# भाग चौथा

## प ते भ्रामकगतियंत्र

संपादक :

यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए., एल्एल्. बी.

चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

संपादक— ज्ञानकोश, शब्दकोश, वाक्संप्रदायकोश, शास्त्रीय परिभाषाकोश, इत्यादि.

१ जून १९५०

किंमत २५ रुपये

# सुलभ विश्वकोश—

भाग ४ था आज प्रसिद्ध होत आहे. राहिलेले दोन भाग बहुधा या वर्षअखेर प्रसिद्ध होऊन संकल्पिल्या-*प्रमाणें एवढें मोठें प्रकाशन माझ्या हातून पूर्ण होत* आहे. अर्थात् सुलभ विश्वकोशाचे आगाऊ ग्राहक आणि विशेषतः राजगुरु प्रेस यांस याचें श्रेय आहे. आपलीं नेहमींचीं कामें संभाळून सुलभ विश्वकोशासारखें काम इतकें नियमित करून देणें हें या दिवसांत खरोखरच अवघड आहे. पण तें होत आहे हेंहि खरें.

**सुलभ विश्वकोशाचा** पुरवणी विभाग म्हणून 'संयुक्त-महाराष्ट्र-परिचय' हा ग्रंथ काढण्याचें ठरवीत आहें. त्यांत संयुक्त महाराष्ट्राची सर्वांगीण माहिती येणार असून शिवाय संयुक्त महाराष्ट्रांतील कर्तबगार माणसांचीं चरित्रेंहि त्यांत देण्याचा विचार आहे. आपल्या गांवीं अगर शहरीं अशीं जीं माणसें असतील त्यांची यादी अगत्यपूर्वक कळविल्यास फार आभारी होऊं.

या कोशाचे संपादक श्री. य. रा. दाते व श्री. चिं. ग. कर्वे यांचेहि आभार मानणें अवश्य आहे. 'संपादकीय खोळंबा' त्यांच्याकडून अद्याप झाला नाहीं. अर्थात् पुढेंहि होणार नाहीं, अशी अपेक्षावजा खात्री आहे.

सुलभ विश्वकोशामध्यें माहिती देण्याच्या दृष्टीनें कांहीं उणीवा आपल्याला जाणवल्या असल्यास त्याहि आपण अगत्यपूर्वक कळविणें; म्हणजे शक्य व अवश्य वाटतील त्या उणीवा ६ व्या भागांत पुऱ्या करण्याचा प्रयत्न करण्यांत येईल. आपण विश्वकोशाचे ग्राहक झालाच आहांत— अशा मोठ्या कामास ग्राहकांची नेहमींच उणीव भासते. आपणहि कांहीं ग्राहक होऊं शकतील अशा आपल्या मित्रांचीं नांवें कळवून अशा कार्यास हातभार लावण्याबद्दल विनंति आहे.

पुणें,
१० जून १९५० }

आपला कृपाभिलाषी
यशवंत गोपाळ जोशी

## वाङ्मयनिधि

एक लाख रुपयांचा वाङ्मय-निधि जमा करून त्याचें येणारें व्याज अदमासें **तीन हजार** रुपये दरवर्षी मराठींतील एका साहित्य-सेवकाला पारितोषिक म्हणून देऊन त्याच्या वाङ्मय-सेवेचें चीज करावें या कल्पनेनें मीं हा निधि सुरू केला आहे. तो पांच वर्षांत पुरा करावयाचा आहे. त्यांपैकीं तीन वर्षें होऊन गेलीं असून आतांपर्यंत फक्त ८,००० रुपये जमले आहेत. राहिलेल्या दोन वर्षांत ९२,००० रुपये जमावयाचे आहेत.

आपणांस ही कल्पना पसंत असल्यास आपण आपली देणगी शक्य तितक्या लवकर पाठवावी. एका व्यक्तीस हें कार्य अवघड आहे. तेव्हां आपण आपली देणगी—व आपल्या मित्रांकडूनाहि कांहीं देणगी जमवून पाठविल्यास हा निधि संकल्पित मुदतींत पुरा होणें शक्य आहे.

यशवंत गोपाळ जोशी,
वाङ्मय-निधि कार्यालय,
६२३ सदाशिव, पुणें २.

# वि श्व वि का स

## ४

## ग्रीक व रोमन संस्कृति-विकास

### पूर्वावलोकन—

आतांपर्यंत आपण या विश्वाच्या विकासाचें जें अवलोकन केलें त्यात प्रथम खगोलशास्त्र, भूस्तरशास्त्र व जीविशास्त्र-दृष्ट्या या विश्वसंस्थेची व भूगोलाची उत्पत्ति कशी झाली, तीवर केवळ बाष्पमय अथवा वायुमय आवरणापासून हळूहळू जलस्थलनिर्मिति कशी झाली व त्यानंतर जलचर, स्थलचर व खेचर प्राणी कसे निर्माण झाले व जीवविकासक्रमामध्यें सर्वश्रेष्ठ मानवप्राणी कसा निर्माण झाला व त्यानंतर भूगोलावरील निरनिराळ्या भौगोलिक, आंतरिक्ष व विश्वावकाशांतील परिस्थितींमुळें व तज्जन्य हवामानादिकांमुळें व भूपृष्ठरचनेमुळें मानवाचा शारीरिक, बौद्धिक व मानसिक जीवनविकास निरनिराळ्या ठिकाणीं कसकसा होत गेला, निरनिराळे बाह्यतः पृथक् पृथक् दिसणारे मानववंश निरनिराळ्या प्रदेशांत कसकसे उत्पन्न होत गेले व त्यांचा जीवनविकास निरनिराळ्या परिस्थितींत कसकसा होत गेला व त्यामुळें पृथ्वीवरील निरनिराळ्या विभागांत व प्रदेशांत मानवसंस्कृति हळूहळू कसकशी विकास पावत गेली, व त्यामुळें प्राचीन संस्कृतींची वाढ हळूहळू कसकशी होत गेली, पृथ्वीवरील हवामानादिकांच्या फेरफारामुळें मानवप्राणी आपआपल्या मूळ विकासस्थानापासून परिभ्रमण करीत करीत निरनिराळ्या प्रदेशांत कसे गेले व तेथें भिन्न भिन्न सांस्कृतिक अवस्थांत असलेल्या मानवसमूहांचा सांस्कृतिक व सामाजिक संघर्ष कसकसा होत गेला व त्यामुळें भिन्न भिन्न मानवसमूहांत निरनिराळ्या सामाजिक, राजकीय व पारमार्थिक संस्था व संप्रदाय कसे निर्माण झाले हेंहि आपण पाहिलें.

या प्रकारें मानवसमूहामध्यें निरनिराळ्या प्रादेशिक हवामानाप्रमाणें व तदनुकूल आयुष्यक्रमामुळें जे निरनिराळे भेद निर्माण झाले त्यांमुळें त्या मानवसमूहांस निरनिराळीं नांवें प्राप्त झालीं. त्यांनीं आपआपल्या सभोंवतींच्या परिस्थितीप्रमाणें आपआपल्या आयुष्यक्रमाची आंखणी केली व त्याकरिता निरनिराळ्या कला, शास्त्रें, सामाजिक नियम व चालीरीती, तसेंच सांप्रदायिक मार्ग अथवा उपासनापद्धति व शासनविषयक नियम अथवा कायदे निर्माण केले. तसेंच आत्मसंरक्षणाकरितां किंवा आत्मसुखसंवर्धनाकरितां अन्य मानवसमूहाशीं आक्रमण व संरक्षणसंघर्षादि प्रकार केले त्यामुळें युद्धें वगैरे निर्माण झालीं व प्रथम केवळ आत्मरक्षणाकरितां किंवा भरणपोषणाकरितां निर्माण केलेलीं शस्त्रास्त्रें परस्परांवर चालवून मानवसंहारासहि सहाय्य केलें. अशा प्रकारें जे अनेक मानवाचे व्यापार—सुष्ट व दुष्ट पद्धतीचे—परिणत होत गेले त्या सर्व व्यापारांस संकलनात्मक म्हणून संस्कृति असें नामाभिधान देण्यांत आलें. अशा प्रकारच्या कांहीं म्हणजे ईजिप्ती, असुरी, बाबिलोनी, फिनिशियन, यहुदी, ईजिअन, इत्यादि संस्कृतींचें आपण विहंगमावलोकन केलें.

### ग्रीक व रोमन संस्कृति—

आतां या ठिकाणीं प्राचीन कालींच प्रादुर्भूत झालेल्या व आज जरी अंशरूपानें अस्तित्वांत असल्या तरी सलग परंपरेच्या दृष्टीनें नष्ट झालेल्या दोन महत्त्वाच्या संस्कृतींचें अवलोकन आपणांस करावयाचें आहे. त्या म्हटल्या म्हणजे ग्रीक व रोमन संस्कृती या होत.

या दोन संस्कृतींनीं जगांतील मानवाच्या आयुष्यक्रमामध्यें व सामाजिक, आर्थिक, पारमार्थिक, राजकीय वगैरे अनेक बाबतींतील विचारामध्यें फार महत्त्वाचें व चिरकालीन परिवर्तन घडवून आणलें आहे. या दोन संस्कृतींचा ठसा युरोप खंडांतील अनेक राष्ट्रांवर व त्यांच्यामार्फत जगांतील अनेक मानवसमूहांवर उठलेला आहे व मानवाच्या आचार व विचार यांस विशिष्ट वळण लावण्याच्या कामीं या दोन संस्कृतींनीं केलेलें कार्य विशेष महत्त्वाचें आहे. म्हणून एकंदर विश्वविकासामध्यें या दोन संस्कृतींच्या विकासास फार महत्त्वाचें स्थान आहे. याकरितां या दोन संस्कृतींचें आपण थोडेंसें विस्तारानें अवलोकन करूं.

### ग्रीक लोकांचें दक्षिणेंत आगमन—

इंडो-युरोपियन लोकांनीं उत्तरेकडील पठारावरून हळूहळू खालीं येऊन सुपीक चंद्रकोर व नंतर सर्व ईजिप्त देश पादाक्रांत

केला. खि. पूर्व २५०० पासून ५०० पर्यंत या लोकांनीं हळूहळू हे प्रदेश व्यापून टाकले. एखाद्या सैन्यानें स्वारी करणें व कांहीं लोकांनीं बरेच दिवसपर्यंत सतत येत राहून हळूहळू वसाहत स्थापन करणें या दोन गोष्टींमध्यें फरक असतो. या इंडो-युरोपियन लोकांनीं उत्तरेकडील पठारावर व सुपीक चंद्रकोरेमध्यें कायमची वसाहत केली. यामुळें त्या प्रदेशांतील लोकवस्तीमध्येंहि बरीच खळवळ होऊन गेली. या सुपीक चंद्रकोरेंतूनहि कांहीं इंडो-युरोपियन लोक खि. पूर्व २००० वर्षांच्या सुमारास ईजियन समुद्रांतील बेटांकडे जाऊं लागले होते. हे लोक हळूहळू निरनिराळ्या टोळ्यांनीं देशांतर करीत होते. या सर्व निरनिराळ्या जमातींतील लोकांत ग्रीक या सामान्य नांवानेंच संबोधलें जातें.

ज्या वेळीं कांहीं इंडो-युरोपियन लोक कास्पियन समुद्राच्या पूर्वेकडील बाजूनें हळूहळू दक्षिणेकडे येत होते त्याच वेळीं ग्रीक लोक काळ्या समुद्राच्या पश्चिमेच्या बाजूनें हळूहळू दक्षिणेकडे सरकत होते. हे डॅन्यूब नदीच्या दक्षिणेच्या भागापासून हेलेस्पाँट सामुद्रधुनीच्या पलीकडेहि हळूहळू पसरत जाऊन ईजियन समुद्रांतील बेटें व ग्रीस देश यांमध्यें वसाहत करून राहिले. याच लोकांपैकीं कांहीं लोक ईजियन समुद्राच्या पलीकडील युरोपमधील प्रदेशांत वस्ती करून राहिले.

हे लोक गुरांचे व मेंढरांचे कळप पाळून राहत असत व व त्यामध्यें संस्कृतीची प्रगति फारशी झालेली नसून त्यांस लेखनकलाहि अवगत नव्हती. या वेळीं ईजियन समुद्रांतील बेटांत संस्कृतीची बरीच वाढ झालेली असून तेथील लोक आपल्या गलबतांतून सभोंवतालच्या निरनिराळ्या प्रदेशांशीं मोठा व्यापार करीत असत.

### एकीअन ग्रीक—

हळूहळू या नवागत इंडो-युरोपियन लोकांचा टीरीन्स व मायासिनी येथील लोकांशीं संबंध आला असावा व त्यांच्या सुधारणांचा त्यांनीं हळूहळू स्वीकार केला असावा. या प्रथम वसाहत करून राहिलेल्या ग्रीक लोकांस एकीयन असें नांव आहे. अलीकडे उपलब्ध झालेल्या हिटाइट लेखांवरून आशियामायनरच्या दक्षिण किनाऱ्यावर एकीयावा या नांवाचें एक राज्य होते असें आढळून आलें आहे. त्यावरूनच कदाचित् या लोकांस एकीयन हें नांव मिळालें असेल व या प्रदेशासहि एकीया अशी संज्ञा प्राप्त झाली असेल. एकीयन लोकांनंतर जो दुसरा लोकसमाज ग्रीसमध्यें वसाहत करण्यास येऊन पिलोपॉनीसस या प्रदेशांत स्थायिक झाला (खि. पू. १६००) त्यास डोरियन असें नांव देण्यात येतें. डोरियन लोक हे ग्रीसमध्येंच थांबून न राहतां खि. पूर्व १४०० च्या सुमारास ते क्रीट बेटांत उतरले व त्यांनीं तेथील राजांचा पराभव करून क्नॉसस शहराचा विध्वंस केला व सर्वत्र जाळपोळ करून टाकली. यानंतर त्यांनीं इतर दक्षिणेकडील बेटेंहि आपल्या ताब्यांत घेतलीं. खि. पूर्व १२०० ते १००० या कालांत ग्रीक लोकांपैकीं डोरियन लोकांनीं दक्षिणेकडील, अयोनियन लोकांनीं मध्यभागांतील व एओलियन लोकांनीं उत्तरेकडील ईजियन समुद्रांतील सर्व बेटें आणि आशियामायनरचा सर्व किनारा पादाक्रांत केला. याच काळांत ग्रीक लोकांनीं ट्रॉय शहराचा विध्वंस केला.

### ट्रॉय शहराचें उत्खनन—

या ट्रॉय शहराचा इतिहासहि मोठा मनोरंजक आणि इतिहाससूचक आहे. अर्वाचीन काळीं बराच दीर्घकाळपर्यंत हें शहर अगदीं अज्ञात होतें व त्याबद्दल होमरच्या ईलियड या काव्यावरून केवळ कांहीं तर्क करण्यापलीकडे फारशी माहिती नव्हती. तें कोठें असावें याबद्दलहि अनेक मतभेद होते व ज्या ठिकाणीं प्रत्यक्ष त्याचे अवशेष सांपडले त्या ठिकाणच्या लोकांसहि अशा अवशेषांची अथवा नष्ट शहराची मुळींच माहिती नसून त्या प्रत्यक्ष जागेवर तेथील लोक धान्य पिकवीत असत. अशा परिस्थितींत श्लीमन या नांवाच्या एका जर्मन गृहस्थाच्या मनावर होमरच्या काव्याचा लहानपणापासून परिणाम झालेला होता. त्यानें रशिया, न्यू यॉर्क, दक्षिण अमेरिका, वगैरे ठिकाणीं अनेक साहसें व धाडसें करून बराचसा पैसा जमवल्यानंतर सन १८६८ सालीं तो ट्रॉय शहराच्या शोधासाठीं आशिया मायनरमध्यें गेला तेथें त्यानें हिसार्लिक नांवाच्या गांवाजवळ एक १२५ फूट उंचीचें टेंकाड पाहिलें व त्या ठिकाणीं १८७० मध्यें उत्खनन करण्यास आरंभ केला. तो जमिनीच्या पोटांत ५० फूटपर्यंत गेला. तेथें त्यास खरा जुन्या जमिनीचा पहिला खडकाळ माथा लागला व तोहि ७५ फूट उंचीच्या एका टेंकडीचा माथा होता. या पन्नास फुटांत एकाखालीं एक असे त्यास नऊ प्राचीन शहरांचे अवशेष आढळले. या एकंदर नऊ शहरांपैकीं सर्वांत खालचें शहर हें उत्तर पाषाणयुगांतील असून पस्तीसशें वर्षांचें जुनें असावें व सर्वांत वरचें नववें शहर रोमन काळातील असावें असें आढळून आलें. यांपैकीं खालून दुसऱ्या शहरांत तांब्याच्या वस्तू आढळून आल्या. यांपैकीं सहावें शहर हें होमरकालीन ट्रॉय शहर असून त्याचा नाश ग्रीक लोकांनीं खि. पू. १२ शेंच्या सुमारास केला. श्लीमन यास ग्रीक प्रवासी पॉसॅनियस यानें वर्णन केलेल्या ठिकाणींच ॲगॅमेम्नॉनचें थडगें आढळलें व त्यात सोन्याचे मुखवटे आढळले. याप्रमाणें या टेंकाडाच्या पोटांत २५०० वर्षांचा इतिहास सांठविलेला होता.

याप्रमाणें ख्रि. पू. २००० ते १००० च्या दरम्यानच्या काळांत ग्रीक लोकांनीं सर्व ग्रीस देश व ईजियन समुद्रांतील बेटांचा प्रदेश व्यापून टाकला. या ग्रीक लोकांनीं पूर्वीं वर्णन केलेल्या ईजियन संस्कृतीचा नाश करून टाकला व क्रीट बेटांतील आणि आसपासच्या प्रदेशांतील शहरांस आगी लावून दिल्यामुळें तेथील लोक आपलीं घरेंदारें सोडून पूर्वेकडे आशिया मायनरच्या किनाऱ्यावर पळून गेले असावे. यांपैकींच फिलिस्टाइन या नांवाची एक जमात ज्या ठिकाणीं जाऊन राहिली त्या प्रदेशास त्यांच्या नांवावरून पॅलेस्टाइन हें नांव पडलें. ही गोष्ट पूर्वी सांगितलीच आहे.

## ग्रीकेतर इतर नवीन वसाहती—

ग्रीक लोकांनंतर उत्तरेकडून ज्या नवीन टोळया दक्षिणेकडे येऊन आशिया मायनरमध्यें स्थायिक झाल्या त्यांमध्यें फ्रीजिअन व आर्मेनिअन या दोन जमाती प्रसिद्ध होत्या.

उत्तरेकडून वसाहत करण्यास दक्षिणेकडे येणाऱ्या टोळयांपैकीं सार्डीनियन आणि एट्रुस्कन या दोन जमातींच्या लोकांसहि बरेंच महत्त्व देण्यांत येतें. या दोहोंपैकीं विशेषतः सार्डीनियन लोक आपल्याजवळ लांब तरवारी बाळगीत असत. या तरवारींच्या उपयोगामुळें ते उपयुक्त सैनिक समजले जात व त्यामुळें त्यांस ईजिप्तच्या सैन्यांतहि दाखल करून घेण्यांत येत असे.

या सार्डीनियन लोकांच्या टोळयांनीं ईजिप्तमध्यें घुसून वसाहत करण्याचा प्रयत्न केला. परंतु ईजिप्तचा राजा तिसरा रॅमेसिस यानें त्यांच्या आक्रमणास विरोध करून त्यांस उधळून लावलें. या जमिनीवरील व समुद्रावरील लढाईचीं चित्रें ईजिप्तमध्यें खोदलेलीं आढळतात. अखेरीस हे सार्डीनियन लोक गलबतात बसून पश्चिमेकडे जाऊन एका बेटांत स्थायिक झाले व त्या बेटास त्यांच्यावरूनच सार्डीनिया हें नांव पडलें. त्यांचे जोडीदार एट्रुस्कन लोक हे इटलीच्या पश्चिम किनाऱ्यावर जाऊन स्थायिक झाले व तेथें त्यांनीं आपल्या संस्कृतीची स्वतंत्रपणें वाढ केली. अशाच तऱ्हेची एक टोळी सिकेल या नांवाची असून तिनें सिसिली बेटावर वसाहत करून आपलें नांव त्या बेटास दिलें. याप्रमाणें युरोपमध्यें पूर्व दिशेकडून संस्कृतीचा उदय झाला.

हे इंडो-युरोपियन लोक ग्रीक लोकांसुद्धां प्रथम असंस्कृत स्थितींतच होते. यांनीं प्रथम ईजियन संस्कृतीचा व त्या-समुद्राच्या आसपासच्या संस्कृतीचा नाशच केला. तो इतका कीं, क्रीट बेटांतील सर्व लेख नाश पावले, एवढेंच नव्हे तर कांहीं कालपर्यंत या प्रदेशातून लेखनकलाहि नष्ट झाली. ईजियन समुद्रांतील व बेटांतील जे लोक पळून जाऊं शकले नाहींत ते हळूहळू या नवीन लोकांशीं मिसळूं लागले. हे मूळचे लोक भूमध्यसामुद्रिक वंशाचे होते. त्यांचें व ग्रीक लोकांचें पुढें पूर्ण मिश्रण झालें. अर्थात् याबरोबर त्यांच्या भाषांचेंहि मिश्रण झालें.

## आद्य ग्रीक लोक—

ग्रीक लोक जेव्हां प्रथम या प्रदेशांत वस्ती करून राहिले तेव्हां ते पशुपालनवृत्तींतच असून आपल्या गुरांचे व मेंढ्यांचे कळप घेऊन भ्रमण करीत असत. अर्थात् अशा भ्रमणवृत्ती लोकांमध्यें स्थिर अशी राज्यव्यवस्था किंवा शासनसंस्था असणें शक्यच नाहीं. या वेळीं ज्याला सार्वजनिक म्हणतां येईल असें कार्यहि त्यांच्यापुढें नसे. त्यामुळें शासनसंस्थेची त्यांस आवश्यकताहि वाटत नसे. अर्थात् त्या वेळीं कोणाच्याहि मालकीची अशी विशिष्ट जमीन नसल्यामुळें कोणत्याहि प्रकारचे कर त्यांच्यामध्यें देण्याची पद्धत नसे. तेव्हा कोणी अधिकारी नसत, कायदा नसे व खटलेहि नसत. सर्व व्यवहार केवळ काहीं रूढी व चालीस अनुसरून चालत असे. त्यांच्या निरानिराळया जनजाती असत व प्रत्येक जनजातीमध्यें गोत्र अथवा भाईबंद नांवाचा लहान कुटुंबाचा गट असे. जातीसंबंधीं कलह अथवा प्रश्न जातींतील वृद्ध लोक सोडवीत असत व एखाद्या उत्सव-प्रसंगीं सर्व जातींतील लोकांचा मेळावा भरत असे व अशा वेळीं एखादें युद्ध करणें किंवा एक प्रदेश सोडून दुसऱ्या प्रदेशांत वस्तीस जाणें अशा तऱ्हेचे प्रश्न सोडविण्यांत येत असत.

## आद्य ग्रीक समाज—

ईजियन प्रदेशातील मायसिनीसारख्या शहरांशीं संबंध आल्यावर तेथील राजाप्रमाणें आपणांसहि राजा असावा असें त्यांस वाटूं लागलें. त्या वेळीं प्रत्येक जातींतील पुढाऱ्याकडे राजपद देण्यांत आलें व त्याच्या मतानुसार सर्व लोक वागूं लागले. यानंतर हळूहळू ते शेतकी करूं लागले. त्यामुळें त्यांस कायमचीं घरें बांधून एका ठिकाणीं राहावें लागलें. या वेळीं युद्धावर जाणें व गुरें संभाळणें हें काम पुरुषाकडे येऊन शेतीकडे पाहण्याचें काम स्त्रियांवर सोंपविण्यांत आलें. अशा तऱ्हेनें हळूहळू लहान लहान खेडीं अस्तित्वांत आलीं व त्या सभोंवतालची जमीन कांहीं कुटुंबांस वांटून देण्यांत आली. तथापि गांवच्या सर्व जमिनीची मालकी जातीकडेच असे. परंतु हळूहळू ही मालकी कांहीं कुटुंबांकडे येत गेली. अर्थात् अशा वेळीं सीमाविषयक, वारसाविषयक व इतर तंटे सुरू झाले.

हे सोडविण्याकरिता शासनसंस्थेची आवश्यकता भासूं लागली. ख्रि. पूर्व १००० ते ६०० या दरम्यानच्या काळांत ग्रीसमध्यें

जमिनीच्या मालकीमध्यें श्रीमंत व गरीब असे दोन वर्ग निर्माण होऊन त्यामध्यें तंटे चालत असलेले दृष्टीस पडतात. या लोकांत या वेळीं लेखनकला प्रचलित नसल्यामुळें निरनिराळे निवाडे व करार लिहून ठेवणें शक्य नव्हतें. याकरितां कांहीं गांवांतून एक आठवण ठेवणारा मनुष्य म्हणून "आठवणे" तयार करावा लागला व त्याचेकडे निरनिराळ्या करारांतील अटी, कर्जाची रक्कम, शेजारच्या लोकांशीं केलेल्या तहांच्या अटी, वगैरे गोष्टी ध्यानांत ठेवण्याचें काम असे. कालांतरानें लहान लहान खेडीं एकत्र येऊन त्यांचीं शहरें बनलीं.

## आद्य ग्रीक संस्कृति—

ग्रीक लोक जेव्हां ग्रीस देशांत स्थायिक झाले तेव्हा त्यांस हिटाइट लोकांप्रमाणेंच खिस्तपूर्व १३ व्या शतकांत पूर्वेकडील देशांतून लोखंडाचीं हत्यारें मिळूं लागलीं. अर्थात् प्रथम प्रथम हीं दुर्मिळ व परदेशी वाटत असत. एका एस्क्युलस नांवाच्या ग्रीक कवीनें त्यास 'समुद्रापलीकडील' अथवा 'परकीय' असेंच नांव दिलें आहे. परंतु हळूहळू लोखंडी हत्यारांचाच प्रघात ग्रीसमध्यें वाढत गेला व खि. पूर्व १००० च्या सुमारास तो सार्वत्रिक झाला. यावरून ईजियन संस्कृतीस ताम्र किंवा कांस्ययुगीन संस्कृति आणि ग्रीक संस्कृतीस लोहयुगीन संस्कृति असें म्हणतां येईल. ग्रीक लोक हे प्रथम असंस्कृत असल्यामुळें पूर्वींच्या ईजियन लोकांनीं केलेलीं मोठमोठीं बांधकामें त्यांस अजस्र वाटून तीं सायक्लॉप्स नांवाच्या मोठमोठ्या राक्षसांनीं केलीं असावीं अशी त्यांची समजूत झाली. ग्रीक लोकांमध्यें इमारती बांधणें, निरनिराळे उद्योगधंदे करणें व कारखाने काढणें या गोष्टी फारच हळूहळू प्रचारांत आल्या. कारण प्रारंभीं त्यांच्यामध्यें कारागिरीचें कौशल्य मुळींच नव्हतें. प्रथम प्रथम त्यांच्या राजाचींहि घरें कच्च्या विटांचीं असून त्यांमध्यें त्यांचीं गुरेंहि बांधीत असत.

ग्रीक लोकांस जरी स्वतः कारागिरीच्या वस्तू तयार करतां येत नव्हत्या तरी ते त्या फिनीशियन लोकांपासून विकत घेत असत. फिनीशियन लोकांकडून ते वस्त्रेंहि विकत घेत. यामुळें त्यांचा पोषाखहि फिनीशियन लोकांप्रमाणेंच बनला व त्यावरून केटन हा फिनीशियन शब्द त्यांच्या पैरणीस रूढ झाला. ग्रीक लोकांनीं फिनीशियन लोकांपासून लेखनकला व वर्णमाला घेतली, परंतु त्या वर्णमालेंत त्यांनीं थोडी सुधारणा केली. मूळ फिनीशिअन लिपींत स्वरचिन्हें मुळींच नव्हतीं तेव्हां ज्या फिनीशिअन अक्षरांचे उच्चार ग्रीक भाषेंत नव्हते त्या अक्षरांचा उपयोग त्यांनीं आपल्या भाषेंत आवश्यक असलेल्या स्वरचिन्हांकरितां केला. फिनीशियन लोकांच्या वर्णमालेंत फक्त २१ वर्ण होते. वर्णमालेबरोबर कागद, शाई आणि लेखणी याहि गोष्टी ग्रीक लोकांनीं फिनीशियन लोकांपासून घेतल्या व त्यामुळें पपायरसपासून होणाऱ्या कागदास त्याच शब्दावरून बनलेला पेपर हा शब्द सर्वत्र रूढ झाला व तो आजहि प्रचलित आहे.

ग्रीक लोक हे लढाऊ वृत्तीचे असून लुटालूट करीत असत. यांचीं नेहमीं आपसांत युद्धें चालू असून एखादें शहर जिंकून घेतलें म्हणजे तेथील लोकांस गुलाम करण्याची पद्धत असे. त्यांस शूर वीरांच्या पराक्रमाचीं गाणीं रचण्यांत, म्हणण्यांत आणि ऐकण्यांत मोठा आनंद वाटत असे. त्यामुळें अशा तऱ्हेच्या पोवाडे रचणाऱ्या कवींचा वर्ग ह्या लोकांत निर्माण झाला. हे लोक राजांच्या व मोठमोठ्या सरदारांच्या घरीं मेजवानीच्या प्रसंगीं असे पोवाडे गात असत. अशा तऱ्हेचीं पुष्कळ गाणीं जमत जाऊन त्यांचे गाथे तयार होत गेले. होमरचीं ईलियड व ओडेसी हीं अशाच तऱ्हेचीं गाथात्मक काव्यें आहेत. हीं काव्यें ग्रीक लोक एखाद्या धार्मिक ग्रंथाप्रमाणें पठण करीत व गाऊन दाखवीत असत.

## आद्य ग्रीक धर्मविषयक कल्पना—

होमरचीं काव्यें ग्रीक तरुणांच्या शिक्षणांतील एक महत्त्वाचा भाग बनलीं. या काव्यांमुळें ग्रीक तरुणांच्या मनावर त्यांतील देवांच्या चारित्र्याचा ठसा उमटूं लागला व त्याचा परिणाम त्यांच्या धार्मिक समजुतींवरहि घडून आला. प्रत्येक ग्रीक मनुष्याला सामान्यतः असें वाटत असे कीं, प्रत्येक झाड, झरा, पर्वताचें शिखर, पशु-पक्षी, वगैरेमध्यें एक अद्भुत शक्ति असते. पृथ्वीमध्यें कांहीं तरी अशी अद्भुत शक्ति असल्यामुळें धान्य उगवतें व झाडें वाढून त्यांस फुलें-फळें येतात. याप्रमाणेंच समुद्र आणि आकाश यांमध्येहि अशा कांहीं दिव्य शक्ती असतात. आकाशामध्यें उंच उडणारा गरुड ही जणुं कांहीं एक शक्ति आहे असें त्यास वाटत असे. या निरनिराळ्या शक्ती आपणांस प्रतिकूल किंवा अनुकूल असतात व त्या प्रतिकूल असल्यास त्यांत कांहीं तरी उपायन दिल्यास त्या आपणांस अनुकूल होतात अशी त्यांची समजूत असे व अशा तऱ्हेनें तो त्यांस संतुष्ट करण्याचा प्रयत्न करीत असे. त्या वेळीं अर्थात् देवळें नव्हतीं. परंतु हे लोक उघड्यावरच देवतांची उपासना करीत. ग्रीक लोकांची प्रथम झ्यूस ही आकाशदेवता परंपरागत होती. पुढें ईजियन लोकांपासून त्यांनीं डेमीटर अथवा भूमाता ही देवता घेतली. ग्रीक लोकांमध्यें निरनिराळ्या देवतांस अनुलक्षून अनेक निरनिराळ्या पौराणिक कथा प्रचलित झाल्या. अर्थात् सर्व देवतांमध्यें ऑलिंपस पर्वतावरील वज्रधारी झ्यूस हा मुख्य देव होता. अपॉलो हा सूर्य देव होता. तसाच तो पशुपालकांचाहि देव होता. हा देव ग्रीक लोकांत अतिशय लोकप्रिय झाला. अथीना ही

प्रथम वायुदेवता असून वादळांचें नियंत्रण करते अशी समजूत असे. परंतु पुढें ती शांततेच्या काळांतहि अनेक कारागिराची देवता बनली. या देवतेनें त्यांस ऑलिव्ह झाडाचें ज्ञान करून दिलें व त्यामुळें ती उद्योगधंदे आणि कलांची देवता बनली. ही झ्यूसच्या मेंदूपासून उत्पन्न झाल्यामुळें बुद्धीची देवता होती अशीहि ग्रीक लोकांची समजूत असे.

पॉसिडन् या नांवाची एक समुद्रदेवता असून द्राक्षांची देवता डायोनिसस नांवाची होती. ती त्यांस मद्य पुरवीत असे. हर्मीस हा देवांचा दूत होता, तसाच तो व्यापार व दळणवळणाचाहि अधिपति होता. चंद्रदेवतेस कोणी रात्रीची शिकारी देवता म्हणून आर्तेमिस् असें नांव देत, तर कोणी चंद्र ही हिरा नांवाची झ्यूसची पत्नी आहे असें मानीत व ती विवाहदेवता आहे असेंहि समजत. सेमिटिक लोकांची ईस्टर ही देवता ग्रीक लोकांत आफ्रोडिटी या नांवानें प्रेमदेवता बनली.

या सर्व देवतांस मानवरूपें आहेत अशी कल्पना असल्यामुळें होमरच्या काव्यांत त्यांचे आपसांतील कलह वगैरे वर्णन केले आहेत. ग्रीक लोकांची कल्पना मृत्यूनंतर मनुष्य अंधकारमय पाताळांत जातो अशी असे. या ठिकाणीं प्लूटो ही देवता असून त्याची पत्नी पर्सीफोनी या नांवाची होती. या ठिकाणीं शूर व पराक्रमी लोकांस एलीशियन नांवाच्या रम्य प्रदेशांत ठेवण्यांत येत असे अशी समजूत होती. ग्रीक लोक मृतास जाळीत असत. परंतु त्यांनीं ईजिप्त व युरोपमधील लोकांपासून प्रेतें रक्षण करण्याची व पुरण्याचीहि पद्धत स्वीकारली. मृतास अन्नपाणी द्यावें लागतें हीहि समजूत त्यांच्यांत रूढ होती. त्यामुळें पूर्वजांच्या थडग्यास मान देऊन तेथें अन्नउदक पुरविण्याची पद्धत चालू होती. ग्रीक मनुष्याच्या प्रत्येक घरांत हेस्तिया नांवाची एक रक्षक देवता असे. राजाच्या राजवाड्यामध्यें हिच्याकरितां एक स्वतंत्र खोली राखून ठेवण्यांत येत असे. तसेंच मुख्य चौकामध्यें एक स्थंडिल असून त्यावर हवि अर्पण करण्यांत येत असत. अद्यापि देवळें बांधण्यास सुरुवात झाली नव्हती. परमेश्वराची इच्छा जाणण्याचें सामर्थ्य कांहीं विशिष्ट लोकांत असतें अशीहि त्या वेळीं समजूत होती व अशा लोकांस देवांची उपासना कोणत्या तऱ्हेनें करावी हें ज्ञान असल्यामुळें त्यांच्या हातूनच पूजा व यज्ञ करण्यांत येत असत. त्यामुळें ते साहजिकच पुरोहित बनले.

### ग्रीस देशांतील नगरराज्यें—

ग्रीस देशाचा पृष्ठभाग पर्वतांच्या रांगा व मोठमोठे उपसागर यांनीं व्यापलेला आहे. या देशांत मोठमोठीं मैदानें किंवा मोठ्या नद्याहि नाहींत. ज्या नदींतून नौकानयन करतां येईल अशी एकहि नदी ग्रीसमध्यें आढळत नाहीं. त्यामुळें ग्रीस देशामध्यें जी प्रथम वस्ती झाली ती सलग न होतां निरनिराळ्या ठिकाणीं जमावाजमावानें झाली. ही वस्ती कांहीं नद्यांच्या उतारावर, कांहीं उपसागरांमध्यें व कांहीं डोंगरमाथ्यावर अशी होत गेली व यामुळें ग्रीसमध्यें प्रथम नगरराज्यें स्थापन झालीं. या निरनिराळ्या नगरांमध्यें पर्वत किंवा समुद्र असल्यामुळें त्यांचा परस्पर संबंध फारसा नसे. या नगरांभोंवतीं फारशी सपाट जमीन नसल्यामुळें जसजशी लोकवस्ती वाढूं लागली तसतसें त्यांस अन्नाचें दुर्भिक्ष भासूं लागलें. यामुळें नगरांतील लोकांस समुद्रावर मासे मारण्याकरितां किंवा आपलीं गुरें चारण्याकरितां अथवा धान्य पिकविण्याकरितां दुसऱ्या प्रदेशांत जाणें आवश्यक वाटूं लागलें. यापैकीं कांहीं लोक व्यापारी बनले तर कांहीं लोक लुटालूट करूनच संपत्ति मिळवूं लागले. प्राचीन लोकांत व्यापारी व लुटारू यांमध्यें फारसा फरक नसे. भूमध्यसमुद्रांत उत्तरेकडून थंड वादळी वारे वाहतात व दक्षिणेकडून सहारा वाळवंटावरून उष्ण वादळी वारे वाहत असतात. त्यामुळें या समुद्रांत गलबतें चालविणें कठिण असतें व त्या वेळीं या लोकांजवळ अर्वाचीन साधनेंहि नव्हतीं. त्यामुळें त्यांस निरनिराळ्या प्रदेशांची व हवामानाची फार बारकाईनें माहिती करून घ्यावी लागे. याकरितां तत्कालीन ग्रीक मनुष्य उघड्या समुद्रावर जाण्याचें धाडस फारसें करीत नसे. अनेक शतकेंपर्यंत त्याच्या गलबतास नांगरहि नसे. त्यामुळें बहुधा तो रात्रीचा प्रवास करीत नसे व संध्याकाळीं गलबत किनाऱ्यावर ओढून ठेवीत असे. ग्रीक लोकांची प्रथम आशिया मायनरमध्यें वस्ती होती. तेथील मिलेटस या शहरांतून अनेक लोक वसाहती करण्याकरितां अनेकदां बाहेर पडले आहेत व अशा रीतीनें त्यांनीं ८० पासून ९० पर्यंत वसाहती स्थापन केल्या.

ग्रीक लोकांनीं आपला व्यापार व वसाहतीचें कार्य जसजसें वाढवीत नेलें, तसतसा त्यांच्या आयुष्यक्रमांतहि विकास होत गेला. शेतीची जमीन कमी पडूं लागल्यावर जमिनीचे मालक आणि ती खंडानें करणारीं कुळें असा फरक उत्पन्न होत गेला. जमिनीचा खंड प्रथम धान्यरूपांत व पुढें नाण्यांमध्यें देण्याचा प्रघात पडला. त्यामुळें नाणीं प्रचारांत अधिकाधिक येत गेलीं व त्यांचा व्यापारांतील देवघेवींतहि उपयोग होऊं लागला. वेळेवर पैसा नसल्यास कर्ज काढावें लागून धनको व ऋणको असे वर्ग समाजांत निर्माण झाले. यामुळें समाजांतील निरनिराळ्या थरांत अंतर पडूं लागून सधन व निर्धन वर्ग निर्माण झाले. अर्थातच समाजांत खळबळी होऊं लागल्या व अशा वेळीं कोणी तरी जबरदस्त मनुष्य पुढें येऊन तो सर्व सत्ता आपल्या हातांत

घेऊन लोकावर राज्य करूं लागला. अशा मनुष्यास प्रथम टायरंट असें म्हणूं लागले.

## टायरंट अथवा एकतंत्री पुढारी—

अशा तऱ्हेनें कॉरिन्थ या शहरांत ब्रॉकीअडे या कुटुंबांत ९० वर्षें राजसत्ता राहिली. या घराण्यांतील सत्ता त्याच घराण्यांत उत्पन्न झालेल्या लॅब्डा नांवाच्या कुरूप मुलीचा मुलगा सिपसेलस यानें हिसकावून घेतली व तीस वर्षें तिचा उपभोग घेतला. यानें ॲड्रीॲटीक समुद्रांत अनेक वसाहती स्थापन केल्या व कॉर्सीरा या शहरावर आपला अमल बसविला. याचा मुलगा पेरिॲंडर यानें ४४ वर्षें राज्य केलें. तोहि आपल्या बापाप्रमाणेंच क्रूर होता. अशा तऱ्हेचे बरेच एकतंत्री राजे त्या वेळीं ग्रीस देशांत होऊन गेले. हे स्वार्थी, आपमतलबी, क्रूर व भांडखोर असत असा त्यांच्यावर आक्षेप घेण्यांत येतो. परंतु यापैकीं कांहीं राजे सुसंस्कृत असून नवीन नवीन कल्पना ग्रहण करण्यास उत्सुक असत. यांपैकीं कांहीं राजांनीं उत्कृष्ट कामें केलीं आहेत. उदा., सॅमॉस येथील ऑलीक्रॅटीस हा प्रथम चांचा होता, पण राजा झाल्यावर त्यानें सॅमॉस येथें एका डोंगरांत भोगदा पाडून पाणी आणलें. पिसीस्ट्रॅटम् यानें अथेन्समध्यें कारंजीं बसविलीं व तेथून गांवास पाणी पुरविण्याची व्यवस्था केली. तसेंच त्यानें सर्व जमीनदार वर्ग नाहींसा करून शेतकरी लोकांस जमीन वांटून दिली. अशा राजांनीं उद्योगधंदे, व्यापार व वसाहती यास उत्तेजन दिलें. आपल्या शहरांतील लोकांस काम देण्याकरितां या लोकांनीं मोठमोठीं शिल्पकामें करून ग्रीक शिल्पकलेची वाढ केली. मोठमोठीं देवळें बांधलीं. मोठमोठे उत्सव-समारंभ करण्याची प्रथा पाडली. या उत्सव-समारंभांमुळें नाटकें करण्याची प्रथा पडून चित्रकला, शिल्प व इतर कलांस उत्तेजन मिळालें. या राजांच्या हातांत फार झालें तर दोन किंवा तीन पिढ्या सत्ता टिकत असे व त्यानंतर पुन्हां योग्य मनुष्याकरितां त्याची जागा रिकामी होत असे. अशा ग्रीक घराण्यांपैकीं एकच घराणें एक शतकपर्यंत टिकलें.

वर म्हटल्याप्रमाणें ग्रीस देशामध्यें पर्वतांच्या रांगा व उपसागर यांच्या योगानें आंतील प्रदेशाचे एकमेकांपासून विभक्त असे निरनिराळे तुकडे पडले आहेत व त्यामुळें ईजिप्त, सुमेर व अक्कड या प्रदेशांतील निरनिराळीं नगरराज्यें एक होऊन कांहीं दिवसांनीं त्यांचें जसें राष्ट्र बनलें तसें ग्रीस देशांत घडून आलें नाहीं. यामुळें ग्रीस देशांतील निरनिराळ्या लोकांत निरनिराळ्या सामाजिक रीती एवढेंच नव्हे तर भिन्न भिन्न भाषाहि प्रचलित झाल्या परंतु ग्रीस देशाच्या मुख्य भूमीचे सामान्यतः लॅकोनिया, ॲटिका, बिओशिया व अरगॉस असे निरनिराळे चार स्वाभाविक भाग पडतात व तेवढ्या तेवढ्या भागांतील नगरराज्यांचें एकीकरण घडून आलें. अशा तऱ्हेनें बनलेलें सर्वांत जुनें राष्ट्र म्हटलें म्हणजे अरगॉस हें होय. अरगॉसच्या राज्यामध्यें मायसेनी व टिरीन्स येथील नष्ट झालेल्या शहरांचे अवशेष व इतर नगरराज्यें यांचा अंतर्भाव होत असे. स्पार्टाच्या राजांनीं त्यांच्या दक्षिणेकडील दोन्ही द्वीपकल्पें व मेसेनियाचा भाग जिंकून एक राष्ट्र बनविलें. अथेन्स शहरानेंहि ॲटिका प्रांतांतील शहरें आपल्या राज्यात अंतर्भूत करून घेतलीं. ॲटिका प्रांताच्या उत्तरेकडील भाग बिओशियामधील थिबीज या शहराच्या वर्चस्वाखालीं आला. यापैकीं स्पार्टा व अथेन्स यांस विशेष प्रामुख्य असे व जरी यांचा प्रदेश विस्तृत झाला तरी त्यांचें स्वरूप नगरराज्यांचेंच राहिलें व सर्व ॲटिका प्रांतांतील लोकांस अथेनियन असेंच म्हणत.

या वेळीं ग्रीक शहरांत राजांची एकतंत्री सत्ता असे. एवढेंच नव्हे तर उमराव लोकहि लोकांस पिळून काढीत असत. या उमराव लोकांनीं मोठमोठाल्या जमिनी व संपत्ति मिळविली होती. हे लोक आपल्या जमिनीवर न राहतां राज्यकारभारांत हात असावा म्हणून शहरांत राहत असत. यांस युपॅट्रीड असें म्हणत. येथील राजसभांत याच वर्गातील सभासद असत. उत्तम उत्तम हत्यारें घेण्यास यांच्याजवळ विपुल पैसा असे व अभ्यास करून युद्धकलेंत निपुण होण्यास भरपूर वेळहि असे. यामुळें राष्ट्राच्या संरक्षणाच्या कामीं किंवा युद्धप्रसंगीं यांचा फार मोठा उपयोग होत असे. ते बलिष्ठ असल्यामुळे लुटालूटहि करीत असत. हे हळूहळू गलबतें बाळगून चांचेगिरी करून बरीच संपत्ति मिळवूं लागले. यामुळें शहरांतील श्रीमंत लोक व जनपदांतील शेतकरी लोक यांच्यामध्यें अधिक अधिक अंतर पडूं लागलें. ग्रामीण लोकांमध्यें कुटुंबातील जमिनीच्या वांटण्या होऊन त्यांचीं शेतें लहान लहान होत गेलीं व ते हळूहळू गरीब होत चालले. त्यांस हत्यारें विकत घेण्यास पैसाहि नसे व तीं वापरण्यास शिकण्यास फुरसतहि नसे. हळूहळू हे शेतकरी कर्जबाजारी होत जाऊन आपल्या जमिनी विकून मजूर किंवा स्वतःस विकून गुलामहि बनूं लागले. अर्थात् या मजूर किंवा गुलामांस कोणतेच हक्क नसत व त्यांस मतहि नसे.

शहराबाहेरील शेतकऱ्यास राजसभेमध्यें जाऊन भागहि घेणें शक्य नसे. कारण त्यास तेथे जाण्यास वेळ नसे व या सभामध्यें श्रीमंत लोकांचें इतकें वर्चस्व असे कीं, तेथें गेल्यापासून कांहीं उपयोगहि होत नसे. या उमरावांनीं केवळ लोकांवरच नव्हे तर राजावरहि आपलें वर्चस्व स्थापन केलें. कारण युद्धप्रसंगीं राजासहि त्यांच्यावांचून गत्यंतर नसे. यामुळें राजेहि हळूहळू नामधारी बनत गेले, कांहीं ठिकाणीं हे उमराव लोक

राजास पदच्युत करून आपल्यांतील कांहीं लोक निवडून अशा लोकसभेमार्फत राज्यकारभार पाहूं लागले. अथेन्समध्यें युद्धाकरितां एक सेनापति व इतर दिवाणी कामाकरितां आर्कन नांवाचा पुढारी नेमण्याची प्रथा पडली. स्पार्टा शहरात दोन राजे निवडण्याची पद्धत पडली. इतरहि नगरराज्यांतून ख्रि. पूर्व ७५० ते ६५० या काळांत राजे नष्ट झाले. अर्थात् यामुळें उमराव लोकांची सत्ता वाढली. या काळांत पूर्वी जेथें राजवाडे होते तेथें देवळें बांधण्यांत आलीं.

## ग्रीसमधील उमरावशाही—

उमरावशाहीच्या काळांत उमराव लोक चांचेगिरीचा धंदा करीत असल्यामुळें ते त्याकरितां गलबतें बांधूं लागले. हीं गलबतें ते प्रथम फिनिशियन लोकांच्या गलबतांसारखीं बांधीत असत. परंतु पुढें पुढें त्यांनीं त्यांत सुधारणा केली. या वेळीं ग्रीस देशातील लोकांचा आशियांतील लोकांशीं फार मोठ्या प्रमाणावर व्यापार चालत असे. या व्यापारांत आशियांतील आयोनियन ग्रीक व युरोपमधील अॅटिका व यूबिया येथील ग्रीक प्रमुख असत.

ग्रीक शेतकरी लोकांवर जो उमरावांचा जुलूम होऊं लागला त्यामुळें वर उल्लेखिलेल्या आशियांतील मिलेटस येथील लोकांप्रमाणें त्यांच्यांतहि नवीन नवीन प्रदेशांत जाऊन वसाहती करून राहावें ही प्रवृत्ति सुरू झाली. याप्रमाणें ख्रिस्तपूर्व ६०० च्या सुमारास काळ्या समुद्राच्या सभोंवतीं ग्रीक लोकांच्या बऱ्याच वसाहती स्थापन झाल्या व यांमार्फत काळ्या समुद्राकडून ग्रीस देशांत धान्याचा पुरवठा होऊं लागला. सायप्रस बेट तर या ग्रीक लोकांनीं ख्रिस्तपूर्व १३०० मध्येंच व्यापलेलें दिसून येतें. तसेंच ईजिप्तमध्यें नाईल नदीच्या मुखप्रदेशात नोक्रॅटीस येथें व पश्चिमेकडे सायरीनी येथें वसाहती स्थापन केल्या. तसेंच त्यांनीं जाऊन इटलीच्या दक्षिण भागांतहि वसाहती स्थापन करून त्यास बृहत्ग्रीस (मॅग्नाग्रीशिया–ग्रेटरग्रीस) असें नांव दिलें. त्यानंतर त्यांनीं सिसिलीमध्यें जाऊन तेथील फिनीशियन लोकास हांकलून देऊन आपल्या वसाहती वसविल्या. यांपैकीं सायरॅक्यूज येथील वसाहतीस पुढें फार महत्त्व आलें. यापुढें फ्रान्सच्या किनाऱ्यावर मार्सेलिस येथेंहि वस्ती करून ऱ्होन नदीच्या खोऱ्याशीं त्यांनीं व्यापार सुरू केला.

## हेलेनी संस्कृति—

वर सांगितल्याप्रमाणें ग्रीक नगरराज्यें व त्यांचीं बनलेलीं राष्ट्रें एकत्र न येता जरी विभक्त राहिलीं तरी त्यांच्यामध्यें एक नवीनच आत्मीयतेचें बंधन निर्माण झालें. तें म्हणजे त्यांचा धर्म व त्यांनीं सुरू केलेले धार्मिक खेळ हें होय. ख्रि. पूर्व ७७६ पासून ऑलिंपिया येथें अपॉलो देवतेच्या उत्सवानिमित्त दर चार वर्षांनीं मोठ्या प्रमाणावर उत्सव, खेळ व शर्यती होत असत. या उत्सवांत व खेळांत सर्व ग्रीक शहरांतील लोक भाग घेत असत. हे लोक जरी निरनिराळ्या पोटभाषा बोलत तरी त्यांची मूळ भाषा ग्रीक हीच असल्यामुळें ते आपणांस एकभाषीच समजत व त्यांचें बोलणेंहि एकमेकांस समजत असे. तसेंच या उत्सवाकरितां रचण्यांत आलेलीं मोठमोठीं काव्यें त्यांस स्फूर्ति देत. यामुळें या लोकांत चालीरीती, धर्म, भाषा व परंपरागत कथा यांमुळें एक प्रकारचें ऐक्य वाढत गेलें व ते आपणांस हेलेनीज असें म्हणूं लागले.

तथापि या लोकांत स्वतःच्या शहराचा स्थानिक अभिमान फार असे व एका शहरांतील मनुष्य दुसऱ्या शहरांत अगदीं परका समजला जात असे. याकरितां निरनिराळ्या शहरात आपल्या नगरवासी लोकांचे हितसंबंध संरक्षण करण्याकरितां प्रतिनिधी ठेवलेले असत.

या लोकांत हळूहळू मनुष्याचीं वैयक्तिक कर्तव्यें व आचरण यांसंबंधीं विचार उत्पन्न होऊं लागले व सदाचाराकडे अधिक अधिक प्रवृत्ति वाढूं लागली. ग्रीक लोक आपआपसात जमून निरनिराळ्या विषयांची चर्चा करूं लागले. हेसीअड या ग्रंथकारानें प्रथम गरिबांचीं दुःखें वेशीवर टांगण्यास सुरवात केली.

ग्रीक लोकांमध्यें जे निरनिराळे उद्योग सुरू झाले त्यांत निरनिराळ्या तऱ्हेचीं भांडीं करण्याचा उद्योग मोठा होता. अशा तऱ्हेच्या भांड्यांत व इतर जिनसांस त्यांच्या वसाहती व त्या वसाहतींस लागून असलेला प्रदेश यातून मोठ्या प्रमाणावर मागणी येऊं लागली. यामुळें ग्रीक लोकांचा व्यापार वाढूं लागला. या वेळीं ग्रीसमधील सॅमॉस येथील भांडीं फार प्रसिद्ध असत. जसजसा व्यापार व मालाची मागणी वाढूं लागली तसतशी व्यापारी लोकांस मजुरांची व कारागिरांची अधिक अधिक जरूरी भासूं लागली. याकरितां ते गुलाम विकत घेऊं लागले. यामुळें कारखानदारीबरोबर गुलामगिरीहि ग्रीस देशांत वाढत गेली. तसेंच मोठ्या प्रमाणावर माल बाहेर पाठवण्याकरितां मोठमोठीं गलबतेंहि बांधण्यांत येऊं लागलीं. याच वेळीं आशिया मायनरमधील लिडिया शहरांत चांदीच्या नाण्यांचा प्रसार झाल्यामुळें व्यापारांत अधिक सुकरता आली. नाण्यांच्या प्रचारामुळें लोक द्रव्यसंचय करूं लागले व रक्कम कर्जाऊ देण्याघेण्याचा व्यवहारहि वाढत गेला. यामुळें ज्या लोकांजवळ जमिनी नव्हत्या असे अनेक लोक व्यापारामुळें श्रीमंत होऊं लागले.

याप्रमाणें एकीकडे भांडवलदार व जमीनदार वर्ग वाढत असतां दुसरीकडे शेतकरी वर्ग अधिक अधिक दरिद्री होऊं लागला. बहुतेक शेतकऱ्यांचीं शेतें सावकारांकडे गहाण पडलीं होतीं, व सावकार लोक जमिनी ताब्यांत घेऊन कुळांस गुलाम म्हणून विकीत होते व लोकांच्या दारिद्र्याचा श्रीमंत लोक फायदा घेत होते. उमराव लोकांना यांपैकीं कोणत्याच गोष्टीस आळा घालणें शक्य नव्हतें. सामान्य कारागिरासहि स्वतःकरितां शस्त्रें विकत घेणें आतां सुलभ होत चाललें होतें व स्पार्टानें सुरू केलेल्या फॅलँक्स या नवीन पायदळी युद्धाच्या पद्धतीमुळें प्रत्येक सैनिकास महत्त्व येत चाललें होतें. त्यामुळें युद्धांतील रथांचा प्रघात मागें पडत चालला होता. याच वेळीं उमराव लोकांत दुफळी पडत चालली होती व त्यांपैकीं एखादा लोकांचा पुढारी बनून सहज सर्व सत्ता आपल्या हातांत घेऊं शकत असे. अशा तऱ्हेचे सत्ताधारी अथवा टायरंट विशेषतः खि. पूर्व ६ व्या शतकांत आशिया मायनर, युबिया, अथेन्स, कॉरिन्थ वगैरे ठिकाणीं उत्पन्न झाले. एका तऱ्हेनें हे एकतंत्री होते तरी लोकांचे पुढारी होते व कॉरिन्थ येथील पेरीआंडर व अथेन्स येथील पिसिस्ट्रेटस यांसारखे सत्ताधारी तर लोकांच्या हक्कांस मान देऊन उमरावांची सत्ता कमी करून सार्वजनिक उपयोगाकरितां देवळें, बंदरें वगैरे बांधणें, सार्वजनिक इमारती बांधणें व कला, संगीत आणि वाङ्मय यांस उत्तेजन देणें यांसारखीं उपयुक्त कामें करीत होते वगैरे गोष्टी पूर्वीं सांगितल्या आहेतच. या वेळीं पूर्वेकडील देशांत जरी कायदा लिखित स्वरूपांत प्रचलित होता तरी ग्रीसमध्यें अद्यापि तो तोंडी परंपरेनेंच चालत होता. अखेरीस अथीनियन लोकांनीं खि. पूर्व ६२४ मध्यें ड्रेको नांवाच्या गृहस्थाकडून आपली कायद्यांची संहिता बनविली. परंतु हे कायदे इतके निष्ठुर होते कीं, 'ड्रेकोनिक' हा शब्द निष्ठुरतावाचक बनला. क्रीट बेटांत अशा तऱ्हेचे जुने कायदे गोर्टीना येथील न्यायालयाच्या भिंतीवर कोरलेले आढळून आले आहेत.

## सोलन व त्याचे कायदे—

याच सुमारास मेगारा येथील व्यापाऱ्यांनीं सॅलेमिस् हें अथेन्ससमोरील बेट काबीज केलें. तेव्हां अथेन्स येथील लोकांनीं खवळून जाऊन राज्यक्रांति केली व सोलन या नांवाच्या आपल्या पुढाऱ्यास खि. पूर्व ५९४ या सालीं त्यांनीं आर्कन निवडलें व त्यास सर्व सुधारणा करण्यास संपूर्ण सत्ता दिली. त्यानें जमिनीवरील गहाणांचे सर्व हक्क नष्ट करून टाकले व सावकारांचें सर्व कर्ज रद्द ठरवलें. परंतु त्यानें उमरावांची जमीन खालसा करून शेतकऱ्यांच्या म्हणण्याप्रमाणें त्यांच्यामध्यें तिची वांटणी केली नाहीं. परंतु प्रत्येक मनुष्याच्या ताब्यांतील जमिनीच्या क्षेत्राची कमाल मर्यादा ठरविली. कर्जाकरितां गुलाम बनलेल्या लोकांस स्वतंत्र केलें व कर्जाकरितां मनुष्य जामीन देणें मना केलें. तसेंच फिर्यादींत हरलेल्या मनुष्यास पंचांपुढें (ज्यूरीपुढें) अपील करण्याचा अधिकार दिला व याप्रमाणें प्रथम पंचांची पद्धति सुरू केली. त्यानें सर्व लोकांस समान हक्क दिले. सोलनच्या कायद्यांची एक लिखित संहिता बनविण्यांत आली. हे कायदे सौम्य असून त्यांपैकीं कांहीं अद्यापहि प्रचलित आहेत. यानंतर त्यानें एक नवीन राज्यघटना तयार केली व तींत सर्व लोकांस मताधिकार दिला. त्यानें सर्व लोकांचे त्यांच्या संपत्तीप्रमाणें चार वर्ग केले. सर्व उच्च अधिकारांच्या जागा उमराव वर्गांतील लोकांस देण्यांत याव्या असें ठरविलें. व इतर लोकांस खालच्या जागा द्याव्यात असें ठरविलें. याप्रमाणें जरी राजसत्ता उमरावांच्याच हातांत राहिली तरी प्रत्येक नागरिकास मत देण्याचा अधिकार मिळाला. राजसभेबरोबरच एक ४०० लोकांची लोकसभा बनविण्यांत आली. तसेंच एक वयस्कर सभा बनवून तिच्याकडे सल्ला देण्याचें काम देण्यांत आलें. हीस एरोपॅगस असें म्हणत.

सोलन यानें कांहीं काव्यें केलीं आहेत. त्यावरून तो नेमस्त पण निश्चयी वृत्तीचा मनुष्य असावा असें वाटतें. लोकांनीं यास सत्ताधारी नेमल्यावर त्यानें ती सत्ता आपल्या ताब्यांत ठेवण्याच्याऐवजीं कायदे ठरविल्यानंतर त्यांचा अमल कसा होतो हें पाहण्याकरितां तो कांहीं वर्षें परदेशांत जाऊन राहिला. सोलन यानें जरी कांहीं सुधारणा करून अथेन्समध्यें राज्यक्रांति थोडी पुढें ढकलली तरी उमराव लोकांस राज्यकारभारांत फारसा हात न मिळाल्यामुळें ते असंतुष्टच राहिले व त्यांपैकीं पिसीस्ट्रेटस नांवाच्या उमरावानें एकदम हद्दपारीमधून परत येऊन एका भाडोत्री सैन्याच्या साहाय्यानें सर्व सत्ता काबीज केली. यानें अथेन्स शहरांत पुष्कळ सुधारणा केल्या. तेथील व्यापार वाढविला. आणि विशेषतः डायोनिसस या देवतेप्रीत्यर्थ होत असलेला वसंत उत्सव अथेन्स शहरीं आणून त्यानें नाट्य, काव्य व संगीत या कलांस उत्तेजन दिलें. तसेंच एक मोठे आरमार बांधून हेलीस्पाँट सामुद्रधुनीवरील सिजियम हें शहर काबीज करून ती महत्त्वाची सामुद्रधुनी अथेन्सच्या ताब्यांत राहील अशी व्यवस्था केली. पिसीस्ट्रेटस याचे दोन मुलगे हिपार्कस आणि हिपीयस या नांवाचे होते. ते जरी राज्य करण्यास समर्थ होते तरी लोकांस असे स्वयंभू राजे मान्य नसल्यामुळें त्यांपैकीं हिपार्कस याचा खून करण्यांत आला व हिपीयस हा पळून गेला. या वेळीं क्लिस्थेनिस नांवाचा एक उमराव पुढें येऊन त्यानें अथेनियन समाजाची १० स्थानिक

जमातींमध्यें विभागणी केली. यामुळें उमराव लोकांत विभागणी होऊन त्यांस एकजूट करणें अशक्य झालें. नंतर त्यानें लोकसभेंतील प्रतिनिधींची संख्या ४०० होती ती उमराव धरून व १० जमातींच्या अनुरोधानें ५०० केली व त्यांचे ५०-५० चे १० गट करून त्यांनीं प्रत्येकानें एकेक महिना कारभार करावा असें ठरविलें व प्रत्येक मनुष्य आपल्या हयातींत फक्त दोनदांच या सभेंत निवडून यावा असें ठरविलें. त्यामुळें सर्व लोकांत लोकसभेमध्यें येण्याची संधि मिळूं लागली. याच लोकसभेमुळें अथेन्समध्यें लोकसत्ता स्थापन होण्यास मदत झाली. यापुढें कोणी एकतंत्री सत्ताधारी निर्माण होऊं नये म्हणून त्यानें एक असा नियम केला कीं, वर्षातून एक वेळ सर्व लोकांनीं एकत्र येऊन एक एक खापरी घेऊन जो मनुष्य त्यांत नको असेल त्याचें नांव तीवर लिहावें व याप्रमाणें मतदान करून मताधिक्यानें त्यास हद्दपार करण्यांत यावें. याप्रमाणें अथेन्समधून अनेक लोकांस त्यांची महत्त्वाकांक्षा राज्याच्या सुव्यवस्थेच्या आड येत आहे किंवा त्यांस अनियंत्रित सत्तेची हाव सुटली आहे, असा लोकांस संशय आल्याबरोबर हद्दपार केल्याचीं उदाहरणें आहेत. सुप्रसिद्ध सेनापति थेमिस्टॉक्लिस याचें नांव असलेली अशी एक खापरी अलीकडे सांपडली आहे. याप्रमाणें अथेन्समध्यें हळूहळू लोकसत्तेची स्थापना झाली.

त्या वेळीं अथेन्समधील नागरिकांचा दैनिक आयुष्यक्रम कसा असे याचें थोडक्यांत वर्णन पुढें दिलें आहे. त्यावरून अथेन्समधील मध्यमवर्गी समाजाची स्थिति कशी होती याची बरीच चांगली कल्पना येईल.

### अथीनियन नागरिकाची दिनचर्या—

अथीनियन मनुष्य सकाळीं उठला म्हणजे आपल्या घराच्या व्हरांड्यामध्यें न्याहरी करीत असे व नंतर लवकरच बाहेर पडून रस्त्यावर अगर बाजारांत आपल्या ओळखीच्या लोकांस भेटत असे. जेवण आणि झोंप यांखेरीज अथीनियन मनुष्य फारसा आपल्या घरांत कधीं आढळत नसे. त्याचा बहुतेक वेळ घराबाहेर जात असे. तो आपला बहुतेक वेळ रस्त्यावर किंवा बाजारांत आपल्या ओळखीच्या लोकांशीं चर्चा व वादविवाद करण्यात घालवीत असे. स्त्रिया मात्र आपला सर्व वेळ घरामध्येंच घालवीत असत. त्या कधीं बाहेर पडत नसत.

तो आपल्या मित्रांच्या गांठीभेटी घेतल्यानंतर कामाला जात असे. हें काम तो घरांत बसून करीत नसे, तर तो बहुधा कारागीर असून त्याचा कारखाना असे. तेथें त्याचे कांहीं गुलाम व कांहीं उमेदवार काम करीत असत. त्यांच्याबरोबर तो स्वतः काम करीत असे. कारखान्यांतील गुलामांस तो त्यांच्या कामाबद्दल पैसे देत असे व या पैशांतून त्या गुलामास आपलें स्वातंत्र्य विकत घेतां येत असे किंवा पुष्कळ दिवस काम केल्यानेंहि त्यास स्वतंत्रता मिळत असे. त्या वेळच्या कारखान्यास एखाद्या फॅक्टरीपेक्षां स्टुडिओचें स्वरूप असे व तो बहुधा बंद नसून व्हरांड्यासारखा उघडा असे. तिसऱ्या प्रहरीं अथीनियन मनुष्य लोकसभेमध्यें जाऊन राज्यकारभाराच्या कामांत भाग घेत असे. या ठिकाणीं सर्व नागरिकांस मत देतां येत असे व त्याच्या मताप्रमाणें युद्ध, तह, कर बसविणें, वगैरे गोष्टी निश्चित होत असत. लोकसभेंत हजर राहण्याबद्दल त्यास पैसे मिळत. केव्हां केव्हां तो न्यायसभेंत पंच म्हणून बसत असे व त्याबद्दलहि त्यास पैसे मिळत.

सायंकाळीं तो एका मित्राकडे भोजनास जात असे. अशी कांहीं मित्रमंडळी मिळून भोजन करण्याची त्यांच्यामध्यें प्रथा होती. त्या ठिकाणीं कोचावर बसून ते जेवण करीत व गुलामांकडे वाढण्याचें काम असे. भोजनोत्तर मद्य देण्यांत येत असे. या वेळीं कांहीं उच्छृंखल तरुण लोक मद्य पिऊन रस्त्यांतहि दंगल करीत, परंतु बरेचसे लोक निरनिराळ्या विषयांवर चर्चा करीत. ही चर्चा अनेक निरनिराळ्या विषयांवर चाले. त्यांस सर्व विषयांत गोडी वाटे व ते स्वतः निरनिराळ्या गोष्टींवर विचार करीत. त्यांस विचार करण्याचें व ते बोलून दाखविण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असे. अर्थात् अगदीं स्वतंत्र रीतीनें विचार करणारे लोक थोडेच असत. त्यांच्यामध्यें तीव्र जिज्ञासा असल्यामुळें ते मनुष्य, देव, सुष्ट, दुष्ट, वगैरे सर्व गोष्टींविषयीं व लोकांविषयीं चर्चा करीत. या प्रकारें निरनिराळ्या गोष्टींबद्दल आश्चर्य व जिज्ञासा वाटल्यामुळेंच व त्यांबद्दल चर्चा व शोध केल्यामुळेंच त्यांनीं संस्कृतीच्या निरनिराळ्या अंगांचा पाया घातला. त्यांनीं निरनिराळीं शास्त्रें, तत्त्वज्ञान, कला, राजनीति वगैरेस जन्म दिला. बहुतेक पाश्चात्य कला व विज्ञान यांचा जन्म ग्रीक लोकांपासून झाला आहे.

### ग्रीक शहराची रचना—

ग्रीक शहरांतील रचना सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें असे. ग्रीक लोक आपलीं घरें बहुधा हिंदुस्थानांतल्या घरांप्रमाणें चौकोनी बांधीत व मध्यें चौक ठेवून त्यासभोंवतीं खोल्या बांधलेल्या असत. जेव्हां ग्रीक राजे मोठालीं शहरें बांधूं लागले तेव्हां त्यांत रुंद रस्ते ठेवून ते रस्ते एकमेकांशीं काटकोनांत असतील अशी रचना करीत, परंतु जुन्या शहरांतून रस्ते वांकडेतिकडे व अरुंद असत; रस्त्यांच्या बाजूस गटारें नसत. एकाच तऱ्हेच्या मालाचीं दुकानें बहुधा एकाच ठिकाणीं असत व बहुतेक त्याच ठिकाणीं तो माल तयार होत असे.

बाजारांत एक मुख्य चौक असे. त्यास अगोरा म्हणत व तेथें सकाळीं नागरिक लोक जमत. बंदरामध्यें गोद्या व मालाच्या वखारी असत. परदेशी व्यापारी लोकांस उतरण्याकरिता प्रवासी-गृहें असत. बाजारांत अनेक तऱ्हेच्या भाषा ऐकूं येत. बहुतेक प्रत्येक गांवांत एक मजबूत तटबंदी केलेली टेंकडी असे व तेथें संकटकाळीं लोक आश्रय घेत असत. याच टेंकडीवर बहुतेक एक देऊळ असे व राजांच्या काळांत शिबंदी असे.

### आदर्श शहर अथेन्स—

अथेन्स हें आदर्श शहर समजण्यांत येत असे. या शहराचें वर्णन पेरीक्लीस यानें केलें आहे. या शहरांत लोक स्वतंत्र असून लोकसत्ता अधिष्ठित होती. सर्व लोकांची मिळून लोकसभा होत असे व ती कायदे करीत असे. न्यायसभा म्हणजेहि सर्व लोकांचीच बनत असे. परंतु प्रत्येक खटल्याच्या वेळीं सर्व लोकांची सभा बोलावणें अशक्य असल्यामुळें कांहीं लोकाची निवड करून न्यायाचें काम करण्यांत येत असे. सर्व लोकांस सारखा न्याय मिळत असे. निर्धनता ही कोणाच्या मार्गांत आड येत नसे. प्रत्येकास राज्याची सेवा करण्याची संधि असे व प्रत्येकाच्या गुणांची चहा होत असे. सार्वजनिक जीवनक्रमांत सवते सुभे नसत. सर्व लोकांस स्वेच्छेनें वागण्याची मुभा असे व त्याप्रमाणें शेजारच्या लोकांनींहि वागावें अशी अपेक्षा असे. कायदे व न्यायाधीश यांबद्दल लोकांत आदर असे. श्रम केल्यानंतर करमणुकीचीं भरपूर साधनें उपलब्ध असत. खेळ व उत्सव नियमितपणें होत असत. प्रत्येकाचा गृहाचार सुसंस्कृत असे. उदासीनता घालवून देण्यांत त्यास आनंद वाटत असे. अथेन्स हें मोठें व मुक्तद्वार असें शहर असून पृथ्वीवरील सर्व प्रकारचीं सुखें तेथें उपभोगावयास मिळून आयुष्य सुखी व वैभवशाली बनत असे. परकीयांस त्या शहरांत येण्यास बंदी नसे व त्यांस येण्याजाण्याची पूर्ण मुभा असे. शांततेच्या व युद्धाच्या काळांतहि अशीच व्यवस्था असे. अथेन्स हें सर्व ग्रीक लोकांस जणुं शिक्षण देणारें शहर होतें. तेथील नागरिकांस शरीरानें सदृढ बनविण्यांत येत असे व ते चौरस होतील अशी काळजी घेण्यांत येई. सौंदर्याची उपासना करणें परंतु साध्या राहणीनें राहणें हें त्यांचें उद्दिष्ट असे. त्यांची मन उदात्त करण्याकडे विशेष दृष्टि असे. प्रत्येक मनुष्यानें सार्वजनिक आयुष्यक्रमांत लक्ष घातलें पाहिजे अशी अपेक्षा असे. नाहीं तर तो निरुपयोगी समजला जात असे. कोणती गोष्ट करण्यास योग्य आहे व कोणती अयोग्य आहे हें समजण्याची पात्रता प्रत्येक नागरिकामध्यें असणें आवश्यक आहे असें मानण्यात येत असे. सर्व ग्रीस देशांत काय चाललें आहे इकडे चौकस बुद्धीनें त्याचें लक्ष असलें पाहिजे अशी अपेक्षा असे व त्यावरून आपल्या देशानें कोणतें धोरण ठरवावें हें ठरविण्याची पात्रता त्याच्या अंगीं असली पाहिजे अशी अपेक्षा असे. कांहीं लोकांचें असें मत आहे कीं, अज्ञानी लोक हे जास्त शूर असतात आणि मनुष्य विचार करूं लागला म्हणजे तो धरसोड करूं लागतो. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. जे लोक योग्य-अयोग्य गोष्टींचें बरोबर आकलन करून व कोणत्याहि कामांतील धोका किती आहे तें ओळखून व तेवढा धोका पत्करण्याची तयारी करून कामास लागतात ते खरोखर शूर असतात. अथेन्सचे नागरिक अशा प्रकारचे होते व म्हणून अथेन्स ही सर्व ग्रीस देशाची शाळा होती.

यावरून अथीनियन लोकांची लोकराज्याची कल्पना काय होती तें दिसून येते. या राज्यांत कोणासहि अंगचुकारपणा करण्यास वाव नव्हता. प्रत्येक मनुष्यानें आपल्या ज्ञानाचा उपयोग *शासनसंस्थेस आपलें धोरण ठरविण्याच्या कामीं करून* देणें आवश्यक होतें. प्रत्येक गोष्टीचा अनुकूल व प्रतिकूल दृष्टीनें विचार करून निर्णय घेणें अवश्य होतें. व त्याप्रमाणें प्रामाणिकपणें व बुद्धीचा पूर्ण उपयोग करून प्रत्येक गोष्टींत मत देणें आवश्यक असे व अशा रीतीनें एकदां धोरण निश्चित झाल्यावर तें अमलांत आणण्याच्या कामीं पडेल तें कार्य करून साहाय्य करणें अवश्य होतें. जेव्हां युद्ध चालू असेल तेव्हां युद्धांत सामील होणें व शांततेच्या काळीं शेती करणें अथवा एखाद्या उद्योगधंद्यांत अथवा कारखान्यांत काम करणें प्रत्येक नागरिकास आवश्यक होतें. जगामध्यें कांहीं ठिकाणीं शहरवासी लोक शेतकऱ्यास अडाणी समजतात व शेतकरी शहरांतील फॅशनेबल तरुणास तो दिसतो तितका बुद्धिवान् नसतो असें समजतो. पेरिक्लीसच्या मताप्रमाणें दोघेहि सारखेच बुद्धिवान् समजले पाहिजेत.

अथेन्समधील उमराव लोकांची सत्ता जरी कायद्यानें कमी करण्यांत आली तरी वस्तुतः त्यांच्या सत्तेंत फारसा फरक पडला नाहीं. कारण राज्यांतील सर्व मोठमोठ्या अधिकाराच्या जागांवर त्यांचीच नेमणूक होत असे. तसेंच त्यांस अधिक फुरसत असल्यामुळें त्यांस शिक्षण घेणेंहि सुलभ होत असे. या वेळच्या शिक्षणांत संगीत हा महत्त्वाचा विषय असे. त्यामुळें या कालांत संगीताची बरीच वाढ झाली. या काळांत एक तऱ्हेची संगीत स्वरलेखन पद्धतिहि प्रचलित होती. ग्रीक लोकांनीं ईजिप्ती लोकांपासून क्रीटमार्फत बांसरी हें वाद्य स्वीकारलें. तसेंच सारंगीला (लायर) पूर्वीं ४ तारा असत त्याऐवजीं ७ बसवल्या गेल्या. तसेंच वृंदसंगीताची (कॉयर) पद्धत याच वेळीं सुरू झाली व त्याकरितां ग्रीक वीणाकाव्यें तयार होत गेलीं. हीं अनेक तऱ्हेचे भाव व्यक्त करणारीं काव्यें असत. पिंडार हा थिबीज येथील कवि भावगीतें लिहिण्यांत प्रवीण होता. वृंदसंगीत हें जानपद लोकांत अधिक

प्रचलित असून त्यांतील पुढारी गीताचा आशय समजावून देत असे. नंतर हाच आशय आणखी एक मनुष्य घेऊन संवादरूपानें सांगण्यांत येऊं लागला. यांतूनच यापुढें नाटकाचा उगम झाला. हे लोक बोकडाचें कातडें अंगावर घेत असत. यावरून ट्रॅजेडी अथवा छागनाटय हा शब्द या नाटकांस लावूं लागले. अशा तऱ्हेचे खेळ एखाद्या डोंगराच्या उतरत्या हिरवळीवर करीत असत. त्यावरून पुढें उघड्या उतरत्या बैठकी असलेल्या नाट्यगृहाची वाढ झाली. याच कालांत मोठमोठीं बांधकामें, इमारती, देवळें, बंदरें, कालवे, वगैरे बांधण्यांत आले. यापूर्वी ग्रीस देशांत फक्त कच्च्या मातीच्या विटांचीं घरें असत, परंतु आतां चुनखडीच्या दगडांचीं देवळें बांधण्याची प्रथा पडली. डेलफाय येथील अपोलोच्या देवळाचा दर्शनी भाग तर संगमरवरी दगडांचा बांधलेला होता. सिसिली बेटामध्यें या काळचीं कांहीं देवळें अद्यापि दृष्टीस पडतात. या देवळांतील स्तंभांच्या रांगांची कल्पना जरी ईजिप्ती लोकांपासून घेतली असली तरी त्यांत ग्रीक लोकांनीं पुष्कळच सुधारणा करून सौंदर्य आणलें होतें. नाइल नदीवरील देवळांप्रमाणें हीं देवळेंहि रंगीत असत. यांवर देवादिकांचीं निरनिराळ्या पौराणिक प्रसंगांचीं उठावदार चित्रें कोरण्यांत येत. या चित्रांतील मूळ कल्पना पौरस्त्य असल्या तरी त्यांतहि ग्रीक लोकांनीं बऱ्याच सुधारणा केल्या होत्या. चित्रकलेंतहि या कालांत बरीच सुधारणा झाली होती. तत्कालीन निरनिराळ्या तऱ्हेच्या भांड्यांवर त्या वेळच्या आयुष्यक्रमांतील प्रसंगांचें रेखाटण करणारीं चित्रें दृष्टीस पडतात. या वेळचीं सुंदर चित्रें काढलेलीं भांडीं २५०० वर्षांपूर्वीच्या ईजिप्तमधील थडग्यांत आढळून येतात. तत्कालीन लोकांच्या विचारांमध्यें बराच फरक झालेला आढळून येतो व सद्गुणांकडे अधिक अधिक प्रवृत्ति होऊन पौराणिक कथाहि चित्रित करण्याचे प्रयत्न दिसून येतात. दुष्ट आचरण करणाऱ्या मनुष्यास मरणानंतर शिक्षा होते ही कल्पना अधिक अधिक प्रसृत होत होती. त्याप्रमाणेंच सद्गुणी मनुष्यास मरणोत्तर सुखांत राहावयास मिळतें हीहि कल्पना प्रादुर्भूत होऊन अशा तऱ्हेची स्वर्गभूमि कुठें तरी पश्चिमेकडे असावी अशा तऱ्हेची कल्पना व्यक्त केलेली आढळते. अज्ञात भविष्यकाळाबद्दल मनुष्यामध्यें स्वाभाविकच जिज्ञासा असून त्याकरितां डेलफाय येथील देवळांत प्रश्न विचारण्याची चाल पुष्कळच वाढीस लागली होती व त्या देवळास ग्रीक राज्यामध्यें फार महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें होतें.

## आयोनियांत तर्कशुद्ध विचार व भौतिक शास्त्रांचा उदय–

याच वेळीं समाजांतील एक वर्ग जुन्या समजुती टाकून देऊन नवीन तऱ्हेचे व तर्कशुद्ध विचार प्रदर्शित करूं लागला होता. अशा तऱ्हेच्या विचारप्रणालीचा उगम प्रथम आशिया मायनरमधील आयोनियन शहरात झाला. या शहरांतील लोकांचें व्यापारांत नेहमीं अग्रस्थान असल्यामुळें त्यांचा व्यापारनिमित्तानें ईजिप्त व फिनिशिया यांतील शहरांशीं वरचेवर संबंध येत गेला. त्या लोकांपासून यांस प्रथम गणित व ज्योतिषशास्त्र यांच्या मूल तत्त्वांचें ज्ञान झालें. यांपैकीं एका विद्वानानें ईजिप्तमधून शंकुयंत्र आणून बसविलें व त्यावरून वेळेचें ज्ञान करून देऊं लागला. मिलेटस या शहरीं थेलीस नांवाचा एक मुत्सद्दी होता. यास बाबिलोनियामधील लोकांपासून आकाशस्थ गोलांच्या वेधाची माहिती मिळाली होती व त्यावरून भविष्यकाळीं होणारें सूर्यग्रहण नक्की वर्तवितां येतें, ही गोष्ट त्यास माहीत झाली होती. याप्रमाणें मिलेटस येथील लोकांस त्यानें अमुक वर्षांत सूर्यग्रहण होईल असें भविष्य सांगितलें. त्याप्रमाणें ख्रि. पूर्व ५८५ मध्यें प्रत्यक्ष सूर्यग्रहण दृष्टीस पडलें. त्यामुळें त्याची कीर्ति सर्वत्र पसरली. या सूर्यग्रहणामुळें अशा गोष्टी देवाच्या असंतोषामुळें उत्पन्न होतात, ही जी लोकांमध्यें समजूत प्रचलित होती ती चुकीची असलेली थेलीस स्पष्टपणें प्रतिपादन करूं लागला व हे चमत्कार सृष्टिनियमाप्रमाणें घडून येतात ही गोष्ट त्यानें पटवून दिली. हा लोकांच्या समजुतींत पडलेला फरक फार महत्त्वाचा होता.

मिलेटस येथील दुसरा एक नागरिक, हा बहुधा थेलीसचा शिष्य असावा, पुढें आला व त्यानें कांहीं लहान प्राण्यांचा विकास होत होत मोठे प्राणी कसे बनतात हें दाखविलें. याप्रमाणें जीविशास्त्राचा पाया घातला. तसेंच त्यानें तत्कालीन ज्ञात जगाचा एक नकाशा तयार केला. यानंतर हेकॅटिअस या दुसऱ्या एका मिलेटस येथील नागरिकानें बराच प्रवास करून एक-जगाचा भूगोल लिहिला. अर्थात् या भूगोलाचा व वरील नकाशाचा मध्य भूमध्यसमुद्र असून त्याच्याचसभोंवारचें चित्र यांत आढळतें. हेकॅटिअस यानें तत्कालीन ज्ञात कथांचा संग्रह करून एक जगाचा इतिहासहि लिहिला आहे.

याच काळांत पायथागोरस या नांवाचा एक आयोनियन तत्त्ववेत्ता होऊन गेला. त्यानें आपला प्रसिद्ध सिद्धांत जगापुढें मांडला. याच वेळीं तंतुवाद्यांतील तारेच्या लांबीचा व स्वराच्या उच्चतेचा संबंध असतो ही गोष्ट लक्षांत आली. तसेंच कांहीं वनस्पती व प्राणी यांचें कालांतरानें अश्मीभवन होतें ही गोष्टहि निदर्शनास येऊन एका काळीं जमिनीच्या मोठ्या भूभागावर समुद्र होता, ही गोष्ट ज्ञात झाली.

याप्रमाणें या कालांत भौतिक शास्त्रें व तत्त्वज्ञान यांचा उदय झाला व सृष्टीतील चमत्कार हे देवाधीन नसून नैसर्गिक नियमांच्या अनुरोधानें होत असतात ही गोष्ट जगापुढें प्रथम

मांडण्यांत आली. याच काळांत ग्रीसमधील सात शहाणे म्हणून कांहीं तत्त्ववेत्त्यांचीं नांवें प्रसिद्ध आहेत.

### इराणची स्वारी—

आशिया मायनरमध्यें आयोनियांतील शहरांनीं जी आपली प्रगति केली होती आणि वैभव संपादन केलें होतें त्यांस पूर्वेकडे नवीन वृद्धिंगत होणाऱ्या इराणच्या सत्तेकडून उपद्रव पोहोंचूं लागला. या वेळीं अनातोलियामध्यें लिडीया येथील राज्य बरेंच संपन्न होतें. या लिडीयाचा त्या वेळीं क्रीसस या नांवाचा राजा असून तो फार वैभवशाली आणि श्रीमंत म्हणून प्रसिद्ध होता. याची राजधानी सार्डिस येथें होती. यावर इराणचा बादशहा सायरस यानें स्वारी करून क्रीसस यास कैद करून नेलें व हळूहळू सर्व आशिया मायनर पादाक्रांत केला. या वेळीं अथेन्स शहरानें आयोनियन लोकांच्या मदतीकरितां २० गलबतें पाठविलीं होतीं. याकरितां अथीनियन लोकांस शासन करावें असा सायरस याचा विचार होता. परंतु सिथीयन लोकांवरील स्वारींत सायरस हा मृत्यु पावल्यामुळें त्यानंतर आलेल्या डरायसनें युरोपवर स्वारी करण्याचा निश्चय केला. याकरितां त्यानें बरेंच मोठें आरमार तयार केलें. परंतु त्या आरमारापैकीं बऱ्याचशा भागाचा ॲथासजवळील भूशिराजवळ वादळानें नाश झाला (खि. पू. ४९२). यानंतर २ वर्षांनीं डरायसनें मोठें आरमार जमवून सभॉस बेटावरून ईजियन समुद्रांतून ॲटिका प्रांतांत सैन्य पाठविलें, व त्यास अथेन्सवर चालून जाण्यास सांगितलें. या वेळीं अथेन्स येथें मिलटियाडीस या नांवाचा मुत्सद्दी पुढारी होता. त्यानें स्पार्टाकडे मदत मागण्याकरितां मनुष्य पाठविला व स्वतः शक्य तितकें सैन्य जमवून शत्रूस तोंड देण्याकरितां अथेन्स शहराच्या बाहेर पडला. त्यास प्लाटिया येथून १,००० लोकांची मदत आली. दोन्ही सैन्यांची गांठ मॅराथॉनच्या मैदानावर पडून तेथील युद्धांत इराणी सैन्याचा पूर्णपणें मोड झाला. या पराभवाचा सूड देण्याकरितां डरायसचा पुत्र क्झर्क्सीस यानें फार मोठी तयारी करून सुमारें दोन लक्ष सैन्य व एक हजार गलबतांनिशीं ग्रीसवर स्वारी केली. याच स्वारीस थोपवून धरण्याकरितां स्पार्टाचा राजा लिओनिडास व त्याच्या तीनशें सैनिकांनीं थर्मापिली येथें तीव्र प्रतिकारानंतर आपलें बलिदान केलें. याच अवधींत अथीनियन लोकांनीं थेमिस्टॉक्लीस या मुत्सद्द्याच्या सल्ल्याप्रमाणें २०० गलबतांचें आरमार तयार केलें होतें, व इराणी लोकांशीं जमिनीवर लढाई देण्यापेक्षां प्रथम समुद्रावर लढाई देण्याचें निश्चित करण्यांत आलें. इराणी आरमारापैकीं कांहीं गलबतें मध्यंतरीं वादळांत सांपडून व एक-दोन ठिकाणच्या चकमकींत निकामी झालीं. इराणी सैन्यानें अथेन्स शहर जिंकून त्याचा विध्वंस केला. परंतु ग्रीक आरमार व इराणी आरमार यांची अथेन्ससमोरील सॅलॅमिस बेटाजवळील उपसागरांत जी लढाई झाली तींत इराणी आरमाराचा पूर्णपणें नाश झाला. तेव्हां क्झर्क्सीस यास हेलीस्पॉंट सामुद्रधुनीवरील आपला मार्ग बंद पडण्याची धास्ती वाटून तो आपला सेनापति मार्डोनियस याच्याजवळ ५०,००० सैन्य ठेवून स्वतः इराणांत निघून गेला. पुढें प्लाटिया येथील लढाईत मार्डोनियस याच्या सैन्याचा नाश झाला व तो स्वतः कामास आला. त्याच्या उरलेल्या आरमाराचाहि त्याच दिवशीं झालेल्या लढाईत नाश झाला (खि. पू. ४८०). या वेळीं स्पार्टानें अथीनियन लोकांस मदत केली होती. परंतु पुढें या दोन शहरांत स्पर्धा उत्पन्न होऊन पहिलें पिलॉपोनिशियन युद्ध झालें व त्यांत ग्रीक शहरांची बरीच हानि झाली. अखेरीस खि. पू. ४४५ मध्यें या दोन पक्षांत ३० वर्षांकरितां तह झाला. तथापि या दोन शहरांतील स्पर्धा थांबली नाहीं. यांच्यामध्यें वरील युद्धाप्रमाणेंच आणखी दोन युद्धें झालीं व त्यांत सर्व ग्रीक राष्ट्राची फारच हानि झाली. तथापि या काळांत ग्रीस देशामध्यें अनेक बाबतींत प्रगति झाली.

### ग्रीक संघांतील स्पर्धा व यादवी युद्ध—

ग्रीसमध्यें इराणच्या बादशहानें केलेल्या स्वारीचा मोड केल्यानंतर त्या देशांत जरी बरींच वर्षें शांतता राहिली तरी त्या राज्यांच्या संघामध्यें परस्पर स्पर्धा व चुरस सतत चालू होतीच. त्यांच्यामध्यें पिलोपोंशियन नांवाचीं तीन यादवी युद्धें झालीं व या युद्धांत प्रथम अथेन्सचें वर्चस्व स्थापन झालें, नंतर स्पार्टा या शहरास यश मिळालें व नंतर थिबीज या शहरास कांहीं काल प्रामुख्य मिळालें, तथापि अखेरीस या झगड्यामध्यें अथेन्स शहरासच यश मिळालें. वास्तविक या युद्धाची स्मृति कधींच नष्ट झाली असती इतकें तें परस्पर स्पर्धा व व्यक्तिद्वेष यांनीं भरलेलें आहे. परंतु याच युद्धकालांत ग्रीक वाङ्मय तयार झालें व त्यांत या युद्धाचा वारंवार संबंध देत गेला म्हणून तें चिरस्थायी झालें आहे.

या युद्धामध्यें इराणच्या राजांनींहि मधून मधून हस्तक्षेप केला व कधीं या पक्षास तर कधीं त्या पक्षास द्रव्यसाहाय्य करून हें युद्ध चालू राहण्यास मदत केली.

या युद्धाचा तपशील देण्यांत व कोणीं कोणतें शहर जाळलें व कोणीं कोणाचा खून केला याचें विस्तृत वर्णन करण्यांत आतां फारसा लाभ नाहीं. थुसीडायडीस या इतिहासकारानें या

युद्धाचा इतिहास लिहिला आहे, परंतु तो येथें देण्यास आपणांस अवकाश नाहीं.

## ग्रीक वाङ्मयाचा विकास—

तथापि एवढी गोष्ट मात्र खरी कीं, या काळात ग्रीक वाङ्मयाचा पुष्कळच विकास झाला. गिल्बर्ट मरे यानें असें म्हटलें आहे कीं, "ग्रीक लोकांचा इतिहास इतर राष्ट्रांप्रमाणेंच युद्धें व राजकारण आणि क्रौर्य व कपट यांनीं भरलेला आहे. तथापि त्याचें महत्त्व फारसें नसून ती केवळ बाह्य घटना आहे. परंतु या देशाचा अंतर्गत इतिहास, त्या देशांतील लोकांचे विचार, भावना आणि चारित्र्य यांचा इतिहास फार उज्ज्वल आहे. त्यांना त्या काळांत बऱ्याच अडचणींतून मार्ग काढावयाचा होता. तशा अडचणी आपल्या मार्गांत नाहींत. त्यांस पूर्वीचा अनुभव उदाहरणादाखल पुढें ठेवण्यास नव्हता. सर्व गोष्टी त्यांस प्रथमच करावयाच्या होत्या. त्यांच्याजवळ फारशीं साधनेंहि नव्हतीं. तसेंच त्यांचे मनोविकार, त्यांच्या भावना, त्यांच्या आकांक्षा, त्यांची भीति, त्यांचा क्रोध, वगैरे सर्व मनोविकार आजच्या आपल्या मनोविकारांपेक्षा फार तीव्र आणि भयंकर असत. तथापि त्यांनींच पेरिक्लीस आणि प्लेटो यांच्या कालीन अथेन्स घडविलें."

त्या वेळीं अथेन्स शहरांत जें विचार व कल्पना यांचें बीज रुजत घालण्यात आलें त्याची आज गेल्या २३ शतकात वाढ होत आली आहे व त्यांच्यापासूनच अनेकांस स्फूर्ति मिळाली असून मार्गदर्शनहि झालें आहे.

## वैभवकालीन अथेन्स—

मॅरथॉन व सॅलामिस या युद्धांनंतर अथेन्समधील लोक स्वतंत्र, सुरक्षित व मानधन स्थितींत राहिले. या वेळीं पेरिक्लीससारख्या नेत्याच्या पुढारीपणाखालीं त्यांनीं आपली सर्व अंगांनीं प्रगति करून घेतली. या कालच्या अथेन्सवर पेरिक्लीस याचा ठसा पूर्णपणें उमटला आहे असें विंकलर यानें म्हटलें आहे. या वेळीं मिलेटस येथील अस्पाशिया या नांवाच्या स्त्रीनेंहि तत्कालीन राजकारणांत बराच भाग घेतला. पेरिक्लीस यानें राजपदापेक्षा पुढारीपणच पत्करलें. त्याच्या नेतृत्वाखालीं निरनिराळ्या ग्रीक शहरांशीं व संघांशीं सख्य करण्यांत आलें. नवीन नवीन वसाहती व व्यापाराचीं ठिकाणें स्थापन करण्यांत आलीं. त्यांचा विस्तार इटलीपासून काळ्या समुद्रापर्यंत होता. अथेन्स शहर ज्या डेलीयन संघाचें प्रमुख होतें त्यांचा द्रव्यनिधि डेलॉस या बेटांत होता तो अथेन्स शहरीं आणण्यांत आला व या द्रव्याचा उपयोग अथेन्सचें वैभव वाढविण्याच्या कामीं करण्यांत आला. पार्थेनॉन या नावाचें एक भव्य देऊळ अक्रॉपोलिस या टेंकडीवर बांधण्यांत आलें. या देवळामध्यें फिडीयस, मॉयरॉन आणि पॉलिक्लीटस यांच्याकडून अत्यंत कौशल्याचीं शिल्पकामें करून घेण्यांत आलीं. या कामाकडे अद्यापहि लोक आश्चर्यानें पाहतात.

या काळीं अथेन्समध्यें निरनिराळ्या ठिकाणांहून अनेक विद्वान् तेथील वैभवामुळें व उच्च दर्जाच्या बौद्धिक जीवनामुळें आकर्षित झाले.

परंतु अथेन्सच्या सामान्य लोकांस पेरिक्लीसचा उत्कर्ष सहन होईनासा झाला. ग्रीक लोक त्यास गर्विष्ठ व अभिमानी म्हणूं लागले. त्याच्यावर द्रव्याच्या अपहाराबद्दल फिर्यादहि करण्यांत आली. परंतु तींतून तो दोषमुक्त सुटला. तेव्हां त्याच्या शत्रूंनीं त्याच्या मित्रांस छळण्याचा उपक्रम आरंभला. त्याचा मित्र डॅमन यास हद्दपार करण्यांत आलें. फिडियस या शिल्पकारास अधर्मनिष्ठेबद्दल तुरुंगांत टाकण्यांत आलें. कारण त्यानें अथेनी देवीच्या ढालेवर स्वतःचें व पेरिक्लीसचें चित्र रंगवलें होतें. त्या वेळीं अनाक्सागोरस या नांवाचा एक तत्त्ववेत्ता अथेन्समध्यें आला होता व त्याचें पेरिक्लीसनें स्वागत केलें होतें. तो बुद्धिवादी असल्यामुळें देव वगैरे मानीत नसे. तत्कालीन विनोदी नाटकांत त्याची बरीच थट्टा व उपहास करण्यांत आलेला आढळतो व अखेरीस तो फिर्यादीच्या भीतीनें पळून गेला. अस्पाशियावर खटला भरण्यांत आला व तिला पेरिक्लीसनें मोठ्या मिनतवारीनें सोडविलें. पेरिक्लीस हा स्वतः गरिबींतच राहिला व गरीब स्थितींतच मरण पावला. तो अत्यंत प्रामाणिक असूनहि त्याचेवर खटला झाल्याचें वर्णन वर केलेंच आहे.

## सॉक्रेटीस व त्याचे शिष्य—

याच सुमारास अथेन्समध्यें असाच एक तत्कालीन जनतेच्या आवांक्याबाहेरचे विचार प्रगट करणारा पुरुष निर्माण झाला. त्याचे नांव सॉक्रेटीस असून तो एका पाथरवटाचा मुलगा होता. यानें स्वतः कांहीं लिहिलें नाहीं. परंतु तो सार्वजनिक जागांतून पुष्कळ बोलत असे व चर्चा करीत असे. त्या वेळीं ज्ञानाचा शोध करण्याची वृत्ति अनेक लोकांत उत्पन्न झाली होती. त्या वेळीं सोफिस्ट नांवाचा तत्त्वज्ञानी लोकांचा एक वर्ग निर्माण झाला होता व ते सत्य म्हणजे काय, सत्य कसें असतें व सदाचार म्हणजे कोणता याबद्दल चर्चा करीत असत. तरुण लोकांच्या मनांत ते जिज्ञासा व कल्पनाशक्ति जागृत करीत. ग्रीसमध्यें या वेळीं पुरोहितवर्ग नसल्यामुळें या लोकांस साहाजिकच कार्यक्षेत्र मिळालें. सॉक्रेटीसहि या लोकांप्रमाणें भाषणें करूं लागला व तरुण लोकांस प्रश्न विचारून त्यांच्यामध्यें चौकस बुद्धि जागृत करूं लागला. तो खरोखर नास्तिक किंवा संशयवादी नव्हता. त्याचें

म्हणणें असें असे कीं, सर्व सद्गुणांचें मूळ सत्यज्ञानांत आहे. त्यामुळें योग्य कसोटीशिवाय कोणत्याहि गोष्टीवर श्रद्धा ठेवणें किंवा कोणतीहि आशा बाळगणें हें व्यर्थ आहे. परंतु यास तो जरी सद्गुण मानीत असे तरी जे त्याच्याइतके मनानें सुदृढ नसत *अशा अनेक तरुणांच्या भावनांवर जे स्वाभाविक निर्बंध असत* ते उडून जाऊन त्यांची श्रद्धा व नीति ढासळत असे. यामुळें जे दुर्बल मनोवृत्तीचे असत ते स्वतःची सर्व नैतिक बंधनांपासून सोडवणूक करून घेऊन व्यसनमग्न व स्वैर बनत असत. अशा तऱ्हेचें ठळक उदाहरण म्हणजे त्याचा प्रतिपक्षी जो अनिटस त्याचा मुलगा सॉक्रेटिसाचा शिष्य असून पक्का दारुड्या बनला. तथापि सॉक्रेटिसाच्या शिष्यांमध्यें पुष्कळच चांगले लोक होऊन गेले. उदाहरणार्थ, प्लेटो हा त्याचा पट्टशिष्य होता. यानें त्याचीं तत्त्वें संभाषणरूपानें लिहून ठेविलीं होतीं व हीं संभाषणें म्हणजे एक आदर्श ग्रंथ आहे. प्लेटोनें पुढें ॲकेडमी या नांवाचें विद्यापीठ सुरू केलें तें ९०० वर्षें टिकलें. प्रसिद्ध १०,००० ग्रीक सैनिकांचा सेनापति झेनोफॉन हा त्याचा शिष्य असून त्यानें त्याच्या मृत्यूच्या प्रसंगाचें वर्णन केलें आहे. ग्रीक राजकारणी पुरुषांपैकीं अत्यंत विद्वान् असा आयसॉक्रेटीस हाहि त्याचा शिष्य होता. तथापि त्याच्या शिष्यांत क्रीटीयस व फार्मेंडीस असेहि शिष्य होते कीं, जे अथेन्सचा स्पार्टाकडून पाडाव झाल्यानंतर स्पार्टानें नेमलेल्या तीस सत्ताधाऱ्यांत होते. तसाच *अल्कीबीयाडीस हा प्रसिद्ध देशद्रोहीहि त्याच्या शिष्यवर्गामध्यें* मोडत असे. सॉक्रेटीसनें प्रदर्शित केलेले विचार किंवा मतें तत्कालीन ग्रीक लोकांच्या मानसिक मर्यादेस न झेपणारीं असल्यामुळें त्यास विषप्राशन करून मृत्यु पत्करून घ्यावा लागला (ख्रि. पू. ३९९). याच्या मृत्यूचें प्लेटोनें फीडो या संवादांत उत्तम वर्णन केलें आहे.

### प्लेटो—

प्लेटो याचा जन्म ख्रिस्तपूर्व ४२७ मध्यें झाला व तो ८० वर्षें जगला. हा सॉक्रेटीसपेक्षां अगदीं निराळ्या मनोवृत्तीचा होता. त्याची लेखनशैली फार कुशल व कलात्मक होती. उलट सॉक्रेटीस यास सुसंगतपणें मुळींच लिहितां येत नसे. प्लेटो हा सौंदर्याचा चाहता होता व सॉक्रेटीस त्याचा तिटकारा करीत असे. प्लेटोस सार्वजनिक कामांत सुव्यवस्था असावी व मानवसमाजात सुखकर संबंध असावेत असें वाटे. उलट सॉक्रेटीस जीवित हें भ्रामक असून फक्त आत्मा जीवमान असतो असें मानीत असे. प्लेटो यानें सॉक्रेटीस याची सत्यशोधनाकरिता वापरण्यांत येणारी संवादपद्धति उचलली. परंतु या संवादांत आपले विचार पुढें मांडले. वास्तविक त्या वेळीं म्हणजे पेरिक्लीसच्या काळांत समाज सुस्थितींत होता. त्यामुळें कोणत्याहि प्रकारचे बिकट प्रश्न उत्पन्न होण्यासारखी परिस्थिति नव्हती. त्या वेळच्या सामाजिक व राजकीय सत्ताहि लोकांस सुखकर असून त्यांच्याबद्दल असंतोष वाटत नव्हता. हिरोडोटसनें आपल्या *इतिहासांतहि असेंच वर्णन केलें आहे. परंतु* प्लेटो हा हिरोडोटसच्या मृत्यूच्या समयीं पुढें आला व त्या वेळीं यादवी युद्ध सुरू असून समाजांत घोटाळे—कलह माजले होते. या गोष्टीबद्दल असमाधान वाटून त्यानें आपली आदर्श राज्यपद्धति वर्णन करणारा रिपब्लिक (लोकराज्य) हा ग्रंथ लिहिला. तो 'युटोपिया' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्याचा दुसरा 'लॉज' म्हणजे कायदे हा ग्रंथ अपूर्णच राहिला. त्याच्या शिकवणीचा सारांश असा असे: मानवानें आपल्या जीविताकडे पूर्ण लक्ष दिलें पाहिजे. ज्या गोष्टींपासून मनाला दुःख होत असेल त्या टाळतां येण्यासारख्या असतात. ज्या गोष्टी तुमच्यावर वरचष्मा करण्यासारख्या असतील त्यांवर तुम्ही वर्चस्व मिळवूं शकतां. तेव्हां अशा गोष्टींत तुमची इच्छा असेल त्याप्रमाणें तुम्हांस वागतां येणें शक्य आहे.

प्लेटोच्याबरोबर आयसॉक्रेटीस या नांवाचा एक तरुण असे. हा वक्ता नसून लेखक होता. याचा मुख्य उद्देश इराणी साम्राज्याविरुद्ध ग्रीसमध्यें ऐक्य स्थापन करण्याचा होता व ज्या गोष्टींकडे लक्ष दिलें असतां ग्रीक लोकांतील आपसांतील स्पर्धा *व वैमनस्य नष्ट होतील त्यांकडे लक्ष दिलें पाहिजे अशी त्याची* शिकवण असे. राजकारणांत त्याची दृष्टि प्लेटोपेक्षां निराळी असे. परंतु ही गोष्ट घडवून आणण्याकरितां तो मॅसिडोनियाकडे पाहत असे.

झेनोफोन याच्याहि कल्पना कांहींशा अशाच प्रकारच्या असून त्या त्यानें सायरोपीडिया या ग्रंथांत व्यक्त केल्या आहेत.

### आरिस्टॉटल—

प्लेटो आपल्या ॲकेडमीमध्यें अध्यापन करीत असतां त्याच्याकडे मॅसिडोनियामधील स्टॅगीरा या गांवांतून आरिस्टॉटल नांवाचा एक तरुण विद्यार्थी आला. हा मॅसिडोनियाचा राजा फिलीप याच्या वैद्याचा मुलगा होता. याचा कल्पनाशक्तीवर फारसा विश्वास नव्हता. त्यानें पुढें अथेन्समध्यें लायसीयम येथें एक विद्यापीठ स्थापन केलें. तेथें तो अध्यापन करीत असे व आपल्या शिक्षणांत प्लेटो आणि सॉक्रेटीस यांच्यावर टीका करीत असे. हा कांहीं दिवस फिलीपच्या दरबारांत अलेक्झांडरचा अध्यापक होता. याच्या मतें राजाच्या प्रमुखत्वाखालील घटनात्मक राज्यपद्धति ही आदर्श राज्यपद्धति होय. त्यानें प्लेटोच्या कवीस राज्याबाहेर घालवून देण्याच्या कल्पनेवर टीका केली आहे.

कारण कवींमध्यें सामर्थ्य असतें अशी त्याची कल्पना असे. तसेंच सॉक्रेटीसनें अनाक्सागोरसबद्दल दाखवलेला अनादर त्यास पसंत नसे.

तो अलेक्झांडरचा गुरु असल्यामुळें त्याला अलेक्झांडरकडून पुष्कळच द्रव्य साहाय्य झालें. त्यामुळें भौतिक शास्त्रांत प्रगति करण्यास त्यास चांगली संधि मिळाली. एका काळीं त्याच्या हाताखालीं १,००० लोक असून ते त्याच्यासाठीं आशिया व ग्रीसमध्यें त्याच्या भौतिक इतिहासाकरितां साहित्य गोळा करीत होते व अनेक वस्तू गोळा करून त्याच्याकडे पाठवीत होते. याच्या निदर्शनाखालीं याच्या विद्यार्थ्यांनीं १५८ निरानिराळ्या राज्यघटनांचें पृथक्करण केलें होतें. पद्धतशीर शास्त्रीय संशोधनाचा हा आरंभ होता व त्याचा अलेक्झांड्रिया शहर सोडलें तर इतरत्र अलेक्झांडरच्या मृत्यूबरोबर २००० वर्षेपर्यंत अस्त झाला.

### स्टोइक व एपिक्यूरिअन तत्त्ववेत्ते—

गिल्बर्ट मरे म्हणतो, "सिनिक पंथाचे तत्त्ववेत्ते केवळ आत्मा आणि ईश्वर यांसंबंधीं सद्गुणांची अपेक्षा करीत. ऐहिक जगाबद्दल व जगांतील वैभव, सत्ता अथवा मानापमान या गोष्टींकडे ते तुच्छतेनें पाहत. स्टोइक आणि एपिक्यूरिअन या पंथाचे तत्त्वज्ञानी जरी बाह्यतः निराळे दिसत तरी तात्त्विक दृष्ट्या ते सारखेच होते. त्यांचा विशेष कटाक्ष नीतीवर असे. मनुष्यानें आपलें आचरण नीतिमान ठेवलें पाहिजे याकडे ते अधिक कटाक्षानें पाहत. या पंथांतील लोकांनीं भौतिक शास्त्रांकडे थोडेंफार लक्ष दिलें, नाहीं असें नाहीं. स्टोइक लोकांनीं तर्कशास्त्र व वक्तृत्वकला यांकडे लक्ष दिलें तर एपिक्यूरिअन लोकांनीं पदार्थविज्ञानशास्त्रावर भर दिला. स्टोइक लोक वादविवादाच्या कसरतीनें आपल्या श्रोत्यांचीं मनें आपणांकडे वळविण्याचा प्रयत्न करीत. एपिक्यूरिअन लोकांच्या मतें मनुष्यानें आपली उन्नति देवतांस संतुष्ट केल्याशिवाय किंवा यज्ञयाग केल्याशिवाय आपली आपण स्वतंत्र रीतीनें करून घेतली पाहिजे. देवाबद्दल भीति वाटतां कामा नये. मरणाचेंहि दुःख वाटतां कामा नये. या आयुष्यांत जें उत्तम असेल तें मिळविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. म्हणजे तें मिळूं शकतें. तसेंच ज्याबद्दल आपणांस भीति वाटत असेल, अशा संकटांतूनहि पार पडता येतें."

अथीनियन लोकांनीं या काळांत लिहिलेलें वाङ्मय हें तत्कालीन परिस्थितीचा विचार करूनच वाचलें असतां त्यांतील मर्म लक्षांत येईल. ज्याप्रमाणें आजच्या प्रश्नांचा आपण विचार करतों व चर्चा करतों त्याप्रमाणेंच ते तत्कालीन प्रश्नांचा विचार व चर्चा करीत होते व ते या वैचारिक युगाच्या आद्यकाळांत निरनिराळ्या गोष्टी समजून घेण्याचा प्रयत्न करीत होते.

युंग हा आपल्या मानसशास्त्रीय ग्रंथांत असें म्हणतो कीं, "या काळांतील ज्ञान किंवा विचार हे अनियंत्रित होते. त्यांस दिशा दाखविणारे पूर्वीचे कांहीं नियम वगैरे नव्हते. अर्वाचीन विचार हे सुनियंत्रित असतात. तत्कालीन विचार हे काल्पनिक व स्वप्नमय असून अर्वाचीन विचार हे अधिक नियमित व भाषाबद्ध असतात व अशा रीतीनें सुनियंत्रित विचारप्रणालीपासूनच शास्त्र निर्माण होतें. त्यामुळें तत्कालीन विचारापासून शास्त्र निर्माण होण्याच्याऐवजीं पौराणिक कथा निर्माण झाल्या. तत्कालीन लोकांची विचारप्रणाली ही आजच्या असंस्कृत लोकांप्रमाणें किंवा बालकांप्रमाणें होती. त्यामुळें बालकसुलभ अशा पौराणिक कथाच त्यांनीं निर्माण केल्या, व त्यामुळें सर्व विश्वांतील घडामोडी देवतांशीं संबद्ध करण्यांत आल्या. ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं या गोष्टीस थोडेंसें इष्ट दिशेनें वळण देऊन आपल्या विधानांचें व शब्दांचें पृथक्करण करण्याचा प्रयत्न केला व त्यामुळें जी विचारास दिशा लागली तीमुळेंच पुढील शास्त्रीय विचारपद्धतीचा व वाङ्मयाचा पाया रचला केला. त्या काळीं ग्रीक तत्त्ववेत्त्यांपुढें असलेल्या सर्वच प्रश्नांचा आजहि आपणांस पूर्णपणें उलगडा झाला आहे असें म्हणतां येत नाहीं. *त्या काळापासून मनुष्य या विश्वाचें कोडें उलगडण्याचा प्रयत्न* करीत आहे. त्याच्यापुढें निरनिराळ्या देवता, देवतास्वरूपी राजे, वंश, जाती, नगरराज्यें, वगैरे अनेक कल्पना उभ्या राहून त्यांतून मनुष्याचें जीवित सुखमय कसें होईल हें शोधून काढण्याचा प्रयत्न करीत आहे. परंतु अद्यापहि मानवजातींतील कृत्रिम भेद व स्वार्थ इत्यादि गोष्टींमुळें प्रवृत्त होणारीं युद्धें वगैरे गोष्टींकडे पाहिलें म्हणजे आपणहि या विचारांत फारशी प्रगति केली आहे असें म्हणतां येणार नाहीं. आपण मानलेल्या परमेश्वराकडून सर्व मानवजातीचें रक्षण अद्यापि झालें नाहीं. आपण ज्या निरनिराळ्या मानववंशांच्या किंवा जातींच्या कल्पना केल्या त्यामुळें परस्परांत द्वेष व निष्ठुरता उत्पन्न झाल्याचें आपण पाहतों. देवतास्वरूपी मानलेला राजाहि राक्षसासारखें वर्तन करतो, याप्रमाणें आपणांस निरनिराळे अनुभव येतात."

### ग्रीक विचारास बंधनें—

तत्कालीन ग्रीक लोकांच्या विचारास पुढें दिल्याप्रमाणें तीन बंधनें असल्यामुळें त्यांची फारशी प्रगति झाली नसावी. पहिलें बंधन म्हणजे त्यांची राज्याची कल्पना नगरराज्याइतकीच मर्यादित होती. प्लेटोची लोकसत्ताक राज्याची कल्पना १००० ते ५००० व्यक्तींपर्यंतच होती. आरिस्टॉटलच्या कल्पनेप्रमाणें न्यायदान

योग्य होण्याकरितां नगरांतील प्रत्येक व्यक्तीस दुसऱ्या प्रत्येक व्यक्तीचा स्वभाव माहीत असणें अवश्य होतें व अशा नगर-राज्यांत पुन्हां युद्धें होणें गृहीतच धरलें होतें. या गोष्टीवरून इराणी बादशहा क्झर्क्सीस याच्या एवढ्या प्रचंड सैन्यानें ग्रीसवर स्वारी केल्यानंतरहि ग्रीक लोकांच्या कल्पना किती आकुंचित होत्या हें दिसून येतें. इराणी राजाचा पराभव झाल्यावर त्यांस साम्राज्यशाहीचा अंत झाला असें वाटलें. परंतु याचे उलटपक्षीं त्या कालीं साम्राज्यशाहीचा अंत झाला नसून नुकताच कोठें उदय होऊं लागला होता ही गोष्ट लवकरच त्यांच्यावर मॅसिडोनी लोकांनीं स्वारी केल्यानें प्रत्ययास आली!

त्यांच्या विचारास दुसरें बंधन गुलामगिरीचें होतें. मानव-समाजातील प्रत्येक व्यक्ति स्वतंत्र असूं शकते ही कल्पना त्यांस नव्हती. मानवाच्या सुखाकरितां कांहीं मानव गुलाम असणें हें त्यांस क्रमप्राप्त वाटत होतें. प्लेटोचें मत गुलाम-गिरीच्या विरुद्ध होतें. नवीन होत असलेल्या विनोदी नाटकांत गुलामगिरीवर टीका करण्यांत येत असे. स्टोइक व एपिक्यूरि-अन तत्त्ववेत्ते गुलामगिरीचा द्वेष करीत असत. कारण त्यांच्या-पैकीं कांहीं स्वतःच गुलाम होते. परंतु गुलामगिरीचा आत्म्यावर कांहीं परिणाम होत नाहीं अशी त्यांची समजूत असे. आरिस्टॉटल यास गुलामगिरी ही एक स्वाभाविक संस्थाच वाटत असे व ती एक कांहीं मानवांच्या बाबतींत नैसर्गिक अवस्थाच मानली जाई व तत्कालीन तत्त्ववेत्त्यांपैकीं कोणींहि ती बंद करण्याचें मनांत आणलें नाहीं.

ग्रीक तत्त्ववेत्त्यांच्या विचारावर तिसरा निर्बंध त्यांच्या अज्ञानाचा होता. त्यांत त्यांच्यापूर्वीच्या मानवजातीचा इति-हास माहीत नव्हता. त्यांचें तत्कालीन भूगोलाचें अथवा जगावरील भूप्रदेशाचें ज्ञान फारच मर्यादित होतें. भूमध्य-समुद्रापासून इराणच्या पलीकडील जगाचें त्यांत मुळींच ज्ञान नव्हतें. त्यांच्या शेजारच्या सुसा, पर्सीपोलिस, बाबिलोन व मेंफीस, इत्यादि शहरीं काय चाललें आहे याची त्यांस आज आपणांस जितकी माहिती आहे तितकीहि नव्हती. अॅनॅक्सा-गोरसच्या मतें सूर्य हा पिलापोनिससएवढा मोठा होता. हें विश्व परमाणूंचें बनलें आहे ही कल्पना त्यास कशी करतां आली याबद्दल मात्र आश्चर्य वाटतें.

### प्रयोगांचा अभाव—

त्यांच्या अज्ञानाचें एक कारण त्यांस प्रयोग करून पाहण्याची पद्धति माहीत नव्हती व प्रयोग करण्यास साधनेंहि नव्हतीं. त्यांस काळाचें सूक्ष्म परिमाण मोजण्याचें मान माहीत नव्हतें. अंकपद्धति अज्ञात होती. मापें बिनचूक नव्हतीं व सूक्ष्म तराजूहि नव्हता. दुर्बीण किंवा सूक्ष्मदर्शक यांची कल्पनाच नव्हती. आजचा एखादा शास्त्रज्ञ ग्रीसमध्यें गेला असता तर त्यास आपलें ज्ञान प्रकट करून सांगण्यास साधनें मिळालीं नसतीं व साक्रेटीससारख्या लोकांचा कंपास पेटीसारख्या साधनावर विश्वास नव्हता. विद्वान् लोक व कारागीर यांच्यामध्यें फार मोठी अनुल्लंघनीय अशी जणुं काय भिंतच होती. कारागिरा-सारखीं हत्यारें वापरणें विद्वानांस कमीपणाचें वाटे. आजच्या मानवापुढें जसा दीर्घकालांतील ज्ञानाचा संग्रह असतो तसा तत्कालीन विद्वानांपुढें नव्हता. त्या वेळीं ज्ञानाचा कोठें आरंभ होत होता. याकरितां तत्कालीन विद्वानांनीं किती गोष्टी साध्य केल्या यापेक्षां किती प्रयत्न केले याचें महत्त्व ओळखलें पाहिजे. या वेळीं नैतिक आणि बौद्धिक विचारांस सुरवात झाली, व तेव्हांपासून मानवजातीच्या सुखाकरितां मनुष्य विचार व प्रयत्न करीत आहे. परंतु मानवांचे मत्सरादि विकार बळावत जाऊन मानवांमध्यें निरनिराळे कलह व युद्धें वाढून त्यांचें जीवित सुखमय होण्याऐवजीं दुःखमयच झालेलें दिसून येतें. परंतु मानवाची दुर्दम्य आशा त्यास पुढें पुढें नेत आहे.

### वाङ्मयाचा प्रारंभ—

मानवसमाजांत वाङ्मयाचा प्रसार होण्यास लेखनकलेचें ज्ञान प्रथम प्रसृत होणें अवश्य होतें व तें सुलभ होणेंहि अवश्य होतें. यामुळें लेखनकला प्रसृत होण्यापूर्वी जें वाङ्मय तयार झालें तें केवळ तोंडी परंपरेनें चालत आलेलें होतें व लेखनकलेचें ज्ञान झाल्यावर तें स्थिरस्वरूप पावलें. ग्रीक भाषेंतील ईलियड आणि ओडेसी हीं दोन महाकाव्यें खि. पूर्व ७०० च्या सुमारास लेखस्वरूप पावलीं. हीं दोन्हीहि आयोनियन ग्रीक भाषेंत आहेत. पिसीस्ट्रेटस यानें हीं काव्यें प्रथम गोळा करून त्यांच्या संहिता बनविल्या. या काव्यांचे प्रथम अनेक पाठ होते. त्यांवरून खि. पूर्व २ ऱ्या शतकांत सध्यांचा पाठ तयार झाला. याखेरीज जीं कांहीं काव्यें व गीतें प्रचलित होतीं तीं हळूहळू नष्ट झालीं. वरील दोन्ही काव्यें होमर या कवीनें लिहिलीं असें ग्रीक लोक मानतात. होमरचा काल निश्चित नसून तो खि. पूर्व ११०० पासून ८०० पर्यंत कोणता तरी धरण्यांत येतो. होमर हा अंधळा होता याखेरीज याच्या चरित्रांतील कोणत्याहि गोष्टी-बद्दल एकमत आढळत नाहीं. जरी हीं दोन काव्यें एकाच कवीचीं मानण्यांत येतात तरी त्या काव्यांतील कल्पना, शैली व पद्धती भिन्न आहेत ही गोष्ट खि. पूर्व २ ऱ्या शतकापर्यंत कोणाच्याहि ध्यानीं आलेली दिसत नाहीं. हीं काव्यें मात्र आदर्श काव्यें आहेत व त्यांचीं अनेक भाषांतरें आजपर्यंत झालीं असलीं तरी कोणतेंहि भाषांतर मुळाची बरोबरी करूं शकत नाहीं. होमर-

बरोबरच हेसीयड या कवीचें नांव ऐकूं येतें. हा खि. पूर्व ९ व्यापासून ७ व्या शतकापर्यंत केव्हां तरी होऊन गेला असावा. यानें 'काम आणि दिवस' ( वर्क्स ॲन्ड डेज ) आणि 'देवज्ञान' ( थिओगोनी ) हीं दोन महाकाव्यें लिहिलीं आहेत. पहिल्या काव्यामध्यें त्यानें बिओशियांतील शेतकऱ्याचा जीवनक्रम चित्रित केला आहे व दुसऱ्यांत ग्रीक देवतांची उत्पत्ति व त्यांचे निरनिराळे संबंध यांसंबंधीं लोकांत प्रचलित असलेल्या कथा दिल्या आहेत. दीर्घकालपर्यंत ग्रीसमध्यें पौराणिक काव्यांशिवाय दुसरीं काव्यें प्रचलित झालीं नाहींत. परंतु त्यानंतर कांहीं मृत्युपर शोकगीतें लिडीयन कवींनीं आपल्या बांसरीवर मोठ्या गोड सुरांत आळवलेलीं व करुणरसपूर्ण दिसूं लागतात. यानंतर सारंगीवर म्हटलीं जाणारीं वीणागीतें दिसूं लागतात. या काव्यांचा जनक म्हणून पिंडार आणि सायमोनिडीस यांचीं नावें प्रामुख्यानें पुढें येतात. त्याचप्रमाणें लेसबॉस येथील सॅफो नांवाच्या कवयित्रीचीहि अशा काव्यांबद्दल प्रसिद्धि होती ही गोष्ट विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे.

ग्रीसमध्यें मद्यदेवता डायोनिसस हिचा जो वसंतोत्सव होत असे त्या प्रसंगामुळें ग्रीसमध्यें नाटकें करण्याची प्रथा सुरू झाली. प्रथम या देवतेसंबंधीं कथा एका गायकवृंदाकडून गायिल्या जात असत. नंतर त्या गायकवृंदाचा प्रमुख एकटाच पुढें येऊन गीत म्हणूं लागला व बाकीचे लोक त्याची साथ करूं लागले. यानंतर एश्चिलस ( खि. पूर्व ५२५ ) यानें यांत एक अधिक पात्र घालून वृंदप्रमुखाच्या प्रश्नास उत्तरें देण्याची प्रथा पाडली. यापुढें सोफोक्लीस ( खि. पूर्व ४९५ ) यानें एक तिसरें पात्र पुढें आणलें व संवाद आणि हावभाव यांची बरीच वाढ केली व त्यामुळें गायकवृंद हा मागें पडून त्याच्याकडे केवळ साथ करण्याचें काम राहिलें. प्रथम प्रथम हे नाट्यप्रयोग एखाद्या उंच ओट्यावर होत असत, परंतु खि. पूर्व ६ व्या शतकांत नाटकगृहें बांधण्यांत आलीं. यानंतर एका शतकांत ग्रीक नाटकांची पुष्कळच वाढ झाली व त्यांत वरील एश्चिलस, सोफोक्लीस आणि युरीपीडीज ( खि. पूर्व ४८० ) यांचीं नावें विशेष झळकलीं. हीं नाटकें प्रथम ट्रॅजेडी अथवा शोकांतक असत हें पूर्वी सांगितलेंच आहे. परंतु पुढें विनोदात्मक ( कॉमिडी ) नाटकें करण्याचीहि प्रथा हळूहळू सुरू झाली. अरीस्टोफानीज ( खि. पूर्व ५ वें शतक) यानें पुष्कळच कल्पनारम्य व उपहासात्मक-विशेषतः राजकीय व्यक्तींच्या उपहासात्मक-विनोदी नाटकें रचल्याचें प्रसिद्ध आहे. एक शतकानंतर मिनांडर या नांवाचा एक लेखक या क्षेत्रांत बराच पुढें आला. दुर्दैवानें तत्कालीन बहुतेक ग्रीक नाटकें आतां नष्ट झालीं आहेत.

ग्रीस देशामध्यें गद्यवाङ्मयाचा प्रारंभ इतिहासरूपानें झाला. हिरोडोटस यास इतिहासाचा जनक असें म्हणतात. तो पेरिक्लीसच्या अमदानींत अथेन्स येथें आला. त्यानंतर थूसीडायडीस यानें पिलापोनिशियन युद्धाची कथा लिहिली व झेनोफोन यानें आपल्या १०००० सैनिकांच्या प्रवासाचें वृत्त लिहून काढलें. याखेरीज ग्रीक वाङ्मयाचा एक महत्त्वाचा भाग म्हणजे तत्कालीन लोकांनीं केलेलीं वक्तृत्वें हा होय. यांपैकीं कांहीं वक्तृत्वें अगदीं नमुनेदार आहेत. तसेंच आरिस्टॉटल व प्लेटो यांचे संवादात्मक ग्रंथहि महत्त्वाचे आहेत. या ग्रीक वाङ्मयानें युरोपमधील वाङ्मयाचा आरंभ झाला.



### ग्रीक कला—

ईजियन संस्कृतीच्या काळांत क्रीट बेटांत व मायसिनी आणि टिरीन्स या शहरांत शिल्पकलेची व इतर कलांची पुष्कळच प्रगति झाली होती हें आपण पाहिलेंच आहे. या कलेची परंपरा पुढें ग्रीसमध्यें चालू राहिली. या काळांत ग्रीस देशांत झालेलीं सुवर्णाचीं व रत्नांचीं कलाकुसरीचीं कामें, तसेंच उत्कृष्टपणें कोरलेल्या मुद्रा व लहान लहान पुतळे, त्याचप्रमाणें खचकाम व रंगकाम केलेलीं पात्रें हीं ईजियन काळांतील किंवा ईजिप्तमधल्या अठराव्या घराण्याच्या काळांतील कलात्मक कामांच्या जवळ जवळ येतात. विशेषतः या कालांतील शिल्पकामें वाखाणण्यासारखीं आहेत. या काळांत डोरिक, आयोनिक आणि कोरीन्थिक या नांवानें तीन शिल्पपद्धती प्रचलित झाल्या. यांपैकीं कोरीन्थिकचेंच अनुकरण पुढें रोमन काळांत होऊं लागलें. पिसीस्ट्रेटस आणि पेरिक्लीस यांच्या काळांत ग्रीक शिल्पकला उच्च शिखरास पोहोंचली. या काळांतील शिल्पकाम रंगानें भरलेलें असे. परंतु आज जरी हे रंग निघून गेले असले तरी तें अप्रतिम कौशल्याचें दिसून येतें. या काळांत बांधलेलीं देवळें जरी आज भग्न अवस्थेंत असलीं तरी त्यांचें सौंदर्य अप्रतिम असून चांदण्यामध्यें तर मनास अतुलनीय आनंद झाल्यावांचून राहत नाहीं. ग्रीक लोकांत चित्रकलेची वाढ बरीच झाली असावी. परंतु आज तत्कालीन चित्रें उपलब्ध नसून तीं नष्ट झालीं आहेत. त्यांच्या ज्या कांहीं प्रतिकृती आज रोममध्यें दृष्टीस पडतात किंवा पॉंपी आणि हरक्यूलियम यांच्या उत्खननांत अवशेषरूपानें दृष्टीस पडतात त्यांवरूनच आपणांस ग्रीक लोकांच्या चित्रकलेतील कौशल्याची कल्पना करून घ्यावी लागते. परंतु त्यांवरूनहि ग्रीक चित्रकला ही ईजिप्शियन व बाबिलोनियन चित्रकलेपेक्षां अधिक स्वाभाविक व आत्मविश्वासपूर्ण दिसून येते.

तत्कालीन संगीतामध्यें विशेष प्रगति झाली नसून तें पद्य किंवा काव्य यांचें आनुषंगिक म्हणून असे आणि त्यांत स्वरमेळ

( हार्मनी ) नसे. त्यामुळें आजच्या पाश्चात्य संगीतशास्त्र तें बेचव वाटतें.

### मॅसिडोनियाचा फिलिप—

ग्रीस देशाच्या उत्तरेकडे मॅसिडोनिया या नांवाचा एक प्रांत आहे. या प्रांतांत खि. पूर्व ३६० या वर्षी फिलीप या नांवाचा राजा राज्य करूं लागला. फिलीप यानें ग्रीक पद्धतीचें शिक्षण घेतलें होतें. या वेळीं ग्रीसची झालेली हलाखीची स्थिति त्याच्या पूर्णपणें लक्षांत येऊन त्या देशावर स्वामित्व मिळविण्याची त्याच्या मनांत कल्पना आली. तो स्वतः शूर व मुत्सद्दी होता. त्यानें आपल्या राज्यांतील शेतकरी लोकांतूनच पुरेसें लढाऊ पेशाचें सैन्य उभें केलें व त्यास ग्रीक पद्धतीचीं शस्त्रे देऊन फॅलँक्स पद्धतीनें लढावयास शिकविलें. याप्रमाणेंच त्यानें एक मोठा घोडेस्वारांचा रिसाला तयार केला व पायदळ आणि घोडदळ यांस एकत्र जमावानें युद्ध करण्यास शिकविलें. प्रथम त्यानें आपल्या आजूबाजूस म्हणजे पूर्वेकडे व उत्तरेकडे जे दुर्बल प्रदेश होते त्यांवर सत्ता स्थापन केली व आपलें राज्य डॅन्यूब नदीपासून हेलेस्पाँट सामुद्रधुनीपर्यंत वाढविलें. या वेळीं फिलीपच्या सत्तावर्धनाकडे निरनिराळ्या दृष्टींनीं पाहणारे अथेन्समध्यें दोन पक्ष होते. एका पक्षाचा पुढारी आयसॉक्रेटीस हा असून त्याचें मत फिलीपशीं सख्य करून इराणशीं शत्रुत्व करावें असें होतें, परंतु डेमॉस्थिनीस या वक्त्यानें फिलीपच्या महत्त्वाकांक्षेविरुद्ध ग्रीक लोकांचें मन इतकें भडकावून दिलें कीं, शेवटीं त्यांमध्यें युद्ध होऊन फिलीपनें ग्रीक लोकांचा अखेरीस पिरोनिया येथें पूर्ण पराभव केला आणि स्पार्टाखेरीज सर्व ग्रीक संस्थानांवर आपलें वर्चस्व किंवा पुढारीपण स्थापन केलें. यानंतर त्यानें आशिया मायनरवर स्वारी करण्याची तयारी चालविली परंतु इतक्यांत त्याचा खून झाला.

### अलेक्झांडर दि ग्रेट—

फिलीपनंतर त्याची सत्ता त्याचा पुत्र अलेक्झांडर याच्या हातांत आली. फिलीपनें त्यास प्लेटोचा शिष्य आरिस्टॉटल याजकडून शिक्षण दिलें होतें. यामुळें त्यास शास्त्र, विद्या व कला यांचें महत्त्व कळून आलें होतें. तसेंच तो आपणांस अकिलीसचा वंशज समजत असे. यानें आशियावर स्वारी करण्याचा बेत केला. पण त्यापूर्वीं आपल्या सत्तेची जाणीव करून देण्याकरितां त्यानें बंडखोर थिबीज शहराचा पराभव करून त्याचा पूर्ण विध्वंस केला. त्यांत पिंडार या कवीचें घर तेवढें शाबूत ठेवलें. याप्रमाणें त्यानें विद्वत्तेबद्दल आदर दाखवून आपला चांगला दरारा बसविला. यानंतर त्यानें पूर्वेकडे चाल करून प्रथम ट्रॉय शहरीं तेथील देवतेचें पूजन केलें. यानंतर त्यास इराणी सत्तेखालीं असलेलीं ग्रीक शहरेंच प्रथम काबीज करावीं लागलीं. यांपैकीं एका लढाईत तो मोठ्या शर्थीनें वांचला. ख्रिस्तपूर्व ३३३ मध्यें त्याची इसस येथें इराणचा राजा तिसरा दरायस याच्याशीं पहिली लढाई झाली. तींत दरायसचा पूर्ण पराजय झाला. या वेळीं दरायसनें युफ्रेटीस नदीच्या पश्चिमेकडील सर्व प्रांत सोडून देण्याचें पत्करून तहाची मागणी केली. या तहानंतर अलेक्झांडर पूर्वेकडे न जातां दक्षिणेकडे वळला व सर्व फिनीशियन शहरें एकामागून एक काबीज करून तेथील बंदरांवर त्यानें आपला अमल बसविला. यांपैकीं टायर शहर त्यानें ७ महिने वेढा देऊन घेतलें व तेथे भयंकर विध्वंस केला. भूमध्यसमुद्रावरील सर्व बंदरें त्याच्या ताब्यांत आल्यामुळें त्यास इराणी आरमारापासून भीति नाहींशी झाली. यानंतर ईजिप्त देशावर स्वारी करून व तोहि देश पादाक्रांत करून पुनः तो आशियामध्यें आला. या वेळीं खि. पू. ३३१ मध्यें इराणी बादशहाचा अरबेला येथें पुन्हां त्यानें पूर्ण मोड केला व बाबिलोनिया या शहरांत हिंवाळा घालविला. या लढाईतून पळून गेलेल्या दरायस राजाचा त्याच्या सेवकानेंच खून केला. पुढें या खुनी लोकांस अलेक्झांडरनें चांगलें शासन केलें. या वेळीं अलेक्झांडर नाइल नदी व सुपीक चंद्रकोर या संपन्न व सुपीक देशाचा मालक बनला. यानंतर तो सुसा व पसारगडी या शहरांस भेट देऊन पर्सीपोलिस येथें गेला. तेथें त्यानें सायरसच्या राजवाड्याला स्वतः आग लावली. नंतर उत्तरेकडे एकबटाना या शहरीं जाऊन तेथे त्यानें आपला विश्वासू सरदार पार्मेनिओ यास ठेवलें. यानंतर पुढील सहा वर्षें ख्रिस्तपूर्व ३३० ते ३२४ त्याने पूर्वेकडे स्वारी करण्यांत खर्च केलीं व इराणी पठारावरून ऑक्सस व जक्सारटीस या नद्या ओलांडून तो हिंदुस्थानांत सिंधु नदीच्या अलीकडे आला. यापुढे जाण्यास त्याच्या सैनिकांनीं नकार दिल्यामुळें तो परत फिरला. आपल्या सैन्याची एक तुकडी त्यानें गलबतांतून सिंधु नदीच्या मार्गानें पाठवून तिच्या मुखांतून पश्चिमेकडे इराणी आखातापर्यंत जाण्यास तिला आज्ञा केली व तो स्वतः खुष्कीच्या मार्गानें बाबिलोन शहरास गेला. त्यानें वाटेंत स्वतःच्या नांवाचीं अनेक शहरें स्थापन करून तेथें ग्रीक सैनिकांच्या वसाहती स्थापन केल्या. बाबिलोन येथें आजारी पडून तो ख्रिस्तपूर्व ३२३ मध्यें मरण पावला.

### अलेक्झांडरचा विजय व त्याचे परिणाम—

या अलेक्झांडरच्या स्वारीनें संस्कृतिसंवर्धनाच्या बाबतींत फार मोठे परिणाम घडून आले. ईजिप्तमध्यें असताना त्याने नाइल नदीच्या प्रवाहाचें संशोधन करण्याकरितां एक तुकडी

पाठवली होती. याप्रमाणेंच कास्पियन समुद्राचें संशोधन करण्याकरितां गलबतें पाठवलीं होतीं. सिंधु नदींतून पाठविलेल्या निआर्केसच्या हाताखालील तुकडीचा उल्लेख वर आलाच आहे. त्यानें आपल्याबरोबर शेंकडों शास्त्रज्ञ आणले होते व भौतिक शास्त्रदृष्ट्या अनेक महत्त्वाच्या पदार्थांचे नमुने त्यानें अथेन्समध्यें आपला गुरु ॲरिस्टॉटल याकडे पाठविले. त्याच्या मनांत आशिया व युरोप यांचें एकीकरण करून त्यामध्यें ग्रीक संस्कृतीचा प्रसार करावयाचा होता. त्याच्या सैन्यांत मॅसिडोनियांतील लोकांइतकेच इतर लोक असून त्यांचा दर्जा सारखाच असे. त्यानें सोगडियन राजकन्या रोकझाना इच्याशीं विवाह केला होता. तसेंच आपल्या अनेक सेनापतींचीं व मित्रांचीं आशियांतील सरदारांच्या मुलींशीं लग्नें करून दिलीं होतीं. अर्थात् त्याच्या सैन्यांतील हजारों सैनिकांनीं अशाच तऱ्हेनें आपले विवाह केले होते. कांहीं पर्शियन लोकास त्यानें सत्रप म्हणून नेमलें होतें. मधून मधून तो इराणी तऱ्हेचा पोपाखहि करीत असे. त्यानें इटली, सिसिली व कार्थेज हे देशहि जिंकण्याचें योजलें होतें व त्याकरितां एक मोठें आरमार बांधण्याचें योजलें होतें. तसेंच त्याच्या मनांत आफ्रिकेच्या उत्तर किनाऱ्यावर सैन्य जाण्याकरितां एक मोठी सडक जिब्राल्टरपर्यंत बांधावयाची होती. त्यानें कॅलिस्थेनीस नावाचा एक साहित्यिक मित्र आपल्याबरोबर बाळगला होता व त्यास दैनंदिन हकीगतींची नोंद ठेवण्यास सांगितलें होतें. कॅलिस्थेनीसच्या लेखांतील अवतरणें अनेक ठिकाणीं आढळतात. परंतु मूळ लेख नष्ट झाले आहेत. तो स्वतःला देवतेचा अवतार समजूं लागला होता असेंहि दिसून येतें व तशा तऱ्हेचे त्यानें ग्रीक संस्थानास हुकूमहि पाठविले होते असें दिसतें. अलेक्झांडरच्या या स्वारीचा परिणाम रोमपासून चीनपर्यंत जाणवला यांत शंका नाहीं. या कालांत शास्त्र, कला, व्यापार आणि मुत्सद्दीगिरी यांत पुष्कळच वाढ झाली. त्यानें शास्त्रीय ज्ञानास उत्तेजन दिल्यामुळें पुढील राजांनीं त्याचें अनुकरण केलें. त्याच्या स्वाऱ्यांमुळें ग्रीक संस्कृतीचा आशिया, हिंदुस्थान व चीनमध्यें प्रसार झाला. निरनिराळ्या राष्ट्रांतील सीमा नष्ट झाल्यामुळें व्यापारास फार मोठी चालना मिळाली. लहान लहान राज्यापेक्षां एक मोठें साम्राज्य स्थापन करणें अधिक शहाणपणाचें आहे ही गोष्ट त्यानें निदर्शनास आणली. याचेंच पुढें अनुकरण करण्याचा जूलियस सीझर व मार्क ॲंटनी यांनीं प्रयत्न केला असें दिसतें. ऑगस्टसच्या काळांत तर लोकराज्यापेक्षां साम्राज्यच अधिक बळकट असतें हें दिसून आलें. याप्रमाणें अलेक्झांडरच्या स्वारीमुळें सर्व जगामध्यें एक प्रकारची विचारक्रांति घडून आली.

## अलेक्झांड्रिया येथील विद्योपासना—

अनेक शतकेंपर्यंत अथेन्स शहरानें कला आणि संस्कृति यांचें केंद्र म्हणून आपली कीर्ति कायम ठेवली होती. अथेन्स येथील विद्यापीठें सुमारें १००० वर्षें म्हणजे इसवी सन ५२९ पर्यंत सतत चालू राहिलीं. परंतु हळूहळू जगांतील बौद्धिक कार्याचें पुढारीपण भूमध्यसमुद्राच्या पलीकडे अलेक्झांडर यानें स्थापन केलेल्या अलेक्झांड्रिया या शहराकडे गेलें. या ठिकाणीं अलेक्झांडरचा एक सेनापति टॉलेमी हा अलेक्झांडरच्या मृत्यूनंतर स्वतंत्र होऊन ईजिप्तचा फॅरो बनला होता. त्या वेळीं ईजिप्तची राजभाषा ग्रीक भाषा बनली होती. टॉलेमी हा अलेक्झांडर राजा होण्यापूर्वीपासून त्याचा मित्र होता व त्यानें ॲरिस्टॉटलपासून बरीचशी विद्या ग्रहण केली होती. यानें ज्ञानाचें संवर्धन व संशोधन या गोष्टींस मोठी चालना दिली. यानें एक अलेक्झांडरच्या स्वाऱ्यांचा इतिहास लिहिला होता, परंतु तो पुढें नष्ट झाला.

अलेक्झांडरनें स्वतः ॲरिस्टॉटल याच्या संशोधनास द्रव्यद्वारा बरेंच साहाय्य केलें होतें. परंतु शास्त्रसंवर्धनाकरितां कायमची सांपत्तिक योजना टॉलेमी पहिला यानेंच केली. यानें अलेक्झांड्रिया येथें म्यूझिस या देवतांच्या नांवानें एक कायमची संस्था स्थापन केली. म्हणून तिला म्यूझियम हें नांव पडलें. या ठिकाणीं दोनतीन पिढ्या फार महत्त्वाचें शास्त्रीय ज्ञानप्रसाराचें कार्य झालें. भूमितीचा जनक युक्लिड, पृथ्वीचा आकार व व्यास मोजणारा एराटॉस्थिनीज, शंकुछेदांचें गणित करणारा अपोलोनियस व आकाशांतील ताऱ्यांचा नकाशा व सूची तयार करणारा हिपार्कस, तसेंच पहिलें बाष्पयंत्र बनविणारा हिरो हे सर्व अलेक्झांड्रिया येथेंच पुढें आले. प्रसिद्ध यंत्रशास्त्रवेत्ता व संशोधक आर्किमीडीस हा सायराक्यूजहून अलेक्झांड्रिया येथें अभ्यासाकरितां आला होता व त्यानें आपला या शहराशीं संबंध पुढेंहि पत्रव्यवहारानें कायम ठेवला होता. हिरोफिलस या नांवाचा एक ग्रीक शरीरशास्त्रवेत्ता याच वेळीं होऊन गेला. तो प्रत्यक्ष गुन्हेगारांच्या जिवंत शरीरांचें विच्छेदन करीत असे असें सांगतात. इतर वैद्य शस्त्रक्रियेस विरोध करीत व औषधिविद्येची जोपासना करीत असत.

टॉलेमी पहिला व टॉलेमी दुसरा यांच्या कारकीर्दींत ज्ञानामध्यें व शास्त्रीय शोधांमध्यें एकदोन पिढ्यांतच इतकी प्रगति झाली कीं, तेवढी जगामध्यें पुन्हां ख्रिस्तोत्तर १६ व्या शतकापर्यंत झाली नाहीं. परंतु ही ज्ञानसंवर्धनाची परंपरा पुढें टिकून राहिली नाहीं. या गोष्टीस अनेक कारणें संभवतात. परंतु त्यांतील मुख्य कारण म्हणजे म्यूझियम ही संस्था स्वतंत्रपणें शास्त्रसंशोधन करूं शकेल अशा पद्धतीनें स्थापन करण्यांत आलेली नसून

ती केवळ राजाश्रयानें चालली होती; व टॉलेमी पहिला व दुसरा हे आरिस्टॉटल वगैरेंच्या सहवासांत असल्यामुळें जसे बुद्धीचे चहाते होते तसे त्यांचे वंशज राहिले नाहींत. त्यांच्यावर हळूहळू ईजिप्ती संस्कार होऊं लागले व ते ईजिप्तमधील पुरोहित आणि धर्मगुरु यांच्या कह्यांत जाऊन त्यांचें शास्त्रसंशोधनाकडे दुर्लक्ष होत गेलें.

### अलेक्झांड्रिया येथील ग्रंथालय—

पहिल्या टॉलेमीनें विद्वान् लोकांच्यामार्फत केवळ ज्ञानसंवर्धनाचेंच कार्य चालविलें असें नाहीं तर त्यानें एका मोठ्या ग्रंथालयाच्या रूपानें सर्व जगांतील ज्ञानाचा अलेक्झांड्रिया येथें संग्रह केला. या ग्रंथालयांत केवळ ग्रंथ संग्रहीत करून ठेवण्यांत आले असें नव्हे तर तेथें अनेक ग्रंथांच्या नकला करण्याकरितां लेखक नेमण्यांत आले होते व त्यांचेमार्फत ग्रंथप्रसाराचेंहि काम चालू होतें. याप्रमाणें या ग्रंथालयांत जगांतील ज्ञानप्रसाराची खरोखरच मुहूर्तमेढ रोवण्यांत आली होती. ही मानवाच्या इतिहासांतील फार महत्त्वाची गोष्ट होय.

या ज्ञानप्रसाराच्या कार्यांत त्या वेळींहि बऱ्याच अडचणी होत्या. त्यांतील महत्त्वाची गोष्ट ही कीं, त्या वेळचा विद्वान् मनुष्य अथवा तत्त्वज्ञानी आणि सामान्य व्यापारी किंवा कारागीर या दोहोंच्या मनोभूमिकेमध्यें फार अंतर असे. त्या वेळीं उत्तम कांचेच्या वस्तू बनविणारे कारागीर होते. परंतु त्यांचा विचार करणाऱ्या लोकांशीं मुळींच संबंध नव्हता. हा कारागीर उत्तम निरनिराळ्या तऱ्हेच्या रंगीत कांचेच्या वस्तू, पात्रें व मणी तयार करीत असे. परंतु त्यानें कधींहि दूरदर्शक भिंग अथवा दुर्बिणीची कांच बनविली नाहीं. त्याला स्वच्छ पांढरी कांच करण्यांत कौशल्य वाटत नसे. धातुकाम करणारा कारागीर उत्कृष्ट शस्त्रें व जडावाचें काम करीत असे, परंतु त्यानें कधीं रासायनिक द्रव्यें तोलण्याचा सूक्ष्म तराजू अथवा कांटा तयार करण्याचें मनांत आणलें नाहीं. तत्कालीन तत्त्ववेत्ते अणू, परमाणू व पदार्थांचे गुणधर्म यांच्याबद्दल अनेक तर्क चालविण्यांत गर्क असत. परंतु त्यांस निरनिराळे रंग किंवा कांचमिना वगैरे व्यवहारांतील वस्तूंची माहिती नसे. भौतिक वस्तूंबद्दल ते उदासीन असत. यामुळें अलेक्झांड्रियांत सूक्ष्मदर्शक यंत्रें किंवा रसायनशास्त्र यांची उत्पत्ति झाली नाहीं व हिरोनें जरी बाष्पयंत्र शोधून काढलें तरी त्याचा उपयोग पाणी चढवणारा पंप करण्याकडे किंवा गलबत चालविण्याकडे करण्याची प्रवृत्ति त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली नाहीं. वैद्यकशास्त्राशिवाय शास्त्रीय ज्ञानाचा प्रत्यक्ष व्यवहारांत उपयोग फारसा केलेला आढळत नाहीं. त्यामुळें टॉलेमी पहिला व टॉलेमी दुसरा या दोन राजांच्या बौद्धिक जिज्ञासेनंतर ज्ञान-प्रसारास काहीं प्रवर्तक कारण राहिलें नाहीं. या संस्थेमध्यें लागलेले शास्त्रीय शोध हस्तलिखित ग्रंथांतच पडून राहिले व या ग्रंथांचा प्रत्यक्ष व्यवहारांत उपयोग विद्या पुनरुज्जीवनकालापर्यंत कोणीं करून घेतला नाहीं.

या ग्रंथसंग्रहालयांत ग्रंथ तयार करण्याच्या कलेंतहि फारशी प्रगति झाली नाहीं. त्या कालांत चिंध्यांपासून कागद करण्याची कला माहीत नव्हती. ही कागद करण्याची कला प्रथम चिनी लोकांनीं शोधून काढली. तिचें ज्ञान पश्चिमेकडील लोकांस ख्रिस्तोत्तर ९ व्या शतकापर्यंत झालें नाहीं. तेव्हां पपायरस लव्हाळ्याच्या पट्ट्या एकत्र जोडून केलेल्या कागदावर किंवा चर्मपत्रावर लिहिण्याची पद्धत होती. यांच्या गुंडाळ्या करून ठेवण्यांत येत. त्या उलगडण्यास व वाचण्यास आणि विशेषतः संदर्भ पाहण्यास फार गैरसोयीच्या असत. प्राचीन सुमेरियन लोकांतच अक्षरांचे ठसे उठविण्याची कला बरीच वृद्धिंगत झाली होती. परंतु कागदाच्या अभावीं या कलेची वाढ पुस्तकें छापण्याच्या कामीं झाली नाहीं. या बाबतींत नकलाकारांचाहि विरोध आड आला असणें शक्य आहे. अलेक्झांड्रिया येथें अनेक ग्रंथ तयार झाले. परंतु स्वस्त ग्रंथ तयार झाले नाहींत. त्यामुळें ज्ञानाचा प्रसार श्रीमंत व उच्च लोकांपलीकडे सामान्य जनतेंत मुळींच झाला नाहीं. यानंतरच्या काळांत लोकांमध्यें धर्माचें वेड वाढत गेलें व त्याचा परिणाम अलेक्झांड्रिया शहरावरहि घडून आला. यामुळें आरिस्टॉटलनें लावलेलें हें ज्ञानाचें बीज १,००० वर्षें अंधारांतच दडून राहिलें. त्यानंतर त्यास अंकुर फुटावयास लागले व थोड्या शतकांतच त्याचा विस्तार सर्व मानवजातीमध्यें ज्ञानप्रसार व नवीन नवीन स्पष्ट कल्पना यांच्या द्वारें झाला व मानवी जीवितास अगदीं नवीन वळण मिळालें.

ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांत अलेक्झांड्रिया शहर हें एकटेंच ज्ञानाचें केंद्र नव्हतें, तर त्या वेळीं अनेक शहरांमध्यें ज्ञानाची उपासना चालू होती. उदाहरणार्थ, सिसिली बेटामध्यें सायराक्यूज या शहरीं सुमारें दोन शतकें शास्त्रांची व विचारांची वाढ होत होती. आशिया मायनरमध्यें पर्गामम येथें एक मोठें ग्रंथालय होतें. परंतु या सर्व संस्कृतीचा प्रथम उत्तरेकडून स्वाऱ्या करणाऱ्या गॉल लोकांकडून व नंतर रोमन लोकांकडून व पूर्वेकडील पार्थियन लोकांकडून विध्वंस होत गेला.

### अलेक्झांड्रिया शहराचें सांस्कृतिक संघटनेंत महत्त्व—

अलेक्झांड्रिया या शहरीं विकास पावलेल्या व वाढीस लागलेल्या सांस्कृतिक केंद्राचें आणखीहि एका दृष्टीनें महत्त्व आहे.

अलेक्झांड्रिया या शहरांत टॉलेमी राजांची सत्ता प्रस्थापित झाल्यामुळें त्या ठिकाणीं त्या राजांच्या आश्रयानें आरिस्टॉटलचीं मतें व हेलेनिक आणि मॅसिडोनियन संस्कृति यांचा एका दिशेनें प्रसार होत गेला. त्याजबरोबर तें शहर ईजिप्तमध्यें असल्यामुळें तेथें पूर्वीच्या ईजिप्शिअन रहिवाशांची बरीच मोठी वस्ती होती व त्यांची भाषाहि ग्रीकच होती. परंतु त्यांच्या मागें सुमारें चार हजार वर्षांची निरनिराळ्या देवता, त्यांचीं मंदिरें, त्यांच्या उपासना व यज्ञविधी यांची एक परंपरा होती. त्याचप्रमाणें अलेक्झांड्रिया शहरांत पॅलेस्टाइनमधून आश्रयार्थ परागंदा होऊन आलेल्या बऱ्याच यहुदी लोकांची वस्ती होती. हे यहुदी बाबिलोन शहरांतून जे दास्यमुक्त होऊन पॅलेस्टाइनमध्यें परत आले त्यांपेक्षां भिन्न होते. ते दास्य चुकविण्याकरितांच पॅलेस्टाइन सोडून ईजिप्तमध्यें येऊन वसाहत करून राहिले होते. यांची संख्याहि इतकी मोठी होती कीं, त्या वेळीं जेरुसलेममधील यहुद्यांची संख्याहि त्यांच्यापेक्षां कमीच होती. शिवाय आतां ते हिब्रू भाषा विसरून गेले होते. त्यामुळें त्यांची परंपरा ग्रथित करणारा जो बायबल ग्रंथ त्याचें त्यांनीं अलेक्झांड्रिया या शहरींच ग्रीक भाषेंत भाषांतर केलें होतें. म्हणजे त्यांच्यामागेंहि एक बरीच जुनी परंपरा होती. मात्र या सर्व लोकांची प्रचलित भाषा ॲटिका प्रांतांतील ग्रीक भाषाच होती.

याप्रमाणें या वेळीं तीन भिन्न भिन्न परंपरांच्या लोकांचा संघर्ष अलेक्झांड्रिया या शहरीं झालेला होता. एक ग्रीक लोकांची बुद्धिवादी आर्यपरंपरा, दुसरी यहुदी लोकांची सेमिटिक एकेश्वरी परंपरा व तिसरी ईजिप्ती उपासना व यज्ञयाग परंपरा. या तिन्ही परंपरांचा संघर्ष व मिश्रण अलेक्झांड्रिया येथें होत होतें. हा प्रकार नगरामध्यें व समाजामध्यें चालू होता. पण अलेक्झांड्रियाच्या बाजारपेठांत व बंदरांत त्या वेळीं ज्ञात असलेल्या जगांतील अनेक निरनिराळ्या देशांतील लोकांचें एकत्र संघटण होत होतें व त्यांचा भिन्न भिन्न धर्मांचें व रीतिरिवाजांचें पालन करणाऱ्या लोकांशीं नित्य संबंध येत होता. ख्रि. पू. तिसऱ्या शतकांत अशोकानें बौद्ध धर्माच्या प्रसाराकरितां पाठविलेले धर्मोपदेशक व भिक्षु अलेक्झांड्रियामध्यें आले होते असें सांगतात व त्यानंतरच्या कालांत या शहरांत भारतीय व्यापाऱ्यांची एक वसाहतच स्थायिक झाली होती ही गोष्ट निश्चित आहे.

या गोष्टींचा परिणाम असा झाला कीं, या लोकांनीं परस्परांमध्यें आपल्या उपास्य देवतांचीहि देवाण-घेवाण केली व या समाजांत रूढ असलेल्या प्रमुख देवतांमध्यें साम्य आहे अशी भावना त्या लोकांत प्रसृत झाली. यामुळें जरी प्रत्येक समाजाची भिन्न भिन्न देवता होती तरी सृष्टीमध्यें एकच देव असून त्याचींच भिन्न भिन्न रूपें म्हणजे या निरनिराळ्या समाजांतील देवता आहेत अशी समजूत त्या लोकांची हळूहळू होऊं लागली व या गोष्टीस त्यांचा एकत्र सहवास व व्यवहार हा कारणीभूत झाला. याप्रमाणें ईजिप्ती लोकांचा ॲम्मन, (यास अलेक्झांडर आपला पूर्वज मानीत असे), असुरी बाबिलोनी लोकांचा बेल मार्डुक, ग्रीक लोकांचा झ्यूस व रोमन लोकांचा ज्युपिटर हीं सर्व एकाच देवतेचीं भिन्न भिन्न रूपें आहेत ही गोष्ट या सर्व निरनिराळ्या समाजांतील लोकांच्या मनावर ठसावयास फार काळ लागला नाहीं व हीं सर्व सूर्यदेवतेचींच रूपें असल्यामुळें वैदिक मित्र व फारसी लोकांचा मिथ्र हेहि त्यांपासून दूर नव्हते ही गोष्ट आपल्या सहज नजरेस येते. जेथें कांहीं देवतांत भिन्नता आढळेल तेथें त्या भिन्न देवता म्हणजे एकाच देवतेचीं भिन्न स्वरूपें होत असें *मानण्याची प्रवृत्ति होऊन त्या भेदाचें निराकरण करण्यांत* येत असे. अर्थात् या भिन्न भिन्न समाजांच्या व संप्रदायांच्या संनिकर्षामध्यें जे समाज अल्पसंख्याक होते अथवा कमी सामाजिक अथवा राजकीय वा व्यापारी महत्त्वाचे होते त्यांचीं दैवतें मागें पडलीं व हळूहळू विस्मृतींत गडप झालीं. ईजिप्ती लोकांचा ऑसिरिस हा देव ॲपिस या नंदी देवतेशीं व पुढें ॲमनशीं एकरूप मानण्यांत येऊं लागला होता, हाच सेरापिस या नांवानें अलेक्झांड्रियामध्यें महत्त्वास चढला होता व त्यास ग्रीक लोक ज्युपिटर सेरापिस म्हणून संबोधीत. ईजिप्ती लोकांची धेनु देवता ही थोर इसिस या नावानें अर्थात् नंदी देवतेची म्हणजेच ऑसिरिसची पत्नी बनली व त्यांस होरस हा पुत्र झाला. हाच पुढें ऑसिरिस बनला. कारण होरस हीहि सूर्यदेवताच होती. याप्रमाणें ऑसिरिस, इसिस व होरस ही देवतात्रयी बनली. या ईजिप्ती देवता-त्रयीच्या उपासनेकरितां पहिल्या टॉलेमीनें सेरापियम या नांवाचें एक मंदिर बांधलें. या त्रयीपैकीं कोणत्या ना कोणत्या तरी देवतेशीं इतर सर्व देवतांचें ऐक्य मानण्यांत येऊं लागलें व या त्रयींमध्येंहि एक प्रकारचें ऐक्य आहे, या तीन देवताहि एकच असून तीं एकाच देवतेचीं भिन्न रूपें आहेत अशीहि समजूत रूढ झाली. या त्रयीची पूजा मोठ्या समारंभानें करण्यांत येत असे.

याच सुमारास आत्मा अथवा मनुष्य हा अमर आहे ही ईजिप्ती कल्पनाहि प्रसार पावूं लागली. आर्य अथवा प्राचीन सेमिटिक लोकांत मरणोत्तर जीविताची कल्पना नव्हती. मंगोलियन लोकांत अद्यापिहि नाहीं. परंतु ईजिप्ती लोकांत प्राचीन कालापासून दृढमूल होती. या कल्पनेचा सेरापिस उपासनेशीं निकट संबंध आला व ही देवता आत्म्याची मार्गदर्शक मानण्यांत येऊं लागली. तो मृतांस जिवंत करून सूर्यप्रकाशांत नेतो

अशीहि कल्पना व्यक्त केलेली आढळते. होरस ही सूर्यदेवता असून तिचें प्रतीक पंख पसरलेला षट्पद कीटक हें बनलें व होरस हा अखेरीस आपला पिता जो आकाशांतील सूर्य त्या देवतेशीं (ऑसिरिस) एकरूप होतो ही कल्पनाहि अधिकाधिक प्रसृत होऊं लागली. होरसचीं सूर्यदेवतात्मक अनेक स्तोत्रें प्रचलित झालीं व त्यांचें खिस्ती स्तोत्रांशीं बरेंच साम्य आढळतें. या ईजिप्ती देवतात्रयीची अथवा त्रिमूर्तीची कल्पना अनेक भिन्न भिन्न धर्मांत व संप्रदायांत आढळते. खिस्ती संप्रदायानेंहि ती पिता, पुत्र व पवित्र आत्मा या रूपाने ग्रहण केली आहे. या ठिकाणीं हीहि एक गोष्ट जातां जातां नमूद करावीशी वाटते कीं, आपणां भारतीयांतहि ही देवतात्रयीची कल्पना फार प्राचीन कालापासून अनेक स्वरूपांत प्रचलित आहे. वेदांमध्यें ती रुद्र, विष्णु व प्रजापति या रूपांत, तर पौराणिक कालांत ती ब्रह्मा, विष्णु, महेश या रूपांत व त्यावरून दत्तात्रेय या स्वरूपांत तर कांहीं ठिकाणीं ती इतर रूपांत प्रचलित आहे. परंतु भारतीयांत या तीनहि देवता नर रूपांत आहेत तर ईजिप्ती लोकांत त्यांत एक स्त्री आहे. घारापुरी येथील लेण्यांतील त्रिमूर्तीच्या शिल्पकामाकडे पाहिल्यास त्यांत एका बाजूस असलेल्या मूर्तीचा चेहरा स्त्रीसारखा दिसतो ही गोष्ट लक्षांत आल्यावांचून राहत नाहीं व यामुळें या त्रिमूर्तीच्या कल्पनेची जगद्व्यापकता व कदाचित् परस्पर देवाणघेवाण झाल्याचाहि तर्क मनांत आल्याशिवाय राहत नाहीं. तसेंच जगन्नाथ येथील त्रिमूर्तीमध्यें राम, बलिराम व सुभद्रा अशीं नांवें ऐकण्यांत येतात, हीहि गोष्ट विचारास चालना दिल्याशिवाय राहत नाहीं. या दृष्टीनें विचार करूं गेल्यास जगांतील अनेक समाजांस एकत्र आणणारें व सर्व जगांतील विचारांची देवाणघेवाण करण्याच्या दृष्टीनें अत्यंत सोयीचें व व्यापाराच्या भरभराटीमुळें व ज्ञान-संवर्धनाच्या दृष्टीनें प्राचीन कालांत फार महत्त्वास चढलेलें म्हणून अलेक्झांड्रिया या शहराचें व तेथें टॉलेमी राजांनीं स्थापन केलेल्या विद्यापीठाचें, ग्रंथसंग्रहालयाचें व तेथील उपासनामंदिराचें महत्त्व फार आहे व हें महत्त्व या शहराकडे दीर्घकाला-पर्यंत राहिलें.

रोमन साम्राज्याच्या कालांतहि अलेक्झांड्रिया हें जगातील सर्वांत मोठें व्यापाराचें केंद्र होतें. अलेक्झांड्रिया येथील रोमन व्यापाऱ्यांच्या दक्षिण हिंदुस्थानांत वसाहती होत्या. मलबार किनाऱ्यावरील क्रांगानूर या ठिकाणीं ऑगस्टस बादशहाचें एक मंदिर होतें व या वसाहतींच्या संरक्षणाकरितां दोन रोमन कोहॉर्टें ठेवलेल्या असत. रोमन बादशहा दक्षिण हिंदुस्थानांतील राजांकडे वकील अथवा राजदूतमंडळें पाठवीत असत. क्लेमंट, क्रिसोस्टोम वगैरे ग्रंथकारांनीं अलेक्झांड्रियामधील भारतीय लोकांचें व त्यांच्या धर्माचें वर्णन केलेलें आढळतें. या सर्व दृष्टींनीं अलेक्झांड्रिया शहराचें संस्कृतिविकासाच्या दृष्टीनें महत्त्व फार आहे.

## सूर्योपासक संस्कृति—

आतांपर्यंत आपण ज्या संस्कृतींचें विवेचन केलें त्यांमध्यें एक प्रकारची सुसूत्रता आढळण्यांत येते. प्रथम हजारों वर्षें एक तऱ्हेची सूर्योपासक संस्कृति तत्कालीन ज्ञात जगांतील उष्ण हवामानाच्या व सुपीक नद्यांच्या खोऱ्यांच्या प्रदेशांत प्रसार पावली व पुरोहित वर्ग हाच राज्यकर्ता वर्ग असून सूर्यदेवतेचीं निरनिराळ्या स्वरूपांतील उपासनास्थानें म्हणजेच देवळें हीं या संस्कृतींचीं केंद्रें असून त्यांच्यासमोंवतीं या संस्कृतींचा प्रसार होत होता. या संस्कृतींचा प्रसार करणारे लोक मध्य आशियां-तील एका केंद्रापासून हळूहळू सर्वत्र प्रसार पावले होते. हे लोक पर्वताच्या खोऱ्यांतून हळूहळू सपाट गवताळ प्रदेशांत पसरले व त्यांनीं आपली भाषा व संस्कृति हीं त्यांच्या मार्गांत येणाऱ्या तत्पूर्व असंस्कृत लोकांवर लादलीं. अर्थात् या त्यांच्या संस्कृतीचीं रूपें निरनिराळ्या ठिकाणीं थोड्याफार भिन्न भिन्न स्वरूपांत प्रकट झालीं. मेसापोटेमियामध्यें आपणांस प्रथम एलामाइट व नंतर सेमिटिक लोक दृष्टीस पडतात व त्यानंतर उत्तरेकडील मीड व इराणी लोक आणि त्यांच्यामागून ग्रीक लोक दृष्टीस पडतात. ईजियन प्रदेशांतहि ग्रीक लोकच नजरेस येतात. भरत-खंडामध्यें संस्कृत बोलणारे आर्य लोक दिसून येतात. ईजिप्त-मध्यें यांचा प्रभाव त्या मानानें कमी दिसून येतो. कारण तेथें त्यांच्याहि पूर्वीं येऊन वस्ती करून राहिलेल्या पुरोहित लोकांनीं आपली संस्कृति बरीच पूर्णतेस नेली होती. चीनमध्ये वारंवार हूण लोकांनीं आक्रमण करून तेथील प्रदेश व्यापला होता व पुढें मोगोल लोकांनीं त्यावर आपला अमल बसविला.

या निरनिराळ्या भ्रमणवृत्ती लोकांनीं व्यापलेल्या प्रदेशांत पुष्कळ खळबळ उडवून दिली. ठिकठिकाणीं त्यांनीं नवीन नवीन विचारांस व कल्पनांस चालना दिली. फार प्राचीन काळापासून चालत आलेल्या समजुती व परंपरा यांस धक्का दिला. त्यांनीं देवळें खुलीं केलीं आणि पुरोहित वर्गास बाजूस सारून आपल्यांतील सेनानायकास राज्यावर बसविलें.

खिस्तपूर्व ६ व्या शतकानंतर आपणांला सर्वत्र एक तऱ्हेची नवीन विचारांची लाट पसरलेली दिसते. जुन्या परंपरागत समजुती मागें पडून नवीन नवीन नैतिक व बौद्धिक विचार वाढीस लागलेले दिसतात. वाचन व लेखन यांचा प्रसार वाढत जाऊन राज्यकर्त्यांत व उच्च वर्गांमध्यें बौद्धिक वाढ झालेली दिसून येते आणि ज्ञान हें केवळ पुरोहित वर्गाचीच मत्ता न

राहतां तें जिज्ञासूंस उपलब्ध होऊं लागल्याचें दिसून येतें. मोठमोठे रस्ते तयार झाल्यामुळें व घोड्यासारख्या माणसाळलेल्या प्राण्याचा प्रसार झाल्यामुळें प्रवास, वाहतूक व दळणवळण या गोष्टींची वाढ मोठ्या प्रमाणावर होऊन नाण्यांच्या प्रसाराबरोबर व्यापारहि वाढीस लागलेला दिसून येतो.

भरतखंडामध्येंहि बुद्धाचा केवळ भूतदया व नीतितत्त्वें यांवर आधारलेला व मानवाची उन्नति त्याच्याच हातांत आणून देणारा नवीन विश्वधर्म याच कालांत प्रसार पावत होता व जुन्या परंपरांस धक्के देत होता. या संप्रदायाचें वाङ्मयहि लोकभाषेंत तयार होऊन ते सर्वत्रांस सुगम व सुलभतेनें उपलब्ध होत होतें. म्हणून या धर्माचा प्रसार अथवा त्याचा ठसा तत्कालीन ज्ञात जगावर पूर्वेकडे चीनपासून पश्चिमेकडे अलेक्झांड्रियापर्यंत सर्वत्र उमटला होता.

## इटलीमध्यें संस्कृतीचा उदय—

आतांपर्यंत आपण भूमध्यसमुद्रांतील इटली या देशाकडे फारसें लक्ष दिलें नव्हतें. खिस्तपूर्व १००० च्या सुमारास हा प्रदेश म्हणजे डोंगराळ व अरण्यमय असून त्यांत मानवाची वस्ती तुरळकच होती. उत्तरेकडे आर्यभाषी कांहीं लोकांनीं येऊन कांहीं शहरें स्थापन केलीं होतीं व दक्षिणेकडे ग्रीक लोकांनीं वसाहती स्थापन केल्या होत्या. दक्षिण इटलींतील पीस्टम नांवाच्या ग्रीक लोकांच्या वसाहतीवरून तत्कालीन ग्रीक संस्कृतीच्या येथें झालेल्या वाढीचें आपणांस ज्ञान होतें. इटलीचा मध्यभाग इट्रुस्कन नावाच्या लोकांनीं व्यापला होता. या इट्रुस्कन नांवाच्या लोकांच्या सत्तेखालींच टायबर नदीवर त्या काळीं लॅटिन नांवाच्या लोकांची रोम या नांवाची एक वस्ती होती. रोम शहराच्या स्थापनेचें वर्ष खि. पूर्व ७५३ हें देण्यांत येतें. परंतु रोमन फोरममध्यें या कालाच्या पूर्वींचे इट्रुस्कन लोकांच्या थडग्यांचे अवशेष सांपडले आहेत. प्रत्यक्ष रोम्युलस याची म्हणून जी कबर दाखविण्यांत येते तीवर इस्ट्रुस्कन भाषेंत कोरलेला लेख दृष्टीस पडतो. रोममध्यें प्रथम लॅटिन राजे असावे,पण पुढें इस्ट्रुस्कन राजांनीं तेथें आपली सत्ता स्थापन केली. खिस्तपूर्व ६ व्या शतकांत ५१० या वर्षीं रोमन लोकांनीं इस्ट्रुस्कन राजास हांकून देऊन आपल्यापैकीं पॅट्रीशियन या उच्च वर्गाच्या लोकांच्या आधिपत्याखालीं एक लोकराज्य स्थापन केलें. या वेळीं सामान्य लोकांस प्लीबिअन म्हणत. या पॅट्रीशियन आणि प्लीबिअन म्हणजेच वरिष्ठ व कनिष्ठ लोक यांमध्यें अनेक शतकें व वर्षें लढा चालू होता व अखेरीस प्लीबिअन लोकांनीं वरिष्ठ लोकांकडून सर्व तऱ्हेचे अधिकार कमावीज केले व रोम शहराचें नागरिकत्व निर्बंधित न राहतां तें परकीयांसहि प्राप्त करून घेतां यावें अशी तजवीज केली. परंतु रोम शहरामध्यें हा अंतर्गत लढा चालू असतांनाच त्याच्या सत्तेचा प्रसार शहराबाहेरहि हळूहळू होत होता.

## वरिष्ठ व कनिष्ठ वर्गांतील कलह—

रोमन लोकांमधील या पॅट्रीशियन व प्लीबिअन अथवा वरिष्ठ आणि कनिष्ठ वर्गांतील कलहाचा इतिहास मोठा मनोरंजक व बोधप्रद आहे. अशा तऱ्हेचा वरिष्ठ व कनिष्ठ दर्जांतील लोकांचा कलह बहुतेक सर्व देशांत निरनिराळ्या काळीं झालेला आपणांस आढळून येतो. प्रत्येक ठिकाणीं संघर्षाचीं तात्कालिक कारणें निरनिराळीं असलीं व त्यांचा कालहि निरनिराळा व कमीअधिक असला तरी सामान्यतः त्याचें स्वरूप बहुतेक सारखेंच असतें. याकरितां या कलहाचें येथें थोडेंसें वर्णन देणें इष्ट होईल.

रोमन लोकांतील या वरिष्ठ व कनिष्ठ वर्गांतील कलहामध्यें कनिष्ठ वर्गानें हक्क मिळविण्याकरितां तीन प्रकारांनीं वरिष्ठ वर्गावर दाब आणला. पहिला प्रकार म्हणजे वरिष्ठ वर्गाशीं असहकारिता करणें अथवा संप करणें हा होय. दोन वेळां हे प्लीबिअन लोक रोम शहर सोडून टायबर नदीच्या वरच्या बाजूस नवीन शहराची स्थापना करण्याच्या इरायानें बाहेर पडले व या दोन्ही वेळींहि त्यांनीं आपल्या मागण्या वरिष्ठ वर्गाकडून मान्य करून घेतल्या. दुसरा प्रकार म्हणजे एखाद्या महत्त्वाकांक्षी मनुष्यास सर्वसत्ताधीश होण्याच्या कामीं साहाय्य करण्याची धमकी देणें. ज्याप्रमाणें अथेन्समध्यें पिसिस्ट्रेटस हा गरीब लोकांच्या साहाय्यानें सर्वसत्ताधीश बनला त्याप्रमाणें प्लीबिअन लोकांमध्यें असंतुष्टता माजली असतांना त्या प्रसंगाचा फायदा घेऊन आपल्या हातांत सर्व सत्ता घेण्याचा प्रयत्न करणारी कोणी तरी व्यक्ति रोममध्यें पुढें येण्याचा प्रयत्न करतांना आढळून येई व अशा व्यक्तीस जर प्लीबिअन लोकांचें साहाय्य मिळालें तर वरिष्ठ वर्गाचीहि सत्ता नामशेष होण्याचा प्रसंग येत असे. त्यामुळें साहजिकच वरिष्ठ वर्गास कनिष्ठ वर्गाची समजूत काढणें भाग पडत असे. तिसरा प्रकार म्हणजे पॅट्रीशिअन अथवा वरिष्ठ वर्गांतील लोकांतहि केव्हां केव्हां थोर मनाचे व उदार अन्तःकरणाचे पुढारी निघत असत व त्यांस प्लीबिअन लोकांस अथवा कनिष्ठ वर्गास सहानुभूतीनें वागविणें व राज्यकारभारांत योग्य तो वांटा देणें दूरदर्शीपणाचें व रोमच्या हिताच्या दृष्टीनें मुत्सद्दीगिरीचें वाटत असे व याचाहि फायदा वेळोवेळीं कनिष्ठ वर्ग करून घेत असे.

आतां या तीनहि गोष्टी रोममधील कनिष्ठ वर्गानें आपल्या फायद्याकरितां कसकशा व कोणकोणत्या वेळीं उपयोगांत आणल्या हें पाहिलें पाहिजे. अगदीं प्रथम खि. पू. ५०९ मध्यें व्हॅलेरियस

पॉप्लिकोला हा कॉन्सिल असतांना त्यानें एक असा कायदा केला कीं, जेव्हां जेव्हां एखाद्या नागरिकाचें जीवित वा हक्क यांस धोका उत्पन्न होईल तेव्हां तेव्हां मॅजिस्ट्रेटच्या निकालावर सर्व-साधारण सभेकडे अपील करण्याचा हक्क प्रत्येक व्यक्तीस असेल. यास 'लेक्स व्हॅलेरिया' असें म्हणत व हा रोमचा 'हेबिअस कॉरपस' होय. यामुळें रोममधील प्लीबिअन लोकांचें वर्गद्वेषापासून रक्षण होऊं लागलें. खि. पू. ४९४ मध्यें प्लीबिअन लोकांनीं संप केला, त्याचें कारण असें होतें कीं, लॅटिन लोकांशीं चाललेल्या युद्धा-मुळें अनेक सैनिकांस आपली शेती सोडून सैन्यांत दाखल व्हावें लागलें. यामुळें शेतीचें उत्पन्न बुडाल्यामुळें ते कर्जाच्या ओझ्या-खालीं सांपडले. यामुळें सैन्यांतून परत आलेल्या या लोकांवर कर्जापायीं गुलाम होण्याची व त्यांच्या पायांत शृंखला पडण्याची पाळी आली. या वेळीं व्हॉलशियन लोकांशीं युद्ध चालू होतें. त्यांत विजय मिळवून परत आल्याबरोबर रोमन लीजनमधील सैनिक सरळ 'पवित्र पर्वता'वर गेले व तेथें त्यांनीं नवीन शहर वसविण्याचा विचार केला, कारण त्यांस रोम शहरामध्यें नागरिकांचे हक्क नाकारण्यांत आले होते. या वेळीं त्यांस ट्रिब्यून व इडाइल नांवाचे अधिकारी निवडण्याचा हक्क मिळाला. खि. पू. ४८६ या वर्षी स्पूरियस कॅशियस या नांवाचा एक महत्त्वा-कांक्षी पुरुष पुढें आला व त्यानें कनिष्ठ लोकांस खुष करण्या-करितां एक 'धान्याचा कायदा' केला व त्याअन्वयें सार्व-जनिक जमीन प्लीबिअन लोकांमध्यें शेतीकरितां वांटून देण्यांत यावी असें ठरविलें. परंतु लागलीच त्यावर राजसत्ता बळका-वण्याचा प्रयत्न करण्याचा आरोप घेऊन त्यास मरणाची शिक्षा देण्यांत आली व या कायद्याचा अमल केव्हांच करण्यांत आला नाहीं. प्लीबिअन लोकांनीं बरेच दिवस झगडा करून रोमचे कायदे 'दहा कोष्टकां'त लिखित स्वरूपांत दगडावर खोदून घेतले होते. परंतु ॲपियस क्लॉडियसनें या बाबतींत परागतीचें धोरण स्वीकारल्याबरोबर प्लीबिअन लोकांनीं पुन्हां 'पवित्र पर्वता'वर दूरगमन केलें व अखेरीस ॲपिअस क्लॉडियस यास तुरुंगांत आत्महत्या करून घ्यावी लागली. खि. पू. ४४० मध्यें मोठा दुष्काळ पडला. या वेळीं प्लीबिअन लोकांमधीलच एक स्पूरियस मेलियस नांवाचा मनुष्य पुढें येऊन त्यानें प्लीबिअन लोकांच्या गाऱ्हाण्यांचा फायदा घेऊन सर्व सत्ता बळकावण्याचा प्रयत्न केला परंतु त्याचा खून पडला. गॉल लोकांच्या स्वारी-नंतर प्लीबिअन लोकांची फार हलाखीची स्थिति झाली होती. तेव्हां मार्कस मॅनलियस यानें त्यांचें कर्ज फेडून टाकून लोक-प्रियता मिळविण्याचा प्रयत्न चालविला. त्याबरोबर तो सर्व सत्ता बळकावण्याचा प्रयत्न करीत आहे, अशा आरोपावरून त्याचा त्यानेंच रक्षण केलेल्या कॅपिटॉलच्या कड्यावरून कडे-लोट करण्यांत आला. खि. पू. ३७६ मध्यें लिसिनियस हा एक दहा ट्रिब्यूनपैकीं ट्रिब्यून होता. यानें जमिनीचें एका व्यक्तीच्या मालकीचें कमाल क्षेत्र ठरविणें, जुन्या कर्जावरील मुद्दल दिलें असतां व्याज माफ करणें अशा प्रकारचे 'लिसिनियन रोगेशन्स' या नांवाचे कायदे करून घेऊन पॅट्रीशियन लोकांशीं दहा वर्षें झगडा चालविला व आपल्या सर्व काम थांबविण्याच्या (व्हेटोच्या) शक्तीचा पूर्ण उपयोग केला. अखेरीस कॅमिलस यास डिक्टेटर नेमण्यांत आलें व त्यानें प्लीबिअन लोकांस जुल-मानें वठणीस आणण्याऐवजीं त्यांच्याशीं तडजोड करून त्यांच्या बहुतेक मागण्या मान्य केल्या व याप्रमाणें हा वरिष्ठ व कनिष्ट वर्गांतील दीर्घ काल चाललेला कलह संपुष्टांत आणला व एक 'ऐक्य' (कॉन्कॉर्ड) देवतेचें देवालय बांधून आपल्या अधिकाराचा न्यास केला.

यानंतर या दोन वर्गांतील कलह हळूहळू थंडावत गेला. याचें कारण असें कीं, या दोन समाजांतील अंतर हळूहळू कमी कमी होत गेलें. रोमचा त्याच्या राजकीय सत्तेबरोबर व्यापारहि वाढीस लागला होता व त्यामुळें अनेक प्लीबिअन लोक सधन होत चालले होते व बरेच पॅट्रीशियन लोक हळूहळू निर्धन होत चालले होते. आतां विवाहाच्या कायद्यांमध्यें फरक होऊन या दोन समाजांत परस्पर विवाह होऊं लागले होते व त्यामुळें या दोन समाजांचें हळूहळू मिश्रण होत होतें. श्रीमंत प्लीबिअन लोक आतां प्रतिष्ठित होऊं लागले होते व समाजांत निरनिराळे नवीन नवीन वर्ग, उदाहरणार्थ, स्वतंत्र झालेले गुलाम, स्वतंत्र लोक, कारागीर, व्यापारी, वगैरे निर्माण होत होते व तेहि हळूहळू उद्योगधंदे करून सधन होत होते. तसेंच अनेक प्लीबिअन लोक मोठमोठ्या अधिकारांच्या जागांवर नेमले जाऊं लागले होते व त्यामुळें सीनेटचेहि समासद होत होते, अर्थात् सीनेट ही आतां केवळ पॅट्रीशिअन लोकांचीच राहिली नसून सर्व श्रीमंत, समर्थ, उत्साही व वजनदार गृहस्थांची बनत चालली होती. रोमन लोकांची सत्ता प्रसार पावत होती व त्या प्रसारा-बरोबर हे पूर्वीचे भेदाभेद हळूहळू नष्ट होत चालले होते. आतां समाजामध्यें जन्मावरून होणाऱ्या भेदांपेक्षां संपत्तीमुळें होणारे भेद वाढत होते व त्या प्रकारचे वर्ग तयार होत चालले होते.

**रोमच्या सत्तेची वाढ—**

रोमच्या वर्चस्वाची वाढ होण्यास खिस्तपूर्व ५ व्या शतकांत प्रारंभ झाला. तोंपर्यंत ते इट्रुस्कन सत्तेशीं झगडण्यांत गुंतले होते. खिस्तपूर्व ४७४ या वर्षी इट्रुस्कन आरमाराचा सिसिलीमध्यें सायराक्यूज या ठिकाणीं ग्रीक लोकांनीं नाश केला व त्याच वेळीं उत्तरेकडून गॉल लोकांनीं त्यांच्यावर स्वाऱ्या केल्या व याच

सुमारास रोमन लोकांनींहि केलेल्या उठावामुळें इट्रस्कन लोकांचा इतका नाश झाला कीं, यापुढें त्यांचें इतिहासांत नांवहि ऐकूं येईनासें झालें. रोमन लोकांनीं त्यांचें व्हीई हें आतांपर्यंत अजिंक्य असलेलें शहर जिंकून घेतलें व आपल्या सत्तेचा हळूहळू प्रसार करण्यास सुरुवात केली. ख्रिस्तपूर्व ३९० या वर्षी गॉल लोकांनीं रोमवर स्वारी करून तें शहर काबीज केलें. परंतु त्यांतील कॅपिटॉल ही टेंकडी त्यांस घेतां आली नाहीं. त्यांनीं एका रात्रीं ती टेंकडी घेण्याचा केलेला प्रयत्न तेथील पक्ष्यांच्या आवाजाच्या योगानें शिबंदी जागी झाल्यामुळें फसला. अखेरीस गॉल लोकांस बरेंचसें सोनें वगैरे देऊन रोमन लोकांनीं परत जावयास लाविलें. हें सोनें वजन करतांना तराजूमध्यें गॉल लोकांच्या पुढाऱ्यानें आपली तरवार टाकल्याची आख्यायिका सर्वत्र प्रसिद्ध आहे.

हळूहळू रोमन लोकांनीं आपली सत्ता इट्रस्कन लोकांस जिंकून आर्नो नदीपासून नेपल्स शहरापर्यंत पसरली. रोमन लोकांची सत्ता दक्षिणेकडे पसरत चालली तशी तेथील ग्रीक वसाहतींस भीति वाटूं लागून त्यांनीं रोमन लोकांस प्रतिकार करावयाचा निश्चय केला. या वेळीं एपायरसमधील पिऱ्हस या नांवाचा एक अलेक्झांडरचा नातेवाईक विजेता म्हणून पुढें आला होता. त्याजवळ ग्रीक पद्धतीचें उत्तम पायदळ, थेसली येथील उत्तम घोडदळ आणि २० लढाऊ हत्ती होते. टारंटम येथील ग्रीक वसाहतीनें त्याची मदत मागितली. तेव्हां त्यानें इटलीवर स्वारी करून हेराक्लिया (ख्रि. पूर्व २८०) व अस्कुलम (ख्रि. पूर्व २७९) येथें रोमन लोकांचा पराभव केला. परंतु सरळ रोमवर चालून न जातां त्यानें सिसिली बेट जिंकण्याच्या कामांत कांहीं दिवस घालविले. तेवढ्यांत फिनीशियन लोकांनीं रोमन लोकांच्या मदतीस आपलें आरमार पाठविलें व पिऱ्हस याच्या आरमाराचा पराभव केला. अखेरीस बेनीव्हेंटम येथील लढाईंत रोमन लोकांनीं त्याचा पूर्ण मोड केल्यामुळें तो परत आपल्या एपायरस देशाकडे निघून गेला. यानंतर रोमची सत्ता मेसीनाच्या सामुद्रधुनीपर्यंत पसरली. या वेळीं मेसीनाच्या सामुद्रधुनींतील कांहीं चांचे लोकांनीं रोमची मदत मागितली. यामुळें रोम आणि कार्थेज या दोन सत्तांत वैर उत्पन्न झालें.

**प्यूनिक युद्धें—**

हें चांचे लोकांच्या निमित्तानें रोम व कार्थेज ह्या दोन सत्तांतील द्वंद्व ख्रि. पूर्व २६४ या वर्षी सुरू झालें. या युद्धास पहिलें प्यूनिक युद्ध म्हणतात. या युद्धामध्यें कार्थेजिनीयन लोकांचें लढाऊ आरमार अतिशय मजबूत व वल्ह्यांच्या पांच रांगा असलेल्या गलबतांनीं समृद्ध असल्यामुळें त्या लोकांस प्रथम प्रथम कांहीं विजय मिळाले. रोमन लोकांनीं आपल्या गलबतांवर ग्रीक खलाशी ठेवले आणि कार्थेजिनीयन गलबतांवर हल्ला करण्याकरितां एका सोंडेसारख्या नव्या साधनाचा उपयोग करून समुद्रावरूनहि हळूहळू त्यांस हुसकावून लावलें. मायली (ख्रि. पू. २६०) आणि एक्नॉमस (ख्रि. पूर्व २५६) या ठिकाणीं कार्थेजिनीयन लोकांचा मोठा पराभव झाला व अखेरीस पालेर्मो येथें त्यांचा पूर्ण मोड झाला. परंतु रोमन लोकांसहि पुन्हां दोन पराभव सहन करावे लागले. परंतु त्यांनीं पुन्हां सांवरून कार्थेजिनीयन लोकांचा एगेटिअन बेटांजवळील युद्धांत (ख्रि. पूर्व २४१) पूर्ण पराभव केला. तेव्हां कार्थेजनें तहाची याचना केली. यामुळें रोमला सायराक्यूज सोडून सर्व सिसिली बेट मिळालें. हा तह २२ वर्षे टिकला.

या वेळीं गॉल लोकांनीं पुन्हां स्वारी केली. परंतु रोमन लोकांनीं त्यांचा टेलामन येथें पराभव करून आपली सत्ता ॲड्रिॲटिक समुद्रावर ईलीरियापर्यंत वाढविली. लवकरच रोमनें कॉर्सिका आणि सार्डीनिया हीं बेटेंहि हस्तगत केलीं व कार्थेजिनीयन लोकांस स्पेनमध्यें एब्रो नदी ही हद्द ठरवून दिली. परंतु ख्रि. पूर्व २१८ मध्ये हानिबॉल या कार्थेजिनीयन सेनापतीस रोमचें वर्चस्व सहन न होऊन त्यानें स्पेनमधून ऑल्प्स पर्वत ओलांडून इटलीवर स्वारी केली. हें दुसरें प्यूनिक युद्ध १५ वर्षे चाललें. हानिबॉलनें रोमन लोकांचा ट्रासिमीन सरोवर व कॅनी येथें भयंकर पराभव केला. हानिबॉल १३ वर्षे इटलींत राहिला, पण त्यानें रोम घेण्याचा प्रयत्न केला नाहीं. अखेरीस रोमन लोकांनीं आफ्रिकेंत उतरून कार्थेजवर स्वारी केली. न्युमीडियन लोकांनींहि बंड केलें त्यामुळें हानिबॉल यास कार्थेजचें संरक्षण करण्याकरितां आफ्रिकेस परत जावें लागलें. तेथें झामा येथील लढाईंत त्याचा पराजय झाला (ख्रि. पूर्व २०२). सिपिओ आफ्रिकानस यानें कार्थेज शहर हस्तगत केलें व कार्थेज शहरास स्पेनमधील प्रदेश व आपलें सर्व आरमार रोमच्या स्वाधीन करावें लागलें. या तहांत हानिबॉलला रोमच्या स्वाधीन करण्याची अट होती. याकरितां तो आशियांत पळून गेला. परंतु तेथेंहि त्यास आत्महत्या करून घ्यावी लागली. यानंतर या दोन शहरांत ५६ वर्षे शांतता राहिली. या दरम्यानच्या काळांत रोमनें आपली सत्ता ग्रीस देशावर स्थापन करून आशिया मायनरवर स्वारी केली व तेथील लिडिया देशाचा सेल्यूकीड राजा ॲटीऑकस तिसरा याचा मॅग्नेशिया येथें पराभव केला. तसेंच ईजिप्त, परगॅमम आणि आशिया मायनरमधील इतर लहान लहान राज्यें यांस मांडलिक करून घेतलें.

कार्थेजनें या काळांत आपली थोडीशी भरभराट पुन्हां करून घेतली होती. तेव्हां त्या शहराबद्दल रोमन लोकांस मत्सर वाटून कांहीं क्षुल्लक कारणावरून रोमनें कार्थेजवर पुन्हां स्वारी

करून खि. पूर्व १४६ मध्यें तें शहर पूर्णपणें उध्वस्त केलें व तेथील रस्त्यांतून रक्ताचे पाट वाहविले. त्या शहरांतील अडीच लाख लोकसंख्येपैकीं फक्त ५०,००० जिवंत राहिले, त्यांस गुलाम म्हणून विकण्यांत येऊन शहर जाळून फस्त करण्यांत आलें व त्यावर अक्षरशः नांगर फिरविण्यांत आला.

## रोमन सत्तेचा विस्तार व तिचें दीर्घकालीन स्थैर्य—

यानंतर रोमन साम्राज्याची पुष्कळच वाढ झाली. रोमन साम्राज्यानें आपल्या सत्तेखालीं पश्चिमेकडील बहुतेक सर्व ज्ञात मुलूख आणला. रोमन लोकांनीं आपली सत्ता स्पेन व मोरोक्को यांवर स्थापन केली. फ्रान्स, बेल्जम आणि ब्रिटन यांवर ताबा बसवून पूर्वेकडे हंगेरी आणि दक्षिण रशिया हाहि प्रदेश आपल्या ताब्यांत आणला; परंतु या सत्तेचें केंद्र पश्चिमेकडे असल्यामुळें त्यास मध्य आशिया व इराण इकडील प्रदेशांवर आपली सत्ता फारशी स्थिर करतां आली नाहीं व तेथील राज्यकारभारहि पाहतां आला नाहीं. या साम्राज्याचा इराणी किंवा ग्रीक सत्तेप्रमाणें लवकरच नाश झाला नाहीं. कारण त्यांनीं पूर्वीच्या राजकर्त्यांप्रमाणे स्थानिक स्थितीचा परिणाम आपल्यावर फारसा होऊं दिला नाहीं. याचे उलट मीड व इराणी लोक एका पिढींतच बाबीलोनियन बनले. अलेक्झांडर व त्याचे सेनापतीहि पूर्ण स्थानिक स्वरूप पावले. सेल्यूकीड राजांची राज्यपद्धति नेबूचाडनेझरसारखीच बनली. टॉलेमी हे लवकरच पूर्णपणें ईजिप्तचे फॅरो राजे बनले. परंतु रोमन लोकांनीं आपल्या रोम या राजधानींतून कारभार चालविला व अनेक शतकेंपर्यंत आपले कायदे व आपला स्वभाव कायम ठेवला. रोमन संस्कृतीवर जर कोणाचा विशेष परिणाम झाला असेल तर तो ग्रीक लोकांचा होय. त्यांच्या सत्तेचें केंद्र एखादें देऊळ, पुरोहित अथवा त्या देवस्थानची जमीन अशा मर्यादित स्वरूपाचें नव्हतें. त्यांचे देव असले व पुरोहित असले तरी त्यांचा राज्यकारभारावर फारसा परिणाम होत नव्हता. रोमन साम्राज्य हळूहळू वाढत गेलें व सर्व साम्राज्याचा कारभार यथाक्रम त्यांच्या हातांत येत गेला. त्यांची राज्यपद्धति हा जणुं काहीं एक प्रयोग होता व त्यामध्यें एकसारखा व त्वरित बदलहि होत होता. हा बदल कसा होत गेला हें पाहणें मोठें मनोरंजक आहे.

खिस्तपूर्व पहिल्या आणि दुसऱ्या शतकामध्यें रोमन सत्तेची जी वाढ झाली ती इतर दुसऱ्या साम्राज्यांहून भिन्न प्रकारें झाली. रोम हें शहर विशिष्ट राजाचें किंवा एखाद्या मोठ्या विजेत्याचें राज्य नव्हतें. त्यास अगदीं पहिलें लोकसत्ताक साम्राज्य असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण यापूर्वी अथेन्स या शहरानें बरींच मांडलिक राज्यें आपल्या सत्तेखालीं पेरिक्लीसच्या काळांत आणलीं होतीं. तसेंच रोमचें प्रतिस्पर्धी कार्थेज याचीहि सत्ता सार्डिनिया, कॉर्सिका, मोरोक्को, अल्जिअर्स, ट्यूनिस, स्पेन व सिसिली यांवर स्थापन झाली होती. या दोहींपेक्षांहि रोमच्या लोकराज्याची सत्ता अधिक काळ टिकून राहिली व ती वाढत गेली.

या सत्तेचें केंद्र अधिक पश्चिमेकडे असल्यामुळें त्या सत्तेखालीं पश्चिमेकडील बराचसा नवीन प्रदेश येऊन तो त्यांस आपल्या संस्कृतीखालीं आणतां आला. रोमची सत्ता मोरोक्को व स्पेननंतर फ्रान्स, बेल्जम, ब्रिटन, एवढेंच नव्हे तर हंगेरी व दक्षिण रशियापर्यंत पसरली होती. परंतु त्या सत्तेस आशिया किंवा इराण आपल्या हाताखालीं आणतां आला नाहीं. कारण ते प्रदेश त्यांच्या सत्तेच्या कक्षेंत नसून फार दूर होते. रोमनें बहुतेक ग्रीक लोकांसहि आपल्या सत्तेखालीं आणलें.

इतिहासाच्या विद्यार्थ्यांच्या मनांत अशी एक कल्पना असते कीं, रोमन राजसत्ता ही एक स्थिर, पक्की, मोठी उदात्त, सुनिश्चित व सर्वांगीण अशी राज्यपद्धति होती व रोमन साम्राज्याचें त्यांतील केटो, सिपीओ, जूलियस सीझर, डायोक्लीटियन, कॉन्स्टंटाइन, जस्टीनियन, वगैरे मोठमोठे लोक, त्यांच्या भव्य मिरवणुकी, त्यांचीं स्फूर्तिदायक भाषणे, त्यांचे खेळ, वगैरे सर्व गोष्टींचें तो मोठें भव्य चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें करतो. या चित्राचें आपणांस थोडें परीक्षण करावयाचें आहे.

## रोमन सत्तेचे चार कालविभाग—पहिला कालविभाग-

रोमन सत्तेची वाढ आपणांस चार कालविभागांत वांटतां येईल: पहिला कालविभाग खिस्तपूर्व ३९० मध्यें गॉल लोकांनीं रोमवर केलेल्या पहिल्या स्वारीपासून पहिल्या प्यूनिक युद्धापर्यंतचा (खि. पूर्व २४०) म्हणतां येईल. या कालांत त्यांची सत्ता आपल्यालगतचा मुलूख संलग्न करीत होती. या कालांत लोकांतील आपण मागें वर्णन केलेले वरिष्ठ व कनिष्ठ वर्ग यांतील द्वंद्व सामोपचारानें मिटलें होतें. इट्रस्कन लोकांस आत्मसात् करण्यांत आले होतें. त्या वेळीं समाजांत फार श्रीमंत अथवा फार गरीब असे लोक नव्हते. सर्व रोमन लोक शेतकरी असून त्यांचें हें लोकराज्य होतें. त्याचें क्षेत्रफळ २० मैल लांबी—रुंदीपेक्षां जास्त नव्हतें व या क्षेत्रांतील सर्व लोक एकजीव बनले होते. हा उज्ज्वल इतिहासाचा काल म्हणतां येईल. या कालांत सर्व रोमन सैनिक नागरिक होते. मोठमोठे रस्ते बांधण्यांत आले होते. त्यामुळे रोमच्या सत्तेखालीं सर्व इटली देश साहजिकच येऊन सर्वांची एक संस्कृति बनली होती. खि. पूर्व ८९ या वर्षी इटलींतील सर्व लोक रोमचे नागरिक बनले होते. हें नागरिकत्व अधिक अधिक व्यापक होत गेलें व इ. सन २१२

मध्यें रोमन साम्राज्यांतील प्रत्येक स्वतंत्र नागरिकास रोम शहराचें नागरिकत्व प्राप्त झालें होतें व तो रोम शहरांत असल्यास त्यास मत देण्याचा अधिकार मिळाला होता. या पद्धतीमुळें जेते लोक जित लोकांत मिसळून जाण्याच्याऐवजीं जित लोक जेते लोकांत मिसळून गेले.

## दुसरा कालविभाग—

यानंतर दुसऱ्या कालविभागास सुरुवात होते. पहिल्या प्यूनिक युद्धानंतर सिसिली बेट ताब्यांत आल्यावर एक नवीन पद्धति अमलांत आणण्यांत आली. उदाहरणार्थ, सिसिली बेट हा एक अंकित प्रदेश मानण्यांत येऊं लागला व त्या बेटांतील उद्योगी जनतेचा उपयोग रोमची संपत्ति वाढविण्याकरितां करण्यांत येऊं लागला. अर्थात् हा पैसा विशेषतः रोममधील उच्च वर्गाच्या खिशांत जाऊं लागला. तसेंच युद्धामुळें गुलामांची संख्याहि वाढली. पहिल्या प्यूनिक युद्धापूर्वी सर्व रोमन नागरिक हे शेतकरी होते. त्यांवर सैन्यांत दाखल होण्याची सक्ती व हक्कहि होता. त्यामुळें ते सैन्यांत काम करीत असता त्यांचीं शेतें मोकळीं पडून त्यांचें कर्ज वाढत गेलें. त्यामुळें मोठ्या प्रमाणावर गुलाम ठेवून शेती करण्याची प्रथा वाढत गेली. सैनिक लोक परत शेतावर आल्यास त्यांस मोठ्या शेतकऱ्यांच्या स्पर्धेमुळें लहान शेतांवर शेती करणें परवडेनासें झालें. या वेळीं रोममधील सत्ता श्रीमंत लोकांच्या हातांत गेली होती. यामुळें रोमन सैनिकानें २०० वर्षे लढा करून जें स्वातंत्र्य मिळवलें होतें व जे हक्क त्यानें एक शतकभर उपभोगले होते त्यांस या प्यूनिक युद्धानंतर तो पारखा झाला, त्याचे राजकीय हक्कहि संपुष्टांत आले. त्या वेळीं रोम येथील राजसत्ता दोन सभांमध्यें केंद्रित होती. त्यांपैकीं सीनेट अथवा उच्च सभा ही अधिक महत्त्वाची होती. ही सभा प्रथम उच्च वर्गीयांची होती. ही इंग्लंडमधील लॉर्डांच्या सभेसारखी असे. दुसरी सभा लोकसभा म्हणून होती. ही सर्व नागरिकांची मिळून बनलेली असे. जेव्हां रोमचा विस्तार २० मैलांपेक्षां अधिक नव्हता तेव्हां ही खरीखुरी लोकसभा असे. परंतु जेव्हां रोमचें नागरिकत्व इटलीच्या बाहेर विस्तृत झालें तेव्हां या सभेचें स्वरूप पहिलें राहिलें नाहीं. खि. पू. ४ थ्या शतकांत लोकसभेचा उच्च सभेवर दाब असे, परंतु प्यूनिक युद्धानंतर तो तसा राहिला नाहीं. त्यामुळें रोमची राजसत्ता ही प्रातिनिधिक राजसत्ताच राहिली नाहीं व राज्यव्यवस्थेमध्यें नागरिकांचे प्रतिनिधी घेण्याची कल्पना तेव्हां कोणास सुचली नाहीं. त्यामुळें रोमच्या सभेस 'हौस ऑफ कॉमन्स' किंवा अमेरिकन 'कॉंग्रेसचें' स्वरूप आलें नाहीं. तत्त्वतः ती लोकसभा होती, परंतु व्यवहारांत ती निरुपयोगी होती. त्यामुळें रोमन नागरिकांची दुसऱ्या प्यूनिक युद्धानंतर फार दीनवाणी स्थिति झाली होती. खि. पू. पहिल्या व दुसऱ्या शतकांत ही स्थिति सुधारण्याचे निष्फळ प्रयत्न अनेकवार करण्यांत आले. शेतकऱ्यांस जमिनी वांटून देणें, त्यांचें कर्ज रद्द करणें, वगैरे प्रयत्न झाले. खि. पूर्व ७३ मध्यें इटलीतील गुलामांनीं स्पार्टाकस या आपल्या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं बंड केलें. हें बंड २ वर्षे चालून अखेरीस मोठ्या क्रूरतेनें मोडण्यांत आलें. या वेळीं सामान्य मनुष्यास आपल्या कठिण परिस्थितींतून बाहेर पडण्यास मार्ग नव्हता व तो पूर्णपणें श्रीमंत लोकांच्या वर्चस्वाखालीं गेला होता. परंतु यापुढें या दोहोंपेक्षांहि वरचढ असा एक तिसरा वर्ग पुढें आला. तो म्हणजे सैनिकांचा होय.

## तिसरा कालविभाग—

दुसऱ्या प्यूनिक युद्धापूर्वी रोमचें सैन्य स्वतंत्र शेतकरी नागरिकांचें असे व तें घोडदळ व पायदळ यांचें बनलेलें असे. हें स्थानिक युद्धास उत्कृष्ट होतें, परंतु दूरदेशांतील मोठमोठ्या मोहिमांस तें उपयोगी नव्हतें. तसेंच गुलामांकडून शेती करून घेण्याचा प्रघात जसजसा वाढत गेला तसतसे हे स्वतंत्र नागरिक सैनिक कमी कमी होऊं लागले. याकरितां मेरियस यानें प्रथम पगारी सैनिक ठेवण्याचा उपक्रम केला. हा उपक्रम करणें त्यास जुगर्थाच्या आधिपत्याखालील आफ्रिकेंतील न्युमीडियन लोकांवर विजय मिळविण्याकरितां अवश्य झालें होतें. मेरियसनें जुगर्थास कैद करून आणलें, परंतु आपल्या सैन्याच्या बळावर कॉन्सलचें पद न सोडतां तो तें तसेंच दाबून बसला व रोममध्यें त्याचा प्रतिकार करण्यास कोणी समर्थ झाला नाहीं. याप्रमाणें रोमन सत्तेमध्यें हें तिसरें युग सुरू झालें. यास सेनापतींचें लोकराज्य म्हणतां येईल. यानंतरच्या काळांत सेनापतींमध्यें सत्तेकरितां स्पर्धा व युद्धें सुरू झालीं. ज्या सेनापतीस जय मिळे तो आपल्या विरुद्ध पक्षाच्या लोकांची कत्तल करीत असे. नागरिकांच्या 'अरक्षित' म्हणून याद्या प्रसिद्ध करून त्यांस मारण्याची कोणासहि मुभा देण्यांत येत असे व त्यांची मालमत्ता जप्त करण्यांत येत असे. अशा प्रकारचा पहिला लढा मेरियस व सला यांमध्यें झाला. त्यानंतर ल्युक्युलस आणि पॉंपे व पुढें क्रासस आणि ज्यूलियस सीझर यांमध्यें झाला. क्राससनें गुलामांचें बंड मोडलें व इराणवर स्वारी केली. पण पार्थियन लोकांकडून तो मारला गेला. ल्युक्युलसनें आशिया मायनर व आर्मेनिया हे प्रदेश जिंकले. पण तो पुढें निवृत्त झाला. एका मोठ्या लढ्यानंतर पॉंपेचा ज्यूलि-

यस सीझरनें पराभव केला व त्याचा ईजिप्तमध्यें खून झाला (ख्रि. पू. ४८). याप्रमाणें ज्यूलियस सीझर यास प्रतिस्पर्धी राहिला नाहीं. या ठिकाणीं तिसरें युग संपून चौथ्या प्रथम साम्राज्ययुगास आरंभ झाला.

## चौथा कालविभाग—

या कालीं रोमन साम्राज्याची मर्यादा सर्व बाजूंनीं वाढली होती. ज्यूलियस सीझरनें गॉलमध्यें पराक्रम गाजविले होते व तो प्रदेश पादाक्रांत केला होता. तसेंच ब्रिटनवरहि विजय मिळवला होता. या वेळीं रोमन उच्च सभेमध्यें नाममात्र सत्ता राहिली होती व सिसरो हा तिचें रक्षण करण्याचा प्रयत्न करीत होता. परंतु लोकांची स्थिति या वेळीं फारच हलाखीची झाली होती. त्यामुळें या उच्च सभेंतील लोकास लोकांचें पाठबळ नव्हतें. याचा परिणाम असा झाला कीं, क्रासस, पाँपे आणि सीझर यांनीं लोकांस न जुमानतां सर्व सत्ता त्रिवर्गांत वांटून घेतली. पुढें क्रासस मरण पावल्यावर सीझर आणि पाँपे यांच्यामध्यें सत्तेकरितां स्पर्धा सुरू होऊन पाँपेनें उच्च सभेचा योज राखण्याचा प्रयत्न केला. परंतु सीझरनें त्याचा पराजय करून आपणास 'डिक्टेटर' म्हणून नेमून घेतलें. सीझर यानें राजा व देव होण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्याचा खून करण्यांत आला. त्यानंतर तेरा वर्षें महत्त्वाकांक्षी लोकांमध्यें स्पर्धा चालून अखेरीस लेपीडस, मार्क अँटनी व ऑक्टेव्हिअस सीझर यांची 'त्रिकूट सत्ता' स्थापन झाली. ऑक्टेव्हिअस सीझरनें ख्रि. पू. ३१ मध्यें मार्क अँटनीचा ॲक्टिअम येथें आरमारी युद्धांत पराभव केला व तो एकटा सत्ताधारी झाला. परंतु त्यानें ती सत्ता उच्च सभा व लोकसभा यांच्या स्वाधीन केली व स्वतःस डिक्टेटर म्हणवून घेण्याचेंहि नाकारलें. परंतु लोकांनीं त्यास ऑगस्टस ही पदवी देऊन बादशहा केलें (ख्रि. पू. २७ ते ख्रि. पू. १४). ऑगस्टसनंतर टायबेरीयस सीझर, कॅलीगुला, क्लॉडियस, नेरो, ट्राजन, हेड्रियन, अँटोनियस पायस, मार्कस ऑरेलियस, इत्यादि अनेक बादशहा झाले. हे सर्व सैन्याच्या बळावर झालेले बादशहा असून ते पूर्णपणें सैन्याच्या अंकित असत. सैनिक लोक त्यांस गादीवर वाटेल तेव्हां बसवीत व वाटेल तेव्हां काढून टाकीत. या कालांत उच्च सभा अस्तंगत झाली व सर्व कारभार बादशहाच्या आणि त्याच्या अधिकाऱ्यांच्या हातांत गेला. या कालांत साम्राज्याची मर्यादा मात्र कमालीची वाढली. त्यांत ब्रिटन बेटांचा अंतर्भाव झाला. ट्रॅन्ससिल्व्हानिया हा नवीन प्रांत बनला. ट्राजननें युफ्रेटीस नदी ओलांडली आणि हेड्रियन या बादशहानें उत्तरेकडील लोकांच्या स्वाऱ्यांस अडथळा करण्याकरितां ब्रिटन बेटांत या किनाऱ्यापासून त्या किनाऱ्यापर्यंत एक व ऱ्होन नदीपासून डॅन्यूब नदीपर्यंत एक भिंत बांधली. यापुढें रोमन साम्राज्याची वाढ खुंटली.

## रोमन समाजाची स्थिति—

रोमन सत्तेचा ख्रिस्तपूर्व दोन शतकांत साम्राज्यामध्यें विस्तार होऊन ऑगस्टस सीझरनंतर तें ख्रिस्तोत्तर दोन शतकें अबाधित राहिलें. या काळांत रोममधील नागरिक व रोमन समाज यांची स्थिति कशी काय होती हें मानवसमाजाच्या विकासाच्या दृष्टीनें या ठिकाणीं अवलोकन करणें बोधप्रद होईल. या कालांत या सर्व भूप्रदेशांपैकीं पश्चिमेकडील भागांत सर्वत्र नाण्यांचा प्रसार सररहा झाला होता. त्याप्रमाणेंच समाजांतहि सरकारी अधिकारी अथवा पुरोहित नसलेलाहि बराचसा मोठा वर्ग व्यापार-उद्योगधंद्यांमुळें सधन व स्वतंत्र बनला होता. या कालांत प्रवासास अनुकूल अशी देशस्थिति असल्यामुळें अनेक लोक प्रवासहि पुष्कळ व दूर दूर करूं लागले होते व प्रवासाच्या सोयीकरितां मोठमोठे रस्ते व ठिकठिकाणीं पथिकनिवासहि बांधले गेले होते व तेथें प्रवाशांची चांगली सोय होऊं लागली होती. ख्रिस्तपूर्व ५०० च्या सुमाराच्या एकंदर जीवनक्रमाशीं तुलना करूं पाहतां या वेळीं एकंदर आयुष्यक्रमहि अधिक स्वतंत्र होत चालला होता. यापूर्वींच्या कालांत सुसंस्कृत लोक विशेष स्थाननिष्ठ असून आपला प्रांत अथवा देश यांशीं निगडित असत व त्याबाहेर फारसे दूर जात नसत. तसेच ते विशिष्ट परंपरेनेंहि बद्ध असून त्यांची दृष्टिहि मर्यादित असे. केवळ भ्रमणवृत्तीनें राहणारे लोकच दूर दूर भ्रमण करीत किंवा व्यापार करीत असत. परंतु रोमन साम्राज्यांत जरी एकंदर दीर्घकाल शांतता असली तरी त्या कालांत साम्राज्यांतील सर्व प्रदेशांत अथवा एखाद्या मोठ्या प्रदेशांत अथवा भागांत एकस्वरूपी संस्कृति असलेली आढळत नाहीं. निरनिराळ्या प्रदेशांतील संस्कृतींमध्यें स्थानिक फरक बऱ्याच प्रमाणांत आढळत असे. या अफाट प्रदेशामध्यें मधून मधून कांहीं ठिकाणीं रोमन सैन्याच्या छावण्या व वसाहती असत व तेथील रोमन लोक रोमन देवतांची उपासना करीत व लॅटिन भाषा वापरीत असत. परंतु ज्या ठिकाणीं रोमन लोक येण्यापूर्वीं गांवें व शहरें पूर्वींच वसलेलीं असत त्या ठिकाणीं जरी तेथील लोक रोमन अमलाखालीं असले तरी ते आपला व्यवहार जुन्या पद्धतीप्रमाणेंच चालू ठेवीत असत व बऱ्याच दीर्घकालपर्यंत आपल्याच देवतांची आपल्या जुन्या पद्धतीप्रमाणें उपासना करीत असत.

### ग्रीक भाषा व संस्कृतीचें वर्चस्व—

ग्रीस देश, आशिया मायनर, ईजिप्त आणि ग्रीक संस्कृतीनें व्यापलेला पूर्वेकडील प्रदेश या सर्व भागांत लॅटिन भाषा कधींच प्रचारांत आली नाहीं. त्या सर्व प्रदेशांत ग्रीक भाषाच चालू राहिली. सेंट पॉल म्हणून पुढें प्रसिद्धीस आलेला टार्सस येथील सॉल हा यहुदी असून जन्मजात रोमचा नागरिक होता, परंतु त्यास हिब्रू भाषा मुळींच येत नसून त्यानें सर्व लिखाण ग्रीक भाषेंतच केलें. रोमन साम्राज्याच्या पलीकडेहि इराणांतील सेल्युकिड ग्रीक लोकांची सत्ता उठवून स्थापन झालेल्या पार्थियन घराण्याच्या दरबारांतहि ग्रीक हीच शिष्ट भाषा मानली जात असे. त्याप्रमाणेंच कार्थेज शहराचा जरी नाश करण्यांत आला होता तरी पूर्वी कार्थेजच्या अमलाखालीं असलेल्या स्पेन व आफ्रिकेचा उत्तर भाग या प्रदेशांत कार्थेजिनीअन भाषाच दीर्घकालपर्यंत प्रचारांत होती. इटालिका या ठिकाणीं जरी रोमन वसाहत स्थापन झाली होती तरी रोमन लोकांचें नांवहि ऐकूं येण्यापूर्वी अनेक वर्षें सेव्हिल या शहराची तेथून थोड्याच मैलांच्या अंतरावर स्थापना झाली होती व तें भरभराटीसहि आलेलें होतें व त्या ठिकाणीं सेमिटिक भाषा व सेमिटिक देवतांची उपासना अनेक पिढ्यांपर्यंत चालू होती. इसवी सन १९३ ते २११ या कालांत बादशहा असलेला सेप्टीमिअस सेव्हरस हा मातृभाषा म्हणून कार्थेजिनीअन भाषाच बोलत असे व मागाहून तो लॅटिन ही भाषा एखाद्या परकीय भाषेसारखी शिकला. परंतु त्याची बहीण लॅटिन भाषा मुळींच न शिकतां आपल्या प्यूनिक भाषेंतच आपल्या राजवाड्यांतील नोकरचाकरांशीं बोलत असे व वाड्यांतील सर्व कारभार पाहत असे.

### लॅटिन भाषा व संस्कृतीचा प्रसार—

तथापि गॉल, ब्रिटन, डेशिया (सध्यांचा रुमानिया) व पॅनोनिया (सध्यांचा दक्षिण हंगेरी) या प्रदेशांत पूर्वीचीं नगरें, देवालयें व संस्कृति नसल्यामुळें त्या ठिकाणीं रोमन साम्राज्यामुळें लॅटिन भाषेचा प्रसार झाला व या प्रदेशांत रोमन साम्राज्यानें प्रथम संस्कृति आणली. रोमन साम्राज्यामुळें या प्रदेशांत गांवें व नगरें स्थापन झालीं व त्या ठिकाणीं प्रथमपासूनच लॅटिन ही भाषा प्रामुख्यानें प्रचलित झाली व त्या ठिकाणीं रोमन देवतांची उपासना, रोमन चालीरीती व रोमन शिष्टाचार प्रचलित झाले. या गोष्टीचें प्रत्यंतर आपणांस आजच्या रुमानिअन, इटालियन, फ्रेंच व स्पॅनिश भाषा या सर्व लॅटिन भाषेचेच अपभ्रंश आहेत या गोष्टीमध्यें स्पष्टपणें दिसून येतें. वायव्य आफ्रिकेमध्येंहि अखेरीस लॅटिन भाषेचा बराच प्रसार झाला. परंतु ईजिप्त, ग्रीस व पूर्वेकडील देश यांत लॅटिन भाषा कधींच प्रचलित झाली नाहीं. त्यांची भाषा व संस्कृति ईजिप्ती व ग्रीकच राहिली. एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष रोममध्येंसुद्धां सुशिक्षित लोक ग्रीक ही सभ्य लोकाची भाषा म्हणून शिकत असत व लॅटिन वाङ्मय व लॅटिन भाषेंतील विद्येपेक्षां ग्रीक वाङ्मय व ग्रीक विद्वत्तेला अधिक मान्यता ओघानेंच दिली जात असे.

### शेती व गुलाम पद्धति—

या अशा तऱ्हेनें संमिश्र बनलेल्या साम्राज्यांत लोकांचा व्यवहार व कामें करण्याची पद्धतिहि अनेक प्रकारची संकीर्ण असे. सामान्यतः स्थायिक लोकांचा मुख्य धंदा विशेष प्रमाणांत शेतीचाच होता. परंतु इटलीमध्यें प्यूनिक युद्धांनंतर सकस व सशक्त अशा रोमन नागरिकाच्या कौटुंबिक शेतीऐवजीं सर्व शेती बहुतेक मोठ्या प्रमाणावर व गुलामांकडून कसली जाऊं लागली. ग्रीक लोकांमध्येंहि शेतीचे अनेक प्रकार असत. आर्केडियामधील शेती प्रत्येक शेतकरी घरीं व स्वतः करीत असे तर स्पार्टामध्यें स्वतः शेती करणें कमीपणाचें मानलें जात असून सर्व शेती हेलॉट नांवाच्या एका विशिष्ट गुलामवर्गाकडून करून घेण्यांत येत असे. परंतु ही पद्धतिहि आतां जुनी होऊन मागें पडत चालली होती. ग्रीसमध्येंहि आतां मोठमोठ्या इस्टेटी तयार होऊन त्यावर गुलामांचे तांडे काम करीत असत. हे शेती करणारे गुलाम निरनिराळ्या प्रदेशांतील असून एकमेकांस न समजतील अशा निरनिराळ्या भाषा बोलत व जन्मतः गुलाम असत किंवा युद्धांमध्यें कैद करून आणलेले असत. अर्थात् त्यांच्यामध्यें कोणत्याहि प्रकारची संघटना अथवा जूट नसल्यामुळें त्यांवर होणाऱ्या जुलमांचा त्यांना प्रतिकार करतां येत नसे. त्यांस कोणतेहि ज्ञान किंवा कोणतीहि परंपरा नसे अथवा मनुष्याच्या स्वाभाविक हक्कांची कल्पना नसे, तसेंच त्यांस लिहितां-वाचतांहि येत नसे. जरी ग्रामीण भागांत ते बहुसंख्य असत तरी त्यांनीं बंड करण्याचें कधींच मनांत आणलें नाहीं.

ख्रि. पू. पहिल्या शतकांत स्पार्टाकस या पुढाऱ्याच्या नेतृत्वाखालीं एकदां गुलामांनीं बंड केलें होतें व तें दोन वर्षें चाललेंहि होतें. परंतु ते शेतीवर काम करणारे गुलाम नसून ग्लॅडिएटर म्हणजे इत्यारी कुस्ती करणारे लढाऊ गुलाम होते. लोकराज्याच्या अखेरच्या काळांत आणि साम्राज्याच्या आरंभींच्या काळांत शेतीवर काम करणाऱ्या लोकांची अत्यंत दुर्दशा झालेली होती व त्यांस फार निर्घृणतेनें वागविण्यांत येत असे. त्यांस रात्रीं पळून जातां येऊं नये म्हणून सांखळीनें बांधून ठेवण्यांत येत

असे व पळाल्यास लवकर ओळखता यावें म्हणून त्यांच्या डोक्याची अर्धी हजामत करण्यांत येत असे. त्यांस स्वतःच्या बायका नसत. त्यांचे धनी त्यांस मारीत, झोडपीत, हातपाय तोडीत किंवा ठारहि मारीत असत. धन्याला आपल्या गुलामास साठमारीकरितां विकतां येत असे. जर एखाद्या गुलामानें आपल्या धन्याचा खून केला तर त्या धन्याच्या सर्व गुलामांस ठार करण्यांत येत असे. ग्रीसमध्यें व विशेषतः अथेन्समध्यें गुलामांची स्थिति इतकी वाईट नव्हती, तथापि ती घृणाकारकच होती. अर्थात् रोमन साम्राज्यावर जेव्हां रानटी लोकांनीं स्वारी केली तेव्हां या गुलामांस ते शत्रु असें न वाटतां स्वातंत्र्यदातेच वाटले यांत नवल नाहीं.

## उद्योगधंदे व गुलामगिरी—

ही गुलामांकडून काम करून घेण्याची पद्धति शेतीप्रमाणें जेथें बरेच मजूर लागत अशा उद्योगधंद्यांमध्येंहि पसरली. खाणी खोदणें, गलबतांवर वल्हीं मारणें, रस्ते तयार करणें, आणि मोठमोठ्या इमारती बांधणें हीं सर्व कामें गुलामांच्या श्रमांनींच करण्यांत येत असत. तसेंच सर्व घरगुती कामें गुलामांकडूनच करून घेण्यांत येत असत. याच वेळीं स्वतंत्रता प्राप्त झालेले गुलाम किंवा कांहीं गरीब स्वतंत्र लोकहि स्वतःकरितां किंवा मजुरी घेऊन काम करणारे असत, पण ते बहुधा कारागीर, मुकादम, देखरेख करणारे वगैरे असत. परंतु अशा कामगारांचें एकंदर जनतेशीं प्रमाण किती होतें तें सांगतां येत नाहीं. तें निरनिराळ्या काळीं व निरनिराळ्या ठिकाणीं भिन्न भिन्न असलें पाहिजे. गुलामांमध्येंहि सांखळीला बांधण्यांत येणारे व चाबकाच्या माराखालीं काम करणारे गुलाम, व धन्याला ठराविक रक्कम देऊन आपल्या सोयीनें शेती करणारे किंवा कारागिरी करणारे व स्वतःची बायको वगैरे असणारे असे गुलाम, असे निरनिराळे प्रकार असत. प्यूनिक युद्धाच्या आरंभीं ख्रि. पू. २६४ या वर्षीं इट्रुस्कन लोकांत प्रचलित असलेला गुलामांच्या हत्यारी कुस्तीचा अथवा माणसांच्या युद्धाचा खेळ चालू करण्यांत आला. यानंतर प्रत्येक श्रीमंत रोमन असे लढवय्ये गुलाम बाळगूं लागला. कांहीं अंशीं ते त्याचे शरीररक्षक तर कांहीं अंशीं गडबड करणारे गुंड असत. कांहीं विद्वान् गुलामहि असत. लोकशाहीच्या उत्तर कालांत रोमन लोकांनीं ग्रीस, उत्तर आफ्रिका व आशिया मायनर हे त्यांच्यापेक्षां अधिक सुसंस्कृत देश जिंकले व त्या वेळीं बरेच विद्वान् लोक कैद करून आणले. यामुळें बहुतेक प्रत्येक रोमन शिष्ट कुटुंबांत ग्रीक गुलाम शिक्षक म्हणून असे. श्रीमंत रोमन मनुष्याकडे ग्रीक गुलाम ग्रंथपाल म्हणून असे, तसेंच त्याचा चिटणीस व त्याच्या बरोबरील विद्वान् मनुष्य म्हणून ग्रीक गुलाम असत. अर्थात् या पद्धतीमुळें विद्वान् लोकांत भिवेपणा, गुळमुळीतपणा, विवादकता, वगैरे दोष शिरले. कांहीं लोक हुशार गुलाम मुलें विकत घेत व त्यांस शिकवून तयार करून अधिक किंमतीस विकून फायदा मिळवीत. गुलामांस पुस्तकांच्या नकला करणें, रत्नांची पारख करणें व जडिताचीं कामें करणें, वगैरे अनेक उपयुक्त कलांचें शिक्षण देण्यांत येत असे. परंतु श्रीमंत लोकांनीं केलेल्या दिग्विजयाच्या व युरोपांतील भयंकर स्वाऱ्यांच्या दरम्यानच्या चारशें वर्षांच्या काळांत गुलामांच्या स्थितींत बरेंच स्थित्यंतर झालें होतें. ख्रि. पू. दुसऱ्या शतकाचा काळ रानटी अवस्थेचा होता. त्या वेळीं युद्धांत पुष्कळ गुलाम मिळत व त्यांस अत्यंत क्रूरपणें वागविण्यांत येत असे. परंतु ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकांत रोमन लोकांमध्यें गुलामांस वागविण्याच्या पद्धतीमध्यें बराच फरक झालेला होता. या वेळीं पूर्वी इतके कैदी मिळत नसत व गुलाम फार महाग झाले होते. तसेंच ज्या गुलामांत कांहीं स्वाभिमान आहे अशा गुलामांपासून मालकास अधिक लाभ व सुखाची प्राप्ति होते ही गोष्टहि मालकांस कळूं लागली होती. याप्रमाणें सामान्य नागरिकांची नीतिमत्ता व न्यायबुद्धि यांतहि वाढ झाली होती. ग्रीक लोकांच्या संस्कृतीचा रोमन मनावरहि परिणाम घडून येऊं लागला होता. गुलामांच्या वागवणुकीवर निर्बंध घालण्यांत येऊं लागले होते. साठमारीकरितां गुलामाची विक्री करणें मना करण्यांत आलें, गुलामाला कांहीं बाबतींत उदाहरणार्थ, श्रमानें मिळविलेल्या पैशांवर ( पिक्युलियम ) स्वामित्व देण्यांत आलें, गुलामांस उत्तेजन देण्याकरितां कामाबद्दल मजुरी देण्यांत येऊं लागली, गुलामांचीं विशिष्ट पद्धतीचीं लग्नें मान्य करण्यांत येऊं लागलीं. कांहीं शेतीच्या प्रकारांत हंगामाच्या वेळेशिवाय इतर वेळीं एकदम फारसे मजूर लागत नाहींत, अशा तऱ्हेची शेती असलेल्या प्रदेशांत गुलामांस हळूहळू व कायमच्या बंदीकुळाचें स्वरूप प्राप्त झालें व हीं कुळें उत्पन्नाचा कांहीं ठराविक हिस्सा मालकास देऊन किंवा त्याच्या शेतीवर हंगामापुरतें कांहीं दिवस काम करून स्वतः शेती करूं लागलीं.

## रोमन सत्तेचा ऱ्हास—

याप्रमाणें ख्रि. पू. दुसऱ्या शतकापासून ख्रिस्तोत्तर दुसऱ्या शतकापर्यंतच्या काळांत रोमन साम्राज्य हें कसें गुलाममय बनलेलें होतें व ज्यांस स्वातंत्र्य वा स्वाभिमान आहे असे लोक किती अल्पसंख्य होते ही गोष्ट आपल्या लक्षांत आल्यानंतर त्याचा अधःपात व नाश कसा झाला याच्या मूळ कारणाचा आपणांस तात्काल उलगडा होतो. त्या वेळीं कौटुंबिक आयुष्यक्रम

असा फारच थोडा होता. ज्या ठिकाणीं नियमितपणा, विचार व अभ्यास यांनीं युक्त असा आयुष्यक्रम आचरला जात असेल अशीं घरें फारच अल्प प्रमाणांत होतीं. शाळा व कॉलेजें फार थोडीं व तुरळक होतीं. स्वतंत्र मन व स्वतंत्र इच्छा या फारच क्वचित् दृष्टीस पडत असत. रोमन लोकांनीं आपणांमागें ठेवलेले मोठमोठे रस्ते, भव्य इमारतींचे अवशेष, कायदा व सामर्थ्य यांची परंपरा यांमुळें जरी अर्वाचीन मनुष्यास आश्चर्य वाटत असलें तरी हा सर्व बाह्य भपका व देखावा, अतृप्त इच्छा, दडपलेली बुद्धि आणि भग्न मनोरथ व आकांक्षा आणि विकृत इच्छा यांच्यावर आधारून उभारलेला होता ही गोष्ट डोळ्यांआड होत नाहीं. एवढेंच नव्हे तर जे थोडे लोक या मोठ्या जनसमूहावर वर्चस्व गाजवीत होते तेहि स्वतः मानसिक शांति व सुख यांपासून वंचित होते. या वातावरणांत कला, वाङ्मय, शास्त्र व तत्त्वज्ञान हीं जीं स्वतंत्र व सुखी मनाचीं फळें आहेत तीं पार वाळून गेलीं. जिकडे तिकडे नक्कल व अनुकरण, सर्वत्र कलात्मक कृत्रिमपणा अथवा चौर्यपाटव, विद्वान् लोकांत मानसिक गुलामगिरी व दांभिक विद्वत्ता यांचा सुकाळ माजला होता आणि या चार शतकांत रोमनें अथेन्ससारख्या टुमदार नगरानें एक शतकांत जें धीर व उदात्त बौद्धिक कार्य केलें त्याच्या पासंगासहि पुरेल इतकें कार्य केलें नाहीं. रोमन साम्राज्याच्या दंडामुळें अथेन्सची हळूहळू अवनति होत गेली. अलेक्झांड्रिया येथील शास्त्रीय ज्ञानाचा लोप झाला व त्या काळांत मानवाच्या आत्म्याचाहि हळूहळू अधःपात होत गेला.

## पूर्व व पश्चिम संघर्ष—

ग्रीक राष्ट्रें आपल्या संस्कृतीचें संवर्धन करीत असतां त्यांचा जसा पूर्वेकडील इराणी साम्राज्याशीं संबंध आला व प्रथम त्यांचेवर इराणी सम्राटांनीं स्वारी करून त्यांस पुष्कळच त्रास दिला व नंतर अलेक्झांडरनें उलट इराणवर स्वारी करून त्यांचें साम्राज्य नष्ट केलें व याप्रमाणें मध्य आशियांतील व पश्चिमेकडील राष्ट्रांतील हा कलह अथवा इराणचा ग्रीस राज्यांमध्यें व त्यांच्या परस्पर संबंधांमध्यें हस्तक्षेप अनेक वर्षें चालू राहिला व इराणनें आपल्या द्रव्यबलानें अनेक ग्रीक राज्यांस दीर्घकाळपर्यंत परस्परांशीं झुंजविलें, त्याप्रमाणें रोमन सत्तेचाहि विस्तार जसजसा पूर्वेकडे होत गेला तसतसा त्यांचाहि या इराणी लोकांशीं संबंध येऊन त्यांमध्यें परस्पर युद्धें व तह वगैरे अनेक गोष्टी दीर्घकालपर्यंत घडून येत होत्या. ग्रीक राज्यांच्या अभ्युदयाच्या काळीं इराणचें साम्राज्य करणारें घराणें हखामणि हें होतें. रोमशीं स्पर्धा करणारीं त्या वेळचीं घराणीं आर्सेकिडी व सस्सन हीं होतीं. पहिल्या घराण्यास पार्थिअन राजघराणें असेंहि संबोधण्यांत येतें. कारण त्यांच्या सत्तेचें केन्द्र पार्थियामध्यें असून त्या सत्तेचा प्रसार प्रबळ व कर्तबगार राजांच्या कारकीर्दींत मेसापोटेमियापर्यंत व पश्चिमेकडे युरोपच्या सीमेपर्यंतहि केव्हां केव्हां झालेला होता.

ज्याप्रमाणें ग्रीक व इराणी सम्राट यांच्यामधील संघर्ष पूर्व व पश्चिम या दोन खंडातील संस्कृतींच्या आदान-प्रदानामध्यें व परस्पर प्रगतीमध्यें झाला व इराणी सम्राटांनीं पूर्वेकडील संस्कृतीचें पश्चिमेकडे बीजारोपण करून पश्चिमेकडील लोकांस संस्कृतिसंवर्धनाच्या कामीं चालना दिली व त्या उलट अलेक्झांडरनें पश्चिमेकडील संस्कृतीचा परिचय पूर्वेकडील देशांस आपल्या स्वारीमुळें व सफरींमुळें करून दिला, त्याप्रमाणें रोमच्या पूर्वेकडील साम्राज्याचा संघर्ष या दोन इराणी घराण्यांशीं झाल्यामुळें पुन्हां पूर्वेकडील व पश्चिमेकडील संस्कृतींचा मिलाफ होऊन त्यांच्या संवर्धनास व प्रगतीस साहाय्य झालें. अशा तऱ्हेनें मध्य आशियांतील आर्सेकिडी व सस्सन या दोन घराण्यांचें महत्त्व आहे. याकरितां त्यांचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करण्यांत येत आहे.

## मध्य आशियाचें पठार—

खि. पू. दुसऱ्या व पहिल्या शतकामध्यें मानवेतिहासांत एक विशेष घटना दृष्टीस पडते. या कालांत यापूर्वी विशेष महत्त्वास चढलेला जो मेसापोटेमिया व भूमध्य समुद्राचा पूर्वेकडील भाग यांचें महत्त्व कमी झालेलें दिसून येतें. मेसापोटेमिया व ईजिप्त हे दोन्हीहि प्रदेश पूर्वीप्रमाणेंच सुपीक व दाट लोकवस्तीचे होते. परंतु जगाच्या इतिहासांत त्या दोन्ही प्रदेशांस या कालांत विशेष महत्त्व नव्हतें. या कालांत या प्रदेशाच्या पूर्वेकडील व पश्चिमेकडील देशांचें वर्चस्व विशेष वाढलें होतें. या वेळीं जगांत दोन मोठीं साम्राज्यें सत्ताधारी बनलीं होतीं. एक रोमन साम्राज्य व दुसरें चीनचें साम्राज्य. चीननें आपली एक स्वतंत्र संस्कृति व साम्राज्य निर्माण केलें होतें. त्याच्या इतिहासाचें अवलोकन आपण पुढें स्वतंत्र रीतीनें करणार आहों. रोमनें आपली सत्ता युफ्रेटीस नदीपर्यंत वाढविली होती, पण तीपलीकडील प्रदेशावर रोमला आपली सत्ता कधींच प्रस्थापित करतां आली नाहीं. तसेंच चीननें आपल्या सत्तेचा विस्तार पामीरच्या पठारापलीकडे पश्चिम तुर्कस्तानपर्यंत केला होता, पण त्याच्या पलीकडे पश्चिमेकडे त्याची मजल गेली नाहीं. खि. पू. ६० या वर्षी पॉंपेनें पूर्वेकडे कास्पियन समुद्राच्या पूर्व किनाऱ्यापर्यंत ससैन्य चाल केली होती. तसेंच इ. स. १०२ या वर्षी चिनी सेनापति पान चौ यानेंहि कास्पियन समुद्रापर्यंत पूर्वेकडून आपलें सैन्य नेलें होतें व रोमच्या सामर्थ्याची माहिती मिळविण्याकरितां आपले दूत पाठविले होते. परंतु प्रत्यक्ष आशिया व युरोप यांचें संघटन या कालानंतर अनेक शतकांनीं घडून आलें.

या दोन्हीहि साम्राज्यांच्या उत्तरेच्या बाजूस अरण्यमय असा निर्जन प्रदेश पसरलेला होता. सध्यां जेथें जर्मनी देश आहे तेथें त्या वेळीं एक दाट जंगल पसरलें होतें. हें जंगल रशियाचाहि बराच मोठा भाग व्यापून राहिलें होतें व त्यांत प्रचंड हत्तीसारखे जंगली बैल इतस्ततः भ्रमण करीत होते. याप्रमाणें आशियाच्या उत्तरेकडील डोंगराळ भागांतहि एक मोठा ओसाड पट्टा असून त्यापलीकडे दाट जंगल व त्याच्या पलीकडे बर्फाळ प्रदेश पसरलेला होता. आशियाच्या उंच पठाराच्या पूर्वेकडील भागांत मांचुरियाचा त्रिकोणी भूभाग होता. दक्षिण रशिया व मांचुरिया यांच्या दरम्यानचा प्रदेश मोठ्या चमत्कारिक हवामानाचा आहे. येथें पावसाच्या वार्षिक प्रमाणांत फार विचित्र फेरफार होतात. कित्येक वर्षे येथें मुबलक पाऊस पडून सुंदर हिरवींगार व सुपीक शेतें पसरलेलीं दिसतात व मनुष्यें आणि पशु यांची आबादानी आढळते. परंतु त्यानंतर कांहीं वर्षे पूर्णपणें अनावृष्टीचीं येऊन सर्व प्रदेश वैराण बनून जातो.

दक्षिण रशिया व तुर्कस्तान यांच्या पश्चिमेकडील जर्मन जंगलाच्या प्रदेशांत प्रथम आर्यन भाषा बोलणाऱ्या उत्तरी अथवा नॉर्डिक लोकांनीं वसाहत केली व पूर्वेकडील प्रदेशांत हूण, मंगोल, तार्तार व तुर्क, वगैरे लोकांनीं वसाहत केली. हे सर्व लोक भाषा, वंश व राहणी या दृष्टींनीं सारखेच होते. ज्याप्रमाणें नॉर्डिक लोक यांच्या प्रदेशांत दाटी झाल्यामुळें खालीं दक्षिणेकडे मेसापोटेमिया व भूमध्य समुद्राच्या आसपास पसरले त्याप्रमाणें हे हूण वगैरे लोक चीनमध्यें व या दोहोंच्या दरम्यानच्या मार्गानें भरतखंडावर आक्रमण करून गेले व तेथें या शकयवनांनीं बराच धुमाकूळ ख्रिस्तोत्तर आरंभींच्या शतकांत घातला. कुशाण वंशी राजे वगैरे यांपैकींच होत.

अशा लोकांपैकीं सिथिअन व मंगोलियन यांच्या मिश्रणानें उत्पन्न झालेल्या पार्थियन लोकांनीं मेसापोटेमियावर ख्रिस्तपूर्व पहिल्या शतकांत स्वारी केली. त्यांचें पॉम्पेच्या सैन्याबरोबर युद्ध झालें व त्यांनीं पुढें क्रासस या रोमन कॉन्सलचा पराभव करून त्यास ठार मारलें. त्यांनीं इराणांतील सेल्युकीड या ग्रीक घराण्याची सत्ता नष्ट करून आपल्या आर्सेकिड घराण्याची स्थापना केली.

## पार्थियन घराणें—

या पार्थियन लोकांचें पुढें जरी सिथिअन अथवा शक लोकांशीं मिश्रण झालें तरी ते मूळचे ऋग्वेदांत पर्शु लोकांबरोबर उल्लेखिलेले पृथु लोक होत. यांचा मूळ प्रदेश कास्पिअन समुद्राच्या आग्नेयीस असून त्यास सध्यां खोरासान म्हणतात. तेथून ते पूर्वेकडे स्वारी करीत असल्याचा ऋग्वेदांतहि उल्लेख आहे. दरायसच्या शिलालेखांतहि यांचा पार्थव म्हणून उल्लेख आहे. प्रथम आर्सेसीजनें अंड्रोगोरस या सत्रपास मारून आर्सेकिडी राज्याची स्थापना केली. या राजांनीं झरथुष्ट्री धर्माचा स्वीकार केला. यांच्या भाषेस व लिपीस पहलवी असे नांव आहे. यांच्यापैकीं तिसऱ्या व्होलोजिझीसनें झरथुष्ट्राचे ग्रंथ एकत्र करून सध्यांचा अवेस्ता तयार केला. यांनीं ग्रीक संस्कृतीचें वर्चस्व कमी करून पौरस्त्य संस्कृतीचें संवर्धन केलें.

यांचें राज्य ख्रि. पू. २४८ पासून ख्रिस्तोत्तर २२९ पर्यंत टिकलें. या कालांत या राजांस रोमन सत्तेशीं व सिथियन वगैरे भ्रमणवृत्ती लोकांशीं सारखें झगडावें लागलें. रोमन कॉन्सल क्रासस याचा करीच्या लढाईंत पराभव होऊन तो मारला गेला (ख्रि. पू. ५३). मार्क ॲंटनीनें एकदां यांचा पराभव केला, पण पुढें त्याचाच या लोकांनीं चौथ्या फ्राएटीसच्या नेतृत्वाखालीं पराभव केला (ख्रि. पू. ३६). ऑगस्टसनें यांच्याशीं सलोख्याचेंच धोरण ठेवलें होतें व ट्राजननें जरी यांच्यावर स्वारी केली तरी हेड्रिअननें यांच्यांशीं सख्यच ठेवलें. ऑरेलियस व व्हेरस यांनीं आर्मीनिया वगैरे प्रदेशाकरितां या राज्यावर स्वाऱ्या केल्या व ॲव्हिडियस कॅशिअसच्या सैन्यानें सिल्यूशिया शहराचा नाश केला.

याप्रमाणें या राजांचे रोमशीं व इतर आसपासच्या शत्रूंशीं सारखे झगडे चालले होते. या घराण्यामध्यें फ्राएटिस, मिथ्रिडाटीस, आर्टाबेनस, व्हिलोजिझीस वगैरे कांहीं महत्त्वाचे राजे झाले. यांनीं झरथुष्ट्री संप्रदायाचें व इराणी संस्कृतीचें पुनरुज्जीवन केलें. या दृष्टीनें याचे महत्त्व आहे.

## सस्सन घराणें—

आर्सेकिडी घराण्यांतील शेवटचा राजा चौथा आर्टाबेनस याचा याच्याच राज्यांतील एका प्रांताचा अधिपति अर्देशिर (आर्टाक्सर्क्सीज) यानें पराभव करून सस्सन घराण्याची स्थापना केली. हें राजघराणें इराणचें राष्ट्रीय घराणें असून याच्या कारकीर्दीत झरथुष्ट्र संप्रदायास पुन्हा उत्तेजन मिळालें व अग्निपूजेचा सर्वत्र प्रसार झाला. या राजघराण्यांतील राजांचाहि पूर्वेकडील रोमन साम्राज्याशीं बहुतेक सतत झगडा चालू होता व विशेषतः आर्मेनिया, सीरिया व मेसापोटेमिया या प्रांतांवर या झगड्याचा परिणाम होऊन या प्रदेशावरील स्वामित्व कधीं रोमन बादशहा तर कधीं इराणी बादशहा यांचेकडे असे. हे इराणी राजे आपणांस इराणी व इराणीतर लोकांचे शहानशहा म्हणवून घेत असत. अर्देशीरनंतर या घराण्यांत पहिला शापूर हा एक पराक्रमी राजा होऊन गेला. यानें सीरियावर स्वारी केली असतां तिसरा गॉर्डियन या रोमन बादशहानें इ. स. २४२

मध्यें याचा पराभव केला. पण पुढें लवकरच यानें आर्मेनिया प्रांत जिंकून व अँटिऑक शहर घेऊन व्हॅलेरियन या रोमन बादशहास कैद केलें.

या सस्सन राजांची तत्कालीन कथांमध्यें ॲकॅमेनिड (हखामणी) वंशापासून उत्पत्ति वर्णन केलेली असून ते आपणांस ईश्वर म्हणवून घेत. यांच्या राज्यांत सहा सरदार घराणीं व सातवें राजघराणें हीं प्रमुख असून सर्व अधिकारपदें यांसच प्राप्त होत असत. या कालांत मगी लोकांच्या हातांतहि बरीच सत्ता असे व त्या सर्वांवर एक मोबेद असे. पहिल्या अर्देशीरच्या काळांत अवेस्ता व वेंदिदाद हे ग्रंथ ग्रथित करण्यांत आले. पहिल्या शापुरनें धर्मग्रंथांतच ज्योतिष, गणित, तत्त्वज्ञान, वगैरे शास्त्रीय ग्रंथांचाहि समावेश केला. या सुमारास अरेमाइक ख्रिस्ती संप्रदायाचा या प्रदेशांत विशेष प्रचार झाला होता व त्याचा झरथुष्ट्र संप्रदायाशीं संघर्ष चालू होता. यामुळें या दोहोंचा संग्राहक असा मणिसंप्रदाय या सुमारास अस्तित्वांत आला. परंतु पहिला बहराम यानें मणीस देहान्त शिक्षा दिली. तथापि मणिसंप्रदाय समरकंद या शहरीं व आसपास बराच प्रचलित होता.

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें या राजघराण्यांतील राजांचा आर्मेनिया, सीरिया, वगैरे प्रांतांबद्दल पूर्वरोमन साम्राज्याशीं सतत झगडा चालू असून जयाचें पारडें कधीं या पक्षाकडे तर कधीं त्या पक्षाकडे असें झुकत असे. सस्सन घराण्यांत अर्देशीर व पहिला शापूर यानंतर बहराम, दुसरा शापूर, यज्झजर्द पहिला, बहरामगोर, वगैरे राजे होऊन गेले.

याच सुमारास एफ़थालाइट अथवा श्वेतहूण या लोकांच्या स्वाऱ्या दक्षिणेकडे होऊं लागल्या व त्यांनीं या सस्सन राजांस बराच त्रास दिला. मध्यंतरीं कवध व पहिला खुश्रू यांच्या कारकीर्दींत यांचें रोमन सत्तेशीं वैमनस्य येऊन युद्धें झालीं. अखेरीस जस्टीनियन व खुश्रू यांचा तह झाला. याच सुमारास मझ्दक नांवानें स्थापन झालेल्या एका नवीन पंथास खुश्रूनें निर्मूल केलें. हा मोठा पराक्रमी राजा असून याच्या काळांत बऱ्याच सुधारणा झाल्या. परंतु यानंतर पुन्हां रोमन बादशहाशीं व तुर्कांशीं युद्धें सुरू झालीं व त्यांमध्यें या दोघांच्याहि शक्तीचा ऱ्हास झाला व अखेरीस तिसरा यझ्दजर्द याच्या कारकीर्दींत सन ६३७ मध्यें कदेशिया येथील लढाईंत या साम्राज्याचा शेवट झाला.

## इतर नष्ट संस्कृती—

येथपर्यंत आपण युरोप व आशियामधील भारत व चीन देश सोडून बाकीच्या सर्व प्रदेशांत प्राचीन काळीं विकास पावलेल्या संस्कृतींचें अवलोकन केलें. या संस्कृतींचे अवशेष आपणांस



अर्वाचीन कालीन युरोपीय व कांहीं अंशीं आशियांतील संस्कृतीमध्यें दिसत असले तरी या संस्कृतींचे औरस वारस आज अस्तित्वांत नाहींत.

अशाच तऱ्हेच्या थोड्या कालदृष्ट्या उत्तरकालीन परंतु वरीलप्रमाणेंच नष्ट झालेल्या कांहीं संस्कृतींचे अवशेष नवीन खंडांत अथवा अमेरिकेंत उपलब्ध झालेले आहेत व त्यांचा अभ्यासहि चालू आहे. या अमेरिकन संस्कृतीहि भव्य स्मारकांच्या रूपानें आज आपणांस आपलें अस्तित्व प्रकट करीत आहेत, पण या संस्कृतींच्या जनक लोकांची भाषा वगैरेचें अद्यापि चांगलेंसें ज्ञान झालेलें नाहीं. तथापि नष्ट संस्कृती म्हणून त्यांचेंहि वर्णन येथें देतों.

### अझ्टेक—

यांस मेक्सिका असेंहि दुसरें नांव आहे. हे अमेरिकेंतील मूळ रहिवाशांपैकीं सर्वांत प्रसिद्ध असे नहुआ भाषा बोलणारे लोक युटोअझ्टेकन कुलांतील आहेत. यांच्या परंपरागत कथांप्रमाणें हे अझ्तलन खोऱ्यामध्यें पूर्वी राहत असत. परंतु या भूमीचा नक्की तपास लागत नसून अझ्तलन या शब्दाचा अर्थच 'अझ्टेक प्रदेश' असावा. या लोकांची या प्रदेशांत हजारों वर्षांपूर्वींपासून वस्ती असून त्यांस हजारों वर्षांपूर्वींपासून मका पिकविण्याचें ज्ञान होतें असें प्राचीन वस्तुशास्त्रज्ञांचें मत आहे.

यांचें अर्धवट इतिहासकालीन ज्ञान टोल्टेक लोकांची सत्ता नष्ट होऊन अझ्टेक लोकांची सत्ता स्थापन होत होती अशा कालापासून म्हणजे सुमारें इ. स. ११०० पासून मिळतें. या अझ्टेक लोकांत आढळणारी संस्कृति टोल्टेक लोकांच्या संस्कृतीपेक्षां फारशी अधिक विकास पावल्याचें दिसून येत नाहीं. यावरून यांची संस्कृति या कालापेक्षां बरीच जुनी असावी. अझ्टेक लोकांप्रमाणेंच त्या वेळीं नहुआ भाषा बोलणारे चाल्का, झोचीमिल्का, टेपानेका, थाल्हुइका, त्लाझकालटेका, हुएक्सोटझिंका, वगैरे अनेक लोक होते. अझ्टेक लोक मेक्सिको नदीच्या खोऱ्यांत सुमारें शंभर मैलांच्या टापूंत राहत होते. सुमारें इ. स. १३२५ मध्यें त्यांनीं टेझकोको या खाऱ्या पाण्याच्या सरोवराच्या किनाऱ्यावर वस्ती केली. या ठिकाणीं यांची वस्ती कोर्टेझनें यांस जिंकीपर्यंत कायम होती. यांचीं यांच्या शेजारील लोकांशीं नेहमीं युद्धें वगैरे चालू असून त्यांत वरचेवर हार-जित होत असे. सुमारें ५० वर्षांनीं यांनीं अकमपिच्तालि यास आपला राजा केलें. यानंतर या लोकांच्या निरनिराळ्या टोळ्यांनीं अथवा राज्यांनीं एक संघ बनविला. या संघामध्यें अझ्टेक अथवा मेक्सिका लोकच

अग्रणी असत व यांनीं बरेच विजय मिळविले होते. या अझ्टेक लोकांचा राजा पहिला मॅंटिझुमा (१४४०–१४६९) यानें बरेच विजय मिळवून बराच मुलूख पादाक्रांत केला व अनेक राजांस मांडलिक बनविलें. कॉर्टेझ मेक्सिकोंत आला त्या वेळेस (१५१९) दुसरा मॅंटिझुमा राज्य करीत होता. कॉर्टेझच्या अर्वाचीन शस्त्रांपुढें व त्याच्या क्रौर्यापुढें या अप्रगत लोकांचा निभाव लागणें शक्यच नव्हतें व त्यांच्या दुर्बलतेमुळें त्यांत दुफळीहि माजली व अखेरीस त्यांच्या सत्तेचा शेवट झाला.

इ. स. १५१९ मध्यें यांची राजधानी टेनोक्टिटलन या शहरांत एक लक्ष लोकवस्ती होती. यांत मोठमोठीं व उंच उंच देवालयें होतीं. निरनिराळ्या धंद्यांमध्यें वैशिष्ट्य व कौशल्य उत्पन्न झालेलें होतें. या लोकांनीं पाट, कालवे, नहर, साकू अथवा पूल व सार्वजनिक इमारती बांधल्या होत्या. अर्थात् या प्रदेशांतील निरनिराळ्या गांवांतील सुधारणा व संस्कृति त्यांच्या समृद्धीवर अवलंबून असे व ही संस्कृति टोल्टेक लोकांपासूनच चालत आलेली होती व त्यामुळें या दोन संस्कृतींतील वस्तूंमध्यें फारसा फरक आढळत नाहीं. अझ्टेक काळांत थोडी अधिक प्रगति दिसते एवढेंच.

स्पॅनिश लोकांनीं अझ्टेक लोकांचींच स्थलनामें मेक्सिकोंत व मध्य अमेरिकेंत चालू ठेवलीं. अझ्टेक अथवा नहुआ भाषेंतील बरेच शब्द स्पॅनिश भाषेंत मिसळून गेले व ते त्या भागांत अद्यापहि चालू आहेत एवढेंच नव्हे तर त्यांपैकीं कांहीं शब्द सार्वराष्ट्रीय बनून गेले आहेत; उदाहरणार्थ, टोमॅटो व चोकोलेट, हे शब्द मूळचे नहुआ भाषेंतील आहेत.

### इंका—

दक्षिण अमेरिकेमध्यें सर्वांत प्राचीन संस्कृतीचा उदय तीन क्षेत्रांमध्यें बहुतेक एकाच कालांत झालेला आढळतो. (१) बोलिव्हियामधील टिटिकाका सरोवराच्या कांठीं तिआन्हानाको संस्कृति. (२) दक्षिण पेरूच्या किनाऱ्यावर नास्का. व (३) उत्तर पेरूच्या किनाऱ्यावर ट्रुक्सिलो. यापेक्षां सर्वांत जुनी संस्कृति तिआन्हानाको, प्रोटोनास्का व प्रोटोचिमु या नांवांनीं ज्ञात आहे. तथापि यांच्या स्वरूपांत कांहीं बाबतींत फरक असला तरी बहुतेक तिआन्हानाको या संस्कृतीचींच हीं तीन रूपें आहेत. या संस्कृती खि. पू. तिसऱ्या शतकापासून खिस्तोत्तर दुसऱ्या शतकापर्यंत प्रचलित होत्या. यामुळें त्या मय व मध्य अमेरिकन संस्कृतींशीं समकालीनच होत्या. या संस्कृतींचा प्रसार तिआन्हानाको संस्कृतीच्या लोकांनींच दक्षिणेकडून उत्तरेकडे इक्वेडोरपर्यंत केल्याचें दृष्टीस पडतें. या सर्व तीन संस्कृतींचो खिस्तोत्तर ८०० ते ११०० या कालांत अवनति होऊन एक प्रकारचें कृष्णयुग सुरू झालें. यांपैकीं इंका संस्कृति विशेष महत्त्वाची असल्यामुळें तिचें थोडें वर्णन देण्यांत येत आहे.

इंका लोकांनीं तिआन्हानाको संस्कृतीचें पुनरुज्जीवन केलें. एवढेंच नव्हे तर त्यांनीं एक मोठें साम्राज्य स्थापन केलें. परंतु या लोकांनीं लेखन-कलेचा शोध न लावल्यामुळें यांची माहिती केवळ परंपरेनें आली तेवढीच उपलब्ध आहे. या इंका लोकांचा मूळ पुरुष मांको कापाक नांवाचा होता. यानें कुझको खोऱ्यापर्यंत आपली सत्ता वाढवून तेथें एक सूर्यमंदिर बांधलें. याच्यानंतर अनेक राजे झाले व त्यांनीं आपल्या सत्तेचा बराच विस्तार करून अखेरीस आपली सत्ता पश्चिमेकडील समुद्रकिनाऱ्यापर्यंत स्थापन केली व एक मोठें साम्राज्य स्थापन केलें. या लोकांनीं प्रथम भव्य दगडांचीं मंदिरें बांधलीं, कारण यांच्या पूर्वीचे तिआन्हानाको लोक दगडांच्याच इमारती बांधीत असत. तसेंच मोठमोठ्या भिंती (उदाहरणार्थ, सक्सा हुयामन टेकडीवरील भिंत) व मोठमोठे किल्ले (उदाहरणार्थ, ओलान टायटांबो येथील किल्ला) वगैरे बांधले. त्या बांधकामांत त्यांनीं अजस्र घडलेले दगड वापरलेले असून ते परस्परांमध्यें कोपरे काढून बसविले आहेत. यामुळें हें बांधकाम चौकोनी दगडांचें नसून बहुकोनी दगडांचें आहे. कुझको येथील भव्य सूर्यदेवालय यांच्या अजस्र बांधकामाची साक्ष देत आहे. पुढें हे समुद्रकिनाऱ्यावर पोंचल्यावर यांनीं कच्च्या विटांचीं मोठमोठीं बांधकामें केलीं. याखेरीज डोंगरांच्या उतारावर शेंकडों मैल लांबीचे दगडी बांध घालून शेतीकरितां मजग्या बांधल्या.

ईजिप्तमधील पिरामिडप्रमाणें यांनीं थडग्यांवर बांधलेले मोठमोठे पायऱ्यांचे मनोरे आढळतात.

तिआन्हानाको संस्कृतीचे लोक इन्द्राप्रमाणें पर्जन्य-देवतेची उपासना करीत. परंतु इंका लोक हे सूर्योपासक असल्यामुळें त्यांनीं आपल्या साम्राज्यांत सूर्योपासनेचा सक्तीनें प्रसार केला.

या लोकांत पवित्र वस्तूला व्हाका हा शब्द प्रचलित होता व अनेक विविध जातींच्या पवित्र वस्तूंस हा शब्द लावला जात असे. हे लोक मृतांस पुरीत असत व ईजिप्तप्रमाणेंच या प्रदेशांतील हवा कोरडी व रुक्ष असल्यामुळें कुजण्याची क्रिया फारशी घडून येत नाहीं. त्यामुळें या लोकांत प्रेतें संरक्षित करून ठेवण्याचीहि चाल रूढ झाली होती.

या लोकांनीं कुऱ्हाडी, खलबत्ते व अनेक पात्रें फार कौशल्यानें करण्याची कला पुष्कळच वाढीस लावलेली होती व तीं फार गुळगुळीत करीत असत. यांस लोखंड माहीत नव्हतें, पण सोनें व तांबें पुष्कळ लवकर ज्ञात झालें होतें व त्यांच्या ते अनेक वस्तू करीत व त्यांत कांसें बनविण्याची कलाहि अवगत

झाली होती. त्यांस सोन्याप्रमाणें चांदीहि माहीत होती व आपल्या बगीचांतील फुलें चांदी-सोन्याच्या पात्रांत ठेवण्याइतपत त्यांची सौंदर्यदृष्टिहि विकास पावली होती.

पण प्राचीन वस्तूंच्या दृष्टीनें व कालनिर्णयाच्या दृष्टीनें त्यांची मातीची भांडीं करण्याची कला विशेष महत्त्वाची दिसते. कारण त्यांस कुंभाराचें चाक दीर्घकालपर्यंत माहीत नसून त्यांनीं निरनिराळ्या पात्रांस दिलेले आकार फार कौशल्याचे आहेत व या कौशल्यावरूनच त्यांचा विकासकाल अजमावतां येतो. तसेंच या भांड्यांवरील रंगीत कामहि कौशल्यपूर्ण व चित्तवेधक दिसून येतें.

या लोकांमध्यें वस्त्रें विणण्याची कलाहि अगदीं उच्च दर्जास पोंचली होती व हिचा आरंभ जरी किनारी विणण्यापासून झालेला दिसतो तरी वस्त्रांतील रंगीबेरंगी काम व नक्षी फारच कलापूर्ण आढळते.

इंका लोकांचें राज्य म्हणजे एक प्रकारची समाजसत्ता होती. परंतु पुढें त्यांचें साम्राज्य झाल्यावर इंका लोक हे एक वरिष्ठ जात बनून ते इतरांवर अमल चालवूं लागले. शेतीमधील सर्व उत्पन्न राज्याच्या मालकीचें समजलें जाऊन त्याची सर्व लोकांत वांटणी करण्यांत येत असे. त्यामुळें नापिकी भागासहि अन्न पुरविलें जात असे. कोष्टी, सुतार, कुंभार, विणकर, वगैरे लोकांस आपआपल्या धंद्याचीं कामें करावीं लागत. त्याकरितां त्यांस कच्चा माल पुरविण्यांत येऊन त्यांच्याकडून पक्का माल घेण्यांत येत असे व तो सर्व लोकांस पुरविण्यांत येत असे व त्यांस धान्य व इतर संसारोपयोगी वस्तू पुरविण्यांत येत असत. याकरितां राज्यांतील सर्व जमिनीची व निरनिराळ्या लोकांची पाहणी व शिरगणति करण्यांत येत असे व एका भागांत लोकवस्ती दाट झाल्यास तिला सक्तीनें कमी लोकवस्तीच्या भागांत वसाहत करण्यास पाठविलें जात असे. तसेंच निरनिराळ्या धंद्यांतील लोकांस आपआपला धंदा बदलतां येत नसे. इंका साम्राज्य दूरवर पसरल्यावर त्यामध्यें दळणवळण राहण्याकरितां जासूद व हरकारे यांच्या द्वारां टपालाची व्यवस्था करण्यांत आली होती.

लोकांच्या विवाहसंबंधावरहि सरकारची नजर असे व विवाह बहुतेक स्थानिक लोकसमूहांतच केले जात असत. राजाला एकच बायको करण्याचा अधिकार असे व ती बहुतेक त्याची बहीणच असे. त्यामुळें या लोकांत मातेकडून वारसा जात असे. अर्थात् राजाला वाटेल तितक्या उपस्त्रिया ठेवण्याचा अधिकार असे.

या बहिणीशीं विवाह करण्याच्या चालीमुळें पिझारो यास हें साम्राज्य नष्ट करण्याची संधि मिळाली. कारण व्हायना कापाक हा राजा मृत्यु पावल्यानंतर त्याच्या बहिणीपासून झालेला मुलगा व्हासकार हा गादीवर बसला. परंतु कुझको या नवीनच साम्राज्यास जोडलेल्या प्रांताच्या राजाच्या मुलीचा मुलगा आटाहुआल्पा हा आपल्या आईचा व्हायनाशीं विवाह झाला होता व आपण त्याचे पुत्र आहों असें म्हणून पुढें आला व त्यानें व्हासकार यास कैद केलें व या दुहीचा फायदा घेऊन पिझारोनें इंका साम्राज्य नष्ट केलें व या संस्कृतीचा ऱ्हास झाला.

## मय—

या लोकांची वस्ती मध्य अमेरिकेमध्यें मेक्सिकोंत यूकाटन द्वीपकल्पांत आढळते. हे ख्रिस्ती शकाच्या सहाव्या शतकांत विशेष प्रबल झालेले दिसून येतात. यांचें सर्वांत जुनें शहर ग्वाटेमालाच्या उत्तरेकडील मैदानांत होतें. या ठिकाणीं त्यांनीं मोठमोठ्या भव्य दगडी इमारती बांधल्या होत्या. तथापि ते या कालाच्या पुष्कळच पूर्वीपासून या भागांत वस्ती करून होते. अकराव्या शतकापर्यंत यूकाटन व ग्वाटेमाला यांमध्यें यांनीं अनेक राज्यें व शहरें स्थापन केलीं होतीं. यूकाटनमध्यें इत्झा, क्सिउ व कोकोम या तीन घराण्यांनीं आपली सत्ता दोनशें वर्षांहून अधिक टिकविली. तेराव्या शतकाच्या आरंभीं यांमध्यें यादवी सुरू होऊन इत्झा लोक ग्वाटेमालाच्या जंगलांत गेले व तेथें त्यांनीं आपली संस्कृति सतराव्या शतकापर्यंत टिकविली. स्पॅनिश लोक आले तेव्हां या लोकांत परस्पर वैमनस्यें व यादवी बरीच बोकाळली होती.

या लोकांच्या परंपरागत हकीगतीप्रमाणें मध्य-मेक्सिकोंत टोल्टेक लोक सन ७५२ मध्यें येऊन त्यांनीं एक राज्य स्थापन केलें तें सन १०७० पर्यंत टिकलें. यांचें मय लोकांशीं सख्य होतें, एवढेंच नव्हे तर टोल्टेक हे मय लोकांपैकींच असून त्यांनीं आपल्या शेजाऱ्यांकडून नहुआ भाषेचा स्वीकार केला होता.

अझ्टेक लोकांनीं १३२५ मध्यें येऊन मेक्सिको खोऱ्यांत आपली राजधानी स्थापन केली व ते नहुआती भाषा बोलत. यांच्या साल्वादोर व पनामा यांमध्यें वसाहती होत्या. हांडुरासच्या किनाऱ्यावर कारिब इंडियन लोक राहत असत. यास १७९६ मध्यें हद्दपार करण्यांत आलें.

## मय भाषा—

मय ही एक भाषा असून तिच्या अनेक पोटभाषा आहेत व त्या बोलणाऱ्या अनेक टोळ्या आहेत. या लोकांची संस्कृति फार प्राचीन कालांतच बरीच प्रगत झाली होती व तिचे अनेक अवशेष इमारती व बांधकामाच्या रूपानें आढळतात. तसेंच या लोकांस लोखंड, कुंभाराचें चाक, माग व कमानं बांधण्याचें ज्ञान नसूनहि दगडांतील खोदकाम, मातीचीं

भांडीं बनविणें, आणि वस्त्रें विणण्याची कला यांत या लोकांनीं बरीच प्रगति केलेली होती. या लोकांत एक विचित्र चित्रलिपि प्रचलित होती व कालदर्शक पंचांगहि त्यांनीं बनविलें होतें. यांच्या कालचे बरेच लेख उपलब्ध असून त्यांतील तारखा व मजकूर बरोबर जुळवितां येतो.

यांच्या बांधकामामध्यें एका खुल्या चौकाभोंवतीं उंच पायऱ्यांचे मनोरे असतात व चौकांत पुतळे व स्थंडिलें असत. ईजिप्तमधील मनोरे हीं थडगीं असत तर हे मनोरे म्हणजे देवळें अथवा वेदी असत. या मनोऱ्यांच्या बाह्य पृष्ठभागावर पुष्कळच नक्षी खोदलेली आढळते. दरवाजांवर लांकडी छावण्या असत. त्यामुळें लांकडें कुजून गेल्यामुळें इमारतींचे अनेक भाग पडून गेले आहेत. या इमारतींत बहुधा स्तम्भ आढळत नाहींत. इमारतीकरितां चुना वापरीत नसत, त्यामुळें झाडांच्या मुळांनींहि अनेक इमारतींचा विध्वंस झाला आहे.

मय लोकांचा सृष्टिकर्ता ईश्वर कुकुलकन (कुकुल = पक्षी + कन = सर्प) नांवाचा असे. याचें प्रतीक पिसांचा सर्प असे. दुसरा देव इत्झामा नांवाचा असे. ही आकाशदेवता असून ग्रीक लोकांच्या झ्यूसदेवतेप्रमाणें असे. तिसरी चाक नांवाची पर्जन्यदेवता असे. याखेरीज कमीजास्त महत्त्वाच्या अनेक देवता निरनिराळ्या कल्पना व कला वगैरेंशीं संबद्ध असत. मयधर्म हा निसर्गोपासनेच्या स्वरूपाचा होता. नरमेधहि या लोकांत स्पॅनिश लोक आले तेव्हां प्रचलित होता. मय लोकांत प्रेतें जाळण्याची व पुरण्याची अशा दोन्हींहि चाली असत.

या लोकांत राजा व पुरोहित एकच व्यक्ति असे व या लोकांच्या मोठमोठ्या वस्ती एकत्र राहण्यामध्यें राजकीय बंधनापेक्षां धार्मिक बंधन अधिक महत्त्वाचें असे.

या लोकांमध्यें उंच कपाळाऐवजीं खोल गेलेलें कपाळ सुंदर मानीत व याकरितां लहान मुलांच्या डोक्यास एक लांकडी पट्टी बांधीत. त्यांच्या खोदलेल्या आकृतींतहि ही गोष्ट दृष्टीस पडते.

हे लोक मका पिकवीत असत व मक्याचीं रानटी झाडें या प्रदेशामध्यें आढळून आलीं आहेत. याखेरीज ककाओ व घेवडा हींहि पिकवीत असत. तसेंच हे लोक शिकार करीत व फांसेपारधहि करीत असत व रानांतून मध गोळा करीत. नद्या व खाड्यांतून मासेहि मारीत असत. तसेंच कोंबडीं, बदकें यांसारखे प्राणीहि बाळगीत.

## उपसंहार—

याप्रमाणें आपण आतांपर्यंत मानवसमाजाच्या उत्पत्तीपासून त्याच्या निरनिराळ्या ठिकाणीं व निरनिराळ्या भूभागांत झालेल्या प्रसाराचें व या निरनिराळ्या भूभागांत त्यानें संवर्धित केलेल्या कांहीं संस्कृतींचें विहंगमावलोकन केलें. त्यांत ईजिप्ती, सुमेरी, असुरी, बाबिलोनी, हिटाइट, मित्तनी, फिनीशिअन व हिब्रू या संस्कृती व त्यानंतर ग्रीक व रोमन संस्कृती यांचें दिग्दर्शन केलें व त्यानंतर अमेरिकेंतील प्राचीन संस्कृतींचें विहंगमावलोकन केलें. या सर्व नष्ट संस्कृती होत. व यांपैकीं कांहींचा विशेषतः ग्रीक व रोमन संस्कृतींचा कांहीं परिणाम जरी आज दृश्य स्वरूपांत दिसत असला तरी यांचे औरस वारस आज जगांत हयात नाहींत.

*यापुढें आपणांस अत्यंत प्राचीन कालापासून सतत परंपरेनें* चालत असलेल्या व अत्यंत दीर्घकालपर्यंत हळूहळू विकास पावत असलेल्या व कालाच्या ओघांत अनेक उत्कृष्ट व निकृष्ट स्थितींतून पार पडलेल्या व अनेक भिन्न भिन्न संस्कृतींशीं व लोकांशीं संबंध येऊनहि व अनेकांशीं संघर्ष होऊनहि आपलें स्वरूप कमीअधिक प्रमाणांत कायम ठेवणाऱ्या व आपल्या दीर्घकालापासून चालत आलेल्या कल्पनांस, समजुतींस, आचारविचारांस निरनिराळ्या काळीं कमीअधिक मुरड घालून व आपलें स्वरूप, सातत्य व परंपरा शक्य तितकी टिकवून धरणाऱ्या अशा दोन पूर्वेकडील देशांत प्रसृत झालेल्या संस्कृतींचें अवलोकन करावयाचें आहे. आज जरी या दोन संस्कृती जगांतील अग्रगण्य मानल्या जात नाहींत व त्यांवर आतांपर्यंत होत गेलेल्या अनेक आघातांमुळें त्या कांहींशा जीर्ण झाल्यासारख्या वाटतात तरी ज्या चिकाटीमुळें त्यांनीं आपलें सातत्य कायम ठेवलें आहे व आपली परंपरा कायम ठेवली आहे ती चिकाटी व तो जिवटपणा त्यांमध्यें अद्यापहि कायम असून त्यांच्या बळावर सध्यांच्या भौतिकवादी संस्कृतीवरहि विजय मिळवून त्या पुन्हां आपल्या प्राचीन वैभवास चढतील अशी आशा करण्यास बरीच जागा आहे, असें वाटूं लागलें आहे. अशा या दोन महत्त्वाच्या पौरस्त्य संस्कृतींचें म्हणजेच भारतीय व चिनी संस्कृतींचें आपणांस अवलोकन करावयाचें आहे तें पुढील भागामध्यें करण्यांत येईल.

# भाग चौथा

**प**—मराठी-वर्णमालेचें एकविसावें व्यंजन. या वर्णाचा चार अवस्थांनीं विकास झालेला दिसतो. पहिली (इ. स. पू. ३ रें शतक) गिरनार लेखांत, दुसरी (इ. स. पू. १ लें शतक) मथुरा येथील शोडासकालीन जैन लेखांत व तिसरी (इ. स. चें चौथें शतक) अलाहाबादच्या (समुद्रगुप्ताच्या) स्तंभावरील लेखांत आढळतें.

**पंका**—ही कपडे विणणारांची व मजुरांची जात आहे. हे लोक गोंड वर्गांत मोडतात, पण यांचा दर्जा जरा वरचा असतो. बिहार, ओरिसा, मध्यप्रांत, वऱ्हाड इकडे यांची वस्ती आहे. यांच्यांत पंथ दोन : कबीर व सुकट. सुकट हिंदु देवतांची पूजा करतात. कबीर पंथी लोक दुसऱ्यांस आपल्या धर्मांत घेतात. सुकट मद्य-मांस खातात. कबीरपंथी खात नाहींत.

**पकोक्कू**—ब्रह्मदेशांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ६,२१० चौरस मैल. लोकसंख्या सु. पांच लक्ष. बहुतेक लोक ब्रह्मी व भाषाहि ब्रह्मी. १८८८ सालीं पगन जिल्हा काढून पकोक्कू जिल्हा करण्यांत आला. पकोक्कू शहर हेंच जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. या जिल्ह्यांत देवळें (पागोडे) बरींच आहेत. मिथ्या व वाव या दोन नद्या या जिल्ह्यांत आहेत. त्यांच्या खोऱ्यांत चिनी लोक राहतात. लोक बौद्ध धर्मीय असून शेतींत लक्ष घालणारे आहेत. शेकडा ६२ लोक शेतीवर राहतात. मुख्य पीक ज्वारी. मिथ्या व वाव या नद्यांतून शेतीकरितां लहान लहान पाट काढले आहेत. इरावतीच्या कांठीं येनंगियन येथें रॉकेल तेल निघतें. पकोक्कू गांवांत म्युनिसिपालिटी १८८७ सालीं झाली.

**पक्क्या मातीचीं चित्रें**—(टेराकोटा). जिल्हई दिल्या-शिवाय मातीच्या तयार करून भाजलेल्या वस्तू फार प्राचीन काळापासून निरनिराळ्या कामीं वापरलेल्या आढळतात. विशेषतः कौलें, शिल्पकामाचे नमुने व सजावटी, उठावदार चित्रें व पूर्ण आकाराचीं चित्रें, इत्यादि वस्तू मातीच्या तयार करून भाजून वापरीत असत. ईजिप्त व क्रीट बेटांतील शिल्पकामांत भाजलेल्या मातीच्या वस्तूंचा उपयोग आढळून येतो. बिओशियामध्यें तानाग्रा येथें असे मातीचे पुतळे आढळतात. अशा तऱ्हेचे पुतळे खि. पू. ३५० ते २०० पर्यंत दृष्टीस पडतात व त्यांत तत्कालीन सामान्य ग्रीक स्त्रियांचीं त्यांच्या वस्त्राभरणांसह सुंदर चित्रें आढळतात. इटली देशांत इट्रुस्कन लोक शवपेटिकां-करितां भाजलेल्या मातीचा उपयोग करीत. रोमन लोकांतहि भाजलेल्या मातीच्या मूर्ती व लहान लहान पुतळे यांचा विशेष प्रचार होता व त्यांच्या प्रत्येक वसाहतींत यांचे अवशेष आढळतात. ही कला कांहीं काल मागें पडली होती. परंतु पंधराव्या व सोळाव्या शतकांत डोनाटेल्लो, व्हेरोशिओ, ल्युकाडेला रोब्बिया व इतर कांहीं कलावंत यांनीं या कलेमध्यें विशेष प्रावीण्य दाखविलेलें आढळतें. सतराव्या व अठराव्या शतकांतहि या तऱ्हेचीं कांहीं कामें दृष्टीस पडतात व विशेषतः अशा चित्राचा ब्रॉंझ किंवा संगमरवर यांचे पुतळे बनविण्यापूर्वी नमुने करण्या-करितां म्हणून उपयोग करीत असत. यामध्यें नमुना बनवितांना

आपला हात अधिक मोकळेपणानें व जलद चालवितां येतो. अलीकडे ही कला पुन्हा मागें पडली आहे. अलीकडचे शिल्पकार प्लॅस्टर ऑफ पॅरिसचे ठसे शाडूच्या नमुन्यावरून तयार करतात.

या प्रकारचीं मातीचीं कामें भारतीय शिल्पकार मौर्यकालापासून करीत आले आहेत. प्रथम लहान पट्टिकाचित्रें होतीं, नंतर गुप्तकालीं फलकचित्रें आलीं. निरनिराळ्या तळ्यांतून माती काढून तिला विशिष्ट आकार देत व विटांप्रमाणें भाजीत. शुंगकालीन चित्रांतून केशरचनेकडे व वस्त्रें तलम व सुंदर रीतीनें वापरण्याकडे लक्ष पुरविलेलें आढळतें. मथुरा, भिटा, गढवा, बसरथ, बुलंदीबाग (पाटणा), वगैरे ठिकाणीं टेराकोटा चित्रांचे उत्कृष्ट नमुने सांपडले आहेत व त्यांवरून इतिहासाला महत्त्वाची मदत झालेली आहे.

**पक्कासा, मंगळदास मछाराम** (१८८२- )—मध्य प्रांताचे गव्हर्नर. यांचें शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें. पुढें हे मुंबई येथें ३० वर्षें सॉलिसिटर होते. १९३० मध्यें यांनीं सत्याग्रहाच्या चळवळींत भाग घेतला व त्यांस एक वर्षाची शिक्षा झाली. तेथून सुटल्यावर हे अखिल भारतीय ग्रामोद्योग संघाचे सल्लागार झाले. हे एक मोठे सामाजिक कार्यकर्ते असून यांनीं मरोली येथें एक आश्रम चालविला होता. हे प्रथम मुंबई वरिष्ठ कायदे मंडळाचे अध्यक्ष होते (१९४७); नंतर स्वतंत्र हिंदी संघराज्य झाल्यावर यांना मध्यप्रांताचे गव्हर्नर करण्यांत आलें.

**पखवाज**—एक वाद्य. याचें खोड खैर, शिसू, चांफा, इत्यादि लांकडांचें असतें. ह्याची लांबी सुमारें दीड हात असते. हें खोड कांतून गोलाकार केलेलें असतें; व आतून आरपार पोंखरून त्या लांकडाची जाडी अर्ध्या इंचापर्यंत ठेवितात. दोन्ही तोंडांचा व्यास सुमारें टीचभर असतो. खोडाच्या मध्याचा व्यास तोंडाच्या व्यासाच्या सव्वापट असतो. पखवाजाचीं दोही तोंडें कातड्यानें मढवितात व किनारीवर अर्धा इंच दुहेरी चामडें घालतात. पखवाजाच्या दोंनहि तोंडाच्या कांठाबरोबर कातड्याच्या वादीचा वेठ वळलेला असतो, त्यास 'गजरा' म्हणतात. ह्या गजऱ्यांतून चौफेर वादी ओंवलेली असते. पखवाजाचा स्वर कमी–जास्त करतां यावा म्हणून तीन इंच लांब व दीड इंच जाड असे लांकडाचे गोल पांच–सहा तुकडे या वादीखालीं दिलेले असतात. ह्या तुकड्यास 'गठ्ठे' म्हणतात. एका तोंडाला लोहकीट गव्हाच्या चिक्कींत मिसळून तयार केलेली शाई घातलेली असते. दुसऱ्या तोंडास वाजविण्याच्या वेळीं कणीक पाण्यांत भिजवून लावितात. हरिदासाच्या साथींत व भजनात हें वाद्य वाजवितात. पूर्वीं हें वाद्य मातीचें करीत असत. म्हणून त्यास मृदंग हें नांवहि आहे. हल्लींहि दक्षिणेंत पाणी ठेवण्याचा मातीचा माठ पालथा घालून त्याच्या पाठीवर स्वतंत्रपणें पखवाजाचें गतकाम, बोल, परण, वगैरे वाजवितांना दृष्टीस पडतें. ह्यालाच दक्षिणेंत 'घटवाद्य' म्हणतात.

**पंखा**— उष्मा होत असतांना आपलें शरीर थंड होण्याकरितां आपण पंख्यानें वारा घेतों. पंखे वापरण्याची पद्धत सर्व राष्ट्रांमध्यें अत्यंत प्राचीन काळापासून आढळते. प्राचीन काळीं राजे लोकांबरोबर पंखा घेऊन वारा घालणारे लोक असत. अशा तऱ्हेचे पंखे कधीं कधीं युद्धामध्यें निशाणासारखे बरोबर नेत असत. ग्रीक व रोमन लोकांत पंखे धरणारे गुलाम असत व ते आपल्या मालकांस व पाहुण्यांस जेवतांना वारा घालीत असत.

सध्यां पॅरिस, व्हिएन्ना, ब्रुसेल्स आणि जिनिव्हा या शहरांत उत्तम पंखे तयार करण्यांत येतातः इंग्लंडमध्येंहि कांहीं उंची पंखे तयार होतात. पॅरिसमध्यें हजारों लोक पंखे करण्याच्या धंद्यांत गुंतलेले आहेत. हे करण्याच्या कामीं हस्तिदंत, मोत्याचे शिंपले, कासवाची पाठ, निरनिराळ्या प्रकारच्या अस्थी, लांकडें व धातू, तसेंच रेशीम, साटीण, चामडें, कागद, शेळीचें कातडें, पिसें, वगैरे अनेक निरनिराळ्या प्रकारचे जिन्नस वापरण्यांत येतात; आणि ते तयार करीत असतांना अनेक कारागिरांचे त्यांस हात लागतात. एक पंखा सुमारें वीस निरनिराळ्या कारागिरांच्या हातांतून जातो.

चीन व जपान देशांतहि मोठ्या प्रमाणावर पंखे तयार होतात. अगदीं स्वस्त पंखा म्हटला म्हणजे ताडांच्या पानांचा होय. कागदी पंखे उघडता-मिटतां येण्यासारखेहि करण्यांत येतात व त्यांवर निरनिराळीं रंगीत चित्रें काढण्यांत येतात. त्यांपैकीं कांहीं पंखे इतके सुंदर असतात कीं, ते भिंतीवर शोभेकरितां बसविण्यांत येतात. चिनी–जपानी लोक हस्तिदंत, मोत्याचे शिंपले, चंदन, कासवाची पाठ, पिसें, वगैरेंचे भारी किंमतीचे पंखे तयार करतात. हस्तिदंती पंख्यांमध्यें फार सुंदर कोरीव नक्षीकाम केलेलें असतें. चीन व जपान यांमध्यें लोक रस्त्यांतून जातांना आपण काठी वापरतों त्याप्रमाणें पंखे हातांत घेऊन जातात. या पंख्यावर असलेलीं चित्रें अनेकदां अर्थपूर्ण असतात. त्यांच्या योगानें एखादा संदेश देण्यांत येतो किंवा त्यांत एखादें व्यंगचित्र असतें. चिनी लोक पंख्याच्या साहाय्यानें अनेक प्रकारचे कागदी पांखरांचे वगैरे खेळहि करतांना आढळतात.

**पंखाचा साप**—(ड्रॅगन). ख्रिस्ती वाङ्मयांतील एक काल्पनिक प्रचंड प्राणी. याच्याबद्दल अनेक कथा प्रचलित आहेत. हा सापासारखा असून याला दोन पाय व पंख होते अशी समजूत आहे. याच्या शरीरावर खवले होते आणि डोक्यावर तुरा होता. याच्या तोंडांतून ज्वाला निघत. बायबलांतील कथांवरून व ईजिप्तमधील प्रचंड सुसरींवरून या प्राण्यासंबंधीं कल्पना प्रचलित झाल्या असाव्या. या प्राण्याला सेंट जॉर्जनें मारल्याची कथा

आहे. चीन–जपानमधील घराण्यांतील चिन्हांतून हा प्राणी दिसतो. वेल्सचें हें एक राष्ट्रीय चिन्ह आहे.

**पंखा ताड**—[जात–कोरिफा उंब्राकुलिफेरा. इं.–टालिपॉट. सं.–तालपत्र]. पंख्याच्या ताडाचें झाड मूळ सीलोनमधील आहे. याची उंची ६०–७० फुटांपासून १०० फुटांपर्यंत भरते. याच्या शेवटीं पंख्यासारखीं झुबकेदार पानें असतात. यांची लांबी १८ फुटांपर्यंत व रुंदी १४ फुटांपर्यंत असते. याच्या पानांचा उपयोग घरें शाकारण्याच्या कामीं, पंखे व इरलीं करण्याकरितां करतात आणि तीं कागदाच्याऐवजींहि वापरण्यांत येतात. ताड पाहा.

**पंखी मासा**—(रॉर्कवाल). हा एक व्हेल (देवमासा) जातीचा मासा आहे. याच्या पाठीवर कल्ला असून याचा गळा व खालचा भाग सुरकुत्या पडलेला असतो. याच्या अनेक जाती आहेत. यांतील एक निळ्या रंगाची जात सर्वांत मोठी असून ती उत्तरेकडील समुद्रांत आढळते. सामान्यतः याची लांबी ६० फूट असते.

**पंच**—(ज्यूरी). इंग्लंडांतील फौजदारी खटल्यांत ग्रँड ज्यूरी आणि पेटी ज्यूरी असे दोन प्रकार आहेत. ग्रँड ज्यूरीमध्यें किमान ११ आणि कमाल २४ इसम असतात. त्यांचें कर्तव्य असें असतें कीं, फिर्यादीनें आरोपीवर जो आरोप (चार्ज) ठेवून पुरावा केला असेल त्याचा विचार एकत्र बसून गुप्तपणें करून आपलें मत आरोपी दोषी आहे किंवा नाहीं तें द्यावयाचें. पेटी ज्यूरीमध्यें बारा इसम असतात व फौजदारी आणि दिवाणी खटल्यांत त्यांचें मत घेतात. ज्यूरीचें मत वस्तुस्थितीच्या मुद्यां-(इश्यूज् ऑफ फॅक्ट्स्) बद्दल घेतात. पंच किंवा ज्यूरर म्हणून २१ ते ६० वर्षांच्या वयापर्यंत कोणाहि स्त्रीला किंवा पुरुषाला नेमण्यांत येतें. ज्यूरर म्हणून नेमावयाच्या इसमाची लायकी पुढील-प्रमाणें असावी लागते: १. लंडन शहरांत १०० पौंड किंमतीची मालमत्ता असणें; २. खेडेगांवांत १० पौंड किंमतीची मिळकत किंवा १० पौंड भाडें देणारा इसम. पार्लमेंटचे सभासद, न्यायाधीश, उपाध्याय (क्लर्जिमेन), बॅरिस्टर, सॉलिसिटर, डॉक्टर, लष्करी किंवा आरमारी नोकरी करणारे अधिकारी यांना ज्यूरर नेमण्यांत येत नाहीं. ज्यूरर नेमलेला मनुष्य हजर झाला नाहीं तर त्याला २० ते ४० शिलिंगांपर्यंत दंड होतो. ज्यूरीची निवड चिठ्या टाकून (बॅलटनें) करतात. खटला चालू असतांना ज्यूरींतील सर्व इसमांना कोर्टांत सतत हजर राहावें लागतें आणि पुरावा घेण्याचें काम पुरें झाल्यावर न्यायाधीश ज्यूरीला कायद्याचे मुद्दे आणि झालेला पुरावा नीट समजावून सांगतो. नंतर एका निराळ्या खोलींत बसून गुप्तपणें विचार करून ज्यूरी आपला निर्णय ठरविते आणि नंतर भरकोर्टांत परत येऊन ज्यूरीमधील पुढारी (फोरमन) आपला निर्णय न्यायाधिशाला सांगतो.

कॉरोनरची ज्यूरी एखादा आकस्मिक किंवा अत्याचारानें मृत्यु झाला असल्यास त्याची तावडतोब पूर्वचौकशी करण्याकरितां बोलावतात.

हिंदुस्थान—क्रिमिनल प्रोसीजर कोडमध्यें असा कायदा आहे कीं, हायकोर्टांत सर्व फौजदारी खटल्याची चौकशी ज्यूरी-पद्धतीनें झाली पाहिजे (कलम २६७). सेशनकोर्टांत फौजदारी खटल्यांची चौकशी ज्यूरीपद्धतीनें किंवा असेसरांच्या मदतीनें झाली पाहिजे (कलम २६८). कोणत्या गुन्ह्यांची चौकशी कोणत्या सेशन कोर्टानें ज्यूरीपद्धतीनें करावी, त्याबद्दल प्रांतिक सरकारनें हुकूम सरकारी गॅझेटमध्यें प्रसिद्ध करावा (क. २६९). ज्यूरीपद्धतीच्या हायकोर्टांतील खटल्यांत नऊ इसम ज्यूरर असावे. ते चिठ्या टाकून निवडावे, नंतर ज्यूररबद्दल आरोपीचा किंवा सरकारी प्रॉसीक्यूटरचा आक्षेप असेल तर तो ज्यूरर रद्द करून दुसरा ज्यूरर– कोर्टाला आक्षेप योग्य वाटल्यास– नेमावा (कलमें २७४ ते २७९). असेसरांच्या मदतीनें चालणाऱ्या खटल्यांत कोर्टानें तीन किंवा चार इसम असेसर नेमावे (कलम २८४). ज्यूरर किंवा असेसर नेमल्यावर खटल्याच्या चौकशीचें काम चालू होऊन पुरावा फिर्यादी-आरोपीचा घेतल्यावर आणि फिर्यादी-आरोपीच्या वकिलांची स्वपक्षसमर्थक भाषणें (अर्ग्युमेंट) झाल्यावर कोर्टानें ज्यूरीला खटल्यांतील दोन्ही पक्षांचा पुरावा समजावून सांगावा आणि लागू असलेल्या कायद्याच्या कलमांची माहिती द्यावी. नंतर ज्यूरीनें पुराव्याचा विचार करून आरोपी दोषी आहे किंवा नाहीं याबद्दलचें आपलें मत ज्यूरीच्या फोरमनकडून काटात जाहीर सांगावें (२९७ ते ३०४). ज्यूरीचें एकमत असेल, किंवा किमान सहा ज्यूररांचें एकमत असेल आणि हायकोर्ट जज्जाचें मत तसेंच असेल तर त्याप्रमाणें निकाल करावा. सहा-पेक्षां कमी ज्यूररांचें एकमत असेल तर ती ज्यूरी रद्द करून पुन्हां खटला चालवण्याचा हुकूम करावा (कलम ३०८). असेसरांच्या मदतीनें सेशनकोर्टांत खटला चालला म्हणजे जज्जानें प्रत्येक असेसराचें मत विचारून तें लिहून ठेवावें. नंतर स्वतःला वाटेल तसा निकाल द्यावा. असेसराचें मत बंधनकारक मानूं नये (कलम ३०९). ज्यूरीच्या खटल्यांत सेशन जज्जाला ज्यूरीचें मत अमान्य असलें तर तो खटला हायकोर्टाकडे सेशन-जज्जानें पाठवावा (कलम ३०७).

**'पंच'**—एक ब्रिटिश नियतकालिक. या नांवाचें चित्रमय साप्ताहिक प्रथम १८४१ सालीं सुरू झालें. मार्क लेमन हा संपादक आरंभापासून १८७० पर्यंत होता. नंतर त्याच्या जागीं शर्ले ब्रूक्स, नंतर १८७४ सालीं टॉम टेलर, १८८० सालीं सर फ्रान्सिस बर्नेड, व १९०६ सालीं सर ओवेन सीमन, याप्रमाणें संपादक झाले. या साप्ताहिकाच्या लेखकवर्गांत डगलस जेरॉल्ड,

थॅकरे, गिल्बर्ट बेकेट, हूड, टेनिसन, सर हेन्री लकी, अॅन्स्टी गुथरे, आणि ए. व्ही. ल्यूकस हे होते. या पत्राचे प्रसिद्ध चित्रकार जॉन लीच, रिचर्ड डॉइल, हॅब्लॉट के. ब्राऊन, टेनील, चार्लस कीन, जॉर्ज दि मोरीअर, लिनले सॅमबोर्न, सर बर्नार्ड पार्ट्रीज, एल्. रॅव्हेन्-हिल आणि जॉर्ज बेल्चर हे होऊन गेले. हें विनोदी पत्र आहे. सामाजिक आणि राजकीय गोष्टींचा उपहास, व साहित्य आणि नाट्य यांवर टीका असें याचें धोरण असतें.

**पंचगव्य**— गोमय, गोमूत्र, गोदुग्ध, गोघृत व गोदधि या पाच गायीपासून उत्पन्न होणाऱ्या पदार्थांच्या सांस्कारिक मिश्रणाला म्हणतात. धार्मिक विधीला आरंभ करण्यापूर्वी शरीरशुद्धीसाठीं हें तीन पळया घेतात. पंचगव्यांत औषधी गुणधर्म असल्याचें सांगतात.

**पंचजन**—ह्या शब्दानें कोणते लोक दर्शित होतात ह्याबद्दल प्राच्य व पाश्चात्य विद्वानांत फारच मतभेद आहेत. पंचमानुष, पंचमानव, इत्यादि पर्याय शब्दांनींहि वैदिक वाङ्मयांत यांचा उल्लेख आलेला आहे. गंधर्व, पितर, देव, असुर व राक्षस यांस कांहींनीं पंचजन म्हटलें आहे. परंतु ऋग्वेदांत उल्लेख आलेले (१) अनु, (२) तुर्वश, (३) द्रुह्यु, (४) पुरु, व (५) यदु हेच खरे पंचजन होत व यांचाच देव इंद्र आहे, हें मत जास्त सयुक्तिक धरलें गेलें आहे.

**पंचद्राविड**—हिंदुस्थानांतील ब्राह्मणांचे पंचगौड आणि पंचद्राविड असे दोन भेद पडतात. पंचगौडांत कान्यकुब्ज, सारस्वत, मैथिल, मागध व गौड, तर पंचद्राविडांत (१) तैलंग, द्राविड, कर्नाटकी, महाराष्ट्रीय व कोंकणी, किंवा (२) तैलंग, द्राविड, महाराष्ट्रीय, कर्नाटकी व गुर्जर हे ब्राह्मण येतात. पंचद्राविडांत व पंचगौडांत एकमेकांत किंवा पोटजातींत परस्परांत पूर्वी रोटीबेटी व्यवहारहि होत नसत; पण अलीकडे पोटजातींत तरी ते होऊं लागले आहेत.

**पचन**—प्राणी जे पदार्थ खातो त्या पदार्थांतील शरीरास पोषक अशीं द्रव्यें वेगळीं काढून त्यांचें रक्तांत रूपांतर करणें, आणि शरीरपोषणास निरुपयोगी द्रव्यें वेगळीं काढून तीं बाहेर टाकणें, या क्रियेस पचनक्रिया म्हणतात. ही क्रिया करणाऱ्या इंद्रियांस पचनेंद्रियें म्हणतात. यांमध्यें मुख्यतः जठर, लघ्वंत्र आणि बृहदंत्र, तसेंच यकृत आणि पित्ताशय, इत्यादि अवयव येतात. जेव्हां खाद्य पदार्थ नीट चावला जाऊन व लाळेशीं मिश्रित होऊन जठरांत जातो तेव्हां त्याचें एका पाचक रसाशीं पूर्णपणें मिश्रण होतें. ही क्रिया जठराच्या हालचालीनें घडून येते. या हालचालीनें खाल्लेल्या पदार्थाचें अगदीं बारीक बारीक कणांत विभजन होतें आणि त्यांत पाचक रस मिसळला जातो व त्याचा एक नरम गोळा अथवा द्रव बनतो. खाल्लेल्या अन्नांत जो मलक-

**अन्नमार्गाचें रेखाचित्र**

(यकृताचा खालचा भाग दाखविण्यासाठीं तें वर केलें आहे).

१ अन्ननलिका. २ जठराचें आमाशयमुख. ३ जठर. ४ अर्श. ५ पित्तधरा (ड्युडेनम). ६ मध्यांत्राचा प्रारंभ. ७ लघ्वंत्र. ८ ग्रहणीबंध (लघ्वंत्र आणि बृहदंत्र यांच्या सांध्याच्या ठिकाणीं). ९ आरोही स्थूलांत्र. १० बद्ध-स्थूलांत्र. ११ आंत्रपुच्छ. १२ तिर्यक् स्थूलांत्र. १३ अंत्र-पट्टक्रमि. १४ अवरोही स्थूलांत्र. १५ जघनीया स्थूलांत्र. १६ कटिर स्थूलांत्र. १७ गुदनलिका. १८ यकृताची दक्षिण पाली. १९ यकृताची वाम पाली. २० पित्ताशय. २१ पित्ताशयवाहिनी. २२ यकृत-नलिका. २३ सामान्य पित्तनलिका. २४ स्वादुपिंडवाहिनी. २५ स्वादुपिंड. २६ प्लीहा.

मय भाग असतो त्यावर पाचक रसाची क्रिया घडून त्याचें पक्व अन्नांत रूपांतर होतें. हें पक्व अन्न इंद्रियांतील अंतस्त्वचेंतून आरपार जाऊन रक्तात मिसळूं शकतें. ही क्रिया जठरांतील उष्णतेमुळें घडून येते. हा पक्व अन्नाचा रस जठरांतून (पायलोरिस-मधून) लघ्वंत्रामध्यें जातो. तेथें त्याचें पाचकरस, पित्तरस आणि आंत्ररस यांबरोबर मिश्रण होतें. पाचकरसाच्या योगानें सत्त्वमय अन्नाचें साखरेंत रूपांतर होतें. बलकमय अन्नाचें अन्नरसामध्यें व चरबीमध्यें रूपांतर होतें. या अवस्थेंत हें अन्न शरीरास शोषून घेण्यास योग्य अशा स्थितींत असतें. ही क्रिया शरीराच्या आंतड्यांत असणाऱ्या रसापासून घडून येते. पित्त-रसाचें चरबीवर कार्य होतें, आणि त्यानंतर ती चरबी सूक्ष्म वाहिन्यांच्या योगानें शरीरशोषण करून घेतें. शरीरपोषणाच्या कामीं निरुपयोगी असलेला भाग पुढें जातो व तो मलरूपानें बाहेर पडतो.

**पंचम**—हा राग मारवा थाटांतील जन्य रागांपैकीं एक आहे. ह्याचे आरोहावरोह सात स्वरांचे असल्यामुळें ह्याची जाति संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा चौथा प्रहर मानितात. ह्यांत दोन्ही मध्यमांचा प्रयोग होतो. हा राग ललित रागाच्या अंगानें गातात. ह्या रागांत पंचम स्वर वर्ज्य करून सोहनी रागाच्या अंगानें हा

गाण्याचा परिपाठ आहे. तिसरा एक प्रकार ह्या रागाचा असा आहे कीं, त्यांत ऋषभ व पंचम हे दोन्ही स्वर वर्ज्य करतात.

**पंचमढी**—मध्यप्रांत, हुशंगाबाद जिल्हा, एक थंड हवेचें ठिकाण. उन्हाळयांत मध्यप्रांत सरकारचें वास्तव्य येथें असतें. सातपुड्याच्या पर्वतराजींत महादेव डोंगरावर हें वसलें आहे. जी. आय्. पी. रेल्वेच्या पिपारिया स्टेशनवर उतरून येथें जातात. समुद्रसपाटीपासून ४,५०० फूट उंच. मे महिन्यांत उष्णतामान ८५°, पाऊस ७७ इंच पडतो. तीन शिखरें आहेत. त्यांत महादेव हें यात्रेचें एक ठिकाण आहे. येथें म्युनिसिपालिटी व लष्करी छावणी आहे. गोल्फ खेळण्याचें हें एक प्रसिद्ध स्थान आहे.

**पंचमहाल**—मुंबई इलाखा, उत्तर विभाग, एक जिल्हा. भडोच आणि पंचमहाल यांचें एकत्रच क्षेत्रफळ व लोकसंख्या अलीकडे खानेसुमारींत देण्यांत येतात. त्याप्रमाणें क्षेत्रफळ ३,१९८ चौरस मैल. गांवें ६६० ; पैकीं ३ शहरें महत्त्वाचीं. लोकसंख्या ( १९४१ ) ९,२४,५२७. पैकीं शेंकडा ८० लोक हिंदू आहेत. भाषा गुजराथी. मूळचे रहिवासी भिल्ल व नायकडे हालोल जंगलांत राहत. शेकडा ७१ शेतकीवर उपजीविका करतात. व्यापार सर्व वोहरी लोकांच्या व वनियाच्या हातीं आहे. या भागाचा इतिहास म्हणजे चंपानेरचाच इतिहास म्हणतां येईल. १८६१ मध्यें हा जिल्हा शिंद्यांकडून झांशीजवळील विभागाच्या मोबदल्यांत इंग्रजांनीं घेतला. १८७७ पासून स्वतंत्र कलेक्टर नेमला गेला. मका, चणा, गहूं, बाजरी, तांदूळ, तीळ, तूर, एरंडी, कापूस, वगैरे पिकें जिल्ह्याच्या निरनिराळया भागांत निघतात. मोहाच्या फुलांचा जंगी खप होतो. जंगलाखालीं बरीच जमीन असून इमारती व जळाऊ लांकूड बाहेर प्रांतींहि जातें. तुवा (गोध्र्याच्या पश्चिमेस १० मैल ) येथें उन्हाळीं आहेत. पावागड डोंगरावर एक जुना पडका किल्ला आहे. पंचमहालांतील मुख्य शहर गोध्रा आहे.

**पंचवक्त्र**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें पारागंधक कज्जली, टाकणखार लाही, पिंपळी, मिरें व बचनाग हीं असून आल्याच्या रसांत खल करतात. सन्निपात ज्वरावर हें औषध चांगलें आहे. बडबड, डोळे ताठ होणें, हातपाय आपटणें, शुद्धीवर नसणें, तापांत उठून पळून जाण्याचा प्रयत्न करणें, चक्कर येणें, सगळें अंग ठणकणें, छातींत घरघर आवाज होणें, इत्यादि लक्षणांवर हें औषध देतात. छातींतून वेदना होणें, बरगड्यांतून चमका निघणें, इत्यादि लक्षणांवरहि याचा उपयोग होतो. ।· ते १ गुंज आल्याचा रस, मध, किंवा गरम पाणी यांबरोबर घेतात.

**पंचांगें**— सांप्रत बहुतेक प्रांतांतील चालू पंचांगें पाहिलीं तर सामान्यतः असें दिसून येईल कीं, सर्व प्रांतांत एकाच पद्धतीचीं पंचांगें चालतात. त्यांत तिथी, नक्षत्र, योग, करण यांचीं घटिपळें, संक्रमणकाल व स्पष्टग्रह यांत थोडाबहुत फरक पडतो ; तो निरनिराळया प्रांतांतील पंचांगें सौर, ब्राह्म व आर्य या तीन पक्षांच्या निरानिराळया ग्रंथांस अनुसरून करतात यामुळें आहे. सांप्रत मुंबई व पुणें येथें मराठी लिपीचीं जीं पंचांगें छापतात तीं सर्व ग्रहलाघव व लघुचिंतामणि यांजवरून केलीं असून त्यांमध्यें पलभा ४ आणि देशांतर पश्चिम ४० धरलेलें असतें. बरींच वर्षे बहुतेक सर्व छापखान्यांत छापलेल्या पंचांगांचें गणित वसई येथील मोघे घराण्यांतील जोशी मंडळी वंशपरंपरेनें करीत असतात. वस्तुतः हीं सर्व ग्रहलाघवी पंचांगें अगदीं एकच असून सबंध महाराष्ट्र व महाराष्ट्र भाषा बोलणारे वऱ्हाड, नागपूर, इत्यादि प्रांत, बडोदें, इंदूर, ग्वाल्हेर, इत्यादि मराठी संस्थानें, हैद्राबाद संस्थानचा कांहीं भाग, काठेवाड प्रांत, बेळगांव, धारवाड, विजापूर, कारवार, इत्यादि सरहद्दीवरचे कानडी व तेलंगी मुलूख यांत चालतात. पूर्वी मोठमोठ्या गांवांतून जोशी पंचांग करीत असत. चंडू पंचांग म्हणून मारवाडी लोकांत एक पंचांग चालतें. तें जोधपूरची पलभा आणि देशांतर हीं धरून केलेलें असून त्यांत रवि आणि त्याच्या संक्रांती ब्राह्म पक्षाच्या असतात. परंतु अहर्गण करणकुतूहल ग्रंथावरून दिलेला असतो. काशी, ग्वाल्हेर, इत्यादि उत्तरेकडील प्रांतांत मकरंद ग्रंथाचें प्राबल्य असल्यामुळें त्यावरून केलेलें पंचांग त्या प्रांतांतील लोकांत चालतें.

मद्रासच्या उत्तरेकडील तेलंगण प्रांतांत तेलंगी लिपींत छापलेलें सिद्धांत पंचांग चालत असून त्यांतील रविसंक्रमणकाल सूर्यसिद्धांतावरून घेतलेले दिसतात. परंतु बाकीचे ग्रह ग्रहलाघवी किंवा मकरंद पंचांगांतल्याशीं मिळत नाहींत.

मल्याळी आणि तामिळ भाषा चालणाऱ्या मद्रास इलाख्यातील प्रांतांत आर्यपक्षच चालतो.

काश्मीर प्रांतांत पुष्कळ काल, म्हणजे सुमारें शके १५८० पर्यंत पंचांगें खंडखाद्य ग्रंथानुसार करीत असत व सांप्रतहि करीत असतील. मात्र खंडखाद्य ग्रंथावर अनेक प्रकारचे बीजसंस्कार दिले गेले आहेत. एकंदरींत पाहतां सांप्रत ग्रहलाघव व तिथिचिंतामणि ह्या ग्रंथांचा प्रसार सर्वांत जास्त असून त्याच्याखालोखाल मकरंदाचा आहे. या तीनहि ग्रंथांतलें वर्षमान सांप्रतच्या सूर्यसिद्धांताचें असून बंगाल व तेलंगण प्रांतांत हेंच वर्षमान आहे. मारवाडांत ब्राह्मपक्ष चालत असून द्राविड आणि मलबार प्रांतांत आर्यपक्षाचीं पंचांगें चालतात. सांप्रत चालू असणारीं सर्व निरयन पंचांगें दृक्प्रत्ययास येत नाहींत. म्हणून ज्यांतील गणित दृक्प्रत्ययास येईल अशीं कांहीं सूक्ष्म नवीन पंचांगें निघालीं आहेत. ( केरोपंती पंचांग पाहा. )

पंचाग-सुधारणेस महाराष्ट्रांत शके १८२६ पासून सामुदायिक रीतीनें ज्योतिषसंमेलनांतून आरंभ झाला; व नवीन करणग्रंथ तयार होऊन त्याप्रमाणें टिळक पंचांगासारखीं शुद्ध पंचांगें निघूं लागलीं. पाश्चात्य पद्धतीचें पंचांग म्हणजे अल्मानॅक (पाहा) होय.

आपल्याकडील पंचांगांत तिथि, वार, नक्षत्र, योग आणि करण अशा पाच गोष्टी दिलेल्या असतात म्हणून त्यास पंचांग म्हणतात.

आपल्या मराठी पंचांगांत काय दिलेलें असतें हें समजून घेणें आवश्यक आहे. पंचांगाच्या पत्रात प्रथम तिथीचें कोष्टक देतात. नंतर वारकोष्टक लिहून त्या तिथीच्या घटका व पळें दिलेलीं असतात. नंतर योग मांडून योगाचीं घटि–पळें देतात. नंतर करण देऊन त्यांचीं घटि–पळें दिलेलीं असतात. नंतर रोजचें दिनमान दिलेलें असतें. नंतर पारशी तारीख, मुसलमानी तारीख आणि इंग्रजी तारीख देतात. नंतर रवीचा उदय किती वाजतां होईल हें दिलेलें असतें, व पुढें रवीचा अस्त किती वाजतां होईल हें दिलेलें असतें; व पुढच्या कोष्टकांत चंद्र कोणत्या राशींत त्या दिवशीं आहे हें दिलेलें असतें. पुढच्या कोष्टकांत शास्त्रार्थ देतात, व खालच्या बाजूस रव्यादि-स्पष्ट ग्रह पौर्णिमेच्या दिवशीं सूर्योदयीं कोणत्या राशींत आहेत. हें दिलेलें असतें. शुक्ल पक्ष असल्यास पौर्णिमा तिथीच्या सूर्योदयाचे स्पष्ट ग्रह असतात. आणि कृष्णपक्ष असल्यास अमावास्येच्या सूर्योदयाचे स्पष्ट ग्रह दिलेले असतात. ग्रहांच्या कोष्टकांत ४ अंक दिलेले असतात त्यांपैकीं पहिला अंक, ग्रहाच्या दुसऱ्या राशी जितक्या झाल्या असतील तत्तुल्य असतो; दुसरा अंक, वर्तमान राशीपैकीं किती अंश पुरे झाले आहेत त्याचा द्योतक असतो. तिसरा व चौथा अंक हे क्रमानें पुऱ्या झालेल्या कला व विकला यांचे द्योतक असतात. असेंच बाकीच्या ग्रहांविषयीं समजावें. ग्रहांच्याखालीं त्यांच्या रोजच्या गतीच्या कला व विकला देतात. तशीच एक कुंडली (कोणता ग्रह कोणत्या राशींत आहे हें पाहण्याचा नकाशा) देतात. त्यावरून कोणताहि ग्रह कोणत्या राशींत आहे, हें समजतें. हा क्रांतिवृत्तांतील १२ राशींचा नकाशा आहे, व त्यांतील जो राशि क्षितिजाला त्या वेळीं संलग्न असेल तो कुंडलीच्या मध्यें मांडून पुढें अपसव्य क्रमानें बाकीच्या राशींचे अंक मांडलेले असतात. व त्या वेळीं ग्रह ज्या ज्या राशींत असतील तसे त्या त्या ठिकाणीं लिहितात.

**पंचामृतपर्पटी**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधक कज्जली, लोहभस्म, अभ्रकभस्म, ताम्रभस्म हीं मुख्य औषधें असतात. जुनाट अतिसार, संग्रहणी, पोटांत दुखणें, पोट फुगणें, अतिशय अशक्तपणा असणें, घसा सुजणें, इत्यादि अनेक विकारांवर हें औषध रामबाण आहे. संग्रहणीवर हें प्रमुख औषध आहे. ·।।· ते १ गुंज दूधसाखर, मध, लोणी, किंवा आर्द्रकावलेह यांबरोबर देतात.

**पंजाब**—हिंदुस्थानांतील अगदीं उत्तरेकडचा प्रांत. १९४७ सालीं याची फाळणी होण्यापूर्वी क्षेत्रफळ ९९,०८९ चौ. मैल व लो. सं. (१९४१) २,८४,१८,८१९ होती. झेलम, चिनाब, रावी, सतलज, व बिआस या पांच नद्यांचा मुलूख म्हणून पंजाब हें नांव पडलें. शिवाय सिंधु व यमुना यांतून वाहतात. फिरोझ तुघ्लख यानें या नद्यांपासून प्रथम कालवे काढून हा प्रांत सुपीक बनवला. नंतर ब्रिटिश अमदानींत इतर अनेक कालवे झाले. फार प्राचीन काळीं आर्यांची वसाहत प्रथम या प्रांतांत झाली. ऋग्वेदाचा कांहीं भाग येथें तयार झाला असावा. कुरुक्षेत्र (ठाणेश्वराजवळ) ही कौरव–पांडवांच्या भारतीय युद्धाची भूमि. नंद, मौर्य, ग्रीक, शक, रजपूत, मुसलमान, इंग्रज, वगैरे लोकांच्या ताब्यांत हा प्रांत क्रमाक्रमानें येत गेला. बाबा नानक यानें स्थापन केलेला शीख धर्म याच प्रांतांतला. मुसलमानी छळामुळें शीखांचा धर्म वीरधर्म झाला व स्वतंत्र शीखराज्य स्थापन झालें. परंतु याच शीखांचा १८५७ च्या शीखेतरांच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांत तो हाणून पाडण्यास इंग्रजांनीं उपयोग करून घेतला. १९०१ मध्यें पंजाबमधूनच वायव्य-सरहद्द प्रांत निर्माण करण्यांत आला व १९११ सालीं दिल्ली प्रांत स्वतंत्र बनविला. पंजाबांतील पुराणवस्तूंचे अवशेष सांपडावे तेवढे सांपडत नाहींत; कारण नद्यांचे पूर व मुसलमानांचे उत्पात यांनीं सर्व वाताहत करून टाकली. या प्रांतांत आर्यसमाजाचा विस्तार व कार्य हीं मोठींच झालीं आहेत. अंबाला, जालंदर, लाहोर, मुलतान व रावळपिंडी असे पांच विभाग या प्रांतांत पाडले गेले आहेत. हिंदु-मुसलमान निम्मे निम्मे आहेत.

या प्रदेशाची हवा अगदीं कोरडी आहे; पण येथें अतिशय उन्हाळा व अतिशय थंडी आहे. पाऊस फारच कमी पडतो. मुख्य पीक गव्हाचें आहे. गव्हाखेरीज कापूस, बार्ली, तंबाकू, ऊंस, वगैरे होतात. हिंदुस्थान सरकारनें हा प्रांत पाटबंधाऱ्यांमुळें फार सुपीक करून सोडला. गहूं इतका पिकतो कीं, जगांतील गव्हाच्या उत्पादनांत पंजाबचा अनुक्रम बराच वर लागतो. तसेंच खाणींतील मिठाविषयीं पंजाब प्रसिद्ध आहे. मोठमोठे रस्ते प्रांतांतून सर्वत्र गेले आहेत. आगगाडीचे फाटे ७,००० मैलांवर भरतील. नौकानयनाला योग्य असे १५० मैलांवर कालवे आहेत. लोक शेतकीच्या व्यवसायांत असून फार सुखी आहेत. इतर सर्व प्रांतांतल्यापेक्षा पंजाबी माणूस उंच व धिप्पाड आढळेल. सैन्यांत बरीच भरती या लोकांचीच आहे. इस्लामी धर्माचे लोक एकंदर लोकसंख्येंत शेंकडा ५७ भरत होते. शीख लोक सु. शें. १२ व हिंदू २६ होते, पण १९४७ च्या फाळणी-

नंतर पश्चिम पंजाब केवळ मुसलमानांचा झाला. आतां पूर्व पंजाबांत बहुतेक हिंदू आहेत. पंजाबांत पंजाबी, हिंदी, पुश्तु व ऊर्दू या चार भाषा मुख्य आहेत. मुख्य शहरें लाहोर, अमृतसर, मुलतान व रावळपिंडी हीं जुन्यां पंजाबांत होतीं. पूर्व पंजाब व पाकिस्तान पाहा.

**पज्जुसन**— जैनांचा एक धार्मिक उत्सव. मूळ संस्कृत शब्द पर्युषण (= उपासना) असा आहे. श्रावण महिन्याच्या कृष्णपक्षांतील द्वादशीपासून किंवा त्रयोदशीपासून ते भाद्रपद शुद्ध पंचमीपर्यंत किंवा नवमीपर्यंत हा आठ दिवसांचा उत्सव असतो. या वेळीं जैन लोक उपवास करतात. शेवटचा दिवस 'संवत्सरी' असून या दिवशीं तरी सर्व जैन कडकडीत उपोषण करतात. पज्जुसनाच्या चौथ्या दिवशीं महावीरजयंती पाळतात.

**पटई**—घरांतील मजल्याची पटई लांकडाच्या आडव्या कड्या टाकून, किंवा लोखंडाच्या कड्या टाकून, नाहीं तर, लोहगर्भ (कॉंक्रीट) संधानक किंवा पोकळ विटा व लोखंडी कड्या यांची करतात. कांहीं ठिकाणीं लोखंडी कड्या घालून त्यांत शहाबादी फरशी व वर रोडे चुना व पुन्हां फरशी घालून करतात. या ज्या कड्या घालावयाच्या त्या सामान्यतः घरामध्यें वगैरे दरचौरस फुटास ७० पौंड सहन करतील अशा व वाचनालयासारख्या सार्वजनिक ठिकाणीं २०० पौंड भार सहन करतील अशा घालण्यात येतात. ज्या कड्यांवर दुसऱ्या कड्या टेंकावयाच्या असतात त्या इतरांपेक्षां एक इंच अधिक रुंद व जाड घालण्यांत येतात व अशा कड्यांवरहि सहापेक्षां अधिक कड्या टेंकतां कामा नये. पटईच्या फळया श्वेत समुद्रांतील (व्हाइट सी पोर्ट) बंदरांतून पहिल्या प्रतीच्या व कानडा व बाल्टिक बंदरांतील दुसऱ्या प्रतीच्या असतात. भुसा, सिमेंट यांच्या मिश्रणापासूनहि बिनसांध्याची पटई करतात.

**पटकी**—(कॉलरा). महामारी—विषूचिका. हिंदुस्थान आणि उष्ण कटिबंध प्रदेश यांतच हा रोग फारकरून होतो. युरोपांत फार क्वचित्. इंग्लंडांत गेल्या ७५ वर्षांत हा रोग नाहीं. हा रोग स्वल्पविरामाच्या आकाराच्या एका जंतूपासून उत्पन्न होतो, ही गोष्ट प्रथम १८८४ मध्यें कॉच यानें निदर्शनास आणली. हा रोग फार संसर्गजन्य नाहीं. परंतु रोग्याच्या वस्त्रांशीं वगैरे ज्यांचा संपर्क येतो त्यांस हा रोग होण्याचा संभव असतो. रोगाचा संसर्ग बहुधा पाणी, दूध, किंवा दूषित पाण्यामध्यें धुतलेल्या भाज्या वगैरेंपासून होतो. ज्या मानानें पाणी दूषित झालें असेल त्या मानानें रोगाची सांथ तीव्र अगर सौम्य असते. कांहीं लोकांच्या शरीरांत या रोगाचे जंतू असतात व त्यांपासून या रोगाचा विशेषतः त्यांचा अन्न तयार करण्याशीं संबंध असल्यास विशेष प्रसार होतो. केवळ वातावरणांतून या रोगाचा संसर्ग वाढत नाहीं. या रोगाच्या तीन अवस्था असतात: १ प्राथमिक– या अवस्थेंत पोटांत कळ येऊन व हातपाय वळावयास लागून मनुष्यास रेच होतात; डोकें दुखूं लागतें, ग्लानि येते, आणि बहुधा ओकाऱ्या होऊं लागतात. २ शक्तिपातीय– या अवस्थेंत जुलाब जास्तच होऊं लागतात, फार तहान लागते व अतिशय क्षीणता वाटते. याच अवस्थेंत बहुधा रोगी मूर्च्छित होऊन मरणहि पावतो. ३ प्रतिकारावस्था—जर रोगी जगला तर फार लवकर बरा होतो. पण या वेळीं (निमोनिया), फुप्फुसावरणदाह (प्लूरिसी), मूत्रकृच्छ (नेफ्रिटिस) हे रोग मुख्यतः होण्याचा फार संभव असतो. पटकी रोगाचीं चिन्हें तात्काळ उद्भवून त्यांचा परिणामहि तितकाच तात्काळ होतो. शें. ५० ते ८० रोगी सांथींत दगावतात.

लहान मुलांची पटकी–(कॉलिरा इन्फंटिअम). हा मुलांमधील जठरांत्रदाह(गॅस्ट्रो–एन्टेरिटिस)चा एक तीव्र प्रकार आहे. या रोगाचीं लक्षणें बहुधा सामान्य पटकीसारखींच असतात; पण फार शक्तिपात होऊन मृत्यूचें प्रमाण वाढतें.

'कॉलिरा सिक्का'—हा एक तीव्र स्वरूपाच्या पटकीचा प्रकार आहे. यांत रोगी थोड्याच तासांत दगावतो.

कॉलऱ्याच्या सांथींत लस टोंचतात ती रोगनिवारक असते. शक्तिपात होत असल्यास ईथर किंवा स्ट्रिक्नाइन देतात. त्यानें ऊब येऊन हुषारी वाटते. सॅलिनद्रव नीलामार्गांत (इन्ट्राव्हीनस) टोंचतात. यानेंहि चांगला गुण वाटतो. वेदना कमी होण्यासाठीं पोट शेकतात व अफूचें सत्त्व (मॉर्फिआ) टोंचतात.

**पटदीपिकी**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सात स्वरांनीं होतो; म्हणून याची जाति औडुव–संपूर्ण आहे. तथापि अवरोहांत ऋषभ स्वर कमजोर ठेवण्यांत येतो. वादी स्वर षड्ज आणि संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाचा तिसरा प्रहर मानितात. हा राग भीमपलाशी रागाशीं बराच मिळता येतो. कारण, दोन्ही रागांचे आरोहावरोह सारखे आहेत; तथापि वादी स्वर भिन्न असल्यानें रागभेद स्पष्ट होतो. धनाश्री रागाच्याहि हा राग जवळ येतो. पण धनाश्रीचा वादी स्वर पंचम असून व अवरोहांत ऋषभ स्वर कमजोर नाहीं. यावरून दोहोंमधील भेद स्पष्ट भासतो. या रागांत दोन्ही गांधारांचा प्रयोग दृष्टीस पडतो. हंसकंकणी या रागांत मध्यम स्वर सुटा ठेविल्यानें तो या रागापासून बचावला जातो.

**पटमंजिरी**—पहिला प्रकार. हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होत असल्यामुळें याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. यांत

बिलावल रागाची छाया बरीच दृष्टीस पडते. मंद्र व मध्यम सप्तकांत हा राग खुलतो. होतां होईल तों या रागांत तार सप्तकांत कमी प्रमाणांत जाणें इष्ट आहे. विलंबित लयीनें या रागास विशेष खुलावट येते. संयुक्त प्रांतांत या रागास 'बंगाल' असें म्हणण्याचा प्रघात आहे.

दुसरा प्रकार—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सात स्वरांनीं होतात, म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय दिवसाच्या तिसऱ्या प्रहराचा आरंभ मानितात. याच्या आरोहांत गांधार व धैवत हे स्वर दुर्बल आहेत म्हणून याचें स्वरूप सारंगासारखें भासतें. परंतु सारंगांत हेच स्वर अजीबात वर्ज्य असल्यानें दोहोंमधील भेद स्पष्ट होतो. कोणी या रागांत दोन्ही गांधारांचा प्रयोग सुचवितात.

**पटवर्धन, अच्युत सीताराम** (१९०५– )—कॉँग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचे एक पुढारी व धाडसी कार्यकर्ते. नगरचे एक सुप्रसिद्ध वकील हरि केशव पटवर्धन यांचे हे चिरंजीव. हे दत्तक गेले असल्यामुळें अच्युत हरीचें अच्युत सीताराम झालें. यांचें बनारसच्या सेंट्रल हिंदु कॉलेजांत शिक्षण झालें. हे एम्. ए. झाल्यावर युरोपला गेले व आल्यावर आर्थिक शास्त्राचे प्राध्यापक झाले. १९३२ पासून म्हणजे महात्मा गांधींच्या कायदेभंगाच्या चळवळीपासून यांनीं कॉँग्रेसच्या चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली. यासाठीं यांना अनेक वेळां तुरुंगवास घडला. पुढें कॉँग्रेस सोशॅलिस्ट पक्षांत यांनीं प्रवेश केला. १९४२ सालीं तारीख ८ ऑगस्टच्या 'चले जाव' चळवळींत आचार्य नरेंद्रदेव, भाई जयप्रकाश नारायण, अरुणा असफअली यांनीं जी भूमिगतांची चळवळ हातीं घेतली तिचे एक धाडसी सूत्रधार म्हणून यांची कामगिरी बहुमोल अशी झालेली आहे. कॉँग्रेस सोशॅलिस्ट पक्षाला मजबुती आणण्यासाठीं ज्यांनीं आपले श्रम खर्ची घातले त्यांपैकीं हे एक प्रमुख होत.

**पटवर्धन, पांडुरंग नरसिंह** (मृ. १९२१)—एक इतिहाससंशोधक. यांचे वडील हेडमास्तर होते. स्कूल फायनल होऊन यांनींहि सरकारी नोकरी धरली होती. पण मानी स्वभावामुळें त्यांना ती सोडावी लागली. इतिहाससंशोधनाच्या आवडीनें यांनीं त्याला वाहून घेतलें. त्यांनीं जमा केलेलें संशोधन–साहित्य भारत इतिहास संशोधक मंडळ (पुणें) यांत ठेविलें आहे. कांहीं दिवस 'राष्ट्रहितैषी' वर्तमानपत्राचे हे संपादक होते. साधी राहणी, तीव्र बुद्धि, करारीपणा आणि चिकाटी या गुणांचे ते प्रतीक होते.

**पटवर्धन, माधव त्रिंबक** (१८९४–१९३९)—एक महाराष्ट्रीय विद्वान् व कवि. १९१८ सालीं मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमधून फारसी भाषा घेऊन यांनीं एम्. ए. ची परीक्षा दिली व हे डेक्कन एज्युकेशन सोसायटीमध्यें फारसीचे प्राध्यापक झाले. परंतु थोड्याच अवधींत यांनीं तेथील आपल्या जागेचा राजीनामा दिला व १९२८ सालीं हे कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्यें फारसी व इंग्रजी भाषांचे प्राध्यापक झाले. या जागीं ते अखेरपर्यंत राहिले. यांनीं फारसी वळणाची बरीच काव्यरचना मराठींत केली.

प्रथम जरी यांच्या काव्यावर फारसी भाषेचा पगडा विशेष प्रामुख्यानें बसलेला होता तरी थोड्क्याच अवधींत यांच्या विचारसरणींत बदल होऊन हे भाषाशुद्धीचे कट्टे पुरस्कर्ते बनले. नवीन पद्धतीचा 'छन्दोरचना' हा छंदःशास्त्रावरचा ग्रंथ लिहून मराठी वाङ्मयांत यांनीं मानाचें स्थान मिळविलें आहे. १९३९ सालीं मुंबई युनिव्हर्सिटीनें यांच्या या ग्रंथाबद्दल यांना 'डॉक्टर ऑफ लिटरेचर' ही पदवी देऊन यांचा यथायोग्य गौरव केला. १९३६ सालीं जळगांवीं भरलेल्या मराठी साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदावर यांची निवड झाली होती.

यांचे शलाका, विरहतरंग, उमरखय्यामकृत रुबाया, गज्जलांजलि, स्वप्नरंजन, द्राक्षकन्या, नकुलालंकार हे काव्यग्रंथ आहेत. 'फारसी–मराठी कोश' रचून यांनीं मराठी भाषेची चांगली सेवा केली आहे. हे स्वतंत्र बुद्धीचे, निश्चयी, मानी व बुद्धिवादी असत.

'डॉ. माधवराव पटवर्धन साहित्यमंदिर' हें यांचें स्मारक पुणें येथें उभारून यांच्या असंख्य चाहत्यांनीं यांच्यावरील आपली भक्ति व्यक्त केली आहे.

**पटवर्धन, विनायक रामचंद्र** (ऊर्फ आण्णासाहेब) (१८४७–१९१७)—जनसेवेसाठींच आपलें आयुष्य खर्च करणारे आधुनिक महाराष्ट्रांतील एक साधु पुरुष. बी. ए. पर्यंत शिक्षण झाल्यावर हे मुंबईच्या मेडिकल कॉलेजमध्यें व लॉ क्लासमध्यें दाखल झाले. याशिवाय एल्. सी. ई. चा अभ्यासहि यांनीं सुरू केला होता. परंतु एकाच वेळीं एका मनुष्यास दोन परीक्षांस बसतां येत नाहीं अशा अर्थाच्या युनिव्हर्सिटीच्या ठरावामुळे हे फक्त एल्एल्. बी. झाले. पण डॉक्टरची एल्. एम्. ॲण्ड एस्. ही पदवी यांना घेतां येणें शक्य झालें नाहीं. मुंबईतील आपल्या वास्तव्याच्या काळांत यांनीं कांचकारखान्यांसारख्या अनेक औद्योगिक कार्यांत आपलें लक्ष घातलें. 'इंदुप्रकाश'चे बातमीदार या नात्यानें हे मल्हारराव गायकवाड प्रकरणाच्या चौकशीच्या वेळीं हजर होते. श्री. माधवराव नामजोशी यांनीं 'किरण' व 'डेक्कन स्टार' हीं पत्रें काढलीं, तेव्हां त्यांना यांचें साहाय्य होतें. व्यापक प्रमाणावर औद्योगिक व राजकीय उलाढाली सुरू करण्याची यांची मनीषा होती व

त्यासाठीं आर्थिक साहाय्य निर्माण करण्याच्या हेतूनें यांनीं हैद्राबादचे दिवाण सर सालरजंग यांच्या सहकार्यानें निजामच्या ताब्यांतून गेलेला वऱ्हाड प्रांत फ्रेंच बँकेकडून मोठी रक्कम काढून विकत घ्यावयाचें ठरवलें, परंतु दुर्दैवानें हा व्यवहार पुरा होण्याच्या पूर्वीच सालरजंग पैगंबरलोकवासी झाले व यांनीं प्रथम फ्रेंच बॅंकेकडून काढलेल्या दोन कोट रुपयांवरील व्याजाचा भुर्दंड यांना भरावा लागला. या प्रसंगामुळें यांना उदासीनता प्राप्त झाली व यानंतर हे राजकारणांतून निवृत्त होऊन आळंदीच्या नरसिंहसरस्वती स्वामीचे शिष्य होऊन राहिले.

नगरपालिकेंत निवडून येऊन काम करणें, कायदेशीर सल्ला-मसलत, फिर्यादी लिहून देणें, मोफत औषधोपचार करणें, यांसारखीं अनेक कामें जरी हे पुढें करीत असले तरी यांना या कामांत मनापासून लक्ष घालणें शक्य झालें नाहीं. यांचें रोगाचें निदान अचूक असून यांनीं लिहून दिलेल्या आयुर्वेदीय औषधांनीं रोग्यांना गुण येई. हे राष्ट्रीय पक्षाचे एक आधार असून लो. टिळकांचे जिवलग मित्र होते.

**पटवर्धन संस्थानिक घराणीं**—मूळपुरुष जिल्हा रत्नागिरी, गांव कोतवडें येथील हरभट. हा बाळाजी विश्वनाथाबरोबर पुण्यास आला. या घराण्यांतील सर्व पुरुष शूर होते व नानासाहेब पेशवे यांच्यापासून पेशवाईअखेरपावेतों मराठ्यांच्या सर्व मोहिमांत त्यांनीं भाग घेतला होता. सांप्रत दक्षिण महाराष्ट्रांतील पटवर्धन संस्थानिक हे या हरभटाच्याच घराण्याचा विस्तार होय. मिरजेचें घराणें पहिलें. नंतर सांगली, कुरुंदवाड, जमखंडी, वगैरे वेगळीं घराणीं झालीं. त्यांची माहिती स्वतंत्र दिली आहे. आतां हीं संस्थानें राहिलीं नसून मुंबई इलाख्यांत विलीन झालीं आहेत.

**पटवेकरी**—पटवा, पटवी, पटवेगार, पट्टा, वगैरे अनेक नांवांनीं हे लोक ओळखले जातात. मुंबई इलाख्यांत यांची संख्या २,००० च्यावर आहे व वऱ्हाड–मध्यप्रांतांत ६,००० च्यावर आहे. बायकांच्या गळ्यांत घालण्याचे दागिने पटवणें, व गंडे, ताईत, दोरे, अनंत, वगैरे तयार करून विकणें, हा यांचा उदरनिर्वाहाचा मुख्य धंदा. त्यावरूनच त्यांस पटवेकरी म्हणतात. हे मूळचे गुजराथकडील असावेत असें यांच्या भाषेवरून दिसतें. पटवेकऱ्यात पुष्कळ मुसलमानहि आहेत. ते हनफी पंथाचे सुनी मुसलमान आहेत. यांच्यांत धर्मबुद्धि कमीच दिसते.

**पटेटी**—पारशांचा नवीन वर्षाचा दिवस. फरवरदिन महिन्याची पहिली तीथ–होर्मझ (५ सप्टेंबर) हा पटेटीचा पहिला दिवस. पारशी लोकांत पटेटी सण फार मोठा मानतात. अग्यारींतून बरेच सामाजिक कार्यक्रम–संमेलनें होतात.

**पटेल, वल्लभभाई जव्हेरभाई** (१८७५– )—हिंदुस्थान सरकारचे गृहमंत्री व कॉंग्रेसचे एक प्रमुख. यांचा जन्म खेडा जिल्ह्यांतील नडियाद गांवीं झाला. १८९७ मध्यें हे नडियाद हायस्कूलमधून मॅट्रिक होऊन १९०१ मध्यें त्यांनीं वकिलीची परीक्षा दिली. त्यांनीं प्रथम पंचमहाल जिल्ह्यांत व नंतर खेडा व अहमदाबाद जिल्ह्यांत वकिली केली. १९१० मध्यें हे बॅरिस्टर होण्याकरितां इंग्लंडमध्यें गेले. १९१२ मध्यें परीक्षा पास होऊन १९१३ मध्यें ते मिडलटेंपलमधून बॅरिस्टर झाले. त्याच वर्षी हिंदुस्थानांत परत येऊन फेब्रुवारीमध्यें त्यांनीं अहमदाबाद येथें पुन्हां वकिली सुरू केली. १९१५ मध्यें ते अहमदाबाद म्युनिसिपालिटीचे सभासद झाले. १९१६ सालीं पाहिल्या गुजराथ प्रांतिक परिषदेचे महात्मा गांधी हे अध्यक्ष असतांना हे चिटणीस होते. १९१७ मध्ये यांनीं गांधीजींच्या नेतृत्वाखालीं खेडा जिल्ह्यांत करबंदीची चळवळ केली. नंतर त्यांनीं वकिली सोडून गुजराथमध्यें रौलट कायद्याविरुद्ध असहकारितेची चळवळ केली. नंतर ते खिलाफत चळवळींत सामील झाले. अहमदाबाद येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या वेळीं ते स्वागताध्यक्ष होते. गया येथील राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या वेळीं हे राष्ट्रीय सभेचे प्रधान मंत्री झाले. यांनीं गुजराथ विद्यापीठाकरितां दहा लक्ष रुपये गोळा केले. नागपूर येथील झेंडा सत्याग्रहामध्यें हे प्रमुख होते. बोरसद येथें जादा पोलिसांसंबंधीं कर बसविण्यांत आला असतां यांनीं त्याविरुद्ध यशस्वी रीतीनें करबंदीची चळवळ केली. १९२३ ते १९२८ पर्यंत हे अहमदाबाद म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. परंतु बारडोली सत्याग्रहांत भाग घेण्याकरितां यांनीं अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. बारडोलीच्या इतिहासप्रसिद्ध करबंदीच्या चळवळीचे हे पुढारी होते. १९२८ मध्यें अहमदाबाद येथें जलप्रलयामुळें नुकसान झालें त्या वेळीं यांनीं लोकांस मदत करण्याकरितां नमुनेदार व्यवस्था केली. त्या वेळीं यांनीं लोकांकडून लाखों रुपये जमा केले व सरकारला एक कोटीपेक्षां अधिक रुपये गुजराथ प्रांतिक कॉंग्रेस कमिटीमार्फत खर्च करावयास लावले. १९३० सालीं सुरू झालेल्या सत्याग्रहाच्या चळवळींत यांस अनेक वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली. १९३० मध्यें सप्रू-जयकर यांनीं महात्मा गांधींबरोबर येरवडा जेलमध्यें जो विचारविनिमय केला त्यांत यांनीं भाग घेतला होता. १९३१ मध्यें हे कराची येथें राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष होते. १९३२ मध्यें यास

महात्मा गांधींबरोबर १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनप्रमाणें चौकशीविना अटक झाली. यांचे बंधु विठ्ठलभाई पटेल यांचें शव मुंबई येथें आणलें असतांना सरकारनें यांची कांहीं अटींवर मुक्तता करण्याचें ठरविलें, पण यांनीं अटींवर मुक्त होण्याचें नाकारलें. पुढें जुलै १९३४ मध्यें सुटका झाल्यावर मध्यवर्ती असेंब्लीच्या निवडणुकीमध्यें यांनीं आपल्या पक्षातर्फे फार मोठा प्रचार व कार्य केलें व त्या निवडणुकींत पक्षास यश मिळवून दिलें. १९३५ मध्यें बोरसद तालुक्यांत प्लेगविरुद्ध सक्त उपाय योजावयाची मोहीम करून तेथील प्लेगची पूर्णपणें हकालपट्टी केली. हे अखिल भारतीय काँग्रेस कमिटी व वर्किंग कमिटी यांचे सभासद असून, १९१९ व १९३६ सालांमध्यें गुजराथ प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. नंतर अखिल भारतीय काँग्रेस पार्लमेंटरी समितीचे ने अध्यक्ष होते. १९४२ सालीं यांनाहि इतर काँग्रेस-पुढाऱ्यांबरोबर अटक झाली होती. काँग्रेसनें देशाचा कारभार हातीं घेतल्यावर यांना गृहमंत्री करण्यांत आलें. यांचा तत्त्वनिष्ठ करडेपणा व करारीपणा या गुणांचा लोकमतावर फार परिणाम होतो. म. गांधींनंतर नेहरूंच्या जोडीनें हेच हिंदी संघराज्याचे आधारस्तंभ आहेत.

**पटेल, विठ्ठलभाई जव्हेरभाई** (१८७१-१९३३)— एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण प्रथम अहमदाबादमध्यें व नंतर इंग्लंडमध्यें झालें. १९१८ सालीं मुंबई येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या जादा अधिवेशनाचे हे स्वागताध्यक्ष होते. हे मुंबई कार्पोरेशनचे सभासद असून स्कूल्स कमिटीचे १९२३-२४ सालीं चेअरमन होते. हे मुंबई कायदे मंडळाचे व व्हाइसरॉयच्या मध्यवर्ती कायदे मंडळाचे सभासद होते. १९२४-२५ मध्यें हे मुंबई कार्पोरेशनचे अध्यक्ष होते. १९२२ सालीं हे कायदेभंग कमिटीचे सभासद असून त्यांनीं त्या वेळीं सर्व हिंदुस्थानभर दौरा केला होता. १९२५ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष झाले व पुन्हां १९२७ मध्यें निवडून आले. १९३० मध्यें यांनीं राष्ट्रीय सभेच्या ठरावाप्रमाणें असेंब्लीचा राजीनामा दिला व कायदेभंगाच्याच चळवळींत पडले; त्यांत त्यांस शिक्षा झाली. नंतर ते प्रकृतीसाठीं इंग्लंड-अमेरिका, वगैरे देशांत प्रवास करण्याकरितां गेले व तिकडेच त्यांचा व्हिएन्ना येथें अंत झाला. त्यांचें शव मुंबईस आणण्यांत आलें व त्याचा मोठ्या समारंभानें दहनविधि करण्यात आला. यांची करारी आणि स्वाभिमानी वृत्ति त्या वेळच्या राजकारणांत प्रभावी ठरली होती.

**पट्टकृमि**—(टेपवर्म). हे शरीरामध्यें आढळणारे परोपजीवी जंतू असून त्यांची पूर्ण वाढ झाली असतां ज्यांच्या अंगांत उष्ण रक्त असतें अशा सपृष्ठवंश प्राण्यांच्या आंतड्यांत अथवा अन्नमार्गांत आढळतात. यांचें शरीर अनेक चापट सांध्यांचें बनलेलें असतें. हे सांधे डोक्याला जोडलेले असून त्यांस आंकडे किंवा शोषक नळ्या किंवा दोन्ही असतात व त्यांच्या साहाय्यानें ते मनुष्याच्या आंतड्यास घट्ट धरून बसतात. या जंतूंस तोंड किंवा पाचक इंद्रियें नसतात. त्यांचें पोषण कातडींतून अन्नरस शोषून घेऊन होत असतें. यांची लांबी कांहीं इंचांपासून कांहीं वारपर्यंत असते. हे जंतू बहुधा तोंडावाटे प्रवेश करितात व हे शरीरांतून बाहेर पडतांना यांचीं अंडीं पूर्ण झालेलीं असतात व त्यांच्या प्रत्येक अवयवांतून हीं बाहेर पडतात. त्यांच्याभोंवतीं एक कवच असतें. हें अंडें एखाद्या प्राण्यानें उचविलें म्हणजे बाहेरील कवच फुटतें व त्यांतून एक गर्भ बाहेर पडतो. हा गर्भ दुसऱ्या एखाद्या प्राण्याकडून गिळण्यांत आल्याशिवाय त्याची वाढ होत नाहीं. तसा गिळला गेल्यास तो पुन्हां वाढीस लागून त्याचा पूर्ण प्राणी तयार होतो. गोमांस व डुकराचें मांस खाणाऱ्यास हा रोग होतो.

**पट्टण**—बडोदें संस्थान. पट्टण तालुक्याचें मुख्य ठिकाण. ऐतिहासिक जुनें नांव अनहिलवाड (पाहा) ऊर्फ अनहिलपूर आहे. हें इ. स. ७५० च्या सुमारास वसलें आहे. जुनाट अवशेषांत 'राणीवाव' विहीर व १४६७ चा एक शिलालेख हीं आहेत. अर्वाचीन शहर पाटण व किल्ला मराठ्यांच्या अमदानींतील आहे. लोकसंख्या सु. तीस हजार. तलवारी, अडकित्ते, वगैरेंचे अनेक स्थानिक उद्योगधंदे आहेत. येथें जैनांचीं अनेक देवळें असून असंख्य पोथ्या असलेलें जैन-वाङ्मय त्यांतून सांठवलें आहे.

**पट्टणी, सर प्रभाशंकर दलपतराम** (१८६२-१९३५)—एक काठेवाडी मुत्सद्दी व मंत्री. यांचें शिक्षण मोर्वी, राजकोट व मुंबई येथें झालें. १९१२ ते १९१५ पर्यंत हे मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. १९१६ मध्यें मुंबई कायदे मंडळाचे सभासद होते. १९१७ मध्यें हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ती कायदे मंडळाचे सभासद होते. १९१७ ते १९१९ या काळांत इंग्लंडमध्यें स्टेट सेक्रेटरीच्या इंडिया कौन्सिलचे सभासद होते. १९२० मध्यें हे भावनगर संस्थानच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष होते. हे गोलमेज परिषदेचेहि सभासद होते. भावनगर संस्थानांत यांनीं शेतकऱ्यांच्या ऋणमोचनाची एक योजना करून सर्व शेतकऱ्यांस ऋणमुक्त केलें.

**पट्टा**—नाशिक जिल्हा. देवळालीपासून ५ कोसांवर असलेला एक किल्ला. तो ज्या डोंगरावर आहे त्याला जटायूचा डोंगर असें म्हणतात. हा व जवळचाच दुसरा औंध नांवाचा किल्ला हे बहामनी राजवटींत बांधले गेले. पुढें ते मोंगलांकडे व नंतर मराठ्यांकडे आले.

**पट्टा**—सुमारें तेहतीस इंच लांबीचें व मुठीपासून टोंकापर्यंत निमुळतें होत गेलेलें तरवारीचें पातें. याच्या टोंकास इजा होऊं नये म्हणून एक चामड्याचें म्यान बसविण्यांत येतें. ही तरवार टोंचण्याच्या कामींच उपयोगी असते; कापण्याच्या नव्हे. एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत प्रथमतः ही तरवार इंग्लंडमध्यें वापरण्यांत येऊं लागली व द्वंद्वयुद्ध करण्याच्या कामीं बहुधा हिचा उपयोग करण्यांत येऊं लागला. पूर्वी युरोपांत तरवारीनें युद्ध करण्याचें शिक्षण प्रत्येक गृहस्थास देण्यांत येत असे. तसें अलीकडे देण्यांत येत नसल्यामुळें हें हत्यार आतां मागें पडलें आहे. आपल्याकडे पट्टा हें शस्त्र जुनेंच आहे. दांडपट्टा या खेळांत याचा उपयोग दिसतो.

**पट्टाभी सीतारामय्या,** (डॉ.) (१८८०- )—एक राजकारणी कॉंग्रेस पुढारी. यांनीं १९०६ सालीं मच्छलीपट्टण येथें वैद्यकीचा धंदा स्वतंत्र रीतीनें सुरू केला; परंतु १९१६ मध्यें तो सोडून देऊन के. हनुमंतराव, एम्. ए. यांनीं स्थापन केलेल्या 'आन्ध्र जातीय कलाशाला' नांवाच्या एका राष्ट्रीय कॉलेजमध्यें यांनीं सहकार्य केलें. हें कॉलेज स्वतंत्र असून कोणत्याहि युनिव्हर्सिटीस जोडलेलें नाहीं, किंवा त्यास सरकारी मदत मिळत नाहीं. १९१६ पासून हे अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचे सभासद आहेत. १९१९ मध्यें त्यांनीं 'जन्मभूमि' नांवाचें एक इंग्रजी साप्ताहिक सुरू केलें व तें एप्रिल १९३० पर्यंत चालविलें. त्या वेळीं त्यांस मीठ-सत्याग्रहामध्यें एक वर्षाची शिक्षा झाली. १९३२-३३ मध्यें त्यांस पुन्हां दोन वर्षांची शिक्षा झाली व पुन्हां ऑक्टोबर १९३३ मध्यें सहा महिन्यांची शिक्षा झाली. १९२९ ते १९३१ मध्यें हे अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीच्या वर्किंग कमिटीचे सभासद होते व पुन्हां १९३४ व १९३६ मध्यें सभासद होते. हे सहकारी चळवळींतहि लक्ष घालतात आणि मद्रास प्रांतिक सहकारी परिषदेचे हे १९२६ सालीं अध्यक्ष होते व त्या चळवळीशीं यांचा १९३० पर्यंत निकटचा संबंध असे. बँकिंग व इन्शुअरन्स याच्याकडेहि यांचें लक्ष आहे. यांनीं आन्ध्र इन्शुअरन्स कंपनी, आन्ध्र बँक व भारत लक्ष्मी इन्शुअरन्स कंपनी व हिंदुस्थान म्यूच्यूअल इन्शुअरन्स कंपनी या स्थापन करण्याच्या कामीं महत्त्वाचें साहाय्य केलें. हिंदुस्थानची भाषावार प्रांतरचना व्हावी या बाबतींत यांनीं बरीच चळवळ केली व त्यासंबंधीं एक पुस्तक लिहिलें आहे. यांच्या दीर्घ प्रयत्नानें आता आन्ध्र प्रांत मद्रास प्रांतांतून वेगळा काढण्यांत येत आहे. याखेरीज राष्ट्रीय शिक्षण, हिंदी राष्ट्रीयत्व, राष्ट्रीय सभा, वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. १९४८ सालीं हे जयपूर येथें भरलेल्या कॉंग्रेसचे अध्यक्ष होते.

**पट्टया**—स्थानिक स्वराज्य संस्था आपला खर्च भागविण्यासाठीं जे कर बसवितात त्यांना हें नांव दिलें आहे. सरकार ज्याप्रमाणें कर बसवितें त्याप्रमाणेंच नगरपालिका किंवा जिल्हापालिका आपल्या हद्दींतील लोकांवर पट्टया बसवितें. मुख्यतः घरपट्टी, ड्रेनेजपट्टी व पाणीपट्टी याच मोठ्या प्रमाणावर उत्पन्न देणाऱ्या पट्टया असतात.

**पॅट्रिक, सेंट** (३८९-४६१)—हा आयर्लंडचा संरक्षक संत (पेट्रन सेंट) आहे. त्याला त्याच्या वयाच्या १६ व्या वर्षी एका दरोडेखोरांच्या टोळीनें पळवून नेलें आणि गुलाम म्हणून विकलें. पुढें त्यानें त्या गुलामगिरींतून ६ वर्षांनंतर पळून जाऊन आपली सुटका करून घेतली. नंतर आयरिश लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याचें पवित्र कार्य करण्याचा त्यानें निश्चय केला व ४३२ सालीं तो आयर्लंडांत गेला. तेथें त्यानें ३६० हून अधिक चर्चें (ख्रिस्तालयें) बांधलीं, आणि १२,००० हून अधिक लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. तसेंच अनेक इसमांनां त्यानें उपाध्याय (प्रीस्ट) नेमलें.

**पठाण**—एक जात. अस्सल अफगाण लोक, सालोमनचा सेनापति सॉल याचा नातू अफगाना यास आपला मूळ पुरुष मानतात. नेबूचाडनेझर यानें आमच्या पूर्वजांना पॅलेस्टाइनमधून काढून मीडिया व इराण येथें वसाहत करावयास लाविलें, असें ते सांगतात. तेथून हे लोक नंतर घोर वगैरे पूर्वेकडील प्रांतांत पसरले. ख्रि. पू. ३२७ सालीं अलेक्झांडरनें हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हा बुद्धानुयायी पॅक्टियन राष्ट्र अस्तित्वांत होतें. आणि या राष्ट्रामधील अपरयटी, सत्तागिद्धे, दादिफी आणि गांधारी, या जाती म्हणजेच हल्लींच्या पठाणांचे खरे पूर्वज होते, असें हेराडोटस् हा इतिहासकार लिहितो. वरीलपैकीं पहिल्या तीन जातींना अनुक्रमें आफ्रिडी, कट्टक व दादी अशीं दुसरीं नांवें असून वरील चार जाती मूळच्या आर्यच आहेत. सहाव्या शतकांत हिंदुकुश पर्वताच्या आसपास हूण लोकांनीं गांधार लोकांचे कित्येकदां पराभव केले. याच सुमारास गांधार लोकांच्या एका टोळीनें गांधार (हल्लींचें कंदाहार) शहर स्थापिलें. यानंतर हळूहळू तुर्की, सिथियन व मंगोलियन लोकांशीं संबंध आल्यामुळें त्यांचे कित्येक स्वभावविशेष वरील चार जातींत उतरूं लागले व त्यामुळें पूर्वीची आर्य संस्कृति या जातींतून कमी कमी झाली.

महात्मा गांधींबरोबर १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनप्रमाणें चौकशीविना अटक झाली. यांचे बंधु विठ्ठलभाई पटेल यांचें शव मुंबई येथें आणलें असतांना सरकारनें यांची कांहीं अटींवर मुक्तता करण्याचें ठरविलें, पण यांनीं अटींवर मुक्त होण्याचें नाकारलें. पुढें जुलै १९३४ मध्यें सुटका झाल्यावर मध्यवर्ती असेंब्लीच्या निवडणुकीमध्यें यांनीं आपल्या पक्षातर्फें फार मोठा प्रचार व कार्य केलें व त्या निवडणुकींत पक्षास यश मिळवून दिलें. १९३५ मध्यें बोरसद तालुक्यांत प्लेगविरुद्ध सक्त उपाय योजावयाची मोहीम करून तेथील प्लेगची पूर्णपणें हकालपट्टी केली. हे अखिल भारतीय काँग्रेस कमिटी व वर्किंग कमिटी यांचे समासद असून, १९१९ व १९३६ सालांमध्यें गुजराथ प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. नंतर अखिल भारतीय काँग्रेस पार्लमेंटरी समितीचे ते अध्यक्ष होते. १९४२ सालीं यांनाहि इतर काँग्रेस-पुढाऱ्यांबरोबर अटक झाली होती. काँग्रेसनें देशाचा कारभार हातीं घेतल्यावर यांना गृहमंत्री करण्यांत आलें. यांचा तत्त्वनिष्ठ करडेपणा व करारीपणा या गुणांचा लोकमतावर फार परिणाम होतो. म. गांधींनंतर नेहरूंच्या जोडीनें हेच हिंदी संघराज्याचे आधारस्तंभ आहेत.

**पटेल, विठ्ठलभाई जव्हेरभाई** (१८७१-१९३३)— एक हिंदी पुढारी. यांचें शिक्षण प्रथम अहमदाबादमध्यें व नंतर इंग्लंडमध्यें झालें. १९१८ सालीं मुंबई येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या जादा अधिवेशनाचे हे स्वागताध्यक्ष होते. हे मुंबई कार्पोरेशनचे समासद असून स्कूल्स कमिटीचे १९२३-२४ सालीं चेअरमन होते. हे मुंबई कायदे मंडळाचे व व्हाइसरॉयच्या मध्यवर्ती कायदे मंडळाचे समासद होते. १९२४-२५ मध्यें हे मुंबई कार्पोरेशनचे अध्यक्ष होते. १९२२ सालीं हे कायदेभंग कमिटीचे सभासद असून त्यांनीं त्या वेळीं सर्व हिंदुस्थानभर दौरा केला होता. १९२५ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष झाले व पुन्हां १९२७ मध्यें निवडून आले. १९३० मध्यें यांनीं राष्ट्रीय सभेच्या ठरावाप्रमाणें असेंब्लीचा राजीनामा दिला व कायदेभंगाच्याच चळवळींत पडले; त्यांत त्यांस शिक्षा झाली. नंतर ते प्रकृतीसाठीं इंग्लंड-अमेरिका, वगैरे देशांत प्रवास करण्याकरितां गेले व तिकडेच त्यांचा व्हिएन्ना येथें अंत झाला. त्यांचें शव मुंबईस आणण्यांत आलें व त्याचा मोठ्या समारंभानें दहनविधि करण्यात आला. यांची करारी आणि स्वाभिमानी वृत्ति त्या वेळच्या राजकारणांत प्रभावी ठरली होती.

**पट्टकृमि**—(टेपवर्म). हे शरीरामध्यें आढळणारे परोपजीवी जंतू असून त्यांची पूर्ण वाढ झाली असतां ज्यांच्या अंगांत उष्ण रक्त असतें अशा सपृष्ठवंश प्राण्यांच्या आंतड्यांत अथवा अन्नमार्गांत आढळतात. यांचें शरीर अनेक चापट सांध्यांचें बनलेलें असतें. हे सांधे डोक्याला जोडलेले असून त्यांस आंकडे किंवा शोषक नळ्या किंवा दोन्ही असतात व त्यांच्या साहाय्यानें ते मनुष्याच्या आंतड्यास घट्ट धरून बसतात. या जंतूंस तोंड किंवा पाचक इंद्रियें नसतात. त्यांचें पोषण कातडींतून अन्नरस शोषून घेऊन होत असतें. यांची लांबी कांहीं इंचांपासून कांहीं वारपर्यंत असते. हे जंतू बहुधा तोंडावाटे प्रवेश करितात व हे शरीरांतून बाहेर पडतांना यांचीं अंडीं पूर्ण झालेलीं असतात व त्यांच्या प्रत्येक अवयवांतून हीं बाहेर पडतात. त्यांच्याभोंवतीं एक कवच असतें. हें अंडें एखाद्या प्राण्यानें उचविलें म्हणजे बाहेरील कवच फुटतें व त्यांतून एक गर्भ बाहेर पडतो. हा गर्भ दुसऱ्या एखाद्या प्राण्याकडून गिळण्यांत आल्याशिवाय त्याची वाढ होत नाहीं. तसा गिळला गेल्यास तो पुन्हां वाढीस लागून त्याचा पूर्ण प्राणी तयार होतो. गोमांस व डुकराचें मांस खाणाऱ्यास हा रोग होतो.

**पट्टण**—वडोदें संस्थान. पट्टण तालुक्याचें मुख्य ठिकाण. ऐतिहासिक जुनें नांव अनहिलवाड (पाहा) ऊर्फ अनहिलपूर आहे. हें इ. स. ७५० च्या सुमारास वसलें आहे. जुनाट अवशेषांत 'राणीवाव' विहीर व १४६७ चा एक शिलालेख हीं आहेत. अर्वाचीन शहर पाटण व किल्ला मराठ्यांच्या अमदानींतील आहे. लोकसंख्या सु. तीस हजार. तलवारी, अडकित्ते, वगैरेंचे अनेक स्थानिक उद्योगधंदे आहेत. येथें जैनांचीं अनेक देवळें असून असंख्य पोथ्या असलेलें जैन-वाङ्मय त्यांतून सांठवलें आहे.

**पट्टणी, सर प्रभाशंकर दलपतराम** (१८६२-१९३५)—एक काठेवाडी मुत्सद्दी व मंत्री. यांचें शिक्षण मोर्वी, राजकोट व मुंबई येथें झालें. १९१२ ते १९१५ पर्यंत हे मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळाचे समासद होते. १९१६ मध्यें मुंबई कायदे मंडळाचे सभासद होते. १९१७ मध्यें हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ती कायदे मंडळाचे समासद होते. १९१७ ते १९१९ या काळांत इंग्लंडमध्यें स्टेट सेक्रेटरीच्या इंडिया कौन्सिलचे समासद होते. १९२० मध्यें हे भावनगर संस्थानच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष होते. हे गोलमेज परिषदेचेहि सभासद होते. भावनगर संस्थानांत यांनीं शेतकऱ्यांच्या ऋणमोचनाची एक योजना करून सर्व शेतकऱ्यांस ऋणमुक्त केलें.

**पट्टा**—नाशिक जिल्हा. देवळालीपासून ५ कोसांवर असलेला एक किल्ला. तो ज्या डोंगरावर आहे त्याला जटायूचा डोंगर असें म्हणतात. हा व जवळचाच दुसरा औंध नांवाचा किल्ला हे बहामनी राजवटींत बांधले गेले. पुढें ते मोंगलांकडे व नंतर मराठ्यांकडे आले.

**पट्टा**—सुमारें तेहतीस इंच लांबीचें व मुठीपासून टोंकापर्यंत निमुळतें होत गेलेलें तरवारीचें पातें. याच्या टोंकास इजा होऊं नये म्हणून एक चामड्याचें म्यान चसविण्यांत येतें. ही तरवार टोंचण्याच्या कामींच उपयोगी असते; कापण्याच्या नव्हे. एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत प्रथमतः ही तरवार इंग्लंडमध्यें वापरण्यांत येऊं लागली व द्वंद्वयुद्ध करण्याच्या कामीं बहुधा हिचा उपयोग करण्यांत येऊं लागला. पूर्वी युरोपांत तरवारीनें युद्ध करण्याचें शिक्षण प्रत्येक गृहस्थास देण्यांत येत असे. तसें अलीकडे देण्यांत येत नसल्यामुळें हें हत्यार आतां मागें पडलें आहे. आपल्याकडे पट्टा हें शस्त्र जुनेंच आहे. दांडपट्टा या खेळांत याचा उपयोग दिसतो.

**पट्टाभी सीतारामय्या**, (डॉ.) (१८८०- )—एक राजकारणी कॉंग्रेस पुढारी. यांनीं १९०६ सालीं मच्छलीपट्टण येथें वैद्यकीचा धंदा स्वतंत्र रीतीनें सुरू केला; परंतु १९१६ मध्यें तो सोडून देऊन के. हनुमंतराव, एम्. ए. यांनीं स्थापन केलेल्या 'आन्ध्र जातीय कलाशाला' नांवाच्या एका राष्ट्रीय कॉलेजमध्यें यांनीं सहकार्य केलें. हें कॉलेज स्वतंत्र असून कोण-

त्याहि युनिव्हर्सिटीस जोडलेलें नाहीं, किंवा त्यास सरकारी मदत मिळत नाहीं. १९१६ पासून हे अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचे सभासद आहेत. १९१९ मध्यें त्यांनीं 'जन्मभूमि' नांवाचें एक इंग्रजी साप्ताहिक सुरू केलें व तें एप्रिल १९३० पर्यंत चालविलें. त्या वेळीं त्यांस मीठ-सत्याग्रहामध्यें एक वर्षाची शिक्षा झाली. १९३२-३३ मध्यें त्यांस पुन्हां दोन वर्षांची शिक्षा झाली व पुन्हां ऑक्टोबर १९३३ मध्यें सहा महिन्यांची शिक्षा झाली. १९२९ ते १९३१ मध्यें हे अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीच्या वर्किंग कमिटीचे सभासद होते व पुन्हां १९३४ व १९३६ मध्यें सभासद होते. हे सहकारी चळवळींतहि लक्ष घालतात आणि मद्रास प्रांतिक सहकारी परिषदेचे हे १९२६ सालीं अध्यक्ष होते व त्या चळवळीशीं यांचा १९३० पर्यंत निकटचा संबंध असे. बॅंकिंग व इन्शुअरन्स याच्याकडेहि यांचें लक्ष आहे. यांनीं आन्ध्र इन्शुअरन्स कंपनी, आन्ध्र बँक व भारत लक्ष्मी इन्शुअरन्स कंपनी व हिंदुस्थान म्यूच्युअल इन्शुअरन्स कंपनी या स्थापन करण्याच्या कामीं महत्त्वाचें साहाय्य केलें. हिंदुस्थानची भाषावार प्रांतरचना व्हावी या बाबतींत यांनीं बरीच चळवळ केली व त्यासंबंधीं एक पुस्तक लिहिलें आहे. यांच्या दीर्घ प्रयत्नानें आता आन्ध्र प्रांत मद्रास प्रांतांतून वेगळा काढण्यांत येत आहे. याखेरीज राष्ट्रीय शिक्षण, हिंदी राष्ट्रीयत्व, राष्ट्रीय सभा, वगैरे ग्रंथ लिहिले आहेत. १९४८ सालीं हे जयपूर येथें भरलेल्या कॉंग्रेसचे अध्यक्ष होते.

**पट्ट्या**—स्थानिक स्वराज्य संस्था आपला खर्च भागविण्यासाठीं जे कर बसवितात त्यांना हें नांव दिलें आहे. सरकार ज्याप्रमाणें कर बसवितें त्याप्रमाणेंच नगरपालिका किंवा जिल्हापालिका आपल्या हद्दींतील लोकांवर पट्ट्या बसवितें. मुख्यतः घरपट्टी, ड्रेनेजपट्टी व पाणीपट्टी याच मोठ्या प्रमाणावर उत्पन्न देणाऱ्या पट्ट्या असतात.

**पॅट्रिक, सेंट** (३८९-४६१)—हा आयर्लंडचा संरक्षक संत (पेट्रन सेंट) आहे. त्याला त्याच्या वयाच्या १६ व्या वर्षी एका दरोडेखोरांच्या टोळीनें पळवून नेलें आणि गुलाम म्हणून विकलें. पुढें त्यानें त्या गुलामगिरींतून ६ वर्षांनंतर पळून जाऊन आपली सुटका करून घेतली. नंतर आयरिश लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा देण्याचें पवित्र कार्य करण्याचा त्यानें निश्चय केला व ४३२ सालीं तो आयर्लंडांत गेला. तेथें त्यानें ३६० हून अधिक चर्चें (ख्रिस्तालयें) बांधलीं, आणि १२,००० हून अधिक लोकांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. तसेंच अनेक इसमांना त्यानें उपाध्याय (प्रीस्ट) नेमलें.

**पठाण**—एक जात. अस्सल अफगाण लोक, सालोमनचा सेनापति सॉल याचा नातू अफगाना यास आपला मूळ पुरुष मानतात. नेबूचाडनेझर यानें आमच्या पूर्वजांना पॅलेस्टाइनमधून काढून मीडिया व इराण येथें वसाहत करावयास लाविलें, असें ते सांगतात. तेथून हे लोक नंतर घोर वगैरे पूर्वेकडील प्रांतांत पसरले. ख्रि. पू. ३२७ सालीं अलेक्झांडरनें हिंदुस्थानावर स्वारी केली तेव्हा बुद्धानुयायी पॅक्टियन राष्ट्र अस्तित्वांत होतें. आणि या राष्ट्रामधील अपरयटी, सत्तागिद्दि, दादिकी आणि गांधारी या जाती म्हणजेच हल्लींच्या पठाणांचे खरे पूर्वज होते, असें हेराडोटस् हा इतिहासकार लिहितो. वरीलपैकीं पहिल्या तीन जातींना अनुक्रमें आफ्रिडी, कट्टक व दादी अशीं दुसरीं नांवें असून वरील चार जाती मूळच्या आर्यच आहेत. सहाव्या शतकांत हिंदुकुश पर्वताच्या आसपास हूण लोकांनीं गांधार लोकांचे कित्येकदां पराभव केले. याच सुमारास गांधार लोकांच्या एका टोळीनें गांधार (हल्लींचें कंदाहार) शहर स्थापिलें. यानंतर हळूहळू तुर्की, सिथियन व मंगोलियन लोकांशीं संबंध आल्यामुळें त्यांचे कित्येक स्वभावविशेष वरील चार जातींत उतरूं लागले व त्यामुळें पूर्वीची आर्य संस्कृति या जातींतून कमी कमी झाली.

महंमद पैगंबरानें मुसलमानी धर्माच्या प्रसाराकरितां घोरच्या अफगाणांकडे एक शिष्य पाठविला. अफगाणांनीं तावडतोब मुसलमानी धर्म स्वीकारून आपला पुढारी महंमदाकडे पाठविला. त्याला महंमदानें 'पठाण' (म्हणजे शौर्यशाली) असा किताब दिला; व तेव्हांपासून पठाण शब्द अमलांत आला, असेंहि म्हणतात. अशा रीतीनें अफगाण व पॅक्टियन राष्ट्रांमधील लोक हे एकाच नांवाचे झाले. आठव्या शतकात अफगाण लोक पूर्वेकडे पुढें सरकले व गांधार लोकांत स्वतः मिसळून जाऊन त्यांनीं त्यांना मुसलमान बनविलें व अकराव्या शतकांत गझनीचा महंमूद हिंदुस्थानावर स्वाऱ्या करीत होता तेव्हां मार्गातील आफ्रिडी लोकाना त्यानें मुसलमान बनविलें. महंमदाबरोबरच सुलेमान पर्वतावर राहणारा रोहिलाहि हिंदुस्थानांत आला व त्यानें संयुक्त प्रांतांत कायमचा तंबू ठोकला. बाराव्या शतकामध्यें गझनीची सत्ता मागें पडून घोरचे अफगाण फारच प्रबळ झाले आणि उरलेल्या दोन जातींचा व त्यांचा एकजीव होऊन संपूर्ण पॅक्टियन राष्ट्र मुसलमान झालें.

पठाण लोकांनीं सामान्यपणें १२०५ पासून १५२६ पर्यंत हिंदुस्थानांत राज्य केलें. पठाणांची रुधिरप्रियता आणि आडदांडपणा तर सर्वश्रुतच आहे. हिंदुस्थानांत पठाणांची वस्ती बरीच असून मुख्यतः गरीबगुरीब लोकांना पैसे देऊन मग त्यांच्याकडून धाकदपटशानें दुप्पट-तिप्पट पैसे उकळणें हा त्यांचा धंदा आहे. पठाणांची सावकारी फार प्रसिद्ध असून ठरलेला पैसा वाटेल त्या उपायांनीं परत मिळविण्यांत ते वस्ताद असतात. पठाण लोक टोळ्या करून राहतात. स्वदेशांत राहणाऱ्या पठाणांचा धंदा शेती व मेंढरांचे कळप पाळणें हा आहे. प्रत्येक टोळींतील मुख्य माणसाचें न्यायकोर्ट असतें. त्यास जिर्गा म्हणतात. असे सर्व टोळ्यांचे जिर्गे एकत्र जमून जातींतील न्याय करतात. तरी पुष्कळदां हा रीतसर मार्ग सोडून टोळींतील लोक 'हम करेसो कायदा' याच तत्त्वानें वागतात. जिर्ग्यांचें काम ज्या कोडाच्या आधारें चालतें त्यास 'पुक्तुवाली' म्हणतात. पश्चिम सरहद्दीवर राहणाऱ्या पठाण टोळ्यांचे दोन मुख्य राजकीय तट आहेत. एका पक्षाचें नांव 'गार' व 'सामिल', व दुसऱ्यांचें नांव 'तोरगुंडी' व 'स्पिनगुंडी' असें आहे.

आज हिंदुस्थानांतील सर्व प्रांतांतून हे लोक आढळतात. यांची ४० लाखांच्या वर वस्ती आहे. हे धर्मानें मुसलमान आहेत. सैन्यांत व इतरत्र नोकरी करणें, तगाद्याचीं कामें करणें, द्वाररक्षक म्हणून राहणें, शेती करणें, वगैरेंवर हे उदरनिर्वाह करतात.

पक्थ या वैदिक राष्ट्रवाचक शब्दाशीं पठाणाचा संबंध कोणी संशोधक लावतात. हिंदुस्थानांतील वायव्य सरहद्द प्रांत हा पठाणांनींच व्यापलेला आहे. त्याच्यापुढेंहि निरनिराळ्या पठाण जातींची वस्ती आहे. पाकिस्तानातून वा. स. प्रांत काढून व पश्चिमेकडील अफगाणिस्तानापर्यंतचा प्रदेश घेऊन पठाणिस्तान राज्य करण्याची महत्त्वाकांक्षा कांहीं पठाण पुढाऱ्यांनीं धरली आहे.

**पठाणकोट**—पंजाब, गुरुदासपूर जिल्हा, एक तालुका व गाव. तालुक्यांत लष्करी ठाणीं असून डलहौसी हें हवा खाण्याचें ठिकाण आहे. पठाणकोट गांव फार प्राचीन असावें असें तेथें सांपडणाऱ्या नाण्यांवरून दिसतें. येथें उदुंबर लोक राहत असावेत. दहमेरी राज्याचें नांव याच लोकांवरून पडलें. येथें रजपूत राजघराणें नांदत होतें. राजा भक्तमल हा शिकंदर सूरी याच्या पक्षांत मानकोटच्या लढाईत होता. हें संस्थान १८१५-त रणजितसिंगाच्या ताब्यांत गेलें. पठाणकोट हे व्यापारी गांव आहे. येथें शालजोड्या व लोंकरी पांघरुणें चांगलीं होतात.

**पठारी संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतलें एक संस्थान. क्षेत्रफळ ३० चौरस मैल. बरो पठारी व चोर पठारी या नांवांनींहि हें ओळखलें जातें. लोकसंख्या सु. चार हजार. येथील संस्थानिक पठाण आहेत. यांची मूळची जहागिरी रहतगडची. ती शिंद्यांनीं काढून घेतली होती व नंतर कित्येक वर्षांनीं त्यांस शिंद्यांकडूनच ही परत मिळाली.

पठारी गांव—एका तळ्याच्या कांठीं टेंकडीवर हें वसलें आहे. कुल्हारी स्टेशनापासून ११ मैल आहे. तेथें एक स्तंभ आहे. त्यावर ८६१ चा लेख आहे. बरेच हिंदु देवळांचे अवशेष येथें सांपडले आहेत.

संस्थानचें वार्षिक उत्पन्न ८० हजार रु. आहे. हें आतां मध्यभारत संस्थानसंघांत सामील झालें आहे.

**पडदा**—(व्हाल्व). एखाद्या नळींतून जाणारा एखाद्या द्रवपदार्थाचा अथवा वायूचा प्रवाह बंद करण्याकरितां किंवा नियंत्रित करण्याकरितां ज्या एका सरकत्या व उघडझांप होणाऱ्या भागाची योजना केलेली असते त्यास पडदा असें म्हणतात.

हे पडदे निरनिराळ्या प्रकारचे असतात. कांहींस बिजागरी असते. कांहीं फूलपांखरांच्या आकाराचे असतात. कांहीं आंव्यासारखे छत्रीच्या आकाराचे असतात. कांहीं तबकडीसारखे असतात. कांहीं दुहेरी असतात व कांहीं उघडमीट करणारे असतात. आपोआप क्रिया न होणाऱ्या पडद्यांमध्यें बंद होणारे नियामक व फिरणारे पडदे असतात, व ते निरनिराळ्या पद्धतीनें बसविलेले असतात. स्टिफन्सनच्या पडद्यामध्यें दोन

गतिविपर्यासक (एक्सेंट्रिक) बसविलेले असतात. (आकृति पाहा). हॅकर्थ याच्या गतिमालेंत (गीयरमध्यें) एकच गतिविपर्यासक असतो. तर जॉय याच्या गतिमालेंत मुळींच नसतो. वाल्सचीर्टच्या गतिमालेंत पडद्याला गति विपर्यासकाकडून मिळते व हा विपर्यासक एका आंदोलन-शृंखलेलाहि गति देत असतो.

**पडवळ**—एक भाजीची वेल. हिच्या आंखूड व लांब अशा दोन जाती आहेत. अक्षयतृतीयेच्या सुमारास लागवड करतात. आषाढ-श्रावणांत बहर येतो. कांहीं ठिकाणीं शिवरात्रीनंतर लावणी करतात. आळ्यांना सांखळ्या करून पाणी देतात. वेल मांडवावर सोडतात. मांडव ६ फूट उंचीचा घालतात. एकेका आळ्यांत ४।५ बिया पेरतात. साधारण कोंवळींच पडवळें बाजारांत नेतात. कडू पडवळ औषधी असतें. पडवळीचीं पानें पित्तनाशक, मूळ रेचक व वेल कफनाशक आहे.

**पडसें**—हा विकार सर्दीपासून होतो. हा झाला असतां बाहेरची हवा जाण्या-येण्याच्या शरीरांतील मार्गांना जें त्वचावरण असतें त्यांना सूज येते व नाकांतून शेंबूड गळतो. आमाशयिक व श्वासनालिज असे याचे दोन प्रकार आहेत. डोक्यांतलें जें पडसें होतें त्यांत नाक, गळा, घसा व डोळे यांचीं त्वचावरणें सुजतात. पडशाचीं कारणें पुष्कळ आहेत. ओल, हवेंतील फरक व कोंदट जागा यांमुळे सामान्यतः हा रोग होतो. घरगुती साधें औषध म्हणजे युकॅलिप्टस (कापूर) तेलाचे थोडे थेंब पाण्यांत टाकून त्याचा नाकांत वाफारा घ्यावा. किंवा आमोनियायुक्त क्विनीन घेऊन गरम पाण्यानें स्नान करून २४ तास बिछान्यांत पडून राहावें. म्हणजे बहुधा हा विकार नाहींसा होतो. जेव्हां सर्दी होऊं लागते तेव्हां रोग्यानें आंथरुणांत पडून राहणें त्याच्या व इतरांच्या दृष्टीनेंहि चांगलें असतें. जेव्हां नाकांतून घट्ट पाणी किंवा शेंबूड वाहूं लागतो तेव्हां नस्य औषधें देण्यांत यावीं. सामान्यतः निजतांना खिडक्या उघड्या ठेवणें, गरम कपडे वापरणें, फार गरम खोल्यांतून न निजणें, वगैरे गोष्टी केल्यास सहसा सर्दी होत नाहीं. विशेषतः मुलांच्या बाबतींत अशी काळजी घेतल्यास त्यांस सर्दी होण्याचा संभव कमी असतो. जर वरचेवर सर्दी होऊं लागली तर नाकामध्यें ग्रंथि झाली आहे काय हें तपासून घ्यावें.

**पंडित, विजयालक्ष्मी** (१९००- )—एक राजकारणी हिंदी महिला. या पं. जवाहरलाल नेहरू यांच्या भगिनी आहेत. १९२१ सालीं यांचें बॅ. पंडित यांजबरोबर लग्न झालें. १९३० व १९३२ सालच्या सत्याग्रहाच्या चळवळींत यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला व भिठाच्या सत्याग्रहामध्यें यांस शिक्षा झाली. अलाहाबादमध्यें यांनीं स्त्री-सेवादलाची स्थापना केली होती. १९३७ मध्यें या युक्तप्रांतीय असेंब्लीमध्यें निवडून आल्या व तेथें काँग्रेस-मंत्रिमंडळ असतांना या मंत्री होत्या. १९४२ च्या चळवळींत यांना अटक झाली होती. १९४६ त या पुन्हां संयुक्त प्रांतांत मंत्रिपदावर आरूढ झाल्या. त्याच सालीं व नंतर त्या राष्ट्रसंघांत हिंदुस्थानच्या प्रतिनिधि-मंडळाच्या प्रमुख म्हणून होत्या. द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांचीं गाऱ्हाणीं त्यांनीं फार परिणामकारक रीतीनें राष्ट्रसंघाच्या सभांतून मांडलीं.

नंतर त्यांची नेमणूक रशियांत वकील म्हणून झाली. १९४८ त त्यांना अमेरिकेंत वकील म्हणून धाडण्यांत आलें. जागतिक राजकारणांत व वक्तृत्वांत या आपल्या भावाप्रमाणेंच फार कुशल आहेत. या हिंदुस्थानास भूषणभूत असून हिंदी महिलांच्या कर्तबगारीचें उदाहरण म्हणून यांचें नांव घेतां येईल.

**पंडित, विष्णु परशुरामशास्त्री** (१८२७-१८७६)—एक महाराष्ट्रीय सुधारक आणि समाजसेवक. पुनर्विवाह, परदेशगमन, विधवा-वपननिषेध, अनाथप्रेतदहन व शूद्रान्नसेवन यांसारख्या अनेक बाबतींत समाजाची पर्वा न करतां ज्यांनीं छातीठोकपणें व निर्भीडपणें आपले विचार लोकांपुढें मांडले त्यांपैकीं हे एक सांगतां येतील. मूळचे हे वांईजवळच्या बावधन गांवचे. पुण्याच्या विश्रामबाग पाठशाळेंत यांचें इंग्रजी शिक्षण झालें. त्यानंतर ट्रान्स्लेशन एक्झिबिशनर, शिक्षक यांसारख्या जागांवर नोकरी करून हे सेवानिवृत्त झाले. नोकरीवर असल्यापासूनच मुंबईच्या 'इंदुप्रकाशां'तून यांचें लिखाण प्रसिद्ध होत असे. सन १८६५ मध्यें स्थापन झालेल्या पुनर्विवाहोत्तेजक मंडळीचे संस्थापक हेच होते. वेणूबाई परांजपे या सोळा वर्षे वयाच्या मुलीचा पांडुरंग विनायक करमरकर यांच्याशीं पुनर्विवाह लावल्यावरून श्रीशंकराचार्यांकडून यांच्यावर बहिष्कार जाहीर करण्यांत आला. या बाबतींत जो वाद निर्माण झाला त्यांत आपली बाजू यांनीं रोखठोकपणें मांडली. स्वतः यांनीं प्रथम पत्नीच्या पश्चात् १८७४ सालीं वामनराव आगाशे यांची विधवा कन्या कुसाबाई हिच्याशीं पुनर्विवाह करून लोकांना स्वतः उदाहरण घालून दिलें. धार्मिक व सामाजिक विषयांवरोबरच स्वदेशी व्यापार, ईस्ट इंडिया असोसिएशनची स्थापना, यांसारख्या बाबतींतहि यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. हिंदुस्थानचा इतिहास (मरेचें भाषांतर), विधवाविवाह, स्मृतिशास्त्र, शूद्रधर्म, पुष्पमाला काव्य, इंग्रजी-मराठी कोश, इ. यांचे ग्रंथ आहेत. हे 'इंदुप्रकाशा'चे कांहीं काळ संपादक होते. पुढें झालेल्या आगरकरांना कित्ता घालून देणारे हे कर्ते सुधारक होते.

**पंडित, शंकर पांडुरंग** (१८४० – १८९४)—एक महाराष्ट्रीय विद्वान्. सारस्वत ब्राह्मण घराण्यांत सावंतवाडी संस्थानांत जन्म. लहानपणीं साधारण मराठी अभ्यास झाला. कांहीं दिवस कुलकर्णीपणाचें काम केलें. पुढें इंग्रजी शिकले. संस्कृत व जर्मन भाषामध्यें प्रावीण्य संपादन केलें. १८६५ मध्यें एम्. ए. झाले व कॉलेजात फेलो होते. दक्षिणा प्राइझ् कमिटीच्या सेक्रेटरीचें काम केलें. १८६८ त डेक्कन कॉलेजांत प्रोफेसर होते; नंतर खानदेश व सुरत येथें डे. कलेक्टर झाले. १८७४ सालीं इंटर नॅशनल काँग्रेसला हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून गेले. नंतर इन्कमटॅक्स कलेक्टर वगैरे हुद्यांवर कामें करून शेवटीं पोरबंदरचे ॲडमिनिस्ट्रेटर झाले. याचा विद्याभ्यासंग जसा मोठा तसें लेखनहि दांडगें होतें. यांनीं अथर्ववेद आणि तुकारामाच्या अभंगांची गाथा यांचें मोठ्या परिश्रमानें संपादन करून विद्वानांना उपकृत केलें. तसेंच ऋग्वेदाचें इंग्रजी व मराठी सटीप भाषांतर करण्यास आरंभ करून ऋग्वेदाचीं पहिलीं चार मंडलें पुरीं केलीं. पुढें आयुष्य उरलें नाहीं; नाहीं तर अधिक संशोधनपर ग्रंथ निघाले असते. यांच्या तुकारामाच्या गाथेची पुन्हां आवृत्ति मुंबई सरकार काढीत आहे.

**पंडितराव**—शिवाजीनें सुरू केलेल्या अष्टप्रधानमंडळांतील एक. शास्त्रार्थ सांगणें, देवस्थानांच्या नेमणुकांची व्यवस्था पाहणें, सरकारकडून होणारे विधी, दानधर्म, वगैरेंवर देखरेख ठेवणें, इत्यादि यांचीं कामें होतीं. यालाच पूर्वी न्यायशास्त्री असें म्हणत. राज्याभिषेकाच्या वेळीं शिवाजीनें रघुनाथभट्ट चंदावरकर यास 'पंडितराव' केलें. 'राजव्यवहारकोश' याच रघुनाथ पंडिताचा. पंडितरावाचा अधिकार पुढें निरनिराळ्या घराण्यांकडे गेला. साताऱ्याप्रमाणेंच कोल्हापुरासहि पंडितराव घराणें आहे.

**पंडु**—हस्तिनापुराचा कुरुवंशातील एक राजा व व्यासापासून अंबालिकेला झालेला मुलगा. हा चांगला शूर व गुणी होता, पण याला आयुष्य थोडें लाभलें. याची बायको कुंती हिला धर्म, भीम आणि अर्जुन हे तीन व माद्रीला नकुल आणि सहदेव असे दोन मिळून जे पांच पुत्र झाले, तेच पांडव होत.

**पंढरपूर**—मुंबई इलाखा, सोलापूर जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ ४७८ चौरस मैल. यांत पंढरपूर व करकंब हीं दोन गांवें व इतर ८४ खेडीं आहेत. लोकसंख्या सुमारें एक लाख. हवा कोरडी, पाऊस कमी व अनिश्चित. भीमा व माण या नद्यांच्या कांठची जमीन काळी व सुपीक आहे. इतरत्र बरड वगैरे हलकी आहे. एकंदर प्रदेश उघडा व सपाट आहे.

गांव—हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. पंढरपूरपावेतों आगगाडी गेली आहे. पंढरपूर म्युनिसिपालिटी १८५२ मध्यें स्थापन झाली. येथील विठोबाच्या देवळामुळें गाव एक प्रसिद्ध क्षेत्र बनलें आहे व बरेंच उत्पन्न त्यामुळें होतें व तें गांवच्या म्युनिसिपालिटीला मिळतें. दर शुक्ल एकादशीला सामान्य यात्रा व चैत्र, आषाढ, कार्तिक व माघ या महिन्यांत मोठ्या यात्रा भरतात. येथील विठोबाची मूर्ति अति प्राचीन आहे. विष्णुपद व नारद यांचीं दोन देवळें नदीच्या पात्रांत आहेत. विठोबाच्या देवळांत शक ११९५ चा जुना शिलालेख आहे. तो 'चौऱ्यायशीची शिला' म्हणून प्रसिद्ध आहे. येथें भरणाऱ्या यात्रांमुळें येथील लोकसंख्या नेहमीं कमीजास्त होत असते. लो. सं. (१९४१) ३९,३६०.

विठोबाची मूर्ति

जुन्या गांवांत विठोबाच्या देवळाभोंवतीं लहान लहान फरसबंदी बोळ आहेत. बाहेर मात्र मोठमोठ्या इमारती व धर्मशाळा झाल्या आहेत. भाविक यात्रेकरू बडव्यांच्या घरीं उतरतात. भीमेला या क्षेत्रांत चंद्रभागा हें नांव आहे. तिच्या वाळवंटात यात्रेच्या वेळीं हजारों लोक तळ ठोकतात व विठ्ठलाचें नामस्मरण करून भजनें ऐकत आनंदानें दिवस काढतात. आषाढी-कार्तिकी एकादशीला लांबून भक्तजन येतात. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, इत्यादि संतांनीं पंढरपूरचा महिमा वाढविला आहे व वारकऱ्यांनीं तो जागविला आहे. यात्रेच्या प्रसंगानें येथें कुंकू, बुका, लाह्या, डाळें, खण, बांगड्या, नारळ, वगैरे अतिशय खपतें.

**पणि**—एक वैदिक लोकराष्ट्र किंवा व्यक्ति. ऋग्वेदांत देवास हवि न देणारा व ब्राह्मणास दक्षिणा न देणारा पण श्रीमंत मनुष्य असा या शब्दाचा अर्थ आहे. अशा तऱ्हेचा मनुष्य मंत्रकर्त्या ऋषींना प्रिय होणें कधींहि शक्य नव्हतें; म्हणून देवाना पणी लोकांवर हल्ला करण्यासाठीं विनंति केल्याचा व त्यांचा पराभव होऊन कत्तल झाल्याचाहि उल्लेख आलेला आहे. पणि हा यज्ञ करणाऱ्यांच्या उलट, पक्का कवडीचुंबक व द्वेष करण्यास योग्य अशा अर्थानें त्याला चूक म्हटलें आहे. कांहीं ठिकाणीं पणी हे काल्पनिक पुरुष दिसतात, हे राक्षस असून यांनीं आकाशांतील

पाणी व गाई यांना अडवून ठेविलें; म्हणून इन्द्राकडून सरमा त्यांच्याकडे गेली अशी कथा ऋग्वेदांत आहे. पर्णीमध्यें वृबु हा श्रेष्ठ होता. हे लोक फिनिशियन असावेत असा कांहीं संशोधकांचा तर्क आहे.

**पत**—व्यवहारांत व विशेषतः व्यापारांत पत असण्यानें थोड्या पैशांत पुष्कळ कामें होतात. पैशाची फेड लांबणीवर टाकण्यास संमति म्हणजेच पत होय. हुंड्या, कागदी चलन, विश्वासपत्रें, इ. पतीचीं साधनें होत. सरकारविषयीं लोकांना विश्वास असला, त्याच्या कार्यक्षमतेविषयीं खात्री असली तर सरकारला लोकांकडून थोड्या व्याजावर कर्ज मिळतें. पेढ्यांच्या बाबतींतहि ही गोष्ट खरी आहे. पत आणि भांडवल हीं भिन्न आहेत. जमीन, मजूर, भांडवल, इ. उत्पादनाचीं साधनें एका व्यक्तीकडून दुसऱ्या व्यक्तीकडे देण्याचा एकमेव मार्ग म्हणजे पत होय व यामुळें त्या साधनांचाहि कस वाढतो.

**पंत, गोविंद वल्लभ** (१८८७- )—संयुक्त प्रांताचे प्रमुख मंत्री व काँग्रेस पुढारी. हे काँग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचे जनरल सेक्रेटरी होते व मध्यवर्ती असेंब्लीमध्यें दुय्यम पुढारी होते. हे पक्के काँग्रेसनिष्ठ असून १९२१ मध्यें यांनीं असहकारितेच्या चळवळींत प्रामुख्यानें भाग घेतला. मोतीलाल नेहरू यांना स्वराज्य पार्टी स्थापन करण्याच्या कामीं यांनीं पुष्कळ साहाय्य केलें. हे काँग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचे प्रमुख सभासद होते. १९३० व १९३२ सालांमधील सत्याग्रहाच्या चळवळींतहि यांनीं विशेष भाग घेतला होता. १९३५ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून आले. काँग्रेस मन्त्रिमंडळें अधिकारावर असतांना हे संयुक्त प्रांताचे प्रधान मंत्री होते व सध्यांहि आहेत. एकनिष्ठ काँग्रेससेवकांपैकीं गोविंद वल्लभ पंत पहिल्या श्रेणीचे म्हणतां येतील. हे चांगले साहित्यिकहि आहेत. 'वरमाला', 'राजमुकुट' इ. यांचीं नाटकें प्रसिद्ध आहेत.

यांचें घराणें मूळ महाराष्ट्रीय असून अनेक शतकें उत्तर हिंदुस्थानांत काढल्यानें आतां पूर्ण हिंदी बनलें आहे.

**पतंग**—१. हे पाकोळ्या किंवा फुलपांखरें यांपेक्षां निराळीं लहान पांखरें अथवा कीटक होत. यांच्या तोंडापुढील स्पर्शतंतू पिसांनीं युक्त किंवा निमुळते असतात. ते बसले असतां त्यांचे पंख पाकोळीप्रमाणें मिटलेले नसून पसरलेले असतात. व ते फक्त सायंकाळीं किंवा रात्रीचेच उडतांना दिसतात. यांना चार पंख असून ते विविध रंगांचे असतात. हात लावल्यास बारीक पूड हातास लागते. यांच्यांत अंडें, अळी, कोश व पतंग अशीं शारीरिक रूपांतरें असतात. पतंग आणि फुलपांखरूं यांच्यांत फरक म्हणजे पतंग पंख पसरून बसतात, तर फुलपांखरें मिटून बसतात. पतंग दिवसां बाहेर पडत नाहींत तर फुलपांखरें दिवसांच बाहेर पडतात. पतंगाच्या शिंगाचें टोंक जाड नसतें, पण फुलपांखराच्या शिंगास टोंकाशीं गांठी असतात.

पतंग पक्षी (घार)

२. यांना झाडावरचे ढेंकूण म्हणतात. यांचा डोक्याच्या पुढील भाग थोडा लांबट असून सोंडेसारखा असतो व त्याचा उपयोग ते उडी मारण्याकरितां करितात. हे प्राणी सामान्यतः दक्षिण अमेरिकेंत आढळतात. आपल्या डोक्याचा पुढील भाग फुगवून ते एक प्रकारचा प्रखर प्रकाश पाडतात असें म्हणतात; पण या गोष्टीस अद्यापि भक्कम पुरावा मिळालेला नाहीं. हे किडे दिव्याभोंवतीं जमतात व त्याच्या उष्णतेनें मरतात.

३. घार पहा.

**पतंग**— पतंगाचा खेळ फार जुना आहे. त्याचा उल्लेख जुन्या वाङ्मयांतून वारंवार येतो. महाराष्ट्रापेक्षां गुजराथेंत पतंग उडविण्याचा फार शोक. वृद्ध माणसेंहि या खेळांत भाग घेतात. तिकडे दिवाळीपासून संक्रांतीपर्यंत या खेळाचा हंगाम असतो.

पतंगाचे निरनिराळे प्रकार आहेत. तो बहुधा चौकोनी आकाराचा असून त्याला खालीं शेपटी किंवा गोंडा असतो. पतंगाचा दोरा चांगला बळकट असावा लागतो. दुसऱ्याच्या पतंगावर झडप घालून त्याचा दोरा कापण्यासाठीं 'मांजा' नांवाचा विशिष्ट कांचेची पूड लावलेला दोरा वापरतात. पतंग उडविण्याची एक कला आहे. त्यांत पेंच घेतां यावे लागतात तरच पतंगांची लढाई जिंकतां येईल.

पतंग उडविण्याची कला महाराष्ट्रांत वरच्या वर्गांत तर नाहींच, पण तिला क्रिकेट, बॅडमिंटन यांसारख्या खेळांचा दर्जा नसल्यानें खालच्या वर्गांतील उरलीसुरली कला देखील नामशेष होणार आहे.

चिनी व जपानी लोक पतंग फार सुरेख व वेगवेगळ्या प्रकारचे करतात. मुलांप्रमाणें बाप्येहि या खेळांत हौसेनें भाग घेतात. या पतंगांना प्राण्यांचे, घरांचे, झाडांचे, देवळांचे, वगैरे निरनिराळे आकार देतात व त्यांत दिवेहि ठेवतात व ते पेटवून उडवितात. कधीं त्यांत दारूहि भरतात. जपानांत एकाच

वेळीं विविध प्राण्यांच्या आकारांचे पतंग हवेंत सोडतात तेव्हां या शिकारखान्याची मोठी गंमत दिसते. आपल्याकडच्याप्रमाणें पतंगाच्या दोरीला मांजा लावून दुसऱ्याचे पतंग काटतात.

युरोपमध्यें देखील हा खेळ लोकांच्या मोठा आवडीचा आहे. पेग्टॉप, एडी, बॉक्स यांसारखे पतंगाचे प्रकार आहेत. पतंगाचा उपयोग शास्त्रज्ञहि करून घेतात. खोल दरींत इकडून तिकडे तार न्यावयाची झाल्यास पतंगाची युक्ति वापरतात. डॉ. फ्रँक्लिननें पतंगामुळेंच वीज खालीं आणण्याचा शोध काढला.

**पतंग**—[लॅ. सीसालपिना सुप्पान. सं. पत्रांग]. एक झाड. याच्या लांकडापासून तांबडा रंग निघतो. हें झाड लहान व कांटेरी असतें व लांकूड, शेंगा व साली यांच्यापासून रंग निघतो. हा रंग सिरिकाम्लानें जातो. आधुनिक तऱ्हेचे रंग निघण्यापूर्वी रंगासाठीं याची निर्यात फार मोठी होती. हीं झाडें बंगाल व मलबार या प्रदेशांत होतात.

**पतंगलकडी**—[वर्ग—लेग्युमिनोसी—हेमॅटोक्सिलॉन कँपेशियानम. इं. लॉगवुड्]. पतंगाचें लांकूड. हें झाड जमेका बेटांत होतें. याची उंची ४० ते ५० फुटांपर्यंत असते. या लांकडाचा रंग तांबडा असतो व मधून मधून नारिंगी व काळ्या रंगाची झांक मारते. याचा उपयोग रंगकामाकरितां होतो. या लांकडांत हेमॅटोक्सिलॉन या नांवाचें द्रव्य असतें. त्यामुळें या लांकडापासून रंग मिळतो. चित्रें छापण्याकरितां काळा किंवा पिंगट रंग काढण्याकरितां याचा उपयोग करतात. तसेंच स्नायूंचें आकुंचन करण्याच्या कामींहि याचा उपयोग होतो.

**पतंजलि**—एक महान् वैयाकरण व पाणिनीच्या अष्टाध्यायीवरील महाभाष्याचा कर्ता. योगसूत्रकार पतंजलि तो हाच कीं निराळा, हे निश्चित होत नाहीं. याचा काल ख्रि. पू. १५० हा असावा. याच्या महाभाष्यांत संस्कृत व्याकरणशास्त्राच्या विकासाचा कळस झालेला दिसेल. पतंजलीच्या नांवावर महाभाष्याखेरीज सांख्यप्रवचन, योगसूत्र, छंदोविचिति व एक वैद्यक ग्रंथ आहे.

**पंतप्रधान**—(प्रीमियर). इंग्लंडमधील सरकारचा जो मुख्य प्रधान त्याला प्रीमियर किंवा पंतप्रधान म्हणतात. त्याचें राहण्याचें ठराविक सरकारी ठिकाण नंबर १० डाउनिंग स्ट्रीट, व्हाइट हॉल येथें असतें आणि लंडनबाहेर त्याचें राहण्याचें ठिकाण चेकर्स येथें आहे. मुख्य प्रधान म्हणून याला स्वतंत्र पगार नसतो. पण दुसरें एखादें मंत्रिपद—उदा., फर्स्ट लॉर्ड ऑफ ट्रेझरी, किंवा चॅन्सेलर ऑफ एक्सचेकर, किंवा सेक्रेटरी ऑफ स्टेट हें काम—याच्याकडे असतें व त्या कामाचा पगार त्याला मिळतो. सर रॉबर्ट वॉलपोल हा पहिला ब्रिटिश प्रीमियर होय; परंतु १८०९ सालींच या पदवीला प्रथम सरकारी मान्यता देण्यांत आली.

पूर्वी हिंदुस्थानांत १९३५ च्या कायद्याप्रमाणें प्रांतिक स्वायत्तता मिळाल्यापासून प्रत्येक प्रांतांतून मंत्रिमंडळें स्थापन झालीं व इंग्लंडप्रमाणें गव्हर्नर मुख्य प्रधान निवडतो व त्या मुख्य प्रधानानें आपले इतर मंत्री निवडावयाचे असतात.

शिवाजीच्या अष्टप्रधानांत पंतप्रधान किंवा पेशवा हा मुख्य असून त्याची हुकमत सर्व प्रधानांवर चालत असे. त्याला सालिना १५००० होन तनखा असे व बाकीच्यांना १००० असे. शाहूच्या अमदानीपासून नुसतें पंतप्रधानपदच राहिलें; इतर प्रधान उरले नाहींत.

**पंतलु, सुब्बाराव** (१८५६–१९४१)—हे आपल्या निरपेक्ष जनसेवेनें 'आंध्रभीष्म' ही पदवी प्राप्त करून घेणारे आंध्र प्रांताचे एक जुने व अनुभवी पुढारी असून राष्ट्रीय सभेचे सन १९१३–१७ या काळांतील चिटणीस होते. प्रथम हे एक नामवंत वकील म्हणून प्रसिद्ध होते. राजमहेंद्रीच्या स्थानिक स्वराज्य संस्थेंत शिरून यांनीं सार्वजनिक क्षेत्रांत आपलें पहिलें पाऊल टेवलें. यानंतर १८९२ सालच्या कायद्याप्रमाणें अस्तित्वांत आलेलें मद्रास कौन्सिल व सन १९०९ च्या कायद्याप्रमाणें अस्तित्वांत आलेलें इंपीरियल कौन्सिल या दोन्ही कायदेमंडळांत लोकप्रतिनिधि या नात्यानें यांनीं केलेली कामगिरी प्रशंसनीय अशीच झाली. पब्लिक सर्व्हिस कमिशन व डीसेंट्रलायझेशन कमिशन या दोन कमिशनांबाबतचें यांचें कार्य लोकांच्या स्मरणांतून जाणार नाहीं. १८९८ सालच्या मद्रासच्या काँग्रेसचे हे स्वागताध्यक्ष होते. त्यानंतर काँग्रेसचे कार्यकारी मंत्री म्हणून चार वर्षे यांनीं काम केलें. लो. टिळकांची मंडाले तुरुंगांतून सुटका झाल्यानंतर त्यांना काँग्रेसमध्यें येऊं द्यावें किंवा नाहीं हा जो वाद नेमस्त पुढाऱ्यांत निर्माण झाला त्या वेळीं यांचें मत टिळकांना अनुकूल असें होतें. हिंदुधर्माच्या पुनरुद्धारासाठीं नेहमीं यांचे प्रयत्न असत. गीता ग्रंथाचे हे एक कट्टे पुरस्कर्ते होते. मद्रासच्या 'हिंदु' पत्राचे प्रस्थापक हेच होत.

**पंताजी गोपीनाथ बोकील**—शिवाजीच्या पदरचा एक मुत्सद्दी. हा जामदग्नि गोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण हिवऱ्याचा कुलकर्णी होता. तसेंच शिवाजीचा बरींच वर्षे चिटणीस असून शिवाजीनें यास आपला वकील म्हणून अफझलखानाकडे पाठविलें होतें व पंतानें ही कामगिरी चांगली बजावली व तीबद्दल शिवाजीनें त्याला चांगली बक्षिसीहि दिली होती. हा जिजाबाईबरोबर सोंगट्या खेळत असे असा बखरींत उल्लेख आढळतो. पुढें प्रसिद्धीस आलेला सखारामबापू याच्याच घराण्यापैकीं होता.

**पतिपत्नी**—पत्नीचा कायद्याप्रमाणें दर्जा काय आहे एवढाच या ठिकाणीं विचार केला आहे. इंग्लंडांत १८८२ च्या

कायद्यानें विवाहित स्त्रीला पुढील प्रकारचे हक्क कायद्यानें दिलेले आहेत : (१) कोणतीहि विवाहित स्त्री स्वतः नोकरी, धंदा किंवा व्यापार करून मिळकत संपादन करूं शकते, व तिचा स्वतंत्र उपभोग घेऊन त्या मिळकतीची विल्हेवाट मृत्युपत्र करून किंवा इतर रीतीनें करूं शकते. (२) सदरहू मिळकतीबद्दल करार करणें किंवा नवऱ्याला सामील न करतां स्वतः एकटीनें कोर्टात दावा लावणें, वगैरे हक्क ती जणुं कांहीं अविवाहित स्त्री आहे अशा प्रकारें तिला असतात. तसेंच इतरांना तिच्यावर नवऱ्याला सामील न करतां दावा लावतां येतो. तिच्या देण्याची जबाबदारी नवऱ्यावर नसते. (३) कोणाहि विवाहित स्त्रीला स्वतंत्रपणें धंदा करतां येतो; आणि अशा धंद्यांत बूड आल्यास नादारीचा कायदा तिला लागू असतो. (४) तिच्या स्वतःच्या मिळकतीसंबंधीं आपल्या मिळकतीचें संरक्षण करण्याकरितां नवऱ्याविरुद्ध दिवाणी दावा व इतर कायदेशीर उपाय करतां येतात. मात्र दोघे एकत्र राहत आहेत तोंपर्यंत त्या मिळकतीसंबंधाचा फौजदारी खटला नवऱ्याविरुद्ध करतां येत नाहीं. हिंदुस्थानांतहि अशाच प्रकारचे हक्क विवाहित स्त्रियांना आहेत ( मॅरिड विमेन्स प्रॉपर्टी ॲक्ट, कलमें ४।७।८।९ पाहा ).

**पतियाळा संस्थान**—पूर्व पंजाबांतील सर्वांत मोठें संस्थान. फुल्किअन संस्थानांतच हें मोडतें. क्षेत्रफळ ५,९३२ चौ. मैल. लो. सं. १९,३६,२५९ आहे. गांवें ३६१८. हें शीखांचें एक प्रमुख संस्थान आहे. शें. ८८ लोकांची भाषा पंजाबी. शें. ६२ लोकांचा मुख्य धंदा शेती. जमीन सुपीक असून जंगल मौल्यवान् आहे. सुराजपुर येथील सिमेंटचा कारखाना व राजपुरा येथील बिस्किटांचा कारखाना हिंदुस्थानांतील त्या जिनसांच्या मोठ्या कारखान्यांपैकीं आहेत. संस्थाननें स्वतःची १३९ मैलांची ब्रॉड गेज रेल्वे बांधली आहे. तीन कॉलेजें ( पैकीं एक मुलींचें ) व दहा हायस्कुलें संस्थानांत आहेत. प्राथमिक शिक्षण व स्त्रीशिक्षण मोफत आहे. संस्थानचें उत्पन्न २ कोटी ७० लक्ष रुपये आहे. पूर्व पंजाब संस्थानी संघांत पतियाळा सामील असून प्रमुख आहे.

१७६२ पासून ( अलासिंगपासून ) या संस्थानच्या इतिहासास सुरवात होते. त्यापूर्वींचा इतिहास फुल्किअन संस्थानच्या इतिहासांत मोडतो. मध्यंतरीं संस्थानची वाढ होत गेली. परंतु अंतःकलहामुळें रणजितसिंगास वाव मिळतांच त्यानें स्वारी केली व त्याच्याविरुद्ध (१८०८) इंग्रजांची मदत घेतली गेली. सध्यांचे महाराज यादवेंद्रसिंग १९३८ सालीं गादीवर आले.

शहर—पतियाळा ही संस्थानची राजधानी आहे. १७३६ त राजा अलासिंगानें येथें दगडी किल्ला बांधून राजधानी केली. अंबाल्याच्या पश्चिमेस ३४ मैलांवर नॉर्थ वेस्टर्न रेल्वेच्या राजपुरा–भटिंडा शाखेवर हें स्टेशन आहे. येथील व्यापार मोठा आहे. राजवाडे, बाग, कॉलेजें हीं प्रेक्षणीय आहेत. १९०४ सालीं येथें म्युनिसिपालिटी निघाली. स्त्रीशिक्षणाची सोय येथें चांगली केली आहे. लो. सं. सु. ७०,०००. गांव सुंदर व स्वच्छ आहे.

**पतौडी संस्थान**—पंजाबांतील अंबाला विभागांतील एक संस्थान. क्षेत्रफळ ५३ चौ. मैल. लोकसंख्या बावीस हजार. गांवांची संख्या ४१; त्यांत पतौडी हें मुख्य. संस्थानचें उत्पन्न ४¾ लाख रुपये. संस्थानिक अफगाण वंशीय आहे. मराठ्यांच्या पदरीं तलब फैजखान होता. मराठ्यांनंतर तो इंग्रजांचा मदतनीस व आश्रित झाला. १८०६ सालीं पतौडी जहागीर त्याला इंग्रजांकडून मिळाली. हें संस्थान पूर्व पंजाब प्रांतांत आतां विलीन झालें आहे.

**पत्ते**—पत्त्याचा खेळ मूळ प्राच्य देशांतील असला तरी तो युरोपियनांच्या मार्फतच आपल्याकडे आला. पंधराव्या शतकांत हा खेळ युरोपांत चालू असल्याबद्दल माहिती मिळते. पत्त्यांची संख्या ५२ असते व त्यांत (१) किलावर, (२) इस्पिक हे दोन काळे, व (३) बदाम आणि (४) चौकट हे दोन तांबडे, असे प्रत्येकीं १३ पानांचे चार गट पाडलेले असतात. एकपासून दहा अंक व त्यानंतर गुलाम, राणी व राजा अशीं तेरा पानें प्रत्येक गटांत असतात. लाडीस, मार्क डाव, गुलामचोर, विझिक, ब्रिज, वगैरे पत्त्यांच्या खेळाचे कित्येक प्रकार आहेत.

**पंथ पिपलोदा**—मध्यभारत, एक ब्राह्मणी जहागीर. क्षे. फ. २५·२१ चौ. मैल व लो. सं. ४,४०६. याचें वार्षिक उत्पन्न ५७,७०० रु. आहे. या घराण्याचा संस्थापक संभाजी खांडेकर होय. माळव्यांतून राजपुतान्यांत जावयाचा जो मार्ग आहे त्यावर पिपलोदा गाव आहे.

खांडेकर घराणें मोगल सम्राट् अकबर ह्याच्या हयातीची अखेर १० वर्षें उरलीं असतां कोंकणांत वस्तीस आल्याचा ऐतिहासिक पुरावा मिळतो. हे खांडेकर गार्ग्य गोत्री ऋग्वेदी कऱ्हाडे महाराष्ट्र ब्राह्मण. त्यांचें कुलदैवत कोल्हापूरची श्रीमहालक्ष्मी व कोंकणांतील पाली येथील श्रीपल्लिनाथ. पुढें ते यथाकाल मौजे बुरंबाड, तालुके संगमेश्वर, हल्लीं जिल्हा रत्नागिरी येथें राहिले. औरंगजेब बादशहा असतां प्रसिद्ध मावळणकर सरदेसायांकडून ह्या खांडेकरांस बुरंबाड, माखजन, माहुलंगें, इत्यादि पांच गांवचें कुळकर्णपण वंशपरंपरा मिळालें. बुरंबाडच्या कुळकर्णाबद्दल 'नानकार' म्हणून त्यांस वार्षिक रुपये १०० व माखजनकरितां रु. ४० मिळत. बुरंबाड येथें खांडेकरांचा घरबंद व विहीर अद्याप टिकून असल्याचें कळतें. संभाजी तुकदेव खांडेकर ह्यांस सहा पुत्र होते. पैकीं दुसरा गणेश,

तिसरा गोपाळ व सहावा वासुदेव इतिहासांत प्रसिद्धि पावले. ( गोपाळ संभाजी खांडेकर पाहा ).

सन १७६३ मध्यें पेशव्यांकडून गोपाळ संभाजीस धारच्या पवारांकडे सरंजाम असलेल्या मंडावळ महालची कमावीस मिळाली. तेव्हां त्याला 'पिपलोदा टप्पा' पाहावयास मिळून त्यानें पुढें पेशव्यांकडे त्याची मागणी केली व पेशव्यांनीं तो टप्पा त्यास सरंजाम दिला. सरंजाम होते वेळीं त्या टप्प्याच्या एकंदर गांवाचें उत्पन्न रुपये १०,१०१ होतें. त्याची खांडेकरांनीं रु. ११,१०१ वाढ केली. हा ऐवज 'हाली' शिक्क्यांत मिळे. शिवाय त्यांनीं 'बाचती' म्हणून सालिमशाही शिक्क्यांत रु. ६०० सर्व टप्प्यांतून घेण्याचा उपक्रम केला. तें उत्पन्नहि खांडेकरांस मिळतें. कलदार शिक्का सुरू झाल्यापासून दोन्ही उक्त उत्पन्नें कलदार शिक्क्यांतून मिळतात. गोपाळ संभाजीनें कसबा पिपलोदा येथें मध्यभागीं असलेल्या एका उंचवट्याच्या जागेवर आपली गढी बांधिली. तेथें एक विहीर व अवश्य त्या इतर सोयी केल्या. आपल्या निर्वाहाकरितां व घोडे, गाई, बैल, यांच्या उपयोगाकरितां त्यानें पिपलोद्यास बाग- बिघे २५ व कुरण- बिघे ३०, मौजे गुडमेली येथें 'खड्यां घाट' नांवाची जमीन- बिघे १५ व मौजे कोठडी येथे 'चरी' नांवाची माळ जमीन- बिघे ४० अशी एकूण ११० बिघे आपल्याकडे राखून ठेविली.

सुरुवातीस खांडेकरांनीं आपल्या टप्प्याची व्यवस्था खालसांत केली, पुढें गाव इजाऱ्यानें इतरांस दिले, व शेवटीं तेथील जमीदारांस इजाऱ्यानें दिले. हे जमीदार पेशवाईपूर्वी सरकार मंदसोर येथें मोंगल अमलापासून सर्व मंडवळ महालाचे जमीदार आहेत. त्यांचें कर्तव्य म्हणजे परगण्यांतील गांवांचें वार्षिक उत्पन्न वसूल करण्याच्या कामीं सरकारास साहाय्य करणें. त्याकरितां त्यांस त्या उत्पन्नावर दर शेंकडा एक ठराविक रक्कम मिळे. हल्लींहि पिपलोदा टप्प्याच्या गांवाव्यतिरिक्त मंडावळ महालांत असलेल्या गांवाकरितां तेथील नवाबाच्या राज्यांत ह्या जमीदारांस हीच ठराविक बाब मिळते. त्यांस मोगलांकडून, पेशव्यांकडून, ब्रिटिश सरकारकडून किंबहुना खांडेकरांकडून कोणतीहि सनद अथवा कायमधाऱ्याचा इजारा पट्टा कधींहि मिळाला नाहीं. गोपाळ संभाजीकडे पेशव्यांकडून अंतर्वेदींतील मीरत व बिजनौर या परगण्यांच्या जप्तीचें काम असतां त्यानें १७७१ मध्यें तारीख १८ ऑगस्टला बादशहा शहाअलमकडून मौजे बुरंवाड व माखजन या दोन गांवांच्या कुलकर्णाबद्दल दोन पृथक् फर्मानें घेतलीं. तीं खांडेकरांच्या संग्रहास आहेत. गोपाळ संभाजींनीं स्वतःच्या राहण्यास पुण्यास एक प्रशस्त वाडा बांधला. बऱ्हाणपूर दक्षिण व उत्तर हिंदुस्थानच्या मध्यवर्ती असल्यानें तेथेंहि त्यानें स्वतःचें घर केलें. पेशवाईअखेर 'सात उंटांचें भरत' इतकें गोपाळ संभाजींचें दप्तर पुण्यांतील वाड्यांतून नष्ट झालें. गोपाळ संभाजी सन १७८५ मध्यें निधन पावला. त्याची पत्नी गोपिकाबाई सती गेली.

सन १७९२ मध्यें पेशव्यांनीं गोपाळ संभाजीचे उभयतां चिरंजीव धोंडो गोपाळ व जनार्दन गोपाळ ह्यांच्या नांवें सरंजाम चालू राहण्याकरितां सनद दिली. सन १७९८ ते १८१८ मध्यें माळव्याची परिस्थिति फार वाईट होती. पेशव्यांची सत्ता कमी कमी होऊन शेवटीं अजीबात बुडाली. बळी तो कान पिळी असा प्रकार झाला. प्रथम धारच्या पवारांनीं पिपलोदा टप्पा जबरीनें घेतला. त्यांच्याकडून सबंध मंडावळ परगण्यासह तो होळकरांनीं काबीज केला. संभाजी परशुराम ( परशुराम संभाजी हा संभाजी तुकदेवाचा चौथा पुत्र ), धोंडो गोपाळ व जनार्दन गोपाळ ह्यांजकडून सुभ्याचा अधिकारी होता. त्यानें दौलतराव शिंद्याचें साहाय्य घेऊन तो टप्पा त्याच्याकडून सोडविला. दौलतरावाचीं होळकरांस बरींच पत्रें गेलीं. त्यांपैकीं कांहीं खांडेकरांच्या दप्तरांत कायम आहेत. कांहीं पत्रांत शिंद्यानीं आपल्या फौजी अधिकाऱ्यांस अवश्य तें फौजी साहाय्य बरोबर घेऊन टप्पा सोडवून घेण्याची आज्ञा केली आहे. पण इतकेंहि होऊन खांडेकरांस पूर्ण लाभ घडला नसता. तेव्हां विठ्ठल महादेव किबे उर्फ तात्या जोग, जो ह्या वेळीं होळकर राज्यांत अधिकारोन्मुख होता— ह्यानें टप्पा जप्तींतून सोडवून 'सोडचिठी' घेतली.

सन १८१७ मध्यें पेशवे व इंग्रज यांच्यामध्यें तह होऊन माळव्यांतील पेशव्यांचे अधिकार इंग्रजांस मिळाले. तेव्हां पिपलोदा टप्पा इंग्रजांस मिळाला. सन १८२१ मध्यें स्थानिक पोलिटिकल एजंटनें सर जॉन मालकम यास व सर जॉन मालकमनें मध्यवर्ती सरकाराशीं ह्या टप्प्यासंबंधानें पत्रव्यवहार केला व मध्यवर्ती सरकारनें मान्य केल्यावर सर जॉन मालकमनें सन १८२१ मध्यें धोंडो गोपाळचे चिरंजीव नारो धोंडदेव व जनार्दन गोपाळचे चिरंजीव वासुदेव जनार्दन यांच्या नांवें सनद दिली. सन १८७१ पावेतों या टप्प्याचे सर्वाधिकार खांडेकरांस लाभले.

मध्य भारत येथील रेसिडेंटनें सन १८६९ ते १८७० मध्यें खांडेकरांविरुद्ध मध्यवर्ती सरकारास लिहिल्यामुळें त्या सरकारनें १८७१ मध्यें दिलेल्या हुकुमान्वयें तोंपावेतों खांडेकरांस चालू असलेले मुलकी, दिवाणी, फौजदारी, इत्यादि अधिकार स्थानिक पोलिटिकल एजंटचे निगराणींत या जमीदारांस मिळाले. लॉर्ड कार्नवालिसनें बंगाल प्रांतांत जमीदारांशीं कायमधाऱ्याची व्यवस्था केली. पण तिच्यापेक्षां ह्या जमीदारांस किती तरी अधिक पटीनें अधिकार प्राप्त झाले.

कर्नल न्यूमार्च, पोलिटिकल एजंट असतां, त्यानें सन १९०९ मध्यें सर्व जमीदारांकडून वरील सर्व अधिकारांसह टप्प्याच्या सर्व गावची राज्यव्यवस्था काढून घेऊन रेल्वेच्या दळणवळणाच्या दृष्टीनें रेल्वे लाइनजवळ असलेल्या 'खारवा' नांवाच्या टप्प्याच्या एका गांवांत या ठिकाणच्या कारभाराकरितां व्यवस्थापक नेमिला व त्याच्या कामाकरितां पोलिस इत्यादि सर्व व्यवस्था करून त्या व्यवस्थापकाला आपल्या दिमतीखालीं ठेविलें. ह्या व्यवस्थेकरितां जो खर्च लागतो तो व खांडेकरांचें वार्षिक उत्पन्न वजा करून बाकी जो ऐवज राहतो तो ह्या जमीदारांस मिळतो.

सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया इन् कौन्सिलनें १९२८ च्या ऑक्टोबरमध्यें जो ठराव केला तदन्वयें पंथ पिपलोदा ठिकाण चीफकमिशनरशिप केलें गेलें व मध्य भारताच्या रेसिडेंटला तेथें चीफ कमिशनर नियुक्त करण्यांत येऊन त्यास त्या ठिकाणचें लोकल गव्हर्मेंट म्हणजे स्थानिक सरकार करण्यांत आलें.

पेशव्यांनीं दाक्षिणात्य ब्राह्मणांस दिलेलें व सार्वभौम सरकारच्या सत्तेखालीं प्राप्त परिस्थितींत टिकून असलेलें पंथ पिपलोदा हें एकच ठिकाण मध्य भारतांत आहे. पिपलोदा पाहा.

**पथ्यापथ्यविचार**—शरीरास हितकर तें पथ्य व अहितकर तें अपथ्य या दृष्टीनें माणसानें आपण घ्यावयाच्या अन्नाचा विचार केला पाहिजे. अन्नाचें शरीरांतील मुख्य कार्य म्हणजे त्याच्या पचनानें शरीरांत उष्णता, शक्ति व चैतन्य प्राप्त झालें पाहिजे. शरीरांतील रोज होणारी झीज भरून निघाली पाहिजे. न पचणाऱ्या पदार्थांची विष्ठा बनत असते. नत्रयुक्त, पिष्टमय, वसामय व क्षारयुक्त असे घटक अन्नांत असतात. अन्नाचे प्रकार मागें अन्न या लेखांत वर्णन केलेच आहेत. आहार कोणता ठेवला असतां तो हितकर होईल हें पाहावें लागतें. त्यासंबंधीं शोध केलेले आहेतच. बौद्धिक कामें करणारांचा आहार निराळा तर निरनिराळे व्यवसाय करणारांचा आहार निराळाच असावा लागतो. आजारी, रोगी माणसांचें पथ्य वेगळेंच असलेलें आपण पाहतों. अन्न शिजविण्याच्या संस्कारामुळेंहि तें पथ्यकर किंवा अपथ्यकर होऊं शकतें. लज्जतदार अन्न पौष्टिक असतेंच असें नाहीं.

माणसाचा आहार चौरस किंवा प्रमाणबद्ध असावा असा आरोग्यशास्त्राचा नियम आहे. प्रमाणबद्ध म्हटलें म्हणून अगदीं कांट्यावर तोलून अन्न घ्यावें असें नाहीं; असें करणें जिकिरीचें व अव्यवहार्यच होईल. नियम करणारांचा उद्देश इतकाच आहे कीं, आपल्या रोजच्या आहारांत अन्नाचे घटक योग्य प्रमाणात घ्यावे. थोडाबहुत बदल प्रसंगवशात् झाला तर चालतो; परंतु सतत पुष्कळ दिवस एखादा घटक कमी राहिल्यास मुलांची वाढ चांगली होत नाहीं; व मोठ्या माणसांना थोड्याशा श्रमानें थकवा, मस्तकशूल, फिकेपणा, अजीर्ण, पोटशूल, इत्यादि विकार होतात. कित्येकांना त्वचारोग होतात तर कित्येक सांथीच्या रोगांनाहि बळी पडतात. अन्न फारच सदोष असलें तर मुलांना मुडदूस, मोठ्यांना बेरी-बेरी, पंडुरोग, मधुमेह, क्षयरोग, दांतदुखी, वगैरे रोग होतात.

अन्नाचे दोन मुख्य गुणधर्म आहेत—(१) अन्नाच्या योगानें शरीरास आवश्यक उष्णता मिळते व काम करण्यास शक्ति येते; एवढेंच नव्हे तर (२) शरीराची झीज भरून निघते व शरीराची वाढ होते. अन्नांतील निरनिराळ्या घटकांपासून हे दोन्ही फायदे मिळतात. पिष्टमय धान्यें, साखर आणि मेद (तेल, तूप, चरबी) यांच्यांत पहिला गुण आहे; म्हणूनच त्यांस इंधनवत् अन्नें म्हणतात. दूध, अंडीं, डाळी ह्यांतील प्रोतद्रव्यें व अन्नांतील क्षार आणि जीवनसत्त्वें ह्यांनीं शरीराची मोडतोड भरून निघते व रोगनिवारणाची शक्ति येते.

प्रोत, पिठें, साखर, मेद, क्षार आणि जीवनसत्त्वें हीं सर्व सारखींच महत्त्वाचीं आहेत म्हणून तीं साधारणपणें आहारांत कांहीं प्रमाणांत असावींत. चौरस आहार (Balanced Diet) म्हणजेच सात्त्विक किंवा प्रमाणशीर आहार समजावा.

गरिबांच्या आहारांत पिष्टमय पदार्थ पुष्कळ असतात, कारण त्यांस खर्च कमी येतो; परंतु अशा आहारांतून शरीराची झीज भरून काढून त्याची वाढ करणाऱ्या घटकांची फार कमतरता असते. उलटपक्षीं श्रीमंताच्या आहारांत प्रोत आणि मेद यांचें प्रमाण फार असतें, आणि त्यांत कांहीं क्षार आणि जीवनसत्त्वें यांची बहुधा उणीव असते. श्रीमंत लोक दिसण्यास सुंदर अशा *अन्नाच्या पदार्थांचा आणि सांठवणीच्या महाग पदार्थांचा* उपयोग करण्यांत आनंद मानतात म्हणून त्यांच्या आहारांत वरील उणीव राहते. दिखाऊ आणि टिकाऊ पदार्थ तयार करण्याकरितां धान्यावरचें सालपट पार काढतात; पण त्याबरोबर आंतला अंकुरहि निघून जातो, व शरीराच्या वाढीसाठीं लागणारे क्षार व जीवनसत्त्वें या अंकुरांतच असतात. तांदूळ सडतांना, गहूं दळतांना वगैरे सालपट निघून जातें आणि अशा संस्कारानें अन्नाचें सत्त्वहरण होतें.

नेहमींच्या प्रचारांतल्या पुष्कळशा खाद्यांमध्यें अनेक अन्नघटक, क्षार व जीवनसत्त्वें वेगवेगळ्या प्रमाणांत असतात. प्रोतद्रव्यें, तशींच मेदोद्रव्येंहि वेगवेगळ्या अन्नामध्यें वेगवेगळ्या प्रतीचीं असतात. त्यांची योग्य निवड करण्याची अडचण भासूं नये व चौरस आहार तयार करतां यावा अशा धोरणानेंच पुढील कोष्टक व आठवड्याचें भोजनपत्रक बॉंबे प्रेसिडेन्सी बेबी अँड हेल्थ वीक असोसिएशननें प्रसिद्ध केलें आहे.

## आठवड्याचे भोजनाचें पत्रक

| वार. | शारीरिक श्रम करणाऱ्या लोकांकरितां ( कमींत कमी खर्चाचा ) | | | | मानसिक श्रम करणाऱ्या लोकांकरितां (साधारण खर्चाचा ) | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | सकाळीं ७ वाजतां. | दोनप्रहरीं १२ वाजता. | सायंकाळीं ४ वाजतां. | रात्रीं ८ वाजतां. | सकाळीं ७ वाजतां. | सकाळीं ९ वाजतां. | दोनप्रहरीं १॥ वाजतां. | रात्रीं ८ वाजता. |
| | | | | प्रमाणशीर शाकाहार | | | | |
| सोमवार. बुधवार. शुक्रवार. | भात, भाकर, पेंडेची चटणी. | खिचडी व तूप, भाजी आणि दहीं. | सोयाचीन-ची कॉफी. | वरण, भात, पोळी, भाकरी, लोणी, कोशिंबीर, मोड आलेले हरभरे, भाजी, दहीं, पोपया किंवा केळें. | सोयाचीन-ची कॉफी. | वरण, भात, तूप, कोशिंबीर, मोड आलेले हरभरे भाजी आणि दहीं. | लाडू, नारळाची चटणी. | भाकरी, पोळी, लोणी, भाजी, दहीं आणि फळें. |
| मंगळवार. गुरुवार. शनिवार. | ,, | पोळी, तूप, भाजी, कच्चा कांदा आणि दहीं. | ,, | वरण, भात, तूप, कोशिंबीर, भाजी, आणि दहीं. | ,, | वरण, भात, तूप, कोशिंबीर, भाजी, आणि दहीं. | भाकरी, पोळी, पेंडेची चटणी, केळीं. | खिचडी, भाकर, लोणी, भाजी, आणि दहीं. |
| रविवार किंवा रजेचे दिवस. | सोयाचीन-ची कॉफी किंवा चहा. | वरण, भात, तूप, पुरी व कांहीं गोड पदार्थ, कोशिंबीर, भाजी, मोड आलेल्या कडधान्याची उसळ आणि दहीं. | ... | भात, भाजी आणि दहीं. | ... | वरण, भात, तूप, पुरी व कांहीं गोड पदार्थ, कोशिंबीर, भाजी, मोड आलेल्या कडधान्याची उसळ आणि दहीं. | ... | भाकरी, पोळी, किंवा भात, भाजी आणि दहीं. |
| | | | | प्रमाणशीर मांसाहार | | | | |
| सोमवार. बुधवार. शुक्रवार. | भात, भाकरी, पोळी, पेंडेची चटणी. | खिचडी, अंडीं आणि भाजी. | सोयाचीन-ची कॉफी. | वरण, भात, पोळी, भाकरी, भाजी, कढी आणि कोशिंबीर. | सोयाचीन-ची कॉफी. | वरण, भात, तूप, भाकरी, पोळी, अंडीं भाजी व कोशिंबीर. | लाडू, नारळाची चटणी. | वरण, भात, भाकर, भाजी, फळें. |
| मंगळवार. गुरुवार. शनिवार | ,, | भाकर, पोळी, अंडीं, भाजी आणि कच्चा कांदा. | ,, | खिचडी, मांस, भाजी, मोड आलेल्या हरभऱ्याची कोशिंबीर, दहीं आणि फळें. | ,, | वरण, भात, तूप, भाकरी, पोळी, मोड आलेल्या हरभऱ्याची कोशिंबीर आणि दहीं. | भाकरी, पोळी, पेंडेची चटणी, केळीं. | खिचडी, तूप, मांस, भाजी. |
| रविवार किंवा रजेचे दिवस. | सोयाचीन-ची कॉफी. | वरण, भात, पुरी व कांहीं गोड पदार्थ किंवा मांस, कोशिंबीर, भाजी, मोड आलेल्या कडधान्याची उसळ व दहीं. | ... | भात व भाजी. | ,, किंवा चहा. | वरण, भात, तूप, मांस किंवा पुरी व कांहीं गोड पदार्थ, कोशिंबीर, भाजी, दहीं. | ,, | भाकरी, पोळी, भाजी, फळें. |

लहान मुलांच्या खाण्याच्या वेळा साधारणपणें मानसिक श्रम करणाऱ्या लोकांच्या खाण्यापिण्याच्या वेळांप्रमाणेंच असाव्या. त्यांना दररोज संध्याकाळीं ४ वाजतां एक पेला दूध अगर एक अंडें व सोयाचीन ( चिनी वाटाणा ) ची कॉफी हीं अधिक द्यावीं.

खाद्य पदार्थांचे कांहीं रासायनिक घटक

| अन्न | प्रोतद्रव्यें | चरबी | पिष्टार्क | क्षार | उष्मांक |
|---|---|---|---|---|---|
| असडी तांदूळ ... ... | ८·१ | ०·३० | ७८·७ | ४·० | १,५८४ |
| तांदूळ, सडीक ... ... | ६·३ | ०·४ | ९२·० | १·० | १,८०८ |
| अर्धकच्चे शिजविलेले (उकडे) ... ... | ६·४ | ०·८ | ९२·१ | १·० | १,८२४ |
| कणी ... ... | ६·३ | ०·४ | ९२·० | १·० | १,८०८ |
| कोंडा (ताजा) ... ... | १५·४ | १९·७ | ४९·६ | ८·५ | १,९८० |
| गहूं ... ... | १६·५ | १·३ | ६६·४ | १·५ | १,५७७ |
| बाजरी ... ... | ९·८ | १·६ | ८२·४ | २·० | १,७४४ |
| रागी (नाचणी) ... ... | ६·५ | १·३ | ७३·३ | १·० | १,५०६ |
| ज्वारी ... ... | १०·३ | ४·१ | ७९·५ | २·५ | १,६१६ |
| मका ... ... | ८·९ | ३·६ | ७५·६ | ... | १,६६४ |
| वाटाणा ... ... | २४·६ | १·० | ५७·५ | ३·० | १,५४० |
| भुईमूगपेंड ... ... | २५·६ | ३८·४ | २४·३ | २·० | २,४८० |
| भुईमूग ... ... | ३८·० | १०·० | ३६·० | ४·० | १,५०० |
| तीळ ... ... | २१·९ | ६१·७ | ४·३ | ... | ३,०२० |
| जवस ... ... | २२·६ | ३३·५ | २६·८ | २·० | २,२७२ |
| हरभरे ... ... | २०·१ | ४·६ | ४·० | २·८ | १,५३६ |
| सोयाबीन (चिनी वाटाणा) ... ... | ३३·९ | १६·६ | ३३·५ | ४·८ | १,९०४ |
| मसूर ... ... | २५·० | १·० | ५८·० | ६·० | १,५५० |
| तूप ... ... | ... | ९८·८ | ... | ... | ४,०३२ |
| लोणी ... ... | १·० | ८५·० | ... | ... | ३,६३४ |
| लोणीरहित दुधाची पूड ... ... | ३५·६ | १·० | ५१·३ | ७·८ | १,७०० |
| दूध गाईचें ... ... | ३·३ | ३·६ | ४·८ | ०·७ | ३५० |
| दूध म्हशीचें ... ... | ४·८ | ७·७ | ४·४ | ०·८ | ४८० |
| मांस ... ... | २९·० | २६·८ | ... | १·५ | ५२८ |
| यकृत् (बकरीचें) ... ... | २१·५ | ६·० | २·७ | १·२ | ६८८ |
| अंडीं ... ... | १३·४ | १०·५ | ... | १·० | ६७२ |
| साखर ... ... | ... | ... | १००·० | ... | १,८०८ |
| गूळ ... ... | ०·३ | ... | ८८·२ | १·५ | १,६०० |
| काकवी ... ... | ०·७ | ... | ७०·० | ४·५८ | १,३०० |
| उंसाचा रस ... ... | १·४ | ०·६ | २१·८ | ०·३ | ४४८ |
| बटाटे ... ... | २·५ | ०·१ | २८·७ | ०·६ | ५७६ |

**पदकें**—एखाद्या युद्धांत किंवा एखाद्या कार्यांत विशेष कौशल्य दाखविलें असतां सदरहू व्यक्तीस एखादें पदक देऊन त्या व्यक्तीचा गौरव करण्याची प्रथा पाश्चात्य देशांतून इकडे आली आहे. हीं पदकें विशेषतः युद्धामध्यें पराक्रम केल्याबद्दल प्रथम देण्यांत येत असत. प्रथम तीं वैयक्तिक असत. पुढें सर्वच सैनिकांस देण्याची प्रथा पडत चालली. ही सर्व सैनिकांस देण्याची प्रथा प्रथम ऑलिव्हर क्रॉमवेल यानें इंग्लंडमध्यें डन्बार येथील युद्धानंतर (१६५०) अमलांत आणली. त्यानंतर वाटर्लूच्या लढाईनंतर अशींच पदकें देण्यांत आलीं व एक पदक सर्व नेपोलियन युद्धांचें निदर्शक म्हणून १८४८ मध्यें

जिवंत असलेल्या सैनिकांस देण्यांत आलें. यानंतर हिंदुस्थान-विषयक कामगिरीबद्दल, आफ्रिकेंतील युद्धाबद्दल, अफगाणिस्तान-मधील युद्धाबद्दल, वगैरे पदकें देण्यांत आलीं.

युद्धामध्यें विशेष कामगिरी बजावण्याबद्दल सध्यां व्हिक्टोरिया क्रॉस नांवाचें जें पदक देण्यांत येतें तो विशेष मान समजला जातो. जर्मनीमध्यें 'आयर्न क्रॉस' नांवाचें लोखंडाचें पदक देण्यांत येत असे. सर्व देशांत अशीं पदकें देण्याची प्रथा आता सुरू झाली आहे.

याखेरीज कांहीं पदके विशेष प्रकारचें शास्त्रीय संशोधन किंवा उत्तम प्रकारचा ग्रंथ वगैरे लिहिल्याबद्दल देण्यांत येतात.

अलीकडे निरनिराळ्या विषयांच्या परीक्षांत उत्तम गुण मिळवणारांसहि पदके देण्याची प्रथा आहे. तसेंच खेळांचे सामने, नाट्य-संगीतादि कला, वगैरेंमध्यें नैपुण्य दाखविल्याबद्दल पदकें देऊन सन्मान करण्याची पडली झाली आहे.

**पदपाठ**—वेदसंहिता पाठ करण्याचा हा एक प्रकार आहे. जटा, क्रम, घन पाहा.

मूळपाठ—पवस्व वाजसातये विप्रस्य गृणतो वृधे। सोम रास्व सुवीर्यम्। -ऋ. अ. ६

पदपाठ—पवस्व। वाऽजसातये। विप्रस्य। गृणतः। वृधे। सोम। रास्व। सुवीर्यम्।

**पदमापक**—(पेडोमीटर). हें यंत्र मनुष्याची चाल किती झाली हें दाखवितें. या यंत्रांत यार्ड व मैल मोजले जातील अशी चक्रांची रचना असते. यांत एक लहानशी हातोडी असते ती माणसानें पाऊल टाकलें कीं त्या धक्क्यानें निसटते व चाकें फिरूं लागतात. दोन पावलांतील अंतर साधारणपणें अठरा इंच धरून गणति केली जाते.

**पदार्थ**—(सब्स्टन्स). तत्त्वज्ञानामध्यें ज्याचें अस्तित्व पृथक् रीतीनें किंवा स्वतःसिद्ध आणि रूपभेद न होतां असतें त्यास पदार्थ असे म्हणतात. याच्याउलट ज्यामध्यें वारंवार रूपभेद होत असतो त्यास उपाधि असें म्हणतात. डेकार्ट या तत्त्वज्ञान्यानें आपली तत्त्वज्ञानपद्धति अशा तत्त्वावर बसविली होती कीं, मन अथवा विचार करणारा पदार्थ आणि द्रव्य अथवा बाह्यपदार्थ यांमध्ये तात्त्विक भेद आहे. स्पिनोझा याचें असें मत होतें कीं, सर्व विश्वामध्यें एकच अनंत असा पदार्थ भरलेला आहे. आणि सर्व वस्तू या त्याचे विकार आहेत. लिबनिट्झ याच्या मताप्रमाणें पदार्थ ही एक अशी वस्तु आहे कीं, तिच्यामध्येंच विकाराचें अथवा रूपभेदाचें सामर्थ्य असतें.

**पदार्थविज्ञानशास्त्र**—(फिजिक्स). गति, शक्ति, उष्णता, प्रकाश, ध्वनि, विद्युच्चुंबकत्व, स्थितिस्थापकता, केशाकर्षण, वितरण, स्थित्यंतर, वगैरे अनेक गोष्टींसंबंधीं ज्या शास्त्रामध्यें विचार केलेला असतो त्यास पदार्थविज्ञानशास्त्र असें म्हणतात. या शास्त्राचा व्याप सर्व पदार्थांचे गुणधर्म विशेषतः ज्यांचा समावेश जीवशास्त्र आणि रसायनशास्त्र यांत होऊं शकत नाहीं अशा सर्वांस व्यापून असतो. परंतु पदार्थविज्ञान आणि रसायन या दोन शास्त्रांमधील विभाजक रेषा काढणें कठिण आहे. भूस्तरशास्त्र, खनिजशास्त्र, वगैरे ज्या शास्त्रांमध्यें पदार्थांचें पृथक्करण करण्याऐवजीं त्यांचा इतिहासच अभ्यासावयाचा असतो, अशा शास्त्रास बहुधा पदार्थविज्ञानामध्यें अंतर्भूत करीत नाहींत. परंतु त्यास सृष्टिशास्त्राच्या इतर जीवशास्त्र, वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र, इत्यादि शाखांप्रमाणें स्वतंत्र शाखा समजण्यांत येते.

२० व्या शतकामध्यें सर्व भौतिकशास्त्रास नवचैतन्य प्राप्त झालें आहे. किरणविसर्जन, विद्युत्कण, कणवाद, सापेक्षता या गोष्टी अर्वाचीन पदार्थविज्ञानशास्त्रांत प्रामुख्यानें चर्चिलेल्या आढळतात. पदार्थविज्ञानाच्या यंत्रशास्त्र, गतिशास्त्र, दृक्शास्त्र, विद्युच्छास्त्र, उष्णता, ध्वनि, इ. ज्या शाखा आहेत त्यांवर स्वतंत्र लेख आहेत.

**पदार्थांचें पतन**—पृथ्वीवरील सर्व पदार्थ गुरुत्वाकर्षण-शक्तीमुळें पृथ्वीच्या केंद्राकडे ओढले जात असतात. हवेमध्यें असलेले पदार्थ खालीं पडत असतांना त्यांमध्यें निरनिराळ्या प्रमाणांत गति उत्पन्न होते. उदा., शिशाच्या गोळीपेक्षां कागदाचा तुकडा फार हळूहळू खालीं येतो. यावरून पूर्वी असें मानण्यांत येत असे कीं, पदार्थांची खालीं पडण्याची गति त्यांच्या वजनावर अवलंबून असते. ही चूक गॅलिलिओनें शोधून काढून दुरुस्त केली. त्यानें पिसा येथील झुलत्या मनोऱ्यावरून निरनिराळ्या पदार्थांचे गोळे खालीं टाकण्याचा प्रयोग केला व त्यावरून त्यास असें आढळून आलें कीं, पदार्थांस खालीं पडतांना जी निरनिराळी गति प्राप्त होते तिचें कारण त्यांचें वजन नसून त्यांच्या पृष्ठभागास होणारा हवेचा प्रतिबंध होय. निर्वात प्रदेशांत सर्व पदार्थ एकाच गतीनें खालीं पडतील. या दुसऱ्या गोष्टींतील सत्यता न्यूटन यानें एका निर्वात नळींतून एक गिनीचें नाणें व एक पीस सारख्याच गतीनें खालीं पडतात या प्रयोगानें सिद्ध करून दाखविलें. जेव्हां स्थिर स्थितींत असलेली एखादी वस्तु खालीं पडते तेव्हां त्या वस्तूमध्यें दर सेकंदास ३२·२ फुटांइतकी गति उत्पन्न होत असते. यास गुरुत्वाकर्षण असें म्हणतात. ही गुरुत्वाकर्षण-शक्ति आपण भूमध्यरेपेकडून जसजसें ध्रुवाकडे जाऊं तसतशी वाढत जाते. दिलेल्या वेळांत एखादी वस्तु किती खालीं पडते हें अंतर काढावयाचें असल्यास त्या वेळाच्या सेकंदाच्या वर्गास १६·१ या संख्येनें गुणिलें असतां काढत येतें.

**पदुआ**—इटलीमधलें एक प्रसिद्ध पुरातन शहर. हें व्हेनिसच्या पश्चिमेस २५ मैल आहे. लोकसंख्या सुमारें दीड लक्ष आहे. इ. स. ५४० मध्यें ग्रीक व १४०५ सालीं व्हेनिशियन व १७९७ मध्यें ऑस्ट्रियन आणि १८६६ सालीं इटालियन यांचें या शहरावर आधिपत्य आलें. उच्च विद्या व कला, घोडे आणि लोंकर यांसाठीं हें प्रसिद्ध आहे. फ्राञ्झो डेला रागिआन, सेंट ॲन्थनीचें मंदिर व १२२८ त स्थापन झालेलें विद्यापीठ या इमारती प्रेक्षणीय आहेत. पदुआ विद्यापीठांत गॅलिलिओ, टासो यांसारखे विद्यार्थी शिकत होते. येथें कारखानेहि बरेच आहेत.

**पद्मपुराण**—आपल्या अठरा पुराणांतील एक आद्यपुराण. ज्या वेळीं हें जग सुवर्णपद्माप्रमाणें होतें त्या वेळचें या जगाचें वर्णन यांत आलें आहे. श्लोकसंख्या ५५,००० आहे. याच्या विविध प्रतींचा एकमेकींशीं मेळ बसत नाहीं. पुण्याच्या आनंदाश्रम प्रतींत १ आदिखंड, २ भूमिखंड, ३ ब्रह्मखंड, ४ पातालखंड, ५ सृष्टिखंड व ६ उत्तरखंड अशीं ६ खंडें दिलीं आहेत. परंतु याच प्रतींत सृष्टिखंड पांचवें यांत अनुक्रमें पौष्कर, तीर्थ, राज, वंशानुचरित व मोक्ष अशीं पर्वनांवें दिलीं आहेत. उत्तरखंडांत सृष्टिखंड, भूमिखंड, पातालखंड, पुष्कर व उत्तर असा नामनिर्देश आहे. संशोधित बंगाली प्रतींत सृष्टिखंड, भूमिखंड, स्वर्गखंड, पातालखंड व शेवटीं उत्तरखंड असा क्रम आहे.

**पद्मिनी** (१४ व्या शतकाचा आरंभकाल)—ही सिंहोलीचा राजा हमिरसिंग याची मुलगी व चितोडच्या लक्ष्मणसिंग राण्याचा चुलता भीमसिंग याची बायको असून अत्यंत रूपवती म्हणून प्रसिद्ध आहे. दिल्लीचा बादशहा अल्लाउद्दीन खिलजी यानें तिचा मोह धरून चितोडच्या किल्ल्यास वेढा दिला. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां केवळ आरशांतील दर्शनानें तृप्त होऊन परत जाण्याचें कबूल केल्यावर त्याप्रमाणें परत जातांना गडाबाहेर निरोप द्यावयास आलेल्या भीमसिंगास विश्वासघातानें कैद केलें. परंतु राणी पद्मिनी हिनें ठकास महाठक होऊन दासींचा लवाजमा म्हणून ७०० पालख्यांतून सशस्त्र लोक पाठवून तिनें त्याची सुटका करवली. या प्रसंगीं पद्मिनीच्या माहेरचे बादल व गोन्हा हे प्राणांस मुकले. पद्मिनी, बादल व गोन्हा यांच्यावर या प्रसंगाबाबत अनेक काव्यें झालीं आहेत. चितोडवर खिलजीनें पुन्हां स्वारी केली. परंतु त्याचा हेतु सफळ झाला नाहीं. चितोड पडलें पण पद्मिनीनें व इतर रजपूत स्त्रियांनीं जोहार केला. मलिक महंमद जायसी या कवीनें पद्मावत नांवाचें हिंदींत जें पद्मिनीवर काव्य केलें आहे त्यांतील कथानक सर्वच ऐतिहासिक वाटत नाहीं. तेव्हां मेवाडच्या संशोधकांनीं याची व टॉडच्या राजस्थान ग्रंथाची छाननी करण्याचें चालविलें आहे.

**पॅन-इस्लामवाद**—सार्वमुस्लिम-संघटनावाद. 'पॅन-इस्लामिझम' म्हणजे जगांतील सर्व ठिकाणच्या मुस्लिम जनतेनें राजकारणांत पूर्ण सहकारिता करावी, व अखेर सर्व मुस्लिमांचें एक साम्राज्य किंवा संघराज्य स्थापावें, या हेतूनें चालू असलेली चळवळ. अखिल जगांत मुस्लिमांची एकंदर लोकसंख्या ३० कोटी आहे. मुसलमानी धर्मांचें मूलभूत तत्त्व, सर्व मुस्लिम बंधूबंधु आहेत, असें आहे. तसेंच सर्व सच्चा मुस्लिमांनीं खलिफाची स्थापना करून त्याच्याकडे सर्व मुस्लिम प्रदेशावर राज्यकारभार करण्याची सत्ता दिली, असा पूर्वींचा इतिहास आहे. आधुनिक काळीं ही चळवळ १८८० च्या सुमारास सुरू होऊन तुर्कस्तानचा सुलतान अबदुल हमीद (२ रा) यास खलिफाची गादी देण्याचा प्रयत्न झाला, पण तो निष्फळ ठरला. नंतर १९११ सालीं पॅन-इस्लामिक कॉंग्रेसचें अधिवेशन भरविण्याचा प्रयत्न करण्यांत आला, पण तोहि यशस्वी झाला नाहीं. १९१४-१९१८ च्या महायुद्धांत खलिफाची सत्ता कमकुवत ठरली, कारण तुर्कस्तानच्या सुलतानानें दोस्त राष्ट्रांविरुद्ध जिहाद ऊर्फ धर्मयुद्ध पुकारलें, पण त्यास मुस्लिमांचा पाठिंबा मिळाला नाहीं, आणि अरबी व हिंदी मुसलमान इस्लामी तुर्कांविरुद्ध लढले. पहिल्या महायुद्धानंतर केमल आतातुर्क यानें सुलतानाची व खलिफाची सत्ता नष्ट केली, आणि तुर्कस्ताननें धर्मरहित राज्यकारभार मान्य केला. तेव्हां या चळवळीचें केंद्र तुर्कस्तानऐवजीं अरबस्तान बनलें; आणि खलिफाची गादी पुन्हां प्रस्थापित करण्याचा विचार चालू झाला; व कायरो येथें खलिफत कॉंग्रेस आणि १९२६ सालीं मक्का येथें ऑल मॉस्लेम कॉंग्रेस भरविण्यांत आली, पण निर्णय कांहींच ठरला नाहीं. खलिफाच्या गादीवर हक्क सांगणारे बरेच उमेदवार पुढें आले; त्यांत हेद्‌जाझचा राजा हुसेन, राजा इब्न सौद, ईजिप्तचा राजा व जेरुशलेमचा ग्रॅंड मुफ्ती एमिन एल् हुसेनी हे प्रमुख होते. प्राचीन खलिफांचें साम्राज्य लय पावल्यानंतर आधुनिक काळांत मुस्लिमांचें साम्राज्य केव्हांहि अस्तित्वांत आलें नाहीं; आणि वंशीय, प्रादेशिक व आर्थिक मतभेद दूरवर पसरलेल्या इस्लाम धर्मीयांत असल्यामुळें मुस्लिम साम्राज्य यापुढें स्थापन होण्याची शक्यता दिसत नाहीं. तथापि पॅन-इस्लामिक तत्त्वाचा धार्मिक दृष्ट्या उपयोग इस्लामी जनतेचें राष्ट्रीय स्वातंत्र्य प्रस्थापित करण्याच्या कामीं करण्यांत येत आहे, आणि स्वातंत्र्यप्राप्तीबाबत एकमेकांना सहानुभूतीचे संदेश देण्यात येत आहेत. १९३८ सालीं सीरियामध्यें व ईजिप्तमध्यें भरलेल्या मुस्लिम परिषदांत पॅलेस्टाइनचा प्रश्न अरबांच्या इच्छेनुसार मिटविला पाहिजे, या मताला जोर लागला. १९३४ सालीं तुर्कस्तान, इराक, इराण व अफगाणिस्तान यांच्यामध्यें झालेला राजकारणांत सहकार्य करण्याबाबतचा, सादाबादचा करार पॅन-इस्लामी संघ

पनविण्याचा पाया आहे, असें मानण्यांत येत असून, सौदी अरबस्तानच्या ईजिप्त व इराक यांबरोबर झालेल्या दोस्तीच्या तहांत 'इस्लामी प्रामाणिकपणा' बद्दलचे स्पष्ट उल्लेख आहेत. ही सर्व चळवळ अद्यापि तात्त्विक स्वरूपांत असली तरी पॅन–इस्लामी वाद हा यापुढें इस्लामधर्मी जनतेच्या राजकारणांत कायमचें स्थान धरून राहणार, हें निश्चित आहे.

हिंदुस्थानांत पाकिस्तान झालें आहे तरी तें वायव्य सरहद्दीवरील पठाणिस्तानला प्रतिकूल आहे. यामुळें हिंदी मुसलमान व पठाण यांच्यांत शत्रुत्व उत्पन्न झालें आहे. तिकडे पॅलेस्टाइनमध्यें ज्यू लोकांनीं आपलें स्वतंत्र राज्यहि स्थापलें. त्याला यशस्वी प्रतिकार अरबी राष्ट्रांना करतां आला नाहीं. यावरून ही चळवळ फक्त धर्मवेड्या मुसलमानांतच जीव धरून आहे असें दिसेल.

**पनवेल**—मुंबई, कुलाबा जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ ३०९ चौ. मै.. पनवेल व उरण हीं दोन गांवें व २१६ इतर खेडीं. लो. सं. (१९४१) ९२,७२४. उरण पेटा वेगळा केला असून त्याची लो. सं. ३१,५२१ आहे. पनवेलच्या बहुतेक सर्व बाजूंस पर्वतश्रेणी आहेत. उन्हाळ्यांत पाण्याची टंचाई असते. उरण भागांतील जमीन बहुतेक खारी आहे. तालुक्यांत बरेच तलाव आहेत. पनवेल गांव पुणें–मुंबई रस्त्यावरील मोठा गांव आहे. लो. सं. १०,०००. १८५६ पासून म्यु. कमेटी आहे. हें एक जुनें बंदर आहे. १५७० च्या सुमारास येथून युरोपकडे व्यापार होत असे. ही घाटावरील मालाची उतारपेठ होती. शिवाजीच्या वेळीं हें लहानसें आरमारी ठाणें होतें. कर्नाळा किल्ला (पाहा) महत्त्वाचा आहे. १७७८ त मराठे-इंग्रज यांमध्यें येथें लढाई झाली; व १७८१ त येथें गाडर्डला माघार घ्यावी लागली. १८१७ त इंग्रज–पेंढारी लढाई येथेंच झाली. वासुदेव बळवंत फडके हे पहिले क्रांतिकारक याच तालुक्यांतील शिरढोणचे होत. १९३० सालीं चिरनेर येथें जंगल सत्याग्रह झाला तो फार गाजला.

येथें पुराणिकांचा आयौषधींचा प्रसिद्ध कारखाना आहे. कॉ. ए. सो. चें एक हायस्कूल व सरकारी अध्यापनशाळा आहे. तसेंच सूतिकागृह, व्यायामशाळा, वाचनालय, इ. संस्था आहेत.

**पनामा**—मध्य अमेरिकेंतील एक लोकसत्ताक राज्य. क्षेत्रफळ ३,२३८० चौ. मै.. लो. सं. ६,३५,८३६. स्पॅनिश, रेड इंडियन व नीग्रो यांच्यापासून झालेल्या मिश्र लोकांची संख्या जास्त आहे. पनामा शहर राजधानी असून त्याची लो. सं. १,११,८९३. येथें एक विद्यापीठ आहे. पनामा आखातांत ३६ मोठीं व १०० लहान बेटे आहेत. पनामा संस्थानांत १९०४ पासून प्रजासत्ताक राज्य सुरू झालें. या संस्थानांत तीन मोठ्या नद्या आहेत. सोनें, तांबें, मीठ, लोखंड, वगैरे खनिज द्रव्यें सांपडतात. खनिजोदकाचे झरे आहेत. व्यापार बराच मोठा चालतो.

१४९९ मध्यें आलोन्सोडे ओजेडा हा पहिला युरोपियन येथें आला असावा. १८२१ सालीं स्पेनपासून पनामानें स्वातंत्र्य मिळविलें व १९०३ सालीं हें लोकराज्य झालें. १९०३ मध्यें पनामा कॅनॉल झोन अमेरिकन संयुक्त संस्थानास ३१,२५,००० रु. एकदम व ८,४३,७५० रु. सालीना खंडणी या करारावर देण्यांत आला. अमेरिकन संयुक्त संस्थान सरकारनें तेथें जगप्रसिद्ध पनामा कालवा बांधून ॲटलांटिक व पॅसिफिक महासागर एकमेकांस जोडले.

**पनामा कालवा**—याचें क्षेत्रफळ ५३३ चौ. मैल व या बाजूची लो. सं. ५१,८२९ आहे. कॅरिबियन समुद्र आणि पनामा आखात यांमध्यें हें क्षेत्र असून पनामा कालव्याच्या आंतल्या दोहों बाजूंस पांच पांच मैल पसरलें आहे. संयुक्त संस्थाननें हें क्षेत्र पनामा संस्थानापासून खरेदी केलें. बालबोआ, अँकॉन व क्रिस्टोबल हीं तीन शहरें या भागांत आहेत.

पनामा कालव्यानें ॲटलांटिक आणि पॅसिफिक समुद्र जोडले गेले आहेत. याची लांबी ५०.७२ मैल आहे. या कालव्याची कमाल रुंदी १००० फूट असून सरासरी खोली ६४९ फूट आहे. १९०४ सालीं हा बांधण्यास सुरुवात होऊन १९२० सालीं पुरा झाला. यांतून दरसाल सुमारें पांच हजार गलबतें जातात. हा ओलांडून जाण्यास सातआठ तास लागतात. यांत दारांची सोय केली असल्यानें पाणी समुद्रसपाटीच्याहि वर ८५ फुटांपर्यंत चढवितां येतें. या कालव्यामुळें दक्षिण अमेरिकेला घालावा लागणारा मोठा वळसा वांचतो.

**पॅनूथीऑन**—हें रोम शहरांत खि. पू. २७ सालीं मार्कस आग्रिप्पा यानें बांधलेलें देवालय आहे. याचा घुमट जगात सर्वांत सुंदर आहे. त्याचा आंतील व्यास १४२½ फूट असून आंतील उंची १४३ फूट आहे. हल्लीं रोम शहरांत हा घुमट ला रोटोंडा या नांवानें प्रसिद्ध आहे. पॅरिस शहरांत असेंच देवालय १७६४ ते १७८९ च्या दरम्यान बांधलेलें असून आंत अनेक प्रसिद्ध पुरुषांचीं थडगीं आहेत.

**पन्नादाई**—एक स्वामिभक्त दाई. महाराणा संग याचे पुत्र रत्नसिंह, विक्रमाजित व उदयसिंह असे असून त्यांत उदयसिंह (पाहा) हा फार लहान होता. उदयसिंहाची आई ही गुजराथच्या बहादुरशहानें चितोडवर स्वारी केली त्या वेळच्या जोहारांत मेली. तेव्हां दरबारच्या मंडळींनीं उदयसिंहास संरक्षणासाठीं दूर पाठवून दिलें होतें. संगराण्याचा भाऊ पृथ्वीराज यांच्या रखेलीपासून झालेला पुत्र बनवीर यानें राज्याच्या अभिलाषानें विक्रमाजितास ठार केलें व उदयसिंहास

पनामा कालवा — 'न्यू झीलंड' बोट जात आहे (पृ. १४२०)

पॅरिस — सीन नदीचा देखावा (पृ. १४३४)

पर्सेपोलिस — राजवाड्याचा जिना (पृ. १४३७)

पॉपी — पुढील बाजूस फोरम आणि ज्यूपिटरचें देऊळ यांचे अवशेष व मागील बाजूस जिवंत व्हेसुव्हिअस ज्वालामुखी आहे (पृ. १४६७)

ठार करण्याच्या उद्देशानें तो निद्रित असलेल्या उदयसिंहाकडे आला. पन्नादाईस बनबीराचा कावा पूर्वीच कळल्यानें तिनें आपल्या मुलास उदयसिंहाच्या पलंगावर निजवून ती उदयसिंहासह सुखरूप स्थळीं गेली. बनबीरानें उदयसिंहाबद्दल विचारताच तिनें पलंगाकडे बोट दाखवलें. तेव्हां पलंगावरील तिच्या मुलास उदयसिंह समजून बनबीरानें ठार केलें. हा उदयसिंह पुढें मोठा होऊन १५४१ त त्यानें आपलें राज्य परत मिळविलें. ( उदयसिंह पाहा. )

**पन्ना संस्थान**—मध्य हिंदुस्थान, जुन्या बुंदेलखंड पोलिटिकल एजन्सींतील एक संस्थान. क्षेत्रफळ २५८० चौ. मैल. पन्ना ( विंध्याद्रीचा एक भाग ) पर्वतानें बराच भाग व्यापला आहे. त्यांत हिऱ्याच्या खाणी आहेत. हवा उष्ण पण आरोग्यदायक. पर्जन्यमान ४२ इंच. जंगलहि बरेंच आहे. येथील संस्थानिक ओर्च्छी रजपूत बुन्देले आहेत. छत्रसाल याच घराण्यांतला. पन्ना संस्थानची लो. सं. २,३१,१७०. खेडीं १००८. हिऱ्याच्या खाणीचें सालीना उत्पन्न ४ लाख. पन्ना राजधानीचें शहर. वस्ती सुमारें १५ हजार. संस्थान आतां विंध्यप्रदेश संघांत सामील झालें आहे.

**पन्हाळा किल्ला**— कोल्हापूरच्या वायव्येस दहा मैलांवर हा सह्याद्रीच्या एका शिखरावर बांधलेला आहे. समुद्रसपाटीपासून उंची ३०४७ फूट. घेर ४॥ मैल. वर जाण्यास दगडी पायऱ्या बांधलेल्या आहेत. १८४४ त येथील गडकरी गडकऱ्यांच्या बंडांत सामील झाल्यामुळें इंग्रजांनीं घेतला होता. उत्तरेस एक मोठा तलाव आहे व किल्ल्यांत दोन विहिरी आहेत.

येथें पाराशर ऋषि राहत होता, अशी दंतकथा आहे. जुन्या शिलालेखांत याचें नांव पद्मनाल असें आढळतें, तर करवीर पुराणांत पन्नगालय असें दिसतें. ११९१–९२ मधील एका ताम्रपटांत पन्हाळा हें शिलाहार दुसरा भोज याचें राजधानीचें शहर होतें असें म्हटलें आहे. त्यापूर्वी हा राजा कोल्हापूरच्या उत्तरेस वळवडें येथें राहत असे. यानें एकंदर पंधरा किल्ले बांधले. १३९६ त किल्ल्याच्या आग्नेयीस नभापूर नगर स्थापल्याचा उल्लेख आढळतो. १४८९ मध्यें विजापूरकरांच्या ताब्यांत हा किल्ला होता. तत्कालीन बरेच शिलालेख किल्ल्यांत आढळतात. १६५९ त शिवाजीनें अफजुलखानास मारल्यावर सिद्दी जोहारनें त्यास या किल्ल्यास वेढा घालून अडवून ठेवलें होतें; येथून तो रांगण्यास गेला. यानंतर या किल्ल्याची हातपालट एकदोन वेळ झाली. याच किल्ल्यावर शिवाजीनें संभाजीस कैद करून ठेवलें होतें. १६८९ त हा किल्ला मोंगलांकडे गेला. तो १६९२ त परशुराम त्रिंबक प्रतिनिधीनें परत घेतला. १७०१ मध्यें तो औरंगजेबानें घेतला, पण लवकरच तो रामचंद्रपंत यानें परत मिळविला. १७०५ मध्यें ताराबाईनें येथें आपली गादी स्थापली. १७०९ मध्यें हा शाहूनें घेतला, परंतु लवकरच तिनें तो परत घेतला. तेव्हांपासून तो कोल्हापूरकरांच्या ताब्यांत आहे. १८४४ च्या बंडांत येथें ओव्हन्स या साताऱ्च्या रेसिडेंटास कैद करून ठेवलें होतें.

या किल्ल्यावर बरीच वस्ती आहे. दोन तळीं आहेत. मामलेदार कचेरी वगैरे सरकारी कचेऱ्या आहेत. आंत एक बालेकिल्ला फार जुना आहे. त्यांत कांहीं इमारती आहेत. कोल्हापूरचा संभाजी व जिजाबाई यांच्या छत्र्या आहेत. येथें पूर्वी नरमेध होत असे असें म्हणतात. किल्ल्याच्या दक्षिणेस एक गुहा आहे, तीस पाराशर ऋषीची गुहा म्हणतात.

**पंप** ( इ. स. दहावें शतक–पूर्वार्ध )—हा दिगंबर जैन पंथी कानडी कवि मूळचा वेंगी प्रांतांतील ब्राह्मण घराण्यांतील होय. याच्या बापानें प्रथम जैन धर्म स्वीकारला. दुसरा अरिकेसरिन् चालुक्य या आपल्या आश्रयदात्याच्या इच्छेवरून यानें 'भारत' किंवा 'विक्रमार्जुनविजय' हा चंपूरूप ग्रंथ लिहिला असून त्यांत अरिकेसरिनची अर्जुनाशीं तुलना केली आहे. यानें या ग्रंथापूर्वी शके ८६३ मध्यें 'आदिपुराण' नांवाचा एक कानडी ग्रंथ पुलिगरे ( हल्लींचें लक्ष्मेश्वर ) येथें लिहिला असून तोहि चंपूरूप आहे. त्यांत यानें पहिल्या तीर्थंकराचें चरित्र लिहिलें आहे. याचा हाच ग्रंथ विशेष लोकप्रिय ठरला आहे. कर्नाटकांतील लोकांत आदिपंप या नांवानें हा कवि सुप्रसिद्ध आहे.

**पंप**—कोणताहि द्रवरूप अगर वायुरूप पदार्थ एका बाजूकडून उचलून दुसऱ्या बाजूस टाकणें किंवा त्याला जोरानें दाबणें याला जें यंत्र लावलें जातें त्याला साधारणपणें पंप असें नांव आहे. ज्या कामासाठीं जो पंप वापरला जातो त्याचें नांव त्याला देतात. उदा., हवा ( एअर ) पंप, पाणी ( हायड्रॉलिक ) पंप, इत्यादि. पंपाचें कार्य मुख्यतः पोकळी उत्पन्न ( सक्शन ) करून त्यामुळें जो द्रव किंवा वायुरूप पदार्थ वर येईल तो पुनः उचलून बाहेर टाकणें किंवा दाबणें हें असतें. बहुतेक सर्व पंपांमध्यें नळकांड्यांत ( सिलिंडरमध्यें ) दट्ट्या ( पिस्टन ) चालत असतो. सिलिंडरमध्यें पिस्टन वायुरोधी ( एअर टाइट ) बसविलेला असतो. सिलिंडर एका बाजूनें बंद असतो त्या बाजूला हवाबंद दोन पडदे ( व्हाल्व्ह ) बसविलेले असतात. एक द्रव किंवा वायु आंत घेणारा व दुसरा बाहेर जाऊं देणारा. सिलिंडरमध्यें पिस्टन पुढें येऊं लागतो व त्यामुळें जी पोकळी निर्माण होते त्या पोकळीमध्यें पदार्थ आंत घेणाऱ्या पडद्याला शोषक ( सक्शन ) पडदा म्हणतात. तो उघडतो व पदार्थ आंत येतो. पिस्टन परत जातांना जो दाव उत्पन्न होतो त्यामुळें शोपक पडदा बंद होतो व पदार्थ बाहेर जाऊं

देणारा पडदा–ज्योला निष्कास ( एक्झास्ट ) पडदा म्हणतात तो–उघडतो व त्यांतून पदार्थ बाहेर जातो. हवा काढण्यास हा पंप लावला असतां याला वातार्कर्पक पंप ( एअर पंप ) म्हणतात. बंद भांड्यांतून हवा किंवा वायु काढून निर्वात पोकळी निर्माण करणाऱ्या पंपास निर्वातक ( व्हॅक्यूम ) पंप म्हणतात. पाणी काढणाऱ्या पंपास पाणपंप आणि पाणी दाबणाऱ्या पंपास जल-पीडक ( हायड्रॉलिक ) पंप म्हणतात. कोणताहि वायु दाबण्यास जो पंप वापरला जातो त्याला संपीडक ( कॉम्प्रेसर ) म्हणतात. जेव्हां जेव्हां दाब उत्पन्न करावयाचा असेल तेव्हां पंपामधून बाहेर जाणारे पदार्थ बंद जागेंतूनच गेले पाहिजेत, तरच दाब उत्पन्न करतां येतो.

पाण्यासाठीं केन्द्रापसारी ( सेंट्रिफ्यूगल ) नांवाचा एक पंपाचा प्रकार आहे. एखाद्या दोरीला वजन बांधून तें जोरानें फिरविलें असतां दोरीला एक तऱ्हेचा जोर उत्पन्न होऊन तें वजन बाहेर फेकलें जात असतें. याचाच उपयोग या पंपामध्यें केला जातो. एका बंद जागेंत पंख्याच्या योगानें पाणी जोरानें फिरविले जातें. पुरेसा जोर आला म्हणजे नळीवाटें पाणी बाहेर फेकलें जाऊन तेथें पोकळी उत्पन्न होते. या पोकळीमध्यें हवेच्या दाबामुळें बाहेरचें पाणी आंत येतें व पुनः हेंच पाणी बाहेर फेकलें जातें. अशा तऱ्हेनें हा पंप चालतो. हे पंप चालू करतांना त्यांत पाणी भरावें लागतें. चक्रवर्ती ( रोटरी ) पंप नांवाचा जो एक पंप आहे त्यामध्यें एका बंद जागेंत एकांत एक बसणारीं दांत्याचीं दोन चक्रें असतात. यांत पाणी येणारीं व जाणारीं तोंडें एकमेकांच्या विरुद्ध बाजूस असतात. हीं चाकें फिरावयास लागलीं म्हणजे पंपांतील पाणी निष्कासना( डिलिव्हरी )च्या बाजूनें बाहेर लोटलें जातें. यामुळे पोकळी उत्पन्न होऊन शोपका( सक्शन )च्या बाजूनें पाणी आंत येतें. याच तत्त्वावर वायुरूप पदार्थ दाबण्याचेहि जे पंप बनविलेले असतात त्यांना 'रोटरी ब्लोअर' किंवा 'कॉंप्रेसर' म्हणतात.

**पपनस**—हें फळ मलायाकडील असावें व बहुधा १७ व्या शतकांत जावा बेटामार्फत तें इकडे आलेलें दिसतें. याला बाराहि महिने फळें येतात. फळ साधारण भोपळ्याएवढें असतें व पिकलेलें पिवळें होतें. आंतील गीर तांबडा पाकळ्यांचा असतो. हें फळ औषधी आहे. अरुचीवर देतात.

**पपयी**—पोपई. [ लॅ. कॅरिका पपया ]. ही संज्ञा पोर्तुगीज आहे. हें झाड मूळचें दक्षिण अमेरिकेतलें पण आतां सर्व जगभर तें पसरलें आहे. उष्ण कटिबंधांत त्याची लागवड फार होते. १६५६ मध्यें हिंदुस्थानांतून चीनमध्यें गेलें. पोपया हा अत्यंत पाचक आहे. याच्या फळाच्या चिकापासून पपेन नांवाचें फार मौल्यवान् औषध तयार होतें. अजीर्ण, अग्निमांद्य, वगैरे विकारांवर उत्तम. त्याच्या ठिकाणीं औषधाच्या दसपट केसिन विरविण्याचा धर्म आहे. कीड, गजकर्ण, मूळव्याध, वगैरेवर कच्च्या फळांचा चीक लावतात. यांत नर व मादी असे प्रकार आहेत. नराला फुलांचे लांब तुरे येतात, पण मादीला पानांच्या काखांत फुलें येतात.

**पंपा प्रदेश**—दक्षिण अमेरिकेंतील अर्जेंटिना संस्थानामधला मैदानी मुलूख. अँडिअन पर्वतापासून पराणा नदी व अटलांटिक महासागर योंपर्यंत हा पसरला आहे. पंपा नांवाची एक गवताळ वनस्पति वाढते व तिला १०।१२ फुटांचे रेशमासारखे तकतकीत व मऊ तुरे येतात.

**पंपा सरोवर**—किष्किंधेजवळ पंपा सरोवर असल्याचें रामायणांत आहे. सांप्रतचें अनागोंदी शहर हेंच पूर्वीची किष्किंधा असावी असें म्हणतात. पंपा सरोवर हल्लींच्या हंपी शहराजवळ तुंगभद्रेच्या उत्तर तीरीं असावें असा समज आहे. पंपा सरोवराबद्दल नदीचेंच तामिळ रामायणातील वर्णन कांहीं तरी चुकीनें झालेलें असावें.

**पवना**—बंगाल, एक जिल्हा. १८३२ मध्यें हा जिल्हा राज-शाहीमधून तोडून नवा केला गेला. क्षेत्रफळ १८३६ चौ. मै.. पर्जन्यमान ६१ इंच. लोकसंख्या ( १९४१ ) १७,०५,०७२. दोन गांवें पबना व सिरागंज आणि २५३७ खेडीं जिल्ह्यांत आहेत. भाषा उत्तर बंगाली. शेंकडा ७५ मुसलमान व ६८ शेतकरी आहेत. तांदूळ, गळिताचीं धान्यें, ताग हीं मुख्य पिकें आहेत. बरल, हुरासागर, पद्मा व ब्रह्मपुत्रा या नद्यांच्या पात्रांतून मालाची ने-आण होते. बंगाल स्टेट रेल्वेहि या जिल्ह्यां-तून जाते. पबना गांवाची लोकसंख्या तीस हजार. १८७६ पासून म्युनि. कमेटी आहे. शिक्षणसंस्था पुष्कळ आहेत.

**पब्लिक प्रॉसिक्युटर**—इंग्लंडांत सर्व फौजदारी खटले फिर्यादी सरकारतर्फे चालविण्याकरितां जो अधिकारी नेमलेला असतो त्याला पब्लिक प्रॉसिक्युटर म्हणतात. महत्त्वाचे किंवा अवघड फौजदारी खटले सरकारी सॉलिसिटर चालवितो. हिंदु-स्थानांत क्रिमिनल प्रोसिजर कोड यांत फौजदारी गुन्ह्यांचे ( १ ) कॉग्निझेबल, आणि ( २ ) नॉन्-कॉग्निझेबल असे दोन प्रकार केलेले असून कॉग्निझेबल गुन्हे मात्र फिर्यादी सरकार चालवितें, आणि खटल्याचा सर्व खर्च म्हणजे वकिलाचा खर्च, तसेंच साक्षीदारांचा भत्ता, भाडेखर्च, वगैरे सरकार करतें.

**पयोष्णी**—( पूर्णा ). एक नदी. सातपुडा व अजंठा डोंगर यांच्यावरील पाणी या नदीस येऊन मिळतें. वऱ्हाड व खानदेश यांतून वाहत जाऊन हीं चांगदेव येथें तापीस मिळते. पयोष्णी-

माहात्म्य ग्रंथात हिच्या कांठचीं स्थळें वर्णिलीं आहेत. हिच्या कांठीं असलेल्या सावळापूरची विष्णुमूर्ति चित्ताकर्षक आहे. पूर्णा पाहा.

**परकीय**—(एलिएन). एखादा इसम ज्या देशांत राहत असतो त्या देशाबाहेर तो जन्मलेला असेल आणि ज्या देशांत राहत असतो त्या देशाचें नागरिकत्व म्हणजे तेथल्या प्रजाजनांचे सर्व हक्क त्याला प्राप्त झालेले नसतील तर अशा इसमाला परकीय (एलिएन) म्हणतात. ब्रिटनमध्यें परदेशीय इसमांबद्दल वारंवार कायदे झालेले असून १८७० सालचा एलिएन्स ॲक्ट हा कायदा हल्लीं अशा परकीयांना लागू आहे. आणि १९१४ चा 'ब्रिटिश नॅशनॅलिटी ॲंड स्टेट्स ऑफ एलिएन्स ॲक्ट' हा कायदा १९१८ व १९२२ सालीं झालेल्या दुरुस्त्यांसह अशा इसमांना लागू आहे. सदरहू कायद्यांनीं अशा परकीय इसमांवर निर्बंध आहेत ते—(१) परकीय इसमांना मिळकत विकत घेतां येते. परंतु मिळकतीचा मालक असला तरी त्याला सरकारी नोकरीचा किंवा दुसरा विशेष हक्क नसतो, आणि निवडणुकींत मतदानाचा हक्क नसतो. (२) अशा परकीयांना सर्व दिवाणी व फौजदारी कायदे लागू असतात. (३) असा इसम वेडा, किंवा गुन्हेगार, किंवा निर्वाहाचें साधन नसलेला असा असेल तर त्याला देशांत येण्याची परवानगीच देण्यांत येत नाहीं. आणि अगोदरच राहत असून नंतर वरील स्थिति प्राप्त झाली तर त्याला देशाबाहेर घालवून देण्यांत येतें. १९१४ सालीं मंजूर झालेला आणि १९१९ सालीं दुरुस्त झालेला एलिएन्स रिस्ट्रिक्शन्स ॲक्ट या कायद्यानें परकीय इसमाविरुद्ध अधिक कडक उपाययोजना करण्याचा अधिकार सरकारला दिलेला आहे. अशा परकीय इसमाचीं जीं मुलें ब्रिटनमध्यें जन्म पावतील त्यांना ब्रिटिश प्रजाजनांचे हक्क प्राप्त होतात. परकीय इसमांना ब्रिटिश प्रजाजन होण्याचे मार्ग आहेत ते—(१) पार्लमेंटच्या विशेष कायदा करून नागरिकत्व देणें; (२) ज्या मूळ देशांतला तो इसम असेल तो देश ब्रिटनच्या अमलाखालीं येणें; (३) परकीय स्त्री असेल तर तिनें ब्रिटिश प्रजाजनाशीं लग्न करणें; (४) नागरिकत्वाचे हक्क प्राप्त होण्यासंबंधींच्या कायद्याप्रमाणें ते हक्क मिळविणें. (नागरिकत्व पाहा.)

अमेरिकेंत शांततेच्या काळांत बहुतेक संस्थानांतून परकीयांना कांहीं आडकाठी न येतां स्वतःची मालमत्ता करतां येते. प्रत्येक संस्थानाचे नागरिकत्वाबद्दलच निरनिराळे कायदे असतात. पांच वर्षांचा निवास हा नागरिकत्व मिळण्यास पुरेसा आहे.

**परज**—हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागतात, म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर ताडषड्ज व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीचा शेवटचा प्रहर आहे. यांत दोनहि मध्यमांचा प्रयोग होतो. याची प्रकृति चंचल आहे. यामुळें वसंत रागापासून हा निराळा आहे.

**परदेशगमन**—(एमिग्रेशन). एका देशांतील कांहीं इसमांनीं किंवा संघानीं दुसऱ्या देशांत, किंवा वसाहतींत स्थलांतर करणें, याला 'परदेशगमन' (एमिग्रेशन) म्हणतात. एमिग्रेशन आणि मायग्रेशन ह्यांत फरक आहे. मायग्रेशन म्हणजे एखाद्या लोकसमाजानें, किंवा एखाद्या वंशाच्या लोकांनीं एक भूप्रदेश सोडून दुसऱ्या भूप्रदेशांत राहावयास जाणें. कॉलनायझेशन (वसाहत करणें) याचा अर्थ वरील दोन प्रकारांहून निराळा आहे; तो असा कीं, परदेशांत वसाहत करणाऱ्या लोकांनीं तेथें आपलें स्वतंत्र राज्य स्थापणें, किंवा आपल्या मूळ देशांतील सरकारचें आधिपत्य स्वीकारून वसाहतींत राहणें. युरोपांत १७ व्या शतकापर्यंत परदेशगमनाचीं महत्त्वाचीं उदाहरणें—फ्लँडर्समधील लोक १४ व्या शतकांत इंग्लंडमध्यें जाऊन राहिले, आणि फ्रान्समधील प्रॉटेस्टंट लोक १६ व्या व १७ व्या शतकांत इंग्लंडमध्यें जाऊन राहिले—हीं आहेत. १७ व्या शतकांत अमेरिकेंत आणि पूर्वेकडील प्रदेशांत युरोपियन लोकांच्या वसाहतींची वाढ झाल्यावर स्पेन, पोर्तुगाल व ग्रेट ब्रिटन यांमधून पुष्कळ लोक अमेरिकेंत गेले, आणि नेदर्लंडमधील लोक पूर्वेकडील वसाहतींत गेले. १८ व्या शतकांत हें परदेशगमन थंडावलें. पण १९ व्या शतकांत युरोपांत औद्योगिक क्रान्ति (इंडस्ट्रियल रेव्होल्यूशन) झाल्यामुळें आणि शेतकीचा धंदा नष्ट होऊं लागल्यामुळें पुन्हां परदेशगमन मोठ्या प्रमाणांत सुरू झालें. या शतकांत युरोपमधून अमेरिकेंत पुष्कळ लोक गेले. विशेषतः आयर्लंडमधून संयुक्त संस्थानांत आणि जर्मनींतून दक्षिण अमेरिकेंत लोक गेले. याच शतकांत रशियांतून संयुक्त संस्थानांत जाऊं इच्छिणारे बरेच इसम मध्यंतरी युनायटेड किंग्डममध्यें राहिले. पूर्वेकडील देशांपैकीं चीन व जपान या देशांतून बरेच लोक संयुक्त संस्थानांत व ऑस्ट्रेलियांत राहावयास गेले आणि हिंदुस्थानांतून बरेच लोक उष्ण कटिबंधांतील ब्रिटिश वसाहतींत राहावयास गेले. लॅटिन वंशांतले आणि पीतवर्णी वंशांतले लोक परदेशगमन करतात, पण पुन्हां स्वदेशांत परत येण्याची इच्छा त्यांच्या मनांत असते. उलटपक्षीं ॲंग्लोसॅक्सन, ट्यूटॉनिक आणि स्लाव्ह वंशांतले परदेशगमन करणारे लोक कायमचेच परदेशांत राहण्याच्या उद्देशानें जातात.

ज्या देशाची वाढ व्हावयाची होती त्या देशांच्या सरकारांनीं आपल्या देशांत परकीयांना येऊन राहण्यास उत्तेजन दिलें, आणि त्यांच्या हिताचे कायदे मंजूर केले. उदाहरणार्थ, उत्तर अमेरिका, रशियन सायबेरिया, कॅनडा, बोलीव्हिया, चिली, वगैरे

देशांनीं परदेशीय लोकांची आपल्या देशांत (रिक्रूट) भरती होण्यास उत्तेजन दिलें. येणाऱ्या लोकांना मोफत वाहतुकीची सोय किंवा भाडेखर्चाला मदत, एजंटांना कमिशन, वगैरे युक्त्या साउथ वेल्स, नाताळ आणि दक्षिण अमेरिकेंतील कित्येक देश यांनीं योजल्या. उलट पक्षीं निरुपयोगी किंवा उपद्रवकारक अशा परदेशी लोकांनीं आपल्या देशांत येऊं नये म्हणून वरील देशांनींच आगमनावर कडक निर्बंध घालणारे कायदे केले. उदाहरणार्थ, ऑस्ट्रेलियानें चिनी लोकांच्या आगमनाला निर्बंध घातले. १९०१ सालीं कॉमनवेल्थ इमिग्रेशन रिस्ट्रिक्शन ॲक्ट या कायद्यानें चिनी, जपानी व मलाई लोकांच्या आगमनाबद्दल त्यांना युरोपियन भाषेचे ५० शब्द व शुद्धलेखन लिहितां आलें पाहिजे, अशी अट घातली. न्यूझीलंडनें अशा येणाऱ्या प्रत्येक इसमावर १०० पौंड डोईपट्टी बसविली, आणि कानडानें १९०३ सालीं प्रत्येक चिनी इसमावर ५०० डॉलर डोईपट्टी बसविण्याचा कायदा केला. अमेरिकन संयुक्त संस्थानांत परकीयांच्या आगमनाला बरींच वर्षे मोकळीक होती. परंतु तेथेंहि १८८२, १८९३ आणि १९१७ सालीं निर्बंध घालणारे कायदे करण्यांत आले. १९२४ सालीं प्रत्येक देशांतल्या किती इसमांना संयुक्त संस्थानांत येण्याची दरसाल परवानगी द्यावयाची ती संख्या कायद्यानें निश्चित करण्यात आली.

हिंदुस्थान— पौराणिक काळांत हिंदुशास्त्रानें परदेशगमन निषिद्ध ठरविलें. तथापि सुमात्रा, जावा, इ. देशात समुद्रमार्गें हिंदू लोक गेलेच. १९ व्या शतकाच्या आरंभीं मजुरीसाठीं लोक परदेशांत जाऊं लागले. १८३४ सालीं ब्रिटिश वसाहतींतून गुलामांचा व्यापार बंद केल्यामुळें परदेशांतील धंदेवाले लोक हिंदुस्थानांतून मजूर नेऊं लागले. १८३४ ते १८३७ या काळांतच कलकत्ता बंदरांतून ७००० वर मजूर गेले. तेव्हां हिंदुस्थान सरकारचें याकडे लक्ष जाऊन या मजुरांच्या परदेशांतील स्वास्थ्यासाठीं कायदे करण्यांत आले. १९२२ चा कायदा व्यवस्थेशीर असून १९३८-३९ सालीं पुन्हां त्यांत दुरुस्त्या करण्यांत आल्या. बरेच मजूर परदेशांत स्थायिक झाले असून त्यांना तेथें कांहीं अटींवर नागरिकत्वाचे हक्कहि मिळाले आहेत; तथापि दक्षिण आफ्रिकेप्रमाणें समान हक्कांविषयीं राज्यकर्ते आणि हिंदी लोक यांमध्यें तंटे चालू आहेतच; व प्रश्न गुंतागुंतीचे होऊन बसले असून आता ते संयुक्त राष्ट्रसंघ कसे सोडवील तें पाहावयाचें आहे. हिंदुस्थानाबाहेर हिंदुस्थानचे सुमारें चाळीस लक्ष लोक जाऊन राहिले आहेत.

हिंदी परदेशगमनाचा कायदा—( इंडियन एमिग्रेशन ॲक्ट ). परदेशगमनाबाबतचे मागील कायदे दुरुस्त करून हा कायदा १९२२ सालीं मान्य करण्यांत आला, व त्यांत १९२८ सालच्या कायद्यानें दुरुस्त्या करण्यांत आल्या. 'परदेशगमन' याचा अर्थ, ब्रिटिश हिंदुस्थानाबाहेर समुद्रमार्गानें जाणें हा आहे. 'कौशल्याचें काम' ( स्किल्ड वर्क ) याचा अर्थ कोणतेंहि कारागिरीचें काम करणारा, किंवा कारकून व दुकानांतील मदतगार, किंवा चहाच्या किंवा फराळाच्या किंवा इतर सार्वजनिक ठिकाणीं नोकरी करणारा, किंवा घरकाम करणारा, किंवा इतर कोणतेंहि कौशल्याचें काम वरिष्ठ सरकार गॅझेटांत जाहीर करील तें करणारा इसम. 'बिनकौशल्याचें काम' याचा अर्थ शेतीचें काम व वरीलखेरीज इतर काम, असा आहे. परदेशगमन करणारांचा 'प्रोटेक्टर' या नांवाचा अधिकारी व एक मेडिकल इन्स्पेक्टर ज्या बंदरांतून कायदेशीरपणें परदेशगमन करतां येतें त्या बंदरांत प्रांतिक सरकारनें नेमावा. त्या प्रोटेक्टरनें पुढील कामें करावीं—( अ ) परदेशगमन करणारांना सल्ला देऊन मदत व संरक्षण द्यावें; ( ब ) कायद्यांतील सर्व कलमांची अमलबजावणी करावी; ( क ) सदर बंदरांत परदेशांत गेलेले जे प्रवासी परत येतील त्यांची प्रांतिक सरकार नियम करील तदनुसार तपासणी करावी; ( ड ) ज्या देशांत तो प्रवासी गेला त्या देशांत व तेथून परत येतांना प्रवासांत सदर प्रवाशाला कोणत्या प्रकारें वागविण्यांत आलें त्याची चौकशी प्रवाशाजवळ करावी; ( ई ) परत आलेल्या प्रवाशांना योग्य तो सल्ला व मदत द्यावी. ( कलमें ३ ते ६ ). ज्या देशांत परदेश-प्रवासी जातात, अशा प्रत्येक देशांत हिंदुस्थान सरकारनें ( गव्हर्नर-जनरल ) आपला एकेक एजंट नेमावा ( कलम ७ ). बिनकौशल्याचें काम करणारांनीं परदेशगमन कलकत्ता, मद्रास, मुंबई, कराची, नेगापट्टम, तुतिकोरिन व धनुष्कोडी या बंदरांखेरीज इतर बंदरांतून करणें बेकायदा आहे. तसेंच हिंदुस्थान सरकार गॅझेटमध्यें जाहीर करील त्या देशांत व त्या शर्तीवर परदेशगमन सदर इसमांनीं करावें, इतर देशांत जाणें बेकायदा आहे ( कलमें ९-१० ). कौशल्याचें काम करणाऱ्या इसमांनींहि हिंदुस्थान सरकार ठरवील त्याच बंदरांतून गेलें पाहिजे. अशा परदेश-प्रवाशास मदत करणारानें परवाना मिळण्याकरितां प्रांतिक सरकारकडे अर्ज करून व जरूर ती फी देऊन परवाना मिळवला पाहिजे. सदर अर्जांत ( अ ) परदेश-प्रवाशांची संख्या, ( ब ) कोणत्या ठिकाणीं जाणार त्या ठिकाणाचें नांव, ( क ) सदर प्रवासी परदेशांत राहील त्या काळांत त्याची व त्याच्यावर अवलंबून असलेल्या इसमांची आरोग्य व सुस्थिति राहण्याची व्यवस्था, ( ड ) असें कौशल्याचें काम करणाऱ्या इसमाच्या नोकरीच्या कराराच्या शर्ती, वगैरेबद्दल माहिती दिली पाहिजे ( कलमें १५-१६ ). या कायद्याचीं कलमें किंवा नियम मोडणाराला ५० पन्नास रुपयांपर्यंत दंडाची

शिक्षा, आणि बेकायदा परदेशगमनास मदत करणाराला पांचशें रुपयांपर्यंत दंडाची शिक्षा आहे ( कलम २५ ).

**परदेशी ( द्रव्य ) विनिमय**—( फॉरिन एक्स्चेंज ). एका देशाच्या पैशाची किंमत दुसऱ्या देशाच्या पैशांत जेव्हां ठरविली जाते तेव्हां म्हणतात. अशा परदेशी पैशाच्या वटावाचे दर नेहमीं प्रसिद्ध होत असतात. या दरावर पुढील गोष्टींचे परिणाम होत असतात : ( १ ) दोन देशांतील हुंड्या देण्याघेण्याचें प्रमाण जेव्हां हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांना लंडनला पुष्कळ पैसे भरावयाचे असतील, पण लंडनच्या हुंड्या मुंबईच्या बाजारांत फार कमी असतील ( म्हणजे लंडनच्या व्यापाऱ्यांना मुंबईचें देणें थोडें असेल ), तेव्हां एका पौंडाला द्यावे लागणारे रुपये ( हिंदी चलन ) वाढतील व वर्तावळा लंडनला फायदेशीर पडेल. ( २ ) देशाची तौलनिक चलनक्रयशक्ति. विदेशी हुंड्यांची मागणी आणि पुरवठा खालील गोष्टींवरून ठरत असतो : ( अ ) दोन देशांतील आयात-निर्यात व्यापारांतील फरक. ( आ ) एकमेकांचे वर्तावळ्याचे दर. यावरून एका देशांतून दुसऱ्या देशांत पैसा पाठविणें फायद्याचें कीं तोट्याचें हें समजून येतें. ( ३ ) ज्यामुळें पतीवर परिणाम होईल अशी देशाची राजकीय किंवा अन्य परिस्थिति. हिच्यावरून देशांत पैसा गुंतविण्याला मदत होते किंवा होत नाहीं. आज सर्व देशांतून कागदी नोटांचें अविनिमय चलन सुरू असल्यानें व सोन्याच्या स्थानांतरावर बंदी असल्यानें एका देशांतील मालाचे भाव दुसऱ्या देशांतील भावावर अवलंबून असत नाहींत. हे भावच चलनमर्यादेचें प्रमाण ठरवीत असतात. सोनें जर बाहेर धाडतां आलें तर विनिमयांत फरक पडत जाईल. कारण पैसे फेडण्यासाठीं हुंड्या विकत घेण्यापेक्षां सोनेंच धाडणें जास्त स्वस्त पडतें. अशा वेळीं विनिमयानें सुवर्णबिंदु गांठला असें म्हणतात.

**परदेशी व्यापार**—फार प्राचीन काळापासून देशादेशात मालांची देवघेव होत असली पाहिजे. तथापि औद्योगिक युग सुरू झाल्यापासून विशेषतः परदेशी व्यापार हा देशांना परस्पर फार फायदेशीर आहे हें कळून आलें. आगगाड्या आणि आगबोटी जेव्हां या क्रांतीनंतर सर्व देशांतून सुरू झाल्या तेव्हांच खऱ्या आंतरराष्ट्रीय व्यापाराला सुरुवात झाली असें म्हणतां येईल. महायुद्धाच्या काळांतच अशा व्यापाराचें महत्त्व पटतें. परदेशी व्यापारांतील मुख्य गोष्ट म्हणजे आयात आणि निर्गत व्यापारांतील फरक होय. या फरकामुळें देशाचा फायदा किंवा तोटा होत असतो. प्रत्यक्ष आयात-निर्गत व्यापाराखेरीज अदृश्य आयात-निर्गत व्यापार चालत असतो व तो हिशेबांत घेतल्याखेरीज देशाची खरी आर्थिक स्थिति काढतां येत नाहीं. अदृश्य बाबी दोन प्रकारच्या आहेत : एक सेवामूल्य आणि दुसरा व्याज किंवा मुद्दल यांची फेड. जहाजी व्यापार, विमा आणि उत्पन्नाचे धंदे यांपासून मिळणारें सेवामूल्य महत्त्वाचें असून त्याचा पैसा हुंड्याद्वारें मिळतो व त्यांचा उपयोग देशासाठीं बाहेरून माल विकत आणण्याकडे करतां येतो. कांहीं देशांना परकीय प्रवाशांपासून फार मिळकत होत असते ( व म्हणूनच आज इंग्लंडनें चालू आर्थिक अडचण टाळण्यासाठीं परदेशप्रवासास बंदी केली आहे ). परदेशांत भांडवल गुंतविण्यासाठीं तिकडे माल पाठविण्यांत येतो व या भांडवलावर व्याज किंवा लाभांश ( डिव्हिडंड ) देण्यांत येतो. यासाठीं परदेशांत पाठविलेला माल निर्यात या सदरांत हिशेबांत पडतो व ज्या भांडवलासाठीं माल पाठविलेला असतो त्यावरचा फायदा ही 'अदृश्य' आयात समजली जाते. हें व्याज किंवा लाभांश फार फुगला म्हणजे त्याऐवजीं मालच मागविण्यांत येतो व अर्थात् हा आयात सदरांत पडतो. याप्रमाणें पाहिल्यास आयात आणि निर्गत यांचे मूल्य प्रत्यक्ष हिशेबांत दिसतें त्यापेक्षां बदलेल.

**परभणी**—हैद्राबाद संस्थान, औरंगाबाद विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ ५१२७ चौ. मैल. हवा उत्कृष्ट. पर्जन्यमान ३४ इंच. हा भाग पूर्वी देवगिरीच्या यादवांकडे होता, परंतु १४ व्या शतकाच्या सुमारास अल्लाउद्दिनानें घेतला, तेव्हांपासून मुसलमानांकडे आहे. लोकसंख्या सु. आठ लाख. शेंकडा ९० हिंदु. भाषा शेंकडा ८८ लोकांची मराठी. शेंकडा ५३ शेतकरी. मुख्य पीक ज्वारी व कापूस. ह्या जिल्ह्यांतून आगगाडीचा फांटा गेला असून तो हैद्राबादला जातो. कापूस वठण्याच्या व गठ्ठे बांधण्याच्या गिरण्या बऱ्याच ठिकाणीं आहेत. परभणीस जिल्ह्याच्या मुख्य कचेऱ्या असून म्युनिसिपल कमिटी आहे.

**परमा**—( गोनोरिआ ). हा एक जननेंद्रियसंबंधींचा संसर्गजन्य रोग असून गोनोकॉक्स नांवाच्या जंतूपासून होतो. याचा संसर्ग इंद्रियद्वारां होतो. यावर योग्य उपचार केले नाहींत तर विशेषतः स्त्रियांच्या बाबतींत याचे फार दूरवर पोंचणारे अनिष्ट परिणाम होतात. याची तीव्रता दहा दिवसांपासून तीन आठवडेपर्यंत टिकते. या रोगाची बाधा संततीलाहि होत असते.

आयुर्वेदांत प्रमेह या मूत्ररोगविशेषाचे वीस प्रकार सांगितले आहेत. इक्षुमेह, सुरामेह, पिष्टमेह, सांद्रमेह, शुक्रमेह, उदकमेह, लालामेह, शीतमेह, सिकतामेह आणि शनैर्मेह हे दहा प्रकार कफजन्य आहेत. तसेंच मंजिष्ठमेह, हारिद्रकमेह, नीलमेह, रक्तमेह व क्षारमेह हे सहा प्रकार पित्तजन्य आहेत. आणि अस्थिमेह, वसामेह, मज्जामेह, मधुमेह हे चार प्रकार वातजन्य समजतात.

**परमांगनेत**—( परमँगॅनेट ). परमँगॅनिक ह्या अस्थिर अम्लाचें लवण. पोटॅशियम परमँगॅनेट हें विशेष प्रसिद्ध असून

देशांनीं परदेशीय लोकांची आपल्या देशांत (रिक्रूट) भरती होण्यास उत्तेजन दिलें. येणाऱ्या लोकांना मोफत वाहतुकीची सोय किंवा भाडेखर्चाला मदत, एजंटांना कमिशन, वगैरे युक्त्या सायबेरिया, न्यू साउथ वेल्स, नाताळ आणि दक्षिण अमेरिकेंतील कित्येक देश यांनीं योजल्या. उलट पक्षीं निरुपयोगी किंवा उपद्रवकारक अशा परदेशी लोकांनीं आपल्या देशांत येऊं नये म्हणून वरील देशांनींच आगमनावर कडक निर्बंध घालणारे कायदे केले. उदाहरणार्थ, ऑस्ट्रेलियानें चिनी लोकांच्या आगमनाला निर्बंध घातले. १९०१ सालीं कॉमनवेल्थ इमिग्रेशन रिस्ट्रिक्शन ॲक्ट या कायद्यानें चिनी, जपानी व मलाई लोकांच्या आगमनाबद्दल त्यांना युरोपियन भाषेचे ५० शब्द व शुद्धलेखन लिहितां आलें पाहिजे, अशी अट घातली. न्यूझीलंडनें अशा येणाऱ्या प्रत्येक इसमावर १०० पौंड डोईपट्टी बसविली, आणि कानडानें १९०३ सालीं प्रत्येक चिनी इसमावर ५०० डॉलर डोईपट्टी बसविण्याचा कायदा केला. अमेरिकन संयुक्त संस्थानांत परकीयांच्या आगमनाला बरींच वर्षे मोकळीक होती. परंतु तेथेंहि १८८२, १८९३ आणि १९१७ सालीं निर्बंध घालणारे कायदे करण्यांत आले. १९२४ सालीं प्रत्येक देशांतल्या किती इसमांना संयुक्त संस्थानांत येण्याची दरसाल परवानगी द्यावयाची ती संख्या कायद्यानें निश्चित करण्यात आली.

हिंदुस्थान— पौराणिक काळांत हिंदुशास्त्रानें परदेशगमन निषिद्ध ठरविलें. तथापि सुमात्रा, जावा, इ. देशात समुद्रमार्गें हिंदू लोक गेलेच. १९ व्या शतकाच्या आरंभीं मजुरीसाठीं लोक परदेशांत जाऊं लागले. १८३४ सालीं ब्रिटिश वसाहतींतून गुलामांचा व्यापार बंद केल्यामुळें परदेशांतील धंदेवाले लोक हिंदुस्थानांतून मजूर नेऊं लागले. १८३४ ते १८३७ या काळांतच कलकत्ता बंदरांतून ७००० वर मजूर गेले. तेव्हां हिंदुस्थान सरकारचें याकडे लक्ष जाऊन या मजुरांच्या परदेशांतील स्वास्थ्यासाठीं कायदे करण्यांत आले. १९२२ चा कायदा व्यवस्थेशीर असून १९३८–३९ सालीं पुन्हां त्यांत दुरुस्त्या करण्यांत आल्या. बरेच मजूर परदेशांत स्थायिक झाले असून त्यांना तेथें कांहीं अटींवर नागरिकत्वाचे हक्कहि मिळाले आहेत; तथापि दक्षिण आफ्रिकेप्रमाणें समान हक्कांविषयीं राज्यकर्ते आणि हिंदी लोक यांमध्यें तंटे चालू आहेतच; व प्रश्न गुंतागुंतीचे होऊन बसले असून आता ते संयुक्त राष्ट्रसंघ कसे सोडवील तें पाहावयाचें आहे. हिंदुस्थानाबाहेर हिंदुस्थानचे सुमारें चाळीस लक्ष लोक जाऊन राहिले आहेत.

हिंदी परदेशगमनाचा कायदा—( इंडियन एमिग्रेशन ॲक्ट ). परदेशगमनाबाबतचे मागील कायदे दुरुस्त करून हा कायदा १९२२ सालीं मान्य करण्यांत आला, व त्यांत १९२८ सालच्या कायद्यानें दुरुस्त्या करण्यांत आल्या. 'परदेशगमन' याचा अर्थ, ब्रिटिश हिंदुस्थानाबाहेर समुद्रमार्गानें जाणें हा आहे. 'कौशल्याचें काम' ( स्किल्ड वर्क ) याचा अर्थ कोणतेंहि कारागिरीचें काम करणारा, किंवा कारकून व दुकानांतील मदतगार, किंवा चहाच्या किंवा फराळाच्या किंवा इतर सार्वजनिक ठिकाणीं नोकरी करणारा, किंवा घरकाम करणारा, किंवा इतर कोणतेंहि कौशल्याचें काम वरिष्ठ सरकार गॅझिटांत जाहीर करील तें करणारा इसम. 'बिनकौशल्याचें काम' याचा अर्थ शेतीचें काम व वरीलखेरीज इतर काम, असा आहे. परदेशगमन करणारांचा 'प्रोटेक्टर' या नांवाचा अधिकारी व एक मेडिकल इन्स्पेक्टर ज्या बंदरांतून कायदेशीरपणें परदेशगमन करतां येतें त्या बंदरांत प्रांतिक सरकारनें नेमावा. त्या प्रोटेक्टरनें पुढील कामें करावीं—( अ ) परदेशगमन करणारांना सल्ला देऊन मदत व संरक्षण द्यावें; ( ब ) कायद्यांतील सर्व कलमांची अमलबजावणी करावी; ( क ) सदर बंदरांत परदेशांत गेलेले जे प्रवासी परत येतील त्यांची प्रांतिक सरकार नियम करील तदनुसार तपासणी करावी; ( ड ) ज्या देशांत तो प्रवासी गेला त्या देशांत व तेथून परत येतांना प्रवासांत सदर प्रवाशाला कोणत्या प्रकारें वागविण्यांत आलें त्याची चौकशी प्रवाशाजवळ करावी; ( ई ) परत आलेल्या प्रवाशांना योग्य तो सल्ला व मदत द्यावी. ( कलमें ३ ते ६ ). ज्या देशांत परदेश-प्रवासी जातात, अशा प्रत्येक देशांत हिंदुस्थान सरकारनें ( गव्हर्नर–जनरल ) आपला एकेक एजंट नेमावा ( कलम ७ ). बिनकौशल्याचें काम करणारांनीं परदेशगमन कलकत्ता, मद्रास, मुंबई, कराची, नेगापट्टम, तुतिकोरिन व धनुष्कोडी या बंदरांखेरीज इतर बंदरांतून करणें बेकायदा आहे. तसेंच हिंदुस्थान सरकार गॅझिटमध्यें जाहीर करील त्या देशांत व त्या शर्तीवर परदेशगमन सदर इसमांनीं करावें, इतर देशांत जाणें बेकायदा आहे ( कलमें ९–१० ). कौशल्याचें काम करणाऱ्या इसमांनींहि हिंदुस्थान सरकार ठरवील त्याच बंदरांतून गेलें पाहिजे. अशा परदेश-प्रवाशास मदत करणारानें परवाना मिळण्याकरितां प्रांतिक सरकारकडे अर्ज करून व जरूर ती फी देऊन परवाना मिळवला पाहिजे. सदर अर्जांत ( अ ) परदेश-प्रवाशांची संख्या, ( ब ) कोणत्या ठिकाणीं जाणार त्या ठिकाणाचें नांव, ( क ) सदर प्रवासी परदेशांत राहील त्या काळांत त्याची व त्याच्यावर अवलंबून असलेल्या इसमांची आरोग्य व सुस्थिति राहण्याची व्यवस्था, ( ड ) असें कौशल्याचें काम करणाऱ्या इसमाच्या नोकरीच्या कराराच्या शर्ती, वगैरेबद्दल माहिती दिली पाहिजे ( कलमें १५–१६ ). या कायद्याचीं कलमें किंवा नियम मोडणाराला ५० पन्नास रुपयांपर्यंत दंडाची

शिक्षा, आणि बेकायदा परदेशगमनास मदत करणाराला पांचशें रुपयांपर्यंत दंडाची शिक्षा आहे ( कलम २५ ).

**परदेशी ( द्रव्य ) विनिमय**—( फॉरिन एक्स्चेंज ). एका देशाच्या पैशाची किंमत दुसऱ्या देशाच्या पैशांत जेव्हां ठरविली जाते तेव्हां म्हणतात. अशा परदेशी पैशाच्या वटावाचे दर नेहमीं प्रसिद्ध होत असतात. या दरावर पुढील गोष्टींचे परिणाम होत असतात : ( १ ) दोन देशांतील हुंड्या देण्याघेण्याचें प्रमाण जेव्हां हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांना लंडनला पुष्कळ पैसे भरावयाचे असतील, पण लंडनच्या हुंड्या मुंबईच्या बाजारांत फार कमी असतील ( म्हणजे लंडनच्या व्यापाऱ्यांना मुंबईचें देणें थोडें असेल ), तेव्हां एका पौंडाला द्यावे लागणारे रुपये ( हिंदी चलन ) वाढतील व वर्तावळा लंडनला फायदेशीर पडेल. ( २ ) देशाची तौलनिक चलनक्रयशक्ति. विदेशी हुंड्यांची मागणी आणि पुरवठा खालील गोष्टींवरून ठरत असतो : ( अ ) दोन देशांतील आयात-निर्यात व्यापारांतील फरक. ( आ ) एकमेकांचे वर्तावळ्याचे दर. यावरून एका देशांतून दुसऱ्या देशांत पैसा पाठविणें फायद्याचें कीं तोट्याचें हें समजून येतें. ( ३ ) ज्यामुळें पतीवर परिणाम होईल अशी देशाची राजकीय किंवा अन्य परिस्थिति. हिच्यावरून देशांत पैसा गुंतविण्याला मदत होते किंवा होत नाहीं. आज सर्व देशांतून कागदी नोटांचें अविनिमय चलन सुरू असल्यानें व सोन्याच्या स्थानांतरावर बंदी असल्यानें एका देशांतील मालाचे भाव दुसऱ्या देशांतील भावावर अवलंबून असत नाहींत. हे भावच चलनमर्यादेचें प्रमाण ठरवीत असतात. सोनें जर बाहेर धाडतां आलें तर विनिमयांत फरक पडत जाईल. कारण पैसे फेडण्यासाठीं हुंड्या विकत घेण्यापेक्षां सोनेंच धाडणें जास्त स्वस्त पडतें. अशा वेळीं विनिमयानें सुवर्णबिंदु गांठला असें म्हणतात.

**परदेशी व्यापार**—फार प्राचीन काळापासून देशादेशात मालांची देवघेव होत असली पाहिजे. तथापि औद्योगिक युग सुरू झाल्यापासून विशेषतः परदेशी व्यापार हा देशांना परस्पर फार फायदेशीर आहे हें कळून आलें. आगगाड्या आणि आगबोटी जेव्हां या क्रांतीनंतर सर्व देशांतून सुरू झाल्या तेव्हांच खऱ्या आंतरराष्ट्रीय व्यापाराला सुरुवात झाली असें म्हणतां येईल. महायुद्धाच्या काळांतच अशा व्यापाराचें महत्त्व पटतें. परदेशी व्यापारांतील मुख्य गोष्ट म्हणजे आयात आणि निर्गत व्यापारांतील फरक होय. या फरकामुळें देशाचा फायदा किंवा तोटा होत असतो. प्रत्यक्ष आयात-निर्गत व्यापाराखेरीज अदृश्य आयात-निर्गत व्यापार चालत असतो व तो हिशेबात घेतल्याखेरीज देशाची खरी आर्थिक स्थिति काढतां येत नाहीं. अदृश्य याची दोन प्रकारच्या आहेत : एक सेवामूल्य आणि दुसरा व्याज किंवा मुद्दल यांची फेड. जहाजी व्यापार, विमा आणि उत्पन्नाचे धंदे यांपासून मिळणारें सेवामूल्य महत्त्वाचें असून त्याचा पैसा हुंड्याद्वारें मिळतो व त्यांचा उपयोग देशासाठीं बाहेरून माल विकत आणण्याकडे करतां येतो. कांहीं देशांना परकीय प्रवाशांपासून फार मिळकत होत असते ( व म्हणूनच आज इंग्लंडनें चालू आर्थिक अडचण टाळण्यासाठीं परदेशप्रवासास बंदी केली आहे ). परदेशांत भांडवल गुंतविण्यासाठीं तिकडे माल पाठविण्यांत येतो व या भांडवलावर व्याज किंवा लाभांश ( डिव्हिडंड ) देण्यांत येतो. यासाठीं परदेशांत पाठविलेला माल निर्यात या सदरांत हिशेबांत पडतो व ज्या भांडवलासाठीं माल पाठविलेला असतो त्यावरचा फायदा ही 'अदृश्य' आयात समजली जाते. हें व्याज किंवा लाभांश फार फुगला म्हणजे त्याऐवजीं मालच मागविण्यांत येतो व अर्थात् हा आयात सदरांत पडतो. याप्रमाणें पाहिल्यास आयात आणि निर्गत यांचें मूल्य प्रत्यक्ष हिशेबांत दिसतें त्यापेक्षां बदलेल.

**परभणी**—हैद्राबाद संस्थान, औरंगाबाद विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ ५१२७ चौ. मैल. हवा उत्कृष्ट. पर्जन्यमान ३४ इंच. हा भाग पूर्वीं देवगिरीच्या यादवांकडे होता, परंतु १४ व्या शतकाच्या सुमारास अल्लाउद्दिनानें घेतला, तेव्हांपासून मुसलमानांकडे आहे. लोकसंख्या सु. आठ लाख. शेंकडा ९० हिंदु. भाषा शेंकडा ८८ लोकांची मराठी. शेंकडा ५३ शेतकरी. मुख्य पीक ज्वारी व कापूस. ह्या जिल्ह्यांतून आगगाडीचा फांटा गेला असून तो हैद्राबादला जातो. कापूस वठण्याच्या व गठ्ठे बांधण्याच्या गिरण्या बऱ्याच ठिकाणीं आहेत. परभणीस जिल्ह्याच्या मुख्य कचेऱ्या असून म्युनिसिपल कमिटी आहे.

**परमा**—( गोनोरिआ ). हा एक जननेंद्रियांसंबंधींचा संसर्गजन्य रोग असून गोनोकॉक्स नांवाच्या जंतूपासून होतो. याचा संसर्ग इंद्रियद्वारां होतो. यावर योग्य उपचार केले नाहींत तर विशेषतः स्त्रियांच्या बाबतींत याचे फार दूरवर पोंचणारे अनिष्ट परिणाम होतात. याची तीव्रता दहा दिवसांपासून तीन आठवडेपर्यंत टिकते. या रोगाची बाधा संततीलाहि होत असते.

आयुर्वेदांत प्रमेह या मूत्ररोगविशेषाचे वीस प्रकार सांगितले आहेत. इक्षुमेह, सुरामेह, पिष्टमेह, सांद्रमेह, शुक्रमेह, उदकमेह, लालामेह, शीतमेह, सिकतामेह आणि शनैर्मेह हे दहा प्रकार कफजन्य आहेत. तसेंच मंजिष्ठमेह, हारिद्रकमेह, नीलमेह, रक्तमेह व क्षारमेह हे सहा प्रकार पित्तजन्य आहेत. आणि अस्थिमेह, वसामेह, मज्जामेह, मधुमेह हे चार प्रकार वातजन्य समजतात.

**परमांगनेत**—( परमॅंगॅनेट ). परमॅंगॅनिक ह्या अस्थिर अम्लाचें लवण. पोटॅशियम परमॅंगॅनेट हें विशेष प्रसिद्ध असून

जंतुनाशक म्हणून ह्याचा उपयोग होतो. हा काळसर रंगाचा, चकचकीत, लांबट स्फटिकांचा पदार्थ असून पाण्यांत विरघळला म्हणजे गर्द जांभळ्या रंगाचें पाणी तयार होतें. कॉंडीज फ्ल्युइड-मध्यें पोटॅशियम परमॅंगॅनेटबरोबर सोडियम परमँगॅनेटहि असतें.

**परमाणु**—(ॲटम). रासायनिक मूलद्रव्याचा अतिसूक्ष्म व अविभाज्य असा कण अशी पुष्कळ वर्षें परमाणूबद्दल कल्पना होती. ग्रीक तत्त्ववेत्त्यांनीं विशेषतः डिमोक्रिटस (४५० खि. पू.), एपिक्युरस आणि ल्युक्रेटिअस (खि. पू. ९९–५५) ह्यांनीं ह्या कल्पनेची किंवा ह्या परमाणुवादाची सुरुवात केली. आपल्या इकडेहि कणादादिकाच्या मतांत ह्याच तत्त्वाचा समावेश केलेला आहे. कालानुक्रमें ग्रीक तत्त्वज्ञ अगोदर का हिंदी अगोदर हें अजून निश्चित झालें नाहीं. इ. स. १८०४ च्या सुमारास डाल्टननें रसायनशास्त्रांत हा परमाणुवाद सुरू केला; पण परमाणूच्या स्वरूपाविषयीं निरनिराळ्या शास्त्रज्ञांनीं निरनिराळ्या कल्पना केल्या आहेत. न्यूटनच्या मतानें हे परमाणू विशिष्ट गुणधर्मांचे आणि वजनाचे असून ह्यांच्या स्वरूपभेदामुळें सृष्टींतील पदार्थांत भेद निर्माण होतात. घर्षणरहित प्रवाही पदार्थांतील चक्रगतीची (व्होर्टेक्स) कल्पना केली म्हणजे परमाणूच्या गुणधर्मांचें स्पष्टी-करण होऊं शकतें असें केल्व्हीनचें मत आहे. धन आणि ऋण ह्या दोन विद्युत्कणांच्या पुंजानें हा परमाणु तयार झाला आहे अशी आजची कल्पना आहे. (अणु पाहा.)

**परमाणुबाँब**—हा एक प्रकारचा अत्यंत विध्वंसकारी बॉंब (अस्त्र) आहे. पदार्थांचा विध्वंस केल्यावर अतिशय मोठ्या प्रमाणाची शक्ति उत्पन्न होते, या शास्त्रीय सिद्धांतानुसार हा नवा शोध आहे. या बॉंबमधील मुख्य घटक द्रव्य युरेनियम २३५ [युरेनियमचा एक एकस्थानीय (आयसोटोप)] असून तो अंतिम प्रमाणाबाहेर झाल्यास भंग पावूं लागतो व तेव्हां प्रचंड शक्ति उत्पन्न होते. यु. २३५ च्या अंतिम प्रमाणापेक्षां कमी अशा प्लेटी निरनिराळ्या ठेवून देतात व जेव्हां स्फोट पाहिजे असेल तेव्हां एकत्र आणतात. या बाँबच्या घटनेचा शोध प्रथम युरोपांत झाला असून त्याची प्रत्यक्ष रचना अमेरिकेंत झाली. या कामीं अमेरिकेला दोन महापद्म (बिलियन) डॉलर खर्चावे लागले. असा पहिला बाँब अमेरिकन विमानांतून ६ ऑगस्ट १९४५ रोजीं जपानमधील हिरोशिमा या मोठ्या लष्करी ठाण्याच्या शहरावर टाकण्यांत आला तेव्हां शहर बेचिराख झालें. थोड्याच दिवसांनीं नागासाकी बंदरावर दुसरा बाँब टाकला. यामुळें महायुद्ध एकदम बंद झालें. या बाँबचें वजन ४०० पौंड असलें तरी याचें विध्वंसक सामर्थ्य २०,००० पौंड टी. एन्. टी. विस्फोटक द्रव्याइतकें भरतें.

या विनाशकारी अस्त्रावर नियंत्रण असावें अशाविषयीं संयुक्त राष्ट्रसंघांत विचार चालू आहेत. याचा उपयोग औद्योगिक कामांत कसा करतां येईल याचाहि विचार चालू आहे. पुराणां-तील हालाहलाप्रमाणें हें भयंकर अस्त्र खरें!

**परमाण्वंक**—(ॲटामिक नंबर). बहुतेक मूलद्रव्यांचे क्ष-किरणमालेंतील (एक्स-रे स्पेक्ट्रा) आवर्त $a(N-b)^2$ ह्या पदानें दर्शित करतां येतात असा मोस्ले ह्यानें शोध लावला. वरील पदांतील a आणि b हीं सर्व मूलद्रव्यांना एकच असतात; N ची किंमत मात्र प्रत्येक मूलद्रव्याला निराळी आहे. परमाणु-मानाच्या क्रमानें सर्व मूलद्रव्यें मांडलीं तर N ची किंमत मागच्या मूलद्रव्याच्या N किंमतीपेक्षां एकानें जास्त असते. मोस्लेनें ह्या N ला परमाण्वंक असें नांव दिलें आहे. उज्ज (हायड्रोजन) चा १, सौर (हेलियम) चा २, ग्रावा (लिथियम)-चा ३, याप्रमाणें युरेनियमचा ९२ असे परमाण्वंक लावतां येतात. पदार्थविज्ञानशास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं, मूल-द्रव्याची परमाण्वंक संख्या ही त्या परमाणूच्या केंद्रांतील स्वतंत्र धन विद्युदंशाबरोबर असते. उदा., सौर (हेलियम) चें परमाणुमान ४ आहे; म्हणजे त्याच्या अणुकेंद्रांत चार धनविद्युदंश (प्रोटोन) आहेत. पण हे दोन विद्युत्कणां(इलेक्ट्रॉन)नीं एकत्र बांधलेले असल्यामुळें परमाण्वंक संख्या ४ – २ = २ ही येते.

**परमानंद, भाई** (१८७४–१९४७)— पंजाबमधील एक हिंदु पुढारी. हे प्रथम दयानंद अँग्लो-वेदिक कॉलेजमध्यें आजीव सभासद होते. आर्य समाजाचे मिशनरी म्हणून यांनीं दक्षिण आफ्रिकेमध्यें प्रवास केला. तेथून आल्यावर यांस तीन वर्षें स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें. पुन्हां ते दक्षिण अमेरिकेंतील ब्रिटिश वसाहतींचा दौरा करून आले. १९१५ मध्यें यांस पकडण्यांत येऊन पहिल्या गदर कटांत सामील असल्याबद्दल त्यांच्यावर खटला करून त्यास देहांताची शिक्षा देण्यांत आली. परंतु पुढें ती कमी करून जन्मठेप–हद्दपारीची करण्यांत आली. १९२० पर्यंत हे अंदमानांत कैदेंत होते. यांनीं दोन महिने अन्न-सत्याग्रह केला तेव्हां त्यांची सुटका करण्यांत आली. पंजाबच्या राष्ट्रीय शिक्षण मंडळाचे हे कांहीं वर्षें अध्यक्ष होते. पंजाब राष्ट्रीय विद्यापीठाचे कुलगुरुहि होते. अजमेर येथें भरलेल्या १९३३ मधील अखिल भारतीय हिंदुमहासभेचे ते अध्यक्ष होते. नंतर ते जॉइंट पार्लमेंटरी कमिटीपुढे हिंदूंचें म्हणणें मांडण्याकरितां लंडन येथें गेले. १९३५ मधील कानपूर येथील रेव्ह. भिक्षु उत्तम यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनानंतर ते कार्यकारी अध्यक्ष होते. त्याचप्रमाणें पुणें येथें पंडित मदनमोहन मालवीय यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या अधिवेशनानंतर

उपाध्यक्ष होते. यांनीं हिंदुस्थानचा एक इतिहास व आत्मचरित्र लिहिलें आहे.

**परमार घराणें**—माळव्यांतील एक राजघराणें. हें घराणें मूळ अघूमघर्ले व नंतर धारचें. मूळ पुरुष कृष्णराज हा कनोजचा मांडलिक होता तो इ. स. ९१० च्या सुमारास स्वतंत्र झाला. यांचें राजचिन्ह गरुड हें होतें. उज्जयिनी सोडून हें राजघराणें धारला गेलें. मुंज (९७५–९९५), सिंघ, भोज (१०१०–१०५३), वगैरे अनेक शूर व विद्वान् राजे या घराण्यांत झाले. भोज याला हिंदुस्थानचा ऑगस्टस असतात. यानें बरेच ग्रंथ लिहिले. हा विद्वानांचा पोशिंदा होता व यानें चंबळा ते गोदावरी एवढा आपला राज्यविस्तार केला. मुंज आणि भोज शूरहि होते. मुंजाला चालुक्य राजानें ठार करून पूर्वीच्या पराजयाचा सूड उगविला. भोजाला देखील चाळीस वर्षांच्या उज्ज्वल कारकीर्दीनंतर त्याच्या अनेक पराजित शत्रूंनीं एकत्र येऊन जिंकलें. स. ११०७ पासून पुन्हां परमारांना उतरती कळा येऊन हे गुर्जरांचे मांडलिक झाले. महंमद गझनीपासून अल्तमशपर्यंत व त्यापूर्वीहि हूणांनीं यांच्या राज्यावर बरेच वेळां हल्ले केले होते. परंतु त्यांना हा सर्व काळ हे पुरून उरले होते. तथापि शेवटीं अल्लाउद्दीन खिलजी यानें शेवटच्या जयसिंह याजपासून त्याचें राज्य हिरावून घेतलें. हें घराणें सुमारें ५०० वर्षेपर्यंत कर्तृत्ववान् म्हणून टिकलें. जैन धर्मास यांचा बराच आश्रय होता.

**परलोकविद्या**—मरणोत्तर मनुष्याचा आत्मा कोणत्या तरी स्थितींत राहतो अथवा पुन्हां जन्मास येतो असा बहुतेक लोकांचा विश्वास आहे. आत्मा अमर असून त्याचें स्वरूप वर्णन करतां येत नाहीं, असें धर्मग्रंथांत प्रतिपादिलेलें आढळतें. परंतु आधुनिक परलोकविद्येच्या संशोधकांकडून असें सांगितलें जातें कीं, प्रत्येक मनुष्याला स्थूल व सूक्ष्म असे दोन देह असतात. हा सूक्ष्म देह आकारानें व अवयवाने स्थूल शरीरासारखा असून सूक्ष्म (इथिरिक) परमाणूंचा बनलेला असतो. मृत्युसमयीं तो स्थूल शरीरापासून विलग होऊन ज्याला परलोक असें म्हटलें जातें अशा अन्य स्थितींत प्रेम, स्मृति, वगैरे व्यक्तिविशिष्ट गुणांसहित कांहीं काल राहतो व अशा सूक्ष्म देहधारी व्यक्तींशीं इहलोकांतील माणसांना मध्यस्थांच्या साहाय्यानें किंवा कधीं कधीं त्याशिवाय संवाद करतां येतो. त्या अवस्थेंत अशा व्यक्तीला अनेक कामें करतां येतात व करावींहि लागतात. तीं कामें त्या व्यक्तीच्या प्रकृतीस अनुसरून त्याच्या उन्नतीकरितां परलोकांतील उच्च व्यक्तींकडून नियोजित केलीं जातात. इहलोकांतील आचरणांवर प्रत्येक माणसाची स्थिति अवलंबून असते. परलोकनिवासाचा काळ निश्चित कळत नाहीं. पण शेंकडों वर्षांपूर्वी मृत झालेल्या व्यक्तींशीं संभाषणें झाल्याचीं उदाहरणें आढळतात. पुनर्जन्म झालेल्या व्यक्तींची माहिती अन्य मृतांकडून मिळते.

आधुनिक परलोकविद्येचा आरंभ १८४८ सालीं अमेरिकेंत झाला. त्याबद्दल प्रथम पुष्कळ चिकित्सा होऊन नंतर या विषयावर बऱ्याच लोकांचा विश्वास बसला व युरोपांतहि ह्या विद्येचा प्रवेश झाला. गेल्या शतकांतील अनेक विद्वानांनीं ह्या विद्येच्या सत्यतेविषयीं अविश्वस्त मनानें दीर्घकाल संशोधन केलें व शेवटीं त्यांना ह्या विद्येंतील तत्त्वें खरीं आहेत असें मान्य करावें लागलें. सदर संबंधांत सर विलियम क्रुक्स, डब्ल्यू. टी. स्टेड, फ्लॅमेरियन, लॉंब्रोसो, सर आर्थर कॉनन डॉइल, सर ऑलिव्हर लॉज, इत्यादि विद्वानांचीं नांवें नमूद करण्यासारखीं आहेत. त्यांची खात्री झाल्यावर त्यांनीं आपलीं मतें निर्भयपणें जगापुढें मांडलीं आणि अधिक अनुभव मिळविण्याकरितां व ह्या विद्येचा प्रसार करण्याकरितां जारीनें प्रयत्न सुरू केले. इंग्लंडमध्यें या विषयाकडे धार्मिक दृष्टया पाहण्यांत येतें व त्यामुळें तिकडे सुमारें पांचशें संस्था एतदर्थ स्थापन झाल्या आहेत. तेथें नेहमीं विवेचन, प्रयोग व प्रार्थना, इत्यादि कामें चालू असतात.

सामान्यतः या विषयाची सत्यता स्वयंलेखनद्वारां सुलभ रीतीनें प्रतीत होते. हा मार्ग पुष्कळांना अवलंबन करतां येण्यासारखा आहे. व त्याच्याच द्वारां मृतांकडून अनेक संदेश येतात. स्वयंलेखनास अवश्य असणारी शक्ति बहुतेक मनुष्यांत असते व थोड्याशा अभ्यासानें ती वाढवितां येते. ह्याशिवाय मृतात्म्याचें मध्यस्थास दर्शन (क्लेअरव्हॉयन्स), मध्यस्थानें मृतात्म्याचा आवाज ऐकणें (क्लेअरऑडियन्स), मृतात्म्याचें प्रत्यक्ष दर्शन (मटीरिअलायझेशन), मध्यस्थाच्या साहाय्यानें मृतात्म्याचा फोटो घेणें (स्पिरिट फोटोग्राफी), मध्यस्थाच्या मुखानें मृतात्म्याशीं बोलणें (ट्रान्स), इत्यादि प्रयोग युरोप व अमेरिका खंडांत होत असतात. ह्या संबंधांत अलीकडे कांहीं यंत्रें निघालीं आहेत. त्यांपैकीं स्पिरिट कॉलबेल एक होय. ती घंटी आपोआप वाजू लागते व मृतात्म्याचें आगमन सूचित होतें. नंतर त्याचा संदेश अन्य साधनांनीं विदित केला जातो. परावर्तन लेखक (रिफ्लेक्टोग्राफ) नांवाच्या यंत्रानें विशिष्ट मध्यस्था (मिडियम)च्या साहाय्यानें मृतात्म्याचा हात दिसतो व टाइपरायटरप्रमाणें तो संदेश लिहून येतो. या यंत्रास विवक्षित मध्यस्थाची आवश्यकता असल्यामुळें तें सर्वांस उपयोगी पडूं शकत नाहीं. कम्यूनिग्राफ नांवाच्या दुसऱ्या एका यंत्रानें ही अडचण दूर होते. त्या यंत्राजवळ दोनचार जिज्ञासू प्रेक्षक बसले असतां मनुष्याच्या हस्तस्पर्शाशिवाय मृतात्म्याचा संदेश ऐकूं येतो. मनुष्याच्या स्पर्शाची जरूर न लागणें हें या यंत्रांतील वैशिष्ट्य आहे. ह्या

हें कीं, येथें दोन भिन्न भिन्न दर्जाचे प्राणी परस्परांच्या साहाय्यानें आपला जीवनक्रम चालवितात. या जीवनक्रमाचे सामान्यतः पुढील उपप्रकार आहेत : (अ) सेव्य-सेवक सहोपजीवन— या प्रकारांत एका मुख्य जीवाच्या आश्रयास अनेक सूक्ष्म जीव राहून ते त्याची त्याच्या जीवनाला जरूर अशी सेवा करतात व या प्रकारें सेवा करण्याकरितां स्वतः जिवंत राहण्यासाठीं त्या मुख्य प्राण्याच्या जीवनरसावर आपली उपजीविका करतात. बहुतेक प्राण्यांच्या रक्तांत श्वेतगोलक अगर श्वेतकलें असतात. हे श्वेतगोलक या मुख्य प्राण्यानें खाऊन पचविलेल्या अन्नरसावर आपली उपजीविका करतात. उलटपक्षीं हे मनुष्यशरीराचें अनेक रोगांपासून संरक्षण करूं शकतात; जखमा भरून काढण्यास मदत करतात; व मनुष्यशरीरांत प्रवेश करणाऱ्या रोगजंतूंचा खाऊन फडशा पाडतात. या अनेक प्रकारची उपयुक्त सेवा हीं श्वेतगोलकें करीत असल्यामुळें यांना संरक्षक कलें (गार्ड सेल्स) म्हणण्याचाहि प्रघात पडलेला आहे.

(आ) दुसरा प्रकार विनिमय सहोपजीवनाचा म्हणतां येईल. या प्रकारांत अन्य जीवोपयोगी कांहीं जीवनद्रव्यांचें स्वतः संपादन करून त्याचा भाग अन्य जीवास देणें व त्याच्या मोबदला त्या जीवानें त्याच प्रकारें प्रमाणबाह्य संपादन केलेल्या जीवनद्रव्याचा हिस्सा आपल्या जीविताकरिता घेऊन दोघांनीं मिळून परस्परांचा चरितार्थ चालविणे या क्रिया उद्दिष्ट आहेत. उदाहरण म्हणजे ज्याला आपण स्वयंपाकाच्या मसाल्यांतील दगडफूल म्हणतों त्याचें होय. हा हिरवट रंगाचा चिवट पापुद्र्या-सारखा पदार्थ म्हणजे आल्गी आणि अळिंबें यांच्या संयुक्त जीविताचा वाळलेला देहविस्तार होय. हें संयुक्त जीवित जंग-लांत, विशेषतः फार पावसाच्या प्रदेशांत झाडांच्या फांद्यांवर व दगडांवरहि वाढलेलें दिसून येतें, आणि या जीविताचा अन्य एक विशेष हा कीं, ज्या निर्जल परिस्थितींत उदाहरणार्थ, कोरड्या दगडावर जेथें आल्गी अगर अळिंब हे प्रत्येकीं पृथक् स्थितींत जगूं शकणार नाहींत तेथें हें त्यांचें संयुक्त जीवित जगूं शकतें. यांपैकीं आल्गी नामक वनस्पतींच्या अंगीं हरितद्रव्य असून त्यामुळें तें हवेंतील कार्बन शोषण करून आत्मसात् करूं शक-तात. पण त्याच्या जोडीस जरूर असलेले भौमक्षार व नत्रयुक्त सेंद्रिय द्रव्य हें कुजलेल्या वानस्पत्य अवशेषांपासून त्याचे सह-जीव अळिंबीं हीं शोषून घेऊं शकतात. उलटपक्षीं या सहचर अळिंबांना जरूर असलेलें कर्बजन्य द्रव्य हें त्यांना आल्गीकडून मिळतें व अशा रीतीनें या दोन जीवाचें सहजीवन चांगलें चालू असतें. त्यांचीं बीजें देखील बहुधा परस्पर समागमात स्थलांतर करतात. परस्परांचा शोष करण्याकरितां शत्रू म्हणून आलेले दोन जीव कालान्तरानें आपला शत्रुभाव विसरून, परस्परांचे जीवश्चकंठश्च मित्र बनून, अगदीं एकजीव होऊन राहिल्याचें उत्तम उदाहरण म्हणजे या दगडफुलाचें होय.

(इ) व्यक्त्यतिगामी सहजीवन—यानंतर अन्य असे कांहीं प्रकार दाखवितां येणें शक्य आहे कीं, जेथें हा विनिमय फक्त परस्परोपयोगी अन्नाचाच असेल, असें नव्हे तर त्यांत दुसऱ्याला जरूर तें अन्न एकानें पैदा करून तें दुसऱ्यास लुटूं द्यावें व त्या दानाच्या मोबदला स्वतःच्या जातीच्या संरक्षणास, विस्तारास व विकासास इष्ट अशा गोष्टी अगर सोयी त्या दुसऱ्याकडून मिळवाव्यात. ज्याला संचित द्रव्य (स्टोरेज प्रॉडक्ट) म्हणतां येईल तें उत्पन्न करणाऱ्या वनस्पतींची व प्राण्यांची या विभागांत गणना करतां येईल. सुरण, बटाटा, रताळूं, गोराडूं, माकरफळ (ब्रेड), ऊंस, बीट या वनस्पती अशा होत कीं, ज्यांच्या विशिष्ट भागांत सांठून राहणारे सत्त्वस्नेहशर्करामय पदार्थ त्यांना निदान सर्वच्या सर्व तरी व्यक्तिजीविताकरितां अगर जातिजीविता-करितांहि जरूर असतातच असें नाहीं; तर त्यापेक्षां तें पुष्कळ जास्त प्रमाणात त्यांच्या संग्रहीं असतात. भुईमूग, एरंड, करंज, मोह, वगैरेंच्या बीजांतील स्निग्ध द्रव्यावांचून त्या बीजांचें चांगलें नडतें असें नव्हे. आंत अल्पांश बीज व त्याभोंवतीं मधुर, स्वादिष्ट असा पक्ष्यांना व मनुष्यांनाहि उपयोगी पडणारा खाद्य भाग तयार करणारीं आंबा, पेरू, केळ, फणस, वगैरे फळझाडें व्यक्तिशः त्यांना व त्यांच्या वंशजांना निरुपयोगी पण इतरांना अत्यंत उपयोगी असा हा एवढा मोठा खाद्यभाग निसर्गतःच कां तयार करीत असावींत? तसेंच सुरुवातीला वास-राला अजीर्ण करून त्याला आजारी पाडण्याइतका चीक व पुढें देखील ज्याच्या अंशावरहि अपत्यसंगोपन चांगलें होईल इतकें दूध पाळीव गाई-म्हशींच्या स्तनांत कां असतें? फलनक्रियेची अपेक्षा न ठेवतांहि कोंवळ्या अंड्यासारखें मौल्यवान् खाद्य कां पचवतात? आत बीजाचा संभव चिलकुल नसतांहि कोबीला पानाचा व कॉली फ्लॉवरला फुलवऱ्याचा एवढा मोठा गड्डा कां? अगर त्याच परिस्थितींत गुलाबाला फक्त सुंदर व सुवासिक फूलच कां येतें? या प्रश्नाचें अंशतः उत्तर हेंच कीं, व्यक्तिजीवित यथाशक्य सुखी होऊन मुख्यतः जातिजीवित सुरक्षित राहण्याची योजना करणें हा या सर्व जीवांचा मुख्य हेतु असून त्याकरितां त्याचा हेतुपुरस्सर यत्न चालू असतो.

(ई) व्यक्तिनिरपेक्ष जात्यधिष्ठित सहजीवन— यानंतर परस्परोपजीवनाची याहिपेक्षां उच्च अशी एक पायरी दाखवितां येणें शक्य आहे. या पायरीवरच्या सहोपजीवनांत वैयक्तिक जीविताचें पूर्ण बलिदान देऊन जातिजीविताचें सातत्य संपादलें जातें. प्राणिशास्त्रज्ञांच्या निरीक्षणात असें एक परफलनापेक्षी अगर परेरेणुसिंचनापेक्षी वनस्पतींच्या व तें घडवून आणणाऱ्या कीट-

काच्या सहजीवनाचें उदाहरण आलें आहे कीं, हा कीटक एका फुलावरील रेणूंचा गोळा करून दुसऱ्या फुलाच्या स्त्रीकेसराग्रांवर चढवितांना त्या रेणूंच्या गोळ्यांत आपलीं अण्डीं खुपसून देतो, व या रेणूंच्या साह्यानें त्या फुलांतील बीजांडें सफल होतात व वाढूं लागतात. इतक्यांत त्या रेणूंच्यामध्यें असलेलीं त्या कीटकांचीं अंडींहि फुटतात व त्यांतून कांहीं लहान अळया निघून त्याहि बीजकोशांत प्रवेश करून वाढीस लागलेल्या बीजांवर हल्ला करून त्यांपैकीं बरीचशीं बीजें खाऊन टाकतात. त्या वनस्पतीच्या हिशेबीं ही नुकसानीची बाजू झाली. पण त्याच्या उलट फायद्याची बाजू म्हणजे कांहीं तरी बीजें फलज पावून परिपक्व झालीं ही होय. जर त्या कीटकानें स्वतःच्या अंड्यांबरोबर का होईना, पण परक्या फुलावरचे कांहीं रेणू आणून त्या वनस्पतीच्या केसराग्रावर जे टाकले ते टाकलेच नसते तर जगलीं एवढीं बीजें देखील आरंभीं फलितच झालीं नसतीं. अनेक भक्ष्य धान्यांचा व सबीज फळांचा हाच प्रकार दरसालीं होत आहे. पुष्कळशीं बीजें खाल्लीं जातात, पण थोडीशी तरी पुढच्या सालच्या बीजाकरितां संभाळून ठेवलीं जातात. याप्रमाणें सहजीवनांत जीवोत्पन्न द्रव्याची हानि जीवाला भोगावी लागत असेल अगर वैयक्तिक जीविताची हानि जातीला सोसावी लागत असेल; परंतु सहजीवनानें भक्ष्य व भक्षक या दोघांच्याहि जीविताचा एकंदर विकासच होतो. तेव्हां जीवनाच्या सर्व प्रकारांपैकीं सहोपजीवन श्रेष्ठ म्हणतां येईल. [ भारद्वाज–जीवनमीमांसा ]

**परळ**— एक वनस्पति. हा लव्हाळा किंवा माका याप्रमाणें ओहोळांत होतो. याचा देंठ तांबडा असून पानें माक्याप्रमाणें लावट असतात. लव्हाळ्याच्या अंगीं जे औषधी गुण असतात तेच याच्या ठिकाणीं आढळतात. गुरांस विषबाधा झाल्यास याचा पाला ताकांत वांटून पाजतात. पोटफुगीवर पाण्यांत वांटून पोटावर ओढा देतात.

**परळी वैद्यनाथ**— परळी वैजनाथ असेंहि नांव आहे. हैद्राबाद संस्थान, बीड जिल्हा, मोमिनाबाद तालुका, द्वादश ज्योतिर्लिंगांतलें एक. गांवाचें नांव परळी असून वैजनाथ हा येथील देव आहे. याचें देऊळ उंचावर व फार भव्य आहे. इतरहि देवालयें बरींच आहेत. १७०६ मध्यें अहिल्याबाईनें मंदिराचा जीर्णोद्धार केला. ४४ चाहूर जमीन येथील ब्राह्मणांस पेशवाईपासून इनाम आहे. या ठिकाणीं लिंगाइतांची मोठी वस्ती आहे.

जगमित्र नागा याची समाधि येथें आहे. येथें शके ११०९ चा मराठी शिलालेख सांपडला असून त्यांत कोंकणच्या अपरादित्य राजानें वैद्यनाथाच्या पूजेसाठीं साष्टी भागांतील माहुलीजवळची एक जमीन दान दिल्याचा उल्लेख आहे.

**परळी–सज्जनगड**— साताऱ्याच्या पश्चिमेस ६ मैलांवर सह्याद्रीच्या एका फांट्यावर सज्जनगड जो आहे त्याच्या पायथ्याशीं परळी गांव असून तें रामदासस्वामींस इनाम होतें. ( सज्जनगड पाहा. )

**पॅरा**— बेलेमडो पॅरा. हें शहर व बंदर ब्राझील देशांत, पॅरा नांवाच्या संस्थानची राजधानी आहे. बंदरांत अगदीं मोठालीं जहाजें जाऊं शकतात. येथून रबर, भात, कापूस, कोको, पिआसावा व अन्नाटो हा मुख्य माल परदेशीं जातो. लो. सं. २,७९,४९१.

**पराग**—वनस्पतींच्या फुलांतील पराग-कोशामध्यें जे रज–कण असतात त्यांस पराग म्हणतात. यांमध्यें पेशीरसाचा साठा असतो ( जसें तेल, पिष्टसत्त्व, इ. ); तसेंच एक वाटोळें वनस्पतिमय किंवा नलिकाकार पेशीकेंद्र असतें. तसेंच एक चातीसारखें जीवकेंद्र असतें. परागांचें प्रसरण वाऱ्याच्या योगानें होतें ( अशा स्थितींत तें कोरडें व धुळीच्या कणासारखे असतात ), नाहीं तर प्राण्यांच्या ( बहुतेक कीटकांच्या ) मार्फत होतें (अशा स्थितींत पराग चिकट व ओलसर असतात). पुष्पयुक्त वनस्पतींमध्यें परागवहनाची क्रिया होणें म्हणजे पुंकेसरापासून पराग स्त्रीकेसराग्रावर जाणें हें होय. ही क्रिया एकाच फुलामध्यें होते (आत्मोत्पत्ति), किंवा एका फुलांतील पुंकेसरावरील पराग त्याच जातीच्या दुसऱ्या फुलांतील स्त्रीकेसराग्रावर जाऊन पडतात ( संकरोत्पत्ति किंवा परोत्पत्ति ). ही क्रिया झाल्याशिवाय बीजधारणा होत नाहीं व सफलता येत नाहीं.

**पराग** ( प्रवर्धित आकृति )
(डावीकडून उजवीकडे) वरची ओळ- १ भोपळा. २ काटे रिंगणी. ३ पाइन. खालची ओळ–१ दुग्धतृण. २ 'मस्क' वनस्पति. ३ सायं प्रिमरोज.

**पॅरग्वे**—दक्षिण अमेरिकेंतील एक संस्थान. हें ब्राझिलच्या दक्षिणेस व अर्जेंटाइनच्या उत्तरेस आहे. याचें क्षेत्रफळ ( एल् चाको धरून ) १,७४,८५४ चौरस मैल. लो. सं. १०,४०,४२०. राजधानी ॲसन्शन. हा देश शेतकीप्रधान आहे. तंबाकू, कापूस, नारिंगें, इ. पिकें होतात. ॲसन्शन येथें विद्यापीठ आहे. प्रथम या भागांत ग्वारानी इंडियन लोकांची वस्ती होती; व पहिली गोरी वसाहत १५३७ सालीं झाली. १७२१ त स्पॅनिश सरकाराविरुद्ध बंड होऊन १० वर्षेंपर्यंत जोस डी आन्तेग्वेरा या सर्वाधिकाऱ्यानें राज्य केलें. १७७६–१८१२ पर्यंत हें ब्यूनो आयरेच्या राज-प्रतिनिधीच्या अमलाखालीं होतें. नंतर स्वातंत्र्य

पुकारण्यांत आलें; पण त्याबरोबरच सभोंवतालच्या देशांशीं झगडे सुरू झाले व अंतस्थ यादवी माजली. १९३२ सालीं बोलेव्हियाशीं युद्ध सुरू झालें. बाहेरच्या राष्ट्रांनीं दोघांनाहि दारुगोळा, मदत, वगैरे पाठविण्याचा व पोंचविण्याचा बेत केला व शेवटीं तात्पुरता तह होऊन सरहद्दी-निर्णयाकरितां एक कमिशन बसलें; पण शेवटीं प्रश्न अनिर्णीतच राहिला. दुसऱ्या महायुद्धांत पॅराग्वे दोस्तांच्या बाजूला होता.

**परांजपे, (सर) रघुनाथ पुरुषोत्तम** (१८७६- )— एक महाराष्ट्रीय विद्वान् व शिक्षणतज्ज्ञ. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील मुर्डी या गांवीं १६ फेब्रुवारी १८७६ रोजीं झाला. यांचें शिक्षण मराठा हायस्कूल (मुंबई), फर्ग्युसन कॉलेज (पुणें) व सेंट जॉन्स कॉलेज (केंब्रिज) यांमध्यें झालें. तसेंच यांनीं पॅरिस व गॉटिंजेन येथेंहि अभ्यास केला. हिंदुस्थानांतील सर्व परीक्षांत हे पहिले आले होते. हिंदुस्थान सरकारची शिष्यवृत्ति घेऊन ते इंग्लंडमध्यें गेले व तेथें सीनिअर रँग्लर झाले (१८९९). १९०१ मध्यें हे हिंदुस्थानांत परत आले. १९०२ ते १९२६ पर्यंत हे फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपॉल व गणिताचे प्राध्यापक होते. मध्यंतरीं १९२१ ते १९२३ पर्यंत हे मुंबई सरकारचे शिक्षणमंत्री होते. १९२४ मध्यें रिफॉर्म्स इन्क्वायरी कमिटीचे ते सभासद होते. त्याचप्रमाणें ऑक्झिलिअरी अँड टेरिटोरिअल फोर्सेस कमिटीचे सभासद होते. लखनौ येथें नॅशनल लिबरल फेडरेशनच्या १९२४ मध्यें भरलेल्या अधिवेशनाचे ते अध्यक्ष होते. मुंबई इलाख्यांतील सर्व शैक्षणिक, सामाजिक व नेमस्त राजकीय चळवळींमध्यें यांनीं आतांपर्यंत भाग घेतला आहे. १९०५ ते १९२७ पर्यंत हे मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो होते. १९१६ ते १९२० पर्यंत हे भारत महिला विद्यापीठाचे कुलगुरु (व्हाइस चान्सेलर) होते. हे लंडन, अमेरिकन व इंटरनॅशनल मॅथेमॅटिकल सोसायट्यांचे सभासद आहेत. रॅशनॅलिस्टिक प्रेस असोसिएशनचे ते ऑनररी असोसिएट आहेत. १९१३ ते १९१६ मध्यें मुंबई कायदेमंडळाचे सरकारनियुक्त सभासद होते. १९१६ ते २३ पर्यंत मुंबई युनिव्हर्सिटीतर्फे निवडून गेले होते. १९२६ मध्यें हे पुन्हां निवडून आले व अबकारी मंत्री व जंगलमंत्री झाले. १९२७ ते १९३२ पर्यंत हे लंडनमधील इंडिया कौन्सिलचे सभासद होते. नंतर यांची लखनौ युनिव्हर्सिटीमध्यें उपकुलगुरु (व्हाइस चान्सेलर) म्हणून दोनदा नेमणूक झाली. महायुद्धकालीं सैनिक अधिकारी निवडण्याच्या समितीचे ते सभासद होते. १९४४–४७ सालांत ते ऑस्ट्रेलियांत हिंदुस्थानचे हायकमिशनर म्हणून होते.

**परांजपे, शिवराम महादेव** (१८६४–१९२९)—एक महाराष्ट्रीय साहित्यिक व देशभक्त. यांचा जन्म ११ जून १८६४ रोजीं झाला. यांचे वडील महाड येथें वकील होते. यांचें शिक्षण प्रथम महाड येथे व नंतर रत्नागिरी आणि पुढें पुणें येथें झालें. १८९५ सालीं ते एम्. ए. झाले व महाराष्ट्र कॉलेज या संस्थेमध्यें प्राध्यापक झाले. परंतु त्यांच्या जहाल मतप्रतिपादनामुळें त्यांस तेथील राजीनामा द्यावा लागला. त्या वेळीं पुण्यांत प्लेगची धामधूम, रँडचा खून, वगैरे मानगडी चालू असून लो. टिळक यांस शिक्षा झाली होती. अशा वेळीं त्यांनीं 'काळ' नांवाचें वर्तमानपत्र सुरू करून त्यांत ते खरमरीत लेख लिहूं लागले. त्यांच्या या कडक लेखांबद्दल बरेंच काहूर उठून त्यांचा निषेध करावा असेंहि त्या वेळच्या कांहीं नेमस्त लोकांनीं बोलण्यास सुरुवात केली. परंतु या दीव्यांतूनहि ते त्या वेळीं बाहेर पडले. त्यांचे लेख औपरोधिक व उपहासगर्भ टीकेचे सुंदर नमुने आहेत. १८९८ पासून १९०८ पर्यंत त्यांनीं हें पत्र चांगलें चालवून अत्यंत लोकप्रिय केलें. त्यांनीं त्या वेळचे बोअर युद्ध व रुसो-जपानी युद्ध यांचा फायदा घेऊन स्वातंत्र्याचे धडे लोकांस देण्याचा उपक्रम केला. बंगालच्या फाळणीनंतर बंगालमध्यें जी खळबळ उडाली तीमुळें पूर्वींचे त्यांचे टीकाकार त्यांचें अनुकरण करूं लागले. ते जसे उत्तम लेखक तसे उत्तम वक्तेहि होते. आपल्या भाषणांतहि उपरोधपूर्ण टीकेनें ते श्रोतृवर्गास मुग्ध करून सोडीत. १९०८ मध्यें त्यांवर खटला झाला तो त्यांनीं स्वतःच चालविला व त्यांत त्यांस १९ महिन्यांची शिक्षा झाली. १९१० सालीं 'काळ' पत्र सरकारनें बंद पाडलें. १९२० नंतर ते गांधींच्या असहकारितेच्या चळवळींत पडले व 'स्वराज्य' साप्ताहिक कांहीं काळ चालविलें. पण पूर्वींचा जोम त्यांच्यांत राहिला नव्हता. मुळशी सत्याग्रहांत त्यांनीं सहा महिने शिक्षा ओढवून घेतली. १९२९ मध्यें ते महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे बेळगांव येथें अध्यक्ष होते. २७ सप्टेंबर १९२९ रोजीं ते दिवंगत झाले. यांनीं कांहीं स्वतंत्र संस्कृत व मराठी ग्रंथरचनाहि केली आहे. यांचे जप्त झालेले काळांतील निवडक निबंध आतां पुन्हां प्रकाशित झाले आहेत व ते अजून मननीय वाटतील.

**पराना**—ही दक्षिण अमेरिकेंतील दुसऱ्या क्रमाची सर्वांत मोठी नदी आहे. रायोग्रँडी आणि परानाहिबा या दोन नद्या मिळून ही नदी तयार होऊन ती पुढें लाप्लाटा या आखाताला मिळते. हिला मिळणाऱ्या मुख्य नद्या पॅराग्वे आणि सालाडो या आहेत. या नदीची एकंदर लांबी २५०० मैल आहे, व या नदींतून नाविक वाहतूक फार चालते.

**पॅराफिन वर्ग**—$C_nH_{2n+2}$ ही सर्वसामान्य सारणी (फार्म्युला) असलेला उज्जकर्बा (हायड्रोकार्बन)चा वर्ग. मिथेन किंवा मार्शवायु हें या वर्गांतील अगदीं साधें संयुक्त. हा वर्गहीन

वायु असून कर्बयुक्त पदार्थांच्या विघटनापासून तयार होतो. ह्या वर्गांतील पहिलीं पहिलीं संयुक्तें वायुरूप असून पेंटेनपासून ( $CyH_{12}$ ) द्रवरूप पदार्थांस सुरुवात होते व त्यानंतर १६ पेक्षां जास्त कर्ब परमाणू असल्या वेळीं संयुक्तें घनरूप होतात. हीं सर्व संयुक्तें पूर्ण स्वरूपाचीं (सॅच्युरेटेड) असल्यामुळें त्यांवर रासायनिक क्रिया तितक्या सुलभतेनें होत नाहीं.

दगडी कोळसा आणि लांकूड ह्यांच्या विघटनात्मक उत्पतनानें हीं तयार होतात, व उद्योगधंद्यांत त्याचें महत्त्व अतिशय आहे. तेलाच्या खाणींतहि हीं सांपडतात.

कोळशाच्या उत्पतनानें प्रथम १८३० च्या सुमारास पॅराफिन काढण्यांत आला. नंतर १८४८ त जेम्स यंग यानें खनिज तेलापासून हा तयार केला. हल्लीं अशुद्ध पेट्रोलियमपासून पॅराफिन काढतात. मेणबत्त्या, जलप्रतिबंधकें व इतर अनेक गोष्टी यांपासून तयार करतात.

**पराया**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक वरच्या दर्जाची अस्पृश्य जात. हे पराय ताशे वाजवतात म्हणून यांस पराया म्हणतात. मद्रास इलाख्यांत बहुतेक खेड्यांतून हेच कनिष्ठ अधिकारी असतात. यांची लो. सं. (१९११) सु. पाव कोटी आहे. मद्रास इलाख्यातील सर्वच अस्पृश्यांना चुकीनें पराया हें नांव दिलें जातें.

**परार्थवाद**—(अल्ट्रुइझम्). अल्ट्रुइझम् (परार्थवाद किंवा परहितवाद) हा शब्द प्रथम फ्रेंच तत्त्ववेत्ता कोम्ट यानें आपल्या ग्रंथांत वापरला व तो शब्द दुसऱ्याबद्दल किंवा मानवजातीबद्दल हितबुद्धि, म्हणजे स्वार्थीपणाच्या अगदीं विरुद्ध अशी परोपकार करण्याची बुद्धि, या अर्थानें उपयोगांत आणला. हा परहितवादाचा कोम्टचा सिद्धांत हर्बर्ट स्पेन्सरनें पुढें वाढविला. भौतिक विकासाचीं तत्त्वें त्यानें समाजाला लावून असें दाखविलें कीं, आदर्श समाजांत व्यक्तीनें इतरांच्या स्वास्थ्यरक्षणांत भाग घेतलाच पाहिजे. शुद्ध परार्थवाद शक्य नाहीं. कारण इतरांच्या सुखांत व्यक्ति आपलें सुख पाहते हें या सिद्धांतांत गृहीत धरलें आहे. म्हणजे परार्थवाद हें साध्य नसून साधन आहे.

**परावर्तक**—(रिफ्लेक्टर). प्रकाशाचे व उष्णतेचे किरण आणि ध्वनि यांचें परावर्तन करण्याकरितां जो एखादा धातूचा अथवा दुसऱ्या एखाद्या योग्य अशा पदार्थाचा गुळगुळीत केलेला पृष्ठभाग वापरण्यांत येतो त्यास परावर्तक असें म्हणतात. या परावर्तकाचा आकार परवलयाकृति असल्यास तो विशेष उपयुक्त असतो. कारण अशा आकाराच्या परावर्तकापासून परावर्तन पावलेले सर्व किरण समांतर अशी एक किरणशलाका करून बाहेर पडतात व त्यामुळें अंतराच्या मानानें प्रकाशाची तीव्रता फार थोडी कमी होते.

**परावर्तक पृष्ठभाग**—(स्पेक्युलम). दृक्‌शास्त्र व ज्योतिषशास्त्र यांमधील परावर्तक दुर्बिणीसारख्या यंत्रांत परावर्तक पृष्ठभागाचा उपयोग करण्यांत येतो. हा तयार करण्याकरितां पूर्वीं तांबें व कथील यांचें मिश्रण वापरण्यांत येत असे. परंतु अलीकडे कांचेवर चांदीचा पातळ थर चढवून हा पृष्ठभाग बनविण्यांत येतो. हा चांदीचा थर कांचेच्या ज्या अंगास वस्तु असेल त्या अंगास चढविण्यांत येतो.

**परावर्तन**—(रिफ्लेक्शन). जेव्हां ईथरमधून किंवा दुसऱ्या एखाद्या माध्यम द्रव्यांतून एखादी लहरी जात असतां ती एखाद्या पृष्ठभागावर आपटल्यामुळें तिची दिशा बदलते व ती ज्या माध्यमातून येत असते त्यांतच परत फेंकली जाते, या क्रियेस परावर्तन असें म्हणतात. अशा रीतीनें परावर्तन पावणाऱ्या लहरी परावर्तक पृष्ठभागास लंबरेषा काढली तर त्या लंबाशीं आगामी लहरी जितका कोन करतात तितकाच कोन परत जातांना करतात. कोणत्याहि लहरींचें केव्हांहि पूर्णपणें परावर्तन होऊं शकत नाहीं. कारण त्या लहरींतील कांहीं भागाचें शोषण होतें आणि कांहीं भाग पार निघून जातो. रजताच्या अंगीं प्रकाशलहरींतील ९० टक्के प्रकाशाची तीव्रता परावर्तित करण्याचा गुण असतो. कांहीं कांहीं पदार्थांपासून विशिष्ट लहरींचेंच परावर्तन होतें. अशा पदार्थांच्या पृष्ठभागास विशेष प्रकारचा वर्ण किंवा रंग आहे असें मानण्यांत येतें. अशा पदार्थांपासून धातूसारखें परावर्तन होतें असें म्हणतात.

**पराशर**—वसिष्ठाचा पौत्र. याच्या बापाला एका राक्षसानें भक्षण केल्यावरून यानें राक्षससत्रच केलें. कृष्णद्वैपायन व्यास हा याचा मुलगा. याच्या नांवानें एक स्मृति प्रसिद्ध आहे. पराशर स्मृति अथवा पराशर संहिता हा बारा अध्यायांचा व्यास-पराशर संवादात्मक असा बराच मोठा ग्रंथ आहे. यांत आचार व प्रायश्चित्त अशीं दोन कांडें आहेत. व्यवहारशास्त्राचा भाग यांत मुळींच आलेला नसल्यानें पराशरमाधवीकार सायण यांनीं 'व्यवहारमाधवीय' लिहून पूर्तता केली आहे. पराशरमाधवी हा पराशर संहितेवरील टीकाग्रंथ आहे.

**परिंडा किल्ला**—हैद्राबाद संस्थान, उस्मानाबाद जिल्हा. बार्शीच्या पश्चिमेस ८–९ कोसांवर असलेला अत्यंत जुना व मजबूत किल्ला. मुसलमानी अमलांत हा प्रसिद्ध असून अनेक झगड्यांचें हें स्थळ होतें. शिवाजीनें हा १६७० त जिंकून घेतला; पण पुढें फार काळ मराठ्यांकडे राहिला नाहीं.

**परित्याग**—(डेझर्शन). जेव्हां नवरा बायकोला किंवा बायको नवऱ्याला सोडून जाते त्या वेळीं कायद्यांत त्याला परित्याग म्हणतात. इंग्लंडच्या कायद्यांत वरीलप्रमाणें त्याग सतत २ वर्षें योग्य कारण नसतांना केलेला असल्यास त्या कारणास्तव

पृथक् वास्तव्य (ज्यूडिशियल सेपरेशन) कायदे कोर्टात मागण्याचा हक्क प्राप्त होतो. स्कॉटिश कायद्यांत असा त्याग चार वर्षें केलेला असल्यास तें घटस्फोट मागण्याला कायद्याप्रमाणें योग्य कारण ठरतें. हिंदूंच्या नारद-स्मृतींत 'नष्टे मृते प्रव्राजिते क्लीबे च पतिते पतौ। पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥' या श्लोकांत नवरा नाहींसा झाल्यास किंवा बैरागी बनल्यास स्त्रीनें दुसरा नवरा करावा असें सांगितलें आहे. तथापि या स्मृतिवचनानुसार आचार रूढ झालेला आढळत नाहीं. आतां नुकताच १९४७ सालीं मुंबई प्रांतांत हिंदूंचा घटस्फोटाचा कायदा मंजूर झाला. यापूर्वींचाच पारशी समाजासाठीं 'पारशी मॅरेज ॲंड डायव्होर्स ॲक्ट' आणि ख्रिस्ती समाजाकरितां 'इंडियन डायव्होर्स ॲक्ट' आहे. या तिन्ही कायद्यांत २ वर्षें त्याग व व्यभिचार अशीं दोन्ही संयुक्त कारणें असतील तर घटस्फोट किंवा पृथक् निवास 'ज्यूडिशियल सेपरेशन' कोर्ट देतें. शिवाय पारशी कायद्यांत, नवरा किंवा बायको सतत ७ वर्षें बेपत्ता असेल व जिवंत आहे अशी वार्ताहि नसेल तर घटस्फोट मिळतो (कलम २९).

**परिधिरेषा**—(कॉन्टूर लाइन). समुद्रसपाटीपासून सारख्या उंचीवर असणाऱ्या स्थलबिंदूंतून काढलेली नकाशावरील एक रेषा. एखाद्या देशाचे जर ठराविक उंचीवरच्या पातळीचे भाग कल्पिले तर या भागांभोंवतीं अशा परिधिरेषा येतील. प्राकृतिक नकाशावर त्यांची उंची देऊन या रेषा काढलेल्या असतात. पर्वताच्या शिखराजवळची परिधिरेषा ही लहान लंबवर्तुळासारखी असेल. या रेषांच्या साहाय्यानें दोन स्थळांमधील चढण-उतरण समजून येते.

**परिवृत्तपक्ष वर्ग**—(स्ट्रेप्सिप्टेरा). हा एक लहान चमत्कारिक आकृतीच्या कीटकांचा वर्ग आहे. कदाचित् यांचा संबंध शेणकिड्यांशीं असेल. यांची उत्पत्ति अंड्यांपासून न होतां पिल्लांपासून होते. यांच्या अळया प्रथम गांधीलमाशा किंवा मधमाशा यांच्या शरीरास चिकटतात व त्यांपैकीं स्त्री जातीच्या अळया त्यांस कधीं सोडीत नाहींत. नर जातीच्या अळयांचे त्या गांधीलमाशांच्या शरीरांतच रूपांतर होतें आणि नंतर त्यांस पंख फुटून ते नर बाहेर पडतात. यांच्या तीन-चार जाती आढळतात.

**पॅरिस**—फ्रान्सची ही राजधानी सीन खोऱ्यांत आहे. समुद्रसपाटीपासून उंची ८० ते ४२० फूट. सीन नदीला तिसावर पूल आहेत; व त्यांतील प्रमुख पोंत नफ हा आहे. १८४० पासून एक तटबंदी बांधण्यांत आली आहे. तटाच्या आंत क्षेत्रफळ १९,२७९ एकर आहे. हवामान सामान्यतः ४९.८० फारेनहैट उष्णतेचें असतें. पॅरिसचे रस्ते अगदीं आखीव आहेत व अनेक सुंदर चौक आहेत, अनेक बागा शहरांत आहेत. नाना तऱ्हेच्या करमणुकीच्या सोयींसाठीं हें शहर प्रसिद्ध आहे. नेपोलियनचें थडगें, ९८० फूट उंचीचा व १९८७ पायऱ्या असलेला एफिल टॉवर, विजेचें घर, जुने राजवाडे, वगैरे अनेक ठिकाणें प्रेक्षणीय आहेत. लोकसंख्या १९३१ सालीं २८ लक्ष होती ती १९४० त १० लक्ष भरली. या शहरांतील व्यापार फार मोठा आहे. लहान लहान सुंदर नक्षीदार वस्तू बनविण्यांत हें शहर हातखंडा आहे. ५०-६० हिंदी जवाहिरे व्यापारानिमित्त येथें स्थायिक झाले आहेत. पॅरिसचें जुनें नांव ल्युतेतिआ. ९८७ पासून हें राजधानीचें ठिकाण झालें. नेहमीं जर्मनीशीं युद्धें व महायुद्धें यांची फार झळ या सौंदर्यसंपन्न शहराला लागल्याशिवाय राहिली नाहीं. तरी एकंदरींत तें बरेंच बचावलें गेलें व जसेंच्या तसें राहिलें.

**पॅरिस विद्यापीठ**—ही युरोपांतील एक सर्वांत जुनी व सर्वांत मोठी युनिव्हर्सिटी आहे. ही युनिव्हर्सिटी इ. स. ११५० त स्थापन झाली, व बराच काळ सर्व युरोप खंडांत अतिशय प्रसिद्ध विद्यापीठ म्हणून हिची कीर्ति होती. १७९३ सालीं हें विद्यापीठ व दुसरीं कांहीं विद्यापीठें बंद करण्यांत आलीं आणि नवी शिक्षणपद्धति सुरू करण्यांत आली. १८०८ सालीं नेपोलियननें या विद्यापीठाची पुनर्घटना केली आणि तिला 'फॅकल्तीन द पारी' असें नांव दिलें. पुढें १८९६ सालीं एक नवा कायदा होऊन या विद्यापीठाची पुन्हां निराळ्या प्रकारें रचना करण्यांत आली. या विद्यापीठाखेरीज पॅरिसमध्यें मोफत उच्च शिक्षण देणाऱ्या बऱ्याच संस्था आहेत. अनेक पदार्थ-ग्रंथ-कला-संग्रहालयें आहेत.

**परिस्थिति**—जीवशास्त्रामध्यें एखाद्या प्राण्याच्या सभोंवतालची परिस्थिति म्हणजे हवामान व शीतोष्ण इत्यादि गोष्टींचा विचार करावा लागतो. सामान्यतः वनस्पती व प्राणी हीं स्वतः सभोंवतींच्या हवामानाप्रमाणें अनुकूल अशी अवस्था धारण करतात. याचें उत्तम उदाहरण म्हणजे फुलें व कीटक यांची हवामानाप्रमाणें रंग धारण करण्याची शक्ति आपल्या दृष्टीस पडते. परंतु अशी ही शक्ति प्राण्यांच्या अंगीं कशी येते याबद्दल बरीच चर्चा ऐकण्यांत येते. एकपेशीमय जीवांखेरीज बाकी सर्व जिवाणूंमध्यें दोन भाग असतात: (१) त्याचें सामान्य शरीर (सोमा)-याच्या योगानें तो जीव आपलें धारण-पोषण करतो; व (२) जीवपेशी-याच्या योगानें नवीन जीव उत्पन्न होत असतात किंवा पुनरुत्पादन होऊन त्यांची जात कायम राहत असते. बफन, लामार्क आणि ट्रीव्हीरॅनस या डार्विनपूर्वीं होऊन गेलेल्या तीन विकासवाद्यांचें मत असें होतें कीं, सभोंवतालच्या परिस्थितीच्या सतत क्रियेमुळें मूळ प्राण्याच्या शरीरा(सोमा)मध्यें फरक होत जातात. उदा., शरीरावर विशिष्ट ठिकाणीं एकसारखा दाब पडत गेल्यानें तेथील कातडी जाड होते, किंवा विशिष्ट

अवयवांचा उपयोग केल्यांमुळें त्यांचा आकार वाढत जातो, किंवा उपयोग न केल्यामुळें त्यांचा आकार कोंबडीच्या पंखाप्रमाणें कमीं होत जातो, इत्यादि परिस्थितीमुळें उत्पन्न झालेले गुणधर्म अधिकाधिक वाढत जातात व या योगानें नवीन जाती निर्माण होतात. तथापि आजकालचे बरेच वेसमनसारखे जीवशास्त्रज्ञ यांचें मत असें आहे कीं, फक्त जीवपेशीच्या द्रव्यामध्यें होणारे फरकच काय ते पुढील पिढ्यांमध्यें वंशपरंपरेनें प्राप्त होतात. या दोन पक्षांमध्यें अनेक तऱ्हेचे मतभेद असून त्यांवर अद्यापि निश्चित मत देतां येण्यासारखें नाहीं. सामान्यतः पूर्वजांमध्यें जर कांहीं सांसर्गिक रोगांचे जंतू असतील किंवा त्यांच्या पेशींवर कांहीं विषारी जंतूंचा परिणाम झाला असेल तर तेवढेच गुणधर्म त्यांच्या प्रजेमध्यें वंशपरंपरेनें प्राप्त होऊं शकतात. बाकीचे सामान्यतः मुलांमध्यें आढळणारे निरनिराळ्या प्रकारचे गुणदोष हे त्यास पितृपरंपरेनें प्राप्त होतात, असें म्हणणें योग्य वाटत नाहीं.

**परिक्षित**—अर्जुनाचा नातू व अभिमन्यूचा मुलगा. याची आई उत्तरा. हा मातेच्या उदरांत असतांनाच अश्वत्थामा यानें सोडलेल्या ब्रह्मास्त्रापासून याचा बचाव श्रीकृष्णास करावा लागला होता. हा युधिष्ठिरानंतर हस्तिनापुराच्या गादीवर बसला. यानें तीन अश्वमेध यज्ञ केले. हा शापामुळें सर्पदंशानें मृत्यु पावला. याचा पुत्र जो जनमेजय त्यानेंच सर्पसत्र केलें.

**पॅरी, सर विल्यम एडवर्ड** (१७९०-१८८५)—एक ब्रिटिश भू-प्रदेश संशोधक. १८१८ सालीं अलेक्झांडर नांवाच्या जहाजांतून आर्क्टिक प्रदेशाचें संशोधन करण्याकरितां सर जॉन रॉस याच्या नेतृत्वाखालीं जी सफर गेली तिचा पॅरी हा कमांडर होता. त्यानंतर पुढील ९ वर्षें अशा अनेक संशोधन-सफरींचा तोच कमांडर होता व त्या सर्व सफरींचा उद्देश उत्तर ध्रुव गांठणें आणि वायव्य मार्ग शोधून काढणें हा होता.

**परुष्णी**—हें वेदांतील एका नदीचें नाव असून तें नदीस्तुतींत व दहा राजांवर सुदासनें जो जय संपादिला त्याबद्दलच्या सूक्तांत आलें आहे. ह्या नदीचें पाणी चढून पळणारे राजे बुडून मेले आणि त्यामुळें सुदासला कायमचा जय मिळाला, म्हणून या नदीचें नांव त्या सूक्तात आलेलें आहे. ह्या ठिकाणाप्रमाणेंच ऋग्वेदांतील आठव्या मंडलांत एका ठिकाणीं हें नांव आलेलें आहे. मागाहून हिला रावी 'इरावती (रावी)' असें नांव मिळालें असें यास्काचार्य म्हणतो.

**परोपजीवन**—(हेटेरोट्राफिझम). जीवांनीं सर्व सृष्टि अन्तर्बाह्य व्यापून टाकलेली आहे, आणि या मर्यादेंत त्यांची इतकी खेंचाखेंच झाली आहे कीं, पुष्कळ उदाहरणांतून त्यांच्या वैयक्तिक मर्यादाहि भिन्न राहिल्या नसून ते परस्परांशीं शरीरानें संमिश्र झाले आहेत; व यामुळेंच थोड्याफार प्रमाणांत त्यांना परस्परांच्या आश्रयानें उपजीविका करणें अपरिहार्य, शक्य व इष्ट झालें आहे. जो जो जीव—मग तो वनस्पति असो कीं प्राणी असो—जन्मास आला त्याला जगण्याकरितां अगर जिवंत राहण्याकरितां जीवन अगर अन्न हें प्रामुख्यानें हवें. अन्न म्हणजे हवा अगर पाणी. यांव्यतिरिक्त व दोहोंपेक्षां घट्ट असें तिसरें जें द्रव्य लागतें व जें बहुधा पाण्याशीं थोडें-फार संमिश्र असतें तें होय. हें अन्न सामान्यतः हवा व पाणी यांतील प्राण (ऑक्सिजन), व उज्ज (हायड्रोजन) यांच्याशीं नत्र (नायट्रोजन) व विशेषतः कर्ब (कार्बन) नामक द्रव्याच्या नानारूप संयोगानें बनलेलें असतें. या अन्नांतील कर्ब नामक द्रव्याचा उपयोग जीवनक्रमांत जी हालचाल करणें जरूर असतें त्यांसाठीं, म्हणजे कांहींसा सरपणासारखा होतो व नत्र व इतर द्रव्यें यांचा उपयोग जीवनक्रमांतील नाना व्यापारांचें साधन जें जीवाचें शरीर त्याची घटना करण्याकारितां प्रामुख्यानें होतो. पण याप्रमाणें जीव सर्वत्र आहेत व त्यांना त्यांच्या जीविताकरिता अन्न अत्यवश्य आहे. तरीहि पण जीवांना अत्यवश्य असलेल्या अन्नाचे ढिगारे मात्र जीवांव्यतिरिक्त कोठेंच सृष्टींत दिसत नाहींत. त्याचे अंतिम घटक मात्र हवेंत, पाण्यांत व पृथ्वीवरच्या मातींत भरपूर आहेत. जीव हे जीवांवरच जगूं शकतात. एक जीव दुसऱ्या जीवावरच जगतो. सृष्टींत स्थूलमानानें व वैयक्तिक व्यवहारदृष्ट्या सर्वत्र परोपजीवनच दिसून येतें.

एकंदर जीवसृष्टीचे वनस्पती व प्राणी असे दोन स्थूलभाग त्यांना जरूर असलेल्या अन्नाच्या दृष्टीनें पडतात. वनस्पतींचें अन्न अत्यंत साधें व पृथ्वीवर जीव निर्माण होण्याच्या आधींपासूनच तींत भरपूर भरलेलें आहे. वनस्पती कर्ब नामक द्रव्य हवेंतून घेतात, व नत्र व इतर कांहीं द्रव्यें हीं जमिनींतून अगदीं साध्या भौमक्षाराच्या स्थितींत घेतात. स्थूलमानानें वनस्पतिच यथाशक्य परोपजीवी नसून अहिंसक होत असें म्हणतां येईल. या स्थूल नियमाला अपवाद नाहींत असें नाहीं.

वनस्पती जितक्या अहिंसक आहेत तितकाच प्राणी हिंसक व परोपजीवी आहे. त्याचें जीवन निरिंद्रिय क्षारांवर व हवेंतील कर्ब द्रव्यावर अशक्य होय. त्यानें वानस्पत्य द्रव्याचें तरी भक्षण केलेंच पाहिजे. शिवाय तो स्वाभिरुचीप्रमाणें इतर प्राणी व त्यांच्यापासून उत्पन्न झालेले पदार्थ यांवर आपली उपजीविका करतो.

या परोपजीवनाचे कांहीं पर्याय आहेत. ते मुख्यतः १ परोपजीवन किंवा जीवोपजीवन, २ शवोपजीवन किंवा परावशेषजीवन, व ३ परस्परोपजीवन किंवा सहजीवन हे होत.

जीवोपजीवन—(पॅरासायटिझम). दृश्य सृष्टीचे निरिंद्रिय व

सेंद्रिय, अगर अनशन व साशन असे दोन स्थूल भाग पडतात. अशन अगर आहार याचा अर्थ वन्य वस्तु स्वतःच्या अन्तर्भागांत घेऊन त्या वस्तूंचें सात्मीकरण करणें हा होय. परंतु याच क्रियेला उपजीविका हें जें अन्य नांव आहे त्यांतील ध्वन्यर्थाचा विचार करण्यासारखा आहे. उपजीविका याचा अर्थ जीविकेच्या आश्रयानें चाललेली दुय्यम दर्जाची जीविका अगर आश्रयानें जगणें असा होय. उपजीवन म्हणजेच परोपजीवन. परोपजीवन म्हणजे भक्ष्य वस्तूंचा नाश होत असतांहि त्याकडे दुर्लक्ष करून आपलपोटेपणानें त्यावर यथास्थित हल्ला करणें. हे परोपजीवन विकासक्रमांतील आद्य अवस्थांमधून फारच धडाक्यानें चालू असल्याचें दिसून येतें. या परोपजीवनाचीं उदाहरणें अनेक देतां येतील. यांच्या उपजीविकेची पद्धतीच अशी आहे कीं, त्यामुळें तें ज्या अन्य जीवावर हल्ला करतात त्याला त्याचें जीवित संथपणें चालू ठेवणें कठिण पडतें. म्हणजे त्यांच्या शरीरांत रोगाचा प्रादुर्भाव होतो आणि यामुळें अर्थातच अशा जीवांना रोगकारक जंतू म्हणतात. सामान्यतः वनस्पतींच्या व प्राण्यांच्या शरीरांत रोग उत्पन्न करणारे अनुक्रमें फंगी व सूक्ष्म जीवजंतू (बॅक्टेरिया) हे या रोगकारक जंतूंच्या यादींत येतात. परंतु फंगी, बॅक्टेरिया, वगैरे क्षुद्र जीवच परोपजीवी असतात असें नव्हे. बांडगुळ वगैरे उच्च प्रकारच्या वनस्पतिहि अन्य वनस्पतींवर उपजीविका करणाऱ्या असतात. त्याचप्रमाणें उवा, गोचीड, जंत, आणि सिंहव्याघ्रादि मांसाहारी प्राणी पूर्ण परोपजीवी होत. वनस्पत्याहार व मांसाहार या प्रकारचें उपजीविकेचें सव्यसाचित्व अन्य अनेक पशुपक्ष्यांप्रमाणें मनुष्यानेंहि संपादन केलें आहे. शिवाय, जंगम पशुपक्षिमानवांनीं स्थावर वनस्पतींवर हल्ला करावा यांत कदाचित् नवल असें कांहीं नसेल; परंतु कांहीं स्थावर वनस्पतीदेखील (उदा., घटपत्री-पिचर प्लँट) लहानसहान जंगम कीटकांना पकडून त्यांच्या मांसाशनानें वाढलेल्या आहेत. परोपजीवी जीव हे उच्चतर जीविताचे बहुधा शत्रुच आहेच आणि त्यांचा उच्छेद करण्यामागें मनुष्यप्राणी लागलेला आहे. [जीवनमीमांसा.]

शवोपजीवी वर्ग व परस्परोपजीवन हे लेख स्वतंत्र दिलेले आढळतील.

**पर्किन्, सर विल्यम हेन्री** (१८३८-१९०७)—एक इंग्रज रसायनशास्त्रज्ञ. कृत्रिम कोयनेल करण्याचा प्रयत्न करीत असतां एके दिवशीं त्याला निळ्या रंगाचा अभावितपणें शोध लागला. लगेच त्यानें त्याचें पेटंट घेऊन १८५७ सालीं रंगाचा कारखाना काढला. मंजिष्ठापासून तांबड्या रंगाचा शोध लावून त्याचेंहि पेटंट घेतलें. १८७४ मध्यें रंगाचे कारखाने सोडून इतर शोध-प्रयोगांकडे त्यानें लक्ष लावलें. १९०६ मध्यें त्याला 'सर' पदवी मिळाली.

**पर्जन्यमापक**—पाऊस मोजण्याचें यंत्र. एका तांब्याच्या पंचपात्रांत एक बाटली ठेवून तींत एक नसराळें घालतात. हें भांडें झाडें, इमारती, वगैरेपासून, लांब मोकळ्या जागेवर ठेवतात. २४ तासांत बाटलींत सांचणारें पाणी इंचाच्या ग्लासांत घालून मोजतात. एका इंचाचे १०० भाग (सेंट) केलेले असतात. वर्षभर दररोज याप्रमाणें मोजून टिपून ठेवतात व वर्षअखेर पावसाचें मान ठरवतात.

**पर्णपादवर्ग**—(फायलोपोडा). हा एक कवचधर प्राण्यांचा पोटवर्ग आहे. या प्राण्याला पुष्कळच पाय असतात. सामान्यतः यास आठ पायांच्या कमींत कमी जोड्या असून त्यांतील पहिली जोडी त्यास पोहण्याच्या कामीं उपयोगी पडते. यांचें रूपांतर होतें व प्राथमिक अवस्थेमध्यें त्यांचे गर्भ अळीसारखे असतात. त्यांच्या झिंग्यासारख्या दोन जाती असून त्यांपैकीं एक गोड्या पाण्यांत व एक खाऱ्या पाण्यांत राहते.

**पऱ्या आणि वनदेवता**—(फेअरीज, एल्व्ज). पाश्चात्य समाजांतील लोककथांतून पऱ्याप्रमाणें क्षुद्र स्त्रीदेवता किंवा अर्धदेवता आढळतात. यांच्या जोडीला 'एल्व्ज' या पुरुष देवता असतात. या पऱ्या पाळण्यांतील मुलें पळवितात व दायांचें काम देण्यासाठीं लग्नाच्या बायका नेतात, असा प्रवाद असे. अकालीं मरण आलेलीं माणसें परिस्तानाप्रत जातात असाहि समज रूढ होता व त्याबद्दल वाङ्मयांतून उल्लेख आढळतात. पऱ्या सुंदर पक्ष्यांचें रूप घेतात व एल्व्ज साप; मासे, वगैरे बनतात. शेक्सपीयरचें 'ए मिड्समर नाइट्स ड्रीम' या नाटकांत परीपुराण वाचावयास मिळेल. पऱ्या आणि वनदेवता यांच्या अनेक गोष्टींचे संग्रह प्रसिद्ध झाले असून त्यांचा सूक्ष्म अभ्यासहि पाश्चात्य विद्वान् करीत आहेत.

**पर्याप्तिदिन**—(ग्रेस डेज्). व्यापारांत एखाद्या हुंडीची मुदत भरल्यानंतरहि कांहीं ठराविक दिवस तिच्या भरपाईला देत असतात. हे दिवस बहुधा तीन असतात. विमा कंपन्यादेखील हप्ते भरण्याच्या नोंद मुदतीपेक्षां सवलतीचे कांहीं अधिक दिवस (बहुधा एक महिना) पैसे भरण्यास देत असतात.

**पर्वत**—दगड-मातीचा डोंगरापेक्षां जास्त उंच असा ढिगारा म्हणजे पर्वत म्हणतां येईल. हा साधारणतः २,००० फुटांच्या वर उंच असतो. बहुधा पर्वत एकेकटे नसतात. त्यांचे संघ, सांखळ्या किंवा रांगा आढळतात. ज्वालामुखी पर्वत मात्र एकाकी असतात. पर्वताचे दोन प्रकार असतात: १ त्वष्ट्र (टेक्टॉनिक) पर्वत—हे पृथ्वीच्या आवरणावर रास्त किंवा कांहीं विकृति होऊन तयार होतात. २ अवशिष्ट पर्वत—हे प्राचीन उच्च भागांचे अवशेष म्हणून राहिले असतात. पृथ्वीवर सर्वांत उंच पर्वत हिमालय आहे. याचें एव्हरेस्ट शिखर २९,००२ फूट उंच आहे. अमेरिकेंत

इलांपु ( २५,२४८ ), आफ्रिकेंत किलिमांजारो ( १९,७१० ) व युरोपांत एल्बुर्झ ( १८,४६५ ) हे सर्वांत उंच पर्वत आहेत.

ऋग्वेद व अथर्ववेद यांत पर्वत या शब्दाचा संयोग नेहमीं गिरि या शब्दाशीं होत असून त्याचा अर्थ पर्वत किंवा टेंकडी असा आहे. ऋग्वेदापासून पुढील ग्रंथांत लहान डोंगरांत वाहणाऱ्या नद्यांच्या पाण्याच्या संबंधांत वरील अर्थी ह्या शब्द रूढ आहे. पर्वतांना पंख असल्याबद्दलच्या पुराणांतून येणाऱ्या कथेचा उल्लेख वाजसनेयी संहितेंत ( ३६.९ ) आहे. कौपीतकी उपनिषदांत दक्षिण व उत्तर पर्वत ह्यांचा उल्लेख आलेला आहे व हे पर्वत म्हणजे विंध्य व हिमालय पर्वत होत ह्यांत संशय नाहीं. अथर्ववेदामध्यें औषधी व सुगंधी पदार्थ ( अंजन ) हे पर्वतावर सांपडतांत असें व ऋग्वेदामध्यें पर्वतावर खनिज पदार्थ सांपडतात असें म्हटलेलें आहे.

पुराणांतून ऋष्यमूक, गंधमादन, गोमंत, ब्रह्मगिरि, मंदराचल, महेंद्र, मेरु, मैनाक, रैवतक, विंध्य, सह्याद्रि, वगैरे पर्वतनामें व त्यांच्या कथा आढळतात.

**कांहीं अत्युच्च पर्वतशिखरें**

| शिखराचें नांव व स्थान | उंची फूट |
|---|---|
| गौरीशंकर ( नेपाळ-तिबेट ) | २९,००२ |
| के २ ( काश्मीर ) | २८,२५० |
| कांचनगंगा ( नेपाळ–सिकीम ) | २८,१४५ |
| माकालू ( तिबेट–नेपाळ ) | २७,७९० |
| नंगा पर्वत ( काश्मीर ) | २६,६२९ |
| नंदादेवी ( सं. प्रांत ) | २५,६४५ |
| कामेट ( सं. प्रांत ) | २५,४८१ |
| चुमालहारी ( भूतान ) | २३,९४४ |
| खान टेंगरी ( टिएनशान ) | २३,६०० |
| आर्कॉनकागुआ ( अर्जेंटिना ) | २२,८६८ |
| टुपुंगॅटो ( ॲंडीज ) | २१,५५० |
| सोराटा ( बोलिव्हिया ) | २१,४९० |
| इलिमानी ( ,, ) | २१,०३१ |
| चिंबोरॅझो ( युक्केडोर ) | २०,४९८ |
| जुनकाल ( ॲंडीज ) | २०,३६७ |
| माउंट किन्ले ( अलास्का ) | २०,३०० |
| लुलाईलाको ( चिली ) | २०,२४३ |
| सॅन जो ( ॲंडीज ) | २०,००० |
| लोगान ( युकॉन ) | १९,८५० |
| कोटोपॅक्सी ( युक्केडोर ) | १९,६१३ |
| लिकान काऊर ( चिली ) | १९,५२१ |
| किलीमांजारो ( टांगानिका ) | १९,३२० |
| देमावेंद ( इराण ) | १८,६०० |
| एल्बुर्झ ( कॉकेशस ) | १८,४७१ |
| टोलिमा ( कोलंबिया ) | १८,३२० |
| पोपोकॅटिपेटल ( मेक्सिको ) | १७,८८१ |
| ओरिझाबा ( ,, ) | १७,८७९ |
| मायपो ( अर्जेंटिना ) | १७,४३१ |
| कोशतान ताऊ ( कॉकेशस ) | १७,०९६ |
| आरारात ( आर्मेनिया ) | १७,०४३ |
| केनिया ( पू. आफ्रिका ) | १७,०४० |
| रुवेनझोरी ( युगांडा ) | १६,८०० |
| चार्लस लुई ( न्यू गिनी ) | १६,७३० |
| काझबेक ( रशिया ) | १६,५५० |
| कारसटेंझ ( न्यू गिनी ) | १६,४०० |
| माउंट ब्लँक ( फ्रान्स ) | १५,७८१ |
| टिंगुइरिरिका ( चिली ) | १५,६७६ |
| मॉंटेरोझा ( स्वित्झलॅंड ) | १५,२१७ |
| मॅटरहॉर्न ( ,, ) | १४,७८० |
| जुंगफ्रॉव ( ,, ) | १३,६६८ |
| राबसन ( ब्रि. कोलंबिया ) | १२,९७२ |
| फुजियामा ( जपान ) | १२,३९१ |
| कुक ( न्यूझीलंड ) | १२,३४९ |
| एटना ( सिसिली ) | १०,७३९ |



**पर्ले किमेदी**—किमेदी पाहा.

**पर्शु**—वेदकालीन एक राष्ट्र. पर्शु राष्ट्र व पर्शु संस्कृति यांविषयीं वेदांत उल्लेख आहेत. परशुराम (दशावतारांतील सहावा) हा याच राष्ट्रजातीपैकीं असावा असा कांहीं संशोधकांचा तर्क आहे.

ज्या वेळीं आजच्या इराण्यांचे पूर्वज कोणत्या तरी प्रदेशांत कांहीं काळ वेदभाषी लोकांच्या पूर्वजांसह राहिले होते त्या वेळीं तेथें एका विशिष्ट संस्कृतीचें संवर्धन झालें होतें. त्या संस्कृतीस पर्शु–भारतीय ( इंडो–इराणियन ) संस्कृति व त्या काळास पर्शुभारतीय काळ म्हणतात. या संस्कृतीचें ज्ञान पारशी धर्मग्रंथांवरून होतें. आजचे पारशी हे त्या काळीं इराणांत स्थायिक झालेल्या पर्शूंचे वंशज होत. यांची एक टोळी सुदास या वेदकालीन राजास साहाय्य करण्याकरितां पृथू लोकांसहित भरतखंडांत आली होती.

**पर्सेपोलिस**—इराणांतले सिराझपासून ४० मैलांवरील प्राचीन शहर. हें सध्यांच्या फारसिस्तान प्रांतांत आहे. सध्यांचें नांव नक्शी रुस्तुम. हें पहिल्या दरायसनें वसवलें व त्या वेळीं ही

इराणची राजधानी होती. पुढें शिकंदरनें हे शहर जाळलें. या शहराच्या अवशेषांवरून त्या काळच्या वैभवाची कल्पना येते.

**पलटण**—(प्लॅटून). पूर्वी हिंदुस्थानामध्यें जेव्हां इंग्रज, फ्रेंच, वगैरेंनीं कवायत शिकविलेलें पायदळ सैन्य तयार केलें तेव्हां अशा कवायत शिकलेल्या फौजेच्या भागास पलटण म्हणत. हा प्लॅटून या शब्दाचा अपभ्रंश आहे. पण त्या वेळीं पलटण या शब्दानें निश्चित अमुक संख्या व्यक्त होत नव्हती. आतां १९१४ मध्यें डबल कंपनीची पद्धति अमलांत आल्यापासून प्लॅटून म्हणजे कंपनीचा चौथा हिस्सा होय. प्रत्येक प्लॅटूनवर एक दुय्यम अधिकारी (ज्यूनियर ऑफिसर) असतो व त्याच्या हाताखालीं एक सार्जेंट असतो. त्याला प्लॅटून सार्जेंट म्हणतात. याचे पुन्हां चार भाग असतात. ते दुय्यम दर्जाच्या बिनसनदी अधिकाऱ्यांच्या हुकमतीखालीं असतात. अशा प्रत्येक भागाची संख्या बहुधा दहा असते. या दहांपैकीं एका वेळीं फक्त सहा लढाईच्या कामीं योजावयाचे असतात.

**पलाद धातु**—(पॅलाडिअम). हा धातु फार दुर्मिळ आहे. याचा अणुभारांक १०६·७ आहे. सोनें आणि प्लॅटिनम यांशीं संयुक्त झालेला असा हा सांपडतो. प्लॅटिनमप्रमाणेंच हा हवेंत खराब होत नाहीं. पण नत्राम्लाचा याच्यावर थोडथोडा परिणाम होतो. ज्योतिषशास्त्रांतील यंत्रांसाठीं या धातूचा उपयोग होतो. याचा रंग रुपेरी असतो.

**पलामऊ**—बिहार. छोटानागपूरमध्यें हा एक जिल्हा आहे. क्षेत्रफळ ४,९७१ चौ. मैल व लो. सं. ९,१२,७३४. शोण नदी याच्या उत्तर सरहद्दीवरून वाहते. यांत दगडी कोळसा व इतर खनिज पदार्थ निघतात. हवामान समशीतोष्ण. पाऊस ४९ इंच. पलामऊ या शब्दाचा अर्थ आश्रयस्थान असा आहे.

**पलिस्तराचे किडे**—हे कवचपक्ष वर्गांत येतात. यांना 'पलिस्तराचे' (ब्लिस्टर) किडे हें नांव देण्याचें कारण या कीटकांच्या (पूर्णावस्थेंतील) दुसऱ्या पायांतून एक प्रकारचा द्रव पदार्थ बाहेर पडतो. तो माणसाच्या अंगाला लागल्याबरोबर फोड येतात. पलिस्तराच्या किड्यांचें खाद्य म्हणजे फुलांतील पराग हें होय.

**पलुस्कर, पंडित विष्णु दिगंबर** (१८७२–१९३१)—एक प्रसिद्ध संगीत-विशारद. बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या सहवासांत यांनीं संगीतकलेची आराधना केली. आवाजाची नैसर्गिक अनुकूलता नसतांनाहि स्वतःच्या दृढ महत्त्वाकांक्षेनें यांनीं हिंदी संगीत आत्मसात् केलें. या कलेंत प्रावीण्य मिळवून १८९६ सालीं यांनीं उत्तर हिंदुस्थानांत दौरा काढला व तिकडील लोकांकडून वाहवा मिळवली. एका साधूच्या अनुज्ञेवरून लाहोर येथे यांनीं गांधर्व महाविद्यालयाची स्थापना केली व संगीत-प्रसाराच्या कार्यास स्वतःस वाहून घेतलें. कै. ना. मो. खरे, प्रा. नारायणराव व्यास, पं. वामनराव पाध्ये, पं. विनायकबुवा पटवर्धन यांच्यासारखे शिष्य निर्माण करून हिंदी शास्त्रोक्त संगीताचा प्रसार चोहोंकडे केला. भक्तिपूर्ण व रसाळ पद्यें भावनापूर्णतेने गाण्याकडे यांचा ओढा विशेष असे. संगीताचें यशस्वी स्वरलेखन निर्माण करणारे व संगीतशास्त्रावरील एक अधिकारी लेखक म्हणूनहि यांची योग्यता वरच्या दर्जाची आहे.

आपल्या ध्येयवादी, निर्व्यसनी व शुद्ध आचरणानें नमुनेदार शिष्यपरंपरा निर्माण करून यांनीं हिंदी संगीताला समाजांत उच्च स्थान प्राप्त करून दिलें यांत शंका नाहीं.

**पॅलेस्टाइन**—आशिया मायनरमधील एक प्रदेश. ही ख्रिस्ती लोकांची पवित्र धर्मभूमि आहे. बायबलमधले प्रसंग याच प्रदेशांत घडले. बायबलमध्यें कॅनान म्हणून वर्णन झालेला प्रदेश व पॅलेस्टाइन दोन्ही बहुतेक एकच. १६ व्या शतकांत हा प्रदेश तुर्कांनीं जिंकून घेतला होता. तो १९१७ मध्यें इंग्रजांनीं जिंकून घेतला व महायुद्धाच्या अखेरीस त्याबद्दल राष्ट्रसंघाकडून त्यांस पॅलेस्टाइनवर मॅंडेटचे अधिकार मिळाले (१९२२). क्षे. फ. १०,४२९ चौ. मैल. मुख्य नदी जॉर्डन आहे. हा मुख्यतः शेतीचा मुलूख आहे. तेलाचा व्यापार मोठा आहे. हैफा हें बंदर त्यासाठीं प्रसिद्ध आहे. सुमारें तेरा लाखांच्यावर असलेल्या लोकवस्तींत अर्ध्याहून जास्त मुसलमान आहेत. सुमारें पांच लाख ज्यू आहेत. पूर्वीं यांची वस्ती ⅓ हि नव्हती. एक लाखाच्या आसपास ख्रिश्चन आहेत. इतरहि नानाविध धर्मपंथांचे लोक आहेत. त्यांत कांहीं हिंदू व शीख आहेत. सुमारें ७५० गांव अरब वस्तीचे आहेत. ज्यू वस्तीचे चार विभाग केले आहेत. राजकीय कारभाराकरितां तीन विभाग पाडले आहेत. मृत समुद्र यांतच आहे. जेरुसलेम हें राजधानीचें ठिकाण आहे.

पॅलेस्टाइनच्या स्वामित्वाबद्दल ज्यू आणि अरब या दोघा राष्ट्रजातींत बरेच दिवसांपासून जोराचे झगडे चालू होते. ही आपली पितृभूमि म्हणून ज्यू लोकांनीं राष्ट्रसंघाच्या कायद्यांविरुद्ध या प्रदेशांत मोठी वसाहत चालविली. अर्थात् अरबांनीं याला विरोध केला. ज्यूंनीं मॅंडेटप्रमाणें अधिकार गाजविणाऱ्या इंग्रज सत्तेशीं जोराचा लढा दिल्यामुळे कंटाळून १९४८ सालीं इंग्रजांनीं मॅंडेटप्रमाणें त्यांच्याकडे आलेलें आधिपत्य सोडून दिलें. तेव्हां तर प्रत्यक्षच एकीकडे अरब राष्ट्रें व दुसरीकडे ज्यू लोक यांच्यांत युद्ध सुरू झालें. संयुक्त राष्ट्रसंघानें तडजोडी सुचविल्या, पण यश न येऊन शेवटीं पॅलेस्टाइनवर ज्यूंचें स्वामित्व आलें व राष्ट्रसंघाला मान्यता द्यावी लागली. याप्रमाणें पॅलेस्टाइनमध्यें नवें ज्यू राष्ट्र निर्माण झालें.

या प्रदेशांतील तेलासंबंधांत बाहेरच्या राष्ट्रांचे हितसंबंध पॅलेस्टाइनमध्यें गुंतले होते. इंग्लंड, अमेरिका आणि रशिया या तिघांचा डोळा या तेलावर आहे. व या तिघांनीं आपआपले डाव साधण्यासाठीं एकमेकांविरुद्ध मुत्सद्देगिरी लढविली. इंग्लंड अरबांच्या बाजूस तर रशिया आणि अमेरिका ज्यूंच्या बाजूस असें दृश्य या लढाईंत दिसलें.

आतां पॅलेस्टाइनची जी फाळणी झाली ती अशी—

| | ज्यू प्रदेश | अरब प्रदेश | प्रमाण |
|---|---|---|---|
| क्षेत्रफळ— | ५,६०० चौ. मै. | ४,७०० चौ. मै. | ५५ : ४५ |
| लोकसंख्या— | | | |
| (१) ज्यू | ४,९८,००० | १०,००० | |
| (२) अरब | ३,२७,००० | ८,०५,००० | |
| ज्यूंचें अरबांशीं प्रमाण— | ३ : २ | १ : ८० | |

**पलौंग**—एक ब्रह्मदेशीय राष्ट्रजाति. टौंगपेंग संस्थान (उत्तरशान विभाग) हा यांचा मुख्य प्रदेश. इतरत्रहि हे डोंगराळ प्रदेशांत आहेत. याचे दोन पोटविभाग—एक पलौंग व दुसरा पले. पलौंग लोकसंख्या सुमारें ६०,००० आहे. हे बौद्ध धर्मीय आहेत. चहाची लागवड यांना चांगली करतां येते.

**पल्टूदासी पंथ**—पल्टूदास नांवाच्या साधूनें या पंथाची स्थापना केली. अयोध्येंत या पंथाचा मुख्य मठ आहे. या पंथातील लोक तुलसीमाला धारण करतात. या पंथास मूर्तिपूजा मान्य नाहीं. पल्टूदासी हे निर्गुण ब्रह्माचे उपासक आहेत. यास अवतारांबद्दल विशेष आदर वाटत नाहीं, परंतु रामनामसरण आणि योग ह्यांच्या योगानें मोक्षप्राप्ति होते असें हे समजतात. या पंथाचे लोक संयुक्त प्रांत व नेपाळ या भागांत आहेत. [हिं. ध. दी.].

**पल्लव घराणें**—दक्षिण हिंदुस्थानांत कांची ऊर्फ कांजीवरम् येथील इ. स. च्या ३ ऱ्या, ७ व्या व ८ व्या शतकांत स्वतंत्रपणें राज्य करणारें राजघराणें. हे राजे परकीय म्हणजे हिंदुस्थानाबाहेरील असून पार्थियन वंशाचे वाटतात. हे खि. पू. २ ऱ्या शतकांत दक्षिणेंत आले व गोदावरीच्या दक्षिणेच्या मुलुखाचे स्वामी झाले. चोल, चेर, पाण्डय, चालुक्य, वगैरे शेजारच्या राष्ट्रांशीं यांस नेहमीं झगडावें लागे. यांना चालुक्यांनीं तुंगभद्रा आणि कृष्णा यांच्या दक्षिणेस रेटलें. चिनी प्रवाशी ह्युएन्त्संग हा यांचें जें वर्णन करतो तें मराठ्यांच्यासारखेंच आहे. हें शैव घराणें होतें पण जैन व बौद्ध धर्मीयास उदारतेनें व सहिष्णुतेनें वागवी. पूर्वपल्लव व उत्तरपल्लव असे कालानुक्रमाप्रमाणें या घराण्याचे दोन भाग मानतात. पूर्वपल्लवांस समुद्रगुप्तानें मांडलिक केलें (३३८). उत्तरपल्लव इ. स. ५८० ते ७४५ या कालांत झाले. चालुक्य व उत्तरपल्लव एकमेकांचे शत्रू होते व एकमेकांचा पराभव करीत. परंतु शेवटीं ७४२ मध्यें दुसरा विक्रमादित्य यानें शेवटचा पल्लव राजा नंदीपोतवर्मा याचा पराभव करून त्याचें राज्य खालसा केलें.

पल्लव राजे विद्येचे व शिल्पाचे फार चहाते होते. यांची राजधानी कांची (कांजीवरम्) होती. शिवस्कंधवर्म्यानें इ. स. १५० च्या सुमारास अश्वमेध यज्ञ केला. नरसिंहवर्मा याला 'महामल्ल' अशी पदवी होती व त्यानें मामल्लपुरम् येथील शिल्पाविषयीं प्रसिद्ध अशीं कांहीं देवळें बांधलीं. पल्लव राजांनीं सर्व धर्मांना आदरानें वागविलें व विशेषतः ब्राह्मणी धर्माला उत्तेजन दिलें. त्यांच्या अमदानींत म्हैसूरचा कांहीं भाग व पश्चिम किनारा हे सोडून सारा दक्षिण हिंदुस्थान हिंदुमय होता. यांच्या अमदानींत तामिळ वाङ्मयांत सर्वोत्कृष्ट काव्यांची भर पडली. पल्लवांचीं सोन्याचीं नाणीं उपलब्ध आहेत.

**पवार घराणें**—पुणें जिल्ह्यांत मलठण येथें मूळ पवार घराणें आहे. देवासचे आणि धारचे पवार येथलेच. यांचें गोत्र अगस्ति. हे सूर्यवंशी व अष्टपदा गायत्रीचे अधिकारी. मानाजी पवार याला शाहूनें ५० स्वारांच्या पथकाचें सरंजामी इनाम दिलें होतें. मानाजीचा पुत्र यादव यास महादजी शिंदे यानें ५ हजारांचा जात सरंजाम दिला. हा होळकरांच्या दंग्यापर्यंत चालला. बाजीरावानें तो १० हजार केला पण एल्फिन्स्टननें तो पुन्हां ५ हजारांवर आणला. पवारांच्या कुलदेवता काळभैरव व अंबूवरची देवी. यांचें निशाण लाल असून त्यावर हनुमानाचें चित्र आहे. पवार घराण्यांतील थोर पुरुषांचीं चरित्रें या कोशांत त्या त्या ठिकाणीं दिलेलीं आढळतील.

**पवार, शिवराम गणपत** (१८६६–१९३९)—एक महाराष्ट्रीय ज्योतिर्विद्. हे नगर जिल्ह्यांतले असून शाळाखात्यांत डेप्युटीच्या हुद्यापर्यंत चढले. यांनीं भारतीय आणि पाश्चात्य ज्योतिषशास्त्राचें चांगलें अध्ययन करून ज्योतिषविषयक पुढील ग्रंथ लिहिले— सूर्येन्दुस्थानमान, रेवती योगतारा, लग्नसाधन, सारण्या, ग्रहगतीसिद्धान्त, ग्रहविज्ञानपंचांगकल्पतरु, उपरागविज्ञान, इ. . यांतील कांहीं छापलेले नाहींत. हे टिळक पंचांगाचे मोठे पुरस्कर्ते होते.

**पॅव्हिआ**—इटली, पॅव्हिआ प्रांताची राजधानी. हें शहर मिलानपासून २२॥ मैलांवर व समुद्रसपाटीपासून २५३ फूट आहे. लो. सं. ४० हजार. येथें काहीं सुंदर मंदिरें आहेत. १३६१ मध्यें गॅलेझोनें एक विद्यापीठ स्थापन केलें. याची वैद्यकशास्त्राकरितां फार प्रसिद्धि आहे.

**पशुपतीश्वर**— नेपाळ, एक यात्रास्थान. बी. एन्. डब्ल्यू. रेल्वेनें रक्सौल स्टेशनावर उतरून जावें लागतें. हे रक्सौल स्टेशना-

पासून १०० मैल दूर आहे. पहिले ६० मैल सडक व पुढचा रस्ता डोंगराळ आहे व तोच फार त्रासाचा आहे. पशुपतीपासून काटमांडू तीन मैल लांब आहे. देऊळ वाग्मती नदीकांठीं असून फार भव्य आहे. सर्व देऊळ पितळेच्या पत्र्यानें मढाविलें असून देवादिकांच्या प्रतिमांनीं सजविलें आहे. दरवाजे चांदीचे आहेत. देवळांत शंकराचें लिंग कमरेइतकें उंच असून त्याला चार तोंडे आहेत. देवळापुढचा नंदी दीड पुरुष उंच आहे.

या देवस्थानच्या भागास देवपाटण म्हणतात. पशुपतिनाथाच्या देवळापासून जवळ भुवनेश्वरीचें सुंदर देऊळ आहे. पशुपतिनाथाला सरकारी उत्पन्न एक लाखाचें आहे. ही राज्याची अधिष्ठात्री देवता समजतात. येथील पुजाऱ्याला फार मोठा मान असतो. तो अस्सल द्राविडी ब्राह्मण असला पाहिजे. मुख्य पुजाऱ्याला रावळ म्हणतात. तो तेलंगी असून बाकीचे तीन कऱ्हाडे ब्राह्मण आहेत (गुर्जर, बावडेकर व पाध्ये या आडनांवांचे). पुजाऱ्याचा जन्म दक्षिणेंत झालेला पाहिजे असा नियम आहे.

**पशु**—या शब्दाचा सामान्यपणें प्राणी हा अर्थ असून त्यांत मनुष्याचाहि अंतर्भाव होतो. यज्ञाच्या वेळीं उपयोगी पडणाऱ्या

## पशूंचे वर्ग व त्यांचीं लक्षणें

| वर्ग | पशू | लक्षणे |
|---|---|---|
| १ द्विहस्त प्राणी | गोरिला, शिंपांझी, ओरँग्-ओटँग्, गिबॉन, बबून, माकड, हुप्प्या, इ. | सर्वांगावर केंस असतात. हातांपायांस पांच पांच बोटें असतात. आंगठे तिरपे असतात. बहुतेक झाडांवर राहतात. |
| २ पक्ष्याप्रमाणें उडणारे प्राणी | वटवाघूळ, पाकोळी | पुढील पायांचें पंखांत रूपांतर होतें, त्यामुळें त्यांस उडतां येतें. |
| ३ किडे खाणारे प्राणी | चिचुंद्री, साळू, इ. | हे किडे खातात. तोंडांत दांत बारीक बारीक करवतीसारखे असतात. बहुतेक बिळें करून राहतात. |
| ४ कुरतडणारे प्राणी | खार, उंदीर, सायाळ, ससा, इ. | पुढीस दांत पटाशीसारखे कुरतडण्यास योग्य असे असतात. हे शाकाहारी असतात. |
| ५ मांसाहारी प्राणी अथवा हिंस्र पशू | सील, आस्वल, कुत्रा, लांडगा, कोल्हा, खोकड, तरस, मांजर, सिंह, वाघ, चित्ता, मुंगूस, ऊद, इ. | हे मांसभक्षक प्राणी आहेत. क्रूर असतात. सुळे दांत मोठे असतात. पायांस तीक्ष्ण नख्या असतात. भक्ष्य रात्रीं मिळवितात. |
| ६ खुराचे प्राणी | गेंडा, घोडा, गाढव, झीब्रा, डुक्कर, पाणघोडा, गाय, म्हैस, शेळी, मेंढी, हरिण, सांबर, उंट, जिराफ, हत्ती, इ. | हे जमिनीवर राहणारे प्राणी आहेत. हे शाकाहारी असतात. पायास चारांपेक्षां जास्त बोटें नसतात. बोटांच्या शेवटीं खूर अथवा सपाट नखें असतात. |
| ७ माशासारखे प्राणी | देवमासा, वगैरे | हे माशांप्रमाणें पाण्यांत राहतात. |
| ८ दंतहीन प्राणी | खवले, मांजर, वगैरे | बहुतेक प्राण्यांत दांत नसतात. अंगावर खवल्यांचें चिलखत असते. मुंग्या खाऊन राहतात. |
| ९ पिशवीचे अथवा कांगारू जातीचे प्राणी | कांगारू | हे प्राणी पूर्ण वाढ होण्यापूर्वीच जन्मास येतात. यांच्या पोटास पिशवी असते. |

पांच जनावराचा नेहमीं निर्देश होत असतो. अश्व, धेनु, अज, मेष आणि नर अशीं हीं पांच नांवें आहेत. अशा प्रकारच्या सात पाळीव जनावरांचा अथर्ववेद व मागाहून झालेले ग्रंथ यांमध्यें उल्लेख आलेला आहे. सात ही संख्या धरण्याचें कारण प्राच्य-विद्यापंडित व्हिटने म्हणतो त्याप्रमाणें ती संख्या पवित्र व गूढ मानीत असत, हें असावें. वर सांगितलेलीं पांच जनावरें आणि गर्दभ व उष्ट्र मिळून सात होतात, हें भाष्यकाराचें स्पष्टीकरण कांहीं पंडितांस मान्य नाहीं. जनावरांचें वर्गीकरण, १ हस्तादानाः (हातानें जिन्नस उचलणारे)– उदाहणार्थ, मनुष्य, हत्ती व मर्कट; आणि २ मुखादानाः (मुखानें जिन्नस उचलणारे), असेंहि केलेलें सांपडतें. द्विपाद व चतुष्पाद असें दुसरें एक वर्गीकरण केलेलें आहे. मनुष्य हा द्विपाद प्राणी असून तो पशूपेक्षां श्रेष्ठ गणला गेला आहे. तो शतायु असून पशूंचा राजा आहे. त्याला वाचा आहे. ऐतरेय आरण्यकांत वनस्पतिवर्ग, पशुवर्ग व मनुष्यवर्ग यांमध्यें असलेला बुद्धीच्या बाबतींत सविस्तर भेद दाखविला आहे.

कणा असलेल्या प्राण्यांत पक्ष्यांच्या शेजारीं पशूंना स्थान दिलें पाहिजे. कोणी संशोधक सांगतात कीं, पक्ष्यांपासून पशू झाले; पण हें मत सर्वमान्य नाहीं. पशूंमध्यें गाय, घोडा, म्हैस, सिंह, वाघ, वगैरे तर येतातच, पण उंदीर, घूस, वटवाघूळ, इ. प्राणीहि पडतात. हा सस्तन प्राणिवर्ग आहे. पण मनुष्याला पशूंतून वगळावयाचें म्हटल्यास पशूंना सस्तन चतुष्पाद प्राणि-वर्ग असें शास्त्रीय नांव द्यावें लागेल. पशूचें शरीर शीर, धड व अवयव यांनीं युक्त असून समतोल असतें. अर्थात् याला स्पर्शेंद्रियें आणि रसनेंद्रियें असतात. यांची स्वतःची भाषा असते, पण त्यांना मनुष्यासारखें बोलतां येत नाहीं. यांना मनोविकार असतातच. कान टवकारणें, शेंपटी उभारणें, दांत काढणें, वगैरे गोष्टी यांचे द्योतक म्हणतां येतील. पशूंची राहणी साधारणतः जमिनीवरच असते. वानरें, खारी, वगैरे झाडांवर राहतात; व सील, देव-मासे, वगैरे पाण्यांत वस्ती करतात; तर वटवाघूळ हवेंत उडत जातात. कांहीं शाकाहारी तर कांहीं मांसाहारी आहेत. मनुष्या-प्रमाणें संघ (कळप) करून राहण्याची आवड पुष्कळ पशूंत दिसते. यांच्या संततीची वाढ कांहीं कालपर्यंत मातेच्या पोटांत होते. पुढें लवकरच पिलें स्वतःचें भक्ष्य मिळवितात. पिलांची एका वेळीं जन्मास येणारी संख्या निरनिराळी असते. हत्ती, घोडा, गाय, वगैरेंना एका खेपेस एक पोर होतें, तर डुक्कर, कुत्रा, उंदीर, वगैरेंना आठदहा होतात. पशूंच्या लक्षणांवरून त्यांचे वर्ग पाडले जातात. ('पशू, पक्षी व इतर प्राणी' वरून) कांहीं वर्ग असे—

[तक्ता मागील पृष्ठावर पाहा.]

**पशुवैद्यक**—प्राचीन आयुर्वेदांत या वैद्यकाची माहिती नसली तरी अशोकाच्या काळापासून पशूंसाठीं दवाखाने होते असें नक्की सांगतां येतें. या काळच्या व पुढील काळच्याहि ग्रंथांत फक्त हत्ती आणि घोडे यांच्या उपचारांसंबंधीं विवेचन सांपडतें. हस्त्यायुर्वेद आणि शालिहोत्र हे हत्तीघोड्यांसाठींच स्वतंत्र ग्रंथ आहेत. या ग्रंथांचीं अरबी आणि तिबेटी भाषांतरेंहि उपलब्ध आहेत.

युरोपांत फ्रान्समध्यें १७६२ सालीं पशुवैद्यकाचें शिक्षण देणारें विद्यालय निघालें. पुढें १७९० मध्यें एका फ्रेंच माणसानेंच लंडनमध्यें असेंच विद्यालय काढलें. आज या शास्त्राची पुष्कळ वाढ झाली असून घरगुती जनावरांसाठीं दवाखाने आणि इस्पितळें यांची गरज वाढली आहे. कृषि-शास्त्राची एक शाखा म्हणून गुरांची निगा कशी राखावी याचें शिक्षण देण्यांत येत असतें. आपल्याकडे या वैद्यकाचें शिक्षण घेण्यास थोडेच विद्यार्थी पुढें येतात. याचें बहुंशीं कारण आपण जनावरांची मुळींच काळजी घेत नाहीं हें होय.

**पश्चिम ऑस्ट्रेलिया**—ऑस्ट्रेलियाच्या संघराज्यामधील पश्चिम भागाचा प्रांत. जवळजवळ सगळा पश्चिम भाग यांतच आला आहे. याचा मध्यभाग अद्यापि असंशोधित जंगलांनीं व्याप्त आहे. तेव्हा वसाहती फक्त किनाऱ्याच्या बाजूनें झालेल्या आहेत. १८९२ मध्यें कूलगार्डीजवळ सोन्याच्या खाणींचा शोध लागला व त्यामुळें संस्थानची वाढ, भरभराट व प्रगति बरीच झाली. गहूं, लोंकर, लांकूड यांचा निर्यात व्यापार चालतो. पर्थ हें राज्यकारभाराचें ठिकाण आहे. फ्रीमँटल हें बंदर आहे. क्षेत्रफळ ९,७५,९२० चौ. मैल. लो. सं. (१९३३) ४,३८,८५२. येथें एक विद्यापीठ आहे.

१८२९ सालीं कॅ. फ्रीमॅन्टल यानें येथें वसाहतीस सुरवात केली. प्रथम जन्मठेपेचे कैदी येथें ठेवण्यांत येत. १८६८ मध्यें ही पद्धत बंद पडून याला राज्यकारभाराचे कांहीं हक्क दिले. १८९० सालीं हा स्वयंशासित प्रांत बनला. १९०० मध्यें हा प्रांत संघराज्यास जोडण्यांत आला.

**पश्चिम पंजाब**—पाकिस्तान, एक प्रांत. १९४७ च्या हिंदुस्थानच्या विभागणींत हा भाग पाकिस्तानांत गेला. यालाच पंजाब म्हणणें सार्थ होईल. कारण झेलम्, चिनाब, रावी, सतलज आणि सिंधु या पांचहि नद्या याच प्रदेशांतून वाहतात. या प्रांतांत पुढील प्रदेश येतात—

(अ) लाहोर विभाग—लाहोर, गुजराणवाला, गुरुदासपूर, शेखपुरा व सियालकोट हे जिल्हे.

(आ) रावळपिंडी विभाग—रावळपिंडी, अटक, झेलम, मियानवाली व शाहपूर हे जिल्हे.

(३) मुलतान विभाग—मुलतान, डेरागाझीखान, ल्यालपूर, मॉंटगॉमेरी व मुझफरगड हे जिल्हे.

याचें क्षे. फ. ६२,०१२ चौरस मैल व लोकसंख्या (१९४१) १,८७,४६,००० आहे. या भागांत गहूं व कापूस फार होतो. तसेंच लोंकर निघते. पाटबंधारे किती तरी आहेत. आशिया खंडांत कालवे जर कोठें फार असतील तर ते पंजाबमध्यें; याच्या पाण्यामुळें किती तरी जमीन भिजते. लाहोर हें राजधानीचें ठिकाण इतिहासप्रसिद्ध असून सर्व दृष्टींनीं भरभराटलेलें आहे.

**पश्चिम व्हर्जीनिआ**—संयुक्त संस्थानें (अमेरिका) यांतील पूर्वेकडचें एक डोंगरी संस्थान. हें व्हर्जिनिया व केन्टकी या संस्थानास लागून आहे. क्षे. फ. २४,१८१ चौ. मै. व लोकसंख्या १९,०१,९७४. राजधानी चार्लस्टन. बहुतेक भाग डोंगराळ आहे. ॲपॅलॅशियन पर्वताच्या रांगा या संस्थानांतून जातात. पश्चिम भाग ओहिओ खोऱ्यांत येतो. ओहिओ धरून ३–४ मोठ्या नद्या आहेत. खनिज कोळसा पेन्सिल्व्हानियाच्या खालोखाल याच संस्थानांत निघतो. पेट्रोलियम् गॅस, लोखंड, मीठ, वगैरे इतर खनिज पदार्थ प्रमुख आहेत. पश्चिम भागांत मोठीं अरण्यें आहेत. त्यातून इमारती व इतर मौल्यवान् लांकूड निघतें. कांच, कांचसामान, बीड, पोलाद, कोक, कागद, वगैरेंचे कारखानेहि आहेत. मॉर्गनटाउन येथें एक विद्यापीठ आहे.

१६७० मध्यें प्रथम या भागाचें संशोधन झालें. १७२७ मध्यें वसाहती झाल्या. १७६८ मध्यें इंग्रजांनीं ह्या भागाच्या जमिनी स्थानिक रहिवासी–रेड इंडियन यांपासून खरेदी केल्या. स्वातंत्र्यप्राप्तीच्या युद्धापासून नंतरच्या यादवीअखेरपावेतो हा भाग व्हर्जिनियामध्यें सामील होता. यादवी युद्धानंतर हें संस्थान स्वतंत्र झालें व १८६३ मध्यें तें युनियनमध्यें सामील झालें. (व्हर्जिनिआ पाहा.)

**पॅसिफिक महासागर**—हा पृथ्वीच्या पाठीवरील सर्वांत मोठा महासागर असून अमेरिका आणि आशिया–ऑस्ट्रेलिया यांच्यामध्यें आहे. आणि त्यानें पृथ्वीचा $\frac{1}{3}$ हून अधिक भाग व्यापलेला आहे. याचें क्षे. फ. सु. साडेपांच कोटी चौ. मै. आहे. या महासागराशीं हिंदी महासागर, चिनी समुद्र, पीत समुद्र, जपानचा समुद्र, ओखोटस्कचा समुद्र, इत्यादि जोडलेले आहेत. उत्तर अंगास हा महासागर बेहरिंग सामुद्रधुनीनें आर्क्टिक महासागराशीं जोडलेला आहे. आणि पूर्व बाजूस केपहॉर्ननजीक ॲटलांटिक महासागराला मिळालेला आहे. या महासागरावरून ईशान्य व्यापारी वारे नेहमीं वर्षभर वाहतात. चिनी समुद्रांत मधून मधून भयंकर वादळें होतात. याची खोली कमी-जास्त आहे. जपानच्या उत्तरेस टुस्कारोरा समुद्राची खोली ४,७०० फॅदम आहे, तर फिलिपाइन्स बेटांजवळ ती ५,३४८ आहे. या महासागरावरून अनेक व्यापारी मार्ग जातात.

**पहलवी**—किंवा पेहलवी. झरथुष्ट्राच्या अनुयायांनीं आपल्या पवित्र ग्रंथांचीं जुनीं भाषांतरें ज्या लिपींत लिहिलीं आहेत तिला पेहलवी अशी संज्ञा देतात. ही संज्ञा फार जुन्या काळापासूनची आहे. ससॅनियनांच्या अमदानींत पहलवी ही दरबारी भाषा होती. आठव्या शतकांतील विद्वान् इब्न मोकाफा इराणांत पेहलवी ही राजभाषा होती असें प्रतिपादन करतो. हल्लीं पहलवी ग्रंथांतील लिपीला व या ग्रंथासारखेच लिहिलेले जे शिलालेख व धातुलेख आहेत त्यांतील लिपीलाच फक्त ही संज्ञा लावतात.

पहलवी ग्रंथाकडे नजर टाकल्याबरोबर त्यांतील भाषेची चमत्कारिक भेसळ कळून येते. पहलवी सेमिटिक आहे ह्याबद्दलचा वाद आतां मिटला व असें सिद्ध झालें आहे कीं, फारसी सेमिटिक लिपीमध्यें लिहितात; डोळ्यांना फक्त सेमिटिक शब्द दिसतात, पण कानांना ते फारसी ऐकूं येतात. इब्न मोकाफा यानें पुष्कळ पहलवी ग्रंथ अरबींत लिहिलेले आहेत. तो म्हणतो कीं, ज्याचा फारसीमध्यें उच्चार करीत, पण निराळ्या तऱ्हेनें लिहीत असे एक हजार शब्द इराणी लोक वापरीत असत. भाकरी म्हणावयाची असल्यास ते 'नॉन्' असा उच्चार करीत पण 'लह्मा' असें लिहीत. पहलवी वाचतांना ज्या अडचणी येतात त्या कांहीं पहलवी अक्षरें जीं १, २, ३, +, – यांसारखीं कल्पनाबोधक चिन्हें आहेत तीं समजून घेतल्यास कमी होतील. सध्यांच्या हस्तलिखित ग्रंथांतून वेळोवेळीं कांहीं उच्चारभेददर्शक खुणा केलेल्या आढळतात. पण यापेक्षां पहलवीमधील ग्रंथांतून अवेस्ता हा धर्मग्रंथ ज्या लिपींत लिहिला आहे, त्या सुबोध लिपींत उतरलेल्या पाझंद ग्रंथाचा फार उपयोग होतो. हा ग्रंथ (हा उतारा) भाषाशास्त्रदृष्ट्या निर्दोष नसेल व नाहीं, पण पहलवीची कल्पना येण्यास पाझंदची फार जरूरी आहे. कांहीं अतिप्राचीन ससॅनियन खोदीव लेखांबरोबर एक लिखाण सांपडतें. त्यांतील लिपि कांहींशी निराळी आहे. ही लिपीसुद्धां कांहीं रत्नांवर व शिक्क्यांवर आढळते. हिला खाल्डिओ–पहलवी म्हणतात. ही मीडियांतील लिहिण्याची पद्धत व दुसरी अरेमाइक–पहलवी ही इराणची पद्धत आहे, असें कांहीं भाषाशास्त्रज्ञ सांगतात. पहलव हें नांव जुन्या पार्थियन शब्दाचें फारसीमधील रूपांतर होय; तेव्हां पहलवी म्हणजे पार्थियन. ह्यावरून असें सिद्ध होतें कीं, ह्या लिहिण्याच्या पद्धतीची वाढ पार्थियन काळामध्यें झाली असावी. हखामणी राज्यांत अरेमाइक लिहिणें व वाचणें राज्यकारभारांत सुद्धां, अरेमाइक प्रदेशाबाहेर चालत असे. तेव्हां इराणी लोकांनीं स्वतःची उपयुक्त लिपि नसल्याकारणानें, जशी त्यांनीं पुढें अरबी लिपि उसनवार घेतली, त्याचप्रमाणें सहजगत्या हीं अरेमाइक

वर्णाक्षरें घेतलीं असण्याचा संभव आहे. पारशांचीं बहुधा सहाव्या शतकांतील पवित्र धर्मग्रंथांचीं भाषांतरें, मुख्यतः मिनोई–खिर्द आणि बुंदहिश हे ग्रंथ पहलवी वाङ्मयांत येतात. एके काळीं भ्रष्ट, धर्मबाह्य वाङ्मय फार असे; त्यापैकीं पुष्कळसें अरबी व नवीन फारसी भाषेमध्यें उतरून घेतलें आहे. अद्याप कांहीं थोडें वाङ्मय पहलवीमध्यें शिल्लक आहे.

अवेस्ताच्या भाषांतरापासून पहलवी लेख सांपडतात. 'दीनकर्द', 'दातिस्तान–ई–दीनीक' (सु. ९ वें शतक), 'शिकंदगूमानीक वीजार', 'बुन्दहिश्न' (१२ वें शतक), 'दीना–यी मैन्यो–यी खिराद', 'अर्दवीराफ' यांसारखे धर्मग्रंथ पहलवींत लिहिले आहेत. ससॅनियनांच्या अमदानीनंतर धर्मग्रंथांखेरीज ग्रंथांची निगा पारशी धर्मगुरूंनीं घेतली नाहीं; त्यामुळें ते उरले नाहींत. तथापि पुढील कांहीं सांपडतात. खोस्राव–इ कवाधान व त्याचा नोकर यांची गोष्ट (इ. स. ५००); कार्नामक–ई–अर्तक्षत्र–ई पापकान (पहिला ससानी राजा याची गोष्ट, इ. स. ६००); इराणी शहरें; सगिस्तानचे चमत्कार; पहलवी–पाझेंद कोश, इ.. शहानाम्यांत या काळांतील कथा ग्रथित केल्या आहेत. ससॅनियन अमदानींत काव्यालाहि बहर आला असला पाहिजे. पण त्याविषयीं फक्त आख्यायिकाच उरल्या आहेत. बहराम गूर (४२०–४३८) व त्याची राणी देलाराम गाणीं रचीत. आफरीन, खोस्रवानी, बार्बंद, वगैरे कवींचीं नांवेंच फक्त ऐकूं येतात. कांहीं काळ पहलवी व अरबी जोडीनें चालल्या होत्या. पण लवकरच इस्लामी चढाईमुळें पहलवी ऱ्हास पावली.

**पहाड मूळ**—पहाड ही वेल डोंगरी प्रदेशांत होते. कोंकणांत पुष्कळ वेली दिसतील. हिचीं पानें गुळवेलीच्या पानांसारखीं असतात व वेलास बारीक मिऱ्याएवढीं फळें येतात. हिच्या मुळास 'पहाड मूळ' नांव आहे व हें फार औषधी आहे. शीतज्वरावर याचा काढा देतात. सूज असल्यास वांटून लेप देतात.

**पहाडी**— हा राग बिलावल थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सातहि स्वरांनीं होतात, म्हणून याची जाति संपूर्णसंपूर्ण आहे. वादी स्वर षड्ज व संवादी पंचम आहे. हा राग सदागेय आहे असें मानितात. मध्यम व निषाद हे स्वर थात दुर्बल आहेत. म्हणून याचें स्वरूप कांहींसें भूपाळी व शुद्ध कल्याण ह्या रागासारखें भासतें. मंद्र व मध्य सप्तकांत हा राग गाण्याचा प्रचार आहे. मंद्र सप्तकांतील धैवतामुळें ह्या रागास वैचित्र्य येतें.

**पहिला गुन्हा**—फौजदारी कायद्यांत ज्या गुन्हेगाराचा तो पहिलाच गुन्हा आहे अशा गुन्हेगार इसमाला कायद्यानें कांहीं विशेष सवलती दिलेल्या आहेत. इंग्लंडमध्यें 'दि प्रोबेशन ऑफ ऑफेंडर्स ॲक्ट', (१९०७) या कायद्यानें कोर्टाला पुढील अधिकार दिले आहेत : जर त्या अपराध्याचा तो पहिलाच गुन्हा असेल तर त्या इसमाचें वर्तन, पूर्वचरित्र, वय, प्रकृतिमान, किंवा मानसिक स्थिति, किंवा त्या अपराधाचा क्षुल्लकपणा, किंवा गुन्हा घडला त्या वेळची विशिष्ट परिस्थिति आणि शिक्षा दिल्यानें होणारा अनिष्ट परिणाम हीं लक्षांत घेऊन, न्यायाधीश संक्षिप्त चौकशी करून अशा प्रकारच्या गुन्ह्यांत गुन्हा शाबीत झाला तरी शिक्षा न देतां चांगली वर्तणूक ठेवण्याबद्दल लायक जामीन घेऊन व त्या जामीनकीची मुदत जास्तींत जास्त तीन वर्षे ठेवून आणि त्या मुदतींत गैरवर्तन केल्यास पुन्हां कोर्टांत हजर होऊन शिक्षा भोगावी लागेल अशी समज देऊन सोडून देतात. हिंदुस्थानांतील कायद्यांत क्रिमिनल प्रोसीजर कोडमध्यें अशीच योजना आहे (कलम ५६२).

**पळणी**—मद्रास इलाखा, मदुरा जिल्हा, डिंडिगल विभाग, पळणी तालुक्यांतील एक क्षेत्र. येथील सुब्रह्मण्यम् देवस्थान प्रसिद्ध आहे.

**पळस**—हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांत आढळणारें एक झाड. याला लाल भपकेदार फुलें येतात व त्यांचा रंग कच्चा पिवळा होतो. या झाडावर लाखेचे किडे पोसून लाखेची लागवड करतात. या झाडापासून गोंदहि निघतो. रंग व कातडीं कमाविणें यांत या गोंदाचा उपयोग होतो. सालीपासून एक प्रकारचा तंतु निघतो. मुळांपासून तीं चेंचून एक प्रकारचा वाक काढतात. म्हशींना पळसाच्या पानांची वैरण होते. लांकूड जमिनीवर टिकत नाहीं, पण पाण्यांत टिकतें; म्हणून याचे पोहरे वगैरे करतात. याज्ञिकीमध्यें याच्या समिधा भिक्षुक वर्गास लागतात. पळसाच्या पानांच्या पत्रावळी जेवणासाठीं करतात. त्यांचा दक्षिणेंत फार मोठा खप आहे. पळसाच्या बिया 'पळसपापडी' फार औषधी आहेत. सापाच्या विषावर पळसाचें मूळ उगाळून पिण्यास देतात.

**पक्षचर्म वर्ग**—(कोलेऑप्टेरा). शेणकिड्याच्यासारखा एक प्राण्यांचा वर्ग. या प्राण्यास चार पंख असतात; त्यांपैकीं दोन पुढें असून ते उडण्याच्या कामीं निरुपयोगी असतात. परंतु ते मागच्या पंखांस झांकून टाकून त्यांचें संरक्षण करतात. ते कठिण असून शृंगमय अथवा चर्ममय द्रव्याचे बनलेले असतात. मागचे पंख जेव्हां प्रत्यक्ष उपयोगांत आणलेले नसतात तेव्हां पुढील पंखाच्या खालीं आठवे मिटलेले असतात. यांचें पूर्णपणें रूपांतर होतें. यांच्या अळ्या प्रथम आंखूड जाड किड्यासारख्या असून त्यास सहा पाय असतात व एक खवले असलेलें डोकें व तोंड असतें.

**पक्षितीर्थ**—तिरुक्कलीक्कुनरम् पाहा. मद्रास व चिंगलपट्टम् यांच्या दरम्यान एका डोंगरावर हें आहे. चिंगलपेटाहून ९ मैलांवर हें आहे.

डोंगरावर एक शिवस्थान आहे व तेथून जवळच एका खडकावर दोन पक्षी पुजाऱ्यानें दिलेला भात खाऊन पाणी पितात व निघून जातात. हें दृश्य पाहण्यासाठीं येथें नेहमीं यात्रेकरू येतात. हे पक्षी पूर्वजन्मींचे मोठे तपस्वी ऋषी असल्याचें सांगण्यांत येतें.

**पक्षिविद्या**—(ऑर्निथॉलॉजी). पक्ष्यांच्या अभ्यासास पक्षिविद्या असें म्हणतात. सपृष्ठवंश प्राण्यांपैकीं हवेंत उडणाऱ्या प्राण्यांचा हा वर्ग आहे. यांच्या शरीराची रचना व आकार हीं त्यांच्या हवेंत उडण्यास योग्य अशा तऱ्हेचा विकास पावत आलीं आहेत. यांच्या शरीरांतील अस्थींचा सांगाडा मजबूत असूनहि हलका आहे, व त्यांत मधून मधून हवा जाण्यास मोकळा अवकाश ठेवलेला आहे. या प्राण्यांच्या मेंदूची वाढ चांगली झालेली असते. चोंचीच्या आकारामध्यें बरीच भिन्नता आढळून येते. यांच्या नाकपुड्या बहुधा चोंचीच्या आरंभीं असतात. यांचे डोळे मोठे असून कान स्वतंत्रपणें बाहेर आलेले नसतात. सामान्यतः शरीराच्या पुढील गात्रांच्याऐवजीं पंख असतात व शेपटी बोथट असते. शेपटीच्या वरच्या बाजूस एक तैलग्रंथि असते व त्यांतून बाहेर पडणारें तेल पिसें साफ करण्यास उपयोगी पडतें. शरीराच्या मागच्या बाजूस मांड्या व नडग्या, पादास्थी व पाय असतात. पक्ष्याच्या पायास अंगुली असून पक्षी आपल्या बोटांवर भार टाकून चालतो. पादास्थी आणि पाय यांवर खवले असून बोटांचा पंजा बनलेला असतो. पक्ष्याच्या शरीराच्या मागील भागाची लांबी आणि पायांचा आकार यांमध्यें निरनिराळ्या पक्ष्यांच्या राहणीप्रमाणें पुष्कळच फरक आढळतो.

शरीराची बाह्य रचना श्रृंगमय अस्तरणांची झालेली असून तिच्यामुळें जबडा, पंजे, खवले आणि निरनिराळ्या तऱ्हेचीं पिसें यांच्यावर आवरण असून तें बाह्यत्वचामय असतें. पिसामध्यें मध्यभागीं एक पोकळ नळी असून तें पीस पुढें पुढें लवचिक बनत गेलेलें असतें व त्याच्या दोन्ही बाजूंस कांट्यासारखे तंतू फुटलेले असतात. या मुख्य पिसाखेरीज अशींच लहान आकाराचीं निरनिराळीं पिसें किंवा पर असतात. यांच्या योगानें शरीराचा बाह्य आकार बनतो. पिसांचा रंग अनेक तऱ्हाचा असतो. याचें कारण त्यांमध्यें रंजक द्रव्यें असतात. नर पक्ष्यांचे रंग बहुधा अधिक तेजस्वी असतात व मादी पक्ष्यांचे रंग त्यांच्या संरक्षणाच्या दृष्टीनें सभोंवतालच्या वस्तूंप्रमाणेंच व मंद असतात. पक्ष्यांचीं पिसें वर्षांतून एकदां किंवा दोनदां गळून पुन्हां येतात.

पक्ष्यांची जीभ आणि चोंच यांचे आकार त्यांस कराव्या लागणाऱ्या क्रियांप्रमाणें भिन्न भिन्न असतात. घशाचा उपयोग बहुधा अन्न ठेवण्याच्या कामीं करण्यांत येतो व पोट किंवा उदर हें एखाद्या पिंडाप्रमाणें असून त्याच्या पुढील भागांत अन्नामध्यें जाठररस मिसळण्यांत येतो व दुसऱ्या पाठीमागील भागांत त्याचें पचन होतें. यानंतर आंतडीं सुरू होतात व शेवटीं मलद्वार असतें. स्तनन प्राण्यापेक्षां पक्ष्यांचें रक्त अधिक उष्ण असतें व त्याची उष्णता १०३° ते ११०° फॅ. इतकी असते. कंठास्थीच्या पाठीकडील बाजूस फुफुसें घट्ट बसविलेलीं असतात. त्यांचीं संतत्युत्पादक इंद्रियें शरीरामध्येंच असतात. उडणाऱ्या पक्ष्यांच्या शरीरांत छातीचा भाग स्नायुमय व पूर्ण वाढ झालेला असून त्या स्नायूंच्या योगानें उडतांना त्यास पंख खालीं-वर करतां येतात. हे स्नायू एका कण्याशीं खालच्या बाजूस जोडलेले असतात. शहामृगासारख्या धांवणाऱ्या पक्ष्यांमध्यें छातीचें हाड एखाद्या वांकड्या तबकडीसारखें असून त्यास खालीं कणा नसतो. जे पक्षी झाडावरच राहतात आणि अंडीं घालतात, त्यांस झाडाच्या फांदीवर बसण्याकरितां विशिष्ट रचना केलेली असते. पक्ष्यांच्या मेंदूचीं गोलार्धें मोठीं असतात आणि त्यांचीं संवेदनात्मक इंद्रियें चांगलीं वाढलेलीं असतात.

सामान्यतः बऱ्याचशा जातींच्या पक्ष्यांमध्यें त्यांचीं अंडीं उबवल्यानंतर फुटून पिलें बाहेर येतात. परंतु कांहीं पक्षी आपलीं अंडीं गरम वाळूमध्यें किंवा कुजणाऱ्या वनस्पतींमध्यें घालतात व तेथें तीं आपोआप उबून फुटतात व पिलें बाहेर येतात. गिलॅमॉटसारखे कांहीं पक्षी घरटीं बांधीत नाहींत. सामान्यतः पक्ष्यांचीं अंडीं अशा रंगाचीं असतात कीं, तीं सभोंवतालच्या पक्ष्यांपासून फारशीं भिन्न नसल्यामुळें नजरेस येत नाहींत. तसेंच त्यांच्या पिलांचे रंगहि त्यांस चांगलें धांवतां येईपर्यंत असेच सभोंवतालच्या पदार्थांशीं जुळतील असे असतात. कोकिळा आणि इतर कांहीं पक्षी आपलीं अंडीं इतर पक्ष्याच्या घरट्यांत घालतात. कांहीं पक्षी हवामान बदललेलें असतां दूरदूरच्या देशांत उडून जातात. अशा पक्ष्यांच्या कांहीं जाती पुढें दिल्या आहेत : १ हिंवाळ्यांत दूरदेशीं जाऊन राहणारे व वसंत ऋतु आला कीं आपल्या मूळ प्रदेशांत जाऊन अंडीं घालणारे पक्षी; २ उन्हाळ्यांत दुसऱ्या देशांत जाऊन राहून हिंवाळ्यांत दक्षिण प्रदेशांत जाऊन अंडीं घालणारे पक्षी; ३ चंचलपक्षी–हे आपल्या मूळ ठिकाणावरून दुसऱ्या प्रदेशांत उडून जात असतां अथवा परत उडून येत असतां कांहीं वेळां एखाद्या देशांत वास्तव्य करतात; ४ भटके पक्षी–हे नेहमींच भक्ष्याच्या शोधांत देशाच्या या भागांतून त्या भागांत फिरत असतात. दूर दूर देशांत भ्रमण करणारे पक्षी कांहीं ठराविक मार्गानें फार दूर अंतरावर उडत जातात.

पक्षितीर्थ (पृ. १४४४)

पिसा — झुकता मनोरा (पृ. १४९३)

पुणें — पुणें विद्यापीठ (जुना गव्हर्नरांचा प्रासाद, गणेशखिंड) (पृ. १५०१)

कदाचित् या मार्गावर पूर्वी भूप्रदेश असून पुढें तो पाण्याखालीं बुडाला असावा. परंतु हे पक्षी आपला मार्ग कसा शोधून काढतात हा प्रश्न अद्यापि सुटला नाहीं.

पक्ष्यांचे मुख्यतः दोन मोठाले वर्ग करण्यांत येतात: १ प्राचीन पक्षी—यांचे फक्त प्रास्तर अवशेष आढळतात. २ नवीन पक्षी—यांचे तीन पोटवर्ग करण्यांत येतात— अ. धांवणारे व न उडणारे पक्षी. यांमध्यें शहामृग, न्हिया, एमू, रूक, वगैरे पक्षी येतात. आ. दंतयुक्त पक्षी—हे बहुतेक नष्ट झाले असून यांस दांत असत. इ. सर्वसामान्य उडणारे पक्षी—यांचे चौदा पोटवर्ग पाडण्यांत येतात.

## पक्ष्यांचे वर्ग व त्यांचीं लक्षणें

| प्रकार | यांत कोणते पक्षी येतात | लक्षणें |
|---|---|---|
| १. गगनविहारी—हिंस्र. | घार, गिधाड, गरुड, घुबड, पिंगळा. | (१) चोचीची वरची बाजू आंकड्यासारखी खालच्या बाजूला वळलेली. (२) पायाचीं नखें तीक्ष्ण. (३) बोटें चार—पुढें तीन, मागें एक. |
| सुतार पक्ष्याच्या जातीचे. | सुतार, तांबट, वगैरे. | (१) चोंच सरळ, लांब, छिनीसारखी. (२) जीभ बारीक लांबवितां येण्याजोगी. (३) पायाचीं बोटें चार-चढतां येण्याजोगीं. |
| कोकिळाच्या जातीचे. | कोकिळ, भारद्वाज, वेडा-राघू, खंड्या, हुप्पी. | (१) चोच लांब. (२) जीभ लहान व मांसल. (३) पायाचीं बोटें चार—पुढें तीन व मागें एक, चढतां येण्याजोगीं किंवा दांडीवर बसतां येण्याजोगीं. |
| पोपटाच्या जातीचे. | पोपट (निरनिराळ्या जातींचे) | (१) चोंच बांकदार, कठिण. (२) जीभ—जाड व मांसल. (३) पायाचीं बोटें चार—पुढें दोन व मागें दोन, दांडीवर बसतां येण्याजोगीं. |
| चिमणीच्या जातीचे. | चिमणी, साळुंकी, बुलबुल, कावळा, पीलक, चष्मेवाला, परटीण, बाया, कोळसा, नीलकंठ, मधुमक्षक, शिंपी, सुगरण, पाकोळी, वगैरे. | (१) पाय कठिण कवच असलेले व पिसें नसलेले. (२) बोटें चार—पुढें तीन, मागे एक. |
| पारव्याच्या जातीचे. | पारवा, कबूतर, होला, लाहूर, वगैरे. | (१) चोंचीचें टोंक कठिण शिंगासारखें, बाकीचा भाग साधारण मऊ. (२) नाकपुड्यावर पातळ त्वचेचें आवरण. (३) बोटें चार—मागें दोन पुढें दोन. |
| २. जल किंवा कर्दम विहारी. | बगळा, बदक, टिटवी, जलकुक्कुट, क्रौंच, सारस, वगैरे. | (१) चोंच लांब. (२) मान लांब. (३) पाय लांब. (४) बोटें मोकळीं किंवा जोडलेलीं. (५) पाण्यांत किंवा चिखलांत वावरतात. |
| ३. स्थल—निवासी—कोंबड्याच्या जातीचे. | कोंबडा, मोर, टर्की, गिनी. | (१) शरीर लठ्ठ. (२) पंख आंखूड. (३) पाय बळकट व नख्या असलेले. (४) चोंच आंखूड व बळकट. (५) नर मादीपेक्षां दिसण्यांत सुरेख. |
| ४. शहामृगाच्या जातीचे. | शहामृग. | (१) उरोस्थि नसते. (२) पंख फार आंखूड. (३) पाय लांब व बळकट, धावतां येण्याजोगे. (४) बोटें दोन. |

**पक्ष्यांचीं घरटीं**—आपलीं अंडीं विण्याकरितां किंवा त्यांचें संरक्षण व पालन करण्याकरितां पक्षी जी रचना करितात त्यास त्यांचीं घरटीं म्हणतात. हीं पुष्कळच भिन्न भिन्न प्रकारचीं असतात. कांहीं जमिनीवर असून त्यांची रचना फार विचित्र व कौशल्यपूर्ण असते. हीं घरटीं बांधण्याकरितां सामान्यतः पानें, झाडांच्या बारीक बारीक फांद्या, डिऱ्या, शेवाळ, लोंकर, पिसें, माती व चिखल यांचा उपयोग करण्यांत येतो. कांहीं पक्षी वाळूंत बिळें करून राहतात. कांहीं सस्तन प्राणी व मासेहि प्रसूतीकरितां पक्ष्यांसारखींच घरटीं बांधतात असें आढळून आलें आहे.

**पाइक मासा**—या वर्गाच्या माशांचे कल्ले मृदु असतात. यांचें शरीर लांब असून पाठ सपाट असते आणि शेपटीकडे एकदम निमूळतें होत जातें. या माशास दांत असतात. हे युरोप व अमेरिका यांमधील नद्यांत आढळतात. हे बरेच दिवस जगतात व फार खादाड आहेत. यांची पूर्ण वाढ झाली म्हणजे यांची लांबी ५ पासून ६ फूटपर्यंत असते.

**पाइन**—सुरूच्या जातीच्या एका झाडास हें लौकिक नांव आहे. हें 'पिनासी' कुलांत मोडतें. या झाडांचे मुख्य दोन प्रकार आहेत: एक ॲबिटिनी अथवा फर, आणि दुसरा कुप्रेसिनी अथवा सायप्रस. पाइन हें पहिल्या प्रकारांत मोडतें. त्यामध्यें व दुसऱ्या प्रकारामध्यें हा फरक असतो कीं, याचीं पानें डोळ्यापासून लहान लहान अंकुरास एका पापुद्र्यासारख्या खवल्यामध्यें दोन ते पांच अशा गुच्छांनीं फुटतात. युरोपातील बहुतेक झाडांच्या या पर्णगुच्छांत दोन पानें असतात. आशियांतील व अमेरिकेंतील झाडांच्या पर्णगुच्छांत तीन ते पांच पानें असतात. यांची आकृतिहि कोनासारखी निमुळती होत गेलेली असते व त्यामुळें त्यांच्या आकारांतहि फरक दिसतो. हीं झाडें उत्तर युरोपांत ५२ ते ६५ अक्षांशांत मोठ्या प्रमाणांत आढळतात. यांतील कांहीं जातींची उंची १५० फुटांपर्यंत असते. यांचे निरनिराळ्या देशांत अनेक प्रकार आहेत व त्या त्या हवामानाप्रमाणें त्यांच्या आकारांत व उंचींत फरक असतो. कानडामध्यें होणाऱ्या या झाडाच्या लांकडाचा रंग पिवळा असतो व त्याचा गलबतें बांधण्याकडे उपयोग होतो.

**पाऊस**—हवेंतील वाफेचें पाणी होऊन तें थेंबाथेंबानें खालीं पडतें त्यास पाऊस म्हणतात. सूर्य पृथ्वीवरील पाणी शोषून घेतो व पुन्हां तें खालीं टाकतो असें सोप्या भाषेंत म्हणतां येईल. वारा हा देखील पावसाचें एक कारण आहे. बाष्पयुक्त उष्ण वारा जेव्हां थंड प्रदेशावरून वाहत जातो तेव्हां थोड्या वेळानें पाऊस येतो. पावसाचे थेंब लहान-मोठे असतात. फार मोठे थेंब सुमारें ¼ इंच व्यासाचे असतात. वनस्पति आणि प्राणी यांच्या जीवनाला पाऊस अवश्य आहे. यानें नद्यानाल्यांना पाणी मिळतें, हवा शुद्ध होतें व डोंगरावरील माती झऱ्यांमार्फत सखल प्रदेशांत आणली जाते. पावसाचें पाणी (तें जमिनींत जिरलें नाहीं किंवा वाहूनहि गेलें नाहीं तर) जमिनीवर जेवढें इंच उंचीचें होईल तेवढे इंच पाऊस तेथें पडला असें धरून पर्जन्यमान काढतात (पर्जन्यमापक पाहा). स्थळाचा अक्षांश, समुद्राचें निकटवर्तित्व, उंची, भूप्रकृति, इ. गोष्टींवर पावसाचें मान अवलंबून असतें. डोंगर-पर्वताचा पावसाच्या वाऱ्यांना अडथळा झाला कीं तेथें पाऊस पडतो. वृक्षवनस्पतींचा अभाव किंवा वैपुल्य पाऊस कमी किंवा जास्त पडण्याला कारणीभूत होतें.

पर्वताचा अडथळा आला नाहीं तर वारे पावसाला फार दूरवर नेतात व देशाच्या अंतर्भागांत बऱ्याच मोठ्या प्रदेशावर पाऊस पाडवितात. विषुववृत्ताजवळ पाऊस साधारणपणें ९५ इंच पडतो. खासी टेंकड्यांतील चेरापुंजीसारख्या ठिकाणीं पाऊस दरसाल ५०० इंचांवर पडतो. पृथ्वीवर हिंदुस्थानाइतका पाऊस कोठल्याच देशांत पडत नाहीं. (पुढील पृष्ठावर निरनिराळ्या ठिकाणांचें पावसाचें मान दिलें आहे.)

**पाकशास्त्र**—अन्नद्रव्यें खाण्यालायक करण्याचें जें शास्त्र ते पाकशास्त्र म्हणतां येईल. खाद्य पदार्थ, फळें सोडल्यास जशाचा तसा माणूस खात नाहीं. पशुपक्षी तसें करतात. त्यांना अन्न पाचक, रुचकर, पौष्टिक, वगैरे प्रकारचें करतां येत नाहीं. माणूस रानटी अवस्थेंत असतांना कच्चेच अन्नपदार्थ–भाजीपाला फळें, मांस, इ. खात असे. त्याला अग्नि तयार करतां येऊं लागल्यावर भाजणें, शिजविणें, उकडणें या गोष्टी तो करूं लागला. जसजसा तो सुधारत गेला तसतसा चोखंदळ बनून तो विविध प्रकारांनीं सिद्ध केलेलें जेवण घेऊं लागला. शिवाय कच्चें अन्न त्याला पचेनासेंहि झालें. तेव्हां जेवण तयार करण्याची विद्या त्यानें मिळविली व हिचेंच पुढें पाकशास्त्र झालें.

अन्न तयार करण्याच्या प्रकारांत शिजविणें, भाजणें, तळणें, परतणें, आंबवणें, मोड आणविणें, इ. गोष्टी येतात. अन्न पाचक, रुचकर, पौष्टिक होण्यासाठीं मूळ पदार्थांत दुसरे पदार्थ मिसळतात; मसाला, तिखटमीठ घालतात; व अन्न खराब होऊं नये म्हणून काळजी घेतात. निरनिराळ्या देशांत जेवणांतले पदार्थ निरनिराळे आढळतात. साध्या जेवणांतल्या पदार्थांखेरीज सणावारीं करावयाचीं पक्वान्नें असतात. पक्वान्नें बहुधा गोड असतात. तीं करण्याला विशेष कौशल्यहि लागतें.

अन्नांत शाकान्न व मांसान्न असे दोन भेद पडतात. तेव्हां शाकपाक करण्याच्या कृती वेगळ्या व मांसपाक करण्याच्या वेगळ्या.

(पृ. १४४९ पाहा.)

जगांतील कांहीं ठिकाणचें उष्णतामान व पाऊस. उत्तर गोलार्ध (उत्तर अक्षांश– विषुववृत्ताच्या उत्तरेकडे)

| अक्षांश | ठिकाणाचें नांव | समुद्रसपाटीपासून फुटांत उंची | सरासरी उष्णतामान जानेवारी | सरासरी उष्णतामान जुलई | पाऊस डि. जा. फे. | पाऊस मा. ए. मे. | पाऊस जू. जु. ऑ. | पाऊस स. ऑ. नो. | वार्षिक पाऊस |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| विषुव-वृत्तावर | किटो | १३५० | ५६ | ५४ | ११ | १७ | ४ | १० | ४२ |
| १ | सिंगापूर | २० | ८० | ८२ | २५ | २१ | २२ | २६ | ९४ |
| ५ | बोगोटा | ८,७०० | ६ | ५६ | १३ | २१ | ९ | २१ | ६४ |
| ६ | कोलंबो | ४० | ७९ | ८१ | ११ | २९ | १६ | ३२ | ८८ |
| ६ | लॅगॉस | २५ | ७९ | ७७ | ५ | २२ | २६ | १७ | ७० |
| ९ | कोलोन | १६४ | ७९ | ७९ | १५ | १६ | ४३ | ५० | १२४ |
| १२ | एडन | ९० | ७५ | ८४ | १ | २ | ० | ० | ३ |
| १३ | बँकॉक | ० | ७६ | ८१ | १ | १४ | २२ | २३ | ६० |
| १४ | मॅनिला | ५० | ७७ | ८० | ४ | ६ | ३९ | २८ | ७७ |
| १६ | सेंट लुई | १६ | ७० | ८१ | ० | ० | ११ | ६ | १७ |
| १६ | रंगून | ४० | ७५ | ७८ | १ | १३ | ६० | २७ | १०१ |
| १९ | मुंबई | ३७ | ७५ | ७९ | ० | १ | ६० | १३ | ७४ |
| १९ | मेक्सिको | ७,५०० | ५४ | ६२ | १ | ३ | १३ | ६ | २३ |
| २१ | मंडाले | ५०० | ७० | ८६ | ० | ७ | १४ | १३ | ३४ |
| २३ | कँटन | ४० | ५५ | ८२ | ६ | २५ | २९ | ८ | ६८ |
| २३ | हॅवाना | ६२ | ७३ | ८४ | ७ | ९ | १६ | १५ | ४७ |
| २३ | मस्कत | ३० | ६९ | ८७ | ४ | १ | ० | १ | ६ |
| २८ | वुशायर | २६ | ५७ | ८९ | १० | २ | ० | २ | १४ |
| ३० | कैरो | १०८ | ५४ | ८५ | १ | ० | ० | ० | १ |
| ३० | न्यू आर्लिन्स | ५२ | ५४ | ८२ | १४ | १५ | १९ | १२ | ६० |
| ३३ | त्रिपोली | ९८ | ५८ | ७९ | ८ | २ | ० | ४ | १४ |
| ३३ | बगदाद | ४० | ५० | ९५ | ६ | ३ | ० | १ | १० |
| ३४ | कायूल | ६,२५० | ३१ | ७८ | २ | ७ | १ | १ | ११ |
| ३५ | तेहरान | ४,००० | ३४ | ८५ | ३ | ४ | ० | १ | ८ |
| ३५ | टोकिओ | ७० | ३७ | ७५ | ७ | १५ | १८ | २२ | ६२ |
| ३६ | अल्जीयर्स | ७३ | ५४ | ७७ | १२ | ६ | १ | ८ | २७ |
| ३८ | इझमिर | २६ | ४७ | ८० | १२ | ७ | १ | ७ | २७ |
| ३८ | सॅन्फ्रॅन्सिस्को | ६० | ५० | ५८ | १४ | ६ | ० | ४ | १४ |
| ३९ | डेन्हर | ५,३०० | २८ | ७३ | २ | ६ | ४ | २ | १४ |
| ३९ | लिस्बन | ३३५ | ५१ | ७० | ११ | १० | ३ | ५ | २९ |
| ४० | माद्रीद | २,१५० | ४० | ७७ | ५ | ५ | ३ | ३ | १६ |
| ४० | समरकंद | २,३६० | ३२ | ७८ | ४ | ७ | १ | २ | १४ |
| ४० | पेकिंग | १२० | २३ | ७९ | ० | ३ | १९ | ४ | २६ |
| ४१ | न्यू यॉर्क | १६४ | ३० | ७४ | १० | ११ | १३ | ११ | ४५ |
| ४२ | रोम | १६३ | ४५ | ७७ | ११ | ७ | ४ | ८ | ३० |
| ४२ | शिकॅगो | ६६१ | २५ | ७१ | ७ | ९ | १० | ८ | ३४ |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४३ | व्हालडिव्होस्टॉक | ६० | ७ | ६७ | ० | ३ | ८ | ४ | १५ |
| ४३ | सोफिया | १,७६० | २९ | ७३ | ४ | ४ | ८ | ६ | २२ |
| ४३ | मार्सेल्स | २५० | ४४ | ७२ | ७ | ५ | ३ | ७ | २२ |
| ४५ | मिलन | ४८० | ३३ | ७६ | ८ | ९ | ९ | १२ | ३८ |
| ४५ | मॉंट्रिअल | १८७ | १३ | ७० | १० | ९ | ९ | ११ | ३९ |
| ४६ | आस्ट्राखान | ६६ | २१ | ७८ | १ | २ | २ | १ | ६ |
| ४७ | बर्न | १,८८० | २९ | ६५ | ७ | ७ | १२ | १२ | ३८ |
| ४७ | बुडापेस्ट | ५०२ | २९ | ७१ | ६ | ५ | ७ | ६ | २४ |
| ४८ | सेंट जॉन | १५० | २४ | ६० | १३ | १३ | १२ | १५ | ५३ |
| ४९ | पॅरिस | २६० | ३७ | ६६ | ४ | ५ | ६ | ६ | २१ |
| ५० | विनिपेग | ७४० | ५ | ६६ | २ | ७ | १० | ४ | २३ |
| ५१ | लंडन | १५५ | ३८ | ६३ | ५ | ५ | ७ | ६ | २३ |
| ५२ | ऑक्सफर्ड | २१० | ३९ | ६२ | ६ | ६ | ६ | ७ | २५ |
| ५२ | इर्कुटस्क | १,५४० | ७ | ६६ | ३ | २ | ८ | ४ | १७ |
| ५३ | डब्लिन | ५१ | ४२ | ६० | ६ | ६ | ७ | ८ | २७ |
| ५४ | एडमंटन | २,४०० | ११ | ६१ | २ | ४ | ९ | ३ | १८ |
| ५६ | मास्को | ५१० | १३ | ६६ | ३ | ५ | ७ | ५ | २० |
| ५६ | एडिंबरो | २७० | ३७ | ५८ | ५ | ५ | ७ | ७ | १४ |
| ५६ | टोम्स्क | २५० | ४ | ६८ | २ | २ | ८ | ३ | १५ |
| ५७ | वेननेव्हिस | ४,४०० | २४ | ४० | ७७ | ५३ | ४० | ४६ | १६२ |
| ५९ | स्टॉकहोम | १४६ | १७ | ६२ | ३ | २ | ५ | ६ | १६ |
| ६० | लेनिनग्राड | १९ | २७ | ६३ | ३ | ३ | ७ | ५ | १८ |
| ६१ | यार्कुटस्क | ३३० | ४५ | ६६ | २ | २ | ६ | ३ | १३ |
| ७० | ट्रॉमसो | ५० | २६ | ५२ | १२ | ११ | ७ | ११ | ४१ |
| | दक्षिण गोलार्ध ( दक्षिण अक्षांश-विपुववृत्ताच्या दक्षिणेकडे ) | | | | | | | | |
| ३ | मॅनॉस | १२१ | ७८ | ७८ | २९ | ३३ | ११ | १३ | ८६ |
| ६ | झांझिबार | २३ | ८२ | ७७ | १४ | ३३ | ६ | १२ | ६५ |
| ६ | बटेव्हिया (जाकर्ता) | २० | ७६ | ७८ | ३३ | १९ | ८ | १२ | ७२ |
| १२ | पोर्ट डार्विन | ७० | ८५ | ७८ | ४० | १६ | ० | ७ | ६३ |
| १२ | लिमा | ५०० | ७४ | ५७ | ० | ० | १ | १ | २ |
| १३ | आपिआ | ० | ७९ | ७५ | ५५ | २९ | १५ | २८ | १२७ |
| १८ | ताहिती | ० | ७८ | ७५ | १९ | १३ | ५ | ९ | ४६ |
| २४ | एलिसस्प्रिंग्ज | २,१०० | ८५ | ५३ | ५ | २ | १ | १ | ९ |
| २५ | प्रिटोरिआ | ४,४६० | ७४ | ५९ | १५ | ५ | १ | ७ | २८ |
| ३३ | बाथर्स्ट | २,१०० | ७३ | ४३ | ७ | ६ | ६ | ६ | २५ |
| ३३ | केपटाउन | ३७ | ७० | ५५ | २ | ७ | ११ | ५ | २५ |
| ३३ | सँटिॲगो | १,७०० | ६९ | ४८ | ० | ३ | ७ | २ | १२ |
| ३५ | ब्यूनॉसएरिस | १२ | ७६ | ५० | ९ | १० | ६ | ९ | ३४ |
| ३६ | ॲडिलेड | १४० | ७५ | ५२ | २ | ६ | ८ | ५ | २१ |
| ३७ | मेलबोर्न | ९१ | ६६ | ४७ | ६ | ६ | ६ | ८ | २६ |
| ४१ | वेलिंग्टन | १४० | ६२ | ४७ | १० | ११ | १७ | १३ | ५१ |
| ४३ | होबार्ट | ३७ | ६१ | ४७ | ५ | ५ | ६ | ७ | २३ |
| ४५ | डुनेडिन | ५०० | ५८ | ४२ | ९ | ९ | ९ | ८ | ३५ |
| ५३ | मॅगेलन भूशिरावरील पुंटाएरिनास | ३३ | ५१ | ३५ | ४ | ६ | ७ | ४ | २१ |

( पाकशास्त्र १४४६ वरून चालू )
खाण्यासाठीं अन्न तयार करताना त्यांतील पौष्टिक द्रव्यें निघून न जातील याची काळजी घ्यावी लागते. यासंबंधीं शास्त्रीय माहिती आपल्याकडे विशेष नाहीं. आपल्या पाकशास्त्रांत चवींवर फार भर असतो. तसेंच मसाले व तोंडी लावण्याचे पदार्थ आपल्या स्वयंपाकांत फार असतात. ते आरोग्याला अपाय-कारकहि होतात. आहारशास्त्राचा अभ्यास करून स्वयंपाक करण्यांत येत नाहीं, त्यामुळें भरमसाट वाटेल तितके पदार्थ खाऊनहि खरें पोषण होत नाहीं. पाकशास्त्रावरचीं बरींच जुनीं-नवीं पुस्तकें आहेत तर त्यांत फक्त अनेक जातींचीं अन्नें–पक्वान्नें बनविण्याचीच माहिती दिलेली असते. शास्त्रीय पद्धतीनें स्वयंपाक कसा करावा याचें मुलींच्या शाळेंतून थोडेंबहुत शिक्षण मिळत असलें तरी जुनी पद्धति सुटत नाहीं.

पाकसिद्धीचे उद्देश अन्नास मोहक रूप देणें, त्यांत नवीन आस्वाद उत्पन्न करणें, आंतील जंतुदोष काढून टाकणें व संग्रहा-साठीं निष्पत्ति करणें हे होय. शिजविण्यानें उद्भिज पदार्थांची पचनीयता वाढते व मांसाचे तंतू मोकळे होऊन पचनरसास आंत शिरण्यास मदत होते. पाकसिद्धीमध्यें पुष्कळ वेळां उष्णता लावावी लागते. अन्नपदार्थांच्या घटकांवर उष्णतेचे परिणाम लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. उष्णतेनें कांहीं प्रथिनें गुठळतात व त्याकरितां ७७ शत. (सेंटिग्रेड) उष्णता पुरते. जास्त उष्णता दिल्यास ती आकसतात, कठिण होतात व त्याची पचनीयता कमी होते. (आधणाच्या पाण्याची उष्णता १०० शतमान असते.) १०० उष्णता लावून एक मिनिट शिजवून पाहावी. म्हणजे गुठळण्यांतील फरक चटकन् समजेल.

पिठास कोरडी उष्णता दिल्यास त्याचे कण विद्राव्य होतात व फार वेळ उष्णता दिल्यास त्याची दक्षिणावर्त साखर ( डेक्स्ट्रिन ) तयार होते. भाकरीचें पीठ अगोदर परतून मग पदार्थ करतात. त्यांत गोडी आणण्याचा उद्देश असतो; पिठें शिज-विल्यास त्यांतील पिष्ट ( स्टार्च ) कण फुगतात, मग ते फुटतात व लापशीसारखा चिकटपणा येतो. त्याकरितां ६५ ते ८० उष्णता पुरते. साखरेस उष्णता लागल्यास तिला रुचकर खरपूस वास येतो. मेदा( तेल, तूप )वर थोड्या उष्णतेचा असा परिणाम होत नाहीं. मेद तापवून थंड केल्यावर त्यांत तुपासारखी कणी-पडते; आंतील पाणी उडून जातें म्हणून ही कणी होते व त्यानें मेदांची पचनीयता वाढते.

मांसपाकसिद्धि—शिजविण्यानें मांसाचा लाल रंग जातो. शिजवितांना आंतील स्वाद न जाईल ही काळजी घ्यावी लागते. रस कधींहि टाकून देऊं नये; व तो वाढणें नको असेल तर पाणीच अगदीं बेताचें घालावें. रस बाहेर जाऊं न देण्यासाठीं मांस थोडीं मिनिटें एकदम आधणाच्या पाण्यांत टाकावें; म्हणजे बाहेरचा थर गुठळतो व आंतील रस बाहेर पडणें अशक्य होतें; नंतर मंदाग्नीवर मांस शिजवावें. मांस मंदाग्नीवर पुष्कळ वेळ शिजविल्यानें तें रुचकर होतें. तळल्यानेंहि असाच बाहेरचा भाग गुठळतो व आंतील भाग नंतर स्वरसांत शिजतो; मासे ह्याचकरितां तळतात. तळण्यासाठीं तेल वापरतात व त्यामुळें पुष्कळ उष्णता ( १०५ ते २०० शत. ) एकदम देतां येते. पदार्थ फडफडतो याचें कारण आंतील पाण्याची वाफ होऊन ती जोरानें बाहेर पडते हें होय.

शाकपाकसिद्धि—ह्या पाकसिद्धीचा उद्देश जरा निराळा असतो. तो म्हणजे शालाकोश ( सेल वॉल ) उष्णतेनें फाडणें व आंतील पिष्ट कणांची दक्षिणावर्त शर्करा बनविणें हा होय. फळांमधील पचनक्रिया आतील अम्लांच्या मदतीनें निसर्ग घडवून आणतो. उन्हाची जी प्रखरता असते तिच्या क्रियेनें पिष्टमय संग्रहाचें साखरेंत रूपांतर होतें, शालाकोश फुटतात व फळ मऊ होतें. आंब्याची आढी घालण्याचा उद्देशहि हाच. गवतापासून खतानिर्मिति होतांना ढिगांत अत्यंत उष्णता उत्पन्न होते, त्यामुळें शालाकोश फुटतात व आंतरपचन सुरू होतें. शिळी भाकरी रुचकर लागते, त्याचेंहि कारण पिष्टांचें साखरेंत रूपांतर हें होय. आपल्याकडे तपेल्यास चिकटलेली भाताची खरपुडी आवडीनें खातात त्याचें कारण त्यांतील शर्करा-उत्पत्ति होय.

दळण्यानें शालाकोश फुटतात, पिष्ट कण मोकळे होतात व वरील उद्देश अर्धवट साधतो. असेंच दळलेले पदार्थ घेतले तर पचन सुलभ होतें. शिजविण्यानें अर्थातच जास्त फायदा होतो. पण शिजविण्यानें खनिजें, प्रथिनें, इत्यादि रसांतून बाहेर जातात. शिजविण्यानें पदार्थ फुगतो. हळू मंदाग्नीवर, बेतशीर, व थोडाच वेळ शिजल्यानें पदार्थकण फुटतात, आस्वाद राहतात व रुचि वाढते. वरती झांकण ठेवावें. शिजतांना प्राणवायूशीं जेवढा थोडा संपर्क येईल तेवढाच येऊं द्यावा. झांकण ठेवून आंतील कोंड-लेल्या वाफेवर पदार्थ शिजविल्यास जीवनसत्त्वांचा नाश होत नाहीं. अन्न धुरकटत नाहीं आणि त्याचा नैसर्गिक आस्वाद कायम राहतो.

चांगले आचारी शिजणाऱ्या भांड्यावर कोळसे ठेवतात, त्याचें कारण वरून खालून सारखी उष्णता लागावी हा होय. हाच उद्देश हल्लीं विकत मिळणाऱ्या पाचनिका ( कुकर ) वापरल्यास सिद्धीस जातो. दाबलेल्या वाफेच्या पाचनिकेपेक्षां साधी बिन-दाबाची पाचनिका चांगली होय.

रानटी लोकांना मंद उष्णतेवर पण पुष्कळ वेळ पदार्थ शिज-विण्याची कला चांगली अवगत होती. ते खड्डा खणून त्यांत

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४३ | व्हालडिव्होस्टॉक | ६० | ७ | ६७ | ० | ३ | ८ | ४ | १५ |
| ४३ | सोफिया | १,७६० | २९ | ७३ | ४ | ४ | ८ | ६ | २२ |
| ४३ | मार्सेल्स | २५० | ४४ | ७२ | ७ | ५ | ३ | ७ | २२ |
| ४५ | मिलन | ४८० | ३३ | ७६ | ८ | ९ | ९ | १२ | ३८ |
| ४५ | मॉंट्रिअल | १८७ | १३ | ७० | १० | ९ | ९ | ११ | ३९ |
| ४६ | आस्ट्राखान | ६६ | २१ | ७८ | १ | २ | २ | १ | ६ |
| ४७ | बर्न | १,८८० | २९ | ६५ | ७ | ७ | १२ | १२ | ३८ |
| ४७ | बुडापेस्ट | ५०२ | २९ | ७१ | ६ | ५ | ७ | ६ | २४ |
| ४८ | सेंट जॉन | १५० | २४ | ६० | १३ | १३ | १२ | १५ | ५३ |
| ४९ | पॅरिस | २६० | ३७ | ६६ | ४ | ५ | ६ | ६ | २१ |
| ५० | विनिपेग | ७४० | ५ | ६६ | २ | ७ | १० | ४ | २३ |
| ५१ | लंडन | १५५ | ३८ | ६३ | ५ | ५ | ७ | ६ | २३ |
| ५२ | ऑक्सफर्ड | २१० | ३९ | ६२ | ६ | ६ | ६ | ७ | २५ |
| ५२ | इर्कुटस्क | १,५४० | ७ | ६६ | ३ | २ | ८ | ४ | १७ |
| ५३ | डब्लिन | ५१ | ४२ | ६० | ६ | ६ | ७ | ८ | २७ |
| ५४ | एडमंटन | २,४०० | ११ | ६१ | २ | ४ | ९ | ३ | १८ |
| ५६ | मास्को | ५१० | १३ | ६६ | ३ | ५ | ७ | ५ | २० |
| ५६ | एडिंबरो | २७० | ३७ | ५८ | ५ | ५ | ७ | ७ | १४ |
| ५६ | टोम्स्क | २५० | ४ | ६८ | २ | २ | ८ | ३ | १५ |
| ५७ | बेननेव्हिस | ४,४०० | २४ | ४० | ७७ | ५३ | ४० | ४६ | १६२ |
| ५९ | स्टॉकहोम | १४६ | १७ | ६२ | ३ | २ | ५ | ६ | १६ |
| ६० | लेनिनग्राड | १९ | २७ | ६३ | ३ | ३ | ७ | ५ | १८ |
| ६१ | यार्कुटस्क | ३३० | ४५ | ६६ | २ | २ | ६ | ३ | १३ |
| ७० | ट्रॉमसो | ५० | २६ | ५२ | १२ | ११ | ७ | ११ | ४१ |
| | दक्षिण गोलार्ध ( दक्षिण अक्षांश–विपुववृत्ताच्या दक्षिणेकडे ) | | | | | | | | |
| ३ | मॅनॉस | १२१ | ७८ | ७८ | २९ | ३३ | ११ | १३ | ८६ |
| ६ | झांझिबार | २३ | ८२ | ७७ | १४ | ३३ | ६ | १२ | ६५ |
| ६ | बटेव्हिया (जाकर्ता) | २० | ७६ | ७८ | ३३ | १९ | ८ | १२ | ७२ |
| १२ | पोर्ट डार्विन | ७० | ८५ | ७८ | ४० | १६ | ० | ७ | ६३ |
| १२ | लिमा | ५०० | ७४ | ५७ | ० | ० | १ | १ | २ |
| १३ | आपिआ | ० | ७९ | ७५ | ५५ | २९ | १५ | २८ | १२७ |
| १८ | ताहिती | ० | ७८ | ७५ | १९ | १३ | ५ | ९ | ४६ |
| २४ | एलिसस्प्रिंग्ज | २,१०० | ८५ | ५३ | ५ | २ | १ | १ | ९ |
| २५ | प्रिटोरिआ | ४,४६० | ७४ | ५९ | १५ | ५ | १ | ७ | २८ |
| ३३ | बाथर्स्ट | २,१०० | ७३ | ४३ | ७ | ६ | ६ | ६ | २५ |
| ३३ | केपटाउन | ३७ | ७० | ५५ | २ | ७ | ११ | ५ | २५ |
| ३३ | सँटिॲगो | १,७०० | ६९ | ४८ | ० | ३ | ७ | २ | १२ |
| ३५ | ब्यूनॉसएरिस | १२ | ७६ | ५० | ९ | १० | ६ | ९ | ३४ |
| ३६ | ॲडिलेड | १४० | ७५ | ५२ | २ | ६ | ८ | ५ | २१ |
| ३७ | मेलबोर्न | ९१ | ६६ | ४७ | ६ | ६ | ६ | ८ | २६ |
| ४१ | वेलिंग्टन | १४० | ६२ | ४७ | १० | ११ | १७ | १३ | ५१ |
| ४३ | होबार्ट | ३७ | ६१ | ४७ | ५ | ५ | ६ | ७ | २३ |
| ४५ | डुनेडिन | ५०० | ५८ | ४२ | ९ | ९ | ९ | ८ | ३५ |
| ५३ | मॅगेलन भूशिरावरील पुंटाएरिनास | ३३ | ५१ | ३५ | ४ | ६ | ७ | .४ | २१ |

( पाकशास्त्र १४४६ वरून चालू )

खाण्यासाठीं अन्न तयार करताना त्यांतील पौष्टिक द्रव्यें निघून न जातील याची काळजी घ्यावी लागते. यासंबंधीं शास्त्रीय माहिती आपल्याकडे विशेष नाहीं. आपल्या पाकशास्त्रांत चवीवर फार भर असतो. तसेंच मसाले व तोंडी लावण्याचे पदार्थ आपल्या स्वयंपाकांत फार असतात. ते आरोग्याला अपायकारकहि होतात. आहारशास्त्राचा अभ्यास करून स्वयंपाक करण्यांत येत नाहीं, त्यामुळें भरमसाट वाटेल तितके पदार्थ खाऊनहि खरें पोषण होत नाहीं. पाकशास्त्रावरचीं घरींच जुनीं-नवीं पुस्तकें आहेत तर त्यांत फक्त अनेक जातींचीं अन्नें-पक्वान्नें बनविण्याचीच माहिती दिलेली असते. शास्त्रीय पद्धतीनें स्वयंपाक कसा करावा याचें मुलींच्या शाळेंतून थोडेंबहुत शिक्षण मिळत असलें तरी जुनी पद्धति सुटत नाहीं.

पाकसिद्धीचे उद्देश अन्नास मोहक रूप देणें, त्यांत नवीन आस्वाद उत्पन्न करणें, आंतील जंतुदोष काढून टाकणें व संग्रहासाठीं निष्पत्ति करणें हे होय. शिजविण्यानें उद्भिज पदार्थांची पचनीयता वाढते व मांसाचे तंतू मोकळे होऊन पचनरसास आंत शिरण्यास मदत होते. पाकसिद्धीमध्यें पुष्कळ वेळां उष्णता लावावी लागते. अन्नपदार्थांच्या घटकांवर उष्णतेचे परिणाम लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. उष्णतेनें कांहीं प्रथिनें गुठळतात व त्याकरितां ७७ शत. (सेंटिग्रेड) उष्णता पुरते. जास्त उष्णता दिल्यास ती आकसतात, कठिण होतात व त्याची पचनीयता कमी होते. (आधणाच्या पाण्याची उष्णता १०० शतमान असते.) १०० उष्णता लावून एक मिनिट शिजवून पाहावी. म्हणजे गुठळण्यांतील फरक चटकन् समजेल.

पिठास कोरडी उष्णता दिल्यास त्याचे कण विद्राव्य होतात व फार वेळ उष्णता दिल्यास त्याची दक्षिणावर्त साखर (डेक्स्ट्रिन) तयार होते. भाकरीचें पीठ अगोदर परतून मग पदार्थ करतात. त्यांत गोडी आणण्याचा उद्देश असतो; पिठें शिजविल्यास त्यांतील पैष्ट (स्टार्च) कण फुगतात, मग ते फुटतात व लापशीसारखा चिकटपणा येतो. त्याकरितां ६५ ते ८० उष्णता पुरते. साखरेस उष्णता लागल्यास तिला रुचकर खरपूस वास येतो. मेदा (तेल, तूप) वर थोड्या उष्णतेचा असा परिणाम होत नाहीं. मेद तापवून थंड केल्यावर त्यांत तुपासारखी कणी-पडते; आंतील पाणी उडून जातें म्हणून ही कणी होते व त्यानें मेदांची पचनीयता वाढते.

मांसपाकसिद्धि—शिजविण्यानें मांसाचा लाल रंग जातो. शिजविताना आंतील स्वाद न जाईल ही काळजी घ्यावी लागते. रस कधींहि टाकून देऊं नये; व तो वाहणें नको असेल तर पाणीच अगदीं बेताचें घालावें. रस बाहेर जाऊं न देण्यासाठीं मांस थोडीं मिनिटें एकदम आधणाच्या पाण्यांत टाकावें; म्हणजे बाहेरचा थर गुठळतो व आंतील रस बाहेर पडणें अशक्य होतें; नंतर मंदाग्नीवर मांस शिजवावें. मांस मंदाग्नीवर पुष्कळ वेळ शिजविल्यानें तें रुचकर होतें. तळल्यानेंहि असाच बाहेरचा भाग गुठळतो व आंतील भाग नंतर स्वरसांत शिजतो; मासे ह्याचकरितां तळतात. तळण्यासाठीं तेल वापरतात व त्यामुळें पुष्कळ उष्णता (१०५ ते २०० शत.) एकदम देतां येते. पदार्थ फडफडतो याचें कारण आंतील पाण्याची वाफ होऊन ती जोरानें बाहेर पडते हें होय.

शाकपाकसिद्धि—ह्या पाकसिद्धीचा उद्देश जरा निराळा असतो. तो म्हणजे शालाकोश (सेल वॉल) उष्णतेनें फाडणें व आंतील पैष्ट कणांची दक्षिणावर्त शर्करा बनविणें हा होय. फळांमधील पचनक्रिया आंतील अम्लांच्या मदतीनें निसर्ग घडवून आणतो. उन्हाची जी प्रखरता असते तिच्या क्रियेनें पिष्टमय संग्रहाचें साखरेंत रूपांतर होतें, शालाकोश फुटतात व फळ मऊ होतें. आंब्याची आढी घालण्याचा उद्देशहि हाच. गवतापासून खतानिर्मिति होतांना ढिगांत अत्यंत उष्णता उत्पन्न होते, त्यामुळें शालाकोश फुटतात व आंतरपचन सुरू होतें. शिळी भाकरी रुचकर लागते, त्याचेंहि कारण पिष्टांचें साखरेंत रूपांतर हें होय. आपल्याकडे तपेल्यास चिकटलेली भाताची खरपुडी आवडीनें खातात त्याचें कारण त्यांतील शर्करा-उत्पत्ति होय.

दळण्यानें शालाकोश फुटतात, पैष्ट कण मोकळे होतात व वरील उद्देश अर्धवट साधतो. असेच दळलेले पदार्थ घेतले तर पचन सुलभ होतें. शिजविण्यानें अर्थातच जास्त फायदा होतो. पण शिजविण्यानें खनिजें, प्रथिनें, इत्यादि रसांतून बाहेर जातात. शिजविण्यानें पदार्थ फुगतो. हळू मंदाग्नीवर, बेतशीर, व थोडाच वेळ शिजल्यानें पदार्थकण फुटतात, आस्वाद राहतात व रुचि वाढते. वरती झांकण ठेवावें. शिजतांना प्राणवायूशीं जेवढा थोडा संपर्क येईल तेवढाच येऊं द्यावा. झांकण ठेवून आंतील कोंडलेल्या वाफेवर पदार्थ शिजविल्यास जीवनसत्त्वांचा नाश होत नाहीं. अन्न धुरकटत नाहीं आणि त्याचा नैसर्गिक आस्वाद कायम राहतो.

चांगले आचारी शिजणाऱ्या भांड्यावर कोळसे ठेवतात, त्याचें कारण वरून खालून सारखी उष्णता लागावी हा होय. हाच उद्देश हल्लीं विकत मिळणाऱ्या पाचनिका (कुकर) वापरल्यास सिद्धीस जातो. दाबलेल्या वाफेच्या पाचनिकेपेक्षां साधी विनदाबाची पाचनिका चांगली होय.

रानटी लोकांना मंद उष्णतेवर पण पुष्कळ वेळ पदार्थ शिजविण्याची कला चांगली अवगत होती. ते खड्डा खणून त्यांत

निखारे तयार करीत व त्यांत शिजविण्याचे मांसादि पदार्थ पानांत नीट गुंडाळून आंत टाकीत. सर्व बाजूनें निखारे लावून खड्डा पुन्हां मातीनें भरून काढीत व दुसरीकडे शिकारीला जात असत. दोन दिवसांनीं सर्व अन्न शिजलेलें आढळे. ह्या पद्धतींत लांकूडफांटा कमी लागतो, मेहनत कमी पडते, प्राणवायूशीं पदार्थांचा संयोग फार थोडा होतो. उष्णता थोड्या प्रमाणांत लागते व ती जास्त काळ टिकते, पदार्थांचे आस्वाद राहतात व पाकसिद्धि करण्यांत जाणारा वेळ वांचतो ('आहार', ऑगस्ट १९४९ ).

पंडित रघुनाथ सूरिकृत 'भोजनकुतूहल' या नावाचा एक ग्रंथ प्राच्यग्रंथसंग्रह (उज्जैन) यांत असून तो अद्यापि अप्रकाशित आहे. हा ग्रंथ रघुनाथ पंडितानें सुमारें २२५ वर्षांपूर्वी रचिला असावा, असें त्यानेंच केलेल्या 'धर्मामृतमहोदधि' नामक ग्रंथाच्या शेवटीं दिलेल्या श्लोकावरून अनुमान होतें. 'धर्मामृतमहोदधि' हा ग्रंथ तंजावर येथील शरफोजी ग्रंथालयांत उपलब्ध असून तोहि अप्रसिद्ध आहे. त्याच्या शेवटीं ग्रंथरचनाकाल शालिवाहन शक १६२३ असा दिला आहे. म्हणजे याच सुमारास रघुनाथानें भोजनकुतूहल हा ग्रंथ लिहिला असावा, असें दिसतें. रघुनाथ पंडितानें आपल्या ग्रंथाची उभारणी करण्यासाठीं धर्मशास्त्र व वैद्यक मिळून एकंदर १०१ ग्रंथ उपयोगांत आणिले असून, संहिता ग्रंथाप्रमाणें त्यांतील उतारे एकामागून एक व्यवस्थित रूपानें ठेवून क्वचित् स्थलीं स्वतःचें मतहि प्रतिपादिलें आहे. ग्रंथ स्वतंत्र पद्धतीनें रचलेला दिसत नाहीं; तथापि पाकशास्त्रांतील प्रमुख ग्रंथांत त्याची गणना करण्यास प्रत्यवाय वाटत नाहीं. प्रथम परिच्छेदाच्या शेवटल्या दोन पानांत भोजनसमयीं वस्त्र कसें वापरावें व तांबूल कसा सेवन करावा यासंबंधीं सांगितलें आहे. यांत भोजनसमयीं पांढरें अथवा लाल, शुद्ध रेशमाचेंच वस्त्र परिधान करावें असा स्पष्ट उल्लेख असून त्याचे गुणहि वर्णिले आहेत. सोंवळें नेसून भोजन करण्याची पद्धति कां प्रचारांत आली व तें नेसण्याचें तत्त्व कोणत्या आधारावर उभारिलें आहे, याचें विवेचन आहे. कार्पासवस्त्र उपयोगी असतें तर त्याचा यांत रघुनाथानें जरूर समावेश केला असता. मुख्य सात रंगांपैकीं दोनच–शुभ्र व लाल–वर्णांबद्दल हें वर्णन असून बाकीच्यांबद्दल लिहिलें नाहीं. तेव्हां कृष्ण, हरित, इत्यादि रंगांचा कांहीं तरी अनिष्ट परिणाम आहारावर होत असेल असें वाटतें. रेशमांत विद्युत् अधिक प्रमाणांत असते आणि तिचा भोजनीय पदार्थांच्या पचनासाठीं विशेष उपयोग होतो. यासाठींच त्याची इतकी महती आरोग्यशास्त्रांत वर्णिली गेली, याबद्दल संशय राहत नाहीं. शुभ्र वस्त्र परिधान करून जेवल्यानें कांति व बल हीं वाढतात आणि पित्त, तृषा व दाह यांचा नाश होतो. लाल वस्त्रापासून दाह, उष्णता, कफ व वात हीं वाढतात, असा कर्त्याच्या वर्णनांतील सारांश होय. धौत वस्त्र सुताचें देखील चालू शकेल. परंतु एकदां नेसून सोडल्यानंतर परत परिधान करणें मात्र विहित नाहीं.

विडा—भोजनानंतर विडा खाण्याचा प्रघात जुनाच आहे. तेव्हां भोजनासंबंधींच्या ग्रंथांत त्याविषयीं विवेचन येणें अपरिहार्य आहे. विडा केव्हां सेवन करावा याचा उल्लेख रघुनाथानें असा केला आहे:— 'रतौ, सुतोत्थिते, श्रांते, भुक्ते, वांते च सभायां विदुषां राज्ञां, कुर्यात् ताम्बूलचर्वणमिति ॥' अर्थात् सुखसमयीं, झोंपून उठल्यानंतर, थकवा आला असतां, भोजन केल्यानंतर, वांति झाल्यास, राजा व विद्वान् यांच्या सभेंत ताम्बूलचर्वण करावें. यानंतर विड्यांत कोणकोणते पदार्थ असावे, पान कसें असावें, विद्यार्थ्यांनें विडा कां खाऊं नये, इत्यादि विवेचनात्मक वर्णन आहे. यांतील पहिले तीन श्लोक पानाचा देठ, मधली रेपा व खालचें टोंक हीं वर्ज्य करण्यासंबंधीं आहेत व तीं कां टाकावींत याबद्दल ग्रंथकारानें स्पष्ट खुलासा न करतां धर्माचें पांघरूण त्यावर घातलें आहे. पण धन्वन्तरीय निघण्टूंत याबद्दल जो उल्लेख सांपडतो त्यावरून पानाच्या शिरा, सुकलेलें अथवा सडकें पान किती हानिकारक आहे याचा सहज बोध होईल. दुसरें असें कीं, नुसती सुपारी खाणेंहि अहितकर आहे. सुपारी जास्त खाल्ली असता रक्त सुकतें, जिह्वा जड होते व उष्णता जास्त वाढून मेंदूचे विकारहि होण्याचा संभव असतो. त्रयोदशगुणी विडा म्हणण्याचा नुसता एक प्रघातच नाहीं तर त्यांत खरोखरच १३ गुण आहेत. साधारणपणें विड्यांत घालण्याचे पदार्थ काथ, सुपारी व चुना हे होत. आणि त्यातहि मुखशुद्ध्यर्थ लवंग, वेलची, केशर, जायपत्री, जायफळ, क्वचित् बदामाची कळी व खोबरेंहि घालण्याचा प्रघात आहे. परंतु ग्रंथकार रघुनाथ त्यांत कस्तुरी, चंदनचूर्ण, कंकोल व कापूर हीं टाकावींत असें म्हणतो आणि लगेंच त्यांचे गुणहि वर्णन करतो. खाण्यास कोणतें पान चांगलें याबद्दल कर्त्यानें कांहींच लिहिलें नाहीं. तथापि इतर ग्रंथांत याबद्दल प्रमाणें उपलब्ध आहेत. भावमिश्रानें आपल्या ग्रंथात नागवेलीच्या पानाचें विवेचन केलें आहे. तसेंच राजनिघंटूंतहि आहे. दोघांच्या मतें पिकलेलें, पातळ, ज्यावर जाड रेपा नाहींत व पांढऱ्या वर्णाचें पान खाण्यास योग्य आणि हिरवें, काळसर व कच्चें अयोग्य. हल्लीं प्रचारांत मघवी अथवा मगध देशीय, मालवी, बंगला, मद्रास व कपूरी (मुंबईकडील) पानें विशेष असून प्रत्येकांचे स्वाद व गुण भिन्न आहेत. या सर्वांत मालव व मगध येथील पानें श्रेष्ठ होत. याशिवाय श्रीवाटी–सिरवाडी पान, अम्लवाटी–अंबोडपर्ण, सत्तसा–सालसी पर्ण, गुहागर–अडगरपर्ण, इत्यादि पानांच्या जातींचें भेद

गुणांसह दिले आहेत. परंतु त्याचा प्रमाणाभावीं निर्णय देणें कठिण आहे.

वर दिलेल्या ग्रंथाच्या शेवटच्या श्लोकांत कंकोल हा शब्द आला असून त्याचेच पर्याय शब्द कटुक व कोलक हे असून मराठी शब्दरत्नाकरांत याचा अर्थ कबाबचीनी असा दिला आहे. निघंटूंतहि याच्या गुणांबद्दल वर्णन आहे. यावरून कंकोल अथवा कबाबचीनी यापासून विड्यांत घालण्याचा सुगंधित मसाला तयार होत असे, हें सिद्ध होतें. ताम्बूलनिषेधासंबंधीं या ग्रंथांत उल्लेख नाहीं; पण भावमिश्र लिहितो: विरक्त, भुकेनें व्याकुळ झालेला, दन्तरोगी, मद, विष व मूर्छा यांनीं पीडित, क्षयी, रक्तपित्तानें विकृत, इतक्यांनीं विडा खाऊं नये. तसेंच अतिसेवन करूं नये; कारण त्यापासून शोष उत्पन्न होऊन पित्त व वात हीं कुपित होतात व शरीर, नेत्र, केश, कान, हात, बल व कांति यांचा क्षय होतो. सकाळच्या विड्यांत सुपारी, दुपारीं काथ व रात्रीं चुना किंचित् अधिक घालावा म्हणजे पचन चांगलें होऊन रक्त व भूक यांची वृद्धि होते व बस्ती शुद्ध होते. विडा कफाची वृद्धि करणारा व कामाग्निदीपक असल्यानें विद्यार्थी-वर्गास विहित नाहीं, असें आयुर्वेदाचें स्पष्ट मत आहे. [म. सा. पत्रिका]

**पाकिस्तान**—१९४७ सालीं हिंदुस्थानची फाळणी होऊन भारत आणि पाकिस्तान अशीं दोन राष्ट्रें झालीं. पाकिस्तान राज्य निव्वळ मुसलमानांचें म्हणतां येईल. या राज्याचे दोन विभाग आहेत: १ पश्चिम पाकिस्तान व २ पूर्व पाकिस्तान. पहिल्यांत पश्चिम पंजाब, वायव्य सरहद्द प्रांत, सिंध आणि बलुचिस्तान हे प्रदेश येतात; तर पूर्व पाकिस्तानांत पूर्व बंगाल मोडतो, व त्यांत आसाममधील सिल्हेट जिल्ह्याचा समावेश केला आहे.

यांखेरीज भावलपूर, खैरपूर, कलात, लासबेला, चित्रळ आणि स्वात हीं संस्थानें पाकिस्तानच्या सत्तेखालीं येतात.

पश्चिम पाकिस्तानच्या पश्चिमेस आणि वायव्येस इराण आणि अफगाणिस्तान हे देश असून पूर्वेस आणि ईशान्येस हिंदी संघराज्य (भारत) आणि काश्मीर संस्थान आहे. दक्षिणेस अरबी समुद्र आहे. पूर्व पाकिस्तानच्या सभोंवतालीं बहुतेक हिंदी संघराज्य असून आग्नेयेस ब्रह्मदेश आणि दक्षिणेस बंगालचा उपसागर आहे.

पाकिस्तानचें एकंदर क्षेत्रफळ २,३३,००० चौ. मै. असून यापैकीं १,७९,००० चौ. मै. चा पश्चिम पाकिस्तान व ५४,००० चौ. मै. चा पूर्व पाकिस्तान आहे. पाकिस्तानच्या पूर्व आणि पश्चिम भागांत १,२०० मैलांचें अंतर आहे. एकंदर पाकिस्तानचा प्रदेश सबंध हिंदुस्थानच्या क्षेत्रफळांत १५ टक्के भरेल इतका आहे.

पाकिस्तानची एकंदर लोकसंख्या सुमारें सात कोटींपेक्षां जरा कमी आहे. यापैकीं तीनचतुर्थांशावर लोक मुसलमान आहेत. आज हिंदु लोक बहुतेक निर्वासित होऊन बाहेर गेल्यानें किंवा घालविल्यानें केवळ इस्लामी राज्य म्हणून हें शोभेल. पूर्व पाकिस्तानांत बरेच हिंदू आहेत, पण तेहि हळूहळू पश्चिम बंगाल-मध्यें येत आहेत. पश्चिम पाकिस्तानांत ख्रिश्चन लोकांची वस्ती बरीच आहे. पाकिस्तानांतील लोकांत तुर्को-इराणी, मोगल-द्राविडी व इंडो-आर्यन या तीन वंशांतील लोक दिसतील. बलुची, ब्राहुई, पठाण, अफगाण व विविध जातींचे थोडे हिंदू पाकिस्तानांत राहतात.

अगदीं वायव्येकडे बलुची, पुश्तु व ब्राहुई भाषा चालते. वायव्य प्रांतांत मुख्य भाषा पुश्तु असून सिंध प्रांतांत सिंधी भाषा आहे. पश्चिम पंजाबची प्रधान भाषा ऊर्दू आहे. इकडे पूर्व बंगाल्यांत ९० टक्के लोक बंगाली बोलतात. तथापि एकंदर पाकिस्तानची राजभाषा ऊर्दू धरली आहे.

नॉर्थ वेस्टर्न रेल्वे आणि बंगाल-आसाम रेल्वे या हिंदी संघराज्य आणि पाकिस्तान यांमध्यें विभागल्या गेल्या आहेत. जोधपूर रेल्वेचीहि हीच गत झाली आहे.

पश्चिम पाकिस्तानांत जंगल फारच कमी, पण पूर्व पाकिस्तानांत सुंदरवन, लुशाई व चितगांव माळरान आहे. व त्यांतून लांकूड, बांबू, राळ, गोंद, मध, इ. उत्पन्न निघतें. संरक्षित जंगल ९,९९९ चौ. मै. आहे. पूर्व आणि पश्चिम पाकिस्तानांतील हवामान अगदीं उलटसुलट आहे. पूर्व बंगाल्यांत पाऊस १६० इंच पावेतों पडतो तर सिंधमध्यें जास्तींत जास्त ९ इंच पडतो.

शेतकी हाच भारताप्रमाणें पाकिस्तानचाहि मुख्य व्यवसाय व उपजीविकेचें साधन आहे. तांदूळ, गहूं, कापूस, तंबाखू व ताग हे पिकांचे जिन्नस होत. हिंदुस्थानांतील ७३ टक्के ताग पाकिस्तानांत होतो. पूर्व बंगाल्यांतील ताग व सिंध-पंजाब-मधील लांब धाग्याचा कापूस यांमुळें पाकिस्तानचें वैशिष्टय दिसून येतें. पाकिस्तान हा अन्नाच्या बाबतींत तुटीचा प्रदेश मुळींच नाहीं. उलट तांदूळ आणि गहूं बाहेर पाठविण्यास उरतो. पूर्वेकडचें मुख्य खाणें तांदूळ तर पश्चिमेकडचें गहूं आहे. तथापि जोंधळा-बाजरी, साखर, चहा, कॉफी यांसारख्या जिन्नसांसाठीं पाकिस्तानला हिंदी संघराज्यावर अवलंबून राहावें लागतें. वायव्य सरहद्द प्रांतांत दरसाल २२,००,००० पौंड लोंकर तयार होते.

पश्चिम पंजाब आणि सिंध या प्रांतांत पाटबंधाऱ्याचीं कामें किती तरी आहेत. सक्करचें धरण तर जगप्रसिद्ध आहे. चेनाब व झेलम नद्यांचे कालवे पंजाबला समृद्ध करीत आहेत.

खनिज संपत्ति मात्र फारशी नाहीं. क्रोमाइट आणि जिप्सम हीं मात्र मोठ्या प्रमाणावर सांपडतात. बलुचिस्तानांत गंधक बरेंच

आहे. कोहाटमधील डोंगरमीठ दरसाल पांच लक्ष मणांइतकें सांपडतें. जगांत इतरत्र कोठेंच इतकें निघत नाहीं.

उद्योगधंद्यांच्या दृष्टीनें पाकिस्तान निकृष्ट आहे. मोठाले लोखंड-पोलादाचे, कागदाचे किंवा इतर कारखाने मुळींच नाहींत. पूर्व पंजावांत बहुतेक ताग निघतो तरी त्याच्या गिरण्या कलकत्त्यास आहेत. तीच गोष्ट कापडाची. इतर धंदेहि किरकोळच आहेत. तथापि मोठे धंदे चालवितां येण्यासारखी उत्पादनाची समृद्धि आहे. कराची आणि चितगांव हीं दोन मोठीं बंदरे पाकिस्तानांत आहेत. कराचीला आंतरराष्ट्रीय महत्त्व आहे. तेथील विमानतळ मोठा आहे.

कराची, लाहोर आणि डाक्का हीं मोठीं शिक्षणकेंद्रें आहेत व त्या ठिकाणीं विद्यापीठेहि आहेत; तसेंच रेडिओकेंद्रें आहेत.

पाकिस्तान सरकारची मुख्य कचेरी कराचीस आहे. पहिले गव्हर्नर जनरल पै. जिना होते. आतां ख्वाजा नझिमुद्दीन आहेत. प्रांतांवर गव्हर्नर आहेत.

आज पाकिस्तान आणि हिंदी संघराज्य यांमध्यें काश्मीरच्या सत्तेबाबत मोठा लढा चालू आहे व त्याला जागतिक महत्त्व प्राप्त झालें आहे. इतर अनेक प्रश्न दोन राज्यांतील सलोखा बिघडविण्यास कारणीभूत होत आहेत.

पाकिस्तान असें स्वतंत्र इस्लामी राष्ट्र करण्याची मूळ कल्पना सर महंमद इकबाल यांची. त्यांनीं १८९० सालीं मुस्लिम लीगच्या अध्यक्षस्थानावरून ती मांडली. नंतर पुढील सालीं बॅ. रहमतअली यांनीं या दिशेनें चळवळ सुरू केली. जेव्हां कायदेआझम जिना हे लीगचे एकमेव पुढारी झाले तेव्हां त्यांनीं या प्रश्नाला नेट लावला. दुसऱ्या महायुद्धांत कॉंग्रेस पक्ष सरकारशीं सहकार्य करीना यामुळें मुस्लिम लीगला फारच फावलें. कांहीं प्रांतांतून लीगचीं मंत्रिमंडळें होतीं. १९४२ सालीं म. गांधींनीं 'छोडो हिंद'-ची चळवळ सुरू केली तर बॅ. जिनांनीं 'तोडो छोडो हिंद' अशी मोहीम काढली! ब्रिटिश मुत्सद्द्यांनीं हिंदुस्थानला स्वराज्य देण्यास काढलें असतां हिंदू आणि मुसलमान यांचें ऐक्य साधेना. पाकिस्तानशिवाय स्वराज्य घेण्यास लीग कबूल होईना. अनेक शिष्टमंडळें तडजोडीस आलीं व गेलीं. शेवटीं कॉंग्रेसनें देश-विभागणी नाइलाजानें स्वीकारली व १५ ऑगस्ट १९४७ या दिवशीं पाकिस्तान राष्ट्र जन्म पावलें.

पाकिस्तान हें जगांतील पांचवें मोठें राष्ट्र आहे व मुसलमान राष्ट्रांत इतकें मोठें दुसरे नाहीं. पाकिस्तानचें उत्पन्न सुमारें ८० कोटी रुपये आहे. राष्ट्राची घटना तयार करण्यासाठीं एक समिति बसली आहे. आज या राज्याचे मुख्य कर्णधार लियाकत अली-खान हे जिनांचे पट्टशिष्य आहेत. त्यांनीं राज्याचीं सर्व खातीं पाहून कारभार सुरू केला आहे.

**पाकोळी**—ही एक झाडावर बसणाऱ्या पक्ष्यांची जात आहे. अशा पक्ष्यांच्या पायांस पुढें तीन व मागें एक चोट असतें. यांचे पंख लांब व बळकट असून त्यांची चोंच आंखूड व रुंद असते; पण ती उघडली असतां यांचा जबडा फार रुंद होतो. परंतु यांचे पाय त्या मानानें लहान व अशक्त असतात व ते एकसारखे भक्ष्य मिळविण्याकरितां उडत असतात. हे पक्षी आपली उपजीविका सामान्यतः किडे वगैरे प्राणी खाऊन करतात. विशेष थंडीचे प्रदेश सोडल्यास हे जगाच्या पाठीवर सर्वत्र आढळतात व यांच्या अनेक जाती आहेत. सामान्यतः पाकोळीची लांबी साडेआठ इंच असते. हे पक्षी आपलें घरटें पेल्याच्या आकाराचें व चिखल-मातीचे करतात व आंतल्या बाजूस गवत, पिसें, वगैरे घालून तें मऊ करतात. थंडीच्या दिवसांत हे थंड प्रदेशांतून उडून उष्ण प्रदेशांत जातात व पुन्हां परत येतात. यांच्या एका जातीचीं घरटीं खाण्यासारखीं असतात.

पाकोळ्या फार हिंडतात. दर दिवशीं पन्नास मैल तरी हें हिंडणें-भराऱ्या मारणें होत असेल. दिवसभर हिंडून झाल्यावर रात्रीं आपल्या घरट्यांत निजतात.

वटवाघुळाच्या जातींत एक पाकोळी (बॅट) मोडते. तिचा अर्धपक्ष्यांत किंवा अर्धप्राण्यांत समावेश करतात.

**पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र** (१८७२-१९४१)—एक मराठी ग्रंथकार व संतवाङ्मयाचे अभ्यासक. यांनीं आपल्या भावनायुक्त लेखणीनें महाराष्ट्रांतील तरुण पिढीला प्राचीन वाङ्मयाची गोडी लावली. हे उत्तम वक्तेहि होते. पुणें येथें बी. ए.पर्यंतचें शिक्षण झाल्यावर यांनीं पुण्यांत व कऱ्हाडांत शिक्षका-ची नोकरी केली. यांना मोरोपंत, एकनाथ यांच्यासारख्या जुन्या कवींच्या काव्याची गोडी लहान असल्यापासूनच लागली होती. पुढें तर शिक्षकाचा व्यवसाय सोडून प्रवचन व लेखन याच व्यवसायांस यांनीं स्वतःस वाहून घेतलें. प्रथम 'मुमुक्षु' नांवाचें साप्ताहिक यांनीं काढलें व त्याचेंच पुढें मासिकांत रूपांतर करून यांनीं तें बरींच वर्षें चालवलें.

मोरोपंतांचें चरित्र व काव्यविवेचन, भक्तिमार्गप्रदीप यां-सारखे ग्रंथ लिहून भाविक मराठी वाचकांना यांनीं आपलेंसें केलें. या ग्रंथांखेरीज मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे (१) ज्ञानेश्वर-नामदेव काल, (२) एकनाथ-तुकाराम काल व (३) रामदास असे तीन खंड यांनीं लिहून प्रसिद्ध केले आहेत. 'चरित्र-चंद्र' हा आत्मचरित्रपर ग्रंथ लिहून यांनीं आपलें अंतर्बाह्य प्रेमळ व रसाळ जीवन उघडें केलें आहे. जुन्या काळचे पदवीधर असूनहि पाश्चात्य वाङ्मयाकडे न वळतां यांनीं संत-काव्याचा श्रद्धेनें अभ्यास आणि संशोधन करून तें सुशिक्षितांना सुपरिचित करून दिलें. पण यांच्यांत त्या वाङ्मयाचें चिकित्सात्मक व

तौलनिक मूल्यमापन करण्याची दृष्टि नसल्यानें यांच्या लेखनाला पंडिती दर्जा प्राप्त झाला नाहीं.

**पांगारा**—हा वृक्ष हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यालगत सर्वत्र आढळतो. फेब्रुवारी ते मेपर्यंत पांगारा फुलांनीं बहरून सुंदर दिसतो. त्याचीं फुलें लाल असतात. याच्या पांढरा व तांबडा अशा दोन जाती आहेत; पण पांढरा क्वचित् आढळतो. या वृक्षाची लागवड प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत करण्यांत येत आहे. कारण त्यामुळें जमीन सुपीक होते आणि भरपूर छायाहि मिळते. याच्यावर कांटे असल्यानें झाडें कुंपणासारखीं उपयोगी पडतात. याच्या लांकडावर पोहण्यास शिकवितात. पांगारा औषधी आहे. विंचवावर सालीचा रस देतात.

**पॉगेनडार्फ, जोहान ख्रिश्चन** (जन्म. १७९६)—एक प्रसिद्ध जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. याचे शोध विद्युत् व चुंबकशास्त्र यांजबद्दलचे आहेत. शास्त्रज्ञ या दृष्टीनें याची योग्यता विशेषशी उच्च ठरत नाहीं. तथापि तो आपल्या विषयाचा हौशी व दीर्घव्यासंगी होता. यानें ५२ वर्षेंपर्यंत एक शास्त्रीय मासिक चालवलें. शास्त्रीय प्रयोगाची रचना तो चांगली करी. त्यानें कित्येक शास्त्रीय उपकरणेंहि केलेलीं आहेत. त्याचें सर्व आयुष्य शास्त्रीय लेखन-वाचन-संशोधन यांतच गेलें.

**पागोटा**—एक लहान मुलींचा खेळ. दोन मुलींनीं समोरासमोर उभें राहून एक हात दुसऱ्या हातावर व एक पाय दुसऱ्या पायावर ठेवीत व नाचत जागा बदलावयाच्या व पुढेंमागें करीत पुढील गाणें म्हणावयाचें—

'पागोटा घाली पिंगोटा । सीता बोलाविते । पाळणा हालविते ।' इ.

**पाच**—[ वर्ग लॅबिआटी ]. हें एक लहानसें क्षुद्रप आहे. याच्या मंजिरीस फार मधुर वास येतो. याच्यापासून अत्तर काढतात. याची लागवड रेताड जमिनींत रोपें लावून करण्यांत येते. आसाम, मध्यप्रांत, स्ट्रेट्स सेटलमेंट, वगैरे प्रदेशांत हें फार आढळतें. हें कुंड्यांमध्येंहि लावतात. कपड्यांना कसर लागूं नये म्हणून याचीं पानें त्यांत घालून ठेवतात.

**पाच**—एक रत्न. हा एक गोमेदाचा अथवा वैडूर्याचा निराळा प्रकार आहे. पाच ही गारेपेक्षां कठिण असते. हिचें विशिष्टगुरुत्व २·६७ ते २·७२ पर्यंत असतें. हें एक अल्युमिनम धातूचें सिलिकेट (स्फट सिकतित) असून त्यांत ग्लुसिनम किंवा बेरेलियम या दुर्मिळ मूलद्रव्याचें मिश्रण असतें, ही गोष्ट व्हेंकेलिन या संशोधकानें शोधून काढली. पाचेचा हिरवा रंग तींत असलेल्या क्रोमियम या मूलद्रव्याच्या योगानें येतो. याचा अंश शेंकडा २ ते ३ या प्रमाणांत असतो. पाचेचे निसर्गतः वाटोळे किंवा सहा बाजू असलेले खडे सांपडतात. सर्व रत्नांमध्यें पाच ही ठिसूळ किंवा नरम आहे. परंतु तीवर अम्लाचा परिणाम होत नाहीं. उत्तम पाच हल्लीं कोलंबियामध्यें आढळते. पूर्वेकडील देशांत आढळणारी पाच ही माणकाचीच एक जात असून तिचा रंग मात्र हिरवा असतो. हें फार दुर्मिळ रत्न आहे. हिंदुस्थानांत खंबायत व अजमीर या भागांत क्वचित् हें रत्न आढळतें.

पाचेंत रोगनिवारक व संरक्षक गुण आहेत अशी कल्पना जुन्या काळापासून आहे.

**पाचक तत्त्व**—(पेप्सिन). पाचक रसामध्यें पूर्ण क्रियेनें उत्पन्न होणारें एक द्रव्य असून त्यामध्यें उज्ज हरिकाम्ल (हायड्रोक्लोरिक ॲसिड) मिसळल्यामुळें जठरांतील अन्नपचनाची, विशेषतः अन्नांतील ओजस द्रव्यें पचविण्याची, क्रिया घडून येते. शरीरांतील इतर एनझाइम किंवा पूतिद्रव्यापेक्षां हें अगदीं निराळें असून याची क्रिया घडण्यासाठीं त्यास अम्लाची आवश्यकता लागते. अन्नपचनासाठीं विशेषतः हें देतात.

**पांचकळशी**—हें महाराष्ट्रांतील एका जातीचें नांव आहे. या जातींत लग्नप्रसंगीं सिंहासनासारख्या लांकडाच्या चौरंग्यावर समोवार पांच कलश ठेवलेले असतात. ही जात मुख्यतः ठाणें व अलिबाग (कुलाबा) जिल्ह्यांत व मुंबई शहरांत आढळते. सोमवंशी क्षत्रिय पाठारे समाज म्हणूनहि हे ओळखले जातात. या जातींत-विशेषतः साष्टीकर व अष्टागरकर मंडळींत (स्त्री-पुरुषांत)—साक्षरतेचें मान चांगलेंच म्हणजे जवळजवळ शेंकडा ४८ आहे. पैठणहून बिंबराजा मुंबई, ठाणें या भागांत आला तेव्हां त्याच्याबरोबर हे लोक इकडे आले, असा एक इतिहास सांपडतो; तर आपण अनहिलपट्टणच्या बिंबाबरोबर इकडे आलों असें म्हणणारा एक पक्ष आढळतो. बिंबाच्या सैन्यांत हे लोक योद्धे होते. अलीकडे यांचे शेती, सुतारकाम, शिवणकाम यांसारखे उद्योग आहेत. यांच्यांत कांहीं पोटविभाग आहेत. त्यांपैकीं कांहींचे एकमेकांशीं रोटीबेटी व्यवहार होत नाहींत. तथापि हे सर्व पोटविभाग मूळ एकाच वंशाचे आहेत.

**पांचगणी**—मुंबई, जिल्हा सातारा, तालुका वांई, एक हवेशीर ठिकाण. समुद्रसपाटीपासून उंची ४,३७८ फूट. लोकसंख्या (१९४१) ३,६९१. कॉफीची लागवड या भागांत चांगली होते. येथें युरोपियन, पारशी व हिंदू यांच्याकरितां स्वतंत्र हायस्कुलें आहेत. वांईहून महाबळेश्वरास जातांना लागतें.

**पांचरात्र**—चार वेद, सांख्य आणि योग यांचा यांत समावेश होतो असें महाभारत शांतिपर्वांत लिहिलें आहे. पांचरात्र धर्म म्हणजेच मूळ भागवतधर्म. हा आरंभीं निष्कामकर्मपर होता, पण पुढें निष्कामकर्मापेक्षां भक्तीला अधिक प्राधान्य देण्यांत आलें. पांचरात्र मत हें हल्लीं रामानुजमतांतच मोडतें. या जगताचा कर्ता व कारण ईश्वर असून तो सकल जीवांचा

नियामक आहे; तसेंच सकल जीवांच्या ठिकाणीं राहून त्यांना प्रेरणा करणारा जो वासुदेव तो पांच स्वरूपांत आहे असें म्हणतात. परब्रह्म, जीव, मन व अहंकार हा वासुदेवाचा चतुर्विध व्यूह व पांचवा अंतर्यामी या पांच स्वरूपांची यथाक्रम उपासना झाल्यावर अभिगमन, उपादान, ईज्या, स्वाध्याय व योग या पंचविध उपासना पांचरात्रांत सांगितल्या आहेत. या उपासनांनीं उपासकाला विज्ञान प्राप्त होतें व तो वासुदेवाकडे जातो. अशा रीतीनें झालेल्या मुक्तीमध्यें वासुदेवाचें सर्वकर्तृत्व तेवढें नसतें. बाकी परमात्म्याचे सर्व गुण तिच्यांत उदित झालेले असतात. चित् म्हणजे जीवात्मा हा परमात्म्याहून भिन्न आहे, वगैरे तत्त्वें या मतांत मोडतात. या पांचरात्र मताचा कर्ता कोण हें निश्चित नाहीं. तथापि सांख्य योगाची छाप या पांचरात्र ऊर्फ भागवतधर्मावर बरीच आहे हें मात्र निश्चित.

**पांचवड**—*मुंबई, सातारा जिल्हा, वांई तालुका, एक कृष्णे*-कांठचा गांव. सातारकरांकडून बाळाजीपंत नातू यांस हा इनाम आहे. येथील घाट व श्रीविष्णूची मूर्ति हीं प्रेक्षणीय आहेत. गांधीवधानंतर येथें जाळपोळ होऊन नातूंचे सर्व वाडे जळाले.

**पांचवी**—हिंदूंमध्यें मुलाच्या जन्माच्या पांचव्या दिवशीं करावयाचा एक विधि. हा कोणी सहाव्या दिवशींहि करतात. तिला सटवीपूजा म्हणतात. कांहीं घरांतून हा सातव्या दिवशीं (सातवी) करतात. बाळ-बाळंतीण खुशाल राहावींत म्हणून क्षुद्र देवतांना संतोषविण्यासाठीं हा विधि असतो. भिंतीवर दोन उलटसुलट बाहुल्या काढतात, बाजेचे खूर काळ्या फडक्यांनीं बांधतात, पाटावर जिवतीपूजनाचें साहित्य मांडतात, भात ओवाळून टाकतात; यासारखे प्रकार करतात व शांतिपाठ होतो.

**पांचाल**—(देश व लोक). गंगा-यमुना दुआब (अंतर्वेदी) हाच पांचाल देश आहे. पांचाल देशांतले ते पांचाल लोक अथवा राष्ट्र. पांचालांना ऋग्वेदकालीं सृंजय व ब्राह्मणकाळीं पांचाल म्हणत. कुरु-सृंजयादि पांच जाती मिळून पांचाल झाले असावेत असा एक पक्ष आहे. शतपथांत व ऋग्वेदांत यांच्या एकीकरणाचा उल्लेख आहे. हे कुरु-पांचाल फार शूर होते व सर्व भरतखंडावर यांचें राज्य पसरलें होतें.

पांचाल जात—हे लोक आपणांस ब्राह्मण म्हणवितात. लो. सं. सुमारें दहा लाखांवर आहे. म्हैसूर संस्थान, हैद्राबाद संस्थान, मुंबई इलाखा यांत यांची बरीच मोठी वस्ती आहे. मद्रास इलाख्यांत यांना कम्माल म्हणतात. सोनार, सुतार, तांबट, लोहार, गवंडी (पाथरवट) असे यांचे धंदे आहेत. धंद्याच्या या पंचकावरून यास पांचाल असें म्हणतात. हे यज्ञोपवीत धारण करतात. मद्यमांस घेत नाहींत. यांच्यांत गोत्रें आहेत. विधवाविवाह रूढ नाहीं. या पांचालातील एक विशेष गोष्ट म्हणजे भिन्न धंद्याच्या पांचालांचाच लग्नव्यवहार झाला पाहिजे, अशी समाजाची सक्ती आहे. कारागिरांची एकी वाढवणें व कारागीरवर्गाच्या कारागीरपणाचें ब्रह्मकर्मतुल्य पावित्र्य वाढविणें हा हेतु उघड दिसतो. ही चाल फार पुरातन आहे आणि सामाजिक सुधारणेच्या प्रयत्नांत प्रामुख्यानें वर्णन करण्याजोगी आहे.

**पाचुंदा**—या झाडास बारीक कांटे असतात. हा फार वाढतो व याचीं पानें बेलाच्या पानासारखीं असतात. लांकूड हलकें असतें. यास बारीक फळें येतात. हा हातास बांधल्यानें ज्वरनाश होतो असें सांगतात. जीर्ण ज्वरावर याचा रस पोटांत घेतात.

**पाचोरें**—मुंबई, पूर्व खानदेश जिल्हा, एक तालुका. भडगांव पेट्यासह क्षेत्रफळ ५४२ चौ. मैल. १८९ गांवें. लोकसंख्या सु. एक लाख. हवा आरोग्यकारक. या भागांत कापूस फार पिकतो. *मुख्य ठिकाण पाचोरें. वस्ती दहा हजार. गिरणा नदीला* जामदा कालवा काढला आहे. येथें कापसांतून सरक्या काढून टाकण्याचा कारखाना (जिन) आहे. येथून जामनेरला एक आगगाडीचा फांटा आहे.

**पाटण**—१. मुंबई, सातारा जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ ४३८ चौ. मै.. गांवसंख्या २०३. लोकसंख्या १ लाख. पर्जन्यमान ६७ इंच. हवामान उन्हाळ्यांत थंड व आरोग्यकारक, एरवीं वाईट. मुख्य *ठिकाण पाटण गांव*; तेथील वस्ती सुमारें ४ हजार. येथें सरदार पाटणकर-देशमुख राहतात.

२. नेपाळ. हें गांव खाटमांडूपासून २ मैलांवर आहे. हें ललितपट्टण म्हणून प्रसिद्ध असे. तीस हजार लोकवस्ती. इ. स. २९९ मध्यें प्रथम वसलें. सतराव्या शतकात हें नेपाळ खोऱ्यांतील तीन नेवारी संस्थानांपैकीं एक होतें. १७६८-६९ पासून गुरख्यांकडे आलें. हल्लीं येथें गुरखा शिबंदी असते. येथें एक प्राचीन बौद्ध देवालय आहे.

३. मुंबई, पूर्व खानदेश, एक लहान गांव. हें चाळीसगांवच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर सातमाळ घाटाच्या पायथ्याशीं आहे. येथील भवानीच्या देवळांत इ. स. १२०६ चा मराठी शिलालेख आहे. 'लीलावती' कर्ते भास्कराचार्य यांच्या नातवानें हा कोरविलेला आहे. त्यांत एका मठाच्या योगक्षेमासाठीं कांहीं देणग्या आहेत. पाटणच्या आग्नेयीस अर्ध्या मैलावर तीन लेणीं आहेत.

**पाटणकर, नारायण दीक्षित** (मृ. १७४८)—एक महाराष्ट्रीय सत्पुरुष. याचें घराणें मूळ कोंकणांतील खेड राहाटागर येथील असून १७ व्या शतकांत देशावर आलें. नारायण दीक्षितानें मोंगलाईत आपल्या तपश्चर्येनें व सात्त्विक आचरणानें बरीच कीर्ति मिळविली होती. औरंगजेबालाहि याचा आशीर्वाद

मिळवावा लागला होता. पुढें पेशवे व शाहू यांची भक्ति याजवर बसली. नारायण दीक्षितांसंबंधीं अनेक आख्यायिका सांगतात. अन्नदानाबद्दल याचा फार लौकिक असे. काशी येथेंहि याचें अन्नछत्र असे.

प्रथम नारायण दीक्षित कायगांव टोंक्यास राहत असे. तेथून काशीस जाऊन राहिला. पेशव्यांशीं व तत्कालीन राजकारणी पुरुषांशीं त्याचा मोठा पत्रव्यवहार असे. याची सल्लामसलत वेळोवेळीं घेण्यांत येई. काशीवर स्वारी करून ती घेतल्यास अयोध्येचा नवाब आपणां सर्वांस (ब्राह्मणांस) बाटवील म्हणून नारायण दीक्षितानें बाळाजी बाजीरावास काशी घेऊं दिली नाहीं, असें सांगतात. मृत्युसमयीं नारायण दीक्षिताचें वय १२० वर्षांचें होतें म्हणतात. दीक्षिताचे दोन मुलगे वासुदेव व बाळकृष्ण हेहि वडिलांप्रमाणेंच निघाले. हैद्राबादेकडील राजकारण वासुदेव दीक्षिताच्या सल्ल्यानें चाले. या दीक्षित मंडळींचीं बरींच पत्रें उपलब्ध असून तीं बालबोधींत आहेत. यांचे वंशज विद्यमान असून खानदेशांतील शेंदुर्णी व निजाम हद्दींतील कायगांव येथें असतात.

**पाटणकर, माधवराव नारायण** (१८६२-१९१६)—एक महाराष्ट्रीय नट व नाटककार. सातारा जिल्ह्यांतील विटें गांवीं यांचा जन्म झाला. तेथें मराठी चौथीपर्यंतचें प्राथमिक शिक्षण व थोडेंसें वेदाध्ययन झाल्यावर हे मुंबईस आपल्या मामाकडे जाऊन राहिले. तेथेंच यांना नाटकें व गाणें यांचा नाद लागला व १८८४ सालीं यांनीं आपली नाटकमंडळी काढली. प्रथम जरी हे दुसऱ्या लेखकांचीं नाटकें करीत असत तरी थोड्याच दिवसांत यांनीं स्वतःच नाटकें लिहिण्यास सुरवात केली. 'विक्रम-शशिकला', 'द्रौपदीवस्त्रहरण', 'सत्यविजय' यांसारखीं सुमारें चोवीस नाटकें यांनीं लिहिलीं आहेत.

यांच्या नाटकांतील पदें, भाषा, कथानक, चाली व सवंग संगीत यांमुळें लोकांची जुनी अभिजात अभिरुचि बदलून गेली. साहित्यिक नाटकें म्हणून यांच्या नाटकांना किंमत नसली तरी कांहीं आधुनिक नाट्यतंत्र त्यांत आहे.

उत्कृष्ट नट या नात्यानेंहि यांनीं नांव मिळविलें. प्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा यानें यांचे कांहीं अंगविन्यास (पोझिस्) घेतले आहेत. त्यांपैकीं 'गंगावतरण' चित्रांतील शंकराचें चित्र यांचें आहे.

**पाटणा**—बिहार प्रांत, पाटणा विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ २,१६४ चौ. मै.. लोकवस्ती (१९४१) २१,६२,००८. लोक शें. ८९ हिंदू व ११ मुसलमान. शेंकडा ६२ शेती व शेंकडा १८ उद्योगधंदे करतात. बिहारबाजूस भाताचें आणि बार विभागांत रब्बीचें पीक चांगलें निघतें. ऐतिहासिक कालांत पाटणा हा भाग मगध राज्यांत मोडत असे. राजगृह ही त्याची राजधानी असे. पुढें मगधाबरोबरच हें बिहारमध्यें गेलें. गालिचे, किनखापाचें व कशिद्याचें काम, चांदी-सोन्याची तार व वर्ख, वगैरेबद्दल हा भाग प्रसिद्ध आहे. इतर उद्योगधंदेहि होतात. पाटणा शहर गंगा-शोण संगमापासून कांहीं मैल खालीं गंगातीरीं वसलें आहे. हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. प्राचीन नांव पाटलीपुत्र (पाहा). येथें बिहारचें विद्यापीठ आहे. लो. सं. १,७५,७०६. १७६३ ची कत्तल व १८५७ चें स्वातंत्र्ययुद्ध या दोन अर्वाचीन इतिहासांतील बाबींनीं पाटणा शहर प्रसिद्ध आहे.

**पाटणा संस्थान**—ओरिसा, छत्तीसगड विभाग, एक लहान संस्थान. क्षेत्रफळ २,५३० चौ. मैल. लोकसंख्या ६,३२,२२०. गांवसंख्या १,६६३. मुख्य ठिकाण बोलांगीर हें संबळपूरपासून ७५ मैलांवर आहे. संस्थानिक महाराजेंद्र नारायणसिंह देव हे १९२४ सालीं गादीवर आले. आज हें संस्थान ओरिसांत विलीन झालें आहे.

**पाटलीपुत्र**—ही मौर्यांच्या वेळीं मगधाचीच नव्हे तर साऱ्या भारताची राजधानी होती. कुसुमपुर, कुसुमध्वज, पुष्पपुर या नांवांनींहि हें नगर ज्ञात होतें. खि. पू. ५५४ मध्यें अजातशत्रूनें याचा पाया घातला व पाटली नांवाच्या खेड्याचें शहर केलें. अनेक शतकें यानें राजवैभव भोगलें. शहराच्या लांकडी तटास ५७० बुरूज व ६४ वेशी होत्या. शहराचा घेर १२॥ कोस होता. हूण लोकांनीं स्वारी करून हें शहर उध्वस्त केलें. यांत चंद्रगुप्त मौर्यांचा जो राजवाडा होता तो अतिशय वैभवसंपन्न व सुंदर होता असें ग्रीक लेखकांनीं वर्णन केलें आहे. चंद्रगुप्त याचीहि राजधानी हीच होती. हर्षाच्या अमदानींत हें शहर नामशेष झालें होतें. हल्लींचें पाटणा शहर हें पूर्वींचें पाटलीपुत्र होय. या शहराचे अवशेष गेल्या शतकाच्या अखेरीस शोधून काढले.

**पाटीचा दगड**—(स्लेट). यालाच कधीं कधीं पांढऱ्या मातीचा दगड (आर्गिलाइट) म्हणतात. हा एक कठिण खडक असून याचे पातळ थर सुटतात. या पातळ थरांच्या दगडाचा छपरासाठीं उपयोग करतात. सामान्यतः या दगडाचा रंग करडा असतो, परंतु त्यांत निरनिराळे प्रकार असतात. हा चाकूनें कापला जातो व कमी-अधिक कठिण असतो. छपराचा दगड हा सामान्यतः दुसऱ्या हलक्या थराच्या मधथरांत असतो. याच्या खाणी अनेक ठिकाणीं आढळतात. या जातीचा उत्तम दगड मेनिनजेनमधील सोनेनबर्ग व सालफेल्ड येथें आढळतो. याच्याच मऊ जातीपासून दगडी पेन्सिली करतात.

**पाटील, पटेल**—प्राचीन ग्रामसंस्थेंतील गांवचा मुख्य अधिकारी. पाटिलकीचें वतन वंशपरंपरा चालतें. इंग्रजी अमदानींत पाटिलकीची संस्था राखली गेली आहे. इतर इस्टेटींत हिस

पडतात तसे यांत पडत नाहींत. तरी त्याबद्दल कित्येक ठिकाणीं ठराविक मुदतीनंतर तें वतन फेरपाळीनें बदललें जातें. पाटील हा सरकारचा स्थानिक प्रतिनिधिच असतो व सरकारी कामकाजाचीं सर्व सूत्रें त्याच्यामार्फत चालतात. बहुतेक ठिकाणीं सरकारची पोलिस-पाटील व मुलकी-पाटील असे दोन इसम ठेवण्याची वहिवाट आहे. मुलकी-पाटलाकडे शेतसारा वगैरे वसूल करणें व पोलिस-पाटलाकडे फौजदारीबाबतच्या कानूप्रमाणें दिलेलीं कर्तव्यें पार पाडणें हीं कामें असतात. कांहीं भागांत पाटील शब्द पटेल असा उच्चारतात व लिहितात. तलाठी अथवा पटवारी व पाटील हे एकमेकांचे पूरक मदतनीस असतात. मुलकी-पाटील हाच या तिघांत मुख्य असतो. कित्येक ठिकाणीं मुलकी-पाटील व पोलिस-पाटील एकच असतो.

**पाटील, नाना** (१९००- )—एक क्रांतिकारक विचाराचे काँग्रेस कार्यकर्ते. १९४२ च्या ' चले जाव ' चळवळींत भूमिगत राहून सातारा जिल्ह्यांत प्रतिसरकार किंवा ' पत्रीसरकार ' स्थापन करणारे हे एक होते. मुलकीपर्यंतचें प्राथमिक शिक्षण होतांच हे तलाठी झाले. पुढें १९३० सालीं सुरू झालेल्या काँग्रेसच्या चळवळींत यांनीं भाग घेतला. महाराष्ट्र काँग्रेस कमिटींतहि यांची निवड झाली होती.

१९४२ च्या चळवळींत ब्रिटिश राजवटीचें निर्मूलन करण्याकरितां यांनीं व यांच्या सहकाऱ्यांनीं आक्रमक चळवळीचा मार्ग स्वीकारला. खेड्यांतील पाटील-तलाठ्यांस जबरीनें सारा वसूल न करण्याची सूचना देणें, सरकारी हेरगिरी करणारांस व गुंडांना तळपायाला काठीचे फटके मारण्याची शिक्षा देणें, खेड्यांतील पोस्ट ऑफिसें व पोलिस स्टेशनें जाळणें, यांसारख्या वरून अत्याचारी दिसणाऱ्या मार्गांनीं यांनीं सरकारला सळो कीं पळो करून सोडलें होतें. याच कालांत यांनीं केलेलें ग्रामराज्याचें कार्यहि तितकेंच महत्त्वाचें आहे. प्रत्येक खेडें स्वयंपूर्ण बनावें यासाठीं त्या खेड्यांतील लोकांनीं निवडून दिलेल्या पंचांनीं त्या खेड्याचा कारभार पाहावयाचा अशी कल्पना व कार्यपद्धति होती. या पद्धतीप्रमाणें कऱ्हाड, वाळवें, कान्हापूर यांसारख्या ठिकाणीं पंचसभा स्थापन करण्यांत येऊन आपली कल्पना यांनीं प्रत्यक्षांत उतरवली.

१९४६ सालीं काँग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर आल्यावर यांच्यावरील वॉरंट जरी रद्द करण्यात आले तरी आपल्या इतर सहकाऱ्यांवरील पकड-वॉरंटें रद्द होईपर्यंत यांनीं भूमिगतावस्थेंतून प्रकट होण्याचें नाकारलें. यांच्या सर्व सहकाऱ्यांवरील वॉरंटें सरकारनें रद्द केल्यावर कोरेगांवला हे आपल्या १४७ भूमिगत व २७ बंदिस्त सहकाऱ्यांसह मोठ्या समारंभानें प्रकट झाले. आतां हे शेतकरी-कामकरी पक्षांत आहेत.

**पाटील, भाऊराव पायगोंडा** ( १८८७- )—महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाचे एक उद्धारक व साताऱ्याच्या रयत-शिक्षणसंस्थेचे संस्थापक. हे धर्मानें जैन आहेत. यांचें इंग्रजी सहावीपर्यंतचें शिक्षण कोल्हापुरासच झालें व त्यानंतर सन १९१४-२२ या कालांत प्रथम ओगले व नंतर किर्लोस्कर यांच्या कारखान्यांचे एजंट ( विक्रेते ) म्हणून यांनीं सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला. हे सत्यशोधक समाजांतील एक कार्यकर्ते म्हणून प्रथम प्रसिद्धीस आले.

आपल्या देशांतील असंख्य खेड्यापाड्यांतून असणारे लोक जोंपर्यंत अज्ञानांत खितपत पडले आहेत तोंपर्यंत आपल्या देशाची सुधारणा होणें शक्य नाहीं हा विचार मनांत येतांच यांनीं बहुजनसमाजाला शिक्षित करण्याचा चंग बांधला. त्या दृष्टीनें इतर व्यवसाय संभाळून यांनीं पहिली संस्था काढली ती ' दुधगांव शिक्षणप्रसारक संस्था ' ही होय. यानंतर लवकरच सन १९१९ मध्यें काले ( कऱ्हाड ) येथें रयत-शिक्षणसंस्था स्थापून यांनीं आपल्या कार्यास नेट लावला. त्यामुळें सन १९४५ अखेर खेड्यांतील मुलांमुलींना शिक्षण देणाऱ्या अशा सुमारें चारशें प्राथमिक शाळा अस्तित्वांत आल्या व त्यांतून पंधरा हजारांवर विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय झाली. याखेरीज प्राथमिक शिक्षक तयार करण्यासाठीं ' सिल्व्हर ज्युबिली रूरल ट्रेनिंग कॉलेज ', ' रा. ब. काळे प्रॅक्टिसिंग स्कूल ', या संस्थांचीहि स्थापना करण्यांत आली. मुलींच्या शिक्षणाकरितां ' जिजामाता अध्यापिका विद्यालय ' व ' लक्ष्मीबाई पाटील वसतिगृह ' यांची स्थापना झाली. तसेंच सातारा येथें यांनीं उच्च शिक्षण देण्याचें ' छत्रपति शिवाजी कॉलेज ' उघडलें आहे.

**पाटील, सदाशिव कान्होबा** ( १९४०- )—एक कॉंग्रेस कार्यकर्ते. यांचें शिक्षण मुंबई येथें सेंट झेविअर कॉलेज व लंडनमधील स्कूल ऑफ जर्नलिझममध्यें झालें. १९२१ मध्यें हे असहकारितेच्या चळवळींत पडले व त्यांनीं चार वर्षें एक राष्ट्रीय शाळा चालविली. १९२५ मध्यें हे युरोपमध्यें गेले व लंडन युनिव्हर्सिटी व लंडन स्कूल ऑफ जर्नॅलिझम यांमध्यें शिक्षण घेऊन १९२७ सालीं ते परत आले. नंतर कांहीं वर्षें ते ' बॉंबे क्रॉनिकल '-च्या संपादकवर्गांत होते. १९३० त हे मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे सरचिटणीस, नंतर अध्यक्ष झाले. हे अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचे सभासद १९३४ व १९३६ मध्यें होते. ऑक्टोबर १९३४ मध्यें मुंबई येथें भरलेल्या ४८ व्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाच्या प्रसंगीं हे सरचिटणीस होते. १९३५ मध्यें हे मुंबई म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे सभासद झाले. पुढें १९४८ त अध्यक्ष झाले. १९४९ सालीं यांनीं युरोपांत प्रवास करून तेथील नगरपालिकांच्या कारभाराचें अवलोकन केलें.

**पान्टून पूल**—जेव्हां तरता पूल बांधावयाचा असतो तेव्हां सपाट बूड असलेल्या पान्टून जातीच्या होड्यांचा उपयोग करतात. या होड्या सामान्यतः २१ फूट लांबीच्या असून त्यांचे पुढचा व मागचा असे दोन स्वतंत्र भाग असतात. या प्रत्येक भागाचें वजन पांच हंड्रेड-वेट असतें. या होड्यांचे भाग एकाशीं एक जोडून पूल तयार करतांना त्याजवर प्रथम आडवे दांडे (सॅडलबीम) घालण्यांत येतात. नंतर त्यावर उभे दांडे (बॉक) टाकण्यांत येतात. यावर मुख्य रस्त्याच्या फळया (चेसेस) टाकून त्या एकमेकांशीं घट्ट बंदांनीं (रिबँड्स) आवळून टाकण्यांत येतात. अशा होड्यांच्या पुलास कांठाजवळ निराळया तऱ्हेचे उभे दांडे वापरावे लागतात. हे पूल चार प्रकारांनीं बांधण्यांत येतात : १ पुलाच्या आरंभींच होड्या एकमेकांशीं जोडण्यांत येतात; २ होड्यांचे तराफे करून नंतर एकमेकांशीं जोडण्यांत येतात; ३ सर्व पूल नदीच्या एका कांठाशीं बांधून तयार करण्यांत येतो व एक टोंक प्रवाहाबरोबर दुसऱ्या कांठाशीं नेण्यांत येतें;४ पुढील कांठाशीं जोडावयाचें टोंक प्रथम तयार करून मागून एक एक होडी जोडून तें पुढें पुढें दुसऱ्या कांठापर्यंत नेण्यांत येतें.

**पॉट्सडॅम**—हें शहर प्रशियांत (जर्मनी) बर्लिनच्या वायव्येस १७ मैलांवर हॅव्हेल नदीकांठीं आहे. जर्मनीमध्यें अतिशय सुंदर शहरांपैकीं हें एक आहे. येथें अनेक राजवाडे आहेत. आणि १९१८ च्या राज्यक्रांतीपूर्वी होएनझोलर्न राजघराण्याचें वास्तव्य येथें असे. येथें साखर, बीअर, दारू, साबण, चष्मे, वगैरे जिनसांचे कारखाने आहेत. लो. सं. १,३६,१६५ आहे. दुसऱ्या महायुद्धाच्या अखेरीस १९४५ त या ठिकाणीं दोस्त राष्ट्रांनीं जमून जर्मनींत मध्यवर्ती सरकार कांहीं काल स्थापन न करण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें अद्यापि मध्यवर्ती जर्मन सरकार नाहीं.

**पाठक, काशीनाथ बापूजी** (१८५०-१९३२)—एक प्राचीन वाङ्मयाचा संशोधक व पंडित. बी. ए. पर्यंत शिक्षण झाल्यावर यांनीं बेळगांवच्या सरदार हायस्कूलमध्यें शिक्षकाचा पेशा पत्करला. या कालांत हिंदी शिलालेखावरील फ्लीट यांचे इंडियन अॅन्टिक्वेरींतील लेख यांच्या वाचनांत आले व त्यांतील दोषस्थळें दाखविण्याच्या निमित्तानें यांनीं संशोधनकार्यांत प्रवेश केला. पुढें सन १८८४ मध्यें मिरजेच्या राजेसाहेबांचे शिक्षक म्हणून असतांना कोल्हापूरच्या सरस्वती भांडारांतील जैन वाङ्मयाचें परीक्षण करण्याची सुसंधि यांना मिळाली व तेथून पुढें या विषयांतील एक तज्ज्ञ म्हणून हे ओळखले जाऊं लागले. म्हैसूर सरकारच्या आर्किऑलॉजिकल डिपार्टमेन्टमध्यें व त्यानंतर पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक म्हणून कांहीं काल काम केल्यानंतर सन १९०८ मध्यें हे सेवानिवृत्त झाले.

सन १८९३ सालीं लंडन येथें भरलेल्या इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑफ ओरिएन्टॅलिस्टच्या नवव्या अधिवेशनासाठीं यांनीं 'दिगंबर जैनवाङ्मयांत कुमारीलचें स्थान' हा जो निबंध पाठवला त्याचें तेथील अध्यक्ष मॅक्समुल्लर, फ्लीट व ल्युमन, इत्यादि विद्वानांनीं चांगलें स्वागत केलें. सुमारें वीस शिलालेखांचें संशोधनवाचन करून यांनीं त्यांवर पन्नासाहून अधिक निबंध लिहिले आहेत.

'कर्नाटकांतील शिलालेख' या विषयावर व्याख्यान देण्यासाठीं सन १९०८ मध्यें मुंबई विद्यापीठाकडून यांना भगवानलाल इंद्रजी लेक्चरर म्हणून निवडलें होतें. १९३१ सालीं यांच्या ८१ व्या वाढदिवसानिमित्त पुण्याच्या भांडारकर ओरिएन्टल रीसर्च इन्स्टिटयूटनें यांना एक स्मृतिग्रंथ अर्पण करून यांचा यथोचित सत्कार केला. यांनीं 'कालिदासाचें मेघदूत' व 'नृपतुंगाचा कविराजमार्ग' हे ग्रंथ लिहिले आहेत.

**पाठारे, आत्माराम मोरेश्वर** (१८६८-१९३१)—एक मराठी कवि व नाटककार. यांचें जन्मठिकाण ठाणें हें होय. यांच्या लहानपणींच यांचे वडील व चुलते वारल्यामुळें यांचें प्राथमिक शिक्षण यांच्या मामांच्या आधारानें झालें. पुढें चित्रकलेचा अभ्यास करण्याच्या हेतूनें यांनीं 'स्कूल ऑफ आर्ट' मध्यें प्रवेश केला. परंतु आर्थिक परिस्थितीमुळें थोड्याच दिवसांत चित्रकलेला सोडून यांनीं मुंबईच्या शिवाजी स्कूलमध्यें शिक्षकाची नोकरी धरली. यानंतर 'मार्कंडेय' हें पौराणिक नाटक यांनीं लिहिलें. यांनीं लिहिलेल्या 'संगीत वसंत-इंदिरा', 'संगीत संभाजी', 'रणसिंह बाजी', वगैरे नाटकांत 'संभाजी' नाटकानें यांना प्रसिद्धि मिळवून दिली. 'संभाजी' हें नाटक सन १९१२ मध्यें सरकारनें जप्त केलें. तसेंच यांच्या 'रणसिंह बाजी' या प्रसिद्ध नाटकासहि सरकारनें मनाई केली. यांच्या 'भक्त नरहरि' नाटकास दोनशें रुपयांचें बक्षीस मिळालें. 'महानन्दा' 'मद्यपाननिषेध' व भिल्लिणी' हीं यांचीं तीन काव्यें होत.

**पांडव**—हस्तिनापूरच्या पंडु राजाचे मुलगे ते पांडव. धर्म, भीम, अर्जुन, नकुल व सहदेव हे पांच पांडव होत. पांडवांचें व कौरवांचें राज्यप्राप्तीसाठीं झालेलें युद्ध हाच महाभारताचा मुख्य विषय आहे. धर्म, भीम व अर्जुन हे तिघे कौंतेय म्हणजे कुंतीचे मुलगे, आणि नकुल व सहदेव हे दोघे माद्रेय म्हणजे माद्रीचे मुलगे होते.

पांडव म्हणजे पांच असा संख्यावाचक अर्थ या नांवाला आला आहे. कांहीं खडकांत कोरलेलें शिल्पकाम असलें म्हणजे त्यास पांडव लेणें म्हणतात.

**पांडवगड**—मुंबई, सातारा जिल्हा, वांई तालुका. वांईच्या ईशान्येस ४ मैलांवर एका टेंकडीवर ४१७७ फूट उंचीवर हा किल्ला आहे. रस्ता शेलारवाडीवरून आहे. किल्ला चौरस असून क्षेत्रफळ ६ एकर आहे. हा कोल्हापूरचा शिलाहार राजा दुसरा भोज (११७८–११९३) यानें बांधला असें सांगतात. हा १६७३ त शिवाजीनें घेतला. १७१३ मध्यें चंद्रसेन जाधवानें बाळाजी विश्वनाथास येथें कोंडलें होतें, परंतु हैबतराव निंबाळकरानें वेढा उठवून त्याचा जेजूर येथें पराभव केला. त्रिंबकजी डेंगळ्याच्या लोकांनीं हा किल्ला घेतला होता. तो मेजर थॅकरनें परत घेतला. येथें जवळ धावडी येथें कोरींव लेणीं आहेत.

**पाडवा**—प्रतिपदा म्हणजे पहिली तिथि असा मूळ संस्कृत शब्द; त्याचा अपभ्रंश पाडवा. चैत्री पाडवा किंवा गुढी पाडवा आणि कार्तिकी पाडवा (दिवाळींतला) अशा दोन सणांना हें नांव आहे. चैत्री पाडव्याला शालिवाहन शक सुरू होतो. व कार्तिकी पाडव्याला विक्रम संवत् सुरू होतो. या दोन शकारंभांच्या स्मारकासाठीं पाडवा हा मोठा सण समजतात. चैत्री पाडव्यास महाराष्ट्रांत प्रत्येक हिंदु गुढी उभारतो व त्याची पूजा करून पक्कान्नांचें जेवण जेवतो. हा दिवस साडेतीन मुहूर्तोंपैकीं असल्यानें शुभ होण्याच्या इच्छेने मोठ्या कार्यांचा प्रारंभ या सणाला करतात. दिवाळींतील पाडवा (बलिप्रतिपदा) देखील फार शुभ समजतात.

**पाडळ**—या झाडाच्या वेलपाडळ व वृक्षपाडळ अशा दोन मुख्य जाती आहेत. संस्कृतांत पाटलि–पाटला अशीं नांवें आहेत. वेलपाडळीच्या वेली झाडावर चढलेल्या असतात. हिला 'मोठी तान्हीची वेल' असेंहि म्हणतात. हीस फळांचे घोंस येतात. फळें लहान व पांढरीं असतात. हें झाड औषधी आहे. उन्हाळे, पोटदुखी, फुरशाच्या विषाची बाधा, इ. वर मुळी उगाळून देतात.

**पॉंडिचेरी**—हिंदुस्थानांतील फ्रेंच वसाहतींचें मुख्य ठिकाण. हें कारोमांडल किनाऱ्यावर कुडलोरपासून १२ मैलांवर आहे. साउथ इंडियन रेल्वेच्या विल्लुपुरम्-पॉंडिचेरी फांट्यावर हें स्टेशन आहे. १६७४ मध्यें फ्रेंचांनींच हें वसवलें. लोकसंख्या ५९,८३५. डचांनीं एकदां व इंग्रजांनीं चारदां घेतलें. परंतु अखेर तें फ्रेंचांकडेच आलें. एका कालव्यानें शहराचे श्वेत व कृष्ण असे दोन भाग पडले आहेत. श्वेतभागाची रचना पाश्चात्य आहे. येथें बंदर नाहीं. किनाऱ्यापासून एक मैलावर जहाजें येतात. येथें बरेच गुजराथी व्यापारी आहेत. पॉंडिचेरी प्रांताचें क्षे. फ. ११५ चौ. मै. व लो. सं. २,२२,५७२ आहे. चंद्रनगरप्रमाणेंच लोकांचें मत घेऊन हिंदुस्थानांतील हा परकीय अमलाखालील प्रदेश हिंदी संघराज्यांत सामील करण्यांत येणार आहे.

**पांडुरोग**—(क्लोरोसिस). मनुष्याच्या शरीरांतील रक्त रुधिर कणांचा रंग हळूहळू नाहींसा होतो त्यास म्हणतात. हा एक प्रकारचा रक्तक्षयच असतो. पाश्चात्य देशांत हा सामान्यतः शहरांत अर्धपोटीं काम करणाऱ्या १४ ते १७ वर्षें वयाच्या मुलींमध्यें त्यांस स्वच्छ हवा, व्यायाम व पौष्टिक अन्न न मिळाल्यामुळें उत्पन्न होतो. या रोगामध्यें त्वचेचा रंग पिवळट हिरवा दिसूं लागतो व तसेंच आंतड्यांत वायु उत्पन्न होतो. तेव्हां मज्जातंतूस विकार होऊं लागून छाती धडधडूं लागते, सर्व अंग फिकें पडतें, व पायास सूज येते. या रोगावर सारक औषधें व लोह यांचा उपयोग करणें अवश्य असतें. पित्त वाढल्यानें हा रोग होतो; पित्त शरीरांत पसरून त्वचा, मांस, रक्त व कफ यांस बिघडवितें, असें आयुर्वेद सांगतो. कफ व सन्निपात यांमुळें होणाऱ्या पांडुरोगाचीं लक्षणें वेगळीं असतात. माती खाण्यानेंहि हा रोग मुलांना होतो. स्नेहन आणि वमन करवून दूध देतात. द्राक्षरस आणि आंवळ्याचा रस हेहि गुणकारी आहेत. रक्तक्षय पाहा.

**पांडुवंश**—एक राजवंश. हा आठव्या शतकांत कोसल येथें राज्य करीत होता. याचें व पल्लवांचें वैर होतें. पांडुवंशीय उदयनाचा पल्लवराज नंदिवर्मा यानें ७३५ मध्यें पराभव केला.

**पांड्य**—हें एक पुरातन काळच्या राष्ट्राचें व राज्याचें नांव आहे. महाभारत, पुराणें, बृहत्संहिता, वगैरे प्राचीन ग्रंथांतून पांड्यांचा उल्लेख आहे. हल्लींचा मदुरा, तिन्नेवेली व त्रिचनापल्ली या जिल्ह्यांचा व त्रावणकोर संस्थानचा भाग पूर्वी पांड्य राष्ट्रांत समाविष्ट होत असे. मदुरा, कोरकई, मणलूर या त्यांच्या एके काळच्या राजधान्या होत. कुलशेखर पांड्य हा त्यांचा मूळपुरुष. ग्रीक व रोमन लोकांना पांड्यांची माहिती परस्परांच्या व्यापारी संबंधानें झाली होती. पांड्यांनीं वेळ येईल त्याप्रमाणें दबून अथवा चढाई करून आपलें अस्तित्व पुष्कळ शतकेंपावेतों टिकविलें. राजराज चोलानें पांड्यांस ९९४ मध्यें मांडलिक केलें. पुढें त्यांनीं १३ व्या शतकाच्या पूर्वार्धांत पुन्हां डोकें वर काढलें. मध्यंतरीं नेहमीं होणाऱ्या पांड्य-सिंहलांच्या झटापटींत ११६६ मधली सिंहलांची स्वारी महत्त्वाची होती. पांड्य यांच्या प्रदीर्घ कालांत त्यांच्या २-३ शाखा झाल्या.

१३११ मध्यें मलिक काफर याला पांड्यांच्याच गृहकलानें संधि मिळाली व पांड्यांचा पूर्ण नाश झाला. पांड्यांची पहिली शाखा कीर्तिभूषणापर्यंत होती. तेथून दुसरी वंशशेखरनें प्रस्थापित केली. कूण नांवाच्या पांड्य राजाच्या वेळीं मदुरा येथें अरब लोक आले होते. दुसऱ्या शाखेंतील वीर या शेवटच्या पुरुषाच्या वेळीं त्याचें राज्य त्याच्या दासीपुत्रांत वांटलें गेलें. तिसऱ्या शाखेचा मेरुसुंदर (मृ. १२२३) व मकरध्वज हे शूर होते. या

शाखेंतील कुवलयानंद यानें समुद्रमार्गानें परदेशांशीं व्यापार वाढवला. याच शाखेंतील शेवटच्या पुरुषांनीं गृहकलहानें परकीयांस घरांत घेऊन १३११ मध्यें सर्वस्वाचा नाश करून घेतला.

**पांड्ये, लोचनप्रसाद चिंतामणि** ( १८८६- )— उडिया व हिंदी भाषेंतील एक नामवंत कवि, लेखक व इतिहास-संशोधक. सरयूपारीण जातीच्या एका सुप्रतिष्ठित घराण्यांत यांचा जन्म झाला. विलासपूर जिल्ह्यांतील बालपूर हें गांव यांचें जन्म-ठिकाण होय. सन १९०५ मध्यें मॅट्रिक झाल्यावर यांनीं उडिया, बंगाली व संस्कृत भाषेचें अध्ययन केलें.

हिंदी भाषेंत यांनीं गद्य व पद्य अशीं वरीच पुस्तकें लिहिलीं आहेत : ( १ ) नीतिकविता, ( २ ) मेवाडगाथा, ( ३ ) कविताकुसुममाला, ( ४ ) रघुवंशसार, ( ५ ) पद्मपुष्पांजली. यांसारखीं हिंदी भाषेंतील यांचीं पुस्तकें अत्यंत लोकप्रिय झालीं आहेत. ( १ ) कविताकुसुम, ( २ ) महानदी, ( ३ ) रोगीरोदन हे यांचे उडिया भाषेंतील काव्यग्रंथ होत. ओरिसा प्रांतांतील बामण्डा येथील राजांनीं यांना काव्यविनोद ही पदवी देऊन यांच्या गुणांचा गौरव केला आहे. तसेंच सुप्रसिद्ध उत्कल साहित्यविशारद पं. नीलमणि शर्मा व भाषाभ्यासक ग्रियर्सन यांनीं उडिया भाषेवरील यांच्या अलौकिक प्रभुत्वाबद्दल यांची प्रशंसा केलेली आहे.

इतिहाससंशोधनकार्याचा यांचा व्यासंगहि दांडगा असून यांनीं महाराज पृथ्वीदेव, रत्नदेव, प्रतापमल्लदेव (हैहय), योधेय-गण, सोम, नाग, वगैरे राजांचे शिलालेख महत्प्रयासानें संग्रहित केले आहेत. मध्यप्रांत सरकारनें ग्रियर्सन यांच्याकडून करविलेल्या 'छत्तीसगडी' व्याकरणाचें संशोधन व संवर्धन चालू ठेवण्याची कामगिरी यांच्याकडे सोंपवली होती. यांनीं कांहीं इंग्रजी पुस्तकेंहि लिहिलीं आहेत. सन १९२१ मध्यें जबलपूर येथें भरलेल्या चौथ्या हिंदी साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना मिळाला होता.

**पांढरकवडा**—वऱ्हाड, यवतमाळ जिल्हा, केळापूर तालुका, एक गांव. हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या सुमारें ४,०००. हें यवतमाळपासून ४२ मैलांवर आहे. दुसरा बाजीराव व इंग्रज यांची या गांवीं झटापट होऊन बाजीरावाचा पराभव झाला. येथून दोन मैलांवर केळापूर गांव आहे.

**पांढरी**—हें झाड डोंगरप्रदेशांत होतें व मोठें वाढतें. याचें लांकूड जड व कठिण असतें. लांकडाचा रस पांढरासफेत असतो. पांढरीची काठी हातांत असल्यास भूतबाधा होत नाहीं किंवा साप डसत नाहीं, असा समज आहे. म्हणून याच्या काठ्या घरांतून बाळगतात. वेलपांढरी म्हणून हिची एक जात आहे.

**पांढुर्णा**—मध्यप्रांत, छिंदवाडा जिल्हा, सौंसर तहशील, एक गांव. जांब नदी गांवांतून जाते. येथें म्युनिसिपालिटी आहे. जिन, प्रेस, ऑइल मिल व बोलपटगृह आहे. लो. सं. सुमारें १२,०००. येथें फार प्राचीन काळापासून एक धार्मिक खेळ होत असतो. या खेळाला 'गोटमार' ( दगडाची मारामारी ) असें म्हणतात. जांब नदीच्या कांठावर कै. विठोबाजी बंधु रामचंद्रजी पऱ्हाते पाटील यांनीं बांधिलेल्या राधा-कृष्णाच्या मंदिरासमोर वरील खेळ होतो. नदीच्या मध्यभागीं एक पळसाचा ( झाडाचा ) झेंडा गाडतात आणि नदीच्या दोन्ही तीरांवर अंदाजें २००-२५० लोक आपसांत दगडाची मारामारी करीत असतात. खेळणारे लोक बरेच जखमीहि होतात. श्रीचंडीदेवीच्या प्रीत्यर्थ हा खेळ होतो म्हणतात.

**पाणकांच**— ही विरघळणारी कांच सिंधुरक्षा ( सोडा ॲश ) व स्वच्छ वाळू ( सिकित ) यांचें मिश्रण खूप तापवून तयार करतात. दगडी बांधकाम हवेनें खराब होऊं नये म्हणून व साबण, अग्निबंधक सीमेंट, कृत्रिम दगड, इ. तयार करण्यासाठीं पाणकांच वापरतात. याचा घरगुती उपयोग अंडीं नीट राहावीं म्हणून होतो.

**पाणकोंबडी**—( कूट ). हा एक पाण्यांत राहणारा व कोंबडी-सारखा दिसणारा प्राणी आहे. हा बहुधा तळ्यांत किंवा डबक्यांत राहतो. याची लांबी सुमारें १५ इंच असून याच्या कपाळावर पिसें नसतात. शरीराचा रंग काळसर असून याच्या पायाच्या बोटाच्या शेवटीं ग्रंथी असतात. हे आपलीं घरटीं तळ्याच्या कांठीं किंवा तळ्यांतील बेटांत किंवा थोड्याफार दूर अंतरावर घालतात. तीं फार मोठीं असून बळकट व घट्ट असतात. तीं पाण्यांतील लव्हाळे किंवा इतर पालापाचोळा, वगैरेचीं केलेलीं असतात. एखाद्या वेळीं तळ्याचें पाणी वाढलें म्हणजे हीं घरटीं पाण्यांत तरंगूं लागतात. पण अशा प्रसंगीं मादी आपल्या अंड्यांवर संथपणें बसून असते व ती पुन्हां जमिनीस लागेपर्यंत सोडून जात नाहीं.

**पाणकोळी**—( पेलिकन ). या प्राण्याचा एक निराळाच वर्ग आहे. यांच्या पायांचीं बोटें बदकाप्रमाणें जोडलेलीं असतात. हे कळप करून राहतात. यांचा आकार हंस पक्ष्यापेक्षां मोठा असून त्यांचे पंखहि मोठे असतात व पोहण्याची शक्तिहि मोठी असते. यांची चोंच सपाट असते आणि तीस एक पिशवीसारखा अवयव जोडलेला असतो. त्यांत ते मासे भरून ठेवूं शकतात. हे पक्षी पृथ्वीवर चारीहि खंडांत आढळतात. यांचा रंग सामान्यतः पांढरा स्वच्छ असून मधून मधून गुलाबी छटा आढळते. हे आपल्या पिलांना आपल्या पिशवींतील मासे खाऊं घालून वाढवितात. हे पक्षी युरोपमध्यें हिंवाळा आला म्हणजे ईजित देशांत जातात.

**पाणघड्याळ**—(क्लेप्सिड्रा). आपल्याकडील घटिकेमध्यें ज्याप्रमाणें एका छिद्रांतून पाणी आंत येतें त्याप्रमाणें त्याच्या उलट एका पात्रांतील पाणी एका छिद्रांतून गळून जाण्यावरून वेळ मोजण्याचें केलेलें साधन. पूर्वी पाणी जसजसें गळून जाई तसतशी पाण्याची पातळी खालीं जाई, व त्यावरून वेळ मोजीत असत. कांहीं घड्याळांत पाण्याच्या पृष्ठभागाचा संबंध एका कांटे असलेल्या तबकडीशीं वजनाच्या व तरंगणाऱ्या वस्तूंच्या साहाय्यानें जोडण्यांत येऊन वेळ दाखविण्याची योजना केलेली असे. या रचनेंत भांड्यांत पाणी भरलें म्हणजे तरंगणारी वस्तु वर येते व तिला जोडलेलें वजन खालीं जातें व जातांना कांट्यांच्या चातीला गति देते व त्यामुळें कांटे फिरतात.

**पाणघोडा**—(हिपोपोटॅमस). हा एक रवंथ न करणारा पण खूर असलेला चतुष्पाद प्राणी आहे. याच्या दोन जाती आढळतात : एक आफ्रिकेमध्यें असून फार मोठ्या आकाराची असते. दुसरी आफ्रिकेच्याच पश्चिमेकडील नद्यांमध्यें आढळते; ती आकारानें लहान असून तींत आणखीहि कांहीं फरक आहेत. पहिल्या जातीच्या प्राण्याचें डोकें जाड व चौकोनी असतें. तोंड मोठें असतें. कातडी दोन इंच जाड असते व तीवर शेपटीच्या टोंकाशिवाय केंस नसतात. यांच्या खालच्या जबड्यांतील सुळे व तीक्ष्ण दांत मोठे असून वळकट असतात. यांची लांबी कधीं कधीं दोन फूट भरते व वजन ६ पौंडांपर्यंत होतें. यांच्या दांतांकरितां व सुळयांकरितां यांची शिकार करतात. यांची लांबी १४ फूट किंवा त्यापेक्षांहि जास्त असते. हे पाण्यांत राहतात व पाण्यांतील वनस्पती खातात आणि अट्टल पोहणारे आहेत. पण हा फार शांत व निरुपद्रवी प्राणी आहे. याच्या दांतांचा हस्तिदंतासारखा उपयोग करतात व कातड्याचे चाबूक करतात.

**पाणतीर**—(टॉर्पेडो). आरमारी युद्धामध्यें शत्रूचें जहाज फोडण्याकरितां एका धातूच्या कवचामध्यें ज्वालाग्राही पदार्थ भरून पाण्यांतून दूर जाऊन शत्रूच्या जहाजावर आपटल्यावरोबर स्फोट होईल अशा तऱ्हेच्या या शस्त्राची रचना केलेली असते. सध्याचा अनियंत्रित पाणतीर रॉबर्ट व्हाइटहेड (१८२३–१९०५) यानें प्रथम शोधून काढला. हा एक ब्रिटिश एंजिनियर होता. याची मुख्यतः अशी रचना केलेली असते कीं, त्याच्या शरीरामध्यें त्यास गति मिळण्याची व एका विवक्षित दिशेनें ती कायम राहण्याची यांत्रिक योजना असते. तिचा आकार माशासारखा असतो. याच्या डोक्यांत डायनामाइट भरलेलें असून त्याच्यापुढें असलेल्या नाकास लक्ष्याचा धक्का बसतांच तें पेट घेतें. त्याच्यामागें दाबलेली हवा असून तिच्यामुळें पाणतीरास गति मिळते. यानंतर एक कप्पा असतो, त्यामुळें ही हवेची खोली व इंजिन हीं दूर केलेलीं असतात. मागील भागांत एक लंबकाकार वजन असतें, त्यामुळें हा पाणतीर पाण्याखालीं राहतो. याच्यामागें पाणतीर तरंगत ठेवण्याची व त्यास गति मिळण्याची यंत्ररचना असते व तो इष्ट दिशेनें जाण्याकरितां सुकाणूचीहि योजना असते. गेल्या दोन महायुद्धांत या शस्त्राचा फार वापर करण्यांत आला व याच्या रचनेंतहि बरीच कार्यशक्ति निर्माण केली.

**पाणतीर**

अ—डोकें. ब—वायुपात्र. क—मागचा भाग. ड—गतिप्रेरक.

**पाणबुडी घंटा**—पाणबुड्ये लोकांना समुद्राच्या पृष्ठभागाच्या खालीं जाऊन तेथें बराच वेळ राहतां यावें याकरितां जी यांत्रिक रचना केलेली असते ती घंटेच्या आकाराची असल्यामुळें तिला पाणबुडी घंटा म्हणतात. या घंटेचें लहान तोंड बंद असून मोठें तोंड उघडे असतें. या पात्रामध्यें जी हवा असते तीमुळें हें पात्र पाण्यांत बुडविलें तरी त्यांत पूर्ण पाणी भरत नाहीं, व त्यामुळें पाणबुड्यास पुष्कळ वेळ श्वासोच्छ्वास करतां येतो. परंतु घंटेंतील हवा श्वासोच्छ्वासामुळें दूषित झाली असतां तिच्या जागीं नवीन हवा भरण्याची योजना करण्यांत आली पाहिजे. अलीकडे ज्या पाणबुडी घंटा बनविण्यांत येतात त्या चौकोनी आकाराच्या असून त्यांच्यावर एक नळी जोडलेली असून ती पाण्याच्या पृष्ठभागापर्यंत आणलेली असते. तिला हवाबंद किल्ली किंवा द्वार असतें. त्यामुळें ही घंटा पाण्याच्या तळाशींच असतांना पाणबुड्यास वर येतां येतें किंवा खालीं जातां येतें. या घंटेस टेलिफोन व विजेचे दिवे बसविलेले असतात. अलीकडे नवीन प्रकारच्या 'नॉटिलस्' नांवाच्या घंटा बनविण्यांत आल्या आहेत. त्या आंतील पाणबुड्यासच वर आणतां येतात किंवा खालीं नेतां येतात, व या गोष्टींकरितां वरील लोकांवर अवलंबून राहावें लागत नाहीं.

**पाणबुडी दुर्बीण**—(पेरिस्कोप). पाणबुडी बोट जेव्हां पाण्याखालून जात असेल तेव्हां पाण्याच्या पृष्ठभागावर असलेल्या वस्तू किंवा जहाजें पाहण्याकरितां ही दुर्बीण बसविलेली असते. या दुर्बिणींत कांहीं भिंगें (लेन्स) व त्रिपार्श्व कांचा अशा तऱ्हेनें बसविलेल्या असतात कीं, त्यामुळें पाणबुडीच्या माथ्यावर असलेल्या भिंगापुढें जी जी वस्तु येईल तिचें प्रतिबिंब खालीं पडून पाहतां यावें. या दुर्बिणींतून तोंडाशीं असलेल्या भिंगांतून प्रत्यक्ष डोळ्यानेहि वरील वस्तु पाहतां येते.

**पाणवुडी बोट**—(सब्मरीन). हातानें चालविण्यांत येणाऱ्या पाणवुडया होडया प्रथम बुशनेल यानें १७७५ मध्यें आणि रॉबर्ट फुल्टन यानें १८०० मध्यें तयार केल्या होत्या. यंत्रानें चालणारी पाणवुडी प्रथम फ्रान्समध्यें १८६३ सालीं सी. ब्रुन यानें तयार केली. ती १४६ फूट लांब, १२ फूट रुंद असून दाबलेल्या हवेच्या इंजिनानें चालविण्यांत येत असे. यानंतर १८७७ मध्यें जेपी हॉलंड यानें व १८८३ मध्यें नॉर्डन फेल्ट यानें स्टॉकहोम येथें नवीन तऱ्हेची पाणवुडी बांधली. यावरूनच सध्यांच्या पाणवुडया निघाल्या. या दोघांनीं १८८७ मध्यें नवीन पाणवुडीचे नमुने अमेरिकन सरकारकडे पाठविले. त्यांपैकीं हॉलंडचा नमुना पसंत करण्यांत आला. या पाणवुडीचा तळ अर्धा इंच जाडीच्या पोलादी पत्र्याचा बनविलेला असतो. यावर एक मध्यभागीं उंच मनोरा बसविलेला असतो. त्याला वरील बाजूस बाहेर उघडणारें ११॥ फूट रुंदीचें एक दार असतें. होडीच्या तळमजल्यांत कांहीं हवा कोंडलेली असते, व होडी जेव्हां समुद्राच्या पृष्ठभागाखालीं जाते तेव्हां ही हवा आंतील खलाशी लोकांस श्वासोच्छ्वासाच्या कामीं उपयोगी पडते. या होडींत बरीच गुंतागुंतीची यांत्रिक रचना असते. त्यांत मुख्यतः पुढील गोष्टी असतात: १ पेट्रोलनें किंवा तेलानें चालणारें इंजिन; २ विजेचें यंत्र; ३ विद्युत्संचययंत्र; ४ हवा दाबण्याचें यंत्र; ५ दाबलेली हवा भरून ठेवण्याच्या बाटल्या; ६ या पाणवुडीला जोडून असलेलीं पक्षनियमन करण्याचीं यंत्रें. या यंत्रांच्या साहाय्यानें ही होडी पाण्याखालीं वाटेल तितक्या खोलीवर समतोल राखतां येते; व ७ युद्धसामुग्री म्हणजे टॉर्पेडो व त्यांच्या नळया.

**पाणवुडे**—खोल पाण्यांतून बुडी मारून खालचे जिन्नस काढणें वगैरे कामें तरबेज पाणवुडे इसमच करतात. परंतु पाश्चात्यांनीं पाणवुडयांस त्यांचें काम दीर्घकाल व त्यांस तकलीफ न होतां करतां यावें म्हणून सुधारलेले पोलादी पोशाख, दाबलेली व सांठविलेली हवा, घंटेची योजना, वगैरे विविध प्रकारचीं साधनें व सोयी निर्माण केल्या आहेत. नवीन तऱ्हेच्या पोशाखांत बाहेर बोटांच्या जागीं चिमटे किंवा आंकडे बसविलेले असतात व ते हालवून माणसें काम करतात. प्रथम असे जड कपडे घातलेलीं माणसें यारीनें उचलून आंत सोडतात; पण खोल पाण्यांत त्यांचें वजन कमी कमी होत जातें व तें सुसह्य होऊन माणसांना आपलें इष्ट तें काम करतां येतें व त्याकरितां जरूर ती हालचाल करतां येते.

पाणवुडा पोशाख— ज्या लोकांना वरचेवर पाण्यांत बुडून काम करावयाचें असतें त्यांच्याकरितां विशिष्ट पोषाख तयार करण्यांत आलेला असतो. हा सर्व रबरी कापडाचा जलाभेद्य असा करण्यांत येतो व तो सर्व शरीर डोक्याशिवाय पूर्णपणें झांकून टाकतो. याच्या गळपट्टीला शिरस्त्राण अडकविण्यांत येतें. शिरस्त्राणामध्यें एक रबरी नळी असून तिला एक पडदा असतो. या नळीमध्यें पृष्ठभागावर ठेवलेल्या एका पंपांतून हवा भरण्यांत येते व ती पडद्यामुळें परत जाऊं शकत नाहीं. पाणवुड्याला

स्वयंपूर्ण पाणवुडी पोपाख

१. साधा पाणवुडी पोपाख.

२. शिरस्त्राण.

३. पुढचें दृश्य (पोपाख घालून).

४. मागचें दृश्य.

पृष्ठभागावर असणाऱ्या आपल्या सहकाऱ्यांबरोबर छातीवर असणाऱ्या एका दोरीच्या साहाय्यानें खुणा करून किंवा टेलेफोनवरून बोलतां येतें. पाणवुडयाच्या पाठीमागच्या बाजूस दाबलेल्या हवेचा सांठा असतो. जेव्हां त्याला वर यावयाचें असतें तेव्हां तो ही हवा आपल्या पोशाखांत भरून तो फुगवतो. अशा तऱ्हेचा पोपाख घालून पाणवुडा २५ फूट पाण्याखालीं दीड तासपर्यंत राहूं शकतो. पाण्याखालीं २०० ते ३०० फूट खोल सुद्धां जाऊं शकतो. परंतु अशा खोल पाण्यांतून वर येतांना फार काळजी घ्यावी लागते.

**पाणवुड्ये पक्षी**—१. (डायव्हर). ही पोहणाऱ्या पक्ष्यांची एक जात आहे. यांची चोंच टोंकदार, लांब, मजबूत, सरळ व दृढ असून यांची शेपटी आंखूड व वाटोळसर असते. यांचे पक्ष आंखूड असून पाय बारीक व घट्ट असतात आणि बोटें सांधलेलीं असतात. ते मासे खाऊन राहतात. यांच्या अनेक जाती असून ते दोन्ही ध्रुवांजवळील समुद्र, हेब्राइड बेटें, नॉर्वे, स्वीडन रशिया, वगैरे देशांच्या आसपास आढळतात.

२. (ग्रीब). हे पेंग्विनसारखे एका जातीचे पक्षी आहेत. यांची चोंच सरळ व निमुळती होत गेलेली असते. यांना शेपटी नसते. यांचें शरीर आंखूड असतें. यांच्या पायाचे तळवे सपाट असतात व पाय शरीराच्या इतके मागील बाजूस असतात कीं, हे जमिनीवर असले म्हणजे हे त्या पायांवर पेंग्विनसारखे सरळ उभे राहूं शकतात. हे सर्वत्र आढळतात. यांस उत्कृष्टपणें पोहतां

व बुडी मारतां येतें. हे लहान मासे, बेडूक व इतर किडे,

पाणबुड्या पक्षी (ग्रीव)

वगैरे खाऊन राहतात. हे आपलीं घरटीं बहुधा लव्हाळ्यांत बांधतात.

**पाणलावा**—हे पक्षी सामान्यतः दलदलीच्या जागीं राहतात. यांची लांबी दहाअकरा इंच असून यांच्या अंगावर सुंदर चित्रविचित्र ठिपके असतात. यांची शिकार करतात.

**पाणसुरुंग**—(माइन). युद्धशास्त्रामध्यें सुरुंगाची भूमि म्हणजे एखादा रस्ता, प्रदेश, किंवा समुद्राचा भाग सुरुंग टाकून शत्रूस रहदारी करण्यास बंद करण्यांत येतो त्या क्षेत्रास म्हणतात.

पाणसुरुंग ('पॅराव्हेन')

१. आंत ओढती तार.
२. व ५. 'जलमार्जार'
३. सुरुंग–खुंटवण.
४. गलबतापासून सुरुंग दूर नेण्याची तार.
६. सुरुंग.

जमिनीवर अशा व्यवस्थेस भूसुरुंग म्हणतात. समुद्रामध्यें पेरण्यांत येणारे सुरुंग बहुधा धक्का लागल्याबरोबर उडावे अशा तऱ्हेनें बनविलेले असतात. हे एका धातूच्या पात्रांत अतिशय स्फोटक असे पदार्थ भरून त्यांस शिंगासारखे सुळके काढून बनविलेले असतात. या सुळक्यांस एखाद्या जहाजाचा जोराचा धक्का बसल्याबरोबर हे सुरुंग उडतात. हे सुरुंग बहुधा एखाद्या प्रदेशांत संख्येनें बरेच व एकत्र टाकण्यांत येतात.

**पाणिनि**—अतिप्राचीन संस्कृत वैयाकरण. हा खिस्तपूर्व दहाव्या शतकांत झाला असावा असें आतां बहुतेक निश्चित झालें आहे. 'प्राकृत' व 'संस्कृत' हे दोन्ही भाषावाचक शब्द पाणिनींत नाहींत. बुद्धाचाहि उल्लेख पाणिनीनें केलेला नाहीं. पाणिनीमध्यें यवन हा शब्द (आयोनिअन ग्रीक) लोकवाचक आहे; लिपिवाचक नाहीं. यवनांची लिपि खि. पू. ९०० नंतर झाली. तेव्हां खि. पू. ९०० च्या पलीकडे केव्हां तरी पाणिनि झाला, एवढें निश्चित होतें.

पाणिनीचा अष्टाध्यायी हा व्याकरणग्रंथ अनेक दृष्टींनीं महत्त्वाचा आहे. याच्या नांवावर आणखी कांहीं ग्रंथ मोडतात.

**पाणी**—पृथ्वीच्या पृष्ठभागाच्या शेंकडा ७२ इतकें क्षेत्रफळ पाण्यानें व्यापिलें आहे. हवेंत बाष्परूपानें पाणी आहेच. पाणी हें मूलद्रव्य नाहीं, हा शोध लाव्हाझिएनें अठराव्या शतकाच्या शेवटीं लावला. यांत दोन भाग उज्जवायु व एक भाग प्राणवायु आहे. शुद्ध पाणी रंगहीन, रुचिहीन व गंधहीन असतें. यांत प्रकाशाचें पुष्कळच वक्रीभवन होतें, पण याच्या द्वारें उष्णतेचें मुळींच वहन होत नाहीं. तथापि गंधकाम्लानें जर हें अम्लयुक्त केलें तर विजेचा प्रवाह यांतून जातो व याचें मूलद्रव्यांत विभजन होतें. ४० शतमान (सेंटि.) उष्णमानावर पाणी गोठतें व त्याला कमालीचें घनत्व येतें. पण उष्णमान आणखी खालीं गेल्यास पाणी प्रसरण पावतें (यामुळेंच पाण्याचे नळ फुटतात). याची वाफ केल्यास तें १७०० पट पसरतें. अनेक पदार्थांशीं याचीं संयुक्तें होतात. (उदा., विरलेला चुना, गंधकाम्ल, इ.). अनेक स्फटिकरूप संयुक्तांत पाणी असतें व तें स्फटिकें तापविल्यानंतर लागलीच बाहेर पडतें. पावसाचें पाणी जमिनींतून किंवा खडकांतून खालीं जाऊन पुन्हां झरे किंवा नद्या यांच्या रूपानें वर येतें. या पाण्यांत क्षार असल्यामुळें तें 'जड' होतें. यांत साबण लवकर विरघळत नाहीं पण चवीला बरें लागतें.

पाणी हें प्राण्यांचें मुख्य जीवन आहे. पंचमहाभूतांपैकीं हें एक आहे. अन्नाप्रमाणेंच पाण्यावांचून प्राणी जगूं शकत नाहीं. वनस्पतींच्या वाढीलाहि पाणी आवश्यक आहे. या पाण्यापासून मोठी शक्ति निर्माण करून तिच्यायोगें यंत्रें चालवितात. विशिष्ट गुरुत्व आणि विशिष्ट उष्णता मापण्याचें प्रमाण पाणीच धरलें आहे.

**पाणी देणें**—पोलाद व पोलादी वस्तू, अवजारें, वगैरे भट्टीमध्यें तापवून व विशिष्ट उष्णतामान लावून त्यांच्या ठिकाणीं विशिष्ट काठिण्यादि गुण आणणें व याकरितां तें तप्त लोखंड यथाप्रमाण पाण्यांत बुडवणें आणि तो विशिष्ट गुण पोलादाच्या ठिकाणीं कायम करणें, या क्रियेस पाणी देणें, असें म्हणतात.

विळे, वस्तरे, चाकू व इतर पोलादी हत्यारें यांची तीक्ष्णता पाणी देण्याच्या विशिष्ट पद्धतीवरच अवलंबून असते.

**पाणीपुरवठा**—( इरिगेशन ). कृत्रिम रीतीनें पाणी पुरवून जमिनीची उत्पादनशक्ति वाढविणें या क्रियेस पाणीपुरवठा म्हणतात. ही पद्धति शेतकीइतकीच जुनी आहे. या पद्धतीचे उल्लेख अत्यंत प्राचीन काळापासून ईजिप्त, हिंदुस्थान व चीन या देशांतील वाङ्मयांत आढळतात. ज्या प्रदेशांत पाऊस फार थोडा पडतो अशा प्रदेशांत कृत्रिम पाणीपुरवठा केला तरच शेतकी करतां येणें शक्य असतें. मेसापोटेमियाचा अफाट प्रदेश आज जो ओसाड पसरला आहे तो एके काळीं पाणीपुरवठा करून सुपीक करण्यांत आला होता व तसा तो पुन्हां करणें शक्य आहे. पाणीपुरवठा करण्याच्या मुख्य दोन पद्धती आहेत : ( १ ) सर्व प्रदेश जलमय करणें, व (२) पाण्याचे खोल पाट सोडणें. पहिल्या पद्धतीनें एखाद्या जमिनीच्या तुकड्यांत वरचेवर कांहीं इंच खोलीचें पाणी सर्वत्र सोडण्यांत येऊन सर्व जमीन पाण्याखालीं आणण्यांत येते. किंवा एकदांच त्या जमिनींत पुष्कळसें पाणी सोडून ती जमीन पाण्यानें भरून तिला हंगामास पुरेल इतका पाणीपुरवठा करण्यांत येतो. दुसऱ्या पद्धतींत कालवे वगैरेंच्या साहाय्यानें वरचेवर अवश्य तेवढें पाणी पुरविण्यांत येतें. या पद्धतीनें सर्व तऱ्हेच्या पिकांस, एवढेंच नव्हे तर रांगेनें लावलेल्या झाडांसहि पाणी पोंचवितां येतें. पाणीपुरवठ्याची पद्धति दक्षिण युरोप, अल्जीरिया, ईजिप्त, हिंदुस्थान, ऑस्ट्रेलिया व अमेरिका यांमध्यें चालू आहे. ( कालवे पाहा. )

**पाण्याचा खजिना**—(रेझरव्हायर). एखाद्या मोठ्या शहरासाठीं पाण्याचा पुरवठा करण्याकरितां एखाद्या मोठ्या नैसर्गिक किंवा कृत्रिम पात्रामध्यें जो पाण्याचा सांठा करण्यांत येतो त्यास पाण्याचा खजिना म्हणतात. अशा तऱ्हेनें पाण्याचा खजिना करण्याची चाल आपल्या प्रांतांतहि पेशवेकालीं वगैरे होती व एक अशा तऱ्हेची 'खजिन्याची विहीर' पुण्यांत परवांपर्यंत होती. हौद हेहि पाण्याचे खजिनेच म्हणतां येतील. असा खजिना मोठ्या प्रमाणावर करण्याकरितां एखादा तलाव बांधण्यांत येतो व त्याच्या कांठावर अवश्य तेथें बंधारा घालण्यांत येतो. अशा तऱ्हेचा बंधारा बांधण्याकरितां प्रथम तळाशीं खडक लागेपर्यंत एक खोल चर खणण्यांत येतो व हा खंदक चिखलानें भरून काढण्यांत येतो व तो चिखल ठोकून घट्ट करण्यांत येतो. यानंतर मध्यें चिखल घातलेला दगडी किंवा सिमेंट कॉंक्रिटचा पाहिजे तितक्या उंचीचा बंधारा वर बांधण्यांत येतो. या बंधाऱ्यांत मधून मधून दारें ठेवण्यांत येतात. त्यांतून पाहिजे तिकडे पाणी नेण्यांत येतें. यांतील कांहीं दारांस तीं आपोआप उघडझांप होतील अशा सोयी करण्यांत येतात. अशीं दारें भाटघर येथील बंधाऱ्यांत आहेत. पुण्याकरितां खडकवासलें येथील तलावांतून पाणी येतें. मुंबई शहरास विहार, तुळशी व तानसा या तीन तलावांतून पाणीपुरवठा होतो. इंदूर शहराकरितां यशवंत सागर तलाव बांधण्यांत आला आहे. त्याचा बंधारा वक्रनलिका-तत्त्वावर रचण्यांत आला आहे.

**पात**—(नोड). खगोलाचीं दोन महावृत्तें (उदा., क्रांतिवृत्त आणि विषुववृत्त किंवा एखाद्या ग्रहाची कक्षा आणि क्रांतिवृत्त) ज्या दोन बिंदूंत एकमेकांना छेदतात त्यांपैकीं प्रत्येक. याचे उच्चपात आणि निम्नपात असे दोन प्रकार खस्थ पदार्थाचा मार्ग उत्तरेकडे किंवा दक्षिणेकडे असल्या वेळीं होतात. यांना राहुपात आणि केतुपात अशीं आपल्या ज्योतिषशास्त्रांतील नांवें आहेत.

**पाताल**—पाताल म्हणजे अधोलोक. भारतीयाच्या कल्पनेप्रमाणें पृथ्वीवर सात स्वर्ग व खालीं सात पाताल आहेत. त्यांचीं नांवें क्रमानें अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल आणि पाताल हीं आहेत. पातालांत असुरांचें राज्य असतें व बलिदैत्यास वामनानें पाताळांत घालविलें, वगैरे कथा पुराणांतून आढळतात. अधोलोक हा मृतांचें निवासस्थान आहे, अशी कल्पना पृथ्वीवरील बहुतेक सर्व लोकांत आढळते. पातालांत मृताचा आत्मा जाण्यापूर्वी तो मृताच्या पुरलेल्या स्थळाजवळ किंवा थडग्यांत कांहीं दिवस राहतो अशी कांहीं लोकांची समजूत असल्यामुळें थडग्यांत कांहीं खाद्यपेयादि वस्तू व इतर पदार्थ अगर दासदासी वगैरेहि पुरण्याची चाल त्या लोकांत आढळते. सूर्य सायंकाळीं मावळतांना खालीं जातो व सकाळीं तो पुन्हा खालून वर येतांना दिसतो, यावरून पाताल लोकांची कल्पना प्रथम प्रादुर्भूत झाली असावी. या लोकांत नेहमीं अंधार असतो अशी कल्पना बाबिलोनी, हिब्रू, मिसरी, ग्रीक, रोमन, वगैरेहि लोकांत असलेली आढळते.

**पातित जल**—( डिस्टिल्ड वॉटर ). पाणी उकळून त्याची वाफ करून तिचें पुन्हां पाणी केलें असतां पातित किंवा ऊर्ध्वपातित जल तयार होतें. त्यांतील खड्ड वगैरे घन द्रव्यें सर्व निघून गेल्यामुळें तें शुद्ध होतें. या पाण्याचा उपयोग केस धुण्याच्या द्रावणामध्यें करण्यांत येतो. तसेंच अंगास लावावयाचीं उटणीं यांच्याकरितांहि या पाण्याचा उपयोग करतात. कारण साधें पाणी वापरलें असतां त्या उटण्याचा गुण कमी होतो. डोळे आले असतां बोरिक पावडर विरघळविण्याकरितां अशा पाण्याचाच उपयोग करावा. मोटारगाडीमध्यें विद्युत्संचायकांतहि याच पाण्याचा उपयोग करण्यांत येतो. फोटोग्राफीमध्यें त्याचा उपयोग करणें फार महत्त्वाचें असून कांचप्रतिमा धुण्याकरितां हेंच पाणी वापरणें आवश्यक आहे. कारण साध्या पाण्यांत कांहीं लवणें असतात तीं फोटोग्राफींतील

रसायनांशीं संयुक्त होऊन कांहीं घनपदार्थ तयार होतात व त्यामुळें ऋणप्रतिमा चिघडतात. विलायती औषधांत जें पाणी मिसळतात तें पातित जल असावें लागतें.

**पातूर**—वऱ्हाड, अकोला जिल्हा, बाळापूर तालुका. हें गांव निर्गुणा नदीच्या कांठीं आहे. लोकसंख्या ६,०००. येथें बारी लोकांची वस्ती विशेष आहे. जवळच कोरींव लेणीं आहेत. त्यांत एक शिलालेख आहे. या गांवीं एक प्रसिद्ध पीराचें स्थान आहे.

**पात्रपर्ण**—[ नेपेंथस अँपुलारिया. इं. पिचर-प्लँट. सं. घट-कलश पर्ण ]. मांसाहारी वनस्पतींपैकीं कांहीं वनस्पती अशा असतात कीं, त्यांचीं पानें भांड्यासारखीं असतात. हीं चीनमध्यें व पूर्वेकडील बेटांत आढळतात. हें झाड बहुवर्षायु असून वानस्पतिक आहे. याच्या पानाच्या भांड्यांत किडे पकडले जातात. या भांड्यास झांकणहि असतें.

**पाथरवट**—दगडी काम करणारी एक जात. हे आपणांस रजपूत-वंशज म्हणतात. त्यांच्यांत मराठा, कामाठी व तेलंग असे तीन वर्ग सध्यां पडले आहेत. यांच्यांत रोटीबेटीव्यवहार होत नाहीं. भाषा मराठी, राहणी स्वच्छ व मराठा-कुणब्यासारखी. जातीची पंचायत असते. यांचा कुलोपाध्याय बहुधा यजुर्वेदी ब्राह्मण असतो. यांचें दैवत खंडोबा. यांच्या लग्नांत नवरा-नवरी बांबूच्या पेटाऱ्यांत उभीं राहतात. हे लोक पाटे-वरवंटे, जातीं, देवमूर्ती, वगैरे दगडी कामें चांगलीं करतात. दक्षिणेंत पांचाल ( ब्राह्मण ) जातींत पाथरवट धरतात.

**पाथरी**—ज्वारीच्या शेतांत उगवणारी एक तृण भाजी. संस्कृतांत गोजिह्वा नांव आहे. हिला जमिनीलगत ५-६ पानें येतात व फिक्कट पिंवळीं मखमलीसारखीं एकेरी लहान फुलें असतात. हिची भाजी खातात. ही औषधीहि आहे. पाथरीच्या बियांस उत्तरेकडे गोजवान म्हणतात. गुरांस पाथरी खाऊं घातल्यास दूध जास्त देतात. पाथरीचा रस ( मुळीचा ) सर्पदंश व इतर विषबाधा यांवर इलाज आहे.

**पाथरी**—हैदराबाद, परभणी जिल्हा, एक तालुका व गांव. क्षे. फ. ६०० चौ. मै. व लोकसंख्या १। लाख. खेडीं १६७. मोठीं गांवें २ : एक पाथरी व दुसरें मानवत. निजामशाहीचा मूळपुरुष पाथरीचा होता. पाथरी गांव पूर्वीचें पार्थपूर. पाथरी गांवची वस्ती सुमारें ६ हजार.

**पादतलचारी**—( प्लँटिग्राडा ). मांसाहारी प्राणिवर्गामध्यें अस्वलासारखे जे प्राणी आपल्या पायाचा पूर्ण अथवा बहुतेक तळवा जमिनीवर टेकून चालतात त्या प्राण्यांस ही संज्ञा देण्यांत येते. या वर्गांतील प्राणी पूर्ण मांसाहारी नव्हेत, तर ते झाडाचीं मुळें, मध आणि फळें यांचाहि बराच आहार घेतात.

**पादत्राणें**—मनुष्य तळपायावर कांटेकुटे, उष्णता, पाणी, इ. पासून रक्षण करण्यासाठीं जें आवरण घालतो त्यास पादत्राण म्हणतात. अंगाच्छादनाप्रमाणेंच अत्यंत प्राचीन कालापासून यांचा उपयोग मनुष्यप्राणी करीत आला आहे. पादत्राणांचा उल्लेख बायबलमध्यें आढळतो. तसाच इतर ऐतिहासिक कागदपत्रांतहि आढळतो. यहुदी लोक लांकूड, लव्हाळे, कापड किंवा चामडें यांचे जोडे वापरीत. पायथॅगोरसनें आपल्या अनुयायांस झाडांच्या सालींचे जोडे करून घालावयास सांगितलें आहे. ग्रीक लोक बहुधा चपला वापरीत. रोमन लोक प्रथम उंची जोडे वापरूं लागले, व ते आपल्या जोड्यांस हस्तिदंत किंवा मौल्यवान खडे बसवूं लागले. पंधराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास अनेक चित्रविचित्र प्रकारचे जोडे प्रचारांत येऊं लागले. त्यांपैकीं कांहीं इतके विचित्र व लांब असत कीं, त्यांचीं टोंकें वाटेंत अडथळा येऊं नये म्हणून ढोंपराला बांधून ठेवावीं लागत व याकरितां श्रीमंत लोक चांदीच्या सांखळ्या वापरीत. १७३२ सालापासून सध्यां प्रचलित असलेल्या जोड्यांसारखे जोडे प्रचारांत आले. १६६८ मध्यें जोड्यावर एक भूषण म्हणून बकल बसवूं लागले. हें बकल १९ व्या शतकापर्यंत विशेष प्रचारांत आलेलें दिसतें. या कालापर्यंत डावे-उजवे जोडे वेगळ्या आकाराचे करीत नसत.

वेदांत पादत्राणांच्या अर्थी संज्ञा आहेत. प्राचीन ईजिप्शियन चपला आजच्यासारख्याच होत्या. प्रथम वेत व नंतर लांकडी फळ्या पादत्राणासाठीं वापरीत. लांकडांत पोकळी करून पाय घालण्याची तऱ्हा अद्यापि फ्रान्स, हॉलंड, वगैरे देशांत पाहावयास मिळते. मद्रास, काशी, वगैरे भागांतून लांकडी फळ्यांवर चामडें किंवा कापड मढवून केलेल्या खडावा आजहि दिसतात. पूर्वी तशाच होत्या. जनावरांचीं कातडीं वापरण्यांत आलीं तेव्हांपासून पादत्राणांत विविधता आली व कपड्याप्रमाणें आकार, शिलाई, इ. बाबतींत सौंदर्यदृष्टि वाढली. कांहीं विशिष्ट उद्योगधंद्यांना विशिष्ट प्रकारचींच पादत्राणें लागतात. उदा., लष्करी कामाला सबंध बूट, घोडेस्वाराचे बूट, सोंवळ्यासाठीं खडावा, इ.. आपल्याकडे चढाव, वाहाणा व जोडे हे प्रकार आढळतात. जोड्यांमध्येंहि पुणेरी, नगरी, वांईचे, आगरकरी, गादीचे, इत्यादि जाती आहेत. पुणेरी जोडा ऐतिहासिक व अलंकारिक अर्थानें महत्त्व पावला आहे.

**पानउवा**—१. ( फिलोक्सेरा ). या उवा झाडांच्या पानांवर राहतात. विशेषतः ओक झाडाच्या पानांवर या आढळतात. यांसारख्याच दुसऱ्या एका जातीच्या उवा द्राक्षीच्या पानांवर पडतात व द्राक्षाच्या मळ्यांचें फार नुकसान करतात. यांचेहि दोन प्रकार आहेत : एका प्रकारचे किडे ओक वृक्षावर जी लाख

येते तींत राहतात व दुसरे मुळांत राहतात. सामान्यतः द्राक्षे होणाऱ्या सर्व देशांतून हे किडे आढळतात. असे किडे पडले म्हणजे पुढच्या वर्षी द्राक्षांचे वेल कमजोर होतात व तिसऱ्या वर्षी मरून जातात. अमेरिकन द्राक्षांच्या वेलांवर युरोपियन वेलांचीं कलमें केल्यास यांचा उपद्रव होत नाहीं, असें आढळून आलें आहे.

२. (अँफिस). हे एका जातीचे कीटक असून ते झाडांच्या पानांवर होतात. यांच्या अनेक जाती आहेत व त्या फार विध्वंसक आहेत. उदाहरणार्थ, गुलाब, घेवडा, तृणधान्यें, वगैरेंवर निरनिराळ्या प्रकारच्या उवा आढळतात. सफरचंदाच्या पानांवर पडणाऱ्या उवा लोंकरीसारख्या दिसतात.

**पानपत**—पंजाबच्या कर्नाळा जिल्ह्यांतील एक तालुका. क्षेत्रफळ ४६० चौरस मैल. लोकसंख्या सु. दोन लक्ष. खेडीं १७३; व पानपत गांव तालुक्याचें ठिकाण. हा तालुका यमुना नदीच्या पश्चिम अंगास आहे. उंच भागांत यमुनेच्या पश्चिम कालव्याचें पाणी खेळवलें आहे. सर्व प्रदेश भरभराटीचा आहे.

पानपत गांव—लोकसंख्या सु. तीस हजार. हा अत्यंत जुना पुराणप्रसिद्ध ऐतिहासिक गांव असून पांडवांतील धर्मानें मागितलेल्या पांच गांवांतला एक आहे. अर्वाचीन काळीं येथें तीन मोठ्या लढाया झाल्या व त्या सर्व परकीय मुसलमानांनीं जिंकल्या. पहिली बाबर व इब्राहिम लोदी यांमधील (१५२६), दुसरी अकबर व सुरवंशीय राजा मोहंमद याचा दिवाण हिमू यांमधील (१५५६) व तिसरी मराठे व अब्दाली यांमधील (१७६१) होय. १७६१ च्या सुप्रसिद्ध लढाईनें मराठी राज्याच्या ऱ्हासाला आरंभ झाला. १८६७ सालीं येथें म्युनिसिपल कमेटी स्थापन झाली. येथें भांडीं होतात. भांड्यांत चांदीचा मुलामा देण्याचें काम उत्तम होतें.

**पानपतचें युद्ध**—उत्तर हिंदुस्थानांतील तीन मोठ्या लढायांची पानपत ही समरभूमि आहे. पानपतची तिसरी मोठी लढाई इ. स. १७६१ मध्यें अहमदशहा अब्दाली व मराठे यांच्यामध्यें झाली. अब्दाली व मराठे यांमध्यें वांकडें येण्यास अनेक कारणें झालीं. सन १७५० मध्यें राघोबादादानें गाजीउद्दीनाच्या सांगण्यावरून अब्दालीनें दिल्लीच्या बादशाहीच्या सेनापतिपदावर नेमलेला नजीबखान यास पदच्युत केलें. तसेंच गाजीच्या सांगण्यावरूनच राघोबानें सरहिंद येथें असलेल्या अब्दालीच्या सुभेदारास हांकलून लावलें व दुराण्यांच्या पाशांतून पंजाब सोडवला (सन १७५८). यानंतर सन १७५९ मध्यें दत्ताजी शिंद्यानें रोहिलखंडांत नजीबखानावर स्वारी केली. अशा रीतीनें मराठे वरचढ होऊं लागले व त्यांचें वर्चस्व दिल्ली दरबारांत अतिशय वाढलें. तें इतकें कीं, दिल्लीची मुसलमानी पादशाही येथून पुढें कितपत टिकेल याची मुसलमानांना धास्ती पडली आणि यांतच पानपतच्या युद्धाचा उगम आहे.

अहमदशहा अब्दालीस हा मराठ्यांचा वरचढपणा मानवण्याजोगा नव्हता; कारण, त्याला स्वतःलाच साम्राज्याची हांव होती. दत्ताजी शिंद्यानें नजीबखानावर स्वारी केल्यामुळें आपला हेतु साधण्यास अब्दालीस एक चांगलीच संधि मिळाली. नजीबखानाच्या बोलावण्यावरून त्याच्या मदतीसाठीं तो तावडतोब अटक ओलांडून हिंदुस्थानांत आला. या बातमीमुळें दत्ताजी शिंद्यानें नजीबाचें तहाचें बोलणें मान्य केलें. याच वेळीं गाजीउद्दीनानें अलमगीराला त्यानें अब्दलीशीं गुप्त पत्रव्यवहार केल्याचें उघडकीस आल्यावर ठार केलें व शहाअलमला दिल्लीच्या तख्तावर बसविलें. इकडे अब्दालीनें लाहोर घेतलें व यमुनेच्या कांठीं असलेल्या दत्ताजीच्या सैन्याचा बंदोबस्त करून तो दिल्लीजवळ आला. दिल्लीजवळ त्याची दत्ताजीच्या सैन्याशीं चकमक होऊन त्यांत दत्ताजी मारला गेला (दत्ताजी शिंदे पाहा). यानंतर मल्हारराव होळकरानें जरी अब्दालीची रसद लुटून त्यास त्रास देण्याचा प्रयत्न केला तरी तो फार उशीरां झाल्यानें त्यास त्यांत यश आलें नाहीं. शिंदे–होळकरांच्या पराभवाची बातमी कळतांच पेशव्यानें भाऊसाहेबास अब्दालीवर पाठवलें; त्याच्या मदतीस विश्वासराव, मेहेंदळे, समशेरबहादूर, विंचुरकर, वगैरेंसारखे शूर सेनापतिहि होते. याशिवाय चंबळा ओलांडण्यापूर्वींच होळकर, शिंदे, गायकवाड, पवार, बुंदेले, वगैरे सरदारहि त्यास येऊन मिळाले. रजपूत राजांची मदत मात्र या युद्धांत मिळाली नाहीं. कारण नुकताच दोन वर्षांपूर्वी राघोबानें व जयाप्पा शिंद्यानें त्यांचा पराभव केला असल्यामुळें ते मराठ्यांवर नाराज होते. मल्हाररावामुळें सुरजमल जाटानें मराठ्यांना साहाय्य झालें. गनिमी काव्यानें लढून अब्दालीस हैराण करावें असें त्याचें म्हणणें, तर अब्दालीशीं समोरासमोर लढत द्यावी असें इब्राहिमखान गारद्याचें म्हणणें. या दोघांत ऐकावें कोणाचें हा भाऊसाहेबापुढें प्रश्न पडला. शेवटीं इब्राहिमखानानें उदगीर येथें तोफखाना व कवायती पलटणी यांच्या साहाय्यानें मिळवून दिलेला विजय ध्यानांत घेऊन त्यानें खानाच्या म्हणण्यास मान्यता दिली व दिल्लीच्या किल्ल्यावर तोफखाना चालवून किल्ला हस्तगत केला. यानंतर पुढें पावसाळ्यांत भाऊसाहेबानें दिल्लीसच आपली छावणी नेली. याच वेळीं रसद व पैसा यांच्या अभावीं त्यानें दिल्लीच्या बादशाही दरबारच्या दिवाणखान्याचें छत काढून त्याचें नाणें पाडलें. त्यामुळें रागावून सुरजमल मराठ्यांना सोडून निघून गेला. या वेळीं अब्दाली हा गंगाकांठीं अनूपशहर येथें होता. नजिबाच्या साहाय्यानें त्यानें सुजा उद्दौला यास आपल्या पक्षाकडे वळवलें. त्याला तटस्थ

ठेवण्याचा, किंवा फोडण्याचा भाऊसाहेबानें केलेला प्रयत्न व्यर्थ गेला. शहाअलमच्या दिल्लींतील गैरहजेरींत भाऊसाहेबानें जवानबख्त यास दिल्लीचा पातशहा करून सुजा उदौल्यास वझीरपद देऊं केलें तरीहि सुजानें ऐकलें नाहीं. मराठ्यांनीं पूर्वी आपल्या बापाच्या विरुद्ध केलेली कारवाई सुजा अद्यापि विसरला नव्हता व त्यामुळें मराठ्यांना तो दाद देईना. त्यानंतर भाऊसाहेबानें नारो शंकरला दिल्लीस ठेवून कुंजपुरा आपल्या ताब्यांत घेतला. तेव्हां अब्दालीनें भाऊसाहेबाकडे तहाच्या बोलण्याचें आमिष दाखवून अनूपशहराहून निघून ऑक्टोबरमध्यें यमुना ओलांडली. तेव्हां भाऊसाहेबानें पानपत येथे छावणी ठेवून तिच्याभोंवतीं खंदक खोदला, तर अब्दालीनेंहि मराठ्यांच्यासमोरच पानपत ते दिल्ली रस्त्यांच्यामध्यें मोर्चे रोखून दिल्लीची वाट अडवली. त्याचें सैन्य सुमारें एक लाख तीस हजार इतकें होतें. शिवाय तोफखाना होता तो निराळाच. मराठ्यांचें मात्र त्या मानानें त्याच्या निम्में म्हणजे सुमारें सत्तर हजार एवढेंच सैन्य होतें.

अशा रीतीनें दोन्ही पक्षांचीं सैन्यें जरी लढाईच्या तयारीनें होतीं तरी प्रत्यक्ष लढाई अशी सुरू झाली नव्हती. मात्र मध्यंतरीं गोविंदपंत बुंदेले हा सरदार अब्दालीची रसद लुटीत असे. त्यास अब्दालीच्या एका सरदारानें त्याच्या गैरसावधपणाचा फायदा घेऊन ठार मारलें. याच वेळीं दिल्लीहून खजिना व रसद घेऊन येणारी मराठ्यांची टोळी चुकून अब्दालीच्याच छावणींत गेली व त्यामुळें त्याचा फायदा झाला. पण याच कारणानें मराठ्यांना अन्नाची टंचाई भासूं लागली. सुजा व नजीब यांनीं या वेळीं मराठ्यांवर एकदम हल्ला करण्याचा सल्ला अब्दालीस दिला. परंतु मराठे अन्नटंचाईनें अगदीं त्रस्त झाल्यावरच त्यांचा नक्षा उतरावयाचा असा जणुं अब्दालीनें निर्धारच केला होता. शेवटीं त्याच्या मनाप्रमाणेंच घडलें. अन्नटंचाईस कंटाळून नाइलाजानें ता. १४ जानेवारी, १७६१ रोजीं भाऊसाहेबानें अब्दालीवर चाल केली. मल्हारराव सोडला तर मराठ्यांची सर्व फौज या दिवशीं अतिशय शौर्यानें लढली. विशेषतः भाऊसाहेब, विश्वासराव, पवार, समशेरबहाद्दर यांचें शौर्य वाखाणण्याजोगें होतें. सायंकाळपर्यंत विजय मराठ्यांचाच होता. परंतु सायंकाळीं विश्वासराव गोळी लागून ठार झाला. तेव्हां मल्हारजीवर बायकामुलांना परत नेण्याची कामगिरी सोंपवून भाऊसाहेब हत्तीवरून उतरून घोड्यावर चढला व जो एकदां त्या गर्दींत शिरला तो दिसेनासाच झाला. आपले दोन्हीहि नेते न दिसल्यामुळें मराठ्यांच्या फौजेनें कच खाल्ली व तिनें माघार घेतली. होळकर, गायकवाड, विंचुरकर, राजेबहाद्दर हे सरदार पळून गेले. यशवंतराव पवार व भाऊसाहेब यांना रणांगणांत मरण आलें. जनकोजी शिंदे, समशेरबहाद्दर व इब्राहिमखान हे जखमी स्थितींत शत्रूच्या हातीं सांपडले व नंतर त्यांचा खून झाला. शेवटीं मराठ्यांची एकचतुर्थांश फौज दक्षिणेंत परत आली. भाऊसाहेबाच्या बोलावण्यावरून नानासाहेब पेशवा हा फौजेसह त्याच्या मदतीस येत असतां वाटेंतच मराठ्यांच्या पराभवाची वार्ता त्यास समजली. या बातमीनें त्याला अतिशय दुःख झालें व पुण्यास आल्यावर थोड्याच दिवसांत तो मरण पावला. अब्दालीनें शहाअलम यास दिल्लीच्या गादीवर बसवलें व सुजास त्याचा वझीर व नजीबखानास त्याचा सेनापति नेमून तो आपल्या देशास निघून गेला. त्यालाहि जरी या मोहिमेंत यश आलें, तरी बरेंचसें नुकसान सोसावें लागलें व याचाच परिणाम म्हणजे त्याजपासून यानंतर हिंदुस्थानला फारसा उपद्रव झाला नाहीं.

हें पानपतचें तिसरें युद्ध पहिल्या दोन युद्धांप्रमाणेंच क्रांतिकारक ठरलें. यामुळें मराठ्यांचें साम्राज्य कांहीं काळ खालावल्यासारखें झालें व त्याला सांवरण्यास दहाबारा वर्षे लागलीं. या युद्धाचीं कारणें आणि परिणाम यांसंबंधीं इतिहासकारांनीं भिन्न भिन्न विवेचनें दिलीं आहेत.

**पानसे घराणें**—पेशवाईमध्यें हें घराणें पुढें आलें. मूळपुरुष यशवंतराव पानसे हा ३०० स्वारांनिशीं शाहूच्या नोकरीस राहिला. त्याला पुढें शाहूनें पेशव्यांच्या मदतीस दिलें. सावनूरकर नबाबावरील स्वारींत तो शौर्यानें पुढें आला. त्याच्यानंतर त्याचा मुलगा भिवराव यानें तळेगांवच्या लढाईंत कॅप्टन स्टुअर्ट यास मारलें. भिवरावाचा भाऊ जयवंतराव यानें गोहदच्या स्वारींत पराक्रम गाजवला. या तिघांनीं व पुढें त्यांच्या वंशांतल्या लोकांनीं पेशव्यांकडून सरंजाम, इनामें, वगैरे मिळवलीं. पण कंपनीच्या राज्यांत क्रमानें तीं सर्व कमी करण्यांत आलीं. सांप्रत सोनोरी व पुणें येथें यांचे वंशज आहेत.

**पाप**—पापाची कल्पना सर्व धर्मांतून आहे. परमेश्वराला आवडणार नाहीं असें किंवा धर्मशास्त्राविरुद्ध कांहीं कृत्य केल्यास तें पाप होतें. पापाची कल्पना जशी नैतिक आहे तशी धार्मिक आहे. परमेश्वराच्या आज्ञेचें हेतुपुरस्सर उल्लंघन केलें असतां पातक घडतें, अशी ख्रिस्ती कल्पना आहे. यामध्यें इतर व्यक्तींच्या असाधारण प्रेमाकरितां परमेश्वरापासून दूर जाण्याची प्रवृत्ति दिसून येते. जेव्हां एखादी व्यक्ति एखाद्या महत्त्वाच्या बाबतींत हेतुपुरस्सर व जाणूनबुजून परमेश्वराच्या नियमांचा भंग करते तेव्हां त्या पातकास मृत्युसम किंवा अक्षम्य पातक समजण्यांत येतें. अशा पातकामुळें मनुष्य परमेश्वराचा शत्रु होतो. जेव्हां तें इतक्या तीव्र स्वरूपाचें नसतें, किंवा त्या पातकाबद्दलचें ज्ञान नसतें किंवा समजूनउमजून केलेलें नसतें, तेव्हां त्याला क्षम्य मानण्यांत येतें. ज्या व्यक्तीस पातकाबद्दल पश्चात्ताप होतो त्या

व्यक्तीस त्या पातकाबद्दल क्षमा करण्यास परमेश्वर तत्पर असतो. (पापक्षालन पाहा.)

**पापनाशम्**—मद्रास इलाखा, तिनेवेल्ली जिल्हा, अम्बासमुद्र गांवापासून ६ मैलांवरचें शंकराचें देऊळ. येथें ताम्रपर्णीचा पवित्र धबधबा आहे. हजारों यात्रेकरू या क्षेत्रांत दर्शन-स्नानाकरितां येतात.

**पापक्षालन**—येशू ख्रिस्ताचें जीवन, मरण आणि पुनरुत्थान यांमार्फत पातकावर विजय आणि दैवी कृपायुक्त अशा मानवी जीवनाची पुनःप्राप्ति यास ख्रिस्ती धर्मांत पापक्षालन असें म्हणतात. पातक म्हणजे परमेश्वराचा आज्ञाभंग होय व त्यामुळें मनुष्याचा परमेश्वरापासून वियोग होतो. मृत्यु, दुःख, यातना हीं सर्व पातकाचे शिक्षारूपी परिणाम आहेत. पातक म्हणजे ज्या अर्थी परमेश्वराचा आज्ञाभंग होय, त्या अर्थी परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें पश्चात्तापयुक्त अन्तःकरणानें पुन्हां वर्तन केल्यानेंच पापक्षालन होऊं शकेल. येशू ख्रिस्तानें सर्व मानवजातीचें पापक्षालन केलें आणि परमेश्वराच्या आज्ञेस अनुसरून मृत्यूचा स्वीकार करून मानवजातीचें परमेश्वराशीं पुन्हां ऐक्य घडवून आणलें. येशू ख्रिस्त हा सर्व मानवजातीचा प्रतिनिधि असल्यामुळें त्यानें सर्व मानवजातीकरितां मृत्यु पत्करला आणि सर्वांस दैवी जीवन प्राप्त करून दिलें. परंतु या दैवी जीवनांत प्रत्यक्ष भाग घेण्याकरितां त्याचे अनुयायी होऊन पित्याची आज्ञा पाळण्याचें कर्तव्य केलें पाहिजे आणि त्याशीं ऐक्य पावलें पाहिजे. ज्यांचें त्याच्याशीं ऐक्य झालें आहे त्यांस त्याच्यापासून जीवनतत्त्व प्राप्त होतें व ते त्याच्या गूढ तनूशीं एकरूप होतात. इतर धर्मांत पापक्षालनार्थ प्रायश्चित्तें असतात. पण ख्रिस्ती धर्मांत पापोच्चार करणें हेंहि एक प्रायश्चित्तच आहे. म्हणून धर्माचार्याजवळ पापांची कबुली देण्याचा ख्रिस्ती लोकांत एक विधि असतो. (पापोच्चार पाहा.)

**पॉंपी**—नेपल्सच्या आखाताजवळ व्हेसुव्हियस पर्वताच्या पायथ्याशीं वसलेलें व इसवी सनाच्या आरंभीं वैभवशाली असलेलें शहर. पुढें तें ज्वालामुखीच्या तडाख्यांत सांपडून नाहींसें झालें, व त्याची आठवणहि राहिली नाहीं. पण अठराव्या शतकाच्या मध्यापासून या मृत शहराचें उत्खनन करून पुन्हां तें वर काढण्यांत आलें. ग्रीक व रोमन शिल्पपद्धतीनें बांधलेलीं येथील देवतांचीं देवालयें प्रेक्षणीय आहेत. नेपल्स येथील वस्तुसंग्रहालयांत याचे अवशेष ठेवलेले आहेत. हें सघन रोमन लोकांचें ऐषआरामानें राहावयाचें ठिकाण होतें. त्या वेळीं याची लो. सं. तीस हजारांवर होती.

**पापीरस**—[वर्ग-सायपरासी-पापीरस ॲंटिकोरम अथवा सायपेरस पापीरस]. हें आफ्रिकेंतील एक पाण्यांत होणारें झाड आहे. याचा मुळासारखा देंठ जाड, घट्ट व सरपटत जाणारा असतो. जमिनीवर येणारा देंठ कांहीं इंच जाडीचा असून ८ ते १५ फूट उंच वाढतो. याच्या शेवटीं एक पानांची छत्रीसारखी रचना असते. या छत्रीच्या शेवटास कांहीं विशेष दृष्टीस न पडणारे फुलांचे तुरे असतात. सध्यां हें ईजिप्तमध्यें फारसें आढळत नाहीं, पण तें आफ्रिकेच्या भूमध्यरेषेवरील भागात बरेंच आढळतें. याचा अलीकडे गलबतांचीं शिडें, दोर, वस्त्रें व होड्या करण्याकरितां उपयोग करण्यांत येतो.

पापीरस झाड

प्राचीन काळीं ईजिप्तमधल्या नाइल नदीच्या दुआबांत याची फार लागवड होत असे. त्याच्यापासून चटया, दोऱ्या, कापड व विशेषतः लिहिण्याचा कागद, वगैरे वस्तू तयार करीत. बुंध्याचा उपयोग बोटी करण्यांत होई. याचा कागद लिहिण्याकरितां वापरीत. ख्रि. पू. ३५८० सालची हकीगत लिहिलेला एक पापीरस कागद उपलब्ध आहे. मध्ययुगापर्यंत हाच कागद लॅटिन व अरबी लेखक यांनीं वापरलेला आढळतो.

**पापुअन लोक**—ऑस्ट्रेलियाच्या उत्तरेस पॅसिफिक महासागरांतील पापुआ, न्यू गिनी, वगैरे बेटांतील रानटी लोक. हे पूर्वी अश्मकालांतील दगडी हत्यारें वापरीत. आज हे होड्या व जहाजें उत्तम बांधतात. अनेक मोठमोठीं कुटुंबें करून राहतात. त्यांसाठीं फारच मोठीं व लांब (६०–७० ते ५१७ शें फूट) घरें बांधतात व त्यांत अनेक कुटुंबें राहतात. हे लोक अनेक भाषा बोलतात. (न्यू गिनी पाहा.)

**पापुआ**—ब्रिटिश न्यू गिनी. ऑस्ट्रेलियाच्या उत्तरेस असलेल्या न्यू गिनीचा बहुतेक दक्षिण भाग यानें व्यापिला आहे. लो. सं. सु. ३½ लक्ष. यांत युरोपियन दोन हजार देखील नाहींत. बाकीचे पापुअन आहेत. क्षे. फ. ९०,५४० चौ. मैल. येथून सोनें, रबर, खोबरें व नारळ हा माल निर्यात होतो. १८८३ त ग्रेट ब्रिटननें हा प्रदेश मिळविला. १९०६ पर्यंत क्वीन्सलंडच्या अधिकाराखालीं होता. १९०६ सालीं याचा ऑस्ट्रेलियन संघराज्यांत समावेश करण्यात आला. मोरेस्बी हें बंदर प्रमुख शहर आहे व येथून सर्व राज्यकारभार चालतो.

**पॅंपे** ( खि. पू. १०६–४८ )—एक रोमन सेनापति व राज्यशासक त्रयींपैकीं एक. मारिअस आणि सुल्ला यांच्या भांडणांत पॅंपेनें सुल्लाची बाजू घेऊन आफ्रिकेंतील सुल्लानें गमावलेला मुलूख परत मिळविला. कायदेशीर वय झालें नसतांनाहि त्याला क्रेससससमवेत कॉन्सल निवडण्यांत आलें ( खि. पू. ७१ ). त्यानें यानंतर अनेक पराक्रम गाजविले; ज्यूंना नामोहरम करून जेरुसलेम घेतलें. पॅंपे, सीझर आणि क्रेसस हे पहिले राज्यकर्तृक त्रिकूट होय. सीझर गॉल देशांत गेला हें पाहून पॅंपेनें सेनेटला पळवून सीझरला राष्ट्राचा शत्रु ठरविलें. पण सीझरनें तावडतोब येऊन रक्तपाताशिवाय इटलीचा कबजा घेतला; तेव्हां पॅंपे ग्रीसला व तेथून ईजिप्तला पळून गेला, पण तेथें त्याला त्याच्या एका पूर्वींच्या शिपायानें ठार केलें.

**पापोच्चार**—हा एक खिस्ती संस्कार आहे. यामध्यें जो मनुष्य एखाद्या पातकाबद्दल पश्चात्ताप व्यक्त करतो व त्या पातकाचा अन्तःकरणपूर्वक उच्चार करतो त्याला त्या पातकाबद्दल किंवा बाप्तिस्मा घेतल्यापासून एकंदर केलेल्या पातकांबद्दल किंवा पूर्वपातकोच्चारानंतर केलेल्या पातकांबद्दल धर्मोपदेशकाकडून येशू खिस्ताच्या सामर्थ्यानें क्षमा करण्यांत येते. त्या वेळीं धर्मोपदेशक पुढें दिल्याप्रमाणें शब्द उच्चारतो : 'मी तुला तुझ्या पातकांबद्दल पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा यांच्या नांवांनीं क्षमा करतों.' ही पातकाची क्षमा करण्याचा अधिकार येशू खिस्तामार्फत प्रेषित व त्यांच्यामागून येणारे धर्मोपदेशक यांस देण्यांत आलेला होता. 'जेव्हां तुम्ही मानवांना त्यांच्या पापांची क्षमा कराल, तेव्हां त्यास क्षमा होईल. जेव्हां तुम्ही त्यांस बंधनांत ठेवाल तेव्हां ते बंधनांत राहतील' ( जो. २०·२३ ). यामध्यें केवळ परमेश्वरानें पातकांबद्दल क्षमा केली आहे. एवढेंच ध्वनित होतें असें नव्हे तर धर्मोपदेशक हा या बाबतींत आपला औपचारिक निर्णय जाहीर करतो व त्याप्रमाणें तो पातकी मनुष्याच्या पश्चात्तापयुक्त वृत्तीप्रमाणें त्यास पातकापासून मुक्त करतो किंवा मुक्त करण्याचें नाकारतो. हा पातकांस क्षमा करण्याचा अधिकार ज्यास बिशपकडून प्राप्त होतो त्यासच असतो. पातकांची क्षमा होण्याकरितां पुढील गोष्टींची आवश्यकता असते : १ पातकी मनुष्यास आपल्या पातकाबद्दल अन्तःकरणपूर्वक दुःख होत आहे; २ त्यानें असें पातक पुन्हां न करण्याचा निश्चय केला आहे व तसें पातक घडून येण्याचे प्रसंग टाळण्याचा निश्चय केला आहे; ३ तो आपल्या पातकाचा शक्य तितक्या पूर्णतेनें उच्चार करीत आहे. पातकोच्चारामध्यें बाप्तिस्मा घेतल्यापासून अथवा पूर्वपातकोच्चारानंतर केलेल्या सर्व आध्यात्मिक जीवनाचा नाश करणाऱ्या पातकांचा उच्चार होणें अवश्य असतें. परंतु बरेचसे कॅथॉलिक लोक सर्व क्षम्य पातकांचा उच्चार करतात; ४ प्रायश्चित्त ( पातकनिराकरण )—धर्मोपदेशकानें सांगितल्याप्रमाणें विशेष प्रार्थना म्हणणें किंवा कांहीं विशेष सत्कृत्यें करणें.

मूळ खिस्ती धर्मांतील पापोच्चार हें एक विशेष तत्त्व असून अलीकडे खिस्ती धर्मांतील कांहीं पंथ मात्र हें तत्त्व मानतात. या पापोच्चाराचे दोन प्रकार असत : १ असा पापोच्चार खिस्ती धर्मपरिषदेंत किंवा आपल्या धर्मबांधवांच्या सभेंत जाहीर रीतीनें करणें. २ असा पापोच्चार खाजगी रीतीनें आपल्या धर्माधिकाऱ्या (प्रीस्ट) जवळ करून त्याच्यामार्फत त्या पापापासून मुक्तता मिळविणें. इ. स. ४५० मध्यें पोप लिओ दि ग्रेट यानें पहिली जाहीर पापोच्चाराची पद्धति बंद केली, आणि दुसरी प्रीस्टजवळ गुप्तपणें पापोच्चार करण्याची पद्धति चालू केली. इ. स. १२१५ मध्यें चौथ्या जनरल लॅटरेन कौन्सिलनें अशी धर्माज्ञा काढली कीं, प्रत्येक खिस्ती स्त्रीपुरुषानें प्रौढ वयांत आपल्या पॅस्टर (खिस्ती पालक) याजवळ तिदान दरसाल एकदां आपल्या सर्व पापांची कबुली गुप्तपणें द्यावी.

हिंदु धर्मांत माणूस स्वतःशींच पापोच्चार करून परमेश्वराजवळ क्षमा मागतो ( पापोऽहं पापकर्माऽहं पापात्मा पापसंभवः। त्राहि माम्...). परमेश्वराजवळ पापाची कबुली देण्याची पद्धतिच बहुतेक धर्मांतून आढळेल. हिंदुधर्मांतहि प्रायश्चित्तें घेतांना पापाची कबुली द्यावी लागतेच.

**पॉप्लिन**—एक प्रकारचें पोशाखाचें कापड. यांतील उभें सूत ( ताणा ) रेशमाचें असून आडवें सूत ( बाणा ) लोंकरीचें असतें. तेव्हां बाणा हा ताण्यापेक्षां जड असल्यानें कापड गुंडाळ्यागुंडाळ्यासारखें दिसतें. तथापि हें कापड मऊ, टिकाऊ व नरम असतें. याला अनेक रंग देतात, व पोषाखाखेरीज पडदे, खुर्च्या, चटया, इ. सरंजामी सामानासाठींहि वापरतात. हें फार पूर्वी आयर्लंडमध्यें तयार होत असे. इंग्लंडमध्यें हें १७ व्या शतकांत फ्रेंच निर्वासितांनीं आणलें.

**पांबन**—मद्रास इलाखा, मदुरा जिल्हा, रामनाड इस्टेटींतील एक द्वीप. पाल्कची सामुद्रधुनी आणि मानारचें आखात यांच्यामध्यें हें आहे. लांबी-रुंदी ११×६ मैल आहे. रामेश्वर हा मुख्य गांव व यात्रेचें ठिकाण. रामाचा सेतु येथेंच आहे. पांबन हें बंदर आहे. लोकसंख्या ३,०००. येथें दीपगृह आहे. हवा थंड आहे.

**पाभरीनें पेरणें**—हातानें शेतांत कर्से तरी बीं पेरण्यापेक्षां तें पाभरीनें पेरल्यास सरळ रांगांमध्यें व सारख्या अंतरावर पेरतां येतें. हिंदुस्थानांत साध्या बांबूच्या नळ्यांची पाभर करून बीं पेरण्याची पद्धति फार प्राचीन कालापासून चालत आलेली आहे. इंग्लंडमध्यें अशी पद्धति १७४१ मध्यें प्रथम जेथ्रोटल यानें प्रचारांत आणली. प्रथम या पाभरीनें एकच रांग पेरण्यांत येत असे. अलीकडे तींत बऱ्याच सुधारणा करण्यांत आल्या आहेत. याच्या साहाय्यानें पिकांस खतहि घालण्यांत येतें.

**पामर, एडवर्ड हेन्री** (१८४०-१८८२)— एक इंग्रज प्राच्य-विद्यापंडित. हा केंब्रिज येथें अरबी भाषेचा प्रोफेसर १८७१ सालीं झाला; पुढें सिनायटिक द्वीपकल्पांत अरब लोकांकडून मारला गेला. त्याचे प्रमुख ग्रंथ म्हटले म्हणजे ज्यू राष्ट्राचा इतिहास व फारसी-इंग्रजी कोश हे होत.

**पामर्स्टन, लॉर्ड** (१७८४-१८६५)—एक इंग्लंडचा पंतप्रधान व मुत्सद्दी. हा वयाच्या २४ व्या वर्षी पार्लमेंटमध्यें शिरला (१८०९). नंतर युद्धखात्याचा चिटणीस झाला. हा टोरी पक्षीय होता. १८२९ पासून परराष्ट्रीय राजकारणांत लक्ष घालूं लागला. १८३० मध्यें तुर्की साम्राज्य स्थापन झाल्यावर त्याचें अस्तित्व व स्थैर्य युरोपच्या राजकारणाला आवश्यक आहे या कल्पनेनें त्यानें त्याचा बचाव करण्याची यशस्वी खटपट केली. इटली-हंगेरींतील क्रांतिकारकांना त्यानें जाहीरपणें आश्रय दिला. त्यामुळें त्याचे अधिकार कांहीं काळ काढले गेले. १८५२ मध्यें गृहमंत्री व पुढें क्रिमियन युद्धाच्या वेळीं मुख्य प्रधान झाला. यानें आपला कारभार अनियंत्रितपणें चालवण्याचा यत्न केला; तथापि तो जात्या फार उदारमतवादी होता.

**पामिर**—मध्य आशियांतील अत्यंत मोठें व उंच पठार. याला पृथ्वीचा माथा म्हणतात. अलीकडे या भागाविषयीं बरेंच संशोधन झालें आहे. हिमालय आणि तिएनशान पर्वतशाखांचा संयोग होऊन हें पठार झालें, असें कांहींचें म्हणणें आहे. मध्यावर सारिकोल हा पर्वत असल्यानें याचे पूर्व पामिर व पश्चिम पामिर असे दोन भाग झाले आहेत. पश्चिम पामिरचे पुन्हां ५ व पूर्व पामिरचे २ मोठमोठे भाग पडतात. आर्य लोक याच भागांतून पंजाबांत गेले. कनिष्क राज्यांत या भागाचा समावेश झालेला होता. ऑक्सस नदी या पठारावरून निघते. या भागांत पीक कांहीं होत नाहीं. किरघिज लोकांची यावर वस्ती आहे.

**पाय**—प्राण्यामध्यें तंगडीचा जो सर्वांत खालचा भाग असतो त्यास पाय म्हणतात. याची रचना हाताच्या धर्तीवर आहे. मनुष्याच्या पायामध्यें २६ अस्थी असतात. त्यांपैकीं ७ अस्थी मिळून गुल्फ किंवा घोट्याचा संधि होतो, व याचा मनगटासारखा उपयोग होतो. यानंतर हातांतील पांच अस्थींप्रमाणें पायांतील पांच अस्थींचा पंजा होतो व या अस्थी मागील घोटा आणि पुढील बोटें यांना जोडतात. हात आणि पाय यांतील अस्थींची अशी रचना केलेली असते कीं, या अवयवांना जीं निरनिराळ्या प्रकारचीं हालचालीचीं कामें करावीं लागतात तीं सहज रीतीनें करतां यावींत. पायांत पावलाच्या आंतल्या बाजूस टांच व अंगठा यांमध्यें एक कमान असते. तीमुळें पायाला आपल्या शरीराचा भार सहन करतां येतो.

**पायगाडी**—(सायकल). सध्यां जी आपण पायगाडी पाहतों तिच्या पूर्वावस्थेमध्यें १८१७ सालीं तिला फक्त एकापुढें एक दोन सारख्या आकाराचीं चाकें असून त्यांस एक दांडा जोडलेला असे व त्यावर मनुष्य बसत असे व तो आपले पाय जमिनीवर रेटून ती चालवीत असे. १८६१ पर्यंत तिच्यात बरीच सुधारणा झाली व त्यानंतर निरनिराळे प्रकार प्रचारांत आले. मध्यंतरीं एक उंच सायकल प्रचारांत आली; तिचें पुढचें चाक ६० इंचांपर्यंत उंच असे व मागचें लहान असे. ही पायगाडी १८८० च्या सुमारास फार प्रचारांत होती. यानंतर ठेंगण्या सुरक्षित पायगाड्या प्रचारांत आल्या. याच वेळीं बऱ्याच प्रकारच्या तिचाकी गाड्या प्रचारांत आल्या. या वेळीं या पायगाड्यांना प्रथम भरीव रबरी धांवा लावण्यांत येऊं लागल्या व त्यानंतर आंतून पोकळ असलेल्या रबरी धांवा लावण्यांत येत असत, व त्यामुळें धक्के जरा कमी बसत. यापुढें यांत सुधारणा होऊन हल्लींच्या हवा भरलेल्या पोकळ धांवा प्रचारांत आल्या. यामुळें गति वाढली. सुट्या चाकांची कल्पना निघाली त्यामुळें रोधक (ब्रेक) उपयोगांत आणणें आवश्यक झालें. हे रोधक हातांनीं दाबून लावण्याचे किंवा चाक उलटें फिरवून लावावयाचे असतात. पायगाड्यांना साधीं एकेरी, दुहेरी किंवा तिहेरी गतिचक्रें (गिअर्स) बसविलेलीं असतात. त्यामुळें चढणीवर वगैरे चढणें सोपें जातें. पायगाडीची गति पुष्कळच वाढवितां येते. दीड मिनिटांत एक मैल मनुष्य जाऊं शकतो. ११॥ मिनिटांत दहा मैल, ५५॥ मिनिटांत ५० मैल व दोन तास सव्वीस मिनिटांत १०० मैल गेल्याचीं उदाहरणें आहेत. एप्रिल १८८४ मध्यें सान्फ्रान्सिस्कोहून निघून १८ नोव्हेंबर १८८६ रोजीं टॉमस स्टीव्हन्स हा शांघायला पोंचला.

पायगाड्या करण्याचा धंदा हा फार महत्त्वाचा आहे. हिंदुस्थानांत आतां तीन कारखान्यांत सायकली तयार होऊं लागल्या आहेत. पायगाड्यांनीं प्रवास करणाऱ्या लोकांचे क्लब निघाले आहेत ते अशा प्रवाशांना मदत करतात.

**पायथॅगोरस** (खि. पू. ५८२-५००)—एक प्रसिद्ध ग्रीक तत्त्ववेत्ता. यानें फिनिशिआ, सीरिया, ईजिप्त, हिंदुस्थान, इ. देशांतील तत्त्वज्ञान्यांपासून ज्ञान मिळवून नंतर दक्षिण इटलींतील क्रोटोना या ग्रीक शहरांत तत्त्वज्ञान व धर्म यांबाबत चर्चा करणारी एक संस्था काढली. या संस्थेंत शेंकडों विद्यार्थी शिकण्यास आले. पुनर्जन्म, नीतिनियम व संख्यावाद हे त्याचे मुख्य विषय होत.

आपल्या मतप्रसाराकरितां त्यानें एक समर्थ रामदासांच्या मठां-प्रमाणें मठ स्थापन केला होता.

पुनर्जन्म किंवा आत्म्याचें पुनर्भ्रमण होणें या कल्पनेवर त्याचा स्वतःचा फार मोठा विश्वास असे. पापपुण्याच्या फळांशीं निगडित अशी ही मिसरी किंवा प्राच्यदेशीय कल्पना आहे. या कल्पनेमुळेंच पायथॅगोरस प्राणिहत्या करीत नसे. संख्या, भूमिति, संगीत, इ. विषयींहि त्याचे कांहीं गूढ सिद्धांत असत. युक्लिडच्या 'एलेमेंट्स' च्या पहिल्या पुस्तकांतील ४७ व्या सूत्रा-(प्रॉपोझिशन)मधील प्रमाणसिद्धि (प्रूफ) पायथॅगोरसची आहे असे मानतात.

**पायथॉन**—हा एक सापाच्या जातीचा अजगरासारखा प्राणी आहे. हा सामान्यतः उष्ण प्रदेशांत आढळतो. याचा आकार फार मोठा असून तो फार बळकट असतो. याची लांबी तीस फुटांपर्यंत भरते. याचें डोकें मानेपेक्षां जाड असून तोंड मोठें असतें. याच्या शरीराचा मागील भाग प्राथमिक स्वरूपां-तील अवयवांप्रमाणें दिसतो. हे प्राणी आपलें भक्ष्य आवळून दाबून मारतात. यांच्या मोठ्या जाती पश्चिम आफ्रिकेंत आढळतात.

**पायदळ**— प्राचीन काळीं रथ, गज, अश्व व पदाति यांचें मिळून चतुरंग दल होत असे. यांतील पदाति अथवा पायदळ हेंच महत्त्वाचें व संख्येनें सर्वांत अधिक असें अंग असे. प्राचीन काळीं गदा, खड्ग, म्हणजे तरवार व कुंत अथवा भाला आणि धनुष्य-बाण हीं पदातींचीं आयुधें असत. त्यांत दूर अंतरावरून बाणाचा, त्यानंतर भाल्याचा व अगदीं जवळून खड्गाचा अथवा गदेचा उपयोग करावयाचा असे व हीं शस्त्रें वापरण्याचें शिक्षण प्रत्येक सैनिक घेत असे. भरतखंडामध्यें चातुर्वर्ण्यपद्धति असल्यामुळें क्षत्रियासच हें शिक्षण घ्यावें लागत असे. पण इतर देशांत प्रत्येक नागरिकास स्वतःचें किंवा प्रसंगीं देशाचें रक्षण करावें लागत असल्यामुळें सर्वांसच हीं हत्यारें वापरण्याचें शिक्षण घ्यावें लागत असे. ग्रीक व रोमन सैन्यांतहि पायदळावरच विशेष भर असे व घोडेस्वार हे त्यांच्या मदतीस व शत्रुसैन्य विस्कळित करण्याकरितां किंवा तसें झाल्यावर त्याचा पाठलाग करण्या-करितां उपयोगांत आणीत. अर्वाचीन काळांत हत्ती व रथ हे मागें पडत चालले व अश्व आणि पायदळ यांचें महत्त्व वाढत गेलें. मोंगल अमदानीपर्यंत येथील युद्धांत पायदळ व घोडदळ यांस महत्त्व असे. परंतु रजपूत लोक घोड्यावर बसूनच लढाई करीत. त्यांनीं पायदळ ठेवण्याचें मनांत आणलें नाहीं, त्यामुळें त्यांचा पराभव होत गेला.

बंदुका प्रचारांत येण्यापूर्वीं पायदळाचें दुरून वापरावयाचें हत्यार बहुधा बाण हेंच असे व बंदुका प्रचारांत आल्यानंतरहि बाण हें हत्यार बरींच वर्षें प्रचारांत राहिलें. पूर्वींच्या पायदळांत फारशी शिस्त नसे. युरोपियन लोकांनीं शिस्तीनें लढणारें पायदळ प्रथम शिकवून तयार केलें व आपल्याजवळच्या उत्तम बंदुका व दारू यांच्या साहाय्यानें हिंदुस्थानांतील लोकांस तयार करून हिंदुस्थान जिंकलें.

मराठ्यांची युद्धपद्धति गनिमी काव्याची असल्यामुळें त्यांचा मुख्य भर घोडदळावर असे व शत्रूभोंवतीं घिरट्या घालून त्याचें अन्नपाणी बंद करून त्यास जेरीस आणावयाचें, ही त्यांची हम-खास युक्ति होती. त्यामुळें प्रारंभीं त्यांनीं पायदळाकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. याच पद्धतीनें त्यांनीं औरंगजेब व निजाम यांस जेर केलें. परंतु पुढें तोफखान्याचें महत्त्व पटल्यामुळें ठासून उभें राहून युद्ध करणें अवश्य झालें व त्याकरितां पायदळ सैन्य तयार करावें लागलें. प्रथम भाऊसाहेबानें या प्रकारची युद्धपद्धति अमलांत आणली व तिचा फायदा त्यास उद्‌गीर येथें मिळाला; पण पानपत येथें शत्रूच्या मुलखांत अडकून पडल्यामुळें हीच पद्धति त्याच्या अंगलट आली व त्या युद्धांत त्याचा पराजय झाला.

इंग्रजी कवाईत केलेल्या पायदळ फौजेचें महत्त्व पटून शिंदे, होळकर, वगैरेंनीं फ्रेंच, इंग्रज, वगैरे सेनापतींकडून पायदळ पलटणी तयार केल्या. परंतु त्यांचीं हत्यारें कमी दर्जाचीं असल्यामुळें त्यांचा निभाव इंग्रजांपुढें लागला नाहीं.

अर्वाचीन सैन्यामध्यें प्रत्येक पायदळांतील शिपायाजवळ बऱ्याच अंतरावरून व अगदीं हातघाईचें युद्ध करण्यास अवश्य अशीं सर्व प्रकारचीं हत्यारें असतात. त्याच्याजवळ बंदूक व लुइगन (मशिनगन) असते. ती २८०० यार्डांपर्यंत मारा करूं शकते. परंतु बहुधा ८०० यार्डांवर परिणामकारक मारा होतो. त्यानंतर त्याच्याजवळ लाइटमॉर्टर व रायफल ग्रेनेड म्हणजे हलक्या तोफांसारखीं व बॉंब फेकणारीं हत्यारें असतात. त्यांचा कांहीं अंतरावरून उपयोग करतां येतो. त्यानंतर हँडग्रेनेड म्हणजे हातबॉंब असतात. ते अगदीं जवळून फेंकावयाचे असतात व अखेरीस हातघाई सुरू झाली म्हणजे बायनेट अथवा संगीन (बेयोनेट) वापरावयाची असते. याप्रमाणें प्रत्येक पायदळ सैनिकाजवळ तो जाईल त्या दिशेला पुरेसा आगीचा डोंब उडविण्यापुरतीं व त्याबरोबरच चाल करून जाऊन हल्ला करण्यास लागणारीं अवश्य तेवढीं हत्यारें देण्यात आलेलीं असतात.

**पायलाग**—हा रोग गुरांच्या पायांस व तोंडास होतो. हा अतिशय संसर्गजन्य व त्वग्रोगासारखा आहे. हा रोग झाला असतां गुरें लंगडूं लागतात. चारा खात नाहींशीं होतात. त्यांच्या शरीरांत ताप असतो व रोग झाला असेल त्या भागावर बारीक पुटकुळ्या उठतात. दूध देणाऱ्या गुरांमध्यें हा रोग त्यांच्या ओटीवरहि पसरतो.

**पायस, बारावा** ( १८७६- )—हा २६२ वा पोप असून अकराव्या पायसनंतर पोपच्या गादीवर आला. याचा जन्म रोम शहरात झाला असून त्याचें जन्मनांव यूजेनियो पॅसिली असें होतें व त्याचें घराणें रोममध्यें बरेंच प्राचीन होतें. त्यानें १९०१ मध्यें दीक्षा घेतली. १९१७ मध्यें त्यास म्युनिक शहरांत पोपचा प्रतिनिधि नेमिलें होतें. तेथें त्यानें पहिल्या महायुद्धाचा शेवट घडवून आणण्याची खटपट केली. १९२४ मध्यें बव्हेरिया देशाशीं संधि करण्यांत येऊन त्यास बर्लिन येथें पोपचा प्रतिनिधि म्हणून पाठविण्यांत आलें व तेथें त्यानें प्रशियाशींहि संधि केला. नंतर त्यास रोम येथें परत बोलावून आणून कॉर्डिनल पद देण्यांत आलें व तो पोपच्या संस्थानचा चिटणीस बनला. पोप अकरावा पायस हा १० फेब्रुवारी १९३९ रोजीं मृत्यु पावला, व पॅसिली हा २ मार्च १९३९ रोजीं गादीवर आला. हा पोप चांगला पंडित व बहुभाषामिश्र आहे.

**पाया**—ज्या जागेवर एखादी इमारत बांधावयाची असेल ती जागा पक्की केली म्हणजे तिला पाया म्हणतात. पाया हालतां कामा नये किंवा खचतां कामा नये, याकरितां डोंगराच्या उतारावरील माती वगैरे टाळली पाहिजे; कारण अशी माती घसरत असते. निरनिराळ्या वस्तूंची भार सहन करण्याची शक्ति किती असते त्याचें कोष्टक खालीं दिलें आहे.

| | | |
|---|---|---|
| कठिण खडक—दर स्क्वेअर फुटास टन— | | ९ |
| कॉंक्रिटसारखा खडक— | ,, | ३ |
| नरम खडक— | ,, | १·८ |
| घट्ट जमीन व कठिण माती— | ,, | १ ते १·५ |
| स्वच्छ कोरडी वाळू, बाजू बंद असतील तर | ,, | १ ते १·५ |

जेथें वाळू घसरती असेल तेथें खांब पुरण्यांत येतात. लांकडाचे १०० फुटांपर्यंत लांबीचे खांब जमिनींत ठोकून बसविण्यांत येतात. केव्हां केव्हां एकावर एक दोनतीन खांब पुरण्यांत येतात. अशा वेळीं सर्वांत खालचा ३०० फुटांपर्यंत जातो. असे खांब लांकडाऐवजीं कॉंक्रिटचेहि वापरण्यांत येतात. हे वरून ठोकून बसविण्यांत येतात. या खांबावर कॉंक्रिटच्या तराफ्याची रचना करण्यांत येते. म्हणजे ३ इंचांपासून ५ फुटांपर्यंत जितका पाहिजे तितका जाडा थर देण्यांत येतो. पुलांचा वगैरे पाया अशा तऱ्हेनें तयार करण्यात येतो. सीमेंटच्या पोल्यांनींहि असा पाया तयार करण्यांत येतो व त्यावर वरील काम बांधण्यांत येतें.

**पारख ( धातूची )**—( ॲसेइंग ). खनिज द्रव्यांतील किंवा भेसळ धातूंतील एखाद्या विशिष्ट धातूचें प्रमाण पाहण्याची रीत. प्रमाण पाहण्याला सुरुवात करण्यापूर्वी त्या त्या पदार्थाचा प्रातिनिधिक नमुना तयार करावा लागतो. त्यानंतर अग्निसंस्कार करून पाहिजे असलेल्या धातूची गोळी तयार करतात व तिच्या वजनावरून मूळ पदार्थांतील प्रमाण ठरवितात. किंवा केव्हां केव्हां मूळ पदार्थांचें द्रावण करून त्यांत रासायनिक पद्धतीनें त्या धातूचें प्रमाण ठरवितात. सोन्याच्या बाबतींत पहिलीच पद्धत अजूनहि चालू आहे. पुष्कळ वेळां सोन्याबरोबर रुपें मूळ खनिज द्रव्यांत असल्यामुळें अग्निसंस्कारानें तयार केलेल्या गोळींत रुपेंहि असतें. तें नंतर नत्राम्लांत विरघळवून निराळें करतात व राहिलेल्या सोन्याचें वजन घेतात. सोन्यारुप्याचा कस लावणें व्यवहारांत नेहमीं अवश्य असल्यामुळें त्याची परीक्षा करण्याचा स्वतंत्र धंदाच झाला आहे.

**पारख, गोकुळ**—उत्तर हिंदुस्थानांतील एक सावकार. खुशालचंद अंबादास पेढीचा गोकुळ पारख हा मुनीम होता. यानें शिंद्यांस अतोनात पैशाची मदत करून शिंद्यांच्या दरबारीं आपलें मोठें वजन बसविलें. 'दौलत दौलतरावकी, पारखजीका राज" अशी म्हणच पडली होती. अशी आख्यायिका सांगतात कीं, दर दिवाळीस लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं तीन लाख चांदवडी रुपयांचा चबुतरा करून व त्यावर दौलतरावास बसवून हा पानसुपारी देई व तेवढी रक्कम शिपाई-हुजऱ्यास इनाम म्हणून वांटीत असे. मथुरेंतील द्वारकाधीशाचें मोठें देऊळ याच्याच पेढीकडून बांधलेलें आहे. हें घराणें आतां ग्वाल्हेरीस मोदीवाले म्हणून ओळखलें जातें.

**पारघाट**—मुंबई इलाखा, सातारा ते कोंकण मार्गावर लागणारा सह्याद्रींतला एक घाट. १८६४ व ७६ सालीं कुंभार्ली घाटांतून व दुसरीकडून नवे रस्ते होईपर्यंत दळणवळणाचा हाच एक मार्ग होता. घाट पाहा.

**पारधी**—शिकारी. एक फिरती जात. मध्य हिंदुस्थान, मुंबई इलाखा, मध्यप्रांत, वऱ्हाड व यांतील मिळून लो.सं.सु. ६०,०००. दक्षिण प्रांतांत हे फांसेपारधी व विजापूरकडे अटवींसंचार या नांवानें ओळखले जातात. फांसे घालणें, चित्ता किंवा सांवर पाळून शिकार धरणें, ससाणे पाळणें, इ. शिकारी धंद्यांशिवाय पाथरवटाचें कामहि कांहीं लोक करतात. ठिकठिकाणच्या तांड्याचा एक मुख्य नाईक असतो. पारधी लोक चोरी करण्याबद्दलहि प्रसिद्ध आहेत. यांची भाषा स्वतंत्र आहे. यांच्यांत विधवा भावजयीचें दिराशीं लग्न होतें.

**पारदमिश्र**—( ॲमलगम ). पारा आणि इतर धातु यांच्या मिश्रणानें हा तयार होतो व पाऱ्याचें प्रमाण कमी-अधिक असेल त्याप्रमाणें तो घन किंवा द्रवरूप असतो. आरशाला पारा लावण्यासाठीं, दांत भरण्यासाठीं, सोनें आणि रुपें त्या त्या खनिज द्रव्यांतून काढण्यासाठीं पाऱ्याच्या मिश्रधातूंचा उपयोग करतात.

**पारदर्शक प्रत्यग्निजन्य**—(डायोप्साइड). प्रत्यग्निजन्य (पायरोक्सीन) मालेंतील खटमग्नसिकितेत (कॅल्शियम मॅग्नेशियम सिलिकेट). याचा रंग फिक्कया पिवळयापासून हिरव्यापर्यंत असतो. हा अग्निजन्य दगडांत व रूपांतरित सुधाश्मांत (लाइम स्टोन) सांपडतो.

**पारनेर**— मुंबई प्रांत, अहमदनगर जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ ७२९ चौरस मैल. गांवें १३७. मुख्य ठिकाण पारनेर. लोकसंख्या (१९४१) ९२,८८३. तालुका उंचसखल व डोंगराळ. मध्य पठार २,८०० फूट उंचीवर आहे. पाणीपुरवठा चांगला. पारनेर नगरपासून वीस मैलांवर आहे. वस्ती सु. सहा हजार. येथें संगमेश्वराचें जुनें देऊळ आहे.

**पारशी**—हिंदुस्थानांतील एक स्वतंत्र धार्मिक वर्ग व जात. पारशी हा शब्द पर्शु या संस्कृत शब्दापासून झाला असून झरथुष्ट्राच्या धर्मानुयायांना हा शब्द लावतात. इराणवर मुसलमानांच्या स्वाऱ्यांनंतर कांहीं पारशी हिंदुस्थानांत आले. हिंदुस्थानांतील पारशी लोकांत प्राचीन पूर्वजांचें कांहीं वैशिष्ट्य राहिलें असलें तरी हिंदुस्थानच्या हवापाण्याचा त्यांच्यावर बराच परिणाम झाला आहे. पारशी ही मूळ जात सुस्वरूप, मध्यम उंचीची व बांधेसूद असून पारशी स्त्रिया हिंदु व मुसलमान स्त्रियांपेक्षां अधिक सुंदर असतात. पुष्कळ प्राचीन परकी प्रवाशांनीं पारशी स्त्रियांच्या सौंदर्याची स्तुति केलेली आढळते.

इराणांतील पारशी—सन ७६६ मध्यें हिंदुस्थानांत कांहीं पारशी आले; पण कांहीं इराणांतच राहिले. तैमूरलंग व त्याचे वंशज, व नादिरशहा व त्यानंतरचे मुसलमान राजे यांच्या अमलाखालीं पारशांचे पुष्कळ हाल झाले; त्यांचीं देवालयें व धर्मपुस्तकें नष्ट झालीं. सर्व पारशांना (सुमारें एक हजार) मिळून दोन हजार तोमन (एक हजार पौंड) जिझिया कर द्यावा लागे. आज येझ्द व आसपासचीं गांवें मिळून पारशांची ९।१० हजार वस्ती इराणात आहे. पायमोजे, छत्री, चष्मा, अंगठ्या, वगैरे जिन्नस वापरण्याची त्यांना मनाई असे. इंग्रज व हिंदुस्थानांतील पारशी पुढारी यांच्या खटपटीनें हे निर्बंध व जिझिया कर कमी करण्यांत आला (१८८२).

संजानचा इतिहास—'किस्से-इ-संजान' या ग्रंथांत पारशांबद्दल पुढीलप्रमाणें हकीकत आहे: यज्दजर्द याचा अरबांनीं पराभव केल्यावर (इ. स. ६४१) कांहीं झरथुष्ट्रीय पंथाचे लोक इराणांतील कोहिस्तान (खोरासान) प्रांतांत जाऊन १०० वर्षे राहिले. तेथेंहि त्यांस त्रास झाल्यानें ते ओरमझ्द शहरीं जाऊन (७५१) १५ वर्षेंपर्यंत राहिले. तेथूनहि ते गलबतांत बसून हिंदुस्थानांत येऊन दीव बंदरांत उतरले (७६६) व येथें त्यांनीं १९ वर्षें काढलीं. नंतर ते तेथून निघून संजान येथें (७८५) येऊन उतरले. नंतर या पारशी लोकांचा दस्तुर तेथील राजा जयराणा याजकडे गेला व त्याची (१६ संस्कृत श्लोकांनीं) स्तुति करून त्यानें तेथें राहण्याबद्दल त्याची परवानगी मिळविली. नंतर तेथें ते आनंदांत राहिले व त्यांनीं राजाकडून परवानगी मिळवून आतष बेहरामचें अग्निमंदिर तेथें बांधिलें. ज्या अर्थी आतष बेहराम याच्या प्राणप्रतिष्ठेस जवळजवळ एक वर्ष लागलें व पारशी लोकांना हीं उपकरणें इराणमध्यें जाऊन आणावीं लागलीं, त्या अर्थी आतष बेहरामची स्थापना ते संजान येथें आल्यापासून पांच वर्षांनीं झाली असावी.

वसाहती— याप्रमाणें संजान येथें ३०० वर्षें राहिल्यावर कांहीं पारशी लोक तेथून निघून दुसरीकडे जाऊं लागले व हा क्रम सुमारें २०० वर्षें चालला होता. इतक्या अवधींत त्यांनीं वांकानेर, भडोच, वरिआव, अंकलेश्वर, खंबायत व नवसरी या ठिकाणीं वसाहती केल्या. या वेळीं संजानमध्यें फक्त कांहीं दस्तुर (उपाध्याय) राहिले होते. अलफखान यास संजानवरील दुसऱ्या स्वारींत यश येऊन संजानचा राजा व त्याच्या बाजूनें लढणारे बरेच पारशी मारले गेले. तेव्हां राहिलेले पारशी अग्नि घेऊन जवळच्या बाहरूत पर्वतावर पळून गेले व तेथें बारा वर्षें राहून पुन्हां अग्नि घेऊन बांसडा येथें परत आले (१४९०). तेथें १४ वर्षें राहिल्यावर तो अग्नि नवसरी येथील एक मुख्य रहिवासी चांगशा यानें नवसरी येथें (१५१६) आणिला. नंतर संजानचे भिक्षुक दमाजी गायकवाडाचा परवाना घेऊन व बरोबर अग्नि घेऊन नवसरी सोडून वलसाड येथें गेले (१७४०). वलसाड येथें ते दोनतीन वर्षें राहिले. नंतर तेथून ते राजा दुर्जनसिंग याच्या आश्रयाखालीं उदवाडा येथें गेले (१७४२). नवसरी येथून अग्नि गेल्यानंतर कांहीं दिवसांनीं नवसरी येथें इ. स. १७६५ मध्यें अग्निमंदिर बांधून त्यांत आतष बेहरामची स्थापना केली. पारशांसंबंधीं मुसलमानी इतिहासांत उल्लेख आढळतात. १५९५ सालीं पारशी दस्तुर कैकोबाद माहिया यास अकबरानें पूर्वी २०० बिघे जमीन दिली होती. त्याच्या जोडीस आणखी १०० बिघे दिली. पारशांचा प्रवेश मुंबईमध्यें पोर्तुगीज अमलाखालींच झाला.

गुजराथेंत राहिलेले पारशी शेती व ताडी काढण्याचा धंदा मुख्यतः करीत. शिवाय सुरत वगैरे मोठ्या शहरीं सुतारकीचा, जहाजें बांधण्याचा आणि युरोपियनांच्या फॅक्टरींत दलालीचा धंदा करीत. सुरत येथें १९ व्या शतकांत पारशांचीं सुमारें २००० कुटुंबें होतीं. गुजराथेंत जे दुष्काळ पडले त्या वेळीं पारशांची वस्ती मुंबई शहरांत वाढूं लागली. १९व्या शतकांत मुंबई शहर व बेट यांची जी वाढ झाली तिचें बरेंचसें श्रेय पारशी समाजाला आहे. साक्षरतेचें प्रमाण पारशांमध्यें सर्वांहून अधिक

आहे. स्त्रीशिक्षणाचा प्रसारहि पारशांतच सर्वांहून अधिक आहे. ब्रिटिश पार्लमेंटांतले पहिले हिंदी सभासद दादाभाई नवरोजी हे पारशी होत. पारशी लोक घरांत व सार्वजनिक व्यवहारांत गुजराथी भाषा बोलतात.

धर्म— पारशी लोक झरथुष्ट्री धर्माचा मूळ संस्थापक झरथुष्ट्र (पाहा) यास मानतात. पण वास्तविक हा मूळ धर्मसंस्थापक नसून केवळ धर्मसुधारक होता. त्यांच्या जुन्या धर्माला पोईरोत्क-एश हें नांव असून अग्नि, सूर्य, चंद्र, आकाश, वगैरेंना ते स्वतंत्र देवता मानीत. हिंदूंतील ब्राह्मणांप्रमाणें यांच्यांत मोबेद ही जात आहे. पारशांचीं सर्व धर्मकृत्यें मोबेद करतात. मुलगा सात वर्षांचा झाला म्हणजे त्याला कस्ती बांधण्यांत येते. ही जानव्याप्रमाणें असते. झरथुष्ट्र यानें त्यांत सुधारणा करण्याकरितां मुख्य तत्त्व हें प्रतिपादिलें कीं, परमेश्वर एक आहे व इतर देवता त्याच्या अंकित आहेत. स्वबांधवांना मदत करण्याकरितां श्रीमान् पारशी लोक नेहमीं तयार असतात.

पारशी कायदा—हा फक्त वारसाच्या बाबतींतील आहे. इंग्रज सरकारनें तारीख १५ माहे मे, सन १८३७ रोजीं सन १८३७ चा ॲक्ट नंबर ९ ‘दि पारशी चॅटल रिपील ॲक्ट’ पसार केला कीं, इंग्लंडांतील स्थावर मिळकतीसंबंधींचा कायदा प्रेसिडेन्सी शहरांतील पारशी लोकांस लागू नाहीं. मुंबई शहराच्या बाहेरगांवीं जे पारशी राहत होते त्यांच्या इस्टेटीची वांटणी त्यांच्या मरणानंतर सन १८२७ रेग्युलेशन नंबर ४ प्रमाणें होत असे. ह्याप्रमाणें प्रेसिडेन्सी शहर आणि बाहेर गांवांतील पारशी लोकांचा कायदा एक नसल्याकारणानें सन १८६२ मध्यें पारशी लोकांकरितां एक कमिशन नेमण्यांत आलें. या कमिशनच्या आधारें इंग्रज सरकारनें ‘दि पारशी ईन्टेस्टेट सक्सेशन ॲक्ट’ (सन १८६५ चा) केला आहे.

दि लॅण्ड्ज् केलॅाट् ॲक्ट (१८७४), सन १८६५ चा ॲक्ट, २१ शेडयूल्ड डिस्ट्रिक्ट शिवायकरून सर्व हिंदुस्थानांत लागू करण्यांत आला. सदरहू कायद्याप्रमाणें जर एखादा पारशी पुरुष मयत झाला तर त्याच्या मरणानंतर त्याच्या स्थावर–जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं, दरएक मुलीस एक, विधवास दोन व दर एक मुलास चार भाग मिळावे. जर एखादी पारशी बाई मयत झाली तर तिच्या स्थावर-जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं, तिच्या दरएक मुलास एक भाग व तिच्या नवऱ्यास दोन भाग मिळावे.

एखाद्या पारशी पुरुषाच्या मरणाच्या वेळीं जर त्याची स्त्री हयात नसली तर त्याच्या स्थावर-जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं, दरएक मुलीस एक व दरएक मुलास चार भाग मिळावे. एखाद्या पारशी बाईच्या मृत्युसमयीं जर तिचा नवरा हयात नसला तर तिच्या स्थावर-जंगम मिळकतीची वांटणी अशी करावी कीं, दरएक मुलास सारखा हिस्सा मिळावा. जर एखाद्या पारशाचा मुलगा व मुलगी त्याच्या हयातींत मरण पावली असेल तर त्याची विधवा अगर भ्रतार यास व त्याच्या ट्रस्टीस त्याच्या मयत बापाचा अगर आईचा हिस्सा मिळावा.

जर एखाद्या पारशाच्या मृत्युसमयीं त्याची विधवा अगर एखाद्या पारशी बाईच्या मृत्युसमयीं तिचा नवरा हयात असेल तर त्यास कांही शेती नसल्यास त्याच्या स्थावर-जंगम मिळकतीचे दोन भाग करावे व त्यांतील एक भाग मयताची आई व बाप यांस किंवा एक हयात असेल त्यास मिळावा व मयताची विधवा अगर तिच्या नवऱ्यास दुसरा भाग मिळावा.

जर मयताचे आईबाप दोघेहि जिवंत असतील तर आईचा हिस्सा बापाच्या हिश्श्यापेक्षां निम्मा असावा. कदाचित् मयताची आई किंवा बाप जिवंत नसल्यास मयताच्या बापाच्या नातेवाइकांस त्यांच्या अनुक्रमाप्रमाणें निम्मा हिस्सा मिळावा; परंतु पुरुषवारसाचा हिस्सा स्त्रीवारसापेक्षां दुप्पट असावा. जर त्याच्यातर्फे कोणी नातेवाईक नसेल तर मयताची विधवा किंवा भ्रतार यास सर्व इस्टेट मिळावी. जर एखाद्या पारशी पुरुषाच्या आईच्या मरणाच्या समयीं त्यास संतति नसेल व त्याची विधवा किंवा मयत स्त्रीचा भ्रतार नसेल तर कायद्यांत परिशिष्ट आ मध्यें नमूद केलेल्या त्याच्या मिळकतीचे वारस यांस त्यांच्या अनुक्रमाप्रमाणें सर्व मिळकत मिळावी. परंतु एका स्त्रीवारसाचा हिस्सा पुरुषाच्या हिश्श्याच्या निम्म्यानें असावा. पारशी लोकांस दि इंडियन सक्सेशन ॲक्ट १० सन १७६६ चा, भाग ३ व ४ यांतील कलम २५ शिवायकरून भाग ५ वा कलम ४३ लागू पडत नाहीं; बाकीचे सर्व भाग व कलमें पारशी लोकांस लागू आहेत.

पारशी लोकांत दादाभाई नवरोजी, फेरोजशहा मेथा, टाटा, वाडिया, मोदी, वगैरे थोर पुढारी हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत राजकीय क्षेत्रांत चमकले असले तरी पारशांचा मुख्य उद्योगधंदा व्यापार होय. सरकारी नोकरींत त्यांचें प्रमाण फारच कमी आहे. हा समाज अगदीं लहान असून जातिनिष्ठ मुळींच नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें नमुनेदार उदाहरण आहे. पाश्चात्य लोकांची व्यवस्थित वागणूक त्यांनीं फार लवकर उचलून आत्मसात् केली. त्यांच्यांत शिक्षणाचें मान बरेंच अधिक आहे. स्त्रियांतहि शिक्षणाचा प्रसार इतर धर्मांतील स्त्रियांपेक्षां अधिक आहे. या समाजांत पाश्चात्य राहणी व सुस्थिति यांमुळें जननाचें प्रमाण कमी आहे व दीर्घायुष्यमान बरेंच आहे.

एकंदर हिंदुस्थानांत पारशांची लोकसंख्या १९४१ च्या खानेसुमारीप्रमाणें १,१४,८९० होती. यापैकीं ५८,२४८ पुरुष

व ५६,६४२ स्त्रिया होत्या. एकट्या मुंबई प्रांतात ८६,००० वर यांची वस्ती होती. बडोदें संस्थानांत सु. सात हजार लोक आहेत. बाकीच्या भागांतून तुरळक आहेत.

**पारसनाथ**—एक जैन क्षेत्र. जुनें नाव समेत शिखर. बिहार प्रांत, हजारीबाग जिल्हा यांत हें जैन लोकांचें पवित्र स्थान आहे. समुद्रसपाटीपासून सुमारें ४,५०० फुटांवर उंचीची ही टेंकडी आहे. जैनांचा २३ वा तीर्थंकार पार्श्वनाथ याची समाधि या ठिकाणीं आहे. येथें दरसाल यात्रेकरूंचा फार मोठा मेळावा जमतो.

**पारसनीस घराणें**—पुणें येथें नांदत असलेलें एक घराणें. प्रत्येक दरबारीं पूर्वीं एक फारसी दुभाषा असे. त्याप्रमाणें शाहूच्या दरबारीं फारसनवीसीच्या म्हणजे स्वीय सरकारकडून परसरकारकडे जाणारीं पत्रें-खलितें यांच्या मूळ मराठी मसुद्याचें फार्शींत भाषांतर करण्याच्या कामावर भीमराव होता. भीमरावाचा मुलगा बापूजी यास पेशव्यांनीं त्याच कामावर साताऱ्याहून पुण्यास आणलें. त्या घराण्यानें पेशवाईअखेरपावेतों तेंच फारसनवीसीचें काम केलें.

**पारसनीस, रा. ब. दत्तात्रय बळवंत** (१८७०-१९२६)—मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें जमा करणारे एक इतिहासव्यासंगी व लेखक. यांचा जन्म सातारा येथें झाला. तेथेंच हे मॅट्रिक झाले. विद्यार्थिदशेपासूनच लेखनवाचन व वादविवाद-सभा यांकडे याचा ओढा असे. शिक्षण सुटल्यानंतर इतिहाससंशोधनकार्याची गोडी लागली व १८८७ सालीं 'महाराष्ट्र कोकीळ' या आपल्या स्वतःच्या मासिकांतून हे इतिहाससंशोधनपर लेख लिहूं लागले. यानंतर झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाई यांचे दत्तक पुत्र दामोदरपंत यांच्याकडून ऐतिहासिक पत्रें व माहिती मिळवून यांनीं लक्ष्मीबाईचें चरित्र मराठी भाषेंत लिहून आपल्या संशोधनपर इतिहास-लेखनास सुरुवात केली. अनेक ठिकाणांहून दुर्लभ असे कागदपत्र, वस्तू, चित्रें, वगैरेंचा संग्रह करून यांनीं लेखन, संपादन व संकलन या विविध दृष्टींनीं मराठ्यांच्या इतिहासाची महत्त्वाची कामगिरी केली आहे. १९०२ सालीं कोल्हापूरच्या शाहू छत्रपतींबरोबर लंडनला गेले असतां यांना तिकडील अनेक संग्रहालयें व संस्था पाहण्याची सुसंधि मिळाली. स्वतः संग्रहीत केलेल्या वस्तूंचा व ग्रंथांचा अभ्यासकांना उपयोग व्हावा यासाठीं एक चांगलें ग्रंथालय व वस्तुसंग्रहालय काढण्याची यांनीं खटपट सुरू केली. त्यांत यश येऊन १९२५ सालीं सातारा येथें मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांच्या हस्तें पारसनीस म्यूझियमचे उद्घाटन झालें. या वस्तुसंग्रहामध्यें तीस हजार मराठी, चार हजार इंग्रजी कागदपत्रें व तीन हजार इंग्रजी ग्रंथांचा समावेश करण्यांत आला होता. याचा मोबदला म्हणून यांना दरमहा २०० रुपयाची नेमणूक वंशपरंपरेनें करून देण्यांत आली. आतां हा संग्रह साताऱ्याहून हालवून पुणें येथील डेक्कन कॉलेज रीचर्स इन्स्टिटयूटमध्यें ठेवण्यांत आला आहे. (१) कीर्तिमंदिर, (२) मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार, (३) बायजाबाई शिंदे यांचें चरित्र, (४) वाक्पुष्पांजली, (५) भारतभाग्योदय, (६) बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी, यांसारखे इतिहासग्रंथ यांनीं लिहिले. (१) सुभाष्यचंद्रिका (हस्तलिखित), (२) महाराष्ट्र कोकीळ, (३) भारतवर्ष व (४) इतिहाससंग्रह यांसारखीं मासिकेंहि यांनीं चालविलीं. किंकेडसाहेबांच्या मदतीनें यांनीं इंग्रजींत महाराष्ट्राचा इतिहास लिहिला आहे. नवें संशोधनसाहित्य जमा करून व त्याची चटकदार रीतीनें मांडणी करून लोकांना अप्रसिद्ध अशा इतिहासवाचनाची गोडी यांनीं लाविली. महाराष्ट्राचा इतिहास त्यांनीं बराच उजेडांत आणला यांत शंका नाहीं.

**पारसिकचा किल्ला**—मुंबई, ठाणें जिल्हा. हा एक लहानसा किल्ला कल्याणच्या खाडीच्या मुखाशीं आहे. हा पाण्यापासून २५ फूट उंचीच्या खडकावर बांधलेला आहे. दरवाजा खाडीच्या बाजूस होता. हा पडून गेला असून याचे दगड आगगाडीच्या रस्त्याकरिता घेतले असावे.

**पारा**— हा एकच धातु द्रवरूपांत दिसतो. परमाणुभारांक २००.६; वि. गु. १३.५६; द्रवणबिंदु ३८.८° शत.; व क्वथनबिंदु ३५६.७° शत.. अकृत्रिम गंधित (सल्फाइड), हिंगूळ यांपासून पारा स्पेन, कॅलिफोर्निया व इंद्रिया (युगोस्लाव्हिया) या प्रदेशांत काढतात. हा धातु जड व रुपेरी पांढरा असतो. सोनें, रुपें, कथील, इ. धातूंशीं हा सहज मिसळून जातो. हवेचा दाब समजण्यासाठीं वायुभारमापकांत व उष्णमान कळण्यासाठीं उष्णमापकांत पारा वापरतात. सोनें अशोधितापासून काढण्यास, आरसे करण्यास व औषधें बनविण्यास पारा नेहमीं लागतो. इतर द्रव्यांशीं संयोग होऊन याचे बरेच क्षार बनतात; उदा., पारदगंधिद, पारदहरिद, इ.. पारदहरिद हें जालीम विष आहे. पारदगंधिदाचा रंगासाठीं उपयोग होतो.

पूर्वीं किमयागार पाऱ्यापासून सोनें काढण्याचा निष्फळ प्रयत्न करीत असत; पण आतां याउलट सोन्यापासून पारा करतां येऊं लागला आहे. सायक्लोट्रॉनच्या साहाय्यानें अमेरिकेंत प्रयोगालयांत केलेला असा पारा नळींत घालून सर चंद्रशेखर रामन् यांस 'रामन् परिणामा'च्या प्रकाशसाधनासाठीं डॉ. उहलर कॉन्डन यांनीं नुकताच बक्षीस दिला.

**पाराकीट**—ही एक पोपटाची लहान जात आहे. यांची शेपटी लांब असते. हे पक्षी सामान्यतः पूर्वेकडील द्वीपसमूहांत आढळतात. हिंदुस्थानांत आढळणाऱ्या या पक्ष्यांचा रंग हिरवा

तजेलदार असून कंठावर तांबडी रेघ असते. या पक्ष्यांना शिकविल्यास स्पष्ट बोलतां येतें. ऑस्ट्रेलियामध्येंहि या पक्ष्यांच्या कांहीं जाती आढळतात; त्यांचा रंग हिरवा व काळा असून मधून मधून पिंगट रंगाची छटा असते.

**पारायण**—एखादा धार्मिक ग्रंथ विशिष्ट मुदतींत वाचणें. महाभारत, रामायण, सप्तशती, गीता, भागवत, इ. संस्कृत ग्रंथांचीं; दासबोध, गुरुचरित्र, हरिविजय, रामविजय, शिवलीलामृत, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, इ. मराठी ग्रंथांचीं; व तुलसीदासकृत रामायण यांसारख्या हिंदी ग्रंथांचीं भाक्तिभावानें पारायणें करण्यांत येतात. नवरात्र, चातुर्मास, एकादशी, शिवरात्र, रामनवमी, इ. धार्मिक पर्वकालांत बहुधा पारायणें होतात. सात दिवसांत जें पारायण पुरें करतात त्याला सप्ताह म्हणतात.

**पारासेलसस, फॉन होहेन्हीम** ( १४९३–१५४१ )—एक जर्मन वैद्यकशास्त्रज्ञ. यानें बराच प्रवास केला व त्या काळांत जर्मनींत ज्ञात नसलेल्या अशा अनेक औषधांची माहिती मिळविली; तीं औषधें पाऱ्यापासून केलेलीं असावींत. या त्याच्या औषधांनीं अगदीं विशेष प्रकारें रोगी बरे होऊं लागले, व त्यामुळें त्याची कीर्ति फार पसरली. प्रथम प्रथम त्याला निव्वळ वैदू, जादूमंत्र करणारा वैद्य समजत असत; पण पुढें त्यानें औषधंशास्त्र व रसायनशास्त्र या दोहोंत फार महत्त्वाची भर घातली, व अनेक नवे शोध लावले; त्यामुळें त्याला आधुनिक औषधविद्येचा जनक मानतात.

**पारिजातक**—या फुलझाडाच्या बिया वाटोळ्या असतात. फूल नाजुक व सुवासिक असतें. फांद्यांना कुसळें असून पानें कातीदार असतात. मंदार हें याचेंच दुसरें पौराणिक नांव असून समुद्रमंथनांतून प्राप्त झालेल्या रत्नांपैकीं हें एक आहे. कृष्णानें इंद्राच्या नंदनवनांतून हा द्वारकेस आणल्याची कथा आहे. याचीं झाडें लहानमोठीं सात-आठ जातींचीं आहेत. पाला औषधी आहे. खवड्यावर बिया वांटून लावतात. गजकर्णावर रस लावतात. सर्पदंशावर रस पाजतात.

**पारोसा पिंपळ**— हें झाड पिंपळासारखेंच असतें. याला कोंकणांत मणेर किंवा कडे पाईर म्हणतात. पानें पिंपळाच्या पानांहून मोठीं असून त्यांस पांढरा चीक येतो. हीं झाडें डोंगराळ प्रदेशांत होतात. फळें भेंडीच्या झाडासारखीं असतात. मण्यारीच्या विषावर सालीचा रस देतात. कफावर चीक देतात.

**पारोळें**—मुंबई, पूर्व खानदेशांतील एका पेठ्याचें ठिकाण. येथें असलेल्या किल्ल्याची तटबंदी सत्तावनच्या बंडाच्या वेळीं इंग्रजांनीं पाडली. हा किल्ला १७२७ त बांधल्याचें सांगतात. याचें शिल्प सुरेख आहे. कापसाच्या व्यापाराचें हें गांव आहे. हात माग आहेत. नैर्ऋत्येस पांच मैलांवर चोरी नदींतील बेटावर एक सुंदर महादेवाचें स्थान आहे. लो. सं. सु. १५,०००. १८६४ पासून म्युनिसिपालिटी आहे.

**पार्क, मंगो** ( १७७१–१८०६ )— एक स्कॉटिश भूप्रदेशसंशोधक. २७९४ सालीं आफ्रिकन सोसायटीनें त्याला नायगर नदीच्या उगमापर्यंत शोध लावण्याचें काम सांगितलें, त्याप्रमाणें त्यानें त्या नदीचा कांहीं भाग शोधून काढला आणि नंतर तो स्वदेशीं परत आला व त्यानें १७७९ सालीं या आफ्रिकेंतील प्रवासाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. १८०५ सालीं ब्रि. सरकारनें नायगर नदीच्या शोधार्थ सफर पाठवली, त्याचा तो प्रमुख होता. तो आपल्या सहकाऱ्यांसह नायगर नदीवरील बाऊसा या शहरापर्यंत गेला तों तेथें तद्देशीय लोकांनीं या सफरीवाल्यांवर हल्ले केले. या हल्ल्यांतून बचावून जात असतांना तो पाण्यांत बुडून मेला असावा अशी समजूत आहे.

**पार्थिआ**—कास्पियन समुद्राच्या आग्नेयीस एलबुर्झ पर्वतापासून हिरातपर्यंत पसरलेला पृथु लोकांचा देश. सध्यांचा खोरासान प्रांत हा पार्थिआ असावा. ऋग्वेदांत या राष्ट्राचा उल्लेख आहे. पांडवांची माता कुंती ऊर्फ पृथा ही या देशाची असावी. पुढें सिथिअन व पार्थिअन एकमेकांत मिसळले आणि झरथुष्ट्राचे अनुयायी झाले. इराणी लोकांनीं पार्थिअनांच्या भाषेस व लिपीस पुढें पहलवी हें नांव दिलें.

पार्थिअन साम्राज्य अरबी समुद्र आणि युफ्रेटीस, ऑक्सस, कॅस्पिअन समुद्र यांमधील प्रदेशावर होतें. पहिल्या मिथ्रिडाटीसनें या साम्राज्याचा पाया घातला ( ख्रि. पू. १७०० ). सेल्युसिडींच्या राज्यांत पुढें याचा समावेश झाला. पार्थिअन सैनिक तिरंदाज घोडेस्वार म्हणून प्रसिद्ध होते. पुढें यांचे रोमशीं झगडे सुरू झाले. ट्राजन, ॲन्टोनिनस आणि कॅराकल्ला यांनीं पार्थिअनांचा अजीबात नायनाट केला.

**पार्नेल, चार्लस स्टुअर्ट** ( १८४६–१८९१ )—एक प्रसिद्ध आयरिश पुढारी. हा पार्लमेंटमध्यें अडवणुकीच्या मार्गाचें अवलंबन करणारा, आयरिश लँडलीग व आयरिश नॅशनल लीग यांचा अनुक्रमें प्रोत्साहक व संस्थापक होता. आयर्लंडमध्यें शेतकरी वर्गांत करबंदीची चळवळ सुरू झाली तेव्हां याला पकडण्यांत आलें होतें. पार्नेलच्या चळवळीस कांहींसें यश येऊन गेल्या शतकाच्या अखेरीस आयर्लंडला बरेंच स्वातंत्र्य मिळालें. पार्नेलच्या लोकप्रियतेचें एक दर्शक म्हणजे त्याला लोकांनीं ३७ हजार पौंडांची थैली अर्पण केली हें होय. १८८९ चें होमरूल बिल पुढें आणण्यांत याचीच खटपट होती. अत्याचारी चळवळीशीं याचा संबंध जोडण्याचा याच्या हितशत्रूंनीं व 'लंडन टाइम्स'नें प्रयत्न केला, परंतु त्याबाबत याच्याच मागणीवरून कमिशनमार्फत पूर्ण

चौकशी होऊन हा पूर्णतया दोषमुक्त ठरला. इंग्रजद्वेष हा याचा पिढीजात विशेष होता.

**पार्मा**—उत्तर इटली, पार्मा प्रांताची राजधानी. ही पार्मा नदी कांठीं आहे. वस्ती सुमारें ५५ हजार (१९२२). हें एक फार जुनें सुंदर शहर आहे. येथें १४८२ मध्यें निघालेलें विद्यापीठ आहे. पार्मा नदीच्या कांठीं ही रोमन लोकांची मूळ वसाहत होती. रेशीम, लोकर, सूत, इ. चीं वस्त्रें व फल्ट टोप्या येथें तयार होतात. लो. सं. ७१,८५८.

**पार्लमेंट (ब्रिटिश)**—ग्रेट ब्रिटनचें व अल्स्टरचे कायदेमंडळ. यामध्यें राजा, लॉर्ड व लोकप्रतिनिधि असतात. या कायदेमंडळाची निवड, मुदत, अधिवेशन भरविणें, बरखास्त करणें यांचे सर्व अधिकार राजाकडे असतात. याची बैठक तीन वर्षांतून एकदां तरी भरविलीच पाहिजे असा कायदा आहे; पण जमाखर्चाला मंजुरी दरवर्षी घ्यावी लागते. लोकप्रतिनिधी व लॉर्ड यांनीं संमत केलेल्या कायद्यांस राजाची संमति मिळाल्यावरच ते पूर्ण होतात. लॉर्ड दोन प्रकारचे असतात: १ गृहस्थ, व २ धार्मिक. कांहीं वंशपरंपरा तर कांहीं तहाहयात असतात. लॉर्डांची सभा ही वरिष्ठ न्यायसभाहि आहे. लोकप्रतिनिधि सभेमध्येंच प्रथम पगार किंवा जमाखर्च व कर यांच्या कायद्याचे मसुदे यावयाचे असतात. पण या सभेनें मान्य केलेले कायदे अमान्य करण्याचा अधिकार लॉर्ड सभेस आहे. सभासदांच्या गैरवर्तनाबद्दल शिक्षा करण्याचा हक्क या सभांस आहे, पण सामान्य कोर्टास नाहीं. भाषणस्वातंत्र्याचा हक्क आहे. सभासदास दिवाणी खटल्याबाबत कैद करतां येत नाहीं.

प्रथम दोन्ही सभांचे सभासद लॉर्डांच्या सभेंत जमतात. नंतर प्रतिनिधिसभेचा अध्यक्ष निवडला जाऊन सर्वांचे शपथविधि होतात. नंतर राजाचें भाषण व त्यास सभेचें प्रत्युत्तर होऊन नंतर कामास आरंभ होतो. लॉर्डांच्या सभेचा अध्यक्ष लॉर्ड चान्सेलर असतो. प्रत्येक सभेंत कायद्याचे मसुदे आणतां येतात. त्यांचा विचार करण्याकरितां जरूर तर समित्या नेमण्यांत येतात. प्रत्येक सभेंत ठराव मांडण्यांत येतात. प्रश्न व उपप्रश्न विचारण्यांत येतात व अखेर मतें घेऊन निर्णय करण्यांत येतो. प्रत्येक सभासदास एकदांच भाषण करतां येतें. मात्र नियम दाखविण्याकरितां वाटेल तितक्या वेळां बोलतां येते. मूळ ठराव मांडणारास प्रत्युत्तरादाखल भाषण करतां येतें. एकदम अधिक सभासद बोलावयास उठले असतां लॉर्ड स्वतःच व प्रतिनिधिसभेंत अध्यक्ष प्रथम कोणीं बोलावयाचें तें ठरवितात.

अँग्लो-सॅक्सन लोकांनीं इंग्लंड जिंकल्यावर अनेक लहान राज्यें स्थापलीं व निरनिराळे राजे प्रजेच्या व थोर लोकांच्या संमतीनें राज्य चालवूं लागले. अशा राज्यांत मुट नांवाच्या गांवसभा असत. त्यांचीच एक विटेनगेमुट म्हणजे 'शहाण्यांची सभा' असे. तिचा सल्ला घेऊन राजा राज्य चालवी. हे प्रतिनिधि सभेचें मूळ होय. पुढें नॉर्मन विजयानंतर या सभा मागें पडल्या, पण १२१५ मध्यें लोकांनीं जॉन राजाकडून 'मॅग्ना चार्टा' नांवाची बडी सनद मिळविली. पुढें तिसऱ्या हेन्रीच्या कारकीर्दींत सायमन डी मॉटफर्ड या सरदारानें राजाला कैद करून (१२६५) राज्य चालविण्याकरितां पार्लमेंट नांवाची कायमची संस्था स्थापन केली. तींत लॉर्ड, बॅरन, बिशप, वगैरे असून प्रत्येक परगण्याचे व शहराचे दोन दोन प्रतिनिधी असत. पहिल्या एडवर्डच्या काळांत या सभेच्या बैठकी नियमित भरूं लागल्या व तिसऱ्या एडवर्डच्या कारकीर्दींत लॉर्ड व प्रतिनिधी यांच्या सभा वेगळ्या भरूं लागल्या. त्या वेळीं प्रतिनिधिसभेस फारसे अधिकार नसत. फक्त विनंति करण्याचा अधिकार होता. राजाच कायदे करीत असे. एलिझाबेथच्या कारकीर्दींत ही सभा आपलें मत अधिक धिटाईनें व्यक्त करूं लागली. स्टुअर्ट राजांबरोबर या सभेचा झगडा झाला व अखेरीस १६८८ च्या राज्यक्रांतीनें पार्लमेंट व राजा यांचे हक्क स्पष्टपणें नमूद करण्यांत आले. मध्यंतरीं वेल्स देश या सभेत सामील झाला होता. पुढें स्कॉटलंड व आयर्लंड हे देशहि सामील होऊन सभासदांची संख्या बरीच वाढली. १७७१ पासून पार्लमेंटच्या कामांचा रिपोर्ट प्रसिद्ध होऊं लागला. पुढें १८३१, १८६७–१८६८ व १८८४–१८८५ या कायद्यांनीं मतदान अधिक पद्धतशीर करण्यांत आलें. यानंतर पार्लमेंटच्या प्रत्यक्ष कामकाजाच्या पद्धतींत वरचेवर अधिक सुधारणा होत गेल्या. लॉर्डांच्या सभेचें धोरण सनातनी व अडवणुकीचें वाटूं लागल्यामुळें तिचे अधिकार कमी कमी होत गेले व प्रतिनिधिसभेचे वाढत गेले व त्यामुळें काम अधिक शिस्तवार व पद्धतशीर होऊं लागलें. १८९२ सालीं ग्लॅडस्टननें वादविवाद थांबविण्याचाहि उपक्रम केला; यास 'गिलोटिन' म्हणतात.

१९११ च्या पार्लमेंट कायद्यानें हाउस ऑफ लॉर्ड्स हें हाउस ऑफ कॉमन्सच्या हाताखालचें ठरविण्यांत आलें. लॉर्डांची सभा ही आतां नुसती साफसुफीची सभा उरली आहे. एखादें बिल वाटल्यास दिरंगाईवर टाकतां येईल (पण तेंहि आतां एका नवीन कायद्यामुळें करतां येत नाहीं), पण फेटाळतां येणार नाहीं. पैशाचीं बिलें तर या सभेपुढें प्रथम येतच नाहींत.

कानडा, ऑस्ट्रेलिया, दक्षिण आफ्रिका, हिंदुस्थान, व इतर कांहीं वसाहती यांतून या ब्रिटिश नमुन्यावरच पार्लमेंट सभा स्थापन झाल्या आहेत.

**पार्वतीबाई पेशवे** (मृ. १७८३)—सदाशिवरावभाऊ पेशवे यांची ही पत्नी. ही पेणच्या कोल्हटकर घराण्यांतील होती. लग्न १७५० मध्यें झालें. ही फार सहनशील व सुस्वभावी

असून हिनें सवाई माधवरावाच्या बालपणीं त्याची चांगली काळजी घेतली. पेशवे घराण्यांतील मंडळी व सरदार-मुत्सद्दी हिला फार मान देत. तोतया प्रकरणांत हिनें फार संयम राखून बारभाईंना अडचणींत घातलें नाहीं.

**पार्श्वनाथ**—जैनांचा तेविसावा तीर्थंकर. बनारस येथील इक्ष्वाकु घराण्यांतील राजा अश्वसेन याचा वामा राणीपासून आलेला हा मुलगा. एकदां हा शिकारीस गेला असतां यानें कुशस्थलाच्या प्रसेनजित् राजाची मुलगी प्रभावती हिला कलिंग देशाचा राजा पळवून नेत असल्याचें पाहिलें. तेव्हां यानें प्रभावतीची सुटका केली व नंतर तिच्याशींच विवाह केला. पुढें यानें जैन धर्माच्या उन्नतीप्रीत्यर्थ आपलें आयुष्य खर्ची घातलें. आपल्या आयुष्याच्या शंभर वर्षांपैकीं सत्तर वर्षें यानें निर्वाणाच्या शोधार्थ घालविलीं. याचा काल महावीराच्या पूर्वी दोनशें वर्षें झाला असावा असें संशोधक म्हणतात. महावीराचे आईबाप व त्या वेळचे मगधाचे लोक याचे अनुयायी होते. गुहेच्या प्रत्येक कमानीवर दोन सर्पांचीं डोकीं खोदणें ही पार्श्वनाथाची खूण होती.

**पाल**—या प्राण्याच्या अनेक जाती आहेत. हे निरनिराळ्या प्रकारच्या हवामानांमध्यें निरनिराळ्या आकाराचे आढळतात; पण सहसा थंड देशांत आढळत नाहींत. उष्ण प्रदेशांत यांचा आकार बराच मोठा असतो. पाल, सरडा, घोरपड, वगैरे अनेक जाती या वर्गांतच मोडतात. अरिझोना आणि मेक्सिको यांमधील पाली फक्त विषारी असतात. पाली रात्रीच्या बाहेर पडतात. यांचें शरीर सपाट असून पायांची रचना अशी असते कीं, त्या उभ्या भिंतीवर सहज चढून जातात. अस्वच्छ जागीं किडे वगैरे जास्त जमतात तेव्हां त्यांस खाण्यासाठीं आसपास पाली चुक् चुक् करीत असतात. पाल आपलें भक्ष्य मिळविण्यास संध्याकाळीं व रात्रीं हिंडूं लागते. ही घाणेरड्या जागीं किडे वगैरे खाऊन राहते. हिचें शरीर लांबट असून चापटकें असतें. डोकें साधारणपणें तिकोनी असून आंखूड मानेनें धडास जोडलेलें असतें. तिचें शेपूट लांब व निमूळतें असते. पाय आंखूड असून आडवे असतात. प्रत्येक पायास पांच पांच बोटें असून शेवटीं नखया असतात. पालीच्या शरीरावर खवल्या-खवल्यासारखें आच्छादन असतें. तिचा पोटाकडील भाग पातळ असतो. पालीचा जबडा रुंद असतो. तिची जीभ लांबट असून

टोंकास दुभंगलेली असते. पालीचे डोळे पुढें आलेले असतात. तिला पापण्यांची इच्छेनुरूप उघडझांप करितां येते. कानाच्या जागीं एक पातळ पडदा असतो, त्याच्यामार्फत तिला फार चटकन् ऐकूं येतें. पालीला दुसरें शेपूट पुन्हां फुटतें. पाल अंडीं घालते. व वरचेवर कांत टाकते. अन्नांत वगैरे जर पाल पडली किंवा तिचें गरळ पडलें तर विषाची बाधा होते.

**पाल राजे**—आठव्या शतकांत कनोजची सत्ता संपुष्टांत आली, तेव्हां बंगालमधल्या सर्व सरदारांनीं कोणी गोपाळदास या शूर मुत्सद्दी नेत्यास आणलें व राजपद दिलें. प्रथम कांहीं दिवस पाटणा व नंतर मोंगीर येथें याची राजधानी होती. सर्व बंगाल याच्या सत्तेखालीं आला. तो स्वतःस सूर्यवंशी मानीत असे. बौद्धधर्मीय असून हिंदुधर्मीयाप्रमाणेंच वागे. यानें राष्ट्रकूट, वर्म, वत्स, वगैरेशीं बऱ्याच लढाया केल्या. हाच पाल राजांचा मूळपुरुष. गोपाल, धर्मपाल, देवपाल, विग्रहपाल, नारायणपाल, राजपाल, दुसरा गोपाल, दुसरा विग्रहपाल, महीपाल, नयनपाल व तिसरा विग्रहपाल असे राजे एकामागून एक झाले. हे क्षत्रिय होते. राष्ट्रकूट व हैहय घराण्यांशीं यांचे लग्नसंबंध होत. सांप्रतचा बंगाल, बिहार, ओरिसा व आसाम हा प्रदेश यांच्या राज्यांत मोडत असे. हे बौद्ध धर्माला प्रोत्साहन देणारे हिंदुस्थानांतील शेवटचेच राजे दिसतात. तिबेटांतील बौद्धपंथाला यांनीं मदत दिली. ते प्रथम बौद्ध होते; परंतु पुढें हिंदु शैव झाले व त्यांनीं ठिकठिकाणीं शिवमंदिरें बांधलीं. ११ व्या शतकांत बंगालमधून पालांचें उच्चाटण झाल्यावर त्यांनीं कांहीं दिवस बिहारमध्यें राज्य केलें.

**पॉल (संत)** (इ. स. १ ले शतक)—हा ख्रिस्ती धर्माचा दुसरा संस्थापक. त्याचा जन्म आशिया मायनरमधील रोमन सत्तेच्या सिलिशिया प्रांताची राजधानी टार्सस येथें झाला. त्याचे आईबाप ज्यू धर्माचे होते, आणि बाप रोमन नागरिक असल्यामुळें तो वारसाहक्कानें रोमन होता. प्रथम तो कट्टर ज्यू-धर्मी व ख्रिस्तीधर्मविरोधी होता; त्यामुळें दमास्कस येथें ख्रिस्ती धर्मप्रसारास विरोध करण्याची कामगिरी त्याला जेरुसलेमच्या अधिकाऱ्यांनीं सांगितली. तो दमास्कसला पोंचला, तेव्हां त्याला येशू ख्रिस्ताचें दर्शन झालें, व तो एकदम ख्रिस्ती झाला; व ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याकडे त्यानें आपलें बुद्धिसामर्थ्य व संघटनाचातुर्य लावलें. पॉलनें बार्नाबासच्या सहकार्यानें सायप्रस बेटांत व आशिया मायनरच्या दक्षिणेकडील पिसिडिया व पॉम्फिलिया या प्रदेशांत तीन वर्षें पुष्कळ ख्रिस्ती धर्मप्रसार केला. यहुदी कायदा मान्य करील त्यालाच ख्रिस्ती चर्चमध्यें प्रवेश मिळावा, अशी अट जेरुसलेमच्या ज्यू अधिकाऱ्यांनीं घातली, पण त्या बाबतींत पीटरच्या मध्यस्थीनें पॉलशीं तडजोड झाली.

पॉलनें नंतर आशिया मायनर, मॅसेडोनिया, कॉरिंथ, अथेन्स या प्रदेशांत धर्मप्रसारांत चांगलें यश मिळविलें. नंतर एफेसस येथें मुख्य ठाणें ठेवून पॉलनें आशिया व युरोप या दोन्ही खंडांत धर्मप्रसारकार्य चालू केलें; पण दोन वर्षांनीं तेथें पॉलविरुद्ध स्थानिक बंड झालें, म्हणून तो जेरुसलेमला गेला. तेथें त्याला कैद झाली व पुढेंहि सीझरीया व रोम येथें त्याला कैदेंत ठेवलें; या कैदेंत सुमारें दहा वर्षें डांबल्यावर अखेर त्याला इ. स. ६७ पूर्वी नीरो या रोमन बादशहानें ठार मारलें. रोमन्स, कॉरिंथियन्स, गॅलशियन्स, एफेशियन्स, फिलिपीयन्स, कोलोशियन्स, थेसेलोनियन्स, टिमोथी, टायटस, हिब्रूज यांना उद्देशून लिहिलेलीं नव्या करारा (न्यू टेस्टामेंट) मधील पत्रें पॉलचीं आहेत.

**पाल, ख्रिस्तोदास** (१८३८–१८८४)—एक बंगाली सार्वजनिक कार्यकर्ता. याला विद्यार्थीदशेपासून लेखनाची व वक्तृत्वाची हौस व संवय होती. हा 'हिंदु पेट्रिअट' पत्राचा सहसंपादक व पुढें मुख्य संपादक झाला. अनेक महत्त्वाच्या जागांवर काम केल्यावर व्हाइसरॉयच्या कायदेमंडळांत सभासदत्वाचीहि जागा त्याला मिळाली व अनेक पदव्या मिळाल्या. त्याचे स्मारक म्हणून कलकत्त्यास एक पुतळा उभारला आहे (१८९४).

**पाल, विपिनचंद्र** (१८५८—१९३२)— बंगालचे एक प्रमुख देशभक्त आणि पुढारी. यांनीं प्रथम ब्राह्मो पंथांत शिरून त्याचा प्रचार चालविला. स्वतः पुनर्विवाह केला. हे शिक्षकाचा व्यवसाय करीत. राजकारणांत पडल्यावर हे एक अत्यंत लोकप्रिय वक्ते ठरले. स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण यांचा प्रसार करण्याकरितां यांनीं सर्व देशभर दौरा काढला होता. १९०६ सालीं काँग्रेसमध्यें यांनीं बहिष्काराच्या ठरावावर भाषण केलें होतें. मद्रास येथील त्यांच्या दौऱ्यांतील भाषणें फार कडक होतीं. याकरितां त्यांस मद्रास सोडण्यास भाग पाडण्यांत आलें होतें. लाल–बाल–पाल ही राष्ट्रीय त्रिमूर्ति त्या वेळीं प्रसिद्ध होती. लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दींत त्यांस हद्दपार करण्यांत आलें होतें. अरविंद घोष यांच्यावरील 'वंदे मातरम्' बद्दल झालेल्या खटल्यांत साक्ष देण्याचें नाकारून यांनीं सहा महिन्यांचा बंदीवास पत्करला. इंग्लंडमध्यें असतांना 'हिंदु रिव्ह्यू' नांवाचें मासिक ते चालवीत असत. या मासिकांत बाँबच्या केलेल्या मीमांसेबद्दल त्यांच्यावर येथें आल्यावर खटला भरण्यांत आला, पण त्यांनीं माफी मागितली. ते पुन्हां ब्राह्मो चळवळीकडे वळले व अँग्लो-इंडियन पत्रांत लेख लिहूं लागले. होमरूलच्या चळवळींत हे लो. टिळकांबरोबर होते. १९२८ सालच्या सर्वपक्षीय परिषदेस ते हजर होते. मागें 'न्यू इंडिया' व 'वंदे मातरम्' पत्रांतील त्यांच्या लेखांनीं तरुणांच्या मनावर फार मोठा परिणाम झाला होता, पण आयुष्याच्या अखेरीस यांची पूर्वीची लोकप्रियता राहिली नाहीं. यांनीं आपलें चरित्र लिहिलें आहे.

**पॉल, म्युनि** (१८९७– )—एक प्रख्यात युरोपियन नट. याचें सबंध नांव म्युनि वीसेन फ्रूंड असें असून हा धर्मानें ज्यू आहे. वयाच्या चौदाव्या वर्षापासून हा रंगभूमीवर कामें करीत आहे. बोलपट निघाल्यानंतर यानें त्यांतहि इतकीं सुंदर कामें केलीं कीं, त्याचा एक मोठा चाहता स्वतंत्र प्रेक्षकवर्गच तयार झाला. 'गुड अर्थ', 'एमिल झोला', वगैरे बोलपटांची त्याच्यामुळें फार ख्याति झाली. प्रत्येक भूमिकेंत तो आपलें वैशिष्ट्य दाखवितो.

**पालक**—[ वर्ग–चेनोपोडिआसी स्पिनाक ]. या जातीची एकच वनस्पति आहे (स्पिनासिआ ओलेरासिआ). आपल्याकडे ही एक पालेभाजी म्हणून प्रसिद्ध आहे. हिचे दोन प्रकार बागेतून लावण्यांत येतात. त्यांपैकीं एका जातीच्या फळास कांटे असतात व दुसरीं गुळगुळीत असतात.

**पालक**—कायद्यांत पालक (गार्डियन) म्हणजे एकवीस वर्षांच्या आंतील वयाचा अज्ञान मुलगा किंवा मुलगी पोरकी असल्यास म्हणजे त्यांचा बाप व आई नसल्यास ज्या इसमाच्या ताब्यांत अशा अज्ञानांना देतात, तो इसम. तो अज्ञान व त्याची मालकीची मिळकत या दोहोंचा ताबा त्या पालकाकडे असतो. इंग्लंडांत १८८५ च्या कायद्यानें असें ठरवलें आहे कीं, जर बाप वारल्यावर आई हयात असेल तर त्या अज्ञानाचें पालकत्व नेमलेला पालक व आई या दोघांकडे असतें.

इंग्लंडच्या दिवाणी कायद्यांत 'क्युरेटर' याचा अर्थ चौदा वर्षें वय पुरें झालें आहे अशा अज्ञान मुलाचा, आणि बारा वर्षें वय पुरें झालें आहे अशा मुलीचा नेमलेला पालक असा आहे. शिवाय कित्येक प्रकारच्या व्याधींमुळें स्वतः व्यवहार करण्यास असमर्थ बनलेल्या इसमांचा नेमलेला पालक किंवा मरण पावलेल्या इसमाच्या किंवा गैरहजर इसमांच्या (ॲबसेंट पर्सन्स) आणि नादार बनलेल्या इसमांच्या इस्टेटीची व्यवस्था पाहण्याकरितां नेमलेल्या इसमालाहि क्युरेटर म्हणतात. क्युरेटर मुख्यतः इस्टेटीची व्यवस्था पाहण्याकरितां नेमतात, आणि तितक्यापुरते अशा इसमांचे पालक ते असतात.

हिंदुस्थानांत पालकांबद्दलचा 'गार्डियन अँड वार्ड्स ॲक्ट' १८९० सालीं झालेला आहे. १८ वर्षें पूर्ण झालीं नाहींत अशा अज्ञान मुला-मुलींचा 'गार्डियन' मृत्युपत्रानें किंवा कोर्टाकडून सदर कायद्यानुसार नेमता येतो. गार्डियन–पालक–नेमण्याबद्दल कोर्टाकडे अर्ज अज्ञानाच्या नातेवाइकाला किंवा इष्टमित्राला करतां येतो. मृत्युपत्रान्वयें नेमलेला पालक आपल्या सत्तेचा दुरुपयोग करीत असेल, किंवा आपलें कर्तव्य नीट

करीत नसेल, अज्ञानाच्या हितसंबंधांत पालकहितसंबंधाचा विरोध आला, किंवा पालक कर्जबाजारी होऊन दिवाळखोर व नादार बनला, तर कोर्टाकडे अर्ज करून दुसरा पालक नेमतां येतो. अशा पालकानें अज्ञानाच्या आरोग्याची, अन्नवस्त्राची, शिक्षणाची, अज्ञानाच्या नातलगांच्या अवश्य त्या खर्चाची व त्यांच्या लग्नकार्यादि खर्चाची, आणि अज्ञानाच्या मिळकतीची व्यवस्था फार काळजीपूर्वक केली पाहिजे ( कलमें ८, ३९, २४, २७). कोर्टानें नेमलेल्या पालकाला त्याच्या श्रमाबद्दल कोर्टास योग्य वाटेल ती रक्कम मेहनताना देण्यांत येईल ( कलम २२ ). सदर मेहनतान्याखेरीज पालकानें अज्ञानाच्या इस्टेटींतून आपला फायदा करून घेतां कामा नये ( आपलें घर भरतां कामा नये ). अज्ञानाचें हित कशांत आहे त्याकडे लक्ष दिलें पाहिजे ( कलमें १७। २० ).

**पालगड**—मुंबई, रत्नागिरी, खेडच्या वायव्येकडील सीमेवर उंच डोंगरावर हा किल्ला बांधलेला आहे. याचें क्षेत्रफळ सुमारें दीड एकर आहे. हा शिवाजीनें बांधला असें सांगतात. पायथ्याशीं पाली गांव आहे, त्यावरूनच किल्ल्याला नांव मिळालें.

**पालग्रेव्ह, फ्रॅन्सिस टर्नर** ( १८२४–९७ )—एक ब्रिटिश कवि व टीकाकार. याचा बाप सर फ्रॅन्सिस हा बॅरिस्टर असून पुढें सरकारी नोकरींत शिरला. हा ऑक्सफोर्ड येथें १८८५ ते १८९५ पर्यंत काव्य या विषयाचा प्राध्यापक होता. त्याचे प्रसिद्ध ग्रंथ आहेत ते म्हणजे 'आयडिअल्स अँड सॉंग्ज' ( १८५४ ), 'गोल्डन ट्रेझरी ऑफ दि बेस्ट सॉंग्ज अँड लिरिकल पोएम्स' ( उत्कृष्ट गीतें आणि भावगीतें यांचा सुवर्ण-करंडक ) आणि 'सिलेक्टेड लिरिकल पोएम्स ऑफ हेरिक' ( १८७७ ) हे होत. 'इंग्लिश कॉमनवेल्थ' ( १८३२ ), इंग्लंड आणि नॉर्मंडी यांचा इतिहास, वगैरे आणखी याचे ग्रंथ आहेत.

**पालनपूर**—एजन्सी–मुंबई प्रांताच्या अगदीं उत्तर भागांत गुजराथी संस्थानांचा हा संघ असे. सिंधच्या लुटारू लोकांपासून बचाव व्हावा म्हणून एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीपासून एकेक संस्थान ब्रिटिशांचा आश्रय करूं लागलें. त्यांना त्याबद्दल ब्रिटिशांस खंडणी द्यावी लागे. ती १८२५ पासून माफ झाली.

संस्थान—मुंबई इलाखा, गुजराथेंतील एक संस्थान. उत्तरेस मारवार व सिरोही संस्थानें, पूर्वेस सिरोही, दांता व महीकांठा संघ, दक्षिणेस बडोदें संस्थान व पश्चिमेस बनासकांठा संघ आहे. क्षेत्रफळ १,७७४ चौ. मै.. लोकसंख्या ( १९४१ ) ३,१५,८५५. गांवें ५११. येथील संस्थानिक युसफझई लोदाणी पठाण वंशाचे आहेत. गायकवाड, बडोदें यांस या संस्थानांतून ३८,४६२ खंडणी मिळत असे. संस्थानचें उत्पन्न सु. २४ लक्ष रु. आहे. तांदूळ, धान्यें, साखर व कापड यांचा मोठा व्यापार चालतो. पालनपूर ही राजधानी खोलांत आहे. भोंवतीं टेंकड्या आहेत. गांवाभोंवतीं तट आहे. चावडावंशसंस्थापक वनराज याचें बालपण येथेंच गेलें. पोवार घराण्याच्या वेळीं हें राजधानीचें ठिकाण होतें. हल्लींचे संस्थानिक नबाब ताले महंमदखान १९१८ सालीं गादीवर आले. यांना १९३६ सालीं लेफ. कर्नलचा हुद्दा मिळाला. १९२८ सालीं जिनेवा येथें भरलेल्या राष्ट्रसंघाच्या बैठकीस हिंदुस्थान सरकारनें यांना धाडलें होतें. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**पालादीओ, आन्द्रिआ** (१५१८–१५८०)—एक इटालियन वास्तुशिल्पकार. त्यानें रोम शहरीं शिल्पकलेचा अभ्यास केला आणि व्हेट्रुव्हियस आणि आल्बेर्टी यांच्या शिल्पकामाचा त्याच्यावर परिणाम झाला. नंतर त्यानें व्हिसेंजा या गांवीं अनेक मोठमोठाल्या इमारतींचे नमुनानकाशे काढून दिले. तसेंच इटली शहरांतील अनेक मोठमोठ्या इमारतींचे नमुनानकाशे त्यानेंच तयार करून दिले. याशिवाय उत्तर इटलीमधील अनेक खेडे-गांवांतील इमारतींचे नकाशे त्यानेंच केले. त्यानें वास्तुशिल्पावर एक पुस्तक लिहिलें. पालाडियन वास्तुशिल्पपद्धति इंग्लंड देशांत इनिगो जोन्स या शिल्पकारानें सुरू केली.

**पालामास, कोस्टेस** ( १८५९–१९४२ )— अर्वाचीन ग्रीसचा अग्रणी कवि. त्याच्या मनाची ठेवण बौद्धिक आणि आध्यात्मिक असून ग्रीक काव्यांत त्यानें विविध प्रकार सुरू केले. प्राचीन बायझान्टाइन व अर्वाचीन जगांत ग्रीक प्रकृति सर्वांगांनीं एकसारखी साकल्यानें प्रतीत होत आहे हें दाखवून देण्याचा पालामासानें जन्मभर प्रयत्न केला. त्याचा एक संप्रदाय तयार झाला हा त्याचा विजय म्हणतां येईल. अर्वाचीन ग्रीक वाङ्मयाची उंची किती आहे याची कल्पना त्याच्या काव्यावरून येते.

**पालाश**—( पोटॅशिअम ). एक रासायनिक मूलद्रव्य. परमाणुभारांक ३९·१०. १८०९ सालीं डेव्हीनें जवखारा-( पोटॅश ) मध्यें हें मूलद्रव्य शोधून काढलें. आश्मिका( लिथियम )च्या खालोखाल हा हलका धातु आहे. चाकूनें हा कापतां येतो, आणि हातानें त्याची पाहिजे तशी गोळी करतां येते. पालाश उज्जिद ( पोटॅशियम हायड्रोक्साइड ) किंवा पालाश हरिद (पोटॅ. क्लोराइड) यापासून विजेच्या साहाय्यानें हा तयार करतात. हा प्राणवायूबरोबर सहज संयोग पावतो, व पाण्याचें विघटन करतो. ह्याच्या लवणांपैकीं स्तम्भिद ( ब्रोमाइड ), नैलिद ( आयोडाइड ) आणि द्विकर्बित ( बाय कार्बोनेट ) ह्यांचा औषधांत उपयोग होतो. नत्रेत ( नायट्रेट, साल्टपीटर ) आणि

हरिद (क्लोरेट) आगपेट्या तयार करण्यासाठीं आणि द्विक्रुमित (बाय क्रोमेट) कापडावरील रंगकामासाठीं उपयोगी पडतात.

**पालाश परमंगनेत**—(पोटॅशिअम परमँगनेट). याच्या द्रावणास काँडीचा द्रव म्हणतात. हें औषध जंतुघ्न आहे. याचा उपयोग दुर्गंधीचा नाश करण्याकरितां किंवा तापामध्यें जंतुघ्न म्हणूनहि करण्यांत येतो. घटसर्प झाला असतां याच्या गुळण्या करतात; तसेंच इतरहि घशाचे रोग झाले असतां हें औषध वापरतात. जखमा व गळवें धुण्याकरितां याचा उपयोग फार असतो.

**पालाश लवणें**—पालाश हरिदें (पोटॅशिअम क्लोराइड) असणारीं हीं खनिजें आहेत. बाजारांत त्यांचे अनेक प्रकार दिसतात. उदा., कायनाइट, कार्नेलाइट सिल्हाइन. शेवटच्या प्रकारात पुष्कळ वेळां सैंधव (रॉक सॉल्ट) असतें, व तेव्हां त्याला सिल्हनाइट असें म्हणतात. पालाश लवणांचा शेतीकरिता खत म्हणून उपयोग होतो. स्टासफर्ट आणि ऱ्हाइन-वेल या ठिकाणांहून मुख्यतः हीं लवणें येतात.

**पालिठाणा**—मुंबई इलाखा, काठेवाड प्रांत, एक संस्थान. क्षेत्रफळ ३०० चौरस मैल. पर्जन्यमान २५ इंच. हवा उष्ण व रोगट. नेहमीं तापसराई चालूच असते. लोकसंख्या (१९४१) ७६,४३२. याच संस्थानांत जैनांचें पवित्र ठिकाण तीर्थंकर आदिनाथ, शत्रुंजय टेंकडीवर आहे. समुद्रसपाटीपासून उंची १९७७ फूट. पालिठाणा ही संस्थानची राजधानी. लोकसंख्या १५,०००. हा गांव शत्रुंजय टेंकडीच्या पूर्व पायथ्याशीं वसला आहे. शत्रुंजय क्षेत्राबद्दल जैनांकडून सालीना १५,००० रुपये खंडणी मिळते; त्यामुळें जैन यात्रेकरूंस यात्रेचा कर द्यावा लागत नाहीं.

हल्लींचे संस्थानिक ठाकोरसाहेब बहादुरसिंहजी मानसिंहजी हे १९१९ सालीं राज्यकारभार पाहूं लागले. हें संस्थान आतां सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे.

**पाली भाषा व वाङ्मय**—पाली भाषा संस्कृतपासून झाली नसली तरी तिला संस्कृतची धाकटी बहीण म्हटल्यास अयोग्य होणार नाहीं. पाली या शब्दाची व्युत्पत्ति 'प्रकट'पासून असल्याचें इतिसाचार्य राजवाडे सांगतात. जर्मन पंडित विंटरनिट्झ पालीचा मूळ अर्थ 'रांग' समजतो. या भाषेचें व्याकरण बहुतेक संस्कृतच्या धर्तीवरच आहे. लिपि ब्राह्मी आहे व तिचीं सिंहली, ब्रह्मी, कांबोजी, वगैरे वळणें आहेत. ज्या देशाचें लिखाण असतें त्या ब्रह्मी, सिंहली, किंवा कांबोजी लिपींत ही भाषा लिहिण्यांत येते. पाली व संस्कृत भाषांच्या व्याकरणांत फारसा फरक आढळणार नाहीं. संस्कृत स्वर-व्यंजनांप्रमाणें पालींतहि स्वर-व्यंजनें आहेत. पण ऋ व ऌ हे स्वर नाहींत; तसेंच ऐ व औ हें स्वरद्वय नाहीं; तर अ, इ, उ हे तीन ऱ्हस्व स्वर; आ, ई, ऊ, ए, व ओ हे पाच दीर्घ स्वर, व अम्, इम्, उम्, हे तीन अनुनासिक स्वर आहेत.

व्यंजनें दोन प्रकारचीं मानितात: घोसवा (आवाजी) व अघोसा (मुकीं). घोसवाः—क, च, ट, त, प या पांच वर्गांतील शेवटचीं तीन तीन व्यंजनें, व य्, र्, ल्, व्, आणि ह्. अघोसाः—पांच वर्गांतील पहिलीं दोन दोन व्यंजनें व स्. पाली शब्दाच्या अंतीं नेहमीं स्वर असतो त्यामुळें विभक्तिप्रत्यय लावतांना संस्कृतप्रमाणें फारसा त्रास पडत नाहीं. पाली भाषेंत तीन लिंगें, दोन वचनें (द्विवचन बहुधा उपयोगांत आणीत नाहींत) व आठ विभक्त्या आहेत. भवादि, दिवादि, रुधादि, स्वादि, क्रियादि, तनादि, चुरादि असे क्रियापदांचे सात वर्ग संस्कृतप्रमाणें पाडतात. वर्तमान आणि अपूर्णभूत हे विशिष्ट काळ, व पूर्णभूत, अद्यतनभूत, भविष्य व संकेतार्थ असे सामान्य चार काळ मानतात. अव्ययें, धातुसाधितें, वगैरे संस्कृतांतल्याप्रमाणेंच होतात. द्वंद्व, तत्पुरुष, कर्मधारय व अव्ययीभाव हे समास आढळतात.

ही भाषा ख्रि. पू. ७ व्या शतकापासून उत्तर हिंदुस्थानांत चांगले सुधारलेले लोक उपयोगांत आणीत आहेत. आजहि ती ब्रह्मदेश, सयाम व सिलोन यांची वाङ्मयीन भाषा आहे. जगांत ज्या कांहीं थोड्या वाङ्मयीन भाषा महत्त्वास चढल्या आहेत त्यांपैकीं पाली ही एक आहे. धार्मिक व राजकीय कारणांमुळें पालीला हें महत्त्व प्राप्त झालें. ख्रि. पू. ७ व्या शतकांत कोसल राष्ट्राच्या उत्कर्षामुळें पाली भाषेला मोठी मान्यता मिळाली व आजच्या इंग्रजीप्रमाणें ती जागतिक दळणवळणाची माध्यम होऊन बसली. गौतम बुद्धानें या भाषेच्या द्वारेंच आपला धर्म पसरविला. लूथरच्या धर्मसुधारणेच्या चळवळीमुळें जर्मन भाषेला जी प्रसिद्धि मिळाली तीच या बौद्ध संप्रदायी पाली भाषेला प्राप्त झाली.

प्राचीन काळीं या पाली भाषेला मागधी भाषा म्हणत. मागधी म्हणजे मगध देशांत बोलली जाणारी भाषा नव्हे, तर कोसल आणि मगधाचा सम्राट् जो अशोक त्याच्या दरबारीं प्रचारांत असलेली भाषा होय. भाषाशास्त्रदृष्ट्या मागधी हें नांव चुकीचें असलें तरी ऐतिहासिक दृष्ट्या तें अगदीं योग्य होईल. पाली भाषेचीं निरनिराळीं रूपें दृष्टीस पडतात, पण आज पाली हें नांव फक्त बौद्ध धर्मग्रंथाच्या भाषेला लावणें योग्य होईल. तिपीटक किंवा बौद्ध धर्मशास्त्र पालीमध्यें आहे. सिलोन, ब्रह्मदेश, वगैरे ज्या प्रदेशांत बौद्ध संप्रदाय-विशेषतः त्याचा हीनयान हा पंथ प्रचलित होता तेथें पाली भाषा बरीच दृढमूल झाली व त्या देशांतील प्राचीन धार्मिक वाङ्मय याच भाषेंत रचलें गेलें. अर्वाचीन

काळीं मात्र या भाषेस संस्कृत भाषेचीच स्थिति प्राप्त झाली आहे व ही बोलण्याच्या प्रचारांतून गेली असून नवीन वाङ्मयहि तींत क्वचितच तयार होतें.

पाली वाङ्मय—बौद्ध धर्माचें वाङ्मय कांहीं पालीमध्यें आहे व कांहीं संस्कृतमध्यें आहे. गौतम बुद्धाच्या काळीं ज्या अनेक प्राकृत भाषा भारतांत प्रचलित होत्या त्यांच्या मिश्रणानें पाली भाषा बनली व त्या भाषेंत बुद्धानें व त्याच्या शिष्यांनीं धर्मप्रचार केला. बुद्धदेवाचें सर्व धर्मशास्त्र त्रिपीटक (तीन करंडे) या पाली ग्रंथांत एकत्र केलेलें सांपडतें. १ विनय पीटक (आचारधर्म), २ सुत्तपीटक (धर्मसंवाद), व ३ अभिधर्म पीटक (तत्त्वज्ञान) हे त्रिपीटकाचे भाग आहेत. त्यांत बुद्ध व त्याचे शिष्य यांचीं संभाषणें, काव्यें, कथानकें, आणि संप्रदायाचे नियम दिलेले आहेत. मिलिंद पन्ह (प्रश्न) हा पालींतील एक बौद्ध तत्त्वज्ञानाचा महत्त्वाचा ग्रंथ आहे. यांत राजा मिलिंद हा अनेक विषयांवर प्रश्न विचारतो व भिक्षु नागसेन उत्तरें देतो. यात प्रामुख्यानें नीतिधर्माचें विवेचन आहे. या ग्रंथांत अभिजात वाङ्मय वाचावयाला मिळतें. तिसरा महत्त्वाचा पाली ग्रंथ म्हणजे जातक (पाहा) किंवा जातककथा हा होय. यांत बुद्धाच्या ५५० मागील जन्मांचें वर्णन दिलें आहे. पालीमध्यें तीन मोठे भाष्यकार होऊन गेले : १ बुद्धदत्त, २ बुद्धघोष, व ३ धर्मपाल. बुद्धदत्तानें विनयपीटकावर 'विनयविनिश्चय' नांवाचीं अनेक भाष्यें लिहिलीं. बुद्धघोषानें त्रिपीटकावर अनेक भाष्यग्रंथ लिहिलेच आहेत. पण याशिवाय 'विशुद्ध मग्ग (मार्ग)' म्हणून एक विस्तृत ग्रंथ लिहिला आहे. त्यामध्यें सिलोनांत ह्या काळापर्यंत झालेलीं अनेक भाष्यें व मागच्या अनेक शतकांतील विचारप्रवाह यांचें संकलन केलें आहे. धर्मपाल याचें भाष्य म्हणजे एक कथांचा प्रचंड समूह आहे. दीपवंश आणि महावंश या लंकेच्या इतिहासाच्या बखरी आहेत. त्यांत बराच खराहि इतिहास आहे. पालीमध्यें महाकाव्यें फारशीं नाहींत. तथापि जिनचरित्र, तेलकहाट-गाथा, वगैरे कांहीं सुंदर काव्यग्रंथ आहेत. व्याकरण, कोश, छंद व अलंकार या विषयांवर तुरळक ग्रंथ पालींत आहेत. परंतु ते संस्कृत ग्रंथांचींच रूपांतरें आहेत. बौद्धधर्माचें पहिलें स्वरूप म्हणजे हीनयान पंथ. या पंथाचे सर्व ग्रंथ पालीमध्येंच आहेत. मागाहून जो महायान पंथ निघाला त्याचे ग्रंथ बहुधा संस्कृतमध्यें आहेत. हें संस्कृत शुद्ध नसून प्राकृत, पाली, गाथा व संस्कृत यांचें मिश्र स्वरूप आहे. या महायान पंथाचा संस्कृत ग्रंथसंग्रह फार मोठा आहे. त्याचा रचनाकाळ पहिल्या शतकापासून अकराव्या शतकापर्यंत आहे. या संस्कृत ग्रंथांपैकीं बरेच ग्रंथ नष्ट झाले आहेत, पण त्यांचीं चिनी व तिबेटी भाषांतरें अलीकडे उपलब्ध झालीं आहेत.

**पॉलीनेशिया**—ओशियानिया खंडाचा हा एक मोठा भाग असून तो मेलानेशिया व मायक्रोनेशिया यांच्या पूर्वेस आहे. विषुववृत्ताच्या खालीं आणि वर ३० अंश आणि पूर्वेस आणि पश्चिमेस रेखांश १३५ यामधील पॅसिफिक महासागरांतील हा भूभाग आहे. या प्रदेशांत द्वीपसमूह आहेत ते : हवाई, दि फोनिक्स, मार्क्विसस्, पौऊटोमू, सोसायटी, एलिस, सामोया, युनियन, मॅनिहिकी आणि टॉंगा द्वीपसमूह हे होत. येथील मूळच्या लोकांना पॉलीनेशियन जातीचे लोक हें नांव आहे. हे पिंगट रंगाचे असून यांची साधारण उंची ५´ ८″ असते.

**पॉलीबियस** (खि. पू. २०४–१२२)—एक ग्रीक इतिहासकार. खि. पू. १६८ सालीं रोमन लोकांनीं मॅसिडोनियाचा राजा पर्सियस याचा पराभव केला, व नंतर रोमन सेनेटनें एक हजार ॲकियन इसमांना, रोमन फौजेला मॅसेडोनियावरील स्वारींत कां मदत केली नाहीं याचा जाब विचारण्याकरितां रोम शहरीं बोलावलें, त्यांत पॉलीबियस हा होता. रोम शहरीं असतांना पॉलीबियसचा एल्. एमिलियस पॉलस व त्याचे दोन मुलगे सीपीयो व फेबियस यांच्याबरोबर चांगला स्नेह जमला. त्यामुळें सीपियो आफ्रिकॅनसनें आफ्रिकेवर स्वारी केली. त्या स्वारीबरोबर पॉलीबियस आफ्रिकेंत गेला, व तेथें कार्थेज शहराचा जो विध्वंस झाला, तो त्यानें प्रत्यक्ष पाहिला. पॉलीबियसचा मुख्य ग्रंथ त्यानें लिहिलेला रोमचा इतिहास (खि. पू. २२०–१४०) या काळाचा होय. या इतिहासाचीं चाळीस पुस्तकें होतीं,. पण त्यांपैकीं हल्लीं फक्त पांच संपूर्ण व बाकीच्यांचे बरेचसे भाग उपलब्ध आहेत. इतिहासकाराला लागणारे बहुतेक सर्व गुण त्यांत आहेत.

**पालेमबंग**—हें शहर सुमात्रा बेटांत सूसी नदीच्या कांठीं आहे. हें बंदर फार सोयीचें असल्यामुळें येथें मोठा व्यापार चालतो. लो. सं. ६,००० आहे. येथे ब्रिटिश रेसिडेन्सी असून तिचें क्षे. फ. ३३,१७३ चौ. मैल व लो. सं. १,०९,००० आहे. डच्च रेसिडेन्सी पालेमबंग आणि जांबी या जुन्या राज्यांत समाविष्ट आहे.

**पालेर्मो**—इटली, सिसिली बेटांतील खि. पू. ८–६ शतकांतील एक बंदर व राजधानी. वस्ती ३ लाखांच्या वर. हें शहर मूळ फोनीशिअन लोकांची वसाहत असून तें क्रमानें कार्थेजिनियन व रोमन लोकांच्या ताब्यांत गेलें. नंतर वायझंटाइन, सारासेनिक, नॉर्मन, स्पॅनिश, इटालियन व फ्रेंच सत्तेखालीं होतें. शेवटीं गॅरिबाल्डीनें याला स्वातंत्र्य मिळवून दिलें (१८६०). येथील विद्यापीठ १७७९ सालीं स्थापन झालेलें आहे. बंदर चांगलें बांधलें असून कोरडी गोदीहि या ठिकाणीं आहे. लो. सं. सु. चार लाख.

**पाल्कची सामुद्रधुनी**—मद्रास इलाख्याच्या दक्षिण भागाचा पूर्व किनारा, रामेश्वर ते पदुकोटापर्यंतचा भाग, सिंहलद्वीपाच्या उत्तर टोंकाचा भाग, व तलइ मानारपासून जाफनापर्यंतचा भाग, यांमध्यें हा पाल्कचा उपसागर अथवा आखात आहे. रामाच्या सेतूच्या ईशान्य भागांत हें पाल्कचें आखात असून नैर्ऋत्य भागांत मानारचें आखात आहे. यालाच पाल्कची सामुद्रधुनी असें म्हणतात.

**पाल्मायरा**—सीरिया, एक ऐतिहासिक शहर. याची जागा दमास्कसच्या ईशान्येस १५० मैलांवर एका ओसाड मैदानांतील ओलवणांत १३०० फूट उंचीवर होती. पॅलमाइरा हें या पौरस्त्य शहराचें ग्रीक नांव. याचें स्थानिक मूळ नांव टॅडमोर. याच नांवानें अरब लोक त्याचा हल्लींहि उल्लेख करतात. खि. पूर्व ९ व्या शतकात हें रोमन व पार्थिअन व्यापाराचें केंद्र होतें. येथील संस्कृति अरबी–ग्रीक–रोमन अशी संमिश्र होती. रोमन वसाहतीपासून याचा उदय होऊन क्रमानें तें फार पुढें आलें होतें. पूर्वेकडील अरबांप्रमाणेंच यांचा धर्म व याचे देव असत.

**पाल्य**—इंग्लिश कायद्यांत जो इसम कायद्याच्या दृष्टीनें कायदेशीर कृत्यें करण्यास असमर्थ असतो ( उदा., वेडा इसम किंवा २१ वर्षें वयाच्या आंतील अज्ञान ), त्याला दुसरा कायदेशीर पालक इसम नेमून त्याच्या ताब्यांत दिलेलें असतें अशा इसमाला पाल्य ( वॉर्ड ) म्हणतात. जर अशा पाल्य इसमाचा पालक कोर्टानें नेमलेला असेल, किंवा अशा अज्ञान इसमाच्या मिळकतीची व्यवस्था खुद्द कोर्टानें आपल्या देखरेखीखालीं घेतलेली असेल तर अशा अज्ञान्याला कोर्टाचा पाल्य ( वॉर्ड ऑफ कोर्ट ) म्हणतात. हल्लीं हिंदुस्थानांतहि अशाच स्वरूपाचा कायदा आहे ( दि गार्डियन अँड वॉर्ड्स ॲक्ट, कलमें ७।१५।१७ ). पालक पाहा.

**पाल्याची लेणीं**—मुंबई, कुलाबा जिल्हा. गाधारी नदीच्या पश्चिम बाजूस पालेगांवाजवळ एका टेंकडींत हीं लेणीं कोरलीं आहेत. लेण्यांचे तीन मजले असून ४७ खोल्या आत आहेत. सभामंडपांत मोठा स्तूप असून त्यावर ६ मूर्ती आहेत. इतर कांहीं स्तूपांवर पाली भाषेंत लेख आहेत.

**पालमकोट्टा**—मद्रास इलाखा, तिन्निवेली जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें ताम्रपर्णी नदीकांठीं आहे. १८६६ मध्यें म्युनिसिपालिटी झाली. लो. सं. ५२,०००. हवा चांगली पण पाण्याचें दुर्भिक्ष. मुलींकरितां एक स्वतंत्र कॉलेज आहे.

**पावटा**—याच्या अनेक जाती आहेत व प्रांतभाषाभेदानें याला अनेक नांवेंहि आहेत. याचे वेल आंखूड, मध्यम लांब ; शेंगाहि आंखूड, लांब, चपट्या व गोलसर अशा असतात. झाडाला उग्र वास असतो ; भाताचें पीक निघाल्यावर काढतात. पावट्याचें रब्बीचें स्वतंत्र पीक काढतात. कोंकणांत वर्णी व कडवे या दोन जाती आहेत. सोमेश्वरी वर्णे प्रसिद्ध आहेत. हिरवा पावटा दुभत्या गुरांना घालतात. पावट्याच्या मागून भाताचें पीक चांगलें होतें.

**पावती**—पैसा किंवा इतर कोणताहि माल पोहोंचल्याबद्दल जो लेखी मजकूर लिहून देतात, त्याला पावती म्हणतात. इंग्लंडांत दोन पौंड किंवा त्याहून अधिक रकमेची पावती असेल, तर तिला दोन पेनीचा स्टँप लावावा लागतो. तसा स्टँप लावलेला नसेल तर ती पावती कोर्टातील पुराव्यांत दाखल करून घेतां येत नाहीं, असा कायदा आहे. हिंदुस्थानांतहि अशाच स्वरूपाचा कायदा असून वीस किंवा त्यांहून अधिक रुपये रकमेच्या पावतीला एक आण्याचें रेव्हेन्यू तिकिट लावावें लागतें.

**पावनगड**—कोल्हापूरजवळ पन्हाळगडाच्या पूर्वेस सुमारें अर्ध्या मैलावर एका डोंगरावर बांधलेला हा किल्ला आहे. पन्हाळगड व पावनगड याच्यामध्यें एक मोठें खोरें आहे. किल्ल्याच्या सभोंवार खडकाचा कडा असून कांहीं ठिकाणीं तो मुद्दाम फोडून अवघड केला आहे व शिवाय १४ फूट उंच काळ्या दगडाचा भक्कम तट आहे. आतां तट व दरवाजे पाडून टाकलेले आहेत. याला पवनगड असेंहि म्हणतात. पन्हाळगड व हा भोज शिलाहारानें बांधला. १६६० त शिवाजीनें हा जिंकून घेतला. पुढें कांहीं दिवस मोंगलांकडे होता तो रामचंद्रपंत अमात्यानें परत मिळविला.

**पावरोटी**—यस्टिसारखे विपाकप्रवर्तक पदार्थ घालून आंबविलेल्या कणिकेची ही बनवितात. आंबविल्यामुळें ही फुगते. ही भट्टींत चांगली भाजतात. पाश्चात्य देशांत हेंच मुख्य खाद्य असल्यानें याविषयीं कडक कायदे केलेले आहेत. ही वजनानें विकली जाते. गव्हाखेरीज इतर धान्याची पावरोटी केली असल्यास तीवर तसा शिक्का पाहिजे, असा कायदा आहे. पूर्वी पाश्चात्य देशांत घरोघरीं आपल्याकडील भाकरी-पोळ्यांप्रमाणें पाव करीत. पण पुढें पाव करण्याचे कारखाने निघाले, तेव्हां आज अशा 'बेकरी' तून तयार झालेल्या पावांचा दुधाप्रमाणें रतीबच असतो यांत नवल नाहीं. तिकडे यंत्राच्या साहाय्यानें पाव बनवितात. लंडनमध्यें पाववाल्यांची संस्था १३०० सालापासून दिसून येते. आज या धंदेवाल्यांचे मोठे संघ आहेत. हिंदु धर्मांत ही रोटी निषिद्ध मानली गेल्यानें पूर्वीं गोवें वगैरे प्रांतांत पावाच्या विटाळानेंहि लोक बाटले व खिस्ती कळपांत नाइलाजानें गेले.

—न आंबविलेली रोटी ( ब्राउन ब्रेड ) पुढें
... येते : पाऊण रत्तल कणीक घेऊन तींत पाव
मिसळावा. त्यांत एक चहाचा चमचाभर

मीठ व सोडा घालून दोन चमचे क्रीम ऑफ टार्टर घालावी. नंतर त्यांत दोन औंस मार्जोरिन् किंवा लोणी घालून त्यांत अर्धी बाटली दूध घालून चांगलें मळावें. मळून झाल्यावर त्याचे दोन वाटोळे गोळे करावे व त्यांमध्यें रेघा पाडून उभे-आडवे भाग करावे. नंतर भट्टींत तीस मिनिटें किंवा चांगली फुगेपर्यंत व करडा रंग येईपर्यंत भाजून काढावी व ताक असल्यास तें घालून क्रीम ऑफ टार्टर फक्त एक चमचा घालावें.

**पावलोव्ह, इव्हान पेट्रोविच** (१८४९–१९३६)—एक रशियन इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञ. त्यानें पचनेंद्रियें आणि मज्जा-तंतुरचना या विषयांवर ग्रंथ लिहिला. शिवाय त्यानें प्राण्यानें संपादन केलेले गुण त्याच्या संततींत किती प्रमाणांत संक्रांत होतात, यासंबंधींचे प्रयोग उंदरांवर केले व त्या त्याच्या प्रयोगांकडे अनेक विद्वानांचें लक्ष वेधलें होतें. रॉयल सोसायटीनें त्याला आपला परदेशीय सभासद करून घेतलें होतें. त्याला नोबल पारितोषिकहि मिळालें होतें.

**पावलोव्हा, ॲना** (१८८५—१९३१)—एक रशियन नर्तिका. वयाच्या दहाव्या वर्षापासून ही नृत्यकला शिकूं लागली व पुढें रंगभूमीवर प्रयोगांत कामें करूं लागली. हिनें या कलेंत फार मोठें नांव मिळविलें. १९१० सालीं प्रथम लंडनला गेली व पुढें १९२३ सालीं स्वतःची कंपनी घेऊन येऊन इंग्रज प्रेक्ष-कांना तिनें वेडावून सोडलें. अजंठ्याच्या चित्रांतील नृत्यकलेचाहि तिनें अभ्यास केला होता.

**पावा**—बांसरी. अलगूज पाहा.

**पावागड**—मुंबई प्रांत, पंचमहाल जिल्हा, कलोल तालुका. हा डोंगरी किल्ला २८०० फूट उंचीवर आहे. बडोद्यापासून पूर्वेकडे २८ मैल. दक्षिण टोंकाला २५० फूट उंचीच्या शिखरावर काली देवीचें देऊळ आहे. जैन व मुसलमानी वास्तूंचे पुष्कळ अवशेष आहेत. शिलालेखांत याचें नांव 'पावकगड' असें आहे. शाहिर चांद 'तुंअर रामगौड' (तोमर) पावागडचा राजा होता, असें सांगतो. रजपूत, मोंगल, शिंदे, व ब्रिटिश असें याचें हस्तांतर होत गेलें.

**पावित्र्य**—हिन्दुधर्मशासनांत, स्वच्छता, शुद्धता, पावित्र्य यांजवर विशेष भर दिलेला असतो. स्मृति वगैरे धर्मशास्त्रविषयक ग्रंथांत 'अशौच-निर्णय', 'शुद्धितत्त्वें', 'शुद्धिमयूख', इत्यादि या विषयांवर स्वतंत्र ग्रंथहि आहेत व बहुतेक सर्व धर्मग्रंथांत याविषयीं स्वतंत्र प्रकरणें आहेत. मनुष्याचा जन्म अशुद्ध व अपवित्र स्थितींत होतो व जन्मापासून मरेपर्यंत मनुष्याच्या मागें धर्मानें शुद्धाचरण विधी लावून दिले आहेत. जननाशौच, मृताशौच, स्त्रियांचा मासिक ऋतुमती होण्याचा काळ, नित्याचीं मलमूत्रोत्सर्गादि कर्में, वगैरे प्रसंगीं अशौच-परिहाराचा काळ, विधी वगैरे शास्त्रानें घालून दिलेले आहेत. सर्व संस्कारहि शुद्धीकरण व पावित्र्यसंवर्धन याच्याकरितांच असतात. बाह्यशुद्धि, अंतःशुद्धि, प्रायश्चित्तविधि, तीर्थयात्रा, तीर्थस्थानें, वस्त्रविशेषांतर-धूतवस्त्र, सोंवळें, वगैरे विषयांत सर्वत्र एकच धोरण दिसून येतें. बौद्ध, जैन, पारशी, चिनी, ख्रिस्ती, वगैरे सर्व धर्मांत, देशांत, लोकांत शुद्धता व पावित्र्य यांजकडे तत्त्वतः लक्ष दिलेलें असतें. चित्तशुद्धि, शील, चारित्र्य या व अशा सर्व गोष्टी पावित्र्यहेतुक असतात. अस्पृश्यता हीहि जुनी पावित्र्यरक्षक घटना होती.

**पाशुपतदर्शन**—हें माहेश्वरी पंथाचें दर्शन आहे. पशुपति ही रुद्रवाचक संज्ञा वैदिक वाङ्मयांतली आहे. पशूंचा मालक व नंदीवाह या दोन अर्थांशिवाय पशु म्हणजे जगत् या संदर्भानें पशुपति म्हणजे जगन्नाथ, जगत्पति असा अर्थ निघतो. या पाशु-पतदर्शनमतें कार्य अनित्य नसून नित्य आहे. हें दर्शन निरपेक्ष आशावादी आहे. अन्य शास्त्रज्ञांच्या मतें स्वर्गभोगानंतर जीव पुनः संसारी होतो. पाशुपतमतें तो विकल्पानें होतो म्हणजे नेहमीं होतोच असें नव्हे. मोक्षप्राप्तीचा खरा आणि एकच मार्ग म्हणजे तत्त्वनिश्चय हा होय.

**पाश्चर, लुई** (१८२२–१८९५)—एक फ्रेंच रसायन-शास्त्रज्ञ. सोरबोर्न येथें तो रसायनशास्त्राचा प्राध्यापक होता. तार्तरिक अम्लांचे दोन प्रकार, आंबवण्याच्या क्रियेचा प्रकार, जखमांचें रक्षण, रेशमी किड्यांचें संरक्षण, प्रतिकारक लस (ॲन्टिसेरम), कुत्र्याचे दंशावर उपाय, इत्यादि शोधांनीं मनुष्य जातीवर यानें फार उपकार करून ठेवले आहेत. १८८८ सालीं पाश्चर इन्स्टिटयूटची स्थापना लोकांच्या वर्गणीनें करण्यांत आली. त्याच्या जंतुनाशनक्रियेच्या शोधाला पाश्चरायझेशन असेंच नांव आहे. जंतुनाशनक्रिया पाहा.

**पाषाणभेदी**—या वनस्पतीला 'पाथरफोड' असेंहि साधें नांव आहे. ही खडकावर उगवते व हिचें मूळ खडक फोडून आंत शिरतें म्हणून हें नांव पडलें. रिंगणीप्रमाणें ही कांटेरी वनस्पति जमिनीवर पसरते. हिच्या पानांची भाजी करतात. मुळास 'लकड्या पाषाणभेद' म्हणतात. 'दोडेरी' असेंहि याचें दुसरें नांव आहे. लकड्या पाषाणभेद सर्व मूत्ररोगांवर फार गुणकारी आहे. दांतांस कीड लागल्यास पाषाणभेदीच्या फळांची धुरी देतात.

**पाषाणयुग**—मानवी संस्कृतींत जे बरेच टप्पे आहेत त्यां-पैकीं पहिला टप्पा. या काळांत माणसाला धातूंचा उपयोग माहीत नव्हता किंवा धातू तयार करतां येत नव्हत्या. तो दग-डांच्या साहाय्यानें आपलें काम भागवी. या युगाचे पूर्व आणि नव असे दोन मोठे भाग पडतात. त्या भागांचें वर्णन त्या त्या

लेखांतून दिलें आहे. ( सुलभ विश्वकोश, वि. १ ला, प्रस्तावना पृ. २८ पासून पुढें, पाहा. )

**पाषाणयुगीन** ( निॲण्डर्थल ) **मानव**— हा मानववंश प्रथम १८५७ मध्यें ड्युसेलडोर्फजवळ निॲण्डर्थल येथील एका गुहेंत अवशिष्ट स्वरूपांत आढळला. यावरून संशोधकांनीं असें अनुमान काढलें कीं, तिसऱ्या हिमयुगांत जिब्राल्टरपासून ड्युसेलडोर्फपर्यंत व दक्षिण इंग्लंडपासून कार्पेथियन पर्वतापर्यंत हा मानववंश नांदत असला पाहिजे. लहान पण बोजड व मांसल शरीर, खालीं वांकून चालणें, मोठें व सपाट डोकें, भुंवया बऱ्याच पुढें आलेल्या, रुंद नाक व आंत गेलेली हनुवटी यासारखी या माणसाची ठेवण होती. त्याचीं गारगोटीचीं हत्यारें लमूस्तिएर येथें सांपडलेल्या सांप्यांत आढळलीं. त्यावरून मूस्तेरियन संस्कृतिकालांतील हा मानववंश आहे असें सिद्ध झालें. ऑस्ट्रेलियांतील देशी लोकांत या वंशाच्या कांहीं खुणा दिसतात.

**पासी**—संयुक्त प्रांतांतली एक जात. लो. सं. १३ लाख. बिहार-ओरिसांतहि १॥ लाख वस्ती आहे. हे द्राविड वंशाचे दिसतात. पूर्वी यांचा स्वतंत्र राजा असे. जयचंदाच्या वेळेस त्याचे सरदार आल्हा व उदल यांनीं यांच्या रामकोट गांवाचा नाश केला. पासी लोक हल्लीं विशेषेंकरून ताडीचा धंदा करतात. हे खजुराचेंहि मद्य करतात. कांहीं लोक मजुरीहि करतात. यांच्यांत लग्नें वराच्या घरीं होतात व त्या वेळीं वराची आई विहिरींत उडी टाकण्याचें सोंग करते.

**पास्कल, ब्लेझ** (१६२३-१६९२)— एक फ्रेंच तत्त्ववेत्ता, गणितशास्त्रज्ञ आणि धर्मविज्ञानी. त्याने वयाच्या १६ व्या वर्षापूर्वीच शंकुच्छेद ( कॉनिक सेक्शन्स ) या विषयावर अतिशय महत्त्वाचा निबंध लिहिला. १६४७ सालीं त्यानें एक हिशेब करण्याचें कॅल्क्युलेटिंग यंत्र शोधून काढलें व त्याच सुमारास द्रवांची साम्यावस्था ( इक्विलिब्रियम ऑफ फ्ल्यूइड्स ) आणि वातावरणाचें वजन ( वेट ऑफ ॲट्मॉस्फिअर ) व इतर अनेक बाबतींत शोध लावले. १६५५ सालीं त्यानें प्रॉव्हिन्शियल लेटर्स या नांवाचीं आपलीं सुप्रसिद्ध पत्रें लिहिलीं. व त्यांत जेसूईट लोकांच्या शिथिल नीतिमत्तेबद्दल उपहासात्मक टीका केली.

**पाहांग**—मलाया संस्थानसंघ या संयुक्त राज्यांतील सर्वांत मोठें संस्थान. हें ब्रिटिश मलायाच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. या प्रदेशाची राजधानी कौलालिपिस असून या संस्थानचा राजा जो सुलतान याचें राहण्याचें ठिकाण पेकान हें आहे. १८८८ मध्यें हा प्रदेश ब्रिटिशसंरक्षित (प्रोटेक्टरेट) करण्याला सुलतानानें संमति दिली. १९४८ च्या फेब्रुवारींत सर्व मलाया संस्थानांचें एक स्वतंत्र संघराज्य तयार झालें. यांत पाहांग प्रमुख आहे. लो. सं. २,२१,८०० व क्षे. फ. १३,८२० चौ. मैल आहे. हल्लींच्या सुलतानाचें नांव सर अबुबकर रिआयतुद्दिन अल् मुआदझमशहा असें आहे. पाहांग राजधानीची लो. सं. ७,६०० आहे.

**पाळोंचा संस्थान**—हैद्राबाद संस्थान, वरंगळ तालुका. क्षेत्रफळ ८०० चौ. मै.. लोकसंख्या सु. चाळीस हजार. उत्पन्न दीड लाखावर आहे. निजामास खंडणी ४६ हजार द्यावी लागते. देशमुखीचें वतन आहे. हें संस्थान वरंगळच्या प्रतापरुद्र याच्याहि अगोदरचें आहे. प्रतापरुद्रानें येथील राजास 'अश्वराव' पदवी दिली होती. निजामाकडून सनद चालू आहे. गोदावरी नदीचें पाणी खोल असल्यानें शेतीकडे उपयोग करून घेतां येत नाहीं.

**पिकें**—पिकांचें वर्गीकरण निरानिराळ्या प्रकारांनीं करतां येतें. अन्नदायी व अन्नेतर हे एक वर्गीकरण झालें. नंतरचीं अशीं: १. कोरडवाहू पिकें–ज्वारी ( दाण्याची किंवा वैरणीची ), कापूस, बाजरी, गहूं, कुळीथ, भुईमूग, तंबाखू, वाल, हरभरा, जवस, कारळा, तीळ, तूर, मूग, मटकी, आंबाडी, मका, भात, लांग, मसूर, नाचणी, कोद्रा, वरा, वरी, उडीद, करडई, वाटाणा, वगैरे.

२. बागायत पिकें—ऊंस, कांदे, वांगीं, कोबी, नवलकोल, भोपळा, कॉलीफ्लॉवर, बटाटे, पालेभाज्या, मुळे, भेंडी, दुध्या भोपळा, पडवळ, दोडका, कारलीं, तोंडलीं, परवर, डबल बीन, श्रावण घेवडा, लसूण, टोमॅटो, सुरण, हळद, आलें, पानवेल, फळझाडें, कॉफी, वगैरे.

याच पिकांची वर्गवारी त्यांच्या वनस्पति–जातीवरून व उपयोगावरून निराळी करतां येते.

( १ ) तृण धान्यें :–ज्वारी, बाजरी, भात, मका, गहूं. डोंगरी पिकें–नाचणी, हरीक ( कोद्रा ), वरी, वरा, चेंटी, बराटी, भादली, ओढ, जव, वगैरे. ( २ ) डाळीचीं पिकें:– हरभरा, मूग, मटकी, लांग ( गुजराथमध्यें हें होते ), मसूर, तूर, उडीद, चवळी, वगैरे. यांच्या डाळी खाण्यांत वापरतात. (३) गळिताचीं पिकें :– तीळ, कारळा, जवस, करडई, नारळ, एरंडी, वगैरे. यांच्यापासून तेल निघतें. ( ४ ) धाग्याचीं पिकें :– कापूस, अंबाडी, ताग, घायपात, जवस, ताग, भेंडी, वगैरे. यांच्या खोडापासून किंवा बोंडापासून धाग काढून दोरा किंवा पुढें कापड तयार करतात. ( ५ ) पिष्टमय पिकें :– रताळीं, बटाटे, वगैरे. (६) साखरेचीं पिकें :– ऊंस, बीट. (७) भाज्या :– (अ) पालेभाज्या:– करडई, अंबाडी, मेथी, पोकळा, राजगिरा, चुका, चाकवत, मुळा, चंदनबटवा, कोबी, कांदा, लेट्यूस (सालीट), शेपू, वगैरे. (आ) फळभाज्या :–भेंडी, गवारी, निरानिराळे घेवडे व वालाच्या जाती, दुध्याभोपळा, कारली, दोडकी, तोंडली,

टोमॅटो, वांगीं, परवर, मिरची (भोपळी). (इ) मुळा, बीट, रताळीं. (उ) खोडभाज्याः– बटाटे, सुरण, गोराडू (कोन), नवलकोल, वगैरे. (ऊ) फुलभाज्याः– कॉली फ्लॉवर. (८) मसाल्याचीं पिकें :– हळद, आलें, कांदा, ओवा, बडीशेप, जिरें, वेलदोडे, मिरें, पिंपरी, पानवेल, वगैरे. (९) रंगाचीं पिकें :— हळद, करडी, नीळ. (१०) कैफाचीं पिकें:– तमाखू, भांग, अफू. (११) वैरणीचीं पिकें :— ज्वारी, घास, गिनी, मका.

पिकांचे रोग—माणसाप्रमाणें पिकांनाहि रोग जडतात. त्यांचीं कारणें अंतःस्थ असतात, तर कांहीं बाह्य असतात. अंतःस्थ रोग प्रकृतिगुणांमुळें उत्पन्न होत असल्यानें त्यावर इलाज करणें अद्यापि फारसें शक्य झालेलें नाहीं. बाह्य कारणांत जमीन, पाणी, हवा, इ. चे दोष; विनाशक प्राणी आणि कीटक; बांडगूळ, तण, वगैरे उगवणें; काजळी, तांबेरा, वगैरे रोगराई येणें, हीं सांगतां येतात; व यांवर इलाज करतां येतो. गव्हाच्या पिकावर 'तांबेरा,' ज्वारीवर 'काजळी', सुपारीवर 'गळ', द्राक्षावर 'भुरी', बटाट्यावर 'बांगडी', इत्यादि विशिष्ट पिकांचे रोग असतात व ते आधुनिक रासायनिक पद्धतीनें नाहींसे केले नाहींत तर फार नुकसान होतें. झाड पिवळें पडणें, त्यावर चित्रविचित्र रंग उठणें, ठिपके किंवा भोंकें पडणें, झाड वाळून जाणें, पानें गळणें, झाडावर गांठी किंवा फोड येणें, स्राव होणें, कुजणें, वठणें, इत्यादि पिकाच्या रोगांचीं लक्षणें आहेत. झाडांत अंतर ठेवणें, पाण्याचा निचरा व जमिनीची मशागत करणें, पिकांत फेरबदल करणें, बियांची निवड करणें, मोर्चुदाचें पाणी देणें, बोर्डो मिश्रण वापरणें, वगैरे या रोगांवर उपाय आहेत.

**पिक्ट**—या जातीचे लोक अगदीं प्राचीन काळीं स्कॉटलंडमध्यें राहत होते. ते केल्टिक वंशाचे गॉल किंवा ब्रिटन या लोकांपैकींच असावे, असें मानलें जातें. तथापि पिक्ट लोक हे आयबेरियन (स्पेन–पोर्तुगॉल प्रदेशांतील) वंशाचे आहेत, असें कांहीं विद्वानांचें मत आहे. यांचा प्रथम उल्लेख रोमन ग्रंथांत इ. स. २९७ च्या सुमारास आलेला आहे. ९ व्या शतकांत पिक्ट लोक आणि स्कॉट लोक यांची एकी स्कॉट लोकांचा राजा केनेथ मॅक् आल्पिन याच्या कारकीर्दीत झाली. या राजाची आई पिक्ट जातीची होती.

**पिक्रिक अम्ल**—हा पिवळा स्फटिकमय पदार्थ फेनॉलवर नत्राम्लाची क्रिया करून तयार करतात. हें अम्ल विषारी असून त्याचीं लवणें तापवलीं किंवा त्यांच्यावर आघात केला म्हणजे त्यांचा स्फोट होतो. म्हणून स्फोटक द्रव्यें तयार करण्यासाठीं त्यांचा उपयोग करतात. तसेंच रंगाच्या कामीं वापरतात. याचा औषधीहि उपयोग आहे. बॉचच्या खटल्यांतून याचें नाव मागें फार ऐकूं येत असे.

सु. वि. भा. ४–१२

**पिंगपाँग**—एक विलायती खेळ. टेबलावरचें टेनिस असें यास म्हणतां येईल. हा खेळ १९०१ च्या सुमारास प्रचारांत आला. ९'×५' आकाराच्या टेबलावर मधोमध आडवी जाळी लावतात. चेंडू सेल्युलाइडचा व लहान असतो. बॅट किंवा खेळण्याच्या फळ्या हलक्या लांकडाच्या (७"×६" पृष्ठभागाच्या) असतात. टेनिसप्रमाणेंच खेळ चालतो व एकवीस डावांत (पाइंट) आटपतो.

**पिंगळा**—ही एक घुबडाची लहानशी जात आहे. तथापि हा पक्षी घुबडाइतका उजेडास भीत नाहीं. हा एकटा कधीं दिसत नाहीं, तर नर व मादी अशी जोडी असते. यांची सारखी कांहीं किलबिल चालू असते.

या पक्ष्यांना माना वेड्यावांकड्या करून पाहण्याची फार संवय असते. गांवांतील पिंगळ्यांची घरटीं भिंतींतील भोंकांत असतात. यांची वीण सुमारें मार्च महिन्यांत होते. प्रत्येक खेपेस चार ते पांच अंडीं घालतात.

पिंगळ्यांचें भक्ष्य म्हणजे निरनिराळ्या प्रकारचे लहान लहान प्राणी होत. आपल्याकडे घुबडाप्रमाणेंच हा पक्षी अशुभ मानतात.

**पिंगळे घराणें**—(पुण्याचें). थोरल्या माधवराव पेशव्यांच्या वेळीं या घराण्याचा मूळपुरुष गोविंद भगवंत (पाहा) सरकारात कामावर होता. त्याच्या हुषारीमुळें नाना फडणीस व सखाराम-बापू हेहि त्याचा आपल्या मसलतींत सल्ला घेऊं लागले. याला निजामाकडे पेशव्यांचा वकील म्हणून पाठविला होता. याच्या-मागून याचे मुलगे व्यंकटराव व शामराव हेहि पेशव्यांकडे होते. या घराण्यास पेशवे व निजाम यांजकडून इनाम गांव मिळालें होतें. यांचे वंशज हल्लीं पुण्यास असतात. इंदापुरास यांचा मोठा वाडा आहे पण तो नांदता नाहीं.

**पिंगळे, विष्णु गणेश** (१८८८–१९१५)—एक क्रांतिकारक महाराष्ट्रीय. यांचा जन्म १८८८ सालीं पुणें जिल्ह्यांत झाला. यांनीं कांहीं दिवस तळेगांव येथील समर्थ विद्यालयांत शिक्षण घेतलें. नंतर ते कांहीं दिवस हातमाग चालवीत असत. १९११ सालीं ते यंत्रशास्त्राचें अध्ययन करण्याकरितां अमेरिकेंत मोठी खटपट करून गेले व तेथें त्यांनीं बिनतारी संदेशयंत्राचा अभ्यास केला. अमेरिकेंत ते बाबा गुरुमुखसिंग यांच्या पुढारी-पणाखालीं सुरू झालेल्या गदर चळवळींत शिरले. तेथेंच त्यांचा लाला हरदयाळ यांच्याशीं परिचय झाला. हिंदुस्थानामध्यें सशस्त्र क्रांति केल्याशिवाय स्वातंत्र्य मिळणार नाहीं व याकरितां हिंदुस्थानांतील लष्कर आपणांस मिळालें पाहिजे; म्हणून त्याचें साहाय्य मिळविण्याकरितां ते हिंदुस्थानांत आले. परंतु १९१५ च्या मार्चमध्यें त्यांस मीरत येथें अटक करण्यांत आली. ते

लाहोर कटांत सामील असून अमेरिकेंतून हजारों लोक हिंदुस्थानांत आणण्याची त्यांची तयारी होती, असा रौलट रिपोर्टांत उल्लेख आहे. पुढें लाहोर कटाच्या खटल्यांत त्यांस फांशीची शिक्षा झाली. १५ नोव्हेंबर १९१५ रोजीं त्यांस लाहोर येथील तुरुंगांत फांशीं देण्यांत आलें.

**पिंगा**—एक मुलींचा खेळ. दोन मुली समोरांसमोर उभ्या राहून, कमरेवर हात ठेवून, कमरेवरचा भाग तेवढा आपल्याभोंवतीं गोल फिरवितात. हात तसेच कमरेवर ठेवून मान शक्य तितकी खालीं वांकवितात. या खेळांत स्नायूंना व पोटाला चांगला व्यायाम होतो. "पिंगाबाई पिंगा, चवळीच्या शेंगा," इ. गाणें या वेळीं मुली म्हणतात.

**पिंजर**—कोरडें कुंकू. उत्तम लाल रवे दळून-कुटून बारीक पूड केल्यास पिंजर बनतें. बाजारी पिंजरेंत तांबड्या दगडाची पूड मिसळलेली असते. हें तेलांत कालवून ओलें कुंकू बनवितात.

**पिंजारी**—कापूस पिंजण्याचा धंदा करणारी महाराष्ट्रांतील एक जात. ही एक स्वतंत्र जातच आहे. हे लोक मूळचे हिंदु असून औरंगजेबाच्या वेळीं मुसलमान झालेले आहेत. यांची राहणी कुणब्यासारखीच असते. गिरण्या झाल्यापासून यांचा धंदा बुडाला. कांहीं गाद्या-उशा भरण्याचा उद्योग करतात व इतर शेतकी व नोकरी करतात.

**पिझारो, फॅन्सिस्को** (१४७८-१५४१)—एक धाडसी स्पॅनिश प्रवासी आणि पेरू देशाचा विजेता. १५२४ सालीं त्यानें नवीन देश शोधून काढणें व जिंकणें या कार्यासाठीं एक नाविक सफर काढली, आणि त्या सफरीपैकीं दुसऱ्या वेळच्या जलपर्यटनांत पेरू देशाचा शोध लावला; पण त्याच्याबरोबर तो देश जिंकण्यास पुरेसे सैनिक नसल्यामुळें तो स्पेन देशांत १५२८ सालीं परत आल्यावर त्याला जरूर ते अधिकार व एक लहान लष्करी तुकडी देण्यांत आली. तेव्हां तो १५३१ सालीं पुन्हां अॅटलांटिक महासागर ओलांडून पुढील सालीं पेरू देशांत उतरला. त्या वेळीं तेथें तद्देशीय लोकांत यादवी युद्ध चालू होतें. पिझारोनें तत्कालीन इंका राजाला मेजवानीला बोलावून व त्याचा विश्वासघात करून त्याला कैदेंत ठेवलें; नंतर त्याची बंधमुक्तता करण्यासाठीं जबर खंडणी घेतली आणि अखेर लबाडीनें त्या राजाला ठार मारलें. त्यानंतर हळूहळू त्यानें त्या प्रदेशांत स्पॅनिश साम्राज्य स्थापलें. पण पुढें स्थानिक लोकांनींच त्याचा खून केला.

**पिट, विल्यम (थोरला)** (१७०८—१७७८)— एक ब्रिटिश मुत्सद्दी. याचा आजा थॉमस पिट ईस्ट इंडिया कंपनीचा मद्रासचा गव्हर्नर होता व बाप रॉबर्ट पिट हा एक इंग्रज मुत्सद्दी होता. १७३४ मध्यें विल्यम पार्लमेंटचा समासद झाला. १७४६ त प्रधानमंडळांत शिरला. १७४६ ते ५५ च्या काळांत पे-मास्टर जनरल होता. मध्यंतरीं मुख्य प्रधान न्यूकॅसल याच्याशीं न जमल्यानें तो प्रधानमंडळांतून निघाला होता; परंतु सप्तवर्षात्मक युद्धाच्या वेळीं लोकांनींच त्याला प्रधानमंडळांत घेण्याबद्दल हट्ट धरला; तेव्हां १७५७ मध्यें त्याची न्यूकॅसलशीं तडजोड होऊन युद्धाचें सर्व तंत्र त्याच्या स्वाधीन करण्यांत आलें. तें त्यानें यशस्वीपणें संभाळलें. नंतर १७६६ त तो मुख्य प्रधान झाला व त्याला उमरावशाही मिळाली. पण लवकरच त्याला आनुवंशिक संधिवातानें पछाडलें व १७७८ मध्यें अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धाबाबत भाषण करतांना तो पार्लमेंटमध्येंच मूर्छा येऊन पडला व मरण पावला. थोर इंग्रज वक्ता व उदारमतवादी मुत्सद्दी म्हणून तो इतिहासांत प्रसिद्ध आहे.

**पिट, विल्यम (धाकटा)** (१७५९-१८०६)— एक ब्रिटिश मंत्री व थोरल्या पिटचा दुसरा मुलगा. हा १७७० त बॅरिस्टर झाला व १७८१ त पार्लमेंटमध्यें आला. १७८३ मध्यें याला मुख्य प्रधान होऊन मंत्रिमंडळ बनवावें लागलें. परंतु त्या वेळीं त्याचा पक्ष अल्पसंख्याक होता. १७८४ मध्यें तो पुन्हां अधिकारारूढ झाला. त्या वेळीं आमूलाग्र सुधारणा करणारे बरेच कायदे त्यानें मंजूर करून घेतले. त्यांतच ईस्ट इंडिया कंपनी सुधारण्याचा एक कायदा होता. १८०० मध्यें त्यानें इंग्लंड-आयर्लंडच्या पार्लमेंटांचें एकीकरण घडवून आणलें. फ्रेंच राज्यक्रांति होऊन फ्रान्सशीं युद्ध उद्भवलें त्या काळांत तो युद्धमंत्री होता. १८०१ मध्यें त्यानें राजीनामा दिला, पण पुन्हां १८०४ मध्यें मुख्य प्रधान झाला. नेपोलिअनशीं लढाई देण्याचें फार अवघड काम त्याच्याकडे आलें. ऑस्टर्लिट्झ येथें नेपोलिअनचा झालेला जय ऐकून तो फार विषण्ण झाला व १८०६ मध्यें मरण पावला. इंग्लंडला मोठ्या संकटांतून निभावून नेणारा व एक सुधारणावादी मुत्सद्दी म्हणून त्याला मोठा मान असे.

**पिटमन, सर आयझॅक** (१८१३-१८४७)—एक इंग्रज लेखनकलासंशोधक. पिटमनची लघुलेखनपद्धति प्रसिद्ध आहे. त्यानें आपलें पुस्तक 'स्टेनोग्रॅफिक साउंड-हँड' हें १८३७ सालीं प्रसिद्ध केलें व 'फोनेटिक जर्नल' हें नियतकालिक १८४२ सालीं काढलें. 'आयझॅक पिटमन अँड सन्स' या प्रकाशनसंस्थेचा आरंभ तेव्हांपासून झाला. याची लघुलेखनपद्धति फार यशस्वी झाली. त्याला १८९४ सालीं नाइट करण्यांत आलें.

**पिट्सबर्ग**--अमेरिका, पेन्सिल्व्हेनियामधलें एक अत्यंत मोठें प्रेक्षणीय शहर. येथें तीन नद्यांचा संगम आहे; तसेंच रेल्वेच्या अनेक फांट्यांचें केन्द्र येथेंच आहे. व्यापार आगगाडीनें व नद्यांतून सारखा चालू असतो. सदासर्वदा हें शहर उद्योगी माणसांनीं गजबजलेलें असतें. वस्ती सुमारें सात लक्ष. सर्व नद्यांच्या कांठीं असणाऱ्या गिरण्यांच्या रांगामुळें या शहराची धूम्रनगरी म्हणून प्रसिद्धि आहे. येथील विद्यापीठांत एक हजार प्राध्यापक व अकरा हजार विद्यार्थी असतात.

**पिठवण**—(सं.पृश्निपर्णी). या झाडास रानभाळ किंवा डवला असेंहि म्हणतात. हें झाड कोंकणांत फार दिसतें. याचीं पानें दुहेरी असतात. या वनस्पतीचें मूळ दशमुळांत धरतात. पांथरीवर मुळांचा किंवा पानांचा रस देतात.

**पिंडशास्त्र**—(*एम्ब्रायॉलॉजी*). *गर्भाशयामध्यें प्राण्याची* वाढ होऊन त्यास पूर्णावस्था प्राप्त होणें या क्रियेच्या ज्ञानशाखेस गर्भविद्या किंवा पिंडशास्त्र म्हणतात. कोणत्याहि प्राण्याची वाढ होत असतांना तो आपल्या जातीच्या सर्व विकासावस्थांमधून जात असतो व त्यामुळेंच त्याचे इतर जातींशीं नातें ओळखतां येतें. या शास्त्रज्ञानापासून आनुवंशिकतेसंबंधीं बऱ्याच प्रश्नांवर प्रकाश पडतो. ॲरिस्टॉटल व गॅलेन यांच्या ग्रंथांत आपणांस प्रथम प्राण्याच्या गर्भावस्थेबद्दल कांहीं विचार व विधानें नमूद करून ठेवलेलीं आढळतात. त्यानंतर हार्वे व त्यामागून येणाऱ्या विद्वानांनीं या ज्ञानामध्यें भर घातली. परंतु स्वतंत्र पिंडशास्त्राचा आरंभ १९ व्या शतकांत झाला. या शास्त्राची वाढ करण्याच्या कामीं केइर्फॉन बेअर (१७९२–१८७६), एम्. बाल्फर (१८५१–१८८२), वगैरे शास्त्रज्ञांचीं नांवें विशेष उल्लेखनीय आहेत.

प्राण्यांप्रमाणेंच वनस्पतींच्या गर्भातील वाढीचा या शास्त्रांत विचार केला जातो. उदाहरणार्थ, पावट्याच्या झाडाचा गर्भ बियांच्या आवरणांनीं झांकलेला असून ओलावा आणि ऊब यांच्या विशिष्ट परिस्थितींत त्याचा उद्भव होतो.

**पिंडार** (खि. पू. ५२२–४४३)—एक प्राचीन ग्रीक कवि. त्याचीं भावगीतें सर्वोत्कृष्ट आहेत. त्यानें भावगीतें अनेक वृत्तांत अनेक विषयांवर लिहिलीं. नाचाचीं गाणीं, वरातीचीं गाणीं, सर्वांनीं मिळून म्हणावयाचीं गाणीं, मद्यपानाचीं गाणीं, विजयाचीं गाणीं, वगैरे याच्या गाण्यांचे प्रकार दिसतात. त्याचें काव्य आज अगदींच थोड्या अंशांत उपलब्ध आहे. फक्त विजयगीतें बहुतेक उपलब्ध असून त्यांपैकीं ४४ गीतांचीं चार पुस्तकें आहेत. या पिंडारच्या काव्यांत उपमारूपकालंकार, नवशब्दनिर्मिति, उच्च नैतिक व धार्मिक तत्त्वप्रतिपादन हे विशेष गुण आहेत. पिंडारचा नैतिक सिद्धांत असा कीं, मनुष्याचा जन्मजात स्वभाव हाच प्रभावी असून नवसंपादित गुणांना त्यामानानें फार अल्प महत्त्व असतें.

**पिता**—ऋग्वेदापासून पुढील ग्रंथांत हा (पितृ) शब्द आढळत असून त्याचा अर्थ बाप असा आहे. पण बाप म्हणजे जन्म देणारा हाच अर्थ सर्वत्र नसून मुलाचें रक्षण करणारा असाहि याचा कोठें कोठें अर्थ होतो व व्युत्पत्तिदृष्ट्या तोच अधिक जुळतो. ऋग्वेदांत जेथें जेथें बाप या अर्थी हा शब्द आला आहे तेथें तेथें तो चांगला व प्रेमळ आहे असें वर्णन आहे. मूल मोठें झाल्यावरहि तें संकटकाळीं बापाच्या मदतीवर अवलंबून राहतें व बापाचें आनंदानें स्वागत करतें, असेंहि वर्णन आलें आहे. बापाचा मुलावर ताबा किती असे व तो किती कालपर्यंत असे, हें सांगणें कठिण आहे. तथापि बापाचें मुलावरील स्वामित्व बरेंच असावें हें शक्य दिसतें. मुलाच्या अथवा मुलीच्या लग्नाच्या बाबतींत बापाला कायदेशीर रीतीनें ढवळाढवळ करतां येत असे. मुलगा वयांत आल्यावर तो बापाबरोबर राहून संसार करी व त्याची बायको गृहस्वामिनी होई; किंवा मुलगा निराळेंच बिऱ्हाड करून राही, हेंहि सांगतां येत नाहीं. बहुतकरून दोन्ही चाली अमलांत असाव्या. सामान्य नियम म्हणजे मुलगा बापाच्या पूर्णपणें आश्रित असे. मागाहून झालेल्या सूत्रग्रंथांत मुलानें बापाशीं कसें वागावें याबद्दल सविस्तर वर्णन दिलें आहे. औरस संततीच्या अभावीं दत्तक घेण्याची चाल असे. ही दत्तकाची चाल कधीं कधीं औरस संतति असतानाहि असे. पण अशा वेळीं दत्तक घेतला जाणारा मुलगा विशिष्ट गुणसंपन्न असाच असे. प्रत्येक कुटुंबांत आईपेक्षां बापालाच जास्त मान असे. प्रथम बिनवारशी मिळकतीवर हक्क सांगण्याची पद्धत होती व तीपासून समायिक सत्ता किंवा कौटुंबिक सत्ता सुरू झाली असावी.

आईबाप आणि मुलें यांचे नैसर्गिक नात्याचे संबंध असतातच. परंतु यांच्यामधील संबंध कायद्यानेंहि निश्चित केलेले आहेत. इंग्लंडमधील कॉमन लॉ या कायद्यानें आईबापांनीं मुलांचें पालनपोषण केलेंच पाहिजे असें त्यांना भाग पाडतां येत नसे. ज्या मुलाला स्वतः द्रव्य मिळवून आपला उदरनिर्वाह करतां येत नसेल, आणि त्याचे आईबापहि त्याला पोशीत नसतील तर निराश्रितांच्या कायद्याप्रमाणें नेमलेले अधिकारी (पुअर–लॉ ॲथॉरिटी) अशा मुलांचें पालनपोषण करीत असत, आणि त्याबद्दल आईबापांकडून किंवा इतर नातलगांकडून त्या खर्चाबद्दलचा पैसा वसूल करीत असत. याशिवाय मुलांचें पालनपोषण करण्यासंबंधीं आईबापांबद्दल कांहीं एक कायदा नाहीं. मात्र ऐपत असून कोणी आईबाप मुलांचें पोषण करण्याची जाणूनबुजून टाळाटाळ करीत असतील तर त्यांच्याविरुद्ध फौजदारी कोर्टांत इलाज

करतां येत असे. एखाद्या मुलानें दुकानदाराकडून जरूर ते खाद्यपदार्थ, कपडे, वगैरे विकत घेतले, आणि त्याच्या आईबापांनीं त्या दुकानदाराला तसा माल देण्यास सांगितलें असेल तर त्या दुकानदाराचें तें कर्ज आईबापांनीं फेडणें कायद्याप्रमाणें भाग असतें. तसेंच आईबापांनीं आपल्या मुलांना पालनपोषणाकरितां दुसऱ्या एखाद्या इसमाच्या ताब्यांत दिल्यास त्याबद्दल होणारा खर्च आईबापांनीं द्यावा लागतो, असा कायदा आहे. कॉमन लॉ कायद्यानें औरस मुलांचा पालक बाप असतो, असें ठरविलें आहे. परंतु १९२५ सालीं मंजूर झालेल्या 'गार्डियनशिप ऑफ इन्फंट्स ॲक्ट' या कायद्यानें आई व बाप या दोघांनाहि मुलावर सारखाच हक्क दिलेला आहे.

हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें अज्ञान मुलांचा पालनपोषणकर्ता बापच असतो. त्याच्या हयातींत दुसरा पालक होऊं शकत नाहीं. पित्याच्या पश्चात् हें पालकत्व मातेकडे जातें (पालक, पाल्य पाहा). क्रिमिनल प्रोसीजर कोडाप्रमाणें बापावर मुलांच्या पोषणाची सक्ती करतां येते, पण शिक्षणाची करतां येत नाहीं. अज्ञानाचा विवाह करण्याचा अग्राधिकार पित्याचा आहे. मातापित्यानें बारा वर्षांच्या आंतील मुलास टाकल्यास त्यांस शिक्षा होते (१८६०चा ४५वा कायदा, कलम ३१७). श्री. य. रा. दाते यांचें पितापुत्रसंबंधावर मराठींत स्वतंत्र पुस्तकच आहे. त्यांत सर्व दृष्टींनीं या प्रश्नासंबंधीं विवेचन आलें आहे.

**पितृपूजा**—फार प्राचीन कालापासून सर्व देशांमध्यें पितृपूजेची चाल प्रचारांत होती. चीन देशामध्यें व रोमन लोकांत ही विशेषत्वानें आढळते. या चालीच्या मुळाशीं अशी कल्पना असावी कीं, मृत पितरांस अथवा पूर्वजांस त्यांच्या मूर्ती करून त्यासमोर धूप जाळणें, बलिदान करणें, किंवा इतर कांहीं विधी करणें यायोगें त्यास पुन्हां परत उठवितां येतें. पितृपूजेचें स्वरूप प्रत्यक्ष एखाद्या पितराची पूजा करणें, किंवा एखाद्या अतिमानुष अशा यमासारख्या पितृदेवतेची पूजा करणें, इत्यादि भिन्न भिन्न स्वरूपात दृष्टीस पडते. पूर्वी कित्येक देवतांचें अस्तित्व एखाद्या प्राण्यांत असल्याचें मानीत असत व अशा प्राण्यामध्यें एखाद्या मृत पितराचा आत्मा प्रवेश करतो अशी समजूत असे व त्यामुळें अशा प्राण्यास पवित्र मानण्यांत येत असे. अद्यापिहि ही भावना कित्येक अर्धसंस्कृत जातींतून आढळून येईल. पितृपूजेचा देवकांशींहि संबंध दिसतो. आफ्रिका आणि ऑस्ट्रेलिया खंडांतील वन्य लोकांत पितृपूजेचे विविध प्रकार दिसतात.

पितृपूजा अथवा श्राद्ध हा एक धार्मिक विधि आहे. पृथ्वीवरील नव्या जुन्या सर्व ज्ञात लोकांत पितृपूजा असल्याचें दिसून येतें. मृत मनुष्याच्या पार्थिव देहत्यागानंतरच्या अस्तित्वाबाबत अनेक प्रकारच्या कल्पना आढळतात. यांपैकीं एक म्हणजे मृत जीवात्मा आपल्या आप्तेष्टांच्या हिताकरितां झटत असतो. शिवाय मृत पितरांना संतोष होईल असें आपण कांहीं तरी करावें, अशी मनुष्याच्या ठायीं साहजिकच बुद्धि असते. मृत पितराना आवडणारे पदार्थ भोजनास करणें हा एक त्यांतलाच प्रकार आहे. हिंदुस्थान, चीन व जपान या तीन देशांत पितृपूजेचें माहात्म्य विशेष आहे. आपण चांगलीं कृत्यें केलीं तर आपल्या पूर्वजांचा पारलौकिक दर्जा वाढतो असा चिनी लोकाचा विश्वास आहे. आपण काय करतों व कसे वागतों हें आपले स्वर्गस्थ पितर पाहत असतात, असें जपानी मानतात. ही भावना त्यांस पराक्रम करण्यास उत्तेजित करते. १९०४-०५ च्या रूसो-जपानी युद्धांत व गेल्या महायुद्धांत याच भावनेनें जपानी लोकांनीं विलक्षण पराक्रम गाजविला. आपल्या पितरांची स्मृति बाळगणें व त्यांना संतुष्ट ठेवणें हें आपलें कर्तव्य आहे, अशी हिंदूंची शिकवण आहे. श्राद्धविधीचे निरनिराळे प्रकार मृतांविषयीं नाजुक व आदराच्या भावना दर्शवितात. दानें दिलीं असता पितरांना त्यांपासून उपयोग होतो व सुख लाभतें ही कल्पनाहि हेंच दर्शविते. मृतांना नवसहि करण्यांत येतात.

**पितृयाण**—पितृमार्ग, दक्षिणायन मार्ग. हा शब्द ऋग्वेद व मागाहूनचे वैदिक ग्रंथ ह्यांमध्यें आलेला नाहीं. लो. टिळकांचें असें मत आहे कीं, देवयान ह्याचा मेळ सूर्याच्या उत्तरायणाशीं जमतो व पितृयाण ह्याचा संबंध सूर्याच्या दक्षिणायनाशीं आहे. शतपथ ब्राह्मणांत वसंत, ग्रीष्म व वर्षाऋतु ह्यांचा संबंध देवांशीं लावलेला आहे; व बाकीच्या ऋतूंचा संबंध पितरांशीं लावलेला आहे; त्यावरून ते असें अनुमान करतात कीं, देवयानास सुरवात मेषविषुवांत होत असे व पितृयाणास तुलाविषुवांत होत असे. ह्या गोष्टीचा ते तैत्तिरीय ब्राह्मणांतल्या देव व यम या नक्षत्रांमधल्या भेदाशीं संबंध लावतात. याज्ञवल्क्य स्मृतींत, उत्तर गोलार्धांत देवलोक व दक्षिण गोलार्धांत पितृयाण आहे, अशी तत्कालीन कल्पना दिसते.

**पित्त**—मनुष्याच्या शरीरांतील यकृतापासून एक पिवळट, हिरवट असा चिकट रस निघतो व तो पित्तवाहिनीमध्यें जमतो; त्यास पित्त म्हणतात. तो पोटांत जातो किंवा पित्ताशयामध्यें जाऊन तेथें त्याची आवश्यकता लागेपर्यंत सांचून राहतो. याचा उपयोग स्नेहमय पदार्थ पचवून त्याचें अम्लयुक्त द्रवामध्यें रूपांतर करण्याच्या कामीं होतो. तसेंच आंतड्यांची रसवहनाची क्रिया होण्यास या रसाची मदत होते. या रसामध्यें पैत्तिक लवणें व रंजकद्रव्यें असतात. त्याचप्रमाणें कांहीं खनिज लवणें—विशेषतः सिंधुहरिद, स्फुरित व लोह—असतात. आंतड्यां-

मध्यें पित्तरस जाण्याचा थांबल्यास व तो पुन्हा रक्तांत जिरूं लागल्यास कावीळ होते.

आयुर्वेदांत त्रिदोषांपैकीं एक पित्त आहे. कफवातपित्त यांच्या प्रमाणांत कांहीं बिघाड झाला कीं रोग उत्पन्न होतो. हा बिघाड होण्याला कारणें असतात. शरीरांतील पित्त क्रोध, चिंता, भीति, उपोषण, अपचन, भोगातिरेक, इत्यादि कारणांमुळें वाढतें. पित्त झाल्यास सूतशेखरमात्रा, मोरावळा, वगैरे देतात.

**पित्तपापडा**—याचीं झाडें पावसाळ्यांत होतात. याचीं पानें बारीक व फुलेंहि बारीक असतात. हा फार औषधी आहे. पित्तावर याच्या पाल्याचा रस दुधांत देतात किंवा याचा सुंठ घालून काढा देतात. काढा ओकारीवरहि गुणकारी आहे. पित्तपापड्याचा घासपित्तपापडा म्हणून एक गवतासारखा प्रकार आहे.

**पित्ताच्या गांधी**—(नेटल रॅश). हा एक त्वग्रोग आहे. याच्या योगानें कातडीवर तांबड्या किंवा पांढऱ्या गांधी होतात. या बहुतेक मध्यभागीं लाल असून कडेस पांढऱ्या असतात. कधीं कधीं याच्या उलटहि प्रकार आढळतो. हा विकार बहुधा पचनक्रिया बिघडल्यामुळें उत्पन्न होतो.

एकदोन दिवसांत या गांधी मावळल्या नाहींत तर बरेच दिवस टिकतात व फार खाज सुटते. वाईट अन्नामुळें बहुधा हा रोग उद्भवतो. कांहीं चावण्यामुळें हा होतो. रोग्याला त्रास होतो तो नाहींसा करण्याकरितां अॅड्रेनॅलिनपासून तयार केलेलें इंजेक्शन व जुलाबाचें औषध देतात. हा रोग पुन्हां होऊं नये म्हणून द्यावयाचें औषध चांगली परीक्षा करूनच ठरवावें लागतें.

**पिनेरो, सर आर्थर विंग (१८५५–१९३४)**— एक इंग्रज नाटककार. यानें आरंभीं नाटकांत कामें केलीं. मग अनेक फार्स लिहिले (उदा., मॅजिस्ट्रेट, मास्तरीण, इ.), त्यानंतर त्यानें गंभीर स्वरूपाचीं नाटकें लिहिलीं. 'दि सेकंड मिसेस टॅन्क्रेरी' (१८९३) या नाटकानें पिनेरोला तत्कालीन नाटककारांत पहिल्या प्रतीचा दर्जा मिळाला. नंतर त्यानें पुष्कळच नाटकें लिहिलीं; त्यांपैकीं विशेष चांगलीं नाटकें आहेत तीं— 'दि नोटोरियस मिसेस एबस्मिथ', 'दि गे लॉर्ड क्रेक्स', 'हिज् हाउस इन ऑर्डर', 'दि माइंड ऑफ दि पेंट गर्ल', 'ए सीट इन् दि पार्क,' इ.

**पिनेल, फिलिप (१७४५–१८२६)**—एक फ्रेंच वैद्यकशास्त्रज्ञ. याचे कांहीं ग्रंथ आहेत. यानें वेड्यांचीं दोन इस्पितळें चालवलीं होतीं व त्यायोगानेंच मेंदूच्या विकारांवरील औषधोपचारपद्धतींत मोठी सुधारणा करण्याला यानें आरंभ करून दिला, असें म्हणतां येईल.

**पिंपरी**—एक छायावृक्ष. याची छाया दाट व थंड असल्यानें रस्त्याच्या कडेनें याचीं झाडें लावतात. याला पिंपळाप्रमाणेंच फळें येतात. लांकूड इमारतीच्या कामास उपयोगी पडतें. पिंपरी–त्यातल्या त्यांत लघुपिंपरी–औषधी आहे. खवड्यास चीक लावतात.

**पिपलोदा**—मध्य हिंदुस्थानांतील एक हिंदु संस्थान. क्षे. फ. ७२ चौ. मै.. १५४७ मध्यें शार्दूलसिंग राजानें पिपलोदा शहर वसवलें. संस्थानिकांचा पूर्वज काळुजी हा दोरिया रजपूत होता. त्यानें १२८५ सालीं या भागांतील सवलगड घेतला. अठराव्या शतकांत मराठ्यांनीं यावर हल्ले करून बरेंच राज्य संपुष्टांत आणलें. आतां हें संस्थान मध्यभारत संघांत सामील झालें आहे. संस्थानचें उत्पन्न सु. एक लाखाचें आहे. लो. सं. ११,०००. पिपलोदा मुख्य ठिकाण.

**पिंपळ**—हिंदुस्थानांतील झाडांपैकीं एक मोठें झाड. ऋग्वेदांत (१. १३५,८; १०, ९७, ५) या (अश्वत्थ) झाडापासून जहाजें करतात असा उल्लेख आहे, पण तो फार संशयित आहे. पण तदनंतरच्या ग्रंथांत या झाडाचा वारंवार उल्लेख आलेला आहे. याचीं लांकडें एकमेकांवर घासून विस्तव काढीत असत; त्यांत वरचें लांकूड पिंपळाचें आणि खालचें शमीचें असे. क्वचित् स्थळीं हीं झाडांच्या मुख्यत्वेंकरून खादिराच्या फांद्यांवर वाढतात आणि त्या झाडांचा नाश करितात; म्हणून त्यांना 'नाश करणारा' (वैबाध) असें म्हणतात. याचीं फळें गोड असून पक्षी तीं खातात. या झाडाखालीं ईश्वर वास करितो अशी हिंदूंची समजूत आहे. म्हणून याला पार बांधतात. हा आणि न्यग्रोध वृक्ष यांना 'शिखण्डिन्' असें म्हणतात. याचें लांकूड हिंदू जाळीत नाहींत.

हा चांगला छायावृक्ष आहे. हा वडाप्रमाणें फार वाढत असल्यानें दोनतीनशें माणसें मोठ्या झाडाखालीं राहूं शकतात. याची लाख होते व आळित्याचा रंग करतात. पिंपळ फार औषधी आहे. त्वचारोगावर साल वांटून लावतात. उचकीवर साल जाळून देतात. दमा–खोकल्यावर पिंपळाच्या लाखेचें चूर्ण देतात.

**पिंपळगांव (बसवंत)**—मुंबई, नाशिक जिल्हा. हा गांव द्राक्षाविषयीं फार प्रसिद्ध आहे. लो. सं. ४,८४९.

**पिंपळगांव (राजा)**—वऱ्हाड, जिल्हा बुलढाणें, तालुका मलकापूर. ज्ञानगंगाकांठचें जुनें गांव. ८०० वर्षांपूर्वी गवळी राजा पीरतसिंग यानें वसवला. वस्ती सुमारें पांच हजार. या गांवीं गांवाबाहेर श्रीरेणुकादेवीचें खडकांत खोदलेलें देवस्थान आहे. सतराव्या शतकांतील प्रसिद्ध ग्रहलाघवकार ज्योतिषी गणेश दैवज्ञ हा याच गांवचा.

**पिंपळनेर**—मुंबई प्रांत, पश्चिम खानदेश जिल्हा, पूर्वी तालुका उरसें होता. आतां साक्री आहे. पांझरा नदीवर गांव आहे. धुळ्यापासून ४० मैल. येथें एक जुना किल्ला आहे. हेमाडपंती देवळांचे बरेच अवशेष आहेत. येथें रेशिल बरेंच निघतें.

**पिंपळी**—याच्या वेली असतात. पानें विड्याच्या पानासारखीं व तिखट असतात. बारीक पिंपळीस लेंडी पिंपळी म्हणतात; मुळास पिंपळमूळ म्हणतात. विशेषतः दक्षिण गुजराथमध्यें याच्या वेलांची बागाईत लागवड होते. दरएकरीं उत्पन्न २ हजार पौंड ओली व २५० पौंड वाळलेली पिंपळी निघते. खारावलेली पिंपळी ४० पौंडांची वाळून २५ पौंड होते; कारण त्यांत मीठ घातलेलें असतें.

पिंपळी फार औषधी आहे. सर्व उदररोगांवर ही उपयोगी पडते. कफ, अपस्मार, ओकारी, आमवात, इ. कित्येक रोगांवर काढा किंवा चूर्ण देतात. दुधांत पिंपळी घालून आटवून वर्धमान पिंपळी हें औषध करतात. लिंबाच्या रसांत पिंपळ्या भिजवून त्यांत सैंधव घालतात व याप्रमाणें केलेली पाचक पिंपळी अजीर्ण, अरुचि यांवर चांगली असते. नारूवर पिंपळमूळ उगाळून पाजतात.

**पिपीलिकाभक्षक**—मुंगीखाऊ पाहा.

**पिपीलिकाम्ल**—(फॉर्मिक ॲसिड). ग्लिसरिन आणि स्फाटिकमय काष्ठाम्ल (ऑक्झेलिक ॲसिड) यांच्यापासून हें तयार करतात. मनुष्याच्या घामांत हें असतें. मुंग्यासारख्या कांहीं लहान प्राण्यांतहि हें सांपडतें. हें अम्ल फार प्रदाहजनक (इरिटंट) असतें.

**पिपीलिन**—(फॉर्म्यॉलिन). पिपीलमद्यानार्द्रा(फॉर्मॉल्डिहाइड)च्या पाण्यांतील विद्रावाचें व्यापारी नांव. ह्यांत पिपीलमद्यानार्द्राचें प्रमाण शें. ४० असतें. पिपीलिनाला एक प्रकारचा तिखट वास येतो. जंतुनाशक म्हणून ह्याचा उपयोग होतो. त्याचप्रमाणें कातडें कमविण्यासाठीं, कापड जलबंधक (वॉटरप्रूफ) करण्यासाठीं व कांहीं औषधें करण्यासाठींहि याचा उपयोग होतो.

**पिप्पलाद**—एक ऋषि. आईनें टाकल्यावर पिंपळाचीं पानें खाऊन जगलेला म्हणून यास हें नांव पडलें. हा दधीचि ऋषीचा पुत्र असावा. याच्या जन्माविषयीं निरनिराळ्या कथा आहेत. आपल्या आईबापांच्या मृत्यूला देव कारण आहेत म्हणून हा देवावर सूड उगवी. तेव्हां देवांनीं शंकराच्या मध्यस्थीनें याचा राग शांत केला. पिप्पलाद नर्मदेच्या कांठीं तप करीत असे. त्या स्थानास पिप्पलादतीर्थ नांव आहे.

अथर्ववेदाची एक पिप्पलाद शाखा आहे. तिचा प्रवर्तक हाच असावा. मोठमोठे ब्रह्मवादी पिप्पलादाचा उपदेश घेत, असें प्रश्नोपनिषदावरून दिसून येतें.

**पियानो**—हें एक तंतुवाद्य आहे. या वर्गाच्या तंतुवाद्यांमध्यें सतारीप्रमाणें तारा छेडल्या जातात. सारंगीप्रमाणें गजानें एकसारख्या वाजवल्या जात नाहींत. पियानो आज आपणांस दिसतो त्या स्वरूपांत तयार होण्यापूर्वी अनेक निरनिराळ्या अवस्थांतून त्याचीं स्थित्यंतरें होत आलेलीं आहेत. त्यांत साल्टेरी, स्पिनेट, हार्प्सिकॉर्ड, क्लॅव्हिकॉर्ड, वगैरे वाद्यें येतात. या शेवटच्या दोन वाद्यांतील गुण एकीकृत करून सध्यांचा पियानो बनविण्यांत आला आहे. सध्यांचा पियानो तयार करणारा पहिला कारागीर बार्थोलोमिओ ख्रिस्तोफॉरि (१६५१–१७३१) हा पदुआ व फ्लॉरेन्स येथें प्रथम हार्प्सिकॉर्ड हें वाद्य तयार करीत असे. यानें पहिला पियानो १७११ मध्यें तयार केला. या वाद्याचा मुख्य विशेष त्यानें उत्पन्न होणारा स्वरमेळ हा आहे. हा स्वरमेळ उत्पन्न करण्याच्या कामीं या वाद्याखालीं बसविलेल्या पायट्यांचा मुख्य उपयोग होतो. उजवा पायठा खालीं दाबला म्हणजे तारांवरील सर्व दाब एकदम उचलले जातात; त्यामुळें सर्व तारा कंप पावण्यास खुल्या होतात आणि पुन्हां पायठा उचलून दाब घालीपर्यंत किंवा आपोआप थांबेपर्यंत त्या कंप पावतात व विशिष्ट स्वर उत्पन्न करीत राहतात. याप्रमाणें तारा खुल्या असतांना प्रत्यक्ष ज्या तारांवर आघात होऊन त्या कंप पावूं लागतात त्या तारांशीं संवादी असलेल्या सर्व तारा आपोआप कंप पावूं लागतात. त्यामुळें या संवादी स्वरवादनामुळें स्वरभरणा व स्वरपरिपोष चांगला होऊं लागतो. डाव्या पायट्याचा स्वराच्या कालमर्यादेवर परिणाम होत नाहीं. तर त्याचा उपयोग स्वराची चढउतर करण्याच्या कामीं होतो. कांहीं पियानोंमध्यें अशी व्यवस्था केलेली असते कीं, एकाच स्वराच्या तीन तारांपैकीं एक किंवा दोन तारांवरच हातोड्यानें आघात होतो व आघात न झालेल्या त्याच स्वराच्या तारा केवळ संवादीपणामुळें एकाच स्वरांत लावलेल्या असल्यामुळें वाजूं लागतात. त्यामुळें तो स्वर अधिक स्पष्टपणें ऐकूं येऊं लागतो.

'वाऱ्यानें वाजणारा पियानो' या नांवाचें एक नवीन वाद्य तयार करण्यांत आलेलें आहे. हें वाद्य वाजविण्यास मनुष्य लागत नाहीं तर एक कागदाची गुंडाळी लावून दिली म्हणजे तीवर निरनिराळे स्वर निघून तें वाद्य वाजत राहतें. हें वाद्य निर्वात केलेल्या नळीमध्यें छिद्रांच्या योगानें हवा आंत येण्याच्या तत्त्वावर बसविलें असतें. या वाद्याच्या साहाय्यानें ही कागदाची गुंडाळी तयार करतांना ज्या कलावंतानें तें पद वाजविलें असतें त्याच्या कृतीचें अगदीं हुबेहूब पुनरुत्पादन होतें.

करारमदार करण्यासाठीं अभयसिंगानें याजकडे आपले वकील पाठवले व डाकोर येथें एका मारवाड्याच्या साहाय्यानें विश्वासघातानें यास ठार केलें.

**पिलाजी जाधव** (१७०७–१७५१)—एक शूर मराठा सरदार. याचा बाप चांगोजी व आई हंसाई. यांच्या घराण्यास वाघोली व वाडी हीं गांवें इनाम होतीं. पुढें या घराण्याचीं वाघोलीकर व वाडीकर अशीं दोन कुटुंबें झालीं. सन १७०७ मध्यें पिलाजी शाहूस मिळाला. दमाजी थोराताची पुंडाई थांबवून यानें त्यास शाहूपुढें साताऱ्यास धरून आणलें. या कामगिरीबद्दल शाहूनें यास दिवें व नांदेड गांवीं इनाम दिलें. बाळाजी विश्वनाथास त्रास देणाऱ्या चंद्रसेन जाधवास यानें गप्प बसविलें. बाळाजी विश्वनाथास अनेक महत्त्वाच्या कामीं याची मदत झाली. पेशव्यानें निजामावर वचक बसविण्याची कामगिरी याजवर सोंपविली होती. ती यानें अपेक्षेबाहेर यशस्वी करून दाखविली. चिमाजीआप्पाच्या माळव्यावरील स्वारींत व बाजीरावानें छत्रसालास मदत करण्यासाठीं बुंदेलखंडावर केलेल्या स्वारींत यानें महत्त्वाचा भाग उचलला होता. यास बुंदेलखंडांत याच्या कामगिरीबद्दल पांच गांवें इनाम मिळालीं होतीं. कांहीं दिवस याचें बाजीरावाशीं पटत नसल्याचा उल्लेख आहे. शाहूच्या आज्ञेवरून यानें सन १७३५ त कोंकणवर स्वारी केली. भोपाल, जंजिरा, दिल्ली व उत्तरेकडील भेलसा यांवर स्वाऱ्या करून यानें मराठ्यांचें वर्चस्व चोहोंकडे पसरवलें. आपल्या गुणांनीं यानें सर्वांचा–विशेषतः पेशव्यांचा लोभ संपादन केला होता. ता. ३–७–१७५१ रोजीं पोटशुळाच्या विकारानें हा वाघोलीस मरण पावला. याचा मुलगा सटवोजी व सुभानजी नांवाचा पुतण्या हे सुद्धां पराक्रमी निघाले. वाघोलीस पिलाजीची चांगली छत्री बांधलेली आहे.

**पिलु**—या झाडात लहान व मोठी अशा दोन जाती आहेत. हीं झाडें कोंकणांत व गुजराथेंत फार. पानें शायटीसारखीं असून फळें तोरणांसारखींच असतात. कोंकणांत या झाडास सारी किंवा किंकण म्हणतात. फळाचें तेल (किंकण तेल) वायूवर उपचार म्हणून अंगास चोळतात. मोठ्या जातीचीं झाडें मुसलमान लोक कबरेजवळ शोभा आणि छाया यांसाठीं लावतात. फळें मूळव्याध, गुल्म, संग्रहणी या रोगांवर इलाज म्हणून खातात. कुत्र्याच्या विषावर पाल्याचा रस किंवा मूळ उगाळून देतात.

**पिले, लुई डॉमिनिक स्वामीकन्नू** (१८६५–१९२५)—एक हिंदी कालगणनातज्ज्ञ. हे धर्मानें ख्रिस्ती होते. हे एम्. ए. एलएल्. बी. होते. सेंट जोसेफ कॉलेज, त्रिचनापल्ली व मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेज या संस्थांतून कांहीं काल प्राध्यापक म्हणून काम केल्यावर हे मद्रास प्रांत सरकारच्या नोकरींत शिरले. डेप्युटी कलेक्टर, सहकारी खात्याचे रजिस्ट्रार, शेतकी खात्याचे डायरेक्टर, यांसारख्या अनेक महत्त्वाच्या हुद्याच्या जागांवर यांनीं कामें केलीं. यानंतर सन १९२०–२३ या कालांत मद्रासच्या कायदेमंडळाच्या चिटणिसाच्या जागेवर काम केल्यावर १९२५ सालीं यांना कायदेमंडळाच्या अध्यक्षपदाचा मान देण्यांत आला.

सन १९११–२२ या कालांत यांनीं अत्यंत परिश्रमानें दोन हजार वर्षांची भारतीय कालगणना–जंत्री अथवा पंचांग तयार करण्याची मोठी व महत्त्वाची कामगिरी पूर्ण केली. या पंचांगामुळें दोन हजार वर्षांतील सौर व चांद्र वर्षें, तिथी, ग्रहणें व ग्रहांचे उदयास्त यांसारखी माहिती काढणें अत्यंत सुलभ झालें आहे. यांची ही जंत्री फार महत्त्वाची समजली जाते.

तसेंच पिटमनची लघुलेखनपद्धति हुशार विद्यार्थ्यास आठ दिवसांत आत्मसात् करतां येईल इतकी ती यांनीं सुलभ करून ठेवली आहे. तामिळ वाङ्मयांतील 'संगमकाल' या सुवर्णयुगाचा निश्चित काल ठरवण्याची कामगिरी यांनीं केली. बुद्धाच्या जन्मतिथीवरहि यांनीं एक निबंध लिहिला आहे. (१) सीक्रेट ऑफ मेमरी, (२) फलज्योतिष, (३) पंचांगाज् ॲण्ड होरोस्कोप, किंवा इंडियन कॅलेंडर ॲण्ड इंडियन ॲस्ट्रॉलॉजी, (४) इंडियन एफिमेरीज, यांसारखे अनेक ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**पिल्सुडस्की, जोसेफ क्लेमेन्स** (१८६७–१९३५)—पोलंडचा एक प्रसिद्ध सेनापति व मुत्सद्दी. विद्यार्थिदशेपासूनच त्याचा राष्ट्रीय समाजवादाकडे कल होता, त्यामुळें त्याला चार वर्षें हद्दपारी झाली होती. १९०१ सालीं सेंट पीटर्सबर्गच्या तुरुंगांतून पळून जाऊन तो ग्रेटब्रिटन व पूर्वेकडील देश हिंडला, पण पहिलें महायुद्ध सुरू झालें तेव्हां पोलंडला परत आला व त्यानें रशियावर स्वारी केली. १९१९ सालीं पोलंडला लोकशाही स्वराज्य लाभलें, तेव्हां पिल्सुडस्कीला अध्यक्ष निवडण्यांत आलें. तीन वर्षें तो या जागेवर होता. १९२६ सालीं त्या वेळच्या सरकारचा पाडाव करून स्वतः मुख्य मंत्री झाला. नंतर तो हुकूमशहाच बनला. पोलंडच्या स्वातंत्र्य-युद्धावर त्यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत.

**पिशाच**—ऋग्वेदांत हा शब्द पिशाचि या रूपात एकदां आला आहे. अथर्ववेदांत व तदुत्तर ग्रंथांत उल्लेखिलेल्या राक्षसांपैकीं एका जातीचें हें नांव म्हणून आलेलें आहे. तैत्तिरीय संहितेंत त्यांचा संबंध राक्षस व असुर यांच्याशीं लावला आहे; व ते देव मनुष्य व पितर यांच्याविरुद्ध असत असें म्हटलें आहे. अथर्ववेदांत त्यांना कच्चें मांस खाणारे म्हणजे क्रव्याद असें म्हटलें आहे.

व यापासूनच व्युत्पत्तिशास्त्रदृष्टीनें पाहतां पुढील अर्थानें पिशाच शब्द झाला असावा. हे पिशाच लोक म्हणजे काल्पनिक मनुष्योपजीवी भुतें असावींत. जेव्हां ते मनुष्यजाति म्हणून उल्लेखिले जातात तेव्हां त्यांना मुद्दाम तिरस्कारानें पिशाच हें नांव दिलेलें असतें. मागाहूनच्या वैदिक वाङ्मयांत पिशाचवेद किंवा पिशाचविद्या म्हणून प्रसिद्ध आहे.

पिशाचांचे तीन प्रकार मानतात : (१) आपल्या परिचयाच्या माणसांचीं भुतें, (२) पितर व (३) दुष्ट भुतें. पिशाचें देहरूपधारी होऊं शकतात व त्यांना वाटेल तें देहरूप घेतां येतें, अशी एक कल्पना आहे. पृथ्वीवरील सर्व पंचमहाभूतें निरनिराळ्या पिशाचाच्या नियंत्रणाखालीं आहेत व हीं पिशाचें स्वभावतःच दुष्ट वृत्तीचीं आहेत अशीहि कल्पना आहे. भुतांना संतुष्ट ठेवल्यानें कोणत्याहि प्रकारें बाधा, रोगराई, वगैरे होत नाहीं किंवा झाली असल्यास ती दूर होते अशा नानाविध कल्पना निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या लोकांत प्रचलित होत्या व आहेत. स्वप्नांत पिशाचें येऊन तीं माणसाला झोंप घेऊं देत नाहींत, असें ऑस्ट्रेलियन (मूळचे) समजतात. मनुष्यप्राण्याचें रक्त पिणारें एक भूत आहे असें मलायांतील लोक मानतात. प्राचीन काळीं भुतांना खुष करण्याकरितां त्यांची पूजा करीत. अद्यापहि कित्येक लोक भुतांना बळी वगैरे देतात. पिशाच्याविषयीं चांगलेपणाच्याहि कल्पना प्रसृत आहेत. पुढें येणाऱ्या एखाद्या संकटाबाबत स्वप्नांत येऊन अगर अन्य तऱ्हेनें चांगल्या पिशाच्यांकडून इषारा मिळतो. अशा चांगल्या पिशाच्यांची पूजा वगैरे स्वाभाविकच आदरपूर्वक करण्यांत येत असते. आपल्याकडील मुंजाची कल्पना अशीच आहे. भुतें पाहा.

**पिष्टसत्त्व**—(स्टार्च). वनस्पतीपासून मिळणारें हें एक अत्यंत महत्त्वाचें रासायनिक द्रव्य आहे. हें बहुतेक सर्व वनस्पतींच्या पेशींमध्यें आढळतें. विशेषतः तें बी व ग्रंथी यांमध्यें आढळून येतें. बाजारांत मिळणारें पिष्टसत्त्व सामान्यतः गव्हाची कणिक किंवा बटाटे यापासून काढण्यांत येतें. शुद्ध स्वरूपामध्यें तें बर्फासारखें पांढरें व चमकदार असून त्याची पूड असते. यामध्यें पारदर्शक वाटोळे रवे असून त्यांचा आकार निरनिराळ्या वनस्पतींमध्यें निरनिराळा असतो. बटाट्याचे रवे सर्वांत मोठे असून गहूं व तांदूळ यांचे सर्वांत बारीक असतात. पिष्टसत्त्व थंड पाणी, मद्यार्क किंवा ईथर यांत विरघळत नाहीं, परंतु तें पाण्यांत घालून त्यास उष्णता दिली असतां त्यांतील रवे फुटून त्याचा काकवीसारखा द्रव बनतो. याची खळ करून कापड कडक करण्याकरितां वापरतात. मंद उष्णतेवर कढईत ठेवल्यास याची चिकट खळ तयार होते. तिचा उपयोग कापडावर नक्षी छापणारे करतात. या कामीं बटाट्याच्या पिष्टसत्त्वाचा चांगला



उपयोग होतो. (डेक्स्ट्रिन–सिंद्रक पाहा). पातळ गंधकाम्लामध्यें पिष्टसत्त्व उकळलें असतां त्यापासून ग्लूकोज तयार होतें. सर्व पिठूळ पदार्थांमध्यें पिष्टसत्त्व बऱ्याच प्रमाणांत असतें व तें गव्हाच्या पिठामध्यें बऱ्याच मोठ्या प्रमाणांत असून पावरोटीचा तो मुख्य घटक असतो.

**पिसा**—इटलींतील पिसा प्रांताची राजधानी. लो. सं. ७२,४६८. शहराभोंवतीं ६। मैल घेराचा जुना तट आहे. पूर्वी हें शहर फार भरभराटलेलें होतें. पुढें १३ व्या शतकांत खालावलें, पण तें गॅलिलिओनें पुनः सुधारलें. येथील झुलता मनोरा जगप्रसिद्ध आहे. तो ११७४ त बांधला. या संगमरवरी वाटोळ्या मनोऱ्याला आठ मजले आहेत. उत्तर बाजूस याची उंची १८१ फूट आहे. हा लंबरेषेपासून १४ फूट झुकला आहे.

१३३८ सालीं स्थापन झालेलें येथें विद्यापीठ आहे. सेंट स्टीफनचें प्रार्थनामंदिर प्रेक्षणीय असून १५६२ त बांधलेलें आहे. येथें कापूस होतो.

**पिसू**— हे दोन पंखांच्या माशांच्या वर्गांतील रक्तशोषक कीटक आहेत. यांच्यापैकीं अकरा जाती प्लेगजंतूंचा प्रसार करतात. विशेषतः उंदरांच्या अंगावर राहणारी पिसू प्लेगजंतूंचा प्रसार करते. पिसवांना पंख नसतात. शरीराचा आकार चपटा असतो. पाय लांब असतात. हे अंडीं केराच्या जागीं घालतात. यांना उष्ण रक्त आवडत असल्यानें या मेलेल्या प्राण्यांच्या अंगावर नसतात. फिनेल किंवा रॉकेल शिंपडल्यानें पिसवा मरतात.

**पिसें**—पक्ष्यांचीं पिसें हीं त्यांचीं वस्त्रें किंवा त्यांचीं

**पीस**

अ–नळी. ब–मध्यशिरा.

क–पंख.

ड आणि इ–नळीचीं तोंडें.

स्वाभाविक आच्छादनें होत. पिसें घेऊन न्याहाळून पाहिलीं तर गरमपणा, हलकेपणा, बळकटी, लवचिकपणा, मृदुता किंवा स्निग्धपणा, आणि पाण्याचा प्रवेश न होऊं देण्याची शक्ति हे दिसण्यांत परस्परविरुद्ध असे सर्व गुण पक्ष्यांच्या या आच्छादनांत एकवटलेले असतात. पिसाचे मुख्य तीन भाग असतात : (१) नळी, (२) नळीपुढील बारीक शर, आणि (३) शरावरील तंतू.

निरनिराळ्या जातींच्या पक्ष्यांस जशी पाहिजे तशी पिसांची रचना असलेली आढळते. बहिरीससाणे, गरुडपक्षी, हिंस्र वगैरे पक्षी यांचीं पिसें काठिण व घट्ट असून अत्यंत बळकट व स्थितिस्थापक असतात. घुवडांचीं पिसें नरम लवेनें भरलेलीं असतात. यामुळें त्यांस रात्रीं आवाज न करतां उडतां येतें व आपल्या भक्ष्यावर झाप घालतां येते. शहामृग व त्यासारखे जे दुसरे पक्षी उडत नाहींत त्यांच्या पिसांचे तंतू किंवा पाकळ्या आंकड्यांनीं जोडलेल्या नसून त्या परस्पर वेगळ्या असून उडत असतात. पाण्याचा प्रवेश न होऊं देण्याकरितां पोहणाऱ्या पक्ष्यांचीं पिसें दाट व तेलकट असतात.

पक्ष्यांच्या या आच्छादनांचा मनुष्यासाहि फार उपयोग होतो. आणि तीं 'क्विल'टांक, पिसें व लव या रूपांत विकलीं जातात. पिसांचा उपयोग गाद्या, गिरद्या, उशा, वगैरे भरण्यास करतात. हंसाचीं पिसें या कामास उत्तम समजतात.

शहामृग वगैरे कित्येक पक्ष्यांचीं पिसें युरोपियन बायका टोप्यांत वगैरे भूषणाप्रमाणें घालतात. पक्ष्यांच्या लवेचाहि वरच्या कारणाकरितां उपयोग करतात, आणि गळपट्टी करण्याच्या कातड्यास चिकटवितात.

**पिस्ता**— [ वर्ग–अनाकार्डिआसी. जाति–पिस्टासिआ ]. सिरीया, मेसापोटेमिया, खोरासान, वगैरे भागांत ३,००० हून अधिक उंचीच्या प्रदेशांत होणारें एक छोटें झाड. याचीं फळें खातात, पण तीं फार महाग असतात. पक्वान्नांत व मिठाईत घालतात. तीं पौष्टिक असतात. पिस्त्यांत तेल शेंकडा ६० प्रमाणांत निघतें. ते ओषधी असतें. झाडांपासून चीक निघतो. पानांच्या गांठी, फळांच्या साली, वगैरेंचा रेशीम रंगवण्याकडे उपयोग होतो. तेल पित्तशामक आहे.

**पिस्तूल**—हें एका मनुष्याने एका हातानें उडवावयाचें बंदुकीसारखें हत्यार आहे. याचे हें नांव टस्कनी प्रांतांतील पिस्तोजा या गांवीं हें प्रथम १५ व्या शतकांत तयार झालें म्हणून त्या गांवाच्या नांवावरून पडलें आहे. ह्या हत्यारामध्यें बंदुकीप्रमाणेच वरचेवर पुष्कळ सुधारणा होत आल्या आहेत. याचा उपयोग विशेषतः घोडदळामध्यें फार होत असे. पण त्यापेक्षांहि द्वंद्वयुद्धामुळें हें फार प्रसिद्धीस आलें, आणि त्याच्या अचूकपणामध्येंहि बरीच सुधारणा झाली. एका पिस्तुलांतून एकापेक्षां अधिक गोळ्या झाडण्याचे प्रयत्न पुष्कळच करण्यांत आले. १८३५ मध्यें कर्नल कोल्ट यानें एक स्थिर नळीचें पण गोळ्यांचें फिरणारें पंचपात्रें असलेलें पिस्तूल शोधून काढलें. यामध्यें घोडा मागें खेचला म्हणजे हें काडतुसांचें पंचपात्रें फिरण्याची रचना केलेली होती. यानंतर लंडन येथील ॲडॅम्स यानें चाप मागें ओढला किंवा घोडा दाबला तरी चक्र फिरण्याची युक्ति शोधून काढली. अलीकडे एक गोळी उडाल्याबरोबर तिच्या मागच्या दाबानें अथवा प्रतिक्रियेनेंच नवीन गोळी त्या जागीं येऊं शकते.

**पीअर**—[ वर्ग–रोझासी. जाति–पायरस काम्युनिस ]. बदामाच्या वर्गांतील हें एक झाड असून तें युरोप व आशिया खंडांतील बऱ्याच देशांत जंगलांत उगवतें. याच्या सुमारें २०० जाती आहेत. याची लागवड याच्याच रोपावर कलमें करून किंवा डोळे भरून करण्यांत येते. फ्रान्स व इटली यांमध्यें या फळांची अति उत्तम पैदास करण्यांत येते. बऱ्याचशा जातींच्या झाडांची लागवड त्यांच्या फळांपासून मद्य तयार करण्याकरितां करण्यांत येते. या मद्यास 'पेरी' म्हणतात. याच्या लांकडाचा रंग पिवळा असून त्याचे खे चांगले असतात. याला उत्तम तकाकी आणतां येते. याचा उपयोग वाद्यें तयार करण्याकरितां करण्यात येतो. तसेंच हत्यारांच्या मुठी करण्याकरितां व कोरींव कामाकरितांहि याचा उपयोग करतात.

**पीअरी, रॉबर्ट एड्विन** (१८५६–१९२०)—एक उत्तर ध्रुव प्रदेशाचा अमेरिकन संशोधक. त्यानें १८९१ सालीं ग्रीनलंड हें बेट आहे, असें सिद्ध केलें. नंतर तो आणखी सफरींवर १८९३, १८९६, १८९७, १८९८ आणि १९०५ या सालीं गेला आणि उत्तर ध्रुवाला जाऊन पोहोंचणारा (ता. ६ एप्रिल १९०९) तोच पहिला संशोधक होय. त्यानें या प्रदेशासंबंधीं तीनचार ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत.

**पीकॉक, थॉमस लव्ह** ( १७८५–१८६६ )—एक इंग्रज कादंबरीकार आणि कवि. त्यानें स्वतः वाचनानें आपलें ज्ञान वाढवलें आणि ग्रीक काव्याचा विशेष अभ्यास केला. १८१२ सालीं त्याची शेले कवीशीं ओळख झाली आणि ते दोघे जिवलग मित्र बनले. पीकॉकनें आपल्या बहुतेक कविता आपल्या कादंबऱ्यांतच लिहिलेल्या आहेत, त्यामुळें त्या कवितांना स्वतंत्र महत्त्व नाहीं. त्याची कीर्ति त्यानें लिहिलेल्या पुढील सात कादंबऱ्यांवर अधिष्ठित आहे: हेडलाँग हॉल ( १८१६ ); मेलिन कोर्ट ( १८१७ ); नाइट मेयर ॲबे ( १८१८ ); मेड मेरियन ( १८२२ ); दि मिस्फार्च्युन्स ऑफ एल्फिन ( १८२९ ); क्रॉचेट कॅसल ( १८३१ ); आणि ग्रील्ग्रेंज ( १८६० ). पीकॉकच्या ह्या कादंबऱ्या अतिशय सुंदर व आकर्षक आहेत. त्यांचे मुख्य गुण सुंदर लेखनशैली, यथातथ्य सृष्टिवर्णन, उत्तम व्यवहारज्ञान आणि मधून मधून घातलेलीं भावगीतें हे आहेत.

**पीच**—[ वर्ग–रोझासी. जाति–प्रूनस पर्सिका ]. बदामाच्या वर्गांतील हें एक झाड आहे. याचे अनेक प्रकार आहेत. याचीं फळें दोन प्रकारचीं असतात. एका जातीच्या फळांत बिया गरापासून मोकळ्या असतात व दुसऱ्या जातींत त्या गरास

ढकलेल्या असतात. याची एक जात बाहेरून गुळगुळीत असून तिला लव नसते.

**पीटर (संत)**—एक आद्य ख्रिस्ती धर्मप्रचारक. हा मूळचा गॅलिलियांतील कोळी असून याचें नांव सायमन होतें. हा येशू ख्रिस्ताच्या पहिल्या शिष्यांतील एक होता व ख्रिस्ती पंथांत पुढें याचें बरेंच वजन असे. याला रोममध्यें नेरोच्या अमदानींत मारण्यांत आलें. २९ जून हा याचा दिवस पाळतात.

**पीटर दि ग्रेट** (१६७२–१७२५)—एक रशियन सम्राट्. लहानपणींच जहाजें बांधणें, समुद्रप्रवास, लढाया हे याचे खेळ होते. मोठेपणीं या सर्व विद्या शिकून त्यानें स्वपराक्रमानें व धोरणानें रशियन राष्ट्राची घडी बसवली. यानें लढाया आणि तह यांच्या द्वारां रशियाचें वजन सर्व राष्ट्रांत वाढविलें व रशियनांच्या उन्नतीकरितां हा सदैव झटला. यानें एका स्वीडिश शिपायाच्या बायकोशीं लग्न लाविलें होतें. हीच कॅथेराइन (पहिली) पीटरनंतर राज्यारूढ झाली. पीटरनें १७०३ मध्यें सेंट पीटर्सबर्गची स्थापना केली.

**पीटरमारिट्झबर्ग**— आफ्रिका, नाताळच्या राजधानीचें शहर. हें दरबानपासून ४९ मैलांवर आहे. समुद्रसपाटीवर २२०० फूट उंच असून पर्जन्यमान ३८ इंच आहे. हें १८३९ त वसलें गेलें; येथून दरबानवरून जोहान्स्बर्गपावेतों रेल्वे आहे. येथें रेल्वेचे डबे, गाड्या, वगैरे करतात. विटा पाडणें, कातडी कमावणें व दारू गाळणें हे धंदे आहेत. येथें १८००० युरोपियन व तितकेच तद्देशीय काळे लोक राहतात.

**पीठ**—कोणतेंहि धान्य दळून केलेली पूड. धान्याचें पीठ करण्याची पद्धति फार प्राचीन आहे. प्रथम कुटून पीठ करीत. नंतर दोन पोकळ दगडांत घालून धान्य भरडीत. नंतर जात्याची युक्ति निघाली (जातें पाहा). ख्रिस्ती शकाच्या प्रारंभींच्या काळात रोमन लोकांनीं जात्याच्या उपयोगास सुरुवात केलेली दिसते. पीठ चाळून त्यांतील कोंडा, वगैरे काढून टाकण्यांत येतो. अलीकडे पिठाच्या गिरण्या निघाल्या आहेत. यांत दगडांच्या जात्यांऐवजीं लोखंडी किंवा पोलादी रूळ असतात व दळणें, चाळणें, पाखडणें, वगैरे सर्व क्रिया एकदम होतात. यामुळें धान्य ओतून त्याचें पीठ बाहेर पडेपर्यंत त्यास हात लावावा लागत नाहीं. पहिल्या कृतींत धान्यावरील तूस निघतें व धान्य किंचित् भरडलें जातें. ही क्रिया सर्व तूस निघून धान्य स्वच्छ होईपर्यंत पाहिजे तशी एक किंवा अधिक वेळां करण्यांत येते. नंतर पुन्हां दळणें व चाळणें या क्रिया एकामागून एक पाहिजे तितकें बारीक पीठ होईपर्यंत करण्यांत येतात. कोंडा एकीकडे जमा होतो तो गुरांना घालण्यांत येतो. एकदांच दळलेलें पीठ इतकें चांगलें नसतें, पण धान्य स्वच्छ झाल्यानंतर म्हणजे अधिक क्रिया झाल्यावर दळलेलें पीठ चांगलें निघतें. याकरितां पूर्वी धान्य एकाच क्रियेंत दळून देत असत, त्याऐवजीं हल्लीं अधिक क्रिया करण्यांत येतात. यामुळें धान्य जितकें टणक असेल तितकें पीठ चांगलें होतें. नरम धान्याचें पीठ चांगलें होत नाहीं. याकरितां इंग्लंडमध्यें तेथील गहूं सोडून अमेरिकेंतील गहूं आणविण्यांत येतो. खाण्याखेरीज पिठाचा उपयोग खळीसारखा करतात.

**पीठापुरम्**—मद्रास इलाखा, गोदावरी जिल्हा, एक जमीनदारी. क्षेत्रफळ ३८३ चौ. मै.. १६८ खेडीं आहेत. लो. सं. सु. तीन लाख. जमीन सुपीक असून कालव्यांचीहि योजना आहे. मुख्य पीक तांदूळ. इतर धान्येंहि विपुल. उत्पन्न ९॥ लक्ष. पीठापुरम् शहराची लोकसंख्या सु. वीस हजार.

१९ व्या शतकांत यावर गोवळकोंड्याच्या सुलतानांची सत्ता होती. १६४७ त रावचंद्रराय याच्याकडे ही जहागिरी आली. निजामउल्मुल्क दक्षिणेंत आल्यापासून त्याला खंडणी द्यावी लागत असे. इंग्रज आणि फ्रेंच यांच्या भांडणात पीठापुरम् मुळींच पडलें नाहीं. त्यामुळें जहागिरीस कांहीं त्रास झाला नाहीं.

**पीडा**—(नुइसन्स). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या इसमानें त्याच्या शेजाऱ्यांना किंवा सर्वसामान्य जनतेला त्यांच्या कायदेशीर हक्कांचा उपभोग घेत असतांना विशेष त्रास, उपद्रव किंवा पीडा देणें. इंग्लंडच्या कायद्यांत अशा पीडेचे दोन प्रकार असतात : (१) सार्वजनिक पीडा, व (२) खासगी पीडा. सार्वजनिक पीडेंत पुढील अपकृत्यांचा समावेश होतो : (१) सार्वजनिक रस्त्यांत किंवा पुलांवर किंवा नद्यांमध्यें रहदारीला अडथळा करणें, (२) घातक आणि त्रासदायक धंदे किंवा कारखाने चालविणें, (३) पिण्याचें पाणी सार्वजनिक आरोग्य बिघडेल अशा प्रकारें खराब करणें, (४) संसर्गजन्य रोग झाला आहे अशा इसमांना सार्वजनिक ठिकाणीं ठेवणें, व (५) पडावयास झालेल्या इमारती नादुरुस्त स्थितींत ठेवणें. खासगी पीडेची व्याख्या अशी कीं, एखाद्या इसमाला किंवा त्याच्या मिळकतीला इजा, त्रास किंवा नुकसानी होईल असें कृत्य करणें. सार्वजनिक पीडा ही खासगी पीडाहि होऊं शकते. उदा., एखाद्या सार्वजनिक पीडेच्या कृत्यानें एखाद्या विशिष्ट इसमाला इतरांपेक्षां विशेष दुखापत झाली तर तें अपकृत्य खासगी पीडा या गुन्ह्याखालीं येतें आणि त्याबद्दल त्या इसमाला दिवाणी किंवा फौजदारी कोर्टांत न्याय मागतां येतो. हिंदुस्थानांतहि अशाच प्रकारचा कायदा आहे. (इंडियन पीनल कोड २६८ ते

२९१ कलमें पाहा.) सदर कलमांत वर दिलेले गुन्हे असून शिवाय (६) खाण्यापिण्याच्या पदार्थांत आरोग्यविघातक पदार्थांची भेसळ करणें, (७) औषधांत अशीच भेसळ करणें, (८) जीविताला धोका होईल अशा निष्काळजीपणानें वाहनें चालवणें, (९) नावाहोड्यांत प्रमाणबाह्य माणसें किंवा माल नेणें, (१०) यंत्रें व स्फोटक द्रव्यें यांची योग्य काळजी न घेणें, व (११) दुसऱ्याला इजा करतील अशा जनावराची योग्य काळजी न घेणें, हेहि गुन्हे आहेत.

**पीतज्वर**—हा रोग रोगदूषित झालेल्या डांसाच्या दंशापासून उत्पन्न होतो. याचा प्रादुर्भाव अचानकपणें होतो व त्यांत डोकें-दुखी, पाठदुखी, वगैरे लक्षणें असून सर्व गात्रें दुखूं लागतात आणि प्रारंभीं काविळीचीं लक्षणें दृष्टीस पडतात. त्यामुळें यास पीतज्वर असें म्हणतात. यानंतर ४–५ दिवसांनीं ओकाऱ्या येऊं लागतात आणि शरीराच्या निरनिराळ्या अवयवांपासून रक्तस्राव सुरू होतो व कावीळ होते. या रोगापासून होणाऱ्या मृत्यूचें प्रमाण शेंकडा ३० ते ८० असतें. ज्या डांसाच्या दंशापासून हा रोग उत्पन्न होतो त्यांचा नाश केला असतां हा रोग आटोक्यात येतो.

हा रोग सांथीसारखाहि येतो. यात मृत्यूचें प्रमाण शें. १०० हि असूं शकतें. पश्चिम आफ्रिकेंत हा रोग विशेष आहे. अलीकडे पीतज्वराच्या रोगजंतूंपासून एक लस तयार करण्यांत आली आहे.

**पीतरंग**—(फ्लेव्हाइन). एक पिवळा रंग. क्वेरसिट्रोनच्या सालींतून हा रंग तयार करतात. क्वेरसिट्रोन सालीपेक्षां ह्या रंगाची आसवशक्ति जास्त असते. ॲल्युमिनियम किंवा कथिल ह्यांच्या वर्णधारकां(मॉर्डंट)वर हा रंग चढविला तर चमकदार रंग तयार होतात.

**पीपाजी** (पंधरावें शतक)—एक भगवद्भक्त राजा. हा राजपुतान्यांतील गढमंडळाचा राजा होता. हा चांगला पराक्रमी व वैभवसंपन्न असूनहि यानें राज्याचा त्याग करून रामानंदाचें शिष्यत्व पत्करिलें व पुढें हा महान् साधु म्हणून प्रसिद्ध झाला. नाभाजी व महिपति याची कथा देतात. याची पत्नी सीताराणी हीहि महासाध्वी होती. पीपाजीचा संप्रदाय राजपुतान्यांत असून याचे अनुयायी आपणास 'पीपावंशी' म्हणवितात. पीपाजींच्या नांवावर एक पद्य ग्रंथसाहेबांत आहे.

**पील, जॉर्ज** (१५५८–१५९८)—एक इंग्रज नाटककार व कवि. त्यानें ऑक्सफर्ड येथील शिक्षण संपल्यावर लंडन शहरांत बोहिनियन पद्धतीनें जीवन चालवलें. तो ग्रीन, नॅश व मार्लो याचा मित्र बनला. त्यानें ग्रामीण जीवनावर सुखान्त नाटक १५८१ सालीं लिहिलें तें 'दि ॲरेनमेन्ट ऑफ पॅरिस'. या नाटकात त्यानें एलिझाबेथ राणीची मोठ्या कुशलतेनें खुशामत केली आहे. त्याचें दुसरें नाटक 'पहिला एडवर्ड' स्पॅनिश आर्मेडाचा पराभव झाल्यावर लगेंच रंगभूमीवर आलें; त्या नाटकांत त्यानें स्पॅनियर्ड राणी एलिनॉर हिचें पात्र विकृत स्वरूपांत दाखवलें आहे. त्याचें पुढलें नाटक 'दि बॅटल ऑफ आल्काझार'. त्यानंतरचें त्याचें नाटक 'दि ओल्ड वाइव्हज् टेल' हें त्याच्या सर्व नाटकांत अतिशय मनोरंजक आहे. त्याचें नंतरचें नाटक 'दि लव्ह ऑफ किंग डेव्हिड ॲन्ड फेअर बेथसेब'. ह्याचें कथानक पूर्णपणें बायबलांतील जुन्या करारामधलें आहे. याशिवाय 'दि व्हिज्डम ऑफ डॉ. डॉडिपोल', 'विली बिगाइल्ड' आणि 'दि लाइफ ॲन्ड डेथ ऑफ जॅक स्ट्रा' हीं नाटकें पीलचींच आहेत असें मत आहे.

**पील, सर रॉबर्ट** (१७८८–१८५०)—एक ब्रिटिश मुत्सद्दी. हा वयाच्या २१ व्या वर्षीं पार्लमेंटांत शिरला व तीन वर्षांनीं आयर्लंडचा चिटणीस झाला. १८२२ त तो गृहखात्याचा चिटणीस झाला, तेव्हां त्यानें पोलिसांची एक नवीन सेना तयार केली. ती अद्यापि पीलर्स या नांवानें ओळखली जाते. तो तीन वेळां मुख्य प्रधान होता (१८३४, १८३९ व १८४१). त्यानें देशाची आर्थिक व्यवस्था नीट लावून देऊन कॅथॉलिक लोकांविरुद्ध असलेले कायदे रद्द केले. १८४६ सालीं मोठा विरोध असतांहि धान्याचा कायदा (कॉर्न लॉ) रद्द करून घेतला. नंतर तो विरोधी पक्षात राहिला.

**पीलक**—एक प्रवासी वर्गातील पक्षी. याच्या अंगाचा रंग पिवळा असून डोकें काळें असतें. हा साळुंकीच्या आकाराचा असतो. चोंच गुलाबी असते. कांहीं जातीच्या पक्ष्यांत डोकेंहि पिवळेंच असतें. आवाज मंजुळ असतो. हा बहुधा झाडावरच असतो व फळें आणि किडे खातो. हा आपलें घरटें फार मजबूत बांधतो. मादी एका वेळीं दोन-तीन अंडीं घालते.

**पीलू**—हा राग काफी थाटाचा जन्य राग आहे. ह्याच्या आरोहावरोहांत सातहि स्वर लागतात म्हणून ह्याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. गाण्याची वेळ दिवसाचा तिसरा प्रहर आहे. यास सार्वकालीन मानण्याचाहि प्रचार आहे. या रागांत सप्तकांतील तीव्र, कोमल सर्व स्वर लावण्याची मोकळीक आहे, असें कलावंत मानितात. परंतु तीव्र स्वर बहुधा आरोहांत व कोमल स्वर अवरोहांत घेण्याचा प्रचार आहे. हा एक मिश्रराग आहे. यांत भैरवी, भीमपलाशी, गौरी, वगैरे राग युक्तीनें मिसळविले जातात. याची प्रकृति चंचल आहे. हा राग क्षुद्रगीतार्ह आहे.

**पीळकाटा**—(टॉर्शन बॅलन्स). पिळाचा तराजू. हा पहिल्यानें फ्रान्समध्यें कोलोंब यानें तारांच्या पिळाचे नियम

शोधून काढण्याकरितां उपयोगांत आणला. त्यानंतर त्यानें या साधनाचा उपयोग दोन चुंबकीय ध्रुवामधील आकर्षण किंवा उत्सारणशक्तीचा नियम सिद्ध करण्याकरितां केला. या नियमाप्रमाणें हें दोन ध्रुवामधील आकर्षण किंवा उत्सारण त्यांतील अंतराच्या वर्गाच्या व्युत्क्रम प्रमाणांत असतें. याचा उपयोग विद्युत् यंत्राच्या बाबतींतहि हा नियम सिद्ध करण्याच्या कामीं होतो.

**पीळमापक**—(टार्शन मीटर). वाफेच्या यंत्राच्या कामाचें प्रमाण एका दर्शका(इंडिकेटरच्या)च्या साहाय्यानें निश्चित करतां येतें. वाफेच्या चक्रामध्यें हीच गोष्ट पिळाच्या मापकाच्या साहाय्यानें करण्यांत येते. जेव्हां एखाद्या दांड्यांतून शक्ति दूर अंतरावर पाठविण्यांत येते तेव्हां त्या दांड्यास थोडाफार पीळ पडतो. हा पीळ त्या दांड्यांतील धातु व त्यावर पडलेला शक्तीचा दाब यांवर अवलंबून असतो.

**पुंकेसर**—वनस्पतिशास्त्रांत फुलाच्या ज्या अवयवांपासून पराग कण निघतात त्यांस पुंकेसर म्हणतात. हे फुलांमध्यें पाकळ्यांच्या आंतील बाजूस अगदीं त्यांच्या जवळ असतात. यांचे प्रत्येकीं दोन भाग असतात. एक तंतू अथवा देंठ (फिलॅमेंट) व दुसरा अग्र अथवा शिर (ॲन्थर). वनस्पतिशास्त्र पाहा.

अ.—पृष्ठलग्न.
ब.—अधोलग्न.
क.—मध्यलग्न.
१. परागकोश. २ संधायक.
३. केसर.

**पुंगनूरु**—मद्रास, उत्तर अर्काट जिल्हा, एक जमीनदारी. खेडीं ५६४. मुख्य ठिकाण पुंगनूरु. जमीनदार लिंगायत आहेत. मूळपुरुष सितप्पा गौनिचारू १३ व्या शतकांत झाला तेथपासून १७ व्या शतकापर्यंत यांचा वाढता कारभार होता, परंतु १६३९ त मुसलमानांची स्वारी झाली व पुढें मुसलमान, मराठे, इंग्रज या सर्वांचा संबंध येऊन उतरती बाजू लागली. हल्लीं ही इजारावजा आहे.

**पुंगळी**—पुंगळ वेलीला बोकडी असेंहि नांव आहे. हिचीं पानें गुलबाशीच्या पानांसारखीं असतात. सुजेवर पाला वांटून लावतात. तसेंच कोणत्याहि पुळीवर लावला असतां आग कमी होऊन पुळी फुटते. ही वेल कुंपणावर लागलेली असते.

**पुंगी**—एक वाद्य. पपईच्या आकाराचा देंठाकडे निमुळता होत गेलेला असा कडू भोंपळा घेऊन, देंठाकडील निमुळत्या टोंकाशीं एक भोंक पाडतात. खालच्या बाजूस देवनळाच्या दोन नळ्या सुमारें वीत दीड वीत लांबीच्या त्यांत बसवितात. ह्या जोडनळ्यांपैकीं एक नुसता सूर देते व दुसऱ्या नळीस स्वराचीं भोंकें पाडलेलीं असतात. त्यावर बोटें ठेविल्यानें अलगुजासारखी ही वाजती होते. भोंपळ्याच्या वरील अंगास जें भोंक ठेविलेलें असतें त्यास तोंड लावून फुंकल्यानें वारा खालील नळ्यांत शिरतो व त्यामुळें हें वाद्य वाजूं लागतें. गारोडी लोक नागास मोहून टाकण्याकरितां ही पुंगी वाजवितात; त्यांचें हें मोठें आवडतें वाद्य आहे.

**पुंडरिक विठ्ठल**—हा एक सुप्रसिद्ध गवई अकबराच्या कारकीर्दींत होऊन गेला असावा. तो खानदेशांतील बऱ्हाणपूर येथें राहत असे. त्याला इ. स. १५९९ मध्यें अकबरानें दिल्लीस बोलावून नेलें होतें असें दिसतें. पुंडरिकानें षड्रागचंद्रोदय, रागमाला, रागमंजरी आणि नर्तननिर्णय हे चार ग्रंथ लिहिले. हे चारहि ग्रंथ अलीकडे बिकानेर येथील स्टेट लायब्ररींत शोधून काढण्यांत आले आहेत. पुंडरिकाच्या काळाच्या सुमारास उत्तर हिंदुस्थानांतील संगीत पद्धतीमध्यें बराच घोंटाळा माजत चालला होता व त्यामुळें राजा बुऱ्हाणखान यानें पुंडरिकाला संगीत पद्धतीला नीट शिस्त लावण्यास सांगितलें. यासाठीं पुंडरिकानें उत्तर व दक्षिण या दोन्ही पद्धतींचा अभ्यास केला. त्यानें आपल्या ग्रंथांत दक्षिणेकडील शुद्ध रागपद्धति स्वीकारली आणि उत्तरेकडील बऱ्याच रागांचें वर्णन केलें. त्यानें रागांचें वर्णन करतांना एका सप्तकांत १४ श्रुतींचा उपयोग केलेला आहे. पण आपल्या विण्याला फक्त १२ पडदे वापरलेले असतात.

**पुंडलिक**—एक विठ्ठलभक्त. याची समाधि पंढरपूरच्या वाळवंटांत दाखवितात. यानें आईबापांना तुच्छ लेखून व त्यांचे हाल करून बायकोला सुखांत ठेविलें. यामुळें त्याला फार पातक लागलें. तेव्हां पश्चात्ताप होऊन यानें मातापित्यांची अहर्निश सेवा चालविली. इतकी कीं, त्याच्या भेटीसाठीं प्रत्यक्ष विष्णु आला असतांहि त्याला एका विटेवर उभें राहण्यास सांगून आपण मातापित्यांच्या सेवेंत अंतर केलें नाहीं. हा विटेवर उभा राहिलेला विष्णु पुढें विठ्ठल या नांवानें ओळखला व पूजला जाऊं लागला. संतवाङ्मयांत पुंडलिकासंबंधीं अनेक उल्लेख आलेले आहेत. 'पुंडलीक वरदे हारि विठ्ठल' हा गजर प्रसिद्धच आहे.

**पुडुवैप्पु शक**—मल्याळी भाषेंत पुडुवैप्पु शक याचा अर्थ नवीन वसाहतीचा शक असा होतो (पुडु = नवीन, वेप = वसाहत). इ. स. १३४१ मध्यें कोचीनच्या उत्तरेस १३ मैल लांब व १ मैल रुंद असा जो एक जमिनीचा तुकडा समुद्रांतून वर आला त्याच्या स्मरणार्थ सदरहू शक सुरू करण्यांत आला होता. कोचीनचें

राज्य व डच ईस्ट इंडिया कंपनी यांच्या दरम्यान झालेला तह ज्यांवर खोदविला आहे असे पांच ताम्रपट आढळून आले आहेत, त्यांत पुडुवैप्पु शक ३२२,१४ मीनम् (मीन महिन्याचा १४ वा दिवस = ता. २२ मार्च ) असें लिहिलेलें आहे. या शकाचा कोचीनच्या राज्यांत पूर्वी थोडासा प्रचार होता, परंतु आतां तो समूळ नाहींसा झाला आहे.

**पुंड्र देश**—पूर्व बंगालकडील एक प्राचीन राष्ट्र. कृष्णाच्या वेळीं या देशात पौंड्रक वासुदेव राजा होता. सातव्या-आठव्या शतकांत हें राष्ट्र चांगल्या स्थितींत होतें. यांत पूर्वी हिरे सांपडत. हल्लीं रंगपूर, दिनाजपूर, पुरणिया, माल्दा, बोग्रा, राजशाही व पबना हे सात जिल्हे याच प्रदेशांत आहेत. भविष्यपुराणांतहि याचे सात विभाग दिले आहेत ते– गौड, वरेंद्र, निवृत्ति, नारीखंड, वराहभूमि, वर्धमान व विंध्यपार्श्व.

**पुणतांबें**—मुंबई, अहमदनगर जिल्हा, कोपरगांव तालुका, एक गांव. येथें बरींच मोठीं व जुनीं देवळें आहेत. आगगाडीच्या दौंड-मनमाड फांट्यावर हें एक स्टेशन आहे. येथें गोदावरीला दोन घाट आहेत. येथें चांगदेवाची एक समाधि आहे. चांगदेवाच्या योगसमाधि तापीकांठीं तेरा आहेत व ही अखेरची १४ वी होय असें सांगतात. एक साखरेचा कारखाना व शेतकी शाळा आहे. लो. सं. ६६७५.

**पुणें**—मुंबई, महाराष्ट्रांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ५,३२० चौरस मैल. लोकसंख्या (१९४१) १३,५९,४०८. याच्या भोंवती कुलाबा, ठाणें नगर व सोलापूर हे चार जिल्हे, तसेंच भोर व फलटण हीं जुनीं संस्थानें आहेत. नीरा नदी दक्षिणेस आहे. पश्चिमेस असणाऱ्या सह्याद्रीच्या रांगेतून कोंकण आणि देश यांना जोडणारे अनेक घाट आहेत; त्यांत बोरघाट मुख्य व फार प्राचीन (खि. पू. ३००) व विशेष रहदारीचा आहे. भीमा, घोड, नीरा व मुळामुठा या मोठ्या नद्या असून खडकवासला येथें पुण्याला पाणीपुरवठा करणारा मोठा तलाव आहे. कात्रजचा तलाव जुना पेशवाईतला आहे. पुण्याच्या भोंवतालीं घाट व किल्ले बरेच आहेत. दक्षिणोत्तर प्रदेशाचा पश्चिम भाग डोंगराळ व उंचवटयावर आहे. यांत अनेक खिंडी आहेत. खालीं सुपीक सपाट जमीन आहे. या खिंडी व त्यांतला प्रदेश यास उत्तरेकडे नेर, मध्यभागीं मावळ व खालीं दक्षिणेकडे खोरें म्हणतात. जिल्ह्यांत लहान-मोठे तलाव बरेच आहेत. नीरा व मुठा नद्यांपासून तीन मोठे कालवे काढले आहेत. पश्चिम भागांतली जमीन कमी कसाची आहे; पण तेथें पाऊस फार पडतो. तांदूळ, नाचणी, वरी, वगैरे धान्यें होतात. मध्यभागांत भाजीपाला व फळफळावळ होते; शिवाय मूग, मटकी, वगैरे कडधान्य होतें. पूर्वेपट्टी मात्र फार सुपीक आहे. तेथें पाऊस कमी तेव्हां गहूं, ज्वारी, हरभरा व थोडा कापूस होतो.

जंगलांत इमारती लांकूड, सर्पण, हिरडा, चिंच वगैरे निघते. मुख्य धंदा शेतकी व त्या खालोखाल विणकाम. कालव्याच्या पाण्याखालीं गूळ बराच होतो व कांहीं साखरेचे कारखाने चालतात. तळेगांवास एक कांचकारखाना आहे. मुंढव्यास कागदाची गिरणी आहे. पुणें–मुंबई, पुणें–सोलापूर, व पुणें–मिरज असे तीन आगगाडीचे फांटे आहेत. मोटार-वाहतूक फार आहे. पुणें–मुंबई विमानमार्ग चालू झाला आहे.

आयात माल : कापड, यंत्रें, कांचसामान, चहा, औषधें, स्टेशनरी, रॉकेल, सुपारी, नारळ इ.. निर्यात मालांत धान्यें, फळफळावळ, भाजीपाला, गूळ, विड्याचीं पानें, विड्या, भांडीं, कातडीं, हिरडे, इ. जिनसा येतात.

पुणें (शहर व उपनगर), बारामती, लोणावळें, जुन्नर, घोडनदी, तळेगांव (दाभाडे), आळंदी (देवाची), सासवड, जेजुरी, दौंड व इंदापूर या ठिकाणीं नगरपालिका आहेत. जिल्हा व तालुका लोकलबोर्डें असून ग्रामपंचायती दोन हजार वस्तींवरील मोठ्या गांवांतून आहेत.

लोकवस्तींत सु. बारा लाख हिंदू व सत्तर हजार मुसलमान आहेत. ख्रिस्ती वीस हजार आहेत. हिंदूंत शेंकडा सात साक्षर आहेत. जुन्नर, खेड, मावळ, हवेली, पुरंदर, भीमथडी व इंदापूर हे तालुके असून दौंड, आंबेगांव व मुळशी हे तीन पेटे आहेत. जुन्नर भाग फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. नाणेघाटांत लेणीं व शिलालेख आहेत. कार्लें येथील लेणीं जगप्रसिद्ध आहे.

इंग्रजी अमलापूर्वी शेतजमीन जथा आणि थळ यांत विभागलेली असे. त्यांचा सारा जथेकरी व थळकरी भरीत. त्यांच्या नांवावरून शेतांना नांवें पडलेलीं असत. उदा., जाधवजथा, पवारथळ, इ.. मलिकंबरची सारापद्धति दर बिघ्यास $\frac{१}{२}$ मण किंवा एक रुपयास ५$\frac{१}{२}$ आणे अशी असे. दादाजी कोंडदेवपद्धतींत $\frac{१}{२}$ किंवा $\frac{१}{३}$ सरकारसारा असे. मोंगलाईंत तेवढाच सारा असे. पाटस्थळावरचा सारा वेगळा असे.

शहर—हें शहर १८·३१ अक्षांश आणि ७३·५१ रेखांश यांवर वसलेलें असून मुंबईपासून ११९ मैल अंतरावर आहे. समुद्रसपाटीपासून १,८५० फूट उंचीवर वसलेलें हें नगर समुद्रकांठापासून केवळ ६३ मैल अंतरावर असून या नगराची हवा बव्हंशीं समधात आहे.

या नगराच्या पश्चिमेस मुठा नदी, उत्तरेस मुळा आणि मुठा, पूर्वेस बहिरोबा नाला, दक्षिणेस पर्वती आणि सिंहगड आणि भुलेश्वराच्या उत्तरेकडील कडेपठार आहे. याप्रमाणें हें नगर या चतुःसीमांमध्यें द्रोणाप्रमाणें खोलगटांत वसलेलें आहे. पूर्वी

या नगरास पांच नद्या होत्या असें म्हणतात. यांपैकीं आतां केवळ दोन मोठ्या नद्या (मुळा-मुठा) दाखवितां येण्यासारख्या असून नागेश्वरी (नागझरी), अमलका (अंबील ओढा) आणि माणिक (नाला) ह्या ओढ्यासारख्याच झालेल्या आहेत. दक्षिणेकडून उत्तरेकडे ७० फूट उतरत जाणाऱ्या पठारावर हें नगर वसलेलें आहे.

त्रैकूटक आणि आंध्र या राजवटींतील कांहीं नाण्यांवरून हें नगर त्या वेळीं त्या राजांच्या ताब्यांत होतें असें म्हटल्यास हरकत नाहीं. चालुक्य राजवंशापासून राष्ट्रकूटांनीं पुणें आणि त्या भोंवतालचा प्रांत हा इ. स. ७५४च्या सुमारास आपल्या अमलाखालीं आणल्याचें दिसतें. राष्ट्रकूटांच्या एका जुन्या ताम्रपटांत पुण्याचा उल्लेख 'पुण्यविषय' असा केलेला आहे. ह्या पुण्यविषयाचें वर्णन दुसऱ्या एका राष्ट्रकूटकालीन शिलालेखावरून एक सहस्र गांवांचा जो प्रांत तो असें केलेलें आढळतें. पुण्याचें जुनें नांव 'पुण्यविषय', 'पुणक' किंवा 'पूर्णक' असें होतें. राष्ट्रकूटांच्या राजवटीनंतर हा प्रांत देवगिरीच्या यादवांच्या अमलाखालीं गेला व तो तसा ३०० वर्षें त्यांच्या सत्तेखालीं होता. अल्लाउद्दीन खिलजीनें रामदेवरावाचा पाडाव केल्यावर पुण्याचें स्वामित्व साहजिकपणें दिल्लीच्या मोंगलांकडे गेलें. पुण्याचीं नारायणेश्वर आणि पुण्येश्वर अशीं दोन पुरातन शिवाचीं देवालयें भ्रष्ट करून मुसलमानांनीं त्या ठिकाणीं आपले दर्गे स्थापन केले. ते अद्यापि धाकटा व थोरला शेखसल्ला म्हणून प्रसिद्ध आहेत.

इ. स. १४९० पर्यंत हा भाग दिल्लीच्या बादशहाच्या अमलाखालीं होता असें दिसतें. नंतर कांहीं काल तो नगरच्या निजामशाहीखालीं आणि कांहीं काल विजापूरच्या आदिलशाही राजवटीखालीं होता. बंगालमधील श्रीचैतन्यस्वामी यांनीं तीर्थयात्रा करतांना या पुण्यक्षेत्रास भेट दिली. त्या वेळीं या शहरास 'पूर्णनगर' म्हणत असावे, असें डॉ. देवदत्तराव भांडारकर यांचें मत आहे. इ. स. १६०० मध्यें अकबर बादशहानें अहमदनगर जिंकल्यानंतर कांहीं काल हा भाग दिल्लीच्या मोंगल बादशहाकडे चालला. इ. स. १६२० सालीं मलिकंबरनें हा भाग पुन्हां मोंगलांपासून जिंकून नगरच्या निजामशाहीस जोडला आणि ह्या सालापासून मराठ्यांचा या शहराशीं अत्यंत निकट असा संबंध आला.

इ. स. १६२१ या वर्षी शहाजी भोसले यानें आदिलशाहींतील सरदार रायराव याचा पराभव करून हा प्रांत निजामशाहीच्या अमलाखालीं आणला. निजामशाहीकडून पुणें आणि शिरवळ या परगण्यांची जहागीर त्यानें मिळविली. निजामानें शहाजीचा सासरा लुकजी जाधव याचा वध करविल्याकारणानें तो पुढें निजामाशीं फटकून वागूं लागला व पुणें शहरावर अमल स्वतःच्या जबाबदारीवर चालवूं लागला. १६३१ सालीं विजापूरचा सरदार मुरार जगदेव पंडित यानें पुणें शहर काबीज करून तें लुटलें व शहराचा पूर्णपणें विध्वंस केला. इ. स. १६३६ सालीं विजापूरच्या आदिलशहानें पुणें आणि सुपें या जहागिरी शहाजी राजाला दिल्या. शहाजी राजाला कर्नाटकांत स्वारीवर जावें लागल्यानें त्यानें पुणें आणि सुपें या जहागिरींची व्यवस्था आपला विश्वासू आणि कर्तृत्ववान् सेवक दादाजी कोंडदेव याच्यावर सोंपविली. एवढेंच नव्हे तर आपली पत्नी व मुलगा शिवाजी यांनाहि त्याच्यापाशीं ठेविलें. त्या वेळीं पुणें शहर लहान होतें. शिवाजीचें बरेंचसें बालपण पुण्यास गेलें आणि शाहिस्तेखानाचीं बोटें कापण्याचा पराक्रम ह्याच पुण्यांत शिवाजीनें करून दाखविला. शिवाजीनंतर कांहीं काळ पुण्याचें महत्त्व थोडें कमी झालें होतें, परंतु शाहू छत्रपति आणि बाळाजी विश्वनाथ पेशवा यांच्यापासून म्हणजे १७२० पासून तें वाढतच गेलें. थोरला बाजीराव यानें पुणें शहर आपलें कायमचें वास्तव्यस्थान केल्यापासून आणि शनवारवाडा बांधल्यापासून पुणें शहर हें वस्तुतः सर्व हिंदुस्थानचें एक प्रमुख राजकीय केंद्र बनलें आणि ज्या शनवारवाड्याच्या तटाच्या भिंती आज आपण पाहतों त्या शनवारवाड्यांत सुमारें १०० वर्षेंपर्यंत हिंदुस्थानचें राजकारण खेळलें जात असे. इ. स. १७६१ या वर्षी पानपत येथील संग्रामांत जरी मराठ्यांना पड खावी लागली तरी इ. स. १८१७ पर्यंत म्हणजे पुणें शहर इंग्रजांच्या अमलाखालीं जाईपर्यंत पुण्याचें राजकीय क्षेत्रांतील महत्त्व तिळमात्रहि कमी झालेलें नव्हतें. आणि इंग्रजांच्या अमलाखालीं आल्यापासून पुण्याचें राजकीय क्षेत्रांतील महत्त्व स्वराज्यसत्ता लोप पावल्यामुळें जरी एका दृष्टीनें कमी झालें असलें तरी लोकसत्ताक राज्यपद्धतीच्या दृष्टीनें तें वाढतच गेलें.

शिवाजी राजाच्या वेळीं पुणें म्हणजे केवळ कसबा पेठ व त्याला लागून असलेला शनिवार, रविवार व सोमवार या पेठांचा भाग असावा असें वाटतें. शनिवार पेठ ही मुठा नदीच्या दक्षिण भागावर आणि रविवार व सोमवार या नागेश्वरीच्या दोन्ही तीरांवर वसलेल्या असाव्यात. १६६३ सालीं शाहिस्तेखानानें नागझरीच्या पूर्व तीरावर सोमवार पेठेच्या पश्चिमेस एक पेठ वसविली, तीच सध्यांची मंगळवार पेठ होय. म्हणजे शिवाजीच्या राज्याच्या अखेरीस पुणें शहर हें कसबा, शनिवार, रविवार, सोमवार व मंगळवार या पेठांचें बनलें होतें. औरंगजेबानें दक्षिणेंत स्वारी केली त्या वेळीं त्यानें आणखी एक पेठ वसविली. ती सध्यांची बुधवार पेठ होय. या पेठेच्या पूर्वेस

रविवार, उत्तरेस कसबा व शनिवार (कांहीं भाग) आणि पश्चिमेस शनिवार या पेठा येतात.

पुण्याचें शहर बनविण्याचा खरा मान थोरला बाजीराव पेशवा यासच दिला पाहिजे. पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यानंतर पुढच्याच वर्षी म्हणजे इ. स. १७२१ सालीं त्यानें बापूजी श्रीपत (चित्राव) नांवाच्या आपल्या सुभेदारास पुणें शहराची वाढ करण्याची आज्ञा दिली. बाजीरावानें आपल्याकरितां १७२९ सालीं पुण्याचा प्रसिद्ध शनवारवाडा बांधण्यास सुरुवात केली आणि पूर्वीचा नदीलगतचा कोट पाडून, जागा मोकळी करून, आपल्या सरदारांस आपल्याजवळ राहण्याकरितां वाडे बांधण्यासाठीं जागा नेमून दिल्या. त्यांपैकीं कांहीं सरदारांचे वाडे आजहि शनवारवाड्याच्या आसपास उभे असलेले आपणांस दिसतात. १७३४ सालीं बाजीरावानें एक नवी पेठ वसविली; ती बुधवारच्या दक्षिणेस असून तिचें नांव शुक्रवार पेठ असें ठेवलें. त्याच्यानंतर त्याचा पुत्र नानासाहेब पेशवा यानें पुण्यांत आणखी चार पेठा वसविल्या इ. स. १७५० त गुरुवार म्हणजे नंतरची वेताळ पेठ वसविली. इ. स. १७५५ मध्यें नागेश म्हणजे नंतरची न्याहाल व इ. स. १७५६ मध्यें गणेश पेठ वसविल्याचे दाखले इतिहासांत सांपडतात. याशिवाय शनिवार पेठेच्या पश्चिम अंगास नदीकांठीं आणखी एक पेठ त्यानें वसविली; ती म्हणजे सध्यांची नारायण पेठ होय.

इ. स. १७६१ च्या पानपतच्या युद्धात धारातीर्थी पडून कीर्ति मिळविणाऱ्या सदाशिवरावभाऊच्या स्मृतीसाठीं थोरल्या माधवरावाने सध्यांची सदाशिव पेठ इ. स. १७६९ मध्यें वसविली. त्यानेंच सध्यांची भवानी पेठहि नागझरीच्या पूर्वेस वसविली. माधवराव पेशवा अल्पायुषी ठरल्यानंतर व नारायण-रावाचा खून पडल्यावर १७७४ सालीं सवाई माधवराव गादीवर आला आणि त्यानें तीन नव्या पेठा पूर्व अंगास वसविल्या. त्यांपैकीं सरदार रास्ते यांच्या राहण्याच्या जागेजवळची म्हणून त्या पेठेस रास्ता पेठ असें नांव दिलें. त्याचा कर्तृत्ववान प्रधान आणि राजकारपटु नाना फडणीस याच्या आदरार्थ जी पेठ वसविली ती नाना पेठ होय. आणि सरदार घोरपडे ज्या भागांत वस्तीस असत त्या भागास घोरपडे पेठ असें नांव मिळालें. ही पेठ १७८१ सालीं वसली.

पेशवाई गेल्यानंतर थोड्याच वर्षांत म्हणजे इ. स. १८५६ या वर्षी पुण्यास म्युनिसिपालिटी आली व प्रथम रेल्वे सुरू झाली. पुढें इंग्रज राज्यकर्त्यांच्या शिक्षणाबद्दलच्या उदार आणि प्रगमन-शील धोरणामुळें पुण्याचें महत्त्व उत्तरोत्तर वाढतच गेलें. पुण्याची हवा मुंबईपेक्षां चांगली असल्याकाणानें पुष्कळसे युरोपियन अधिकारी व स्वतः ना. गव्हर्नरसाहेबहि पुण्यास येऊन वर्षांतून सहा सहा महिने येथें काळ कंठीत. तेव्हा साहजिकच याला पुन्हां राजधानीसारखें महत्त्व आलें.

पुणें शहर हें विद्येचें महत्त्वाचें केंद्र आहे. आणि याच कारणा-स्तव हजारों विद्यार्थी इतर ठिकाणांहून पुण्यास प्रतिवर्षी येतात. इंग्रजी अमदानींत मोठमोठ्या नोकऱ्या करून पेन्शन घेतलेले पुष्कळ अमलदार या ठिकाणीं राहत. त्या कारणानें पुण्याची वस्ती हळूहळू वाढूं लागली. फर्ग्यूसन कॉलेजची इमारत इ. स. १८९६ मध्यें गांवाबाहेर बांधली गेली. त्या कारणानें मुठा नदीच्या पश्चिमेस आणि चतुःशृंगीच्या पूर्वेस असलेल्या भागांत वस्ती वाढूं लागली. तसेंच आज आपणांस मुठा नदीच्या पश्चिमेकडे जो एवढा शहराचा विस्तार दिसतो, त्याचा उगम डेक्कन जिमखाना कॉलनींतच झाला असल्याचें आढळून येईल. शहराचा पश्चिम भाग अशा रीतीनें वाढत असतांना शहराचा दक्षिण भाग वाढविण्याचें कार्य शिक्षणप्रसारक मंडळीच्या न्यू पूना कॉलेजनें केलें. या कॉलेज इमारतीमुळें व टिळक रस्ता पडल्यामुळें जवळजवळ पर्वती तलाव व स्वारगेट यांपर्यंत पुण्याची वस्ती वाढली. नगर-रचना-योजना (टॉउन प्लॅनिंग स्कीम) क्र. १ यामुळें लकडी पुलापासून जुन्या इंजिनिअरिंग कॉलेजला जोडणारा एक नवीन जंगली महाराज नावाचा रस्ता होऊं शकला. त्यामुळें नदीकांठापासून नदीच्या पश्चिमेकडे गणेश खिंड येथवर वस्ती वाढूं लागली. त्याचप्रमाणें मुठा नदीच्या पश्चिमेस एरंडवणें येथें श्री. धोंडो केशव कर्वे यांच्या परिश्रमानें महिला विद्यापीठ स्थापन झालें. त्याकारणानें लकडी पुलापासून दक्षिणेकडे एरंडवण्याकडील आणि लॉ कॉलेज स्थापन झाल्याकारणानें वेताळाच्या डोंगरापर्यंत सध्यां पुण्याची वस्ती वाढलेली आहे.

पुणें नगरपालिका अस्तित्वांत येण्यापूर्वीं ३० वर्षें म्हणजे १८२६ त येथें पुण्यांत पहिली प्राथमिक शाळा निघाली. इ. स. १८५६ मध्यें पुणें नगरपालिका जरी अस्तित्वांत आली तरी पुढें २८ वर्षेंपर्यंत प्राथमिक शिक्षणाच्या शाळा चालविण्याचा अधि-कार तिला प्राप्त झालेला नव्हता. इ. स. १८८४ मध्यें तो अधिकार मिळाला. तेव्हां फक्त १६ प्राथमिक शाळा अस्तित्वांत होत्या. त्यांपैकीं आठ मुलांच्या, पांच मुलींच्या, एक अस्पृश्यां-साठीं, एक हिंदुस्थानी व एक उर्दू असें त्यांचें वर्गीकरण होतें. ह्या शाळांतून १६८४ मुलें व ३०९ मुली मिळून १९९३ विद्यार्थी शिकत होते.

१९२३ सालचा प्राथमिक शिक्षणाचा कायदा अमलांत येईपर्यंत म्हणजे ता. १ जुलै १९२५ पावेतों नगरपालिकेच्या शाळांवर सरकारी शाळा खात्याची पुष्कळ हुकमत चाले. म्युनि-सिपल स्कूल कमिटीकडून शाळांची सर्व व्यवस्था ठेविली जाई,

पुणें — शनवारवाडा ( पृ. १५०० )

पुणें — पर्वती देवस्थान ( पृ. १५०० )

पुरी — जगन्नाथ-मंदिर ( पृ. १५०६ )

पोलंड — ' कॉर्पस ख्रिस्टी डे ' चा सण साजरा होत आहे. ( पृ. १५३८ )

पण तिला हवी तशी स्वतंत्रता नसे. नवीन कायद्यानें सर्वच बाबतींत महत्त्वाची क्रांति घडून आली. या कायद्याचा हेतु मुलांमुलींचें प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक, सक्तीचें व मोफत करण्याचा आहे. त्या कायद्याप्रमाणें पुणें नगरपालिकेचें स्कूल बोर्ड १ जुलै १९२५ पासून अस्तित्वांत आलें. १९२९ सालीं डिसेंबरमध्यें सक्तीच्या शिक्षणाची मुलांमुलींसाठीं मंजूर झालेली योजना प्रथम नाना, भवानी, गंज, घोरपडे व गुलटेकडी या पांच पेठांच्या विभागांत सुरू झाली. प्रथम योजल्याप्रमाणें सर्व शहरांत सक्तीचें शिक्षण सुरू करण्याचा नगरपालिकेचा पंचवार्षिक हेतु जरी साध्य झाला नसला तरी पुनः शहराच्या उरलेल्या सर्व भागांत सक्तीचें शिक्षण सुरू करण्याचा ठराव स्कूल बोर्ड व पुणें नगरपालिका यांनीं केला. पुणें शहर म्युनिसिपालिटीच्यामार्फत प्राथमिक शिक्षणाच्या सोईसाठीं आज एकंदर ८८शाळा (२४,४७३ मुलां-मुलींची संख्या असलेल्या) निरनिराळ्या पेठांमधून चालू असून ह्या शाळांचा उपयोग सर्व जमातींसाठीं करण्यास मोकळीक आहे. साधारणतः प्रत्येक पेठेंत एक मुलांची व एक मुलींची अशा दोन शाळा असून कांहीं ठिकाणीं लोकसंख्येच्या मानानें प्रमाण कमीजास्त केलें आहे. शिवाय मुसलमान समाजासाठीं त्यांच्या वस्तींत मुलांची व मुलींची शाळा आहे. म्युनिसिपालिटीच्या शाळांखेरीज ६० शाळा खाजगी आहेत. त्यांत १५,५५० संख्या आहे. धंदेशिक्षणाची शाळा १८८९ सालीं नगरपालिकेनें सुरू केली, ती चांगली चालली आहे. तींत मेस्त्री, सुतार व वायरमेन तयार होतात.

तीन आर्ट्स कॉलेजें, एक स्थापत्य, एक शेतकी, एक वैद्यक, व एक कायद्याचें कॉलिज, तसेंच स्त्री-पुरुषांच्या अध्यापनशाळा व बरींच हायस्कुलें शहरात व आसपास आहेत. हिंगण्यास स्त्रियांसाठीं स्वतंत्र शिक्षणसंस्था व एरंडवण्यास स्त्रियांचें कॉलेज आहे. पुणें विद्यापीठ १९४९ सालीं स्थापन झालें. भांडारकर प्राच्य विद्या मंदिर, भारत इतिहास संशोधक मंडळ, अर्थशास्त्र–राज्यशास्त्राध्ययनाची संस्था, वैदिक संशोधन मंडळ, डेक्कन कॉलेज संशोधन संस्था, इ. इतर उच्च शिक्षण व संशोधन संस्था पुण्यांत आहेत. येथें नियतकालिकें, वर्तमानपत्रें आणि छापखाने बरेच आहेत. वाचनालयें व ग्रंथसंग्रहालयें मोठालीं आहेत. हिंदुस्थान सरकारची वेधशाळा, लष्करी शाळा आणि रसायनप्रयोगशाळा गांवाबाहेर आहेत.

शहराला पाणी खडकवासलें येथील सरकारी धरणाचें मिळतें. कात्रजच्या जुन्या तलावाचाहि या कामीं कांहीं उपयोग होतो. नगरपालिकेनें स्वतःचे कांहीं दवाखाने चालविले आहेत व दोन-तीन मोठ्या बागा केल्या आहेत.

पर्वती, शनवारवाडा, चतुःशृंगी, बंडगार्डन, पांचालेश्वर, वगैरे प्रेक्षणीय स्थानें असून अनेक जुनीं–नवीं देवळें आहेत. गांवाच्याभोंवतीं नवीन वस्ती होत आहे व गेल्या महायुद्धापासून लोकसंख्या पांचसहा लाख झाली आहे. बोलपट काढणाऱ्या संस्था पुण्यास सात आहेत. व्यायाम आणि खेळ यांसाठींहि क्लब–जिमखाने यांसारख्या चांगल्या सोयी आहेत.

**पुतळाबाई**—ही शिवाजीची तिसरी बायको असून मोहिते घराण्यांतील होती. राज्याभिषेकप्रसंगीं हिचा विवाह रायगडास झाला असें कांहीं इतिहासकार सांगतात, पण तें बरोबर दिसत नाहीं. रायगडास राज्याभिषेक झाल्या वेळीं त्यांना धार्मिक विधीमध्यें भाग घेतां यावा म्हणून सोयराबाई, पुतळाबाई, सकवारबाई, व सगुणाबाई या चार पूर्वींच लग्न झालेल्या पण हयात असलेल्या स्त्रियांशीं शिवाजीला पुन्हां लग्नें लावावीं लागलीं इतकेंच. पहिली राणी सईबाई यापूर्वीच (इ. स. १६५९ त) वारली होती. पुतळाबाईला मूल नव्हतें व ती शिवाजीबरोबर सती गेली.

**पुत्रजीव**—पुत्रवंती. हीं झाडें कर्नाटकांत फार होतात. यांच्या बियांच्या माळा करून त्या पुत्रप्राप्तीसाठीं वांझ स्त्रियांच्या गळ्यांत बांधतात. गंडमाळा, गालगुंड, काळपुळी, कालमांजरी, वगैरे फोडांवर याची अंतर्साल पाण्यांत उगाळून लावतात.

**पुदिना**—तुळशीच्या वर्गांतील एक वनस्पति. पानांस तिखट वास येतो. त्यांची चटणी करतात. शेंडेहि लावले असतां लागतात. ही औषधि वनस्पति आहे. अजीर्णावर अर्क देतात. ज्वरावर रस पोटांत देतात व नायट्यांवर रस अंगास लावतात.

**पुदुकोट्टई**—मद्रास इलाख्यांतील पांच मोठ्या संस्थानांतलें तिसरें संस्थान. क्षेत्रफळ १,१८५ चौरस मैल. लोकसंख्या ४,३८,३४८. हवा निरोगी व थंड असून पर्जन्यमान ३५ इंच आहे. चोल व पांड्य यांचा यावर प्राचीन काळीं अमल होता. १७ व्या शतकांत रामनाडचा सेतुपति याचा या भागांत अमल सुरू झाला. १६८० मध्यें सेतुपतीनें आपला मेहुणा रघुनाथ याला या संस्थानचा मुख्य नेमलें. या घराण्यानें इंग्रजांस वेळोवेळीं रसद, सैन्य, वगैरे सर्व प्रकारची मदत केली. संस्थानांत खेडीं ३७७. मुख्य पीक तांदूळ व हरभरा. दळणवळणाचीं अंतर्गत साधनें कमी. कांहीं सडका झाल्या आहेत. आगगाडी नाहीं. शिक्षणप्रसाराचा प्रयत्न चालू आहे.

हल्लींचे महाराज बृहदंबादास राजगोपाळ तोंड इ मान बहादुर यांना अधिकार १९४४ सालीं मिळाला. संस्थानचें उत्पन्न सु. अठ्ठावीस लाख रु. आहे. हें संस्थान आतां मद्रास प्रांतांत विलीन झालें.

गांव त्रिचनापलीपासून ३३ मैलांवर आहे. लो. सं. २१,०००. १८२५ मध्यें शहराची व्यवस्थित पुनर्रचना झाली. येथें दोन मोठे तलाव आहेत.

**पुनरुज्जीवनकाल**—(रेनेझास). पश्चिम खंडांत म्हणजे युरोपांत मध्ययुगाचा जुनाट बुरखा जाऊन नवीन तेज या काळांत प्रकट झालें. पंधराव्या शतकाच्या मध्यावरचा काळ हा युरोपच्या पुनरुज्जीवनाचा काळ साधारणपणें धरतात. या वेळीं पूर्वेकडील रोमन साम्राज्य नष्ट झालें व इटली आणि जर्मनी या राष्ट्रांत जुन्या विद्या–कलांकडे लोकांचें लक्ष वेधलें गेलें. बाराव्या शतकापासून विश्वविद्यालयांची स्थापना होऊं लागली तेव्हां अर्थात् बुद्धिप्रामाण्य आलेंच. आबेलार्ड, रॉजर बेकन, २ रा फेडरिक बादशहा, डान्टे, पेट्रार्च, बोकॅशिओ, वगैरेंनीं देशांत नवीन विचार, सुधारणा व साहित्य प्रसृत केलें. अमेरिका आणि हिंदुस्थान यांचे शोध लागून नवीन जगाची ओळख झाली. नवीन शास्त्रीय शोध निघूं लागले. जर्मनींत बायबलचा नवीन दृष्टीनें अभ्यास सुरू झाला व त्याचा परिणाम म्हणजे धार्मिक सुधारणा (रेफॉर्मेशन) होय. या सुधारणेची लाट जी इंग्लंडवर आदळली तिनें चर्चमध्यें क्रांति करून सोडली. ग्रीक भाषेचा अभ्यास सुरू झाला. बायबलचें इंग्रजी भाषांतर झालें व कलाक्षेत्रांत वास्तवता दिसूं लागली.

**पुनरुज्जीवनकालीन शिल्पकला**—ही प्राचीन ग्रीकोरोमन धर्तीवर आहे. या कलेला सुरुवात इटलींत होऊन ती पुढें युरोपांतील इतर राष्ट्रांत पसरली. रोम येथील मिचेल एन्जेलोनें केलेला सेंट पीटर्सचा घुमट हा या कलेचा अत्युत्कृष्ट नमुना म्हणून सांगतां येईल. इंग्लंडमध्यें एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीत या शिल्पाचा प्रवेश झालेला दिसतो. इनिगो जोन्स, सर क्रिस्तोफर रेन व इतर समकालीन शिल्पकार यांनीं उठविलेल्या इमारतींतून हें शिल्प पाहावयास मिळतें.

**पुनरुत्थान**—(रिसरेक्शन). जगाच्या अंतकाळीं परमेश्वर न्यायासनावर बसेल व सर्व मृत देह उठून आत्म्याशीं एकजीव होतील असा ख्रिस्ती धर्माचा विश्वास असून त्याला पुनरुत्थान म्हणतात. प्रत्यक्ष ख्रिस्तानें आपल्या थडग्यांतून वर येऊन शिष्यांना दर्शन दिलें. या प्रकारावरून पुनरुत्थानावर ख्रिस्त्यांचा विश्वास बसला. या सिद्धांताचीं थोडीं बीजें प्राचीन ख्रिस्तीतर धर्मांत आढळतील. पुढें फॅरिसी संप्रदायानें हा सिद्धांत उचलला.

**पुनर्जन्म**—हा धर्मज्ञानांतला एक सिद्धांत आहे. त्याचा अर्थ असा कीं, मनुष्याचा देह मृत झाल्यावर त्याचा आत्मा दुसऱ्या मानवी देहांत, किंवा हलक्या प्राण्यांच्या देहांत, किंवा वृक्षवनस्पतींमध्यें किंवा निर्जीव वस्तूंमध्यें प्रवेश करतो. प्राचीन ईजिप्तमधील धर्मोपदेशकांनीं या सिद्धान्ताचा गुप्त प्रचार केला; आणि नंतर हा सिद्धान्त ग्रीक लोकांत पसरला. पॅथॅगोरसनें प्रथम आपल्या तत्त्वज्ञानग्रंथांत पुनर्जन्माच्या सिद्धांताचें विवेचन केलें. पण तत्पूर्वींहि थेल्स आणि फेरेसीडस यांनीं पुनर्जन्माबद्दल शिकवण दिली होती. प्लेटोनें आपल्या 'फीडो' आणि 'रिपब्लिक' या दोन ग्रंथांत पुनर्जन्म असल्याचें प्रतिपादन केलें आहे; आणि नवप्लेटोवादांतहि त्याला मान्यता दिलेली आहे.

भारतीय तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें पाहतां जीव व शरीर भिन्न असून मृत्यूचा अर्थ विद्यमान शरीर जीवानें सोडणें हा आहे. पुढें तोच जीव जेव्हां दुसऱ्या मानवी शरीरात प्रवेश करतो, तेव्हां त्याला पुनर्जन्म म्हणतात. पुनर्जन्म मानला कीं पूर्वजन्म आलाच. पुनर्जन्माची कल्पना अनुमानावर बसवलेली आहे. प्रत्यक्ष प्रमाणानें ती सिद्ध होण्यासारखी नाहीं. समान परिस्थितींत वाढलेल्या दोघां मुलांत बौद्धिक दृष्ट्या फरक दिसतो, त्याचें कारण पूर्वजन्मांतील कमी–अधिक तयारी असें मानण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति होते. जन्मापासून मुलांच्या वाढीचा सूक्ष्म अभ्यास केला जाईल तेव्हांच कदाचित् पुनर्जन्माची कल्पना बदलावी लागेल. सध्यां मात्र हिंदु धर्माची उभारणी ह्या एका कल्पनेवर केलेली आहे. वासना तृप्त करण्यासाठीं जीवाला जन्म घ्यावे लागतात म्हणून ते टाळण्याकरितां वासनारहित म्हणजे निर्हेतुक कर्माची कल्पना पुढें आली. हाच खरा कर्मयोग. नंतर वासनांचें निर्मूलन होऊन ज्ञानप्राप्तीनेंच जन्म टळेल हा विचार सरसावला. तोंपर्यंत जन्ममरणाचें रहाटगाडगें सारखें फिरत राहणार. सत्कर्मानें ह्या नाहीं तर पुढील जन्मीं सुख लाभेल, असें लोक मानूं लागले. धर्माला ईश्वरापेक्षांहि पुनर्जन्माचें अधिष्ठान आहे. पुनर्जन्माची कल्पना फोल ठरल्यास स्वर्गाची लालूच व नरकाची भीति हींच राहिलीं; परंतु विवेकाला स्वर्गनरकांची कल्पना पटण्यासारखी नाहीं.

**पुनर्नवा**—हीं झाडें हिंदुस्थानांत पुष्कळ आढळतात. हीं तरळ वाढतात. यांच्या लांकडाचा गलबतें बांधण्याच्या कामीं उपयोग होतो. कलकत्ता येथील पुनर्नवा उत्तम असतो. याला देशावर घेटुळी व कोंकणांत खापरी म्हणतात. तांबड्या व पांढऱ्या अशा दोन मुख्य जाती आहेत. पांढऱ्याची भाजी होते. डोळ्याच्या रोगांवर मुळी उगाळून घालतात.

**पुनर्विवाह**—पुनः म्हणजे एका विवाहानंतर परत विवाह करणें हा पुनर्विवाह शब्दाचा अर्थ आहे. स्त्रीच्या किंवा पुरुषाच्या द्वितीय विवाहाला पुनर्विवाह म्हणतां येईल. परंतु सध्यां ज्यांच्यांत स्त्रियांचा पुनर्विवाह रूढ नाहीं अशा जातींतील स्त्रियांच्या द्वितीय विवाहालाच हा शब्द रूढ करण्यांत आला आहे. वेदाचा अधिकार नसलेल्या जातींत पाट अथवा मुहूर्त (मोतुर) हे शब्द पुनर्विवाहार्थी रूढ आहेत. त्रैवर्णिकांत स्त्रियांचा पुनर्विवाह निषिद्ध मानला आहे. याबद्दल स्मृतिवचनें उलट–सुलट आहेत. अक्षतयोनिकन्येच्या पुनर्विवाहाला मनु, बौधायन, नारद, लघुशातातप, वसिष्ठ व प्रजापति यांनीं संमति दिली आहे. नारद,

देवल, कात्यायन व हारीत ह्यांनीं विनशर्त परवानगी दिली आहे. स्त्रीपुनर्विवाह कलियुगांत वर्ज्य आहे असें म्हटल्यामुळें तो पूर्वीं विहित होता हें स्पष्टच आहे. महाराष्ट्रांत विद्वान् धर्मशास्त्रज्ञांनीं स्थापन केलेल्या धर्मनिर्णय मंडळानें पुनर्विवाहाला मान्यता दिली असून प्रयोगहि तयार केला आहे. आतां कायद्यानें विधवाविवाह व्यवहार्य केला आहे. मात्र पहिल्या मिळकतीवर या विधवेचा हक्क राहत नाहीं. विधवाविवाह पाहा.

**पुरणिया**—विहार, भागलपूर विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ ४,९९८ चौ. मै.. पर्जन्यमान ७१ इंच. लोकसंख्या (१९४१) २३,९०,१०५. शेंकडा ७० शेतकरी व १५ उद्योगधंदा करणारे आहेत. तागाचीं पोतीं करण्याचे कारखाने मोठ्या प्रमाणांत आहेत. तसेंच निळीचेहि आहेत. ह्या भागाचा उल्लेख महाभारतांत आहे. महानंदा नदी वंग व पुंड्र राष्ट्रांची सरसीमा म्हणून वर्णन आहे. नवव्या शतकांत पालराजे व तेराव्या शतकांत नदिया राजधानींत सेन राजे होते. त्यानंतर मुसलमानी सत्तेचा बराच काळ गेला. १७६५ पासून हा भाग इंग्रजी सत्तेखालीं आला. पुरणिया गांव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या सु. वीस हजार. येथें १८६४ सालीं नगरपालिका स्थापन झाली. सतरंज्या, चटया, नवारी, वगैरे होतात.

**पुरंदर**—मुंबई, पुणें जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ ४७० चौ. मै.. गांवसंख्या ९२ व लोकसंख्या ९४,७५५. तालुक्याचा बहुतेक भाग डोंगरी आहे. मल्हारगड, पुरंदर, वजीरगड हे किल्ले आहेत. नीरा नदीच्या कालव्यांनीं बऱ्याच भागाला पाणी मिळतें. त्यामुळें उंसाचें पीक विशेष आहे. वार्षिक पर्जन्यमान २३ इंच. बाजरी, गहूं, व फळफळावळ यांचें पीक होतें. वाल्ह्याचीं केळीं, राजेवाडीचे अंजीर व परिंचे–वीर येथील विड्याचीं पानें प्रसिद्ध आहेत.

सासवड हें तालुक्याचें मुख्य ठिकाण. याशिवाय जेजुरी व नीरा हीं मोठीं गांवें आहेत. जेजुरीला खंडोबाचें देवस्थान असून नीरा ही मोठी व्यापारी पेठ आहे.

**पुरंदर किल्ला**—पुणें जिल्हा. हा किल्ला सासवडजवळ आहे. अक्षांश १८·१७° उ. व रेखांश ७४·२° पू.. सह्याद्रीच्या एका फांट्यावर हा आहे. गडाचें अत्युच्च शिखर केदारलिंग समुद्रसपाटीपासून ४५६४ फूट उंच आहे. गडाच्या पायथ्याशीं पूर गांव आहे. पूरपासून वर माचींत जाण्यास नवी पक्की सडक झाली आहे. गडावर शिवाजीनें बांधलेले 'राजाळ' व 'पद्मावती' असे दोन पाण्याचे तलाव आहेत. पुरंदरेश्वर व केदारेश्वर हीं जुनीं देवळें आहेत. बालेकिल्ला हा मुख्य गड. यावर देवळें व इमारती बऱ्याच आहेत. येथें शके १२०७ चा शिलालेख मिळाला आहे, यावरून हें स्थान प्राचीन असल्याचें दिसतें. मुसलमानांकडून शहाजीकडे हा किल्ला सन १६३६ त आला. तो जयसिंगानें १६६९ त शिवाजीपासून जिंकून घेतला. पुढें १७०४ मध्यें शंकराजी नारायण सचिवानें मोंगलांकडून घेतला. या किल्ल्यावर सवाई माधवरावाचा जन्म वैशाख शु॥ ७ शके १६९६ रोजीं झाला. या किल्ल्याला लष्करीदृष्ट्या फार महत्त्व आहे. इंग्रजी अमदानींत यावर सैन्याची एक तुकडी असे.

**पुरंदरदास** (मृत्यु १५६४)—एक कानडी कवि. हा सासवडजवळील पुरंदरगड गांवचा. प्रथम हा सराफीचा धंदा करीत असे. परंतु पुढें यास कृष्णाचा साक्षात्कार झाल्यानें यानें आपलें आयुष्य विठ्ठलनामसंकीर्तनांत घालविलें. पंढरपुरास हा भिक्षा मागून राहूं लागला. सन १५३८ मध्यें हा विजयनगर येथें होता. हा प्रथम स्मार्त होता, परंतु नंतर माध्वसंप्रदायी झाला. व्यासरायांचा हा शिष्य म्हणवी. 'पुरंदरदासाचें कीर्तन' या याच्या पद्यसंग्रहांत विष्णुस्तुति व तत्त्वज्ञान आढळून येतें. कानडी लोकांत याचीं पदें फार प्रसिद्ध असून यास कर्नाटकाचा तुकाराम असें म्हणतात.

**पुरंदरे घराणें**—पुरंदरे मूळचे पुणें जिल्ह्यांतील सासवड गांवचे कुलकर्णी. अंबाजी पुरंदरे व बाळाजी विश्वनाथ भट यांचा परम स्नेह होता. भट हे पेशवे व पुरंदरे त्यांचे मुतालीक. (अंबाजी पुरंदरे पाहा.) अंबाजीचा पुत्र महादबा हा शूर लढवय्या व धनिक होता. पेशव्यांना त्याची मोठी मदत असे. पुढें पेशव्यांचा कारभार फडणिसाकडे गेला व पुरंदऱ्यांनीं राघोबादादाचा पक्ष स्वीकारल्यामुळें बारभाईंशीं वितुष्ट आलें. नंतर हें घराणें मागेंच पडलें. हल्लीं या घराण्यांतील दत्तकाचा वंश पुणें व सासवड येथें नांदत आहे. या पुरंदरे घराण्यांतील ऐतिहासिक कागदपत्रें तीन खंडांत प्रसिद्ध झालीं आहेत.

**पुरळ**—(इं. हर्पीझ; सं. विसर्पिका). हा एक त्वग्रोग आहे. यामध्यें एकाएकीं ओठावर, नाकपुड्यांवर व चेहऱ्याच्या इतर भागीं पुटकुळ्या उठतात. हा रोग गुह्येंद्रियें, नितंब, स्तन, वगैरे भागांवरहि होतो. परंतु इतरत्र क्वचित् आढळतो. हा स्वतंत्र रीतीनेंहि होतो. परंतु पुप्फुळदाह नवज्वर, अथवा मेंदूचे विकार यांतहि आढळतो.

**पुराणवस्तुशास्त्र**—(आर्किऑलॉजी). एखाद्या राष्ट्राच्या अथवा लोकांच्या इतिहासाचें त्यांच्या शिल्पपद्धती, हत्यारें व इतर प्राक्कालीन अवशेष यांवरून ज्ञान करून घेण्याचें शास्त्र म्हणजे पुराणवस्तुशास्त्र होय. पुराणवस्तुशास्त्रामध्यें मानवजातीच्या प्राथमिक इतिहासाचे तीन काल कल्पिले आहेत, व त्यांस त्यांतील हत्यारें व इतर साधनें वगैरेकरितां वापरण्यांत येणाऱ्या वस्तूंवरून पाषाणयुग, कांस्ययुग व लोहयुग अशीं नांवें देण्यांत आलीं आहेत. पाषाणयुगाचे पुन्हां पूर्व–पाषाणयुग व

उत्तर किंवा नवपाषाणयुग असे दोन भाग करण्यांत येतात. यांतील पहिल्या काळांत जीं दगडांचीं हत्यारें तत्कालीन मनुष्यें वापरीत असत तीं पुढील काळांतील हत्यारांप्रमाणें फारशीं घासलेलीं किंवा चकचकीत केलेलीं नसत. कांस्ययुगामध्यें मृतांस जाळून त्यांची रक्षा भांड्यांत घालून, तीं भांडीं दगडी पेट्यांमध्यें ठेवून, त्या पेट्या जमिनींत पुरून, त्यांवर मातीचे किंवा दगडाचे निमुळते बुरूज रचीत असत. या युगांतील लोक सोन्याचे व अंबर दगडाचे दागिने वापरीत असत. लोहयुगामध्यें लोक लोखंडाचीं हत्यारें वापरूं लागले. तथापि त्या काळींहि कांस्याचीं व दगडाचीं हत्यारें वापरण्यांत येत असत.

पुराणवस्तुशास्त्रांतले जे पहिले संशोधक होऊन गेले त्यांत सर हेन्री लेयार्ड यांचें नांव घ्यावें लागतें. यांनीं १८५० च्या आसपास निनेव्हे आणि बाबिलोन येथील अवशेष तपासले. त्यानंतर भूमध्यसमुद्राभोंवतालच्या प्रदेशांतून संशोधन जोरानें सुरू झालें व नंतर अमेरिका आणि आशिया खंडाची पाळी आली. ट्रॉयचें उत्खनन टी. श्लीमन या जर्मन शास्त्रज्ञानें करून बरेच आश्चर्यकारक शोध लाविले. असाच ईजिप्तचा प्राचीन इतिहास सर विल्यम फ्लिंडर्स पेट्री व हॉवर्ड कार्टर यांनीं पुढें आणला. क्रीट (संशोधक–सर आर्थर इव्हान्स), आशिया मायनर (सं.–सर विल्यम रॅम्से) व मध्य आशिया (सं.–सर ओरेल स्टीन) यांतहि उत्खनन करण्यांत आलें. विसाव्या शतकांत मेसापोटेमियांतील उर शहराचे अवशेष मिळून प्राचीन सुमेरियन आणि इतर संस्कृतींविषयीं महत्त्वाची नवीन माहिती उपलब्ध झाली. त्याचप्रमाणें रोम आणि अथेन्स या ठिकाणीं उत्खननाचें काम चालू झालें व रोमन आणि ग्रीक इतिहासांत किती तरी भर पडली. युरोपच्या इतर भागांतूनहि संशोधकांनीं उत्खनन सुरू केलें व किती तरी बारीकसारीक माहिती पुढें आणली.

हिंदुस्थान हें अत्यंत प्राचीन राष्ट्र असून सुद्धां त्याचा प्राचीन इतिहास अलिखित असल्यामुळें शंभर वर्षांपूर्वींपर्यंत प्रत्यक्ष पुरावे उपलब्ध नव्हते. प्रिन्सेपनें जेव्हां ब्राह्मी लिपीचें वाचन करून अशोकाच्या शिलाशासनांचा अर्थ लावण्यास मदत केली तेव्हां कोठें हिंदी लोकांत या शास्त्राच्या अभ्यासाविषयीं जागृति झाली. इतिहासपूर्वकालांतील अवशेष साबरमती आणि नर्मदा *या नद्यांच्या खोऱ्यांतून सांपडले; नष्ट झालेल्या प्राण्यांचीं हाडेंहि* मिळालीं व कित्येक सहस्र वर्षांमागील इतिहासाचा शोध लागला. मद्रास, मयूरभुंज, राजपिपला व बडोदें संस्थान या भागांतून पद्धतशीर रीतींनीं उत्खननकार्यें होऊन भरतखंडांतील प्राचीन मानवाचें आयुष्य कसें गेलें असेल हें कांहींसें समजून आलें. तसेंच नवपाषाणयुगानंतरच्या संस्कृतींची माहिती ठिकठिकाणीं झालेल्या संशोधनांवरून पुढें आली.

नंतर सिंधखोऱ्यांतून उत्खनन होऊन हरप्पा आणि मोहेंजोदारो या ठिकाणचे अवशेष जेव्हां बाहेर निघाले तेव्हां ख्रि. पू. तीन हजार वर्षांपूर्वीं बहुतेक आतांप्रमाणेंच लोक कसे सुधारलेले होते हें प्रत्यक्ष कळून आलें. चांगली नगररचना, सर्व सोयींनीं युक्त अशीं घरें, विहिरी, गटारें, स्नानगृहें, देवळें, इ. गोष्टी त्या वेळींहि लोकांच्या परिचयाच्या होत्या याचें प्रत्यंतर सांपडलें. पुढील बौद्धकालांतील मठ, मूर्ती, लेणीं (उदा., तक्षशिला, सारनाथ, कार्लें, इ.), मथुरेच्या भागांतील जैन आणि ब्राह्मणी शिल्पांचे अवशेष, गुप्तकालांतील ग्रीक कलेची छाप असणाऱ्या गोष्टी, शेंकडों शिलालेख, ताम्रपट, नाणीं, वगैरेंचें संशोधन होऊन हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासावर बराच प्रकाश पडला. त्यावरून वाङ्मयांतील माहितीचे पडताळे पाहण्यास मदत झाली.

या संशोधनाला चालना देण्यासाठीं व संशोधित वस्तूंचें संरक्षण करण्यासाठीं सरकारी खातेंच असतें. उत्खननांत मिळालेल्या वस्तू नीट प्रदर्शनांत मांडलेल्या असतात व अशीं प्रदर्शनें अभ्यासू लोकांना सवलती देतात व मदतहि करतात. हिंदुस्थानांत लॉर्ड कर्झन या व्हाइसरॉयनें पुराणवस्तुखातें निर्माण केलें व पुराणवस्तुसंरक्षणाबद्दल कायदाहि केला. यामुळें प्राचीन अवशेष मागें तीस वर्षांपूर्वी जसे होते तसेच आज टिकून आहेत. मुसलमान आणि मराठे यांच्या अमदानींत या गोष्टीकडे सरकारचें लक्ष गेलें असतें तर आहेत यापेक्षां किती तरी पुराणवस्तू आपणांस दिसत्या.

पुराणवस्तुशास्त्र हें विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्षेत्रांत गेल्यानें या विषयाचा परिपूर्ण अभ्यास केलेले पदवीधर संशोधनासाठीं मिळूं लागले. कलकत्ता विद्यापीठातर्फे उत्तर बंगालमधील बनगढ येथें उत्खनन करण्यांत आलें. कांहीं संस्थानें आणि संस्था यांनींहि या दिशेनें कांहीं प्रयत्न केलेले आढळतील.

**पुराणें**—पुराणांचें महत्त्व वेद व महाभारत यांच्या खालोखाल मानलें आहे. वायुपुराणांतील व्याख्येप्रमाणें 'पुराण' म्हणजे 'प्राचीन कालापासून चालत आलेलें वाङ्मय.' अमरकोशांतील व्याख्येप्रमाणें पुराणाचीं ५ लक्षणें आहेत: (१) सर्ग म्हणजे सृष्टीची उत्पत्ति. (२) प्रतिसर्ग म्हणजे सृष्टीचा संहार व पुनरुत्पत्ति. (३) वंश म्हणजे देवांच्या वंशावळी. (४) *मन्वन्तर म्हणजे वेगवेगळ्या मनूंच्या काळांतील कथा.* व (५) वंशानुचरित म्हणजे राजांच्या वंशावळी, दानें, व्रतें, तीर्थें व श्राद्धें यांचीं वर्णनें. हीं मागाहून घालण्यांत आलीं. कालांतरानें पुढील विषयहि पुराणांत यावेत असें ठरलें: (१) वृत्ति= जीवनसाधनें. (२) रक्षा = देवांचे अवतार. (३) मुक्ति= संसारचक्रांतून मोकळें होणें. (४) हेतु = जीव, व (५) अपाश्रय = ब्रह्म.

पुराणें व उपपुराणें प्रत्येकीं अठरा आहेत. या पुराणांचीं नांवें अशीं आहेत :—

| | | | |
|---|---|---|---|
| १ ब्राह्म. | २ पद्म. | ३ विष्णु. | ४ वायु. |
| ५ भागवत. | ६ नारद. | ७ मार्कंडेय. | ८ आग्नि. |
| ९ भविष्य. | १० ब्रह्मवैवर्त. | ११ वराह. | १२ लिंग. |
| १३ स्कंद. | १४ वामन. | १५ कूर्म. | १६ मत्स्य. |
| १७ गरुड. | १८ ब्रह्मांड. | | |

उपपुराणांची नामावळी अनेक प्रकारांनीं दिली आहे. यांत ऐतिहासिक महत्त्वाचा भाग फार थोडा आहे. पुढील यादी बहुसंमत आहे :—

| | | | |
|---|---|---|---|
| १ सनत्कुमार, | २ नरसिंह, | ३ नंद, | ४ शिवधर्म, |
| ५ दुर्वास, | ६ नारदीय, | ७ कपिल, | ८ वामन, |
| ९ उशनस्, | १० मानव, | ११ वरुण, | १२ काली, |
| १३ महेश्वर, | १४ सांब, | १५ सौर, | १६ पाराशर, |
| १७ मारीच, व | १८ भार्गव. | | |

पुराणांचे ठोकळपणें ६ भाग पडतात ते असे :—

(१) गरुड, अग्नि आणि नारद—यांमध्यें संस्कृत वाङ्मयांतील शास्त्रें व कला यांसंबंधीं अनेक ग्रंथ, वैद्यक, व्याकरण, नाट्य, संगीत व ज्योतिष या शास्त्रांवरील ग्रंथ, यांतील महत्त्वाच्या उताऱ्यांचा संग्रह केला आहे. शिवाय पुराणांचे मुख्य विषय आहेतच.

(२) पद्म, स्कंद व भविष्य—यांत तीर्थें व व्रतें यांचें वर्णन मुख्यत्वेंकरून आहे. या पुराणांत नवीन भर नेहमीं पडत आली आहे.

(३) ब्रह्म, भागवत व ब्रह्मवैवर्त.

(४) ब्रह्मांड व वायु—यांत ऐतिहासिक भाग बराच आहे.

(५) लिंग, वामन व मार्कंडेय—यांत विशिष्ट देवतांचें महत्त्व वर्णिलें आहे. लिंग पुराणांत शिवलिंगाचें माहात्म्य आहे. वामन पुराणहि शैवपंथी आहे. मार्कंडेय पुराणांत देवीचें माहात्म्य आहे.

(६) वराह, कूर्म व मत्स्य—यांत या तीन अवतारांच्या कथा आहेत.

प्रत्येक पुराणांतील सर्ग, प्रतिसर्ग व वंश या भागांत धर्म, तत्त्वज्ञान, व देव, ऋषि, इ. चे वंश याची माहिती असते. मन्वंतर व वंशानुचरित या भागांत वंशावळी व कांहीं ऐतिहासिक माहिती सांपडते. पुराणांचे विषय जे विष्णूचे दशावतार, यांपैकीं मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह व वामन हे पौराणिक आहेत; परशुराम, राम, कृष्ण व बौद्ध हे अंशतः पौराणिक व अंशतः ऐतिहासिक आहेत; व कल्की तर पुढें यायचाच आहे. पुराणांतील श्लोकसंख्या पुढीलप्रमाणें आहे :—

| | | | |
|---|---|---|---|
| १ ब्रह्म | १०,००० | १० लिंग | ११,००० |
| २ पद्म | ५५,००० | ११ वराह | २४,००० |
| ३ विष्णु | २३,००० | १२ स्कंद | ८१,००० |
| ४ वायु | २४,००० | १३ वामन | १०,००० |
| ५ नारद | २५,००० | १४ कूर्म | १७,००० |
| ६ मार्कंडेय | ९,००० | १५ मत्स्य | १४,००० |
| ७ अग्नि | १५,४०० | १६ गरुड | १९,००० |
| ८ भविष्य | १४,५०० | १७ ब्रह्मांड | १२,००० |
| ९ ब्रह्मवैवर्त | १८,००० | १८ देवी भागवत | १८,००० |

इतर पुराण-ग्रंथ :—

| | | | |
|---|---|---|---|
| भारत | १,००,००० | योगवासिष्ठ | ३२,००० |
| रामायण | २४,००० | भागवत | १८,००० |

पवित्र तीर्थक्षेत्रांचीं माहात्म्यें उपपुराणांतच धरतात. वाङ्मय या दृष्टीनें पुराणांना फारसें महत्त्व नाहीं; त्यांत काव्यगुण नाहींत कीं कलात्मक मांडणी नाहीं. वर्णनें फार अतिशयोक्तीचीं आहेत. माहिती पुष्कळ आहे, पण ती विश्वसनीय आणि व्यवस्थित नाहीं. तथापि इतिहासाचीं—विशेषतः धार्मिक—सामाजिक इतिहासाचीं साधनें म्हणून पुराणांचा उपयोग अभ्यासकाना वाटतो.

**पुराव्याचा कायदा**—(एव्हिडन्स). न्यायकोर्टांत वादाचा निर्णय करतां यावा म्हणून जीं जीं प्रमाणें देतां येतील, त्या सर्वांचा 'पुरावा' या शब्दांत समावेश होतो. पुराव्याचा कायदा म्हणजे न्यायकोर्टांत कोणत्या प्रकारचा पुरावा जमेस धरावा, कशा तऱ्हेनें तो पुरावा कोर्टापुढें मांडावा व त्याची किंमत कशी करावी, इत्यादि गोष्टींबद्दल कायदा.

पाश्चात्य देश—या कायद्याचें मूळ रोमन कायद्यांत आहे. पूर्वकालीन ट्यूटन 'दिव्य करून दाखविणें' व 'शपथ घेणें' हीं दोन प्रमाणें न्यायनिवाड्यांत अवलंबीत असत. १३ व्या शतकांत ही पद्धति बंद पडून पंचांच्या अभिप्रायावरून निकाल देण्याची पद्धति (ट्रायल बाय ज्यूरी) नॉर्मन लोकांनीं सुरू केली. यांतहि पुढें सुधारणा होऊन पंचांनीं स्वतःच्या माहितीचा उपयोग न करतां कोर्टांत जो पुरावा येईल, त्यावरून आपला अभिप्राय द्यावा असा कायदा आतां आहे. या विषयावर १७६२ सालीं चीफ बॅरन गिलबर्ट यानें, नंतर बेन्थॅमनें, आणि १८२७ सालीं जे. एस्. मिलनें ग्रंथ लिहिले. १८३३ पासून या पुराव्याच्या कायद्यांत दुरुस्ती होऊन १८९८ सालचा कायदा हल्लीं इंग्लंडांत आहे; व सुधारलेल्या सर्व देशांत अशाच स्वरूपाचा कायदा आहे.

*पुराव्यासंबंधीं मुख्य नियम*—(१) वादाचा निर्णय करताना कायद्याचे प्रश्न व वस्तुस्थितीचे प्रश्न असें वर्गीकरण करून वस्तु-

स्थितीच्या प्रश्नाबद्दल पुरावा घेतात. ( २ ) पुरावा घेतांना वाद-विषयाला लागू ( रेलेव्हंट ) गोष्टींचा पुरावा घ्यावा, गैरलागू गोष्टींचा ( इर्रेलेव्हंट ) पुरावा घेऊं नये. ( ३ ) पुरावा वस्तुस्थिति प्रत्यक्ष पाहणाऱ्या साथीदारांचा ( डायरेक्ट एव्हिडन्स ) घ्यावा; ऐकीव माहिती सांगणाराचा पुरावा ( हिअरसे ) ग्राह्य नाहीं. ( ४ ) दस्तऐवज अस्सल कोर्टांत दाखल व्हावा, किंवा सरकारी सहीशिक्क्याची नक्कल कांहीं प्रसंगीं ग्राह्य मानावी; पण खासगी नक्कल अग्राह्य होय. ( ५ ) खासगी मत हाहि पुरावा नव्हे. ( ६ ) पक्षकार किंवा साक्षीदार यांच्या शीलाचा किंवा वर्तनाचा पुरावा ग्राह्य नाहीं. मात्र फौजदारी खटल्यांत आरोपीच्या शीलाचा म्हणजे सद्वर्तनाचा पुरावा ग्राह्य असतो. ( ७ ) लहान वयाच्या म्हणजे ७।८ वर्षांच्या आंतील वयाच्या मुलाची, व मानसिक विकाराच्या इसमाची, व वयोवृद्धत्वामुळें स्मरणशक्ति क्षीण, व विचारलेल्या प्रश्नाचा नीट बोध होण्याची अपात्रता असलेल्या इसमाची साक्ष पुराव्यास अग्राह्य होय. ( ८ ) साक्षीपुरावा भर कोर्टांत जाहीरपणें घ्यावा. ( ९ ) जबानी घेताना प्रथम सरतपासणी, नंतर उलटतपासणी ( क्रॉस एक्झॅमिनेशन ), आणि नंतर फेरतपासणी ( री-एक्झॅमिनेशन ) या क्रमानें साक्षीदाराला प्रश्न विचारावे.

भारतीय—स्मृतिग्रंथांत व्यवहाराध्यायांत तोंडी व लेखी दोन्ही प्रकारच्या पुराव्याचें विवेचन आढळतें. त्यांत स्त्री, बाल, वृद्ध, उन्मत्त, पाखंडी, असले साक्षीदार घेऊं नयेत, असें आहे. स्टॅंप कागदावर लिहून दस्त रजिस्टर करणें हे प्रकार पूर्वी नव्हते. साक्षीदार पक्षकाराच्याच जातीचा व वर्णाचा असावा. या जुन्या स्मृतिकायद्यात ब्रिटिश अमदानींत १८७२ सालच्या पुराव्याच्या कायद्यानें महत्त्वाचे फरक केले असून सर्व हिंदुस्थानांत फौजदारी व दिवाणी कोर्टांत सर्वत्र तोच पुराव्याचा कायदा ( एव्हिडन्स ॲक्ट ) लागू आहे.

**पुरी**—प्रांत ओरिसा, एक जिल्हा. या जिल्ह्याच्या पश्चिमेस मद्रास इलाखा व दक्षिणेस बंगालचा उपसागर आहे. पर्जन्यमान ५८ इंच; क्षे. फ. २,४५१ चौ. मै.; व लोकसंख्या ( १९४१ ) ११,०१,९३९. हवा रोगट. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पुरी. हें जगन्नाथाच्या यात्रेचें फार मोठें ठिकाण व क्षेत्र आहे. जवळच भुवनेश्वराचें मंदिर आहे. कुशभद्रा नदी बंगालच्या उपसागरास मिळते व भार्गवी वगैरे तीन नद्या चिल्का सरोवरास मिळतात. लोकभाषा उडिया आहे. कोयाखी नदीच्या पुरानें वरचेवर फार नुकसान होतें. जिल्ह्यांत चहाची लागवड होते. कापूसहि पिकतो. पुरी गावची लोकसंख्या पन्नास हजार आहे.

जगन्नाथपुरी हें चार धामांपैकीं व सप्तपुऱ्यांपैकीं एक आहे. ओढ्या प्रांतांत विष्णूच्या चतुरायुध क्षेत्रांपैकीं जगन्नाथाला शंख-क्षेत्र म्हणतात. ही यात्रा प्रथम करून मग चक्र ( भुवनेश्वर ), गदा ( जजपूर ) व पद्म ( कोनारक ) या क्षेत्रांस जातात. पुरी हें क्षेत्र समुद्रतीरीं असून आषाढ महिन्यांत येथें मोठी यात्रा भरते. त्या वेळेसच जगन्नाथाचा प्रसिद्ध रथ मिरवीत नेतात. दरसाल रथ नवा करतात. देऊळ अनंगभीमराजाच्या आश्रेवरून भास्कर पंडित नांवाच्या कारागिरानें बांधलें ( ११९७ ). देवळाच्या भोंवतीं २४ फूट उंचीची भिंत आहे. देवालय उंच असून त्यावर गरुडध्वज व कळसावर सुदर्शन चक्र आहे. देवळावर सर्वत्र विविध प्रकारचीं चित्रें कोरलीं आहेत. कांहीं अत्यंत अश्लीलहि आहेत. देवळांत तीन देवमूर्ती निंबाच्या लांकडाच्या आहेत. ( बलराम, सुभद्रा, व कृष्ण ). मूर्तीची उंची ३-४ फूट आहे. मूर्तींना हातपाय नाहींत हें त्यांचें वैशिष्ट्य आहे. देवाचा प्रसाद म्हणून शिजलेला भात वांटतात व तो सर्व जातींचे लोक विटाळ न मानतां खातात. देवमूर्तीबद्दल अनेक कथा आहेत. देवळांखेरीज येथें अनेक तळीं व मठ आहेत.

**पुरुकुत्स**—इक्ष्वाकु कुलांतील मांधाता याला बिंदुमतीपासून झालेला ज्येष्ठ पुत्र. पातालवासी मौनेय गंधर्वांच्या नाशाकरितां विष्णूनें हा अवतार घेतला होता. याला त्रसदस्यु नांवाचा पुत्र होता. पुरुकुत्साची सुदासास नेहमीं मदत असे.

**पुरुषप्रसूतिविधि** ( विडंबन )—(कूव्हेड). कांहीं असंस्कृत समाजांतून बायको प्रसूत झाली असतां तिच्या बाळंतपणाचे सर्व उपचार नवऱ्याला करण्याची चाल आहे. म्हणजे जणुं काय पुरुषहि बाळंत होतो. एकीकडे मुलाच्या आईला व दुसरीकडे बापाला बाज, शेक-शेगडी, पथ्यपाणी, वगैरे सर्व करतात. डिओडोरस या सीझरच्या वेळच्या इतिहासकाराला कार्सिकन लोकांत ही चाल आढळली. स्ट्राबोनेंहि स्पॅनिश बास्क लोकांमध्यें ही पाहिली. अद्यापिहि ती त्यांच्यांत आहे. चीन, बोर्निओ आणि नीग्रो प्रदेश यांतून प्रवाशांना हें दृश्य पाहावयास सांपडतें. दक्षिण अमेरिका आणि वेस्ट इंडीज यांत या चालीचे वेगळेच प्रकार आहेत.

**पुरुषसूक्त**—ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळांतलें नव्वदावें सूक्त पुरुषसूक्त म्हणून प्रसिद्ध आहे. ह्या सूक्ताची देवता पुरुष ( परमेश्वर ) असल्यामुळें तें पुरुषसूक्त म्हणून ओळखलें जातें. हें सूक्त कोणा ऋषीच्या नांवाशीं संबद्ध झालेलें नाहीं. नारायण हाच ह्या सूक्ताचा ऋषि म्हणजे द्रष्टा असें मानण्यांत येतें. हें सूक्त थोड्याफार फरकानें दुसऱ्या वेदातहि आढळतें. इतक्या प्राचीन काळीं वर्णिलेली ह्या सूक्तांतील विराट पुरुषाची कल्पना जगाच्या वाङ्मयात अपूर्व अशीच आहे. चार वर्णांचा उल्लेख प्रथमच ह्या सूक्तांत येतो. भाषेवरून पाहतां हें सूक्त ऋग्वेदांतील अन्य

सूक्तांच्या मानानें फार मागूनचें आहे, असें विद्वानांचें मत आहे. किंबहुना सर्व दहावें मंडलच पाठीमागूनचें आहे असें म्हणतात. स्नानाच्या वेळीं पुरुषसूक्त म्हणण्याचा संप्रदाय आहे. देवपूजेंत पुरुषसूक्तानें देवावर अभिषेक करण्याची वहिवाट आहे. ह्या सूक्तांत अथर्ववेदाचा उल्लेख नाहीं. ऋग्वेद, सामवेद, यजुर्वेद असा क्रम असून छंदांचा निर्देश स्वतंत्र आहे. सृष्टि, जीव व यज्ञ ह्यांच्या उत्पत्तिविषयक कल्पना आपणांस येथें आढळतात. ऋतु पांच सांगितले असून वसंत, ग्रीष्म व शरद् ह्यांचा नामोल्लेख आहे. ह्या सूक्तांतील कल्पना भव्य व उदात्त अशी आहे.

हें जग एका अद्वितीय पुरुषापासून निर्माण झालें. देवांनीं त्या पुरुषाचा यज्ञ केला. त्याच्या शीर्षापासून आकाश, बेंबीपासून वायु, पायांपासून पृथ्वी, मनापासून चंद्र, डोळ्यांपासून सूर्य, मुखापासून इंद्र व अग्नि, श्वासापासून वायु, व मुख, बाहु, जंघा व पाय यांपासून अनुक्रमें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र याप्रमाणें उत्पत्ति झाली; असें पुरुषसूक्तांत सांगितलें आहे. पुरुषच सर्व कांहीं आहे आणि या पुरुषापासून सर्व स्थिरचरादिकांची उत्पत्ति झाली, ही कल्पना या सूक्तांत व्यक्त केली आहे.

**पुरुषोत्तमदास ठाकुरदास, सर** ( १८७९- )—एक गुजराथी व्यापारी व मुत्सद्दी. यांचें शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें झालें. हे दुष्काळनिवारण फंडाच्या मध्यवर्ती समितीचे निर्वेतन मंत्री व खजिनदार होते. त्याप्रमाणेंच वॉर रिलीफ फंडाचेहि निर्वेतनी मुख्य मंत्री व खजिनदार होते. १९२० मध्यें हे मुंबईचे शेरीफ होते. १९२२-२३ मध्यें हे इंचकेप कमिटीचे सभासद होते. तसेंच इंडियन रेल्वे कमिटीचे हे सभासद होते. मुंबईतील अनेक व्यापारी संस्था व विमा कंपन्या यांच्याशीं यांचा संबंध आहे. ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशनचे हे सभासद आहेत व रिझर्व्ह बँकेचे डायरेक्टर आहेत. गोलमेज परिषदेस सभासद म्हणून हे गेले होते ( १९३०-३३ ). हे चांगले अर्थशास्त्रज्ञ व व्यवहारज्ञ असल्यानें सरकार नेहमीं यांचा सल्ला घेत असतें.

**पुरूरवा**—सोमवंशाचा मूळ पुरुष. याची आई इला म्हणून हा ऐलहि म्हटला गेला आहे. दाशराज्ञ युद्धाच्यापूर्वी पांचपन्नास वर्षांच्या पलीकडे हा होऊन गेला असावा. अफगाणिस्तान व त्याच्या आजूबाजूचा भाग हा याचा प्रदेश असावा. उर्वशी अप्सरा याचीच प्रेयसी असून वैदिक ग्रंथांत यांचा प्रणयसंवाद आढळून येतो. कालिदासाचें विक्रमोर्वशीय नाटक पुरूरवा-उर्वशी यांच्याच कथानकावर रचलेलें आहे. उर्वशी पाहा. पुरूरव्याविषयीं पुराणांतून निरनिराळ्या कथा आहेत. ( चरित्र-कोश १. २३३-२३५ पाहा ).

**पुरोहित**—पुरोहित हा परमेश्वर आणि मनुष्य यांचा संबंध जोडणारा असतो. याचें काम परमेश्वराला मनुष्याजवळ आणि मनुष्याला परमेश्वराजवळ आणण्याचें असतें. कांहीं देशांत पुरोहित हे ठरलेल्या जातीचे असावे लागतात तर कांहींत त्यांची निवड करण्यांत येते. अरबांप्रमाणें कांहीं जातींत पुढारी हाच पुरोहित असतो. रोमन चर्चच्या पुरोहितांना ब्रह्मचर्य पाळावें लागतें तर ग्रीक चर्चच्या पुरोहितांना लग्नाची सवलत असते. हिंदुस्थानांत पुरोहित बहुधा ब्राह्मण वर्णाचे असतात; तरी कांहीं जातींतून त्यांचेच पुरोहित असतात. ब्राह्मणांच्या पौरोहित्याबद्दल विरोध करणारा महाराष्ट्रांत सत्यशोधक समाज तयार झाला व क्षात्र-जगद्गुरूची गादी निर्माण झाली.

कॅथॉलिक मताप्रमाणें पुरोहित हा ख्रिस्ताचा प्रतिनिधि समजला जातो; कारण ख्रिस्त हा मध्यस्थ होता. याकरितां ख्रिस्ताचें जें त्रिविध कार्य-शिक्षण, संस्कारामार्फत पवित्रीकरण आणि श्रद्धाळूंचे प्रतिपालन-तें हा पुरोहित करीत असतो. याचें मुख्य कार्य 'मास' नांवाचा विधि करणें हें असतें. पुरोहित होण्याकरितां कमींत कमी ७ वर्षें शिक्षण घ्यावें लागतें व त्या शिक्षणामध्यें तत्त्वज्ञान व ईश्वरशास्त्र यांचा अन्तर्भाव होतो. या शिक्षणानंतर त्यास दीक्षा देण्यांत येऊन तो पुरोहित बनतो. पुरोहितास नियमाप्रमाणें कांहीं व्रतें पाळावीं लागतात. उदाहरणार्थ, दररोज प्रार्थना करणें ( पंथाची अधिकृत प्रार्थना ) आणि ब्रह्मचर्यपालन. पुरोहित हे एखाद्या धर्मपीठाशीं किंवा एखाद्या वर्गाशीं संबद्ध असतात. यांस फादर या नांवाने संबोधण्यांत येतें.

**पुलकेशी चालुक्य**—पहिला ( राज्य. ५५०-५६९ ).—बदामीच्या पश्चिम चालुक्य घराण्याचा हा संस्थापक रणरागाचा पुत्र होय. ऐहोळ येथील शिलालेखांत यानें कदंब वंशांतील एका शाखेची राजधानी बनवासी ही जिंकल्याचा उल्लेख आहे. यानें अश्वमेध यज्ञ केला होता. याची राजधानी बदामी ( वातापी ) होती. ( चालुक्य पाहा ).

दुसरा—सत्याश्रय व रणविक्रम हीं याचींच नांवें असून यास वल्लभ ही पदवी होती. हा पहिल्या पुलकेशीचा पुतण्या होय. हा फार पराक्रमी होता. याचें राज्य नर्मदेपासून रामेश्वरापर्यंत होतें. इ. स. ६०० च्या सुमारास पहिला महेंद्रवर्मा पल्लव याचा पुलकेशीनें पराभव करून वेंगी प्रदेश आपल्या राज्यास जोडला. त्याचप्रमाणें ठाणेश्वराच्या हर्षाचा नर्मदेच्या भागांत पराभव केला ( ६२० ). याची राजधानी नाशिक असावी. याच्याचकडे इराणची वकिलात आल्याचें चित्र अजंठा लेण्यांत आहे. ह्युएनत्संगानें याचें ऐश्वर्य सुंदर वर्णिलें आहे.

**पुलगांव**—मध्यप्रांत, वर्धा जिल्हा. यांतील याच नांवाचा तालुका व त्याचें मुख्य ठिकाण. मुंबई-नागपूर रेल्वे फांट्यावर हें स्टेशन आहे. लो. सं. ६०००. येथें कापसाचा बाजार भरतो व एक कापडाची गिरणी आहे.

**पुलस्त्य–१.** स्वायंभुव मन्वंतरांतील ब्रह्मदेवाचा एक मानस-पुत्र. याला दक्षाची मुलगी प्रीति दिली होती. याचा पुत्र अगस्त्य याच्यापासून राक्षस, वानर, किन्नर व यक्ष अशी उत्पत्ति झाल्याची कथा महाभारतांत आदिपर्वांत आहे. शंकराच्या शापानें दग्ध झाल्यावर वैवस्वत मन्वंतरांत पुन्हां याला ब्रह्मदेवानें उत्पन्न केलें.

**२.** एक स्मृतिकार. मिताक्षरेंत याचे श्लोक दिलेले आहेत. ही स्मृति इ. स. चौथ्या ते सातव्या शतकांच्या दरम्यान लिहिली असावी असा एक तर्क आहे.

**पुलिंद**—इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेस हा देश असल्याचें महाभारत, सभापर्व, अध्याय ३१ मध्यें लिहिलें आहे. पुलिंद लोकांचा उल्लेख अशोकाच्या एका आदेशांत आहे. वदिक वाङ्मयांतहि या राष्ट्रजातीचा उल्लेख आहे. पुलिंद नामक लोक हिमालयांतहि होते. मध्य हिंदुस्थानच्या जंगल-पर्वतांतून हिंडणारे रानटी लोकहि पुलिंदच होते.

**पुश्किन, अलेक्झांडर** (१७९९–१८३७)—एक रशियन कवि. त्याची पहिली कविता 'रुस्लान अँड लिउडमिला' (१८२१) असून नंतर त्यानें 'दि प्रिझनर ऑफ कॉकेशस', 'दि जिप्सीज्' आणि 'पोल्टावा' या कविता लिहिल्या. त्यानें एक नाट्यकाव्यहि लिहिलें आहे. त्याचीं मते राज्यकर्त्यांना न पटणारीं असल्यानें अनेकदां त्यांच्याशीं तंटे होत. एका द्वंद्व-युद्धांत जखमी होऊन तो मरण पावला.

**पुश्तु भाषा**—ही भारती-आर्य (इंडो-आर्यन) भाषाकुलां-तील असून हिचें संस्कृत भाषेशीं साम्य आहे व ही सिंधी भाषेला जवळची आहे. त्याचप्रमाणें ही इराणी भाषावर्गांत मोडत असून झेंद भाषेशींहि हिचें साम्य आहे व यामुळेंच जुन्या फारसी भाषेच्या जवळची वाटते. फारसी आणि पुश्तु 'यक' हा संस्कृत 'एकः' शब्दाशीं जुळतो. उंटाला संस्कृत शब्द 'उष्ट्र' आहे तर फारसींत 'उस्तुर' (सुतुर) व पुश्तूंत 'उश्' शब्द आहे. याप्रमाणें एकीकडे संस्कृतशीं तर दुसरीकडे फारसीशीं हिचें साम्य दाखवितां येतें. १९३१ सालीं पुश्तु बोलणारांची संख्या १६,३६,४९० होती.

**पुष्कर**—राजपुतान्यांत अजमीरपासून १० मैलांवर असलेलें एक तीर्थक्षेत्र. ब्रह्मपुष्कर, विष्णुपुष्कर, रुद्रपुष्कर अशीं तीन पुष्कर तीर्थें आहेत. जवळपास अनेक देवालयें आहेत, त्यांत मुख्य पांच आहेत. पद्मपुराणात पुष्करमाहात्म्य वर्णिलें आहे. येथें ब्रह्मदेवानें अनेक यज्ञ केले होते. ब्रह्मदेवाची उपासना याच स्थळीं दिसते. येथें दरसाल मोठी यात्रा भरते.

**पुष्कराग**—(टोपाझ). हें एक रत्न असून तें पूर्ण अथवा अर्ध पारदर्शक असतें. याचा रंग पिवळा, पांढरा, हिरवा किंवा निळा असतो. फुटला असतां वांकडातिकडा फुटतो. याचें विशिष्ट-गुरुत्व ३·५ आहे. हा गारेपेक्षां कठिण असतो. हा अग्निजन्य व रूपांतरित खडकामध्यें आढळतो. याची उत्तम जात ब्राझील व उरल पर्वतांत आढळते. ब्राझीलमधील खड्यांचा रंग पिवळा असतो व सायबेरियांतील खड्यांचा निळसर असतो. सॅक्सनीमध्यें आढळणारे पुष्कराग पिवळसर असतात; तर स्कॉटलंडमधील अस्मानी असतात.

हें मध्यम जातीचें रत्न आहे. याचा भाव ३ ते २० रु. रतीपर्यंत असतो. निळ्या व गुलाबी पुष्करागास ६० रु. रतीस पडतात. औरंगजेब बादशहापाशीं एक ३१४ रति वज-नाचा पुष्कराग होता. त्यास त्यानें ८०,००० रुपये दिले होते.

पुष्करागाची देवता गुरु असल्यानें गुरूपासून त्रास होऊं नये म्हणून हा वापरतात. हा धारण केल्यानें स्त्रियांस पुत्रप्राप्ति होते असें गरुड पुराणांत सांगितलें आहे.

**पुष्कलावती**—गांधार (कंदाहार) देशाची फार प्राचीन काळची राजधानी. भरतपुत्र पुष्कर यानें ही वसविली. पुकेला ओती हें ग्रीक नांव अलेक्झांडरच्या वेळीं रूढ होतें. सांप्रत स्वात नदीच्या पूर्व किनाऱ्यावर पराग आणि चरसद्दा हीं दोन मोठीं गांवें आहेत. तींच पूर्वीच्या पुष्कलावतीची जागा होय असें मानतात. पुष्कलावतींत बुद्धाच्या डोळ्यावर बांधलेला मोठा स्तूप होता.

**पुष्पधन्वा**—एक आयुर्वेदीय औषध. अभ्रक, सुवर्ण, रौप्य, वंग भस्म व ताम्रभस्म, गंधक, कांतभस्म हीं यांत मुख्य औषधें असून शेवरीच्या सालीचा रस, ज्येष्ठमधाचा काढा, व विड्याच्या पानाचा रस यांत खल करतात. या औषधाचा गुण वीर्यवर्धक व नपुंसकत्वनाशक असा आहे. स्वप्नावस्था, अतिशय मैथुन, उपदंश, प्रमेह, इत्यादि कारणांनीं कमी झालेली शक्ति भरुन काढण्याच्या कामीं या औषधाचा चांगला उपयोग होतो. शक्ती-साठीं हें औषध अतिशय सुप्रसिद्ध आहे. दूध, तूप, किंवा साखर यांजबरोबर १ ते २ गुंजा देतात.

**पुष्पमुकुट**—(कोरोला). पुष्पकोशामध्यें असणारा फुलाचा मुख्य भाग. पुष्पमुकुट हा फलजननभागांभोंवतीं असतो व पाक-ळ्यांचा बनलेला असतो. फुलाच्या पाकळ्या हींहि एक प्रकारचीं पानेंच असतात तेव्हां त्यास बहुपर्ण पुष्पमुकुट (पॉलिपेटालस) म्हणतात. उदाहरणार्थ, गुलाबाचें फूल. परंतु जेव्हां पाकळ्या प्रारंभीं कांहीं भागीं जोडलेल्या असतात तेव्हां त्यांस एकपर्णी-

पुष्पमुकुट ( मोनोपेटालस ) किंवा संयुक्तपर्णी पुष्पमुकुट ( गॅमोपेटालस ) म्हणतात. पुष्पाच्छादन पाहा.

**पुष्पविन्यास**—( इन्फ्लोरेसीन ). वनस्पतिशास्त्रांत निरनिराळ्या झाडांचीं जीं फुलें असतात त्या फुलांचे तुरे, विशिष्ट रचना, वगैरेस पुष्पविन्यास म्हणतात. यांचे अनेक प्रकार आहेत. त्यांपैकीं मुख्य म्हणजे अंतर्मुख (सेंट्रीपीटल) व बहिर्मुख (सेंट्रीफ्यूगल) हे होत.

**पुष्पाच्छादन**—( केलिक्स ). वनस्पतिशास्त्रामध्यें पुष्पाच्या बाह्यावरणास हें नांव दिलेलें आहे. फुलवरा किंवा मुकुट याच्या बाहेरून जें पानांचें आवरण असतें तें वर्तुलाकार किंवा भोंवऱ्यासारखें पानांचें बनलेलें असतें. तें आवरण त्या मुकुटास आधारभूत असतें व त्याचें संरक्षण करतें. या आवरणास एक किंवा एकापेक्षां अधिक पाकळ्या असतात. त्यांस बाह्यदली ( सेपाल ) म्हणतात. या पाकळ्या जोडलेल्या किंवा सुट्या असतात. त्यांचा रंग बहुधा हिरवा असतो व त्या फुलाच्या पाकळ्यांपेक्षां कमी नाजूक असतात. कांहीं फुलांमध्यें—विशेषतः एकगर्भपर्णी पुष्पांत-फुलाच्या मुकुटाच्या व आवरणाच्या पाकळ्यांत फरक नसतो व त्या वेळीं सर्वांस परिकोप ( पेरिअंथ ) असें म्हणतात.

**पुष्टिमार्ग**—हिंदूंमधील एक धर्मपंथ. हा वल्लभाचार्यानें काढला. पुष्टि म्हणजे ईश्वरी अनुग्रह. श्रीहरिसेवेचें भक्ताला व्यसन लागून त्यानें हरीच्या लीलांतच तल्लीन होऊन राहणें हें या मार्गाचें ध्येय आहे. या पंथांतील लोकांचा कृष्णभक्तीचा रोजचा मोठा कार्यक्रम असतो. गुरुमहाराजांच्या राहण्याच्या ठिकाणीं जाऊन देवपूजा करावी लागते. यांचीं सार्वजनिक देवळें नसतात. आपलें सर्वस्व गुरूला अर्पण करावें या शिकवणीची बहुधा अनाचारांतहि परिणति होते. मग रासमंडळें व गोपगोपीलीला करणें हेंच उपासनेचें साधन होऊन बसतें. यामुळें या पंथाचे कांहीं गुरु किंवा महाराज दुराचारी झाले तर आश्चर्य नाहीं. यामुळें सुधारक मंडळींचे या पंथावर हल्लेहि झाले आहेत व महाराजांना कोर्टांत खेचलेंहि आहे. भाटिये मंडळींत अशी गुरुभक्ति विशेष दिसून येईल. या पंथाचे अनुयायी गुजराथ, काठेवाड व राजपुताना इकडे बरेच आहेत. नाथद्वार, मथुरा-वृंदावन हीं क्षेत्रें पुष्टिमार्गी लोकांचीं यात्रास्थानें होत. वल्लभाचार्य पाहा.

**पुष्यमित्र** ( राज्य. ख्रि. पू. १८५-१४८ )—शुंग घराण्याचा संस्थापक. मौर्य राजा बृहद्रथ याचा हा सेनापति होता. यानें राजाला ठार मारून मगधाचें राज्य बळकावलें. काबुलाहून ग्रीक राजा मिनँडर पंजाब आणि पश्चिम हिंदुस्थान जिंकून पाटलीपुत्रावर चालून आला असतां पुष्यमित्रानें त्याला माघारें घालविलें. हा फार सनातनी हिंदु धर्माचा होता. व यानें बौद्ध धर्माला पायबंद घातला. यानें एक अश्वमेध यज्ञहि केला. प्रसिद्ध वैदिक वैयाकरण पतंजलि याचा समकालीन होता, व कालिदासानें मालविकाग्निमित्रांत याची कथा दिली आहे. याच्या मृत्यूनंतर शुंग घराणें खालावलें व ख्रि. पू. ७२ त नष्ट झालें.



**पुसद**— वऱ्हाड प्रांत, यवतमाळ जिल्हा, एक तालुका. क्षे. फ. १,२८५ चौ. मैल. लो. सं. सु. पावणेदोन लाख. खेडीं ३१०. १९०५ मध्यें वऱ्हाडचे ६ जिल्हे होते ते दोनानें कमी करून चार करण्यांत आले व रद्द केलेल्या वाशिम जिल्ह्यांतला हा भाग यवतमाळ जिल्ह्यास जोडण्यांत आला. पैनगंगा व पूस या नद्यांकांठची जमीन सुपीक आहे.

पुसद गांव तालुक्याचें ठिकाण आहे. ऐने अकबरींत पुसद परगणा आला आहे. गांव पूस नदीच्या कांठीं आहे. लो. सं. सु. आठ हजार.

**पुंसवन**—सोळा संस्कारांतील एक. पुत्र व्हावा म्हणून हा संस्कार गर्भवती स्त्रियेच्या तिसऱ्या महिन्यांत पुनर्वसु नक्षत्रावर करतात. गर्भिणीनें त्या दिवशीं उपोषण करून दुसऱ्या दिवशीं पुष्य नक्षत्रीं स्वतःप्रमाणेंच रंग असलेल्या गाईचें पसाभर दहीं हातांत घेऊन दोन उडीद व एक सातू त्यांत टाकून तें प्राशन करावें. ‘ तूं काय पितेस,’ ह्या पतीच्या प्रश्नाला ‘ पुंसवन ’ असें उत्तर पत्नी त्रिवार देते. याविषयीं सूत्रासूत्रांत फरक आहे.

**पुसा**—बंगाल, दरभंगा जिल्हा, एक गांव. व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यानें १९०५ सालीं येथें ‘ इंपीरियल ॲग्रि. रीचर्स इन्स्टिट्यूट ’ ही संस्था स्थापन केली व हिचें बरेच कृषिसंशोधनहि झालें होतें. पण १९३४ सालीं बिहारच्या भूकंपामुळें हिच्या इमारतींची फार नासधूस झाली तेव्हां पुढें ही संस्था दिल्ली येथें हालविण्यांत आली.

**पुस्तक**—प्राचीन काळीं आजच्याप्रमाणें कागद माहीत नव्हता. ईजिप्तमधील लोक पापीरस नांवाच्या लव्हाळ्याच्या अंतर्सालीपासून तयार केलेल्या पुठ्यावर लिहीत. पशूंच्या—विशेषतः मेंढ्या व वांसरें यांच्या— अंतस्त्वचेवरहि लिहिण्याचा प्रघात असे. कागद प्रचारांत येण्यापूर्वी हिंदुस्थानांत ताडपत्रें, भूर्जपत्रें, कौशेयपट, शिला, ताम्रपट, इ. लिहिण्यासाठीं वापरीत. आरंभीं लिहिलेल्या कागदाची गुंडाळी करून ठेवीत असत. ही पद्धत ग्रीक व रोमन लोकांतहि आढळते. सध्यांसारखीं चौकोनी पुस्तकेंहि लांकूड, हस्तीदंत, कांसें किंवा इतर धातू यांचीं असत व त्यांत पुष्कळ पृष्ठें एकत्र बांधलेलीं असत; व हाच प्रकार पुढें कागदाच्या पुस्तकाच्या बाबतींत रूढ झाला.

पुस्तकांचा आकार निरनिराळ्या प्रकारचा असतो व निरनिराळ्या कागदांच्या अष्टपत्री, षोडशपत्री, वगैरे घड्या घालून त्याप्रमाणें पुस्तकास नांव देऊन बांधण्यांत येतें. कागदांचे

प्रकारहि त्यांच्या आकारावरून निरनिराळे पडलेले आहेत. त्यांचीं नांवें इंपीरियल, रॉयल, डेमी, क्राउन, फुलस्कॅप, वगैरे आहेत.

ग्रंथकार प्रथम जेव्हां पुस्तक लिहितो तेव्हां त्यास हस्तलिखित म्हणतात. या पुस्तकावर ग्रंथकाराचा प्रसिद्धि हक्क असतो. नंतर तें पुस्तक एखादा प्रकाशक छापण्याकरितां मुद्रकाकडे देतो. मुद्रक तें छापून काढतो. एका वेळीं छापलेल्या पुस्तकांच्या प्रतींस आवृत्ति म्हणतात. पुस्तकाचीं पानें छापून झाल्यावर तीं पुस्तक-बांधणाऱ्याकडे बांधण्याकरितां देण्यांत येतात.

**पुस्तक-बांधणी**—लिहिलेलीं किंवा छापलेलीं पानें एकत्र चांगल्या रीतीनें बांधण्याची व त्यांचें एक पुस्तक करण्याची ही कला आहे. छापलेल्या कागदांच्या घड्या घातल्यानंतर त्या जुळवून एकत्र करतात. नंतर अशा एकत्रित घड्यांचे गठ्ठे दाबाखालीं ठेवतात. नीट दाबून झाल्यानंतर बाहेर काढून प्रत्येक पुस्तक शिवतात. कागदांच्या कडातून दोरा ओवून शिवणें किंवा कडांना खांचा पाडून शिवणें असे दोन प्रकार शिवण्याचे असतात. मोठीं पुस्तकें दुसऱ्या प्रकारानें शिवतात. यानंतर पुस्तकाच्या पाठीला सरस लावतात व तो वाळल्यावर हातोड्यानें पाठ वाटोळी करतात. पुठ्ठा कागदी, कापडी, कातडी, वगैरे जसा चढवावयाचा असेल तसा यानंतर चढवून पाठीच्या बाजूनें चिकटवून मग पुन्हां दाबांत टाकतात. पुठ्ठा चढविण्या-पूर्वी पुस्तकाच्या बाजूच्या कडा यंत्रानें सारख्या कापतात. त्यांवर वाटल्यास रंग शिंपडतात किंवा तो ब्रशानें लावतात. कधीं सोन्याचा मुलामाहि देतात. पुठ्ठयावर नांवें साधीं किंवा सोनेरी छापून काढतात. पुस्तक-बांधणीचे प्रकार अनेक आहेत.

**पुळण**—उंच प्रदेशावरून पाण्याच्या ओघाबरोबर वाहत आलेली माती नद्यांच्या तोडाशीं, सखल प्रदेशांत किंवा दऱ्यां-तून जी जमते तीस म्हणतात. समुद्र हटला किंवा नदीचा ओघ बदलला म्हणजेहि असा पुळणाचा प्रदेश तयार होतो. इंग्लंडांत अशीं पाण्यानें परत दिलेल्या जमिनींचीं पुष्कळ उदा-हरणें आहेत. नाइल, पो, मिसिसिपी, इ. नद्यांच्या मुखां-जवळील बेचकीं (डेल्टा) नद्यांच्या प्रवाहाबरोबर आलेल्या मातीचीं बनलीं आहेत. या जमिनी फार सुपीक असतात. त्रिभुजप्रदेश पाहा.

**पुळें**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा व तालुका, एक यात्रेचें स्थान. येथील गणपतीचें देवस्थान प्रसिद्ध आहे. देऊळ समुद्र-कांठीं असून गणपतीची मूर्ति स्वयंभू आहे. माघ शु. ४ ला मोठा उत्सव असतो. हें पटवर्धन संस्थानिकांचें उपास्य दैवत आहे.

**पूतना**—एक राक्षसीण. कंसाज्ञेनें तरुण स्त्रीचें रूप घेऊन ही गोकुळांत आली व स्तनाला विष माखून कृष्णास चोरून पाजीत असतां कृष्णानें हिचेंच प्राणहरण केलें. हिच्यावरून पूतना मावशी म्हणजे दुष्ट, कपटी स्त्री असा वाक्प्रचार पडला.

**पूतिज्वर**—१. (सेप्टिसीमिआ). जेव्हां रक्तप्रवाहामध्यें कांहीं सूक्ष्म जंतू निर्माण होऊन ते जिवंत अवस्थेंत असतात, तेव्हांच्या अवस्थेस ही संज्ञा देतात. या अवस्थेचा परिणाम म्हणून हा पूतिज्वर उत्पन्न होतो. यामध्यें शरीराच्या निर-निराळ्या भागांवर गळवें उठूं लागतात. शरीरांतील पेशींचा क्षय होऊं लागतो. दररोज तापाचा चढउतार होत असतो. नाडी जलद उडूं लागते; जिभेवर बुरा येतो, डोकें दुखतें, आणि बद्धकोष्ठ किंवा अतिसार उत्पन्न होतो. ज्या शरीराच्या अवयवावर गळवें उठूं लागतात तेथें या रोगाचीं लक्षणें दिसूं लागतात. जेव्हां शरीरांतील शक्ति वाढते तेव्हां या रोगाचा प्रतिकार होऊन हा बरा होतो.

२. (पायीमिया). हा एक रक्तांत उत्पन्न होणारा सांसर्गिक विकार आहे. व त्यामुळें अंगावर गळवें उठूं लागतात. विशेषतः शरीरावरील ज्या भागांतील पेशी दुखावल्या असतील त्या भागांत हा विकार उत्पन्न होतो. या विकारामध्यें हिंव भरतें, ताप येतो व त्याचें प्रमाण एकदम कमीअधिक होतें व पुष्कळ घाम येतो. रोगी क्षीण होत जातो. हा विकार गंभीर स्वरूपाचा असून त्यामध्यें मृत्यूचें प्रमाण बरेंच असते. तथापि तावडतोब शस्त्रक्रिया करून घेणें उत्तम.

**पूतिनाशक**—(ॲन्टिसेप्टिक–कृमिघ्न, कोथघ्न). ज्या औषधाच्या योगानें कुजण्याची, सडण्याची अथवा पू होण्याची क्रिया करणारे जंतू नाश पावतात त्यास म्हणतात. अशा तऱ्हेचीं अनेक औषधें अथवा पदार्थ आढळतात. उदा., क्लोरिन, आयोडिन, हॅपोक्लोरस ॲसिड, सल्फ्यूरस ॲसिड, कापूर, काष्ठ-तेल (क्रियोसोट), आयडोफॉर्म, नवजात प्राणवायु (नॅसेंट ऑक्सिजन), रसकापूर (करोझिव्ह सब्लिमेट), पिपीलमद्यानार्द्र (फॉर्मेलडिहाइड), पालाश परमंगनेत (पोटॅशियम परमँगनेट), कर्बाम्ल (कॅरबॉलिक ॲसिड), इत्यादि. अलीकडे डांबरी रंगहि या कामीं वापरण्यांत येतो. यांपैकीं फ्लॅव्हिन हा फार उपयुक्त ठरला आहे. याचा उपयोग पहिल्या महायुद्धांत फार करण्यांत आला. जंतुघ्न औषधांचा शस्त्रक्रियेचीं उपकरणे शुद्ध करण्याकरितां व हवा शुद्ध करण्याकरितां उपयोग करण्यांत येतो. अलीकडे शस्त्रक्रियेमध्यें कृमिघ्न औषधें वापरण्या-ऐवजीं कृमिरहित (ॲसेप्टिक) शस्त्रक्रिया करण्याची पद्धति प्रचारांत अधिकाधिक येत चालली आहे. परंतु युद्धामध्यें जंतुघ्न औषधांचाच विशेष उपयोग करण्यांत येतो.

**पूतीभवन**—(ग्रॅग्रीन). जेव्हां शरीराच्या विशिष्ट भागांतील पेशी मृत होतात तेव्हां त्या भागाचें पूतीभवन झालें असें म्हण-

ण्यांत येतें. जेव्हां विशिष्ट पेशींतील द्रव प्रथमच सर्व वाहून जाऊन नंतर त्या मृत होतात, तेव्हां त्यास शुष्क पूतीभवन म्हणतात, व जेव्हां त्या पेशींमध्यें द्रव असतो तेव्हां त्यास आर्द्र पूतीभवन म्हणतात. दुसऱ्या प्रकारामध्यें बहुधा आर्द्रतेमुळें पू उत्पन्न होतो व त्यामुळें शरीराचा भाग कुजत जाऊन पुवाचे जंतू वाढत जातात. अशा वेळीं शरीराचा दूषित भाग कापून टाकणें अवश्य असतें. जिवंत पेशीमधील चेतना कमी करणाऱ्या अथवा नाश करणाऱ्या कोणत्याहि कारणापासून पूतीभवन सुरू होतें. ही क्रिया कांहीं रोगांमध्यें अशक्त झालेल्या अवयवांच्या ठिकाणीं किंवा कातडीस कांहीं पदार्थ लागून प्रथमच सुरू होते.

**पूर**—मुंबई, पुणें जिल्हा, जुन्नर तालुका. जुन्नरच्या पश्चिमेस १२ मैलांवर हें लहान गांव आहे. येथें कुकडेश्वराचें हेमाडपंती देऊळ आहे. देवालयांत शिल्पकाम चांगलें आहे. त्यात शिवतांडव व चामुंडा नृत्य दाखविलें आहे. दरवाजावर ४० योगिनी व नवग्रह काढले आहेत. एक शिलालेखहि आहे.

**पूरिया**—हा राग मारवा थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत पंचम स्वर वर्ज्य होत असल्यानें ह्याची जाति षाडव–षाडव आहे. वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. गानसमय रात्रीच्या पहिल्या प्रहराचा आरंभ होय. याचें चलन मंद्र व मध्यसप्तकांत होत असल्यामुळें उत्तरांगप्रधान सोहनी रागापासून हा निराळा भासतो. ह्या रागांतील निषाद व मध्यम स्वरांची संगति वैचित्र्यदायक आहे.

**पूरु**—१. एक वैदिक राष्ट्र. दिवोदास व सुदास हे याच कुलांतील होत.

२. सोमवंशांतील राजा ययाति याला शर्मिष्ठेपासून झालेला कनिष्ठ पुत्र. याचा भाऊ यदु. याच्यापासून दोन वंशशाखा झाल्या. याला ययातीनें सार्वभौमत्व दिलें होतें; कारण यानें बापाची आज्ञा–तारुण्य देण्याबद्दल–पाळली. पूरूची राजधानी प्रतिष्ठान होती.

**पूर्णगड**—रत्नागिरीच्या दक्षिणेस पूर्णगडच्या खाडीवर किंवा मुचकुंदी नदीवर समुद्राला लागून एका टेंकडीवर हा किल्ला आहे. हा शिवाजीनें सर्व किल्ल्यांच्या शेवटीं बांधला म्हणून यास पूर्णगड म्हणतात. आत भातशेती असून ती पूर्वीच्या शिबंदीच्या लोकांच्या वंशजांकडे आहे.

**पूर्णचन्द्रोदय (मकरध्वज)**—एक आयुर्वेदीय औषध. यांत सुवर्ण, पारागंधक कज्जली, कापूर, जायफळ, लवंग व कस्तुरी हीं मुख्य औषधें असून कपाशीच्या व कोरफडीच्या रसाची भावना देतात. या रसाला चन्द्रोदय, पूर्णचन्द्रोदय, मकरध्वज, सिद्धकल्प, इत्यादि नावें आहेत. शक्तीवरचें हें अतिशय सुप्रसिद्ध औषध आहे. स्वप्नावस्था, धातुक्षीणता, उत्साह नसणें, क्षय, इंद्रियशैथिल्य, इत्यादि अनेक विकारावर हें औषध चांगलें उपयोगी पडतें. हें औषध अतिशय कामाग्निदीपक आहे. ।। ते १ गुंज दूध-साखर, लोणी-खडीसाखर, आटीव दूध, वगैरेंत देतात.

**पूर्णय्या**—म्हैसूरचा एक दिवाण. १७९९ मध्यें टिपूचें राज्य घेतल्यावर इंग्रजांनीं कृष्णराज वोडेय्यर यास म्हैसूरच्या गादीवर बसविलें. त्या वेळीं टिपूच्याच नोकरींतला हा तेलंगी वैष्णव ब्राह्मण प्रधान म्हणून नेमण्यांत आला. यानें म्हैसूरांत बऱ्याच चांगल्या सुधारणा केल्या व खजिन्यांत रोकड शिल्लक वाढविली. १८१५ मध्यें हा मरण पावला. याचा नातू दिवाण सर कृष्णमूर्ति होत.

**पूर्णा**—वऱ्हाड प्रांतांतली एक मोठी नदी. ही बैतुल जिल्ह्यांत गाविलगड पहाडांत उगम पावते व वऱ्हाडांत उतरून पश्चिमेला वाहत जाऊन पुढें चांगदेवाजवळ तापीला मिळते. ही १८० मैल लांब आहे. वऱ्हाडांत दक्षिणोत्तर दोन्ही बाजूंनीं हिला बऱ्याच नद्या येऊन मिळतात. ही पैनघाटांतून वाहते; हिच्या दोन्ही काठची जमीन फार सुपीक आहे. हिला पयोष्णी नांव पडण्याचें कारण, चंद्राची कन्या इंदुमति हिनें हा उष्ण दुधा(पया)चा वर्षाव केला असें सांगतात. पयोष्णी पाहा.

**पूर्याधनाश्री**—हा राग पूर्वी थाटांतून उत्पन्न होतो. ह्याचे आरोहावरोह सातहि स्वरानीं होत असल्यामुळें ह्याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी ऋषभ आहे. गानसमय सायंकाळ मानतात. हा राग पूर्वी रागासारखा सामान्यतः भासतो. परंतु या रागांत कोमल मध्यमाचा प्रयोग होत नसून वादी स्वर भिन्न आहे म्हणून रागभेद स्पष्ट होतो.

**पूर्व आफ्रिका**—यांत ब्रिटिश, इटालियन व पोर्तुगीज असे तीन विभाग पडतात. पहिल्या महायुद्धापूर्वी जर्मनीच्या ताब्यांत हा प्रदेश होता.

१. ब्रिटिश—यांत केनिया, युगांडा संरक्षितराज्य, टांगानिका व न्यासालंड संरक्षित राज्य हे प्रदेश येतात. यांवर स्वतंत्र लेख या कोशांत दिले आहेतच. यांखेरीज लहान वसाहती म्हणजे झांझीबार, मॉरिशस, सेचेलेस व सोमालीलँड या होत.

२. इटालियन—यात झांझीबारचा कांहीं प्रदेश, एरिट्रिआ व सोमालीलँडचा कांहीं भाग हीं येतात. आतां दुसऱ्या महायुद्धांत इटलीचा पराभव झाल्यामुळें या वसाहती इटलीकडे राहतात कीं काय हें कायमचा तह झाल्यानंतरच समजेल.

३. पोर्तुगीज—मोझांबिक पाहा.

**पूर्वघाट**—दक्षिण हिंदुस्थानच्या पूर्वपश्चिम किनाऱ्यानें दक्षिणोत्तर जाणाऱ्या पर्वतांना सामान्यतः घाट म्हणतात. पूर्वघाट ओरिसापासून सुरू होतो व गंजममधून खालीं नीलगिरीला मिळतो, आरंभीं हा किनाऱ्याला धरून जात असतो, पण पुढें

किनाऱ्यापासून आंत आंत जातो व १००।१५० मैलांची पट्टी किनाऱ्याकडे सुटते. हा सर्व घाट एकाच प्रकारचा नाहीं. भूस्तरशास्त्राप्रमाणेंहि भिन्न भिन्न भागांत भिन्न भिन्न भूरचना आहे. या घाटांतून निघणाऱ्या नद्या फारशा नाहींत, पण पश्चिम घाटाकडून येणाऱ्या नद्या याच्या तुटक भागांतून पुढें मार्ग काढून समुद्राला मिळतात.

**पूर्वपाषाणयुग**—( पॅलिओलिथिक एज ). पुराणवस्तुशास्त्रामध्यें पाषाणयुगाचे पूर्वपाषाणयुग आणि नवपाषाणयुग असे दोन विभाग करण्यांत येतात. पहिल्या काळामध्यें मनुष्यप्राण्याचीं हत्यारें गारेचीं असून तीं खडबडीत व गारा तोडून केलेलीं असत. दुसऱ्या कालांतील हत्यारें घासून गुळगुळीत केलेलीं असत. अलीकडे या काळाची आणखीहि विभागणी करण्यांत आली आहे. अधोपूर्वपाषाणयुग किंवा खालचें प्राचीनपाषाणयुग ही संज्ञा नियान्डरथाल मनुष्याच्या काळच्या आणि तत्पूर्वकालीन मनुष्याच्या हत्यारांस व धंद्यांस लावण्यांत येते. उत्तरपूर्वपाषाणयुग किंवा वरचें प्राचीनपाषाणयुग ही संज्ञा क्रोमॅग्नन मनुष्य व त्याच्यानंतर येणाऱ्या मनुष्याच्या हत्यारांस लावण्यांत येते. या वेळीं मनुष्य गारांचीं, दगडांचीं, शिंगांचीं, हाडांचीं व लांकडाचीं हत्यारें आणि वस्तू तयार करीत असत. अधोपूर्वपाषाणयुगांत पुढील सांस्कृतिक काल मोडतात: १ पूर्वचेलियन, २ चेलियन, ३ अच्यूलियन, ४ माउस्टेरियन. उत्तर प्राचीन पाषाणयुगांत पुढील सांस्कृतिक कालांची गणना करण्यांत येते: १ औरिग्नॅशियन, २ सोल्युट्रियन, व ३ मग्डेलेनियन.

पूर्वपाषाणयुगापासून नवपाषणयुगाच्या दरम्यान मानवी संस्कृतीचे व एकंदर संस्कृतीचे तीन काल मानण्यांत येतात: १ ॲझिलिअन, २ टार्डेनोइशियन, ३ मॅग्लेमोशियन. पूर्वं निआंडरथाल लोकांची संस्कृति पूर्वचेलियन, चेलियन आणि अच्युलियन या कालांत मोडते, आणि नियांड्रथालकालीन मनुष्याची संस्कृति अधोपूर्वपाषाणयुगांत मोडते. अर्वाचीन मनुष्य ( होमोसॅपिएन ) याचा प्रतिनिधि क्रोमॅग्नॉन या पश्चिम युरोपांतील जातींत आढळतो व त्यानें उत्तरप्राचीनपाषाणयुगांतील संस्कृतीस औरिग्नेशियन कालापासून सुरुवात केली. ही नवी संस्कृति व हे नवे लोक उत्तर आफ्रिकेंतून इटलीच्या मार्गानें आले. सोल्युट्रियन कालामध्यें मध्य व पश्चिम युरोपमधील हवामान औरिग्नेशियन कालापेक्षां अधिक सौम्य होतें. परंतु थंड आणि कोरडें होतें. यानंतर हवामान अधिक थंड झालें आणि मॅग्डेलेनियन काल सुरू झाला. या कालांतील लोकांनीं सोल्युट्रियन काळांतलि संस्कृतीपासून कांहींहि घेतलेलें दिसत नाहीं. युरोप खंडांतील इटलीमध्यें औरिग्नेशियन संस्कृति प्रचलित असतानाच ॲझिलियन लोक येऊन त्यांच्यामध्यें मिसळले. टार्डेनोइशियन कालांतील हत्यारांत कांहीं लहान आकाराचीं गारांचीं हत्यारें आढळतात. त्यांचा उपयोग बहुधा मासे मारण्याच्या कामीं करीत असावे. मध्यंतरींच्या कालांत सायबेरियांतून कांहीं लोक बाल्टिक समुद्राच्या दोन्ही बाजूंकडून खालीं आले. हे बहुधा उत्तरेकडील मनुष्यजातीचे पूर्वज असावे. यांच्या संस्कृतीस मॅग्लेमोशियन असें म्हणतात. हे लोक नद्या गोठलेल्या असतांना उत्तर समुद्राच्या बाजूनें ब्रिटनमध्यें गेले असावे. या वेळीं इंग्लंड युरोपशीं जोडलेलें होतें. ( सुलभ विश्वकोश, भाग १ ला, यांतील प्रस्तावना पृ. २९ पासून पुढें पाहा )

**पूर्व बंगाल**—पाकिस्तान, एक प्रांत. १९४७ सालीं हिंदुस्थानची जी विभागणी झाली तींत पूर्व बंगाल हा पाकिस्तानांत घातला गेला. खालील जिल्हे या प्रांतांत मोडतात:—

( अ ) चितागांग विभाग—चितागांग, नोआखली आणि टिपेरा हे जिल्हे.

( आ ) डाक्का विभाग—डाक्का, फरीदपूर, बाकेरगंज, आणि मैमनसिंग हे जिल्हे.

( इ ) प्रेसिडेन्सी विभाग—जेसोर व खुलना हे जिल्हे.

( ई ) राजशाही विभाग—राजशाही, रंगपूर, पबना, बोग्रा व दिनाजपूर हे जिल्हे.

याचें क्षेत्रफळ ४९,५०० चौ. मै. व लो. सं. ३,९१,४०,०००. या प्रांतांत अनेक नद्या असल्यानें दलदल फार आहे व पूरहि पुष्कळदां येतात. ताग, तांदूळ, चहा व तंबाखू हीं पिकें होतात व मच्छीमारीचा धंदा मोठा आहे. मुख्य ठिकाण डाक्का आहे.

**पूर्वसंकेत**—( ख्रिस्ती प्रीडेस्टिनेशन ). पूर्वसंकेत म्हणजे प्रत्येक व्यक्तिमात्रासंबंधीं परमेश्वराच्या ठिकाणीं असलेलें पूर्वज्ञान व त्या व्यक्तिमात्रास मिळणारें शाश्वतसुख अथवा शासन हें होय. विश्वाच्या उत्पत्तीचा हेतु परमेश्वराच्या ठिकाणीं असलेलें सौख्य आणि वैभव यांचे मानवाच्या ठिकाणीं आरोपण करणें हा आहे. परमेश्वराची अशी इच्छा आहे कीं, प्रत्येक मनुष्यानें त्याच्याशीं स्वर्गीय सुखामध्यें भागीदार व्हावें. तथापि स्वर्गाची प्राप्ति दोन गोष्टींवर अवलंबून आहे: ( १ ) परमेश्वराची कृपा ही सर्व प्राणिमात्रांस त्यांचें अंतिम ध्येय साध्य होण्याकरितां द्यावयाची असते. ( २ ) मनुष्याला ही परमेश्वरी कृपा स्वीकारण्याचें अथवा तिचा त्याग करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य दिलेलें असतें. परमेश्वरास मनुष्याची प्रत्येक कृति पूर्वींच पूर्णपणें दिसत असते. त्यास त्या मनुष्यावर होणाऱ्या कृपेचेंहि ज्ञान असतें. मनुष्यानें ती कृपा स्वीकारण्यापासून अगर त्याग करण्यापासून घडणाऱ्या परिणामांचेहि त्यास पूर्वज्ञान असतें आणि त्याप्रमाणें मनुष्यानें केलेल्या

निर्णयाप्रमाणें त्याला पुढें कोणतें फळ मिळणार हेंहि त्यास माहीत असतें. याप्रमाणें परमेश्वराला प्रत्येक व्यक्तीच्या अंतिम प्राक्तन्याचें पूर्णपणें पूर्वज्ञान असतें व त्याप्रमाणें मनुष्याच्या कृत्यांप्रमाणें त्याला मिळणारें फळ परमेश्वरानें निश्चित व अढळ केलेलें असतें.

पूर्वसंकेत ही गोष्ट अद्यापिहि गूढ असून तिचें पूर्णपणें आकलन मनुष्यास कधींच झालेलें नाहीं. हें गूढ उकलण्याच्या कामीं करावयाच्या प्रयत्नांमध्यें दोन सत्य व मूळ तत्त्वें प्रथम ग्रहण केलीं पाहिजेत. (१) परमेश्वरास प्रत्येक व्यक्तीच्या भविष्य-कालीन स्थितीचें निरंतर (अनन्त कालापासून) ज्ञान असतें; (२) ही भविष्यकालीन स्थिति मनुष्यानें स्वतः आपल्या पूर्ण स्वेच्छेनें निश्चित करून घ्यावयाची असते. कोणाचेंहि स्वतःच्या दोषांशिवाय पतन होत नाहीं. आपली भविष्यकालीन स्थिति परमेश्वरास पूर्णपणें पूर्वींच ज्ञात असून त्यानें केलेल्या निर्णयामध्यें आपणांस कोणत्याच प्रकारें हात घालतां येत नाहीं व आपले सर्व प्रयत्न व्यर्थ होत असें म्हणणें चुकीचें आहे. जर मनुष्य आपली निवड करण्यास चुकला तर ती चूक परमेश्वरास पूर्वीं ज्ञात होती हें तिचें कारण नव्हे तर त्याच्या उलट वस्तुस्थिति असते. परमेश्वरास त्याचें भविष्य कळतें याचें कारण मनुष्य अवश्य तो प्रयत्न करीत नाहीं.

**पूर्वी**—हा पूर्वी थाटाचा आश्रयराग आहे. ह्याच्या आरोहा-वरोहांत सातहि स्वर लागतात म्हणून ह्याची जाति संपूर्ण—संपूर्ण आहे. गानसमय दिवसाचा शेवटचा प्रहर मानितात. ह्याची प्रकृति गंभीर आहे. ह्यांत शुद्ध मध्यम स्वर विवादी ह्या नात्यानें लागतो व अवरोहांतच येतो. तीव्र धैवत लावून हा राग उत्तरेकडे गातांना दृष्टीस पडतो.

**पूल**—एखाद्या प्रवाहावर किंवा दरीवर वाट करण्याकरितां जी दगड, विटा, लांकूड, किंवा लोखंड वगैरेसारख्या वस्तूंची रचना करतात तीस पूल असें म्हणतात. पूल बांधण्याच्या कामीं कमानींचा उपयोग प्रथम रोमन लोकांनीं केला. त्यांनीं बांधलेल्या कमानींची रुंदी ७०।८० फुटांपेक्षां अधिक नसे. व त्या बहुतेक अर्धवर्तुळाकृती असत. रोमन लोकांनीं जे जे प्रदेश जिंकले त्या सर्व प्रदेशांमध्यें पूल बांधलेले आढळतात. ब्रिटनमध्यें रोमन लोकांनीं बांधलेल्या पुलांपैकीं कांहीं पूल अद्यापि अस्तित्वांत आहेत. रोमन साम्राज्य नष्ट झाल्यानंतर १८ व्या शतकापर्यंत पूल बांधण्याच्या कलेमध्यें फारशी प्रगति दिसून येत नाहीं. यानंतर फ्रेंच शिल्पज्ञांनीं या कलेंत सुधारणा व प्रगति केली.

पुलाची कमान बांधीत असतांना असें आढळून आलें कीं, त्या कमानीमधील दगड परस्परांवर पडणाऱ्या दाबामुळे आणि त्यांच्या पृष्ठभागाचें परस्परांशीं होणारें घर्षण यांमुळें घसरून खालीं पडत नाहींत. यावरून असें दिसून येतें कीं, कमानीच्या रचनेमध्यें मुख्यतः पुलाची शक्ति रचनेच्या पद्धतीवर अवलंबून असते व ती दगड जोडण्याकरितां वापरण्यांत आलेल्या संधानका(सिमेंट)वर अवलंबून नसते. ज्या बांधकामावर किंवा खडकावर कमानीच्या बाजूचा भार येऊन पडतो त्यास आधारभित्ती किंवा आधारस्थान (अबटमेंट) असें म्हणतात. कमानीच्या बाजूच्या खांबास स्तंभ (पिअर) असें म्हणतात, व कमानीच्या रुंदीस विस्तार (स्पॅन) असें म्हणतात. दगडी पुलाच्या कमानीचा सर्वांत अधिक विस्तार सुमारें २५० फुटांपर्यंत आढळतो. पुलास एकच कमान असली तर त्यास स्तंभांची जरूर नसते. कमान बांधतांना तिच्याखालीं आधाराकरितां लांकूडकामाची रचना करावी लागते तीस गर्भाधार असें म्हणतात. या गर्भाधारावर कमानीचे दगड (व्हाउस्वॉर) रचण्यांत येतात व त्यावर चावीचा दगड बस-विण्यांत येईपर्यंत त्यास गर्भाधाराचाच आधार असतो.

लोखंडी पूल प्रथम १७७७ ते १७९० च्या दरम्यान बांध-ण्यांत येऊं लागले. आरंभींचे लोखंडी पूल कमानीच्या आका-राचेच बांधण्यांत येत असत व त्याकरितां बीड अथवा ओतीव लोखंडाचा उपयोग करण्यांत येत असे. परंतु त्यानंतर कमानींच्या-ऐवजीं मोठमोठ्या लोखंडी तुळया (गर्डर) वापरण्यांत येऊं लागल्या. आणि ताण सहन करण्याच्या कामीं बीड किंवा ओतीव लोखंडाच्याऐवजीं घडीव लोखंड किंवा पोलाद हें अधिक उपयुक्त असतें असें दिसून आलें. ब्रिटनमध्यें मिनाईच्या सामुद्रधुनीवरील पुलास ब्रिटानिया टयुबुलर ब्रिज असें म्हणतात. म्हणजे तो लांबच लांब बोगद्यासारखा किंवा नलिकाकार आहे. ही नळी अथवा बोगदा चौकोनी असून तो लोखंडी पत्र्यांचा एकमेकांस जोडून बनविलेला आहे. असे मोठमोठाले दोन बोगदे एकाशेजारीं एक जोडून बसविण्यांत आले असून एकाचा उपयोग जाण्याकरितां व दुसऱ्याचा परत येण्याकरितां होतो. यांतून आगगाडी जाते. याची लांबी सुमारें पाव मैल आहे. मॉंट्रील येथील सेंट लॉरेन्स नदीवरचा पूल दोन मैल लांबीचा आहे. क्वीन्सफेरी येथील फोर्थ खाडीवरचा (फर्थ ऑफ फोर्थ) पूल अधांतरीं कमानीच्या (कॅन्टीलिव्हर) तत्त्वावर बांधण्यांत आलेला असून अशा तऱ्हेचा हा पहिलाच पूल आहे. यास दोन कमानी सुमारें १७१० फूट विस्ताराच्या असून दुसऱ्या दोन ६८० फूट विस्ता-राच्या व १५ कमानी १६५ फूट विस्ताराच्या आहेत व यां-खेरीज सात लहान कमानी आहेत. या पुलाची उंची भरतीच्या पाण्यावरहि १५० फुटांपर्यंत असते. यांतील तरंगती कमान

दोन्ही बाजूंस ६८० फूट लांबीची असून मधील तुळई ३५० फूट लांब आहे. झॅम्बेझी नदीवरहि व्हिक्टोरिया फॉल्स या धबधब्याच्या खालच्या बाजूस असाच एक तरंगत्या कमानीचा पूल १९०५ मध्यें बांधण्यांत आला आहे. याच्या कमानीचा विस्तार ६५० फूट असून हा जगांतील सर्व पुलांमध्यें अत्यंत उंच पूल आहे. क्विबेक येथें याच तत्त्वावर बांधलेल्या पुलाची मुख्य कमान १८०० फूट विस्ताराची आहे.

तरंगत्या कमानीचें मुख्य तत्त्व असें असतें कीं, तीमध्यें ज्या जागेवरून पूल जावयाचा असतो तीवर दोन्ही बाजूंनीं लोंबत्या हातासारख्या तुळया पुढें आणण्यांत आलेल्या असतात. हे दोन्ही तरंगते हात एकमेकांस प्रत्यक्ष मिळविण्यांत येतात किंवा त्या दोहोंवर दुसऱ्या तुळया टाकण्यांत येतात आणि त्यांवरून रस्ता तयार करण्यांत येतो. जेव्हां दुसऱ्या कोणत्याहि पद्धतीनें पूल बांधणें फार कठिण असतें तेव्हां या पद्धतीचा अवलंब करण्यांत येतो, आणि या पद्धतीमध्यें तरंगत्या तुळया दोन्ही तीरांच्या आधारानें पुढें लोंबत्या ठेवणें शक्य असल्यामुळे कितीहि उंच जागेवर अशा तऱ्हेचा पूल बांधणें शक्य होते.

लोंबता पूल ( सस्पेन्शन ब्रिज ) हा मध्यंतरीं कोणताहि आधार दिल्याखेरीज बांधतां येणें शक्य असल्यामुळें नदीच्या पात्रामध्यें किंवा नदींतून चालणाऱ्या वाहतुकीस त्याच्या योगानें कोणताहि अडथळा उत्पन्न होत नाहीं. याकरितां दुसऱ्या कोणत्याहि तऱ्हेनें जेथें पूल बांधणें शक्य नसतें, तेथें अशा तऱ्हेचे पूल बांधण्यांत येतात. अशा लोंबत्या पुलांचें सर्व वजन ज्या बाजूच्या स्तंभांवरून ते लोंबत असतात त्यांवर पडतें. व तें त्यांच्या आधारस्थानाच्या खालच्या बाजूस पडतें. हे लोंबते पूल नेहमीं थोडाफार झोका खात असतात व त्यामुळें नेहमीं कंप उत्पन्न होऊन वरून चालणाऱ्या मनुष्यास थोडेसे हादरे बसल्यासारखें वाटतें. अशा तऱ्हेचे पूल बांधण्याच्या पद्धती अनेक आहेत. या पुलावरील रस्ता सांखळयांच्या अथवा तारांच्या मोठमोठ्या दोरांच्या साहाय्यानें टांगल्यासारखा असतो. आणि या तारा किंवा सांखळ्या बाजूच्या पक्क्या खडकाशीं किंवा लोखंडी अथवा चिरेबंदी बांधकामाशीं पक्क्या जोडलेल्या असाव्या लागतात. अशा तऱ्हेचा एक बराच जुना पूल मिनाई सामुद्रधुनीवर टेल्फर्ड यानें १८२५ मध्यें बांधला आहे. याचा विस्तार ५८० फूट आहे.

कांहीं पूल सरकते असतात. अशा पुलांचे एक किंवा दोन भाग असून ते खालीं सोडतां येतात किंवा वर उचलून घेतां येतात. कांहीं पूल वळवितां येतात; म्हणजे अशा पुलाचा कांहीं भाग समपातळींत फिरविण्यांत येऊन गलबतास वगैरे जाण्यायेण्यास मार्ग मोकळा करून देतां येतो. कांहीं पूल तरत्यां( फ्लोट )वर किंवा नावांवर बांधण्यांत येतात व अशा पुलापैकीं कांहीं भाग दूर करून गलबतास मार्ग करून देण्यांत येतो. उडता पूल ( फ्लाइंग ब्रिज ) म्हणजे एक प्रकारची तरच असते. लंडनमधील थेम्स नदीवरचा मनोऱ्यांचा पूल हा एक स्वतंत्र प्रकारचा पूल असून त्याचा मध्यभाग वर उचलून उघडतां येतो व गलबतास वाट करून देतां येते, व खालीं सोडला म्हणजे रस्ता तयार होतो. तसेंच याच्या मनोऱ्यास पायऱ्या असून त्यावरहि पायरस्ता केलेला आहे.

## जगांतील मोठे पूल

| पुलाचे नांव | चालू झालेलें वर्ष | ठिकाण | लांबी मैल | लांबी यार्ड |
|---|---|---|---|---|
| थाउजंड आयलंड्स | १९३८ | सं. संस्थानें—कॅनडा | ७ | |
| सॅनफ्रॅन्सिस्को | १९३७ | ,, | ४ | ८८० |
| ट्रिबरो | १९३६ | ,, | ३ | ८८० |
| झांबेझी | १९३४ | मोझॅंबिक | २ | ५०१ |
| ओहिओ | ... | सं. संस्थानें | २ | |
| स्टॉर स्टॉम | १९३७ | डेन्मार्क | १ | १,७४९ |
| टे | १८८७ | स्कॉटलंड | १ | १,६६८ |
| शोण | ... | हिंदुस्थान | १ | १,५९१ |
| व्हिक्टोरिया | १८५९ | कॅनडा | १ | १,३२० |
| गोदावरी | ... | हिंदुस्थान | १ | १,२७२ |
| फोर्थ | १८९१ | स्कॉटलंड | १ | १,००५ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| मिसोरी | ... | सं. संस्थानें | १ | ७८४ |
| क्वीन्सबरो | १९०९ | ,, | १ | ७४० |
| विल्यम्सबर्ग | १९०४ | न्यूयॉर्क | १ | ६७६ |
| महानदी | ... | हिंदुस्थान | १ | ५४४ |
| मानहाटन | १९०९ | सं. संस्थानें | १ | ५२० |
| रिओ सॅलॅडो | ... | अर्जेंटिना | १ | ४४२ |
| आमुदर्या | ... | तुर्कोमेनिस्तान | १ | ३४७ |
| ससकेनहाना | ... | संयुक्त संस्थानें | १ | ३४५ |
| झझाट | ... | गंगा, हिंदुस्थान | १ | ३६७ |
| ब्रुकलिन | १८८३ | संयुक्त संस्थानें | १ | २४५ |
| हार्डिंज | १९१४ | गंगा, हिंदुस्थान | १ | २०७ |
| रिओडलसे | ... | अर्जेंटिना | १ | १९५ |
| मूरडिज्क | १८८० | हॉलंड | | १,५६५ |
| लिटल बेल्ट | १९३५ | डेन्मार्क | | १,३१२ |
| सिडने हार्बर | १९३२ | न्यू साउथ वेल्स | | १,२५७ |
| जॉर्ज वॉशिंग्टन | १९३१ | न्यू यॉर्क | | १,१६६ |
| कोनॉट | ... | कॅनडा | | १,१६६ |
| क्विबेक | १९१७ | ,, | | १,०८० |
| ऑरेंज रिव्हर | १९२७ | बेचुआनालँड | | ९९१ |
| बेन्यू | १९३२ | नायगेरिया | | ८६१ |
| सरनाव्होडा | ... | रुमानिया | | ७८३ |
| मेंफिस | १८९२ | टेनिसी | | ६२९ |
| ब्रिटानिया | १८५० | वेल्स | | ६१४ |
| सक्कर | १८८९ | सिंध | | ४१७ |
| किंग जॉर्ज दि सिक्स्थ | १९३७ | बंगाल | | ३३८ |
| झांबेझी | १९०५ | ऱ्होडेशिया | | २१७ |

**पूसँ, निकोलस** (१५९४–१६६५)—एक फ्रेंच चित्रकार. हा १३ वा लुई या बादशहाचा दरबारी चित्रकार १६३९ साली झाला. १६४०–१६४२ पर्यंत तो पॅरिस येथें राहिला. पण पुढें फ्रेंच चित्रकारांच्या मत्सरी वृत्तीमुळें तो रोम शहरीं परत गेला, व तेथेंच अखेरपर्यंत राहिला. सृष्टिसौंदर्यदर्शक चित्रें पूसँनें पुष्कळ काढिलीं. त्याचीं चित्रें इंग्लंडांत नॅशनल गॅलरीमध्यें आणि डलविच येथील चित्रसंग्रहांत आहेत. त्याच्या उत्तरकालीन चित्रांचा संग्रह लूव्र येथें आहे. त्याचीं प्रमुख चित्रें आहेत तीं–सॅक्रामेंन्ट्स, शेपर्ड्स इन आर्केडिया. (आर्केडियांतील धनगर), फोसियन, दि डेथ ऑफ फोसियन ॲण्ड पॉलिफेमस (फोसियन आणि पॉलिफेमस यांचे मृत्यु).

**पृथक् निवास** (पति-पत्नींचा)—(ज्युडिशियल सेपरेशन). यासंबंधीं इंग्लंडांत सुप्रीम कोर्ट ऑफ ज्युडिकेचर कन्सॉलिडेशन ॲक्ट (१९२५) यानें तरतूद केली आहे, व सदर कायदा १८५७ च्या मॅरेज कॉन्ट्रॅक्ट (लग्नाचा करार) ॲक्ट या कायद्याच्या आधारानें तयार केलेला आहे. पतीला किंवा पत्नीला व्यभिचार, क्रूर वर्तन, किंवा दोन वर्षें व त्याहून अधिक योग्य कारण नसतां त्याग करणें हें कारण असेल तर कोर्टांत दावा लावून पृथक् राहण्याचा हुकूम मिळवितां येतो. आणि पत्नीला पति विशेष प्रकारें मारहाण करतो असें शाबीत झालें तर नवऱ्याविरुद्ध दावा लावून पृथक् राहण्याचा हुकूम मिळवितां येतो. क्रूरपणाचें कृत्य याचा अर्थ जिवाला धोका किंवा शरीराच्या अवयवाला, किंवा शारीरिक किंवा मानसिक आरोग्याला धोका असा आहे. नेहमीं दारू पिऊन धुंदींत असणें किंवा सतत धमक्या देणें हेंहि कारण नवऱ्याविरुद्ध दावा लावून पृथक् राहण्याचा हुकूम मिळविण्यास पुरेसें असतें.

मात्र या पृथक् निवासाचा हुकूम मिळाला तरी विवाहबंधन नष्ट होत नाहीं, म्हणून पतीला किंवा पत्नीला दुसरा विवाह करतां येत नाहीं.

हिंदुस्थानांत हिंदु, पारशी, ख्रिस्ती, मुसलमान जमातींच्या कायद्यांत पृथक् राहण्याच्या हक्काबद्दल वरीलप्रमाणेंच कलमें आहेत (इंडियन डायव्होर्स ॲक्ट, कलमें २२ ते ३१; पारशी मॅरेज ॲंड डायव्होर्स ॲक्ट, कलमें ३१।३४). हिंदु धर्मशास्त्राला घटस्फोट व पृथक् निवास या गोष्टी मान्य नाहींत, म्हणून जो 'हिंदु डायव्होर्स ॲक्ट' नुकताच १९४७ सालीं मंजूर झाला आहे, त्यांत वरीलप्रमाणें कलमें आहेत.

**पृथु**—भारतांतील पहिला सम्राट्. हा दुष्ट वेन राजाचा पुत्र असून यानें प्रजेला फार सुख दिलें व शंभर अश्वमेध यज्ञ केले. यानें पृथ्वीचें दोहन करून रत्नें व औषधी हीं मिळविलीं व तिला निवासयोग्य व कृषियोग्य अशी सपाट (सुपीक) बनवली. यानें भूमीला आपली कन्या मानल्यामुळें तिला पृथ्वी नांव प्राप्त झालें. पुष्कळ वर्षे राज्य केल्यावर यानें वानप्रस्थाश्रम घेतला.

**पृथ्वी**—रुंद पसरलेली भूमि अशा अर्थानें ऋग्वेद व तदनंतरच्या ग्रंथांत पृथिवी असा शब्द आला आहे. पुष्कळ वेळां ही देवता मानण्यांत येते. कित्येक वेळां ही एकटीच देवता मानली जाते व कित्येक वेळां द्यावा-पृथिवी अशी संयुक्त मानली जाते. नेहमीं तीन लोकांचा उल्लेख येतो, परंतु आपण राहतों ती पृथ्वी सर्वांत श्रेष्ठ होय असें वर्णन येतें. पृथ्वीच्या सभोंवार समुद्राचा कंबरपट्टा आहे, असें ऐतरेय ब्राह्मणांत (८·२०) म्हटलें आहे. निरुक्ताप्रमाणें (९·३१) विश्व अनेक जगतांचें बनलेलें आहे व प्रत्येक जगांत एक एक पृथिवी आहे. शतपथ ब्राह्मणांत पृथ्वीला प्रथमसृष्टि असें म्हटलें आहे. व तिच्या संपत्तीचा उल्लेख केला आहे. शांखायन आरण्यकांत पृथ्वीला वसुमती (= संपत्तीनें परिपूर्ण) असें म्हटलें आहे.

धरणीमाता आणि पंचमहाभूतें यांची प्रार्थना फार प्राचीन काळापासून लोक करीत आले आहेत. त्याचें कारण ही धरणीमाता आपणांला जीवनोपयोगी असलेल्या वस्तू पुरवते. हवा, पाणी आणि पृथ्वीवरील माती सूर्याची उष्णता आपल्या अंगांत सांठवतात म्हणूनच आपण जगूं शकतों. जर ही उष्णता आपणांस मिळाली नसती तर आपण आपलें या जगांत अस्तित्वच टिकवूं शकलों नसतों. जरी आपण विमानांत बसून उंचावर गेलों तरीसुद्धां तें विमान वर राहण्यासाठीं वातावरणाची जरूरी आहे. आणि या वातावरणाला पृथ्वीचा आधार आहे. पृथ्वीच्या पाठीवर राहणाऱ्या मनुष्यांना पृथ्वीचा संपूर्ण अभ्यास करावा लागत आहे. आणि त्या दृष्टीनें पृथ्वीची उत्पत्ति कोठून कशी झाली, ती किती मोठी आहे, ती कशाची बनली आहे, तिच्यावर पाणी कोठून येतें, तिच्यावर कोणकोणते प्राणी राहतात, तिच्यावर कोणत्या वनस्पती उगवतात, वगैरे गोष्टींची माहिती करून घेण्याचा शास्त्रज्ञ प्रयत्न करीत आहेत.

पृथ्वीचा आकार कसा आहे, या गोष्टीचा फार प्राचीन कालापासूनच विचार सुरू होता. निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळे तर्क बांधले होते. भारतीय पुराणांमध्यें पृथ्वी ही शेषाच्या मस्तकावर राहिलेली आहे किंवा आठ दिशांस आठ दिग्गजांनीं तिला तोलून धरली आहे अशा कल्पना व्यक्त केलेल्या आढळतात. पृथ्वी ही हत्तींच्या पाठीवर स्थिरावली आहे. आणि हे हत्ती एका कांसवावर उभे आहेत; हें प्रचंड कांसव पाण्यांत पोहत आहे, अशी ईजिप्शिअन लोकांची कल्पना होती. ग्रीक लोकांची अशी कल्पना होती कीं, पृथ्वी ही सपाट असून तिचा आकार बशीसारखा आहे. परंतु या सर्व कल्पनाच होत्या. एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकांत शास्त्रीय ज्ञानाचा जोरानें प्रसार झाला. आणि पृथ्वीतील बरींचशीं रहस्यें उलगडलीं. तरीसुद्धां अजून पुष्कळशा गोष्टी अज्ञातच आहेत.

अठराव्या शतकांत सुरुवातीला फ्रेंच गणिती व ज्योतिषशास्त्रज्ञ लाप्लास यानें फार मोठ्या प्रमाणावर आकाशांतील दीप्तिमान् वायु अथवा तेजोमेघ याचा सिद्धान्त मांडला आणि तो असा कीं, आपली सूर्यमाला ही तेजोमेघांच्या घनस्थितीस प्राप्त होण्यामुळें उत्पन्न झाली आहे. तेजोमेघ हा द्वीप्तिमान् वायूचा बनलेला असतो, परंतु जसजसा हा वायु थंड होत गेला तसतसे त्यापासून निरनिराळे ग्रहमालेतील ग्रह उत्पन्न झाले. इ. स. १९०० मध्यें टी. सी. चेंबरलेन (शिकॅगोचा एक शास्त्रज्ञ) यानें असा सिद्धांत मांडला कीं, एक फार मोठा तारा आकाशांतून निखळला आणि त्यानें सूर्यापासून बरेच पदार्थ ओढून घेतले. हे ओढून घेतलेले पदार्थ म्हणजेच ग्रह होत. यावर असा एक प्रश्न उपस्थित होतो कीं, पृथ्वी आणि ग्रह सूर्यापासून निघाले खरे, पण मूळ सूर्यच कोठून निघाला? अशा तऱ्हेनें पृथ्वीची उत्पत्ति कशी झाली हा प्रश्न अद्यापि निश्चितपणें सुटलेला नाहीं.

भूगर्भशास्त्रज्ञांनीं पृथ्वी बनल्यानंतर तिच्या इतिहासाचा शोध लावण्यास बरीच मदत केली आहे. त्यांच्या समजुतीप्रमाणें पृथ्वी हा एक प्रचंड द्रवरूप गोल असून तिच्या वर्तुलाकार गतीमुळें तिचा आकार वाटोळा बनला. तप्तशिलारस अथवा लाव्हा आणि अनेक फुटलेले खडक हे पृथ्वीच्या सर्व भागांवरच इतस्ततः पसरलेले होते. या रसापासून उत्पन्न होणाऱ्या भूकंपांनीं पृथ्वीवर बरीच घडामोड केली. एकोणिसाव्या शतकांत डार्विनने असा सिद्धांत मांडला कीं, प्रथम पृथ्वी

फत्तेपूर सिक्री—दिवाण-इ-खासचा स्तंभ (पृ. १५८५)

फिजी — क्रव्याद नृत्य (पृ १५९६)

बँगकॉक — वातचेंग देवालय (पृ. १६२३)

बर्लिन — रीश बँक (पृ. १६४६)

थंड झाली तेव्हां तिचा आकार शंकूसारखा बनला आणि वरचा भाग उडून जाऊन तिचा हल्लींचा आकार बनला. अर्थात् त्या वेळीं सुमारें २७ मैल खोलीचें एक प्रचंड छिद्र त्या शंकूच्या टोपीच्या ठिकाणीं पडलें असावें. प्रोफेसर डार्विन असें सुचवतो कीं, हें छिद्र हल्लींच्या पॅसिफिक महासागरांत असावें. भूगर्भ-शास्त्राप्रमाणें या कल्पनेंत बरेंच तथ्य आहे. कारण पॅसिफिक महासागरामध्यें ग्रॅनाइट जातीचा खडक मुळींच सांपडत नाहीं.

पुढें चिखलाचा हळूहळू खडक बनला, समुद्राला खारटपणा आला आणि पृथ्वीच्या पोटांतील उष्णता हळूहळू कमी होत गेली. या सर्वांवरून पृथ्वीचें सध्यांचें स्वरूप बनण्यास लागलेला काल निश्चित करण्याचा प्रयत्न शास्त्रज्ञांनीं केला आहे. प्रो. जे. जॉली यांच्या मताप्रमाणें पृथ्वीची उत्पत्ति नऊ कोटी वर्षांपूर्वी झाली असावी; हें अनुमान त्यांनीं समुद्राच्या पाण्याच्या खारट-पणावरून काढलें आहे. आर्चिबाल्ड गेक या भूगर्भशास्त्रज्ञाच्या मताप्रमाणें पृथ्वीचा जन्मकाल सुमारें दहा कोटी वर्षांपूर्वींचा असावा. लॉर्ड केल्व्हिन या पदार्थविज्ञानशास्त्रज्ञानें असें मत मांडलें कीं, पृथ्वीचा जन्मकाळ सुमारें दहा कोटी वर्षांपूर्वींचा असावा. रेडियमच्या शोधामुळेंहि वरील विधानाला पुष्टि मिळते. कारण कांहीं धातूंवर रेडिअमचा परिणाम होऊन ते फुटतात. अशा तऱ्हेची फुटण्याची क्रिया रशिया, कॅनडा, वगैरे ठिकाण-च्या खडकांतील धातूंवर झालेली दिसते आणि ही क्रिया होण्यास सुमारें दहा कोटी वर्षें लागलीं असावीं.

सूर्यमालेंत फिरणाऱ्या ग्रहांपैकीं पृथ्वीचा क्रमांक आकार-मानानें सहावा लागतो. सूर्यापासून अंतराच्या दृष्टीनें पृथ्वीचा क्रमांक तिसरा लागतो आणि हें अंतर सुमारें नऊ कोटी तीस लक्ष मैल आहे. लोकांची कल्पना अशी होती कीं, पृथ्वीचा आकार सपाट असावा, परंतु मॅगेलननें इ. स. १५२२ त पृथ्वीची प्रदक्षिणा पुरी केली, आणि पृथ्वी वाटोळी आहे हा पहिला धडा जनतेला शिकविला. ग्रीक ज्योतिषी एराटोस्थेनीज यानें खिस्त शकापूर्वी अडीचशें वर्षें पृथ्वीचा आकार वाटोळा आहे, असें सांगून तिचा व्यासहि मोजण्याचा प्रयत्न केला होता. त्यानें सायिनि आणि अलेक्झांड्रिया या दोन शहरांमधील अंतर घेऊन त्यावरून पृथ्वीचा परिघ काढला. पृथ्वी वाटोळी आहे हें सिद्ध करण्यासाठीं खालील पुरावे मांडण्यात येतात:

(१) कोणत्याहि ठिकाणाहून निघून एकाच दिशेनें प्रवास केल्यास मनुष्य त्याच ठिकाणीं परत येतो; म्हणजे तो वाटोळ्या पृथ्वीवरूनच प्रवास करतो.

(२) जर आपण समुद्राच्या पृष्ठभागावर एकाच उंचीच्या तीन काठ्या एक एक मैल अंतरावर उभ्या केल्या आणि दुर्बिणींतून त्या काठ्यांकडे पाहिलें तर मधली काठी उंच दिसेल. याचें कारण त्या तिन्ही काठ्या वाटोळ्या पृष्ठभागावर ठेवल्या असल्यानें एका रेषेंत दिसत नाहींत. मधली काठी जास्त उंच दिसते.

(३) जर आपण समुद्रकिनाऱ्यावर उभे राहिलों आणि एखादें जहाज समुद्रांतून किनाऱ्याकडे येत असलें तर प्रथम प्रथम त्याचा धूर दिसतो, नंतर मधला भाग दिसतो आणि शेवटीं तळ दिसतो. याच्या उलट स्थिति जहाज बंदरांतून बाहेर पडतांना होते. यामुळें पृथ्वी वाटोळी आहे असें सिद्ध होतें.

(४) जसजसें आपण एखाद्या उंच जागीं वर चढत जावें तसतसें क्षितिज मोठमोठें होत जातें.

(५) चंद्राला सूर्यापासून प्रकाश मिळतो आणि त्याचेंच परिवर्तन पृथ्वीवर होतें. परंतु चंद्रग्रहणाच्या वेळीं सूर्य आणि चंद्र यांमध्यें पृथ्वीचा पृष्ठभाग येतो आणि चंद्रावर दिसणारा तो आकार वाटोळा असतो. यावरून पृथ्वी वाटोळी आहे असें सिद्ध होतें.

(६) सकाळीं सूर्यप्रकाश पडतांना भूपृष्ठावर तो सर्वत्र एकदम पडलेला दिसत नाहीं. जर पृथ्वी सपाट असती तर तो सगळीकडे एकदमच पडलेला दिसला असता.

वरील सर्व पुराव्यांवरून असें हमखास दिसून येईल कीं, पृथ्वीचा आकार वाटोळा आहे.

आतां पृथ्वीचा आकार जरी वाटोळा असला तरी तो संपूर्णपणें वाटोळा नाहीं; तर दोन्ही ध्रुवांकडे तो चपटा असून विषुववृत्तावर तो जास्त रुंद आहे. पृथ्वीचा विषुववृत्तावरील व्यास ७,९२६·६ मैल असून ध्रुवाकडील बाजूनें ७,८९९·९ मैल इतका आहे. म्हणजे ध्रुवाकडील व्यासापेक्षां २७ मैलांनीं विषुववृत्ताचा व्यास जास्त आहे. तसेंच पृथ्वीचें विशिष्ट गुरुत्व ५·५१ इतकें असून भूपृष्ठावरील गुरुत्व २·७५ असें आहे. तसेंच मध्यभागाचें गुरुत्व ५·५१ पेक्षां जास्त आहे.

डॉ. पालहेल यांनीं प्रयोगानें पृथ्वीचें वजन साधारणपणें ६,५९२,०००,०००,०००,०००,०००,००० इतकें कच्चे टन (Short-tons) (२००० पौंड = १ टन) काढलें आहे. या प्रचंड गुरुत्वाकर्षणामुळें चंद्र पृथ्वीसभोंवतीं फिरत राहतो.

तेव्हां पृथ्वी हा स्वतःच एक प्रचंड लोहचुंबक असून त्याचा लोहचुंबकीय उत्तर ध्रुव ७०°,५′ उत्तर अक्षांश आणि ९३°,४३′ पश्चिम रेखांश या ठिकाणीं आहे. तसेंच दक्षिणेकडील बाजूचा लोहचुंबकीय दक्षिण ध्रुव पश्चिम गोलार्धांत ७२°,२५′ दक्षिण अक्षांश आणि १५५°,१६′ पूर्व रेखांश या ठिकाणीं आहे. ह्या लोहचुंबकीय ध्रुवांच्या जागा बदलत असून हा लोहचुंबकीय कणा भौगोलिक कण्याभोंवतीं एक हजार वर्षांत एक वेळां प्रदक्षिणा करतो असा समज आहे.

पृथ्वीचा पृष्ठभाग तीन आवरणांचा बनलेला आहे; आणि तीं म्हणजे: भूकवच, जलावरण, आणि वातावरण. त्यांपैकीं भूकवच हा पृथ्वीचा पृष्ठभागच होय. जलावरण म्हणजे पृथ्वीवरील महासागर, सरोवरें, तळीं, झरे, वगैरे; आणि याच जलावरणानें एकंदर पृथ्वीच्या क्षेत्रफळापैकीं सुमारें शें. ७० भाग व्यापलेला आहे. वातावरण निरनिराळे वायू आणि पाण्याची वाफ यांचें बनलें आहे. सर्वसाधारणतः जलावरणाची खोली सुमारें तेरा हजार फुटांपर्यंत असून जमिनीवरील सर्वसाधारण उंची २,४०० फूट आहे. सुमारें आठ हजार मैल व्यास असलेल्या पृथ्वीच्या आकारमानावर या गोष्टी म्हणजे क्षुल्लक पदार्थ होत.

पृथ्वीच्या पृष्ठभागावर असलेल्या कवचाचें वजन आणि दाब हीं एकमेकांशीं प्रमाणबद्ध असतात. म्हणजे ज्या ठिकाणीं पर्वत आणि पठारें असतात त्या ठिकाणापासून पृथ्वीचा मध्य आणि भूपृष्ठभाग यांमध्यें तयार होणारा त्रिपार्श्व (प्रिझम) यामध्यें जो भाग येतो त्याच प्रमाणांत समुद्रतळ, पृथ्वीचा मध्य आणि भूपृष्ठभाग यांमधला तयार होणारा त्रिपार्श्व थोडासा कमी असावा लागतो. म्हणजेच पृथ्वीच्या सर्वच पृष्ठभागावर एकसूत्रीपणा असावा लागतो. याचें जास्त स्पष्टीकरण म्हणजे जमिनीवरून समुद्राकडे जो गाळ वाहत जातो त्याचें वजन वाढूं लागतांच त्याची प्रतिक्रिया होऊन कांहीं भूभाग दुसरीकडे निर्माण होतात.

पृथ्वीची गति—पृथ्वी ही सूर्यमालेंतील एक ग्रह असल्यामुळें आणि ही सूर्यमाला सूर्याभोंवतीं फिरत असल्यामुळें तिला एक वार्षिक गति असते. तसेंच ती स्वतःच्या आंसाभोंवतीं २४ तासांत एक वेळ फिरते. ही तिची दैनंदिन गति होय. सूर्य प्रत्येक महिन्यांत पूर्वदिशाभागांत उगवतांना एकाच जागीं न उगवतां निरनिराळ्या ठिकाणीं उगवतो; म्हणजेच सूर्यमाला सूर्याभोंवतीं फिरत आहे असें आढळून येईल. पण ज्या एका ठिकाणीं आज सूर्य दिसतो त्याच ठिकाणीं परत तो एक वर्षानें दिसेल. या सूर्यमालेंत पृथ्वीची फिरण्याची जी कक्षा आहे तिचा परिघ ५८,३८,२५,७६५ इतक्या मैलांचा आहे. आणि या परिघावर एका सेकंदास सुमारें १८·५ मैल या गतीनें एका वर्षांत पृथ्वी सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा करते. वास्तविक पाहतां सूर्यापासून पृथ्वी ९,३०,००,००० इतकी मैल दूर आहे. परंतु सूर्यमालेंतील तिचा प्रदक्षिणेंतील रस्ता पूर्ण वाटोळा नसून तो लंब वर्तुळाकार असल्यानें पृथ्वी वर्षांतून दोन वेळां वर सांगितलेल्या अंतरावरून प्रवास न करतां त्या अंतरापेक्षां कमी अंतरावरून प्रवास करते. पृथ्वीची सूर्याभोंवतीं होणारी एक प्रदक्षिणा ३६५·२४२२ इतक्या दिवसात पुरी होते. ३६५ नंतर वर जे दिवस शिल्लक राहतात ते हिशोबाच्या दृष्टीनें आडनिडे पडतात. म्हणून ३६५ दिवसांचें एक वर्ष मानतात. आणि या वरच्या अपूर्ण दिवसांचा हिशेब पूर्ण होण्यासाठीं दर चौथ्या वर्षी ३६६ दिवसांचें वर्ष मानतात.

१ पृथ्वीचें क्षेत्रफळ—

| | | |
|---|---|---|
| पृथ्वीचें एकंदर क्षेत्रफळ | | १९,६९,५०,००० चौ. मै. |
| जमिनीचें | ,, | ५,७५,१०,००० ,, ,, |
| समुद्राचें | ,, | १३,९४,४०,००० ,, ,, |

२ पृथ्वीचा परिघ—

| | | |
|---|---|---|
| विषुववृत्ताचा | २४,९०२ | मैल |
| याम्योत्तर वृत्ताचा | २४,८६० | ,, |

३ पृथ्वीचा व्यास—

| | | |
|---|---|---|
| विषुववृत्तावरचा | ७,९२६·६ | मैल |
| ध्रुवांवरचा | ७,८९९·९ | ,, |

४ पृथ्वीवरील भूप्रदेश आणि लोकवस्ती—

| भूखंड | क्षेत्रफळ (हजार चौ. किलोमीटर) | वस्ती |
|---|---|---|
| आफ्रिका | ३०,३०० | १५,५५,००,००० |
| आशिया* | २६,८०० | १,१३,४५,००,००० |
| युरोप * | ५,३८५ | ४०,०१,००,००० |
| यू. एस्. एस्. आर्. | २१,१७५ | १७,००,००,००० |
| उत्तर अमेरिका | २२,६४२ | १८,२८,१०,००० |
| दक्षिण अमेरिका | १७,९६८ | ९,१३,००,००० |
| ओशियानिया | ८,५५० | १,०६,७०,००० |
| | १३२,८२० | २,१४,५२,००,००० |

* यू. एस्. एस्. आर्. सोडून

**पृथ्वीराज चव्हाण** (११६८—११९२)— अजमीरच्या चौहान या सूर्यवंशांतील विद्वान् राजा जो विग्रहराज त्याचा भाऊ सोमेश्वर, त्याचा पृथ्वीराज हा पुत्र. हा फार शूर, कडवा पण विलासी होता. मुसलमानांना त्यानें सतावून सोडलें. पृथ्वीराजानें बुंदेलखंड घेऊन आपलें राज्य बरेंच वाढविलें. कनोजचा जयचंद याचा मावसभाऊच होता. त्याच्या मुलीचें स्वयंवर व्हावयाचें होतें. राजकन्या संयोगिता हिचें मन पृथ्वीराजानें वेधलें होतें. त्याला तिनें आपला मनोदय कळविला. तेव्हां स्वयंवरमंडपांतून पृथ्वीराजानें संयोगिता हिला पळवून नेलें. आधींच मत्सरी जयचंदास पृथ्वीराजाचा उत्कर्ष, यश व मोठेपणा सहन होत नव्हताच. मध्यंतरीं पृथ्वीराजानें अबूचा जैन परमार याच्या मदतीस जाऊन आपल्या बापाच्या मरणाचा सूड भीमदेवाच्या पराभवानें उगवून घेतला. पुढें जयचंद, भीमदेव, वगैरेंनीं मिळून शहाबुद्दीन घोरी यास पृथ्वीराजाशीं लढण्याच्या कामीं मदतीस बोलावलें.

या वेळीं पृथ्वीराजानें घोरीचा पराभव केला, पण त्यास सोडून दिलें. तो पुन्हां आला तोंपर्यंत पृथ्वीराज हा संयोगितेच्या नादानें आपल्या सर्व लोकांस अप्रिय होऊन एकटा पडला होता. त्यामुळें घोरीला या वेळीं यश येऊन त्यानें पृथ्वीराजाला अंध करून छळून मारलें. त्यामुळें मुसलमानी सत्तेचा लोंढा थोपवून धरणारा बांधच नाहींसा झाला व मुसलमानी अमदानी सुरू झाली. या पृथ्वीराजावर अनेक काव्यें व नाटकें झालीं आहेत. पृथ्वीराजाच्या पदरचा चंदभाट (पाहा) यानें 'पृथ्वीराज रासो' या काव्यांत मोठी मनोरंजक माहिती दिली आहे, पण ती विश्वसनीय नाहीं.

**पृष्ठरज्जुदाह**—(मायेलायटिस). हा रोग पृष्ठवंशाच्या दाहामुळें उत्पन्न होतो. आरंभीं पायामध्यें बधिरता उत्पन्न होऊन मुंग्या आल्यासारखें वाटतें. नंतर हळूहळू पायांची शक्ति क्षीण होत जाऊन बेशुद्धि येते व मूत्राशयांत मूत्र सांचून राहून मूत्ररेचन होत नाहीं.

**पृष्ठवंश**—कणा पाहा.

**पृष्ठवंशरज्जुदाह**—(पोलिओ मायेलायटिस). याला लहान मुलांचा अर्धांग (पॅरॅलिसिस) म्हणतात. या रोगावर वैद्यकीय शास्त्रज्ञांना निश्चित प्रतिबंधक असें कांहीं औषध अगर इनॉक्युलेशन सांपडलेलें नाहीं. सांथीचा अगर संसर्गजन्य रोग म्हणण्याइतक्या मोठ्या प्रमाणावर याची कोठें फारशी लागण झालेली नाहीं. 'व्हिरस' नांवाच्या जंतूमुळें हा रोग होतो. इतर जंतूपेक्षां हा शरीरावर वेगळ्या प्रकारें हल्ला करतो. रक्तपेशींच्या आंतहि तो जाऊं शकतो. पेशींवरच उपाययोजना केल्याशिवाय व्हिरसचा बीमोड होऊं शकणार नाहीं. शरीरांत एकदां त्याचा प्रवेश झाल्यानंतर दिसणारे परिणाम व लक्षणें यांवरच तज्ज्ञांना उपाय योजावे लागतात, पण त्यांतहि शास्त्रज्ञांना कांहींच प्रगति करतां आलेली नाहीं. हे जंतू माणसाचा खोकला व मलमूत्रादि यांपासून सर्वत्र पसरतात. माशासुद्धां जंतू पसरवण्यास कारणीभूत होतात. प्रारंभीं रोग्याला इन्फ्ल्युएंझा अगर साधा ताप आल्यासारखें होतें. त्यानंतर हळूहळू एकदां पाय अगर हात, प्रसंगीं श्वासोच्छ्वास करणारे स्नायूहि काम करीनासे होतात. फक्त माशांचा फैलाव होऊं नये म्हणून प्रयत्न करण्याशिवाय दुसरा चांगला उपाय अद्यापि सांपडला नाहीं. खोकल्याचा संसर्ग पोहोंचूं नये म्हणून गर्दीच्या ठिकाणीं जावयाचें टाळणें हाहि एक उपाय आहे. पण परिणामकारक असा प्रतिबंधक उपाय मात्र शास्त्रज्ञांना सांगतां येत नाहीं.

**पृष्ठवंशक्षय**—हा एक पृष्ठवंशाचा क्षयजन्य विकार आहे. याचें वर्णन निश्चितपणें प्रथम १८ व्या शतकाच्या अखेरीस पॉट यानें केलें, म्हणून याला 'पॉटचा रोग' असें नांव आहे. हा विकार पृष्ठवंशांतील मणक्याच्या पुढील भागामध्यें होऊन हळूहळू ते मणके झिजून जातात व त्यामुळें त्या ठिकाणीं पृष्ठवंशामध्यें बांक उत्पन्न होतो. यावर उपचार म्हणजे कृत्रिम रीतीनें पृष्ठवंशास आधार देणें हा होय व याकरितां प्लॅस्टरची केलेली जाकिटें, वगैरे वापरण्यांत येतात. अशा रोग्यास इतर इंद्रियांच्या ठिकाणींहि क्षय होण्याचा संभव असतो. याकरितां त्यावर प्रतिबंधक उपाय योजणें अवश्य असतें.

**पेकिंग**—दुसरें नांव पेइपिंग. जुन्या चिनी बादशाही साम्राज्याची व पुन्हां आजची कम्युनिस्ट राजधानी. हें शहर फार जुनें असून निरनिराळे राजे व बादशहा यांची राजवट त्यानें पाहिली आहे व वेळोवेळीं त्याला निरनिराळीं नांवेंहि प्राप्त झालेलीं आहेत. सध्यांच्या शहाराचे दोन भाग : नै चेंग-आंतील शहर व वै चेंग-बाहेरील शहर; यांनाच अनुक्रमें तार्तर व चिनी असेंहि म्हणतात. बॉक्सर बंड व परराष्ट्रीय वकिलातींस पडलेले वेढे यांनीं शहराची फारच नासाडी केली. ह्या विस्तीर्ण शहराची लोकसंख्या १५ लक्ष आहे. शहरहि राजधानीच्या मानानें बरेंच घाणेरडें आहे. एक विश्वविद्यालय व शिक्षणाच्या बऱ्याच संस्था येथें आहेत. ६०-७० वर्तमानपत्रें निघतात. एक वेधशाळा आहे. १२६४ सालीं कुब्लाईखानानें ही चीनची राजधानी केली. १९२८ पर्यंत येथें राजधानी होती. नुकतेंच कम्यूनिस्ट पक्षानें हें शहर जिंकून घेतलें व आपली राजधानी केली.

**पेगू**—खालचा ब्रह्मदेश, पेगू विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ ४२७६ चौ. मैल, लोकसंख्या सु. चार लक्ष. शेंकडा ६८ लोक शेतीवर राहतात. मुख्य व्यापार तांदुळाचा. या जिल्ह्यांत साक्षरता बरीच आहे.

पेगू जिल्ह्यात दोन विभाग व त्यांत अनुक्रमें ३ व २ असे ५ तालुके आहेत. हा भाग १८२४ पासून ब्रिटिशांकडे आला.

जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पेगू शहर रंगूनपासून ४७ मैल आहे. बहुतेक रहिवासी बौद्धधर्मानुयायी आहेत. लो. सं. २७,७१२. हें शहर इ. स. ५७३ मध्यें वसविण्यांत आलें. अनेक राजे व अनेक राजघराणीं यानें पाहिलीं. पुढें रंगून शहरामुळें याचें महत्त्व फारच कमी झालें.

**पेंग्विन**— हा एक पक्ष्यांचा स्वतंत्र वर्ग आहे. यांचे पंख अगदीं प्राथमिक अवस्थेंतील असतात. परंतु त्यांचा त्यांस पाण्यांत बुडी मारण्याच्या कामीं फार उपयोग होतो, आणि जमिनीवर ते

पृथ्वीचा पृष्ठभाग तीन आवरणांचा बनलेला आहे; आणि तीं म्हणजे : भूकवच, जलावरण, आणि वातावरण. त्यांपैकीं भूकवच हा पृथ्वीचा पृष्ठभागच होय. जलावरण म्हणजे पृथ्वीवरील महासागर, सरोवरें, तळीं, झरे, वगैरे; आणि याच जलावरणानें एकंदर पृथ्वीच्या क्षेत्रफळापैकीं सुमारें शें. ७० भाग व्यापलेला आहे. वातावरण निरनिराळे वायू आणि पाण्याची वाफ यांचें बनलें आहे. सर्वसाधारणतः जलावरणाची खोली सुमारें तेरा हजार फुटांपर्यंत असून जमिनीवरील सर्वसाधारण उंची २,४०० फूट आहे. सुमारें आठ हजार मैल व्यास असलेल्या पृथ्वीच्या आकारमानावर या गोष्टी म्हणजे कःपदार्थ होत.

पृथ्वीच्या पृष्ठभागावर असलेल्या कवचाचें वजन आणि दाब हीं एकमेकांशीं प्रमाणबद्ध असतात. म्हणजे ज्या ठिकाणीं पर्वत आणि पठारें असतात त्या ठिकाणापासून पृथ्वीचा मध्य आणि भूपृष्ठभाग यांमध्यें तयार होणारा त्रिपार्श्व (प्रिझम) यामध्यें जो भाग येतो त्याच प्रमाणांत समुद्रतळ, पृथ्वीचा मध्य आणि भूपृष्ठभाग यांमधला तयार होणारा त्रिपार्श्व थोडासा कमी असावा लागतो. म्हणजेच पृथ्वीच्या सर्वच पृष्ठभागावर एकसूत्रीपणा असावा लागतो. याचें जास्त स्पष्टीकरण म्हणजे जमिनीवरून समुद्राकडे जो गाळ वाहत जातो त्याचें वजन वाढूं लागतांच त्याची प्रतिक्रिया होऊन कांहीं भूभाग दुसरीकडे निर्माण होतात.

पृथ्वीची गति—पृथ्वी ही सूर्यमालेंतील एक ग्रह असल्यामुळें आणि ही सूर्यमाला सूर्याभोंवतीं फिरत असल्यामुळें तिला एक वार्षिक गति असते. तसेंच ती स्वतःच्या आंसाभोंवतीं २४ तासांत एक वेळ फिरते. ही तिची दैनंदिन गति होय. सूर्य प्रत्येक महिन्यांत पूर्वदिशाभागांत उगवतांना एकाच जागीं न उगवतां निरनिराळ्या ठिकाणीं उगवतो; म्हणजेच सूर्यमाला सूर्याभोंवतीं फिरत आहे असें आढळून येईल. पण ज्या एका ठिकाणीं आज सूर्य दिसतो त्याच ठिकाणीं परत तो एक वर्षानें दिसेल. या सूर्यमालेंत पृथ्वीची फिरण्याची जी कक्षा आहे तिचा परिघ ५८,३८,२५,७६५ इतक्या मैलांचा आहे. आणि या परिघावर एका सेकंदास सुमारें १८·५ मैल या गतीनें एका वर्षांत पृथ्वी सूर्याभोंवतीं प्रदक्षिणा करते. वास्तविक पाहतां सूर्यापासून पृथ्वी ९,३०,००,००० इतकी मैल दूर आहे. परंतु सूर्यमालेंतील तिचा प्रदक्षिणेंतील रस्ता पूर्ण वाटोळा नसून तो लंब वर्तुळाकार असल्यानें पृथ्वी वर्षांतून दोन वेळां वर सांगितलेल्या अंतरावरून प्रवास न करतां त्या अंतरापेक्षां कमी अंतरावरून प्रवास करते. पृथ्वीची सूर्याभोंवतीं होणारी एक प्रदक्षिणा ३६५·२४२२ इतक्या दिवसांत पुरी होते. ३६५ नंतर वर जे दिवस शिल्लक राहतात ते हिशोबाच्या दृष्टीनें आडनिडे पडतात. म्हणून ३६५ दिवसांचें एक वर्ष मानतात. आणि या वरच्या अपूर्ण दिवसांचा हिशेब पूर्ण होण्यासाठीं दर चौथ्या वर्षी ३६६ दिवसांचें वर्ष मानतात.

१ पृथ्वीचें क्षेत्रफळ—

| | | |
|---|---|---|
| पृथ्वीचें एकंदर क्षेत्रफळ | | १९,६९,५०,००० चौ. मै. |
| जमिनीचें | ,, | ५,७५,१०,००० ,, ,, |
| समुद्राचें | ,, | १३,९४,४०,००० ,, ,, |

२ पृथ्वीचा परिघ—

| | |
|---|---|
| विषुववृत्ताचा | २४,९०२ मैल |
| याम्योत्तर वृत्ताचा | २४,८६० ,, |

३ पृथ्वीचा व्यास—

| | |
|---|---|
| विषुववृत्तावरचा | ७,९२६·६ मैल |
| ध्रुवांवरचा | ७,८९९·९ ,, |

४ *पृथ्वीवरील भूप्रदेश आणि लोकवस्ती—*

| भूखंड | क्षेत्रफळ (हजार चौ. किलोमीटर) | वस्ती |
|---|---|---|
| आफ्रिका | ३०,३०० | १५,५५,००,००० |
| आशिया* | २६,८०० | १,१३,४५,००,००० |
| युरोप * | ५,३८५ | ४०,०१,००,००० |
| यू. एस्. एस्. आर्. | २१,१७५ | १७,००,००,००० |
| उत्तर अमेरिका | २२,६४२ | १८,२८,१०,००० |
| दक्षिण अमेरिका | १७,९६८ | ९,१३,००,००० |
| ओशियानिया | ८,५५० | १,०६,७०,००० |
| | १३२,८२० | २,१४,५२,००,००० |

* यू. एस्. एस्. आर्. सोडून

**पृथ्वीराज चव्हाण** (११६८—११९२)— अजमीरच्या चौहान या सूर्यवंशांतील विद्वान् राजा जो विग्रहराज त्याचा भाऊ सोमेश्वर, त्याचा पृथ्वीराज हा पुत्र. हा फार शूर, कडवा पण विलासी होता. मुसलमानांना त्यानें सतावून सोडलें. पृथ्वीराजानें बुंदेलखंड घेऊन आपलें राज्य बरेंच वाढविलें. कनोजचा जयचंद याचा मावसभाऊच होता. त्याच्या मुलीचें स्वयंवर व्हावयाचें होतें. राजकन्या संयोगिता हिचें मन पृथ्वीराजानें वेधलें होतें. त्याला तिनें आपला मनोदय कळविला. तेव्हां स्वयंवरमंडपांतून पृथ्वीराजानें संयोगिता हिला पळवून नेलें. आधींच मत्सरी जयचंदास पृथ्वीराजाचा उत्कर्ष, यश व मोठेपणा सहन होत नव्हताच. मध्यंतरीं पृथ्वीराजानें अबूचा जैन परमार याच्या मदतीस जाऊन आपल्या बापाच्या मरणाचा सूड भीमदेवाच्या पराभवानें उगवून घेतला. पुढें जयचंद, भीमदेव, वगैरेंनीं मिळून शहाबुद्दीन घोरी यास पृथ्वीराजाशीं लढण्याच्या कामीं मदतीस बोलावलें.

या वेळीं पृथ्वीराजानें घोरीचा पराभव केला, पण त्यास सोडून दिलें. तो पुन्हां आला तोंपर्यंत पृथ्वीराज हा संयोगितेच्या नादानें आपल्या सर्व लोकांस अप्रिय होऊन एकटा पडला होता. त्यामुळें घोरीला या वेळीं यश येऊन त्यानें पृथ्वीराजाला अंध करून छळून मारलें. त्यामुळें मुसलमानी सत्तेचा लोंढा थोपवून धरणारा बांधच नाहींसा झाला व मुसलमानी अमदानी सुरू झाली. या पृथ्वीराजावर अनेक काव्यें व नाटकें झालीं आहेत. पृथ्वीराजाच्या पदरचा चंदभाट (पाहा) यानें 'पृथ्वीराज रासो' या काव्यांत मोठी मनोरंजक माहिती दिली आहे, पण ती विश्वसनीय नाहीं.

**पृष्ठरज्जुदाह**—(मायेलायटिस). हा रोग पृष्ठवंशाच्या दाहामुळें उत्पन्न होतो. आरंभीं पायामध्यें बधिरता उत्पन्न होऊन मुंग्या आल्यासारखें वाटतें. नंतर हळूहळू पायांची शक्ति क्षीण होत जाऊन बेशुद्धि येते व मूत्राशयांत मूत्र साचून राहून मूत्ररेचन होत नाहीं.

**पृष्ठवंश**—कणा पाहा.

**पृष्ठवंशरज्जुदाह**—(पोलिओ मायेलायटिस). याला लहान मुलांचा अर्धांग (पॅरॅलिसिस) म्हणतात. या रोगावर वैद्यकीय शास्त्रज्ञांना निश्चित प्रतिबंधक असें कांहीं औषध अगर इनॉक्युलेशन सांपडलेलें नाहीं. सांथीचा अगर संसर्गजन्य रोग म्हणण्याइतक्या मोठ्या प्रमाणावर याची कोठें फारशी लागण झालेली नाहीं. 'व्हिरस' नांवाच्या जंतूमुळें हा रोग होतो. इतर जंतूपेक्षां हा शरीरावर वेगळ्या प्रकारें हल्ला करतो. रक्तपेशींच्या आंतहि तो जाऊं शकतो. पेशींवरच उपाययोजना केल्याशिवाय व्हिरसचा बीमोड होऊं शकणार नाहीं. शरीरांत एकदां त्याचा प्रवेश झाल्यानंतर दिसणारे परिणाम व लक्षणें यांवरच तज्ज्ञांना उपाय योजावे लागतात, पण त्यांतहि शास्त्रज्ञांना कांहींच प्रगति करतां आलेली नाहीं. हे जंतू माणसाचा खोकला व मलमूत्रादि यांपासून सर्वत्र पसरतात. माशासुद्धां जंतू पसरवण्यास कारणीभूत होतात. प्रारंभीं रोग्याला इन्फ्ल्युएंझा अगर साधा ताप आल्यासारखें होतें. त्यानंतर हळूहळू एकदां पाय अगर हात, प्रसंगीं श्वासोच्छ्वास करणारे स्नायूहि काम करीनासे होतात. फक्त माशांचा फैलाव होऊं नये म्हणून प्रयत्न करण्याशिवाय दुसरा चांगला उपाय अद्यापि सांपडला नाहीं. खोकल्याचा संसर्ग पोहोंचूं नये म्हणून गर्दीच्या ठिकाणीं जावयाचें टाळणें हाहि एक उपाय आहे. पण परिणामकारक असा प्रतिबंधक उपाय मात्र शास्त्रज्ञांना सांगतां येत नाहीं.

**पृष्ठवंशक्षय**—हा एक पृष्ठवंशाचा क्षयजन्य विकार आहे. याचें वर्णन निश्चितपणें प्रथम १८ व्या शतकाच्या अखेरीस पॉट यानें केलें, म्हणून याला 'पॉटचा रोग' असें नांव आहे. हा विकार पृष्ठवंशांतील मणक्याच्या पुढील भागामध्यें होऊन हळूहळू ते मणके झिजून जातात व त्यामुळें त्या ठिकाणीं पृष्ठवंशामध्यें बाक उत्पन्न होतो. यावर उपचार म्हणजे कृत्रिम रीतीनें पृष्ठवंशास आधार देणें हा होय व याकरितां प्लॅस्टरची केलेली जाकिटें, वगैरे वापरण्यांत येतात. अशा रोग्यास इतर इंद्रियांच्या ठिकाणींहि क्षय होण्याचा संभव असतो. याकरितां त्यावर प्रतिबंधक उपाय योजणें अवश्य असतें.

**पेकिंग**—दुसरें नांव पेइपिंग. जुन्या चिनी बादशाही साम्राज्याची व पुन्हां आजची कम्युनिस्ट राजधानी. हें शहर फार जुनें असून निरनिराळे राजे व बादशहा यांची राजवट त्यानें पाहिली आहे व वेळोवेळीं त्याला निरनिराळीं नांवेंहि प्राप्त झालेलीं आहेत. सध्यांच्या शहाराचे दोन भाग : नै चेंग-आंतील शहर व वै चेंग-बाहेरील शहर; यांनाच अनुक्रमें तार्तर व चिनी असेंहि म्हणतात. बॉक्सर बंड व परराष्ट्रीय वकिलातींस पडलेले वेढे यांनीं शहराची फारच नासाडी केली. ह्या विस्तीर्ण शहराची लोकसंख्या १५ लक्ष आहे. शहरहि राजधानीच्या मानानें बरेंच घाणेरडें आहे. एक विश्वविद्यालय व शिक्षणाच्या बऱ्याच संस्था येथें आहेत. ६०–७० वर्तमानपत्रें निघतात. एक वेधशाळा आहे. १२६४ सालीं कुब्लाईखानानें ही चीनची राजधानी केली. १९२८ पर्यंत येथें राजधानी होती. नुकतेंच कम्यूनिस्ट पक्षानें हें शहर जिंकून घेतलें व आपली राजधानी केली.

**पेगू**—खालचा ब्रह्मदेश, पेगू विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ ४२७६ चौ. मैल. लोकसंख्या सु. चार लक्ष. शेंकडा ६८ लोक शेतीवर राहतात. मुख्य व्यापार तांदुळाचा. या जिल्ह्यांत साक्षरता बरीच आहे.

पेगू जिल्ह्यात दोन विभाग व त्यांत अनुक्रमें ३ व २ असे ५ तालुके आहेत. हा भाग १८२४ पासून ब्रिटिशांकडे आला.

जिल्ह्याचें मुख्य ठिकाण पेगू शहर रंगूनपासून ४७ मैल आहे. बहुतेक रहिवासी बौद्धधर्मानुयायी आहेत. लो. सं. २७,७१२. हें शहर इ. स. ५७३ मध्यें वसविण्यांत आलें. अनेक राजे व अनेक राजघराणीं यानें पाहिलीं. पुढें रंगून शहरामुळें याचें महत्त्व फारच कमी झालें.

**पेंग्विन**— हा एक पक्ष्यांचा स्वतंत्र वर्ग आहे. यांचे पंख अगदीं प्राथमिक अवस्थेंतील असतात. परंतु त्याचा त्यांस पाण्यांत बुडी मारण्याच्या कामीं फार उपयोग होतो, आणि जमिनीवर ते

पुढच्या पायांसारखे वापरतां येतात. जमिनीवर असले म्हणजे हे पक्षी उभे राहतात. यांच्या पायांचीं बोटें कातड्यानें जोडलेलीं असतात. हे बहुधा दक्षिण गोलार्धांत दक्षिण ध्रुवाच्या बाजूस आढळतात. यांच्या तीन प्रमुख जाती आहेत. हे फार जबरे पोहणारे असतात.

**पेटके**—स्नायूंमध्यें एकदम आंचके येऊन एक प्रकारचें चमत्कारिक आकुंचन आपोआप होऊं लागतें त्यास पेटके येणें किंवा पाय वळणें असें म्हणतात. याचा उद्भव उष्णमानांत एकदम फरक झाल्यामुळें (उदा., स्नान करतांना एकदम थंडी लागली असता), एखाद्या स्नायूवर अतिशय ताण पडला असता, किंवा ज्या भागास कधीं व्यायाम घडत नाहीं किंवा ज्या स्नायूचें फारसें कार्य लागत नाहीं अशा स्नायूवर एकदम भार पडला असतां हा विकार उत्पन्न होतो.

अशा वेळीं पेटके येतात त्याच्या उलट दिशेनें स्नायू शक्य तितके ताणावे व हातानें किंवा खरबरीत रुमालानें तो भाग जोरानें चोळावा. या उपचारानें पेटके राहिले नाहींत तर शेकावें.

**पेटन, सर जोसेफ नोएल** (१८२१-१९०३)—एक ब्रिटिश इतिहासविषयक चित्रकार. त्यानें रूथ ग्लीनिंग हें आपलें १ लें चित्र १८४४ सालीं एडिंबर्ग येथील प्रदर्शनांत ठेवलें. त्यानंतर त्यानें पुष्कळ चित्रें काढलीं तीं म्हणजे 'दि परसूट ऑफ प्लेझर' (सुखाचा शोध), 'मॉर्स जानुआ व्हिटा', 'फेथ ॲन्ड रीझन' (श्रद्धा आणि विचार), 'लक्स इन् टेनेब्रीस' आणि 'दि मॅन विथ दि मक-रेक', इ. होत.

**पेंटर, बाबूराव** (१८९२- )—एक हिंदी चित्रकार. यांचें सर्व घराणें चित्रकारांचें असून त्यांत हे स्वतः कलात्मक तैलचित्रें काढण्याबद्दल सुप्रसिद्ध आहेत. एकदां हे व यांचे आतेभाऊ आनंदराव यांनीं मुंबईच्या अमेरिका इंडिया थिएटरमध्यें एक चित्रपट पाहिला व त्यावरून अशा तऱ्हेनें आपणहि चित्रपट निर्माण करावे अशी इच्छा यांच्या मनात उद्भूत झाली. तदनुसार आनंदरावाच्या साहाय्यानें यांनीं महाराष्ट्र फिल्म कंपनीची स्थापना करून 'सैरंध्री' हा बोलपट काढला. या बोलपटानें पैशाबरोबरच यांना कीर्तीचाहि लाभ करून दिला. यानंतर वत्सलाहरण, प्रल्हाद, दामाजी, सिंहगड, कल्याण खजिना, नेताजी पालकर, यांसारखे अनेक चित्रपट यांनीं काढले. यांच्या कल्याण खजिना, पद्मिनी व सिंहगड या चित्रपटाना युरोपातील वेंब्ले येथें भरलेल्या चित्रपट-प्रदर्शनांत सुवर्णपदक मिळालें. 'लंकादहन' हा सतरावा चित्रपट काढल्यानंतर १९३० सालीं सहकाऱ्यांमधील मतभेदांमुळें महाराष्ट्र फिल्म कंपनी यांना बंद ठेवावी लागली.

बोलपटाचें युग सुरू झाल्यावर कोल्हापूरच्या शालिनी सिनेटोनमध्यें यांनीं उषा, सावकारी पाश व प्रतिमा हे तीन बोलपट दिग्दर्शित केले. यांनीं दिग्दर्शित केलेले अगदीं अलीकडचे बोलपट म्हणजे 'रुक्मिणी-स्वयंवर' व 'राम जोशी' हे होत.

फाळके यांनीं सिनेमासृष्टीचा पाया हिंदुस्थानांत घातला व यांनीं त्याला कलात्मक वळण देण्याचें कार्य केलें आहे. कलात्मक चित्रपटाबरोबरच यांनीं नवीन कलावंतहि तयार केले. व्ही. शांताराम, एस्. फत्तेलाल, केशवराव धायबर यांच्यासारखे यांच्या तालमींत तयार झालेले अनेक कलावंत आजच्या हिंदी चित्रपटसृष्टींत अग्रभागीं चमकत आहेत. हिंदी चित्रपटसृष्टींत अगदीं सुरुवातीपासून ते थेट आजतागायत महाराष्ट्राला मिळालेलें नेतृत्व हें यांच्या या धंद्यांतील अलौकिक तपश्चर्येचेंच फळ आहे.

**पेटलाद**—बडोदें संस्थान, एक तालुका व गांव. तालुक्याचें क्षेत्रफळ १८२ चौ. मै.. लो. सं. दीड लक्षाच्या वर. यांत ४ शहरें व ७३ खेडीं आहेत. जमीन काळी व सपाट; जंगल किंवा नदी नाहीं. तंबाखू उत्तम पिकते. मुख्य ठिकाण पेटलाद शहर. लो. सं. सु. वीस हजार. कोर्ट-कचेऱ्या व शाळा गावांत असून गांव वाढतें आहे.

**पेटॉफी, सान्डोर** (१८२३-१८४९)—एक हंगेरियन कवि. त्यानें कविता आणि कित्येक नाटकें व कादंबऱ्या लिहिल्या. त्याचें भावगीत 'आतां नाहीं तर कधीं नाहीं!' हें १८४८ च्या क्रांतिकालांत युद्धगीत बनलें. तो स्वासबर्ग येथील लढाईंत मारला गेला.

**पेटिट, जहांगिर बोमनजी** (१८७९- )—एक पारशी व्यापारी व दानशूर. यांचें शिक्षण मुंबई येथें झालें. हे कॉंग्रेसचे व प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे १८९८ ते १९१८ पर्यंत सभासद होते. इंडियन होमरूल व तिचें कार्यकारी मंडळ यांचे १९१५ ते १९२० पर्यंत सभासद होते. नॅशनल लिबरल फेडरेशन व त्याचें कार्यकारी मंडळ यांचे १९१८ ते १९२० पर्यंत सभासद होते. सुरत कॉंग्रेस कन्व्हेन्शनचे ते १९०५ मध्ये सभासद होते. हे ऑ. प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट, युनिव्हर्सिटी सेनेटचे सभासद, अनेक संस्थांचे ट्रस्टी, कमिटी मेंबर, संस्थापक, वगैरे आहेत. सामान्यतः मुंबईंत आढळणाऱ्या सर्व प्रकारच्या सार्वजनिक संस्थांशीं व चळवळींशीं यांचा निकटचा संबंध आढळून येतो. यांचें घराणेंहि सर्वपरिचित आहे व यांनीं आतांपर्यंत लाखों रुपये सार्वजनिक कार्यांत खर्च केले आहेत.

**पेटिट, सर दिनशा माणेकजी** (१८२३-१९०१)—मुंबईचे एक सुप्रसिद्ध धनाढ्य व्यापारी व सार्वजनिक कार्यकर्ते. यांचे पूर्वज नसरवानजी कावसजी हे सुरतेहून मुंबईस

येऊन फ्रेंच व इंग्लिश मालाच्या अडत्याचें काम करूं लागले. त्यामुळें यांच्या घराण्याला फ्रेंच भाषेंतील 'पेटिट' म्हणजे व्यापारी असें नांव पडलें. मुंबईच्या साइक्स कॉलेजमध्यें प्राथमिक शिक्षण झाल्यावर यांनीं धंद्यांत लक्ष घालण्यास सुरुवात केली. १८६४ सालच्या अमेरिकन युद्धाच्या कालांत अतोनात द्रव्य मिळवून त्यावर यांनीं माणेकजी पेटिट स्पिनिंग ॲण्ड वीव्हिंग मिल्स व माणेकजी पेटिट मॅन्युफॅक्चरिंग कंपनी यांची स्थापना केली. हाच पसारा वाढत जाऊन पुढें दिनशा पेटिट मिल, माझगांव मिल, व्हिक्टोरिया मिल, गॉर्डन मिल व मुंबईतील पहिलीच डाइंग मिल यांचे हे मालक बनले. धंद्यांत सहकारी भांडवलाची दृष्टि उपयोगांत आणून सहकार्यावर आधारलेले धंदे कसे यशस्वी होतात याचें एक नमुनेदार उदाहरण यांनीं घालून दिलें. गिरण्यांतील मजुरांसाठीं घरें बांधण्याची योजना यांचीच होय.

'बॅंक ऑफ बॉंबे' सारख्या संस्थांचे डॉयरेक्टर म्हणून यांनीं यशस्वी कामगिरी केलेली आहे. मध्यवर्ती असेंब्ली, बॉंबे रॅायल एशियाटिक सोसायटी व कार्पोरेशन यांचे हे सभासद होते. मुंबईचे शेरीफ होण्याचा मानहि यांना लाभला.

उदार स्वभावाबद्दल यांची ख्याति होती. जनावरांचें इस्पितळ, स्त्रियांचें कॉलेज, पेटिट हॉस्पिटल, यांसारख्या अनेक उपयुक्त संस्थांना यांनीं सढळ हातानें देणग्या दिलेल्या आहेत. वीस लक्षांहून अधिक इतकी रक्कम यांनीं देणग्यांसाठीं खर्च केली आहे. मुंबईस व्हिटोरिया टर्मिनसच्यासमोर यांचा भव्य पुतळा उभारून यांचें स्मारक करण्यांत आलें आहे.

**पेटंट**—मक्ता. ज्या इसमानें किंवा इसमांनीं एखादा महत्त्वाचा नवा शोध लावला असेल त्या इसमाला किंवा इसमांना सरकारकडून त्या नव्या शोधाचा उपयोग करणें, किंवा त्याची विक्री करणें यांबद्दल संपूर्ण हक्काची जी सनद देण्यांत येते तिला पेटंट म्हणतात. या सनदेनें सदर हक्क हल्लीं युनायटेड किंग्डममध्यें १६ वर्षें मुदतीपर्यंत देण्यांत येतो. लंडनमधील पेटंट कचेरीमध्यें कन्ट्रोलर जनरल ऑफ पेटंट्स या अधिकाऱ्याकडून पेटंट देण्यांत येतें. पेटंटसाठीं अर्ज करणाऱ्या इसमानें सदर अर्जांत आपल्या शोधाबद्दलची सामान्य माहिती दिली पाहिजे. आणि नंतर ९ महिन्यांच्या आंत त्या शोधाबद्दलची आणि त्याच्या उपयुक्ततेबद्दलची संपूर्ण माहिती सदर कचेरीकडे कळविली पाहिजे. सदर अर्ज व माहिती पेटंट कचेरीनें नेमलेल्या परीक्षकाकडे पाठविण्यात येते. आणि त्यानें समाधानकारक शेरा दिला तर अर्ज मंजूर होऊन पेटंटची सनद मिळते. या पेटंटच्या हक्काची अमलबजावणी ब्रिटिश साम्राज्यांतील इतर भागात आणि परकीय देशांत करण्याची व्यवस्था तसा अर्ज केल्यास सदर कचेरीकडून करण्यात येते. अशा पेटंट मिळालेल्या शोधांची माहिती सर्वांना कळावी म्हणून सदर पेटंट कचेरीकडून एक सचित्र सरकारी जर्नल प्रसिद्ध होत असतें. लंडन येथें एक मोठें पेटंट ग्रंथालय-प्रदर्शन असून तेथें सर्वांना मोफत प्रवेश मिळतो.

याप्रमाणें युनायटेड किंग्डममध्यें जो पेटंटसंबंधीं कायदा आहे तोच सर्वत्र उचलून घेतला आहे. हिंदुस्थानांत 'इंडियन पेटंट्स ॲंड डिझाइन्स ॲक्ट, १९११' या कायद्यानें पेटंट देतां येतें. १६ वर्षेंपर्यंत पेटंट घेणाऱ्याला आपल्या शोधासंबंधीं सर्व हक्क असतात व कांहीं विशिष्ट परिस्थितींत ही मुदत आणखी दहा वर्षें वाढवून घेण्यांत येते. ज्याचें पेटंट घ्यावयाचें त्याच्या रचनेंत खरोखरच नावीन्य असावें लागतें. आपण घेतलेलें पेटंट विकतां येतें. 'पेटंट ऑफिस हॅंडबुक' मिळतें त्यांत सविस्तर माहिती सांपडेल.

आपल्याकडे पेटंट घेण्याची पद्धत फारशी नाहीं. त्यामुळें हिंदुस्थानांत घेतलीं गेलेलीं ९० टक्के पेटंट परदेशांतील लोकांनीं घेतलेलीं असतात. याच्या उलट स्थिति अमेरिकेंत आढळेल. तेथें अमेरिकेंतील मित्रराष्ट्रांच्या लोकांना पेटंट मिळूं शकतें. पेटंट मागण्याच्या अर्जाबरोबर १० डॉलर व मान्य झाल्यावर ३० डॉलर भरावयाचे असतात. अर्ज अमान्य झाल्यास १५ डॉलर भरून अपीलहि करता येतें. उपयुक्त कल्पनांचें पेटंट घेण्याचीहि कायद्यांत सोय आहे. आपल्या पेटंट कल्पना चोरल्या तर इलाज करतां येतो.

**पेट्रार्क, फ्रॅन्सेस्को पेट्रार्को** (१३०४–१३७४)—एक इटालियन कवि व मानववादी. त्यानें प्रथम कायद्याचा अभ्यास केला, परंतु त्याचा ओढा लॅटिन कवींचीं काव्यें वाचण्याकडे होता. १३२७ सालीं त्यानें ॲव्हिग्नॉन शहरीं लॉरा या नांवाची स्त्री पाहिली आणि तिच्या दर्शनाचा या कवीच्या पुढील आयुष्यावर आणि त्याच्या भावगीतांवर अतिशय परिणाम झाला. लॉरा हिचा विवाह, ती पेट्रार्कच्या दृष्टीस पडण्यापूर्वींच दोन वर्षें झाला होता व तिला पुष्कळ मुलें झालीं होतीं. ती १३४८ सालीं मरण पावली. पेट्रार्कनें अनेक लॅटिन ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं प्रसिद्ध आहेत ते : पत्रसंग्रह, तीन भाग; बारा ग्रामीण काव्यें; प्यूनिक युद्धविषयक महाकाव्यें; आणि धार्मिक, राजकीय व ऐतिहासिक निबंध. परंतु त्याची कीर्ति मुख्यतः 'ट्रिनोफी' (रूपकात्मक व नीतिबोधपर कविता) आणि 'कॅन्झोनिएर' हीं प्रेमगीतें व राष्ट्रगीतें या दोन कवितासंग्रहांवर आधारलेली आहे.

**पेट्री, सर विल्यम मॅथ्यू फ्लिंडर्स** (१८५३–१९४२)—एक ब्रिटिश मिसरी लिपितज्ज्ञ. त्यानें १८८१ व १८८२ सालीं गिझेह येथील पिरॅमिड मनोऱ्याचें सूक्ष्म अवलोकन केलें व नंतर १८८४ ते १८८६ या कालांत 'ईजिप्त एक्स्प्लोरेशन फंड

पण त्याऐवजीं सरकारचे पैसे त्यांना बिनव्याजी वापरतां येऊं लागले. १८७६ सालीं प्रेसिडेन्सी बँक ॲक्ट होऊन या प्रांतिक पेढ्यांवर कांहीं नियंत्रण बसलें.

१८४२ पासून परदेशी पेढ्यांची हिंदुस्थानांत बादशाही सनदेनें स्थापना होऊं लागली. कारण परराष्ट्रांचा हिंदुस्थानशीं व्यापार वाढला व प्रत्येक राष्ट्राला स्वतःची बँक हिंदुस्थानांत असणें जरूर वाटूं लागलें.

१८६० सालीं नियमित जबाबदारीचें तत्त्व पेढ्यांच्या व्यवहारास लागू करण्यांत आलें व त्यामुळें त्यांची वाढ होण्यास मदत झाली. नंतर देशांत जेव्हां स्वदेशीची चळवळ सुरू झाली तेव्हां देशी पेढ्या निघूं लागल्या. 'बँक ऑफ इंडिया', 'बँक ऑफ बरोडा' व 'सेंट्रल बँक' यांसारख्या देशी पेढ्या स्थापन होऊन चांगला व्यवहार चालवूं लागल्या. पण त्याबरोबरच पेढ्या काढण्याची लाट येऊन त्यांतील कांहीं बुडण्यालाहि सुरुवात झाली. अपुरें भांडवल, चालकांची अतज्ज्ञता, सट्टेबाजी, पैसे गुंतविणें आणि कर्जे देणें या कामीं दक्षता नसणें, इ. कारणांमुळें या बँका बुडल्या हें साहजिक झालें.

हिंदुस्थानची एक स्वतंत्र मध्यवर्ती पेढी असावी या उद्देशानें १९२१ सालीं 'इंपीरियल बँक ऑफ इंडिया' निघाली; पण या बँकेला चलनविषयक हक्क दिले नव्हते. त्यामुळें नुसती एक सरकारी व्यापारी पेढी म्हणून तिचें काम चालूं लागलें. पण मध्यवर्ती बँकेची जरूरी कायमच राहिली. तेव्हां अनेक सूचना व गोलमेज परिषदेंत चालना होऊन १९३४ सालीं रिझर्व्ह बँकेचा कायदा झाला व पुढील सालीं ती अस्तित्वांत आली ( रिझर्व्ह बँक पाहा ).

हिंदी सामुदायिक भांडवलाच्या पेढ्या गेल्या वीस वर्षांत चांगल्या चालल्या असून कांहींना 'शेड्यूल्ड' दर्जा प्राप्त झाला आहे. ज्या पेढ्यांचें भांडवल व कायम निधि पांच लाखांपेक्षां जास्त आहे त्यांचा शेड्यूल्ड वर्गांत समावेश होतो. १९३५ सालीं यांची संख्या ५० होती, ती १९४७ सालीं ९७ झाली. 'शेड्यूल्ड' नसलेल्यांची संख्या अदमासें ७०० भरेल. पन्नास हजार रुपयांच्या भांडवलाखेरीज आतां कायद्यानें पेढी उघडतां येत नाहीं ही चांगली गोष्ट आहे. नवीन पेढ्यांना नफ्याचा ⅕ भाग कायम निधींत ठेवावा लागतो.

विनिमय पेढ्या ( एक्स्चेंज बँक्स )—या सामुदायिक भांडवलाच्या पेढ्यांपेक्षां निराळ्या आहेत. यांचा मुख्य धंदा म्हणजे हिंदुस्थानांतील आयात-निर्यातींच्या व्यापारासंबंधीं ज्या हुंड्या लिहिल्या जातात त्या विकत घेऊन लंडनमध्यें वटविणें किंवा मुदत संपल्यावर वसूल करून घेणें, हा होय. यांच्या बहुतेकांच्या कचेऱ्या लंडनमध्यें असतात. कांहींच्या अमेरिका, जपान, फ्रान्स, इ. राष्ट्रांत असतात. या पेढ्यांची हिंदी पेढ्यांशीं चढाओढ साहजिक होते. हिंदी बँकांना परराष्ट्रीय हुंड्यांचा धंदा फार कमी आहे. बहुतेक तो या विनिमय पेढ्यांमार्फत चालवितात. या विनिमय पेढ्या परदेशांत प्रवास करणाऱ्यासाठीं लागतील तेथें वटवितां येतील असे चेक काढतात. सरकारला पौंडाचा पुरवठा करणें, सोन्याची आयात-निर्गत करणें, वगैरे धंदेहि या पेढ्या करतात. यांमुळें त्यांचें फार महत्त्व आहे.

सहकारी पेढ्या—सहकारी पेढ्या या एका विशिष्ट प्रदेशांतच काम करीत असून त्यांतील भागीदारांचा वर्ग व आर्थिक हित एकच असतें. सामुदायिक भांडवलाच्या पेढ्यांप्रमाणें सहकारी पेढ्यांना एकूण एक कारभार पाहणारे व्यवस्थापक अडत्ये (मॅनेजिंग एजंट्स) नसतात, तर प्रत्यक्ष भागीदारच पेढीच्या कारभारांत भाग घेतात. जो फायदा होईल तो त्यांचाच केवळ असतो. यामुळें राष्ट्रांतील घटकांची प्रत्यक्ष उन्नति होते. १९०४ सालीं सहकारी संस्थांचा कायदा होऊन अशा पेढ्यांना सुरुवात झाली. विशेषतः शेतकऱ्यांच्या उन्नतीसाठीं या पेढ्या आहेत. या नागरी किंवा ग्रामीण सहकारी पेढ्यांची एक मध्यवर्ती जिल्हा किंवा प्रांतिक सहकारी पेढी म्हणून असते. १९४४-४५ सालीं सहकारी 'शेड्यूल्ड' पेढ्या ५० होत्या व त्यांखालच्या एक लाख भांडवलापर्यंत ३१३ होत्या.

जमीन-गहाण पेढ्या ( लँड मॉर्टगेज बँक्स )— सहकारी पेढ्यांकडून लांब मुदतीचीं कर्जें मिळत नाहींत व त्यांच्याजवळ भांडवलहि फार नसतें. जमीन-गहाण पेढ्या पंधरा ते वीस वर्षेंपर्यंत कर्जें देऊन त्याची फेड सोयीच्या हप्त्यांनीं करवून घेतात. तेव्हां यांचा पसारा सहकारी पेढ्यांपेक्षां मोठा असतो. यांचीहि एक मध्यवर्ती प्रांतिक पेढी असते.

गेल्या महायुद्धांत जगांतील सर्व राष्ट्रांची जी दुर्दशा झाली ती सुधारण्यासाठीं एक आंतरराष्ट्रीय पेढी निघाली आहे. या बँकेकडून दिलीं जाणारीं कर्जें त्या-त्या राष्ट्रांच्या आर्थिक विकासासाठींच असतात. या कर्जांवर चार साडेचार टक्के व्याज आकारलें जातें. ज्या देशांना असें कर्ज पाहिजे असेल त्या देशांत ही पेढी आपले तज्ज्ञ पाठवून त्या देशाच्या आर्थिक विकासाच्या दृष्टीनें काय योजना करावयास पाहिजेत याबद्दलहि सल्ला देते. मागासलेल्या व पत नसणाऱ्या देशाला अर्थात् कर्ज मिळण्याचा संभव नसतो. मोठाले कारखाने काढण्यासाठीं खाजगी संस्थांनाहि या आंतरराष्ट्रीय पेढीकडून कर्ज मिळतें.

१९४८-४९ जूनअखेर या पेढीनें १९ कोटी १६ लक्ष डॉलरचें कर्ज सभासद राष्ट्रांना दिलेलें आहे. यांत हिंदुस्थानला आगगाड्यांच्या पुनर्घटनेसाठीं ३ कोटी ४० लक्ष डॉलर कर्ज

मिळालें. या पेढीच्या कारभारांत कांहीं काळ हिंदुस्थानचे माजी रिझर्व्ह बँकेचे गव्हर्नर सर चिंतामणराव देशमुख हे होते.

**पेण**—मुंबई इलाखा, कुलाबा जिल्हा, एक तालुका. यांतील नागोठणें पेट्यासह या तालुक्याचें क्षेत्रफळ २९३ चौ. मैल. लो. सं. ७०,३९७. गांवें २२६. हवा निरोगी असून पाऊस १२१ इंच पडतो. भात, वरी, नागली व मीठ हीं मुख्य पिकें होत. तालुक्याचें मुख्य ठिकाण पेण आहे. कोंकण रस्ता व बोरघाट यांच्या योगानें हा गांव मध्यवर्ती झाला आहे. पांच मैलावर धरमतर येथें खाडींतून मुंबईची बोट येते. धरमतर येथें खाडीवर पूल आहे. पेणला चाकू, कातऱ्या, वगैरे करण्याचाहि एक कारखाना आहे; व लांकडी शिल्प-काम चांगलें होतें. पेण येथें एक हायस्कूल आहे. लो. सं. पंधरा हजार.

**पेतँ, मार्शल हेन्री फिलिप** (१८५६-　　)—एक फ्रेंच सेनापति व मुत्सद्दी. १९१६ फेब्रुवारीमध्यें व्हर्डून किल्ल्या-समोर लढत असलेल्या सेनेचा तो कमांडर होता. आणि त्या शहराच्या संरक्षणाच्या कामीं त्यानें अतिशय शौर्य दाखवलें. व त्यामुळें पहिल्या महायुद्धांतील हा प्रसंग अत्यंत वीररसप्रधान बनला आहे. नंतर तो मध्य युरोपांतील दोस्ताच्या फौजेचा कमांडर झाला आणि १९१७ च्या मे महिन्यात उत्तर व ईशान्य युरोपांतील सैन्याचा तो कमांडर-इन-चीफ होता. १९१८ त मार्शल पदावर चढला. १९२०-३० मध्यें युद्ध-समितीचा उपाध्यक्ष. १९३४ सालीं ड्युमर्ग्यू मंत्रिमंडळांत युद्धमंत्री. दुसऱ्या महायुद्धांत लाव्हालसमवेत हिटलरशीं संगनमत करून याने फ्रान्सला शरणागति पत्करावयास लाविली. हिटलरनें त्याला फ्रेंच राज्याचा प्रमुख नेमलें. दोस्तांनीं फ्रान्स जिंकल्यावर पेतँवर राष्ट्रद्रोहाचा आरोप ठेवून खटला भरला. पण त्याच्या वयाकडे व राष्ट्रहित-कार्याकडे पाहून सोडून देण्यांत आलें.

**पेन, थॉमस** (१७३७-१८०९)— एक इंग्रज मुत्सद्दी व लेखक. हा केवलेश्वरवादी म्हणजे ईश्वराचें अस्तित्व मानणारा, परंतु धर्म हा ईश्वरप्रणीत आहे हें मत नाकबूल करणारा होता. १७७४ सालीं तो अमेरिकेंत गेला आणि तेथें त्यानें 'कॉमनसेन्स' या नांवाचा एक निबंध लिहिला आणि त्या निबंधांत अमेरिकन वसाहतींनीं ग्रेट ब्रिटनपासून विभक्त व्हावें, अशी शिफारस केली होती; त्यामुळें अमेरिकन स्वातंत्र्याचा तो एक आद्य संस्थापक मानला जातो. १८८७ सालीं पेन इंग्लंडांत परत आला आणि तेथें त्यानें एडमंड बर्ककृत 'रिफ्लेक्शन्स ऑन दि फ्रेंच रेव्होल्यूशन' (फ्रेंच राज्यक्रांतीवरचे विचार) या ग्रंथाला उत्तर म्हणून 'राइट्स ऑफ मॅन' (मानवी हक्क) हें पु.क लिहिलें. हें पुस्तक लिहिल्याबद्दल सरकारनें पेनवर ख.ला भरला; पण खटल्याचें काम चालू असतांना तो फ्रान्स-मध्यें पळून गेला. बायबल ग्रंथांतील 'रीव्हीलेशन' (प्रकटीकरण) विरुद्ध पेननें 'दि एज ऑफ रीझन' (बुद्धिवादाचें युग) हा ग्रंथ १७९४ सालीं लंडन आणि पॅरिस येथें प्रसिद्ध केला. पेन १८०२ पर्यंत फ्रान्समध्यें राहून नंतर अमेरिकेला परत गेला.

**पेन, विल्यम** (१६६४-१७१८)—एक इंग्रज क्वेकर. १६६८ सालीं त्यानें आपल्या धर्मपंथाचा प्रचार सुरू केला, आणि 'दि सॅन्डी फौन्डेशन शेकन' (वाळूचा पाया खचला) या नांवाचा धार्मिक निबंध लिहिला. या गुन्ह्याबद्दल त्याला लंडन टॉवर येथील तुरुंगांत टाकलें. तो कैदेंत सात महिने होता. तेथें त्यानें आपले अतिशय नांवाजलेले ग्रंथ लिहिले: (१) नो क्रॉस, (२) नो क्राउन, आणि (३) इनोसन्सी विथ हर ओपन फेस. त्याचा बाप ॲडमिरल सर विल्यम पेन याला सरकारकडून १६,००० पौंड मिळावयाचे होते. त्याचा वारसाहक्क या पेनकडे आला व त्या बाबतींत तडजोड करून सरकारनें पेनला नॉर्थ अमेरिकेंत पुष्कळ मोठी जमीन देणगी दिली. हल्लींच्या पेन्सिल्व्हानिया या संस्थानांत वसाहत स्थापून स्वतःच्या मतानुसार कायदे करण्याची परवानगी त्याला देण्यांत आली. लगेंच पेननें त्या प्रदेशामध्यें दोन वर्षें राहून, वसाहत स्थापून तिची उत्तम व्यवस्था लावून दिली. नंतर १६९९ मध्यें पुन्हां पेन त्या वसाहतींत कायम राहण्याच्या उद्देशानें गेला, पण १७०१ मध्यें इंग्लंडला परत येऊन तेथेंच अखेरपर्यंत राहिला.

**पेनांग**—प्रिन्स ऑफ वेल्स आयलंड. स्ट्रेटसेटलमेंट, एक बेट. क्षेत्रफळ १०८ चौ. मै. वस्ती चिनी व तामिळ लोकांची आहे. पेनांग हें एक उत्तम बंदर आहे. परंतु जवळच सिंगापूर असल्यामुळें याला महत्त्व नाहीं. केडाच्या सुलतानास १७८५ सालापासून दरसाल १०,००० डॉलर या बेटाबद्दल द्यावे लागतात. १८६७ मध्यें स्ट्रेटसेटलमेंट सरकारी वसाहत झाली व पेनांग त्यांत समाविष्ट केलें गेलें. राजधानी जॉर्ज टाउन. लो. सं. २,४७,४६० (त्यांत मलायी ४१,८५३, हिंदी ३१,९१५, व चिनी १,६६,९७४). १९४८ च्या फेब्रुवारींत पेनांग हें नऊ मलाया संस्थानें व मलाका मिळून बनलेल्या संघराज्यांत सामील झालें.

**पेनारं नदी**—दक्षिण हिंदुस्थानांतली एक नदी. ही म्हैसूर संस्थानांत कोलार जिल्ह्यांत उगम पावते व अनंतपूर, कडाप्पा आणि नेलोर जिल्ह्यांतून वाहत जाऊन नेलोर शहराजवळ खालच्या बाजूस समुद्रास मिळते. जयमंगली, चित्रावती व पापघ्नी ह्या म्हैसूरमधल्याच नद्या तिला मिळतात.

**पेनिसिलीन**—मूळचा हा एक परोपजीवी वनस्पतींचा वर्ग आहे. भाकरीवरील निळ्या रंगाची बुरशी ही याचीच एक जात होय. या बुरशीपासून एक फार प्रभावी औषध गेल्या महायुद्धांत

तेथें अथेनिअन लोकांच्या नव्या वसाहती करून नव्या जागा मिळवण्याचे धोरण त्यानें ठेवलें. मरणापूर्वी एक वर्ष त्याचे दोन्ही मुलगे प्लेगनें मेले.

**पेरिपॅटस**—हे एका विशिष्ट जातीचे संधिपाद कीटक वर्गांतील प्राणी आहेत. याचें शरीर मृदु असून टोळासारखें असतें व त्यांस सातपासून वीसपर्यंत पायांच्या जोड्या असतात. ते दगडाखालीं किंवा कुजक्या लांकडांत राहतात व त्यास कोणी त्रास दिल्यास ते तोंडाजवळील दोन स्तनासारख्या नळ्यांतून एक चिकट पदार्थ बाहेर टाकून आपलें रक्षण करतात. यांस पिलें होतात. हा एक श्वासोच्छ्वास करणारा स्वतंत्र प्राणिवर्ग आहे.

**पेरिम बेट**—१. बाबेल मांडेबच्या सामुद्रधुनींत अरबस्तान किनाऱ्यापासून सुमारें दीड मैलांवरचें एक बेट. क्षेत्रफळ अवघें पांच चौरस मैल. याची मालकी इंग्रजांकडे आहे. कारभार एडन-बरोबरच केला जात असून असिस्टंट रेसिडेंट हा येथें राहतो. १७९९ मध्यें ईस्ट इंडिया कंपनीनें हें घेतलें व त्यामुळें ईजिप्तमध्यें असलेलें फ्रेंच सैन्य हिंदुस्थानांत येऊं लागल्यास अडवण्याकरितां शिबंदी ठेवतां आली. नंतर कांहीं काळ याचा ताबा सोडला होता तो पुन्हां १८५७ सालीं घेतला. १८६१ मध्यें दीपगृह बांधलें. लो.सं. १,७००. येथें कोळशाची वखार व १,७०,००० गॅलन पाणी तयार करणारा कंडेन्सर आहे. बेटावर कोठेंहि जिवंत पाण्याचा मागमूस नसल्यानें ही सोय करावी लागली.

२. हिंदुस्थान, अहमदाबाद जिल्हा. खंबायतच्या आखातांत गोघ्राच्या दक्षिणेस ४॥ मैल आहे. पावसाळयात वस्ती नसते; एरवीं कोळी लोक राहतात. मोंगलाईत हें चांचे लोकांचें ठिकाण होतें. चांचे लोकांचा प्रमुख मोखरजी गोहेल रजपूत होता. मोंगलानीं त्याचा मोड केला. १८ व्या शतकांत सुरतचा एक व्यापारी मुल्ला महमद अल्ली यानें किल्ला बांधून वस्ती केली व छोटासा स्वतंत्र संस्थानिक बनला. पुढें त्याच्या लोकांनींच त्याला सोडलें. येथें जुने अवशेष बरेच सांपडतात.

**पेरु**—दक्षिण अमेरिकेंतलें एक संस्थान. क्षेत्रफळ ५,३२,००० चौरस मैल. लो. सं. ७०,२३,१११. मुलूख डोंगराळ आहे. खनिज संपत्तींत तांबें अग्रस्थानीं आहे. सोनें, रुपें, लोखंड, पेट्रोलिअम, कोळसा, इ. आणखी खनिजें आहेत. शेतीच्या उत्पादनांत कापूस, साखर व कॉफी हीं आहेत. लोंकर आणि कातडीं निर्यात होतात. या प्रदेशांत पूर्वी अनेक संस्कृती होऊन गेल्या असाव्यात. १६ व्या शतकांत पिझारोनें हा भाग जिंकला तेव्हां येथें इंका लोक राहत होते ते पुढें नामशेष झाले. १८२४ मध्यें हा देश स्वतंत्र लोकशाही बनला. या देशात नेहमीं राज्यक्रांत्या व बंडें होत असतात. दुसऱ्या महायुद्धांत पेरु दोस्तराष्ट्रांच्या बाजूला होता.

सॅनमार्कोस येथें १५५१ त स्थापलेलें विद्यापीठ आहे. राजधानी लिमा येथें आहे. संस्थानांत लष्करी शिक्षण सक्तीचें आहे.

**पेरुगिनो** (१४४६–१५२३)—एक इटालियन चित्रकार व अंब्रियन चित्रकला-पंथाचा प्रमुख. त्यानें प्रथम जीं जलरंगाचीं चित्रें काढलीं, तींहि उत्तम आहेत. नंतर त्यानें तैलचित्रें काढलीं; त्यांत त्याची विशिष्ट कलापद्धति दिसून येते. त्याचें सर्वांत उत्तम चित्र फ्लॉरेन्स येथील सेंट मेरी चर्चमध्यें 'क्रुसिफिकेशन' हें आहे. सुप्रसिद्ध चित्रकार रॅफेल हा याचा शिष्य होय.

**पेरू**—[ वर्ग मिटार्सी. जाति सिडियम ]. जांब असेंहि म्हणतात. बहुधा उष्ण प्रदेशांत सर्वत्र आढळणारें फळझाड. जाती दोन : पांढरा व तांबडा. पेरूला हवामान उष्ण व कोरडें मानवतें. जमीन कोणतीहि चालते. लागवड बीं लावूनच करतात. क्वचित् कलमें व जडवे बांधूनहि करतात. बार दोन येतात; क्वचित् तीन. छाटणी कोणी करीत नाहींत, पण केल्यास फळांत सुधारणा होते. पाणी बारमहा लागत नाहीं; फक्त बहरापुरतें लागतें. गांवांवरून पेरूच्या जातींचीं कांहीं नांवें आहेत; उदा., अलाहाबादी, मिर्झापुरी, हैद्राबादी ( सिंधी ), नाशिक, पुणें, इ.. पेरूची जेली ( मोरंबा ) चांगली होते. पेरूवर मावा रोग पडतो. भांगेची निशा उतरण्यास पेरू खाण्यास देतात किंवा त्याच्या पाल्याचा रस देतात.

**पेरें**—हाताच्या बोटांना होणारा एक रोग. यांत बोट सुजून पू होतो. सूज त्वचेच्या पापुद्र्याखालीं जास्त असल्यास याचें स्वरूप तीव्र असतें. यापेक्षां जास्त गंभीर स्वरूपाचें पेरें म्हणजे या व्रणांत अग्राचीं हाडें शिरून कुजतात. या वेळीं बोट कापण्याचीच पाळी येते. सौम्य प्रकारांत साध्या उपायांनीं रोग बरा होतो; पण तीव्र प्रकारांत गळूं पिकेपर्यंत वाट न पाहतां बोटास चीर पाडून पू काढून टाकणें चांगलें. नंतर जखमेंत जंतुघ्न औषधाचा बोळा घालून हात बांधून टाकतात.

**पेलिकन**—पाणकोंबड्याच्या वर्गांतील हा पक्षी आहे. हा कारमोरंट पक्ष्यासारखा असून उष्ण व त्याखालच्या प्रदेशांत सर्वत्र हा वास करतो. याच्या लांब पन्हळ असलेल्या चोंचीला एक मोठी पिशवी असते, तींत तो हवे तेव्हां खाण्यासाठीं मासे भरून ठेवतो. याचा पिसारा मुळींच नाजूक नसतो; शेपूट आंखूड व वाटोळें असतें.

**पेलिकन पक्षी**
( करवती चोंचीचा )

सामान्य प्रकारचा पेलिकन पांच फूट लांब असतो व आग्नेय युरोप, नैर्ऋत्य आशिया व ईशान्य आफ्रिका या भागांत आढळतो.

**पेलिको, सिल्व्हिओ** (१७८८-१८५४)—एक इटालियन कवि आणि देशभक्त. त्यानें दोन दुःखान्त नाटकें लिहिलीं तीं 'लोडामिआ' आणि 'फ्रॅन्सेस्का डा रिमिनी' हीं होत. या दोन नाटकांमुळें त्याला इटालियन विद्वानांत मानाचें स्थान मिळालें. १८२२ सालीं त्याला कार्बोनॅरिस्ट पंथाचा अनुयायी म्हणून कैदेंत टाकण्यांत आलें. त्या कैदेंत १० वर्षें भोगलेल्या दुःखांचें वर्णन त्यानें 'माझा तुरुंग' यांत केलें आहे व तें अत्यंत चित्तवेधक झालें आहे, आणि त्याचें भाषांतर अनेक भाषांत झालें आहे.

**पेशवे**—या फारसी शब्दाचा अर्थ मुख्य मंत्री, पंतप्रधान, असा आहे. यासारखाच मुसलमानी राज्यकर्त्यांचा 'वजीर' शब्द होता. मराठेशाहींतच 'पेशवे' हा शब्द रूढ झाला व त्याला विशेष महत्त्व १७१३ मध्यें भट घराण्याकडे पेशवाई आली तेव्हांपासून आलें. शहाजीनें शिवाजीस पुण्यास ठेवलें तेव्हां पेशवा म्हणून एक कारभारी नेमला होता. त्याच्यानंतर आणखी दोन पेशवे (शामराव राझेकर व नरहरि आनंदराव) झाले. नंतर मोरोपंत पिंगळे व त्याचा मुलगा भैरव हे पेशवे होते. भैरवास आंग्र्यांकडून सोडवून आणल्यामुळें १७१३ मध्यें बाळाजी विश्वनाथ भट यास पेशवाई मिळाली. ऐतिहासिक पेशवाईचा हाच प्रारंभ होय. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव बल्लाळ, बाळाजी बाजीराव, माधवराव बल्लाळ, नारायणराव बल्लाळ, रघुनाथ बाजीराव, माधवराव (सवाई) नारायणराव, चिमणाजी माधवराव व बाजीराव रघुनाथ येणेंप्रमाणें भट घराण्यांतले नऊ पुरुष पेशवे होते; व १७१३ ते १८१८ पर्यंत १०४ वर्षें पेशवाई एकाच घराण्यांत नांदली. कोल्हापूरच्या छत्रपतींचेहि पेशवे होते.

**पेशावर**—पाकिस्तान, वायव्य सरहद्द प्रांतातला सिंधु नदीच्या पश्चिमेकडील जिल्हा. क्षेत्रफळ १५४७ चौरस मैल. काबूल नदी यांतून वाहते. लोकसंख्या (१९४१) ८,५१,८३३. यांत पन्नास हजार हिंदू होते, पण १९४७च्या देशविभागणीनंतर हिंदूंची संख्या अगदींच घटली असली पाहिजे. मुख्य भाषा पंजाबी व पुश्तु आहे. येथें मुख्य धंदा शेती आहे. पुरुषपुर किंवा पिशाच-पुर याचा अपभ्रंश पेशावर असावा असें भाषाशास्त्रज्ञ मानतात. पेशावर शहर जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें आगगाडीनें १५५२ मैलांवरील कलकत्त्यास व १५७९ मैलांवरील मुंबईस जोडलें आहे. लोकसंख्या १,२०,९६७. ही प्रांताची राजधानी आहे. चिनी प्रवासी फाहिआन याच्या वेळेस पेशावर हें गांधार (कंदाहार) देशाची राजधानी होतें. पेशावर छावणी (लष्करी विभाग) शहरापासून दूर उंचवट्यावर वसवली आहे. खायबर घाटाच्या तोंडाशीं हें ठिकाण असल्यानें याला लष्करी महत्त्व आहे. १८४८ सालीं हें ब्रिटिशांकडे आलें. सरहद्दीवरील टोळ्यांची या बाजूस नेहमीं भीति असते. येथील किल्ला १५५२ त हुमायूननें दुरुस्त केला, व यावर सुभेदार नेमला. शहरास १६ वेशी आहेत. 'किस्ता कहानी' हा सर्वांत मोठा रस्ता काबूल वेशींतून जातो. मशिदी बऱ्याच आहेत. येथील वझीरबाग प्रसिद्ध आहे.

**पेशावरुन**—अफगाणिस्तानांत हें प्राचीन शहर आतां संशोधकांना आढळून आलें आहे. हिरातच्या दक्षिणेस २८० मैलांवर याचे अवशेष उपलब्ध झाले आहेत. याचा उल्लेख पूर्वी लोककथांतून येत असे, पण प्रत्यक्ष हें ठिकाण नुकतेंच मिळालें. या राजधानीच्या शहराचें क्षे. फ. सुमारें ३० चौ. मै. असावें व लो. सं. ५०,००० ते १,००,००० पावेतों तरी असावी. मशिदी, इमारती, पाण्याचे पाट, इ. वरून मुसलमानी अमदानींतीलच तीं असावींत असें दिसतें. भिंती दहापंधरा फूट जाडीच्या असून आंत खोल्या काढलेल्या आहेत. अफगाणी आख्यायिकांत अशी माहिती सांपडते कीं, शहरावर चालून येणाऱ्या शत्रूंनीं जेव्हां डोंगरांतून येणाऱ्या पाण्याचा मार्ग बंद केला तेव्हां शहर ओसाड पडलें. कांहीं अफगाणी संशोधक असेंहि मानतात कीं, पाणी तुटलें तेव्हां या शहरांतील लोक पर्वत-अरण्यें तुडवून ७०० मैल चालत गेले व तेथें त्यांनीं जें नवें शहर वसविलें तेंच हल्लींचें हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्द प्रांतांतील पेशावर शहर होय.

**पेशी**—(सेल्). जीवशास्त्रामध्यें, सूक्ष्मदर्शक यंत्रांतूनच केवळ दिसेल इतका सूक्ष्म असा अर्धद्रव द्रव्याचा एक मऊ गोलक असतो त्यास सूक्ष्म पिंडगोलक अथवा पेशी म्हणतात. ही वनस्पति आणि प्राणी यांच्या रचनेचें मूलमान (युनिट) असतें. यांतील द्रव्य (जीवरस-प्रोटोप्लॅझम) आकुंचनशील व विलबिलीत पाकासारखें असून त्याच्या केंद्रांत एक विशिष्ट रचना असते; तिचा आकार लहान वाटोळा असतो; तीस मध्य अथवा केंद्र (न्यूक्लस) असें म्हणतात. हा भाग इतर भागापेक्षां थोडा घन असतो, व त्याच्या अंतर्भागांत आणखी एक सूक्ष्म अतिकेंद्र (न्यूक्लिओलस) असतें. साध्या वनस्पति-प्राण्यांना एक पेशी तर इतर कांहींना अनेक पेशी असतात. पेशींचा आकार साधारणपणें गोल असतो; पण इतर पेशींचा दाब पडून पंच-पात्राकार, नक्षत्राकार, बहुकोणी, इ. आकार बनतात. मध्य-केंद्राभोंवतींचा जीवरस (प्रोटोप्लॅझम) हा अल्ब्युमिन द्रव्याचा असून त्यात महत्त्वाचे जीवनोपकारी गुण असतात. याच्यापासून पेशीच्या विविध अवयवरचना होतात. पुनर्जननाची क्रिया मध्यकेंद्रावर अवलंबून असते. पेशीशास्त्र पाहा.

**पेशीकृमि**—( एन्टोझोआ ). हा एक परोपजीवी प्राण्यांचा वर्ग आहे. हे कांहीं प्राण्यांच्या आंतड्यामध्यें तर कांहीं प्राण्यांच्या यकृत्, मेंदु, स्नायू किंवा इतर पेशी यांमध्यें आढळतात. यांची वाढ होत असतां हे निरनिराळ्या अवस्थांमधून जात असतात व प्रत्येक अवस्थेमध्यें शरीराच्या निरनिराळ्या भागात राहत असतात. किंवा निरनिराळ्या अवस्थेंत निरनिराळ्या प्राण्यांच्या शरीरांतहि यांची वाढ होत असते. उदा., नारूचा किडा हा आपल्या वाढीच्या एका अवस्थेमध्यें मेंढीच्या मेंदूत राहतो, व त्यामुळे ती मेंढी धडपड करते व त्यास त्या अवस्थेमध्यें सिस्टिक अथवा कोथळीचा किडा म्हणतात.

**पेशीशास्त्र**—( सायटॉलॉजी ). प्राण्यांच्या शरीरांतील आवश्यक असा जो भाग निरनिराळ्या सजीव गोलकांचा बनलेला असतो त्यास पेशी असें म्हणतात आणि त्यांच्या अभ्यासास पेशीशास्त्र असें म्हणण्यांत येतें. अगदीं सर्वांत खालच्या दर्जाच्या वनस्पती ( उदा., केवळ सूक्ष्मदर्शक यंत्रांतून दिसणारे अतिसूक्ष्म जंतू, बुरशी, वगैरे ), तसेंच अतिसूक्ष्म प्राणी ( प्रोटोझोआ ) हे एकपेशीमय असतात. इतर सर्व वनस्पती ( मेटॅफायटा ) व प्राणी (मेटॅझोआ) हे अनेक पेशीयुक्त असतात, व याप्रमाणें जसजशा वरच्या दर्जाच्या वनस्पतींचा अथवा प्राण्यांचा विचार करूं लागावें तसतशी त्यांत संकीर्ण अशी रचना व अनेक इंद्रियजन्य हालचाली व संकीर्ण पेशी आढळून येऊं लागतात. प्राण्याच्या शरीरांतील पेशी म्हणजे जीवनरसाच्या गोलकामध्यें स्वतंत्र झालेला एक अंश ( सायटोप्लॅझम् ) आणि एक स्वतंत्र असा कण किंवा केंद्र ( न्यूक्लस ) मिळून झालेला असतो. यांपैकीं जीवन रसमय गोलक ( सायटोप्लॅझम् ) हा फेंसासारख्या व जाळ्यासारख्या रचनेचा एक जीवनरसाचा अंश असतो. हा केंद्राच्या जवळच्या भागामध्यें गोलाकार असून त्यांत एक लहान शरीर ( सेंट्रोझोन ) निर्माण झालेलें असतें, व हें पेशींच्या विभजनामध्यें फार महत्त्वाची क्रिया घडवून आणतें. जीवनरसगोलकांत अजीवयुक्त कण ( मेटॅप्लॅझम ) असतात. ते पेशीरचनेच्या कामीं उपयोगांत येतात. किंवा निरुपयोगी म्हणून टाकून द्यावयाचे असतात. केंद्राच्याभोंवतीं एक अंतस्त्वचेसारखें आवरण असतें व त्यामध्यें एका पदार्थाची जाळ्यासारखी रचना असते ( लिनिन ). तीमध्यें दुसऱ्या द्रव्याचे असंख्य कण असतात ( क्रोमॅटिन् ). या कणांवर रंग टाकला असतां ते रंगीत बनतात. याशिवाय एक मोठा कण असतो ( न्यूक्लिओलस ). तो बहुधा राखीव द्रव्य म्हणून असावा. या केंद्राची विभागणी होऊन पुनरुत्पादन होतें. तें कांहीं वेळां प्रत्यक्ष विभजनक्रियेनें होत असतें. अशा वेळीं केंद्रकण लांबट होऊन त्याचे दोन- भाग होतात आणि प्रत्येक भागाभोंवतीं जीवनरस गुंडाळला जातो व दोन जीवपेशी तयार होतात. परंतु पुष्कळदां ही विभागणी अप्रत्यक्षरीत्या होत असते, व अशा वेळीं केंद्रामध्यें अनेक संकीर्ण अशीं रूपांतरें होत असतात. ( मिटोसिस पाहा ). वनस्पतीची पेशी ही सामान्यतः एका लवचिक अंतस्त्वचेसारख्या पदार्थांत ( सेल्व्हाल ) गुंडाळलेली असते. हें आवरण बहुधा काष्ठद्रव्य नांवाच्या एका पिष्ट सत्त्वासारख्या पदार्थाचें बनलेलें असतें. जीवनरसाचे कांहीं भाग निरनिराळ्या क्रियांसाठीं निरनिराळ्या लहान कणांमध्यें ( प्लॅस्टिड्स ) विभागले जातात. हिरव्या वनस्पतींमध्यें त्यांच्या शरीरातील हरित द्रव्य ( क्लोरोफिल् ) हे त्यांच्या हरित जीवनरसकणांमध्यें ( क्लोरोप्लॅस्टिड ) असते. पिष्ट सत्त्व हें अशाच दुसऱ्या कणामध्यें असते ( ॲमिलो प्लॅस्टिड्स ) व इतर पिवळा किंवा नारिंगी हे रंग तिसऱ्या प्रकारच्या कणांमध्यें ( क्रोमोप्लॅस्टिड्स ) असतात. अनेक वनस्पतिपेशींमध्यें राखीव द्रव्य असतें. ते पिष्ट सत्त्वकण ( स्टार्च ), ओजस् द्रव्यकण ( प्रोटीन किंवा ॲलिरोन ), शर्करा आणि इम्यूलिन्, इत्यादि होत. याखेरीज कांहीं निरुपयोगी क्षारासारखीं द्रव्यें असतात. वनस्पतींच्या शरीरामध्यें निरनिराळ्या जागीं पेशीरसाचा पुष्कळ सांठा असतो. अशीं केंद्रें वरच्या दर्जाच्या वनस्पतींत नसतात.

**पेशीसंघ प्राणी**—( पॉलिझोआ ). हा एक अपृष्ठवंश प्राण्यांचा वर्ग असून यांस समुद्रशेवाळ किंवा समुद्रचटई असें म्हणण्यांत येतें. हे प्राणी बहुधा संयुक्त रचनायुक्त असतात. त्यांचे शरीर अनेक पेशींचे अथवा पेशीसंघांचें बनलेलें असतें. प्रत्येक प्राणी एका स्वतंत्र पेशीमध्यें राहतो व त्याचें शरीर एका दुहेरी आस्तरणाच्या पिशवीमध्यें गुंडाळलेलें असतें. तिचा वरील थर चुन्यासारखा घट्ट असून आंतील थर अंतस्त्वचेसारखा नाजूक असतो. प्रत्येक पेशीचें वरचें तोंड उघडें असून त्याच्याभोंवतीं लवयुक्त तंतूंचे एक वर्तुळ असतें व त्याच्या साहाय्यानें हे जीव श्वासोच्छ्वास करितात. याच्या तोंडावर कधीं कधीं एक पडद्यासारखा अवयव असतो. या जातीचे सर्व प्राणी उभयलिंगी असतात. कांहीं प्राण्यांमध्यें अंडकोश असतात व त्यांतून अनेक गर्भ बाहेर पडून त्यांचे स्वतंत्र प्राणी तयार होतात. यांची पुनरुत्पादनक्रिया सतत चालू असते. यांचे दोन वर्ग करण्यात येतात. त्यांस बहिर्द्वारक व अंतर्द्वारक असें म्हणतात. हे प्राणी पाण्यांत राहत असून

सर्व ठिकाणीं समुद्रामध्यें आढळतात. परंतु गोड्या पाण्यामध्यें मात्र उत्तरेकडील समशीतोष्ण कटिबंधात आढळतात.

**पेस्टालोझी, योहान हीनरिक** (१७४६–१८२७)— एक स्विस शिक्षणशास्त्रज्ञ व सुधारणावादी. याचा आरंभींचा कांहीं काळ राजकारणांत व नंतरचा शिक्षणाच्या कार्यांत गेला. यानें कांहीं पुस्तकेंहि लिहिलीं आहेत. यानें नेपालियनसमोर आपली राष्ट्रीय शिक्षणाची योजना ठेवली होती, पण ती त्यास पसंत पडली नाहीं. शिक्षणकार्याला त्यानें वाहून घेतलें होतें. व शेवटपर्यंत एक स्वतःची शाळा चालवली होती. अवलोकनानें विषयग्रहण होतें या तत्त्वावर त्याची शिक्षणपद्धति आधारली होती. 'गरट्रुड आपल्या मुलांना कसें शिकविते' या त्याच्या पुस्तकांत याबद्दल प्रचीति सांपडेल.

**पैज**—अमुक गोष्ट घडली किंवा घडली नाहीं तर अमुक पैसा किंवा वस्तु देईन असा जो करार करतात, त्याला पैज म्हणतात. अशी पैज मारणाराचा त्या गोष्टींत दुसरा कांहीं हेतु नसतो. स्वतः पत्ते, सोंगट्या, वगैरे खेळ खेळतांना पैज लावणें, हा प्रकार द्यूत किंवा जुगार (पाहा) केवळ पैजेहून निराळा आहे. कारण त्यांत खेळणारा व पैज लावणारा तोच इसम असतो. असले करार कायद्यानें बेकायदा ठरवले आहेत. १८९२ च्या इंग्लंडांतील 'गेमिंग ॲक्टा'नें या प्रकारें झालेलें कर्ज कोर्टांत दावा लावून वसूल करतां येणार नाहीं असें ठरवलें आहे. असे खेळ खेळणें गुन्हा नाहीं, पण जाहीर रीतीनें जुगारीचा अड्डा किंवा धंदा एखाद्या घरीं चालवणें, हा गुन्हा आहे. व त्याबद्दल १८७४ चा 'बेटिंग ॲक्ट' व १८९२ चा 'बेटिंग ॲंड लोन्स ॲक्ट' हे कायदे आहेत. शिवाय १९२६च्या 'फायनान्स ॲक्ट'नें जुगारीवर जकातकर (एक्साइज ड्यूटी) बसवला आहे. या प्रतिबंधक कायद्यांत घोड्यांच्या शर्यती (हॉर्स रेसिंग) हा अपवाद असून हा धंदा सर्वत्र कायदेशीर मानला आहे. या शर्यतींत पैज लावणारांचे दोन प्रकार असतातः (१) एका विशिष्ट घोड्यासंबंधीं पैज लावणारे, आणि (२) सर्व घोड्यांसंबंधीं किंवा कांहीं घोड्यांसंबंधीं पैज लावणारे (बुक-मेकर्स किंवा प्रोफेशनल बेटर्स). हे दुसऱ्या प्रकारचे पैज लावणारे प्रत्येक घोड्याचें एकेक एकाच दराचें तिकिट घेतात. त्यामुळें कोणताहि घोडा पहिला आला तरी या इसमाला बक्षीस मिळतें.

हिंदुस्थानांत 'जुगार-प्रतिबंधक कायदा' मुंबई सरकारनें १८८७ सालीं मंजूर केला. 'जुगार खेळणें' याचा अर्थ कोणत्याहि प्रकारची पैज लावून तिच्यावर पैसा लावणें म्हणजे कांहीं ठरीव रक्कम जिंकणें किंवा हरणें (कलम ३). जाहीर जुगारगृह उघडणें, किंवा जुगारगृह म्हणून वापरण्यास आपली जागा, घर, खोली देणें, जुगारगृह चालवण्यास मदत करणें, किंवा जुगार खेळणारांना पैसा देणें, हे गुन्हे असून गुन्हेगाराला ५०० रुपयांपर्यंत दंड किंवा तीन महिने कैद ही शिक्षा आहे. (कलम ४). जुगार खेळणाराला २०० रु. दंड किंवा एक महिना कैदेची शिक्षा आहे.

याला अपवाद (कलम १३) हा आहे कीं, हस्तकौशल्याचा, किंवा शारीरिक कौशल्याचा, किंवा बुद्धिकौशल्याचा खेळ खेळून त्या कौशल्याचें बक्षीस किंवा पैसे मिळविणें जुगार नाहीं. एखादा खेळ कौशल्याचा आहे किंवा नाहीं, हें कोर्टानें ठरवायाचें असतें. दुसरा अपवाद हा कीं, 'बॉंबे रेस कोर्स लायसेन्सिंग ॲक्ट' (मुंबई सरकारचा १९१२ सालचा कायदा) या कायद्यानें घोड्याच्या शर्यतीच्या निकालावर रेसकोर्सच्या आवारांत व रेसेसच्या दिवशीं पैसे लावून जें बेटिंग (पैज) करण्यांत येईल तो गुन्हा नाहीं.

**पैठण**—हैद्राबाद संस्थानांतील औरंगाबाद जिल्ह्यांतला एक तालुका. क्षे. फ. ६०८ चौ. मैल. मोठा गांव पैठण, खेडीं १६७ व जहागिरी १२. दक्षिण सरहद्दीवरून गोदावरी वाहते. तालुक्याची जमीन काळी कापसाची आहे.

गांव—गोदावरीच्या उत्तर तीरावर हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. पूर्वकालचें हें प्रतिष्ठान असून महानुभावी धर्माची स्थापना येथेंच झाली. प्रतिष्ठान हें फार जुनें शहर असून व्यापाराविषयीं प्रसिद्ध असे. तसेंच विद्येचेंहि हें माहेरघर होतें. ही शालिवाहन राजाची कर्मभूमि समजतात. त्यानें ज्या मातीच्या सैनिकांच्या मदतीनें विक्रमाचा पराभव केला ते सैनिक नंतर ज्या विहिरींत टाकून दिले ती शालिवाहनाची विहीर दाखविण्यांत येते. पैठणमाहात्म्याचीं पुराणें झालीं आहेत. प्राचीन महाराष्ट्राचें हें एक दक्षिणेंतील सांस्कृतिक केंद्र होतें. पुढील काळांत एकनाथामुळें ह्या नगराला महत्त्व प्राप्त झालें. एकनाथाचें घर व समाधि येथें आहे. फाल्गुन व॥ ६ स (नाथषष्ठीस) मोठी यात्रा भरते. प्राचीन अवशेषांचें संशोधन करण्यासाठीं निजाम सरकारनें येथें उत्खनन सुरू केलें होतें. अद्यापि येथें व्यापार बराच चालतो. रेशमी व सुती लुगडीं होतात.

**पैनगंगा**—वऱ्हाडांत बुलढाणा जिल्ह्याच्या पश्चिम सरहद्दीवर चिखली तालुक्यांत गोवनखेडाजवळ ही नदी उगम पावते व वऱ्हाडच्या दक्षिण सरहद्दीनें वाहत जाऊन वऱ्हाडच्या पूर्व सरहद्दीवर यवतमाळ जिल्ह्यांतील वणी तालुक्यांत जोजद येथें वर्धा नदीला मिळते. या संगमापासून पुढें हीस प्राणहिता म्हणतात. या नदीची लांबी उगमापासून संगम होईपावेतों २०० मैल आहे. देऊळघाट, मेहकर, उमरखेड, वगैरे गांवें हिच्या कांठीं आहेत.

**पैनघाट**—मेळघाट व बाळाघाट यांच्यामधील काळ्या गाळवट जमिनाचा सुपीक प्रदेश. पूर्णा नदीनें जमीन गाळवटली आहे. इमादशाहींत हा एक सुभा होता. आज या घाटांत बारा तालुके मोडतात.

**पो**—इटलींतील सर्वांत मोठी नदी. आल्पूसमधील मॉंट व्हिसो येथून उगम पावून ॲड्रियाटिक समुद्रास मिळते. लांबी सु. ४५० मैल. हिला बऱ्याच नद्या मिळतात. रोमनपूर्वकालीं व नंतरहि बांध घालून काल्व्यांनीं शेतीकरतां पाणी खेळवलेलें आहे. हे दोन्ही बाजूंचे बांध ६०० मैलांचे आहेत. ३१७ मैलांपावेतों आंत जहाजें येऊं शकतात. मुखाजवळ गाळानें बेंचकें (डेल्टा) वाढत आहे.

**पो, एडगर ॲलन** (१८०९–१८४९)—एक अमेरिकन कवि व अद्‌भुतकथालेखक. १८३३ सालीं त्याचा वाङ्मयक्षेत्रांत प्रवेश झाला; व 'बाल्टिमोर सॅटरडे व्हिजिटर' या टोपण नांवानें गोष्टीसाठीं लावलेलें बक्षीस त्यानें मिळवलें. नंतर तो 'सदर्न लिटररी मेसेंजर', 'न्यू यॉर्क रिव्ह्यू', 'जंटलमन्स मॅगेझिन' व 'ग्राहॅम्स् मॅगेझिन' या नियतकालिकांचा लेखक व संपादक झाला. या नियतकालिकांकरितां त्यानें पुष्कळ लघुकथा लिहिल्या. पुढें 'दि होम जर्नल' व 'दि ब्रॉडवे जर्नल' यांतहि गद्यपद्य लेख लिहिले. त्याच्या कवितांमध्यें 'दि रॅव्हन', 'दि बेल्स', ॲनाबेल ली', 'टु ॲनी', वगैरे कविता चांगल्या आहेत. त्याच्या सुप्रसिद्ध लघुकथा आहेत त्या 'दि गोल्ड बग', 'दि फॉल ऑफ दि हाउस ऑफ उशर', 'दि मर्डर्स इन् दि र्‍यु मोर्ग्यु', व 'दि डिसेंट इन्टु दि मेलस्ट्रॉम', इ. होत.

**पोकर**—हा एक ५२ पानी पत्त्यांचा खेळ आहे, व त्यांत जोकर घेतला जातो. ह्या खेळांत पत्त्यांच्या अनुक्रमाप्रमाणें कोण जिंकतो तें ठरविण्यांत येतें. हा खेळ कोठें सुरू झाला हें निश्चित माहीत नाहीं, तथापि हा अमेरिकेमध्यें विशेष खेळण्यांत येतो. हा दोन ते सहा गड्यांमध्यें खेळतात. प्रत्येकास पांच पानें देण्यांत येतात. यांतील जिंकण्याचा क्रम खालून वर पुढें दिल्याप्रमाणें असतो: १ एक जोडी, २ एका जातीचे तीन पत्ते, ३ निरनिराळ्या रंगांचे पण एका क्रमानें पांच पत्ते, ४ एकाच रंगाचीं पांच पानें, ५ एका जातीचीं तीन पानें व एक जोडी, ६ एका जातीचीं चार पानें, ७ एकाच रंगाचीं क्रमानें पांच पानें, व ८ जोकर मिळून एकाच जातीचीं पांच पानें.

**पोकरण**—राजपुताना, जोधपूर, संक्र जिल्ह्यांतील एक जहागीर. जोधपूर शहरापासून ८५ मैलांवर आहे. लोकसंख्या ८,०००. येथील किल्ला लहान पण मजबूत आहे. पोकरण जहागिरींत १०० गांवें असून उत्पन्न सु. दोन-तीन लक्ष रुपये आहे. जहागिरीचे मालक राठोड ठाकूर आहेत. जोधपूरचे महाराज हत्तीच्या अंबारींत बसले असतां खवासखान्यात बसण्याचा मान पोकरणचे ठाकूर यांचा आहे.

**पोकळा**—ही माठ, तांदुळजा या वर्गांतील (लॅ. ॲमॅरॅन्थस) एक पालेभाजी आहे. याचा देंठ तांबूस असतो. किंचित् आंबटपणा लागतो. रोप सुमारें हातभर वाढतें. भाजलेल्या जखमेवर पाल्याचा रस जमिनीवर घासून त्याचा लेप करावा.

**पोंग**—ब्रह्मदेशांतील एक जुनें राज्य. इ. स. आठव्या शतकाच्या अखेरीस सुकफ राजा राज्य करीत होता व राज्याचा विस्तार बराच होता. पोंग, आव्हा, चीन व ब्रह्मदेश यांच्या एकमेकांवर स्वाऱ्या होत. एक वेळ पोंग आव्हाचें आणि आव्हा ब्रह्मदेशचें मांडलिक होतें. पोंग स्वतंत्र होण्याचा प्रयत्न ब्रह्मदेशचा राजा अलोंद्रा यानें मोडून तें राज्यच नष्ट केलें.

**पोंगल**—मद्रास प्रांतांत हा संक्रांतीचा सण आहे. या दिवशीं बोळक्यांत दूध घालून तें विस्तवावर ठेवतात व कोणत्या बाजूला दूध उतू जातें हें पाहून त्यावरून वर्षभविष्य काढतात. आपल्याकडे रथसप्तमीला असेंच करतात. पोंगल सणांत गुरांना शृंगारतात.

**पोटगी**—इंग्लंडच्या कायद्यांत कोर्टांत एखादा विवाहविषयक दावा (मॅट्रिमोनियल सूट) चालू असतांना त्या दाव्यांतील पत्नीला पतीकडून पोटगीची जी रक्कम मिळते, तिला 'ॲलिमनी' म्हणतात. तसेंच पत्नीला पतीपासून विभक्त राहण्याची परवानगी कोर्टानें दिल्यास (लीगल सेपरेशन) त्या वेळीं पतीकडून पत्नीला पोटगी मिळते. मात्र पत्नीनें व्यभिचाराचें किंवा तिऱ्हाइताबरोबर पळून जाण्याचें कृत्य (इलोपमेंट) केलेलें असतां कामा नये. ही पोटगी तात्पुरती किंवा कायमची असते. असला दावा चालू असेपर्यंत तात्पुरती पोटगी मिळते, आणि कोर्टानें विभक्त राहण्याचा हुकूम दिल्यानंतर कायमची पोटगी मिळते.

हिंदुस्थान— पारशी 'मॅरेज ॲंड डायव्होर्स ॲक्ट'मध्यें पत्नीला वरीलप्रमाणें तात्पुरती व कायमची पोटगी मिळण्याची, तसेंच मुलांनाहि पोटगी मिळण्याची तरतूद आहे (कलमें ३३।३४।४४). ख्रिस्ती समाजाच्या 'इंडियन डायव्होर्स ॲक्ट' मध्यें अशीच तजवीज आहे (कलमें ३६।३७।४१।४२।४३). नुकताच 'हिंदु डायव्होर्स ॲक्ट' मंजूर झाला आहे, त्यांत अशा अन्नवस्त्राची तजवीज आहे.

**पोट फाडणें**—(सीझेरियन ऑपरेशन). उदर व गर्भाशय यांवर शस्त्रक्रिया करून गर्भाशयांतून प्रसूतीशिवाय जिवंत मूल बाहेर काढण्याची ही शस्त्रक्रिया आहे. जेव्हां स्वाभाविकपणें प्रसूति होण्याइतकें मातेचें कटिर रुंद नसेल तेव्हां अशा तऱ्हेची शस्त्रक्रिया करावी लागते. तसेंच इतर अन्य कारणांनीं प्रसूति

होणें कठिण असल्यास ही शस्त्रक्रिया करतात. ज्यूलियस सीझर याचा जन्म अशा तऱ्हेची शस्त्रक्रिया करून झाला होता म्हणून या क्रियेस त्याचें नांव देण्यांत येतें.

**पोटशूळ**—(कोलिक). उदरामधील पोकळींतील कोणत्याहि नलिकेवरील आवरणात्मक जे स्नायू असतात त्यांचें जोरानें आकुंचन झालें असतां पोटामध्यें मधून मधून ज्या कळा येतात त्यांस म्हणतात. याचे अनेक प्रकार आहेत. उदाहरणार्थ, पित्तजन्य पोटशूळ– यामध्यें पित्तनलिकेमध्यें एखादा खडा जमतो. गुदपोटशूळ– यामध्यें गुदनलिकेमध्यें अवष्टंभ होतो. शिशाचा पोटशूळ– हा शिशाचा विपार घडला असतांना उत्पन्न होतो. गर्भाशयपोटशूळ– हा गर्भनलिकेचा संकोच झाला असतांना उत्पन्न होतो.

**पोन्न**—हा कानडी जैन कवि इंद्रनंदीचा शिष्य होता. शांतिपुराण व जिनाक्षरमाले हे याचे दोन ग्रंथ होत. तसेंच 'रामकथा' किंवा 'भुवनैकरामाभ्युदय' या नांवाचा चौदा आश्वासांचा आणखी एक ग्रंथ यानें लिहिला असावा, असें शांतिपुराणांतील उल्लेखांवरून वाटतें. सवण पोन्न, पोनिंग, कुरुळ-गळ सवण, पोन्नमय्य या नांवांनींहि यास ओळखतात. याचा आश्रयदाता कृष्णराज राष्ट्रकूट यानें यास उभयचक्रवर्ती अशी पदवी देऊन याचा गौरव केला होता.

**पोप**—रोमन कॅथॉलिक संप्रदायाचा प्रमुख. या शब्दाचा मूळ अर्थ पिता असा आहे. ही पदवी प्रथम सर्व बिशपांस लावीत असत, पण १०७३ सालीं ती फक्त रोम येथील बिशपास लावूं लागले. पोपचा मृत्यु झाला म्हणजे नवीन पोपची निवडणूक कॉर्डिनलांची सभा करते. यास धर्ममताच्या बाबतींत पूर्ण अधिकार असतात व तो जेव्हां धार्मिक बाबींबद्दल भाषण करतो तेव्हां तो प्रमादरहित असतो, असें १८७० मध्यें व्हॅटिकनमधील सभेंत ठरलें. याच वर्षी पोपच्या अधिकारांत असलेल्या राज्याचा अन्तर्भाव इटलीच्या राज्यामध्यें करण्यांत आला. १९२९ मध्यें इटलीनें याची धार्मिक सत्ता मान्य केल्यानंतर व्हॅटिकन संस्थानचा ताबा त्याच्याकडे पुन्हां सुपूर्त करण्यांत आला. हल्लींचा पोप १२ वा पायस (पाइस) आहे.

**पोप, अलेक्झांडर** (१६८८–१७४४)—एक सुप्रसिद्ध इंग्रज कवि. याला लहानपणापासून कविता करण्याचा नाद असे. १७०९ ते १७३९ च्या दरम्यान त्याची सर्व कविता प्रसिद्ध झाली. उच्च कल्पना, प्रतिभा, तात्त्विक विचार, वगैरे त्याच्या काव्यांत आढळत नाहींत, परंतु उत्कृष्ट सुरस भाषा, व्यावहारिक दाखले, पुष्कळ अर्थ व्यक्त करणारे लहान व थोडे शब्द, यांनीं त्याची कविता शृंगारलेली आहे. 'एसे ऑन क्रिटिसिझम्' (टीका निबंध) हा ग्रंथ उत्कृष्ट लिहिला असून त्यांत त्याची काव्यप्रगल्भता पाहून आश्चर्य वाटतें. 'दि रेप ऑफ दि लॉक' हें ब्वालोच्या 'ल्युत्रिन'चा नमुना पुढें ठेवून लिहिलें आहे. यांतील व्याजवीर (मॉक-हीरॉइक) काव्य फार मजेदार आहे. पोपची महत्त्वाची वाङ्मयसेवा म्हणजे होमरच्या ईलियडचें भाषांतर होय.

**पोपट**—एक माणसाळलेला पक्षी. या अर्थी शुक हा शब्द ऋग्वेदामध्यें आहे व त्यांत अशी इच्छा प्रकट केलेली आहे कीं, काविळीचा पिवळेपणा हा शुक व रोपणाका यांच्याकडे जावा. यजुर्वेद संहितेमध्यें अश्वमेधाच्या वेळीं बळी दिल्या जाणाऱ्यांच्या यादींत या पक्षाचें नांव आलेलें आहे. हा पीतवर्ण असतो व त्याला मनुष्यासारखी वाणी असते असें वर्णन तैत्तिरीय व मैत्रायणी संहितेंत आलेलें आहे, असें कांहीं पाश्चात्य पंडितांचें मत आहे.

नेहमीं पाहण्यांत येणाऱ्या पोपटाचा रंग हिरवा असतो. चोंच वांकडी व तांबडी असते. हनुवटीस काळा पट्टा असतो. नराच्या गळ्याला काळी रेघ असते; तिला 'कंठ' म्हणतात. यांच्या पायांची व बोटांची रचना फांदीला घट्ट धरून बसतां येईल अशी केलेली असते. पोपट बहुधा फळें खातात. हे कळप करून राहतात. यांना संवयीनें बोलतां येत असल्यानें व दिसण्यांत सुरेख असल्यानें यांना लोक बाळगतात.

हा पक्षी सर्वांच्या परिचयाचा आहे. पोपट मनुष्यासारखें बोलूं शकतात. कांहीं पोपट नव्वद वर्षेंपर्यंत जगल्याचीं उदाहरणें आहेत. या पोपटवर्गांतच पाराकीट, मकाव, लोरीकीट, काकाटू, वगैरे पक्षी येतात. उष्ण कटिबंधांत आढळणारे पोपट जरा आकारानें मोठे असून त्यांची चोंच बांकदार असते आणि शेपटी आंखूड असते. पश्चिम आफ्रिकेमध्यें एक करड्या रंगाचा पोपट आढळतो त्यास फार सुलभतेनें बोलावयास शिकवितां येतें. घुबडासारखे पोपट न्यूझीलंड व दक्षिण पॅसिफिक बेटें यांतून आढळतात. यांच्या कांहीं नैसर्गिक संवयी घुबडासारख्या आहेत.

**पोपटराम प्रभुराम** (१८६५–१९४४)—हे मुंबईच्या पोपट प्रभुराम आयुर्वेद महाविद्यालयाचे संस्थापक, नामवंत डॉक्टर व समाजसेवक होते. पोरबंदर (सुदामपुरी) हें यांचें जन्मस्थान होय. प्रभुराम जीवनराय या आपल्या वडिलांजवळच यांनीं आयुर्वेदाचें शिक्षण घेतलें व त्यानंतर १८९३ सालीं मुंबई विश्वविद्यालयाची एल्. एम्. ॲण्ड एस्. ही डॉक्टरची परीक्षा दिली. यानंतर पोरबंदरचे आरोग्याधिकारी म्हणून नेमणूक झाली असतां यांनीं तेथें आयुर्वेद पद्धतीवर उपचार करणाऱ्या एका रुग्णालयाची स्थापना केली. सन १८९५ मध्यें

हें मुंबईस आले व तेथें 'प्रभुराम अनंत औषधालय' हा आयुर्वेदीय औषधें बनविणारा कारखाना व आयुर्वेदाचें शिक्षण देणारें 'आयुर्वेद विद्यालय' यांची स्थापना केली. पुढें याच आयुर्वेद विद्यालयाचें 'दि प्रभुराम आयुर्वेदिक कॉलेज'मध्यें रूपांतर करण्यांत आलें. या कॉलेजमध्यें शस्त्रवैद्यक, नेत्रवैद्यक व सूतिकारोग इत्यादींचें शिक्षण देण्याची सोय करण्यांत आली आहे. १८९६ सालीं मुंबईंत प्लेग सुरू असतां यांनीं लोकांची जी सेवा केली त्याबद्दल सरकारनें यांना जे. पी. ही पदवी व ऑनररी मॅजिस्ट्रेटचा हुद्दा दिला होता.

**पोफळ**—सुपारी पाहा.

**पोरबंदर संस्थान**—मुंबई प्रांत, काठेवाड द्वीपकल्पांतील एक संस्थान. क्षे. फ. ६४२ चौ. मैल. येथील संस्थानिक जेठवा रजपूत आहेत. इ. स. ९००पासून हें स्वतंत्र आहे. १७०५ सालीं पोरबंदर ही राजधानी झाली. येथील हवा चांगली. पर्जन्यमान २५–३० इंच. लो. सं. (१९४१) १,४६,६४८. खेडीं ९६. जमीन उत्तम काळी. पीक ज्वारी, बाजरी, कापूस, गहूं. संस्थानचें उत्पन्न ४० लाख. संस्थानांत उत्तम चुन्याचा दगड निघतो. तो 'पोरबंदरी' म्हणून प्रसिद्ध आहे. समुद्रकांठीं नारळ होतात. खजूर, लांकूड, कोळसा, साखर, तेलें, यंत्रें, वगैरे माल बाहेरून येतो व मीठ, सीमेंट, तूप, शाडू व दगड बाहेर रवाना होतो. संस्थानांत कांहीं कापड, तेल, आगकाड्या, सीमेंट इ. चे कारखाने आहेत. हल्लींचे महाराज नटवरसिंग बहादुर हे १९०८ सालीं गादीवर आले. आतां हें संस्थान सौराष्ट्रसंघांत सामील झालें आहे. राजधानी पोरबंदर असून हें अरबी समुद्रावरचें महत्त्वाचें बंदर आहे. मुंबई व कराची यांमध्यें हें असून मोठ्याहि बोटी थांबतात. येथून व्यापारी आफ्रिकेला जातात. येथून दिल्ली, अहमदाबाद, मुंबई, वगैरे ठिकाणीं आगगाडीचे फांटे गेलेले आहेत.

**पोरस**—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरच्या पौरव (पुरुकुळांतील) राजांना दिलेलें हें ग्रीक नाव आहे. तथापि एका विशिष्ट पौरव राजालाच हें नाव लाविलें जातें. मध्य पंजाबचा हा शूर व स्वाभिमानी राजा होता. अलेक्झांडरनें हिंदुस्थानवर स्वारी केली असतां (ख्रि. पू. ३२६) तक्षशिलेचा राजा आरंभीं व इतर राजे त्यानंतर त्याच्या स्वाधीन झाले. सिकंदरनें यासहि नजराणा घेऊन आपल्यापुढें हजर होण्याचा हुकूम पाठवला असतां यानें त्यास 'आपण सैन्य घेऊन येतों' असें कळवलें व झेलमच्या किनाऱ्यावर सिकंदरला तोंड देण्याची तयारी ठेवली. तेव्हां सिकंदरनें एका अंधाऱ्या रात्रीं छावणीपासून सोळा मैलावर झेलम उतरून याच्या गैरसावध असलेल्या सैन्यावर अचानक हल्ला चढवला. त्यामुळें पोरसचें बरेंच सैन्य ठार झालें व शेवटीं पोरस सिकंदरच्या हातीं सांपडला. यास सिकंदरपुढें कैदी म्हणून उभें करण्यांत आलें असता सिकंदरनें यास विचारलें, 'तुझ्याशीं आम्हीं कसें वागावें?' तेव्हां तितक्याच निर्भयपणें यानें उत्तर दिलें, 'राजे राजांशीं वागतात त्याप्रमाणें!' याचा निर्भयपणा व लढाईंतील याचें शौर्य जाणून सिकंदरनें यास आपला मित्र केलें व हिंदुस्थानांतून परत जातांना व्यास नदीपासून झेलम नदीपर्यंतच्या प्रदेशाचा यास क्षत्रप नेमलें. या लोकप्रिय राजाचा पुढें खून झाला.

**पोर्ट ऑर्थर**—मांचूरियांतील एक बंदर व किल्ला. रूसो-जपानी युद्धांत जमिनीवरून व दर्यावरून मारा करून जपाननें रशियापासून हा किल्ला सर केला. हा मूळ चीनचा. हा चीनमधील लायाओ-तुंग द्वीपकल्पाच्या दक्षिण टोंकास आहे. लायाओ-तुंगचें आखात, कोरियाचा उपसागर व पेचिलीचें आखात या तिन्हींवर याची दृष्टि पोंचते. चीनपासून जपाननें १८९४ मध्यें सर केला व १८९८ मध्यें रशियाला कांहीं करारानें दिला. १९०५ मध्यें वर दिल्याप्रमाणें रशियापासून पुनः परत जपानकडे आला. लोकसंख्या १,३५,०००.

**पोर्ट ब्लेअर**—बंगालच्या उपसागरांतील अंदमान बेटांतील काळ्यापाण्यावर पाठवलेल्या कैद्यांची जुनी वसाहत. क्षेत्रफळ ४७३ चौ. मै., पैकीं १४६ चौ. मै. चा प्रदेश निव्वळ जंगल. ३२७ चौ. मै. मध्यें वसाहत आहे. बहुतेक भाग डोंगराळ. त्यामुळें रस्ते चांगले नाहींत. मुख्य पहाड १५०० फूट उंच आहे. पोर्टब्लेअर हें मुख्य ठिकाण व बंदर आहे. कलकत्ता व मद्रास येथून या ठिकाणीं बोटी येतात. आतां येथें निर्वासितांची वसाहत करण्याचा भारत सरकारचा प्रयत्न आहे. अंदमान पाहा.

**पोर्टलंड**—१. अमेरिकन संयुक्त संस्थानें, ऑरेगॉन संस्थानांतील एक शहर व बंदर. हें विलॅमिट नदीच्या डाव्या तीरावर आहे. येथें प्रॉटेस्टंट व एपिस्कोपल देवालयें, कोलंबिया विद्यापीठ (रोमन कॅथॉलिक), ऑरेगॉन विद्यापीठ व एक लष्करी ॲकेडमी आहे. बंदर फार मोठें असून ३० फूट खोलीच्या बोटी येथें येऊं शकतात. धान्यें, गुरें, इमारती लांकूड आणि फळफळावळ हा माल परदेशीं पाठवला जातो. लो. सं. ३,०५,३९४ आहे.

२. अमे. संयुक्त संस्थानें, मेन संस्थानांतील एक बंदरी शहर. येथें आगगाड्या, मोटारी, इ. वाहनें तयार होतात. कांचकाम, कुंभारकाम, दोरकाम, इ. चे मोठे कारखाने आहेत. बंदरांत मोठाल्या बोटी येऊं शकतात. लो. सं. ७३,६४३.

३. इंग्लिश चॅनेलमध्यें साउदॅम्टनच्या नैर्ऋत्येस ५० मैलांवर हें द्वीपकल्प (किंवा जुनें बेट) आहे. या ठिकाणीं पोर्टलंड

दगडाच्या खाणी आहेत, व पूर्वी कैद्यांची वसाहत होती. येथें शेतकी व मच्छीमारी चालते. लो. सं. १२,०१८.

**पोर्टलंड दगड**—हा एक चुनखडीचा दगड असून याचा इमारतीच्या कामीं फराच उपयोग करण्यांत येतो. हा खाणींतून बाहेर काढल्याबरोबर नरम असतो, परंतु त्यावर वातावरणांतील हवेचा परिणाम होऊन तो हळूहळू घट्ट बनत जातो.

**पोर्टलंड पात्र**—ब्रिटिश म्यूझियममधील हें एक कांचेचें भांडें आहे. प्राचीन ग्रीक कलेचा सुंदर नमुना म्हणून याला फार महत्त्व आहे व पोर्टलंडच्या सरदार घराण्याकडे याची मालकी होती म्हणून 'पोर्टलंट व्हेज' हें नांव पडलें. १७ व्या शतकांत रोमजवळ एका प्रेताच्या संगमरवरी पेटींत हें सांपडलें. कोणा राजपुरुपाची रक्षा ठेवलेलें हें पात्र असावें. याची उंची १० इंच असून याची कांच पारदर्शक व दाट निळसर आहे. भांड्यावर पांढऱ्या कांचमिन्याचीं उठावदार चित्रें आहेत. याची किंमत एकदां तीन लक्ष रुपये केलेली आहे.

**पोर्टलंड सीमेंट**—जें सीमेंट पाण्यामध्यें घट्ट होतें व एकदां घट्ट झालें म्हणजे पाण्यामध्यें तें तसेंच घट्ट राहातें त्यास म्हणतात. यास हें नांव पडण्याचें कारण असें घट्ट झालेलें सीमेंट पोर्टलंड येथील दगडासारखें दिसतें हें होय. याचे मुख्य घटक ७५ टक्के खडू व २५ टक्के माती हे असतात. मात्र यांची दळून अगदीं बारीक भुकटी अगदीं एकजीव केलेली असते. हें मिश्रण एका फिरत्या भट्टींत घालण्यांत येतें व त्यास २८° फॅरेन. पर्यंत उष्णता देण्यांत येते. म्हणजे घटकांचा एकजीव होऊन मिश्रण कणखर बनतें. तें दळून पूड करण्यांत येते. निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या तऱ्हेचें व कमी-अधिक सीमेंट तयार होतें.

**पोर्ट सय्यद**—सुएझ कालव्यावरील ईजिप्तमधलें एक प्रख्यात बंदर. जाणाऱ्या-येणाऱ्या बोटींना जगात सर्वांत जास्त कोळसा याच ठिकाणाहून दिला जातो. हें कैरोपासून १४५ मैल आहे. पोर्ट सय्यद ते कैरो आगगाडी आहे. हें व्यापारी दळणवळणाचें एक मोठें ठिकाण झालें आहे. लो. सं. (इस्मैलिआ धरून) १,०४,६०३.

**पोर्टो नोव्हो**—मद्रास इलाखा, अर्काट जिल्हा, चिदंबरम् तालुका, यातील वेलोद नदीकांठचें एक शहर व बंदर. लोकसंख्या १५ हजार. हें पोर्तुगीज लोकांचें १६ व्या शतकांतलें ठाणें होतें. १७ व्या शतकाच्या अखेरीस येथें इंग्रजी वसाहत झाली. दोन वेळां फ्रेंचांच्या ताब्यांत जाऊन अखेर पुनः इंग्रजांकडे आलें. पूर्वी सिलोनशीं व्यापार मोठा होता.

**पोर्टो रिको**—वेस्ट इंडीज बेटांपैकीं अमेरिकन संस्थानांच्या ताब्यांतील एक मोठें बेट. क्षेत्रफळ ३,४३५ चौ. मैल. लो. सं. १५,४३,९१३. स्पॅनिश लोक आणि मूळचे लोक यांची ही बहुतेक संकर प्रजा आहे. राजधानी सान जुआन. अमेरिकन अमलाखालीं आल्यापासून बेटाची स्थिति सर्व प्रकारें सुधारत आहे. विद्यापीठ सान जुआन येथें आहे.

साखर, तंबाखू, कॉफी, धान्यें, फळें, कापूस, इ. चें पीक होतें. सोनें, रुपें, तांबें, लोखंड, इ. खनिजें आहेत. सिगार-सिगारेट तयार होतात. मच्छीमारीचा धंदा मोठा आहे. कोलंबसानें १४९३ सालीं हें शोधून काढलें. १८९८ त स्पॅनिश लोकांपासून अमेरिकेनें हें जिंकून घेतलें; व याला राज्यकारभारांत स्वायत्तता दिली.

**पोर्ट्समाउथ**—इंग्लंड, हॅम्पशायरमधलें एक बंदर व शहर. येथें मोठा नाविक तळ आहे. येथील गोदी फार विस्तृत आहे. येथें एक लष्करी शाळा आहे. बाराव्या शतकातील प्रार्थना-मंदिर आहे. येथील गोद्या १५४० सालापासूनच्या आहेत. लोकसंख्या २,४९,२८८.

**पोर्तुगाल**—युरोपमधलें एक लोकसत्ताक राज्य. याच्या दक्षिणेला व पश्चिमेला ॲटलांटिक महासागर, उत्तरेला व पूर्वेला स्पेनची सरहद्द. पूर्वी यालाच ल्युसिटानिया असें म्हणत. क्षेत्रफळ १५,५८२ चौरस मैल. लो. सं. ७३,८०,९०६. टेगस नदीच्या मुखाशीं लिस्बन हें राजधानीचें ठिकाण आहे. ओपोर्टो हें महत्त्वाचें शहर व बंदर दूरो नदीकांठीं आहे. येथून 'पोर्ट वाइन' दारू निर्यात होते. सेरा-द-एस्त्रेला हा पर्वत ६,५४० फूट उंचीचा आहे. याच्या दोन्ही बाजूंस दोन मोठ्या नद्या आहेत. कँटब्रिअन नांवाचा एक पर्वत दूरो नदीच्या उत्तरेस आहे. देशाची हवा निरोगी असून जमीन सुपीक आहे. मका, गहूं, कांदे, बटाटे, अंजीर, नारिंगें, वगैरे पिकें व बागाईत फळफळावळ यांचें उत्पादन होतें.

उद्योगधंद्यांत चिनीमातीचें काम, विणकाम, बुचें, वगैरेंचा समावेश होतो. लोखंड, शिसें, कथील, रुपें, कोळसा, तांबें, इत्यादि खनिज माल निघतो. केपव्हर्ड बेटें, मोझांबिक, दीव, दमण, टिमोर, गोवें, मकाओ, गिनिया, अंगोला, वगैरे ९,५०,००० चौरस मैल क्षेत्राच्या वसाहती आहेत. पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस जर्मन ईस्ट आफ्रिका ही पोर्तुगीज सरकारला देण्यांत आली (१९१९).

लिस्बन, ओपोर्टो व कोइंब्रा येथें विद्यापीठें आहेत. वाङ्मयाचें शिक्षण देणारीं सहा महाविद्यालयें आहेत. २० ते ४८ वयापर्यंत लष्करी शिक्षण सक्तीचें आहे. साक्षरता ४३ टक्के आहे. १९४३ सालीं ४९९ वृत्तपत्रें व नियतकालिकें निघत होतीं.

प्राचीन काळीं हा रोमन प्रांत असून याला ल्युसिटानिआ असें नाव होतें. पांचव्या शतकांत येथें सुएव्ही लोक असून

त्यांना पुढील शतकांत शूर व्हिसिगॉथ लोकांनीं जिंकलें. नंतर दोन शतकांनीं सॅरासेन अरबांनीं यांवर ११३९ पर्यंत राज्य केलें. या सालीं आल्फान्सो हा बर्गंडीचा राजपुत्र गादीवर बसला. पंधराव्या शतकांत पोर्तुगीज लोकांनीं लांबलांबच्या समुद्रावरच्या सफरी करून नवीन प्रदेश शोधून काढले. १४८८–९८ मध्यें वास्को-द-गामा हा हिंदुस्थानांत आला व पुढें दोन वर्षांनीं पश्चिमेकडे ब्राझिलचा कबजा पोर्तुगालकडे आला. १५८० ते १६४० पर्यंत पोर्तुगालवर स्पेनची सत्ता होती व १८०८ त नेपोलियननें यावर स्वारी केली. नंतर १८२२ त ब्राझील स्वतंत्र झाला. गेल्या शतकांत सनातनी आणि प्रागतिक यांमध्यें लढा सुरू होऊन देश उध्वस्त होऊन गेला. शेवटीं १९१० सालीं लोकशाहीचा अमल सुरू झाला. नंतर राजपक्षाची चंडाळी माजली. आज पोर्तुगालमध्यें सर्वाधिकाऱ्याचीच सत्ता आहे असें म्हणतां येईल. पहिल्या महायुद्धांत पोर्तुगाल दोस्तांच्या बाजूस होता, पण दुसऱ्या महायुद्धांत तो तटस्थ राहिला.

१९३३ सालीं जी राज्यघटना तयार करण्यांत आली तीप्रमाणें एक सात वर्षें मुदतीचा अध्यक्ष व १२० प्रतिनिधींचें एक राष्ट्रीय मंडळ निवडलें जातें. चांगलासा राजकीय पक्ष अद्यापि तयार झाला नाहीं, त्यामुळें राज्यसूत्रें लोकशाहीच्या तत्त्वांवर चालणारांच्या हातीं नाहींत. दहा सभासदांचें एक प्रिव्ही कौन्सिल असतें. राष्ट्रीय मंडळा( नॅशनल ॲसेंब्ली )प्रमाणें एक संघगृह ( कॉर्पोरेटिव्ह चेंबर ) आहे. युद्धकाळाखेरीज मृत्यूची शिक्षा बंद आहे. देशाचा बहुसंख्याकांचा धर्म रोमन कॅथॉलिक आहे.

**पोर्तुगीज पूर्व आफ्रिका**—ही पोर्तुगीज लोकांची वसाहत आफ्रिकेंत मोझँबिक खाडीनजीक ट्यांगानिकाच्या दक्षिणेस व ऱ्होडेशियाच्या पूर्वेस आहे. क्षे. फ. २,९५,००० चौ. मैल. या प्रदेशाचे तीन विभाग होते ते : (१) मोझँबिक कंपनीचा प्रदेश-क्षे. फ. ५९,८४० चौ. मैल. या प्रदेशावर राज्य करण्याचा अधिकार या कंपनीला १८९१ पासून ५० वर्षें मुदतीनें दिलेला होता. (२) न्यासा कंपनीचा प्रदेश–क्षे. फ. ७३,१९२ चौ. मैल. या कंपनीलाहि राज्यकारभार चालवण्याची सनद दिलेली होती. (३) मोझँबिक प्रांत-क्षे. फ. १,६१,९६८ चौ. मैल. या प्रदेशाचा शोध प्रथम १४९८ सालीं वास्को-द-गामानें लावला, व १५०५ सालीं पहिली वसाहत झाली. १८९१ सालीं ग्रेट-ब्रिटन व पोर्तुगाल यांच्यामध्यें करार होऊन या प्रांताच्या हद्दी निश्चित करण्यांत आल्या. १९१९ सालीं व्हर्सायच्या तहानें जर्मनपूर्व आफ्रिकेपैकीं कांहीं प्रदेश 'किओंगा त्रिकोण' या नांवाचा या पोर्तुगीज वसाहतीला जोडण्यांत आला. १९४२ सालीं पूर्वीच्या वरील दोन्ही कंपन्या रद्द करून ह्या सर्व प्रदेशाचा कारभार पोर्तुगीज सरकारनें आपल्या हातीं घेतला असून, गव्हर्नर-जनरल व एक मिश्र सरकारनियुक्त व लोकनियुक्त (व्यापारी, उद्योगधंदेवाले व शेती करणारे अशा वर्गांनीं निवडलेले) सभासदांचें कायदेमंडळ या वसाहतीचा कारभार चालवतात. या वसाहतीचे आतां चार प्रांत स्युल दो साव, मॅनिका व सोफाला, झांबेझिया, आणि न्यासा असे बनवले आहेत. या वसाहतीची लोकसंख्या ५०,८५,६३० असून त्यापैकीं २७,४३८ युरोपीय, १५६४१ मिश्र जात, १४४९ पीतवर्णी, ९१४७ हिंदी, आणि ५०,३१,९३५ नीग्रो आहेत. येथें ७३४ प्राथमिक शाळा, एक हायस्कूल आणि ३९ उद्योगधंद्यांच्या शाळा (प्रोफेशनल स्कूल्स) आहेत. लॉरेंको मार्क्विस ( लो. सं. ४७,३१० ) ही या वसाहतीची राजधानी व बंदर असून बीरा व मोझँबिक हीं दुसरीं बंदरें आहेत. येथें ऊंस, मका, कापूस, खोबरें हीं पिकें होतात व खनिजद्रव्येंहि निघतात. शिवाय गुरें, शेळ्यामेंढ्या व डुकरें पाळण्याचा धंदा चालतो.

**पोर्तुगीज वाङ्मय**—प्राचीन पोर्तुगीज वाङ्मय जरी विस्तारानें स्पॅनिश वाङ्मयापेक्षां कमी असलें तरी तितक्याच महत्त्वाचें होतें ही गोष्ट त्यांतील 'कॅन्सिओनीरॉस' या प्रणयगीतांवरून लक्षांत येईल. पोर्तुगीज वाङ्मयामध्यें स्वतंत्र वाङ्मय फार थोडें असून त्यावर बहुतेक परराष्ट्रीय वाङ्मयाची छाप पडलेली दृष्टीस पडते. पोर्तुगालमधील प्रथमचें वाङ्मय प्रॉव्हेन्सल वाङ्मयावर आधारलेलें आढळतें. १५ व्या शतकात तें कॅस्टेलिन वाङ्मयाचा आधार घेतांना दिसतें तर १६ व्या शतकांत त्यावर इटालियन वाङ्मयाचा प्रभाव आढळतो. १७ व १८ व्या शतकात स्पेन, फ्रान्स व इंग्लंड या देशांतील वाङ्मयांचा ठसा त्यावर उमटलेला दिसतो तर १९ व्या शतकांत तें इंग्लंड, फ्रान्स व जर्मन यांचें अनुकरण करतांना आढळतें. पोर्तुगीज वाङ्मयामध्यें १२ व्या शतकापर्यंत भावगीतांची वाढ झालेली दिसून येते. यांतील पहिला कवि डॉ. गिलसांचेरू हा होय. याच्या काव्यसंग्रहास 'कँतर द आमीगो' असें नांव आहे. तिसऱ्या आल्फान्सोच्या कारकीर्दींत पोर्तुगीज वाङ्मयाला थोडा भर आलेला दिसतो. याचा मुलगा दिनिझ हा स्वतः कवि असून त्याचें एक कविमित्रमंडळ होतें. या वेळचीं काव्यें बहुतेक प्रेमगीतें आहेत. पोर्तुगीज भाषेंत पहिलें महाकाव्य गिरालेस यानें मूर लोकांच्या १३४० सालच्या परामवावर लिहिलें आहे. गद्य वाङ्मयाची प्रवृत्ति पोर्तुगालमध्यें १४ व्या शतकांत उत्पन्न झाली. प्राथमिक गद्य ग्रंथ अर्थातच बखरी, चरित्रें, वगैरे प्रकारचे होते. १५ व्या शतकांत जॉन राजा हाहि स्वतः ग्रंथकार असल्यामुळें त्या वेळीं कांहीं ग्रंथकार उदयास आले. या शतकांत पोर्तुगालचा इतिहास फेर्नाओलोपेस यानें लिहिला. या कालांत कांहीं चांगले चरित्रग्रंथहि प्रसिद्ध झाले. तसेंच द पेद्रो याचा मुलगा कॉन्स्टेबल हा

वार्सा हें राजधानीचें शहर आहे. यांत विस्तीर्ण अरण्यें आहेत व मोठमोठ्या खाणीहि आहेत. कोळसा, पेट्रोलिअम्, लोखंड, जस्त, मीठ, पोटॅश, वगैरे खनिज माल निघतो. देश शेतकीप्रधान आहे.

इ. स. १७७२ पावेतों पोलंड स्वतंत्र होता. हा त्याचा स्वातंत्र्याचा काळ १००० वर्षांहून जास्ती होता. मध्यंतरी देशाचा बराचसा काल गडबडीचा गेला. कधीं हंगेरीबरोबर तर कधीं लिथुआनियाबरोबर जोडलें जाण्याचें संकट त्याच्या वांट्यास येई. वालाशियन, तुर्क, रशियन यांच्या स्वाऱ्यांनीं तो पीडला गेला होता. नंतर १० व्या शतकांत लहान लहान संस्थानांचें हें एक राष्ट्र बनलें. मिएझिस्ला (९६०–९९२) या पहिल्या प्रसिद्ध राजाच्या कारकीर्दींत ख्रिस्ती धर्म येथें आला. लोक स्लाव्ह वंशाचे होते. १२४१ त तार्तार लोकांनीं यावर स्वारी केली. तिसरा कासिमिर याची कारकीर्द (१३३३–१३७०) ही पोलंडचें सुवर्णयुग समजली जाते. १६५५ मध्यें स्वीडनचा चार्लस गस्ट-व्हस यानें पोलंड जिंकून घेतला. १६८३ मध्यें तुर्कांचा व्हिएन्नाला पडलेला वेढा सोबिएस्कि यानें उठवला. अठराव्या शतकांत देशाला अवनति आली. १७६८ मध्यें रशियन आक्रमणाला कांहीं देशभक्तांच्या संघानें तोंड दिलें. १७७२ मध्यें ऑस्ट्रिया, रशिया, प्रशिया या तिघांनीं बहुतेक मुलूख आपसात वांटून घेतला. राहिलेल्याची पुन्हां १७९३–९५ मध्यें दुसरी विभागणी झाली. १७९५ मध्यें शेवटच्या राजानें राज्यत्याग केला. नेपोलियन यानें वार्सॉची डची (ड्यूकच्या सत्तेखालचा छोटासा प्रदेश) स्थापन करून कारभार चालविण्याचा प्रयत्न केला होता, पण तोहि फार वेळ टिकला नाहीं. १८१४ मध्यें पुन्हां एकवार विभागलें जाण्याचें पोलंडच्या नशिबीं आलें. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं ऑस्ट्रोजर्मन सैन्यानें पोलंडचा कब्जा घेतला होता. नंतर १९१६ मध्यें देशाचें स्वातंत्र्य जाहीर करण्यांत आलें. पिल्सुडस्की यानें पूर्वी पोलिश सैन्यासह रशियावर स्वारी केली होती. हाच या वेळीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें होता. १९१८ मध्यें लोकसत्ताक घटना करण्यांत आली व १९१९ च्या शांततेच्या तहानें तिला मोठ्या राष्ट्रांकडून संमति मिळाली. पिल्सुडस्की हाच पहिला अध्यक्ष झाला. १९२१ मध्यें रशियन आक्रमण पोलंडनें यशस्वी रीतीनें परतवलें आणि आपणाला अनुकूल असा तह करून घेतला. पण दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीनें प्रथमच पोलंडवर स्वारी करून तो देश ताब्यांत घेतला. तेव्हां बरेचसे लोक बाहेर पडले. कांहीं हिंदुस्थानांतहि येऊन राहिले होते. पुढें युद्ध संपल्यावर याल्टाच्या कराराप्रमाणें पोलंडचा पूर्व भाग रशियाकडे गेला, पण जर्मनीचा कांहीं पूर्वभाग पोलंडला मिळाला.

गेल्या महायुद्धापूर्वी पोलंडमध्यें ५ विद्यापीठें व विद्यापीठाच्या दर्जाच्या २३ इतर शिक्षणसंस्था होत्या. प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत आहे व वरचें शिक्षणहि मोफत आहे. बहुतेक लोक रोमन कॅथॉलिक धर्माचे आहेत.

पोलिश वाङ्मय—स्लाव्होनिक वाङ्मय हें रशियन वाङ्मयाच्या खालोखाल महत्त्वाचें आहे. रशियन व जर्मन आक्रमणाची सतत भीति मनांत असल्यामुळे पोलिश लोकांना आपले पश्चिमेकडील शेजारी अधिक जवळचे वाटत. यामुळें त्यांच्या एकंदर वाङ्मयावर इटली व फ्रान्स या देशांच्या वाङ्मयाचा अधिक पगडा दिसून येतो. पोलंडच्या वाङ्मयाला सुरुवात १३ व्या शतकापासून झाली. पहिलें पहिलें बरेंच वाङ्मय मात्र लॅटिन भाषेंत लिहिलेलें आढळून येतें. प्रादेशिक भाषेंतील वाङ्मय अत्यंत थोडें. तें बहुतांशीं संतांचीं चरित्रें, धार्मिक ग्रंथांचीं भाषांतरें, बायबलचा अनुवाद, अशा स्वरूपाचें होतें. १५ व्या शतकांत जेकब पार्कोश यानें उच्चारभेददर्शक खुणा शोधून काढल्यामुळें पोलिश वाङ्मय वाचणें सुलभ जाऊं लागलें. परंतु १६ वें शतक हेंच काय तें सुवर्णयुग ठरतें. या शतकाचा प्रारंभ मिकोलाज रेज (१५०५–६९) यानें केला. त्याचे प्रमुख ग्रंथ पुढील विषयांचे होते—(१) जमीनदार, बेलिफ व धर्मोपदेशक यांचा संवाद, (२) प्राणि–उद्यान, (३) दर्पण, (४) प्रामाणिक माणसाचें जीवन. यांत त्यानें पोलिश लोकांचे दोष दाखवून त्यांच्या ठायीं कोणत्या गुणांचा वास हवा हें उत्तम दाखविलें आहे. याच कालांत जॅन कोचनोवस्की हा मोठा कवि होऊन गेला. त्यानें 'साम' स्तोत्रांचें पद्यांतच रूपांतर केलें. 'सेंट जोन्स ईव्ह' वर गीतें रचलीं व 'शोक' हें दीर्घ काव्य लिहिलें.

१६ व्या शतकाच्या अखेरीस व १७ व्या शतकात वाङ्मयाला अवकळा आलेली दिसून येते. याचें कारण संकुचित अशा कॅथॉलिक विचारसरणीचें प्राबल्य होय. १८ व्या शतकाच्या प्रारंभास मात्र स्टॅनिस्ला कोनारस्की (१७००–७३) हा लेखक चमकला. यानें 'कॉलेजिअम नोबिलिअम' ही शाळा स्थापून तेथल्या अभ्यासक्रमांत सृष्टिशास्त्राचा समावेश केला. शैक्षणिक क्षेत्रांत सुधारणा घडवून आणण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला. तत्कालीन राज्यपद्धतीवर सडकून टीकाहि केली. मात्र या कालात एकंदर वाङ्मयक्षेत्रांत फ्रेंच मिथ्याभिजात (स्युडो क्लासिक) वाङ्मय-कालाचा पगडा अधिक दिसून येतो. कवी बोइलीननें घालून दिलेल्या नियमानुसार काव्य रचीत व गद्यलेखक त्या काळच्या फ्रेंच लेखकांचें अनुकरण करीत.

अठराव्या शतकाच्या अखेरीस मात्र पोलिश वाङ्मयांत निराळे वारे वाहूं लागले. त्याच्यावर इंग्रज व जर्मन अद्भुतरम्य (रोमॅन्टिक) साहित्यलेखकांचा पगडा बसल्याचें दृष्टोत्पत्तीस

येतें. याच कालांत वॉल्टर स्कॉटच्या धर्तीवर ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या व बऱ्याच प्रमुख जर्मन लेखकांच्या कलाकृतींचें पोलिशमध्यें भाषांतर झालें. याच सुमारास म्हणजे १८०० मध्यें वार्सा येथें 'फ्रेंड्स ऑफ दि सायन्सेस' (शास्त्र-सुहृद्) अशी संस्था स्थापन झाली व विल्नो विद्यापीठ स्थापलें गेलें. या कालांत ॲडम मिकिवीझ हा मोठा कवि होऊन गेला. त्यानें 'पूर्वज' हें खंडकाव्य रचिलें; सुनीतें लिहिलीं व 'पॅन टॅडेन्झ' हा मोठा ग्रंथ लिहिला. याच्या खालोखाल महत्त्वाचा असा ज्युलजुझ स्लोवास्की हा कवि होऊन गेला. याच कालांतील तिसरा अद्भुतरम्य कवि झिग्मुंट क्रॅसिन्स्की हा होय. याच सुमारास पोलंड परतंत्र झाला. या कालांतील मोठा नाटककार अलेक्झांडर फेड्रो (१७८३–१८७६) हा होय. यानें मोलिएरच्या धर्तीवर सुखांतिका लिहिल्या. त्यांतील प्रमुख 'लेडीज ॲंड हुसारी', व 'मेडन्स व्हाउज्' ह्या होत. नव्या युगाची नांदी वाजविणारा नाटककार जोझेफ कोझेनिओविस्की हा होय. यानें 'स्थलैक्य' हें तत्त्व झुगारून दिलें. या कालखंडांतील कवींच्या मानानें गद्यलेखक हे जास्त प्रसिद्ध होते.

१८६३ च्या सुमारास सुरू झालेल्या लोकशाही चळवळीचे पडसाद पोलिश वाङ्मयावरहि उमटले. शास्त्रीय प्रगति व नवे नवे शोध याचाहि वाङ्मयावर अनुकूल परिणाम झाला. या कालांत निश्चितवाद (पॉझिटिव्हिझम) व वास्तववाद (रिॲलिझम) हे दोन प्रवाह प्रामुख्यानें दिसून येतात. हेन्रीक सिएंकिविक्ष हा त्याच्या ऐतिहासिक कादंबऱ्यांबद्दल प्रसिद्ध आहे. 'अग्नि आणि असि घेऊन', 'प्रलय' व 'पॅन वोलोडिजोवस्की' ह्या त्याच्या तीन प्रमुख कादंबऱ्या होत. त्याला १९०५ मध्यें नोबल पारितोषिक मिळालें. यानंतर प्रकृतिवादा (नॅचरॅलिझम)-चा काल सुरू झाला. परंतु विशेष नांव घेण्यासारखें वाङ्मय निघालें नाहीं. नंतर व्लाडिस्ला सेंट रेमॉन्ट्स (१८६८–१९२५) हा मोठा लेखक होऊन गेला. त्याला १९२५ मध्यें नोबल पारितोषिक देण्यांत आलें. वॅक्लॉ सिएरोझेवस्की ह्यानें सायबेरियाचें दर्शन आपल्या पुस्तकांत घडवून दिलें. यानंतरचे लेखक हे ऱ्हासकालिक व मांत्रिक या वर्गांत पडतात. याच सुमारास पहिलें जागतिक महायुद्ध सुरू झालें व पोलंड स्वतंत्र झाला. या वेळीं स्टेफन झेरास्की हा प्रसिद्ध लेखक होऊन गेला.

१९ व्या शतकाच्या शेवटीं 'तरुण पोलंड' चळवळ सुरू झाली. या नवीन प्रवाहानें सर्व कलांमध्यें प्रगति घडवून आणली. एकंदर वाङ्मय व कला यांचें नव्यानें मोजमाप होऊन पोलिश विचारसरणीला अनुरूप असें त्याचें मूल्यमापन झालें.

वरील गटांतील प्रमुख लेखक स्टॅनिस्ला विस्पिॲन्स्की हा होऊन गेला. हा कवि, नाटककार व चित्रकार होता. पहिल्या महायुद्धाच्या सुरुवातीच्या वर्षांत पोलिश वाङ्मयाची सर्वांगीण वाढ दिसून येते. राजकीय स्वातंत्र्यामुळें लिखाणांतहि नवीन जोम दृष्टीस पडतो. या कालांत विविध मतप्रणालींचे लेखक आढळतात; उदा., वांडा वासिलेवस्का हा कम्यूनिस्ट लेखक, वातावरणाचें उत्तम वर्णन करणारा मिचल चोरामन्स्की, पहिल्या महायुद्धाची कथा लिहिणारा जोझेफ विट्लिन, वाङ्मयीन टीकाकार टाडेंझबॉय-झेलेन्स्की, वगैरे. दुसऱ्या जागतिक युद्धानें पोलंड रशियाचा अंकित झाला व त्यामुळें बऱ्याच स्वतंत्र विचाराच्या लेखकांनीं देशत्याग केला. अर्थात् हल्लींचें वाङ्मय हें कम्यूनिस्ट वृत्तीनें आहे असें दिसेल.

**पोलाद**—हा लोखंडाचा एक प्रकार असून यांतील कर्बाचें प्रमाण कमीजास्त करून याचे आणखी निरनिराळे प्रकार करतात. लोह आणि कर्ब यांखेरीज पोलादांत सिलिकॉन, स्फुर, मंग आणि गंधक थोडथोड्या प्रमाणांत असतात. जड किंवा हत्यारी पोलादांत कर्बाचें प्रमाण शेंकडा ०·८ ते १·३ यांमध्यें असतें. टणकपणा, चिवटपणा व कठिणपणा हे गुण कर्बाचें प्रमाण जास्त वाढविल्यानें जास्त उत्पन्न होत असतात. पण कठिणपणा वाढत जातो तसा लवचिकपणा कमी होत जातो. मृदु किंवा घडणीच्या पोलादांत कर्ब शेंकडा ०·१ ते ०·४ या प्रमाणांत असतो. हें पोलाद लाल तापवून त्याच्या सळया करतात. पोपड्याचें पोलाद (ब्लिस्टर स्टील), घडीव पोलाद, कात्री पोलाद, वगैरे पोलादाचे व्यापारी प्रकार आहेत. उष्णतामान जास्त चढवून एकदम थंड करण्यानें पोलाद कठिण बनतें. लोखंडापासून पोलाद करण्याचे बरेच प्रकार आहेत.

१९३९ सालीं जगांत सुमारें १३½ कोटी मेट्रिक टन पोलाद तयार झालें. अमेरिका, जर्मनी, रशिया व ग्रेट ब्रिटन या चार मोठ्या राष्ट्रांत सर्वांत अधिक पोलाद तयार होतें. हिंदुस्थानांत १९४३ सालीं १६ लक्ष मेट्रिक टन पोलाद तयार झालें.

**पोलिस**—इंग्लंडमधील हल्लींची पोलिस पद्धति, मूळ १८२९ सालीं सर रॉबर्ट पील यानें 'मेट्रोपोलिस (लंडन)चे व आसपासचे पोलिस सुधारण्याचा कायदा' मंजूर करून घेतला तेव्हांपासून सुरू झाली. त्यांत १८३९ पर्यंत बऱ्याच दुरुस्त्या झाल्या, व नंतर तदनुसार पोलिस कायदा इतर शहरें व गांवें यांना लागू करण्यांत आला. १८५९ सालीं प्रत्येक परगण्यांत पोलिस असलेच पाहिजेत, असा कायदा झाला. १८८८ सालच्या कायद्यानें परगणा पोलिसची व्यवस्था कौन्टी कौन्सिल व कौन्टी जज्ज यांनीं संयुक्तपणें करावी असें ठरलें, आणि २०,००० वस्तीहून कमी वस्तीच्या गांवांच्या पोलिसांची व्यवस्था कौन्टी कौन्सिलकडे देण्यांत आली. इंग्लंड व वेल्स मिळून एकंदर पोलिस ५७,००० आणि स्कॉटलंडांत ६,५३० आणि खुद्द

राजधानींत पोलिस २१,००० हून अधिक असून, हें पोलिस खातें स्वतंत्रपणें होम सेक्रेटरीच्या ताब्यांत दिलेलें आहे. पोलिसांचा खर्च कांहीं स्थानिक उत्पन्नांतून व कांहीं मुख्य सरकारी खजिन्यांतून चालतो. १९२० पासून स्त्री-पोलिस नेमण्यास सुरवात होऊन १९२४ सालीं त्यांची संख्या ११० होती.

हिंदुस्थान—गव्हर्नर जनरल कॉर्नवॉलीस यानें १७९३ सालीं पोलिसांची जुनी जमीनदारांकडची व्यवस्था काढून घेतली, व सरकारी पोलिस खातें सुरू करून बंगालमधील डिस्ट्रिक्ट जज्जांना दर ४०० चौ. मै. क्षेत्रांत एकेक पोलिस ठाणें स्थापन करण्याबद्दल हुकूम दिले; व तेथें एकेक ठाणेदार व त्यांच्या हाताखालीं दुय्यम अधिकारी नेमण्यांत आले. १८१६ सालीं मद्रास प्रांतांत सर थॉमस मन्रोनें पोलिस खातें जिल्ह्याच्या कलेक्टरच्या ताब्यांत दिलें, व याप्रमाणें पोलिस खातें रेव्हेन्यू खात्याच्या हुकमतीखालीं गेलें; व तशीच व्यवस्था हल्लीं मुंबई इलाख्यांत चालू आहे. प्रत्येक जिल्ह्यांत युरोपियन डिस्ट्रिक्ट पोलिस सुपरिंटेंडेंट (डी. एस्. पी.) नेमण्यांत आला. आणि खानदेशांत औट्रॅमनें गुन्हेगार जातींतले इसमहि पोलिस खात्यांत नोकर नेमण्याची सुरवात केली. मद्रास इलाख्यांत प्रत्येक जिल्ह्यांत डी. एस्. पी. हा स्वतंत्र पोलिस अधिकारी नेमून कलेक्टरचा ताबा काढून घेण्यांत आला. १८६१ सालचा हिंदुस्थान सरकारचा 'रेग्युलेशन ऑफ पोलिस ॲक्ट' सर्वत्र लागू आहे; मात्र मुंबई व मद्रास इलाख्यांत १८९० चा प्रांतिक पोलिस ॲक्ट चालू आहे. हल्लीं इंडियन पोलिस खातें मध्यवर्ती सरकारचें मुळींच नाहीं; तें खातें प्रांतिक सरकारांच्या ताब्यांत दिलें गेलें आहे. जिल्हा पोलिसवर डी. एस्. पी. आणि कलेक्टर असा दुहेरी अमल असतो. जिल्ह्यांत शांतता राखण्याच्या कामांत कलेक्टरचा हुकूम पोलिसाला मानावा लागतो. पोलिस अधिकाऱ्यांच्या शिक्षणाकरितां पोलिस ट्रेनिंग शाळा आहेत. मुंबई शहराचें पोलिस खातें स्वतंत्र असून तें मुंबई सरकारच्या प्रत्यक्ष अमलाखालीं आहे. या पोलिस खात्याला क्रिमिनल इन्व्हेस्टिगेशन डिपार्टमेंट (सी. आय्. डी.) १९०३ पासून जोडण्यांत आलें आहे.

पोलिसांचा कायदा—हा कायदा १८६१ सालीं मंजूर झाला व त्यांत १८८८ सालीं दुरुस्ती झाली. दर प्रांतामध्यें मुख्य पोलिस अधिकारी 'इन्स्पेक्टर-जनरल ऑफ पोलिस' (आय्. जी. पी.), आणि जिल्ह्याचा मुख्य पोलिस अधिकारी 'डिस्ट्रिक्ट सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस' (डी. एस्. पी.) हा असतो. कोणाहि इसमानें त्याच्या खर्चानें शांततारक्षणाकरितां पोलिस मागण्याचा अर्ज केल्यास त्या इसमाला जादा पोलिस देण्यांत येतात (कलम १३). कोणतीहि रेल्वे, कालवा, सार्वजनिक कार्य, किंवा कारखाना किंवा व्यापारी संस्था, यांमधील कामगारांच्या वर्तनामुळें तेथें जादा पोलिस ठेवणें जरूर आहे असें वाटेल, तर तेथें जादा पोलिस ठेवावे (कलम १४). प्रांतातील ज्या भागांत अशांतता किंवा भयानक परिस्थिति निर्माण झाली आहे असें प्रांतिक सरकार जाहीर करील, तेथें जादा पोलिस इन्स्पेक्टर-जनरलनें ठेवावे (कलम १५). वरील कलमातल्याप्रमाणें तशा अशांततामय भागांतील एखाद्या रहिवासी इसमाच्या मालमत्तेची नुकसानी झाली असेल किंवा माणसाचा मृत्यु किंवा मोठी दुखापत झाली असेल तर त्याबद्दल नुकसानभरपाई मिळण्याबद्दल अर्ज डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे करावा, व त्यानें त्या अर्जाची चौकशी करून (अ) ज्यांची नुकसानी झाली त्या इसमांचीं नांवें, (ब) त्यांना द्यावयाच्या नुकसानभरपाईची रक्कम, आणि (क) त्या भागांतील ज्या इसमांनीं गर्दीचा गुन्हा केल्यामुळें नुकसानी झाली असेल त्यांच्याकडून किती नुकसानभरपाईची रक्कम वसूल करावी ती रक्कम ठरवावी. ती नुकसानभरपाई रक्कम डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें वसूल करून ज्याची नुकसानी झाली त्याला ठरवलेली द्यावी [कलमें १५ (अ) १६]. हा कायदा खेड्यांतील वतनदार पोलिस पाटलांना लागू नाहीं. पोलिस अधिकाऱ्यांनीं आपल्या हद्दींत बेवारशी मालमत्ता असेल ती आपल्या ताब्यांत घ्यावी आणि त्या मालाची यादी करून डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटकडे पाठवावी. डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें जाहीरनामा काढून त्यांत तो माल नोंदावा, आणि सहा महिन्यांत जो इसम आपली मालकी शाबीत करील, त्याला तो माल द्यावा (कलमें २५-२६). स्थानिक बाबतींत अधिकार असेल त्या त्या पोलिस अधिकाऱ्यांनीं पुढील कामें करावीं: १ गुन्हे होऊं नयेत म्हणून त्यांचा प्रतिबंध करणें; २ जाहीर रीतीनें कोणतेंहि त्रासदायक कृत्य बंद करणें; ३ पकडण्यास योग्य अशा गुन्हेगारांस पकडणें (कलम ५१); ४ रस्त्यांत असलेल्या पंगु किंवा जायबंदी किंवा दुखापत झालेल्या माणसास मदत करणें; ५ दारू पिऊन झिंगलेल्या माणसास ताब्यांत घेणें व वेड्यास ताब्यांत घेणें; ६ आगीपासून नुकसानी होऊं नये असा बंदोबस्त करणें; ७ एखादा अपघात किंवा सार्वजनिक धोका होत असेल तर तो ताबडतोब थांबविण्याचा प्रयत्न करणें (कलम ५२); ८ स्नानाचे घाट, धुण्याचीं ठिकाणें, जत्रा, मोठमोठीं देवळें आणि लोकांचे मोठमोठे जमाव एक होतात अशा सर्व ठिकाणीं बंदोबस्त ठेवणें; एखादें जनावर रस्त्यांत कोणाला मारील किंवा लघुशंका अगर शौच करील, व अशा कृत्यानें लोकांस त्रास देईल; किंवा कोणी एखादें जनावर, घोडे मोकाट असें रस्त्यावर सोडून धोका उत्पन्न करील, अगर एखादा भयंकर कुत्रा म्होरकीशिवाय रस्त्यावर सोडील, किंवा आपलें शरीर निर्लज्जपणानें उघडें करील, किंवा अश्लील भाषा किंवा

शब्द सार्वजनिक ठिकाणीं उच्चारील, किंवा रस्त्यांत अगर सार्वजनिक ठिकाणीं दारू पिऊन झिंगून अस्ताव्यस्त स्थितींत असेल, किंवा अपमानकारक शब्द उच्चारून अगर धमकी देऊन दुसऱ्या कोणाला त्वेष आणून शांततेचा भंग होण्यासारखें वर्तन करील, अशा सर्व इसमांस पन्नास रुपयांपर्यंत दंड करण्यांत येईल.

अडीअडचणीच्या वेळीं शांतता आणि सुव्यवस्था राखण्याच्या कामीं पोलिसांना मदत व्हावी म्हणून 'होमगार्ड्स' (गृहरक्षक) दल तयार करण्यांत आलें आहे. १९४६–४७ च्या जातीय दंग्यांत यांचा फार उपयोग झाला.

**पोलो**—या खेळास घोड्यावरचा हॉकी खेळ म्हणतां येईल. हा मूळ इराणांतील आहे. (भारत इतिहास संशोधक मंडळांत याचें एक रंगीत जुनें चित्र आहे). तेथून हिंदुस्थानांत साहेबांनीं हा खेळ आणला व हिंदुस्थानांतून इंग्रज अधिकाऱ्यांनीं १८६९ च्या सुमारास इंग्लंडांत नेऊन सुरू केला. या खेळांतील तट्टें १४ हात २ इंच असावीं लागतात. मैदान सुमारें ३०० गज लांब व १६० गज रुंद असतें. याचा पांढरा चेंडू ३ इंच व्यासाचा असून काठी ४ फूट ६ इंच असते. एकेका बाजूला चार गडी असून प्रत्येकाला काम वांटून दिलेलें असतें. आठ मिनिटांचा एक असे डाव होऊन खेळ संपतो. हार्लिंगहॅम क्लब (लंडन) ही या खेळाची प्रमाणभूत संस्था समजली जाते.

**पोलोनिअम**—रेडियमपासून जे अनेक पदार्थ तयार होतात त्यांतील शेवटून दुसरा–म्हणजे रेडियम एफ्सारखा हा आहे. १८९८ सालीं मॅडम क्युरीनें हा पहिला किरणोत्सर्गी (रेडिओ ॲक्टिव्ह) पदार्थ स्वतंत्रपणानें निराळा केला, व त्याला पोलोनिअम हें नांव दिलें.

**पोवळीं**—उष्णकटिबंधांतील समुद्रांत पोलाइप या नांवाचे सूक्ष्म जीव असतात, त्यांपासून पोवळ्याची उत्पत्ति होते. या जीवाचा आकार पोकळ गोल नळीसारखा असतो. यास एक तोंड असून त्यासभोंवतीं पुष्कळ कल्ले असतात. हे कल्ले तोंडासभोंवतीं वर्तुळाकार असल्यामुळें तोंडास ताऱ्याचा आकार आलेला असतो. कल्ल्याच्या योगानें भक्ष्य धरून तोंडांत घेतात. हे अनेक जीव एकत्र राहतात, परंतु प्रत्येक जीवाची राहण्याची नळी वेगळी असते, व त्या त्वचेचें पोकळ नळीच्या आंतल्या बाजूनें व बाहेरच्या बाजूनें आच्छादन असतें. या किड्याच्या अशा अनेक नळ्या किंवा घरटीं एकावर एक रचलीं जाऊन त्यांचा एक मोठा घरटा होतो. तो घरटा एकाच वेळीं एकाच कीटकसमूहानें पुरा न होतां पहिला समूह मेल्यावर त्याच घरट्यांत दुसरे किडे निपजतात, व तेहि घरटे वाढवितात. असें होतां होतां त्यास झाडासारख्या सर्व बाजूंनीं फांद्या फुटून कालांतरानें त्यांचे मोठे खडक बनतात, व ते वाढून मोठे टापूच्या टापू होतात. पोवळ्याची घटना थेट खडूसारखी असते.

विषुववृत्ताच्या उत्तरेस व दक्षिणेस ३०° च्या आंत पॅसिफिक महासागरांत व दुसऱ्या समुद्रांत अनेक तऱ्हेच्या पोवळ्याचे मोठे खडक कधीं कधीं १०० किंवा २०० मैलांहूनहि जास्त पसरतात. पोवळीं अनेक रंगांचीं असतात. काळ्या, तांबड्या व पांढऱ्या रंगांचीं पोवळीं मिळतात. रंग, रूप, तेज, भरीवपणा, घट्टपणा व घडणावळ यांवर पोवळ्याची किंमत अवलंबून असते. भूमध्य समुद्रांत गुलाबी आणि तांबडीं पोवळीं सांपडतात व त्यांचा मोठा व्यापार चालतो. नेपल्स आणि जिनोआ येथें पोवळ्याचे अलंकार चांगले करतात.

पोवळ्यांचे प्रकार

१. मेंदूसारखें पोवळें.

२. पोलाइप असलेलें पोवळें.

३. पोवळ्याचें झाड.

४. गवताच्या पेंढीसारखें पोवळें.

**पोवाडे**—हा एक काव्याचा प्रकार आहे. यांत बहुधा वीरांचीं कथानकें, ऐतिहासिक प्रसंग, थोरांचीं चरित्रें, वगैरे गोंविलेलीं असतात. हा वाङ्मयप्रकार फार जुना आहे व लोकगीतांप्रमाणेंच पोवाडे हे पुष्कळदां परंपरागत आलेले असतात. इंग्लंडांत रॉबिन हूडचा पोवाडा असाच आहे. स्कॉटलंड देश या पोवाड्यांच्या बाबतींत प्रसिद्ध व समृद्ध आहे. सर वाल्टर स्कॉटनें त्यांचा उद्धार करून ते जगापुढें आणले. त्यांत रोमांच उभे करणारे प्रसंग, नीतिनिर्बंधक कथा, प्रणयप्रसंग, तसेंच अतिमानुष गोष्टी या सर्व अद्‌भुत वाटतील अशा भरल्या आहेत. या पोवाड्यांचे संग्रह पुष्कळ छापले गेले आहेत.

मराठींत शिवकालापासून आंग्लाईपर्यंत तीनशेंवर पोवाडे उपलब्ध आहेत. अज्ञानदासाचा अफजलखानाचा पोवाडा प्रसिद्धच आहे. पानपतचा, नारायणरावाच्या वधाचा, खर्ड्याच्या लढाईचा, वगैरे पोवाडे गोंधळी गातात. तुळशीदास, लहरीमुकुंदा, राम जोशी, अनंत फंदी, वगैरे शाहीर चमकून गेले. आजच्या काळांत पठ्ठे बापूराव झाला. मागें ॲक्वर्थ–शालिग्राम आणि आतां श्री. य. न. केळकर यांनीं जुन्या पोवाड्यांचे संग्रह प्रसिद्ध करून मराठी वाङ्मयांत अपूर्व भर टाकली आहे. आजहि खाडीलकरांसारखे पदवीधरहि पोवाडे करून म्हणूनहि दाख-

वितात. मुळे, मुचाटे व जामखेडकर यानींहि या प्रकारची रचना केली आहे.

**पोषाख**—शरीराला बाहेरून वस्त्रांचें वेष्टण हें शरीर-संरक्षणासाठीं जसें असतें तसें शोभेसाठींहि असतें. हवामान, वस्त्रसाधनें आणि आवड यांवरून पोषाखांत विविधता आलेली दिसेल. वेदकालांतील लोक नेसावयाचें वस्त्र (नीवी), पांघरावयाचें ( उपवीत ) व वरचें वस्त्र ( अधीवास ) अशीं तीन वस्त्रें वापरीत. डोक्याला बांधावयाचेंहि वस्त्र ( उष्णीष ) असे. त्या काळीं बहुधा कपडे लोंकरीचे असत. मध्ययुगांत ( हर्षकालीं ) वस्त्रें कशीं असत याचे नमुने त्या वेळचें मूर्तिशिल्प पाहिलें म्हणजे कळतें. पौराणिक काळीं बहुधा आतांसारखीं सर्व प्रकारचीं वस्त्रें होतीं. मुसलमानी अमदानीपासून हिंदु पोषाखांत फरक पडूं लागला व इंग्रज अमदानींत तर पाश्चात्य वळणाचे सर्व कपडे आले.

आजवरची पोषाखांतील विविधता आणि बदल जुन्या चित्रांवरून समजण्यासारखीं आहेत. भिंतींवरील चित्रावून प्राचीन मिसरी लोकांचे कपडे काय होते हें समजतें. एक लुंगीसारखें वस्त्र नेसलेलें असे. पुढें झगा आला. बाबिलोनी लोकांची लुंगीच असे. ग्रीक लोकांनीं मात्र लांब शर्ट घालण्याची प्रथा पाडली. यावर एक झगा कधीं घालीत. ग्रीकांचा 'चिटॉन' शर्ट हाच रोमन लोकांनीं थोड्या फरकानें 'ट्युनिका' म्हणून वापरला. श्रीमंत लोक ट्युनिकावर 'टोगा' घालीत. गॉल लोकांचा पोषाख प्राच्य पद्धतीचा असे. ते लांब विजार वापरीत व पायांत कातड्याचे चढाव घालीत. ब्रिटनमध्येंहि हाच पोषाख असे. बायका ट्युनिकावर जाकीट घालीत. जेत्यांचा पोषाख चहूंदिशीं उचलला जातो हा अनुभव रोमनांपासूनचा आहे. क्रूसेडचीं धर्मयुद्धें जेव्हां सुरू झालीं तेव्हां निरनिराळ्या राष्ट्रांतील पोषाखांतील भिन्नता कमी होऊं लागली. फ्रेंच आणि स्पॅनिश लोकांच्या पोषाखांतील आवडीनिवडी पुढील काळांत सर्वत्र उचलल्या जाऊं लागल्या. आज युरोपांत फॅशनच्या बाबतींत फ्रेंचांना पुढें करतात.

आपल्याकडे मराठ्यांच्या अमदानींत सामान्यतः पुरुष धोतर नेसत; स्वारीस जातांना मात्र विजार, तुमान, तुंबा अथवा पायजमा असे. तुंबा मशरूचा करीत. त्याला पीत लावीत व त्याचें अस्तर आंबव्याचें म्हणजे आंब्याच्या रंगाच्या कापडाचें असे. तुंब्याच्या नाड्या रेशमी व किंमतवान् असत. सोवळ्यांत पीतांबर वापरीत. *अंगांत अंगरखे घालीत. अंगरखे छिटी,* रेशमी, किनखापी असे सर्व तऱ्हेचे असत. थंडीकरितां रुईचे अंगरखे करीत. महामुदी नांवाचें सुती तलम कापड मिळे, त्याचे झगे व अंगरखे करीत. ह्या कापडाचे ठराविक वजनाचे तुकडे असत. अशा प्रत्येक तुकड्याला महामुदी म्हणत व त्याची किंमत १६ रुपयांवर असे.

मंदील, रुमाल, फेटा, तिवट, पागोटें, पगडी, व टोपी हे शिरोभूषणाचे प्रकार होते. टोपी मुलें घालीत. पूर्वी पागोट्यापेक्षां तिवट हा शब्दच अधिक प्रचारांत होता. फैजपूर, कळसपाक, नांदेड, कोटगिरी, जालना, पैठण, श्हाडे, वगैरे ठिकाणीं तिवटें-पागोटीं होत असत. ह्याशिवाय जुनरी तिवटाचाहि जुन्या कागदांतून उल्लेख आला आहे. छिटी टोप्यांप्रमाणें छिटी फेटे वापरीत. हल्लींप्रमाणें बांधीव पगड्या असाव्या असें वाटतें. लहान मुलांकरितां कुंची असे व बाळंतविड्यावर कुंची नेत. मुलांच्या टोप्या–विशेषतः मुंजींत–किनखापाच्या अथवा मखमलीच्या असत. अंगावर घेण्याचीं दोन प्रकारचीं वस्त्रें असावीत. साधें सुती वस्त्र म्हणजे धोतरजोडा; अंगावर पांघरावयास हें धोतर घेत. उपरणें हल्लीं एकेरी असतें तसें पूर्वी वापरीत नव्हते. उपरणें हा शब्दहि आढळत नाहीं. अंगवस्त्राचा धोतरजोडा नेसावयास उपयोगी पडे व त्याची किंमत १॥ ते ५॥ रु. अशा सुमारास असे. श्रीमंतांच्या वापरण्यांत दुपेटा येत असावा.

बायकांचीं नेसावयाचीं लुगडीं वीस हात सुद्धां असत. छिटें नेसण्याची हौस विशेष असावी असें दिसतें. हिरव्या रंगाचीं रेशीमकांठी पातळेंहि स्त्रियांना आवडत. बायकांचा प्रवासी पोषाख पुरुषांसारखा असे. पायांत विजार, अंगांत अंगरखा व डोकीस टोपी असें वर्णन बायकांच्या पोषाखाचें केलेलें आढळतें. सुवासिनी अंगावर शेला किंवा दुपेटा घेत, तर विधवा धोतरजोडा अंगवस्त्र म्हणून वापरीत.

छिटाचा पोषाख लोकप्रिय होता असें दिसतें. छिटाचा अंगरखा, छिटाचा फेटा, छिटाचा झगा, छिटी हातरुमाल, *छिटी पातळें, छिटी फर्दें, छिटी टोपी, छिटी तिवट, ह्याप्रमाणें* सर्व पोषाख छिटी कापडाचा असे. छिटाप्रमाणें शेल्याचाहि अनेक प्रकारें उपयोग करीत. अंगरखे, झगे शेल्याचे करीत. परंतु शिवाय अंगवस्त्र म्हणूनहि शेला वापरीत. ह्याखेरीज अस्तराकरितां शेल्याचा उपयोग करीत. तसेंच पांघरावयास व पलंगपोसास म्हणून शेले वापरण्यांत येत. दोरव्याचे शेले असत. जाड्याभरड्या पातळ विणीच्या कापडास खेंडा शेला म्हणत.

हें जुन्या महाराष्ट्रांतील पोषाखासंबंधीं झालें. हिंदुस्थानांतील मुसलमानांचे पोषाख कसे असत याची कांहीं कल्पना मोंगल *बादशहांच्या लग्नप्रसंगींचीं व इतर चित्रें उपलब्ध आहेत, त्यां*वरून येते. शहाजहानच्या वेळेस हिंदू आणि मुसलमान यांच्या पोषाखांत सारखेपणा आला. मुसलमानी स्त्रियाहि साडी वापरूं लागल्या व पुरुष पागोटीं घालूं लागले.

हिंदुस्थानांत प्रांतपरत्वें पोषाखांत विविधता आहे. अगदीं दक्षिणेकडे फक्त एक लुंगी नेसून पुरुष घराच्या बाहेरचेहि व्यवहार करतात. धोतर नेसण्याची जुनी पद्धत बहुतेक सर्व प्रांतांतून हिंदूंमध्यें आढळते. इंग्रजी अमदानीपासून अंगरख्याऐवजीं कोट आला. रुमाल व पगडी बहुतेक प्रचारांतून गेली आहे. टोपीहि कांहीं दिवसांनीं जाईल. पूर्वी समारंभाचा पोषाख वेगळा असे, पण आतां तो निराळा करण्याची वहिवाट मोडत चालली आहे. धार्मिक संस्कारांतीलहि विशिष्ट पोषाख बहुतेक गेले. पण विशिष्ट दरबाराचे विशिष्ट पोषाख अद्यापि टिकून आहेत.

**पोसेन**—पोलंड, पोसेन कौन्टीचें मुख्य ठिकाण. लो. सं. २,४६,६९८. महायुद्धापूर्वी येथील किल्ल्यांमध्यें दोन लक्ष पुस्तकांचें ग्रंथालय असे. कांहीं काळ महायुद्धांत पोसेन हें जर्मनीकडे होतें. शेतकीचीं यंत्रें, खतें, लोंकरी आणि लिनन कापड, वाहनें, वगैरे करण्याचे कारखाने आहेत. कांहीं इमारती फार सुंदर आहेत.

**पोहणें**—पोहण्याची कला प्राण्यांना स्वाभाविक असते म्हणतात; पण माणसाला ती शिकावी लागते व सवयीनें ही कला चांगली येते. समुद्रांत लवकर पोहतां येतें व आज पोहण्याचे तलाव जे सर्व साधनांनीं सज्ज असतात त्यांत बुडण्याची भीति फारच कमी असते. सामन्यांच्या खेळांत गति, विशिष्ट प्रकार, मागची झेप, इ. गोष्टी पाहतात. पोहण्याच्या कलेंत विविध झेपी शिकावयाच्या असतात. उदा., छातीची झेप, मागची झेप, मागें सरकत जाणें, हात टाकणें, इ.. पोहणारांना ज्या सोयीच्या पडतील त्या त्यांनीं उपयोजून प्राविण्य मिळवायचें असतें. पोहण्यांत बरेच विक्रम झालेले आहेत. १८७५ सालीं वेच यानें प्रथमच इंग्लिश खाडी पोहून जाण्याचा विक्रम केला. त्यानंतर पुष्कळांनीं इंग्लिश खाडी पोहून पार केली. अनेक तास पाण्यावर एकसारखें तरंगत राहण्याचेहि विक्रम केले जातात.

पोहणें हें केव्हां सुरू झालें यावद्दल निश्चित असें सांगतां येत नसलें, तरी कृष्णावतारापासूनचा कांहीं पुरावा उपलब्ध आहे; पण पद्धति कोणती होती हें मात्र सांगतां येत नाहीं. कालिदासाच्या काव्यांतून 'जल–विहारा'बद्दल सुंदर अशीं वर्णनें आहेत. मोंगल–मराठे यांचें सैन्य नद्यांना महापूर आला असतां नदीपार झाल्याचीं इतिहासांतहि वर्णनें आहेत. प्रत्येक सैनिकास पोहतां येणें, ही एक आवश्यक बाब होती; पण कला या दृष्टीनें तिला कांहीं शास्त्रीय महत्त्व दिलें गेल्याचें आढळून येत नाहीं. वरच्या हातानें पोहण्याचा परिपाठ बराच होता एवढें दिसून येतें.

पाश्चात्य इतिहासांत पाहतां 'क्रॉल' पद्धतीनें पोहून एका बुडणाऱ्यास वांचविल्याचा उल्लेख सांपडतो, तो इ. स. पूर्वी १००० वर्षांचा आहे. म्हणजे त्या काळींसुद्धां पोहण्याची कला तिकडे बरीच पुढारलेली होती असें अनुमान काढण्यास हरकत नाहीं. पण या पद्धतीचें विवेचन कांहीं कोठें उपलब्ध नाहीं. नंतरच्या काळात पोहण्याचीं अनेक सुखसोयींनीं सज्ज अशीं स्थळें होतीं व त्यांत सर्व क्षेत्रांतील मोठमोठी मंडळी हौसेनें भाग घेत असत. त्यामुळें सर्वसाधारण जनतेचाहि कल तिकडे वळलेला होता.

मुद्रणकला अस्तित्वांत आल्यानंतर गेल्या १५०–१७५ वर्षांत पाश्चात्यांमध्यें या कलेच्या शास्त्रीय विवेचनास सुरुवात झाली. तेव्हां हें पुस्तकी ज्ञान पद्धतशीरपणें प्रत्यक्ष कृतींत उतरविण्याकरितां संस्था निर्माण होऊं लागल्या. सिंक्लेअर, हॅरी फॉक्स्, फ्रॅंक्लिन, पोप यांच्या बहुमोल लिखाणाच्या आधारें पोहण्याच्या कलेचा शास्त्रीय दृष्टीनें विचार होऊन निरनिराळ्या प्रकारांचें संशोधन होऊं लागलें. पोहणारांची उमेद वाढविण्यासाठीं व संशोधनाची तपासणी होऊन तें अखंड चालू राहण्यासाठीं सामने भरविण्याची कल्पना पुढें आली. याचा इष्ट तो परिणाम म्हणजे पोहणाऱ्यांच्या संख्येंत झपाट्यानें वाढ होऊं लागली. त्याबरोबरच पोहण्याच्या संस्थांची संख्याहि वाढीस लागली. साहजिकच घटना व नियम तयार झाले. अमेरिकेंत इ. स. १७८० मध्यें एक संस्था स्थापन झाली, पण या कलेंतील भरीव कामगिरी त्यानंतर ८० वर्षांनीं म्हणजे इ. स. १८६० मध्यें स्थापन झालेल्या इंग्लंडमधील संस्थेनेंच केली आहे.

अशा प्रकारें कांहीं काल गेल्यानंतर संस्था–संस्थांमध्यें अगर प्रादेशिक अशा शर्यती होत असत. नंतर जागतिक सामने घडविण्याची कल्पना उदय पावूं लागली. ह्या वेळपर्यंत पोहण्याच्या अनेक प्रकारांचें शास्त्रीकरण झालेलें होतें. तसेंच शर्यत, सुरुवातीची उडी, वॉटर पोलो, सूरादि उड्या, बुडल्यास वांचविण्याच्या पद्धती, इत्यादि नानाविध प्रकारांची त्यांत भर पडली होती. कलेचा प्रचार व प्रसार यांबरोबरच नवीन नवीन कल्पनांना जन्म देण्यांत इंग्लंडनें बराच पुढाकार घेतला होता. त्यांच्यांत पोहणारेहि चांगले होते. या सर्व गोष्टींमुळें त्यांच्यांत एक प्रकारें अभिमानी वृत्ति दिसून येत होती. अशा सुमारास इ. स. १९०० मध्यें ऑस्ट्रेलियांत पोहण्याचे जागतिक सामने घेण्यांत आले; पण त्यांत बहुतेक स्थानिक लोकच विजयी झाले. १९२४ पासून अमेरिका पुढें सरसावूं लागली. मुद्दाम शिक्षक ठेवून लायक असे उमेदवार तयार करण्यांत आले. सुप्रसिद्ध जलतरणपटु जॉनी वेसमुल्लर ऊर्फ टारझान हा याच वेळीं पुढें आला. १०० ते ८००० मीटरपर्यंतच्या सर्व शर्यती त्यानें जिंकून १०० मीटरमध्यें जो उच्चांक निर्माण केला आहे तो अद्यापपर्यंत कोणत्याहि ऑलिम्पिकमध्यें उल्लंघिला गेलेला नाहीं. १९२८ मध्यें ह्या दोन वाबीं-

खेरीज सर्व पारितोषिकें अमेरिकेनेंच मिळविलीं. १९३६ मध्यें जपानच बहुतेक बाबींत विजयी झाला. नंतर दुसरें महायुद्ध उद्भवलें व १९४८ सालपर्यंत सामने होऊं शकले नाहींत.

**पोळा**—चैंदूर. हा शेतकामाच्या बैलांचा सण आहे. माणूस उपजीविकेसाठीं सर्वस्वीं शेतीवर अवलंबून आहे व त्या शेतीचा मुख्य आधार म्हणजे बैल होय. तेव्हां वर्षांतून एखादा दिवस तरी बैलाला मानाचें स्थान देण्याची बुद्धि शेतकऱ्याला व्हावी यांत नवल नाहीं. पावसाळ्यांतील शेतीचीं कामें उरकलीं म्हणजे पोळा सण साजरा करतात. त्यामुळें सर्वत्र एकच तिथि ठरलेली नाहीं. कोंकणांत ज्येष्ठी पौर्णिमेस, साताऱ्याकडे आषाढी पौर्णिमेस तर देशावर श्रावण किंवा भाद्रपद अमावास्येला पोळा होतो. पोळ्याच्या दिवशीं बैलांना तेल-हळदीनें मळून त्यांना शृंगारतात व गांवांतून त्यांची मिरवणूक काढतात. त्यांना खिचडी, खीर, अंडीं, इ. खावयास देतात. मातीचे बैल करूनहि त्यांची पूजा करण्यांत येते.

ऋषिपंचमीच्या दिवशीं बायका बैलाच्या श्रमाचें कांहीं खात नाहींत, ही गोष्ट पोळ्याप्रमाणेंच बैलाचें महत्त्व दर्शविणारी आहे.

**पोळें**—मधमाशांनीं मध व आपलीं अंडीं ठेवण्याकरितां मेणाचें केलेलें, अनेक कप्पे असलेलें घर. मधमाशा प्रथम आपल्या उदराच्या वळ्यामध्यें लांबट वाटोळ्या थेंबाच्या स्वरूपांत फुलांतून शोषलेला मध जमा करतात. पोळें हें अनेक लहान लहान कप्प्यांचें केलेलें असतें. हे कप्पे बहुधा षट्कोनाकृति असतात व त्यांचे एकावर एक दोन थर असतात. पण त्यांचीं तोंडें बाहेरच्या बाजूस असतात. या कप्प्यांत मध किंवा अंडीं ठेवण्यांत आल्यावर त्यांचीं तोंडें मेणानें बंद करण्यांत येतात. यांपैकीं एका वांकड्यातिकड्या मोठ्या कप्प्यांत राणी माशी असते.

**पौड**—मुंबई, पुणें जिल्हा, हवेली तालुका. पुण्याच्या पश्चिमेस वीस मैलावर मुळा नदीच्या कांठीं असलेला गांव. हें मुळशी पेट्याचें मुख्य ठिकाण आहे. भाताच्या व्यापाराची ही एक मोठी पेठ आहे.

**पौरोहित्य**—(उपाध्याय, पुरोहित पाहा.). व्यवहारांत स्वास्थ्य-संरक्षणाच्या अनेकविध उपायांत दैवी शक्तीचें साहाय्य मिळवणें हा एक उपाय आहे. परंतु ही सर्वसामान्य व्यक्तींच्या आटोक्यांतली गोष्ट नसते. कांहीं विशिष्ट व्यक्तींनाच तें साधतें व त्यामुळें त्या व्यक्ती आणि त्यांचा वर्ग यांना कांहीं विशेष महत्त्व व स्थान हीं समाजाकडून मिळतात. सामान्यतः अशा प्रकारचीं माणसें कोणत्याहि विशिष्ट जातिधर्माचीं नसून तीं वाटेल त्या जातिधर्म-पंथाचीं असत. परंतु पुढें त्याचाच एक स्वतंत्र वर्ग, पंथ वा जात होत गेली. प्रारंभीं जशी समाजाची बाल्यावस्था होती तीस अनुसरून जादूटोणा, मंत्रतंत्र, वगैरे करणारा इसम पुरोहिताच्या स्थानीं असे. समाजाच्या उन्नतीबरोबर याहि वर्गाची बौद्धिक व सामाजिक उन्नति होत गेली. वैदिक काळीं पुरोहितवर्ग होता. हळूहळू हें काम केवळ ब्राह्मण जातीकडे आलें. इतर देश व धर्म यांच्या इतिहासाकडे पाहिलें तर त्यांच्यामध्येंहि असे वर्ग आहेतच. उदा., 'आथ्रवन' हा जुना इराणी पुरोहित, 'मंगी' हाहि एक पश्चिम इराणी पुरोहित, 'वू' नांवाचा चिनी, वगैरे. पूर्वकालीं या वर्गास लोकमान्यता व राजमान्यता होती.

वेदसंहिता आणि ब्राह्मणें या काळांत पौरोहित्यांत यज्ञयाग व इतर धार्मिक कृत्यें येत. पौराणिक काळात याशिवाय राजशासन, धनुर्विद्या, ज्योतिष, मंत्रविद्या, इ. अधिक ज्ञानाची अपेक्षा आली व पुरोहितांचा दर्जाहि वाढला व त्याचे अनेक वर्ग झाले. पुरोहितांच्यावर धर्मगुरु आले. ग्रामपुरोहिताची आवश्यकता आजहि कमी झालेली नाहीं.

पुरोहिताचें कर्म वा अधिकार तें पौरोहित्य. पुरोहित ब्राह्मण पाहिजे, असें हिंदुधर्मशास्त्रांत आहे. पुरोहित नसलेल्या क्षत्रिय राजाचें अन्न देव भक्षण करीत नाहींत, असें ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलें आहे. देवांचा पुरोहित बृहस्पति होता हें प्रसिद्धच आहे. याग नसेल तेव्हां धर्माधर्म सांगण्याकरितां राजाला राज्यकारभारात पुरोहिताची मदत लागते. सध्यां सरकार आफ्रन्याला सल्ला देण्यासाठीं अधिकारी नेमतात. त्याच योग्यतेचे हे पुरोहित पूर्वी होते. उदा., दशरथाचा-रामाचा पुरोहित वसिष्ठ. पुरोहिताला सर्व विद्यांत पारंगत असावें लागे. यज्ञयाग बंद पडल्यावर पुरोहिताचें महत्त्व कमी झालें. तथापि अगदीं थोड्या काळापूर्वीपर्यंत प्रत्येक कुटुंबाचा एक निश्चित पुरोहित अथवा उपाध्याय असून त्याचें त्या कुटुंबांत वजन असे. सारांश, पूर्वी पौरोहित्य हा ब्राह्मणांचा प्रतिष्ठित व वजनदार धंदा होता.

**प्युनिक युद्धें**—रोम आणि कार्थेज यांमध्यें सिसिलीच्या मालकीसाठीं जीं अनेक युद्धें झालीं त्यांना म्हणतात. पहिलें खि. पू. २६४-२४१ व दुसरें खि. पू. २१८-२०१ व तिसरें खि. पू. १४९-१४६ या काळांत झालें. पहिल्या दोन्ही युद्धांत कार्थेजचा पराभव झाला. तिसऱ्या युद्धांत तीन वर्षांच्या वेढ्यानंतर कार्थेज शहर बेचिराख करण्यांत आलें.

**प्युनिक लिपि**—हिला कार्थेजियन असेंहि नांव आहे. लिपीची उत्पत्ति फिनिशियन लिपीच्या सिडोनी शाखेपासून झाली. या लिपीचे सर्वांत जुने लेख खि. पू. ३ ऱ्या शतकांतील असून ते कार्थेज व मार्सेल्स येथें सांपडले आहेत. नाणीं मात्र खि. पू. ५ व्या शतकापासून १ ल्या शतकापर्यंतचीं मिळतात. यानंतर या लिपीस जें बरेंचसें मोडी व अपकृष्ट स्वरूप आलें तें उत्तर आफ्रिका व स्पेन येथें सांपडलेल्या नाण्यांवर दिसून येतें.

सहारामधील भटकणाऱ्या रानटी लोकाची हल्लींची लिपि प्युनिक लिपीच्या न्युमेडियन शाखेपासून निघाली असावी असा अंदाज आहे.

**प्युमा**—मार्जारवर्गीतील मोठ्या प्राण्यांपैकीं एक. याचें

वसतिस्थान अमेरिका. याला 'डोंगरी सिंह' असेंहि म्हणतात. मागें एकदां रॉकी पर्वतांत पुष्कळसे प्युमा सांपडले होते; पण आता ते कमी सांपडतात. प्रौढ प्युमा ६ फूट लांब असून त्याचें वजन २०० पौंड भरतें. वर पिंगट, गळा, छाती व पायांच्या आंतील बाजू हीं पांढरीं व मुसकट आणि शेपटीचें टोंक हीं काळीं असतात. हे प्राणी झाडाझुडपांतून राहतात व सहसा माणसांवर झडप घालीत नाहींत. तसे क्रूरहि नसतात. तथापि शेळयामेंढ्यांचा हे फन्ना उडवतात. एकाच मोहिमेंत एक प्युमा निदान शंभर मेंढ्या मारतो. यामुळें मेंढपाळांना हा मोठा शत्रु वाटणें साहजिकच आहे.

**प्युमिस**—हा पदार्थ ज्वालामुखीच्या मुखांतून बहुधा बाहेर येत असतो. याचा रंग करडा, पांढरा, तांबडसर, पिंगट किंवा काळा असा निरनिराळया प्रकारचा असतो. तो कठिण, खरबरीत आणि सच्छिद्र असतो. याचा उपयोग हस्तिदंत, लांकूड, संगमरवर, धातू, कांच, वगैरेस झिलई देण्याकरितां करण्यात येतो. तसेंच चामडें किंवा चर्मपृष्ठ याचा पृष्ठभाग गुळगुळीत करण्याकरितांहि याचा उपयोग करतात.

**प्युरिटन पंथ**—हें नांव प्रथम इंग्लंडांतील प्रॉटेस्टंट लोकांना देण्यांत आलें; कारण या प्युरिटन लोकांचें मत असें होतें कीं, इंग्लंडांत जी धर्मसुधारणा झाली ती अपुरी होती; कारण ६ व्या एडवर्ड राजानें प्रस्थापित केलेल्या प्रॉटेस्टंट पंथीं ॲंग्लिकन चर्चमध्यें रोम येथील कॅथॉलिक चर्चमधील धर्मविधी व धार्मिक संस्कार बरेच कायम ठेवण्यात आले. १५७२ सालीं सरे परगण्यांतील वँड्सवर्थ येथें एक प्रेस्बीटरचा भाग तयार करण्यांत आला. आणि प्रेस्बिटेरियन पंथाला अनुयायी धर्मोपाध्याय व सामान्य लोक यांतून मिळाले. शिवाय 'ब्राउनिष्ट' नांवाचा आणखी एक पंथ निघाला. त्यांनाच पुढें 'इंडिपेंडंट' (स्वतंत्र) पक्ष हें नांव प्राप्त झालें. या पंथाचा प्रेस्बिटेरियन व एपिस्कोपल या दोन्ही पंथाना विरोध होता. प्युरिटन पंथांतलेच हे दोन उपपंथ असून त्यांच्यामध्यें फरक फारच थोडा होता. १ ला जेम्स राजा प्युरिटन पंथाचा पुरस्कर्ता होईल, अशी प्युरिटन लोकांना आशा होती, ती निष्फळ झाली. कारण 'हॅम्पटन कोर्ट कॉन्फरन्स' या बैठकींत जेम्स राजानें या प्युरिटन लोकांनीं केलेल्या अल्पस्वल्प मागण्याहि मान्य केल्या नाहींत; पण या जेम्स राजाच्या कारकीर्दीतच प्युरिटन पंथाचा जोर वाढत गेला. पुढें १ ल्या चार्लस राजाविरुद्ध ज्या पार्लमेंटरी पक्षीयांनीं हत्यार उचललें त्यांत कांहीं प्युरिटन होते, पण बहुतेक जण प्रेस्बिटेरियन होते. १ ल्या चार्लस राजाच्या वेळच्या यादवी युद्धांत विजय मिळविलेले सैनिक इंडिपेंडंट पंथाचे होते व त्यांचा पुढारी ऑलिव्हर क्रॉमवेल होता. क्रॉमवेल सत्ताधीश झाल्यावर प्रेस्बिटेरियन पंथ रोडावला, आणि इंग्लिश प्युरिटन पंथ 'इंडिपेंडंट' या नांवानें प्रबल झाला. नंतर २ रा चार्लस राजा गादीवर आला, त्या वेळीं पुन्हां पूर्वींचा ॲंग्लिकन पंथ राजधर्म बनला. आणि प्युरिटन पंथ हा प्रेस्बिटेरियन, इंडिपेंडंट, आणि बॅप्टिस्ट या तीन पंथात विभागला गेला होता.

**प्रकाश**—प्रकाशमान पदार्थापासून जी लहरीरूप शक्ति निघते तीस प्रकाश असें म्हणतात. प्रकाशमान पदार्थांत उत्पन्न होणारे कंप ईथरमध्यें येतात व त्या माध्यमाच्या द्वारां हवेमध्यें लहरी म्हणून पसरतात. त्यांचा वेग दर सेकंदास १,८६,००० मैल असतो.

कोणत्याहि एकरूप माध्यमांतून जाणाऱ्या प्रकाशलहरी सरळ दिशेनें व एकाच गतीनें जात असतात. असा प्रकाश जेव्हां एखाद्या प्रकाशमान वस्तूपासून बाहेर पडत असतो तेव्हां त्या प्रकाशाचें दीप्तिमान, प्रकाशमान पदार्थाच्या अंतराच्या वर्गाशीं व्यस्त प्रमाणांत असतें. निरनिराळया प्रकाशमान पदार्थांची दीप्ति मोजण्याच्या क्रियेस आणि अशा प्रकाशमान पदार्थापासून विशिष्ट पृष्ठभागावर ठराविक दीप्तीचा प्रकाश पाडण्याची क्रिया यास प्रकाशमापन असें म्हणतात. जेव्हां एखाद्या पदार्थावर प्रकाश पडतो तेव्हां त्याचें परावर्तन, शोषण किंवा पारगमन होतें. जेव्हां प्रकाशाचें परावर्तन एखाद्या पृष्ठभागापासून सर्व दिशांनीं होतें तेव्हां त्यास विकीरण असें म्हणतात व याच अनियमित प्रकाशपरिवर्तनाच्या साहाय्यानें आपणास आपल्या सभोंवतीं असलेले निरनिराळे पदार्थ दृष्टीस पडतात. जेव्हां एखाद्या पृष्ठभागांतून प्रकाश पलीकडे जातो तेव्हां त्यांतील कांहीं अंश त्या पदार्थामध्यें

शोषला जातो व त्या पृष्ठभागाचा रंग व स्वरूप हीं प्रकाशापासून आपणास ज्ञात होतात. निरनिराळ्या आरशांचे गुणधर्म व त्या आरशांपासून पडणाऱ्या प्रतिमा आणि त्यांचें स्वरूप यांचें ज्ञान प्रकाशाच्या परावर्तन या गुणामुळें होतें. जेव्हां प्रकाश एका पारदर्शक माध्यमांतून दुसऱ्या पारदर्शक माध्यमांत जातो तेव्हां दुसऱ्या माध्यमांतून जातांना त्याची गति व सामान्यतः दिशाहि बदलते. अशा वेळीं प्रकाशाचें वक्रीभवन होतें, म्हणजे ते किरण या दोन माध्यमांच्या दरम्यान असलेल्या पृष्ठभागाशीं थोडेसे वांकतात. हवेंतून जाणारे किरण जेव्हां एखाद्या हवेपेक्षां घन अशा पाणी किंवा कांच यांसारख्या पृष्ठभागांतून जातात तेव्हां त्यांचें ते ज्या बिंदूवर पडतात त्या बिंदूपासून निघणाऱ्या लंबाच्या दिशेकडे वक्रीभवन होतें. प्रकाशाचे किरण त्रिपार्श्वांतून किंवा भिंगांतून पलीकडे जात असतात. त्यांच्या दिशेमध्यें जो फरक होतो अथवा ते खालीं वांकतात, व त्यांच्या ज्या प्रतिमा पडतात त्यांचें ज्ञान आपणास वक्रीभवन या गुणधर्मापासून मिळतें. जेव्हां प्रकाश संमिश्र स्वरूपाचा असतो तेव्हां त्याचें निरनिराळ्या रंगांमध्यें जें पृथक्करण होतें तेंहि या वक्रीभवनामुळेंच होय. प्रकाशांतील निरनिराळ्या रंगांचें पृथक्करण निरनिराळ्या वक्रीभवन–कारक पदार्थांच्या साहाय्यानें करण्याचें कार्य विकीरण या गुणधर्मामुळें होतें.

निरनिराळ्या प्रकाशाचे वर्णपट घेणें, या वर्णपटांचें वर्गीकरण करणें व त्यांचा अभ्यास करणें हें पदार्थविज्ञानशास्त्री, रसायनशास्त्री व ज्योतिषी यांस अत्यंत महत्त्वाचें आहे. रोमर नांवाच्या डेन्मार्क देशांतील ज्योतिषशास्त्रज्ञानें सन १६७५ मध्यें गुरूच्या, चंद्राच्या ग्रहणांच्या कलांचें निरीक्षण करून प्रकाशाच्या गतीचें मापन केलें. ब्रॅडले या इंग्रज ज्योतिषशास्त्रज्ञानें ताऱ्यांपासून निघणाऱ्या प्रकाशाचें जें अपेरण होतें त्याच्या साहाय्यानें प्रकाशाचें मापन केलें. फिजो, फोकॉल्ट आणि इतर शास्त्रज्ञ यांनीं प्रकाशाची गति पृथ्वीवरील विशिष्ट ठिकाणांतील अंतरांवरून मोजली. प्रकाशाच्या लहरींची गति व निरनिराळ्या वर्णपटांतील पट्टे यांचा अभ्यास प्रकाशांतील प्रतिरोध या गुणधर्मामुळें करण्यांत येतो. प्रकाशलहरींची लांबी आपल्या सामान्य व्यावहारिक मापांच्या मानानें फार लहान असल्यामुळें त्या एखाद्या कोपऱ्याशीं फारशा वळूं शकत नाहींत. तरी त्या थोड्याशा वळूं शकतात. ही गोष्ट एखाद्या हातरुमालांतून दूर अंतरावर असलेल्या दिव्याकडे पाहिलें असतां आपल्या लक्षांत येते. या गुणधर्मास विवर्तन ( डिफ्रॅक्शन ) असें म्हणतात. जेव्हां एखाद्या प्रकाशाच्या माध्यमावर, उदा., एखाद्या आरशांतून परावर्तन पावलेलें किरण किंवा एखाद्या स्फटिकांतून आरपार गेलेले किरण किंवा एखाद्या ताण असलेल्या माध्यमांतून गेलेले किरण यावर जो एक प्रकारचा परिणाम होतो त्यास ध्रुवीभवन असें म्हणतात. सामान्य प्रकाशाच्या बाबतींत त्यामधील कंपांची दिशा प्रकाशाच्या लहरींच्या दिशेच्या काटकोनांत असते. परंतु ध्रुवीभूत किरणाच्या प्रकाशांतील कंपांची दिशा एका विशिष्ट पद्धतीनें ठरलेली असते.

**प्रकाशकणसिद्धांत**—हा प्रकाशविषयक जुना सिद्धान्त असून त्याप्रमाणें प्रकाशमान वस्तूपासून अत्यंत सूक्ष्म असे प्रकाशाचे कण बाहेर पडत असतात, असें प्रतिपादन करण्यांत येत असे. हे कण डोळ्यांवर पडल्यामुळें आपणांस प्रकाशाची संवेदना होते असें मानण्यांत येत असे. न्यूटन हा ह्या सिद्धान्ताचा पुरस्कर्ता असून मोठ्या चातुर्यानें त्याचें समर्थन करीत असे. अलीकडे प्रकाशलहरीसिद्धांत पुढें आल्यामुळें हा आतां मागें पडला आहे. परंतु अलीकडे विद्युच्छक्तीचें अणुशक्तीय स्वरूप, वगैरे नवीन अर्वाचीन शोध लागत चालल्यापासून व किरणविसर्जनासंबंधीं नवीन संशोधन सुरू झाल्यापासून कांहीं शास्त्रज्ञांचें या सिद्धांताकडे व त्यापासून नवीन उपलब्ध होणाऱ्या ज्ञानाच्या शक्यतेकडे अधिकाधिक लक्ष लागत चाललें आहे.

**प्रकाशक शक्ति**—( कँडल-स्टँडर्ड पॉवर ). अलीकडे निरनिराळे दिवे प्रचारांत असतात. तेव्हां त्यांच्या प्रकाशमानाची तुलना करावी लागते. याकरितां प्रचारांत आपण 'कँडल पॉवर' किंवा मेणबत्तीचा उजेड हें प्रमाण वापरतों व अमुक दिवा अमुक मेणबत्त्यांचा उजेड देतो असें म्हणतों. निरनिराळ्या देशांत याकरितां निरनिराळे दिवे प्रमाण म्हणून वापरण्यांत येतात. ब्रिटनमध्यें व्हर्नर हारकोर्टचा पेंटेन दिवा म्हणजे एक प्रकारच्या पॅराफिननें जळणारा दिवा वापरतात. हा १० मेणबत्त्यांचा उजेड देतो. फ्रान्समध्यें कार्सेल दिवा प्रमाण मानतात. यांत कोल्झा नांवाचें मोहरी किंवा सरसू यासारख्या बियांचें तेल जाळतात. याचा प्रकाश ९·६२ मेणबत्त्यांचा असतो. जर्मनीमध्यें हेफ्नेर या नांवाचा दिवा प्रमाण मानतात. यांत ॲमिल असिटेट पिजर तेल वापरतात. याचा प्रकाश ०·९ मेणबत्तीएवढा असतो. विजेच्या जळत्या तारांच्या दिव्यातील उजेड एका वॅट प्रमाणाला ०·८ मेणबत्तीएवढा असतो.

**प्रकाशजन्य संयोग**—( फोटोसिन्थेसिस ). वनस्पतींमध्ये जें हरित द्रव्य ( क्लोरोफिल् ) असतें त्याच्या वातावरणांतील कर्बद्विप्राणिद ( कॉर्बन-डायाक्साइड ) याचें सेंद्रिय द्रव्यामध्यें जें रूपांतर होतें त्यास म्हणतात. या व्यापारांतील रासायनिक क्रियेचें अद्यापि पूर्ण ज्ञान झालेलें नाहीं. या व्यापाराची एक उपपत्ति अशी आहे कीं, कर्बद्विप्राणिद आणि पाणी यांचें

रूपांतर पिपीलमद्यानार्द्र( फॉर्मॅलडीहाईड )मध्यें होतें, आणि प्राणवायु बाहेर पडतो. या पिपीलमद्यानार्द्र द्रव्याचें पुन्हा फलशर्करे( ग्लूकोज )मध्यें व इतर कर्बोज्जितांमध्यें रूपांतर होतें.

**प्रकाशध्रुवीभवन**—( पोलरायझेशन ऑफ लाइट ). कांहीं पदार्थांतून प्रकाशाचे किरण जात असतां त्या किरणांमध्यें परावर्तनानें किंवा वक्रीभवनामुळें जो गुणधर्मांत फरक होतो त्यास ध्रुवीभवन असें म्हणतात. हा फरक आपल्या डोळ्यांस सहज दिसून येत नाहीं. जेव्हां एखादा प्रकाशकिरण एखाद्या साध्या कांचेच्या पृष्ठभागावर तिरपा पडतो तेव्हां त्या किरणांपैकीं प्रकाशाचा कांहीं अंश परावर्तन पावतो व कांहीं अंशांचें वक्रीभवन होतें. या परावर्तित व वक्रीभूत प्रकाशकिरणांमध्यें मूळ किरणांपेक्षां निराळे गुणधर्म उत्पन्न होतात. परावर्तित किरण जर दुसऱ्या पृष्ठभागावर पडले तर त्यांचें तितक्याच सहजतेनें सर्व दिशांनीं पुन्हां परावर्तन होत नाहीं, तर दुसरा परावर्तक जसा फिरत राहतो त्या मानानें मूळ आगमकोण ( अँगल ऑफ इन्सिडेन्स ) तितकाच ठेवला असतां हा प्रकाश प्रथम तेजस्वी व नंतर मंद असा एकामागून एक दिसूं लागतो. यास प्रकाशाचें आंशिक ध्रुवीभवन असें म्हणतात. हें ध्रुवीभवन जेव्हां कांचेच्या परावर्तकावर पडणाऱ्या किरणाचा आगमकोण ५७$\frac{१}{२}$° असतो तेव्हां उच्चतम असतें. या कोनास ध्रुवीभवन कोन असें म्हणतात. वक्रीभूत किरणाचेंहि आंशिक ध्रुवीभवन होतें. जेव्हां दुहेरी वक्रीभवन होणाऱ्या स्फटिकामधून प्रकाशकिरणांचें वक्रीभवन होतें तेव्हांहि प्रकाशाचें ध्रुवीभवन होतें. एखाद्या आइस्लंड शिरगोळया( स्पार )च्या चौकोनी तुकड्यांतून एखाद्या पांढऱ्या कागदावरील काळया ठिपक्याकडे पाहूं लागलों तर आपणांस एका ठिपक्याऐवजीं दोन काळे ठिपके दिसूं लागतील. नंतर हा तुकडा जर कागदावर फिरविला तर एक काळा ठिपका दुसऱ्याभोंवतीं फिरत असलेला दृष्टीस पडेल. यावरून प्रकाशकिरणांपैकीं एका किरणाचें नियमाप्रमाणें वक्रीभवन होतें व दुसऱ्याचें होत नाहीं असें आपणास दिसून येईल. यावरून एका किरणास सामान्य किरण व दुसऱ्या किरणास असामान्य किरण असें म्हणण्यांत येतें. सामान्यतः दुहेरी वक्रीभवन करणाऱ्या स्फटिकामधून दोन किरण बाहेर पडतात. परंतु अशा सर्व पदार्थांमध्यें एक किंवा दोन अशा दिशा असतात कीं, त्या दिशांतून गेलेल्या किरणांचे दोन किरणांमध्यें विभजन होत नाहीं. या दिशांस दृगक्ष ( ऑप्टिक ॲक्सिस ) असें म्हणतात, व ज्याप्रमाणें त्या स्फटिकामध्यें एक किंवा दोन दृगक्ष असतील त्याप्रमाणें त्या स्फटिकास एकाक्ष किंवा द्व्यक्ष असें म्हणतात. तोरमल्लीच्या चिपा जर त्याच्या अक्षाशीं समांतर दिशांमध्यें कापल्या व त्यांची जाडी सुमारें १० इंच असली तर सामान्य किरण त्यांच्यावर पडला असतां त्याचें त्या चिपा पूर्ण शोषण करतात. आणि अशा तोरमल्लीच्या दोन चिपा एकावर एक काटकोनांत ठेवल्या तर या काटकोन करणाऱ्या भागाच्या ठिकाणीं काळा भाग दृष्टीस पडून एक उत्तम प्रकारचा लहानसा प्रकाशध्रुवीभवनदर्शक (पाहा) तयार होतो. प्रकाशाचें ध्रुवीभवन करणारा दुसरा स्फटिक म्हटला म्हणजे निकोलचा त्रिपार्श्व होय. हा आइस्लंड शिरगोळया( स्पार )चा करण्यांत येतो. या त्रिपार्श्वांतून फक्त असामान्य किरण बाहेर पडतो. दोन निकलचे त्रिपार्श्व घेऊन ते एकमेकांवर आडवे ठेविले असतां एक काळा भाग दिसूं लागतो व त्या दोन त्रिपार्श्वांमध्यें जर एक दुहेरी वक्रीभवन करणारा स्फटिक ठेवला तर हा काळा भाग पुन्हां प्रकाशमान होतो. प्रकाशध्रुवीभवनदर्शक यंत्र, शर्करांशमापक ( सॅकरीमीटर) यंत्र आणि भूस्तरशास्त्रास लागणारा सूक्ष्मदर्शक या सर्वांमध्यें निकोलचा त्रिपार्श्व हा एक महत्त्वाचा भाग असतो.

जेव्हां निकोलचे दोन त्रिपार्श्व एकमेकांवर आडवे ठेवले असतां त्यांच्या मध्यंतरीं एक गारेची चीप तिच्या अक्षाशीं काटकोनांत कापलेली अशी ठेविली आणि त्यावर एकवर्णात्मक प्रकाशकिरण पाडले तर त्या प्रकाशपृथक्कारकांतून प्रकाश आरपार निघून जातो. या ठिकाणीं प्रकाशाचें ध्रुवीभवन होत असतें. मात्र. या ध्रुवीभवनाची पातळी गारेच्या चकतीमधून जात असतांना भ्रमण पावत असते. हा गुणधर्म गारेखेरीज इतरहि कांहीं पदार्थांमध्यें दृष्टीस पडतो व तो अत्यंत महत्त्वाचा व्यावहारिक उपयोगाचा असतो.

**प्रकाशध्वनिवाहक**—( फोटोफोन ). प्रकाशकिरणाच्या साहाय्यानें ध्वनीचें स्थानांतर करणाऱ्या यंत्रास प्रकाशध्वनिवाहक म्हणतात. याचा शोध प्रथम १८७८ मध्यें बेल आणि पेंटर यांनीं टेलिफोन तयार करतांना लावला. यांतील तत्त्व असें : जेव्हां सोमक( सेलेनियम ) धातूच्या विद्युद्घटावर एखादा प्रकाशकिरण पडतो तेव्हां त्या घटाची विद्युद्रोधक शक्ति कमी होते, आणि ज्या घटमालेंत असा घट असेल अशा विद्युद्घटमालेंतून अधिक जोराचा प्रवाह नेतां येतो. एका लवचिक परावर्तक पडद्यावर एका आरशांतून सूर्याचा किरण पाडण्यांत आला, व नो या परावर्तक पडद्याच्या योगानें परावर्तित करून एका संदेशग्राहक ठिकाणीं ठेवलेल्या परवलयाकृति ( पॅरॅबोलिक ) आरशावर पाडण्यांत आला. या आरशामुळें या कवडशांतील किरण एका विद्युद्घटमालेंतील सेलेनियम विद्युद्घटावर केंद्रित करण्यांत आले. ही घटमाला बॅटरीशीं व टेलिफोनशीं मालांनीं जोडलेली होती. जेव्हां बोलणाऱ्याचा आवाज या प्रक्षेपक पडद्यावर पडला तेव्हां तो पडदा आवाजांतील कंपा-

प्रमाणें कंप पावूं लागला. यामुळें सेलेनियम घटावर केंद्रित केलेल्या प्रकाशाची तीव्रता या कंपास अनुसरून कमीअधिक होऊं लागली. म्हणजे ह्या प्रकाशाची तीव्रता ध्वनिलहरींच्या कंपनसंख्येप्रमाणें बदलूं लागली, व याप्रमाणें ध्वनिलहरींचें रूपांतर प्रकाशलहरींत होऊं लागलें. यामध्यें ए. ओ. रँकिन यानें पुढें पुष्कळच सुधारणा केली. आज बोलपटामध्यें या तत्त्वाचा मोठ्या प्रमाणावर प्रत्यक्ष उपयोग केलेला आपल्या दृष्टीस पडतो.

**प्रकाशनिरीक्षण**—(फोटोग्रॅमेट्री). प्रकाशलेखनाच्या साहाय्यानें निरीक्षण करण्याच्या पद्धतीस प्रकाशनिरीक्षण म्हणतात. या पद्धतींत थेओडोलाइट दुर्बीण किंवा सपाट टेबल यांच्याऐवजीं कॅमेराचा उपयोग करण्यांत येतो, आणि पृष्ठभागावर ज्या ज्या वस्तूंच्या प्रतिमा दिसूं शकतात, त्या त्या वस्तूंपर्यंत कॅमेरापासून किरण काढतां येतात. अशा रीतीनें दोन ठिकाणांहून प्रकाशलेख घेतले म्हणजे त्या प्रकाशलेखांत ज्या ज्या वस्तू दृष्टीस पडतील त्यांचें स्थान या दोन ठिकाणांहून निघणाऱ्या किरणांच्या छेदबिंदूंवरून निश्चित करतां येतें. अर्थात् हीं कॅमेरा ठेवण्याचीं दोन्ही ठिकाणें भोंवतालच्या वस्तूंपासून निश्चित किती अंतरावर आहेत हें माहीत असावयास पाहिजे.

**प्रकाशमापन**—(फोटोमेट्री). दोन निरनिराळ्या प्रकाशदायक वस्तूंपासून मिळणाऱ्या प्रकाशाच्या तीव्रतेची तुलना करणाऱ्या शास्त्रास प्रकाशमापनशास्त्र म्हणतात. जर $ल_1$ व $ल_2$ या वस्तूंपासून $र_1$ व $र_2$ या अंतरांवरून सारखाच प्रकाश मिळत असेल तर पुढील सिद्धांत निघतो : $\frac{ल_1}{र_1^2}=\frac{ल_2}{र_2^2}$ किंवा $\frac{ल_1}{ल_2}=\frac{र_1^2}{र_2^2}$. हा सिद्धांत सर्व प्रकाशमापन-गणिताच्या मुळाशीं आहे. बुन्सेनच्या प्रकाशमापकामध्यें दोन प्रकाशदायक वस्तूंमध्यें एक तेलाचा ठिपका पाडलेला कागद धरण्यांत येतो, व तो ठिपका दोन्ही बाजूंनीं एकसारखा दिसेल अशा रीतीनें त्या प्रकाशदायक वस्तू सरकविण्यांत येतात, व त्यांच्या अंतराच्या प्रमाणावरून त्यांचें प्रकाशाचें प्रमाण काढतां येतें. त्यांतील एका प्रकाशदायक वस्तूच्या प्रकाशाचें मेणबत्तीच्या प्रकाशाशीं असणारें प्रमाण ठाऊक असल्यास दुसऱ्याहि वस्तूचें प्रमाण काढतां येतें.

**प्रकाशम्, टी.** (१८७२-   )—एक आंध्र पुढारी. असहकारितेच्या चळवळींत यांनीं चांगली मिळकत होत असलेली वकिली सोडून दिली. हे स्वराज्य प्रिंटिंग व पब्लिशिंग कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत. यांनीं ब्रह्मदेश व मलाया यांमध्यें प्रचाराकरितां दौरा केला. १९२६ मध्यें हे मध्यवर्ती असेंब्लीमध्यें निवडून गेले. १९३० मध्यें राजीनामा देऊन बाहेर पडले. १९३० मध्यें यांस मिठाचा सत्याग्रह केल्याबद्दल शिक्षा झाली. पुन्हां १९३२ मध्यें आणखी दुसऱ्यांदां शिक्षा झाली. १९३५ मध्यें हे आंध्र प्रांतिक काँ. कमिटीचे अध्यक्ष झाले व त्याच वर्षी ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे सभासद झाले. हे 'स्वराज्य' या पत्राचे संपादक होते. या पत्रास 'आंध्र केसरी' असें म्हणत असत. १९३८ सालीं ते काँग्रेस-मंत्रिमंडळात जमीन-महसूल खात्याचे मंत्री होते. १९४६-४७ या काळांत ते मद्रास प्रांताचे पंतप्रधान होते. आतां हे मद्रास विधिमंडळांत विरोधी पक्षाचे नेते आहेत.

**प्रकाश-रसायनशास्त्र**—(फोटो-केमिस्ट्री). रसायनशास्त्राच्या ज्या शाखेमध्यें रासायनिक क्रियेचा व प्रकाशाचा संबंध दाखविला जातो त्यास प्रकाशरसायनशास्त्र असें म्हणतात. प्रकाश-लेखन किंवा छायाचित्रण, तसेंच वनस्पती सूर्याच्या प्रकाशापासून शक्ति घेऊन वातावरणांतील कर्ब आत्मसात् करतात ती क्रिया, वगैरे या शास्त्राचीं महत्त्वाचीं उदाहरणें आहेत.

**प्रकाशलहरि सिद्धांत**—प्रकाशाचा लहरिसिद्धांत प्रथम ख्रिश्चन ह्युइजेन्स यानें १६९० च्या सुमारास प्रतिपादन केला. परंतु त्यास प्रकाश सरळ रेषेंत कसा प्रसार पावतो हें नीट उलगडून सांगतां येईना व त्यामुळें हा सिद्धांत त्या वेळीं मान्य झाला नाहीं. सुमारें एक शतकभर न्यूटनचा उत्सर्जन (एमिशन) सिद्धांतच लोकामध्यें प्रचलित राहिला. हा सिद्धांत असा होता कीं, कारंज्याच्या नळींतून ज्याप्रमाणें पाण्याचे कण बाहेर पडतात त्याप्रमाणें प्रकाश हा एक कणाचा फवारा असतो. यानंतर सन १८०२ मध्यें यंग या शास्त्रज्ञानें प्रकाशास होणाऱ्या प्रतिबंधाचें तत्त्व शोधून काढून लहरिसिद्धांतामध्यें सुधारणा केली व त्यानंतर फ्रेस्नेल यानें १८१६ मध्यें अनेक लेखांमध्यें लहरिसिद्धांताचें इतकें विस्तृत विवेचन केलें कीं, हा सिद्धांत सर्वत्र मान्य करण्यात आला. फ्रेस्नेल यानें असें दाखविलें कीं, प्रकाशाच्या लहरी या तिर्यक् अथवा आडव्या असतात. तसेंच त्यानें प्रकाशलहरी ज्या माध्यमांतून जात असतात त्या ईथरच्या गुणधर्मांचें संशोधन केलें आणि प्रकाशाचें परावर्तन होत असतांना किंवा तो एखाद्या स्फटिकांतून पलीकडे जात असतां त्याच्या शक्तीचा क्षय किती होतो याचें प्रमाण शोधून काढलें व तें आतांपर्यंत केलेल्या प्रयोगांमध्यें अबाधित राहिलें आहे. फ्रेस्नेल याच्या मताप्रमाणें ईथर हें एक घनद्रव्य असून त्यामध्यें प्रकाशाचे होणारे कंप इतर द्रव्यांच्या कणांमध्यें होणाऱ्या कंपांप्रमाणेंच असतात. यानंतर अनेक गणितज्ञांनीं या बाबतींतील

संशोधन अधिक सूक्ष्म रीतीनें करण्याचा प्रयत्न केला. अखेरीस १८६५ मध्यें क्लार्क मॅक्स्वेल यानें आपला विद्युच्चुंबकसिद्धांत प्रतिपादन केला. या सिद्धांताप्रमाणें असें मानण्यांत येतें कीं, प्रकाशलहरी ही एक विद्युच्छक्तीची लहरी असून तिचा चुंबक-लहरीशीं संयोग झालेला असतो. या दोन शक्ती परस्परांशीं काटकोन करणाऱ्या दिशांनीं जात असतात, व लहरीच्या मार्गाच्या दिशेशींहि त्या काटकोन करीत असतात. क्लार्क मॅक्स्वेल याचा सिद्धांत विद्युच्चुंबकीय क्षेत्रासंबंधीं समीकरणावर आधारलेला आहे. आणि न्यूटनच्या गुरुत्वाकर्षण सिद्धांताचें जितकें महत्त्व ज्योतिषशास्त्रामध्यें आहे तितकेंच याचें महत्त्व विद्युच्छास्त्रांत आहे. हीं समीकरणें अगदीं साधीं व सरळ सांगण्यासारखीं नाहींत. त्यांतील एक समीकरणांचा गट विद्युत्प्रवाह नेत असलेल्या तारेनें उत्पन्न झालेल्या विद्यु-च्चुंबकीय क्षेत्रामध्यें जी चुंबकीय शक्ति निर्माण झालेली असते तिच्यावरून काढलेल्या सर्वसामान्य सिद्धांताच्या स्वरूपाचा आहे, व दुसरा गट फॅरडे यानें संशोधन केलेल्या विद्युत्प्रवाह-प्रवर्तनासंबंधींच्या नियमावरून काढलेल्या सर्वसामान्य सिद्धां-ताच्या स्वरूपाचा आहे.

या मॅक्स्वेलच्या सिद्धांताकडेहि सन १८८७-८८ पर्यंत दुर्लक्षच करण्यांत आलें होतें. परंतु त्या वर्षी हर्ट्झ या शास्त्रज्ञानें आपल्या प्रयोगशाळेंत प्रकाशलहरीपेक्षां पुष्कळच मोठी लहरीची लांबी असलेल्या विद्युत्चुंबकीय लहरींचें अस्तित्व दिग्दर्शित केलें. त्या वेळीं मॅक्स्वेलच्या सिद्धांतास मोठ्या उत्साहानें पुष्टि देण्यांत आली. अगदीं अलीकडे कांहीं शास्त्रीय चमत्कारांचे शोध लागले आहेत. त्यांवरून उलट असें दिसूं लागलें आहे कीं, क्षकिरण किंवा प्रकाश यांचें प्रसरण सामान्य लहरींच्या गतीनें होत नसून न्यूटनच्या उत्सर्जन नियमासारखेंच परंतु कणांच्याऐवजीं शक्तिपुंजाच्या (क्वॉन्टम सिद्धांत) उत्सर्जनानें होत असावें. तथापि अनेक पदार्थविज्ञानशास्त्रज्ञांचें असें मत आहे कीं, लहरीसिद्धांतामध्यें अद्यापि फारसा मूलतः फरक करण्याचें कारण नाहीं. शक्तिपुंज अथवा शक्तिकण हीं परमाणूंमध्यें होणाऱ्या कांहीं तरी अंतर्गत भेदामुळें बाहेर पडणाऱ्या शक्तीचा संचय असावा. या शक्ति-कणसिद्धांताच्या पुरस्कर्त्यांना अद्यापि प्रकाशाच्या गतीमध्यें होणारे फरक उदा., प्रतिबंध, विवर्तन, ध्वनीभवन, इत्यादि गोष्टींचा बरोबर उलगडा करतां आला नाहीं.

**प्रकाशलेखन**—(फोटोग्राफी). कॅमेरा पाहा. प्रकाशाच्या साहाय्यानें चित्र काढण्याच्या कलेस प्रकाशलेखन म्हणतात. प्रकाशलेखन कलेमध्यें मुख्य दोन क्रिया असतात : (१) कॅमेरा अथवा प्रकाश-पेटीच्या साहाय्यानें एखाद्या वस्तूची प्रतिमा उठविणें, व (२) ती प्रतिमा रासायनिक क्रियेनें स्थिर करणें. यानंतर एक ऋण प्रतिमा तयार झाली म्हणजे तिच्यापासून धन अथवा दृश्य प्रती लागतील तितक्या तयार करणें ही एक क्रिया असते. सन १८०२ मध्यें टॉम वेजवूड व हंफ्रे डेव्ही यांनीं रॉयल इन्स्टिटयूटकडे कागदावर घडणाऱ्या

**छायाचित्रपेटिका** (कॅमेरा आब्स्क्युरा)

रजतनत्रेताच्या क्रियेसंबंधीं प्रयोगाची कांहीं माहिती पाठविली; परंतु तीमध्यें प्रतिमा स्थिर करण्यासंबंधीं कांहीं मजकूर नव्हता. यानंतर १८३५ मध्यें विल्यम हेन्री फॉक्स टालबॉट यानें लॅकॉक ॲबे नांवाच्या आपल्या घराच्या चित्राची ऋण प्रतिमा कागदावर उठविली. १८४१ मध्यें टालबॉट यानें एका पद्धतीचा मक्ता घेतला, त्यास त्यानें कॅलोटाइप असें नांव दिलें, पण लोकांनीं तीस त्याच्या नांवावरून टालबोटाइप नांव ठेवलें. याच वर्षी व्हिएन्ना विद्यापीठ येथील गणिताचा प्राध्यापक जोसेफ पेट्झवल यानें व्यक्तिचित्रें काढणारीं भिंगें (लेन्स) शोधून काढल्यापासून या कलेंत पुष्कळ प्रगति झाली. १८४० मध्यें सर जॉन हर्शेल यानें कांचेवर ऋण प्रतिमा घेण्यास सुरुवात केली; पण या कांचेवर रासायनिक लेप किंवा पापुद्रा नसे. हा लेप किंवा पापुद्र्याची कल्पना १८४८ मध्यें निएप्से द सेंट व्हिक्टर यानें काढली. प्रथम हा लेप अंड्याच्या बलकाचा केलेला असे. १८५१ मध्यें फ्रेडरिक स्कॉट आर्चर यानें कोलोडियनचा पत्रा वापरण्यास सुरुवात केली. व ऋण प्रतिमेवरून धन प्रतिमा बनविण्यास प्रारंभ केला. यानंतर कोलोडियनच्या ओल्या पत्र्याऐवजीं जिले-टिनचा पत्रा अथवा पडदा वापरूं लागले. हा प्रघात १८७१ मध्यें डॉ. आर्. एल्. मॅडॉक्स यानें पाडला. पुढें १८८० मध्यें जॉर्ज ईस्टमन यानें जिलेटिनचे कोरडे पत्रे बाजारांत आणले. यानंतर भिंगांमध्यें सुधारणा झाली. कारण रासायनिक किरणांचें केन्द्र दृश्य किरणांच्या केन्द्रापेक्षां निराळें असतें. याकरितां

सध्यांचें भिंग वर्णपेरणाचा परिणाम शक्य तितका कमी करणारें (अॅक्रोमॅटिक) असतें. प्रकाशलेखनाकरितां लागणारीं भिंगें विशिष्ट केंद्र म्हणजेच केंद्रांतरांचीं म्हणून वर्णन करण्यांत येतें. याचा अर्थ भिंगाच्या मागील कांचेपासून अगर पडद्यापासूनचें अंतर होय. हा पडदा भिंगापासून अशा अंतरावर पुढेंमागें सरकवून बसवितात कीं, त्या भिंगांतून ज्याचें चित्र काढावयाचें तो पदार्थ बरोबर केन्द्रांत दिसतो व त्याजवळचे व पलीकडचेहि पदार्थ केन्द्रांत दिसतात. याकरितां भिंगापुढें जें उघडें छिद्र असतें तें या केंद्रांतराप्रमाणें कमीअधिक उघडें ठेवतां येतें किंवा झाकतां येतें. याकरितां कॅमेऱ्यावर खुणा केलेल्या असतात व त्या खुणांचा अर्थ या छिद्राचा व्यास आणि केन्द्रांतर यांतील प्रमाण हा होय. यामुळें जेव्हां छिद्राचा व्यास एक इंच असतो व केन्द्रांतर ८ इंच असतें तेव्हां F/8 अशी खूण असते. हें छिद्र सर्वांत मोठें असतें. यानंतर F/16, F/22.6, F/32, F/45, आणि F/64 अशा खुणा असतात. कोडॅकच्या अमेरिकन पद्धतीमध्यें F/4 हा एक च्या जागीं असतो व F/64 च्या जागीं 256 हा आकडा असतो. या पद्धतींत पहिल्या एक (किंवा F/8) या ठिकाणीं जितका वेळ प्रकाश द्यावा लागतो त्याच्या दुप्पट-चौपट याप्रमाणें अधिक पटींनीं वाढता वेळ प्रकाश द्यावा लागतो.

ज्या संवेदनक्षम पडद्यावर प्रकाशाच्या साहाय्यानें चित्र उठविण्यात येतें तो कांचेचा किंवा कचकड्याचा (काष्ठद्रव्याचा) पत्रा यावर स्थिर करावा लागतो. कांचेपेक्षां कचकड्याच्या पट्टीला तिप्पट किंमत पडते. पण ही पट्टी दिवसां कॅमेऱ्यांत भरतां येते व दिवसां धुऊन तयार करतां येते. म्हणून अधिक सोयीस्कर असते. या पट्टीवरील संवेदनक्षम पडदा हा जिलेटिनचा असून त्यावर रजतब्रुमिदा(सिल्व्हरब्रोमाइड)चे कण पसरलेले असतात. जेव्हां या पट्ट्या धुऊन चित्रें स्पष्ट करण्यांत येतात तेव्हां प्रतिमा स्फुट करण्याकरितां व धुण्याकरितां वापरलेल्या द्रवमिश्रणानें ज्या ठिकाणीं या पट्टीवर सूर्यप्रकाश पडलेला असतो त्या ठिकाणचे ब्रुमिदा(ब्रोमाइड)चे कण धुऊन निघून जातात व फक्त रजत राहतें व ज्या ठिकाणीं सूर्यप्रकाश पोंचत नाहीं तो भाग तसाच राहतो. हा जो भाग कायम राहतो त्यांतील क्षार धुऊन काढावे लागतात, नाहीं तर त्यांच्यावर मागाहून प्रकाशाचा परिणाम होऊं शकतो. ते प्रतिमा स्थिर करणाऱ्या द्रावणामध्यें धुऊन काढण्यांत येतात. प्रतिमा स्फुट करण्याकरितां जें द्रावण वापरण्यांत येतें त्यांत मुख्यतः पुढील प्रकारचीं द्रव्यें असतात: (१) प्रतिमा स्फुट करणारें द्रव्य (डेव्हलपिंग एजंट); (२) त्यास मदत करणारें किंवा तीव्रता वाढविणारें द्रव्य (ऑक्सिलरेटर); व (३) स्तम्भक (रिटार्डर). चौथ्या एका द्रव्याच्या साहाय्यानें हें मिश्रण स्वच्छ राखण्याचें कार्य होतें. स्फुटकारक द्रव्य हें बहुधा पायरोगॅलिक अम्ल वगैरे असतें. साहाय्यक द्रव्य एखादा क्षार (अल्कली) असतो किंवा अॅसिटोन किंवा पिपीलमद्यानार्द्र(फार्मॉल्डिहाइड) हींहि द्रव्यें या कामाकरितां वापरण्यांत येतात. स्तम्भक हा बहुधा पालाशब्रुमिद (पोट्याश ब्रोमाइड) असतो व स्वच्छ करणारें द्रव्य बहुधा सिंधुगंधकाइत (सोडियम सल्फाइट) असतें. कांचेवरील प्रतिमेंत छायाप्रकाशाचा व्यत्यास झालेला असतो, म्हणजे काळ्याच्या जागीं पांढरा व पांढऱ्याच्या जागीं काळा रंग असतो. प्रकाशप्रतिमा अनेक प्रकारच्या द्रव्यांनीं घेतां येतात, परंतु सामान्यतः रजताचीं लवणें मुख्यतः वापरण्यांत येतात. अगदीं प्रथमतः जे कागद प्रतिमा उठविण्याकरितां वापरण्यांत येत असत त्यामध्यें त्या कागदास कोणतेंहि द्रव्य लावण्यांत येत नसे. नंतर त्यावर बलकाचा थर देण्यांत येऊं लागला. या कागदावर घेतलेली प्रतिमा सिंधुगंधकिदाच्या (हायपोसल्फाइड ऑफ सोडा) साहाय्यानें स्थिर करण्यांत येत असे, पण तिला चांगला रंग येत नसे. तो येण्याकरितां सोन्याचें किंवा प्लॅटिनमचें द्रावण वापरण्यात येऊं लागलें. यानंतर निरनिराळ्या प्रकारचे कागद निघाले. ब्रोमाइड कागदावरहि प्रतिमा घेण्यांत येऊं लागल्या.

प्रकाशलेखनकलेचा चित्रपट करण्याकडेहि उपयोग होतो. या कलेमुळें पुस्तकांतील चित्रें तयार करतां येतात. क्ष-किरणांच्या साहाय्यानें चित्रें घेतां येतात, त्याप्रमाणेंच आकाशाच्या देखाव्यांचीं व ताऱ्यांच्या वर्णपटाचीं चित्रें काढतां येतात. धातूंच्या रचनेचा अभ्यास करण्याच्या कामींहि या कलेचा उपयोग होतो. विमानविद्येमध्यें वैमानिकांस खालील प्रदेशाचीं चित्रें घेतां येतात; तसेंच भूनिरीक्षणा (सर्व्हे)च्या कामीं स्थापत्यविशारदास या कलेचा उपयोग होतो.

अतिनील किरणांच्या साहाय्यानेंहि प्रकाशलेखनचित्रें घेतां येतात, तसेंच अतिरक्त किरणांपासूनहि चित्रें काढतां येतात. हे दोन्ही प्रकारचे किरण प्रत्यक्ष डोळ्यांस दिसत नाहींत.

पदार्थांच्या त्यांच्या नैसर्गिक रंगांत प्रतिमा घेण्याची कलाहि पूर्णतेस पावत आहे. पण ही प्रकाशलेखनाची पद्धति साधी नाहीं. कांचेची एक बाजू आळीपाळीनें तांबड्या, हिरव्या व निळ्या पिष्ठरेणूंनीं आच्छादून शीघ्रग्राही (सेन्सिटिव्ह) पट तयार करतात. नंतर या रेणूंवर इंद्रधनुष्याच्या सर्व रंगांना आलोकग्राहीभूत (सेन्सिटाइज्ड) असणारा एक द्रव ओततात. हा पट कॅमेरामध्यें अशा रीतीनें ठेवतात कीं, कांचेचा पृष्ठभाग लेन्सच्याकडे राहावा. म्हणजे आलोकग्राहीभूत फिल्मकडे पोंचण्यापूर्वीं प्रकाश रंगीत पिष्ठरेणूंतून जाईल. नंतर प्रकाशित पटाचें परिवर्धन (डेव्हलपमेंट) करून सरळ कांच केली असतां ती रंगीत पदा-

र्थोची हुबेहूब प्रतिमा होते. या सरळ कांचेवरून तीन किंवा चार रंगांतील चित्रें छापतां येतात. पण अद्यापि रंगीत कांचेवरून रंगीत चित्रें छापण्याची कला पूर्णतेस गेलेली नाहीं.

**प्रकाशविकारी तारे**—ताऱ्यांपैकीं बरेचसे अधूनमधून कमीजास्त प्रकाश देतांना दिसतात. उदाहरणार्थ, ययाति नक्षत्रपुंजांतील एक तारा ( B Persei ) अलगोल म्हणजे दैत्य या नांवानें अरब लोकांत प्राचीन कालापासून प्रसिद्ध आहे. कारण हा डोळा मिचकावतो आहे असें वाटतें. या ताऱ्याचा प्रकाश ठराविक वेळीं कमीजास्त होतो.

**प्रकाशविद्युत्परिणाम**—( फोटो इलेक्ट्रिक इफेक्ट ). प्रकाशाच्या योगानें जें वैद्युतिक कार्य होतें त्यास प्रकाशविद्युत्परिणाम म्हणतात. हा शब्द सामान्यतः घन पदार्थापासून विद्युत्कण निघण्याच्या क्रियेस लावतात. याचें तात्त्विक महत्त्व फार आहे. ही क्रिया प्रकाशानें उज्ज्वलित केलेल्या सर्व वस्तूंमध्यें दिसून येते, परंतु विशेषेंकरून धातूमध्यें ती सहज दृष्टोत्पत्तीस येते. धातूच्या वस्तूचा जो भाग प्रकाशानें प्रदीप्त केला जातो त्या भागापासून विद्युत्कण निघून ते कांहीं विशिष्ट कमाल गतीपर्यंतच्या वेगानें सर्व दिशांनीं जात असतात. ही कमाल गति प्रकाशाच्या तीव्रतेवर अवलंबून नसून त्या प्रकाशाच्या कंपनसंख्येवर अवलंबून असते हें विशेष होय. अल्कलीयुक्त धातूमध्यें हा चमत्कार सामान्य प्रकाशांत दृष्टोत्पत्तीस येतो. परंतु सामान्य धातूंच्या बाबतींत अतिनील किरणांच्या प्रकाशांत हाच मुख्य आढळतो. या परिणामाच्या प्रयोगापासून नवीन निघालेल्या पुंज( क्वांटम् ) सिद्धांतास बरीच बळकटी आलेली आहे.

**प्रकाशक्षेत्र**—( फोटोस्फीयर ). याचा अर्थ प्रकाशाची भूमि अथवा प्रकाशगोल होय. हा प्रकाशगोल म्हणजे सूर्याच्या पृष्ठभागावरील ज्या कवचापासून आपणांस प्रकाश मिळतो तो होय. ह्या प्रकाशगोलावर एक प्रत्यवर्तक थर असतो. त्यामध्यें प्रकाशाचें शोषण होऊन तेजोमुकुटापासून ( कोरोना ) व तेजोगोलापासून ( क्रोमोस्फीअर ) फ्राउन होफरच्या ( सूर्यवर्णपटांतील स्थिर काळ्या ) रेषा उत्पन्न होतांना दृष्टीस पडतात.

**प्रचंड पक्षी**—( डायनोरनिस ). ही एक पक्षहीन पक्ष्यांची जात आहे. यांच्या अनेक जातींचीं हाडें न्यू झीलंडमध्यें आढळून आलीं आहेत. यांपैकीं मोठे पक्षी सामान्यतः १२ फूट उंच असावे. यांचीं कांहीं हाडें शहामृगाच्या हाडांच्या दुप्पट आकाराचीं आढळतात. हे सतराव्या किंवा अठराव्या शतकापर्यंत अस्तित्वांत असावेत.

**प्रचंड सर्प**—( डायनोसौरिआ ). हे पालीसारखे पण प्रचंड सरपटणारे प्राणी आतां नष्ट झाले आहेत. यांपैकीं कांहीं ३ फुटांइतके लहान असले तरी अॅटलांटिक महासागरात ते ११५ फुटांपर्यंत लांब असावे. तृतीय व चतुर्थ युगाच्या मध्यंतरींच्या काळात कवचपृष्ठकालखंडांत पृथ्वीवर या प्राण्यांची वस्ती असावी.

**प्रचंड हत्ती**—१. ( डायनोथेरियम् ). हे हत्तीचे प्रचंड पूर्वज, सस्तन व सोंड असलेले, अवाढव्य आकाराचे एके काळीं सर्व पृथ्वीवर पसरलेले होते; पण आता ते नष्ट झालेले आहेत. याचे अवशेष युरोपमध्यें आढळले आहेत.

२. ( मॅमथ ). या हत्तींची जात आतां नष्ट झाली आहे. यांचे सांगाडे पाषाणासारखे बनलेले युरोप, आशिया, उत्तर अमेरिका, वगैरे खंडात आढळले आहेत. हे प्राणी पूर्वीच्या हिमयुगानंतर जिवंत असून मनुष्यप्राण्याच्या उत्पत्तीच्या कालात अस्तित्वांत असावे; कारण त्यांचे अवशेष मानवी अवशेषांबरोबर आढळून येतात. हे प्राणी उत्तर गोलार्धामध्यें बहुतेक सर्वत्र पसरलेले असावे. सायबेरिया प्रांतांत याचीं हाडें आणि सुळे मोठ्या प्रमाणांत आढळून आले आहेत. कांहीं कांहीं सागाडे संपूर्ण अवस्थेंतहि आढळलेले आहेत.

**प्रचितगड**—१. मुंबई, रत्नागिरी जिल्हा, संगमेश्वर तालुक्यांत शृंगारपूर नांवाच्या खेड्याशेजारीं सह्याद्रीच्या फांट्यावर हा किल्ला बांधलेला आहे. एका अंगास मळेघाट व दुसऱ्या अंगास दाक्षिण तिवरा घाट आहे. क्षेत्रफळ तीनचार एकर आहे. शिड्या लावल्याशिवाय किल्ल्यावर चढतां येत नाहीं. आंत पाण्याचा पुरवठा नाहीं. याला उचितगड असेंहि म्हणतात.

२. मुंबई, सातारा जिल्हा, वाळवें तालुक्यांत पेठच्या ईशान्येस ४० मैलांवर सह्याद्रीच्या फांट्यावर आहे. हा किल्ला चतुरसिंग नांवाच्या गोसाव्यानें १८१७ त बळकावला होता. पण तो तोतया होता. खरा चतुरसिंग त्रिंबकजी डेंगळ्यानें किल्ल्यावर १८१२ त कैद करून ठेवला होता, तेथें तो १८१८ त मरण पावला. १८१८ त कर्नल कनिंगहॅमनें हा किल्ला घेतला व तोतया चतुरसिंगास कैद केलें.

**प्रजापति ग्रह**—( युरेनस ). सूर्यमालेंतील एक मोठा ग्रह. हा नुसत्या डोळ्यांनीं दिसत नाहीं. १७८१ सालीं सर

विल्यम हर्शेलनें हा दुर्बिणीच्या साहाय्यानें शोधून काढला. हा पृथ्वीपेक्षां ७२ पट मोठा असून ८४ वर्षांत एक सूर्यप्रदक्षिणा करतो. याच्याभोंवतीं याचे चार चंद्र फिरत असतात. सूर्यापासून याचें अंतर १,७५,००,००,००० मैलांहून अधिक आहे.

**प्रजोत्पादन**—पुनरुत्पत्ति ही लैंगिक किंवा अलैंगिक पद्धतीनें होऊं शकते. लैंगिक पुनरुत्पादनामध्यें नर जातीचें बीजतत्त्व ( स्पर्मसेल किंवा स्पॅर्माटोझून ) स्त्रीजातीच्या बीजतत्त्वाशीं ( जर्मसेल ओव्हम् अथवा अंडें ) संयोग पावतें व त्यामुळें स्त्रीबीजतत्त्व बीजयुक्त होतें किंवा त्यामध्यें गर्भधारणा होते ; आणि त्याचा गर्भ बनतो. लैंगिक पुनरुत्पादनामध्यें कांहीं प्राणी उभयलिंगी असतात म्हणजे त्या प्राण्यांच्या शरीरातच पुरुष-जननेंद्रियें व स्त्री-जननेंद्रियें असतात व तीं स्वतः गर्भोत्पत्तिक्षम असूं शकतात; उदा, नारूचा किडा-याच्या प्रत्येक तुकड्यामध्यें पुं-स्त्री-जननेंद्रियांचा पुनरुत्पादनक्षम व अंडीं घालण्यास पात्र असा जोड असतो, किंवा ते परस्पर पुनरुत्पादक असूं शकतात. उदा., *गोगलगाईमध्यें एका उभयलिंगी प्राण्याचें* बीज दुसऱ्या उभयलिंगी प्राण्याच्या स्त्रीबीजाशीं संयोग पावावें लागतें. कांहीं प्राणी एकलिंगी असतात. यांमध्यें पुल्लिंग व स्त्रीलिंग हीं निरानिराळ्या स्वतंत्र व्यक्तींमध्यें असतात. यांपैकीं कांहीं जातीचे प्राणी अंडीं घालतात व त्यांपासून पुढें पिलें बाहेर पडतात. या वर्गांत बहुतेक मासे व पक्षी येतात. कांहीं गर्भांडयुक्त असतात. यामध्यें अंडीं फुटून पिलें बाहेर येईपर्यंत तीं अंडीं मादीच्या पोटातच राहतात. या वर्गांत कांहीं भूजलचर प्राणी आणि सरपटणारे प्राणी येतात. कांहीं प्राणी गर्भज असतात. या वर्गांत प्राणी जिवंत जन्मास येईपर्यंत मातेच्या पोटांत राहून तेथेंच त्याची पूर्ण वाढ होते. या जातींत सस्तन प्राणी व इतर उच्चवर्गीय प्राणी येतात. यांपैकीं कांहीं प्राण्यांत माता व गर्भ हीं वारेनें जोडलेलीं असतात. अलैंगिक पुनरुत्पादन यामध्यें कलिकोत्पादन आणि पेशीविभजन हे दोन प्रकार येतात.

**प्रज्वलन**—( इन्कॅन्डेसेन्स ). प्रखर उष्णतेमुळें प्रकाशमान होण्याची पदार्थांची अवस्था. ह्याचीं व्यवहारांतील उदाहरणें म्हणजे दिव्याची ज्योत आणि विजेच्या दिव्यांतील तारा. उष्णतामान जसजसें वाढत जातें तसतसें ह्या प्रकाशमान होणाऱ्या वस्तूंचे रंग बदलत जातात. ४००° श.च्या सुमारास मंद ताम्रूस रंग येतो. त्यानंतर तो वाढत जाऊन पिवळ्याची भर पडते व शेवटीं १,००० श. च्या सुमारास सर्व रंग येतात आणि वस्तु पांढरी दिसूं लागते.

विजेच्या दिव्यांत धातूच्या पातळ तारा विजेच्या प्रवाहानें प्रज्वलित होतात, तर गॅसच्या दिव्यांत शंक्वाकार 'मॅन्टल' ज्वालेवर ठेवून दिलेली असते व ती प्रज्वलित होते व त्यामुळें मोठा प्रकाश पडतो.

**प्रणामी पंथ**—यास खीजडा, चाकला, महाराज पंथ असेंहि म्हणतात. याचा संस्थापक प्राणनाथ. हा प्रेमभक्तीचा पंथ आहे. काठेवाड, गुजराथ, उत्तर हिंदुस्थान, बुंदेलखंड, वगैरे भागांत या पंथाचे लोक आहेत. या पंथास तेथें 'प्राणनाथी पंथ' असें नाव आहे. या पंथाचे लोक वैष्णव व मुसलमानी धर्मांचीं तत्त्वें मान्य समजतात. श्रीकृष्णाच्या बालमूर्तीचें ध्यान श्रेष्ठ समजतात. मूर्तिपूजा यांस मान्य नाहीं. ते तुळशीमाळा धारण करतात व वैष्णवाप्रमाणें उभा तिलक लावतात. यांचा प्रामाण्यग्रंथ प्राणनाथरचित 'कुलीयमस्वरूप' हा आहे. ( हिं. ध. दी.)

**प्रतापगड**—मुंबई, सातारा जिल्हा. जावळी तालुक्यांत मेढ्याच्या ईशान्येस २० मैलांवर व महाबळेश्वराहून आठ मैलांवर, पार व किन्हेश्वर या खेडयांच्या दरम्यानच्या फांटयावर हा किल्ला आहे. किल्ल्यांत शिरलें म्हणजे दरवाजाजवळ उजव्या हातास अबदुल्ला बुरूज आहे व पुढें किल्ल्यांत पूर्वेच्या बाजूस

भवानीचें देवालय आहे. किल्ल्याच्याभोंवतीं तट असून उत्तर व पश्चिम बाजूस ८०० फूट खोल कडे तुटलेले आहेत. याचे खालचा व वरचा असे दोन भाग आहेत. वरचा २०० यार्ड लांब-रुंद व खालचा ३५० *यार्ड लांब* व १३० *यार्ड रुंद* आहे. हा १६५६ मध्यें शिवाजीच्या आज्ञेनें मोरोपंत पिंगळे यानें बांधला व मधून मधून शिवाजी येथें राहत असे. गडाच्या पायथ्याशीं शिवाजी व अफझुलखान यांची इतिहासप्रसिद्ध भेट झाली व नंतर युद्ध झालें. सन १६६१ त शिवाजीनें भवानीचें देवालय बांधलें. १७७८ त सखारामबापूस येथें कैदेंत *ठेवण्यांत* आलें होतें.

**प्रतापगड**—संयुक्त प्रांत, फैजाबाद विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ १४५७ चौ. मै.. लो. सं. १०,४१,०२४. हवा कोरडी व चांगली. उष्णतामान ६०° ते ९२°. पर्जन्य ३८ इंच. गंगा व गोमती *यातून* वाहतात. *कित्येक गांवें बौद्धकालीन आहेत*. भाटाच्या दंतकथांतून या भागाचा इतिहास येतो. बेला हें

तालुका व जिल्हा यांचें मुख्य ठिकाण. माणिकपूर हें एक प्राचीन शहर आहे. प्रतापगड गांव १६१७ च्या सुमारास प्रतापसिंगानें वसविलें. १९ व्या शतकांत हें अयोध्येच्या सत्तेखालीं गेलें.

**प्रतापगड संस्थान**—दक्षिण राजपुतान्यांतील एक संस्थान. क्षे. फ. ८७३ चौ. मै. व लो. सं. (१९४१) ९१,९६७. याच्या उत्तरेस व वायव्येस उदेपूर, पश्चिमेस व नैर्ऋत्येस बांसवाडा, दक्षिणेस रतलाम व पूर्वेस शिंदे-होळकरांचा मुलूख आहे. उष्णतामान बेताचें असून पाऊस ३६ इंच पडतो. गहूं, ऊंस, मका, ज्वारी व हरभरा हीं मुख्य पिकें होत. अफूहि बरीच होते. कारखाने मोठेसे नाहींत. जानागड, शेवना, सोहागपूर, वगैरे ठिकाणीं प्राचीन इतिहासाच्या खुणा सापडतात. संस्थानची प्रजा बहुतेक भिल्ल व रानवट जातीची आहे.

संस्थानिक मेवाडच्या मोकल वंशांतील आहेत. प्रथम येथील राजे मोंगलाच्या अंकित होते ते पुढें होळकरांचे मांडलिक बनले. नंतर १८१८ त इंग्रजांचें स्वामित्व पत्करलें. संस्थानिकांना होळकर व इंग्रज सरकार या दोघांनाहि खंडणी द्यावी लागे. संस्थानचें उत्पन्न सु. साडेसहा लक्ष रु. आहे. मागचे संस्थानिक महारावत सर रामसिंगजी बहादुर हे १९२९ सालीं गादीवर बसले. व १९४९ च्या जानेवारींत मृत्यु पावले. आतां हें संस्थान बृहत्राजस्थानांत सामील झालें आहे.

**प्रतापराव गुजर** (मृ. १६७४)— एक मराठा सरदार. हा पंचहजारी सरदार शिवाजीचा फार विश्वासूक होता. मूळनांव कडतोजी, पण याच्या शौर्यामुळें प्रतापराव हें नांव पडलें. शिवाजी आग्र्यास गेला असतां मागें हा कडतोजी गुजर मुख्य सेनाधिकारी नेमलेला होता. विजापूरकरांतर्फे बहलोलखान नामक सरदार शिवाजीवर चाल करून आला असतां शिवाजीनें त्याचा मोड करण्याची कामगिरी प्रतापरावाकडे सोंपविली. मिरज व विजापूर यांच्या दरम्यान असणाऱ्या उंबराणी गांवीं दोन्ही सैन्यांची गांठ पडून घनघोर संग्राम झडला. पाण्यावांचून तडफडणाऱ्या बहलोलखानानें, "परत मराठ्यांच्या मुलुखाच्या वाटेस जाणार नाहीं", अशी शरणचिठ्ठी देऊन तिकोट्यास पाय काढला. तिकोट्यास त्यास परत विजापूरची ताजी कुमक मिळाल्यानें त्यानें परत प्रतापरावावर चाल केली. नेसरीच्या लढाईत एका खिंडींत प्रतापराव थोड्याशा सैन्यानिशीं लढत असतां धारातीर्थी मरण पावला. (नेसरीची लढाई पाहा.) नंतर प्रतापरावाच्या मुलीशीं शिवाजीनें राजारामाचें लग्न रायगडीं लावून दिलें (१६८०). व प्रतापरावाच्या सेवेचें चीज केलें. रावगडच्या युद्धाच्या वेळीं याचा एक वंश बाटल्यानें याच्या वंशांपैकीं एक घराणें मूळचें हिंदु व दुसरें बाटलेले मुसलमान असा भेद दिसून येतो. भोसरी गांव यास वतन देण्यात आलें होतें.

**प्रतापरुद्र काकतीय, दुसरा** (१२९१-१३२०)— वारंगळच्या काकतीय घराण्यांतील एक राजा. याची आई रुद्राम्मा. हिनें तीस वर्षें चांगल्या रीतीनें राज्य केल्यावर मुलाला गादीवर बसविलें. प्रतापरुद्रास रुद्रदेव महाराज, नवलक्ष धनुर्धरस्वामी असेंहि म्हणत. यानें देवगिरीचा रामदेव राजा ऊर्फ सेवण राजा याचा पराभव केला. सन १३०९ मध्यें दिल्लीच्या अल्लाउद्दीन महंमद खल्जीनें मलिक काफूरला याजवर पाठवलें. त्या वेळीं झालेल्या लढाईत यास अपयश येऊन तह करावा लागला व बरेंच द्रव्य खर्च करावें लागलें. याच वेळीं देवळें वगैरेंचा नाश करून मुसलमानांनीं यास फार त्रास दिला. सन १३२१ मध्यें यानें खंडणी बंद केल्यावरून घियासुद्दिननें यास आपला मुलगा महंमद तुघ्लक याजकरवीं दिल्लीस पकडून आणवलें (१३०९). (काकतीय राजवंश पाहा). विद्यानाथानें याच्याच नांवानें अलंकारशास्त्रावर प्रतापरुद्रयशोभूषण किंवा प्रतापरुद्रीय नांवाचा ग्रंथ लिहिला.

**प्रतापलंकेश्वर**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधककज्जली, अभ्रक, बचनाग, चित्रक, लोह, शंख, हीं मुख्य औषधें असून माकयाच्या रसांत खल करतात. बाळंतपणानंतर येणाऱ्या तापात हें मुख्य औषध आहे. तहान लागणें, बेशुद्धि असणें, भ्रम असणें, तीव्र ज्वर असणें, इत्यादि लक्षणें असतांना हें दिल्यानें बरें वाटतें. बाळंतपणानंतर होणाऱ्या धनुर्वातावरहि या औषधाचा चांगला उपयोग होतो. १ ते ३ गुंजा आल्याचा रस, मध यांबरोबर देतात.

**प्रतापवराळी**—हा राग खमाज थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत गांधार व निषाद हे स्वर वर्ज्य होतात व अवरोहांत निषाद वर्ज्य होतो. म्हणून याची जाति औडुव-षाडव आहे. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. उत्तरेकडे हा राग फारसा गायलेला दृष्टीस पडत नाहीं.

**प्रतापसिंह गुहिलोत, महाराणा** (१५४०-१५९७)— मेवाडचा एक शूर राजा. उदयसिंहाचा हा पुत्र. यानें अकबराचें सार्वभौमत्व न स्वीकारल्यामुळें याला मोंगलांशीं अखेरपर्यंत झगडा करावा लागला. राजा मानसिंह यानें प्रतापाचें मन वळविण्याचा फार प्रयत्न केला, पण व्यर्थ. हळदीघाटाच्याजवळ खमणोर येथें मानसिंहाच्या नेतृत्वाखालीं अकबराचें सैन्य महाराण्याच्या थोड्या सैन्याशीं निकरानें लढलें (१५५६). पण त्याला जय मिळवितां आला नाहीं. मोंगलांच्या सैन्यास वारंवार हुलकावण्या देऊन प्रतापराणा स्वतंत्रपणें वावरत असे.

खुद्द बादशहाहि मेवाडांत तळ देऊन राहिला, पण हा सांपडला नाहीं. उलट यानें मोंगल सैन्याची रसद बंद केली. गनिमी काव्यानें यानें बादशहाला सतावून सोडलें. यानें राज्यांत मोगल सैन्याला उपयोगी पडेल म्हणून धान्य पिकूं दिलें नाहीं कीं लोकांना व्यापार करूं दिला नाहीं. त्यामुळें त्याचे व प्रजेचेहि फार हाल झाले. तथापि राणा स्वाभिमानी व निश्चयी असे. त्यानें बादशहाकडे गेलेला मुलूख परत घेतला. इतकेंच नव्हे तर बादशहाचे मुलूखहि तो लुटूं लागला. शेवटीं स्वतंत्र राहून तो सुखानें मरण पावला. मध्यंतरींच्या काळांत त्याचे जे हाल झाले व त्यांतहि त्यानें जो स्वाभिमान आणि सोशिकपणा दाखविला त्यांबद्दल बऱ्याच कथा मेवाडांत प्रचलित आहेत. स्वातंत्र्यवीर म्हणून याची कीर्ति अजरामर राहील.

**प्रतापसिंह भोसले**–१. (राज्य. १७४०–१७६३)—हा तंजावरचा राजा तुकोजी याचा दासीपुत्र होय. हा गादीवर आल्यावर तंजावरच्या दरबारांतील सय्यदखान व सय्यद कासीम या सरदारांना राजसत्तेची हांव सुटल्यानें त्यांनीं याजविरुद्ध कारस्थानें करण्यास सुरुवात केली. तेव्हां यानें सय्यद कासीमच्या मदतीनें सय्यदखानास ठार केलें. हें पाहून चंदासाहेबानें याजवर स्वारी केली. परंतु साताऱ्च्या शाहूच्या मदतीनें यानें चंदासाहेबास गप्प बसविलें. खंडणीबाबत अर्काटचा सुभेदार अन्वरुद्दिन याच्याशीं झालेल्या लढ्यांत यास माघार घ्यावी लागली. गुत्तींकर मुरारराव घोरपडे यानें याजवर स्वारी केली असतां यानें महंमदअल्लीच्या मध्यस्तीनें त्यास तीन लक्षांची खंडणी देऊन परतवलें. फ्रेंचांनीं याचें कावेरीचे धरण उध्वस्त केलें होतें. इंग्रजाच्या मदतीनें यानें फ्रेंचांचा पराभव करून त्यांनीं केलेल्या अपमानाचें योग्य प्रायश्चित्त दिलें. सयाजी उर्फ शहाजी नांवाचा इसम इंग्रजांच्या पाठिंब्यामुळें गादीवर हक्क सांगूं पाहत होता. परंतु सन १७४९ मध्यें यानें त्यास देवीकोटचा किल्ला व ३,१५,००० रु. उत्पन्नाचा मुलूख देऊन त्याचें तोंड बंद केलें व आपलें राज्य टिकवलें.

२. (१७९२–१८४७)—साताऱ्याचा एक छत्रपति. हा दुसऱ्या शाहूचा वडील मुलगा. बाजीरावानें पळ काढल्यानंतर एल्फिन्स्टननें याला मराठेसाम्राज्याचा वारस कबूल करून फक्त १२ लक्षांचा मुलूख दिला, व १४ पेटे याच्याकडे ठेविले. कॅ. ग्रॅंट डफ यास साताऱ्चा रेसिडेंट नेमला. पण प्रतापसिंहाला डफनें भावाप्रमाणें लेखून पुष्कळ गोष्टी शिकविल्या. त्याला रोजनिशी लिहिण्याची संवय लावली. सन १८१८ च्या दसऱ्यापासून तों १८३८ च्या दसऱ्यापर्यंत याच्या सर्व रोजनिशा उपलब्ध आहेत. प्रतापसिंहाला १८२२ सालीं राज्याधिकार देण्यांत आले व ग्रॅंट डफ विलायतेला निघून गेला.

प्रतापसिंहाला आपल्या थोर क्षत्रिय कुळीचा फार अभिमान असे. त्यानें उदेपूर राजघराण्याशीं स्नेह जोडला व आपली मुलगी रजपुतांकडे देण्याची खटपट केली. त्यानें ब्राह्मणवर्गाचें धार्मिक वर्चस्व चालू न दिल्यामुळें ब्राह्मणब्राह्मणेतर वादाला या वेळींच प्रारंभ झाला. त्याचीं कटु फळें अद्यापि दृष्टीस पडत आहेत. त्यानें बरेच ग्रंथ करवून घेतले. साताऱ्यास नवीन राजवाडा बांधला व यवतेश्वराहून नळ आणून शहरांत पाणी खेळविलें.

त्याला इंग्रजांचें वर्चस्व फार जाणवे व त्यांच्या अपमानकारक अटी व वागणुकी असह्य होऊन तो कांहीं बाबतींत इंग्रज सरकारला जुमानीनासा झाला. यानें सैन्यांत फितुरी आरंभिली व बंड करूं पाहतो या आरोपावरून इंग्रजांनीं त्याला पदच्युत करून काशीस नेऊन ठेविलें (१८३९). त्याचा वकील रंगो बापूजी यानें विलायतेस जाऊन प्रतापसिंहावरील आरोप खोटे ठरविण्याचा फार प्रयत्न केला; पण यश आले नाहीं. शेवटीं विपन्नस्थितींत त्याला काशीस मरण आलें. त्यानें बळवंतराव सेनापतीचा मुलगा दत्तक घेतला होता. पण तो वारसा सरकारनें कबूल केला नाहीं.

**प्रतापाग्निकुमार रस**—एक आयुर्वेदीय रसायन. पारा ताम्र, गंधक, बचनाग, मिरें, सुंठ, त्रिक्षार (जवखार, टांकणखार, सजीखार), पंचलवण (समुद्रमीठ, टाकणखार, सैंधव, बिडलोण व संचळखार) या औषधांचा आल्याच्या रसांत खल करून कांचेच्या कुपींत भरून वालुकायंत्रांत मंदाग्नीनें एक दिवस पचवितात. त्यांत बचनाग दशांश घालून खल करून, एक गुंजाप्रमाण मात्रा आल्याच्या रसाशीं सन्निपातावर देतात हा रस सर्व प्रकारचे वात-विकारहि दूर करतो.

**प्रतिध्वनि**—एखाद्या घराच्या भिंतीवर किंवा एखाद्या पृष्ठभागावर ध्वनिलहरी आपटून त्याचें जें परावर्तन होतें त्यामुळें त्या विशिष्ट ध्वनीचें पुनरुत्पादन होतें; त्यास प्रतिध्वनि असें म्हणतात. जेव्हां हा परावर्तक पृष्ठभाग खडबडीत असतो तेव्हां प्रतिध्वनि अधिक स्पष्ट ऐकूं येतो. यावरून ध्वनि-लहरींच्या मार्गांत येणाऱ्या वस्तूंचें जें संवादी कंपन होतें, आणि त्यामुळें त्यासभोंवतीं असलेल्या हवेमध्यें जे कंप उत्पन्न होतात त्यांच्या योगानें प्रतिध्वनि उत्पन्न होत असावा असें वाटतें ध्वनि-लहरी जेव्हां एखाद्या पृष्ठभागावर आपटतात तेव्हां त्यांचें जें परावर्तन होतें तें प्रकाशकिरणांच्या परावर्तनासंबंधीं जे नियम आहेत त्याच नियमांस अनुसरून होत असतें. जंगल, खडक पर्वत, वगैरे ठिकाणीं नैसर्गिकरीत्या अनेक तऱ्हेचे प्रतिध्वनि उत्पन्न होतात आणि अशा तऱ्हेचीं प्रतिध्वनि करणारीं कांहीं ठिकाणें फार प्रसिद्ध आहेत.

ध्वनि एका सेकंदांत सुमारें १,१२५ फूट दूर जातो. तेव्हां त्याच्या निम्म्या अंतरावर परावर्तक वस्तूपासून उभे राहिल्यास ध्वनि निघाल्यापासून एक सेकंदानें प्रतिध्वनि ऐकूं येईल. एका सेकंदांत जेवढे शब्द ऐकूं येतात तेवढेच या प्रतिध्वनींत ऐकूं येतील. हें अंतर कमी कमी केल्यास प्रतिध्वनींत आणखी कमी शब्द ऐकूं येतील. शेवटीं तर एकच शब्दाचा प्रतिध्वनि कानावर पडेल. परावर्तक अगदीं जवळ असल्यास मूळ ध्वनि स्पष्टहि ऐकूं येणार नाहीं. हा अनुभव कांहीं इमारतींत येतोच.

**प्रतिनिधि**—राजाराम छत्रपतीनें प्रल्हाद निराजीस हें राजमंडळातील वरिष्ठ पद देऊन गौरविलें (१६९२). प्रतिनिधि म्हणजे राजाची केवळ प्रतिमाच. सर्व मंत्र्यांवर त्याचा वचक असे. प्रल्हाद निराजीनंतर तिमाजी हणमंते यास नेमलें; परंतु तो कर्तबगार नव्हता. तेव्हां त्याच्या जागीं परशुराम त्रिंबक किन्हईकर यास नेमलें (१६९९). पुढें दहा वर्षांनीं शाहूनें हें पद त्यासच वंशपरंपरा करून दिलें. छत्रपतींकडून प्रतिनिधींस जाणाऱ्या पत्रांच्या शेवटीं ते "बहुत लिहिणें तरी सूज्ञ असा" हे शब्द स्वहस्तें लिहीत. प्रतिनिधींकडून निघणाऱ्या हुकुमाच्या अखेर "निर्देश समक्ष" (म्हणजे प्रत्यक्ष छत्रपतींनीं निर्दिष्ट केल्याप्रमाणें) असा शेरा असे. प्रतिनिधीचा मानमरातब मोठा असे व तदनुरूप त्याचीं चिन्हें होतीं. त्याच्या वांट्यास येणाऱ्या वसुलास जिल्हेबाब म्हणत. त्याची नेमणूक १५,००० होन एवढी होती.

**प्रतिबंधित व्यापार**—(कॉन्ट्राबँड). युद्धकालांत आंतरराष्ट्रीय कायद्याप्रमाणें तटस्थ राष्ट्रांतील लोकांनीं युद्धोपयोगी माल युद्धमान राष्ट्रांना पुरवावयाचा नसतो. शस्त्रास्त्रें, दारूगोळा हा तर या निर्बंधित मालांत येतोच, पण ज्या द्रव्यांपासून हीं शस्त्रास्त्रें करतात तीं द्रव्येंसुद्धां पाठविण्यास बंदी असते. अलीकडे अन्नपुरवठाहि प्रतिबंधित व्यापारांत येतो.

**प्रतिबिंब**—दृक्शास्त्रामध्यें प्रकाशाचें परावर्तन, वक्रीभवन, किंवा सूक्ष्म छिद्रांतून पारदर्शन झाल्यामुळें जी एक तात्पुरती पदार्थाची आकृति दिसूं लागते तीस प्रतिमा अथवा प्रतिबिंब असें म्हणतात. जेव्हां प्रकाशकिरण परावर्तन पावून त्यामुळें आरशांत दिसणाऱ्या प्रतिमेप्रमाणें प्रतिबिंब दिसतें तेव्हां प्रकाशकिरण प्रत्यक्ष त्या प्रतिमेंतून जात नसतात. त्यामुळें अशा प्रतिमेस अवास्तविक प्रतिमा असें म्हणतात. वास्तविक प्रतिमा हवेंत दिसूं शकते किंवा एखाद्या पडद्यावर पाडतां येते.

**प्रतिमापूर्वकृति**—(कार्टून). जेव्हां एखादें मोठें चित्र भिंतीवर भागशः काढावयाचें असेल तेव्हां त्याचा नमुना प्रथम कागदावर तयार करण्यांत येतो व त्यावरून तें भिंतीवरील चित्र काढावयाचें असतें. अशा वेळीं तें सबंध चित्र कागदावर न काढतां त्याचे निरनिराळे भाग जाड कागदावर किंवा पुठ्ठ्यावर काढण्यांत येतात. हें चित्र भिंतीवर काढावयाच्या चित्राच्याच आकाराचें काढण्यांत येतें व असे कागद वगैरेवरून भिंतीवर उतरण्यांत येतें व मधून-मधून नक्षी, वेलपत्ती वगैरे भरण्यांत येते. अशा तऱ्हेची रोम येथील व्हॅटिकनमध्यें रंगविलेलीं रॅफेलचीं सात चित्रें साउथ केन्सिंग्टन म्यूझियममध्यें ठेवलेलीं आहेत.

**प्रतिरोध**—(इन्टरफीअरन्स). पदार्थविज्ञानशास्त्रामध्यें जेव्हां एखाद्या माध्यमांतून दोन प्रकारच्या लहरींच्या माला एकाच वेळीं जात असतात तेव्हां त्या लहरींचा जो परस्पर परिणाम होतो त्यास प्रतिरोध असें म्हणतात. एखाद्या साबणाच्या बुडबुड्यावर जे आपणास निरनिराळे रंग दिसतात त्याचें कारण, त्याच्या बाहेरील पृष्ठभागापासून व आंतील पृष्ठभागापासून ज्या दोन निरनिराळ्या प्रकाश-लहरींच्या माला परावर्तित होऊन आपल्या डोळ्यांकडे येतात त्या दोन लहरीमालांतील प्रतिरोध हें होय. जेव्हां एखाद्या पाण्याच्या पृष्ठभागावर तेलाचा तवंग येतो तेव्हां तवंगांत जे निरनिराळे तवंग आपल्या दृष्टीस पडतात त्याचेंहि कारण हेंच असतें. जेव्हां दोन जवळजवळ सारख्या पण निरनिराळ्या कंपसंख्या किंवा लहरीसंख्या असलेले ध्वनी आपल्या कानांवर येतात तेव्हां त्यांमध्यें जो विसंवाद आपल्या कानांस जाणवतो त्याचें कारणहि हेंच होय. प्रकाशाच्या अथवा एखाद्या रंगाच्या ध्वनिलहरींचें मापन याच प्रतिरोधक परिणामावरून करण्यांत येतें.

**प्रतिस्फटिक**—(कोलॉइड्स). कलिल, कलोद. विशिष्ट प्रकारच्या आवरणा(मेंब्रेन)मधून कांहीं पदार्थ जाऊं शकत नाहींत किंवा अतिशय सावकाश जाऊं शकतात, अशा पदार्थांना प्रतिस्फटिक म्हणतात. ह्याउलट कांहीं पदार्थ त्या आवरणामधून सहज आणि अति वेगानें बाहेर जाऊं शकतात, त्यांना अनुस्फटिक (क्रिस्टलॉइड्स) म्हणतात. प्रतिस्फटिकाचा हा गुण प्रथम ग्रॅहमनें शोधून काढला.

आवरणामधून आरपार जाणाऱ्या ह्या गुणावर आधारलेल्या दोन पदार्थांना एकमेकांपासून निराळे करण्याच्या पद्धतीला द्विविश्लेषण (डायलिसिस्) म्हणतात. हा आरपार जाण्याचा किंवा न जाण्याचा गुण त्या पदार्थाच्या कणां(पार्टिकल्स)च्या आकारावर अवलंबून असतो, असें सध्यां तज्ज्ञांचें मत आहे. कारण स्फटिकमय पदार्थ सुद्धां प्रतिस्फटिकाच्या अवस्थेंत आणतां येतात.

हें प्रतिस्फटिक कण साध्या डोळ्यांना दिसत नाहींत. पण त्यांचा द्रव माध्यमांत प्रकाशकिरण सोडला तर ते दिसूं लागतात. ते चपळ असतात आणि अतिशय वेगानें हालत असतात. ह्या स्थितींत त्यांचा आकार २ ते ५ सहस्रांश मिलिमीटरपेक्षां

(३ ते ५ म्यु) मोठा असत नाहीं. १८२७ सालीं ब्राउन ह्यानें हा शोध लावला व त्याच्याच नांवानें तो प्रसिद्ध आहे.

प्रतिस्फटिक कणांवर धन किंवा ऋण विजेचा भार (चार्ज) असतो. प्रतिस्फटिकद्रावामध्यें विजेचा प्रवाह सोडला असतां धन-कण ऋणाकडे आणि ऋण-कण धनाकडे जातात. ह्याला विद्युत्क्षेपण (कॅटॅफोरेसिस) म्हणतात.

रासायनिक किंवा विद्युत्पद्धतीनें प्रतिस्फटिक तयार करतां येतात. सोनें, रुपें, प्लॅटिनम्, वगैरेसारखे धातूहि ह्या अवस्थेंत आणतां येतात. शेतकींत, वैद्यकशास्त्रांत, व औद्योगिक क्षेत्रांत प्रतिस्फटिकांचें महत्त्व दिवसेंदिवस वाढत आहे व प्रतिस्फटिक रसायनशास्त्र असा रसायनशास्त्राचा एक स्वतंत्रच भाग आतां निर्माण होतो आहे.

**प्रतिहार**—प्रतिहार, परिहार अथवा पढिहार या नांवांनीं ओळखले जाणारे राजे कनोज येथें राज्य करीत होते. प्रतिहारांनीं आठव्या ते अकराव्या या शतकांत सुमारें ३०० वर्षें राज्य केलें. हे प्रतिहार येण्यापूर्वीं बुंदेलखंडावर गहरवार क्षत्रियांचें राज्य होतें.

आठव्या शतकामध्यें हें घराणें उदयास येऊन भरभराट पावलें. अरब लोकांचा प्रतिकार यांनीं चांगलाच केला. प्रतिहार यांनीं हळूहळू उत्तरेकडील सर्व मुलूख पादाक्रांत करून कनोजचें सम्राट्पद मिळविलें. पहिला प्रसिद्ध पुरुष पहिला नागभट्ट. प्रतिहारांनीं मंडोर येथें आपली राजधानी केली. या घराण्यांत पुढें विशेष विख्यात झालेला वत्सराज यानें भांडिकुलाचा पराभव केला व कनोज घेतलें; तेव्हां वर्मे घराणें ऱ्हास पावलें. राष्ट्रकूट ध्रुवराज यानें वत्सराजास मागें हटवलें. वत्सराजाच्या मागून त्याचा मुलगा दुसरा नागभट्ट व नंतर सर्वप्रतापी भोजराज हे सम्राट् झाले. १०२० च्या सुमारास हें घराणें विनाश पावलें. हे स्वतःस सूर्यवंशी (रामचंद्र लक्ष्मण याचे वंशज) समजत.

**प्रतैलिकाम्ल**—(प्रोपिऑनिक ॲसिड). मेदाम्ल. हें एक सेंद्रिय रासायनिक अम्ल आहे. याच्या क्षारां(सॉल्ट्स)चा उपयोग केल्यास खाद्य पदार्थांना (पाव, बिस्किटें, वगैरे पदार्थांना) बुरशी येत नाहीं. अमेरिकेंत या वस्तू टिकविण्यासाठीं याचा उपयोग सर्रास रूढ झाला आहे.

**(आरोपि) प्रत्यर्पण कायदा**—(एक्स्ट्राडिशन ॲक्ट). एका देशांतला नागरिक गुन्हा करून दुसऱ्या देशांत पळून गेला तर त्या आरोपीला त्याच्या देशाच्या सरकारच्या ताब्यांत देणें, याला 'एक्स्ट्राडिशन' म्हणतात. १८७० च्या एक्स्ट्रॅडिशन ॲक्टमध्यें असें कलम आहे कीं, राजकीय गुन्हा केलेल्या आरोपीला परत तो मूळचा प्रजाजन असेल त्या सरकारच्या ताब्यांत देऊं नये. या कायद्यान्वयें इंग्लंडनें युरोपांतील अनेक देशांतल्या राजकीय गुन्हेगारांना इंग्लंडांत राहूं दिलें आहे. सदर कायद्यांत १८७३, १८८५ व १९०६ सालीं सुधारणा झाली असून हिंदुस्थानांत त्याच स्वरूपाचा कायदा लागू आहे. हिंदुस्थानांत १८७० सालीं 'दि इंडियन एक्स्ट्राडिशन ॲक्ट' होऊन त्यांत १८७३, १८८१, १९०३, १९१३, १९२२ व १९३० याप्रमाणें अनेक वेळां दुरुस्त्या झाल्या आहेत. या कायद्यांतील मुख्य कलम असें आहे कीं, गुन्हा करून ब्रिटिश मुलखांत पळून आलेल्या गुन्हेगार इसमाला परत आपल्या ताब्यांत देण्याबद्दल परदेशच्या सरकारनें विनंति केली तर हिंदुस्थान सरकारनें किंवा प्रांतिक सरकारनें त्या आरोपीची प्राथमिक चौकशी मॅजिस्ट्रेटकडून करवावी आणि गुन्हा शाबीत होईल असें वाटल्यास तो आरोपी परकी सरकारच्या ताब्यांत द्यावा. याला महत्त्वाचा अपवाद असा आहे कीं, जर सदर गुन्हा राजकीय स्वरूपाचा असेल तर तो आरोपी परकी सरकारच्या ताब्यांत देऊं नये (कलम ५) व याच मुद्याबद्दल वर दिल्याप्रमाणें प्राथमिक चौकशी मॅजिस्ट्रेटनें करून सरकारकडे रिपोर्ट करावा (कलम ३). ब्रिटिश हिंदुस्थानातील संस्थानांनीं असा फरारी आरोपी ताब्यांत मागितल्यास पोलिटिकल एजंटमार्फत तो आरोपी संस्थानच्या ताब्यांत द्यावा (कलम ९).

**प्रत्यक्षज्ञानवाद**—(पॉझिटिव्हिझम्). हा तत्त्वज्ञानाचा एक पंथ आहे. हा पंथ शास्त्रीय प्रयोगपद्धतीनें जेवढें सिद्ध होईल तेवढ्या गोष्टीच सत्य आहेत, असें मानतो. अर्थात् भौतिक सृष्टीच्या पलीकडील अदृश्य, अतींद्रिय अशा कोणत्याहि गोष्टींवर या पंथाचा विश्वास नाहीं. मानवी ज्ञानाची कसोटी ऊर्फ सत्यत्व पारखण्याचें साधन इंद्रियद्वारां येणारा अनुभव हे एकच आहे, असें या पंथाचें मत आहे. प्राचीन ग्रीक, सोफिस्ट पंथांतले कांहीं तत्त्ववेत्ते या पंथाचे आद्य पुरस्कर्ते होते. तथापि 'पॉझिटिव्हिझम्' या शब्दाचा जनक आणि या सिद्धांताला तत्त्वज्ञानाचा एक पंथ असें व्यवस्थित स्वरूप देणारा तत्त्ववेत्ता ऑगस्ट कोम्ट हा होय. म्हणून याला कोम्टमत असेंहि म्हणतात. या कोम्टच्या सिद्धांताचे चहाते व अनुयायी जी. एच्. लेवेस, जे. एस्. मिल्ल, रिचर्ड कॉंग्रेव्ह, एच् मार्टिनो, आणि फ्रेडरिक हॅरिसन हे सर्व इंग्रज असून फ्रान्समध्यें पेरी लाफिते, ई. लित्रे, आणि एच्. टेने हे होऊन गेले.

**प्रथमोपचार**—एखाद्या मनुष्यास एकदम कांहीं आजार झाला किंवा अपघात झाला तर वैद्याची मदत मिळण्यापूर्वी जे तात्काल उपचार करण्यांत येतात त्यास प्रथमोपचार म्हणतात. या पद्धतीचे दोन उद्देश आहेत. एक शक्यतों रोग्याचें दुःख कमी करणें व दुसरा शक्यतों रोग अथवा दुखापत अधिक वाढूं न देणें. एखाद्या रस्त्यांत वगैरे अपघात घडला असतां

रोग्यास रस्त्यांतून बाजूला करणें अवश्य असतें. अशा वेळीं हें काम फार काळजीपूर्वक केलें पाहिजे. नाहीं तर रोग्यास झालेली दुखापत वाढून भयंकर परिणाम होण्याचा संभव असतो. प्रथमोपचारपद्धतीची माहिती असलेला मनुष्य प्रथम कोणत्या तऱ्हेची जखम अथवा रोग झाला आहे हें समजून घेण्याचा प्रयत्न करतो. आणि रोग्यास हलविण्यापूर्वी योग्य ते उपाय योजतो. या पद्धतीचा योग्य प्रकारें अवलंब केल्यास इजा झालेल्या मनुष्याचें दुःख बरेंचसें कमी करतां येतें. या पद्धतीचें शिक्षण देणारे सेंट जॉन आणि सेंट अँड्र्यू अॅम्ब्युलन्स नांवाच्या दोन संस्था आहेत, व यांचेंच अनुकरण इतर संस्थांनीं केलें आहे. या संस्था मुख्यतः पुढील विषयांचें शिक्षण देतात: (१) शारीरशास्त्र आणि इंद्रियविज्ञान, (२) फेफरें, मूर्च्छा, वगैरे एकदम होणाऱ्या आजारांचीं लक्षणें व त्यावरील उपचार. तसेंच अस्थिभंग, जखमा, रक्तस्राव, दग्धव्रण, श्वास कोंडणें, धक्का बसणें व किरकोळ दुखापती यांचीं लक्षणें व त्यांवरील साधे उपचार; तसेंच मुद्दाम किंवा अपघातानें होणारे विषप्रयोग व त्यांवरील उपचार; व रोगी वाहून नेण्याची पद्धति, इत्यादि. प्रथमोपचारपद्धति ही केवळ प्राथमिक स्वरूपाची व केवळ दुःख हलकें करणारी आहे, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. जरी कांहीं किरकोळ आजारांत व अपघातांत प्रत्यक्ष वैद्याची आवश्यकता भासत नसली तरी प्रथमोपचार करणाऱ्या मनुष्यानें हें नेहमीं लक्षांत बाळगलें पाहिजे कीं, प्राथमिक उपचार झाल्याबरोबर रोग्यास एखाद्या दवाखान्यांत किंवा डॉक्टरकडे नेणें हें त्याचें पहिलें कर्तव्य आहे. सेंट जॉन अॅम्ब्युलन्स ही संस्था १८७७ सालीं स्थापन झाली. तसेंच १८८२ मध्यें सेंट अँड्र्यू अॅम्ब्युलन्स ही संस्था स्कॉटलंडमध्यें व सेंट पॅट्रिक ही संस्था आयर्लंडमध्यें १९१२ सालीं स्थापन झाली. सेंट जॉन अॅम्ब्युलन्स असोसिएशनची हिंदुस्थानांतील शाखा (इंडियन कौन्सिल) रीतसर १९१० सालीं सुरू झाली.

**प्रदर**—हा एक स्त्रियांचा रोग आहे. जननेंद्रियावाटे स्राव होणें हें याचें प्रमुख लक्षण आहे. याला मराठींत धुपणी म्हणतात. श्वेत व रक्त असे याचे दोन प्रकार आहेत. या रोगात कमर, ओटीपोट, मांड्या, वगैरे दुखतात व अन्नपचनहि बिघडतें. तीव्र अवस्थेंत झटके, उन्मादवायु हे परिणामहि दिसतात. पूर्ण विश्रांति देणें हा प्रथम उपचार होय. नंतर डॉक्टरिणीकडून रोगी तपासून घेऊन प्रकृति आणि निदान यांप्रमाणें औषध द्यावें.

**प्रदररिपु**—एक आयुर्वेदीय औषध. यांत पारागंधककज्जली, नागभस्म, रसांजन व लोध्र हीं मुख्य औषधें असून अडुळशाच्या रसांत खल करतात. स्त्रियांच्या श्वेत व रक्त प्रदरावर हें औषध अतिशय उपयोगी आहे. गर्भाशयाची सूज, पोटांत दुखणें, तांबडा किंवा पांढरा स्राव होणें, हातापायाची आग, डोकें दुखणें, कंबर दुखणें, हातपाय गळून गेल्यासारखें वाटणें, छातींत धडधडणें, भूक न लागणें, इत्यादि स्त्रियांच्या विकारांवर हें एक चांगले औषध आहे. १ ते २ गुंजा तांदुळाचें धुवण अगर लोणी-खडीसाखर किंवा जिरें आणि साखर यांत घेतात.

**प्रदर्शनें**—पूर्वी निरनिराळ्या धार्मिक उत्सवांच्या वेळीं ज्या जत्रा भरत असत त्यांचें हें प्रगत व व्यवस्थित स्वरूप होय. हिंदुस्थानांत लहानमोठ्या प्रमाणावर अशा जत्रा सर्वत्र भरत असत. तशाच पण बऱ्याच मोठ्या प्रमाणावर युरोपमध्यें लाइप्झिग व निझ्नी नोव्हगोराड येथें भरत असत. अशा तऱ्हेचें प्रदर्शन म्हणतां येईल अशी जत्रा व्हेनीस येथें प्रथम इ. स. १२६८ मध्यें भरली, पण अर्वाचीन तऱ्हेचें असे प्रदर्शन लंडन येथील आर्ट सोसायटीनें प्रथम १७५६ मध्यें भरविलें. यानंतर १७६१ मध्यें शेतकी यंत्रांचें एक प्रदर्शन भरलें होतें. पहिलें सार्वराष्ट्रीय प्रदर्शन १८५१ मध्यें भरलें. तें यशस्वी झाल्यामुळें अशीं प्रदर्शनें नंतर न्यू यॉर्क, डब्लीन (१८५३), म्यूनिक, मेलबोर्न (१८५४) व पॅरिस (१८५५) येथें भरलीं. त्यानंतर साउथ केन्सिंग्टनमध्यें क्रिस्टल पॅलेसमध्यें दुसरें सार्वराष्ट्रीय प्रदर्शन १८६२ मध्यें भरलें. यानंतर पांच वर्षांनीं पॅरिस येथें एक जंगी प्रदर्शन भरलें. अशा तऱ्हेनें ही प्रदर्शनांची प्रथा वाढत गेली. हिंदुस्थानांत पहिलें प्रदर्शन १९०४ सालीं मुंबई येथें भरलें. त्यानंतर कॉंग्रेसबरोबर अलाहाबाद वगैरे ठिकाणीं कांहीं प्रदर्शनें भरलीं. पहिल्या जागतिक युद्धानंतर वेंबले येथें १९२४-२५ मध्यें ब्रिटिश साम्राज्यप्रदर्शन भरलें. तें पाहण्याकरितां दोन कोटी पंचेचाळीस लक्ष लोक आले होते व सर्व साम्राज्यांतील माल तेथें मांडला होता. हिंदुस्थानांत पुणें येथें १९२६ डिसेंबरमध्यें एक मोठें शेतकीप्रदर्शन भरविण्यात आलें होतें. यानंतर कॉंग्रेसबरोबरचीं व इतर कलात्मक उद्योगधंदे, वगैरेचीं प्रदर्शनें लहान-मोठीं भरत आलीं आहेत. ग्वाल्हेर, म्हैसूर, वगैरे ठिकाणीं वार्षिक जत्रांच्यासारखीं प्रदर्शनें भरत असतात. यांचा उपयोग निरनिराळ्या उद्योगधंद्यांच्या वाढीच्या दृष्टीनें फार होत असतो. देशांत कोणी कारागिरानें मोठ्या कौशल्यानें एखादा जिन्नस तयार केला तर तो लोकांपुढें येऊन त्याला उत्तेजन व आश्रय मिळावा व देशांतहि तो धंदा सुरू व्हावा हाहि प्रदर्शनाचा एक मुख्य उद्देश असतो.

**प्रदक्षिणा**—एखाद्याभोंवतीं आपल्या उजव्या अंगानें फेरी घालणें किंवा त्याला उजवें घालणें. आपला आदरभाव व्यक्त करण्यासाठीं आदरणीय व्यक्तीला आपल्या उजव्या बाजूस जागा देतात. याच कल्पनेला पुढें प्रदक्षिणेचें स्वरूप प्राप्त झालें. देवाला

सारखें उजव्या बाजूस ठेवावयाचें म्हणजे त्याच्याभोंवतीं उजवीकडून फिरावयाचें. शंकराला प्रदक्षिणा घालावयाची ती सोमसूत्री म्हणजे तीर्थकुंडापर्यंत येऊन पुन्हां माघारीं जाणें व दुसरीकडून तीर्थकुंडापर्यंत पोंचणें अशी घालतात. वड, पिंपळ, उंबर, इ. पवित्र वृक्षांनाहि प्रदक्षिणा घालतात. देवाला प्रदक्षिणा घातल्यानें पुण्य लागतें अशी भावना हिंदूंची आहे. प्रदक्षिणेच्या संख्याहि भक्तकामनेप्रमाणें वाढत गेल्या आहेत. आरोग्याच्या दृष्टीनें प्रदक्षिणेकडे पाहण्याची एक बाजू आहेच. पुरुषापेक्षां बायकाच जास्त प्रदक्षिणा घालतात.

**प्रद्युम्न**—१. चक्षुर् मनूला नड्वलेपासून झालेल्या मुलांपैकीं एक. यालाच सुद्युम्नहि म्हणत.

२. श्रीकृष्णाला रुक्मिणीपासून झालेला पुत्र. आपला मृत्यु रुक्मिणीच्या मुलाकडून आहे हें जाणून शंबरासुरानें याला पळवून नेऊन समुद्रांत टाकलें. पण एका माशानें याला गिळल्यामुळें हा वांचला. शंबरासुराची कन्या मायावती हिनें याचें पालनपोषण केलें. प्रद्युम्न हा पूर्वजन्मीं शंकरानें जाळलेला मदन असून मायावती ही रति होती. मोठा झाल्यावर प्रद्युम्नानें शंबरास मारलें. त्याचा पुत्र अनिरुद्ध. प्रद्युम्न हा शूर महारथी असून पांडवांच्या अश्वमेध यज्ञांत अर्जुनाबरोबर अश्वरक्षणासाठीं व दिग्विजयासाठीं होता. हा प्रभासपट्टण येथें झालेल्या यादवींत मरण पावला.

**प्रबळचा किल्ला**—मुंबई, कुलाबा जिल्हा. पनवेलच्या पूर्वेस आठ मैलांवर व माथेरानच्या पश्चिमेस चार मैलांवर प्रबळ नांवाच्या टेंकडीवर हा बांधलेला आहे. समुद्रसपाटीपासून याची उंची २,३२५ फूट आहे. सन १८२९ मध्यें पुरंदरच्या आसपास रामोशांनीं बंड करून सरकारास वसूल देऊं नये असा जाहिरनामा काढला होता, तेव्हां त्यांनीं या किल्ल्याचा आश्रय घेतला होता.

**प्रभाकरवर्धन** (५८०–६०५)— हा बैसवंशी रजपुतांपैकीं आदित्यवर्धनाचा पुत्र असून यास प्रतापशिव असेंहि म्हणत. हा शूर असून यानें आपल्या पराक्रमानें हूण, गांधार, सिंधु, गुर्जर व लाट येथील राजांना जिंकल्याबद्दलचे उल्लेख उपलब्ध ताम्रपटांवर आहेत. यास परमभट्टारक व महाराजाधिराज असें म्हटलेलें आहे. यावरून हा स्वतंत्र राजा होता असें सिद्ध होतें. यानें श्रीकंठ नांवाचें लहानसें राज्य स्थापलें. त्याची राजधानी ठाणेसर होती. यास याच्या यशोमती नांवाच्या राणीपासून राज्यवर्धन व हर्षवर्धन हे दोन पुत्र व राज्यश्री नांवाची एक मुलगी झाली. राज्यश्री मोखरी वंशांतील अवन्तिवर्म्याचा पुत्र ग्रहवर्मा यास दिली होती. माळव्याच्या राजानें ग्रहवर्म्यास ठार करून राज्यश्रीस कैदेंत टाकलें. प्रभाकरवर्धनाचा मुलगा राज्यवर्धन हा उत्तरेकडे हूणांशीं लढण्यास गेला असतां इकडे प्रभाकरवर्धनाचा अंत झाला. याच्या पश्चात् राज्यवर्धन व नंतर हर्षवर्धन गादीवर आला.

**प्रभाकर शाहीर** (सु. १७५४–१८४३)— हा मराठी शाहीर मूळचा रत्नागिरी जिल्ह्यांतील मुरुड गांवचा. हा जातीनें चित्पावन ब्राह्मण असून याचें पूर्ण नांव प्रभाकर जनार्दन दातार असें आहे. पुण्यांतील गंगू-हैबतीच्या फडांत हा सामील झाला. या शाहीर कवीस पेशव्यांचा आश्रय होता. यानें बाजीरावावर तीन पोवाडे रचले असून शिवाय खर्ड्याची लढाई, सवाई माधवरावाचा मृत्यु या ऐतिहासिक प्रसंगांवरहि यानें केलेले पोवाडे लोकप्रिय झाले आहेत. 'बाजीराव–विलास' नांवाचा लावणी–संग्रह याचाच होय. लावणीकार व शाहीर यांमध्यें काव्याच्या दृष्टीनें पाहतां प्रभाकर श्रेष्ठ ठरतो. जोरदार भाषा, अचूक वर्णनशैली, विषयवैचित्र्य व सुंदर आणि सरस रचना हे त्याचे विशेष गुण होत. याची मुलगी बडोद्याचे गंगाधरशास्त्र्याचे चिरंजीव व पुण्यांतील एक सरदार आबासाहेब पटवर्धन यांना दिली होती.

**प्रभात**—हा राग भैरव थाटांतून उत्पन्न होतो. याचा आरोहावरोह सातहि स्वरांचा असल्यानें याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय प्रातःकाळ आहे. या रागांत ललित रागाचें मिश्रण झालेलें दिसतें. द्रुतलय ठेवून हा राग गायिला असतां कालिंगडा रागाचा भास होतो.

**प्रभावती गुप्ता** (विवाहकाल–सन ३९५)—गुप्त राजांपैकीं दुसऱ्या चंद्रगुप्ताची कुबेरनागा नांवाच्या पत्नीपासून झालेली मुलगी व वाकाटक वंशांतील दुसऱ्या रुद्रसेनाची ही पत्नी. हिला दिवाकरसेन, दामोदरसेन व आणखी एक असे तीन पुत्र होते. हिनें आपल्या एका पुत्राला प्रवरसेन असें नांव देऊन गादीवर बसवलें. राज्यकारभार मात्र ही स्वतःच पाहत असे. हिनें दिलेल्या देणग्यांचे कांहीं ताम्रपट उपलब्ध आहेत. माहेरचा अभिमान असल्यानें ही गुप्ता हें उपनांव लावीत असे.

**प्रभास**—१. अष्टवसूंपैकीं एक. आंगिरसीचा पति व विश्वकर्म्याचा बाप.

२. गुजराथ प्रांतांतील प्रसिद्ध तीर्थक्षेत्र, प्रभासपट्टण. सोमनाथपासून जवळच प्रभासपट्टण आहे. येथें यादवांनीं आपआपसांत युद्ध करून सर्व जण नाश पावले. श्रीकृष्णानें जेथें देह ठेवला तें भटकुंड नांवाचें ठिकाण या बाजूसच आहे. प्रभासक्षेत्रींच्या नदीला प्रभासगंगा म्हणतात.

**प्रभूतावयवता**—(पॉलिमेरिझम). अनेक अणू (मॉलिक्युल) एक होऊन नवीन अणु तयार होण्याची रसायनशास्त्रांतील

क्रिया. उदा., ॲसिटिलीन बंद केलेल्या नळींत तापवला म्हणजे त्याचें बेंझिन तयार होतें व त्याचे गुणधर्म ॲसिटिलीनपेक्षां निराळे असतात. याप्रमाणें ह्या अनेकांचा एक होण्याच्या क्रियेनें पदार्थांचे गुणधर्म पार बदलून जातात व त्याच्या अणूंची पुनर्रचना होते.

**प्रमाण**—एखाद्या गोष्टीचें यथार्थ ज्ञान मिळविण्यासाठीं प्रमाण हें साधन आहे. या साधनाचे चार किंवा कमीअधिक प्रकार आहेत. प्रत्यक्ष, अनुमान, उपमान व शब्द अशीं चार प्रमाणें नैयायिकांनीं काढलीं आहेत. शब्दप्रमाण म्हणजेच आप्तवचन. सत्यार्थप्रकाशकार (दयानंद सरस्वती) वरील चारखेरीज ऐतिह्य, अर्थापत्ति, संभव व अभाव अशीं आणखी चार मानतात. ऐतिह्य म्हणजे इतिहासपरंपरेनें होणारें ज्ञान. अर्थापत्तींत कार्यकारणभाव येतो.

**प्रमाणकाल**—(स्टॅन्डर्ड टाइम). लोकांचे दैनंदिन व्यवहार ठराविकपणें चालण्यासाठीं सूर्याच्या दैनंदिन गतीवरून एक विशिष्ट काल ठरविला जातो, तो स्टॅन्डर्ड टाइम किंवा प्रमाणकाल होय. पण सूर्याचा प्रकाश किंवा दिवसमान यांत ऋतूप्रमाणें बदल होतो. तेव्हां एकसारखी गति ठेवणारा मध्यम ('मीन') सूर्य कल्पून प्रमाणकालाची योजना करण्यांत येते. निरनिराळ्या रेखांशावर सूर्योदय निरनिराळ्या वेळीं होणार. प्रत्येक १५° रेखांशावर एक तासाचा फरक पडत जाणार, म्हणजे प्रत्येक अंशाला ४ मिनिटें फरक होणार. आगगाडया आल्यापासून तर हा फरक फार जाणवूं लागला. तेव्हां ग्रेट ब्रिटनमध्यें ग्रीनिच मध्यम काल प्रमाण धरण्यांत आला व तसा कायदाहि केला. तथापि त्यामुळें इतर लांबलांबच्या शहरीं घोंटाळे होऊं लागले. तेव्हां ग्रीनिच मध्यम कालाला धरून ठराविक तासांचें अंतर मान्य करण्यांत आलें. याना प्रदेशकाल (झोन टाइम) म्हणतात. हिंदुस्थान आणि ब्रह्मदेश यांचा प्रदेशकाल किंवा प्रमाणकाल ग्रीनिच कालापेक्षां ५½ तासांनीं पुढें आहे.

हिंदुस्थानचा हा प्रमाणकाल १९०४ मध्यें सरकारनें ठरविला. याच्याशीं तुलना करतां मुंबईच्या वेळेपेक्षां हा काल ३९ मिनिटांनीं पुढें आहे व मद्रासच्या वेळेपेक्षा हा ९ मिनिटांनीं पुढें आहे. पण कलकत्त्याच्या वेळेपेक्षां २४ मिनिटांनीं मागें आहे. १९०६ पासून सर्व आगगाड्या आणि तारायंत्रें यांची वेळ या प्रमाणकालाप्रमाणें धरण्यांत येऊं लागली.

**प्रमाणपत्र**—(वॉरंट). वॉरंट म्हणजे अधिकारपत्र. अशा अधिकारपत्रांनीं कांहीं विशिष्ट कृत्यें करण्याचा अधिकार दिलेला असतो; आणि तसें वॉरंट नसेल तर तीं कृत्यें करणें बेकायदेशीर ठरतात. वॉरंटें चार प्रकारचीं असतात: सरकारी वॉरंट (रॉयल), अमलबजावणीचें वॉरंट (एक्झिक्यूटिव्ह), न्यायकोर्टाच्या अव्वल कामातील वॉरंट (ज्युडीशियल), आणि व्यापारी वॉरंट (कमर्शियल). सरकारी वारंटांत वधाच्या शिक्षेचें (डेथ), सरकारी हत्यारांसंबंधींचें (रॉयल आर्म्स), परकी गुन्हेगारांचें (एक्स्ट्रॅडिशन), आणि सरकारी खजिन्याचें (ट्रेझरी) वॉरंट यांचा समावेश होतो. न्यायकोर्टातील अव्वल कामातील वॉरंटाचे प्रकार: पकड-वारंट, मोठ्या गुन्ह्याच्या चौकशीचें काम वरिष्ठ कोर्टांत पाठविण्याचें वॉरंट (कमिटमेंट), अव्वल जप्तीचें वॉरंट, आणि घरझाडत्यांचें वॉरंट (सर्च), हे आहेत. व्यापारी वॉरंटांनीं माल किंवा पैसा ताब्यात देण्याचा अधिकार दिलेला असतो. उदा., डाक वॉरंट, डिव्हिडंड वॉरंट, वगैरे.

**प्रमाणशीर प्रतिनिधित्व**—(प्रपोर्शनल रिप्रेझेन्टेशन). लोकनियुक्त कायदे-मंडळांत अल्पसंख्याक पक्षाच्या प्रतिनिधींचा योग्य प्रमाणांत समावेश व्हावा म्हणून ही एक विशिष्ट मतदानपद्धति स्वीकारण्यांत येते. याकरितां एक योजना—'क्युम्युलेटिव्ह व्होट'ची असते. हींत प्रत्येक मतदारानें त्याच्या मतदार संघाला जितक्या जागा असतील तितकीं मतें त्याला वाटेल त्याप्रमाणें एकाच उमेदवाराला सर्व मतें, किंवा अनेकांना विभागून द्यावीं. पण या मतदान पद्धतीनें अल्पसंख्याकांचा उमेदवार निवडून येईल, अशी खात्री नसते. म्हणून दुसरी मतदानाची योजना 'ट्रान्स्फरेबल' किंवा 'आल्टर्नेटिव्ह व्होट' ही अधिक पसंत करण्यांत आली आहे. या पद्धतींत प्रत्येक मतदार उमेदवाराच्या नांवापुढें १, २, ३, असे आंकडे लिहितो; त्याचा अर्थ प्रथम १ आंकडेवाल्या उमेदवाराला त्याचीं मतें आहेत असें समजावें, नंतर २ व नंतर ३ आंकडेवाल्या उमेदवाराला, अशीं त्यांचीं मतें समजावीं. निवडून येण्यास उमेदवाराला किती मतें पडलीं पाहिजेत, ती संख्या एकंदर मतदारांच्या संख्येला, जितक्या जागा असतील त्यापेक्षां एक अधिक इतक्या संख्येनें भागून ती संख्या निश्चित करावयाची. नंतर मतमोजणीच्या वेळीं पहिला आंकडा असलेलीं मतें मोजून कोण उमेदवार निवडून येतात तें निश्चित करावयाचें. साधारणतः पहिल्या मतमोजणींत सर्व जागा भरल्या जात नाहींत. म्हणून पुन्हा मतमोजणी करतांना जो उमेदवार निवडून आला त्याला मिळालेलीं जरूरीपेक्षां जास्त मतें प्रमाणशीरपणें त्याच्या मतपत्रिकेंत दुसरा आंकडा असलेल्या उमेदवाराला वांटून द्यावयाचीं. याप्रमाणें ठरलेल्या जागा भरेपर्यंत मतमोजणी करावयाची असते. विद्यापीठाचे सभासद निवडताना आपल्याकडेहि हीच पद्धति अवलंबिण्यात येत असते.

**प्रमिला**—पांडवांचा अश्वमेधीय श्यामकर्ण धरून अर्जुनाशीं युद्ध करणारी महिला. अर्जुनाला हिचा पराभव करतां येईना तेव्हां त्यानें तिच्याशीं लग्न केलें! जैमिनीकृत अश्वमेधांत हिची

कथा आहे. पाश्चात्यांच्या ग्रीक दंतकथांतील अमेझॉन (पाहा) प्रमाणेंच भरतखंडांत पूर्वी हें एक स्त्रीराज्य असावें व तें राज्य भूतान भागांत असावें, असें पुराण-संशोधक समजतात.

**प्रयाग**—(अलाहाबाद पाहा). प्रजापतीच्या यज्ञामुळें प्रयाग हें नाव पडलें. येथील पवित्र अक्षय्य वटवृक्षाचें चिनी प्रवाशी ह्युएनत्संग व अकबरकालीन अबदुल कादीर यांनीं वर्णन केलें आहे. प्रयागला गंगा, यमुना आणि सरस्वती या तीन नद्यांचा संगम असल्यानें हें स्थान फार पवित्र मानलें जातें. त्रिस्थळी यात्रेंत काशी आणि गया यांच्या जोडीला प्रयाग आहे. आग्र्याहून पळाल्यानंतर गोसाव्याच्या वेषांत शिवाजी प्रयागला आला होता. व तेथून काशी व पुरी येथें तो गेला.

**प्रयागजी अनंत फणसे, पनवेलकर** (१६४९–१७०८)–शिवाजीचा एक सुभेदार. हा जातीनें प्रभु असून याजकडे सन १६४९पासून सातारा व परळी या प्रांतांची सुभेदारी होती. सातारा येथें यास सोमेश्वरानें कळकीच्या झाडांत प्रकट दृष्टांत दिला, तेव्हां यानें साताऱ्याच्या किल्ल्यांत सोमेश्वराच्या मूर्तीची युवतेश्वर महादेव या नांवानें स्थापना केली. युवत म्हणजे कळकीचें झाड. कळकीच्या झाडांत सोमेश्वर प्रगट झाला म्हणून युवतेश्वर असें नांव पडलें. पुढें सातारा शहर राजधानी झाल्यामुळें याजवरील जबाबदारी वाढली व याच्या अंगचे गुण दृष्टोत्पत्तीस आले. सन १६९९ मध्यें औरंगजेबानें मोठी तयारी करून साताऱ्यावर चाल केली. तर्बियतखान, सर्जेखान व अजमशहा यांच्या साहाय्यानें बादशहानें चोहों बाजूंनीं नाकेबंदी केली. या स्वारीची आगाऊ कांहींच कल्पना नसल्यानें मराठ्यांच्याकडील बंदोबस्त अतिशय ढिला होता. धान्यसामुग्रीहि अपुरी होती. अशा परिस्थितींतहि यानें किल्ल्यावरून दगड लोटून व गोळ्यांचा वर्षाव करून मुसलमानांना जेरीस आणलें. परंतु मुसलमानांच्या दारूगोळ्यांपुढें याचा टिकाव न लागून याचे शेंकडों लोक मेले. सुदैवानें हा सुखरूप राहिला. पुढें किल्ल्यांतील सामुग्री अगदींच संपुष्टांत आली व याच वेळीं राजारामाचाहि मृत्यु झाला. तेव्हां परशराम त्रिंबकनें किल्ला अजमशहाच्या ताब्यांत दिला. कांहीं दिवसानंतर हा किल्ला परत मराठ्यांच्या ताब्यांत आला, तेव्हां यासच तेथें सुभेदार नेमलें होतें. पुढें यानें शाहूचा पक्ष घेतला. त्यानंतर थोडक्याच कालांत हा मृत्यु पावला. यास जोतिबा ऊर्फ आप्पाजी नांवाचा एक मुलगा होता. फणसे घराणें पुढें चडोबास प्रसिद्धीस आलें.

**प्रयोजनवाद**—(टेलेऑलॉजी). हेतुवाद; उद्देशवाद. हा तत्त्वज्ञानांतला एक सिद्धांत आहे. त्याचा आशय असा कीं, हें जग कांहीं विशिष्ट योजनेनुसार झालेलें आहे, आणि या जगाचा कांहीं नियोजित हेतु आहे, आणि त्या हेतूप्रमाणें जगांतील घडामोडी होत असतात. ग्रीक तत्त्ववेत्त्यांपैकीं बहुतेकांना— ॲनॅक्झॅगोरस, सॉक्रेटीस, प्लेटो, आरिस्टॉटल आणि स्टोईक पंथाचे तत्त्ववेत्ते— हा सिद्धांत मान्य होता. डेकार्ट्स, बेकन, हॉब्स, आणि स्पिनोझा यांचा या सिद्धांताला विरोध आहे. पण अलीकडील तत्त्ववेत्त्यांपैकीं लिबनिझ, कँट, शोपेनहार, वॉर्ड आणि बोझांके यांनीं या सिद्धांताचा पुरस्कार केला आहे.

**प्रलापक सन्निपात**—(टायफस फीव्हर). यास तुरुंगज्वर, छावणीज्वर; नौकाज्वर, इत्यादि अनेक नांवें आहेत, हा एक तीव्र स्वरूपाचा सांसर्गिक रोग असून उवांमुळें हा पसरतो. यामध्यें शरीरावर ठिपक्यासारखा पुरळ उठतो व अतिशय ग्लानि येते; आणि विमनस्कता उत्पन्न होते. हा रोग युरोपांत पूर्वेकडील देशांत मोठ्या प्रमाणावर आढळून येतो. याचा उद्भव अतिशय गर्दीच्या ठिकाणीं कोंदट हवेमध्यें, घाणीमध्यें व निर्मनुष्य जागेमध्यें विशेष असतो. या रोगामध्यें रोग्याची शुश्रूषा काळजीपूर्वक आणि चांगली ठेवावी लागते. रोग्याची शक्ति क्षीण होणार नाहीं, आणि त्यास भ्रम होणार नाहीं, याची काळजी घ्यावी लागते. रोग्यास वेगळा ठेवून त्याचा संसर्ग कोणास होणार नाहीं अशीहि काळजी घ्यावी लागते. साधारणपणें याचा ताप दोनतीन आठवडे टिकतो. शेंकडा ६० रोगी बरे होतात. कपड्यांची चांगली स्वच्छता राखणें, उवा नाहींशा करणें हा मुख्य प्रतिबंधक उपाय आहे.

**प्रवर**—प्रवर म्हणजे प्रवर ऋषि. वैदिक सूक्तांचे कर्ते, गोत्र ऋषींचे पूर्वज, त्यांचे वंशज, शाखासंस्थापक, अशा तऱ्हेनें प्रवर ऋषींचा अर्थ निरनिराळ्या प्राचीन विद्वानांनीं केलेला आहे. गोत्रें असंख्य आहेत, पण प्रवर ४९ आहेत. प्रवर शब्द प्रामुख्यानें श्रौतांत येतो. ४९ प्रवरांत सर्व गोत्रें विभागलेलीं आहेत. स्मार्त कर्मांत विवाहांत मात्र प्रवरांचा संबंध येतो. कारण सगोत्र विवाहाप्रमाणें सप्रवर विवाह निषिद्ध मानला आहे. तथापि उत्तर हिंदुस्थानांत सप्रवर विवाह होतात. यज्ञामध्यें एखाद्या विशिष्ट संप्रदायाला अनुसरून कर्म करतात त्याला प्रवरण म्हणतात. संप्रदाय प्रस्थापित करणारा तो प्रवर ऋषि. हेंच मत सध्यां विद्वन्मान्य झालें आहे.

प्रत्येक गोत्रांत मुख्यत्वें तीन किंवा पांच प्रवर असतात.

**प्रवर्तक**—(इन्डक्शन जनरेटर). याला डायनॅमो किंवा वीज उत्पन्न करणारें यंत्र असेंहि म्हणतां येईल. लोहचुंबकाच्या दोन ध्रुवांमध्यें जर एखादी तार किंवा तारेचें वेटोळें फिरविलें तर त्यामध्यें वीज उत्पन्न होते. याच क्रियेला प्रवर्तन (इन्डक्शन) असें म्हणतात. सर्व लहान-मोठीं वीज निर्माण करणारीं यंत्रें, उदा., मॅग्नेटो, डायनॅमो, अल्टरनेटर, इ. सर्व या एकाच तत्वा-

वर बनविलेली असतात. मॅग्निटोमध्यें लोहचुंबकाच्या दोन ध्रुवांमध्यें एक फार मोठ्या फेऱ्यांचें वेटोळें फिरत असतें. त्यामध्यें निर्माण होणारी वीजहि फार मोठ्या ऊर्जमाना(व्होल्टेज)ची असते व प्रवाह लहान असतो. जनित्र (जनरेटर) किंवा डायनॅमोमध्यें जे लोहचुंबक वापरतात ते त्यांतून उत्पन्न होणाऱ्या विजेनेंच तयार केलेले असतात. कारण ते अतिशय मोठे असावे लागतात. तारांची जाडी व वेटोळ्यांतील तारांची संख्या हीं त्यांपासून निर्माण होणारे विद्युत्प्रवाह व ऊर्जमान यांवर अवलंबून असतात.

**प्रवर्तन वलय**—(इन्डक्शन कॉइल). जेव्हां कमी ऊर्जमान (व्होल्टेज) असलेल्या विद्युत्प्रवाहाचें रूपांतर अधिक ऊर्जमानाच्या विद्युत्प्रवाहामध्यें करावयाचें असतें तेव्हां तें ज्या वलयाच्या साहाय्यानें करण्यांत येतें त्यास प्रवर्तन वलय असें म्हणतात. या प्रवर्तन वलयाचा उपयोग क्षकिरण तयार करण्याकरितां व बिनतारी संदेशपद्धतीमध्यें संदेशप्रेषक यंत्राच्या कामीं उपयोग करण्यांत येतो. तसेंच आंतरज्वलन इंजिनामध्यें अग्नीची ठिणगी उत्पन्न करण्याकरितां, निर्वात नळ्यांतील विद्युत्स्फुलिंगाचा अभ्यास करण्याकरितां, व वैद्यकीय उपचारपद्धतीमध्यें उच्च लहरींचे प्रवाह उत्पन्न करण्याकरितां या वलयांचा उपयोग करण्यांत येतो. या प्रवर्तन वलयामध्यें एक आंतील अथवा प्राथमिक लोखंडाच्या तारेचें वेष्टण गाभा म्हणून असतें. या प्राथमिक वेष्टणाभोंवतीं आणि त्यापासून विद्युत्रोधन केलेलें असें एक दुसरें वेष्टण असतें. या दुसऱ्या वेष्टणांत अनेक सूक्ष्म तारांच्या वेढ्यांचे निरनिराळे भाग परस्परांपासून विभागलेले असे असतात. प्राथमिक वेष्टणांतील प्रवाह एका स्वयंप्रेरित अशा योजनेनें नियमितपणें कांहीं कालानें बंद करण्यांत येतो व पुन्हां चालू करण्यांत येतो. प्रवाह सुरू झाला म्हणजे या अंतर्वेष्टणामध्यें चुंबकत्व निर्माण होतें; आणि प्रवाह बंद पडला म्हणजे तें चुंबकत्व नाहींसें होतें आणि ही चुंबकत्व उत्पन्न होण्याची आणि पुन्हां नाहींशी होण्याची क्रिया एकापाठीमागून एक अशा रीतीनें वरचेवर घडून आली म्हणजे बाहेरच्या दुय्यम वेष्टणामध्यें प्रवर्तित विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो व तो चुंबकक्षेत्र निर्माण झालें असतां एका दिशेनें वाहूं लागतो व नाहींसें झालें असतां त्यापेक्षां अधिक शक्तीनें विरुद्ध दिशेस वाहूं लागतो. अशा वेळीं विद्युत्स्फुलिंग पडूं नये म्हणून एक योजना केलेली असते व त्यामुळें दुय्यम वेष्टणांतील प्रवर्तित प्रवाहाची विद्युत्गतिशक्ति वाढत जाते. या विद्युत्प्रवर्तक वलयाची शक्ति प्रवर्तित प्रवाहामुळें जितक्या अंतरावरून विद्युत्स्फुलिंग निघणें शक्य असेल तितक्या अंतरावरून मोजण्यांत येते.

अ–गाभा. ब–प्राथमिक वलय. क–दुय्यम वलय. ड–अवरोधक. इ–बॅटरी.

**प्रवर्तित प्रवाह**—(इन्डयूस्ड करंट). एखादा विद्युद्वाहक पदार्थ एखाद्या चुंबकीय क्षेत्रामध्यें ठेवलेला असतांना त्या चुंबकीय क्षेत्रामध्यें कोणत्याहि तऱ्हेनें बदल केला असतां त्या पदार्थांत जो विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो त्यास प्रवर्तित प्रवाह असें म्हणतात. हा बदल पुढील एखाद्या तऱ्हेनें करण्यांत येतो: (१) एखाद्या शेजारच्या विद्युद्वाहकांतील विद्युत्प्रवाहाची शक्ति वाढवून, किंवा (२) शेजारील विद्युद्वाहकामध्यें विद्युत्प्रवाह चालू असतां त्याची स्थिति बदलून, किंवा (३) शेजारील एखादा चुंबक जागेवरून हलवून, किंवा (४) शेजारील चुंबकामधील चुंबकशक्तींत बदल करून. याप्रमाणें जेव्हां एखादें विद्युन्मंडल बंद असतें, उदा., एखाद्या तारेच्या वेष्टणाचीं दोन्ही टोकें जोडलेलीं असतात व त्यांत विद्युत्प्रवाह चालू नसतो तेव्हां त्याच्या शेजारीं असलेल्या लोहचुंबकाच्या गतीमुळें त्या वेष्टणांत विद्युत्प्रवाह उत्पन्न होतो. या विद्युत्प्रवाहाची गति त्या चुंबकाच्या प्रवाहाच्या गतीच्या उलट असते.

**प्रवास-परवाना**—(पासपोर्ट). प्रवासी लोकांना सरकारी अधिकाऱ्यांकडून प्रवास करण्यासाठीं आणि प्रवासांत संरक्षण देण्याबद्दल जें परवानगी पत्र देण्यांत येतें त्याला म्हणतात. ब्रिटिश प्रजाजनांना असे परवाने लंडन येथील फॉरिन ऑफिसच्या पासपोर्ट शाखेकडून देण्यांत येतात. त्याकरितां प्रथम ठराविक फॉर्मवर अर्ज करून तो जे. पी. अधिकाऱ्यासमोर खरा करून नंतर सदर ऑफिसकडे पाठविला पाहिजे.

हिंदुस्थानच्या रहिवाशांना परदेशांत जातांना असा परवाना सरकारकडून मिळवावा लागतो. हा सरकारी परवाना असल्याखेरीज बाहेर प्रवासच करतां यावयाचा नाहीं. तेव्हां अनेक दाखले आणि प्रशस्तिपत्रें सरकारी अधिकाऱ्याकडे देऊन व ठराविक मूल्य देऊन हा परवाना मिळत असतो.

**प्रवासी हुंडी**—याला इंग्रजींत 'सर्क्युलर नोट' म्हणतात. ज्याला प्रवासांत पैशाची जरूरी लागते तो आपल्या पेढीकडून असें एक पतीचें पत्र किंवा दर्शनी हुंडी घेतो. या पत्राबरोबर पेढी एक ज्ञापनपत्र (लेटर ऑफ इंडिकेशन) देत असते. या ज्ञापनपत्रावर ज्या पेढ्यांकडून पैसे घ्यावयाचे त्यांचीं नांवें घालून ज्यानें पत्र दाखवून पैसे घ्यावयाचे त्याची सही घेतात. बाहेरगांवची पेढी प्रवाशानें पतीचें पत्र दाखवितांच ज्ञापनपत्र

पाहावयास मागते व त्याला पावतीवर सही करण्यास सांगते. या दोन सह्या जुळल्या म्हणजे पेढी प्रवाशाला खुशाल पैसे देते.

**प्रवाळ**—पोवळीं पाहा.

**प्रवाळपंचामृत**—एक आयुर्वेदीय औषध. यांत प्रवाळ, मौक्तिक, शंख, शौक्तिक, कपर्दिक, हीं औषधें असून रुईच्या चिकांत खल करतात. करपट ढेकर येणें, पोट जड लागणें, आम्ल पित्त, घशांत जळजळ होणें, खोकला, धाप लागणें, पाढरा अतिसार होणें, आंबट वांत्या होणें, अतिशय तहान लागणें, हातापायांची जळजळ, डोळ्यांची आग होणें, लघवीची आग होणें, आवाज बसणें, इत्यादि विकारांवर हें औषध अतिशय उपयोगी आहे. ।· ते १ गुंज दूध-खडीसाखर, दाडिमावलेह, लोणी-खडीसाखर इत्यादींबरोबर देतात.

**प्रवाळ भस्म**—एक आयुर्वेदीय औषध. पित्तजन्य विकारांवर हें एक उत्तम औषध आहे. दाह, तहान लागणें, ओकाऱ्या होणें, चक्कर येणें, डोकें भयंकर दुखणें, नाकांतून रक्त येणें, प्रदर, मूळव्याध, जुनाट खोकला, डांग्या खोकला, गळ्यांतील गांठी सुजणें, गरोदर स्त्रियांना होणारी ओकारी, इत्यादि अनेक विकारांवर या औषधाचा हमखास उपयोग होतो. प्रमाण—।।· ते २ गुंजा. दाडिमावलेह, मोरावळा, दूधसाखर, लोणीखडीसाखर यांबरोबर देतात.

**प्रवीणराय**—एक हिंदी कवयित्री. केशवदासाची ही शिष्या असून त्यानें हिच्यावर 'कविप्रिया' नांवाचें पुस्तक लिहिलें. ( केशवदास पाहा ). हिनें कांहीं छंदयुक्त कविता केल्या आहेत. गायनवादनकलेंत ही निपुण असून ओर्छाच्या इंद्रजितसिंहाची ही रक्षा होती.

**प्रशिया**—जर्मनींतील एक संस्थान, जुनें जर्मन साम्राज्य. क्षे. फ. १,१४,१२० चौ. मैल. लो. सं. ३,९९,०७,०००. राजधानी बर्लिन. पूर्वी प्रशिया हें एक लहानसें स्वतंत्र राष्ट्र होतें. फ्रेडरिक विल्यम (१६२०-१६८०) यानें याची स्थापना केली. पुढें फ्रेडरिक दि ग्रेट यानें जर्मनी हें पहिल्या प्रतीचे लष्करी राष्ट्र केलें व जर्मन-वैभवाचा पाया रचला. पहिला विल्यम व बिस्मार्क यांच्या काळांत तर प्रशियानें वैभवसीमा गांठली. १९१८ मध्यें लोकशाहीची स्थापना होईपावेतों प्रशियाची श्रेष्ठता कायम होती. त्यानंतरहि प्रशियाला योग्य तें महत्त्व होतेंच. १९३४ मध्यें नाझी योजनेप्रमाणें होणाऱ्या देशाच्या पुनर्घटनेंत याची विभागणी करण्यांत आली. जर्मनी पाहा.

**प्रश्नोपनिषद्**—हें उपनिषद् गद्यांत असून तें पिप्पलाद शाखेंतील आहे. ह्यांत १ कौशल्य आश्वलायन, २ वैदर्भिभार्गव, ३ कबंधी कात्यायन, ४ हिरण्यनाभ ( कोशलांचा राजा ), आणि दुसरे दोघे जण मिळून एकंदर सहा आचार्यांच्या अभिप्रायासह पारमार्थिक विषयासंबंधीं विवेचन पिप्पलादानें केलें आहे. ह्या उपनिषदावरदेखील शंकराचार्यांची टीका आहे.

**प्रसरण**—एखाद्या पदार्थाचें उष्णमान वाढलें असतां त्याच्या आकाराची जी वाढ होते तीस प्रसरण असें म्हणतात. उदा., लोखंडाचा लांबीचा प्रसरणगुणांक ०·००००११ इतका आहे. याचा अर्थ असा कीं, एखाद्या लोखंडाच्या कांबीचें उष्णमान १० शत. नें वाढविलें असतां त्या कांबीची लांबी या प्रमाणांत वाढते. घनपदार्थाचा घनप्रसरणगुणांक लांबीच्या गुणांकाच्या तिप्पट असतो. सिलिका किंवा गारगोटी हिचा प्रसरणगुणांक इतका अल्प आहे कीं, ती लालभडक असतांना जरी पाण्यांत बुडविली तरी तिला भेग पडत नाहीं. निकेल आणि पोलाद यांची इन्व्हर नांवाची एक मिश्र धातु असते. तिचा प्रसरणगुणांक अत्यंत अल्प असल्यामुळें त्या धातूचे घड्याळाचे लंबक करण्यांत येतात. त्यामुळें त्याच्यावर वातावरणांतील उष्णमानांतील फरकाचा परिणाम होत नाहीं. पाण्याचें उष्णमान वाढविलें असतां त्याचें जें प्रसरण होतें तें अनियमित स्वरूपाचें असतें. उदा., पाण्याचें उष्णमान ०° पासून ४° शत. पर्यंत वाढविलें असता तें प्रसरण पावण्याच्याऐवजीं आकुंचन पावतें व त्यानंतर वाढत्या गतीनें तें उकळण्याच्या बिंदूपर्यंत प्रसरण पावत राहतें.

**प्रसाद ( पवित्र )**—पवित्र प्रसाद हा एक ख्रिस्ती संस्कार आहे. यामध्यें भाकरीचें रूपांतर ख्रिस्ताच्या शरीरामध्यें व मद्याचें रूपांतर त्याच्या रक्तामध्यें करण्यांत येऊन त्यास प्रत्यक्ष उपस्थित करण्यांत येतें. श्रद्धाळू लोक या संस्कारामध्यें ख्रिस्ताचें ग्रहण करतात. याचा अर्थ असा आहे कीं, ज्याप्रमाणें अन्नाचें रक्तांत रूपांतर होऊन तें शरीरांत एकजीव होतें त्याप्रमाणें ख्रिस्त हा श्रद्धाळू लोकांच्या देहांत एकजीव होतो. या संस्कारास धन्यसंस्कार असेंहि म्हणण्यांत येतें. कारण सर्व सात ख्रिस्ती संस्कारांमध्यें हा सर्वोत पवित्र आहे. याचें ग्रहण म्हणजे पवित्र एकात्मीकरण होय. हा पवित्र प्रसाद सामान्यतः देवळामध्यें मुख्य वेदीवर एका पात्रांत ठेवण्यांत येतो. तेथें भाविक लोक त्याचें दर्शन घेतात व पूजन करतात. कधीं कधीं त्याचें सार्वजनिक रीतीनें आविष्करण करण्यांत येतें व त्याची मिरवणूक काढण्यांत येते.

**प्रसाधन शिल्प**—( डेकोरेटेड स्टाइल ). गॉथिक शिल्पपद्धतीच्या उत्तर अवस्थेमध्यें तेराव्या शतकाच्या अखेरीपासून पंधराव्या शतकाच्या आरंभापर्यंत ही शिल्पपद्धति इंग्लंडमध्यें प्रचलित होती. यानंतर लंब( परपेंडिक्युलर ) शिल्पपद्धति प्रचारांत आली. या पद्धतींतहि आरंभीं भूमितीच्या आकृतींचा सजावटीमध्यें विशेष उपयोग करण्यांत येत असे. यानंतर खरी

सजावट शिल्पपद्धति प्रचारांत आली. यॉर्कमध्यें असें शिल्प पाहावयास मिळतें.

**प्रसारिणी तेल**—एक आयुर्वेदीय औषध. चांदवेल सुमारें चार शेर वजन घेऊन तींत सुमारें आठ पट पाणी घालून तें चतुर्थांश राहीपर्यंत काढा करून तो गाळून घ्यावा. नंतर त्या काढ्यांत तेल, दहीं, व कांजीं काढ्याच्या समभाग घालून तेलाच्या चौपट गाईचें दूध घालावें. त्यानंतर जेष्ठीमध, पिंपळीमूळ, चित्रक, सैंधव, वेखंड, चांदवेल, देवदार, रास्ना, गजपिंपळी, चिव्हे, बडिशेप, आणि जटामांसी हीं बारा औषधें तेलाच्या अष्टमांश प्रमाणात घेऊन त्यांचा रांधा करावा व तो तेलांत घालून तेल शेष राहीपर्यंत पाक करून तेल गाळून ठेवावें. तें प्रत्यहीं थोडें थोडें अंगास लाविल्यानें सर्व वातरोग दूर होतात.

**प्रसूति**—सस्तन वर्गांतील स्त्रीजातीचा प्राणी जेव्हां आपल्या जातीच्या एका लहान प्राण्यास जन्म देतो तेव्हां त्या क्रियेस प्रसूति असें म्हणतात. प्रत्येक प्राण्याची गर्भावस्था निरनिराळ्या जातीमध्यें ठराविक दिवसांची असते. मनुष्यप्राण्यामध्यें ३९ आठवड्यांच्या अखेरीस किंवा ४० व्या आठवड्याच्या आरंभीं मूल आपल्या आईवांचून स्वतंत्र रीतीनें राहण्यास समर्थ होतें. यामुळें त्या वेळीं त्याचा जन्म होतो. या वेळीं गर्भाशयाचा संकोच होऊन प्रसूतिवेदना होऊं लागतात. गर्भाशयाचा वरील भाग प्रथम आकुंचन पावतो. नंतर खालचा भाग पातळ होऊन प्रसरण पावतो. आणि मूल प्रथमतः डोकें पुढें होऊन खालीं योनीमध्यें ढकललें जाऊन बाहेर पडतें. प्रसूतिवेदनांची प्रथमावस्था सामान्यतः १२ तासांची किंवा क्वचित् १८ तासांची असते. दुसऱ्या अवस्थेंतील वेदना जलद होतात. मूल जन्मल्यानंतर कांहीं काळ वेदना थांबून स्तब्धता येते व नंतर कांहीं वेळानें वारेची पिशवी बाहेर पडते. सातव्या महिन्यानंतर व नऊ महिन्यापूर्वी प्रसूति झाल्यास तिला अपक्व प्रसूति म्हणतात. नऊ महिन्यांनंतर किंवा ४० आठवड्यांनंतर होणाऱ्या प्रसूतीस विलंबित प्रसूति असें म्हणतात.

**प्रसूतिविज्ञान**—स्त्रियांची प्रसूतीसमयीं जी काळजी घ्यावी लागते, त्याविषयींच्या वैद्यकशाखेस प्रसूति-विज्ञान (ऑब्स्टेट्रिक्स) असें म्हणतात. तथापि या शाखेमध्यें प्रसूत होणाऱ्या स्त्रीस प्रसूतीनंतर दुग्ध येण्याच्या कालापर्यंत जे रोग होतात त्यांचा व सामान्यतः स्त्रियांस होणाऱ्या बऱ्याच रोगांचा अंतर्भाव करण्यांत येतो. कारण त्यांतील बरेच रोग प्रसूतिजन्य अथवा प्रसूतिविषयक असतात.

मुलाचा जन्म होणें ही एक अगदीं नैसर्गिक क्रिया आहे व तीमध्यें कोणत्याहि प्रकारची ढवळाढवळ न करणें आणि ती स्वाभाविकपणेंच शक्य तितकी होऊं देणें ही गोष्ट शहाणपणाची आहे. परंतु कित्येक वेळीं मातेचें कटिर संकोच पावलेलें असतें किंवा त्यास विकृति झालेली असते, किंवा त्याच्या स्नायूंची शक्ति मूल बाहेर टाकण्यास समर्थ होईल इतकी असत नाहीं. अशा वेळीं मूल बाहेर पडण्याकरितां चिमट्याचा वगैरे उपयोग करणें अवश्य असतें. कित्येक वेळां चिमट्याचा उपयोग करणेंहि निरर्थक असतें. अशा वेळीं पोट फाडण्याची (सीझर शस्त्रक्रिया) क्रिया करून मूल बाहेर काढावें लागतें. सामान्यतः मुलाचें डोकें खालीं असून तें प्रथम बाहेर येतें, व डोकें सर्व शरीरापेक्षां मोठें असल्यामुळें मुलाच्या शरीराचा बाकीचा भाग सहज बाहेर पडतो. परंतु जर मुलाच्या शरीराचा दुसरा एखादा भाग प्रथम बाहेर आला तर मात्र अडचण आणि विलंब होण्याचा संभव असतो. अशा वेळीं शस्त्रवैद्य मुलाची गर्भाशयांतील स्थिति बदलून त्यास योग्य स्थितींत आणतो. मूल जन्मण्यापूर्वी गर्भाची मोटळी फुटून पाणी बाहेर येतें. व त्यानंतर मूल बाहेर येतें आणि त्यानंतर वार बाहेर पडते. ही वार मुलाच्या बेंबीच्या नाडीस जोडलेली असते. या वेळीं प्रसूति पूर्ण होते.

**प्रस्तरसंधी**—(जॉइंट्स). भूस्तरशास्त्रांत, घट्ट बनलेल्या खडकामध्यें, विभिन्न पृष्ठभागांमध्यें किंवा पातळीमध्यें, निरनिराळ्या प्रकारच्या थरांवर आढळणाऱ्या विभाजक रेषांलेरीज ज्या विभाजक रेषा आढळतात त्यांस प्रस्तरसंधी असें म्हणतात. अग्निजन्य खडकामध्यें असे प्रस्तरसंधी बहुधा तो खडक विशिष्ट ठिकाणीं खचल्यामुळें उत्पन्न होतात. उदा., एखाद्या ठिकाणीं असलेला खडकाचा ततरस कांहीं दिवसांनीं निवत जाऊन घट्ट बनतो व स्फटिकमय थरांच्या वाढीनंतर असे उत्तरकालीं बनलेले खडक मधूनच दृष्टीस पडतात.

**प्रस्तरावशेषकाल**—(प्रोटेरोझोइक). कॅम्ब्रीयन काळाच्या पूर्वीच्या कालास ही संज्ञा लावण्यांत येते. या कालांत पंकनिर्मित आणि अग्निजन्य खडकाचे मोठे ढीग झाले असावेत; तसेंच प्राणी उत्पन्न झाले असावेत; परंतु त्यांचे अवशेष खडकांमध्यें फारच क्वचित् आणि अपूर्ण आढळतात. उत्तर अमेरिकेंत या प्रकारचे खडक दिसतात व त्यांना स्थानावरून नांवें देण्यांत आलेलीं आहेत. विस्कॉन्सिन आणि मिनेसोटा या भागांत असे ॲनिमिकीयन खडक जे आहेत त्यांत लोखंडाचा जगांतील मोठा सांठा आहे.

**प्रस्तरीभूत अवशेष**—(फॉसिल्स). भूस्तरशास्त्रामध्यें, प्राचीन काळच्या पाषाणांमध्यें जे सेंद्रिय पदार्थांचे प्राणी अथवा वनस्पतींचे अवशेष आढळतात त्यांस प्रस्तरीभूत अवशेष किंवा प्रास्तरावशेष म्हणतात. अशा तऱ्हेचे आढळणारे प्रास्तरावशेष बहुधा शंख-शिंपा, किंवा कवचें-अस्थी, किंवा वनस्पतींचे कर्बमय अवशेष असतात व ते प्रथम सेंद्रिय स्वरूपांत

असतात. वनस्पतींचे प्रास्तरावशेप पाण्यामध्यें पूर्णपणें बुडून गेल्यानंतर बनलेले असल्यास ते दीर्घकाल टिकतात. यामुळें समुद्रांत आढळणाऱ्या वनस्पतींचे प्रास्तरावशेप निरनिराळ्या काळांतील जसे सुसंगतवार व पूर्णत्वानें आढळून येतात तसे जमिनीवरच्या वनस्पतींचे आढळत नाहींत. पूर्वी जे मोठाले तलाव होते (उदाहरणार्थ, डेव्होनियन कालांतील तलाव) त्यांमध्यें जमिनीवरील वनस्पतींचें प्रास्तरावशेप अधिक आढळतात; परंतु जमिनीवरील अवशेप बहुधा चिखल किंवा वाळू यांचा त्यांच्यावर पुरेसा थर बसून त्याचें चांगलें संरक्षण होण्यापूर्वीच ते नष्ट होण्याचा किंवा हालविले जाण्याचा संभव बराच असतो. चिकणमातीमध्यें पाणी, वगैरे शिरत नसल्यामुळें चिकणमातीच्या थरांतील अवशेप बहुधा जसेच्या तसेच राहतात. सेन्द्रिय पदार्थांतील सेन्द्रियत्व नष्ट होतें; शिंपले *किंवा शंख अथवा कवचें यांचे निरनिराळे रंग पार नाहींसे* होतात. परंतु अत्यंत नाजुक कवचधारी प्राण्याच्याहि कवचास ओरखडासुद्धां निघत नाहीं किंवा तो द्रवरूप होत नाहीं. वालुकामय प्रस्तरांत किंवा चुनखडीमध्यें जो पोवळ्यांतील कठिण खट कर्बिताचा (कार्बोनेट ऑफ लाइम) भाग असतो किंवा ज्या शिंपा किंवा कवचें असतात त्यांचें खटिता( कॅलसाइट )मध्यें लवकरच रूपांतर होतें. परंतु कांहीं कवचांचे गारांत रूपांतर होतें किंवा त्यांचें लोहकर्बित( आयर्न कारबोनेट ) किंवा लोहद्विगंधकित-(आयर्न डायसल्फाइड—सुवर्णमाक्षिक )मध्यें रूपांतर होतें. अस्थींच्या प्रास्तरावशेपांतील खटकर्बित( कॅल्शम कार्बोनेट ) नष्ट होऊन खटस्फुरित( कॅल्शम फॉस्फेट ) अथवा फ्लुअरिद (फ्लुओराइड) यांचें प्रमाण वाढतें. शॉर्क वगैरे माशांचे दांत अशा स्वरूपांत आढळतात कीं, त्यांचें शेतास उत्तम खत होतें.

जमिनीवर राहणाऱ्या प्राण्यांचीं हाडें कधीं कधीं सुरक्षित राहतात ( उदा., ॲटिका प्रांतांतील पिकर्मी शेतांत ). विशेपतः तीं पाण्याच्या प्रवाहांत सांपडून पुरांतील गाळांत वगैरे पुरलीं गेल्यास चांगल्या स्थितींत आढळतात. परंतु माशांखेरीज अन्य प्राण्यांचें संपूर्ण स्थितींत असलेले पृष्ठवंशयुक्त सांगाडे क्वचितच आढळतात. कधीं कधीं थोडेफार अवशेष आढळले असतां त्यांवरून फार मोठमोठालीं अनुमानें काढण्यांत येतात व अशा अनुमानांपैकीं युरोपांत आढळलेल्या अवशेपांवरून प्राचीन काळीं अस्तित्वांत असणाऱ्या प्राण्यांबद्दल जीं अनुमानें काढण्यांत आलीं होतीं त्यांपैकीं बहुतेक पुढें त्या प्राण्यांचे संपूर्ण सांगाडे आढळल्यामुळें खरीं ठरलीं आहेत.

बव्हेरिया प्रांतांतील सोल्न हॉफेन आणि आइक्स्टाट येथील एका प्रकारच्या शिळाछापास उपयुक्त अशा प्रकारच्या चुनखडीच्या बारीक रव्यांच्या दगडांमध्यें जे प्रास्तरावशेप सुरक्षित स्थितींत सांपडले आहेत त्यांवरून इतर प्रकारचे खडक असणाऱ्या प्रदेशांतील प्राचीन-अवशेपशास्त्र किंवा ज्ञान किती अपूर्ण स्थितींत आहे हें चांगलेंच निदर्शनास येतें. या प्रस्तरांमध्यें सर्वांत प्राचीनतम पक्ष्याचे अवशेप आढळतात. हे प्रस्तर उत्तर जुरितयुग-( अप्पर जुरासिक एज )मधील आहेत. या पक्ष्याच्या पिसांचे आकार या अवशेपांमध्यें स्पष्ट दृष्टीस पडतात. जेली ( कालवें ) फिशसारखे मृदु शरीर असलेले प्राणी आणि उडणाऱ्या सर्पाकृति प्राण्यांच्या पंखाची अंतस्त्वचा हीं चुनखडीच्या दगडांत सांपडलीं आहेत. तसेंच वुर्टेमबुर्गमध्यें एका इक्थायोसॉरस( प्रचंड मत्स्य )चा सर्व सांगाडा संपूर्ण अवस्थेंत आढळला आहे. व त्यास कल्ले आहेत ही गोष्ट अपेक्षेबाहेरची आहे, व ते कल्ले सांगाड्याच्या बाहेरच्या बाजूस सांचासारखे दृष्टीस पडतात. या कालापूर्वीच्या कालांतील प्रास्तरावशेप *आढळत नाहींत, याचें कारण त्या कालांतील प्राणी चुन्याचीं* लवणें ( सॉल्ट ऑफ कॅल्शम ) आपल्या शरीरामध्यें पचवूं शकत नसावे व त्यामुळें त्यांच्या शरीरांत कठिण अशीं हाडें, वगैरे निर्माण होत नसावीं किंवा तत्कालीन समुद्राच्या पाण्यांत विरघळलेल्या स्थितींत खटलवणें ( सॉल्ट ऑफ कॅल्शम ) अस्तित्वांत नसावीं.

तलावाच्या बुडाशीं आढळणारे प्राण्यवशेप रुक्ष प्रदेशांत आढळण्यांत येतात, याचें कारण, प्राचीन काळीं अस्तित्वांत असलेले तलाव पुढील काळांत आटून गेले असावेत, हें होय. तसेंच समुद्रांत राहणाऱ्या प्राण्यांचे अवशेप आजच्या समुद्राच्या सपाटीपेक्षां उंच असलेल्या किंवा समुद्र नसलेल्या जागीं आढळतात याचें कारण, समुद्राची मर्यादा हटत गेली असावी, कमी कमी होत गेली असावी हें होय. किंवा एके काळीं समुद्राच्या तळाशीं असणारी जमीन कालांतरानें वर उचलली गेली असावी व समुद्राच्या ठिकाणीं जमीन झाली असावी हें होय. प्राचीन काळच्या प्राण्यांचे जे प्रास्तरावशेप आढळतात त्यांची सध्यांच्या प्राण्यांशीं तुलना केली असतां त्या विशिष्ट प्रस्तरांचा काल व हवामान यांसंबंधीं अनुमानें काढतां येतात.

**प्रस्थानत्रयी**—उपनिषदें, वेदांतसूत्रें *आणि भगवद्गीता* या त्रयीस म्हणतात. प्रापंचिक व पारमार्थिक, किंवा प्रवृत्तिपर व निवृत्तिपर अशा दोन्ही मार्गांचें पद्धतशीर तात्त्विक विवेचन करणारे वैदिक धर्माचे मुख्य आधारभूत ग्रंथ हेच होत. या प्रस्थानत्रयीचें महत्त्व हिंदुधर्मांत इतकें आहे कीं, जें धर्ममत या तीन ग्रंथांतील विचारसरणीस धरून नाहीं तें धर्मबाह्य अतएव वर्ज्य आहे असें शास्त्री मानतात. यासाठीं या देशांत जे धर्ममतप्रवर्तक झाले त्या सर्वांनीं या तीन ग्रंथांत आधारभूत धरूनच आपापलीं मतें जनतेच्या पुढें मांडलीं. अद्वैत,

विशिष्टाद्वैत, द्वैत, शुद्धाद्वैत आणि द्वैताद्वैत याप्रमाणें पांच भिन्न मतांचे पुरस्कर्ते या प्रस्थानत्रयीस आधारभूत मानतात.

सर्व सांप्रदायिक आचार्यांस प्रस्थानत्रयीला आपण धरून आहों व प्रस्थानत्रयी ही खरी स्वसांप्रदायिक मार्गाचीच विचार-विवेचनसरणी धरून चाललेली आहे, असें दाखवावें लागतें. इतके हे तिन्ही ग्रंथ प्रामाण्यपदाला पोंचलेले आहेत. निवृत्ति व प्रवृत्ति या दोन्ही मार्गांसंबंधीं तात्त्विक विवेचन यांत आहे. उपनिषदें जीव व शिव यांचा विचार करतात. सर्वच उपनिषदें जरी जीवशिवविवेचनात्मक असलीं तरी त्यांतहि कित्येकांत परस्पर विरोध आढळतो. त्याचें निराकरण करणें व औपनिषदैकमत्य प्रस्थापित करणें, या हेतूनें वेदांतसूत्रें निर्माण होऊन तींहि उपनिषत्तुल्य प्रामाण्यग्रंथ ठरलीं. हे दोन्ही ग्रंथ केवळ निवृत्तिमार्गाचे असल्यानें प्रवृत्तिमार्गविवेचक श्रीमत्भगवद्गीतेचाहि भगवद्वाक्यत्वानें प्रामाण्यपूर्वक समावेश होऊन वैदिक परमार्थविवेचक मूलत्रयी झाली.

**प्रहसन**—हा करमणुकीचा प्रकार प्राचीन लौकिक नाटकांतून घेतलेला आहे. याचें संविधानक नाटककारानें नेहमींच्या व्यवहारांतून घेतलेलें असतें. यांत नेहमीं लुच्चे, लबाड व बदमाश लोकांत चालू असणारे लबाडीचे प्रकार, कलह, विग्रह, इत्यादिकांचें चित्र प्रामुख्यानें रेखाटलेलें असतें. वृत्तींपैकीं कैशिकी व आरभटी या दोन वृत्ती वर्ज्य करण्यांत येतात व संधींपैकीं मुख व निर्वहण या दोन संधींचा उपयोग करतात (भरत १९.४५). यांतील मुख्य रस हास्य हा होय. परंतु मधून मधून लास्यांगें व वीथ्यंगें यांचाहि उपयोग करावा असें सांगितलें आहे.

प्रहसनाचे दोन प्रकार आहेत : एक शुद्ध व दुसरा संकीर्ण. शुद्धामध्यें निरनिराळ्या जातींचे लोक–ब्राह्मण व अगदीं हलक्या जातीचेहि लोक–आपापली भाषा बोलतांना व आपापले धंदे करतांना दृष्टीस पडतात. संकीर्ण प्रकारामध्यें वेश्या, दासदासी, वर्षधर, विट आणि धूर्त अशा प्रकारचे लोक दृष्टीस पडतात. दशरूपककाराच्या मतानें ज्यांत वीथ्यंगाचा उपयोग करण्यांत येतो, तें प्रहसन संकीर्ण समजावें. दशरूपककार आणि साहित्यदर्पणकार यांनीं प्रहसनाचा विकृत म्हणून एका तिसऱ्या प्रकाराचा उल्लेख केला आहे. यांत वर्षधर व दासदासी ह्या एकमेकांच्या शृंगारचेष्टा करतात.

साहित्यदर्पणकाराच्या मतानें प्रहसनांत फक्त एक अंक असावा आणि निष्कंभक व प्रवेशक हे नसावेत; परंतु संकीर्ण प्रहसनांत दोन अंक असले तरी चालेल. 'कंदर्प केलि' हें शुद्ध प्रहसनाचें उदाहरण असून, 'धूर्तचरित' व 'लटकमेलक' हीं दोन संकीर्ण प्रहसनाचीं उदाहरणें दिलीं आहेत.

व्याजोक्तिपर व उपहासगर्भ अशा लहानशा नाटकाला आज प्रहसन हें नांव देतात. इंग्रजी 'फार्स' याला हा प्रतिशब्द आहे.

**प्रल्हाद**—हिरण्यकशिपु व कयाधू यांचा ज्येष्ठ पुत्र. हा प्रसिद्ध भगवद्भक्त आहे. याच्या रक्षणार्थ विष्णूनें नृसिंहावतार घेऊन हिरण्यकशिपूस मारलें. प्रल्हाद लहानपणापासूनच विष्णूची अतिशय भक्ति करीत असे. पण ती बापास आवडत नसे. तेव्हां त्यानें प्रल्हादाचा अत्यंत छळ केला. मरण येईल अशा अनेक शिक्षा दिल्या. पण प्रल्हाद मेला नाहीं. शेवटीं भक्ताला वांचविण्यासाठीं विष्णूनें सिंहाचा अवतार घेतला व हिरण्यकशिपूला ठार केलें. तेव्हां प्रल्हादानें त्याच्याजवळ, पित्याचा उद्धार कर, हाच वर मागितला. ध्रुवाप्रमाणें बालभक्त म्हणून प्रल्हादाचें चरित्र हृदयंगम आहे.

**प्रल्हाद शिवाजी बडवे**—एक मराठी संतकवि. हा पंढरपूर येथील श्रीविठ्ठलाच्या पुजारी घराण्यांतला होता. हा शिवकालीन दिसतो. ज्ञानेश्वराचें अमृतानुभव यानें संस्कृतांत भाषांतरलें. औरंगजेबापासून विठ्ठल मूर्तीचें रक्षण कांहीं काळ ती मूर्ति लपवून ठेवून यानें केलें. याचीं कांहीं पदें व आख्यानें आहेत. मृत्यु शके १६४० माघ कृष्ण ११. याची समाधि पंढरपुरास विठोबाच्या देवळांतच आहे.

**प्रक्षेपक सिद्धांत**—(थिएरी ऑफ प्रोजेक्टाइल्स). पृथ्वीवरून क्षितिजाशीं कांहीं उन्नतांशकोन (ॲंगल ऑफ एलेव्हेशन) करून कांहीं वेगानें एखादा पदार्थ फेंकल्यास त्या पदार्थाच्या गतीचें विवरण करणें हा गतिशास्त्राचा एक भाग बनतो. पदार्थ हवेंतून जाणार म्हणजे हवेचा प्रतिरोध त्याच्या वेगावर होणारच. परंतु प्रश्न सोपा करण्याकरितां हा रोध लक्षांत न घेतां पदार्थाच्या वेगाचे दोन अंश भाग करूं. एक क्षितिजाला समांतर (व) वेग आणि दुसरा क्षितिजाला लंब (ल) वेग. पदार्थाची गति सुरू होते तो बिंदु आरंभस्थान घेऊन तेथून काढलेली क्षितिजाला लंब रेषा हा एक अक्ष; व गतीची दिशा व हा लंब ह्यांमधून जाणारें समपृष्ठ क्षितिजाला कापील ती रेषा दुसरा अक्ष, असे घेऊन गतीचीं समीकरणें मांडावयाचीं आहेत.

**ग** गतीनें **आ** स्थानापासून पदार्थ फेंकला. **आक्ष** आणि **आय** हे दोन अक्ष. पदार्थाच्या मार्गावर **ब** बिंदु घ्या. त्याचे **म, न** हे दोन स्थानांक (कोऑर्डिनेट्स). गुरुत्वाकर्षणशक्ति फक्त क्षितिजाला लंब असते म्हणून $न = ल \times क - १६क^{२}$ (आपासून बपर्यंत जाण्यास क काल लागला). तसेंच $म = व \times क$.

हा प्रश्न गोलंदाजी वगैरे व्यवहारांत उपयोगी असल्याकारणानें हवेच्या प्रतिरोधाचा विचार करणें अवश्य आहे. पण त्यामुळें गणित बरेंच अवघड होतें.

**प्रज्ञा**—( रीझन ). मानसशास्त्रांत 'प्रज्ञा' किंवा 'बुद्धि' हा शब्द मनाच्या एका विशिष्ट शक्तीला लावतात. या प्रज्ञेमुळें मनुष्याला वस्तुस्थितीवरून आणि सामान्य सिद्धांतावरुन विशिष्ट अनुमानें काढतां येतात; आणि विशेषतः सत्य विधानावरून बिनचूक अनुमानें काढतां येतात. या बुद्धिसामर्थ्यामुळें मनुष्याला खरें व खोटें, बरोबर व चूक, यांमधील फरक कळतो, आणि आपले विशिष्ट हेतु साध्य करण्याकरितां योग्य साधनें कोणतीं योजावीं हें कळतें. मनुष्याला 'बुद्धिवान् प्राणी' ( रॅशनल ॲनिमल ) असें म्हणतात. कारण मनुष्य व इतर प्राणी यांच्यामध्यें मुख्य फरक बुद्धि हा आहे. या बुद्धिसामर्थ्यामुळें मनुष्याला भौतिक व आध्यात्मिक बाबींचा विचार करतां येतो. त्यांच्या अस्तित्वाबद्दलचा अनुकूल व प्रतिकूल पुरावा तुलनात्मक पद्धतीनें पाहतां येतो, आणि त्यावरून बिनचूक अनुमानें काढून त्याप्रमाणें वागतां येतें. तात्पर्य, प्रज्ञा ( रीझन ) म्हणजेच बुद्धि ( इंटेलेक्ट ) असून बुद्धीच्या उलट अन्तःस्फूर्ति ( इन्स्टिंक्ट ) होय, व अन्तःस्फूर्ति ही मनुष्यापेक्षां हलक्या जातीच्या प्राण्यांमध्यें जास्त असते.

**प्रज्ञापारमिता ( सूत्रें )**—एक बौद्धधर्मीय ग्रंथ. महायान सूत्रांपैकीं अत्यंत महत्त्वाचीं व श्रेष्ठ प्रतीचीं हीं आहेत. बोधिसत्त्वाच्या सहा परिपूर्णता म्हणजेच पारमिता मानल्या आहेत. त्यांचें व विशेषतः बुद्धि अथवा प्रज्ञा या पारमितेचें सर्वश्रेष्ठ परिपूर्णता वर्णन यांत आलेलें आहे. केवलशून्यवादाचा हा ग्रंथ आहे. यांत आस्तित्व व नास्तित्व हीं दोन्ही नाकबूल केलीं आहेत. बुद्धाच्या सर्व शरीरापासून बाहेर पडणाऱ्या किरणांनीं जगाला प्रकाश मिळतो, अशी प्रस्तावना करून सर्व ग्रंथ लिहिला आहे, पण त्यांत 'नाहीं' हें एकच सर्वसामान्य उत्तर व सार भरलेलें आहे.

**प्राउट ( १७८५–१८५० )**—एक इंग्रज रसायनशास्त्रज्ञ व वैद्य. प्राउटचा सिद्धांत म्हणतात तो याचाच. सर्व मूलद्रव्यें केवल उज्जापासूनच झालेलीं आहेत, असें यानें आपल्या एका निबंधांत प्रथापित केलें. सर्व मूलद्रव्यांचे परमाणुभारांक हे उज्जाच्या परमाणुभारांकांच्या कोणत्या तरी पूर्णपटीबरोबर असतात, हाच त्याच्या दुसऱ्या एका निबंधाचा विषय होता. बिनचूक परमाणुभारांक शोधून काढण्याकडे शास्त्रज्ञांचें लक्ष लावण्यास प्राउटचें लेखन कारणीभूत झालें.

**प्राउस्ट ( १७६४–१८२६ )**—एक फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ. हा स्पेनमध्यें रसायनशास्त्राचा अध्यापक होता. कोणतेहि दोन पदार्थ परस्परांशीं अव्वल संयोगानें मिळतांना एकाच प्रमाणांत मिळतात, या बार्थोले शास्त्रज्ञाच्या मताशीं विरोध करणारें मत यानें प्रस्थापित केलें; व तें हें कीं, पदार्थांचा हा संयोग गुणित संयोगनियमानेंच होतो व एकाशीं दुसरा एक-द्वि-त्रि गुणित वगैरे कोणत्या तरी गुणित प्रमाणांत संयोग पावतो. वनस्पतिरस-शर्करा तपासून यानें मध व द्राक्ष यांतील शर्करा एकच ठरवली.

**प्राग**—युरोप, झेकोस्लाव्हाकियाची राजधानी. झेकोस्लाव्हाकियाचा एक प्रांत बोहीमिया आणि मोरेव्हिया यांचेंहि हें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या ९,५०,७०३. व्हलाटवा नदीच्या दोन्ही बाजूंस हें वसलें असून याचा उपनगर विभागहि फारच मोठा आहे. हें शहर बरेंच जुनें व इतिहासप्रसिद्ध असून फार सुंदर आहे. येथें बऱ्याच लढाया व चकमकी झालेल्या आहेत. सेंट जॉर्ज, सेंट व्हिटस यांचीं मोठीं व जुनीं देवळें आहेत. १३४८ त स्थापन झालेलें विद्यापीठ आहे. यांत १८,००० विद्यार्थी शिकतात. संस्कृतादि प्राच्य वाङ्मयाचाहि यांत अभ्यास होतो. येथें व्यापारहि फार मोठा आहे. दारू, पीठ, लोखंड, यंत्रें, वाहनें, सूत, कातडीं, रसायनें, इ. चे कारखाने आहेत.

**प्राचीनजलसर्पवर्ग**—( प्लेझिओसौरस ). ही एक पाण्यांत राहणाऱ्या सरपटणाऱ्या प्राण्याची नष्ट झालेली जात आहे. या प्राण्याचें इचथिओसौरसशीं बरेंच साम्य आहे. याची मान बरीच मोठी व लांब असून शरीर व शेपटी हीं सामान्य आकाराचीं असत व त्यास व्हेल माशासारखे-वल्ह्यासारखे पाय जोडलेले असत. याचें डोकें शरीराच्या आकाराच्या बाराव्या हिश्याएवढें असे. याचें तोंड निमुळतें व पुढें आलेलें असून डोळे मोठे व रुंद असत. याच्या शरीरांत वक्षास्थींची वाढ झालेली दिसून येत नाहीं. हे सामान्यतः उथळ समुद्रांत व खाड्यांत राहत. यांची लांबी वीस फुटांहूनहि अधिक आढळून येते. यांचे अवशेष लियास थरापासून वरच्या क्रिटेशियस खडकाच्या थरापर्यंत आढळतात. प्रचंड सर्प पाहा.

**प्राचीनावीत**—आर्य लोक उजव्या खांद्यावरून डाव्या हाताखालीं अशा तऱ्हेनें, जानवें धारण करीत असत. कारण प्राचीनावीतिन् हें नांव असें जानवें धारण करणाऱ्यास मिळे. परंतु लो. टिळकांच्या मतें हा शब्द जानव्यास उद्देशून नसून उपरण्यास उद्देशून आहे. तैत्तिरीय संहितेंत निवीत, प्राचीनावीत व उपवीत असे तीन शब्द आलेले आहेत. सायणाचार्यांच्या मतें हे शब्द जानवें किंवा वस्त्र कोणच्या वेळेस कसें घ्यावयाचें हें सुचवितात.

**प्राच्यविद्या परिषद् ( अखिल भारतीय )**— हिंदुस्थान आणि इतर देश यांतील अनेक प्राच्य पंडितांच्या कार्याचा आढावा घेण्यासाठीं त्यांना एकत्र आणणें, प्राच्य विद्यार्जन आणि संशोधन या कामीं सहकार्य देवविणें, पंडितांना आपल्या अभ्यासाचें फळ व त्यांतील शंका पुढें मांडण्यास संधि आणून देणें, पंडितांमध्यें परस्पर सामाजिक आणि बौद्धिक दळणवळण

राहील असें करणें, परंपरागत विद्येला प्रोत्साहन देणें, वगैरे उद्देश या परिषदेचे आहेत. पहिलें अधिवेशन १९१९ सालीं डॉ. सर रा. गो. भांडारकर यांच्या अध्यक्षतेखालीं पुण्यास भरलें. नंतर प्रो. लेव्ही (पॅरिस), डॉ. गंगानाथ झा, डॉ. जयस्वाल, म. म. काणे, इ. अध्यक्ष होते. हल्लीं दर दोन सालांनीं अधिवेशन भरतें. वैदिक, इराणी, अभिजात संस्कृत, इस्लामी संस्कृति, अरबी आणि फारसी, पाली आणि बौद्धधर्म, प्राकृत आणि जैनधर्म, पुराणवस्तुसंशोधन, भारतीय भाषा, द्राविडी संस्कृति, तत्त्वज्ञान आणि धर्म, इ. अनेक शाखा अधिवेशनांत पाडल्यापासून त्यांवर निबंध वाचले जातात व चर्चा होते. अलहाबाद येथें परिषदेची कचेरी असते.

**प्रॉटेस्टंट**—पश्चिम युरोपमध्यें ज्या कालीं धर्मसुधारणा घडून आली त्या वेळीं रोमन कॅथॉलिक पंथापासून जे पंथ वेगळे झाले अशा ख्रिश्चन धर्मांतील अनेक पंथीयांना सामान्यपणें हा शब्द योजण्यात येतो. त्याप्रमाणेंच अशा पंथांपासून जे पुढें उपपंथ निघाले त्यांसहि सामान्यतः हेंच नांव देण्यांत येतें. अर्वाचीन कालीं 'उच्चपंथी इंग्रज' (हायचर्चे अँग्लिकन) हें नामाभिधान मान्य करीत नाहींत. हें नांव या पंथास प्रथम १५२९ मध्यें जर्मनीमध्यें स्पेयेर येथें जी धर्मसभा झाली त्या सभेमध्यें लूथरच्या ज्या अनुयायांनीं कॅथॉलिक संप्रदायाप्रमाणें पूजा करण्याच्या धर्मसभेच्या आज्ञापत्रकाविरुद्ध विरोधप्रदर्शन केलें त्या लोकास लावण्यांत आलें.

याप्रमाणें हा पंथ रोमन कॅथालिक पंथापासून १६व्या शतकात फुटून निघाला. जर्मनींत लूथर या धर्माधिकाऱ्यानेंच जुन्या धर्मसंस्थेच्या जाचामुळें बंड उभारलें व स्वतंत्र पंथ काढला. युरोपांतील कांहीं राजे या पंथाला मिळाले. प्रॉटेस्टंट पंथ बायबल ग्रंथाला सर्वश्रेष्ठ व अंतिम प्रमाण मानतो आणि उपाध्यायाच्या मध्यस्थीची गरज मानीत नाहीं. आज जगांत प्रॉटेस्टंट लोकांची संख्या २०,६९,००,००० इतकी आहे.

**प्राण**—हा बराच व्यापक पण अनिश्चित अर्थाचा शब्द ऋग्वेदांत व तदनंतरच्या ग्रंथांतून वारंवार उपयोगांत आणलेला आहे. आरण्यकांतून व उपनिषदांतून जगाच्या ऐक्याचें सर्वसाधारण चिन्ह या अर्थानें हा शब्द उपयोगांत आणला आहे. प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान या पांच प्राणवायूंपैकीं एक या संकुचित अर्थानेंहि प्राण संज्ञा उपयोगांत आणलेली आहे. शिवाय प्राण हा शब्द ज्ञानेंद्रिय या अर्थीं योजिलेला आहे. प्राणवायूचें क्षेत्र डोक्यापासून हृदयापर्यंत आहे. तो बुद्धि, हृदय, इंद्रियें व मन यांना धारण करणारा म्हणजे त्यास प्रेरक असें याचें वर्णन आहे. बाहेरील वायु आंत घेणें, अन्न आंत नेणें, वगैरे कामें प्राणवायूचीं आहेत. वेदांत ज्ञानेंद्रियें असा जो प्राणाचा अर्थ केला आहे तो त्या ज्ञानेंद्रियास प्रेरक अशा साहचर्यानेंच असावा. प्राणवायु व इंद्रियें यांचें साहचर्य किंवा प्रेर्यप्रेरकत्वसंबंध असल्यानें एकमेकांचे शब्द अभिन्न अर्थानें वापरले असावे. प्राणादि पांच वायू कार्यभेदानें व शरीरातील स्थानभेदानें निरनिराळे मानले आहेत.

प्राणी आणि वनस्पती यांत जें विशेष प्रकारचें चैतन्य खेळत असतें तो प्राण होय. हें चैतन्य आपल्या भोंवतालीं हालचाल उत्पन्न करतें व भोंवतालच्या गोष्टींचाहि त्यावर परिणाम होत असतो. प्राणाचा भौतिक आधार म्हणजे जीवद्रव्य होय. या जीवद्रव्यांत कर्ब, उज्ज, प्राणवायु व नत्रवायु, व यांच्या जोडीला कांहीं गंधक आणि स्फुर (फॉस्फरस), या सर्वांचें मिश्रण असतें. हें जीवद्रव्य फार चंचल असतें. त्यांत सारखा भौतिक आणि रासायनिक फरक पडत असतो व त्यामुळें शरीराचा पिंड वाढत किंवा खचत असतो. मृत्यु म्हणजे या जीवद्रव्याचें विघटन होऊन दुसऱ्या संयुक्तात त्याचें रूपांतर होणें. प्राणवायु पाहा.

**प्राणनाथ**.(१७०० चा सुमार)—एक क्षत्रिय साधु. बुंदेलखंडाच्या छत्रसालाचा हा गुरु. यास श्रीप्राणनाथप्रभु असेंहि नांव होतें. हिंदु-मुसलमानांत ऐक्य घडवून आणण्यासाठीं यानें एका नवीन पंथाची स्थापना केली होती.

**प्राणनाथरस**—एक आयुर्वेदीय रसायन. लोहभस्म चार तोळे घेऊन तें माक्याच्या आठ तोळे रसांत खलावें; नंतर गुळवेलीचा काढा चार तोळे, भारंगीचा काढा चार तोळे आणि त्रिफळाचा (हिरडे, बेहेडे व आंवळकाठी याचा) काढा चार तोळे, हे तीन काढे एकत्र करून खापरांत अग्नीवर ठेवावे. नंतर लोहाइतकें शुद्ध माक्षिक घालून पूर्वोक्त रसाशीं घोटावें, आणि पुट द्यावें; याप्रमाणें तीन पुटें द्यावीं; नंतर पारदभस्म सहा मासे, वंगभस्म सहा मासे, शुद्ध गंधक एक तोळा, आणि कवड्या चार तोळे, हीं एकत्र करून त्याला पुट देऊन तें त्या लोहांत मिसळून पूर्वोक्त रसाच्या भावना देऊन पुनः एक पुट द्यावें; नंतर बाहेर काढून यांत मिऱ्यें साडेतीन तोळे, मोरचूद पांच तोळे व टांकणखार पांच तोळे, हीं मिसळावीं; म्हणजे हा रस तयार झाला. हा सहा मासे घ्यावा. म्हणजे असाध्य क्षय, सूज, उदर, मूळव्याध, संग्रहणी, ज्वर आणि गुल्मरोग यांचा नाश होतो.

**प्राणवायु**—(ऑक्सिजन). परमाणुभारांक १६.००. प्राणवायूचा निसर्गांत इतर सर्व मूलद्रव्यांपेक्षां जास्त विस्तार आहे. चेतन आणि अचेतन सृष्टींत हा व्यापून राहिला आहे. स्वतंत्रपणानें हा हवेंत आहे. खनिजांत आणि दगडांत हा संयुक्तरूपानें असतो. प्राणिमात्रांच्या जीवमानास हा अत्यंत अवश्य आहे.

१७७४ सालीं प्रीस्ट्लेनें याचा शोध लावला, पण 'ऑक्सिजन' हें नांव लव्हॉयझरनें दिलें. हा रंगहीन, गंधहीन वायु आहे. हवेपेक्षां हा कांहींसा जड आहे. पाण्यांत हा कांहीं प्रमाणांत विरघळतो, त्यामुळेंच पाण्यांत राहणारे प्राणी-मासे, वगैरे जिवंत राहूं शकतात. प्राणवायु हा अतिशय क्रियाशील असून धातु आणि अधातु या दोहोंबरोबरहि त्याचा संयोग होतो. ह्या संयोगाला प्राणीकरण (ऑक्सिडेशन) म्हणतात. प्राणवायु आणि उज्ज्वायु (हायड्रोजन) यांचा संयोग होतांना इतकी उष्णता उत्पन्न होते कीं, तिच्या साहाय्यानें प्लॅटिनम देखील वितळवितां येतें. प्राणवायु आणि दारिलिन (ॲसिटिलीन) ह्यांचा डाग देण्यासाठीं उपयोग करतात. प्राणवायूचें मोठ्या प्रमाणावर उत्पादन होतें व त्यासाठीं पूर्वी पाण्यावर विजेची क्रिया करीत असत, किंवा ब्रिनची रीत स्वीकारीत असत. आतां लिंडच्या पद्धतीनें हवेला द्रवरूपांत आणून अंशोत्पतनानें (फ्रॅक्शनल डिस्टिलेशन) प्राणवायु निराळा करतात.

**प्राणहरिद**—(ऑक्सिक्लोराइड). धातूंच्या किंवा अधातूंच्या हरिदामधील कांहीं हरा(क्लोरीन)च्या अंशाबद्दल प्राणवायु असतो; त्या वेळीं त्याला प्राणहरिद म्हणतात. उदा., स्फुर प्राणहरिद (फॉस्फरस ऑक्सिक्लोराइड), बिस्मप्राणहरिद (बिस्मथ ऑक्सिक्लोराइड), वगैरे.

**प्राणायाम**—श्वासोच्छ्वासाचें विशिष्ट प्रकारें नियंत्रण. हाताच्या अंगठ्यानें उजवी नाकपुडी दाबून डाव्या नाकपुडीनें श्वास वर ओढतात; यास पूरक म्हणतात. नंतर दोन्ही नाकपुड्या दाबून श्वास कोंडतात; त्यास कुंभक म्हणतात. नंतर बोटांनीं डावी नाकपुडी दाबून उजव्या नाकपुडीनें श्वास सोडतात; यास रेचक म्हणतात. संध्यादि विधींत व्याहृतिपूर्वक (भूः, भुवः, इ. म्हणून) गायत्रीमंत्राचा जप प्राणायामप्रसंगीं करतात. प्राणायाम हा एक व्यायामाचा प्रकारहि धरण्यांत येतो. कुंभक-पूरक-रेचक यांत काळाचें प्रमाण अनुक्रमें १-४-२ असें ठेवतात. या व्यायामानें इंद्रियांतील दोष नाहींसे होतात व दम वाढतो.

**प्राणिपूजा**—जनावरांच्या ठिकाणीं देवत्व किंवा दैवी अंश कल्पून त्यांची पूजा करण्याचा प्रकार फार प्राचीन आहे. सर्व प्राचीन राष्ट्रांतून तो होता व सर्वांत जास्त ईजिप्त देशांत असे. बहुतेक सर्व मुख्य मुख्य प्राणी पवित्र व पूजनीय मानले जात. हे प्राणी स्वतः देव आहेत म्हणून नव्हे तर देवांना ते प्रिय आहेत, देवांचे प्रतिनिधी आहेत म्हणून बहुधा त्यांविषयीं भक्ति वाटत असेल. गोभक्तीविषयीं हिंदुसमाज प्रसिद्ध आहे. नागपूजा रूढ आहेच. वाघ, हत्ती या मोठ्या जनावरांचीहि पूजा पुष्कळ जातींतून आहे. वन्य समाजांत या प्राणिपूजेचा संप्रदाय फार मोठा असतो. अहिंसा, जीवदया या नावाखालींहि कांहीं प्रकार आढळतील.

प्राणिपूजेचे प्रकार दोन-सर्व जात पवित्र मानणें अगर त्यांतून कांहींसच पवित्र मानणें. याप्रमाणें प्राण्यांस पवित्र मानण्याच्या प्रकारांवरून प्राण्यांचें कांहीं वर्गीकरण करतां येईल: (१) गायीसारखा उपयुक्त प्राणी. (२) आस्वलासारखा शिकारी प्राणी. (३) हिंस्र व घातुक प्राणी; उदा., चित्ता. (४) बकरे, वगैरे प्राणी, कीं ज्याच्याविषयीं झाडपाल्याचें अंतर्याम धारण करणारे अशी समजूत असते. (५) शकुनाचे श्येनादि प्राणी. (६) जादू विद्येच्या कामीं येणारे प्राणी. (७) विशिष्ट देवांचे प्रिय किंवा वाहनाचे प्राणी. ईजिप्तमध्यें व मध्य आफ्रिका मादागास्कर वगैरे भागांत बैल, वायव्येकडील अमेरिकन इंडियन लोकांत कावळा, जावा बेटांतील कलंग लोकांत कुत्रा, वगैरे. अनेक प्रकारची प्राणिपूजा प्राचीन काळीं पृथ्वीच्या विविध भागांत प्रचलित होती व आजहि ती भिन्न भिन्न स्वरूपांत पुष्कळ ठिकाणीं आढळते.

**प्राणिव्यवच्छेदन**—(व्हिविसेक्शन). शास्त्रीय संशोधनाकरितां जिवंत प्राण्याचें शरीर व्यवच्छिन्न करण्यांत येतें त्यास ही संज्ञा आहे. यासंबंधीं निरनिराळ्या देशांत कायदे करण्यांत आले आहेत व असें व्यवच्छेदन करण्यास परवाना आवश्यक ठेवला आहे. तसेंच ही क्रिया कांहीं विवक्षित ठिकाणीं करण्यास परवानगी देण्यांत येते व अशा ठिकाणांची वेळोवेळीं तपासणी करण्यांत येते. या परवान्यामध्येंहि शस्त्रक्रियेसंबंधीं कांहीं निर्बंध घालण्यांत येतात. अशा प्राणिव्यवच्छेदनाविरुद्ध कांहीं अहिंसावादी लोकांनीं चळवळहि चालू केल्याचें आढळतें.

**प्राणिशास्त्र**—या शास्त्रामध्यें सर्व प्राणिसृष्टीचा विचार करण्यांत येतो. लिनीयस यानें प्रथम सर्व प्राण्यांचे सहा वर्ग पाडले ते असे: १ सस्तन प्राणी, २ आकाशगामी प्राणी, ३ भूजलचर प्राणी, ४ मत्स्यवर्ग, ५ कीटकवर्ग, व ६ कृमिवर्ग. या प्रत्येक वर्गाचे पोटवर्ग आणि जाती पाडण्यांत आल्या होत्या. क्यूव्हिये या शास्त्रज्ञानें प्राणिसृष्टीचें शारीरिक रचनेवरून वर्गीकरण केलें होतें. डार्विनच्या कालापासून विकाससिद्धांताचा प्राणिशास्त्रावर फार महत्त्वाचा परिणाम झाला. या शास्त्राच्या अभ्यासकांमध्यें पुढील विद्वानांचीं नांवें आढळून येतात: फॉन, बाएर, योहान मुल्लर, ओवेन, मिल्ने एडवर्ड्स, फॉन साएबोल्ड, ल्युकार्ट, अगासिझ, हक्स्ले, हेकेल, फ्रिट्झ मुल्लर, डोर्न आणि रे लॅंकेस्टर. सध्यां प्राणिवर्गाचें पुढें दिल्याप्रमाणें वर्गीकरण करण्यांत येतें: फायलम्, क्लास, ऑर्डर, फॅमिली, जिनस, व स्पिसीज्. (पशू, पक्षी, प्राणी हे लेख पाहा.)

(पुढील मजकूर पृष्ठ १५७० पहा).

प्राणिकोटी
अपृष्ठवंश ( पाठीला कणा नाहीं असे )
संघ १
आद्यजंतु
वर्ग १-कामरूप क्षुद्रजंतु
वर्ग २-परान्नपुष्ट क्षुद्रजंतु
वर्ग ३-निर्यासज क्षुद्रजंतु
संघ २
अनेक छिद्रधारी
संघ ३
शरीरां-त्रैकगुहक
वर्ग १-जलस्थजीव
वर्ग २-मृदजीव
वर्ग ३-तारकित गात्रजीव
वर्ग ४-कंकतसम गात्रजीव
संघ ४
विशाल कृमि
संघ ५
वर्तुलाकार कृमि
संघ ६
चक्रधर कृमि
संघ ७
सकंटक तनु
वर्ग १-तारकित तनुविशिष्ट
वर्ग २-तारकित शाखाविशिष्ट
वर्ग ३-सशल्यकवच
वर्ग ४-तारकित कर्कटिकाकृति
वर्ग ५-तारकित पिच्छदल
संघ ८
वलयांकित शरीर
वर्ग १-लोमपाद
उपवर्ग १
अनंतलोम
उपवर्ग २
अल्पलोम
वर्ग २-जलुकासमूह
संघ ९
संधीपाद
वर्ग १-कवचधर
वर्ग २-अनंतपद
वर्ग ३-षट्पद
वर्ग ४-अष्टपद
संघ १०
मृदुकाय
वर्ग १-उदरतल मृदुकाय
वर्ग २-पत्रसमश्वासेंद्रिय मृदुकाय, द्विपुटकवच मृदुकाय किंवा परशु-समपाद मृदुकाय
वर्ग ३-शीर्षपाद मृदुकाय
सपृष्ठवंश ( पाठीला कणा आहे असे )
संघ
सपृष्ठवंश
पोटसंघ १
निगूढवंश
पोटसंघ २
पुच्छवंश
पोटसंघ ३
पूर्णवंश
भेद १
निःशीर्ष
भेद २
सशीर्ष
वर्ग १
वर्तुलमुखी
वर्ग २
मीन, मच्छ
वर्ग ३
स्थलजलचर
वर्ग ४
उरोगामी किंवा उरग
वर्ग ५
विहग
वर्ग ६
सस्तन

( पृष्ठ १५६८ वरून चालू. )

प्राण्यांचा आकार, ठेवण, वागणूक, इ. विषयच फक्त प्राणिशास्त्रात घेतात असें नाहीं, तर शरीरातील रचना, त्यांच्या हालचाली, त्यांचे परस्पराशीं व भोंवतालच्या गोष्टींशीं संबंध यांचाहि विचार निरनिराळ्या शास्त्रांतून होत असतो. प्राचीन काळीं विशेषतः माणसाळलेल्या प्राण्यांविषयींच विद्वानांचा अभ्यास दिसतो; पण आज तो शास्त्रीय पद्धतींनीं करून त्यांत भर घातलेली आहे.

प्राण्याना काय काय लागतें याचा अभ्यास या शास्त्रात होत असतो. मासा पाण्याबाहेर जगत नाहीं, तर माणूस आणि पशु पाण्यात जगत नाहींत. याचा अर्थ असा नव्हे कीं, माशाला श्वासोच्छ्वासाला पाणी लागतें, व माणूस आणि पशु यांना हवा लागते. दोघानाहि हवाच लागते. फक्त माशाची शरीररचना अशी आहे कीं, तो पाण्यातील हवा श्वासोच्छ्वासाला घेतो. पण जमिनीवरच्या प्राण्यांचें तसें नाहीं. जगण्यासाठीं सर्वच प्राण्यांना हवा लागत असते.

प्राण्यातील परस्पर नातें सांगणें हाहि या शास्त्राचा एक विषय असतो. आपल्या घरांत वावरणारें व अगदीं गरीब दिसणारें मांजर हें अत्यंत क्रूर अशा वाघसिंहादि प्राण्यांचेंहि नातेवाईक आहे, हें समजण्यानें गंमत वाटेल. तसेंच कोल्हा आणि कुत्रा हे भाऊ भाऊ आहेत. शेळयामेंढ्या आणि गुरें यांचा जवळचा संबंध आहे.

सभोंवतालच्या परिस्थिति-वातावरणाप्रमाणें प्राण्यांचा रंग, रूप तयार झालेलें असतें, हें प्राणिशास्त्र पटवून देईल. ध्रुवप्रदेशांतील अस्वल बर्फाप्रमाणें पांढरें असतें तर आफ्रिकेंतील दाट जंगलांतील काळें असतें. निसर्गानें त्याना स्वसंरक्षणासाठीं फायद्याचा होईल असा रंग दिलेला असतो. सरडा हा पाहिजे त्याप्रमाणें रंग बदलीत असतो, ही म्हण अगदीं खोटी नाहीं. त्याच्या हिरव्या-करड्या रंगाच्या छटा बदलत असतात. नाकतोडा प्रसिद्धच आहे. फूलपाखरूं आपले पंख मिटून फांदीवर बसलें कीं एखाद्या पानासारखेंच दिसतें. अशा परिसरसमान रंगामुळें प्राण्यांचें संरक्षणहि होतें.

जगण्यासाठीं धडपड ही आवश्यकच आहे. सर्वच जन्मलेले प्राणी जगूं लागल्यास व सारखें प्रजोत्पादन करूं लागल्यास पृथ्वी आणि समुद्र त्याना राहण्यास पुरणार नाहीं. तेव्हां जीविताच्या लढ्यांत पुष्कळसे मरतात हें सोयीचेंच आहे. प्राण्याचा दुसऱ्या वर्गाशीं जसा लढा होतो, त्याचप्रमाणें जीवनपरिस्थिति आणि निसर्गशक्ति यांच्यांशींहि त्यांना टक्करा द्याव्या लागतात. त्यांत लाखों प्राणी मरतात. माणूसहि त्यांच्या संहारक्रियेला हातभार लावतो. याप्रमाणें शेवटीं जगांतील प्राण्यांची संख्या जगाला झेपेल इतकीच राहते.

( *मागील पृष्ठावरील कोष्टक पाहा.* )

**प्राणिसंग्रहालय**—ज्या सार्वजनिक बगीच्यामध्यें प्राण्यांचा संग्रह केलेला असतो त्यास प्राणिसंग्रहालय-उपवन असें म्हणतात. लंडन येथील प्राणिशास्त्रीय संस्थेचें प्राणिसंग्रहालय १८२८ मध्यें स्थापन करण्यांत आलें. हें जगांतील सर्वांत सुंदर असें प्राणिसंग्रहालय आहे. याचे उत्पादक सर हम्फ्रे डेव्ही आणि सर स्टॅम्फर्ड रॅफल्स हे होते. पॅरिस येथील प्राणिसंग्रहालय १७९४ मध्यें स्थापन झालें असून जगांतील सर्वांत जुनें संग्रहालय आहे. ॲन्टवर्प, बर्लिन, व्हिएन्ना, व ॲम्स्टरडॅम या युरोपांतील मोठाल्या राजधान्यांतून गेल्या महायुद्धापूर्वी नांवाजण्याजोगीं संग्रहालयें होतीं. हीं संग्रहालयें बहुधा खाजगी संस्था किंवा स्थानिक स्वराज्य संस्था चालवितात हें विशेष आहे. अमेरिकेंत तर नगरपालिकेंचींच प्राणिसंग्रहालयें असतात. न्यू यॉर्क, शिकागो, पिट्सबर्ग, फिलाडेल्फिया, वॉशिंग्टन या शहरांची अशा संग्रहालयाच्या बाबतींत जगभर प्रसिद्धि आहे.

हिंदुस्थानात म्हैसूर, हैद्राबाद आणि कलकत्ता येथें चांगलीं संग्रहालयें आहेत. बंगालच्या एशियाटिक सोसायटीनें प्रथम प्राण्यांच्या पाहणीची संस्था काढली. पुढें १९१६ सालीं हिंदुस्थान सरकारनें मध्यवर्ती संस्था काढून तें काम पुढें चालविलें. मद्रास येथें एक जलचरप्रदर्शन आहे.

**प्राणी**—प्राणिवाचक वैदिक शब्दांकडे पाहिलें असतां अश्व व गो यांस असलेलीं अनेक नांवें व अश्वसंबद्ध अनेक पारिभाषिक व इतर शब्द यांवरून त्या कालीं या दोन पशूंचें महत्त्व किती होतें याची कल्पना होते. पक्ष्यांच्या नांवांमध्यें आज आपणास परिचित अशींहि कांहीं नांवें आढळतात. पक्ष्यांना नांवें, त्यांचे रंग, शब्द, गीतें, वगैरे गुणांवरून पडत असत असें दिसतें. सर्पांना तैत्तिरीय संहितेंत जीं अनेक नांवें आढळतात त्यांवरून त्या कालींहि या मानवशत्रूंचें महत्त्व तत्कालीन लोकांस पटलें होतें असें दिसतें. चतुरक्ष हें यमाच्या कुत्र्याचें नांव पशुभारतीय काळाची आठवण करून देतें. महाहस्तिन् या शब्दावरून एखाद्याला गजेंद्राची किंवा दुसऱ्या एखाद्या मॅमथची आठवण होण्यास जागा आहे. आज सामान्यतः परिचित असणारे प्राणी त्या कालींहि ज्ञात होते असें दिसतें. मुष्कावर्ह या शब्दावरून अथर्ववेदकालीं बैल बडवीत असत हें स्पष्ट होतें. व्याघ्र हा शब्द ऋग्वेदांत आढळत नसून अथर्ववेदांत आढळतो. यावरून भरतखंडांतील वसाहतींच्या काळासंबंधीं व वेदांच्या पौर्वापर्यसंबंधीं अनुमान काढण्यास एक जागा मिळते. तसेंच प्राण्यांसंबंधीं जीं

विशेषणें आढळतात त्यांवरून प्राण्यांच्या गुणांविषयींचें तत्कालीन ज्ञान नजरेस येतें.

एक जिवंत असलेली सेंद्रिय घटना म्हणजे प्राणी होय. वनस्पती आणि प्राणी यांच्यामध्यें स्पष्टपणें विभाजक रेषा काढणें कठिण आहे. अनेक प्राणी, उदाहरणार्थ, समुद्रपुष्प किंवा सामुद्रिक जीव यांचें वनस्पतींशीं इतकें सादृश्य असतें कीं, त्यांस पूर्वी व कचित् आतांहि वनस्पती म्हणूनच मानण्यांत येतें. प्राण्यामध्यें चलनशक्ति असते ही गोष्टहि आतां प्राण्याचें वैशिष्ट्य म्हणून मानणें कठिण झालें आहे; उदा., कालवें, स्पंज, पोवळ्यांचे किडे हे स्वाभाविकपणें एकाच जागीं खिळलेले किंवा स्थिर असतात. याच्या उलट अनेक वनस्पतींचे गर्भ किंवा कांहीं पूर्ण वाढ झालेल्या वनस्पती यांना कांहीं तंतुमय अवयवांच्या साहाय्यानें चलन-वलन करतां येतें असें दिसून आलें आहे. प्राणी आणि वनस्पती यांच्यामध्यें जो मुख्य भेद करण्यांत येतो तो त्यांची आपलें अन्न आत्मसात् करण्याची पद्धति पाहून करण्यांत येतो. वनस्पतींचें अन्न सामान्यतः निरिंद्रिय पदार्थांचें असतें, व त्यांत पाणी, अमोनिया, कर्बाम्ल आणि कांहीं खनिज द्रव्यें असतात. वनस्पती केवळ द्रवरूप अथवा वायुरूप अन्नाचें ग्रहण करूं शकतात. या नियमास अपवाद म्हणजे ज्या वनस्पती परोपजीवी असतात म्हणजे एक वनस्पति दुसऱ्या वनस्पतीवर किंवा प्राण्यावर आपलें पोषण करते अशा वेळीं ती वनस्पति प्राणिज किंवा सेंद्रिय पदार्थ त्या दुसऱ्या वनस्पतींतून किंवा प्राण्यांतून रसरूपानें घेऊन आपली उपजीविका करीत असते. उलट प्राणी आपली उपजीविका सेंद्रिय द्रव्यांवर करतात. त्यांचें भक्ष्य इतर वनस्पती अथवा प्राणी हेंच असतें. प्राण्यांस प्राणधारणेकरितां प्राणवायूची आवश्यकता असते व हा वायु ते श्वासोच्छ्वासद्वारां घेतात. याच्या उलट वनस्पतींस कर्बाम्ल वायूची आवश्यकता असते. तसेंच प्राणी कर्बाम्ल वायूचें आणि आपल्या इतर अवशिष्ट पदार्थांचें निष्कासन करीत असतात, व वनस्पती हाच कर्बाम्ल वायु घेऊन त्याचे प्राणवायु व कर्बवायु यांमध्यें पृथक्करण करून त्यांतील कर्बाचें ग्रहण करतात; आणि प्राण्यांकरितां प्राणवायु बाहेर सोडून देतात. (प्राणिशास्त्र पाहा.)

**प्रातिनिधिक सरकार**—(रिप्रेझेन्टेटिव्ह गव्हर्नमेंट). याचा अर्थ, लोकांच्या ऊर्फ प्रजाजनांच्या प्रतिनिधींनीं चालवलेला राज्यकारभार असा आहे. यालाच लोकशाही म्हणतां येईल. इंग्लंडांत राजशाही (मॉनर्की) आणि लोकशाही (डेमॉक्रसी) यांचें मिश्रस्वरूप आहे. या प्रकारच्या राज्यकारभाराचा मूळ आरंभ फ्यूडल सिस्टिममुळें ११ व्या शतकापासून इंग्लंडांत झाला. फ्यूडल सिस्टिममध्यें, मोठाल्या जमीनदारांनीं एकत्र जमून राजाला सल्ला द्यावा व स्वतःच्या हक्कांना जपावें, हें तत्त्व होतें. याप्रमाणें १३ व्या व १४ व्या शतकांत मोठाले जमीनदार इंग्लंड, फ्रान्स व स्कॉटलंड येथील नॅशनल कौन्सिलचे सभासद असत. या कौन्सिलला इंग्लंडांत १३ व्या शतकांत पार्लमेंटचें स्वरूप प्राप्त झालें. कारण त्यांत शहरें व परगणे यांचे प्रतिनिधी लोकांनीं निवडलेले येऊं लागले. तथापि १४ व्या ते १७ व्या शतकापर्यंत वरिष्ठ वर्गांतलेच प्रतिनिधी पार्लमेंटमध्यें असत. इंग्लंडांत 'कॉमनवेल्थ' स्थापल्यावर क्रॉमवेलच्या कारकीर्दींत या पार्लमेंटांत सर्व वर्गांच्या प्रजाजनांना मतदानाचा हक्क असावा, अशी मागणी भेदभावविघातक (लेव्हलर्स) या पक्षानें केली; आणि क्रॉमवेलच्या कारकीर्दींतील पार्लमेंटांत, इंग्लंडांतील सर्व पुरुषवर्गाला मतदानाचा हक्क देण्याचें तत्त्व मान्य होऊन मतदानाचा हक्क अनेक वर्गांना मिळाला. पण पुन्हां २ रा चार्लस राजा याच्या कारकीर्दींत श्रीमंत-व्यापारी, जमीनदार व वतनदार शेतकरी (योमेन फार्मर) यांनाच मतदानाचा व प्रतिनिधी होण्याचा हक्क मिळाला. ३ रा जॉर्ज राजा याच्या कारकीर्दींत अमेरिकन स्वातंत्र्य-युद्धाच्या वेळीं 'प्रातिनिधिक सरकार' या अर्थाची फार चर्चा व चिकित्सा झाली. स्वतंत्र झालेल्या अमेरिकन संयुक्त संस्थानांत सर्व प्रजाजनांना मतदानाचा व प्रतिनिधित्वाचा हक्क होता. फ्रेंच राज्यक्रांतिकारकांनीं संपूर्ण लोकशाहीच्या तत्त्वाचाच पुरस्कार केला. त्यामुळें युरोपांतील अनेक देशांत प्रातिनिधिक राज्यकारभार-पद्धतीचा पुरस्कार जोरानें करण्यांत आला. त्याचा इंग्लंडवर परिणाम होऊन १८३२ पासून पुढें अनेक 'फ्रँचाईज' कायद्यांमुळें मताधिकार विस्तृत होऊन गरीब मजूरवर्गालाहि मतदानाचा हक्क अधिकाधिक प्रमाणांत मिळत गेला. त्यामुळें मजूरपक्ष इतका बळावला कीं, दुसऱ्या महायुद्धानंतर मजूरपक्षाचेंच सरकार इंग्लंडांत आहे.

हिंदुस्थानांत फार प्राचीन काळीं कोठें कोठें गणराज्यें म्हणजे लोकशाहीच्या कांहींशा तत्त्वावर चाललेलीं राज्यें असावींत असें दिसतें. तथापि पाश्चात्य पद्धतीची प्रातिनिधिक शासनसंस्था नव्हती. ब्रिटिश अमदानींत या पद्धतीचा पाया म्हणून १८८४ सालीं स्थानिक स्वराज्याचे हक्क देण्यांत आले. १८९२ सालीं प्रांतिक व वरिष्ठ कायदेमंडळांची वाढ करण्यांत येऊन सरकारमान्य संस्थांचे प्रांतिक कायदेमंडळांत व प्रांतिक कायदेमंडळांनीं निवडलेले कांहीं सभासद वरिष्ठ कायदेमंडळांत घेण्यांत येऊं लागले. तथापि कायदेमंडळांतून बहुमत सरकारच्या बाजूचें असे. यानंतर लोकांच्या चळवळीमुळें १९०९ सालीं राजकीय सुधारणांचा आणखी एक हप्ता आला. कायदेमंडळांतील सभासदांची संख्या दुप्पट करण्यांत आली, व प्रांतिक कायदेमंडळात बिनसरकारी सभासदांचें बहुमत केलें व निवडणुकीचें तत्त्व सरकारनें मान्य केलें. पण अद्यापिहि कार्यकारी मंडळावर कायदे-

मंडळाची हुकमत चालत नसे. तेव्हां लोकांची जोराची चळवळ चालून होती. पहिल्या महायुद्धांत हिंदुस्थाननें साहाय्य केलें म्हणूनहि १९२० सालीं (मोर्ले-मिंटो) सुधारणांचा दुसरा हप्ता मिळाला. यामुळें मतदानाचा हक्क विस्तृत झाला व वरिष्ठ कायदेमंडळांत लोकनियुक्त प्रतिनिधींचें बहुमत झालें. प्रांतिक *कारभारांत सोंपीव खातीं लोकनियुक्त दिवाणांकडे* देण्यांत आलीं. तथापि याला प्रातिनिधिक सरकार म्हणतां येत नव्हतें.

१९२१ सालापासून म. गांधींच्या नेतृत्वाखालीं कॉंग्रेसपक्ष प्रबळ झाला व राजकीय स्वातंत्र्यासाठीं असहकारिता व सत्याग्रह या चळवळी जोरानें सुरू झाल्या. तेव्हां १९२७ त ब्रिटिश सरकारनें सुधारणांची फेरतपासणी करण्यासाठीं एक पार्लमेंटरी कमिटी नेमली. १९२९ सालीं मजूरपक्षाच्या राजवटींत वसाहतीच्या स्वराज्याचा एक जाहीरनामाहि निघाला. सर्व पक्षांच्या प्रतिनिधींशीं चर्चा करण्यासाठीं लंडन येथें दोन गोलमेज परिषदाहि भरल्या व बऱ्याच घालमेलीनंतर १९३५ सालीं हिंदी सुधारणांचा कायदा पार्लमेंटनें संमत केला. यामुळें प्रांतिक स्वायत्तता मिळाली. मतदानाचा हक्क लोकसंख्येपैकीं शें. १४ किंवा वयांत आलेल्यांपैकीं शें. २७ लोकांना मिळाला. वरिष्ठ सरकारास संयुक्त शासनसंस्थेचें (फेडरेशनचें) स्वरूप प्राप्त झालें.

नंतर दुसरें महायुद्ध सुरू झालें. स्वातंत्र्याशिवाय साहाय्य नाहीं हा कॉंग्रेसचा रोख सवाल होता. सरकारनें फार आढेवेढे घेतले, धाकदपटशा दिला. पण ब्रिटिश सरकारला जपानी आक्रमणाची फार भीति वाटूं लागली होती. सुभाषचंद्र बोस यांनीं जपानच्या साहाय्यानें ब्रह्मदेशांत राष्ट्रीय सेनाहि उभारली होती. 'चले-जाव'चें आंदोलन व भूमिगत चळवळी जोरानें चालल्या. इंग्लंडहून शिष्टमंडळें आलीं. मुसलमानांनीं फूट पाडलीच होती. पण शेवटीं संपूर्ण स्वराज्यदानास ब्रिटिश सरकार तयार झालें. १९४७ सालीं १५ ऑगस्ट रोजीं तें बहालहि केलें. तेव्हां या स्वतंत्र भारताची घटना तयार करण्यासाठीं कॉंग्रेस सरकारने एक समिति नेमली. आतां ही घटना १९५० पासूनच अमलांत आली आहे. यामुळें भारत सरकार आतां पूर्णपणें प्रातिनिधिक झालेलें आहे.

**प्राथमिक खडक**— पूर्वींचे भूस्तरशास्त्रज्ञ अग्निसंभूत खडकांस त्यांची स्फटिकमय रचना पाहून ही संज्ञा वापरीत असत. पुढें ही संज्ञा सामान्यतः प्राचीन युगांतील खडक अशा अर्थी वापरण्यांत येऊं लागली व तीमुळें कँब्रियनपासून पर्मीयन रचनेचे जे सर्वांत जुने प्रस्तरमय खडक आढळतात त्यांचा निर्देश या संज्ञेनें होऊं लागला.

**प्रॉपर्टिअस, सेक्सटस्** (ख्रि. पू. ५०-१५)—एक रोमन कवि. हा प्रथम सुस्थितींत होता. पण फिलिपीच्या लढाईच्या वेळीं त्याची मालमत्ता नाहींशी होऊन तो दरिद्री बनला. तो आपल्या २० व्या वर्षी सिन्थिया नांवाच्या एका सुंदर स्त्रीकडे आकर्षित झाला आणि त्यानें लिहिलेल्या ४००० ओळींपैकीं बहुतेक *कविता या सिन्थियाला उद्देशून लिहिलेलीं प्रेमगीतें आहेत.* राजकीय व ऐतिहासिक विषयांवरहि त्यानें कांहीं कविता लिहिल्या आहेत.

**प्राप्तीवरील कर**—प्रथम हा कर सरकार आपला जबर खर्च भागविण्यासाठीं घेत असे. इंग्लंडांत प्रथम १७९८ सालीं हा पिटनें तात्पुरता म्हणून सुरू केला; पण १८४२ पासून तो कायमचाच बसला. हिंदुस्थानांत हा प्रथम १८६० मध्यें शिपायांच्या युद्धामुळें झालेला खर्च भागविण्यासाठीं बसविण्यांत आला. हा कर पुढें प्रसंगानुसार कमजास्त करण्यांत आला. आज दरसाल १,५०० रु. वरच्या प्राप्तीवर ३,५०० पर्यंत हा रुपयाला ९ पै आकारण्यांत येतो. प्राप्ति जास्त जास्त वाढत जाते तसा तसा हा करहि वाढत जातो. अतिरिक्त कर (सुपर टॅक्स) २५,०००रु. वर बसावतात. तो २४ पैपासून १२६ पैपर्यंत पडतो. १९४६-४७ सालीं या प्राप्तीवरील कराचें उत्पन्न ८७ कोटि रुपये झालें. नेहमीं या कराचा दर कमीजास्त करण्यांत येत असतो.

**प्रायश्चित्त**—प्रायः म्हणजे तप व चित्त म्हणजे निश्चय. तप व निश्चय ह्यांच्या संयोगाला प्रायश्चित्त ही संज्ञा आहे. प्रायश्चित्त *ही शिक्षा आहे.* जें करावयाचें तें न करणें व करावयाला नको तें करणें हें अपराध अथवा पाप असून त्याला शास्त्रांत सांगितलेली जी शिक्षा तिचें नांव प्रायश्चित्त. अज्ञानानें घडलेलें पाप वेदाभ्यासानें घालवितां येतें. पण बुद्ध्या केलेल्या अथवा मोहवश होऊन केलेल्या पापाचें क्षालन प्रायश्चित्तावांचून होत नाहीं, असें मनूचें म्हणणें आहे. सामान्यतः उघड पापाचें निराकरण व्रतानें व गुप्त पापाचें जप किंवा हवन करून होतें. केलेला अपराध चारचौघांत बोलून दाखविल्यानें मनुष्य पापमुक्त होतो. याज्ञवल्क्यानें काल, अग्नि, कर्म, माती, वायु, मन, ज्ञान, तप, जल, पश्चात्ताप, निराहार हीं शुद्धीचीं साधनें सांगितलीं आहेत. ऐंशीं वर्षांवरील मनुष्य, सोळाच्या आंतील मूल, स्त्रिया व रोगी ह्यांस अर्धें प्रायश्चित्त सांगावें. एखाद्या पापाबद्दल ब्राह्मणाला जी शिक्षा सांगितली असेल तिच्या पाऊण शिक्षा क्षत्रियाला, अर्धी वैश्याला व पाव शूद्राला सांगावी असें बृहत्पराशरी धर्मशास्त्र सांगतें. भलतेंच प्रायश्चित्त सांगणाऱ्या द्विजाला राजानें शासन करावें. प्रायश्चित्त ठरविणें तें राजा व ब्राह्मण दोघांनीं मिळून ठरवावें. पशुपक्षी, कृमी-कीटक ह्यांची हत्या केल्यास प्रायश्चित्त आहे. तसेंच वृक्षलता ह्यांचा नाश

केल्यास सुद्धां प्रायश्चित्त घेतल्यावांचून सुटका नाहीं. साप मारला तरी दान करून शुद्धि मिळवावी लागते.

प्रायश्चित्तांची योजना पापक्षालनार्थ सर्व धर्मांतून सांगितलेली आहे. पाप म्हणजे अकर्तव्याचरण व कर्तव्य–अनाचरण. पापकर्माची कबुली देणें व त्याबद्दल पश्चात्ताप होणें हें एक प्रायश्चित्तच होय. हा प्रायश्चित्त-प्रकार ख्रिस्ती, हिब्रू, वगैरे धर्मांत विशेष आहे. पारशी धर्माच्या अवेस्ता या धर्मग्रंथांत प्रायश्चित्तविवेचनपर वेंदिदाद हा एक स्वतंत्र भाग आहे. आपल्या हातून होणाऱ्या पापाचा उल्लेख करून त्यापासून मुक्त करण्याकरिता परमेश्वराची प्रार्थना सर्वत्र करतात; पण पारशी लोकांत तो एक विशेष आहे. द्रव्यदानाचाहि प्रायश्चित्तांत समावेश होतो.

**प्रायोगिक मानसशास्त्र**— एका शतकापूर्वी मानसशास्त्र हें स्वतंत्र शास्त्र या पदवीला पोंचलें नव्हतें. तत्त्वज्ञानाचा एक घटक या दृष्टीनेंच त्याचा अभ्यास होई. पण पुढें शास्त्रज्ञांनीं या दोन शास्त्रांची फारकत केली व १८५० च्या पुढें मानसशास्त्र स्वतंत्र रीतीनें अस्तित्वांत आलें. सुरुवातीला या शास्त्राचा अभ्यास आत्मनिष्ठ पद्धतीनेंच करणें शक्य आहे असें शास्त्रज्ञांना वाटे. कारण मन ही काहीं स्वतंत्र वस्तु असेल असें सिद्ध करणारा पुरावा मिळणें अशक्यप्राय होतें. पुढें हळूहळू या आत्मनिष्ठ पद्धतीला विरोध उत्पन्न झाला व इतर शास्त्रांप्रमाणें या शास्त्रांतहि वस्तुनिष्ठ दंडक तयार करतां येतील, असें शास्त्रज्ञांना वाटूं लागलें व येथूनच प्रायोगिक मानसशास्त्राला आरंभ झाला.

मनुष्यप्राण्याचें वैशिष्ट्य म्हणजे बुद्धि. तिचें मोजमाप करण्याला कोणतीं साधनें शास्त्रशुद्ध असतील या शोधांत मानसशास्त्रज्ञ गुंतले होते. तत्पूर्वी अशीं साधनें उपयोगांत येत होतीं, पण तीं बाह्यस्वरूपाचीं होतीं. माणसाच्या डोक्याचा आकार इत्यादि शारीरिक विशेषांवरून बुद्धीचा अंदाज करण्यांत येई, पण सामुद्रिकशास्त्रांतील दंडकांप्रमाणेंच या साधनांची स्थिति असे. त्यांच्या साह्यानें केलेलें अनुमान नेहमींच सत्य ठरे असें म्हणतां येणें शक्य नव्हतें. या परिस्थितींत शास्त्रपूत मानदंड शोधून काढण्याचा पहिला प्रयत्न वुंट या शास्त्रज्ञानें केला. इ. स. १८७९ मध्यें त्यानें लाइपझिक येथें पहिली प्रयोगशाळा सुरू केली. त्यानंतर गाल्टन, प्रो. जे. मॅक्कॅंडेल, एबिंगहास, इत्यादि शास्त्रज्ञांनीं ज्ञानेंद्रियें वगैरे ज्ञानसाधनांच्या शक्ती ठरविणाऱ्या कसोट्या तयार केल्या. फ्रान्समधील बिने नांवाच्या शास्त्रज्ञानें या बाबतींत फारच प्रगति केली व बुद्धिमापनाच्या व्यक्तिगत व सामुदायिक कसोट्यांची पार्श्वभूमि त्यानें तयार केली. विशिष्ट वयाच्या मुलाला विशिष्ट प्रश्न विचारावयाचे व त्यानें दिलेल्या उत्तरावरून त्याचें मानसिक वय सिद्ध करावयाचें. या मानसिक वयाला त्या मुलाच्या शारीरिक वयानें भागून त्या भागाकाराला सोयीसाठीं १०० नें गुणलें म्हणजे येणारें उत्तर हें त्या मुलाचा बुद्ध्यंक दाखवितें. या बुद्ध्यंकावरून त्या मुलाचें बौद्धिक क्षेत्रांतील स्थान ठरविलें जातें. बिनेनें तयार केलेल्या कसोट्यांत सांप्रत फारच सुधारणा झालेली आहे. आणि या कसोट्यांचा उपयोग अनेक क्षेत्रांत विशेषतः शिक्षणक्षेत्रांत आज होत आहे.

मानसशास्त्रज्ञ या बुद्धिमापन कसोट्यांनीं संतुष्ट झाले नाहींत. तर त्यांनीं इतर अनेक क्षेत्रांतहि प्रयोग करून पाहिले. स्मरण-विस्मरण, आवड-नावड, हस्तकौशल्य, इत्यादि व्यक्तिगत गुणांच्या कसोट्यांबरोबरच उद्योगधंदे, कारखाने, कार्यालयें, यांतील उत्पादनाला उपयोगी पडतील असे अनेक निष्कर्ष मानसशास्त्रज्ञांनीं आज जनतेपुढें ठेविले आहेत. उद्योगक्षेत्रांतील उत्पादन वाढविण्यासाठीं काम करतांना किती तास राबवावें, मध्यें किती सुटी द्यावी, आठवड्यांतील कोणते दिवस उत्पादनाच्या दृष्टीनें कसे महत्त्वाचे असतात, कामकरी वर्गाचा स्वाभिमान राखण्यासाठीं काय करावें, काम करतांना येणारा थकवा कसा कमी करावा; इतकेंच काय पण ज्या ठिकाणीं काम चालतें, त्या जागीं उजेड किती असावा, भिंतींचा रंग कोणता असावा, इत्यादि बारीक-सारीक गोष्टींबाबतहि प्रयोग झाले आहेत.

नोकर-भरतीच्या वेळीं कोणते प्रश्न विचारावे, हेंहि प्रयोगसिद्ध होत आहे. व्यापारी क्षेत्रांत माल खपविण्यासाठीं कोणते उपाय मानसशास्त्रदृष्ट्या उपयुक्त होतात याचेहि प्रयोग होऊन त्यांना फार महत्त्व प्राप्त झालें आहे. आज प्रायोगिक मानसशास्त्राची प्रगति एवढ्या प्रमाणांत झाली आहे आणि होत आहे कीं, मानसशास्त्रज्ञ हा मानवी समाजाच्या स्थैर्याला व उत्कर्षाला साहाय्य करणारा एक प्रमुख घटक आहे असें म्हणणें प्राप्त आहे. (मानसशास्त्र पाहा). पुणें विद्यापीठानें आपल्या शिक्षणक्रमांत ही एक शाखा ठेविली आहे.

**प्रायोगिक रसायनशास्त्र**—(प्रॅक्टिकल केमिस्ट्री). रसायनशास्त्रांतील प्रयोगात्मक भाग. ह्यांत परीक्षण, विश्लेषण, संश्लेषण, वगैरे कार्यें येतात. दिलेला पदार्थ कोणत्या जातीचा आहे, त्यांत कोणतीं मूलद्रव्यें आहेत, त्यांचें एकमेकांशीं काय प्रमाण आहे, वगैरे गोष्टी परीक्षणांत आणि विश्लेषणांत येतात. संश्लेषणांत नवीन पदार्थ तयार करण्याच्या रीती येतात. रसायनशास्त्रांतील हा प्रयोगविधि अत्यंत महत्त्वाचा भाग असून त्याला बुद्धिकौशल्याबरोबर हस्तकौशल्याचीहि आवश्यकता लागते.

**प्रायोझिल**—(आल्डेहाइड्स). सेन्द्रिय रसायनांतील मद्यार्क (अल्कोहोल) आणि अम्ल (ॲसिड) ह्या दोन वर्गांमधला एक वर्ग. त्यांत मद्यार्कामधील $CH_2OH$ ह्या समूहातील दोन

H जाऊन प्राणिलीकरण (ऑक्सिडेशन) CHO हा समूह येतो. सामान्यतः प्रायोज्लिल (आल्डेहाइड) म्हणजे दारिल-प्रायोज्लिल (असेटॅल्डेहाइड $CH_3$ CHO) समजतात. हा मद्यार्क एथिलमद्यार्कापासून प्राणिलीकरणा(ऑक्सिडेशन)नें तयार होतो. हा रंगहीन द्रवपदार्थ असून मद्यार्काप्रमाणें हा जळूं शकतो. ह्याचें विशिष्ट गुरुत्व ०.७९ असून हवेंतील प्राणवायूनेंहि ह्याचें दार्वम्ल (असेटिक ॲसिड $CH_3COOH$) तयार होतें. कृत्रिम राळ तयार करण्यासाठीं प्रायोज्लिलांचा उपयोग होतो.

**प्रार्थनासमाज**—प्रार्थनासमाज हा महाराष्ट्रांतील एक धर्मपंथ आहे. प्रत्येक चालू धर्मांत कमी-अधिक प्रमाणानें सत्याचा लोप झालेला दिसून येतो, किंवा धर्मविकास थांबलेला असतो; तेव्हां विवेचक बुद्धीनें सर्व धर्मांमध्यें जें सत्य आहे त्याचें ग्रहण करावें, आणि देशकालपरत्वें धर्मप्रवृत्तींत आलेला जो असत्याचा अंश त्याचा त्याग करावा, आणि जागृत विवेचक बुद्धीच्या योगें जीं मतें उन्नतिकारक आहेत असें अनुभवास येतें त्यांचें अवलंबन करावें, हा प्रार्थनासमाजाचा मूळ उद्देश आहे.

प्रार्थनासमाज प्रार्थनेवरच कां जोर देतो असा सहज प्रश्न येतो. वास्तविक प्रार्थना प्रत्येक धर्मांत आहेच. पण त्या प्रार्थना ऐहिक सुखाच्या वस्तूंकरिताच दिसतात. त्या ठराविक प्रार्थनेच्या योगें आपल्या विकसित होत जाणाऱ्या मनाला जगांतील सत्य, न्याय, प्रेम किंवा दया काय आहे हें कळत नाहीं. प्रार्थना ही मानसशास्त्राच्या तत्त्वावर पाहिजे; म्हणजे प्रथमतः प्रार्थनेची जाणीव झाली पाहिजे. दैवी गुण अंगीं आणण्याची इच्छा, नंतर तळमळ, त्याकरितां आत्मपरीक्षण, भावना व त्याप्रमाणें कृति असावी. अर्थात् षड्रिपूंचें उच्चाटन होण्याकरितां प्रार्थना आहे, हें जाणून प्रार्थनासमाज प्रार्थनेवर जोर देतो.

प्रार्थनासमाजास मान्य असलेलीं धर्मतत्त्वें—१. परमेश्वरानें हें सर्व जग उत्पन्न केलें, तोच एक खरा देव, त्याशिवाय दुसरा देव नाहीं. तो नित्य, ज्ञानस्वरूप, अनंत, कल्याणनिधान, आनंदमय, निरवयव, निराकार, एकच, अद्वितीय, सर्वांचा नियंता, सर्वव्यापी, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान्, कृपानिधि, प्रेमस्वरूप, परमपवित्र, व पतितपावन असा आहे.

२. केवळ त्याच्याच उपासनेच्या योगें येथें व परलोकीं शुभ प्राप्त होतें.

३. त्याच्यावर प्रीति, पूज्यबुद्धि व अनन्यभाव हीं ठेवून त्याप्रमाणें त्याचें मनन, भजन व पूजन करणें व त्यास प्रिय अशीं कृत्यें करणें, हीच त्याची खरी उपासना होय.

४. मूर्ति व इतर जड पदार्थ यांची पूजा किंवा प्रार्थना करणें, हा ईश्वरोपासनेचा खरा प्रकार नव्हे.

५. परमेश्वर सावयवरूपानें अवतार घेत नाहीं व कोणताहि एक ग्रंथ साक्षात् ईश्वरप्रणीत किंवा सर्वांशीं प्रमाण नाहीं.

६. सर्व मनुष्यें एका परमेश्वराचीं लेंकरें आहेत. म्हणून भेद न राखतां परस्परांशीं बंधुभावानें वागावें, हें ईश्वरास प्रिय आहे, आणि हें मनुष्याचें कर्तव्य आहे.

आतां वरील सहा तत्त्वांवरून लक्षांत येईल कीं, प्रार्थनासमाजास देवाची प्रतिमा मान्य नाहीं. मूर्तिपूजा तो गौण धरतो. परमेश्वराच्या गुणांची पूजा, त्यावर भक्तिभाव ठेवून करावी. परमेश्वराचें भजन, मनन व प्रार्थना नित्याचरणांत असावी असें आहे. प्रार्थनासमाज देव अवतार घेतो, असें मानीत नाहीं; तशी जरूर देवाला नाहींच; तर संत, सज्जन, साधु, इत्यादि श्रेष्ठांच्या मनांत प्रेरणा करून त्यांच्या हातून तो कार्य करवितो. कोणताहि धर्मग्रंथ परमेश्वरानें लिहिलेला नाहीं; तर त्या त्या काळच्या देशहितेच्छु संत-सज्जनांनीं कालमानाप्रमाणें ते लिहिले आहेत; पुन्हां देशकालपरत्वें त्यांत कांहीं फरक होणारच. प्रार्थनासमाज देव एकच मानितो. देव एक, तशी जातहि एकच व धर्महि एकच मानतो. तेव्हा सर्व मनुष्यजात एकाच परमेश्वराची संतति आहे, हें जाणून जातपात-भेदभाव तो मानीत नाहीं. आपआपसात बंधुभाव, सलोखा राहावा, हें प्रार्थनासमाजाचें ध्येय आहे.

कलकत्त्यांत ब्राह्मसमाज (पाहा) नावानें ही धर्मसंस्था सव्वाशें वर्षांपूर्वी राजा राममोहन राय यांनीं स्थापिली. मुंबईस प्रार्थनासमाज त्या धर्तीवरच १८६७ सालीं निघाला. पुण्यासहि १८७० सालीं एक समाज निघाला. नंतर नासिक, अहमदनगर, सातारा, पंढरपूर, इंदूर, ठाणें व अहमदाबाद या ठिकाणीं समाज झाले. हल्लीं नासिक व सातारा येथील समाज बंद आहेत. परंतु बाईस प. वा. विठ्ठल रामजी शिंदे यांनीं १९३३ सालीं ब्राह्मसमाज नांवानें तेथें एक संस्था सुरू केली. मद्रास इलाख्यांत देवसमाज किंवा ब्राह्मसमाज या नांवानें बऱ्याच संस्था आहेत. मात्र सर्वांत धर्मतत्त्वें एकच आहेत.

महाराष्ट्रांत प्रार्थनासमाजाचे प्रवर्तक पुढारी म्हणजे डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर, न्या. मू. म. गो. रानडे, श्रीमती रमाबाई रानडे, डॉ. आत्माराम पांडुरंग, मामा परमानंद, वासुदेव बाबाजी नवरंगे, रामचंद्र विष्णु माडगांवकर, बाळ मंगेश वागळे, भास्कर हरि भागवत, वामन आबाजी मोडक, शंकर पांडुरंग पंडित, दीनानाथ विष्णु माडगांवकर, नारायण गणेश चंदावरकर, इ. जुन्या पिढींतील ही मंडळी होती. प्रार्थनासमाजाचें 'सुबोध पत्रिका' नांवाचें एक साप्ताहिक पत्र १८७३ पासून सुरू आहे. श्री. द्वा.

गो. वैद्य यांनीं या प्रार्थनासमाजाचा इतिहास चांगला लिहिला आहे. त्यांनीं याशिवाय 'संसार व धर्मसाधन', 'न्या. मू. रानडे यांचीं धर्मावर व्याख्यानें', 'डॉ. भांडारकर यांचीं धर्मावर व्याख्यानें', इ. या पंथासंबंधीं लहान-मोठीं पुस्तकें लिहिलीं आहेत. प्रि. वि. के. जोग यांनीं लिहिलेल्या 'शुद्ध भक्तिपंथाचा इतिहास' या समाजपरिचय निबंधांत प्रार्थनासमाजाच्या आजवरच्या कार्याचा सुंदर आढावा घेतलेला आहे. आज मुंबईस काय तें प्रार्थनासमाजाचें उपयुक्त शैक्षणिक कार्य चाललेलें आढळतें. या पंथाचे आतां नवीन अनुयायी कोणी होत नसल्यानें याचें भवितव्य आशाजनक वाटत नाहीं. पण गेल्या शतकांत महाराष्ट्रांत ज्या अनेक देशहिताच्या चळवळी झाल्या त्यांपैकीं ही एक धर्म-सुधारणेची चळवळ होती. या दृष्टीनें पाहतां समाजाचा इतिहास मननीय आहे.

**प्रॉव्हिडेंट फंड**—प्रॉव्हिडेंट फंड हा एक वारसानिधि विम्यासारखाच आहे. आपल्या वेतनांतून दरमहा ठराविक हिस्सा वेगळा काढून तो व्याजीं लावावयाचा व सुरक्षित स्थळीं ठेवावयाचा. सेवानिवृत्तीनंतर पगार देणाऱ्याच्या हिश्शासकट हा निधि परत मिळतो; व पुढील योगक्षेमासाठीं उपयोगी पडतो. अनेक नोकऱ्यांतून पेन्शनबरोबर किंवा त्याऐवजीं हा फंड ठेवलेला असतो. या फंडासंबंधीं एक कायदाहि झाला आहे.

प्रॉव्हिडेंट फंडाचा कायदा—१९२५ च्या या कायद्याचा उद्देश, प्रॉव्हिडेंट फंडाची योग्य व्यवस्था लावणें हा आहे. सरकारी किंवा रेल्वेच्या प्रॉव्हिडंट फंडाची रक्कम सक्तीनें ठेव ठेवलेली असेल तर त्या रकमेची जशी कोणत्याहि दिवाणी, रेव्हेन्यू किंवा फौजदारी कोर्टाच्या हुकूमनाम्यानें किंवा हुकुमानें सदर फंडाच्या मालकाला असलेल्या देण्याकरितां करतां येणार नाहीं; आणि ती फंडाची रक्कम सदर फंडाच्या मालकाला त्याच्या मृत्यूपूर्वी झालेल्या कर्जाला, किंवा त्या मयताच्या वारसाच्या कर्जाला जबाबदार नाहीं (कलम ३). सदर फंडाची रक्कम त्या फंडाच्या मालकाला किंवा तो मयत झाला असल्यास त्याच्यावर अवलंबून असणाऱ्या इसमाला—म्हणजे मयताची बायको, ती हयात नसेल तर मयताचे आईबाप, मुलगा, मुलगी, अज्ञान भाऊ, अविवाहित बहीण, विधवा सून व तिचीं मुलें, आणि मयताचे आईबाप जिवंत नसतील तर पितृघराण्यांतील आजाआजी, यांना अनुक्रमें वारस म्हणून—देण्यांत यावी; किंवा त्या फंडाच्या मालकानें कोणी इसम वारस म्हणून स्पष्ट नमूद करून (नॉमिनी) ठेवला असेल, तर त्या इसमाला ती रक्कम द्यावी, असा कायद्यानें निर्बंध आहे.

**प्रॉव्हिडेन्स**—अमेरिका, ऱ्होड आयलंडची राजधानी. या नांवाची एक नदी व एक काउंटीहि आहे. हें शहर बंदरहि आहे. लोकसंख्या २,५३,५०४. येथील सार्वजनिक वाचनालयात दोन लाखावर ग्रंथ आहेत. वस्ती बहुतेक युरोपिअनांची. या ठिकाणीं १७६४ सालीं स्थापलेलें बॅप्टिस्ट विद्यापीठ आहे. जवाहीर, रुप्याचीं भांडीं, वाफेचीं इंजिनें, रबर, कापड, इ. या ठिकाणीं तयार होतें.

**प्रिचार्ड, कॅथेराइन सुसाना** (१८८४– )—एक अत्यंत तेजस्वी ऑस्ट्रेलियन कथालेखिका. 'वर्किंग बुलॉक्स' आणि 'कूनार्डू' या तिच्या उत्कृष्ट कादंबऱ्या होत. 'किस् ऑन दि लिप्स' (ओष्ठचुंबन) हा तिच्या लघुकथांचा एक संग्रह आहे. यांखेरीज, कविता, नाटकें, निबंध, इ. तिचें बरेंच लेखन आहे. ऑस्ट्रेलियांतील जंगलांविषयीं तिला गाढ प्रेम आहे व ऑस्ट्रेलियाची परिस्थिति तिला संपूर्णपणें संमत आहे. याच गोष्टी तिच्या कथालेखनांत प्रतीत होतात.

**प्रिटोरिया**—दक्षिण आफ्रिका संघ आणि ट्रान्सव्हाल प्रांत यांचें मुख्य ठिकाण. या शहराची लो. सं. १,०८,३३० आहे. समुद्रसपाटीच्या वर ४,४७० फुटांवर हें वसलेलें आहे. १८८१ त ट्रान्सव्हाल स्वराज्याचा करारनामा, १९०२ मध्यें ब्रिटिश बोअर तह, वगैरे गोष्टी येथें घडल्या. रेल्वेनें केप टाउन वगैरे महत्त्वाच्या ठिकाणांशीं हें जोडलें गेलें आहे. सरकारी कचेऱ्या, न्यायालयें, सरकारी ग्रंथालय, शिक्षणसंस्था व देवालयें यांच्या मोठाल्या इमारती आहेत. येथें प्रिटोरिया विद्यापीठ (स्थापना १९३०) व दक्षिण आफ्रिका संघाचें विद्यापीठ (स्था. १९१८) आहे.

**प्रिन्स ऑफ वेल्स**—ही पदवी ब्रिटिश राज्याच्या नजीकच्या वारस राजपुत्राला देण्यांत येते. पहिल्या एडवर्ड राजानें वेल्स प्रांत जिंकल्यावर आपल्या थोरल्या राजपुत्राला 'प्रिन्स ऑफ वेल्स' ही पदवी दिली व तेव्हांपासून ही पदवी चालू आहे. शिवाय इंग्लंडच्या वडील राजपुत्राला वारसाहक्कानें पुढील पदव्या असतात:—ड्यूक ऑफ कार्नवॉल, प्रिन्स अँड हायस्टयुवर्ड ऑफ स्कॉटलंड, ड्यूक ऑफ रॉथसे, अर्ल ऑफ कॅरिक, बॅरन रेनफ्र्यू, आणि लॉर्ड ऑफ दि आइल्स. शेवटच्या पांच पदव्या स्कॉटलंडच्या वारसाच्या आहेत. प्रिन्स ऑफ वेल्सच्या मुकुटावर शहामृगाच्या तीन पिसांचा तुरा असतो.

**प्रिन्स एडवर्ड आयलंड**—हें बेट म्हणजे अमेरिकेंतील कानडा-डोमिनियन या ब्रिटिश कॉमनवेल्थपैकीं एका वसाहत राज्याचा एक सर्वांत लहान पण सर्वांत अधिक दाट वस्तीचा प्रांत आहे. त्याचें क्षे. फ. २,१८४ चौ. मैल. लो. सं. ९३,९१९ आहे. राजधानी शार्लोटी टाउन आणि मुख्य शहर समरसाइड आहे. हें बेट सेबास्टियन कॅबट या प्रवाशानें १४९७ सालीं शोधून काढलें. तेथें प्रथम फ्रेंचांनीं वसाहत केली, पण १७५४ सालीं

इंग्रजांनीं तें जिंकून घेतलें. १८७३ सालीं कानडा कॉन्फेडेरेशन-मध्यें तें बेट सामील करण्यांत आलें. हल्लीं या बेटाचा कारभार एक लेफ्टनंट गव्हर्नर व ३० लोकनियुक्त सभासदांचें कायदे-मंडळ चालवतात. येथें स्त्रीपुरुषांना सार्वत्रिक मतदानाचा हक्क (युनिव्हर्सल सफ्रेज) आहे. येथें ४५४ शाळा, दोन कॉलेजें, व सेंट डनस्टन- विद्यापीठ आहे. शिक्षणखात्याचा खर्च ४२१,४५१ डॉलर असून या प्रांताचें एकंदर उत्पन्न २६,३९,७६३ डॉलर व खर्च २९,८८,२४८ डॉलर (१९४५ सालीं) झाला. मुख्य पिकें ओट, बटाटे, गहूं, बार्ली व फळें (ॲपल, प्लम, चेरी, स्ट्रॉबेरी). घोडे, गुरें, कोंबड्या, बदकें व सिल्व्हर फॉक्स (रुपेरी कोल्हा) पाळण्याचा धंदा व दुधाचा धंदा, तसेंच मच्छी-मारीचा (ऑइस्टर, लॉबस्टर, कॉड, साल्मन, हेरिंग जातीचे मासे धरण्याचा) धंदा चालतो.

**प्रीस्ट्ले, जोसेफ** (१७३३-१८०४)—एक प्रसिद्ध इंग्रज लेखक, रसायनशास्त्रज्ञ, धर्मशास्त्रज्ञ व संशोधक. १७६७ मध्यें 'विद्युताचा इतिहास' हा ग्रंथ यानें लिहून प्रसिद्ध केला. १७७४ मध्यें प्राणवायूचा शोध लावला. त्याच्या सुधारक, धार्मिक आणि राजकीय मतांमुळें त्याला बराच त्रास भोगावा लागला. १७९४ मध्यें त्यानें देशत्याग केला आणि तो पेन्सिल्व्हा-निया (अमेरिका) येथें गेला. प्राणवायु व हवेंतील ज्वलनक्रियेस मदत करणारा वायु एकच, यासारखे शोध त्यानें लावले. नत्र, उज्जहरिताम्ल, नत्रप्राणिद (नायट्रस ऑक्साइड), नत्रक प्राणिद (नायट्रिक ऑक्साइड), अमोनिआ, कर्बप्राणिद, गंध-द्विप्राणिद, इ. वायूंचाहि पहिला शोध त्याचाच आहे. लाव्हाझिए-ऐवजीं अर्वाचीन रसायनशास्त्राचा जनक म्हणून प्रीस्ट्लेच व्हावयाचा, पण ज्वलनतत्त्वा( फ्लॉजिस्टन )च्या विषयासंबंधीं त्याचे पूर्वग्रह आड आले.

**प्रुसिक अम्ल**—उदश्यामिकाम्ल (हायड्रोसायनिक ॲसिड). कडू बदामांत हें असतें. पालाशश्यामिद (पोटॅशियम साय-नाइड) किंवा लोहीश्यामिद (फेरीसायनाइड) आणि गंधकाम्ल ह्यांच्या विद्रावांचें उत्पतन केलें म्हणजे या अम्लाचा विद्राव मिळतो. उदश्यामिकाम्ल एक प्रकारचा द्रवरूप असून २६° शत. ला उकळतें. त्याला तीव्र झोंबणारा वास येतो. विद्राव्यांत हें अगदीं थोड्या प्रमाणांत असतें, व कडू बदामासारखा यास वास येतो. हें अतिशय विषारी आहे; एखादा थेंब जरी पोटांत गेला तरी त्यामुळें तावडतोब मृत्यु येतो. ह्याचीं लवणें (सायनाइड) क्षारधर्मी असून ह्याच्याप्रमाणेंच विषारी आहेत.

**प्रूधाँ, पेरी जोसेफ** (१८०९-१७६५)—एक फ्रेंच समाजसत्तावादी लेखक. कंपॉझिटरची नोकरी करून हिब्रू शिकला. १८४० त त्याचें जें प्रसिद्ध पुस्तक बाहेर पडलें, त्याच्या मुखपृष्ठावरच 'मालमत्ता कशाला पाहिजे?' हा प्रश्न होता व याचें उत्तर पहिल्या पानावर 'ती चोरी आहे.' असें दिलें होतें. १८४८ च्या राज्यक्रांतीचा तो पुढारी होता. अर्थशास्त्र व समाज-शास्त्र यांबाबत अत्यंत जहाल व अति प्रागतिक मतें व कडक भाषा यांमुळें त्याला तीन वर्षे कैद घडली. श्रमाचा कालावधि हेंच व्यक्तीच्या श्रमाचें मूल्य ठरविण्याचें साधन; भविष्य-काळीं सर्व माणसें बुद्धोनें वगैरे एका पातळींत येतील; कोण-त्याहि पद्धतीचें सरकार जुलमी व अनिष्ट असतें; मानवजात पूर्णतया विकास पावल्यावर सरकार ही संस्था अनवश्यक होईल, वगैरे एकांतिक मतांचा तो पुरस्कार करी. भांडवल व माल-मत्तासंग्रह यांचा तो कट्टा विरोधी होता.

**प्रेतदहन**—माणूस मेला म्हणजे त्याला जाळतात किंवा पुरतात. या दोन्ही पद्धती प्राचीन आहेत. ख्रिस्ती धर्मांत पुनरुत्थानाची कल्पना आल्यापासून माणसांना पुरण्यांत येऊं लागलें. पुढें जाळणें हें आरोग्यदृष्ट्या चांगलें अशी खात्री होऊन १९ व्या शतकांत ख्रिस्ती लोकांत प्रेतदहन-संस्था निघाल्या व दहनकर्मांत सोयीचे प्रकार निघाले. साहजिकच ठिकठिकाणीं दहनस्थानें (क्रिमेटोरिया) तयार झालीं. आतापर्यंत नुसत्या ग्रेट ब्रिटनमध्यें सुमारें ४०,००० वर प्रेतांचें दहन झालें आहे. जर्मनींत विजेच्या भट्टींत थोड्या मिनिटांत प्रेत जळून त्याची रक्षा लागलीच मिळते. अशा रक्षा ठेवण्यासाठीं चांगल्या जागा बांधल्या आहेत. हिंदु समाजांत कांहीं अस्पृश्य जाती सोडल्यास सर्व जातींत प्रेतें जाळण्यांत येत असतात.

**प्रेत-संस्कार**—मृत्यु म्हणजे जीवाचा अगदीं अखेरचा नाश, अशी जगांतील बहुधा कोणत्याच समाजाची समजूत नाहीं; वास्तव जन्माप्रमाणें मृत्यूनंतरहि संस्कार करण्याची रूढि पडली आहे. मरणोत्तर जीव भूत होतो म्हणून, दुसऱ्या भुतांपासून जीवाला उपद्रव होऊं नये म्हणून, देहत्यागानंतर जीवात्मा कांहीं काल पूर्वीच्या निवासस्थानीं घिरट्या घालीत असतो म्हणून, जीवाला नरकाच्या यातना भोगाव्या लागूं नयेत म्हणून, अशा नानाविध कल्पनांनीं सुसंगति लावतां न येण्यासारखे अनेक आचार या संस्कारात घुसले आहेत. जिवंतपणीं माण-साला खावें-प्यावें लागतें तसें मेल्यानंतरहि लागतें, अशा सम-जुतीनें मृताला अन्नपाणी देण्याची वहिवाट पडली. फार काय, त्याला प्रिय असलेले पदार्थहि स्मशान-यात्रेबरोबर नेण्याची चाल पडली आहे. मृताचा नरकवास टाळण्याकरितां दानें देण्याचा प्रघात पडला.

प्रेताला धुऊन स्वच्छ करणें, त्याच्यावर कोरें स्वच्छ वस्त्र पांघरणें, तसेंच गंध-फुलें वाहणें, ही चाल बहुतेक सर्व समाजांत असल्याचें आढळून येईल.

दहन करणें, पुरणें, नदींत किंवा समुद्रांत टाकणें, गिधाडांकडून खावविणें, हे प्रेताची विल्हेवाट करण्याचे प्रकार आहेत. ह्यांपैकीं जगांतील बहुसंख्याक लोकांनीं पुरण्याचा प्रकार स्वीकारला आहे. पारशी समाजांत गिधाडांचें भक्ष्य म्हणून प्रेताचा विनियोग केला जातो. कित्येक जातींत दहन केल्यानंतर हाडें पुरण्याची रीत आहे. आरोग्यदृष्ट्या दहन करण्याची पद्धत श्रेष्ठ होय. वैदिक वाङ्मयांत ह्या सर्व प्रकारांचा उल्लेख केलेला आढळतो.

भिन्न भिन्न देश, समाज व काल यांत मरणासंबंधींच्या आढळून येणाऱ्या मतवैचित्र्याप्रमाणेंच या संस्कारामध्येंहि विविध वैचित्र्य आढळतें. घरांत मर्तिक झाल्यावर घरेंदारें–खिडक्या उघड्या ठेवणें, पाण्याचीं भांडीं रिकामीं करून ठेवणें, मृत्युस्थलीं पाणी व अन्न ठेवणें, वगैरे किती तरी भिन्न भिन्न प्रकार आढळतात. नंतर क्रिया करण्यापूर्वींच्या संस्कारांबाबतहि असेच प्रकार आढळतात. प्रेताला किंवा मरणोन्मुखाला स्नान घालणें, प्रेताच्या अंगावरचे केस काढणें, प्रेत रंगविणें, त्याला कपडे घालणें, वगैरे प्रकार झाल्यावर जाळणें अगर पुरणें हा अंत्यसंस्कार केला जातो. गिधाडादि प्राण्यांकडून अगर जलचराकडून प्रेत खावविणें, यासारख्याहि प्रकारांनीं प्रेताची विल्हेवाट लावली जाते. ईजिप्तमध्यें पूर्वीं प्रेतें विशेष मसाला घालून विशेष तऱ्हेनें सुरक्षित राखून ठेवत (ममी, शवरक्षण पाहा). प्रेत-संस्काराचा उद्देश मृताला पारलौकिक सुख प्राप्त करून देणें व मृताच्या आप्तांना अशौचांतून मुक्त करणें हा आहे. यानंतर मृताच्या आप्तेष्टांना पुन्हां स्वशुद्ध्यर्थ कांहीं विधीसंस्कार करावे लागतात. सुतक पाळणें, श्राद्धाचें जेवण घालणें, नाचणें, वगैरे विविध देशांतील विविध प्रकारहि वैचित्र्यपूर्णच आहेत.

ख्रिस्ती संस्कार—ख्रिस्ती धर्मांत या संस्कारामध्यें आसन्नमरण अशा रुग्ण मनुष्यास त्याच्या शारीरिक व आत्मिक आरोग्याप्रीत्यर्थ धर्मोपदेशक अभ्यंजन करीत असतो. या वेळीं त्या रुग्ण मनुष्याच्या डोळ्यांत, कानांत, नाकपुड्यांत, तोंडांत, हातांस आणि पायांस ऑलिव्ह तेलाचें अंजन करण्यांत येतें व त्या वेळीं पुढील शब्द उच्चारण्यांत येतात: "या पवित्र अंजनाच्या योगानें व त्याच्या परम दयाळुत्वानें परमेश्वर तुला तुझ्या नेत्र, कर्ण, इ. इंद्रियांनीं केलेल्या यच्चयावत् पातकांची क्षमा करो!" या तेलास दरवर्षी पवित्र गुरुवारीं विशेष आशीर्वाद देत असतो. हा संस्कार फक्त धर्मोपदेशकच करतात.

हा संस्कार करून घेण्यास पात्र होण्याकरितां पुढील अटी असतात: १ बाप्तिस्मा झालेला असणें. २ अत्यवस्थ स्थितींत असणें–सामान्यतः मृत्यु येईल अशी भीति असणें; योद्ध्याच्या बाबतींत केवळ युद्धावर जात आहे एवढें कारण पुरेसें मानण्यांत येत नाहीं. ३ संस्कारार्हतेस आपल्या पातकाबद्दल अंतःकरणपूर्वक दुःख वाटत असलें पाहिजे.

या संस्काराचा परिणाम म्हणजे, सर्व पातकांचें क्षालन व त्या पातकांबद्दल होणाऱ्या शिक्षेपासून मुक्तता; रुग्णाच्या बाबतींत व्याधीपासून होणारें सर्व दुःख आणि पीडा सहन करण्याइतकी त्यास शक्ति प्राप्त होणें; आणि परमेश्वराची योजना असल्यास आरोग्यवृद्धि होणें, हा होय.

**प्रेम**—प्रेमावर साऱ्या जगाचा डोलारा उभारलेला आहे. प्रेमाची भावनाच नष्ट झाल्यास जगाचा विनाश होईल. प्रेमाचें स्थूल व मूल स्वरूप सामान्यतः स्त्री–पुरुषविषयक परस्पर समागमाची इच्छा हें आहे. ही इच्छा जीवसृष्टींत सर्वत्र दिसून येते. पण हें केवळ शारीरिक प्रेम होय. संभोगसमागमाहून अन्य प्रकारचें जें दूरान्वित प्रेम, हाच मनुष्याचा, विशेषतः सुसंस्कृत मनुष्याचा विशेष होय. विवेक किंवा बौद्धिक विवेचनशीलता हाच मनुष्याचा इतर प्राणिवर्गाहून व पशूंहून विशेष होय. एरवीं मनुष्य व पशु एकच. ही विवेचनशीलता मनुष्याला असलेल्या मेंदूविशेषामुळें प्राप्त होते व याच मेंदूच्या अतिविवेचनशीलतेच्या गुणामुळें मनुष्याच्या व पशूच्या सर्वसामान्य जीवनांत भेद झाला. तसेंच मनुष्याच्या सुसंस्कृततेच्या मानानें मनुष्यानें आपला दर्जा फार वाढविला; व त्याच मेंदूमुळें व विवेचनशीलतेमुळें मनुष्याच्या प्रेमविषयक प्रवृत्तींत श्रेष्ठता निर्माण होऊन, स्नेह-भूतदयादि गुणांनींहि मनुष्याचें प्रेम नटूं लागलें. प्रेमवस्तूबद्दल निर्हेतुक आनंद, सान्निध्यांत सुख, वियोगांत दुःख, प्रेमवस्तूबद्दल आत्यंतिक श्रद्धा, इत्यादि श्रेष्ठभाव मनुष्याच्या विवेचनशीलतेनें उत्पन्न झाले. वत्सलता ही थोड्याबहुत प्रमाणांत पशूंतहि असते, परंतु इतर उच्चभाव त्यांच्यांत नसतात; आणि परस्पर सहवास हा केवळ संभोगसुखार्थच होय अशी केवल पशुतुल्य वृत्ति सुसंस्कृत मानवी मनांतून बहुशः निघून जाते. खरें प्रेम, निर्हेतुक आणि निर्विषयक प्रेम शील, सत्त्व व पावित्र्य यांच्या सान्निध्यानें श्रेष्ठता पावतें व भूषणावह होतें. प्रेम कसें उत्पन्न होतें याबद्दल कांहीं नियम देऊन सांगतां येणार नाहीं. तथापि सौंदर्य, पावित्र्य, सहवास, समानशीलता, परस्परांविषयीं आदर, इत्यादिकामुळें त्याची सहज निर्मिति व वाढ होते. प्रेम या मूलतत्त्वाचाच विकास होऊन मनुष्या–मनुष्यामध्यें परस्परविषयक, समाजविषयक असे नानाविध भाव उत्पन्न झाले. ईश्वरविषयक प्रेम, अनन्यताभाव हा याचाच आध्यात्मिक विकास होय.

**प्रेमचंद, मुनशी** (१८८०–१९३६)—एक सुप्रसिद्ध हिंदी कादंबरीकार व लघुकथा-लेखक. बनारसजवळील लमही या गांवीं यांचा जन्म झाला. गोरखपूर, बनारस, अलाहाबाद, वगैरे ठिकाणीं एम्. ए. पर्यंत शिक्षण घेतल्यानंतर यांनीं शाळा-

खात्यांत शिक्षक, मुख्याध्यापक, डेप्युटी इन्स्पेक्टर, वगैरे हुद्यांवर कामें केलीं. त्यानंतर १९२० सालच्या असहकारितेच्या चळवळींत यांनीं सरकारी नोकरीचा राजीनामा दिला.

यांचें नांव (मुनशी) धनपतराय असें असून त्याच नांवानें हे प्रथम आपलें लिखाण प्रसिद्ध करीत. परंतु सरकारी अवकृपेमुळें पुढें यांनीं 'प्रेमचंद' हें नांव घेतलें व याच टोपण नांवावर हे प्रसिद्धीस आले. प्रथम कांहीं दिवस यांनीं ऊर्दू भाषेंत लिखाण केलें. परंतु नंतरचें यांचें सर्व लिखाण हिंदींतच झालें. 'कृष्णा', 'प्रेमा (विभव)', 'गोदान' यांसारख्या बारा कादंबऱ्या, एकतीस लघुकथा-संग्रह, ३ नाटकें, ३ चरित्रें इतकें विविध प्रकारचें वाङ्मय निर्माण करून यांनीं जनमनाची पकड घेतली. कादंबरी-लिखाणापेक्षांहि लघुकथा-लेखनांत यांचा हातखंडा होता. हिंदु-मुसलमानांचे झगडे, हिंदी शेतकऱ्यांची खालावलेली परिस्थिति, यांसारखे अद्ययावत् विषय लघुकथांच्याद्वारें हाताळून यांनीं चालू समाजपरिस्थितीचें उत्कृष्ट दिग्दर्शन केलें आहे. जपानी, इंग्रजी, यांसारख्या परकीय भाषांतहि यांच्या कथांचीं भाषांतरें झालेलीं आहेत.

**प्रेमानंद** (१७ वें शतक–उत्तरार्ध)—एक गुजराथी ग्रंथकार. हा वडोदें येथील गुजराथी चातुर्वेद मोढ ब्राह्मण होता. सुधन्वा-आख्यान, नलोपाख्यान, रणयज्ञनारायण, श्राद्धविधी, वगैरे ग्रंथ यानें गुजराथींत लिहिले आहेत.

**प्रेमाबाई** (मु. १६५८)—एक मराठी कवयित्री. ही बाई कृष्णभक्त असून 'भक्तिलीलामृता'मध्यें हिचें चरित्र आलें आहे. हिचीं बरींच मराठी पदें व अभंग लोकप्रिय आहेत. 'माझा भरत देखिला काय?' या हिच्या एका पदानेंहि ती लोकप्रिय झाल्याचें दिसून येतें.

**प्रेषित**—(मेसाया). ईश्वरप्रेरित. मेसाया हा ख्रिस्तवाचक हिब्रू भाषेंतील शब्द. याचा अर्थ अभ्यक्त (ॲनॉयंटेड)–पवित्र तेलानें माखलेला–असा होतो. बायबलमध्यें हा शब्द परमेश्वरानें तो तारक पाठविण्याचें वचन दिलें होतें त्याबद्दल म्हणजे येशू ख्रिस्ताबद्दल वापरलेला आहे. येशू ख्रिस्ताच्या वेळचे ज्यू लोक आपल्याला परकीयांच्या जुलुमांतून सोडविण्यास यावयाच्या इहलोकच्या राजाबद्दल हा शब्द वापरीत. पण येशू ख्रिस्त आणि त्याचे शिष्य यांनीं त्यांना, तसें न करतां, त्यांची ही इच्छा सफल करणाऱ्या परमेश्वराबद्दल हें विशेषण लावण्यास शिकविलें.

**प्रेसबर्ग**—(ब्रॅटिस्लाव्हा). युरोप झेकोस्लाव्हाकियामधील एक शहर व डॅन्यूब नदीकांठचें बंदर. इ. स. १५४१ ते १७७४ च्या कालांत हें हंगेरीची राजधानी होतें. हें व्हिएन्नापासून ५० मैलांवर असून लो. सं. १,२५,००० आहे. जुनें नांव प्रेसबर्ग व चालू नाव ब्रॅटिस्लाव्हा. पेट्रोल, तंबाखू व स्थापत्यकर्म यांविषयींचे उद्योगधंदे शहरांत आहेत. लांकूड आणि धान्य यांचा मोठा व्यापार चालतो. येथें एक विद्यापीठ आहे.

**प्रेसबिटेरियन पंथ**—युरोपांतील एक धर्मपंथ. हा ज्यू पंथांतून निघाला. सर्व उपाध्याय सारख्या दर्जाचे असावेत व वडील मंडळीकडे कारभार राहावा हा या नव्या पंथाचा उद्देश होता. या पंथानें स्कॉटलंडांत मूळ धरलें. आज या पंथानुयायांची संख्या सुमारें ६५,००,००० आहे.

**प्रेस्टन**—इंग्लंड, लँकेशायरमधील एक बंदर. हें प्रसिद्ध ऐतिहासिक ठिकाणहि आहे. क्रॉमवेलनें राजपक्षीयांचा येथेंच मोड केला. येथें कापडाच्या गिरण्या, ओतीव कामाचे कारखाने, जहाजें बांधणें, वगैरे अनेक उद्योग आहेत. लो. सं. १,१८,८३९.

**प्रोटॅगोरॅस** (ख्रि. पू. ४८१–४११)—एक ग्रीक तत्त्ववेत्ता व सोफिस्ट संप्रदायाचा आद्य प्रवर्तक. त्याला नास्तिक म्हणून हद्दपार करण्यांत आलें होतें. तो कवि होता. सर्वसाधारण नागरिकत्वाचें व उदार शिक्षण देणें हें सोफिस्ट पंथाचे लोक आपलें कर्तव्य समजत. प्रोटॅगोरॅसनें बरेच ग्रंथ लिहिले होते. पण त्यांपैकीं एकहि उपलब्ध नाहीं.

**प्रोम**—खालच्या ब्रह्मदेशांतील पेगु प्रांताचा एक जिल्हा. क्षे. फ. २,९१५ चौ. मैल. लो. सं. ४,१०,६५१. पर्जन्यमान ४८ इंचपावेतों. मुख्य पीक तांदूळ. शेतीचीं कामें उन्हाळ्यांत होतात. कापसाचें व रेशमाचें कापड विणण्याचें काम सर्वत्र चालतें. निर्गत माल तांदूळ व इमारती लांकूड.

प्रोम शहर–जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें इरावती नदीवर आहे. लो. सं. २८ हजार. रंगूनपासून आगगाडीनें १६१ मैल आहे. १८७४ पासून येथें नगरपालिकेचा कारभार चालला आहे.

**प्लँक, डॉ. मॅक्स** (१८५८– )—हा एक जर्मन पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ असून यानें शक्ति-प्रसरण (रेडिएशन ऑफ एनर्जी) सिद्धांताचा शोध लावला. यास १९१८ मध्यें पदार्थविज्ञानशास्त्रांतलें नोबेल पारितोषिक मिळालें. याच्या सिद्धांतापासूनच पुढें कण(पुंज)वाद (क्वान्टम थिअरी) निघाला.

**प्लुकर, ज्युलिअस** (१८०१–१८६८)—एक जर्मन गणित व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. तो हॅले व बॉन या दोन्ही विद्यापीठात प्रोफेसर होता. बीजगणितांत 'प्लुकर्स इक्वेशन्स' या नांवानें सहा महत्त्वाचीं समीकरणें प्रसिद्ध आहेत. १८४७ सालीं प्लुकरनें आपलें लक्ष गणिताऐवजीं पदार्थविज्ञानशास्त्राकडे वळवलें, परंतु पुन्हां १८८५ सालीं तो गणितशास्त्राकडे वळला, आणि त्यानें रेषाभूमिती(लाइन जॉमेट्री)ची पद्धति शोधून काढली.

**प्लॅटिनम**-एक खनिज धातु. परमाणुभारांक १९५·२३ व द्रवणबिंदु १७७५° शतमान. यांत थोडें लोखंड व इरिडियम, ओस्मियम, ऱ्होडियम, इ. धातू मिसळलेले असतात. याचा रंग रुपेरी असून हा तन्यशील व वर्धनशीलहि आहे. याच्यावर हवेचा व साध्या अम्लांचा कांहीं परिणाम होत नाहीं, तसाच हा लवकर वितळतहि नाहीं. प्राणोज्ज फुंकनळीच्या जाळामध्यें १७५०° शत. उष्णमानात हा वितळतो. नत्र व नत्रहराम्ल हीं याचीं द्रावकें (सॉल्व्हेंट) आहेत. याचे अगदीं बारीक भाग केले असतां ते मोठ्या प्रमाणांत वायू ओढून घेतात व गोठवतात. म्हणून रासायनिक प्रतिक्रियेंत योगवाही (कॅटॅलिटिक एजंट) प्रमाणें याचा उपयोग होतो. रासायनिक प्रयोगशालांतून याचीं उपकरणीं बनवितात. रत्नांना कोंदणें म्हणूनहि हा धातु वापरतात. याचे क्षार कांहीं औद्योगिक धंद्यांतून उपयोजितात.

**प्लुव**—(फ्ल्युओराईन). अणुभारांक १९. हें मूलद्रव्य थोड्या प्रमाणांत पण सर्वत्र सांपडतें; उदा., फ्ल्युओस्पार, क्रिओलाईट, वगैरे खनिजांत तें असतें. त्याच्या प्रखर क्रियाशीलतेमुळें ह्या मूलद्रव्याला स्वतंत्र स्वरूपांत आणणें कठिण आहे. पाणी, कांच, वगैरेस हें सहज विघटित करतें. उज्जबरोबर ह्याचें उदप्लविक (हायड्रोफ्ल्युरिक) अम्ल तयार होतें. ह्याच्या लवणांना प्लविद (फ्ल्युराइड) म्हणतात.

**प्लॅस्टर ऑफ पॅरिस**—हें एक प्रकारचें सीमेंट किंवा लुकण आहे. भाजलेल्या जिप्समपासून हा तयार करतात. पॅरिसजवळ याचा मोठा सांठा असल्यानें 'पॅरिसचा गिलावा' अशा अर्थाचें नांव पडलें. ओतीव कामासाठीं व गिलाव्यासाठीं हा वापरतात. पूड पाण्यांत कालवून लावली म्हणजे लवकर घट्ट होते. शस्त्रक्रियेमध्यें अवयवांचे सांचे करण्यासाठीं व मूर्तिशिल्पांत नक्कल-प्रतिमा करण्यासाठीं याचा फार उपयोग आहे.

**प्लॉटस, टिटस मॅकिअस**(खि. पू. २५४–१८४)—एक प्राचीन रोमन विनोदी नाटककार. तो लहानपणींच रोम शहरीं येऊन राहिला, पण त्याला रोमन नागरिकाचे हक्क पूर्णपणें मिळाले होते कीं नाहीं, तें संशयास्पद आहे. त्यानें प्रथम नाट्यगृहांत नोकरी पत्करली, पण त्याच्याकडे पात्रांना सजविणें, देखावे बदलणें, रंगभूमिविषयक सुतारकाम करणें, यांपैकीं कोणतें काम होतें, हें नक्की माहीत नाहीं. तथापि या नोकरींत त्याला जो पगार मिळाला तो शिल्लक ठेवून नंतर त्यानें स्वतःचा स्वतंत्र धंदा सुरू केला; पण त्यांत त्याला बूड लागून त्याचें सर्व भांडवल नष्ट झालें. त्यामुळें त्यानें एका रोटीवाल्याच्या कारखान्यांत पीठ दळण्याचें काम पत्करलें, आणि नोकरींत असतांनाच तीन नाटकें लिहिलीं, व तीं विकून जो पैसा मिळाला, त्या आधारावर वरील नोकरी सोडून तो नाटकें लिहूं लागला. त्याचीं हल्लीं सुखान्त नाटकें उपलब्ध आहेत. त्यांपैकीं बहुतेक नाटकें उत्कृष्ट आहेत, व त्यामुळें प्लॉटसला त्याच्या हयातींत अतिशय प्रतिष्ठा लाभली. त्याच्या मरणोत्तरच्या काळांत व पुढें विद्यापुनरुज्जीवनाच्या काळांत त्याला एक प्राचीन सर्वश्रेष्ठ नाटककार असा मान मिळाला. सुखान्त नाट्यप्रकारावर त्याच्या नाटकाचा परिणाम अतिशय झाला असून, शेक्सपियर व बेन जॉनसन यांच्या नाटकांत तो परिणाम दिसून येतो. प्लॉटसनें विनोद निर्माण करण्याकरितां गमतीदार प्रसंग, विडंबन, हाजिरजवाबीपणा, बोचक विनोद, कोट्या या सर्व युक्त्यांचा अवलंब केला असून विनोदनिर्मितिक्षेत्रांत प्लॉटस शेक्सपिअरच्या तोडीचा आहे.

**प्लॉटिनस** (२०४–२७०)—नवप्लेटोवाद (निओ-प्लेटॉनिझम) या नांवाच्या तत्त्वज्ञानपंथाचा आद्यप्रवर्तक. तो आमोनिअस सॅकस या तत्त्ववेत्त्याचा शिष्य होय. २४२ सालीं रोमन बादशाहा गार्डियन यानें प्राच्य देशांत केलेल्या स्वारीबरोबर प्लॉटिनस इराणी लोकांच्या व हिंदु लोकांच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याकरितां गेला. तिकडून तो आपल्या वयाच्या ४० व्या वर्षीं परत रोमला आला, व तेथेंच अध्यापन करीत राहिला, व त्यानें आपलीं तत्त्वज्ञानविषयक पुस्तकें—विद्यार्थ्यांकरितां २१ आणि प्रौढांकरितां २४ अशीं लिहिलीं, व शिवाय इतर ९ पुस्तकें लिहिलीं. रोमन बादशाहा गॅलीनस याची प्लॉटिनसवर कृपादृष्टि होती, व बादशहानें प्लॉटिनसला कॅंपिनिया प्रांतांतील दोन उध्वस्त झालेलीं शहरें पुन्हां प्रस्थापित करून तेथें प्लेटोच्या 'रिपब्लिक' या ग्रंथांतल्या कायद्याप्रमाणें व्यवस्था चालवण्याची परवानगी दिली.

प्लॉटिनस हा तत्त्वज्ञानविषयाचा महान् पंडित होता. त्यानें जुन्या ग्रीक तत्त्वज्ञानाचा, तसेंच आयोडियन व एलियॅटिक तत्त्वज्ञानपंथाचा आणि प्लेटो व आरिस्टॉटल आणि इतर तत्त्वज्ञानपंथ यांचा चांगला अभ्यास केला होता. पण त्याला प्लेटोचीं तत्त्वें मान्य होतीं. तथापि प्लेटोच्या आदर्शवादाऐवजीं खिस्ती धर्मांतील ईश्वरवाद व त्याच्याहि पुढें भारतीय तत्त्वज्ञानांतील जीव–शिव ऐक्य या तत्त्वाचा त्यानें पुरस्कार केला.

**प्लायमाउथ**—इंग्लंड, डेव्हनशायरमधलें एक बंदर. लो. सं. सु. दोन लाख. उंचवट्याच्या प्रदेशावर जवळपास किल्ले बांधलेले आहेत. त्यांनीं सर्व बाद्या संरक्षित होतात. प्लायमाउथ सामुद्रधुनीमध्यें एक बेट आहे त्याला तटबंदी केलेली आहे. नाविक कामासाठीं उपयोगी अशा वस्तूंचे येथें कांहीं उद्योगधंदेहि चालतात. मच्छीमारी महत्त्वाची आहे. हें मोठें व्यापारी बंदर आहे व मोठ्या बोटींची बरीच रहदारी असते.

**प्लासी**—पश्चिम बंगाल, नदिया जिल्हा. हा गांव येथें झालेल्या एका निर्णायक लढाईबद्दल प्रसिद्ध आहे. २३ जून १७५७ रोजीं बंगालचा नबाब सुराजउद्दौला याचा पराभव करून क्लाइव्हनें इंग्रजांची सत्ता या देशांत दृढमूल केली.

या लढाईत क्लाइव्हच्या सैन्यांत तीन हजार माणसें होतीं; व त्यांपैकीं १/३ युरोपियन होते व नबाबाचें सैन्य–५०,००० पायदळ व १८,००० घोडेस्वार इतकें होतें, असें कांहीं ठिकाणीं दिलें आहे. तथापि नबाबाचा सेनापति मिरझाफर हा इंग्रजांना फितुर होता; तेव्हां त्याच्यावर विसंबून बलिष्ठ शत्रूला तोंड देण्याचें धाडस क्लाइव्हनें केलें व त्यांत त्याला यश आलें.

**प्लास्टिक**—वस्तु वाटेल तशी वाकवितां किंवा हाताळतां यावी; तिला वाटेल तो आकार देतां यावा; ती पारदर्शक व हलकी असून स्वच्छ आणि सुंदर दिसावी, असें माणसाला वाटणें स्वाभाविकच आहे. हे सर्व गुण प्लास्टिक वस्तूंत आढळतात. रासायनिक संघट्टीभवनानें प्लास्टिक तयार करतात. उष्णता आणि दाब यांमुळें घडण होतांना यावर रासायनिक प्रतिक्रिया घडते. भांडीं, पट्टे, तबकड्या, इ. कित्येक पदार्थ प्लास्टिकचे होऊं लागले व त्याचा खपहि वाढला. तेव्हां आणखी शोध सुरू होऊन आतां प्लास्टिक वस्तूवर धातूचा मुलामा देण्यांत यश मिळालें आहे. या मुलाम्यामुळें प्लास्टिकच्या वस्तू धातूच्या वस्तू-सारख्या वाटतात. एवढेंच नव्हे तर त्यांच्यांत धातुसदृश गुणहि येतात. या प्लास्टिकचे आरसे होतात. तसेंच याचें विमानाचें, विजेचें आणि रेडिओचें सामान करणें फार उपयुक्त ठरतें. हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर प्लास्टिक वस्तू बनविण्याचे कारखाने काढण्याचा सरकार विचार करीत आहे.

**प्लिनी**—१. (थोरला) (इ. स. २३–७९)—एक रोमन ग्रंथकार. याचें सबंध नांव गायस प्लिनिअस सिकंदस. हा प्रसिद्ध रोमन तत्त्वज्ञ व मुत्सद्दी सेनेका याचा समकालीन होता. यानें जर्मनी व स्पेन या देशांत मुख्य अधिकारी म्हणून लष्करी व आरमारी खात्यात नोकरी केली. हा अविश्रांत मेहनती होता. 'त्याच्या वेळचा इतिहास' या ग्रंथाचे एकतीस भाग आणि निसर्गेतिहास (नॅचरल हिस्टरी) हा कला, खोदकाम, चित्रकला, इत्यादि विषयावरच्या निबंधांच्या संग्रहाचा ग्रंथ, वगैरेचें त्यानें अजस्र लेखन केलें व या ३७ ग्रंथाकरितां त्यानें स्वतः २००० पुस्तकांचा अभ्यास केला. इ. स. ७९ मध्यें हरक्युलेनिअम व पॉंपी शहरें नेस्तनाबूद करणाऱ्या व्हेसुविअसच्या स्फोटांत सांपडून हा गुदमरून मेला. हा पहिला युरोपियन ज्ञानकोशकार म्हणतां येईल. कारण 'नॅचरल हिस्टरी' हा त्याचा ग्रंथ ज्ञानकोशस्वरूपाचा आहे.

२. (धाकटा) (इ. स. ६१–११३)—याचें सबंध नांव गायस प्लिनिअस केसिलस सिकंदस. थोरल्या प्लिनीचा हा पुतण्या व दत्तक पुत्र. इ. स. ८० मध्यें हा वकिली करूं लागला, नंतर याला मोठ्या अधिकाराच्या जागा मिळून हा शेवटीं बिथिनियाचा गव्हर्नर झाला. हाहि मोठा लेखक होता. त्याचीं पत्रें, मापणें, वगैरेचे ९।१० भाग आहेत. त्याच्या 'ट्राजनच्या पत्रां'वरून रोमन प्रांतिक कारभाराचें चांगलें ज्ञान होतें.

**प्लीहा**—(स्प्लीन). पानथरी. मनुष्याच्या शरीरामध्यें जी सर्वांत मोठी रक्तग्रंथी अथवा वाहिनीविरहित ग्रंथी असते तिला म्हणतात. हिच्या कार्यामुळें रक्ताचे गुणधर्म बदलतात असें मानण्यांत येतें. ही ग्रंथि मनुष्याच्या शरीरांत पोटाच्या डाव्या बाजूला असून लांबट व सपाट आकाराची सुमारें पांच इंच लांब व तीन इंच रुंद असून तिचें वजन सात औंस असतें. ही तंतुमय पेशींची बनलेली असून जाळीदार असते, व त्या जाळीच्या छिद्रांत प्लीहा वल्क असतो. हा वल्क वाटोळ्या, पांढऱ्या रक्तकणांचा बनलेला असून हे कण लहानमोठे असतात व त्यास प्लीहाचे माल्पिघिअन पदार्थ म्हणतात.

जीर्ण झालेले तांबडे रक्तकण सांठवण्याची पानथरी ही जागा म्हणतां येईल. या ठिकाणीं त्यातील रक्तरंजकद्रव्य (हिमोग्लोबिन), यकृता(लिव्हर)कडे पाठविलें जातें व त्याचें पित्तरंजक द्रव्य बनतें. बऱ्याच रोगांत प्लीहा मोठी होते.

**प्लुटार्क** (इ. स. ४६–१२०)—एक प्राचीन ग्रीक चरित्रकार व संकीर्णलेखक. त्याचें शिक्षण अथेन्स शहरीं झालें व नंतर तो रोम शहरीं राहिला व तेथें कांहीं वर्षें त्यानें तत्त्वज्ञान विषयावर व्याख्यानें दिलीं. प्लुटार्कची कीर्ति त्यानें लिहिलेल्या 'पॅरलल लाइव्हज' (समानधर्मी चरित्रें) या ग्रंथानें अजरामर झाली आहे. या ग्रंथांत त्यानें ग्रीक व रोमन प्रसिद्ध पुरुषांच्या समानगुणी जोड्या निवडून एकंदर ४६ जोड-चरित्रें वर्णिलीं आहेत. विद्यापुनरुज्जीवनाच्या काळांत प्लुटार्कच्या या ग्रंथाचा परिणाम इतर सर्व प्राचीन ग्रीक व रोमन ग्रंथांपेक्षां अधिक झाला; कारण या ग्रंथानें प्राचीन ग्रीक व रोमन थोर पुरुषांची यथातथ्य माहिती आधुनिक विद्वानांना जितकी मिळूं शकते, तितकी माहिती प्लुटार्कपेक्षां अधिक बुद्धिमत्तेच्या पुष्कळशा विद्वानांच्या ग्रंथवाचनानेंहि मिळूं शकत नाहीं. या ग्रंथाचें सर थॉमस नॉर्थकृत इंग्रजी भाषांतरापेक्षां आमिओतचें फ्रेंच भाषांतर अधिक बरोबर व सरस आहे. प्लुटार्कच्या इतर आणखी सुमारें ६० लेखांचा संग्रह 'मोरॅलिआ' या नांवानें प्रसिद्ध आहे.

**प्लुटो**—१. सूर्यमालेंतील आतांपावेतों ज्ञात असणारा सर्वांत दूरचा ग्रह. याच्या अस्तित्वाचा अदमास डॉ. लोवेलनें आधींच

ब्रिटिश साम्राज्य — बादशहा सहावे जॉर्ज यांना राज्याभिषेक (पृ. १७८३)

ब्रिटिश साम्राज्य — बादशाही कुटुंब

(डावीकडून) १ महाराणी एलिझाबेथ २. राजमाता मेरी. ३ सहावे जॉर्ज.

(पुढची ओळ) — १ राजकन्या एलिझाबेथ. २ राजकन्या मार्गारेट (पृ. १७८३)

करून ठेवला होता व त्याप्रमाणें १९३० सालीं याचा नक्की शोध लागला. हा कर्क नक्षत्रपुंजांत असून यांतील द्रव्यांश पृथ्वीच्या ·८३ इतका आहे. सूर्याभोंवतीं हा २४८ वर्षांनीं एकदां प्रदक्षिणा घालतो. याचें घनत्व मंगळाइतकें आहे. हा पृथ्वीपासून सुमारें २,७०,००,००,००० मैल दूर आहे.

२. एक ग्रीक देवता. हा पाताळाचा अधिकारी असून याचें मूळ नांव हेडीस होतें. पाताळांत सर्वत्र अंधकार असतो व मृत जीव तेथें जे जातात ते परत येत नाहींत. प्लुटोजवळ द्वाररक्षक, श्वान सर्बिरस नांवाचा पाताळच्या किल्ल्या घेऊन असतो. हा प्लुटो म्हणजे आपल्याकडील यमच.

**प्लुटोनिक खडक**—आग्नेयशिला. पृष्ठभागापासून पुष्कळ खोल असे जे वज्रतुंड, हरिदाश्म (ग्रीनस्टोन), वगैरे अग्निजन्य व स्फटिकमय खडक घट्ट स्वरूपांत बनलेले आहेत त्यांस प्लुटोनिक खडक असें म्हणतात. अग्निजन्य खडकाचें प्लुटोनिक आणि व्होल्कॅनिक अथवा ज्वालामुखीजन्य, असे दोन मुख्य वर्ग करण्यांत येतात.

**प्लुप स्फटिक**—(फ्ल्युअर स्पार) ($CaF_2$–खप्लु$_2$)—हा खटप्लुपक (प्लुओराइड ऑफ कॅल्शियम) पाषाण अनेक ठिकाणीं विशेषतः इंग्लंडमध्यें डर्बी परगण्यांत आढळतो. याचा एक निळा प्रकार आहे. त्यास 'ब्लू जॉन' म्हणतात. याचे खडबडीत खडे आढळतात. पण घनाकृति स्फटिकहि सांपडतात. हा दगड शुद्ध स्वरूपांत चुनखडीमध्यें किंवा वालुकामय दगडांत (ग्रॅनाइट) सांपडतो. सामान्यतः हा रंगहीन असतो, पण क्वचित् त्यांत एखाद्या रंगाची छटाहि असते. याच्या चऱ्याच प्रकारच्या वस्तू व भूषणें तयार करण्यांत येतात. धातुविद्येमध्यें याचा उपयोग धातु वितळण्याकरितां करण्यांत येतो व त्यापासून प्लुपाम्ल (हायड्रोफ्लुओरिक ॲसिड) मिळतें. याचें विशिष्ट गुरुत्व ३·१४ असतें. हा फारसा कठिण नसतो. याचा काठिण्यांक ४ आहे. यावर ॲपटाइट खनिजानें ओरखडे निघतात.

**प्लुपाम्ल**—(हायड्रो-फ्लुओरिक ॲसिड). एक वर्णहीन व अतिशय तिखट वासाचा वायु. हवेंत सोडल्यास त्याचें धुकें तयार होतें. कातडीवर पडल्यास तेथें फोड येतात. यामुळें कागद, लांकूड, वगैरे सेंद्रिय पदार्थ करपून त्यांचा कोळसा होतो. कांचेवरहि याचा अनिष्ट परिणाम होतो. हा अतिशय विषारी आहे. हा पाण्यांत चांगला मिसळतो. पण वायूप्रमाणें त्याचा द्रिद्रावहि कांचेवर अनिष्ट परिणाम करतो. त्यामुळें हें अम्ल गटापर्चाच्या बाटल्यांत किंवा मेण लावलेल्या बाटल्यांत सांठविलें असतें. हें खटफ्लुरिद (कॅल्शम फ्ल्युराइड) आणि गंधकाम्ल यांपासून तयार करतात. कांचेवर खुणा करण्यासाठीं ह्यांचा उपयोग होतो.

**प्लेग**—हा एक तीव्र स्वरूपाचा संसर्गजन्य रोग असून त्याचे ग्रंथियुक्त व ग्रंथिविरहित असे दोन प्रकार आहेत. हा रोग फार प्राचीन काळापासून आढळतो. युरोपमध्यें सहाव्या शतकापासून सतराव्या शतकापर्यंत याच्या सांथी वरच्चेवर आलेल्या दिसून येतात. यांपैकीं सर्वांत भयंकर अशी सांथ १४ व्या शतकामध्यें आली होती. तीस 'ब्लॅकडेथ' अथवा कृष्णमृत्यु असें म्हणत. सतराव्या शतकांत लंडनमध्यें एका सांथींत ७० हजार लोक मृत्यु पावले. या रोगाचें कारण प्लेगदूषित उंदराच्या अंगावर असलेल्या पिसूंचा दंश हें आतां निश्चित झालें आहे. उंदरास या रोगापासून फार त्वरित बाधा होते. या रोगाचा प्रतिबंध करण्याकरितां उंदरांचा नाश करणें अवश्य असतें. या रोगाच्या वरील दोन प्रकारांपैकीं ग्रंथि-सन्निपात (पाहा) हा विशेष आढळतो व यामध्यें लसिकाग्रंथीसारखी एक ग्रंथि उत्पन्न होते. हिचें पुढें गळूं होऊन रोग त्याच ठिकाणीं राहिल्यास रोगी बहुधा बरा होतो. परंतु रोगानें रक्त दूषित होऊन त्याचा सर्व शरीरभर प्रसार झाल्यास रोगी मृत्यु पावतो. ग्रंथिविरहित अथवा फुप्फुसदाह (पाहा) उत्पन्न करणारा प्लेग फार भयंकर असून त्यामध्यें मृत्यूचें प्रमाण फार मोठें असतें. हा भयंकर संक्रामक आहे. कारण रोग्याच्या प्रत्येक खोकण्याबरोबर लक्षावधि जंतू वातावरणांत पसरत असतात. याची लस टोंचल्यानें या रोगाचा प्रतिबंध होतो.

**प्लेटो** (ख्रि. पू. ४२७–३४७)—एक मोठा ग्रीक तत्त्ववेत्ता. याचें खरें नांव आरिस्टोक्लीज असून हा सॉक्रेटिसचा शिष्य व आरिस्टॉटलचा गुरु होता. राजकारणांत पडण्यास याला वेळच नव्हता. याचें सर्व आयुष्य तत्त्वज्ञानविषयक अभ्यास, चिंतन, लेखन व शिक्षण यांत गेलें व तेंहि एकाच अथेन्स शहरांत. फक्त दोन वेळां तो डायॉनिशिअसच्या आमंत्रणावरून तेथील राज्यघटना तयार करण्यास मदत करण्यासाठीं सिरॅक्यूज येथें गेला होता. त्याचे लेख व ग्रंथ तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र व समाजशास्त्र यांबद्दलचेच आहेत. त्याचा सर्वांत मोठा व महत्त्वाचा ग्रंथ 'रिपब्लिक' (लोकशाही) हा आहे. याचें सर्व लिखाण संवादात्मक स्वरूपाचें असून त्यांतील मुख्य वक्ता मतप्रतिपादक, शिक्षक सॉक्रेटिस हाच आहे. प्लेटोनें आपले सर्व विचार आपला मित्र व गुरु सॉक्रेटिस याच्या मुखानें वर्णन केले आहेत.

नीतिशास्त्राचीं तत्त्वें समाधानकारक रीतीनें पटवून देणारा हा पहिला पाश्चात्य तत्त्वज्ञानी आहे. त्याचें सर्व तत्त्वज्ञान सामाजिक स्वरूपाचें आहे. त्याची 'अॅकॅडमी' व अॅकॅडमिक पंथ यांवर स्वतंत्र लेख दिले आहेत. शिवाय 'नवप्लेटोवाद' पाहा.

**प्लेफेअर, जॉन** ( १७४८–१८१९ )—एक स्कॉटिश सृष्टिशास्त्रज्ञ, भूस्तरशास्त्रज्ञ व गणितशास्त्रज्ञ. त्यानें १८०२ सालीं आपलें पुस्तक 'इलेस्ट्रेशन्स ऑफ दि हुटोनियन थिअरी ऑफ दि अर्थ' ( पृथ्वीच्या हुटोनियन सिद्धांताचीं उदाहरणें ) हें प्रसिद्ध केलें, व पुढील सालीं 'ए बायॉग्राफिकल अकाउंट ऑफ डॉ. जेम्स हुटन,' ( डॉ. हुटन याची चरित्रात्मक माहिती ) प्रसिद्ध केलें. त्याला १८०५ सालीं एडिनबर्ग विद्यापीठांत 'नॅचरल फिलॉसफी'–सृष्टिज्ञानाचा प्रोफेसर नेमलें. त्याचीं भूमितीवर आणखी पुस्तकें आहेत. 'दोन एकमेकींना छेदणाऱ्या रेषा तिसऱ्या एका रेषेला दोन्ही समांतर असूं शकत नाहींत', हा विद्यार्थ्यांना माहीत असलेला सिद्धांत ( थिअरम ) 'प्लेफेअरर्स ॲक्शम्' या नांवानें प्रसिद्ध आहे.

**प्वांकारे, ज्यूल्स हेन्री** ( १८५४–१९१२ )—एक फ्रेंच गणितशास्त्रज्ञ. १८८६ सालीं त्याला सोर्बोन येथें गणित-पदार्थविज्ञानशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यांत आलें; आणि १८९६ सालीं तो खगोलीय यंत्रशास्त्राचा प्रोफेसर झाला. १८९० पासून प्वांकारे ह्याची असामान्य गणितशास्त्रज्ञ अशी कीर्ति पसरली. गणितशास्त्र व गणित-पदार्थविज्ञानशास्त्र यांतील सर्व भागांत त्यानें संशोधन करून नवी भर घातली आहे. शिवाय तत्त्ववेत्ता म्हणूनहि त्यानें नांव मिळविलें. अलीकडे ज्या कांहीं थोड्या गणितशास्त्रज्ञांनीं तत्त्वज्ञान या विषयांत विशेष महत्त्वाची भर घातली आहे, त्यांपैकीं प्वांकारे हा एक आहे.

**प्वांकारे, रेमाँद** ( १८६०–१९३४ )—एक फ्रेंच मुत्सद्दी. हा १९१२, १९२२–२४ व १९२६–२९ या काळांत फ्रान्सचा मुख्य प्रधान होता व १९१३–२० पर्यंत अध्यक्ष होता. हा उत्कृष्ट वक्ता असून यानें आपल्या मुत्सद्देगिरीनें फ्रेंच लोकाचा विश्वास आणि प्रेम हीं संपादन केलीं होतीं. पहिल्या महायुद्धांत यानें राष्ट्राची बहुमोल सेवा केली.

---

## फ

**फ**—या वर्णाच्या चार अवस्था : १. अशोककालीन गिरनार लेखांत; २. इ. स. ५३२ च्या मंदसोर लेखांत; ३. पाली गावच्या दानपत्रांत ( इ. स. ४७७ ); व ४. सियडोणी लेखांत ( इ. स. ९०३ ).

**फकीर**—मुसलमान भिक्षेकरी लोक. विशेष वस्ती संयुक्त प्रांतांत. यांची परंपरा अबूबकर व अली यांजपासून आहे. मुख्य वर्ग दोन : बशारा व बेशारा. याच्यांत कलंदर, हबशी, मौलवी, इ. अनेक पोटसंप्रदाय आहेत. संख्या सुमारें ८ लक्ष. कांहीं फकीर हिंदूहि आहेत व त्यांची संख्या सुमारें दोन लाखांवर आहे. बशारा हे नियमबद्ध व बेशारा हे बेछूट व अनियमबद्ध असतात. यांचा मुख्य सरगुरु असतो. त्याच्या हाताखालीं एक भंडारी ( खजिनदार ) व एक नकीब ( बोलावणेकरी ) असतो.

**फजल-इ-हसन** ( १८७७–१९३६ )—पंजाब प्रांतांतील एक उत्साही शिक्षणतज्ज्ञ, सुधारक व मॉटफर्ड सुधारणांचे पुरस्कर्ते. पंजाब व केंब्रिज विद्यापीठांचे पदवीधर झाल्यावर यांनीं बॅरिस्टरीची परीक्षा दिली व हे पंजाबमध्यें वकिलीचा व्यवसाय करूं लागले. हे पंजाब विद्यापीठाच्या सिनेटचे व सिंडिकेटचे सभासद असतांनाच मॉटफर्ड सुधारणा जाहीर झाल्या. त्यांत यांनीं मनापासून पाठिंबा दिला. पंजाब कायदेमंडळांत पंजाब विद्यापीठाकडून यांनाच पाठवण्यांत आलें व यानंतर पंजाबचे शिक्षणमंत्री, महसूल मंत्री व हिंदुस्थान सरकारचे शिक्षणमंत्री या नात्यांनीं यांनीं महत्त्वाची कामगिरी करून दाखवली.

'हिंदुस्थानला जर जगांतील इतर राष्ट्रांच्या तोडीनें जगावयाचें असेल तर या देशांतील विशेषतः खेड्यांतील अज्ञ जनता सुशिक्षित झाली पाहिजे,' या मूलभूत विचारसरणीवर यांनीं आपल्या शिक्षणविषयक सुधारणांची मांडणी केली व त्या दृष्टीनें उत्साहानें काम करण्यास सुरवात केली. खेड्यांतून पसरलेले जातीयतेचें बीज मुळांसकट उपटून टाकण्यासाठीं यांनीं सर्व जातींच्या विद्यार्थ्यांना खुल्या असणाऱ्या सरकारी शाळा खेड्यांतून सुरु केल्या, खेड्यांतील शिक्षणाची व्यवस्था तेथील ग्रामपंचायतींच्या ताब्यांत दिली, अँग्लो व व्हर्नाक्युलर या दोन शिक्षणक्रमांतील घोटाळे दूर करण्यासाठीं यांनीं हे दोन्ही शिक्षणक्रम एक केले व शिक्षणक्रमांत बागकाम, शेतकाम यांसारख्या खेडेगावांतील लोकांना उपयोगी पडणाऱ्या विषयांचा अंतर्भाव केला.

एक पक्षसंघटक म्हणूनहि यांचें नांव नेहमीं घेतलें जातें. लांबलचक जाहीर व्याख्यानें देण्याच्या भरीस न पडतां, प्रत्येक सभासदाची व्यक्तिशः गांठ घेऊन त्याला आपलें म्हणणें हे पटवीत असत. दुसऱ्याला विश्वासांत घेऊन काम करणें हें यांचें वैशिष्ट्यच यांच्या कार्यसिद्धीचें गमक होतें. सर छोटूराम, सर सिकंदर हयातखान, सर फिरोजखान नून, न्या. मू. शहाबुद्दिन ही सर्व विद्वान् मंडळी यांच्याच परंपरेंतील होत.

**फटके मारणें**—ही शिक्षेची पद्धत जुनी आहे. इंग्लंडांत फटके मारण्याची शिक्षा १८८१ पर्यंत लष्करामध्यें चालू होती. नंतर बंद करण्यांत आली. आरमारांत अद्यापहि ही शिक्षा कायद्यांतून काढून टाकलेली नाहीं. तथापि या शिक्षेची अमलबजावणी करीत नाहींत. स्त्रियांना फटके मारण्याची अजीबात मनाई कायद्यानें केलेली आहे. इतर कायद्यांत वयांत आलेल्या

पुढील गुन्हेगारांना फटक्यांची शिक्षा देण्याचा अधिकार आहे : १. ज्यांची गुन्हे करण्याची प्रवृत्ति नाहींशी होत नाहीं असे अनेक वेळां गुन्हे करणारे बदमाश गुन्हेगार, २. राजावर गोळी झाडणारे गुन्हेगार, ३. हत्यारें घेऊन अत्याचार करून दरोडे घालणारे गुन्हेगार, ४. एखाद्याचा श्वास कोंडण्याचा गुन्हा करणारे गुन्हेगार, ५. अनैतिक स्वरूपाचे गुन्हे करणारे पुरुष गुन्हेगार. हिंदुस्थानांत फटक्यांच्या शिक्षेबद्दलचा स्वतंत्र कायदा आहे. ('शिक्षा' पाहा). गुन्हेगार मुलांना व तुरुंगांतील कैद्यांना ही शिक्षा पूर्वी देण्यांत येत असे. पण रानटीपणाची पद्धत म्हणून आतां बंद करण्यांत आली आहे.

**फड**—मराठेशाहींत राज्याच्या हिशेबाची जी कचेरी—दप्तरखाना तिला फड म्हणत. फडाचा प्रमुख तो फडणवीस किंवा फडणीस. पुण्यास फडाची मोठी कचेरी पूर्वी शनवारवाड्यांत होती. नंतर शुक्रवार पेठेंत गेली. 'फडाचें गेट' ही हल्लींची तिची खूण आहेच. बाळाजी जनार्दन भानू ऊर्फ नाना फडणीस हा इतिहासात प्रसिद्ध फडणीस होऊन गेला. या नाना फडणिसाच्या हाताखालीं फडांत ७०० वर कारकून होते. राज्यांतील प्रत्येक सरदाराचे फडणीस नाना नेमीत असे. प्रत्येक सरदाराचे हिशेब या फडणिसामार्फत पेशव्यांकडे येत, त्यावर नाना फडणिसाची मखलाशी अवश्य असे. राज्यांत जे मोठमोठे मुत्सद्दी होत ते याच फडावरून. हुषार माणसाला आपली हुषारी दाखविण्याचें हें ठिकाण असे. दु. बाजीरावाच्या कारकीर्दींत १५०० कारकून फडावर होते. त्यांची वर्गवारी अशी आढळते :—(१) निसबत हुजूर दप्तर ३००, (२) नि॥ खाजगीवाले १००; (३) नि॥ तोफखाना १००; (४) नि॥ पुणें सुभा १००; (५) नि॥ पागा ६००; (६) नि॥ हशमनीस ५०; (७) नि॥ गाडदी ५०; (८) नि॥ शिलेदार २००.

**फडके, गंगाधरशास्त्री**—इंग्रजी अमलांतील आद्य मराठी व्याकरणकार. यांनीं १८२२ मध्यें पहिलें मराठी व्याकरण लिहिलें. हस्तलिखितावरूनच हें व्याकरण शाळांतून शिकविलें जाई. १८३६ मध्यें हें छापलें गेलें. गंगाधरशास्त्री यांनींच गुजराथी भाषेचींहि बाल व प्रौढ अशीं दोन व्याकरणें लिहिलीं.

**फडके, नारायण सीताराम** (१८९४– )—एक मराठी ललित लेखक व वक्ते. पुणें येथें नूतन मराठी विद्यालय व फर्ग्युसन कॉलेज या संस्थांत यांचें शिक्षण झालें. एम्. ए. झाल्यावर न्यू पूना कॉलेजमध्यें यांची प्राध्यापकाच्या जागेवर नेमणूक झाली. यानंतर असहकारितेची चळवळ सुरू झाली असतां कॉलेजमधील नोकरी सोडून हे केसरी व मराठा या पत्राच्या संपादनांत कांहीं मदत करूं लागले, परंतु थोड्याच अवधींत हें काम सोडून हे दिल्ली, हैद्राबाद (सिंध), नागपूर इत्यादि ठिकाणीं नोकरीसाठीं हिंडून नंतर सन १९२६ मध्यें कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्यें तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र या विषयांचे प्राध्यापक झाले. तेव्हांपासून १९४९ पर्यंत ते तेथेंच कायम होते. 'रत्नाकर,' 'झंकार' यांसारख्या नियतकालिकांचे ते संचालक होते व आहेत.

'दौलत', 'जादूगार', 'अटकेपार' यांसारख्या अनेक कलात्मक कादंबऱ्या व लघुकथा लिहून मराठी ललित वाङ्मयांत यांनीं मोठी व नवीन भर घातली आहे. 'गुजगोष्टी' हा एक नवीन निबंधप्रकार मराठी वाङ्मयांत आणण्याचें श्रेय यांनाच आहे. यांची भाषा खुसखुशीत असून वर्णनशैली सहजसुंदर असते. कथा-कादंबरीलेखनांत यांचें वळण निराळेंच असून तें सध्यां फार लोकप्रिय झालें आहे. 'दादाभाई नौरोजी' हा चरित्रग्रंथ व 'प्रतिभासाधन', 'Sex Problem in India', 'मानसोपचार' यांसारखे शास्त्रीय विषयांवरील ग्रंथहि यांनीं लिहिले आहेत.

**फडके, वासुदेव बळवंत** (१८४५-१८८३)— एक महाराष्ट्रीय बंडखोर देशभक्त. पुणें येथील कोर्ट-कचेरींत हे कारकुनाच्या जागेवर होते. सन १८७६-७७ या कालांत पडलेल्या दारुण दुष्काळांत यांना लोकांचे हाल पाहवेनात. तेव्हां बंडाची कल्पना यांच्या मनांत आली. बऱ्याचशा सुशिक्षित व अशिक्षित अशा लोकांची एक संघटना निर्माण करून व या लोकांना दांडपट्टा

खेळणें, घोड्यावर बसणें, तलवार व बंदुक मारणें, वगैरे लष्करी शिक्षण देऊन यांनीं योग्य संधि येतांच दरोडे घालून भुकेलेल्या लोकांच्या अन्नखर्चासाठीं पैसा जमविण्यास सुरुवात केली. महाराष्ट्राचा बराचसा भाग १८७९ सालीं यांच्या बंडानें व्यापला होता. परंतु शेवटीं यांचा आजारीपणा, अनुयायांची फितुरी, यासारख्या अनेक आपत्ती ओढवल्यामुळें हे ब्रिटिशांच्या हातीं लागले. यांना जन्मठेपेची शिक्षा झाली. तुरुंगांतून हे पळून जाण्याच्या प्रयत्नांत असतां एडन येथें यांना मृत्यु आला. यांच्या जन्मशताब्दीचा उत्सव 'फडके जन्मशताब्दि मंडळ' स्थापून महाराष्ट्रानें साजरा केला. यांच्या चरित्रावर आतां एक चित्रपट तयार झाला आहे.

**फडके, हरि बल्लाळ**—हरिपंत फडके पाहा.

**फडणवीस**—पेशवाईंतील एक अधिकारी. हा फडावरचा मुख्य अधिकारी असे. (फड पाहा.) हा एक दरकदार असून छत्रपतींकडून नेमला जाई. राज्यांतील निरनिराळ्या खात्यांचे हिशेब तपासणें, खतांची नोंदणी ठेवणें, त्यांबाबत हुकूम काढणें, वगैरे फडणिसांचीं कामें असत. फडणवीस यास मुजुमदाराच्या हाताखालीं काम करावें लागे व आपल्या रोजच्या लेखी कामावर त्याचा शेरा घ्यावा लागे. तथापि राज्यांतील सर्व फडणविशी खातें त्याच्याकडे असे. सर्व सरदारांचे सरंजामी हिशेब तोच पाही. पेशवाईमध्यें फडणविशीचें काम भानू घराण्यांत होतें.

**फड्या निवडुंग**—(फणी निवडुंग). [वर्ग–कॅक्टासी, ओपंटिया व्हल्गारिस]. निवडुंग पाहा. हें एक पर्णहीन मांसल झाड असून याला तांबडीं-जांभळीं फळें येतात. तीं कांहीं लोक खातात. याचीं फुलें पिंवळीं व मोटीं असतात. हें झाड मूळचें अमेरिकेंतील उष्ण प्रदेशांतील होय. तेथून त्याचा प्रसार मॉरिशस, अरबस्तान, सीरिया, चीन, इत्यादि देशांत झाला.

हिंदुस्थानांतहि याचा प्रसार झाला होता. परंतु तो अतिशयच होऊन पिकांस नुकसानकारक होऊं लागल्यामुळें यावर कोचिनील किडे आणून टाकण्यांत आले. त्यांनीं हा सर्व खाऊन नाहींसा केला. लहान मुलांच्या खोकल्यावर याचा रस देतात. मूळव्याधीस वाळल्या पानाची धुरी देतात.

**फणस**—[वर्ग–आर्टोकार्पस इंटेग्रिफोलिया, इं. जॅक]. हें हिंदुस्थानांतील प्रसिद्ध फळझाड ताज्या (ओल्या) आठोळ्या लावून तयार होतें. उष्ण व दमट हवा व तांबडी जमीन यांत हें वाढतें. मूळ हिंदुस्थानांतलें, पण अनेक देशांत होतें. हिंदुस्थानांत तर सर्व समुद्रकिनाऱ्यानें आढळतें. याच्या जाती दोन : कापा (कोरडा) व बरका (गिलगिलीत). भाजीचा म्हणून एक जात असते ती निराळीच. लव हेंहि एक फणस वर्गांतलेंच फळझाड आहे.

फणसाच्या मोठ्या झाडाला ५०० पर्यंत फळें धरतात. फणस सर्व तऱ्हेनें फार उपयोगी आहे. हिरव्या फणसाची भाजी करतात. पिकल्यावर गोड गरे खातात. त्यांच्या पोळ्या करतात. आठळ्याहि खाण्याच्या उपयोगी येतात. कोंकणांत गरीब लोक चार महिने फणसावरच निर्वाह करतात. फणसाची वरची साल (चारखंडें) गुरांस घालतात व त्यामुळें दूध पुष्कळ येतें. फणसाचें लाकूड पिंवळें असून सागाच्या खालोखाल टिकाऊ असतें. लांकडाच्या पेट्या, चौरंग, देव्हारे, इ. वस्तू होतात. फणस औषधीहि आहे. आंब्याच्या सालीबरोबर फणसाची साल उगाळून लहान मुलांना संग्रहणी, मोडशी यांवर देतात.

**फणी**—अत्यंत प्राचीन कालापासून केंस विंचरण्याकरितां फण्या वापरण्याची पद्धत आहे प्राचीन ईजिप्ती लोकांमध्यें फण्या वापरीत असल्याचें दिसून येतें. त्या बहुधा लांकडाच्या असून त्यांच्या एका बाजूस पातळ व एका बाजूस घट्ट दांते असत. ग्रीक व रोमन लोकहि लांकडीच फण्या वापरीत. अलीकडे शिंगें, हस्तिदंत व गंधकीकृत रबर यांच्या फण्या तयार करण्यांत येतात व आतां तर प्लॅस्टिक अथवा लुकणाच्या फण्या फार प्रचारांत आल्या आहेत. पूर्वी श्रीमंत स्त्रिया सोन्याच्या, चांदीच्या किंवा कांसवाच्या पाठीच्या फण्या वापरीत असत असें दिसतें.

संस्कृतांत कंकत व प्रसाधनी हे फणीला शब्द आहेत. 'शिशुपालवधां'त कंकत आढळतो. पूर्वी फणीचे दांते करवतीनें कापून करीत व पातळ कानशीनें ते घासून गुळगुळीत करीत. पण त्यामुळें पुष्कळ भाग फुकट जात असे. परंतु अलीकडे ठशाच्या साहाय्यानें उलटसुलट फण्या एकाच वेळीं ठोकून करीत असल्यामुळें दांत्यामधील भाग फुकट जात नाहीं. रबराच्या फण्या सांचांत घालून तयार करण्यांत येतात.

**फत्तेखर्डा**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्हा, मेहकर तालुका, एक गांव. लोकसंख्या सुमारें ४,०००. हें भागावती नदीच्या कांठीं आहे. याचें साखरखेडलें असें जुनें नांव आहे. पहिला निजाम असफजाह यानें येथें १७४२ त माळव्याचा मोंगल सुभेदार मुबारिजखान याचा पराभव केल्यावर हें नांव पडलें. १८०३ मध्यें शिंदे यांनीं गांव लुटला होता. येथील मशीद प्रेक्षणीय आहे. एक लिंगायत मठहि आहे.

**फत्तेखान**—एक मुसलमान सरदार. हा निजामशहाच्या पदरीं असलेल्या मलिकंबराचा पुत्र. हा कर्तृत्ववान् नसल्यानें मलिकंबराच्या पश्चात् निजामशहानें यास कांहीं दिवस जुन्नरला बंदींत ठेवलें होतें. नंतर मोंगलांच्या भयानें त्यास मोकळें करून याजकडे निजामशहानें आपला कारभार सोंपवला. हा शहाजीस अनुकूल असल्यानें शहाजी पुन्हां निजामशाहींत परत आला. पुढें फत्तेखान व शहाजी हे मोंगलांना मिळाले. फत्तेखानाला शहाजहाननें जहागिरी दिली (१६३२). यापूर्वी फत्तेखानानें मूर्तजा निजामास कैद करून त्याचा मुलगा हुसेन यास त्याच्या गादीवर बसवलें. पुढें यास व हुसेनला मोंगलांचा सरदार महाबतखान यानें कैद करून नेलें. नंतर हुसेनचा खून झाला व निजामशाही बुडाली. आदिलशाहींत जो फत्तेखान पुरंदरवर चालून आला होता व ज्याचा शिवाजीनें पराभव केला (१६४९) तो हाच कीं काय, हें निश्चित नाहीं.

**फत्तेगड व कनकदुर्ग**—हे किल्ले सुवर्णदुर्गाच्या समोरांसमोर किनाऱ्यावर बांधलेले आहेत व मध्यें खाडीचा फांटा आहे. हे १७१० मध्यें शाहूनें बांधले असें म्हणतात. परंतु हे

सुवर्णदुर्गाच्याच बळकटीकरितां बांधलेले असावे. जंजिऱ्याचा हबशी खैरातखान यानें सन १७०० मध्यें हे किल्ले बांधले अशीहि एक हकीकत आहे. १७५५ मध्यें कमोडोर जेम्स यानें हे किल्ले घेऊन पेशव्यास दिले. पुढें ते इंग्रजांकडे आले. हल्लीं ते जवळजवळ नामशेष आहेत.

**फत्तेपूर**—१. संयुक्त प्रांत, अहमदाबाद विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ १,६२१ चौ. मैल. जंगल बरेंच आहे. बरीच दलदलहि आहे. पर्जन्यमान ३४ इंच. मोठीं गांवें ५. खेडीं १४०३. लोकसंख्या (१९४१) ८,०६,९४४. भाषा हिंदी. त्यांत पूर्व हिंदी शें. ८३ व पश्चिम हिंदी १७ असें प्रमाण आहे. जमीन अर्धीअधिक सुपीक आहे. १७३६ ते १७५० पावेतों हा प्रदेश मराठ्यांकडे होता. जिल्ह्यांत फत्तेपूर हेंच मोठें गांव असून तें जिल्ह्याचें व तालुक्याचें ठिकाण आहे. लो. सं. २७ हजार.

२. संयुक्त प्रांत, बाराबंकी जिल्हा, एक तहसील व मुख्य ठिकाण. वस्ती १०,०००; येथील इमामगड प्रेक्षणीय आहे.

**फत्तेपूर शिक्री**—संयुक्त प्रांत, आग्रा जिल्हा, किरवली तहसील. हें इतिहासप्रसिद्ध गांव आग्र्यापासून २३ मैलांवर आहे. गांवची लो. सं. सु. ६०००. येथेंच बाबरनें रजपुतांस पराभूत केलें. १५६९ ते १५८४ या काळांत अकबरानें शहर वसविलें. त्या वेळच्या कांहीं इमारती अद्याप आहेत. शिक्री हें अकबराच्या कारकीर्दीचें स्मारकच म्हणतां येईल. शेख सेलीम चिस्ती या प्रसिद्ध साधूची कबर येथें आहे. याच्या कृपेनें अकबरास जोधबाईपासून जो मुलगा झाला तो जहांगीर. या आनंदाचें स्मारक म्हणून बादशहानें हें शहर वसविलें. अबुल फजल, फैजी, बिरबल, जोधबाई, वगैरे अकबराच्या वेळच्या थोर मंडळींचे वाडे येथें दाखवितात. बुलंद दरवाझा, पांचमहाल, जुम्मा मशीद, दिवाण-इ-खास, वगैरे इमारती प्रेक्षणीय आहेत. येथें अबुल फजलनें 'इबादतखाना' नांवाचें जें सर्वधर्ममंदिर उभारलें होतें तें अद्यापि कांहीं उभें आहे. त्यांतील मध्यस्तंभ शिल्पाच्या दृष्टीनें अप्रतिम आहे.

**फत्तेसिंग गायकवाड** (१७७१-९०)—एक मराठा सरदार. दमाजी गायकवाडाचा हा मुलगा. कर्नाटकाच्या स्वारींतील याची कामगिरी पाहून माधवराव पेशव्याची याजवर विशेष मर्जी बसली. सन १७७१ मध्यें माधवरावानें यास 'सेनाकर्ते' हें पद देऊन याचा थोरला भाऊ सयाजी यास याचा मुतालीक म्हणून बडोद्याच्या सरदारकीवर बसवलें. यानें गुजराथेंत राघोबादादाच्याविरुद्ध लढाई दिली. पण पुढें सन १७८० मध्यें गॉडर्ड नांवाच्या इंग्लिश सेनापतीनें यास अडचणींत गांठून कुंदेला या गांवीं तह करण्यास भाग पाडलें. या तहांत फत्तेसिंगास भडोच व सिनोर हे गाव गमवावे लागले. नंतर दादाच्या चिथावणीमुळें यानें आपला भाऊ गोविंदराव याच्याशीं लढाई दिली. परंतु तींत याचाच पराभव झाला. पुढें बारभाईंच्या विरोधकांत हा सामील होता.

**फत्तेहाबाद**—१. पाकिस्तान, पश्चिम पंजाबमध्ये हिस्सार जिल्ह्यांतील तहशिलीचें मुख्य ठिकाण. या ठिकाणीं या गांवाचा संस्थापक फिरोजशहा (१३५२) याची वंशावळ एका स्तंभावर खोदलेली आहे. या तहशिलींत तोहाण व अंग्रोह येथें प्राचीन अवशेष आढळतात. उत्तर भागांत घग्गर नदी वाहते.

२. भारत, संयुक्त प्रांत. आग्रा जिल्ह्यांतहि या नांवाची एक तहशील व गांव आहे.

**फॅरॅड**—(विद्युत् संचयांश). विद्युत्चुंबकशास्त्रांतील निरनिराळ्या प्रमाणांपैकीं विद्युच्छक्तिधारणाच्या मूलमानास फॅराड हें नांव देण्यांत येतें. मिचेल फॅराडे याच्या नांवावरून ही संज्ञा निघाली. जेव्हां एखाद्या विद्युद्वाहक पदार्थाचें अथवा विद्युत्संचायकाचें विद्युच्छक्तिधारणेचें प्रमाण १ कुलंब विद्युच्छक्तीचा पुरवठा करून एक व्होल्टपर्यंत वाढविण्यांत येतें तेव्हां त्या धारकशक्तीस एक फॅराड असें म्हणतात. पण हें प्रमाण फार मोठें असल्यानें प्रत्यक्ष व्यवहारांत याच्या सूक्ष्म अंशाचा उपयोग करण्यांत येतो.

**फॅरॅडे, मिचेल** (१७९१-१८६७)—एक फार मोठा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. लहानपणीं तो लंडन शहरांत एका बुकबाइंडरच्या दुकानांत नोकर होता. पण ती नोकरी सांभाळून तो आपल्या फावल्या वेळांत विजेसंबंधीं व इतर शास्त्रीय प्रयोग करून पाहत असे. पुढे त्यानें सर हंफ्रे डेव्ही याच्या हाताखालीं रॉयल इन्स्टिटयूटमध्यें नोकरी केली. नंतर १८२९ सालीं तो वुलविच येथें रॉयल मिलिटरी अॅकेडमीमध्यें शिक्षकाचें काम करूं लागला. १८३३ सालीं रॉयल इन्स्टिटयूटमध्यें त्याला रसायनशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यात आलें व तेथेंच त्यानें विजेसंबंधाचे आपले फार महत्त्वाचे शोध लावले. शास्त्रीय प्रयोग बिनचूक करण्यांत फॅराडे तत्कालीन विद्वानांत अग्रगण्य मानला जात असे. शास्त्रीय व्याख्यानें देण्यांतहि तो अतिशय निष्णात बनल्यामुळें रॉयल इन्स्टिटयूटमध्यें दर शुक्रवारीं होणाऱ्या शास्त्रीय विषयावरील जाहीर व्याख्यानाला लोकांची फार गर्दी जमत असे. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते : विद्युत् आणि चुंबकत्व, विद्युतांतील शोध, अधातु मूलद्रव्यें, मेणबत्तीचा रासायनिक इतिहास, इ. आहेत.

**फरसबी**—[फॅसिओलस व्हलगारिस. फ्रेंच बीन्स]. हा एक वेल असून याच्या शेंगांस फ्रेंचबीन किंवा फरसबी अथवा श्रावण घेवडा म्हणतात. फ्रान्समध्यें यास हॅरिकॉट म्हणतात. याची लागवड पृथ्वीवर सर्वत्र करण्यांत येते. हा वेढणाऱ्या

**फडणवीस**—पेशवाईतील एक अधिकारी. हा फडावरचा मुख्य अधिकारी असे. (फड पाहा.) हा एक दरकदार असून छत्रपतीकडून नेमला जाई. राज्यांतील निरानिराळ्या खात्यांचे हिशेब तपासणें, खर्तांची नोंदणी ठेवणें, त्यांबाबत हुकूम काढणें, वगैरे फडणिसांची कामें असत. फडणवीस यास मुजुमदाराच्या हाताखालीं काम करावें लागे व आपल्या रोजच्या लेखी कामावर त्याचा शेरा घ्यावा लागे. तथापि राज्यांतील सर्व फडणविशी खातें त्याच्याकडे असे. सर्व सरदारांचे सरंजामी हिशेब तोच पाही. पेशवाईमध्यें फडणविशीचें काम भानू घराण्यांत होतें.

**फड्या निवडुंग**—(फणी निवडुंग). [वर्ग–कॅक्टासी, ओपंटिया व्हल्गारिस]. निवडुंग पाहा. हें एक पर्णहीन मांसल झाड असून याला तांबडीं-जांभळीं फळें येतात. तीं कांहीं लोक खातात. याचीं फुलें पिंवळीं व मोठीं असतात. हें झाड मूळचें अमेरिकेंतील उष्ण प्रदेशातील होय. तेथून त्याचा प्रसार मॉरिशस, अरबस्तान, सीरिया, चीन, इत्यादि देशांत झाला.

हिंदुस्थानांतहि याचा प्रसार झाला होता. परंतु तो अतिशयच होऊन पिकांस नुकसानकारक होऊं लागल्यामुळें यावर कोचिनील किडे आणून टाकण्यांत आले. त्यांनीं हा सर्व खाऊन नाहींसा केला. लहान मुलांच्या खोकल्यावर याचा रस देतात. मूळव्याधीस वाळल्या पानाची धुरी देतात.

**फणस**—[वर्ग–आर्टोकार्पस इंटेग्रिफोलिया, इं. जॅक]. हें हिंदुस्थानांतील प्रसिद्ध फळझाड ताज्या (ओल्या) आठोळ्या लावून तयार होतें. उष्ण व दमट हवा व तांबडी जमीन यांत हें वाढतें. मूळ हिंदुस्थानांतलें, पण अनेक देशांत होतें. हिंदुस्थानांत तर सर्व समुद्रकिनाऱ्यानें आढळतें. याच्या जाती दोन : कापा (कोरडा) व बरका (गिलगिलीत). भाजीचा म्हणून एक जात असते ती निराळीच. लव हेंहि एक फणस वर्गांतलेंच फळझाड आहे.

फणसाच्या मोठ्या झाडाला ५०० पर्यंत फळें धरतात. फणस सर्व तऱ्हेनें फार उपयोगी आहे. हिरव्या फणसाची भाजी करतात. पिकल्यावर गोड गरे खातात. त्यांच्या पोळ्या करतात. आठळ्याहि खाण्याच्या उपयोगी येतात. कोंकणांत गरीब लोक चार महिने फणसावरच निर्वाह करतात. फणसाची वरची साल (चारखंडें) गुरांस घालतात व त्यामुळें दूध पुष्कळ येतें. फणसाचें लाकूड पिंवळें असून सागाच्या खालोखाल टिकाऊ असतें. लांकडाच्या पेट्या, चौरंग, देव्हारे, इ. वस्तू होतात. फणस औषधीहि आहे. आंब्याच्या सालीबरोबर फणसाची साल उगाळून लहान मुलांना संग्रहणी, मोडशी यांवर देतात.

**फणी**—अत्यंत प्राचीन कालापासून केंस विंचरण्याकरितां फण्या वापरण्याची पद्धत आहे. प्राचीन ईजिप्ती लोकांमध्यें फण्या वापरीत असल्याचें दिसून येतें. त्या बहुधा लांकडाच्या असून त्यांच्या एका बाजूस पातळ व एका बाजूस घट्ट दांते असत. ग्रीक व रोमन लोकहि लांकडीच फण्या वापरीत. अलीकडे शिंगें, हस्तिदंत व गंधकीकृत रबर यांच्या फण्या तयार करण्यांत येतात व आता तर प्लॅस्टिक अथवा लुकणाच्या फण्या फार प्रचारांत आल्या आहेत. पूर्वी श्रीमंत स्त्रिया सोन्याच्या, चांदीच्या किंवा कांसवाच्या पाठीच्या फण्या वापरीत असत असें दिसतें.

संस्कृतांत कंकत व प्रसाधनी हे फणीला शब्द आहेत. 'शिशुपालवधां'त कंकत आढळतो. पूर्वी फणीचे दांते करवतीनें कापून करीत व पातळ कानशीनें ते घासून गुळगुळीत करीत. पण त्यामुळें पुष्कळ भाग फुकट जात असे. परंतु अलीकडे ठशाच्या साहाय्यानें उलटसुलट फण्या एकाच वेळीं ठोकून करीत असल्यामुळें दांत्यामधील भाग फुकट जात नाहीं. रबराच्या फण्या सांचांत घालून तयार करण्यांत येतात.

**फत्तेखर्डा**—वऱ्हाड, बुलढाणा जिल्हा, मेहकर तालुका, एक गांव. लोकसंख्या सुमारें ४,०००. हें भागावती नदीच्या कांठीं आहे. याचें साखरखेडलें असें जुनें नांव आहे. पहिला निजाम असफजाह यानें येथें १७४२ त माळव्याचा मोंगल सुभेदार मुबारिजखान याचा पराभव केल्यावर हें नांव पडलें. १८०३ मध्यें शिंदे यांनीं गांव लुटला होता. येथील मशीद प्रेक्षणीय आहे. एक लिंगायत मठहि आहे.

**फत्तेखान**—एक मुसलमान सरदार. हा निजामशहाच्या पदरीं असलेल्या मलिकंबराचा पुत्र. हा कर्तृत्ववान् नसल्यानें मलिकंबराच्या पश्चात् निजामशहानें यास कांहीं दिवस जुन्नरला बंदींत ठेवलें होतें. नंतर मोंगलांच्या भयानें त्यास मोकळें करून याजकडे निजामशहानें आपला कारभार सोंपवला. हा शहाजीस अनुकूल असल्यानें शहाजी पुन्हां निजामशाहींत परत आला. पुढें फत्तेखान व शहाजी हे मोंगलांना मिळाले. फत्तेखानाला शहाजहाननें जहागिरी दिली (१६३२). यापूर्वी फत्तेखानानें मूर्तजा निजामास कैद करून त्याचा मुलगा हुसेन यास त्याच्या गादीवर बसवलें. पुढें यास व हुसेनला मोंगलांचा सरदार महाबतखान यानें कैद करून नेलें. नंतर हुसेनचा खून झाला व निजामशाही बुडाली. आदिलशाहींत जो फत्तेखान पुरंदरवर चालून आला होता व ज्याचा शिवाजीनें पराभव केला (१६४९) तो हाच कीं काय, हें निश्चित नाहीं.

**फत्तेगड व कनकदुर्ग**—हे किल्ले सुवर्णदुर्गाच्या समोरांसमोर किनाऱ्यावर बांधलेले आहेत व मध्यें खाडीचा फांटा आहे. हे १७१० मध्यें शाहूनें बांधले असें म्हणतात. परंतु हे

सुवर्णदुर्गाच्याच वळकटीकरितां बांधलेले असावे. जंजिऱ्याचा हबशी खैरातखान यानें सन १७०० मध्यें हे किल्ले बांधले अशीहि एक हकीकत आहे. १७५५ मध्यें कमोडोर जेम्स यानें हे किल्ले घेऊन पेशव्यास दिले. पुढें ते इंग्रजांकडे आले. हल्लीं ते जवळजवळ नामशेष आहेत.

**फत्तेपूर**—१. संयुक्त प्रांत, अहमदाबाद विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ १,६२१ चौ. मैल. जंगल बरेंच आहे. बरीच दलदलहि आहे. पर्जन्यमान ३४ इंच. मोठीं गांवें ५. खेडीं १४०३. लोकसंख्या (१९४१) ८,०६,९४४. भाषा हिंदी. त्यांत पूर्व हिंदी शें. ८३ व पश्चिम हिंदी १७ असें प्रमाण आहे. जमीन अर्धीअधिक सुपीक आहे. १७३६ ते १७५० पावेतों हा प्रदेश मराठ्यांकडे होता. जिल्ह्यांत फत्तेपूर हेंच मोठें गांव असून तें जिल्ह्याचें व तालुक्याचें ठिकाण आहे. लो. सं. २७ हजार.

२. संयुक्त प्रांत, बाराबंकी जिल्हा, एक तहसील व मुख्य ठिकाण. वस्ती १०,०००. येथील इमामगड प्रेक्षणीय आहे.

**फत्तेपूर शिक्री**—संयुक्त प्रांत, आग्रा जिल्हा, किरवली तहसील. हे इतिहासप्रसिद्ध गांव आग्र्यापासून २३ मैलांवर आहे. गांवची लो. सं. सु. ६०००. येथेंच बाबरनें रजपुतांस पराभूत केलें. १५६९ ते १५८४ या काळांत अकबरानें शहर वसविलें. त्या वेळच्या कांहीं इमारती अद्याप आहेत. शिक्री हें अकबराच्या कारकीर्दीचें स्मारकच म्हणतां येईल. शेख सेलीम चिस्ती या प्रसिद्ध साधूची कबर येथें आहे. याच्या कृपेनें अकबरास जोधबाईपासून जो मुलगा झाला तो जहांगीर. या आनंदाचें स्मारक म्हणून बादशहानें हें शहर वसविलें. अबुल फजल, फैजी, बिरबल, जोधबाई, वगैरे अकबराच्या वेळच्या थोर मंडळींचे वाडे येथें दाखवितात. बुलंद दरवाजा, पांचमहाल, जुम्मा मशीद, दिवाण-इ-खास, वगैरे इमारती प्रेक्षणीय आहेत. येथें अबुल फजलनें 'इबादतखाना' नांवाचें जें सर्वधर्ममंदिर उभारलें होतें तें अद्यापि कांहीं उभें आहे. त्यांतील मध्यस्तंभ शिल्पाच्या दृष्टीनें अप्रतिम आहे.

**फत्तेसिंग गायकवाड** (१७७१–९०)—एक मराठा सरदार. दमाजी गायकवाडाचा हा मुलगा. कर्नाटकाच्या स्वारींतील याची कामगिरी पाहून माधवराव पेशव्याची याजवर विशेष मर्जी बसली. सन १७७१ मध्यें माधवरावानें यास 'सेनाकर्ते' हें पद देऊन याचा थोरला भाऊ सयाजी यास याचा मुतालीक म्हणून बडोद्याच्या सरदारकीवर बसवलें. यानें गुजराथेंत राघोबादादाच्याविरुद्ध लढाई दिली. पण पुढें सन १७८० मध्यें गॉडर्ड नांवाच्या इंग्लिश सेनापतीनें यास अडचणींत गांठून कुंदेला या गांवीं तह करण्यास भाग पाडलें. या तहांत फत्तेसिंगास भडोच व सिनोर हे गाव गमवावे लागले. नंतर दादाच्या चिथावणीमुळें यानें आपला भाऊ गोविंदराव याच्याशीं लढाई दिली. परंतु तींत याचाच पराभव झाला. पुढें बारभाईंच्या विरोधकांत हा सामील होता.

**फत्तेहाबाद**—१. पाकिस्तान, पश्चिम पंजाबमध्यें हिस्सार जिल्ह्यांतील तहशिलीचें मुख्य ठिकाण. या ठिकाणीं या गांवाचा संस्थापक फिरोजशहा (१३५२) याची वंशावळ एका स्तंभावर खोदलेली आहे. या तहशिलींत तोहाण व अंग्रोह येथें प्राचीन अवशेष आढळतात. उत्तर भागांत घग्गर नदी वाहते.

२. भारत, संयुक्त प्रांत. आग्रा जिल्ह्यांतहि या नांवाची एक तहसील व गांव आहे.

**फॅरॅड**—(विद्युत् संचयांश). विद्युत्चुंबकशास्त्रांतील निरनिराळ्या प्रमाणांपैकीं विद्युच्छक्तिधारणाच्या मूलमानास फॅराड हें नांव देण्यांत येतें. मिचेल फॅराडे याच्या नांवावरून ही संज्ञा निघाली. जेव्हां एखाद्या विद्युद्ग्राहक पदार्थाचें अथवा विद्युत्संचायकाचें विद्युच्छक्तिधारणेचें प्रमाण १ कुलंब विद्युच्छक्तीचा पुरवठा करून एक व्होल्टपर्यंत वाढविण्यांत येतें तेव्हां त्या धारकशक्तीस एक फॅराड असें म्हणतात. पण हें प्रमाण फार मोठें असल्यानें प्रत्यक्ष व्यवहारांत याच्या सूक्ष्म अंशाचा उपयोग करण्यांत येतो.

**फॅरॅडे, मिचेल** (१७९१–१८६७)—एक फार मोठा इंग्रज रसायनशास्त्रज्ञ व पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. लहानपणीं तो लंडन शहरांत एका बुकबाइंडरच्या दुकानांत नोकर होता. पण ती नोकरी सांभाळून तो आपल्या फावल्या वेळांत विजेसंबंधीं व इतर शास्त्रीय प्रयोग करून पाहत असे. पुढें त्यानें सर हंफ्रे डेव्ही याच्या हाताखालीं रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें नोकरी केली. नंतर १८२९ सालीं तो वुलविच येथें रॉयल मिलिटरी ॲकेडमीमध्यें शिक्षकाचें काम करूं लागला. १८३३ सालीं रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें त्याला रसायनशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यात आलें व तेथेंच त्यानें विजेसंबंधाचे आपले फार महत्त्वाचे शोध लावले. शास्त्रीय प्रयोग बिनचूक करण्यांत फॅराडे तत्कालीन विद्वानांत अग्रगण्य मानला जात असे. शास्त्रीय व्याख्यानें देण्यांतहि तो अतिशय निष्णात बनल्यामुळें रॉयल इन्स्टिट्यूटमध्यें दर शुक्रवारीं होणाऱ्या शास्त्रीय विषयावरील जाहीर व्याख्यानाला लोकांची फार गर्दी जमत असे. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते: विद्युत् आणि चुंबकत्व, विद्युतांतील शोध, अधातु मूलद्रव्यें, मेणबत्तीचा रासायनिक इतिहास, इ. आहेत.

**फरसबी**—[फॅसिओलस व्हलगारिस. फ्रेंच बीन्स]. हा एक वेल असून याच्या शेंगांस फ्रेंचबीन किंवा फरसबी अथवा श्रावण घेवडा म्हणतात. फ्रान्समध्यें यास हॅरिकॉट म्हणतात. याची लागवड पृथ्वीवर सर्वत्र करण्यांत येते. हा वेढणाऱ्या

वेलाच्या एकवर्षायु जातीचा असून याचीं पानें एकाआड एक येतात व तीं त्रिदलयुक्त असतात व त्यांवर बारीक लव असते. याचीं फुलें पांढरट असतात. बिया मूत्राशयासारख्या असतात म्हणून इंग्रजींत 'किडने बीन्स' असेंहि नांव आहे. याच्या अनेक जाती लागवडींत आणलेल्या आहेत.

**फरारी होणें**—( डेझर्शन ). लष्करी कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, एखाद्या सैनिकानें किंवा अधिकाऱ्यानें बादशहाच्या लष्करी नोकरींतून स्वतः गैरहजर राहणें. ही गैरहजेरी लबाडीनें न कळवितां झाली असेल तेव्हां तो मोठा गुन्हा मानण्यात येतो. या गुन्ह्याचे 'आर्मी ॲक्टा'मध्यें दोन प्रकार केले आहेत : १ प्रत्यक्ष लढाई चालू असतां त्या नोकरीसंबंधाचा हुकूम मोडून फरारी होणें; २ शांततेच्या काळांत लष्करांतून फरारी होणें. पहिल्या प्रकारचा गुन्हा फार मोठा असून त्याला मरणाची कमाल शिक्षा सांगितलेली आहे आणि दुसऱ्या प्रकारच्या गुन्हयाला साधी किंवा सक्त मजुरीची शिक्षा सांगितलेली आहे. शिवाय असा गुन्हा करणाऱ्या सैनिकाचा पूर्वी झालेल्या नोकरीबद्दलचा हक्क नष्ट करण्यांत येतो.

हिंदुस्थानांत लष्कर, आरमार व वैमानिकदल यांतील लष्करी अधिकारी, सैनिक, नाविक किंवा वैमानिक लष्करी नोकरीवर परत न येण्याच्या हेतूनें गैरहजर राहिला, तर हा डेझर्शनचा गुन्हा होतो ( आर्मी ॲक्ट, १९२१ चा इंडियन आर्मी ॲक्ट आणि एअरफोर्स ॲक्ट ) आणि या गुन्हयाला त्या लष्करी कायद्यांत शिक्षा सांगितली आहे. शिवाय 'दि ऑक्झिलियरी फोर्स ॲक्ट' ( १९२० ) यांत अशा गुन्ह्येगाराला म्हणजे लष्करी नोकरी करण्याचें नाकारणाऱ्या इसमाला डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें किंवा चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनें लष्करी अधिकाऱ्याकडून तसा अर्ज आल्यास पकडून लष्करी अधिकाऱ्याच्या ताब्यांत द्यावा असें कलम आहे (कलम २२). अशा फरारी इसमाला फरारी होण्यास मदत करील त्याला दोन वर्षें कैद किंवा दंड, किंवा दोन्ही शिक्षा सांगितल्या आहेत ( इंडियन पीनल कोड कलम१३५ ).

**फॅरिंग्टन, इ. एफ्.** (१८४७–१८८५)—एक होमीओपाथी डॉक्टर. अमेरिकेंतील लॉंग आयलंडमध्यें ह्यांचा जन्म झाला. हे तैलबुद्धीचे होते. त्वरित ग्रहण, उत्कृष्ट स्मरण, मनःपूर्वक अभ्यास, जबाबदारीची जाणीव, मनाची धार्मिक ठेवण, हे त्यांचे प्रमुख गुण होत. "चांगली गोष्ट चांगली म्हणूनच करावयाची, फळाकडे लक्ष द्यावयाचें नाहीं" हें त्यांच्या जीवनाचें मुख्य सूत्र होतें. त्यांची विश्लेषणशक्ति अपवादात्मक रीतीनें श्रेष्ठ, आणि मनाची ठेवण अत्यंत शास्त्रीय होती. त्यामुळें कोणताहि सिद्धांत अथवा मत ते पटल्याशिवाय मानीत नसत. हानेमान मेडिकल कॉलेजात न्यायवैद्यक, विकृतिविज्ञान व निदान, आणि औषधिगुणधर्मशास्त्र ह्या विषयांचे ते प्राध्यापक होते. शिकवितांना ते विद्यार्थ्यांमध्यें नवचैतन्य निर्माण करीत असत. ते एक उदारचरित अमेरिकन होते. त्यामुळें ते प्रतिपक्षीयांच्या आदरासहि नेहमीं पात्र होत असत. 'क्लिनिकल मटीरिया मेडिका' हा त्यांचा ग्रंथ होमिओपाथिक वाङ्मयांतील एक पहिल्या प्रतीचा व निर्विवाद असा प्रमाणग्रंथ मानला जातो. होमिओपाथीवर त्यांची निःसीम भक्ति असल्यामुळें इतर प्रकारचीं औषधें द्यावयाचीं नाहींत असा त्यांचा निर्धार होता.

**फॅरिसी**—एक धर्मपंथ. येशू ख्रिस्ताच्या काळीं ज्यू लोकांतील एका धार्मिक संघाला हें नांव होतें व या लोकांचें इतर ज्यू लोकांवर फार वजन वाढलें होतें. मॅकेबियन बंडाच्या वेळीं या फॅरिसी लोकांचें विशिष्ट मंडळ बनलें. ख्रिस्ताच्या हयातींत राजकीय आणि धार्मिक बाबतींत राष्ट्रीय मंडळ असें स्वरूप यांना प्राप्त झालें; व ते सॅड्युसी यांचे विरोधक बनले. या मंडळाचें मुख्य तत्त्व असें होतें कीं, जुन्या लेखी धार्मिक कायद्याला स्पष्टीकरणार्थ व पूरीकरणार्थ तोंडी कायद्याची पुरवणी देणें आवश्यक असतें, व तशा तोंडी कायद्याचें अस्तित्व मानणें भाग आहे. मोझेसनंतर अशा तोंडी कायद्याची झालेली वाढ फॅरिसी लोकांनीं मान्य केली, इतकेंच नव्हे तर लेखी कायद्यापेक्षांहि अशा तोंडी कायद्याला त्यांनीं अधिक महत्त्व दिलें.

मरणोत्तर जीवन व ख्रिस्ताचें पुनरुत्थान यांवर फॅरिसी लोकांचा विश्वास असे. तालमुद या पवित्र ज्यू ग्रंथांतील नियम यांनीं केलेले आहेत. गामालिएल आणि सॉल हे या पंथांतील होत.

**फरीदकोट संस्थान**—पूर्व पंजाब. संस्थानचें क्षेत्रफळ ६३८ चौ. मै.. लोकसंख्या ( १९४१ ) १,९९,२८३. हें अकबराच्या वेळीं भल्लण जाट यानें स्थापन केलें. अकबराच्या दरबारीं त्याचें वजन होतें. पुढें इंग्रजांना वेळोवेळीं बरीच मदत या संस्थानाकडून होत गेली. १८७४ मध्यें विक्रमसिंह गादीवर आल्यावर त्यानें राज्यांत बरीच सुधारणा घडवून आणली. भल्लण जाट याच्या भावानें पतियाळा, नाभा व झिंद, येथील राजघराणीं स्थापलीं. या सर्वांना 'ब्रारजाट शीख' असें म्हणतात. वास्तविक हे सर्व मूळचे जेसलमीरचे रजपूत आहेत. संस्थानचें उत्पन्न सु. सत्तावीस लाख रु. आहे. सध्यांचे राजे हरिंदरसिंग हे १९१८ सालीं तीन वर्षांचे असतांना गादीवर बसले. आतां हें संस्थान पतियाळा–पूर्व पंजाब संघांत सामील झालें आहे.

फरिदकोट गांवचा किल्ला ७०० वर्षांपूर्वी रजपुतांनीं बांधला. येथें फरीदकोटचा संस्थानिक राहतो. गांवची वस्ती दहा हजार.

**फरीदपूर**—पाकिस्तान, पूर्व बंगाल, डाक्का विभागांतील एक जिल्हा. जिल्ह्याचें क्षे. फ. २,८२१ चौ. मै. जमीन पाणथळ,

पाऊस ६६ इंच. पुरांच्या योगानें पाणथळ जमिनी भरून येतात. हा भाग पूर्वी वंग राज्यांत मोडत असे. जहांगीरच्या कारकीर्दींत कांहीं हिंदु संस्थानिकांनीं या भागांत स्वतंत्र राज्यें स्थापन केलीं होतीं. १८११ पासून हा जिल्हा वेगळा काढण्यांत आला. लोकसंख्या (१९४१) २८,८८,८०३. भाषा बंगाली उर्दू आहे. शेंकडा ६२ लोक मुसलमान, व शेंकडा ७७ शेतकरी आहेत. मुख्य पीक तांदूळ व त्याच्या खालोखाल ताग. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण फरीदपूरच आहे. लो. सं. पंधरा हजार. येथें प्रख्यात साधु फरीदशहा याचा दर्गा आहे.

**फरुकी राजे**—इ. स. १३७० ते १६०० पर्यंत खानदेशावर या तुर्की राजांचा अमल होता. मूळ पुरुष मलिक हा खलीफ उमर फरुकचा एक वंशज होय. त्याला फेरोझ तुघ्लखानें एका शिकारीच्या प्रसंगीं आपला प्राण वांचविल्याबद्दल थाळनेर आणि करवंद हे दोन परगणे जहागीर दिले होते. मलिक यानें हळूहळू बराच मुलूख काबीज केला व स्वतंत्र राजा म्हणून तो कारभार करूं लागला. त्याच्यामागें त्याचा मुलगा नाझीर हा गादीवर आला. त्याच्या मागून एकूण दहा पुरुषांनीं खानदेशावर स्वामित्व गाजविलें. शेवटचा पुरुष बहादरखान याला अकबरानें जिंकून कैदेंत टाकलें व खानदेश खालसा केलें. त्या वेळीं खानदेश भरभराटलेला होता. लांबी ७० कोस व रुंदी ५० कोस एवढा त्याचा विस्तार होता. ३२ महाल होते. मोठमोठ्या बाजारपेठा होत्या व एकंदर वसूल ३०।३१ लाखांचा होता.

**फरुखाबाद**—संयुक्त प्रांत, अलाहाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १६४१ व लो. सं. ९,५५,३७७. याचा उत्तर भाग पूर्वी पांचाल राज्यांत समाविष्ट होता. महाभारतांत उल्लेखिलेलीं कांहीं स्थानें येथें अद्यापिहि आढळतात. या जिल्ह्यांत पुष्कळ ठिकाणीं बौद्ध अवशेषहि आढळतात. प्राचीन कान्यकुब्ज अथवा कनोज शहर याच भागांत आहे. महंमद बंगश यानें फरुकशियर याच्या नावानें हें शहर वसविलें व तें त्याच्या जहागीरींत मोडत असे. त्याचा मुलगा कायमखान हा बदौनजवळ मारला गेला (१७४९). त्याचा भाऊ अहमद यानें नवलराय या सुभेदारास मारून बराच मुलूख बळकावला. सफदरजंगानें मदतीस बोलाविलेल्या मराठ्यांनीं यास फत्तेगडात कोंडलें, तेव्हां अर्धा मुलूख मराठ्यांस देऊन यानें आपली सुटका करून घेतली (१७५२). पुढें अहमदशहा अबदालीस मदत करून यानें पुन्हां बराच प्रांत मिळविला. पण पुढें १७७१ त तो सर्व मराठ्यांनीं परत घेतला. यास अहमदखान बंगश लंगडा म्हणत. याच्या पश्चात् याचे वंशज अयोध्येच्या नबाबाचे मांडलिक बनले. फरुखाबाद हें जिल्हा व तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. याच्याजवळच फत्तेगड असून एकाच म्युनिसिपालिटींत आहे. लोकसंख्या सुमारें साठ हजार. शहराभोंवतीं जुना तट आहे. उत्तरेकडील उंचवट्यावर पूर्वी नबाबाचा वाडा होता.

**फर्क्युहर, जॉर्ज** (१६७७–१७०७)—एक आयरिश नाटककार. त्यानें सुखान्त नाटकें लिहिलीं तीं म्हणजे 'लव्ह ॲन्ड ए बॉटल' (प्रेम आणि बाटली), 'दि कॉन्स्टन्ट कपल' (निरंतर जोडी), 'सर हॅरी विल्डेर', 'दि रिक्रूटिंग ऑफिसर' आणि 'दि बो स्ट्रॅटेजम्' हीं होत. हें शेवटलें नाटक त्यानें अगदीं मृत्युशय्येवर असतांना लिहिलें. त्याचीं नाटकें चांगलीं मनोरंजक असल्यामुळें फार लोकप्रिय झालीं. तो वास्तववादी लेखक असल्यामुळें तत्कालीन नाटककारांत त्याचा दर्जा फार उच्च लागतो. त्याच्या नाटकांत इतर नाटकांतून घेतलेलीं उसनीं स्वभावचित्रें मुळींच नसून प्रत्यक्ष जीवनात आढळणाऱ्या स्वभावाचीं पात्रें त्यानें रंगवलीं आहेत, त्यामुळें फील्डिंग या लेखकावर आणि इंग्रजी ललित वाङ्मयावर फर्क्युहरच्या नाट्यवाङ्मयाचा फार परिणाम झालेला दिसेल.

**फर्ग्यूसन, जेम्स** (१८०८–१८८६)—एक स्कॉटिश शिल्पशास्त्रज्ञ व ग्रंथकार. याला कलकत्ता येथें व्यापारी पेशाची नोकरी असून स्वतंत्र व्यापारहि करीत असे. सौंदर्यकल्पना व सूक्ष्म तत्त्वज्ञानविषयक दृष्टि यांची नैसर्गिक देणगी असल्यामुळें १८३५ ते १८४२च्या दरम्यान त्यानें हिंदुस्थानांत प्रवास करून शिल्पविषयक साहित्य जमा केलें. १८४० सालीं त्याला रॉयल एशिॲटिक सोसायटी या संस्थेचा सभासद करून घेण्यांत आलें. या संस्थेच्या सभासदांत त्यानें आपल्या अनेक विद्वत्तापूर्ण निबंधांनीं भारतीय शिल्पकलेबद्दल पाश्चात्यांत आवड उत्पन्न केली. आपल्या आयुष्याचा बराच काळ त्यानें भारतीय कलाविषयक व शिल्पविषयक संशोधनांत व अभ्यासांत घालविला आणि त्याबाबत अनेक ग्रंथ लिहिले. कांहीं वर्षें (१८६०–६८) त्यानें याच कार्यांत पॅलेस्टाइनमध्यें घालविलीं.

त्याचे मुख्य ग्रंथ म्हणजे 'हिस्टरी ऑफ आर्किटेक्चर इन् ऑल कंट्रीज्' (सर्व देशांतील शिल्पकलेचा इतिहास), ३ भाग, 'ए हिस्टरी ऑफ इंडियन ॲन्ड ईस्टर्न आर्किटेक्चर' (हिंदी आणि प्राच्य शिल्पकलेचा इतिहास), 'नोट्स ऑन दि साइट ऑफ दि होली सेपल्कर ॲट जेरुसलेम' (जेरुसलेमच्या पवित्र समाधिदर्शनावर टांचणें), 'ट्री ॲन्ड सर्पेंट वर्शिप' (वृक्ष–सर्पपूजा) आणि 'रूड स्टोन मॉन्युमेन्ट्स इन् ऑल कंट्रीज्' (सर्व देशांतील ओबडधोबड दगडी स्मारकें) हे होत.

**फर्डिनंड**—युरोपिअन इतिहासांत वारंवार येणारें एक ख्रिश्चन नांव. या नांवाचे बरेच राजे युरोपमध्यें होऊन गेले. तीन रोमन बादशहांपैकीं पहिला विवाहामुळें ऑस्ट्रियाचा बादशहा झाला, व भाऊ पांचवा चार्लस याच्या मृत्यूनंतर रोमन्

सम्राट् झाला. बल्गेरियाचा फर्डिनंड राजा हा पहिल्या महायुद्धांत जर्मनीच्या बाजूला होता. १९०८ सालीं त्यानें बल्गेरियाचें स्वातंत्र्य पुकारून स्वतःला झार पदवी लावून घेतली. १९१८ सालीं त्यानें आपलें राज्य मुलाला दिलें. रुमानियाचा फर्डिनंड राजा व्हिक्टोरिया राणीचा नातजावई होता. तो पहिल्या महायुद्धांत दोस्तांच्या बाजूला होता. १९२७ सालीं हा मृत्यु पावला. स्पेनचे बरेच राजे या नांवाचे होते. सातवा फर्डिनंड राजा नेपोलियनाच्या वेळीं होऊन गेला. हा फार जुलमी व वाईट राजा होता. तो दोनदां पदच्युत झाला होता. हा १८३३ त वारला.

**फलज्योतिष**—ज्योतिष अथवा ज्योतिःशास्त्र हा शब्द दीर्घकालपर्यंत ग्रहनक्षत्रज्योतिष व फलज्योतिष यांस सामान्यार्थानें लावण्यांत येत असे, परंतु अलीकडे ज्योतिःशास्त्र हा शब्द केवळ खगोलशास्त्र या अर्थी व फलज्योतिष हा शब्द भविष्यज्ञान अथवा ग्रहादिकांचा मानवी आयुष्यावर होणारा परिणाम, या अर्थी वापरण्यांत येतो. फलज्योतिष म्हणजे ग्रहनक्षत्रादि तार्‍यांच्या स्थितीवरून फलादेश सांगणें होय. ग्रहनक्षत्रादिकांच्या गती व स्थिती या ज्याप्रमाणें मागील अथवा पुढील कालाकरितां निश्चितपणें वर्तवितां येतात त्याप्रमाणें त्यांचा मानवसृष्टीवर होणारा परिणामहि तितकाच निश्चितपणें वर्तवितां येतो व हें एक इतर शास्त्रांपेक्षांहि बलवत्तर असें शास्त्र आहे, असें फलज्योतिषाच्या अभिमानी लोकांचें म्हणणें आहे.

फलज्योतिषाबद्दल आदर व श्रद्धा आपणांस फार प्राचीन काळापासून राजे लोक व इतर जनता यांमध्यें आढळून येते. बाबिलोनियन लोक तार्‍यांस स्वर्ग व पृथ्वी यांमधील अबाधित नियम मानीत असत. याकरितां अत्यंत प्राचीन काळापासून तार्‍यांचें निरीक्षण करण्याकरितां मोठमोठ्या वेधशाळा, वगैरे राजे लोकांनीं बांधून दिलेल्या होत्या. फार काय पण मध्ययुगांत देखील किंवा त्याच्याहि अलीकडे केप्लरसारखे ज्योतिषशास्त्रज्ञ दुसरा रुडॉल्फ या बादशहास व कौंट वॅलेन्स्टेन यासारख्या उमरावांस कुंडल्या पाहून फलादेश वर्तवून सांगत असत व त्यावरच त्यांचा निर्वाह चालत असे. केप्लर ज्योतिषःशास्त्रास सुज्ञ आईची उपमा देत असे व फलज्योतिषास अवखळ मुलीची उपमा देत असे; आणि सांगत असे कीं, या अवखळ पोरीमुळेंच तिच्या आईचा संसार चालत आहे. फलज्योतिषामुळें गोलीय भूमितीची वाढ झाली व सामान्यतः गणितशास्त्राची प्रगति व त्या शास्त्रांतील अचूकपणा यांस फलज्योतिषाची पुष्कळच मदत झाली आहे, ही गोष्ट कोणासहि मान्य करावी लागेल. एके काळीं फलज्योतिषाचे सिद्धांतहि प्रत्यक्ष वेध घेऊन व दीर्घकालपर्यंत निरनिराळ्या योगांचें प्रत्यक्ष निरीक्षण करूनच ठरवावे लागले असले पाहिजेत ही गोष्टहि निश्चित, आहे. आज दीर्घकालाच्या परिचयामुळें त्याच्यामागील श्रमांची व चिकाटीची आपणास कल्पना येत नाहीं ही गोष्ट निराळी.

आतांपर्यंत फलज्योतिषी लोकांची अशी तक्रार असे कीं, ज्योतिषशास्त्रज्ञ आमच्या शास्त्राकडे मुळींच लक्ष देत नाहींत, परंतु तशी खरोखर वस्तुस्थिति नाहीं. अनेक अर्वाचीन जर्मन, फ्रेंच, बेल्जम, इंग्लिश व अमेरिकन शास्त्रज्ञांनीं गेल्या पन्नास वर्षांत असुरी, बाबिलोनी, ईजिप्ती, ग्रीक, लॅटिन, अरबी, फारसी, संस्कृत व चिनी फलज्योतिषग्रंथांचा सूक्ष्म अभ्यास चालविलेला आहे. अक्कडच्या सार्गन राजानें ख्रिस्तपूर्व तिसर्‍या सहस्त्रकांत तत्कालीन ज्ञात जगावर आपला अमल बसविला होता, पण अशा बलाढ्य राजाचीहि हें कृत्य आपल्या ज्योतिष्यांनीं दिलेल्या सल्ल्यास अनुसरूनच आपण करूं शकलों अशी समजूत असे. अर्थात् असा महत्त्वाचा योग वर्तवून देणार्‍या असुरीबाबिलोनी ग्रंथांचीं भाषांतरें त्यांचे शेजारी जे एलाम व हिटाइट राष्ट्रांतील लोक त्यांनीं आपल्या भाषेंत करून घेतलीं. होमरच्या ईलियड या काव्यांत ग्रीक राजा ॲगामेम्नॉन याचा सल्लागार काल्चास नांवाचा ज्योतिषी होता असा उल्लेख आहे. यानेंच इफिजिनिआला ज्या यज्ञामध्यें औलिसमध्यें बळी दिलें त्या यज्ञाचें धुरीणत्व केलें होतें. काल्चास हें नाव ग्रीक दिसत नाहीं. कारण काल्चा याचा अर्थ असीरियामधील काल्खु या गांवचा राहिवासी असा होतो. या ठिकाणीं फलज्योतिषाचें विद्यालय होतें ही गोष्ट ज्ञात आहे.

निनेव्हे येथाल राजा असुर-बनिपाल याच्या कारकीर्दीत त्याचा मांडलिक व सव्विसाव्या राजघराण्याचा संस्थापक उत्तर ईजिप्तचा राजा नेको प्सो (शहाणा नेको) याच्या आश्रयाखालीं एका ॲसीरियन चित्रयुक्त फलज्योतिषग्रंथाचें ईजिप्तच्या भाषेंत भाषांतर झालें होतें. या ईजिप्ती भाषांतरावरून अलेक्झांड्रिया येथें टॉलेमीच्या काळांत ग्रीक भाषेंतहि एक भाषांतर तयार झालें होतें. हा ग्रंथ व अशाच तर्‍हेचे दुसरे फलज्योतिषावरील ग्रंथ यांचीं पुढें अरबी, फारसी व संस्कृत या भाषांत भाषांतरें झालीं. अरबी ग्रंथांचीं पुन्हां बायझंटाइन येथें ग्रीक भाषेंत भाषांतरें करण्यांत आलीं. यानंतर हिब्रू लोकांनीं त्यांचीं हिब्रू भाषेंत भाषांतरें केलीं व त्यांवरून नंतर लॅटिन भाषेंत भाषांतरें करण्यांत आलीं. याप्रमाणें या सर्व ग्रंथांचा प्रसार जगामध्यें झालेला आढळतो.

हिंदुस्थानांत तर फलज्योतिषावर बहुतेक लोकांचा विश्वास आहे. पूर्वीचे राजे तर ज्योतिषाला विचारून लढाईचेहि कार्यक्रम ठरवीत. धार्मिक कृत्यें, विवाह, इ. गोष्टींना मुहूर्त पाहावे लागतात. या ज्योतिषाचें जुनें वाङ्मय बरेंचसें आहे.

इस्लामी संस्कृतीच्या भरभराटीच्या काळांत फलज्योतिषग्रंथांचा प्रसार उत्तर आफ्रिका, ईजिप्त, अरबस्तान, सीरिया,

फत्तेपूर शिक्री—दिवाण-इ-खासचा स्तंभ
(पृ. १५८५)

फिजी — ऋव्याद नृत्य (पृ १५९६)

बँगकॉक — वातचेंग देवालय (पृ. १६२३)

बर्लिन — रीश बँक (पृ. १६४६)

इराक, इराण, अफगाणिस्तान, तिबेट, हिंदुस्थान, मलाया, इंडोनेशिया, इंडोचीन, चीन व जपान या सर्व देशांत झालेला आढळतो.

फक्त मूरिश लोकांच्या हकालपट्टीबरोबर त्यांच्या फलज्योतिषग्रंथांचीहि स्पेन व पोर्तुगाल देशांतून कॅथॉलिक धर्मोपदेशकांनीं हकालपट्टी केली. त्यामुळें स्पेनच्या दक्षिण अमेरिकेंतील वसाहतींतहि फलज्योतिषाचा प्रवेश झालेला नाहीं.

पहिल्या महायुद्धाच्या सुरवातीस १९१४ सालीं एका मोठ्या शास्त्रज्ञानें ब्रिटनमधून आतां फलज्योतिषाची अगदीं पूर्णपणें हकालपट्टी झाली आहे असें म्हटलें होतें; परंतु वस्तुस्थिति अगदीं निराळी होती. टॉम हॅरिसन यानें असें दाखवून दिलें कीं ('मास आब्झर्व्हेशन' मध्यें), त्याच्या मानवसमाजशास्त्राच्या अभ्यासामध्यें त्याला असें आढळून आलें कीं, ब्रिटिश बेटांतील निदान दोनतृतीयांश लोक कोणत्याना कोणत्या तरी रूपांत ग्रहांचें फलादेश नियमितपणें पाहत असतात. त्यांपैकीं चारदशांश लोकांची फलज्योतिषावर श्रद्धा असते व पहिल्या महायुद्धानंतर तर ही श्रद्धा वाढीसच लागली आहे. फलज्योतिषविषयक नियतकालिकांचा लाखोंनीं खप होत आहे व ज्या वर्तमानपत्रांत गुन्ह्यांच्या चटकदार बातम्यांबरोबरच फलज्योतिष वर्तविलेलें असतें अशीं साप्ताहिकें फारच खपतात.

अमेरिकेमधील संयुक्त संस्थानांत तर सु. दोनशें वर्तमानपत्रें दररोजची कुंडली छापतात; व एका फलज्योतिषविषयक वार्षिकाचा खप दहा लक्ष प्रतींचा आहे. त्या देशांत नोंदलेल्या ज्योतिषांची संख्या पंचवीस-तीस हजार आहे व सुमारें ऐशीं हजार लोक कार्डांवरून किंवा स्फटिक गोलकावरून भविष्य सांगतात. हिंदुस्थानांतहि भारदस्त वृत्तपत्रें आणि नियतकालिकेंहि भविष्यें प्रसिद्ध करतात व आपला खप वाढवितात.

फलज्योतिषावरील श्रद्धेमुळें विशिष्ट मनुष्याबद्दल श्रद्धा, किंवा कोणी तरी महापुरुष जन्मास येऊन आपलें दुःख निवारण करील अशा प्रकारची श्रद्धा वाढत जाते व त्यामुळें व्यक्तिपूजेची कल्पनाहि बळावत जाते; व त्या मानानें खरोखर परिश्रम करणाऱ्या व कष्टाळू पण प्रामाणिक मनुष्यास संधि कमी मिळते.

आतां आपले फलज्योतिषी आपली बाजू कशी मांडतात तें पाहा—

भुतेंखेतें, शकुनापशकुन, स्वप्नें, पायगुण, दृष्टि, इत्यादिकांच्या फलांच्या बाबतींतला विश्वास जो तो मनुष्य आपल्या अनेक वर्षांच्या अनुभवानें ठरवीत असतो, परंतु त्यांचे अनुभव पटवून देण्याचीं साधनें त्यांच्याजवळ साक्षात् नसतात व त्यांची उपपत्तिहि शास्त्रीय दृष्ट्या नीटशी लावतां येत नाहीं; तथापि ह्या अनुभवाच्या गोष्टी अर्थशून्य ठरत नाहींत. तशी गोष्ट फलज्योतिषाची नाहीं. तें शास्त्र आहे. त्याच्यासंबंधानें आपली जशी खात्री करून घेतां येते तशीच दुसऱ्याचीहि करून देतां येते. मात्र तितकी करून घेण्याइतका धीर पाहिजे. या गोष्टीचा विचार शास्त्राच्या सत्यतेची मर्यादा किती हें ओळखूनच केला पाहिजे. इतर शास्त्रांना सत्यासत्याची कसोटी ज्या तऱ्हेनें लावली जाते त्याच तऱ्हेची ह्याहि शास्त्राला लावली पाहिजे.

फलज्योतिष पाहण्याच्या अनेक भिन्न व परस्परविरोधी पद्धती वैद्यकशास्त्रासारख्याच आज प्रचारांत आहेत. ॲलोपथी व होमिओपथी यांच्या विचारसरणींत जितका विरोध आहे तितका कांहीं सायन आणि निरयन यांच्या पद्धतींत नाहीं. त्या दोन्ही पद्धतींत चिकित्सा करणारे डॉक्टर असल्यानें वैद्यकशास्त्र जसें खोटें ठरत नाहीं, तद्वतच भिन्न पद्धतींमुळें फलज्योतिषहि खोटें ठरत नाहीं. वैद्यकशास्त्रांत नाडीपरीक्षा, नेत्रपरीक्षा, जिव्हापरीक्षा, मूत्रपरीक्षा, वगैरे अनेक परीक्षा सांगितल्या आहेत, तरी पण एखादा चाणाक्ष वैद्य नुसतें मुख अथवा नाडी पाहून रोगाचें अचूक निदान करूं शकतो, अथवा दुसरा एखादा अनेक प्रकारच्या अधिक परीक्षा करून रोगनिदान ठरवतो. हीच गोष्ट कुंडलीविज्ञानाच्या परीक्षेची आहे.

उत्तम ज्योतिष्याचें कौशल्य असें असतें कीं, त्यानें आपल्या अनुभवानें आडाखे बसवलेले असतात. व त्यामुळें त्याचें भविष्य जमतें. ज्याला आडाखे बसवितां आलेले नसतात त्याचें चुकतें; पण म्हणून कांहीं ज्योतिषशास्त्र खोटें ठरत नाहीं. अडाणी वैद्याच्या हातून रोगी मेला म्हणून वैद्यकशास्त्र खोटें कसें ठरणार ? शास्त्रानें कितीहि सूक्ष्म नियम घालून दिलेले असले तरी त्यांचा उपयोग तारतम्यानें कसा करावयाचा हें जो जाणतो तोच खरा शास्त्रज्ञ. कोणचेंहि शास्त्ररहस्य तारतम्यज्ञानावांचून अनुभवाला पटत नसतें.

खगोलस्थ ग्रह हे जसे कारक तसेच सूचकहि आहेत. जन्मलग्नकुंडलींतले ग्रह हे जसे कारक असतात तसेच गोचरीचे ग्रह सूचक असतात. जन्मकुंडलींतले ग्रह कारक असतात याचा अर्थ असा कीं, ते ग्रह शुभ किंवा अशुभ स्थानीं असतील त्याप्रमाणें आयुष्यांत त्या त्या स्थानाचीं शुभ किंवा अशुभ फळें ते प्राप्त करून देतात; आणि गोचरीचे ग्रह हे त्या कारकत्वाचे सूचक होत असतात. जन्मलग्नकुंडलींतले ग्रह जो लाभ किंवा जी हानि दर्शवितात तो लाभ किंवा ती हानि घडून येण्याची वेळ केव्हां येणार, हें गोचरीच्या ग्रहांवरून ठरतें. म्हणजे हेंच तें त्यांचें सूचकत्व. अर्थात् जन्मकुंडलींत विशिष्ट गोष्ट घडविणारे योग असले आणि त्या योगांचीं फळें मिळण्याचे विशिष्ट काळ ग्रहांच्या गतीवरून प्राप्त झाले तरच त्या योगांचीं तीं फळें मिळतात. सारांश असा कीं, कुंडलींतल्या ग्रहयोगांचें कारकत्व आणि

गोचरीच्या ग्रहयोगांचें कारकत्व व सूचकत्व या दोहोंचा मेळ बसून त्या दोहोंचा मिळून एकंदर आयुष्यावर परिणाम होत असतो. ज्योतिषांतील ग्रहयोगादिक फळें ठरवितांना परिस्थितीचाहि विचार करावा लागतो. हा विचार मदतीस न घेतला तर हमखास फलादेश चुकतो असा अनुभव आहे. उदाहरणार्थ, हिंदुस्थानांत जन्मलेल्या मनुष्यास उत्तम द्रव्ययोग असला तरी जेवढी संपत्ति मिळूं शकेल त्याच्या किती तरी पटीनें अधिक संपत्ति, तसाच द्रव्ययोग असलेल्या अमेरिकन मनुष्यास मिळेल. परिस्थितीचा असाच परिणाम इतरहि अनेक बाबतींत लागू पडतो. बुद्धिमत्तादर्शक योग सारखेच असून दोनशें वर्षांपूर्वी हिंदुस्थानांत हल्लींच्यासारखे पदवीधर आढळत नव्हते, पण ते हल्लीं आढळतात. हें परिस्थितींतलें अंतर होय. हा ग्रहयोगांतला फरक नव्हे. असें आहे तरी कोणत्याहि परिस्थितींत निर्बुद्ध मनुष्य बुद्धिमान होणें, अगर बुद्धिमान निर्बुद्ध होणें, असला प्रकार मात्र होऊं शकणार नाहीं.

जी गोष्ट संपत्तीच्या कमीअधिक प्रमाणांची तीच विवाहादि सांसारिक परिस्थितीसहि लागू पडते. जेथें बालपणांत विवाह होऊं शकत नाहींत तेथें गोचरीग्रहाचें सूचकत्व विशिष्ट कालमर्यादेपर्यंत परिणामकारक होऊं शकत नाहीं. हाच नियम रोगांच्या सांथींनाहि लागू पडतो. खरी वस्तुस्थिति अशी आहे कीं, जन्मकुंडलींतील ग्रहयोगानें मनुष्याचें शरीर हें फोटो घेण्याच्या विशिष्ट कांचेप्रमाणें बनलेलें असतें. फोटोच्या कांचेवर जर कोणत्याहि वस्तूचें प्रतिबिंब पडण्याचा योगायोग आला तर तिचा फोटो घेतला जातो. नाहीं तर ती कांच तशीच पडलेली राहते. बिनतारी संदेश घेण्याचें यंत्र आपण लावून ठेवलें तरी त्यांत जोंपर्यंत त्यानें ग्रहण करण्यालायक अशा ध्वनीच्या लाटा उत्पन्न झाल्या नाहींत तोंपर्यंत त्या यंत्रावर कांहीं परिणाम होणार नाहीं. हीच स्थिति मानवी शरीरांतील परिमाणूंची असते. अनुकूल अथवा प्रतिकूल अशा लाटा बाह्य परिस्थितींत उत्पन्न झाल्या तर त्यांचा परिणाम त्यांच्यावर होईल किंवा होणार नाहीं हें दाखवितात; आणि हें ओळखणें हेंच फलज्योतिषाचें कार्य होय. बाह्य परिस्थितीमुळें कोणच्या लाटा केव्हां येतील किंवा न येतील हें कुंडलींतील ग्रहयोगापेक्षां अन्य कारणावरच अवलंबून राहणार हें उघड आहे. पण वारा उत्पन्न झाला असतां अशा लाटा ग्रहण करण्याची शक्ति असणें किंवा नसणें हें जन्मकालीन ग्रहयोगावरून ठरतें. सायननिरयन वादांत जरी मतभेद असला तरी तो त्यांतल्या पद्धतींच्या श्रेष्ठकनिष्ठत्वाबाबतचा आहे. तेवढ्यानें कांहीं त्या दोन्ही पद्धती खोट्या ठरत नाहींत.

सत्यासत्यनिर्णय हा प्रत्यक्ष व्यावहारिक उपयोगावर अवलंबून नसतो. भविष्य आगाऊ समजल्यानें अनेक गोष्टींच्या बाबतींत आगाऊ इलाज करून अरिष्टें टाळतां येतात, किंवा सिद्धिहि प्राप्त करून घेण्याचे उपाय शोधण्यास वेळ सांपडतो. यालाच अनुसरून भविष्य हें मानवी प्रयत्नानें बदलणें शक्य असल्यानें, फलज्योतिषाचा व्यवहारांत पुष्कळ उपयोग होऊं शकतो. कोणताच रोग जसा दुःसाध्य नसून कांहीं सुसाध्य व कांहीं कष्टसाध्य असतात; तद्वतच कोणतेंहि भविष्य अटळ नसून कांहीं सुलभतेनें व कांहीं महत्प्रयासानें टाळतां येतें; व असें आहे तरी, मनुष्य जसा अखेरीस कोणत्या तरी रोगाला बळी पडतोच त्याचप्रमाणें प्रयत्न करून देखील अखेरीस न टाळण्याजोगीं कांहीं भविष्यें असतात. पण अशांची संख्या अत्यल्प असल्यानें, सामान्यतर भविष्य समजून घेतल्यापासून त्याच्या प्रतिकाराचा मार्ग सांपडूं शकतो.

**फलटण संस्थान**—मुंबई, सातारा जिल्हा. पूर्वी ही एक जहागिरी होती, पण आतां संस्थान बनलें आहे. संस्थानिक निंबाळकर आडनांवाचे आहेत. एकंदर गांवें ७२. क्षेत्रफळ ३९७ चौ. मैल. लोकसंख्या ७१,४७३. उत्पन्न २० लाख. इंग्रजांस खंडणी सालीना ९,६०० रुपये द्यावी लागे. उत्तर भाग सुपीक व दक्षिण भाग डोंगराळ आहे. पाऊस फारच कमी पडतो. हवा उष्ण आहे. मुख्य ठिकाण फलटण गांव. येथें हायस्कूल, दवाखाना, म्युनिसिपल कमिटी व कचेऱ्या आहेत. आतां संस्थानांत बऱ्याच सुधारणा झाल्या आहेत. मुख्य पीक ज्वारी, बाजरी, हरभरा व तूर यांचें. नीरा व बाणगंगा नद्या यांतून वाहतात. नीरेच्या कालव्यामुळें संस्थानांत फार ऊंस पिकतो व एक साखरेचा कारखाना चालतो. या कारखान्यामुळें संस्थानचें उत्पन्न तीन-चार लाखांवरून वीस लाखांवर गेलें.

फलटणचें निंबाळकरांचें घराणें फार जुनें असून सतत सहासातशें वर्षें राज्योपभोग घेत आहे. धारच्या परमार घराण्यांतील कोणी पुरुष तेराव्या शतकाच्या मध्याच्या सुमारास मुसलमानांच्या त्रासामुळें दक्षिणेंत आला व फलटणजवळ शंभुमहादेवाच्या रानांत येऊन राहिला. त्याचें नांव निंबराज. त्याच्यावरून गांवास निंबळक व घराण्यास निंबाळकर हीं नांवें पडलीं. याच्या वंशजांनीं फलटण वसवलें व वतन संपादलें. आदिलशाहींत निंबाळकरांचें महत्त्व बरेंच वाढलें. निंबराज याच्यापासून चौदावा पुरुष जगपाळराव (पाहा) याची व बाबाजी भोसले याचे मुलगे मालोजी व विठोजी यांची ओळख होऊन स्नेह वृद्धिंगत झाला. एकमेकांस मदत होत असे. जगपाळरावाची बहीण मालोजीस दिली होती. हीच शहाजीची आई दीपाबाई. शहाजीला शहाजहानबरोबरच्या युद्धांत जगपाळरावानें मदत केली होती व त्याच लढाईंत तो नगरजवळ १६२९ त मरण पावला. त्याचा मुलगा मुधोजी व शहाजी आणि शिवाजी

याचाहि स्नेहसंबंध व आप्तसंबंध होता. मुधोजींची मुलगी शिवाजीस दिली होती. मराठेशाही व पेशवाई यांच्या अखेरपर्यंत फलटणकरांचा सरकारात संबंध नोकरीपेशा वगैरेचा असे. हल्लीं-चे राजे मालोजीराव नाईक निंबाळकर हे १९१६ सालीं गादी-वर आले. यांनीं लोकशाही पद्धतीनें राज्य चालवून १९४८ सालीं संस्थान मुंबई प्रांतांत विलीन होण्यास प्रथम संमति दिली. हल्लीं ते मुंबई प्रांताचे विकासमंत्री व मजूरमंत्री आहेत.

**फलशर्करा**—(फ्रुक्टोज). ही 'ग्लुकोज'च्या समवेत मध आणि फळें यांतून आढळते. उंसाची साखर कमजोर हराम्ला-(हायड्रोक्लोरिक ॲसिड)बरोबर उकळवूनहि ही साखर तयार करतात.

**फलाटीण**—(फ्लॅनेल). हें एक प्रकारचें लोंकरीचें कापड असून तें अंगांत आंतून घालण्याच्या कपड्याकरिता वापरण्यांत येतें. हें फार आटतें. पण अलीकडे हा आटण्याचा दोष बराच कमी करण्यांत आला आहे. आजकाल नवीन नवीन तऱ्हेचीं कापडें निघूं लागल्यापासून हें मागें पडलें आहे. तथापि लहान मुलांच्या कपड्याकरितां व खेळणीं करण्याच्या कपड्यांकरितां अद्यापि वापरण्यांत येतें. वेल्समध्यें उत्तम फलाटीण होतें.

फ्लॅनेलेट म्हणून फलाटीणसारखें दिसणारें एक सुती कापड असतें. हें कापडांतील आडवा धागा फुगवून तो लोंकरीसारखा मऊ व वर आल्यासारखा दिसेल असा तयार करून बनविण्यांत येतें. पण हें जळण्याची फार भीति असते.

**फसली सन**—हा मुसलमानी सन अकबर बादशहानें इ. स. १५६३ मध्यें सुरू केला. हिजरी सन शेतकऱ्यांना सोईचा पडत नसे म्हणून हा काढला. दक्षिणेंत हा शहाजीनें आणला (इ. स. १६३६). तेव्हांपासून इकडल्या जुन्या कागदपत्रांतून हा येतो. मुंबई इलाख्यांत याचा आरंभ मृगनक्षत्रापासून (ता. ५-६ जूनपासून) धरतात व याचे महिने मोहरम आदिकरून असतात. फसली सनात ५९० किंवा ५९१ मिळविले असतां इसवी सन निघतो.

**फॅसिझम**—हें इटलींतल्या एका अलीकडील राजकीय पक्षाचें नांव आहे. पहिलें महायुद्ध संपल्यानंतर युरोपांतील इतर देशांपेक्षां इटलींत अतिशय कठिण व आणीबाणीचा प्रसंग उद्भवला, याचें कारण राज्यसत्ता हातीं घेईल असा आर्थिक सुस्थिति असलेला आणि राजकारणी, विद्वान् मध्यमवर्ग इटलींत उरला नव्हता. इतर देशांत तसा वर्ग होता. १९१९।१९२० सालीं इटलींत उद्योगधंद्यांमध्यें इतकी भयंकर अस्थिरता माजली कीं, देशांत क्रांति होणार असें वाटूं लागलें, व याच सुमारास कम्यूनिस्ट लोकांनीं कांहीं कारखाने आपल्या ताब्यांत घेतले. मध्यमवर्ग अगदीं दुबळा होता, त्यामुळें उच्च श्रीमंतवर्ग आणि मजूरवर्ग यांच्यामध्यें तो चिरडला जाण्याची भीति उत्पन्न होऊन त्या वर्गानें उच्च वर्गाचा म्हणजे भांडवलदारांचा आश्रय घेतला, आणि या दोघांच्या सहकार्यानें जो राजकीय पंथ निर्माण झाला त्याला फॅसिस्ट पंथ म्हणतात. या शब्दाचा व्युत्पत्ति-अर्थ 'फॅसेस' म्हणजे लाठ्यांचा जुडगा असा आहे. या पक्षाचा पोषाख काळा शर्ट हा असे. या पक्षाचा पुढारी बेनीटो मुसोलिनी हा मध्यमवर्गीय इसम प्रथम शाळेंत शिक्षक होता. नंतर समाजवादी (सोशॅलिस्ट) पक्षामध्यें शिरून १९१२ ते १९१४ सालांत तो पक्षप्रमुख झाला. १९२० सालीं फॅसिस्ट पक्षाची सभासदसंख्या अतिशय वाढली. माजी महायुद्धातले सैनिक, जमीनदार, मध्यमवर्गातले इसम आणि उद्योगधंद्यातले मोठाले भांडवलवाले या पक्षात सामील झाले. आणि सर्वांनीं मिळून मजूरवर्गाविरुद्ध जोराची चळवळ सुरू केली आणि त्या वर्गाच्या संस्था नष्ट करून टाकल्या. १९२२ सालीं फॅसिस्ट पक्षानें रोमवर चाल करून बऱ्याच सार्वजनिक इमारतींचा ताबा घेतला; त्यामुळें इटलीच्या राजाला मुसोलिनीबरोबर तडजोड करणें भाग पडलें. आणि राजानें मुसोलिनीला प्रधानमंडळ बनविण्यास सांगितलें. याप्रमाणें या पक्षाच्या हातीं राज्यकारभार आल्यावर विरोधी पक्षाचा सूड अतिशय अत्याचार करून घेण्यांत आला, व त्यांत विरुद्ध पक्षाचा पुढारी व कायदेमंडळाचा सभासद मॅटिओटी यानें मुसोलिनीचा निषेध केल्यामुळें त्याचा खून करण्यांत आला. हळूहळू मुसोलिनीच सर्वाधिकारी बनला. ब्रिटनमध्येंहि फॅसिस्ट पक्ष स्थापन होऊन त्यानें साम्यवादा-विरुद्ध आणि राजसत्ताक पद्धतीच्या समर्थनपर प्रचार सुरू केला.

या पक्षाचा कार्यक्रम राष्ट्रीय हुकूमशाही पद्धतीचा असून, तो कम्यूनिस्टविरोधी आणि पार्लमेन्टरी पद्धतीच्याहि विरुद्ध आहे. फॅसिझमचे पुढारी भांडवलशाहीचा निषेध करतात व समाजसत्ता-वादाचाहि निषेध करतात. खाजगी मालकीच्या तत्त्वाचा पुरस्कार हा पंथ करतो, परंतु खाजगी मालकीच्या कारखान्यांवर व उद्योगधंद्यांवर सरकारी नियंत्रण असावें असें या पंथाचें मत आहे. वर्गकलह आणि मालक-मजूर यांचे तंटे नसावे. ट्रेड युनियन आणि कारखानदारांच्या असोसिएशन संस्था यांनीं परस्पर सहकार्य करावें, असें हा पंथ प्रतिपादन करतो.

इटली देशांत अलीकडे फॅसिस्ट पक्ष हा एकच राजकारणी पंथ अस्तित्वांत होता. या पक्षाच्या सर्व सभासदांनीं मुसोलि-नीचा प्रत्येक हुकूम मानलाच पाहिजे अशी सक्ती असे. कारण 'मुसोलिनीचें नेहमींच बरोबर असतें', असें या पक्षाचें ब्रीदवाक्य असे. फॅसिस्ट काळे शर्ट वापरीत आणि रोमन पद्धतीचा दोन्ही हात वर करून सलाम करीत. हा पंथ अंतर्बाह्य लष्करी वृत्तीचा होता. या पक्षाचे मुख्य चार नियम असत ते—(१) हा पक्ष

हें एक नागरिक दल आहे. (२) त्याचा सरसेनापति मुसोलिनी हा आहे. (३) इटली देशाची सेवा करणें हें या पक्षाचें मुख्य कर्तव्य आहे. आणि (४) इटालियन लोकांना जगांत अत्यंत श्रेष्ठ स्थान प्राप्त करून देणें हें या पक्षाचें ध्येय आहे. सशस्त्र क्रांतीचा व अत्याचाराचा मार्ग या पक्षाला मान्य असे. नागरिक-स्वातंत्र्य या पक्षाला मान्य नसून हुकूमशाही राज्यपद्धति मान्य असे. ६ ते १२ वर्षें वयाच्या मुलांना शिक्षण देण्याच्या बालशिक्षण-संस्था, आणि नंतर १२ ते १८ वर्षें वयाच्या युवकांना शिक्षण देणाऱ्या युवकसंस्था असत; व त्यांतील शिक्षणक्रम ठरविण्याचा अधिकार फॅसिस्ट सरकारकडे असून या शिक्षणसंस्थांतील मुलांनीं विशिष्ट पद्धतीचा पोशाख केला पाहिजे आणि लहान वयापासून लष्करी शिक्षण घेतलें पाहिजे अशी सक्ती असे. या शिक्षणसंस्थेंत शिकलेला प्रत्येक तरुण १८ व्या वर्षीं फॅसिस्ट पक्षाचा सभासद होई. या पक्षाचें स्वतंत्र सैनिक दल असे. आणि त्या दलाला सरकारच्या सैन्याप्रमाणें लष्करी शिक्षण देण्यांत येत असे.

हा फॅसिस्ट पक्ष राष्ट्रीय वृत्ति आणि साम्राज्यसत्ता यांचा पुरस्कार करणारा असून, प्राचीन रोमन साम्राज्याप्रमाणें थोर वैभव आधुनिक इटलीला प्राप्त झालें पाहिजे आणि त्याकरितां सर्व राष्ट्राला शिस्त, हुकमत, श्रम आणि लष्करी बाणा यांची आवड, विशिष्ट प्रकारचें शिक्षण देऊन निर्माण केली पाहिजे, असा फॅसिस्ट पक्षाचा कटाक्ष असे. सोरेल, पारेटो, नीत्से आणि मॅकिआव्हेली हे या पक्षाचे राजकारणी गुरु असत. इटलींत राजसत्ताक पद्धति फॅसिस्ट पक्षानें कायम ठेवली होती, परंतु राजाचे अधिकार फार कमी केले होते. कामकरी वर्गाला विशिष्ट सामाजिक हक्क देणारे कायदे फॅसिस्ट सरकारनें १९२७ सालीं केले. फॅसिस्ट पक्षानें फॅसिस्ट ग्रँड कौन्सिल या आपल्या मंडळाला सर्वाधिकारित्व दिलें असून, मुसोलिनीनंतरचा सदर पक्षाचा पुढारी नेमण्याचा अधिकार या कौन्सिलला होता. फॅसिस्ट पक्षानें रोमन कॅथॉलिक धर्मपंथाशीं सख्य राखलें असून १९२९ सालीं पोपचें ख्रिस्ती धर्मराज्य पोपला परत देण्यांत आलें. या पक्षाशीं ज्यू लोकांनीं प्रथम सहकारिता केली होती आणि मोठमोठ्या सरकारी हुद्यांवर ज्यू इसम नेमले गेले होते. परंतु पुढें १९३८ सालीं हिटलरच्या नाझी सरकारनें ज्यूविरोधी मोहीम सुरू केल्यावर मुसोलिनीनेंहि ज्यू लोकांना हद्दपार केलें. मुसोलिनीखेरीज या पक्षाचे प्रमुख पुढारी ए. स्टार्स, काउंट सिआनो, डी. अल्फीरी, जी. बोट्टई, ई. रॉसोनी, आयु. बाल्बो आणि ए. फारिनास्सी हे होते.

या इटलीमधील फॅसिझम राज्यपद्धतीचा नमुना इतर अनेक देशांत अमलांत आणण्याचे प्रयत्न चालू झाले होते. दुसरें महायुद्ध हें लोकशाही आणि फॅसिस्ट राज्यपद्धति यांमधील महान् लढाच होता व त्यांत शेवटीं फॅसिस्ट पंथाचा पराजय झाला, व त्याबरोबर इटलीचेंहि फार नुकसान झालें.

**फॅस्मिडी**—हे उष्ण हवामानामध्यें होणारे झुरळाच्या वर्गांतील प्राणी आहेत. यांचा रंग यांच्या सभोंवतालच्या वस्तूंप्रमाणें बनतो. हे झाडांच्या फांद्यांवर व पानांवर राहतात व त्यांसारखेच दिसतात.

**फळें**—वनस्पतिशास्त्रामध्यें पक्व गर्भाशयास फल म्हणतात. याचे साल व बी असे मुख्य दोन भाग असतात. सामान्यतः व्यवहारामध्यें कांहीं झाडांच्या फळांमध्यें जो खाण्यासारखा भाग (गर) असतो त्यास त्यांतील बियांसकट फळ अशी संज्ञा देण्यांत येते. कांहीं फळें उष्ण हवेंत होतात– उदाहरणार्थ, अंजीर, खजूर, द्राक्ष, नारिंग, केळें, चिंच, डाळिंब, बदाम, नारळ, वगैरे. कांहीं थंड हवेंत होतात–उदाहरणार्थ, सफरचंद, पिअर, चेरी, जरदाळू, गूजबेरी, स्ट्रॉबेरी, वगैरे.

फळें कच्चीं, शिजवून किंवा वाळवून खाण्यांत येतात. तसेंच मोरंबा, जेली, लोणचीं, मार्मालेड, सरबतें, इ. करण्यासाठीं वापरतात. ताजीं फळें अन्न या अर्थीं फार उपयुक्त आहेत. त्यांत अम्लें आणि क्षार असतात व ते शरीरपोषणाला आवश्यक असतात. क्षुधा आणि पचन यांच्यावर फळांची चव, स्वाद व स्वरूप यांचा फार परिणाम होतो. ताजीं फळें सारक असतात. वाळलेलीं फळें तर अधिक चांगलीं. त्यांत पोषक द्रव्यांचें प्रमाण जास्त असतें. फळें निर्वात स्थितींत डबाबंद ठेवण्याच्या व खराब होऊं न देण्याच्या पद्धतींमुळें फळांतील साखरेचें प्रमाण वाढतें.

फळें हीं निसर्गानें तयार केलेलीं माणसांना आयतीं मिळणारीं पक्वान्नेंच आहेत. तीं खाणें अत्यावश्यकहि आहे. रोग्यांना फळें मुद्दाम देतात. पण एरवीं तीं खाल्लीं असतां शरीरप्रकृतीवर चांगलाच परिणाम होतो. पण आपल्याकडे फळें भरपूर असतांहि तीं खाण्याची आवडच कमी. मुंबईंतदेखील प्रत्येक मनुष्य एका वर्षाला पाव औंसापेक्षां जास्त फळें खात नाहीं. फळें खाणें श्रीमंती बाब समजण्यांत येते. तथापि भाजीप्रमाणें फळेंहि घेण्याची वहिवाट ठेवली तर फार जड जाणार नाहीं. हंगामांत तर फळें फार स्वस्त असतात. जेवणानंतर ताजीं किंवा सुकीं फळें खावीं. फळें खातांना बिया टाकून देऊं नयेत. त्यांत तर अधिक सत्त्वांश असतो. पेरू, डाळिंब, द्राक्षें यांच्या बिया जरूर खाव्यात. त्यामुळें कोठ्यालाहि चलन मिळतें. फळांचा रस, सरबतें हीं केव्हांहि घेण्यास उपयोगी पडतात.

**फॉक, मार्शल फर्डिनंड** (१८५१–१९२९)—एक फ्रेंच योद्धा. याचें शिक्षण मेट्झ येथें होऊन त्यानें फ्रँको–जर्मन युद्धांत भाग घेतला होता. १८७४ सालीं त्याला तोफखान्यांत लेफ्टनंट नेमलें. नंतर त्यानें सॉमूर येथें घोडदळ शिक्षणसंस्थेंत

(कॅव्हलरी स्कूल) अभ्यास केला, व त्याला कॅप्टनचा हुद्दा मिळाला. १८९१ सालीं जनरल-स्टाफवर त्याला मेजरची जागा मिळाली. पुढेंहि त्याचा दर्जा वाढत जाऊन १९१४ सालीं पहिलें महायुद्ध सुरू झालें त्या वेळीं तो कमांडरच्या हुद्यावर होता. मार्नेच्या पहिल्या लढाईंत दोस्तांचा जो जय झाला, त्याचें श्रेय फॉकला आहे. नंतर त्याला दोस्त सैन्याचा कमांडर–इन्–चीफ नेमलें. सोमेच्या लढाईची सर्व तयारी त्यानें केली. १९१८ सालीं तो फ्रेंच, ब्रिटिश, बेल्जियन व अमेरिकन यांच्या संयुक्त सैन्याचा जनरॅलिसिमो झाला व अखेरच्या विजयाचें बरेंच श्रेय त्याला आहे. त्याला फ्रेंच सरकारनें मार्शल ऑफ फ्रान्स ही बहुमानाची पदवी दिली होती.

**फॉकलंड बेटें**—हा द्वीपसमूह दक्षिण ॲटलांटिक महासागरांत असून ग्रेट ब्रिटनच्या मालकीचा आहे. या समूहांत दोन मोठालीं बेटें–ईस्ट फॉकलंड (क्षे. फ. २५८० चौ. मैल) व वेस्ट फॉकलंड (क्षे. फ. २०३८ चौ. मैल)–असून लहान लहान बेटें बरींच आहेत व त्या सर्वांचें क्षे. फ. ४६१८ चौ. मैल आहे. लो. सं. सु. ३००० आहे. येथील प्रदेश डोंगराळ व वृक्षहीन आहे; पण येथें गवताळ कुरणें फार चांगलीं असल्यामुळें येथें गुरें व मेंढ्या पाळणें हा मुख्य धंदा आहे. मासे व समुद्रपक्षी मारण्याचा मोठा धंदा चालतो. येथून लोंकर, गोठवलेलें मांस, कातडीं व चरबी हा माल परदेशीं जातो. येथील हवा सौम्य आणि आरोग्यकारक आहे. हीं बेटें डेव्हिसनें १५९२ सालीं शोधून काढलीं. येथला कारभार एक गव्हर्नर व सहा सभासदांचें एक कायदेमंडळ चालवतात. येथें शिक्षण सक्तीचें असून एक सरकारी शाळा आणि तीन निमसरकारी शाळा आहेत. खेडेगांवांतील मुलांना शिकवण्याकरितां फिरते शिक्षक नेमले आहेत. येथील सरकारी वार्षिक उत्पन्न १९४३ सालीं ९१,४५३ पौंड असून वार्षिक खर्च ९८,३०७ पौंड झाला. मुख्य ठिकाण स्टॅन्ले बंदर आहे.

**फॉक्स, चार्लस जेम्स** (१७४९–१८०६)—एक इंग्रज मुत्सद्दी. तो १७६८ सालीं पार्लमेंटचा सभासद झाला व प्रथम ६ वर्षें त्यानें तत्कालीन प्रधानमंडळाला पाठिंबा दिला. नंतर लॉर्ड नॉर्थ या मुख्य प्रधानाशीं फॉक्सचा तंटा झाला आणि म्हणून तो सरकारविरोधी व्हिग पक्षाला मिळाला. नंतर त्या पक्षातर्फे बर्क, फॉक्स व इतर अनेक सुप्रसिद्ध वक्ते यानीं लॉर्ड नॉर्थच्या प्रधानमंडळावर सतत हल्ले सुरू केले. विशेषतः अमेरिकेसंबंधींच्या धोरणाबाबत विरोध विकोपाला जाऊन लॉर्ड नॉर्थच्या मंत्रिमंडळाचा पराभव झाला, आणि मार्क्विस ऑफ रॉकिंगहॅमच्या प्रधानमंडळांत फॉक्स परराष्ट्र-खात्याचा चिटणीस झाला (१७८२). पण लवकरच रॉकिंगहॅम वारल्यामुळें त्या पक्षांत दुफळी झाली, आणि फॉक्स मंत्रिमंडळांतून निघाला. नंतर लॉर्ड नॉर्थचे मित्र आणि फॉक्स यांची तडजोड होऊन संयुक्त प्रधानमंडळ स्थापण्यांत आलें. परंतु फॉक्सच्या ईस्ट इंडिया बिलामुळें त्या प्रधानमंडळाचा पराभव झाला. त्यानंतर फॉक्सनें वॉरन हेस्टिंग्जच्या खटल्यांत महत्त्वाचा भाग घेतला. नीग्रो गुलामगिरीची पद्धति बंद करण्याकरितां विल्बरफोर्सनें केलेल्या प्रयत्नांना फॉक्सनें मदत केली. आणि टेस्ट व कार्पोरेशन ॲक्ट रद्द करावे, असा ठराव पार्लमेंट सभेपुढें मांडला. १७७९ सालीं फ्रेंच राज्यक्रांति झाली तेव्हां त्या क्रांतिकारकांचें फॉक्सनें प्रथम अभिनंदन केलें; परंतु पुढें नेपोलियनची सत्ता झपाट्यानें सर्व युरोपभर वाढूं लागली म्हणून फ्रान्सबरोबर युद्ध करण्याचा पुरस्कार करून फॉक्सनें मंत्रिमंडळांत पुन्हां परराष्ट्रचिटणिसाची जागा पत्करली, पण नंतर लवकरच फॉक्स मरण पावला. हा उत्कृष्ट वक्ता होता.

**फांगळा**—[वर्ग–लॅ. पोगोस्टेमॉन पुरपुरिकॉलिस]. पांग; पांगळी. हें झाड रानतुळशीसारखें असतें. झाड व त्याचे तुरे तांबूस असतात. पांढरा, तांबडा व काळा अशा फांगळाच्या जाती आहेत. फांगळ्याचा रस मूत्राघातावर, जंतांवर व जखमांवरहि फार औषधी आहे.

**फांजी**—(सं. फंजी). फांजीच्या वेली असतात. पानें अळवाच्या पानांसारखीं असून त्यांची भाजी करतात. वेल झाडावर वाढतो, त्याला फांद असेंहि म्हणतात. फुरशाच्या विषावर मुळी उगाळून देतात.

**फाब्र, जीन हेन्री** (१८२३–१९१५)—एक फ्रेंच कीटकशास्त्रज्ञ. त्यानें लहान लहान किड्यांच्या जीवनक्रमाचें फार बारकाईनें व धिमेपणानें अवलोकन करून संशोधन केलें. त्याचा पहिला ग्रंथ 'ॲनाले दे सायन्स नॅचरॅलिरेल' १८५५ सालीं प्रसिद्ध झाला आणि त्याच ग्रंथाची सुधारून वाढवलेली आवृत्ति दहा भागांत १८७८–१९०७ या काळांत प्रसिद्ध झाली.

**फायलो** (खि. पू. १ लें शतक)—एक ग्रीक तत्त्ववेत्ता. प्रसिद्ध सिसरोचा हा गुरु. रोम येथें साहित्यशास्त्र व तत्त्वज्ञान हे विषय शिकवीत असे. तो अज्ञेयवादाच्या विरुद्ध होता. शरीराच्या बंधनापासून प्रत्येक मनुष्यानें आपणांस मुक्त करून घेतलें पाहिजे; ईश्वर सर्व सृष्टवस्तूंहून निराळा आहे व तो कोणत्याहि विशेषणाच्या पलीकडचा म्हणजे अवर्णनीय आहे, वगैरे त्याचीं मतें होतीं.

**फारसी वाङ्मय**—प्राचीन फारसी भाषेंत पहलवीचा समावेश होतो. पण तिचा या ठिकाणीं विचार केला नाहीं. नवव्या शतकाच्या सुरवातीस राष्ट्रीय स्वातंत्र्य व राष्ट्रीय वाङ्मय

याच्याबद्दल जागृति उत्पन्न झाली. इ. स. ८०९ मध्यें अब्बास यानें पहिली फारसी कविता लिहिली. सामानिद राजांनीं १० व्या शतकांत ऐतिहासिक संशोधन, वैद्यकाचा अभ्यास, वगैरेंना उत्तेजन दिलें. फिर्दोसीनामक बुद्धिमान कवीनें 'खोदाईनामा' (राजांचें पुस्तक) म्हणून एक काव्यमय भाषांतरित ग्रंथ लिहिला. त्याचाच दुसरा थोर व प्रसिद्ध ग्रंथ 'शाहनामा' (पाहा). यावर त्यानें पूर्ण ३५ वर्षें घालविलीं. यानें आणखीहि अनेक ग्रंथ लिहिले. या २-३ शें वर्षांत याप्रमाणें लेखनाची जी एक लाट आली तींत गद्यपद्यात्मक लहान-मोठे हजारों स्वतंत्र व भाषांतरित ग्रंथ निर्माण झाले व त्यांत बहुतेक सर्व विषयांचा समावेश झाला. लेखनाचे सर्व प्रकार, काव्यें, नाटकें, वगैरे या कालांत लिहिले गेले.

सुफी लेखकांपेक्षां निराळा ग्रंथकार म्हणजे शेख सादी होय. त्याचे 'बोस्तां' व 'गुलीस्तां' हे अत्यंत प्रसिद्ध ग्रंथ आहेत. या नीतिपर ग्रंथांनंतर प्रेमपर ग्रंथ निघूं लागले. हाफीझ याच्या अप्रतिम रसात्मक काव्याचे नमुने अवश्य वाचण्यासारखे आहेत. यापुढें गझलाचा काळ आला. दिल्ली या मुसलमानी राजधानींतहि अमीर हसन व अमीर खुश्रू यांसारखे मोठे कवी होऊन गेले. दिल्लीच्या राजांचे पद्यमय इतिहास फारसींत आढळतात.

इराणात नाटकें मोहरमच्या सणांत होत, पण तीं नाटकें हसन-हुसेनच्या दुःखमय प्रसंगांवर असत. नंतर स्वतंत्र कथानकें नाटककार निवडूं लागले.

फारसी वाङ्मयात इतिहासाचा भाग मोठा महत्त्वाचा आहे. इतिहासाच्या या साहित्यांत अनेक दोष व काल्पनिक गोष्टी असल्या तरी इतिहास-संशोधकांना या साहित्याचा फार उपयोग होतो. इलियटच्या हिंदुस्थानच्या इतिहासाला हींच साधनें उपयोगी पडलीं आहेत. महंमद पैगंबरापासून १९ व्या शतकापर्यंतचीं वर्णनें फारसी इतिहासांत अपरंपार आढळतील.

इतिहासाच्या खालोखाल भूगोल व प्रवासवर्णन यांवरचे ग्रंथ आहेत. रामायण, महाभारत व पुराणें, तसेंच संस्कृत काव्यादि ग्रंथ यांतील भाषांतरित उतारे व रूपांतरें किती तरी झालेलीं दिसतात. अकबर, दाराशुको, वगैरे राजपुरुषांनीं हिंदु धर्मग्रंथांचीं फारसींत भाषांतरें करून घेतलीं.

चरित्रें आणि आत्मचरित्रें यांची चागली भर या फारसी वाङ्मयांत पडलेली आहे. बाबरासारख्या राज्यकर्त्यांनीं स्वतःचा इतिहास लिहिलेला आहे.

१९ व्या शतकापासून इराणांत नवीन तऱ्हेचें वाङ्मय निघूं लागलें. गुलशान कवीचा पुत्र काआनी (१८०७–१८५४) हा या काळांतील प्रथम श्रेणीचा कवि होय. त्याच्या 'काशीद' मधील कविता फारच गोड आहेत. पण काआनी हा क्रांतिकारक कवींपैकीं नव्हे. या कवींचें काव्य राजकीय विषयावरचें असून बहुजनसमाजाला जागृत करणारें असे. या कवींचा अग्रणी आमीरी (१८६०–१९१७) होय. त्यानें वृत्तपत्रेंहि काढलीं होतीं व त्याचें गद्यलिखाणहि बरेंच आहे. इराणवरील जुलुमी राजसत्ता १९०६ सालीं नवीन घटना होऊन गेली तेव्हां वाङ्मयांतहि फरक पडला. लोकांच्या राष्ट्रीय भावना जागृत करण्याला 'सुरूद' व 'तस्नीफ' या जातीचीं पदें फार उपयोगी पडलीं. छापखाने निघाल्यापासून काव्यरचनेंतहि फार फरक पडला. जामी कवीनंतर काव्य म्हणजे कांहीं तरी निरर्थक व गूढ शब्दजाल होऊन बसलें होतें; शब्दलालित्य होतें, पण त्यांत कृत्रिमता भरली होती. अतिरिक्त स्तुतिपर वर्णनेंच फार. नवीन क्रांतिकारक लेखकांनीं पाश्चात्यांचें अनुकरण करून जुने नियम, परंपरा, वगैरे पार झुगारून दिल्या. देशभक्तीची ज्योत जनतेंत फुलविली व रशिया आणि इंग्लंड यांच्या दास्यांत न राहण्याविषयीं शिकवण दिली. अदीबे पीशावरी हा या नवीन वळणांतील एक पुढारी साहित्यिक म्हणून सागता येईल. पिशावरीचा शिष्य बहार हा खोरासानमधील राष्ट्रीय पक्षाचा नेता होता. त्याच्या लेखनांत राजकारण तत्त्वज्ञानांत घोळविलें आहे. आरीफ हाहि उत्कृष्ट राष्ट्रीय कवि म्हणता येईल.

पर्वनि इतिषामी ही विदुषी सुंदर व बुद्धिवादी पद्धतीनें लिहिते. तिनें गोषापद्धतीवर जोराचा हल्ला चढविला आहे. शहारियार व लाहूती हे कवीहि आघाडीवरचे आहेत. अलीकडच्या फारसी वाङ्मयांत अरबी शब्द मागें पडून युरोपियन शब्द येत चाललेले दिसतात.

नवीन लोकशाही घटनेच्या अमदानीपासून लेखकांच्या मनावरील धार्मिक पगडा उडून जाऊन वाङ्मय सामान्य लोकांना समजणारें निघूं लागलें. फारसी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्यास कांहीं लेखक सरसावले. युरोपियन वाङ्मयातील कांहीं ग्रंथांचीं भाषांतरें-रूपांतरें प्रसिद्ध होऊं लागलीं. नवीन पद्धतीचीं नाटकें पुढें आलीं व एकंदरींत नवीन राजकीय व सामाजिक वारे वाङ्मयांत देखील वाहूं लागले आहेत.

**फारीनहैट, गाब्रियल डानियल** (१६८६–१७३६)—एक जर्मन पदार्थविज्ञानी. हा फारीनहैट उष्णमानमापक यंत्राचा जनक होय. आर्द्रतामापक यंत्रातहि यानें सुधारणा करून नवीन पद्धत बनविली. स्वतःच्या निर्वाहासाठीं हा हवामानाचीं उपकरणें विकी.

फारीनहैट उष्णमानमापक (थर्मामीटर) वर पाणी उकळण्याचा बिंदु २१२ अंश व थिजण्याचा बिंदु ३२ अंश असतो.

**फारोहा**—ही बायबल ग्रंथात ईजिप्तच्या प्राचीन राजाना लावलेली पदवी आहे. या नांवाचा मूळ अर्थ राजगृह, राऊळ

असा असून पुढें हें नांव तत्कालीन सरकारला व खुद्द राजाला लावण्यात आलें. नेचो फारोहापर्यंत या फारोहांचीं नांवें बायबलांत नाहींत. आब्राहामच्या वेळेस बहुधा हैक्सोस व मोझेसच्या वेळेस दुसरा रामेसेस असावा.

**फॉर्च्यून, रॉबर्ट** ( १८१३–१८८० )—एक स्कॉटिश वनस्पतिशास्त्रज्ञ व प्रवासी. तो १८४३–१८४६ पर्यंत चीनमध्यें होता. १८५१ सालीं त्यानें हिंदुस्थानांतील वायव्य प्रांतांत चिनी चहाच्या झाडाची लागवड प्रथम सुरू केली. त्याचे ग्रंथ आहेत ते : 'थ्री इयर्स वॉंडरिंग इन् दि नॉर्दर्न प्राव्हिन्सेस ऑफ चायना' (चीनच्या उत्तर प्रांतांतील तीन वर्षांचें भटकणें) आणि 'ए रेसिडन्स अमंग दि चायनीझ्' (चिनी लोकांत वस्ती).

**फालर्झ**—ही एक अशोधित तांब्याची धातु असून हिचा रंग पोलादाप्रमाणें करडा किंवा लोखंडाप्रमाणें काळा असतो. याचे चतुष्कोणी स्फाटिक पडतात. विशिष्टगुरुत्व ४·५ तें ५·१ असतें.

**फालसा**—हें झाड फार मोठें होतें. याचीं फळें पिंपरीच्या फळांसारखीं असतात व रंग जांभळा असतो. हीं खाण्यास गोड लागतात. या फळांचें सरबतहि चांगलें लागतें. उत्तर हिंदुस्थानांत हीं झाडें फार होतात. पित्तावर व दाह होत असल्यास फळें पाण्यांत कोळून देतात.

**फॉसेट, हेन्री** ( १८३३–१८८४ )—एक इंग्रज अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी. याचे आईबापहि राजकीय व सामाजिक कार्यकर्ते होते. १८५६ मध्यें हा रँग्लर झाला. त्याच वर्षी दुर्दैवानें बंदुकीच्या छऱ्यांनीं त्याची दृष्टि गेली. १८५९ पासून त्याचे अर्थशास्त्रविषयक व इतर लेख प्रसिद्ध होऊं लागले. १८६३ मध्यें अर्थशास्त्रावरचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यानंतर त्याला केंब्रिजमध्यें अर्थशास्त्राचा प्राध्यापक नेमण्यांत आलें. १८६५ त त्याचा पार्लमेंटमध्यें प्रवेश झाला. १८६७ मध्यें त्याच्यासारख्याच लेखनपटु समाज-सुधारणावादी स्त्रीशीं त्याचें लग्न झालें. हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाचा तो बारीक नजरेनें अभ्यास करी व पार्लमेंटमध्यें त्यावर सडकून टीका करी. यामुळें त्याला हिंदुस्थानतर्फेचा सभासद असें म्हणत असत. १८८० सालीं त्याला पोस्टमास्तर जनरल नेमण्यांत आलें. मजूरविषयक कायद्यास व कार्यास त्याची नेहमीं अनुकूलता होती; समाजसत्तावादाला तो पूर्ण विरोधी होता.

**फाहिआन** ( **फाशीन** )—एक प्रख्यात चिनी प्रवासी. बुद्धाची जन्मभूमि पाहावी, बुद्धचरित्रांतील इतर स्थळांचेंहि अवलोकन करावें, बुद्धचरित्राची मिळेल ती विश्वसनीय माहिती गोळा करावी, विनयपिटकाची अस्सल प्रत जमल्यास मिळवावी, इकडील बौद्धभिक्षूंपासून शिकतां येईल तें शिकावें, यांप्रमाणें उद्देश ठेवून फाहिआन मोठा व कष्टप्रद प्रवास करून चीनमधील मोठी भिंत ओलांडून, सर्व प्रकारचे हाल सोसून व वाटेंत नाना देश हिंडून हिंदुस्थानांत आला. त्यानें केलेलें दीर्घ पर्यटन व प्रवासांतील सर्व हकीगत यांचें वर्णन त्यानें फार सुंदर रीतीनें लिहून ठेवलें आहे. तो हिंदुस्थानांत १० वर्षे होता ( ४०१–४१० ) व त्या वेळीं बौद्ध धर्माचें केवढें प्राबल्य होतें हें त्याच्या हकीकतीवरून दिसून येतें. फाहिआननें इतर अनेक देशांत प्रवास केला व धर्मग्रंथ जमवले. पण त्याचा प्रवास केवळ धार्मिक बाबींसाठीं होता, त्यामुळें त्याच्या वर्णनांत इतर माहिती फारच थोडी आहे. परंतु त्याचें लेखन विश्वसनीय आहे. सिलोन, जावा, यांगसे किसांग या मार्गानें तो परत गेला. याहि मार्गांत त्याला फार त्रास सोसावा लागला. इ. स. ३९९ ते ४१४ या अवधींत त्यानें हा सर्व प्रवास केला.

**फाळके, धुंडिराज गोविंद** ( १८७०–१९४४ )—हिंदी सिनेमाधंद्याचे जनक. यांचा जन्म त्र्यंबक या तीर्थक्षेत्रीं झाला. मुंबईच्या मराठा हायस्कूलमधून प्राथमिक शिक्षण घेऊन यांनीं जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्स ( मुंबई ) व कलाभवन (बडोदें) येथील अभ्यासक्रमहि संपवले. यानंतर हे जर्मनीस गेले व तिकडून फोटो–लिथोग्राफी, फोटो–एन्ग्रेव्हिंग व ट्रायक्रोमॅटिक प्रोसेस, इ. विषयांचें शिक्षण घेऊन व चित्रकला धंद्याला लागणारी सामुग्री घेऊन स्वदेशीं परत आले. इकडे आल्यावर यांनीं 'आर्ट प्रिंटिंग वर्क्स'ची स्थापना केली. याच संस्थेचें नांव पुढें "लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग वर्क्स" असें ठेवण्यांत आलें. पण १९१२ सालीं यांनीं या संस्थेचा संबंध तोडला.

यानंतर मुंबईस जो ख्रिस्तचरित्रावरील चित्रपट दाखविण्यांत आला तो पाहून आपणहि आपल्याकडील पौराणिक विषयांवर असे चित्रपट काढावेत असें यांच्या मनानें घेतलें. व त्याप्रमाणें जरूर तें साहित्य जर्मनीस जाऊन यांनीं आणलें. १९१३ सालीं 'राजा हरिश्चंद्र' हा याचा पहिला चित्रपट बाहेर पडला. यानंतरचे यांचे चित्रपट म्हणजे 'मोहिनी-भस्मासुर' व 'सावित्री' हे होत. हे दोन चित्रपट घेऊन १९१५ सालीं यांनीं युरोपची सफर केली व तिकडील लोकांकडूनहि एक यशस्वी दिग्दर्शक म्हणून वाहवा मिळवली.

यानंतर कांहीं धनिक लोकांचें आर्थिक सहकार्य घेऊन यांनीं 'हिंदुस्थान फिल्म कंपनी' काढली व या कंपनीनें लंकादहन, कालियामर्दन, श्रीकृष्णजन्म, इत्यादि चित्रपट काढून कीर्ति व पैसा मिळविला. १९३७ सालीं कोल्हापूर येथील सिनेटोनमध्यें तयार झालेला 'गंगावतरण' हा बोलपट यांनींच दिग्दर्शित केलेला असून त्यांतील 'ट्रिक फोटोग्राफी'बद्दल त्यांची सर्वत्र प्रशंसा झाली. पण पुढें यांना या धंद्यांत फारसें यश मिळालें नाहीं. तथापि

त्यांचें राहण्याचें मुख्य ठिकाण रशिया आहे. बाल्टिकपासून सायबेरियापर्यंतच्या जंगलांत व विशेषतः सरोवरें व नद्या यांच्या कांठीं यांची वस्ती असते. त्यांना राजकीय सत्ता नसल्यानें त्यांना फारसें महत्त्व नाहीं. पण रशियाच्या उत्तर, मध्य व पूर्व प्रांतांमध्यें यांची संख्या फार आहे. महारशियन व लघुरशियन यांच्यामध्यें जो फरक दृष्टीस पडतो तो फिनिश रक्ताच्या भेसळीचा परिणाम होय.

फिनो-उग्रिअन जाती शरीरानें फार वळकट, ठेंगू अगर मध्यम व चपट्या बांध्याच्या असतात. यांची कातडी पांढरट, डोळे घारे व निळे, केंस थोडे व दाढी फारच कमी असते. यांच्यामध्यें मानसिक अगर शारीरिक उत्साह असावा तितका दिसून येत नाहीं. ते जड, संशयी, खुनशी व मलूल असे दिसतात. उलट-पक्षीं ते उद्योगी, शांत, विश्वासूक, प्रामाणिक व आतिथ्यशील आहेत.

**फिन्लंड**—रशिया, स्वीडन व नॉर्वे यांच्या हद्दींस लागून असलेलें उत्तर युरोपमधलें एक लोकशाही राज्य. याचा बहुतेक पश्चिम किनारा बाल्टिक समुद्रावर आहे व त्याची लांबी १२०० मैल आहे. दक्षिणेस फिन्लंडचें आखात २५० मैल-पावेतों आंत आलें आहे. क्षेत्रफळ १,३४,५८८ चौरस मैल. बाल्टिक समुद्रांतील आलंड बेटांचा समावेश यांतच होतो. बहुतेक प्रदेश सपाट असून मोठमोठीं सरोवरें व नद्या अनेक आहेत. लो. सं. ३८,८७,२१७. कित्येक शतकें हा प्रदेश स्वीडनचाच एक भाग होता. १८०९ मध्यें तो रशियाकडे आला. १९१७ मध्यें त्याचे स्वतंत्र संस्थान झालें. १९३९ सालीं १६,१७३ चौ. मै. चा मुलूख रशियाला द्यावा लागला. तेव्हां १९४१ मध्यें फिन्लंड जर्मनीच्या बाजूनें रशियाशीं लढूं लागलें. १९४४ सालीं रशिया आणि ग्रेट ब्रिटन यांशीं तह होऊन युद्ध थांबलें. या संस्थानांत मेट्रिक पद्धतीचीं वजनें-मापें आहेत. हा देश मुख्यतः कृषिप्रधान आहे. येथें मच्छीमारी हा फार मोठा धंदा आहे. अरण्यें पुष्कळ आहेत. मोलवान् इमारती लांकडाची निर्यात होते. या देशांत तीन विद्यापीठें आहेत. लष्करी शिक्षण सक्तीचें आहे. हेल्सिंकी हें राजधानीचें ठिकाण आहे.

प्रथम या देशांत लॅप लोकांची वस्ती होती; पण ८ व्या शतकांत बाल्टिक समुद्राच्या दक्षिणेकडील प्रदेशांतून फिन्स लोक येऊन वरचढ झाले. आज फिन्लंडमध्यें ९० टक्के फिन्स लोक आहेत. हे फिनो-उग्रिअन (पाहा) वंशांतले आहेत.

**फिन्ले, जॉर्ज** (१७९९–१८८५)—एक ब्रिटिश इतिहासकार. त्याचा मुख्य ग्रंथ 'रोमन विजयापासून १८६४ पर्यंतचा ग्रीसचा इतिहास' हा होय. हा ग्रंथ त्यानें अनेक विभागांत निरनिराळीं नांवें देऊन प्रसिद्ध केला.

**फिन्सबरी**—इंग्लंड, लंडन विभागांतील एक शहर. याला पार्लमेंटमध्यें दोन सभासद पाठविण्याचा हक्क आहे. लोकसंख्या ६९,८८८. घड्याळें, कागद, चित्रकला, मौल्यवान् वस्तूंचीं कामें, वगैरे उद्योगधंदे चालतात. या शहराजवळ १६ व्या शतकापावेतों फार मोठी दलदल होती, ती यत्नपूर्वक नाहींशी करण्यांत आली व तेथें मोठालीं मैदानें करण्यांत आलीं.

**फिन्सेन, नील्स रायबर्ग** (१८६०–१९०४)—एक डॅनिश वैद्यकशास्त्रज्ञ. यानें प्रचारांत आणलेली एक शस्त्रक्रियेची पद्धति आहे. हिचा उपयोग विशेषतः क्षयरोगाच्या कांहीं प्रकारांमध्यें–उदा., त्वचाक्षय (लुपुस) या रोगात–करण्यांत येतो. या पद्धतींत प्रकाशाचे रासायनिक किरण विशेष तीव्र स्वरूपांत द्यावयाचे असतात. हा प्रकाश सूर्याचा किंवा विजेचा उपयोगांत आणण्यांत येतो व त्याकरितां स्वतंत्र उपकरणें लागतात. अतिनीललोहित (अल्ट्रा व्हायोलेट) फिन्सेन दिव्याचा शोधक व प्रकाशलेखनचिकित्से( फोटोथेरॅपी )चा जनक हाच होय. याला १९०३ सालीं नोबेल पारितोषिक मिळालें.

**फिरती पट्टी**—(स्लाइड रूल). गुणाकार, भागाकार, वगैरे नुसत्या हस्तक्षेपानें करण्याचे साधन. यामुळें पुष्कळसा वेळ वांचतो. या मापनपट्टीच्या मधोमध एक खोबण असते व तींत फिरती पट्टी सरकते. फिरत्या पट्टीच्या दोन्ही कडांवर संख्यांच्या घातांकाच्या प्रमाणांत खुणा केलेल्या असतात. अशाच खुणा मूळ पट्टीवर असतात. मोठ्या संख्यांचे गुणाकार करतां यावे म्हणून मुख्य भागाचे लहान विभाग करतात. गुणाकार करावयाचा असल्यास संख्यांच्या घातांकांची बेरीज करावी लागते. दोन संख्यांचा गुणाकार करावयाचा असल्यास पहिली संख्या मूळ पट्टीवर पाहावी व तिच्याखालीं फिरत्या पट्टीवर असलेली निदर्शक खूण (इन्डेक्स मार्क) आणावी, म्हणजे फिरत्या पट्टीवर दुसरी संख्या असेल त्या बिंदूसमोर मूळ पट्टीवर गुणाकार करून आलेली संख्या सांपडेल. पट्टीवर केलेल्या खुणा जरी घातांकाच्या प्रमाणांत असतात तरी ज्या संख्येचे ते घातांक असतात त्याच संख्या त्या खुणा वर दर्शवितात. भागाकार करते वेळीं फिरत्या पट्टीवर दर्शविलेली भाजकाची संख्या मूळ पट्टीवर भाज्य संख्येच्या खुणेखालीं आणावी, म्हणजे मूळ पट्टीवर निदर्शक खुणेसमोर उत्तर दिसतें. भागाकार करते वेळीं भाज्याच्या घातांकांतून भाजकाचा घातांक उणा करावयाचा असतो.

**फिरदौसी** (९३५–१०२५)—एक प्रसिद्ध इराणी कवि. याचें संपूर्ण नांव अबु अल्-कासिम हसन इब्न अली असें आहे. हा मशाद (जुनें नांव तुझ) येथें जन्मला. 'इराणचा होमर' असें याचें वर्णन करतात. 'शाहनामा' (राजांचें पुस्तक) हा त्याचा

जगप्रसिद्ध ऐतिहासिक काव्यग्रंथ आहे. त्यात ६० हजार श्लोकांत इराणी इतिहास सायंत आला आहे. सतत ३० वर्षांच्या त्याच्या मेहनतीचें हें फळ होय. हें महाकाव्य अतिशय सुंदर व कल्पनारम्य असून अनेक कथांनीं खचलेलें आहे. 'मस्नवी' हें त्याचें दुसरें काव्य यूसफ आणि त्याची पत्नी झुलयखा यांच्यावर आहे. सुलतान महमूदनें त्याचा घ्यावा तसा परामर्ष न घेतल्यानें त्यानें सुलतानावर एक कडक व्यंग्यकाव्य लिहून तो पळून गेला.

**फिरोझपूर**—पूर्व पंजाब, जालंदर विभाग, एक जिल्हा. क्षेत्रफळ ४,०८५ चौ. मै.. जमीन सपाट असून उत्तर भागांत जंगल बरेंच आहे. हवा रुक्ष पण आरोग्यकारक आहे. या भागांत पूर्वीं पोवार रजपूत राजांचा अमल असावा. पहिल्या मुसलमान स्वारीच्या वेळीं येथें रजपूत वसाहती होत्याच. फिरोझपूर किल्ला १३७० मध्यें फिरोझशहानें बांधला. मध्यंतरी जाट व शीख यांचा अमल होता. हा जिल्हा १८३५ मध्यें इंग्रजाकडे आला. लोकसंख्या (१९४१) १४,२३,०७६. शेंकडा ४७ मुसलमान, २९ हिंदू व २४ शीख आहेत. यांत १५०७ गांवें व ८ शहरें आहेत. मुख्य पिकें गहूं, चणे, ज्वारी, बाजरी, तांदूळ, मका व ऊंस हीं आहेत. फिरोझपूर हें तालुक्याचें व जिल्ह्याचें ठिकाण. वस्ती सु. ५०,००० आहे. गांव भरभराटीचा आहे. येथें लष्करी छावणी आहे. मुलांमुलींचीं हायस्कुलें व इतर संस्था आहेत.

**फिरोझशहा तुघ्लक** (राज्य. १३५१–८८)—दिल्लीच्या तुघ्लख घराण्यांतील एक बादशहा. महंमद तुघ्लखानंतर सैनिकांनीं याला निवडलें. हा त्याचाच चुलतभाऊ होता. घियासुद्दिननें यास लहानाचा मोठा केलें व महंमद तुघ्लकाच्या हाताखालीं याचें सर्व शिक्षण झालें. याची आई रजपूत घराण्यांतील होती. गादीवर आल्यावर यानें महंमदाच्या कारकीर्दीतील अंदाधुंदी नाहींशी करून महसूल खात्यांत सुधारणा केल्या, यमुनेवरील कालवा यानेंच बांधला व बरींच शहरें वसविलीं (उदा., जौनपूर, फिरोझाबाद, इ.). याच्या वेळीं यास नजराणा म्हणून गुलाम पाठवण्याची पद्धत होती. या गुलामांना शिक्षण देऊन त्यांच्याकडून काम करवून घेतलें जाई. बंगालवर यानें दोनदां स्वाऱ्या केल्या. हा कट्टर हिंदुधर्मद्वेष्टा होता; तथापि मुसलमानी धर्माप्रमाणें योग्य न्यायदान करी. औरंगजेबाप्रमाणें तो कुराणांतील नियम तंतोतंत पाळी. त्यानें हिंदूंचीं होतीं तीं देवळें पाडलीं नाहींत, पण त्यांना नवीं बांधूं दिलीं नाहींत. सर्व हिंदूंवर त्यानें जिझिया कर बसविला. तो लष्करी अधिकाऱ्यांना व मंत्र्यांना बादशाही खजिन्यांतून पैसे न देता त्यांना सरंजाम देई. त्याचा प्रसिद्ध वझीर मकबूलखान ऊर्फ खानजहान हा बाटलेला हिंदु असून फार हुषार होता.

**फिलाडेल्फिआ**—अमेरिकन संयुक्त संस्थानांतील पेन्सिल्व्हेनिया संस्थानचें मुख्य शहर व बंदर. लो. सं. १८,३१,३३०. येथें जर्मन, इंग्लिश, आयरिश, स्कॉटिश, ऑस्ट्रेलिअन, वगैरे सर्व देशचे लोक आहेत. नीग्रोहि बरेच आहेत. अमेरिकन स्वातंत्र्याचा मूळ जाहिरनामा ता. ४–७–१७७६ रोजीं ज्या प्रसिद्ध इमारतींत मंजूर करण्यांत आला तो 'इंडिपेन्डन्स हॉल' येथेंच स्टेट हाउस या इमारतींत आहे. येथें सर्व प्रकारच्या शिक्षणाची सोय असून व्यापाराचें हें एक महत्त्वाचें ठिकाण आहे. येथें संस्थानचें विद्यापीठ असून अनेक महाविद्यालयें व संस्था आहेत. विद्या आणि कला यांचें हें माहेरघर समजतात. नौकाबंधन, आगगाड्या, एंजिनें व सतरंज्या यांसाठीं हें शहर अमेरिकेंत प्रसिद्ध आहे. व्यापार फार मोठा असून बंदर उत्कृष्ट आहे. विल्यम पेन यानें १६८२ सालीं याची स्थापना आपल्या वसाहतीची राजधानी म्हणून केली.

**फिलिप**—या नांवाचे अनेक राजे युरोपात झाले; त्यांत मॅसिडोनिया, फ्रान्स व स्पेन येथील फिलिप प्रसिद्ध आहेत. मॅसिडोनियाचा दुसरा फिलिप (ख्रि. पू. ३८२–३३६) यानें अगदीं लहान राज्यापासून सुरुवात केली. जगप्रसिद्ध अलेक्झांडर हा याचाच मुलगा. फ्रान्सचा दुसरा फिलिप (११६५–१२२३) यानें धर्मयुद्धांत भाग घेतला व फ्रान्सचें राज्य एकछत्री केलें. स्पेनचा दुसरा फिलिप (१५२७–१५९८) हा १५५१ मध्यें राज्यावर आला. १५५६ मध्यें चार्लसनें बादशाही गादीवरचा हक्क सोडल्यामुळें याच्या ताब्यांत स्पेनच्या वसाहती व इटली, नेदर्लंड, मिलन, वगैरेकडील अवाढव्य मुलूख आला. रोमन कॅथॉलिक पंथाचा हा कट्टा अभिमानी होता व त्यामुळें त्याला नेदर्लंड, फ्रान्स व इंग्लंड यांच्याशीं युद्धें करावीं लागलीं. इंग्लंडच्या मेरीबरोबर याचें लग्न झालें होतें व १५८८ त यानें इंग्लंडवर पाठविलेल्या 'आर्माडा'चा पराभव झाला. हा मोठा कर्मयोगी होता व राजा या दृष्टीनें आपल्या कर्तव्याची त्याला जाणीव होती. पोर्तुगाल जिंकल्यावर त्यानें तेथील लोकांच्या मनोवृत्ति व हक्क यांजकडे लक्ष दिलें व मध्यम वर्गीयांचीहि अनुकूलता मिळविली.

**फिलिपाइन बेटें**—आशिया खंडाच्या पूर्व किनाऱ्यापासून फार दूर, व चीनचा समुद्र व पॅसिफिक महासागर यांच्या दरम्यान हीं बेटें आहेत. मलाया द्वीपसमूहामध्येंच हीं भौगोलिक दृष्ट्या मोडतात व त्यांत ह्यांचा गट सर्वांत मोठा आहे. १५२१ मध्यें मॅगेलान याला यांचा शोध लागला. १५६५ मध्यें तीं स्पेननें आपल्या ताब्यांत घेतलीं. स्पेनचा राजपुत्र फिलिप याच्या नांवावरून या बेटांना नांव पडलें. स्पॅनिश–अमेरिकन युद्धाच्या वेळीं तीं अमेरिकेनें विकत घेतलीं (१८९८). यानंतर लगेच स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं फिलिपिनो लोकांची झालेली चळवळ दडपून टाक-

ण्यांत आली तरी पुढें १९३५ सालीं कॉमन्वेल्थ ऑफ फिलिपाइन्स स्थापण्यांत येऊन त्यांना स्वातंत्र्य देण्यांत आलें. १९४२ मध्यें जपाननें हीं हस्तगत केलीं होतीं, पण १९४५ त अमेरिकेनें परत घेऊन पुढील सालीं तेथें लोकशाही स्थापन केली.

फिलिपाइन बेटें सुमारें ७०८३ आहेत. त्यांतलीं २४४१ साधारण महत्त्वाचीं आहेत. त्यांचें क्षेत्रफळ १,१५,६०० चौ. मैल आहे. त्यांची एकंदर दक्षिणोत्तर लांबी ११५२ मैलांची आणि जास्तींत जास्त रुंदी ६८२ मैल आहे. लो. सं. १,६३,५०,०००. मॅनिला हें राजधानीचें ठिकाण आहे. मॅनिला उपसागरानें ७७० चौ. मै. चें क्षेत्र व्यापलें आहे. कमीअधिक प्रमाणांत जागृत ज्वालामुखी बरेच आहेत. डोंगरांच्यामध्यें सुपीक अशीं मोठालीं मैदानें आहेत. साखर, अबाका (मॅनिला ताग), तंबाखू, नारळ, खोबरें, खोबरेल, तांदूळ, कॉफी, लांकूड, केळीं, सोनें व इतर धातू यांचा व्यापार चालतो.

मॅनिला येथें फिलिपाइन्स विद्यापीठ आहे व सॅन्टो टोमास या ठिकाणीं १६११ त स्थापन झालेलें सर्वांत जुनें असें डोमिनियन विद्यापीठ आहे. या लोकराज्यातील बहुसंख्याकांचा धर्म रोमन कॅथॉलिक आहे. सुमारें ५०,००० बौद्धधर्मी व सात लक्ष लोक मुसलमान आहेत. लोकशाही सरकारनें टागालोग (एक मलायी पोटभाषा) ही राष्ट्रभाषा ठरविली असून दहा वर्षेंपर्यंत इंग्रजी भाषा सक्तीची म्हणून राहणार आहे. या राज्यांत सुमारें ६४ देशी भाषा असून त्यांतील ८ प्रमुख आहेत. १९४० सालीं इंग्रजी, स्पॅनिश व देशी भाषा यांत प्रसिद्ध होणारीं ३६० वृत्तपत्रें निघत होतीं. मॅनिला येथें एक मोठें मध्यवर्ती ग्रंथालय आहे व त्याच्या शाखा इतर शहरांतून आहेत.

**फिलिप्स, स्टीफन्स** (१८६८–१९१५)—एक ब्रिटिश नाटककार व कवि. त्याचे मुख्य काव्यसंग्रह—'मार्पेसा', 'ईरेमस' आणि 'ख्राइस्ट इन् हेड्स' हे आहेत. त्यानें नाटकें लिहिलीं तीं म्हणजे— 'पाओलो ॲन्ड फ्रॅन्सेस्का', 'हेरॉड', 'यूलिसस', 'दि सिन ऑफ डेव्हिड', व 'नेरो' हीं होत.

**फिलेमॉन** (खि. पू. ४ थें शतक)—एक ग्रीक नाटककार. तो कांहीं काळ टॉलेमी राजाच्या दरबारीं होता आणि त्यानें केलेल्या एका नाटकाला इतकें अकल्पित यश आलें कीं, त्या आनंदानें बेहोष होऊन हंसतां हंसतांनाच त्याचा प्राण गेला, असें म्हणतात. त्याच्या सत्तावन सुखान्त नाटकांचे उल्लेख आहेत, पण त्यांतील एकाहि नाटक आज उपलब्ध नाहीं.

**फिशर, हर्बर्ट आल्बर्ट लॉरेन्स** (१८६५–१९४०)—एक ब्रिटिश इतिहासकार व राजकारणी पुरुष. त्याला १९१२ सालीं शेफील्ड विद्यापीठाचा कुलगुरु (व्हाइस-चॅन्सलर) नेमलें. १९१६ सालीं तो सरकारी शिक्षणमंडळाचा अध्यक्ष झाला. नंतर इंग्लंडचा शिक्षणमंत्री झाल्यावर १९१८ सालीं त्यानें शिक्षणाचा कायदा मंजूर करून घेतला. ऑक्सफोर्ड येथील न्यू कॉलेजचा वॉर्डन म्हणून फिशरला १९२५ सालीं नेमण्यांत आलें. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'दि मीडीव्हल एम्पायर' (मध्ययुगीन साम्राज्य), 'नेपोलियन', 'स्टडीज् इन् हिस्टरी ॲंड पॉलिटिक्स' (इतिहास आणि राजकारण यांचा विशेष अभ्यास) हे होत.

**फिश्चर, अर्न्स्ट कुनो बर्थोल्ड** (१८२४–१९०७)—एक जर्मन तत्त्ववेत्ता. तो मर्यादित (मॉडिफाइड) हेगेलियन पंथाचा असून त्यानें कान्टचें तत्त्वज्ञान बरेंच लोकप्रिय केलें. त्याचे पुढील ग्रंथ आहेत —'लॉजिक ॲंड मेटॅफिजिक ऑर् दि डॉक्ट्रिन ऑफ सायन्स' (तर्कशास्त्र आणि भौतिकशास्त्र किंवा शास्त्रसिद्धांत), 'फ्रॅन्सिस बेकन ॲंड हिज सक्सेसर्स' (बेकन आणि त्याचे अनुगामी), 'लाइफ ॲन्ड कॅरेक्टर ऑफ बेनेडिक्ट स्पिनोझा' (स्पिनोझाचें चरित्र आणि चारित्र्य), आणि 'हिस्टरी ऑफ मॉडर्न फिलॉसफी' (आधुनिक तत्त्वज्ञानाचा इतिहास).

**फिसालिआ**—[वर्ग–जलव्याली (हायड्रोझोआ); उपवर्ग – सायफोनोफोरा]. सामुद्रीय प्राण्यांचा एक वर्ग. फिसालिआ ॲटलांटिका याला 'पोर्तुगीज लढाऊ जहाज' (मॅन ऑफ वार) म्हणतात. या जलव्याली जातींतील जीवांत एक किंवा अधिक वायुकोश असल्यामुळें या प्राण्यांना पाण्यावर तरंगतां येतें. जलव्याली वर्ग पाहा.

**फीडीआस** (खि. पू. ४९०–४३५)—एक अथीनियन शिल्पकार. अथेन्स शहरांत अथेनाचे तीन पुतळे फीडीआसनें केलेले होते असा उल्लेख पॅसेनिआसनें केलेला आहे. परंतु हे पुतळे हल्लीं अस्तित्वांत नाहींत. ऑलिंपिआ येथें झ्यूसचा खूप मोठा पुतळा (हस्तिदंत आणि सोनें यांचा) फीडीआसनें केलेला होता. जगांतील एक विशेष आश्चर्यकारक वस्तु अशी त्या पुतळ्याची ख्याति आहे. फीडीआसनें पेरीक्लीसच्या कारकीर्दींत अथेन्स शहरांत ज्या अतिशय उत्कृष्ट सुंदर इमारती बांधल्या गेल्या त्यांच्या बांधकामावर देखरेख केली. पार्थेनॉनचें शिल्पकामहि त्याचेंच असावें असें वाटतें. कारण त्यांत फीडीआसची विशिष्ट शिल्पकलापद्धति दृग्गोचर होते.

**फीनिक्स**—ईजिप्त देशांत या पक्ष्यासंबंधीं एक काल्पनिक समजूत आहे. ती अशी कीं, या पक्ष्याच्या वयास पांचशें वर्षें

झाली म्हणजे आपला मृत्यु समीप आला असें समजून हा स्वतःच आपली धूप व लांकडें यांची चिता रचून तिला पंखांनीं वारा घालून पेटवून देतो आणि स्वतःस जाळून घेतो; व त्याच चितेंतून पुन्हां जिवंत होऊन बाहेर पडून नवीन आयुष्यक्रमास सुरवात करतो. या समजुतींत, सूर्य रोज सकाळीं उषेच्या प्रभेंतून उत्पन्न होतो, या गोष्टीवर रूपक रचलेलें आहेसें दिसतें.

**फीलिंडग, हेन्री** (१७०७–१७५४) एक इंग्रज कादंबरीकार. त्याचें शिक्षण ईटन येथें झालें. त्यानें फार्स (प्रहसनें), सुखान्त नाटकें व विडंबनात्मक प्रहसनें लिहिण्यास सुरवात केली. त्याचें पहिलें सुखान्त नाटक 'लव्ह इन् सेव्हरल मास्क्स' (अनेक बुरख्यांखालील प्रेम) हें १७२८ सालीं ड्रुअरीलेन नाट्यगृहांत रंगभूमीवर आलें. नंतर तो लीडेन विद्यापीठांत जाऊन २ वर्षें राहिला. १७३० सालीं त्यानें विडंबनात्मक प्रहसन 'टॉम थम्ब' हें मार्केट थिएटरांत दाखवलें आणि तें अतिशय लोकप्रिय झालें. नंतर त्यानें तेंच प्रहसन वाढवून 'ट्रॅजेडी ऑफ ट्रॅजेडीज्' (शोकान्तांचा कळस) हें नांव दिलेलें नाटक प्रसिद्ध केलें. 'पास्किन' आणि 'दि हिस्टॉरिकल रजिस्टर' (ऐतिहासिक नोंदवही) हीं दोन विडंबनात्मक प्रहसनें तत्कालीन प्रधानमंडळाबद्दल लिहिलेलीं, त्या प्रधानमंडळाला इतकीं झोंबलीं कीं, प्रधानमंडळानें लायसेन्सचा कायदा करून घेऊन फीलिंडगचें लेखन बंद पाडलें. नंतर त्यानें कायद्याचा अभ्यास करून १८४० सालीं वकिलीची सनद घेतली. त्याच सालीं फीलिंडगनें 'पामेला' नांवाची कादंबरी प्रसिद्ध केली. त्याची सर्वांत उत्तम कादंबरी 'टॉम जोन्स' होय. हिची प्रशंसा कोलरीज व बायरन यांनींहि केली. 'आमेलिआ' (१७५१) ही त्याची शेवटची कादंबरी चांगल्यापैकीं होय. त्यानें कायदा व अर्थशास्त्र यांवरहि कांहीं निबंध लिहिले. फीलिंडगचा विनोदी लेखक म्हणून दर्जा उच्च असून पुढील कादंबरी वाङ्मयावर त्याचा फार हितावह परिणाम झाला. कारण अलीकडे मनोविश्लेषणाच्या भारदस्त नांवाखालीं जें समाजांतील गटार–घाण उपसण्याचें काम कादंबरी-नाट्य-वाङ्मयद्वारां चालू आहे, तसा प्रकार फीलिंडगनें मुळींच केला नाहीं.

**फुकोका**—जपान, क्यिउशिउ बेटाच्या वायव्य किनाऱ्यावर हें शहर आहे. लोकसंख्या २,४२,९००. हें व्यापाराचें महत्त्वाचें ठिकाण असून रेशमाविषयीं प्रसिद्ध आहे.

**फुगडी**—एक मुलींचा खेळ. यांत एका हाताची, दोन हातांची, बस फुगडी, दंड फुगडी, भुई फुगडी, कासव फुगडी यांसारखे कांहीं प्रकार आहेत. फुगड्या खेळतांना गाणीं म्हणतात किंवा उखाणे घेतात. 'खेळ ग फुगडी फुगडी। नको जाऊं तूं रडी ॥' हें तुकारामाचें गाणें प्रसिद्ध आहे. 'बस फुगडी, बसुंगा। चतुरशिंगी लालुगा।'; 'दंड फुगडी दंडाची। बाइल माझ्या दिराची।'; 'एका हाताची फुगडी। मामा देतो लुगडीं।'; 'एक भुई सारवूं सारवूं।', इत्यादि मुलींचीं जुनीं गाणीं जतन करण्यासारखीं आहेत. या खेळांत वर्तुळाकार फिरण्याची संवय व व्यायाम चांगला होतो.

लोळण फुगडींत प्रत्येक मुलगी आपल्या पायांचे अंगठे धरून लोळण घेते व तोंडानें 'काथवट कणा। चौघी जणी सुना। पाणी कां ग घाना।' इ. गाणें म्हणते.

**फुचौ**—चीन, फुकीएन प्रांताची राजधानी. परराष्ट्रीय व्यापारासाठीं १८४२ पासून खुलें बंदर. समुद्रापासून ३५ मैलांवर मिन नदीवर वसलें आहे. लो. सं. ३,२२,७२६. येथून चहाची निर्यात फार मोठ्या प्रमाणावर होते.

**फुजियामा**—फुशियामा. जपानमधील प्रसिद्ध व पवित्र मानलेला पर्वत. याचें बर्फाच्छादित शिखर स्वच्छ हवेंत शंभर मैलांवरून दिसतें. हा शंक्वाकृति सुप्त ज्वालामुखी होंडो बेटांत आहे. हा ज्वालामुखी १७०७ पासून निद्रिस्त आहे. फुजियामाची उंची १२,४०० फूट आहे. या पर्वताची शोभा फार सुंदर असून अनेक जपानी चित्रकारांनीं तिचा आपल्या चित्रकलेंत उपयोग केलेला आहे.

**फुफ्फुसदाह**—(न्युमोनिआ). न्युमोकॉकस या नांवाचा एक जंतु असतो; त्याच्या योगानें अनेक रोग उत्पन्न होतात. ह्या रोगामध्यें फुफ्फुसांची आग होते, ताप येतो व शरीरांत विषसंचय होतो. हा रोग सर्व जगभर पसरलेला असून फार तीव्र स्वरूपाचा आणि मृत्युकारक आहे. हा सर्व वयांच्या मनुष्यांस होतो. स्त्रियांपेक्षां पुरुषांमध्यें याचें प्रमाण अधिक आढळतें. कोणत्याहि कारणामुळें मनुष्य अशक्त झाला असतां हा रोग त्यास होण्याचा संभव असतो. हा रोग उलटण्याचीहि फार भीति असते. या रोगाचा प्रादुर्भाव हिंवाळ्याच्या शेवटीं व वसंत ऋतूच्या आरंभीं विशेष होतो. याच्या गर्भावस्थेचा काल फार अल्प असून हा एकदम थंडी वाजून ताप येऊन सुरू होतो. ताप वरचेवर चढूं लागून डोकें व अंग दुखूं लागतें व नंतर छातींत दुखूं लागतें, चेहरा लाल होतो, आणि श्वास जलद होऊं लागतो. डोळे चकाकित दिसूं लागून ओठांवर पुरळ येते. मधूनमधून खोकला येऊन कफांतून रक्त जाऊं लागतें. ही अवस्था सामान्यतः एक आठवडाभर राहते. याची तीव्र अवस्था तिसऱ्या दिवसापासून बाराव्या दिवसापर्यंत केव्हां तरी येऊन जाते. त्यानंतर रोग्यास उतार पडूं लागल्यास सर्व लक्षणें हळूहळू कमी होऊं लागून चांगली झोंप लागते. या रोगांत फुफ्फुसावरणदाह (प्लूरिसी) होण्याचाहि संभव असतो. तसेंच

हृदावरणदाह (पेरिकार्डिटिस) व मज्जातंतुदाह (मेनिन्जाइटिस) होण्याचा संभव असतो. या रोगातून बरा झाल्यास रोगी लवकर उठतो.

या रोगाचा दुसरा प्रकार आहे. त्यास श्वासनलिकादाह (ब्राँको न्युमोनिआ) म्हणतात. याचा उद्भव श्वासनलिकेस संसर्ग झाल्यामुळें होतो. त्याचा प्रादुर्भाव प्रथम खोकला झाल्यामुळें किंवा गोवर, डांग्या खोकला, घटसर्प किंवा इतर तापांमध्यें श्वासनलिकेंत विकार होऊन होण्याचा संभव असतो. स्वतंत्र रीतीनें हा रोग दोन वर्षांच्या आंतील मुलांस होतो व दुय्यम प्रकारचा रोग वर उल्लेखिलेल्या एखाद्या विकारानंतर होतो. सामान्यतः श्वासनलिकादाह पांच वर्षांच्या आंतील मुलास फार होतो व त्याचें कारण अस्थिमार्दव किंवा अतिसार हें असतें. या रोगाचा प्रकार वरीलप्रमाणेंच असून यामध्यें विशेष तीव्र अवस्था नसते व रोगी हळूहळू बरा होतो. या रोगामध्यें मृत्यूचें प्रमाण ३० ते ४० असतें व लठ्ठ मुलांपेक्षां हडकुळीं मुलें बरीं होण्याचा संभव अधिक असतो. या रोगामध्यें शुश्रूषा चांगली ठेवणें हें अत्यंत महत्त्वाचें आहे.

**फुप्फुसावरणदाह**—(प्लूरिसी). फुप्फुसावरील अंतस्त्वचायुक्त आवरणाचा दाह होऊन व कांहींसा स्राव होऊन हा रोग होतो. याचें स्वरूप बहुधा तीव्र असतें. फुप्फुसावरणाचा दाह होत असतां रक्तमय व तंतुमय असा एक स्राव होत असतो. याचें प्रमाण कांहीं वेळां इतकें अल्प असतें कीं, शरीरामध्येंच त्याचें शोषण होत असतें. यास कोरडा व्याधि म्हणतात. सामान्यतः या रोगाचा प्रादुर्भाव अचानकपणें होऊन थंडी वाजून फार जलद ताप चढूं लागतो. तसेंच खोकला येऊन त्याबरोबर भयंकर कळ येते. स्राव होऊं लागला म्हणजे कळ थांबते; परंतु श्वास घेणें जड होऊं लागतें. ज्या फुप्फुसाच्या बाजूस रोग असेल त्या बाजूवर निजण्याची रोग्याची प्रवृत्ति होते व त्यामुळें दुसऱ्या फुप्फुसाची क्रिया अधिक मोकळेपणानें होऊं लागते. हा रोग २० ते ४० या वयाच्या दरम्यान विशेष होतो. तसेंच क्षयापूर्वींहि हा रोग होण्याचा संभव असतो.

**फुप्फुसें**—सस्तन प्राणी, सरपटणारे प्राणी, पक्षी व जमिनीवर आणि पाण्यांत राहणारे प्राणी यांच्या श्वसनेंद्रियास फुप्फुसें असें म्हणतात. भूजलवासी (अॅम्फीबियन) प्राणी प्रथम आपल्या कल्ल्यांच्या साहाय्यानें श्वासोच्छ्वास करतात व पुढें फुप्फुसांच्या साहाय्यानें करूं लागतात. मनुष्यामध्यें मधाच्या पोळ्यासारख्या आकाराचीं पेशींचीं बनलेलीं फुप्फुसें असतात व त्यांस कंठनलिकांच्याद्वारां हवेचा पुरवठा होतो. या फुप्फुसांत अशुद्ध रक्ताचें शुद्धीकरण होतें. फुप्फुसांमध्यें कंठधमनींतून अशुद्ध रक्त येतें व तेथें श्वासाबरोबर आंत घेतलेल्या हवेंतील प्राणवायु त्यांत मिसळून तें शुद्ध होतें, व कंठधमनींतून हृदयामध्यें परत जातें.

१ उपरिभाग. २ अधोभाग. ३ श्वासनलिका. ४ दक्षिण लघुश्वासनलिका. ५ वाम लघुश्वासनलिका. ६ वाम लघुहृत्पुट. ७ वामोच्चवर्ती फुप्फुस-शिरा. ८ दक्षिणोच्चवर्ती फुप्फुस-शिरा. ९ वाम हृदयविवर. १० दक्षिण हृदयाविवर.

उजव्या फुप्फुसाचे तीन व डाव्या फुप्फुसाचे दोन भाग असतात. दोन्ही फुप्फुसावर एक पातळ अंतस्त्वचेचें आवरण असतें. त्यास फुप्फुसावरण (प्लुरा) म्हणतात. या फुप्फुसावरणाचा दाह होऊं लागला असतां फुप्फुसावरणदाह (प्लूरिसी) (पाहा) हा विकार होतो. हृदयाच्या दोन्ही बाजूंस दोन फुप्फुसें असतात. यांचा वरील भाग छातीच्या वरच्या पोकळींत कंठास्थीच्या सुमारें एक इंच वर असतो; व खालचा भाग हृत्पटावर म्हणजे पडद्यावर टेकलेला असतो.

**फुरसें**—एक सापाची जात. ही जात फार चपळ असते. या जातीच्या सापाचा रंग भुरकट किंवा पिंगट असून शरीराच्या दोन्ही बाजूंस पांढरी नागमोड रेघ असते. डोक्यावर साधारण त्रिशूळाच्या आकारासारखे पांढरे पट्टे असतात. हे साप सुमारें दोन फूट लांब असतात. कोंकणांतील रत्नागिरी जिल्ह्यांत व सिंध प्रांतांतील कांहीं जिल्ह्यांत हे फार सांपडतात. यांचें विष इतर विषारी सापाइतकें जहर नसतें.

**फुलगांव**—मुंबई, पुणें जिल्हा. पुण्यापासून ८ कोसांवर भीमेच्या काठीं हें गांव आहे. दुसऱ्या बाजीरावानें येथें एक चांगला वाडा बांधला होता व तो विलासासाठीं येथें येऊन राही. आज वाडा नाहीं. फक्त त्याचीं जोतीं व कांहीं भिंती दिसतात. नदीला पेशव्यांनीं मोठा घाट बांधला आहे. येथील श्रीमहादेवीचें देवालय प्रेक्षणीय आहे.

**फुलमार**—हे पक्षी उत्तर ध्रुवाकडे फार मोठ्या संख्येनें आढळतात. हे आपलीं घरटीं समुद्रांतील खडकांच्या कडांमध्यें

करतात. मादी एका वेळीं एकच अंडें घालते. यांचीं पिसें, पर व तेल यांचा मोठा व्यापार चालतो. पॅसिफिक महासागरांत यांची एक जरा मोठी जात आढळते व तिसरी दक्षिण ध्रुवप्रदेशांत दृष्टीस पडते.

**फुला**—आफ्रिकेंतील एक मुसलमान जात. बर्बर व नीग्रो यांच्यापासून ही संमिश्र जात उत्पन्न झाली. हे रेखीव बांध्याचे, मोकळ्या मनाचे, बुद्धिमान, कट्टे घर्माभिमानी, ऐषआरामी असे आहेत. हे खंदे घोडेस्वार व भालाईत आहेत. यांच्यांत फारसें शिक्षण नाहीं.

**फुले, ज्योतिबा गोविंद** (१८२७–१८९०)— महाराष्ट्रांतील एक समतावादी व सुधारणावादी ब्राह्मणेतर पुढारी. हे माळी जातींतील फुलमाळी पोटवर्गातले होते. वयाच्या सातव्या वर्षी शाळेंत जाण्यापूर्वी हे कांहीं दिवस बागकाम करीत असत. यांचें दांडपट्टा व नेमबाजी यांचें शिक्षण बंडखोर वासुदेव बळवंत फडके यांचे मांग जातीचे गुरु लहूजीबुवा

यांच्याजवळ झालें. बहुजनसमाजाला साक्षर केल्याखेरीज त्यांतील गुलामी वृत्तीचा नायनाट होणार नाहीं व त्याची खरी सुधारणा होणार नाहीं हें ज्योतिबांना पटतांच त्यांनीं त्या कामीं उत्साहानें भाग घेण्यास सुरुवात केली. अलोट कार्यनिष्ठा व लोकसेवावृत्ति या बाबतींत यांनीं ख्रिस्ती धर्मोपदेशकांचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवलें होतें. समाजाच्या तीव्र विरोधास टक्कर देऊन यांनीं १८५१ सालीं आपल्या अनेक ब्राह्मण मित्रांच्या साहाय्यानें पुण्यांत बुधवारांत एक मुलींची शाळा सुरू केली. याच शाळेच्या पुढें रास्ता, वेताळ, वगैरे पेठांत शाखा निघून त्यांना सरकारचा व सुधारणावादी लोकांचा पाठिंबा मिळाला. १८५२ सालीं यांचा सरकारतर्फे जाहीर सत्कार होऊन यांना दोनशें रुपयांची शालजोडी अर्पण करण्यांत आली. स्त्रीशिक्षणाबरोबरच १८५२ सालीं यांनीं वेताळ पेठेंत अस्पृश्यवर्गासाठीं दोन शाळा स्वखर्चानें सुरू केल्या. या शाळांत अस्पृश्यांच्या मुलांना पाणी पिण्याकरितां यांनीं स्वतंत्र हौद बांधला व आपल्या घराशेजारील हौदहि अस्पृश्यांच्या वापरासाठीं दिला.

विधवा–पुनर्विवाहाचेहि हे कट्टे पुरस्कर्ते असून १८६४ सालीं यांनीं अशा तऱ्हेचा एक विवाह घडवूनहि आणला. समाजांत वांकडें पाऊल पडलेल्या स्त्रियांवर भ्रूणहत्येचा प्रसंग येतो तो टाळण्यासाठीं यांनीं १८६४ सालीं 'बालहत्याप्रतिबंधकगृहा'ची स्थापना केली. या संस्थेंत गुप्तपणें स्त्रियांना प्रसूत होऊन जाण्याची व्यवस्था केलेली होती. याखेरीज अशा स्त्रियांना आपल्या घरींहि आश्रय देण्याइतकें मनोधैर्य यांनीं बाळगलें होतें. यांच्या प्रचारामुळेंच १८७५ सालीं पंढरपूर येथें 'बालहत्याप्रतिबंधकगृहा'ची जाहीर स्थापना करण्यांत आली.

ब्राह्मणादि लोकांच्या दास्यापासून व त्यांच्या स्वकार्यसाधक पौराणिक ग्रंथांपासून समाजांतील खालच्या वर्गाची मुक्तता करण्याकरितां यांनीं ता. २४ सप्टेंबर, १८७३ रोजीं सत्यशोधक समाजाची स्थापना केली. या समाजाच्या लवकरच कांहीं शाखा निघून तीनशेंवर सभासद झाले.

टिळक व आगरकर यांच्यावर कोल्हापूर प्रकरणांत अब्रूनुकसानीची फिर्याद झाली असतां यांनीं रामशेट उरवणे यांच्याकडून दहा हजारांचा जामीन देववून त्यांची सुटका केली. त्यानंतर त्यांचा पुणें व मुंबई येथें सत्कार करण्यांत यांनींच पुढाकार घेतला. रायगडावरील शिवाजीमहाराजांच्या मोडकळीस आलेल्या समाधीचा जीर्णोद्धार करण्यासाठींहि यांनीं परिश्रम घेतले.

यांच्या वेळच्या इतर सुधारकांप्रमाणें केवळ तात्त्विक मतप्रतिपादन व मर्यादित सुधारणा एवढ्यावर हे कधींच संतुष्ट राहिले नाहींत. मूळ समाजरचनेंतच बदल घडवून आणण्याची यांची महत्त्वाकांक्षा होती. तीसाठीं जुन्या समाजाला आधारभूत असणारा ब्राह्मणवर्ग व वेदपुराणादि धर्मग्रंथ यांवर यांनीं आपल्या प्रखर लेखणीनें जोराचे आघात केले.

(१) ब्राह्मणांचें कसब, (२) जातिभेदविवेकसार, (३) शूद्रांचीं गाऱ्हाणीं, (४) सार्वजनिक सत्यधर्मप्रकाश, वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

**फुलिकअन संस्थानें**—पतियाळा, नाभा व झिंद या संस्थानिकांचा मूळपुरुष फूल नांवाचा होता. त्याला सहा पुत्र

झालें, पण बंडखोरांची संख्या अवघी ३,००० होती. या बंडवाल्यांनीं कांहीं पोलिस स्टेशनें जाळलीं, पण बंदोबस्तास पाठवण्यांत आलेल्या ब्रि. लष्कराबरोबर या बंडखोरांनीं उघड सामना मुळींच दिला नाहीं. १८८० व १८८१ सालीं कानडावर स्वारी करण्याचे दोनदां प्रयत्न झाले, पण तेहि निष्फळ व हास्यास्पद ठरले.

**फेनी**—पूर्व बंगाल, नौखाली जिल्ह्यांतील एक पोटविभाग. क्षेत्रफळ ३४३ चौ. मैल. लो. सं. सु. चार लक्ष. यांत खेडीं ६७० ; पैकीं फेनी नांवाचेंच मुख्य ठिकाण. गेल्या महायुद्धांत हें महत्त्वाचें लष्करी ठिकाण होतें.

**फेफरें**—(एपिलेप्सी). हा एक मज्जातंतुविकार असून यामध्यें मनुष्य एकाएकीं खालीं जमिनीवर पडतो. हा रोग उद्भवण्याचीं कारणें अनेक असून तीं फार गुंतागुंतीचीं व दूर करण्यास कठिण असल्यामुळें हा रोग पूर्णपणें बरा न होतां मधून मधून त्याचे झटके येत राहतात. या रोगाची बरीच वाढ झाली असतां मनुष्यास आंचके येतात व नंतर तो पूर्णपणें बेशुद्ध होतो. हा रोग होण्याच्या कारणांतील प्रमुख कारण म्हणजे लहानपणीं मुलाच्या भावनांस अतिशय जोराचा धक्का बसणें, किंवा मेंदूस इजा होणें, किंवा जन्माच्या वेळीं किंवा नंतर डोक्याच्या कवटीस किंवा आंतील भागास इजा होणें, किंवा एखादें गळूं उद्भवून त्याची पुढें वाढ होणें, वगैरे असूं शकतात. याच्या प्रथमावस्थेंत मनुष्यास एक प्रकारें चमत्कारिक व भणभणल्यासारखें वाटूं लागतें, व तें पायांपासून किंवा हातांपासून सुरू होऊन छाती, डोकें वगैरेकडे पसरतें व भोंवळ आल्यासारखें होतें, व एकदम भीति वाटूं लागते. परंतु कधीं कधीं या रोगांत हीं कोणतींच लक्षणें आढळत नाहींत. या रोगाचा झटका आला असतां रोगी आपणास इजा करून घेणार नाहीं एवढ्याच गोष्टीकडे लक्ष देतां येतें व याकरितां रोग्याचें डोकें उचलून ठेवून त्याच्या पोशाखांत कोठें घट्ट बंद किंवा कांहीं आवळलें असल्यास ते सैल करण्यांत यावें. कधीं कधीं रोगी जीभ चावतो ; अशा वेळीं त्याच्या दांतांमध्यें बुचाचा, रबराचा किंवा मऊ लांकडाचा तुकडा ठेवणें अवश्य असतें. या रोगावर इलाज म्हणून साधारणपणें पोटॅशियम ब्रोमाइड किंवा ल्युमिनाल देतात. पण नेहमीं रोग्यानें वैद्याच्या देखरेखीखालीं राहिलें पाहिजे. अपस्मार पाहा.

**फेबियन सोसायटी**—ही ब्रिटिश समाजसत्तावाद्यांची (सोशॅलिस्ट) संस्था १८८३ सालीं सिडने वेब व जॉर्ज बर्नार्ड शॉ यांनीं स्थापन केली व लवकरच बिॲट्रिस्ट पॉटर या संस्थेंत सामील झाली. बिॲट्रिस्टनें नंतर सिडनेबरोबर विवाह केला. या फेबियन विद्वानांनीं मार्क्सच्या मतांचा स्वीकार न करतां समाजसत्तावाद अमलांत आणण्याची एक निराळी योजना तयार केली. फेबियन हें नांव एक प्राचीन हुषार रोमन जनरल क्यू फेबियस मॅक्झीमस म्हणून होता, त्याच्या नांवावरून देण्यांत आलें. या संस्थेनें भांडवलशाहीपेक्षां समाजसत्ताकपद्धति अधिक चांगली असा प्रचार सुरू केला, आणि अर्थशास्त्रासंबंधीं तत्त्वें मार्क्सचीं न स्वीकारतां रिकार्डो व बेन्थॅम यांचीं पुरस्कारलीं. या संस्थेच्या फेबियन रीसर्च डिपार्टमेंट—संशोधन खात्यानें फार महत्त्वाचे अनेक ग्रंथ प्रसिद्ध केले. या संस्थेच्या सभासदांनीं स्वतंत्र मजूर पक्ष आणि इतर राजकारणी संस्था यांच्या कार्यास मदत केली. मजूर पक्षानें १९१८ सालीं वेबनें तयार केलेला फेबियन कार्यक्रम स्वीकारला. ब्रिटनच्या राजकारणाच्या इतिहासांत ही फेबियन सोसायटी फार उपयुक्त कार्य करणारी संस्था असल्याबद्दल मान्यता पावली असून मजूर पक्षांतले व इतर ब्रिटिश राजकारणी पक्षांतले अनेक थोर, विद्वान् या संस्थेचे सभासद झालेले आहेत. १९१८ सालीं फेबियन रीसर्च डिपार्टमेंट या संस्थेनें फेबियन सोसायटीशीं असलेला संबंध तोडला आणि लेबर रीसर्च डिपार्टमेन्ट हें नांव धारण केलें. आतां हें डिपार्टमेंट कम्युनिस्ट पक्षाच्या वर्चस्वाखालीं गेलें आहे. १९३१ सालीं फेबियन सोसायटीनें न्यू फेबियन रीसर्च ब्यूरो स्थापन केला. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर फेबियन सोसायटीच्या जीवनांत नवें चैतन्य निर्माण झालें. समाजसत्तावादाची नव्या स्वतंत्र दृष्टिकोनांतून चर्चा सुरू झाली व मजूर पक्षाला फेबियन सोसायटी जोडली गेली. त्या वेळीं या सोसायटीच्या अध्यक्षपदीं लेडी पॅसफील्ड ( मिसेस बिॲट्रिस्ट वेब ) ही असून, चेअरमन जी. डी. एच्. कोल, आणि जनरल सेक्रेटरी जॉन पार्कर, एम. पी. हे होते. बर्नार्ड शॉप्रमाणेंच एच्. जी. वेल्स हा फेबियन संस्थेचा प्रमुख सभासद आहे.

**फेरिदून**—इराणांतील एक पुराणकालीन राजा. यानें पुष्कळ वर्षे राज्य केलें, व त्याकाळांत त्याची प्रजा फार सुखी होऊन भरभराटीस चढली. त्यानें आपल्या मुलांचीं लग्नें येमेनच्या ( अरबस्तानांतील भाग ) सेर्व्ह नांवाच्या राजाच्या मुलींशीं लावलीं. याबद्दलच्या मोठाल्या कथा आहेत. उत्तर वयांत फेरिदूननें आपलें राज्य या मुलांत वांटून दिलें. सर्वांत धाकट्या आवडत्या इरेद्ज नांवाच्या मुलाला त्यानें खुद्द इराण देशाचा राजा केलें, व तूर नांवाच्या मुलाला चीनच्या बाजूकडील मुलूख दिला. हा देश तेव्हांपासून पुष्कळ शतकें तुराण देश या नांवानें प्रसिद्ध होता. परंतु ही वांटणी थोरल्या तूर व सेल्म या दोघांस पसंत न पडून त्यांनीं युक्तीनें धाकट्या भावाला आपल्या राज्यांत बोलावून त्याला मारलें. तेव्हां त्याबद्दल सूड उगविण्यासाठीं वृद्ध फेरिदूननें इरेदजचा मुलगा मिनोश्चेहर याच्याबरोबर सैन्य

पाठवून लढाई दिली. तींत मिनौश्चेहरचा जय होऊन तूर व सेलम मारले गेले.

**फेरिस्ता** ( सु. १५५०–१६१२ )—एक फारसी इतिहासकार. नांव महंमद कासीम. बापाबरोबर लहानपणींच हिंदुस्थानांत आला. नगरच्या निजामशाहींत बापाला व यालाहि नोकऱ्या मिळाल्या. मूर्तिझा निजामशाहा मेल्यानंतर हा विजापूरच्या दरबारीं गेला. तेथील इब्राहिम आदिलशहा बादशहाच्या आज्ञेवरून यानें इतिहासाचें लेखन केलें. याच्या ग्रंथाचें नांव 'तारीख-इ-इब्राहिमी' किंवा 'नौरसनामा' असें आहे. गजनीच्या सुलतानापासून तों इब्राहिम आदिलशहाच्या काळापर्यंत सर्व घडामोडींची या इतिहासांत हकीकत आहे. याचें भाषांतर जनरल ब्रिग्जनें एल्फिन्स्टनच्या सांगण्यावरून केलें.

**फेरीरा, आन्तोनिओ** ( १५२८–१५६९ )—एक पोर्तुगीज कवि. त्यानें विलाप ( एलेजिआक ) व पत्रबद्ध ( एपिस्टोलरी ) या दोन काव्यपद्धतींचा पूर्ण विकास केला. शिवाय पोर्तुगीज काव्यवाङ्मयांत सुभाषितपर ( एपिग्रॅम ), बोधपर, दुःखान्त ( ट्रॅजेडी ) आणि वैवाहिक ( एपिथालामिअम ) या काव्यप्रकारांची भर घातली. त्याचें दुःखान्त नाटक 'इनेस दि कॅस्ट्रो' हें उत्कृष्ट आहे.

**फेरीवाले**—इंग्लंडांत १८८८ च्या हॉकर्स ॲक्टमध्यें 'हॉकर' याची व्याख्या, जो इसम आपल्याबरोबर एक घोडा किंवा इतर ओझें वाहणारें जनावर घेऊन फिरतो तो–अशी दिली आहे. १८७१ च्या पेड्लर्स ॲक्टमध्यें 'पेड्लर' ह्याची व्याख्या, घोडा किंवा कोठलेंहि ओझें वाहणारें जनावर नसलेला फेरीवाला त्याला पेड्लर म्हणतात, अशी केली आहे. पेड्लर फेरीवाल्यांना वार्षिक पाच शिलिंग फी घेऊन, आणि हॉकर फेरीवाल्यांना वार्षिक दोन पौंड फी घेऊन विक्रीचा परवाना देण्यांत येतो. हिंदुस्थानांत स्थानिक स्वराज्य संस्था अशा विक्रेत्यांवर कर बसवून परवाना देतात.

**फेलिंग** ( १८१२–१८८५ )—एक जर्मन रसायनशास्त्रज्ञ. कोणत्याहि पदार्थांत साखरेचें अस्तित्व व तिचें प्रमाण शोधून काढणारें द्रावण याच्या नांवानें प्रसिद्ध आहे. हा रसायनशास्त्रांतील संशोधक आपल्या विषयावर वर्तमानपत्रांतून लेखहि लिहीत असे. जर्मनींतील आयुर्वेदनिरीक्षक मंडळाचा तो सभासद होता.

**फेलोज, सर चार्लस** ( १७९९–१८६० )—एक ब्रिटिश पुराणवस्तुशास्त्रज्ञ. त्यानें १८३३ सालीं लिसिया देशांत झॅन्थस नांवाच्या दरींत संशोधनकार्य केलें, आणि तेथें झॅन्थस व टेओस या दोन शहरांचे अवशेष शोधून काढले. त्यानें या मुख्य संशोधित भागांवर व कार्यावर कांहीं ग्रंथ लिहिले आहेत.

**फेस्कू**—[ जाति–फेस्टुका ]. ही एक गवताची जाति आहे. हिला लांब दांडे असून त्यांस पुष्कळ फुलांचे तुरे येतात. ही बहुतेक बहुवर्षायु आहे. हिचे कुरणांतील, मेंढीचे, उंच व कठिण असे प्रकार आहेत.

**फैजपूर**—मुंबई इलाखा, पूर्वखानदेश जिल्हा, यावल तालुका, एक गांव. वस्ती सु. २०००. मोंगलाईंत व पेशवाईंत हा भरभराटींत होता. सध्यां इमारती लांकूड व कापूस यांचा बाजार भरतो व चिटें रंगविण्याबद्दल प्रसिद्ध आहे. खेड्यांत काँग्रेसचें अधिवेशन भरण्याचें ठरल्यावर पहिला मान या गांवास मिळाला ( १९३६ ).

**फैजाबाद**—१. संयुक्त प्रांतांतील फैजाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १७१० चौ. मै.. लो. सं. ( १९४१ ) १३,१९,४२५. खेडीं २,७५४; मोठीं गांवें ८. यांतच हिंदूंचें पवित्र व यात्रेचें स्थान अयोध्या आहे. गोग्रा नदी उत्तर हद्दीवरून वाहते. जमीन सुपीक व जंगल बरेंच आहे. फैजाबाद गांव तालुका व जिल्हा यांचें मुख्य ठिकाण आहे. येथें साखरेचा कारखाना आहे. अयोध्या व फैजाबाद मिळून एकच म्युनिसिपालिटी आहे. दोन्ही मिळून लो. सं. ५५,२१५ आहे.

२. अफगाणिस्तान, बदकशानची राजधानी. पूर्व अफगाणिस्तान व रामीर यांचें लष्करी ठाणें आहे. हा गांव १८२९ मध्यें उध्वस्त झाला होता, पण १८६५ मध्यें पुन्हां वसविण्यांत आला

**फोर्ट, सेंट डेव्हिड**—मद्रास, द. अर्काट जिल्हा. हा जुनाट किल्ला गडिलम नदीच्या कांठीं आहे. हें पूर्वीचें डच व फ्रेंच वसाहतीचें ठिकाण. अठराव्या शतकांतील कर्नाटक युद्धांत महत्त्वाचें ठिकाण होतें. १६९० मध्यें मराठ्यांपासून हा किल्ला इंग्रजांनीं विकत घेतला. त्यापूर्वी मराठ्यांनीं १६७७ मध्यें जिंजीबरोबर हा जिंकून घेतला होता. १७५८ मध्यें हा फ्रेंच सेनापति लाली यानें जिंकून घेतला होता.

**फोर्ड, हेन्री** ( १८६३–१९४७ )— सुप्रसिद्ध अमेरिकन मोटारींचा कारखानदार व महान् उद्योगपति. त्यानें १९०३ सालीं फोर्ड मोटार कंपनी बनविली. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं फोर्डनें प्रथम शांतता व तह लवकर व्हावा म्हणून प्रयत्न केला; पण तो निष्फळ झाल्यावर व अमेरिकेनें युद्धांत भाग घेतल्यावर फोर्डनें आपला कारखाना युद्धोपयोगी साहित्य फार मोठ्या प्रमाणावर निर्माण करण्याच्या कामीं लावला. युद्ध संपल्यानंतर स्वस्त किंमतीचीं विमानें तयार करण्याकडे फोर्डनें आपलें लक्ष वळवलें. लोकांना मोटारी स्वस्त मिळाव्यात यासाठीं त्यानें त्यात यांत्रिक सुधारणा करून किंमती उतरविल्या. १९२० नंतर दरसाल अशा मोटारी दहा लाखांवर निघत. जगांतील दुसऱ्या क्रमांकाचा तो धनिक होता. हा अगदीं गरिबींतून

घर आलेला कर्तबगार पुरुष होता. प्रख्यात शास्त्रज्ञ एडिसन याला फोर्डचा पाठिंबा असे. आपल्या कारखान्यांतील मजुरांना फोर्ड चांगल्या रीतीनें वागवी व त्यांचें हिताहित पाही. यानें आत्मचरित्र लिहिलें आहे.

**फोर्ब्स, अलेक्झांडर किंलोक** ( १८२१–१८६४ )— 'रासमाला' या नांवानें गुजराथचा सविस्तर इतिहास लिहिणारा गुजराथचा युरोपियन इतिहासलेखक. या इतिहास ग्रंथासाठीं जरूर असणारी माहिती त्यानें पाटण व अबू येथून मिळविली. देलवाड्याच्या दोन्ही जैन मंदिरांच्या कारागिरीबद्दल यानें प्रथमच आपल्या ग्रंथांत प्रशंसोद्गार काढले आहेत. याचें स्मारक म्हणून एक गुजराथी साहित्य संस्था निघालेली आहे.

**फोर्मोसा**—तैवान. हें बेट चिनी समुद्रांत असून ह्याची लांबी २५० मैल आणि क्षेत्रफळ १३,८८० चौ. मैल आहे. या बेटांत एक पर्वताची रांग असून त्यामुळें या बेटाचे पूर्व भाग व पश्चिम भाग असे दोन विभाग झाले आहेत. पश्चिम भागात चिनी व जपानी लोक राहतात. व तेथें शेती पुष्कळ असून भात, ऊंस, चहा, कापूर, नारिंगें, केळीं, वगैरे पिकें होतात. डोंगराळ भागांत मलायन जातीचे रानटी लोक राहतात. या बेटाच्या उत्तर भागांत भूकंप होतात. या बेटांत तैहोकू, तैनॉन, टॉन्सुई, कींलुंग, ताकाव, इ. अनेक बंदरें आहेत. लोकसंख्या ५८,७२,०८४ आहे. मुख्य ठिकाण तैहोकू आहे. येथील मुख्य भाषा चिनी ( अमॉय पोटभाषा ) आहे.

हें बेट १८९५ सालीं चीननें जपानला दिलें होतें; पण दुसऱ्या महायुद्धानंतर हें पुन्हां चीनकडे आलें. जपाननें येथें बरीच व्यवस्था केली होती. १९२८ सालीं एक विद्यापीठहि स्थापन केलें.

**फोर्सेलिनी, एगिडिओ** ( १६८८–१७६८ ).—एक इटालियन कोशकार. तो व त्याचा मित्र शिक्षक फासिओलाटी यांनीं संपूर्ण लॅटिन शब्दकोश प्रसिद्ध करण्याचें ठरवलें. या कामाला ४० वर्षें लागलीं व तें काम पुढें एकट्या फोर्सेलिनीलाच करावें लागलें.

**फौइली, आल्फ्रेड ज्यूल एमिल** ( १८३८–१९१२ )— एक फ्रेंच तत्त्ववेत्ता. तो प्रथम प्लेटो पंथाचा अनुयायी होता. परंतु पुढें तो प्रत्यक्षैकवादा( एंपिरिसिझम )चा पुरस्कर्ता बनला. आणि त्यानें प्लेटोचा आदर्शवाद ( आयडिॲलिझम ) आणि इंग्रजांचा विकासवाद ( डॉक्ट्रिन ऑफ एव्होल्यूशन ) यांचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते— तत्त्वज्ञानाचा इतिहास, समाजशास्त्र, सामाजिक शास्त्रें, वगैरे विषयांवर आहेत.

**फौकोल्त, जीन बर्नार्द** ( १८१९–१८६८ )—एक फ्रेंच पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. त्याचें नांव लंबक ( पेंड्युलम ) प्रयोगामुळें प्रसिद्ध झालें. या प्रयोगानें पृथ्वी आपल्या आंसाभोंवतीं फिरते हें सिद्ध करतां येतें. त्यानें दृष्टिविज्ञान, आकाशांतील विद्युत् आणि प्रकाशलेखन ( फोटोग्राफी ) या बाबतींत संशोधन केलेलें आहे.

**फौजदारी कायदा**— ( पिनल कोड ). या कायद्यांत गुन्ह्यांच्या व्याख्या व त्यांना शिक्षा सांगितलेल्या असतात. शिवाय फौजदारी गुन्ह्यांची पूर्वचौकशी पोलिस खात्यानें कशी करावी व पुढें न्यायालयांत खटल्यांची चौकशी कशी करावी, वगैरेबद्दलचा कायदा 'क्रिमिनल प्रोसीजर कोड' या नांवाचा स्वतंत्र असतो. *गुन्ह्यांच्या वर्गीकरणाचीं मूलतत्त्वें* सर्व देशांत बहुधा सारखींच असून तदनुसार वर्गीकरण करण्यांत येतें तें असें : १ देशांतील व्यवस्था व शांतता यांचा भंग करणारे गुन्हे; २ सरकार सत्ता व पोलिस कारभार यांच्या विरुद्ध गुन्हे; ३ सामान्यतः लोकांना उपद्रव देणारीं कृत्यें; ४ व्यक्तीविरुद्ध ( त्याचें जीवित-स्वास्थ्य, स्वातंत्र्य व अब्रू यांना धोका आणणारे ) व वैवाहिक आणि पैतृक हक्क व कर्तव्यें यांसंबंधीं गुन्हे; ५ मालमत्ता व करार यांसंबंधीं गुन्हे ( चोरी, विश्वासघात, खोटा लेख करणें, इत्यादि ). सर्व समाजाचा प्रतिनिधि राजा किंवा सरकार असल्याकारणानें गुन्हा घडल्यानें त्यापासून राजाला किंवा सरकारला पीडा होते, असें धरून फौजदारी खटल्यांत राजा किंवा सरकार हें फिर्यादी असतें. सामान्यतः गुन्ह्यांचे दोन प्रकार करतात : १ दिवाणी किंवा खाजगी स्वरूपाचे गुन्हे ( टॉर्ट्स ), आणि २ सार्वजनिक स्वरूपाचे गुन्हे. पहिल्या दिवाणी स्वरूपाच्या गुन्ह्यांत ( उदा., बेअब्रू, वगैरे ) फौजदारी खटला करतां येतो, व शिवाय बेअब्रू केल्याबद्दल नुकसानभरपाईची रक्कम दिवाणी कोर्टांत दावा लावून मागतां येते ( अपकृत्य पाहा ). दुसऱ्या प्रकारच्या गुन्ह्यांत मात्र गुन्हेगाराला दंड व शिक्षा होते. नुकसानभरपाई मागतां येत नाहीं.

इंग्लंडांत नॉर्मन राजाच्या वेळीं गुन्ह्यांबद्दल हद्दपारी, द्वंद्वयुद्ध, नुकसानभरपाई आणि शारीरिक शिक्षा, अशी चार प्रकारची व्यवस्था असे. त्यांत गेलीं अनेक शतकें सुधारणा होऊन विसाव्या शतकांत, दि प्रोबेशन ऑफ ऑफेंडर्स ॲक्ट १९०७; दि प्रिव्हेन्शन ऑफ क्राइम्स ॲक्ट, १९०८; क्रिमिनल जस्टिस ॲडमिनिस्ट्रेशन ॲक्ट, १९१४, आणि क्रिमिनल जस्टिस ॲक्ट, १९२५, या कायद्याप्रमाणें फौजदारी गुन्ह्यांची चौकशी होते.

हिंदुस्थानांत ब्रिटिश अमलापूर्वीं हिंदु गुन्हेगारांना मनुस्मृति, याज्ञवल्क्य स्मृति व त्यांवरील मिताक्षरा, वगैरे टीका-ग्रंथ यांत दिलेल्या कायद्याप्रमाणें चौकशी व शिक्षा होत असे.

मुसलमानी अमदानींनहि न्यायमंदिरें असत व स्वतः बादशहा न्यायमंदिरांत येऊन बसे. शहरांतून न्यायाधीश नेमलेले असत; व इतर ठिकाणीं काजी न्याय देत. बादशहाच्या मंत्र्यांमध्यें एक कोतवाल असे.

मराठे अमदानींत चोरी, मारामारी, खून, शिवीगाळी, व्यभिचार, बेअब्रू करणें, अतिक्रमण, आत्महत्या, मनुष्य पळवून नेणें, नोकरीचा करार मोडणें, मुक्या जनावरांस इजा करणें, बलुत्याचीं कामें न करणें, गांव सोडून जाणें, सरकारी कायदे मोडणें, (उदा., परवानगीवांचून तंबाखू कापणें, अगर खरिपाचा माल तयार करणें), गाय नांगराला धरणें, वजन-मापांत फसविणें, दुसऱ्या गांवची सोयरीक करणें, अशा प्रकारचे गुन्हे तर होतेच; परंतु खोटीं भुतें घालणें, अथवा भुतें घातल्याचा खोटा आरोप करणें, हेहि गुन्हे मानले जात. कांहीं गुन्हे प्रासंगिक स्वरूपाचे असत; उदा., इंग्रजांकडे चाकरी धरणें हा गुन्हा समजून त्याबद्दल पारिपत्य करण्यांत येई. त्याचप्रमाणें कराराच्या बाहेर काम करणें हें गुन्ह्यांत गणलें जाई. चहाडी करणें हा गुन्हाच होता. गुन्ह्यांबद्दल शिक्षा दंडाची असे. खून केला असतांहि दंड करण्यांत येई. १ रुपयापासून ४०० रु. पर्यंत दंडाची रक्कम गेली आहे. ज्याचें नुकसान झालें असेल त्याला दंडापैकीं कांहीं रक्कम देण्याची वहिवाट होती. राजद्रोहाच्या गुन्ह्याला तुरुंगाची शिक्षा असे हें खरें, परंतु त्याखेरीज अन्य कारणांकरितांहि तुरुंगांत टाकीत असावे असें मानण्यास जागा आहे. तुरुंगांतून गुन्हेगारांस सोडावयाचें झाल्यास जामीन घेऊन सोडीत. अवश्य तेथें गोताच्या संमतीनें अपराधाची चौकशी करीत. चोरी करणाऱ्यांचा पत्ता न लागल्यास सर्व गांवाला नुकसान सोसावें लागे. कधीं कधीं कमावीसदार फिर्यादी होई. भिल्लांचे वगैरे उपद्रव मोडण्याची जबाबदारी जमीनदारांवर असे, असें दिसतें. म्हणजे जमीनदार हे वतनी पोलिस अधिकारी होते. उचल्यांवर म्हणजे ज्यांना निर्वाहाचें साधन नाहीं अशा लोकांवर सरकारी नियंत्रण असे. व्यभिचारी स्त्रीपुरुष या दोघांनाहि दंड होत असे. आरोप शाबीत झाला नाहीं तर खोटा आरोप करणारा शिक्षेस पात्र होई. न्यायपद्धति पाहा.

ब्रिटिश अमलांत १८३० नंतर इंग्लंडच्या कायद्यानुसार 'इंडियन पिनल कोड' व 'क्रिमिनल प्रोसीजर कोड' या दोन फौजदारी मुख्य कायद्यानुसार गुन्ह्यांची चौकशी होते. शिवाय सुव्यवस्थित राज्यकारभार चालण्याकरितां किरकोळ अनेक फौजदारी गुन्ह्यांचे कायदे आहेत; उदा., बॉयलर्स ॲक्ट, क्रिमिनल ट्राइब्स ॲक्ट, गॅंब्लिंग ॲक्ट, ल्युनसी ॲक्ट, मोटार व्हेइकल्स ॲक्ट, ऑब्सीन पब्लिकेशन ॲक्ट, स्टेट कॅरेजेस ॲक्ट, इ..

**फौद, अहमद पहिला** (१८६८-१९३६)—ईजिप्तचा एक राजा. १९१७ मध्यें हा भावाच्या मृत्यूनंतर गादीवर आला. याचें शिक्षण इटलीमध्यें झालें असून तो कांहीं दिवस इटालियन सैन्यांत अधिकारी होता. १९२२ सालीं ईजिप्त स्वतंत्र राष्ट्र झाल्यावर हा पहिला सुलतान झाला.

**फौरीएर, जीन बाप्तिस्त** (१७६८-१८६०)—एक गणितशास्त्रज्ञ. त्यानें प्रथम नेपोलियनच्या हाताखालीं अनेक राजकीय अधिकाराचीं कामें केलीं, आणि १८१५ सालीं सायन्स ॲकेडमी या शास्त्रीय संस्थेचा सभासद व नंतर चिटणीस झाला. १९ व्या शतकाच्या आरंभीं जे फ्रेंच गणितशास्त्रज्ञ विशेष हुषार होऊन गेले त्यांत फौरीएरची गणना आहे. लाप्लास, लेग्रेंज, कॉची व पॉइसन हे तत्कालीन थोर गणितशास्त्रज्ञ होत.

फौरीएर श्रेणी—(फौरीएर सीरीज). चल वर्णाची एकपट, दुप्पट, तिप्पट, अशा क्रमानें येणाऱ्या पटींच्या ज्या (साइन्स) व कोज्या (कोसाइन्स) मध्यें ग्रथिलेली एक श्रेणी किंवा माला. उदाहरणार्थ,

अ₀ + अ₁ कोज्या (ट) + अ₂ कोज्या (२ ट) ......
अन कोज्या (नट).
ब₁ ज्या (ट) + ब₂ ज्या (२ ट)...... बन ज्या (नट), अशी अनंत माला. (न हें अक्षर विशिष्ट संख्यावाचक आहे).

ऋतुमानाप्रमाणें ठराविक मर्यादेनंतर चक्रक्रमानें येणारीं कार्यें किंवा आवृत्तिक्रिया या मालेच्या साहाय्यानें मांडतां येतात. असा फौरीएरनें आपला सिद्धांत तयार केला व त्याचा उपयोग उष्णतेसंबंधाच्या प्रश्नांत करून दाखविला. गणिताच्या प्रत्येक शाखेंत या व्यावहारिक श्रेणीशिवाय चालत नाहीं.

**फौरीएर, फ्रांका मारी चार्लस** (१७७२-१८३७)—एक फ्रेंच समाजसत्तावादी. त्याचा सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ १८२२ सालीं प्रसिद्ध झाला. उद्योगधंद्याच्या बाबतींत फौरीएरचें मत असें कीं, सर्व धंदे संघटनेनें म्हणजे संस्थांनीं चालवावे; खाजगी मालकीचे धंदे नसावे. अशा प्रत्येक संस्थेचे १,८०० सभासद असावे; व त्यांनीं एक चौरस लीगइतक्या भूक्षेत्रांत वसाहत करावी; व प्रत्येक वसाहतीवर एक मुख्य अधिकारी गव्हर्नर असावा; तो त्या संस्थेच्या सभासदांनीं निवडावा. या वसाहतींत जें उत्पादन होईल, त्यापैकीं प्रत्येक इसमाला लागणारे किमान जिन्नस सर्वांना द्यावे; त्यांत काम करणारा व काम न करणारा असा भेदभाव करूं नये. याप्रमाणें किमान वांटप झाल्यावर उरलेला भाग श्रम, भांडवल व बुद्धि या तीन बाबींचा विचार करून कमजास्त प्रमाणांत वांटावा. प्रत्येक इसमाला भांडवलांत हिस्सा ठेवण्याची सवलत असावी; व त्या हिश्श्या-

च्या प्रमाणांत मुनाफा (डिव्हिडंड) वांटण्यांत यावा. अशी फौरीएरच्या समाजसत्तावादी वसाहतीची योजना आहे.

**फौस्ट, डॉक्टर जॉन** (सु. १४८५–१५४०)—हा प्रसिद्ध मांत्रिक आणि चेटका इसम जर्मनींत १६ व्या शतकांत होऊन गेला. फौस्ट या नांवाची जी दंतकथा लोकांत पसरलेली आहे तिला या इसमाचा आधार आहे. त्या दंतकथेंत असें वर्णन आहे कीं, फौस्ट हा आपल्या मंत्रसामर्थ्यानें भुतें खेळवीत असे व त्याला एक पिशाच्च अनुकूल होतें व त्या पिशाचा-बरोबर त्याचा २४ वर्षें संबंध होता. या पिशाचाचें नांव मेफिस्टोफेलेस असें असून तें फौस्टचें काम एखाद्या नोकरा-प्रमाणें करीत असे. या पिशाचाबरोबर मानवी जीवनांतील विविध अवस्थांचा अनुभव घेत फौस्टनें जीवितप्रवास केला आणि अखेर तें पिशाच फौस्टसकट नाहींसें झाले. जर्मनींत हा डॉ. फौस्ट आणि त्याचा मित्र वॅग्नर यांच्या दंतकथेवर एक नाटक करण्यांत येत असे. गोएटे या सुप्रसिद्ध कवीने आपलें विख्यात नाटक फौस्ट या दंतकथेच्या आधारानेंच लिहिलें. गाऊनोडच्या लोकप्रिय फौस्ट नांवाच्या नाटकालाहि तोच आधार आहे. आणि १५९० सालीं ख्रिस्तोफर मार्लो यानें डॉ. फौस्टस या उत्कृष्ट नाटकाला या दंतकथेचाच आधार घेतला होता. फौस्ट हा म्हातारा असून तो एका तरुणीच्या नादानें आपला आत्मा सैतानाला विकून त्याबद्दल सौंदर्य आणि तारुण्य मिळवितो. शेवटीं ही तरुणी स्वर्गाला जाते व फौस्टला मेफिस्टोफेलस हा नरकाकडे ओढीत नेतो–अशी नाट्यकथा रंगविली आहे.

**फ्युअरबॉक, लुडविग आन्ड्रेआज** (१८०४–१८७२)–एक जर्मन आधिभौतिक शास्त्रज्ञ. अतींद्रियज्ञानविषयक कल्पना म्हणजे ईश्वर, अमरत्व, वगैरे या सर्व कल्पना, अपायकारक आभासांप्रमाणें आहेत. खरें सत्य-ज्ञान, इंद्रियांचा पदार्थांशीं प्रत्यक्ष संबंध घडून होतें ते होय. त्याचे ग्रंथ आहेत ते : 'ए क्रिटिक ऑफ हेगेल' (हेगेलचा टीकाकार), 'दि इसेन्स ऑफ ख्रिश्चॅनिटी' (ख्रिस्ती पंथाचें सार), आणि 'दि इसेन्स ऑफ रिलिजन' (धर्माचें सार).

**फ्रँकफुर्ट**—जर्मनी, प्राशियांतील एक शहर. यांत मेन नदी-च्या दोन्ही बाजूंस वस्ती आहे. प्राचीन काळीं हें रोमन बाद-शहांच्या निवडणुकीचें ठिकाण होतें. १८०६ पर्यंत हें स्वतंत्र नगर होतें. पुढे नेपोलियननें हें प्रशियाला जोडलें. १८७१ चा फ्रँको–जर्मन युद्धाचा तह याच ठिकाणीं झाला.

रोमर ही इमारत फार मोठी व प्रसिद्ध आहे. सेंट बार्थो-लोम्यूचें देऊळहि फार प्रसिद्ध असून त्यांत १७११ नंतरच्या जर्मन बादशहांचा राज्याभिषेक झालेला आहे. वाङ्मय आणि कला यांविषयींच्या गोष्टींनीं हें शहर भरलेलें दिसेल. ऐतिहासिक व सृष्टिशास्त्राचें प्रदर्शन आणि नगर-ग्रंथालय यांचीं नांवें या बाबतींत सांगतां येतील. येथें एक प्रॉटेस्टंट विद्यापीठ आहे. येथें रासायनिक द्रव्यें, धातुकाम, साबण, शिवण्याचीं यंत्रें, अत्तरें, इ. चे कारखाने असून मोठाल्या पेढ्या आहेत. आग-गाड्या आणि जहाजें यांची मोठी वाहतूक आहे. लोकसंख्या ५,५५,०००.

**फ्रँको, फ्रॅन्सिस्को** (१८९२– )—स्पेनचा आजचा सर्वाधिकारी. याचा जन्म गॅलिशियामध्यें झाला. त्यानें प्रथम सैन्यांत नोकरी धरली व १९३५ मध्यें तो प्रमुख अधिकारी झाला. स्पेन-च्या यादवी युद्धामध्यें तो बंडखोर सैन्याचा पुढारी बनला आणि स्वतः हुकूमशहा बनून स्पेनमध्यें त्यानें एकतंत्री राज्य स्थापन केलें. १९३९ मध्यें या यादवी युद्धाची समाप्ति झाल्यानंतर त्यानें स्पेनमध्यें पुनर्घट-नेच्या कामास सुरुवात केली. प्रथमतः त्याच्या एकतंत्री सत्तेस कांहीं राष्ट्रांचा विरोध होता; तथापि आज त्याची सत्ता सर्व राष्ट्रांनीं मान्य केली आहे.

**फ्रँकोलिन**—हा कवडा पक्ष्याच्या जातीचा एक पक्षी आहे. हा दक्षिण युरोपांत आढळतो. याला उत्तर हिंदुस्थानांत काळा कवडा म्हणतात. आफ्रिका, ओशियानिया, वगैरेमध्येंहि याच्या कांहीं जाती आहेत. याच्या एकंदर चाळीसावर जाती आहेत. याचें ओरडणें हंसण्यासारखें कानाला लागतें.

**फ्रँक्लिन, बेंजामिन** (१७०६–१७९०)—सुप्रसिद्ध अमे-रिकन अर्थशास्त्रज्ञ, मुत्सद्दी व पुढारी. हा अत्यंत बुद्धिमान्, विद्वान् व अष्टपैलु होता. परराष्ट्रीय वकील व भौतिक शास्त्रज्ञ म्हणूनहि तो प्रसिद्ध आहे. याने १० व्या वर्षीं शाळा सोडली व नोकरी धरली. १३ व्या वर्षी छापखान्यांत शिरला व लेख लिहिण्यास सुरु-वात केली. पुढें स्वतःचा

छापखाना घातला. १७२९ मध्यें पेन्सिल्व्हॅनिया गॅझेट पत्र विकत घेऊन चालवलें. फ्रेंच, इटालिअन, स्पॅनिश, लॅटिन, वगैरे भाषा शिकला. नंतर पोस्ट खात्यांत अधिकारी झाला. पेन्सिल्व्हॅनिया असेंब्लीचा सभासद झाला. अनेक सुप्रसिद्ध लोकांच्या ओळखी होऊन स्नेहसंबंध वाढला. स्टॅंप ॲक्टाविरुद्ध खटपट करून त्यानें तो रद्द करविला. स्वातंत्र्ययुद्धांत आपलें सर्वस्व अर्पण करून सामील झाला. १७७६ चा स्वातंत्र्यजाहीरनामा लिहिणाऱ्या पांच पुढाऱ्यांत हा होता. यानें अनेक महत्त्वाच्या जागीं कामें केलीं; लहानमोठे शोध लावले व ग्रंथ लिहिले. याच्या सन्मानार्थ विद्यापीठांनीं याला अनेक पदव्या दिल्या. याचें आत्मचरित्र आहे, पण तें अपूर्ण आहे.

**फ्रँक्लिन, सर जॉन** (१७८६–१८४७)—एक उत्तरध्रुव-प्रदेशाचा इंग्रज संशोधक. त्यानें १४ व्या वर्षी आरमारांत नोकरी धरली, आणि तो कोपनहेगन (१८०१) आणि ट्रॅफल्गार (१८०५) या दोन आरमारी लढायांत हजर होता. १८१९ सालीं त्यानें उत्तरध्रुवप्रदेशाच्या संशोधनाचें कार्य सुरू केलें. पहिल्या सफरींत त्यानें उत्तर अमेरिकेंतील हडसन आखाता-मजीकच्या किनाऱ्याची माहिती मिळवली. व दुसऱ्या सफरींत कॉपरमाइन नदीच्या मुखापासून पॉइंटबीचिकडील प्रदेशाचें संशोधन केलें. १८३६–१८४३ पर्यंत तो टॅस्मानियाचा गव्हर्नर होता. १८४५ सालीं त्यानें उत्तरध्रुवाकडे शेवटली सफर काढली. पण तिकडे त्याचीं जहाजें नष्ट होऊन तो ता. ११ जून १८४७ रोजीं मरण पावला. आणि त्याच्याबरोबरचे १०५ खलाशीहि मरण पावले. १८५९ सालीं फ्रँक्लिनच्या मोडलेल्या जहाजांचे कांहीं भाग, जिन्नस व कागदपत्र एमालिंगटॉक नांवाच्या उत्तर-ध्रुवप्रदेशाकडील संशोधकाला सांपडले.

**फ्राउड, सिग्मंड** (१८५६–१९३९)—एक मानसशास्त्रज्ञ. हा १९०२ ते १९३८ पर्यंत व्हिएन्ना विद्यापीठांत मज्जातंतु-विज्ञानाचा प्राध्यापक होता. यानें मनोविश्लेषणविद्येचा पाया घातला. यानें या विषयावर अनेक ग्रंथ लिहिले आहेत. पुढें हा ऑस्ट्रिया देश सोडून इंग्लंडमध्यें येऊन राहिला. उन्मादाचें निदान आणि विवरण या कामीं व स्वप्नें पडताळण्याच्या कामीं मनोविश्लेषणाचा त्यानें उपयोग दाखवून वैद्यकशास्त्राच्या प्रगतींत मोठी भर घातली. 'इन्टरप्रिटेशन् ऑफ ड्रीम्स' (स्वप्नांचा अर्थ), 'सायकोपॅथॉलॉजी ऑफ एव्हरीडे लाइफ' (रोजच्या जीवनक्रमाची मनोविचिकित्सा), 'टोटेम ॲंड टॅबू' (देवकें आणि निषिद्ध गोष्टी), इ. त्याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत. आधुनिक मानसशास्त्रज्ञांत याला प्रमुख स्थान मिळतें.

**फ्रॉनहोफर, जोसेफ** (१७८७–१८२६)—एक जर्मन चक्षुःशास्त्रज्ञ. त्यानें सूर्यावर असंख्य काळ्या रेषा असल्याचा शोध लावला. त्यांना 'फ्रॉनहोफर्स लाइन्स' असेंच नांव आहे हा शोध फारच महत्त्वाचा आहे. कारण त्यामुळें वर्णलेखक (स्पेक्ट्रॉस्कोप) या यंत्राचा शोध निघून त्याची उपयुक्तता सिद्ध झाली. आणि वर्णपटशास्त्र (स्पेक्ट्रॉस्कोपी) या शास्त्राचा आरंभ झाला. त्यामुळें सूर्य व ग्रह यांची रसायनशास्त्रविषयक पुष्कळ माहिती आज उपलब्ध झाली आहे.

**फ्रान्स**—युरोपमधील एक लोकसत्ताक राज्य. याच्या उत्त-रेस इंग्लिश खाडी, पश्चिमेस बिस्केचा उपसागर, दक्षिणेस पिरि-नीज पर्वत व भूमध्य समुद्र, व पूर्वेस इटली, स्वित्झर्लंड, जर्मनी, आणि बेल्जम या देशांच्या सरहद्दी आहेत. याच्या पूर्व भागांत कांहीं पर्वत आहेत व मध्यभागीं मोठें पठार आहे. दक्षिण भागांत पेरिनीज पर्वताची रांग आहे, परंतु सामान्यतः बाकीचा भाग सपाटच आहे. सॉम व ऱ्होन या दोन मोठ्या नद्या आहेत. बाकी लहानमोठ्या नद्या पुष्कळ आहेत. क्षेत्रफळ २,१२,६६० चौ. मै.. राजधानीचें शहर पॅरिस हें सर्वांत मोठें व प्रेक्षणीय शहर आहे व मार्सेलीस हें त्याच्या खालोखाल आहे. मार्सेलीस हें प्रख्यात बंदरहि आहे. लिऑन्स, बोर्डो, नाइस, तुलो, हाव्रे, वगैरे ९-१० शहरें दीड-दोन लाखांच्यावर लोकवस्तीचीं आहेत. फ्रान्सची लोकसंख्या ४,२१,००,००० आहे. राज्यक्रांतीच्या पूर्वी फ्रान्सचे अंतर्विभाग निराळेच होते. त्यांपैकीं फारच थोडे आपलें पूर्वीचें स्वातंत्र्य उपभोगीत आहेत. त्यांत नमूद करण्यासारखा म्हणजे ब्रिटनी हाच एक आहे. नार्मंडी, गॅस्कनी, पिकार्डी, प्रॉव्हेन्स व लांग्वेडोक हेहि कांहींसे स्वतंत्र आहेत. हल्लीं फ्रान्सचे विभाग कारभाराच्या सोयीसाठीं ९० पाडले आहेत. अल्सेस लोरेन म्हणून जो प्रसिद्ध प्रांत आहे त्यांत या ९० तले तीन विभाग आहेत. १८७१ ते १९१८ या शतकार्धांत त्याजवर जर्मनीची सत्ता होती. पण महायुद्धानंतर तो फ्रान्सचा फ्रान्सला देण्यात आला. हे ९० विभाग स्वतंत्र स्थानिक कौन्सिलद्वारां आपला कारभार पाहतात.

फ्रान्सच्या राज्यकारभारासाठीं एक अध्यक्ष (प्रेसिडेन्ट) असतो. तो व दोन कायदेमंडळें हीं ७ वर्षांकरितां निवडतात. हीं दोन कायदेमंडळें म्हणजे, एक डेप्युटींची सभा व दुसरी सेनेट. डेप्युटी हे सर्व पुरुष नागरिकांच्या मतदानानें ४ वर्षांकरितां निवडले जातात व सेनेटचे सभासद नऊ वर्षांकरितां निवडलेले असतात. ग्रेट ब्रिटनप्रमाणेंच फ्रान्सचा सर्व राज्यकारभार मंत्रि-मंडळाच्या स्वाधीन असतो. या मंत्रिमंडळाचा मुख्य पंतप्रधान (प्राइम मिनिस्टर) याची निवडणूक स्वतः अध्यक्ष करतो. मात्र त्याला दोन्ही कायदेमंडळांचा पाठिंबा असावा लागतो व त्याच्यावर त्यांचा पूर्ण विश्वास असावा लागतो. मंत्रिमंडळांतील बाकीचे मंत्री पंतप्रधान निवडतो, परंतु त्यांची नेमणूक अध्यक्षा-

मार्फत करून घ्यावी लागते. सिनेटर व डेप्युटी म्हणजे दोन्ही कायदेमंडळांचे सभासद यांस पगार मिळतो. कायदेमंडळांत अनेक पक्ष असतात आणि त्यामुळें सहसा कोणत्याहि एका पक्षाला आपलेंच संपूर्ण मंत्रिमंडळ बनविण्याइतकें मताधिक्य मिळत नाहीं. यामुळें नेहमीं संमिश्र मंत्रिमंडळें बनविणें भाग पडतें.

फ्रान्समध्यें सरकारमान्य असा कोणताहि धर्म वा पंथ नाहीं. देशामध्यें सामान्य प्रचलित असणारा पंथ रोमन कॅथॉलिक हा आहे. प्रॉटेस्टंट पंथाचेहि कांहीं (सुमारें दहा लक्ष) लोक आहेत.

फ्रान्सची जमीन सामान्यतः सुपीकच आहे आणि फ्रान्स हा त्यामुळें स्वाभाविकच एक मोठा कृषिकर्मी देश आहे. गहूं वगैरे धान्यें होतात. जनावरें, मेंढ्या व घोडे यांची पैदास होते. दारूची निपज व निर्यातहि मोठी आहे. उद्योगधंदे व कारखाने बरेच आहेत. पॅरीस व लिऑन्स हीं दोन्ही शहरें औद्योगिक केंद्रें आहेत. ईशान्य भागांत कोळसा व लोखंड यांच्या खाणी जवळ जवळ असल्यामुळें त्या प्रदेशांतहि उद्योगधंदे बरेच आहेत. औषधें, रेशमी कापड, लोखंड, पोलाद, वगैरेची निर्यात होते. रेशमी कापडाचें उत्पादन व असेच आणखी कांहीं उद्योगधंदे हे फ्रान्समध्यें विशेष प्रगति पावलेले आहेत. फ्रँक नांवाचें मुख्य नाणें आहे. चलनपद्धत दशमानाची आहे. एक फ्रँकचे १०० सांतीम असतात.

फ्रान्सच्या ताब्यांतील वसाहती वगैरेचा विस्तार फार मोठा आहे (क्षेत्रफळ ४६,१७,५७९ चौरस मैल व लोकसंख्या ६,४९,४६,९७५). सर्वांत मोठा भाग आफ्रिकेंत आहे व त्यांतहि बराचसा विषुववृत्ताच्या आसपासच आहे. अल्जीरिया, ट्युनिस, मादागास्कर व सोमाली लँड यांचाहि समावेश यांतच होतो. कामेरूनचा कांहीं भाग व टोगोलँड यांचा कारभार मॅंडेट अधिकारान्वयें चालतो. मोरोक्को आश्रित राज्य (प्रोटेक्टोरेट) आहे. आशिया खंडांत फ्रान्सचा जो मुलूख आहे तो म्हणजे आनाम, कांबोडिया, टांगकिंग, कोचीन चायना मिळून इंडो-चायना; व पांडेचरी, चंद्रनगर, कारिकल, वगैरे हिंदुस्थानांतील ठिकाणें. यांखेरीज सिरिया (मॅन्डेटखालीं), फ्रेंच गिनी, वेस्ट इंडियन बेटांपैकीं कांहीं बेटें; न्यू कॅलेडोनिया व पासिफिक महासागरांतील कांहीं बेटें हीं फ्रान्सकडे आहेत. याप्रमाणें फ्रान्सच्या वसाहतींचा अवाढव्य पसारा आहे.

फ्रान्समध्यें मूळ केल्टिक लोक होते व ख्रि. पू. ५८-५१ काळांत ज्यूलिअस सीझरनें हा गॉल प्रांत जिंकून घेतला. पुढें रोमन साम्राज्यांत असतांना त्या वेळच्या युरोपमध्यें फ्रान्स हा सुधारलेल्या देशांत अग्रणी होता. रोमन सत्तेचे परिणाम अगदीं दृढमूल झाले होते. पुढें फ्रँक लोकांनीं यावर हल्ला केला आणि कित्येक वर्षें फ्रान्स शार्लमेन याच्या साम्राज्यांत राहिला. पुढें ११ व्या शतकांत फ्रान्समध्यें स्थानिक स्वतंत्र राजे झाले, परंतु नॉर्मंडी, बर्गंडी, व अक्विटेन, वगैरे ठिकाणचे ड्यूक प्रबळ होते; त्यामुळें त्या राजांच्या राजसत्तेचा प्रभाव पडला नाहीं.

यानंतर मध्ययुगीन कालांत फ्रान्सचा इतिहास म्हणजे इंग्लंड व फ्रान्स यांच्या दरम्यान राजपदावरून चालणाऱ्या युद्धाचा इतिहास आहे. १५ व्या शतकाच्या अखेरीस ही स्थिति पालटून पुढच्या काळांत व्हलॉइस व बुरबॉन राजांच्या सत्तेखालीं फ्रान्स हा युरोपमधला एक प्रबळ पण केंद्रीभूत सत्तेचा देश बनला. ब्रिटनीचा भागहि पुढें फ्रान्समध्यें सामील झाला व हल्लींचा बहुतेक फ्रान्स त्या वेळेपासूनचाच आहे.

चौदाव्या लुईच्या कारकीर्दीत (१६४३-१७१५) फ्रान्सचें राज्य आपल्या वैभवशिखराला पोंचलें होतें. त्या वेळीं तें एक प्रमुख लष्करी वृत्तीचें आणि बुद्धिमान् असें राष्ट्र होतें. ह्या उज्ज्वलतेबरोबरच दुसरी अनिष्ट कालिमाहि त्याच वेळीं फ्रान्सच्या वांट्यास आली होती. चैनबाजी, उधळेखोरपणा, लांचलुचपत, अनीति, गरीब जनतेला अत्यंत अन्यायाची व माणुसकी नसलेली वागणूक, यांनीं फ्रान्सचा त्या वेळचा इतिहास कलंकित झालेला आहे. या अन्याय्य व माणुसकी नसलेल्या वागणुकीचा परिणामहि फ्रान्सला चांगलाच भोंवला आहे. त्याच्या सत्ताधारी व श्रीमंत वर्गाच्या बेछूट वर्तनानें फ्रेंच राज्यक्रांतीचा पायाच घातला गेला आणि ती क्रांति प्रत्यक्ष घडून आली. जुनें राजघराणें नष्ट झालें व लोकसत्ताक सरकार स्थापन झालें. मध्येंच नेपोलिअनचा उदय झाला व १८१५ मध्यें तो अस्तंगत झाल्यावर पुन्हां कांहीं दिवसांकरितां बुरबॉन राजघराणें सत्ताधिष्ठित झालें. १८४८ मध्यें पुन्हां लोकसत्ताक सरकार अस्तित्वांत आलें, पण राजसत्ता कायमच होती. १८७०-७१ मध्यें त्या वेळेचा राजा तिसरा नेपोलिअन याच्या वर्तनानें व धोरणानें फ्रँको जर्मन युद्ध घडून आलें.

फ्रँको-जर्मन युद्धांत विरोधी मुख्यतः प्रशियाच होता, परंतु बव्हेरिया व सर्व जर्मन संस्थानें प्रशियाच्या बाजूनें एकत्रित झालीं होतीं. जर्मन राजपुत्राची स्पेनचा राजा म्हणून होणारी निवडणूक फ्रान्सच्या तिसऱ्या नेपोलिअनला संमत नसल्यानें हें युद्ध उभें राहिलें. त्या वेळचा प्रशियाचा सूत्रधार प्रख्यात बिस्मार्क हा होता. त्यानें प्रशियाच्या राजानें फ्रेंच वकिलाचा उपमर्द केला असें भासविणारी एक विकृत तार प्रसिद्ध करविली व फ्रान्सनें जर्मनी (प्रशिया) विरुद्ध युद्ध जाहीर केलें. या वेळीं जर्मन सेना तीन मोठमोठाल्या विभागांनीं फ्रान्सवर आक्रमण करून पुढें चालल्या व फ्रान्सचा सर्वत्र पराभव झाला. मेझ किल्ल्यावर कांहीं दिवस फ्रेंच सैन्य कोंडीतच होतें. अखेरीस सीडानच्या लढाईत फ्रान्सचा पूर्ण पराभव झाला व फ्रान्सला

अल्सेस लोरेन हा समृद्ध विभाग जर्मनीस द्यावा लागला. पहिल्या महायुद्धाच्या अखेरीपावेतों तो जर्मनीकडेच होता व महायुद्धाच्या अखेरीस तो फ्रान्सचा फ्रान्सला परत करण्यांत आला. या (फ्रँको-जर्मन) युद्धांत वरील मुलुखाशिवाय फ्रान्स-कडून जर्मनीला १,००,००,००,००० डॉलर इतकी खंडणी मिळाली.

फ्रँको-जर्मन युद्धानंतर १८७१ मध्यें राजसत्ता संपुष्टांत आली व तिसरें पूर्ण लोकसत्ताक राज्य स्थापन झालें. १८७१ पासून आजतागायत फ्रान्समध्यें लोकसत्ताक राज्यपद्धति कायम आहे. महायुद्धांत व वेळोवेळींच्या इतर युरोपियन राजकारणांत फ्रान्सला बरेंच महत्त्वाचें स्थान प्राप्त झालेलें आहे. १९३१ व १९३२ च्या बड्या राष्ट्रांच्या परिषदेंत फ्रान्सनें महत्त्वाचा भाग घेतला होता. १९३६ मध्यें लिऑं ब्लम याच्या नेतृत्वाखालीं समाजवादी पक्षाचें सरकार अस्तित्वांत आलें.

पहिल्या महायुद्धानंतर फ्रान्सचा दर्जा युरोपियन राष्ट्रांत मोठा वाढला खरा, पण अंतर्गत कलहांमुळें देशांत बजबजपुरी माजली. इकडे जर्मनींत हिटलर आपली सत्ता वाढवीत असतां फ्रान्सने त्याला पायबंद घालण्याचा कांहीं प्रयत्न केला नाहीं कीं स्पेन-मधील अराजकाला त्याला आळा घालतां आला नाहीं. ब्लमचें सरकार दुबळें म्हणून दालादिएपक्ष सत्तारूढ झाला; पण त्यानें म्युनिक करारावर सही देऊन झेकोस्लोव्हाकियाचा विश्वासघात केला. इटलीनें कांहीं प्रदेशांची मागणी करून ते प्रदेश मिळविलेहि. या प्रदेशांत नाझींची फितुरी सुरू होतीच. १९३९ च्या सप्टेंबरांत पोलंडच्या रक्षणार्थ ब्रिटनबरोबर फ्रान्सनें जर्मनीविरुद्ध शस्त्र उचललें. पण फ्रान्सची युद्धाची मुळींच तयारी नसल्यानें त्याच्या सैन्याचा पराभव होऊं लागला. शेवटीं ब्रिटनला सोडून देऊन जर्मनीशीं शरणागतीचा तह करावा लागला. नंतर बहुतेक फ्रान्स जर्मनीनें ताब्यांत ठेवला. या वेळीं मार्शल पेतॉं हा पंतप्रधान होता. जनरल गॉलनें मात्र इंग्लंडमध्यें पळून जाऊन तेथें राष्ट्रीय फ्रेंच सेना उभी केली व ब्रिटनला शक्य ती मदत केली. पुढें १९४४ सालीं दोस्त राष्ट्रांनीं जर्मनीचा पूर्ण पराभव करून फ्रान्सला दास्यांतून मुक्त केलें. नंतर १९४५ सालीं चौथी लोकशाही स्थापन झाली. आतांहि फ्रेंच मंत्रिमंडळ नेहमींप्रमाणें डळमळीत असतें. कोणत्याहि पक्षाला हमखास बहुमत नसल्यानें एखादें मंत्रिमंडळ किती दिवस टिकेल हें सांगवत नाहीं. त्यामुळें सर्व राज्यकारभार हंगामी स्वरूपाचा चालला आहे. अमेरिका आणि इंग्लंड यांच्या बाजूला फ्रान्स असल्यानें राष्ट्रसंघांत याला कांहीं मानाचा दर्जा आहे इतकेंच.

फ्रान्समध्यें प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण मोफत आहे. देशांत १७ विद्यापीठें आहेत; व तीं १२ व्या–१३ व्या शतका-पासून आहेत. औद्योगिक व यांत्रिक शिक्षणाच्या शाळा अनेक आहेत.

**फ्रान्स, आनातोल** (१८४४–१९२४)—एक फ्रेंच ग्रंथ-कार. अर्वाचीन काळांत उपरोधिक लेखनांत त्याचा हात धरणारा कोणी नाहीं. तो एका पुस्तकविक्याचा मुलगा असून त्याचें बालपण वाङ्मयीन वातावरणांत गेलें. पॅरिस येथील एका कॉलेजांत त्याचें शिक्षण झालें. १८६८ सालापासून त्यानें स्फुट-लेख लिहिण्यास आरंभ केला. १८८२ सालीं त्याच्या 'ल क्रीम द सिल्व्हेस्त्र बोनार्द' या पुस्तकानें लोकांचें लक्ष वेधलें, व तत्का-लीन कादंबरीकारांत फ्रान्स पहिल्या दर्जाचा लेखक ठरला. त्याचे ग्रंथ लालित्यपर असले तरी त्यांतील कथानकें चित्ताकर्षक असून शिवाय त्यांत कला, धर्म, तत्त्वज्ञान, नीतिमत्ता, आणि ऐतिहासिक प्रसंग यांवर सूक्ष्म विवेचक टीका असल्यामुळें त्याच्या कादंबऱ्या फारच उच्च प्रतीच्या आहेत, आणि त्याच्या विशेष चांगल्या कादंबऱ्यांचीं इंग्रजी व इतर भाषांत भाषां-तरें झालीं आहेत. 'जोन ऑफ आर्क'चें त्याचें चरित्र पाहून त्याच्या ठिकाणीं उत्कृष्ट उपरोधाप्रमाणेंच सत्य आणि सौंदर्य यांची प्रामाणिक उपासनाहि होती हें पटतें.

**फ्रान्सिस, जोसेफ** (१८३०–१९१६)— ऑस्ट्रिया-हंगेरीचा एक बादशहा. १८४८ सालीं त्याच्या चुलत्यानें राज्य-त्याग केल्यानंतर हा गादीवर आला. यानें ६८ वर्षें राज्य केलें. पण या दीर्घ काळांत त्याच्या स्वतःवर व राज्यावर मोठमोठीं अरिष्टें ओढवलीं. राज्याचा इटलींतील कांहीं भाग त्याच्या ताब्यां-तून गेला (१८५९) व प्रशियानें ऑस्ट्रियावर विजय मिळविला (१८६६). तथापि न डगमतां यानें सर्व्हियावर चाल केली व पहिलें महायुद्ध ओढवून घेतलें. ऑस्ट्रियाला पुढें आणण्यासाठीं हा वाटेल तें करी, तरहि मोडी व शेवटीं परिणाम भोगीत बसे.

त्याची बायको, भाऊ, एकुलता एक मुलगा व पुतण्या या सर्वांचे चमत्कारिक रीतीनें मृत्यू ओढवले. त्याचा पुतण्या आर्चड्यूक फ्रान्झ फर्डिनंड याचा खून झाल्यामुळेंच पहिलें जागतिक महायुद्ध पेटलें. या महायुद्धानंतर हें राज्य मोडून लोकशाही झाली.

**फ्रान्सिस, सेंट** (असीसी येथील)—फ्रान्सिस्कन पंथाचा संस्थापक. सेंट फ्रान्सिस हा अंब्रियामधील असीसी येथें सन ११८१ किंवा ११८२ मध्यें जन्मला. याचा बाप पायट्रो बर्नाडोन हा असीसी येथील एक मोठा श्रीमान् कापडाचा व्यापारी होता. फ्रान्सिस यास भावंडें बरींच होतीं. तो फारसा अभ्यासू नसल्यामुळें त्याचें शिक्षण अर्धवटच राहिलें. पुढें तो आपल्या

बापाच्या धंद्यांत शिरला; परंतु त्यामध्यें त्याला फारसें गम्य नसे. पुढें जो तो एवढा मोठा साधु म्हणून प्रसिद्धीस आला, त्याचें पूर्वचिन्ह त्याच्या बालपणांत कांहीं फारसें आढळून येत नाहीं. तो एकदां आजारी पडला व त्या आजारानंतर तो घरा होण्याच्या कालांत त्याच्यामध्यें स्थित्यंतर घडून आलें. यानंतर त्यास मौल्यवान किंवा झगझगीत पोषाख व इतर श्रीमंती थाट यांची आवड वाटेनाशी झाली व त्याची प्रवृत्ति एकांतवासाकडे व प्रार्थनेकडे वळली. यानंतर त्यानें पुष्कळच प्रवास केला, ठिकठिकाणीं गंभीर चर्चा केली व आपल्या पंथाची पुष्कळ वाढ करून त्याचा प्रसार केला. त्यानें आपल्या पंथाकरितां नियम केले व विशेषतः फ्रान्सिस्कन पंथीयांत एक विशिष्ट प्रकारची वृत्ति निर्माण केली. अर्थात् ही वृत्ति उत्पन्न करण्याकरितां त्याला स्वतःला मानवी शक्तीच्या पलीकडील परिश्रम करावे लागले व हें कार्य त्यानें इ. स. १२२६ मध्यें मृत्यु येईपर्यंत केले. मृत्युसमयीं उघड्या जमिनीवर पडून त्यानें आपल्या अनुयायांस निर्धनतेचें अखेरचें उदाहरण प्रत्यक्ष घालून दिलें व निर्धनता ही कोणत्या मर्यादेपर्यंत नेतां येते याचें निदर्शन केलें.

**फ्रास्ट, एड्विन् ब्रॅन्ट** (१८६६–१९३५)—हा एक अमेरिकन ज्योतिषशास्त्रज्ञ असून १८९८ ते १९०५ पर्यंत शिकागो विद्यापीठामध्यें ज्योतिष व पदार्थविज्ञानशास्त्र यांचा प्राध्यापक होता. तेथून तो यर्किस वेधशालेचा चालक झाला. त्यानें सूर्याचें उष्णताविसर्जन आणि सूर्यावरील डाग यांसंबंधीं पुष्कळ संशोधन व निरीक्षण केलें आहे. यानें आकाशगंगेचा एक तारकापटहि प्रसिद्ध केला आहे.

**फ्रिजिआ**—आशिया मायनरमधील कांहीं एका प्रदेशाचें जुनें ऐतिहासिक नांव. अनातोलियाचें पठार यांतच मोडत असे. फ्रिजिअनांचा मुख्य धंदा शेती. प्रसिद्ध कथालेखक इसाप फ्रिजिआंतील कोटियमचा गॉर्डीयस व मिडास हे यांतील प्रसिद्ध राजे होते. फ्रिजिआवर सुमेरियन वगैरे लोकांच्या स्वाऱ्या झाल्या व इराण, रोम, वगैरे परकीय सत्तेखालीं हा देश राहिला. फ्रिजिअन लोकांची संस्कृति पौरस्त्य होती. ते मूर्तिपूजक होते. ते मूळचे आर्मोनिअन असावेत व फार प्राचीन काळीं त्यांनीं विस्तृत प्रदेशावर राज्य केलें असावें, अशीं संशोधकांचीं नवीं अनुमानें आहेत. यांच्यांतील मिडास राजा दंतकथांतून येतो. तो ख्रि. पू. ८ व्या शतकांत होऊन गेला. सुमेरियनांनीं फ्रिजिआचें राज्य बुडविलें व तें लिडियाला जोडलें.

**फ्रीअर, सर हेन्री बार्टल एडवर्ड** (१८१५–१८८४)—एक ब्रिटिश मुत्सद्दी व सरकारी अधिकारी. यानें १८३३ सालीं ईस्ट इंडिया कंपनींत नोकरी धरली. १८४७–१८५० पर्यंत तो सातान्यास रेसिडेंट होता. नंतर सिंध प्रांताचा कमिशनर झाला. त्यानें १८५७ च्या बंडांत महत्त्वाची कामगिरी बजावली. १८६२–६७ पर्यंत हा मुंबईचा गव्हर्नर होता; व त्याच काळांत त्यानें पुण्यास गणेशखिंडींत गव्हर्नरचा बंगला बांधला; व सरदारांचा एक मोठा दरबार भरवून मराठींत भाषण केलें. १८६७ सालीं तो इंग्लंडला परतला. १८७२ सालीं त्यानें झांजिबारच्या सुलतानाशीं तह करून नीग्रो गुलामांचा व्यापार बंद केला. १८७७ सालीं त्याला साउथ आफ्रिकेचा कमिशनर नेमलें पण १८८० सालीं त्याच्या कारभारावर आक्षेप घेऊन ब्रिटिश सरकारनें त्याला परत बोलावलें.

**फ्रीटाउन**—पश्चिम आफ्रिकेंतील सिरालिओन (ब्रिटिश वसाहत)ची राजधानी व बंदर. लो. सं. ४५,०००. हें शहर एका मैदानावर असून फार सुंदर आहे. परंतु येथील हवा रोगट आहे. व्यापाराच्या व युद्धविषयक दृष्टीनें हें शहर या भागांत फार महत्त्वाचें आहे. येथील बंदरांत मोठें आरमार राहण्याजोगी जागा आहे.

**फ्रीमेसनरी**—ही एक जागतिक संस्था आहे. हिचें मूळ कांहीं संशोधक ग्रीक लोक व त्यांचे कांहीं गूढ विधी यांशीं जोडतात. इंग्लंडमध्यें या संस्थेचा प्रवेश धर्मयुद्धकाळीं झाला अशी समजूत आहे. स्कॉटलंडमध्यें सोळाव्या शतकांत यांच्या संस्था व सभागृहें होतीं व त्यांतील सर्वांत जुनें एडिंबर्ग येथील सभागृह होय. इंग्लंडमध्यें त्यानंतर कांहीं सभागृहें स्थापन झालीं व १७१७ मध्यें सर्व लंडनमधलि सभागृहांचें एकीकरण करण्यांत येऊन इंग्लंडचें मुख्य सभागृह (ग्रँड लॉज) स्थापन करण्यांत आलें. आयर्लंडचें मुख्य सभागृह १७२९ मध्यें व स्कॉटलंडचें १७३६ मध्यें स्थापन झालें. या संस्थेचा प्रचार हळूहळू १९ व्या शतकांत सर्व ब्रिटिश साम्राज्यांत व विशेषतः युरोपियन लोकांत होत गेला. आज इंग्लंडच्या मुख्य सभागृहास जोडलेलीं ४५०० सभागृहें आहेत व सभासदांची संख्या चाळीस लक्षांवर आहे.

प्रत्येक सभागृहाचें एक अधिकारीमंडळ निवडलेलें असतें व सारख्या दर्जाच्या लोकांस सभासद करून घेण्यांत येतें. प्रत्येक सभागृहाचा एक अध्यक्ष (मास्टर) असतो व त्याशिवाय खजिनदार, रक्षक (वॉर्डन) व चिटणीस असतो. यांच्या नियमितपणें सभा व जेवणें होतात व त्या वेळीं बरेच विधी करण्यांत येतात. विशिष्ट तऱ्हेचे पोषाख व अलंकार अध्यक्ष धारण करतो. अशीं अनेक सभागृहें जिल्ह्याच्या किंवा प्रांताच्या सभागृहास जोडलेलीं असतात. या सर्वांचा प्रमुख ड्यूक ऑफ कॅनॉट हा असे.

याखेरीज रॉयल आर्च मेसन, मार्क मेसन, वगैरेहि कित्येक निरनिराळ्या संस्था आहेत. इंग्लंड, स्कॉटलंड व आयर्लंड

या देशांचीं मुख्य सभागृहें लंडन, एडिंबर्ग व डब्लिन येथें आहेत. यांचा मुख्य उद्देश परस्परांस साहाय्य करणें हा असतो व मृत सभासदांच्या वारसांस मदत करण्यांत येते. यांच्याजवळ मोठमोठे निधी आहेत.

हिंदुस्थानांत ही संस्था बंगालमध्यें १७२८ त स्थापन झाली. नंतर इतर प्रांतांतून संस्था स्थापन झाल्या. हिंदुस्थानांत युरोपियन लोकांशीं संबंध जोडण्याकरितां व त्यांमार्फत आपलीं कांहीं कामें करून घेण्याकरितां कांहीं हिंदी गृहस्थ या सभागृहांचे सभासद होऊं लागले. त्यांत कांहीं सरकारी नोकर चढती मिळण्याकरितां, कांहीं कंत्राटदार कामें मिळण्याकरितां, कांहीं वकील साहेबांशीं ओळख करण्याकरितां, वगैरे सभासद झालेले आढळतात. यांचे विधी, कामें वगैरे गुप्त व रात्रीच्या वेळीं चालत असल्यामुळें यांच्या सभागृहांस सामान्यतः 'भूतखाना' ही संज्ञा रूढ झालेली आहे.

**फ्रेंच इंडिया**—हिंदुस्थानांतील फ्रेंच अमलाखालचा मुलूख. इंग्लंड व फ्रान्स यांच्या दरम्यान वेळोवेळीं झालेल्या युद्धांस आणि त्यांतील तहांस अनुसरून हिंदुस्थानांतील फ्रेंच मुलूख विशेषतः पॉंडेचरी अनेक वेळां इंग्रजांकडे येई व परत दिला जाई. १८१५ च्या तहान्वयें शेवटचा निर्णय घेण्यांत आला त्याप्रमाणें हिंदुस्थानांत फ्रेंचांकडे पॉंडेचरी (८ पेटे), कारिकल (६ पेटे), चंद्रनगर, माही व यानान (३ पेटे, प्रत्येकीं एकेकप्रमाणें) हा मुलूख राहिला. एकंदर जमा वसूल (१९४६) ४१,७०,६८८ रु.. पॉंडेचरी, कारिकल व माही या तिन्ही बंदरांत मिळून १९४५ सालीं ४५,८३,४०५ रुपयांची आयात व ६७,१४,९५१ रुपयांची निर्यात झाली. ४३ मैल लांबीची फ्रेंच रेल्वे आहे. वरील १७ हि पेट्यांना म्युनिसिपल कमिट्या आहेत. गव्हर्नर पॉंडेचरीस असतो. पॅरिसच्या पार्लमेंटमध्यें पांचहि तालुक्यांतून दोन दोन प्रतिनिधी घेतले जातात. पांचहि तालुके मिळून क्षेत्रफळ फक्त २०३ चौ. मैल आहे. लो. सं. ३,६२,०४५ आहे. १९४४ सालीं फ्रेंच इंडियांत ६७ प्राथमिक शाळा व ४ कॉलेजें होतीं.

१६०३ पासून हिंदुस्थानशीं व्यापार करण्याचा फ्रेंचांचा इरादा होता पण १६८३ मध्यें पॉंडिचरी गांव विकत घेऊन जम बसवीपर्यंत कांहीं फारसें साधलें नाहीं. चंद्रनगर १६८८ मध्यें दिल्लीच्या बादशहाकडून मिळविलें. १७२५ त माही, १७३९ त कारिकल व १७५० त यानान हीं फ्रेंच कंपनीकडे आलीं.

हिंदुस्थानांत हा जो थोडा परकीय मुलूख आहे तो त्यांतील प्रजेच्या संमतीनें भारतांत घ्यावा असें दोन्ही राष्ट्रांचें दोन वर्षांपूर्वी ठरलें. त्याप्रमाणें चंद्रनगरचें लोकमत अजमावण्यांत आलें. तें ७,४७३ विरुद्ध ११४ मतांनीं विलीनीकरणाला अनुकूल होतें. तसेंच पॉंडेचरी वगैरे भागांतील लोकमत घ्यावें असें पूर्वी ठरलें असतांहि फ्रेंच सरकारनें विनाकारण दिरंगाई लावली आहे. तथापि लवकरच फ्रेंच इंडिया हा भारतांत समाविष्ट होईल अशी आशा वाटते.

**फ्रेंच इंडोचीन**—इंडोचीन पाहा.

**फ्रेंच कॉंगो**—फ्रेंच विषुववृत्तीय आफ्रिका पाहा.

**फ्रेंच ग्वायना**—ग्वायना पाहा.

**फ्रेंच पॉलिश**—घरांतील लांकडी सामान, पेट्या, दारें, खिडक्या, वगैरेंना तकाकी आणण्याकरितां मद्यार्कांत लाख विरघळवून तयार करण्यांत येणारें एक मिश्रण. याची कृति पुढीलप्रमाणें असते:— लाख ५½ औंस, उत्तम राळ १ पिंट; किंवा लाख ३½ पौंड व राळ १ गॅलन हीं मद्यार्कांत विरघळविणें.

**फ्रेंच भाषा व वाङ्मय**—१. भाषा—फ्रेंच हें रोमानिक पोटभाषांपैकीं एका भाषासमूहाचें नांव आहे. हें नांव संकुचित अर्थानें पॅरिसच्या भाषेलाहि लावतात. पण विस्तृत अर्थानें लोरेन धरून उत्तर फ्रान्स देश व बेल्जम आणि स्वित्झर्लंड यांचे कांहीं भाग यांत बोलली जाणारी जी देशभाषा ती फ्रेंच होय.

गॉलमधील फ्रँक लोकांनीं आपली मूळ ट्यूटॉनिक भाषा टाकून रोमानिक भाषा स्वीकारली व तिला फ्रान्सिस्का हें नांव पडलें. या नांवावरूनच फ्रान्से हें आजचें फ्रेंच भाषेचें नांव बनलें. पॅरिसचें महत्त्व वाढल्यावर तेथील भाषा ही राज्यभाषा बनली (१५३९).

फ्रेंचमध्यें जो शब्दसंग्रह आहे त्यांतील मूळ भाग लॅटिन शब्दांचा आहे. लॅटिन शब्द बोलींत येऊन त्यांत फेरफार झाले व फ्रेंच शब्द बनले. नंतर साधित शब्द व केल्टिक व ट्यूटन शब्द यांची भर पडली. क्रुसेडर लोकांनीं प्राच्य व परकीय शब्द आणले. राजघराण्यांच्या विवाहादि संबंधांमुळें इटालियन व स्पॅनिश शब्दांची आयात झाली. प्रॉव्हेन्शल, जर्मन व इंग्रजी शब्दहि थोडेफार फ्रेंच भाषेंत शिरले. आज जगांत फ्रेंच बोलणाऱ्यांची लोकसंख्या सु. ४½ कोटी आहे.

२. वाङ्मय—मध्ययुग—मध्ययुग हें श्रद्धेचें युग होतें म्हणून त्या कालच्या वाङ्मयांत जीवनाच्या सर्व पैलूंचें प्रतिबिंब दिसून येत नाहीं. त्यांत धार्मिक गोष्टी, वीरांच्या कथा व नीतिकथा यांचा भरणा आढळतो. खंडकाव्यांत 'ला शॉंसों द रोलॉं' हें विशेष प्रसिद्ध आहे. याची भाषा अत्यंत साधी व विषय ऐतिहासिक आहे. देशप्रेम व धार्मिक भावना उत्तम रीतीनें रेखाटल्या आहेत. कादंबऱ्या तीन प्रकारच्या आढळतात: धाडसी, पौराणिक व ब्रिटनविषयक. काव्यांत भावगीतांसारख्या कविताहि दिसून येतात. 'व्हील आर्द्रुएं', 'उबॅंव्हील' व 'प्रवासार' हे चखरीकार होऊन गेले. जनमनरंजनार्थ प्राण्यांच्या विनोदी गोष्टी व उपहासात्मक कथाहि बऱ्याच होत्या. त्यांपैकीं 'ल रोमॉं द

रनार' हा कथासंग्रह प्रसिद्ध आहे. एकंदर जीवनावर धर्मसंस्थेची विशेष छाप असल्यामुळें या कालांतील वाङ्मयांत उपदेशपर गोष्टी व गूढदर्शन (मिस्टरी) आणि चमत्कार (मिरॅकल) दिसणारीं नाटकें प्रामुख्यानें आढळतात. 'आदाम द ला आल' हा विनोदी नाटककार होऊन गेला. याची 'पातॅलँ' ही नाट्यकृति नमूद करण्यासारखी आहे. १४ व्या व १५ व्या शतकांत वाङ्मयाला ओहोटी लागलेली दिसते. नांव घेण्यासारखा 'व्हीलाँ' हा एकच कवि होऊन गेला.

१६ वें शतक—यांत विद्येचें पुनरुज्जीवन झालें. लेखकांनीं आपली दृष्टि मध्ययुगीन वाङ्मयावरून काढून पुराणकालीन वाङ्मयाकडे वळविली. याच सुमारास धार्मिक सुधारणेची चळवळ सुरू झाली. वरील दोन्ही चळवळींचे पडसादहि तत्कालीन वाङ्मयात उमटले. सामाजिक व धार्मिक टीकेबद्दल 'राबले' याचा पांच भागांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. 'काल्व्हँ' या प्रॉटेस्टंट धर्मोपदेशकानें 'ख्रिश्चन संस्था' हा ग्रंथ लिहिला. काव्यांत 'क्लेमाँ मारो' हा विख्यात कवि झाला; परंतु काव्याला मानाचें स्थान मिळवून देण्याचें श्रेय 'प्लेय्याद' ह्या कविमंडळाला द्यावें लागेल. यांतील प्रमुख कवि 'रोसार' होता. नाट्य-लेखनांत 'गार्न्ये', 'द मॉंक्रेस्त्ये' व 'द लारीव्हे' हे होऊन गेले. तात्त्विक विषयांत 'मोंतेन्य' व धार्मिक ग्रंथांबद्दल 'सँ फ्रॉस्वा द साल' याचा उल्लेख केला पाहिजे.

१७ वें शतक—वाङ्मयाच्या दृष्टीनें हें फार महत्त्वाचें शतक होय. म्हणून यास 'ल ग्राँ स्येक्ल' (मोठें शतक) या नांवानें संबोधितात. अभिजात (क्लासिकल) वाङ्मयाची मुहूर्तमेढ याच कालात रोवली गेली. काव्याचे नियम घालून देणें, भाषेला निश्चिति आणणें व एकंदर वाङ्मयांत शिस्तीचें वातावरण निर्माण करणें, या सर्वांचें श्रेय 'मालेर्ब', 'व्होजलास' व फ्रेंच अकॅडेमी यांना द्यावें लागेल. या वेळीं स्थापन झालेले 'सालों' (Liberty Clubs) यांचाहि वाङ्मयावर इष्ट असाच परिणाम झाला. 'व्हॉत्यूर' व 'बाल्झाक्' हे प्रसिद्ध लेखक होऊन गेले. 'ला रोषफूकोल' यानें 'माक्सीम' लिहिल्या. कादंबरी-वाङ्मयांत 'द्यूर्फे'ची 'आस्त्रे' व 'स्क्युदेरी'ची 'ला क्लेली' ह्या प्रमुख होत. गणित व तत्त्वज्ञान यांत 'देकार्त' व 'पास्काल' ह्या मुख्य व्यक्ती होऊन गेल्या. देकार्तचा प्रसिद्ध ग्रंथ 'दिस्कूर द ला मेतोद' (रीतिमीमांसा) व 'पास्काल'चा 'ले पाँसे' (विचार) हा आहे. नाट्य-लेखनांत 'कोर्नेय', 'रासीन' व 'मोल्येऽर' हे प्रमुख असून 'कोर्नेय' व 'रासीन' यांच्या 'दुःखान्तिका' व 'मोल्येऽर'चीं हास्यरसप्रधान नाटकें प्रसिद्ध आहेत. टीकात्मक वाङ्मय व काव्यमीमांसा याबद्दल 'ब्वालो' हा लेखक, धार्मिक वक्तृत्वाबद्दल 'बॉस्वे' व 'बुर्दालू' हे वक्ते होऊन गेले. आपल्या दंतकथा (फेबल)नीं नांव कमाविलेला 'ला फोंतेन' होय. 'सँसिमों' यानें आपल्या 'मेम्वार' लिहिल्या; यांत मनोविश्लेषण व आकर्षक व्यक्तिदर्शन सांपडतें. आपल्या खुसखुशीत 'पत्रां'नीं 'मादाम द सेव्हीन्ये' हिनें अमरपद मिळविलें आहे. १७ व्या शतकाच्या अखेरीस 'जुन्या-नव्यांचा' वाद सुरू झाला. या कालांतील प्रसिद्ध लेखक 'ला ब्रुय्येर' व 'फेन्लो' हे होत.

१८ वें शतक—हें शतक तात्त्विक व शास्त्रीय वाङ्मय, फ्रेंच राज्यक्रान्ति, नव्या-जुन्या मतांचा झगडा व सर्वसंग्राहकता (कॉस्मॉपॉलिटिझम) यांबद्दल प्रसिद्ध आहे. या वेळच्या 'सालों'मधून नवीन मतांचा व कल्पनांचा प्रसार जोरानें झाला. प्रमुख लेखक एकत्र येत व विविध विषयांवर चर्चा करीत; तसेंच आपल्या वाङ्मयकृती वाचून दाखवीत. परंतु या काळांत गद्यावर अधिक भर होता. काव्याच्या दृष्टीनें हें शतक शुष्क वाटतें.

या काळांतील मुख्य लेखक—(१) मोंतेस्क्यू–याचें 'पर्शिअन पत्रें' व 'स्पिरिट ऑफ दि लॉज' (कायद्याचा मूळ हेतु) हे मुख्य ग्रंथ आहेत. (२) व्होल्तेर–लघुकथालेखक, कादंबरीकार, तत्त्ववेत्ता व इतिहासकार. ग्रंथः— १४ व्या लुईचें शतक; झादीग, कांदीद, व पत्रव्यवहार. (३) दिदरो—त्याच्या विश्वकोशाबद्दल प्रसिद्ध; शिवाय स्वतः नाटककार व नाटकांवरील टीकात्मक निबंधाबद्दल विख्यात. (४) ब्यूफों—शास्त्रीय लिखाणाबद्दल प्रसिद्ध. ग्रंथ 'सृष्टिज्ञान'. (५) जॉ जॉक रूसो—तत्त्ववेत्ता, शिक्षणतज्ज्ञ, राजकारण व धर्म यांवर टीका करणारा. ग्रंथ—'शास्त्र व कला' यांची मीमांसा, 'सामाजिक करार', 'आत्मनिवेदन' (कॉन्फेशन्स), 'एमिल'. या काळांत अभिजात वाङ्मयाचें पुनरुज्जीवन करणारा कवि 'आंद्रे शेन्ये' हा होय.

दुय्यम दर्जाचे लेखक—त्या वेळचीं नाटकें, कादंबऱ्या व नीतिकथा यांतून तत्कालीन समाजाच्या चालीरीतींचें प्रतिबिंब थोडेंबहुत दिसतें. 'मारीव्हो' व 'बोमार्शे' हे दोन प्रसिद्ध नाटककार; 'लसाज', 'प्रव्होस' व 'बेर्नार्दँ द सँ प्येऽर' हे तिघे कादंबरीकार; 'व्होव्हनार्ग', 'ध्यूक्लो', 'शांफोर' व 'रिव्हारोल' हे चौघे नीतिकथा लिहिणारे होऊन गेले.

१९ वें शतक—पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतीनंतर एक नवीन तऱ्हेचा समाज उदयास आला. जुने नियम झुगारले गेले. नव्या विचारांचे वारे जोमानें वाहूं लागले. वर्तमानपत्रें व नियतकालिकें अधिक प्रमाणांत निघूं लागलीं. वाचकवर्ग वाढला व टीकात्मक वाङ्मय बाहेर पडूं लागलें. १९ व्या शतकांतील वाङ्मयाचे चार प्रमुख कालखंड पडतात : (१) राजशाही काल (१८००–१८२०)–शातोब्रियां हा विख्यात लेखक होऊन गेला.

या लेखकाची वाङ्मयकृति सोडल्यास बाकीचें वाङ्मय रुक्ष आहे. (२) अद्भुतरम्य वाङ्मयीन काल (१८२०–१८५०)—प्रमुख लेखक: पालोन्नियां, मादाम द स्ताऽल, व्हिक्तोर यूगो, लामार्तिन, म्यूसे, व्हिन्यी, जॉर्ज सॉ, व मिश्ले. (३) यथार्थवादी काळ (रिॲलिझम) (१८५०–१८८०)—यांतील मुख्य लेखक: फ्लोबेर, बाल्झाक, रनां, तेन, सँतवऽव्ह. (४) ध्येयवादी काल (१८८०–१९००)—यथार्थवादांतून निसर्गवाद (नॅचरलिझम) निघाला, आणि निसर्गवादाची प्रतिक्रिया म्हणून आणि विशेषतः काव्यांत संकेतवाद (सिम्बॉलिझम) उदय पावला. त्याचप्रमाणें अद्भुतरम्य वाङ्मयाची प्रतिक्रिया म्हणून काव्यांत पार्न्योसिअन पंथ निघाला.

२० वें शतक—या शतकांत सामाजिक, राजकीय, शास्त्रीय, वगैरे विविध क्षेत्रांत प्रगति दिसते. काव्यांत (१) संकेतवादाची चळवळ. कवि—व्हेर्लेन, रँबो, मालार्मे, व्हालेरी, वगैरे. (२) अर्वाचीनता, दादैझम, अतियथार्थवाद (सुर्रिॲलिझम) व एकत्ववाद (युनॅनिझम). (३) भावगीतें रचणारे कवी—फ्रान्सिस जाम्स, आना द नोकाय. (४) विजातीय कथनक (एक्झॉटिक) कवी.

नाट्यवाङ्मय—संकेतवादांतील नाट्यकार—मोरीस मातेर्लिंक. गूढवादांतील नाट्यकार—पोल क्लोदेल. तात्त्विक नाटककार—फ्रान्सिस् द क्यूरेल. सामाजिक नाटकें—नाटककार: एर्व्हिअ, ब्रिय, मिर्बो, वगैरे. मानसशास्त्रीय नाटकें—नाटककार: पोर्तो-रीश व ऑरी बाताय. प्रहसनें, फार्स—नाटककार: कुर्तलिन.

कादंबरीकार—आनातोल फ्रान्स व रोमॉ रोलाँ—निसर्गवादाविरुद्ध यांची उभारणी होती. पिएर लोती—विजातीय कथां(एक्झॉटिझम)चा पुरस्कर्ता. विवरणात्मक (अॅनलिटिकल) कादंबऱ्यांमध्यें प्रसिद्ध कादंबरीकार—आंद्रे जीद व मार्सेल प्रूस. सामाजिक आचारविचारांच्या कादंबऱ्या—कादंबरीकार: मार्ले घ्यू व गार ज्यूल रोर्म.

याप्रमाणें फ्रेंच वाङ्मयाचा हा धांवता आढावा काढला आहे. फ्रेंच वाङ्मय साहित्य या दृष्टीनें उत्कृष्ट आहे यांत शंका नाहीं; पण राष्ट्र बलशाली व कणखर करण्यास या वाङ्मयाचा उपयोग होत नाहीं हा जुनाच अनुभव आहे. स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्या राष्ट्राला स्वतःचें स्वातंत्र्य सांभाळतां येत नाहीं. आज फ्रान्सला राष्ट्रीय व स्फूर्तिदायक वाङ्मयाची फार गरज आहे.

**फ्रेंच राज्यक्रांति**—ही जगद्विख्यात राज्यक्रांति फ्रान्समध्यें १७८९ सालीं सुरु होऊन पुढें सात वर्षे टिकून होती. या पूर्वी फ्रेंच लोकांची, विशेषतः खेड्यापाड्यांतील, फारच दुःस्थिति होती. राज्यकारभार अतिशय जुलमी व अंदाधुंदीचा झाला होता. राजकर्ते आणि सरदार लोक यांच्या हातीं सर्व सत्ता असून ते मात्र कांहीं कर भरीत नसत, व गरिबांच्यावर त्यांचा सर्व भार पडे व तो सोसणें अशक्य होऊन गेलें होतें. याबरोबरच व्होल्टेर, रूसो, वगैरे लोकशाहीच्या पुरस्कर्त्या पंडितांची सामान्य लोकांना अशी शिकवण असे कीं, आपणांवर विनाकारण धार्मिक दडपण फार आहे; त्यामुळें आपण परतंत्र व दुबळे झालों आहों. प्रत्येक माणसाला नैसर्गिक हक्क असून राज्यकारभारांत त्याचें मत घेतलेंच पाहिजे. माणसामाणसांत उच्चनीचपणाचे कृत्रिम भेद पाडले आहेत ते मोडून काढले पाहिजेत. या प्रकारच्या नवविचारांमुळें सामान्य फ्रेंच जनता चंडखोर बनली. याच सुमारास १६१४ पासून कधीं न भरलेलें 'स्टेट्स जनरल' नांवाचें नांवालाच सत्ता असलेलें प्रतिनिधि मंडळ भरलें; पण सामान्य जनतेनें तिचा एकदम ताबा घेऊन एक राष्ट्रीय मंडळ बनविलें. व हीच क्रांतीला सुरुवात झाली.

ता. १४ जुलै सन १७८९ रोजीं प्रक्षुब्ध जनसंमर्दानें बॅस्टाइल नांवाचा कुप्रसिद्ध तुरुंग फोडून त्यांतील कैदी मोकळे केले, व तिरंगी निशाण उभारून लोकशाहीची मागणी शास्त्यांना रुजू केली. तेव्हां राष्ट्रीय मंडळानें वतनदारांचे व इतरांचे सर्व हक्क झुगारून देऊन स्वतःच नवीन लोकशाहीची घटना करण्याची तयारी केली. याप्रमाणें देशांत खळबळ माजल्यावर सरदार व बडे लोक इंग्लंडला व इतर देशांना पळाले. उरलेल्यांची कत्तल सुरू झाली. फ्रान्सचा बादशहा सोळावा लुई पॅरिस सोडून पळून जाऊं लागला असतां त्याला धरून कैदेंत टाकलें. इंग्लंडप्रमाणें मर्यादित राजसत्ताक शासनपद्धति ठेवण्याचा क्रांतिनेत्यांचा प्रथम बेत होता. पण ऑस्ट्रिया, प्रशिया, वगैरे आजूबाजूच्या राजांनीं जेव्हां फ्रान्सच्या राजाला बंदींतून सोडवून राज्यारूढ करण्याचा व बंडें मोडण्याचा चंग बांधून फ्रान्सवर हल्ला करण्याची सिद्धता केली, तेव्हां लोकशाही पक्षानें या शत्रूंशीं टक्कर देण्यासाठीं सैन्य उभारलें व कांहीं विजयहि मिळविला. आपला राजा विश्वासघातकी आहे असें पाहून त्याला फांशीं दिलें (१७९३) व त्याच्या राणीचीहि तीच गत केली.

फ्रान्सनें मागें कोणाशीं तह केले असतील ते सर्व रद्द करून, राजसत्तेखालीं चुरडल्या जाणाऱ्या इतर देशांतील लोकांना अशीच क्रांति करण्याची चिथावणी या लोकसभेनें दिली. यामुळें इंग्लंडादि राष्ट्रें फार घाबरलीं. इंग्लंडांत कांहीं मुत्सद्दी या क्रांतीला अनुकूल होते; पण एडमंड बर्कसारखे राजकारणी फार विरोधी असून त्यांनीं ही क्रांतीची लाट थोपवून धरण्याचा व क्रांतिवाद्यांचा पाडाव करण्याचा आग्रह धरला.

फ्रान्समध्यें क्रांतिकारकांतहि दोन पक्ष होते व ते एकमेकांना नष्ट करण्याचा प्रयत्न करीत. यामुळें देशांत आणखी अशांतता

रनार' हा कथासंग्रह प्रसिद्ध आहे. एकंदर जीवनावर धर्मसंस्थेची विशेष छाप असल्यामुळें या कालांतील वाङ्मयांत उपदेशपर गोष्टी व गूढदर्शन (मिस्टरी) आणि चमत्कार (मिरॅकल) दिसणारीं नाटकें प्रामुख्यानें आढळतात. 'आदाम द ला आल' हा विनोदी नाटककार होऊन गेला. याची 'पातूलँ' ही नाट्यकृति नमूद करण्यासारखी आहे. १४ व्या व १५ व्या शतकांत वाङ्मयाला ओहोटी लागलेली दिसते. नांव घेण्यासारखा 'व्हीलॉं' हा एकच कवि होऊन गेला.

१६ वें शतक—यांत विद्येचें पुनरुज्जीवन झालें. लेखकांनीं आपली दृष्टि मध्ययुगीन वाङ्मयावरून काढून पुराणकालीन वाङ्मयाकडे वळविली. याच सुमारास धार्मिक सुधारणेची चळवळ सुरू झाली. वरील दोन्ही चळवळींचे पडसादहि तत्कालीन वाङ्मयात उमटले. सामाजिक व धार्मिक टीकेबद्दल 'राबले' याचा पांच भागांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. 'काल्व्हँ' या प्रॉटेस्टंट धर्मोपदेशकानें 'ख्रिश्चन संस्था' हा ग्रंथ लिहिला. काव्यांत 'क्लेमॉं मारो' हा विख्यात कवि झाला; परंतु काव्याला मानाचें स्थान मिळवून देण्याचें श्रेय 'प्लेय्याद' ह्या कविमंडळाला द्यावें लागेल. यांतील प्रमुख कवि 'रोसार' होता. नाट्य-लेखनांत 'गार्न्ये', 'द मॉंक्रेस्त्ये' व 'द लारीव्हे' हे होऊन गेले. तात्त्विक विषयांत 'मोतेन्य' व धार्मिक ग्रंथांबद्दल 'सँ फ्रॉंस्वा द साल' याचा उल्लेख केला पाहिजे.

१७ वें शतक—वाङ्मयाच्या दृष्टीनें हें फार महत्त्वाचें शतक होय. म्हणून यास 'ल ग्रॉं स्येक्ल' (मोठें शतक) या नांवानें संबोधितात. अभिजात (क्लासिकल) वाङ्मयाची मुहूर्तमेढ याच कालात रोवली गेली. काव्याचे नियम घालून देणें, भाषेला निश्चिति आणणें व एकंदर वाङ्मयांत शिस्तीचें वातावरण निर्माण करणें, या सर्वांचें श्रेय 'मालेर्ब', 'व्होजलास' व फ्रेंच अकॅडेमी यांना द्यावें लागेल. या वेळीं स्थापन झालेले 'सालों' (Liberty Clubs) यांचाहि वाङ्मयावर इष्ट असाच परिणाम झाला. 'व्हॉत्यूर' व 'बाल्झाक्' हे प्रसिद्ध लेखक होऊन गेले. 'ला रोषफूकोल' यानें 'माक्सीम' लिहिल्या. कादंबरी-वाङ्मयांत 'द्यूर्फे'ची 'आस्त्रे' व 'स्क्युदेरी'ची 'ला क्लेली' ह्या प्रमुख होत. गणित व तत्त्वज्ञान यांत 'देकार्त' व 'पास्काल' ह्या मुख्य व्यक्ती होऊन गेल्या. देकार्तचा प्रसिद्ध ग्रंथ 'दिस्कूर द ला मेतोद' (रीतिमीमांसा) व 'पास्काल'चा 'ले पॉंसे' (विचार) हा आहे. नाट्य-लेखनांत 'कोर्नेय', 'रासीन' व 'मोल्येऽर' हे प्रमुख असून 'कोर्नेय' व 'रासीन' यांच्या 'दुःखान्तिका' व 'मोल्येऽर'चीं हास्यरसप्रधान नाटके प्रसिद्ध आहेत. टीकात्मक वाङ्मय व काव्यमीमांसा याबद्दल 'ब्वालो' हा लेखक, धार्मिक वक्तृत्वाबद्दल 'बॉस्वे' व 'बुर्दाल्' हे वक्ते होऊन गेले. आपल्या दंतकथा (फेबल) नीं नांव कमाविलेला 'ला फॉंतेन' होय. 'सॅंसिमों' यानें आपल्या 'मेम्वार' लिहिल्या; यांत मनोविश्लेषण व आकर्षक व्यक्तिदर्शन सांपडतें. आपल्या खुसखुशीत 'पत्रां'नीं 'मादाम द सेव्हीन्ये' हिनें अमरपद मिळविलें आहे. १७ व्या शतकाच्या अखेरीस 'जुन्या-नव्यांचा' वाद सुरू झाला. या कालांतील प्रसिद्ध लेखक 'ला ब्रुय्येर' व 'फेन्लो' हे होत.

१८ वें शतक—हें शतक तात्त्विक व शास्त्रीय वाङ्मय, फ्रेंच राज्यक्रान्ति, नव्या-जुन्या मतांचा झगडा व सर्वसंग्राहकता (कॉस्मॉपॉलिटिझम) यांबद्दल प्रसिद्ध आहे. या वेळच्या 'सालों'-मधून नवीन मतांचा व कल्पनांचा प्रसार जोरानें झाला. प्रमुख लेखक एकत्र येत व विविध विषयांवर चर्चा करीत; तसेंच आपल्या वाङ्मयकृती वाचून दाखवीत. परंतु या कालांत गद्यावर अधिक भर होता. काव्याच्या दृष्टीनें हें शतक शुष्क वाटतें.

या काळांतील मुख्य लेखक—(१) मोंतिस्क्यू-याचें 'पर्शिअन पत्रें' व 'स्पिरिट ऑफ दि लॉज' (कायद्याचा मूळ हेतु) हे मुख्य ग्रंथ आहेत. (२) व्होल्तेर-लघुकथालेखक, कादंबरीकार, तत्त्ववेत्ता व इतिहासकार. ग्रंथः— १४ व्या लुईचें शतक; झादीग, कांदीद, व पत्रव्यवहार. (३) दिदरो—त्याच्या विश्वकोशाबद्दल प्रसिद्ध; शिवाय स्वतः नाटककार व नाटकांवरील टीकात्मक निबंधाबद्दल विख्यात. (४) ब्यूफों— शास्त्रीय लिखाणाबद्दल प्रसिद्ध. ग्रंथ 'सृष्टिज्ञान'. (५) जॉं जॉक रूसो—तत्त्ववेत्ता, शिक्षणतज्ज्ञ, राजकारण व धर्म यांवर टीका करणारा. ग्रंथ—'शास्त्र व कला' यांची मीमांसा, 'सामाजिक करार', 'आत्मनिवेदन' (कॉन्फेशन्स), 'एमिल'. या काळांत अभिजात वाङ्मयाचें पुनरुज्जीवन करणारा कवि 'आंद्रे शेन्ये' हा होय.

दुय्यम दर्जाचे लेखक—त्या वेळचीं नाटकें, कादंबऱ्या व नीतिकथा यांतून तत्कालीन समाजाच्या चालीरीतींचें प्रतिबिंब थोडेंबहुत दिसतें. 'मारीव्हो' व 'बोमार्शे' हे दोन प्रसिद्ध नाटककार; 'लसाज', 'प्रव्होस' व 'बेर्नार्दँ द सँ प्येऽर' हे तिघे कादंबरीकार; 'व्होव्हनार्ग', 'धूक्लो', 'शांफोर' व 'रिव्हारोल' हे चौघे नीतिकथा लिहिणारे होऊन गेले.

१९ वें शतक—पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतीनंतर एक नवीन तऱ्हेचा समाज उदयास आला. जुने नियम झुगारले गेले. नव्या विचारांचे वारे जोमानें वाहूं लागले. वर्तमानपत्रें व नियतकालिकें अधिक प्रमाणांत निघूं लागलीं. वाचकवर्ग वाढला व टीकात्मक वाङ्मय बाहेर पडूं लागलें. १९ व्या शतकांतील वाङ्मयाचे चार प्रमुख कालखंड पडतात: (१) राजशाही काल (१८००–१८२०)-शातोब्रियां हा विख्यात लेखक होऊन गेला.

या लेखकाची वाङ्मयकृति सोडल्यास बाकीचें वाङ्मय रुक्ष आहे. (२) अद्भुतरम्य वाङ्मयीन काल (१८२०–१८५०)—प्रमुख लेखक : पालोन्नियां, मादाम द स्ताऽल, व्हिक्तोर यूगो, लामार्तिन, म्यूसे, व्हिन्यी, जॉर्ज सॉं, व मिश्ले. (३) यथार्थवादी काळ (रिॲलिझम) (१८५०–१८८०)—यांतील मुख्य लेखक : फ्लोबेर, बाल्झाक, रनां, तेन, सँतबऽव्ह. (४) ध्येयवादी काल (१८८०–१९००)—यथार्थवादांतून निसर्गवाद (नॅचरलिझम) निघाला, आणि निसर्गवादाची प्रतिक्रिया म्हणून आणि विशेषतः काव्यांत संकेतवाद (सिम्बॉलिझम) उदय पावला. त्याचप्रमाणें अद्भुतरम्य वाङ्मयाची प्रतिक्रिया म्हणून काव्यांत पार्न्यासिअन पंथ निघाला.

२० वें शतक—या शतकांत सामाजिक, राजकीय, शास्त्रीय, वगैरे विविध क्षेत्रांत प्रगति दिसते. काव्यांत (१) संकेतवादाची चळवळ. कवि—व्हेर्लेन, रँबो, मालार्मे, व्हालेरी, वगैरे. (२) अर्वाचीनता, दादैझम, अतियथार्थवाद (सुर्रिॲलिझम) व एकत्ववाद (युर्नेनिझम). (३) भावगीतें रचणारे कवी—फ्रान्सिस जाम्स, आना द नोकाय. (४) विजातीय कथनक (एक्झॉटिक) कवी.

नाट्यवाङ्मय—संकेतवादांतील नाट्यकार—मोरीस मातेर्लिंक. गूढवादांतील नाट्यकार—पोल क्लोदेल. तात्त्विक नाटककार—फ्रान्सिस् द क्यूरेल. सामाजिक नाटकें—नाटककार : एर्व्हिअ, ब्रिय, मिर्बो, वगैरे. मानसशास्त्रीय नाटकें—नाटककार : पोर्तो-रीश व ऑरी बाताय. प्रहसनें, फार्स—नाटककार : कुर्तलिन.

कादंबरीकार—आनातोल फ्रान्स व रोमॉ रोलॉं—निसर्गवादाविरुद्ध यांची उभारणी होती. पिएर लोती—विजातीय कथां(एक्झॉटिझम)चा पुरस्कर्ता. विवरणात्मक (अॅनॅलिटिकल) कादंबऱ्यांमध्यें प्रसिद्ध कादंबरीकार—आंद्रे जीद व मार्सेल प्रूस. सामाजिक आचारविचारांच्या कादंबऱ्या—कादंबरीकार : मार्ले घू व गार ज्यूल रोमॅं.

याप्रमाणें फ्रेंच वाङ्मयाचा हा धांवता आढावा काढला आहे. फ्रेंच वाङ्मय साहित्य या दृष्टीनें उत्कृष्ट आहे यांत शंका नाहीं; पण राष्ट्र बलशाली व कणखर करण्यास या वाङ्मयाचा उपयोग होत नाहीं हा जुनाच अनुभव आहे. स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्या राष्ट्राला स्वतःचें स्वातंत्र्य सांभाळतां येत नाहीं. आज फ्रान्सला राष्ट्रीय व स्फूर्तिदायक वाङ्मयाची फार गरज आहे.

**फ्रेंच राज्यक्रांति**—ही जगद्विख्यात राज्यक्रांति फ्रान्समध्यें १७८९ सालीं सुरु होऊन पुढें सात वर्षें टिकून होती. या पूर्वी फ्रेंच लोकांची, विशेषतः खेड्यापाड्यांतील, फारच दुःस्थिति होती. राज्यकारभार अतिशय जुलमी व अंदाधुंदीचा झाला होता. राज्यकर्ते आणि सरदार लोक यांच्या हातीं सर्व सत्ता असून ते मात्र कांहीं कर भरीत नसत, व गरिबांच्यावर त्यांचा सर्व भार पडे व तो सोसणें अशक्य होऊन गेलें होतें. याबरोबरच व्होल्टेर, रूसो, वगैरे लोकशाहीच्या पुरस्कर्त्या पंडितांची सामान्य लोकांना अशी शिकवण असे कीं, आपणांवर विनाकारण धार्मिक दडपण फार आहे; त्यामुळें आपण परतंत्र व दुबळे झालों आहों. प्रत्येक माणसाला नैसर्गिक हक्क असून राज्यकारभारांत त्याचें मत घेतलेंच पाहिजे. माणसामाणसांत उच्चनीचपणाचे कृत्रिम भेद पाडले आहेत ते मोडून काढले पाहिजेत. या प्रकारच्या नवविचारांमुळें सामान्य फ्रेंच जनता बंडखोर बनली. याच सुमारास १६१४ पासून कधीं न भरलेलें 'स्टेट्स जनरल' नांवाचें नांवालाच सत्ता असलेलें प्रतिनिधि मंडळ भरलें; पण सामान्य जनतेनें तिचा एकदम ताबा घेऊन एक राष्ट्रीय मंडळ बनविलें. व हीच क्रांतीला सुरुवात झाली.

ता. १४ जुलै सन १७८९ रोजीं प्रक्षुब्ध जनसंमर्दानें बॅस्टाइल नांवाचा कुप्रसिद्ध तुरुंग फोडून त्यांतील कैदी मोकळे केले, व तिरंगी निशाण उभारून लोकशाहीची मागणी शास्त्यांना रुजू केली. तेव्हां राष्ट्रीय मंडळानें वतनदारांचे व इतरांचे सर्व हक्क झुगारून देऊन स्वतःच नवीन लोकशाहीची घटना करण्याची तयारी केली. याप्रमाणें देशांत खळबळ माजल्यावर सरदार व बडे लोक इंग्लंडला व इतर देशांना पळाले. उरलेल्यांची कत्तल सुरू झाली. फ्रान्सचा बादशहा सोळावा लुई पॅरिस सोडून पळून जाऊं लागला असतां त्याला धरून कैदेंत टाकलें. इंग्लंडप्रमाणें मर्यादित राजसत्ताक शासनपद्धति ठेवण्याचा क्रांतिनेत्यांचा प्रथम बेत होता. पण ऑस्ट्रिया, प्रशिया, वगैरे आजूबाजूच्या राजांनीं जेव्हां फ्रान्सच्या राजाला बंदींतून सोडवून राज्यारूढ करण्याचा व बंडें मोडण्याचा चंग बांधून फ्रान्सवर हल्ला करण्याची सिद्धता केली, तेव्हां लोकशाही पक्षानें या शत्रूंशीं टक्कर देण्यासाठीं सैन्य उभारलें व कांहीं विजयहि मिळविला. आपला राजा विश्वासघातकी आहे असें पाहून त्याला फांशीं दिलें (१७९३) व त्याच्या राणीचीहि तीच गत केली.

फ्रान्सनें मागें कोणाशीं तह केले असतील ते सर्व रद्द करून, राजसत्तेखालीं चुरडल्या जाणाऱ्या इतर देशांतील लोकांना अशीच क्रांति करण्याची चिथावणी या लोकसभेनें दिली. यामुळें इंग्लंडादि राष्ट्रें फार घाबरलीं. इंग्लंडांत कांहीं मुत्सद्दी या क्रांतीला अनुकूल होते; पण एडमंड बर्कसारखे राजकारणी फार विरोधी असून त्यांनीं ही क्रांतीची लाट थोपवून धरण्याचा व क्रांतिवाद्यांचा पाडाव करण्याचा आग्रह धरला.

फ्रान्समध्यें क्रांतिकारकांतहि दोन पक्ष होते व ते एकमेकांना नष्ट करण्याचा प्रयत्न करीत. यामुळें देशांत आणखी अशांतता

रनार' हा कथासंग्रह प्रसिद्ध आहे. एकंदर जीवनावर धर्मसंस्थेची विशेष छाप असल्यामुळें या कालांतील वाङ्मयांत उपदेशपर गोष्टी व गूढदर्शन (मिस्टरी) आणि चमत्कार (मिरॅकल) दिसणारीं नाटकें प्रामुख्यानें आढळतात. 'आदाम द ला आल' हा विनोदी नाटककार होऊन गेला. याची 'पातूलँ' ही नाट्यकृति नमूद करण्यासारखी आहे. १४ व्या व १५ व्या शतकांत वाङ्मयाला ओहोटी लागलेली दिसते. नांव घेण्यासारखा 'व्हीलाँ' हा एकच कवि होऊन गेला.

१६ वें शतक—यांत विद्येचें पुनरुज्जीवन झालें. लेखकांनीं आपली दृष्टि मध्ययुगीन वाङ्मयावरून काढून पुराणकालीन वाङ्मयाकडे वळविली. याच सुमारास धार्मिक सुधारणेची चळवळ सुरू झाली. वरील दोन्ही चळवळींचे पडसादहि तत्कालीन वाङ्मयांत उमटले. सामाजिक व धार्मिक टीकेबद्दल 'राबले' याचा पांच भागांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. 'काल्व्हँ' या प्रॉटेस्टंट धर्मोपदेशकानें 'ख्रिश्चन संस्था' हा ग्रंथ लिहिला. काव्यांत 'क्लेमाँ मारो' हा विख्यात कवि झाला; परंतु काव्याला मानाचें स्थान मिळवून देण्याचें श्रेय 'प्लेय्याद' ह्या कविमंडळाला द्यावें लागेल. यांतील प्रमुख कवि 'रोसार' होता. नाट्य-लेखनांत 'गार्न्ये', 'द मॉंक्रेस्त्ये' व 'द लारीव्हे' हे होऊन गेले. तात्त्विक विषयांत 'मोंतेन्य' व धार्मिक ग्रंथांबद्दल 'सँ फ्रॉंस्वा द साल' याचा उल्लेख केला पाहिजे.

१७ वें शतक—वाङ्मयाच्या दृष्टीनें हें फार महत्त्वाचें शतक होय. म्हणून यास 'ल ग्राँ स्येक्ल' (मोठें शतक) या नांवानें संबोधितात. अभिजात (क्लासिकल) वाङ्मयाची मुहूर्तमेढ याच कालात रोवली गेली. काव्याचे नियम घालून देणें, भाषेला निश्चिति आणणें व एकंदर वाङ्मयांत शिस्तीचें वातावरण निर्माण करणें, या सर्वांचें श्रेय 'मालेर्ब', 'व्होजलास' व फ्रेंच ॲकेडेमी यांना द्यावें लागेल. या वेळीं स्थापन झालेले 'सालों' (Liberty Clubs) यांचाहि वाङ्मयावर इष्ट असाच परिणाम झाला. 'व्हॉत्यूर' व 'बाल्झाक्' हे प्रसिद्ध लेखक होऊन गेले. 'ला रोपफूकोल' यानें 'माक्सीम' लिहिल्या. कादंबरी-वाङ्मयांत 'द्यूर्फे'ची 'आस्त्रे' व 'स्क्युदेरी'ची 'ला क्लेली' ह्या प्रमुख होत. गणित व तत्त्वज्ञान यांत 'देकार्त' व 'पास्काल' ह्या मुख्य व्यक्ती होऊन गेल्या. देकार्तचा प्रसिद्ध ग्रंथ 'दिस्कूर द ला मेतोद' (रीतिमीमांसा) व 'पास्काल'चा 'ले पाँसे' (विचार) हा आहे. नाट्य-लेखनांत 'कोर्नेय', 'रासीन' व 'मोल्येऽर' हे प्रमुख असून 'कोर्नेय' व 'रासीन' यांच्या 'दुःखान्तिका' व 'मोल्येऽर'चीं हास्यरसप्रधान नाटकें प्रसिद्ध आहेत. टीकात्मक वाङ्मय व काव्यमीमांसा याबद्दल 'ब्वालो' हा लेखक, धार्मिक वक्तृत्वाबद्दल 'बॉस्वे' व 'बुर्दालू' हे वक्ते होऊन गेले. आपल्या दंतकथा (फेबल) नीं नांव कमाविलेला 'ला फोंतेन' होय. 'सँसिमों' यानें आपल्या 'मेम्वार' लिहिल्या; यांत मनोविश्लेषण व आकर्षक व्यक्तिदर्शन सांपडतें. आपल्या खुसखुशीत 'पत्रां'नीं 'मादाम द सेव्हीन्ये' हिनें अमरपद मिळविलें आहे. १७ व्या शतकाच्या अखेरीस 'जुन्या-नव्यांचा' वाद सुरू झाला. या कालांतील प्रसिद्ध लेखक 'ला ब्रुय्येर' व 'फेन्लो' हे होत.

१८ वें शतक—हें शतक तात्त्विक व शास्त्रीय वाङ्मय, फ्रेंच राज्यक्रान्ति, नव्या-जुन्या मतांचा झगडा व सर्वसंग्राहकता (कॉस्मॉपॉलिटिझम) यांबद्दल प्रसिद्ध आहे. या वेळच्या 'सालों'-मधून नवीन मतांचा व कल्पनांचा प्रसार जोरानें झाला. प्रमुख लेखक एकत्र येत व विविध विषयांवर चर्चा करीत; तसेंच आपल्या वाङ्मयकृती वाचून दाखवीत. परंतु या काळांत गद्यावर अधिक भर होता. काव्याच्या दृष्टीनें हें शतक शुष्क वाटतें.

या काळांतील मुख्य लेखक—(१) मोंतेस्क्यू—याचें 'पर्शिअन पत्रें' व 'स्पिरिट ऑफ दि लॉज' (कायद्याचा मूळ हेतु) हे मुख्य ग्रंथ आहेत. (२) व्होल्तेर—लघुकथालेखक, कादंबरीकार, तत्त्ववेत्ता व इतिहासकार. ग्रंथः— १४ व्या लुईचें शतक; झादीग, कांदीद, व पत्रव्यवहार. (३) दिदरो—त्याच्या विश्वकोशाबद्दल प्रसिद्ध; शिवाय स्वतः नाटककार व नाटकांवरील टीकात्मक निबंधाबद्दल विख्यात. (४) ब्यूफॉं— शास्त्रीय लिखाणाबद्दल प्रसिद्ध. ग्रंथ 'सृष्टिज्ञान'. (५) जाँ जॉक रूसो— तत्त्ववेत्ता, शिक्षणतज्ज्ञ, राजकारण व धर्म यांवर टीका करणारा. ग्रंथ—'शास्त्र व कला' यांची मीमांसा, 'सामाजिक करार', 'आत्मनिवेदन' (कॉन्फेशन्स), 'एमिल'. या काळांत अभिजात वाङ्मयाचें पुनरुज्जीवन करणारा कवि 'आंद्रे शेन्ये' हा होय.

दुय्यम दर्जाचे लेखक—त्या वेळचीं नाटकें, कादंबऱ्या व नीतिकथा यांतून तत्कालीन समाजाच्या चालीरीतींचें प्रतिबिंब थोडेंबहुत दिसतें. 'मारीव्हो' व 'बोमार्शे' हे दोन प्रसिद्ध नाटककार; 'लसाज', 'प्रव्होस' व 'बेर्नार्दँ द सँ प्येऽर' हे तिघे कादंबरीकार; 'व्होव्हनार्ग', 'ग्रूक्लो', 'शांफोर' व 'रिव्हारोल' हे चौघे नीतिकथा लिहिणारे होऊन गेले.

१९ वें शतक—पहिल्या फ्रेंच राज्यक्रांतीनंतर एक नवीन तऱ्हेचा समाज उदयास आला. जुने नियम झुगारले गेले. नव्या विचारांचे वारे जोमानें वाहूं लागले. वर्तमानपत्रें व नियतकालिकें अधिक प्रमाणांत निघूं लागलीं. वाचकवर्ग वाढला व टीकात्मक वाङ्मय बाहेर पडूं लागलें. १९ व्या शतकांतील वाङ्मयाचे चार प्रमुख कालखंड पडतातः (१) राजशाही काल (१८००–१८२०)—शातोब्रियां हा विख्यात लेखक होऊन गेला.

या लेखकाची वाङ्मयकृति सोडल्यास बाकीचें वाङ्मय रुक्ष आहे. (२) अद्भुतरम्य वाङ्मयीन काल (१८२०–१८५०)—प्रमुख लेखक : षालोब्रियां, मादाम द स्ताऽल, व्हिक्तोर यूगो, लामार्तिन, म्यूसे, व्हिन्यी, जॉर्ज सॉं, व मिष्ले. (३) यथार्थवादी काळ (रिॲलिझम) (१८५०–१८८०)—यांतील मुख्य लेखक : फ्लोबेर, बाल्झाक, रनां, तेन, सँतबऽव्ह. (४) ध्येयवादी काल (१८८०–१९००)—यथार्थवादांतून निसर्गवाद (नॅचरलिझम) निघाला, आणि निसर्गवादाची प्रतिक्रिया म्हणून आणि विशेषतः काव्यांत संकेतवाद (सिम्बॉलिझम) उदय पावला. त्याचप्रमाणें अद्भुतरम्य वाङ्मयाची प्रतिक्रिया म्हणून काव्यांत पार्न्योसिअन पंथ निघाला.

२० वें शतक—या शतकांत सामाजिक, राजकीय, शास्त्रीय, वगैरे विविध क्षेत्रांत प्रगति दिसते. काव्यांत (१) संकेतवादाची चळवळ. कवि—व्हेर्लेन, रॅंबो, मालर्मे, व्हालेरी, वगैरे. (२) अर्वाचीनता, दादैझम, अतियथार्थवाद (सुर्रिॲलिझम) व एकत्ववाद (युनॅनिझम). (३) भावगीतें रचणारे कवी—फ्रान्सिस जाम्स, आना द नोकाय. (४) विजातीय कथनक (एक्झॉटिक) कवी.

नाट्यवाङ्मय—संकेतवादांतील नाट्यकार—मोरीस मातेर्लिंक. गूढवादांतील नाट्यकार—पोल क्लोदेल. तात्त्विक नाटककार—फ्रान्सिस् द क्यूरेल. सामाजिक नाटकें—नाटककार : एर्व्हिअ, ब्रिय, मिर्वो, वगैरे. मानसशास्त्रीय नाटकें—नाटककार : पोर्तो-रीश व ऑरी बाताय. प्रहसनें, फार्स—नाटककार : कुर्तलिन.

कादंबरीकार— आनातोल फ्रान्स व रोमाॅ रोलॉं— निसर्गवादाविरुद्ध यांची उभारणी होती. पिएर लोती—विजातीय कथां(एक्झॉटिझम)चा पुरस्कर्ता. विवरणात्मक (अॅनॅलिटिकल) कादंबऱ्यांमध्यें प्रसिद्ध कादंबरीकार—आंद्रे जीद व मार्सेल प्रूस. सामाजिक आचारविचारांच्या कादंबऱ्या—कादंबरीकार : मार्ले घू व गार ज्यूल रोमॅ.

याप्रमाणें फ्रेंच वाङ्मयाचा हा धांवता आढावा काढला आहे. फ्रेंच वाङ्मय साहित्य या दृष्टीनें उत्कृष्ट आहे यांत शंका नाहीं; पण राष्ट्र बलशाली व कणखर करण्यास या वाङ्मयाचा उपयोग होत नाहीं हा जुनाच अनुभव आहे. स्वातंत्र्याच्या पुरस्कर्त्या राष्ट्राला स्वतःचें स्वातंत्र्य सांभाळतां येत नाहीं. आज फ्रान्सला राष्ट्रीय व स्फूर्तिदायक वाङ्मयाची फार गरज आहे.

**फ्रेंच राज्यक्रांति**—ही जगद्विख्यात राज्यक्रांति फ्रान्समध्यें १७८९ सालीं सुरू होऊन पुढें सात वर्षे टिकून होती. या पूर्वी फ्रेंच लोकांची, विशेषतः खेड्यापाड्यांतील, फारच दुःस्थिति होती. राज्यकारभार अतिशय जुलुमी व अंदाधुंदीचा झाला होता. राज्यकर्ते आणि सरदार लोक यांच्या हातीं सर्व सत्ता असून ते मात्र कांहीं कर भरीत नसत, व गरिबांच्यावर त्यांचा सर्व भार पडे व तो सोसणें अशक्य होऊन गेलें होतें. याबरोबरच व्होल्टेर, रूसो, वगैरे लोकशाहीच्या पुरस्कर्त्या पंडितांची सामान्य लोकांना अशी शिकवण असे कीं, आपणांवर विनाकारण धार्मिक दडपण फार आहे; त्यामुळें आपण परतंत्र व दुबळे झालों आहों. प्रत्येक माणसाला नैसर्गिक हक्क असून राज्यकारभारांत त्याचें मत घेतलेंच पाहिजे. माणसामाणसांत उच्चनीचपणाचे कृत्रिम भेद पाडले आहेत ते मोडून काढले पाहिजेत. या प्रकारच्या नवविचारांमुळें सामान्य फ्रेंच जनता बंडखोर बनली. याच सुमारास १६१४ पासून कधीं न भरलेलें 'स्टेट्स जनरल' नांवाचें नांवालाच सत्ता असलेलें प्रतिनिधि मंडळ भरलें; पण सामान्य जनतेनें तिचा एकदम ताबा घेऊन एक राष्ट्रीय मंडळ बनविलें. व हीच क्रांतीला सुरुवात झाली.

ता. १४ जुलै सन १७८९ रोजीं प्रक्षुब्ध जनसमर्दानें बॅस्टाइल नांवाचा कुप्रसिद्ध तुरुंग फोडून त्यांतील कैदी मोकळे केले, व तिरंगी निशाण उभारून लोकशाहीची मागणी शास्त्यांना रुजू केली. तेव्हां राष्ट्रीय मंडळानें वतनदारांचे व इतरांचे सर्व हक्क झुगारून देऊन स्वतःच नवीन लोकशाहीची घटना करण्याची तयारी केली. याप्रमाणें देशांत खळबळ माजल्यावर सरदार व बडे लोक इंग्लंडला व इतर देशांना पळाले. उरलेल्यांची कत्तल सुरू झाली. फ्रान्सचा बादशहा सोळावा लुई पॅरिस सोडून पळून जाऊं लागला असतां त्याला धरून कैदेंत टाकलें. इंग्लंडप्रमाणें मर्यादित राजसत्ताक शासनपद्धति ठेवण्याचा क्रांतिनेत्यांचा प्रथम बेत होता. पण ऑस्ट्रिया, प्रशिया, वगैरे आजूबाजूच्या राजांनीं जेव्हां फ्रान्सच्या राजाला बंदींतून सोडवून राज्यारूढ करण्याचा व बंडें मोडण्याचा चंग बांधून फ्रान्सवर हल्ला करण्याची सिद्धता केली, तेव्हां लोकशाही पक्षानें या शत्रूंशीं टक्कर देण्यासाठीं सैन्य उभारलें व कांहीं विजयहि मिळविला. आपला राजा विश्वासघातकी आहे असें पाहून त्याला फांशीं दिलें (१७९३) व त्याच्या राणीचीहि तीच गत केली.

फ्रान्सनें मागें कोणाशीं तह केले असतील ते सर्व रद्द करून, राजसत्तेखालीं चुरडल्या जाणाऱ्या इतर देशांतील लोकांना अशीच क्रांति करण्याची चिथावणी या लोकसभेनें दिली. यामुळें इंग्लंडादि राष्ट्रें फार घाबरलीं. इंग्लंडांत कांहीं मुत्सद्दी या क्रांतीला अनुकूल होते; पण एडमंड बर्कसारखे राजकारणी फार विरोधी असून त्यांनीं ही क्रांतीची लाट थोपवून धरण्याचा व क्रांतिवाद्यांचा पाडाव करण्याचा आग्रह धरला.

फ्रान्समध्यें क्रांतिकारकांतहि दोन पक्ष होते व ते एकमेकांना नष्ट करण्याचा प्रयत्न करीत. यामुळें देशांत आणखी अशांतता

व भयंकर परिस्थिति उत्पन्न झाली. पुढें १७९५ मध्यें या प्रकारचा दारुणकाल संपून संचालकमंडळा( डिरेक्टरी )ची अमदानी सुरू झाली. १७९२ पासून पुढें दहा वर्षे फ्रान्स विरुद्ध सर्व युरोपांतील राष्ट्रें असा मोठा संग्राम चालला होता. याच काळांत नेपोलियनचें युद्धकौशल्य प्रचीतीला आलें. पण त्यानें अरेराव होऊन लोकशाही घटना झुगारून दिली ( १७९९ ); व आपण प्रमुख कॉन्सल व पुढें बादशहा बनला. यानंतरचा फ्रान्सचा इतिहास म्हणजे नेपोलियनचाच इतिहास होय. ( नेपोलियन पाहा. )

**फ्रेंच विषुववृत्तीय आफ्रिका**—बेल्जिअन कॉंगोच्या उत्तरेस व लिबियाच्या दक्षिणेस ही वसाहत आहे. हींत गाबुन, उबंगी-शरी, चड व मध्य कॉंगो हे प्रदेश येतात. एकंदर क्षे. फ. ९,५९,२५६ चौ. मै. व लो. सं.- ३७,२४,७१० देशी लोक व ६,०९९ युरोपियन, इतकी आहे. ब्राआझाव्हील ही राजधानी आहे. हस्तिदंत, ताडतेल व रबर यांचें उत्पादन मुख्यतः होतें.

**फ्रेंच सुदान**—पश्चिम आफ्रिकेंतील एक फ्रेंच वसाहत. सिनेगॉल व नायगर नद्या यांतून जातात. क्षेत्रफळ ५,९०,९६६ चौरस मैल. लो. सं. ३७,९४,२७०. बामाको हें मुख्य ठिकाण. फ्रेंचांचीच सिनेगॉल वसाहत याच्या पश्चिमेस आहे. हा प्रांत १९०४ सालीं वनविण्यांत आला. सेनेगांबिया व नायगर यांतील मुलूख सिनेगॉल प्रोटेक्टेरेट कॉलनी सोडून यांत घेण्यांत आला. १९२० मध्यें फ्रेंच सुदान असें नांव कायद्यानें योजण्यांत आलें. कुंभारकाम, विटा भाजणें, दागदागिने करणें, विणकाम व कातडीं कमाविणें, हे देशी लोकांचे धंदे आहेत. भुइमूग, बाजरी, मका, तांदूळ, कापूस, तीळ हीं येथील पिकें होत. आगगाडीनें किनाऱ्याकडे जातां येतें.

**फ्रेझर, सर जेम्स जॉर्ज** ( १८५३–१९४१ )— एक ग्रीक–लॅटिन भाषांचा पंडित आणि मानसशास्त्रवेत्ता. त्याला १९१४ सालीं नाइट ही पदवी मिळाली आणि १९२५ सालीं ऑर्डर ऑफ मेरिट हा बहुमान मिळाला. त्याचे ग्रंथ आहेत ते– 'टोटेमिझम' (देवकें), 'दि गोल्डन बाऊ : ए स्टडी इन कंपॅरेटिव्ह रिलिजन' ( तौलनिक धर्मेतिहासाचा अभ्यास, १२ भाग ), 'दि स्कोप ऑफ सोशल ॲन्थ्रॉपॉलॉजी' ( सामाजिक मानवशास्त्राची व्याप्ति ) आणि 'फोकलोअर इन् दि ओल्ड टेस्टॅमेन्ट' ( जुन्या करारांतील लोककथा ).

**फ्रेडरिक दि ग्रेट** ( १७१२–१७८६ )— प्रसिद्ध प्रशियन राजा फ्रेडरिक विल्यम याचा हा वडील मुलगा. याला फ्रेंच भाषा उत्कृष्ट येत असे. लष्करी शिक्षणहि चांगलें झालें होतें. १७३२ मध्यें कर्नल झाला. यानें दोन प्रसिद्ध ग्रंथ लिहिलेले आहेत. 'राजा हा राष्ट्राचा पहिला नोकर,' हें त्यानें यांतील एका ग्रंथांत राजकर्तव्याविषयीं लिहितांना नमूद करून ठेवलें आहे. राजपदावर आल्यावर तो तसाच वागला. 'उत्तम फौज व पुष्कळ पैसा' हेच राज्याचे मुख्य आधार, असें त्याचें मत होतें. आपल्या राज्यांत यानें शेतकी, कारखाने यांत व इतर बाबींतहि लक्ष घालून राष्ट्रहितवर्धक अशा पुष्कळ सुधारणा केल्या. यानें सायलेशियावर हक्क सांगून त्यासाठीं ऑस्ट्रियाशीं युद्धें केलीं व शेवटीं तो प्रांत मिळविला. तो लोककल्याणार्थ झटला. त्याच्या मरणसमयीं संस्थानची शिल्लक सात कोटी डॉलर होती व खडी फौजहि दोन लक्ष होती.

**फ्रेसनेल, ऑगस्टिन् जीन्** ( १७८८–१८२७ )—एक फ्रेंच पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. प्रकाशविकृतीवर निबंध ( १८१८ ) लिहिल्यानें हा प्रसिद्धीस आला. दीपगृहांचा अधिकारी म्हणून नेमला गेल्यावर त्यांत यानें सुधारणा घडवून आणली; व आरशाऐवजीं संयुक्त लेन्सचा उपयोग केला. प्रकाशप्रकम्पनाबाबतचा सिद्धान्त गणिताच्या सिद्धान्ताची जोड देऊन यानें दृढमूल केला.

**फ्रोबेल, फ्रीड्रिच विल्हेल्म ऑगस्ट** (१७८२–१८५२)— एक जर्मन तत्त्ववेत्ता, शिक्षणशास्त्रज्ञ व प्रसिद्ध किंडरगार्टन ( बालोद्यान ) पद्धतीचा जनक. अनेक प्रोफेसरांचीं व्याख्यानें ऐकून अनेक शास्त्रांतील परस्पर संबंध समजावून घेण्याची याला फार आवड असे. मुलांना शिकविण्याच्या हौसेनें त्यानें शिक्षकांच्या खास शाळेंत प्रवेश मिळविला. ही शाळा प्रसिद्ध शिक्षणशास्त्रवेत्ता पेस्टालोझी यानें चालवली होती. नंतर त्यानें कित्येक वर्षे स्वतःच्या धोरणानें व पद्धतीनें शाळा चालविल्या. मध्यंतरीं त्याला लढाईंत जावें लागून लष्करी शिस्त व सामुदायिक कार्यपद्धति यांची उपयुक्तता पटली. स्विस सरकारनें त्याच्या शाळांतून आपला शिक्षकवर्ग अध्यापनकार्य शिकण्याकरितां पाठविला. मनुष्याचें शिक्षण त्याच्या बालपणापासून योग्य प्रकारें व्हावयास पाहिजे व तें बालोद्यान–पद्धतीनें स्त्री शिक्षकांकडून चांगलें देतां येतें, असें त्यानें प्रतिपादन केलें.

प्रशियन सरकारनें त्याच्या मरणापूर्वी एकच वर्ष त्याचें कार्य तें समाजसत्तावादी व धर्मविरोधी आहे असें ठरवून बंद पाडलें; परंतु त्याची किंडरगार्टन( बालोद्यान ) पद्धत, व अगदीं जन्मल्यापासून सात वर्षेपर्यंत बालांच्या मनाची वाढ व त्यांचें शिक्षण हंसत-खेळत, स्वैर पद्धतीनें झालें पाहिजे, हें त्याचें मत, हीं जगन्मान्य झालीं आहेत. फ्रोबेलच्या पद्धतींतील मूलभूत कल्पना अशाः—

(१) मुलांची नैसर्गिक वाढ होण्यासाठीं शिक्षणाची मदत पाहिजे; तेव्हां मूल जन्मल्यापासूनच शिक्षण सुरू झालें पाहिजे. (२) बालपणांत आत्मिक व शारीरिक शिक्षण वेगळें असूं शकत नाहीं. (३) आरंभीं शिक्षण प्रत्यक्ष शारीरिकच पाहिजे; व इंद्रियांच्या व्यापारमार्गें आत्मिक वाढीला तिचा उपयोग झाला पाहिजे. (४) निसर्गानें मुलांमध्यें जी प्रेरकबुद्धि ठेविली आहे तिच्या हालचाली लक्षांत घेऊन इंद्रियव्यापारांचा मार्ग पाहिला पाहिजे व त्याप्रमाणें शिक्षणाची स्वाभाविक भूमिका ठरविली पाहिजे. (५) मुलांमधील प्रेरकबुद्धि शारीरिक गरजाच दाखवून देते असें नव्हे तर आत्मिक गरजाहि सांगते. या दोन्ही गरजा शिक्षणानें पुऱ्या केल्या पाहिजेत. (६) हालचालीमुळें अवयवांची प्रथम वाढ होत असते; तेव्हां आपलें प्रथम लक्ष तिकडे गेलें पाहिजे. मुलांच्या आत्म्याची जागृति होण्याचें एकमेव साधन म्हणजे जीवनाच्या प्रभात-काळचे भौतिक संस्कार होत. तेव्हां आपण त्यांच्या शरीराची काळजी घेतों त्याप्रमाणें या संस्कारांना मानसिक वळण देण्याची शक्य ती काळजी घेणें अत्यावश्यक आहे.

**फ्लॅमस्टीड, जॉन** (१६४६–१७४९)—हा इंग्लंडचा पहिला राजज्योतिषी ( ॲस्ट्रॉनमर रॉयल ) होय. त्यानें आपलें आयुष्य ग्रीनिच येथें घालवलें, व तेथें त्याच्याकरितां राजवेधशाला ( रॉयल ऑब्झर्व्हेटरी ) ही इमारत १६७६ सालीं बांधण्यांत आली. त्यानें अचल ताऱ्यांचा ( फिक्स्ड स्टार ) विश्वसनीय नकाशा तयार केला. त्याचा महत्त्वाचा ग्रंथ 'हिस्टोरिआ कोलेस्टिस ब्रिटानिका' हा होय.

**फ्लामारिऑं, कामिली** (१८४२–१९२५)—एक फ्रेंच ज्योतिषशास्त्रज्ञ. त्याचे या शास्त्रावरील दहाबारा ग्रंथ असून ते फार लोकप्रिय झाले आहेत. तो या शास्त्रावर बरेंच लेखन करून व्याख्यानेंहि देत असे. त्याच्या लोकमान्य ज्योतिषशास्त्राची इंग्रजींत आवृत्ति १८९४ त निघून फार खपली. त्यानें फ्रान्समध्यें १८८७ त एक ज्योतिषाभ्यासाची संस्थाहि काढली होती.

**फ्लॉरेन्स**—युरोप, इटली, फ्लॉरेन्स प्रांताचें मुख्य ठिकाण. पूर्वी कांहीं काळ ही इटलीची राजधानी होती. हें शहर मूळ रोमन लोकांच्या वेळीं वसवलें गेलें. हें विद्येचें माहेरघर आहे. येथें मोठमोठीं वाचनालयें अनेक आहेत. त्यांतलीं तीन अनुक्रमें १७४७, १७५१, व १७५२ सालचीं आहेत व त्यांत लाखों ग्रंथ आहेत. येथें सार्वजनिक बागबगीचे अनेक आहेत. तसेंच उद्योगधंदे आणि कारखानेहि आहेत. हें व्यापाराचेंहि एक केंद्र आहे. लो. सं. ३,१६,३००. या ठिकाणीं डान्टे आणि मिचेल ॲंजेलो यांचा जन्म झाला. येथें मोठमोठीं व जुनीं प्रेक्षणीय प्रार्थनामंदिरेंहि आहेत. समुद्रसपाटीपासून उंची १६९ फूट. पर्जन्यमान ३७॥ इंच. सर्वांत मोठा दिवस १५ तास ३३ मिनिटें व सर्वांत लहान ८ तास ३० मिनिटें असतो. येथें इमारतीचा व फरशीचा दगड खाणींतून काढला जातो. येथील जमीन अत्यंत सुपीक आहे.

फ्लॉरेन्स ख्रि. पू. २ ऱ्या शतकापासून माहीत असलें तरी इ. स. च्या ११ व्या शतकापासूनच त्याचा रेशीम आणि लोंकर, जरतार आणि जवाहीर या संबंधांतला मोठा व्यापार सुरू झाला. कलाकौशल्य आणि विद्या यांतहि हें प्रसिद्धीला आलें.

**फ्लॉरेस**—डच ईस्ट इण्डीजमधलें जावाच्या पूर्वेकडील एक बेट. या बेटाची कमाल लांबी व रुंदी अनुक्रमें २२४ व ३७ मैल असून क्षेत्रफळ ५८५० चौ. मैल आहे. येथील सर्वसाधारण उष्णतामान ७७° ते ८०° अंशांपावेतों असतें. वार्षिक पर्जन्यवृष्टि ४३ ते ४७ इंच इतकी असते. येथें उद्योग व व्यापार फार थोडा. येथून चंदनाचें लांकूड व दालचिनी यांची निर्यात होते.

**फ्लॉवर, सर विल्यम हेन्री** (१८३१–१८९९)—एक इंग्रज प्राणिशास्त्रज्ञ व तुलनात्मक-शारीरशास्त्रज्ञ. त्याला १८८४ सालीं साउथ केन्सिंग्टन येथील नॅचरल हिस्टरी म्यूझियमचा चालक ( डायरेक्टर ) नेमण्यांत आलें. तो प्राणिशास्त्रीय मंडळा-( झूऑलॅजिकल सोसायटीचा )चा अध्यक्ष २० वर्षें होता. १८६४ पासून रॉयल सोसायटीचा सभासद, आणि १८८९ पासून न्यूकॅसल–ऑन–टाइन येथील ब्रिटिश असोसिएशनचा अध्यक्ष होता. त्याचे महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते–'इन्ट्रोडक्शन टु दि ऑस्टिऑलॉजी ऑफ दि मॅमेलिया' ( सस्तन प्राण्यांच्या अस्थिविज्ञानाची प्रस्तावना), 'फॅशन इन् डिफॉर्मिटी' (विरूपतेंत प्रसाधन-प्रकार ) 'आणि 'दि हॉर्स' ( घोडा ), इ..

**फ्लीट, जॉन फेथफुल** (१८४७–१९१७)—एक प्राच्य-भाषाकोविद आंग्ल पंडित व संशोधक. १८६५ मध्यें इंडियन सिव्हिल सर्व्हिस परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर हिंदुस्थानांत नेमणूक झाली व १८७२ मध्यें एज्युकेशनल इन्स्पेक्टर झाले. १८७५ मध्यें दक्षिण महाराष्ट्र व कोल्हापूर येथील असिस्टंट पोलिटिकल एजंट होते. १८८३ मध्यें प्राचीन शिलालेख संशोधन खातें निर्माण झालें व त्याचें काम डॉक्टर फ्लीट यांच्याकडेच आलें. १८९७ मध्यें स्वदेशीं परत गेल्यावर प्राचीन लिपिविज्ञान या

काढून पिण्यास देतात. प्रमेहावर फळें तांदुळाच्या धुवणांत वाटून तुपांत कालवून खाण्यास देतात.

**बंकापूर**—मुंबई, धारवाड जिल्हा, एक तालुका. क्षेत्रफळ ३४४ चौ. मैल. लोकसंख्या ८१,४४२. बंकापूर (लोकसंख्या ७,२०९) व शिगांव हे दोन मोठे गांव आहेत. बंकापूर हें तालुक्याचें ठिकाण आहे. मराठी दप्तरावरून सोळा परगण्यांच्या सरकारचें येथें मुख्य ठाणें होतें असें दिसतें. वसईच्या तहानें हें १८०२ मध्यें इंग्रजांकडे गेलें.

**बकासुर**—१. पांडवकालीं एकचक्रा नगरींत राहणारा हा अघोर, खादाड नरभक्षक राक्षस होता. तुला रोज वीस खंडी अन्न व एक मनुष्य देऊं असा करार त्याचा त्रास वांचविण्याकरितां गांवच्या लोकांनीं केला होता. वनवासांत असतां पांडवांतील भीमानें त्याचा वध करून ज्या घरांत ते राहत होते त्या ब्राह्मण कुटुंबाचें व सर्व गांवाचें विघ्न निवारण केलें.

२. बकासुर याच नांवाचा दुसरा एक कंसप्रेषित राक्षस बक पक्ष्याचें सोंग घेऊन वृंदावनांत आला व त्यानें कृष्णाला गिळलें; पण त्यास श्रीकृष्णानें मारलें.

**बंकिमचंद्र चतर्जी** (१८३८–१८९४)—आद्य बंगाली कादंबरीकार व देशाभिमानी पंडित. जन्मस्थळ कांतलपारा असून शिक्षण हुगळी कॉलेजमध्यें झालें. कायद्याच्या अभ्यासानंतर मॅजिस्ट्रेट झाले. यांचे वडील डेप्युटी कलेक्टर होते. बंकिमचंद्रांनीं प्रथम इंग्रजींत दोन गोष्टी लिहिल्या. पुढें मातृभाषा जी बंगाली तिच्याकडेच त्यांनीं लक्ष देऊन तींत त्यांनीं अनेक कादंबऱ्या व निबंध लिहिले. 'वन्दे मातरम्' हें आजचें लोकप्रिय राष्ट्रगीत रचून 'आनंदमठ' नांवाच्या कादंबरींत यांनीं घातलेलें आहे. कल्पनाचातुर्य व उत्कृष्ट लेखनशैली यांमुळें ते फार लोकप्रिय झाले. त्यांच्या गद्यांतहि काव्य आहे. त्यांच्या लिहिण्यांत विनोद व प्रेमळपणा असून त्यांची शब्दसंपत्ति विशाल आहे. मराठीमध्यें बंकिमचंद्रांच्या सर्व लेखनाचा अनुवाद करण्यांत आलेला आहे. कलकत्त्याच्या विद्यापीठांत यांचा पुतळा ठेवण्यांत आला आहे.

यांच्या दुर्गेशनंदिनी, कपालकुंडला, विषवृक्ष, चंद्रशेखर, आनंदमठ, वगैरे कादंबऱ्या आजहि वाचनीय वाटतात. आनंदमठात त्यांनीं राष्ट्रसेवेची एक योजना दिली आहे. 'वन्दे मातरम्' गीताच्या तोडीचें दुसरें सुंदर व यथार्थ राष्ट्रगीत झालें नाहीं. तथापि आंतरराष्ट्रीय कारणासाठीं व बँडवादनाला सोयीचें नाहीं म्हणून आजच्या हिंदी संघराज्यानें याला एकमेव राष्ट्रगीत म्हणून मान्यता न देतां, याबरोबर रवींद्रनाथांच्या 'जनमनगणा'चा दरबारी राष्ट्रगीत म्हणून स्वीकार केला आहे.

**बकुळ**—हें झाड हिंदुस्थानांत सर्वत्र होतें. झाड मोठें वाढतें. याचीं पानें आंब्याच्या पानांसारखीं असून फुलें लहान, पिवळट व चक्राकृती असतात. फुलांचा वास फार मधुर असतो. यांचें अत्तर काढतात. फळें बदामाएवढीं होतात पण तीं तुरट म्हणून कोणी खात नाहींत. लांकूड गलबतास उपयोगी असतें. दांत कठिण होण्यास बकुळीची साल चावतात; दन्तमंजनहि करतात. अतिसार व मोडशी यांवर चिंया पाण्यांत उगाळून देतात.

**बॅकेलाइट**—हा औद्योगिक पदार्थ म्हणजे फेनॉल व पिपीलमद्यानार्द (फार्मोल्डीहाइड) यांच्यापासून बनविलेली कृत्रिम राळ होय. बॅकेलाइट वितळवितां येत नाहीं. यावर अम्ल किंवा विद्रावक यांचा परिणाम होत नाहीं; व हें विद्युद्विरोधी आहे. याच्या वस्तू तयार करण्याकरितां हें कारखानदारांना वितळण्यास योग्य अशा स्थितींत पुरविण्यांत येतें. परंतु कांहीं वेळ उष्णता दिल्यानंतर तें घट्ट बनतें, टणक होतें व त्यानंतर वितळत नाहीं. बॅकेलाइट हें सांचांत घालून त्याच्या निरनिराळ्या वस्तू बनविण्यांत येतात. विशेषतः विजेच्या दिव्यांचीं बटणें व इतर विजेचीं उपकरणें, व कांहीं किरकोळ भांडीं करण्याकरिता याचा उपयोग करण्यांत येतो. हीं भांडीं सहजीं फुटत नाहींत.

**बॅक्ट्रिया**—एक प्राचीन देश. हा हिंदुकुश व ऑक्सस यांच्यामध्यें होता. राजधानी बॅक्ट्रा (आजचे बल्ख). बॅक्ट्रिया हें एका इराणी शाखेचें मूलस्थान होतें. कित्येकांच्या मतें सर्व इराण देश बॅक्ट्रियांतच मोडत होता. याच भागात झरथुष्ट्रानें पारशी धर्म-संस्थापना केली. सायरस यानें बॅक्ट्रिया जिंकून आपल्या इराणी साम्राज्यांत सामील केला होता. डेमेट्रिअस यानें हिंदुस्थानावर मोर्चा फिरविला असतां तिकडे त्याच्या युक्रेटिस नामक सेनापतीनें सर्व बॅक्ट्रियाचें राज्य बळकावलें. बॅक्ट्रियापासून हिंदुस्थानपर्यंतच्या विस्तीर्ण प्रदेशांत व प्रदीर्घ कालांत बरेच राज्यकर्ते होऊन गेले. बौद्ध धर्मीय कनिष्क हा इंडोसिथिअन कुशान घराण्यांतला होता. अखेरीअखेरीस इराण, बॅक्ट्रिया हा सर्व विस्तीर्ण प्रदेश तुर्कस्तानच्या व नंतर खलिफांच्या अमलाखालीं गेला होता. बॅक्ट्रियांत उंट चांगले होत. आजचा अफगाणिस्तान हा बॅक्ट्रियावर वसला आहे.

**बखले, भास्करबुवा रघुनाथ** (१८७०–१९२२)—एक सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय गायक. प्रथम हे किर्लोस्कर नाटक मंडळींत स्त्री पात्रांच्या भूमिका करीत असत. परंतु यानंतर मात्र यांनीं बडोद्याचे फैज महंमद, कोल्हापूरचे अल्लादियाखांसाहेब व नथ्थनखां यांच्यासारख्या कलावंतांच्या सहवासात राहून शास्त्रोक्त गायनांत प्रावीण्य मिळविलें. फैज महंमदखांचें स्वरकाम, नथ्थनखांची लयकारी व अल्लादियाखांची मुष्किल रागदारी यांचा भास्करबुवांच्या गाण्यामध्यें अपूर्व संगम झालेला दिसून येई. या

गुणांमुळें महाराष्ट्रीय लोक मुसलमानी गवयांची रागदारी गाऊंच शकणार नाहींत असा जो एक समज त्या वेळीं रूढ होता तो यांनीं नष्ट केला, व त्यामुळें उत्तर हिंदुस्थानांतील लोकांकडूनहि महाराष्ट्रीय गवयांची वाहवा होऊं लागली. मास्टर कृष्णराव, गोविंदराव टेंबे, बापूराव केतकर, बालगंधर्व, वगैरे कलावंत यांच्याच तालमींत तयार झाले. यांनीं पुण्यास 'भारत गायन समाज' स्थापन केला तो चांगला चालला आहे.

**बखतबुलंद** (इ. स. १७००)—एक गोंड राजा. हा देवगड येथें राहत असे. नागपूर प्रदेशांत त्या सुमारास अनेक हिंदु शेतकरी व कारागीर या लोकांस त्यानें इनाम जमिनी दिल्या, हजारों नवीन खेडीं वसवलीं व शेती—व्यापाराची झपाट्यानें वाढ केली. हल्लींचे छिंदवाडा—बैतुल जिल्हे व नागपूर—शिवणी-भंडारा—बालाघाट यांतील कांहीं मुलूख इतकें त्याचें राज्य होतें. नागपूर शहर मूळ त्यानेंच वसवलें. पुढील मराठ्यांच्या राज्याची जणुं भूमिकाच यानें तयार करून ठेवली होती.

**बँगकॉक**—सयामच्या राज्याची ही राजधानी मेनाम नदीच्या दोन्ही कांठांवर वसलेली आहे व ही नदी बँगकॉकपासून पुढें १५ मैलांवर सयामच्या आखाताला मिळते. या शहराची बरी-चशी वस्ती या नदींत उभारलेल्या वांबूच्या व लांकडी झोंपड्यांत व बोटींत राहते. या शहरांत विजेचे दिवे, ट्राम, टेलेफोन व इतर पुष्कळ आधुनिक सुधारणा झालेल्या आहेत. येथें एक विद्यापीठ आहे. या बंदरांत बोटींचे धक्के, गोद्या, वगैरे सर्व अद्य-यावत् साधनें आहेत. हें शहर रेल्वेनें पेनांगला जोडलेलें आहे. येथें अन्तर्गत व निर्यात व्यापार फार मोठा चालतो; व येथून तांदूळ, साखर, रेशीम, कापूस, तमाखू, हस्तिदंत, जस्त, कातडीं, वगैरे माल परदेशीं जातो. लो. सं. ६,८४,९९० असून त्यापैकीं सुमारें एकतृतीयांश चिनी आहे.

**बगदाद**—इराक, बगदाद प्रांताची राजधानी. तैग्रीस नदीच्या पूर्वपश्चिम अशा दोन्ही किनाऱ्यांनीं वसलेलें हें शहर आहे. जुनें शहर पश्चिम भागास होतें. त्याच्या पश्चिम भागांत शिया लोक राहतात. नव्या पूर्व भागीं वसलेल्या शहराची रचना चांगली नाहीं. दुकानें, बाजार, मशिदी हीं पश्चिम भागात आहेत. शहरातील मुख्य इमारती पूर्व भागात नदीकिनाऱ्यानें आहेत. पश्चिमेला तीन मैलांवर नबीयुशा अथवा कोहेनयुषा याची कबर आहे. यहुद्यांचें तें एक पवित्र क्षेत्र आहे. तैग्रीस आणि युफ्रेतीस या नद्यांमधील खोरीं फार सुपीक आहेत. सुएझ कालवा होण्या-पूर्वीं बगदाद हेंच पूर्व (हिंदुस्थान व इराण) व पश्चिम (युरोप) यांमध्यें होणाऱ्या व्यापाराचें मुख्य केंद्र होतें, पण आतां त्याला हें पूर्वीचें महत्त्व राहिलें नाहीं.

प्रांताची लो. सं. सुमारें पांच लक्ष असून बगदाद शहराची साडेतीन लक्ष आहे. रेशीम, कापड, कातडीं व गालिचे येथें होतात. बगदाद आणि बसरा यांमध्यें बोटींची ये—जा आहे. नवव्या शतकांत जेव्हां हरुन अल् रशीद हा खलिफा होता त्या वेळीं बगदादचें वैभव अवर्णनीय होतें. त्याची कल्पना अरेबियन नाइट्सवरून कांहीं येईल. इस्लामी विश्वाचें हें बराच काळ केंद्रस्थान होतें.

**बंगनपल्ले**—मद्रास, कर्नूल जिल्हा, एक संस्थान. क्षेत्रफळ २७५ चौ. मै.. हवा उष्ण पण निरोगी. पर्जन्यमान ३० इंच. हा पूर्वी निजामाच्या ताब्यांत होता. निजामानें इंग्रजांस दिलेल्या जिल्ह्यांत हें संस्थान गेलें व निजामाच्या विनंतीवरून तें खालसांत कायम ठेवलें गेलें. संस्थानची लोकसंख्या (१९४१) ४४,६३१. भाषा तेलगू. वार्षिक उत्पन्न ३ लाख ७५ हजार रुपये.

या संस्थानचा मूळपुरुष सय्यद हुसेन अलीखान याला विजापूरच्या बादशहापासून ही जहागिरी मिळाली. आजचे नबाब मीर फजल अलीखान १९२२ सालीं गादीवर आले. हे चांगले सुविद्य असून अरबस्तानपर्यंत जाऊन आले आहेत.

संस्थान खनिज संपत्तीनें भरलें आहे. हिरे, शिरगोळे, इ. खनिजें सांपडतात. कापूस आणि भुइमूग यांचें पीक फायदेशीर होतें. बंगनपल्ले हें राजधानीचें ठिकाण बेझवाडा-गुंटकल या फांट्यावरून पण्यम् स्टेशनापासून १७ मैल दूर आहे. १९४८ सालीं हें संस्थान मद्रास इलाख्यांत विलीन करण्यात आलें.

**बगळा**—नदी, ओढे, तलाव, डबकीं, इ. पाण्याच्या जागीं हे उंचमाने व लांबटांगे पक्षी आढळतात. पाणबगळा व गाय-बगळा असे यांचे दोन प्रकार आहेत. पाणबगळे पाण्यांत उभे राहून भक्ष्य शोधतात, तर गायबगळे जनावरांच्या भोंवतीं व त्यांच्या अंगावर असतात. इग्रेट, करकोचा, क्रौंच पाहा.

**बंगळूर**—म्हैसूर संस्थानांतील एक जिल्हा. कावेरी, पौनेयार व शिमोगा ह्या तीन नद्या यांतून वाहतात. हवा आरोग्याला उत्तम असते. पर्जन्यमान ३५ इंच. जमीन तांबूस पण सुपीक. मुख्य पीक रागी. ऐतिहासिक काळांत १००४ पासून गंग, चोळ, होयसळ, विजयानगर व विजापूर या क्रमानें निरनिराळ्या राज्यांत हा समाविष्ट होता. विजापूरच्या आदिलशाहींतील सरदार शहाजी भोंसले याच्या जहागिरींतहि हा समाविष्ट होता. नंतर १६८७ मध्यें तो मोंगलांकडे गेला व शेवटीं मोंगलांपासून म्हैसूरनें विकत घेतला. जिल्ह्याची लोकसंख्या सु. आठ लक्ष आहे. शेंकडा ५४ शेतकरी.

शहर—जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बंगळूर. समुद्रसपाटीपासून ३,००० फूट उंच असल्यानें येथील हवा थंड व आरोग्यकारक आहे. शहर फार सुंदर तऱ्हेनें वसलें आहे. येथून जिल्ह्यांत आगगाडीचे कांहीं फांटे जातात, बंगळूरपासून मद्रास २१९ मैल

व मुंबई ६९२ मैल आहे. बंगळूर म्युनिसिपालिटी १८९२ मध्यें स्थापन झाली. लो. सं. (कँटोन्मेंटसह) सुमारें चार लक्ष. बंगळूर हे अनेक उद्योगधंद्यांचें केंद्र आहे. म्हैसूर संस्थानच्या मुख्य कचेऱ्या, कॉलेजें व अनेक शिक्षणसंस्था येथें असल्यानें शहर मोठें व महत्त्वाचें झालें आहे. येथील टाटा रीसर्च इन्स्टिट्यूट ही अखिल हिंदुस्थानांतील उच्च शास्त्रीय शिक्षण-संशोधनाची संस्था आहे. विमानांचा कारखाना नवाच आहे. रेशीम, सूत, जर यांचें कापड येथें चांगलें तयार होतें. येथील लष्करचा भाग मोठा असून पूर्वी त्यांत युरोपियन वस्ती असे.

हें शहर १५३७ त केंपे गौडा नांवाच्या एका लहान पाळेगारानें वसविलें. प्रथम मातीचा किल्ला होता तो १७६१ त हैदरनें वाढवून दगडी केला. आतां तो पाडून त्या ठिकाणीं दवाखाने, शाळा, इ. बांधले आहेत. कब्बन पार्क, लालबाग, गवीपूर, बसवन्गुडी, इ. स्थळें प्रेक्षणीय आहेत. शहर सारखें वाढत आहे. हिंदुस्थानांतील पहिल्या दहा महत्त्वाच्या शहरांत याची गणना आहे.

**बँगाटेल**—बिलियर्डसारखा एक विलायती खेळ. मेजाच्या एका बाजूला नऊ घरे असतात. प्रथम यांतील एका घरांत लांब काठीनें काळा चेंडू व आपला एक चेंडू घालावयाचा व नंतर शक्य तितके आपले चेंडू एकामागून एक घरांत घालविण्याचा प्रयत्न करावयाचा. घराला जी संख्या असेल तितके गुण मिळविले असें धरतात.

**बंगाल**—हिंदुस्थान, एक प्रांत. १९१२ मध्यें हा स्वतंत्र इलाखा केला गेला व यावर लेफ्टनंट गव्हर्नरच्याऐवजीं गव्हर्नर नेमण्यांत आला. १९४७ सालीं पाकिस्तान तोडून दिल्यानंतर याचीं दोन छकलें झालीं (पूर्व बंगाल पाहा); व दोन वेगळया राष्ट्रांत विभागणी झाली. त्यापूर्वी अखंड बंगालचें क्षेत्रफळ ७७,४४२ चौ. मै. होतें व लो. सं. (१९४१) ६,०३०,६,५२५ होती. लोकसंख्येपैकीं शेंकडा ५४ मुसलमान होते. मुख्य भाषा बंगाली. हिंदी व उर्दू बोलणारे शेंकडा फक्त ४ होते. उडिया व नेपाळी भाषाभाषी लोकहि बरेच आहेत. एकंदर प्रांत सुपीक आहे, परंतु बहुतेक भाग सखल असल्यानें नद्यांच्या पुरांनीं पुष्कळ वेळा पिकांस वगैरे नुकसान पोंचतें. गंगा व ब्रह्मपुत्रा या दोन मोठ्या नद्या यातून वाहतात. शेंकडा ७७ लोक शेती व शेतमजुरी करीत. मुख्य पीक तांदूळ. गळिताचीं धान्यें व चहा यांवालींहि बरीच जमीन असते. ताग, चहा व कोळसा यांबाबतचे धंदे शेतीच्या खालोखाल येतात. कापडाच्या व तागाच्या गिरण्या, व साखर, कागद, वगैरे उद्योगधंदे मोठे आहेत.

या इलाख्याचे बरद्वान, राजशाही, डाक्का, चितगांव व प्रेसिडेन्सी (कलकत्ता) असे कमिशनरचे प्रांत होते. कुचबिहार व त्रिपुरा हीं दोन मोठीं संस्थानें या प्रांतात होतीं. कलकत्ता व डाक्का हींच काय तीं दोन मोठीं शहरें यांत होतीं; आतां तीं अनुक्रमें पश्चिम व पूर्व बंगालमध्यें गेलीं आहेत.

मुसलमानांपूर्वी बंगालवर पाल व सेन या राजांचा अमल होता. १७ व्या शतकांत ब्रिटिश व्यापारी या भागांत आले. व त्या शतकाच्या अखेरीस त्यांनीं हा नवीन प्रांत केला. पुढें या प्रांतावरचा गव्हर्नर, गव्हर्नर-जनरलच्या हुद्यावर आणून ठेवून मुंबई व मद्रास या प्रांतांवर त्याची देखरेख ठेवली. १८५४ सालीं गव्हर्नर-जनरलच्या अधिकारांतून बंगाल काढून त्यावर एक स्वतंत्र लेफ्टनंट गव्हर्नर नेमला; व बिहार आणि ओरिसा यांचा या प्रांतांत समावेश केला. १९०५ सालीं यातील पूर्व भाग आसामला जोडून तो वेगळा प्रांत केला व या प्रांताचीं दोन छकलें केलीं. पण वंगभंगाची मोठी चळवळ झाल्यानंतर पूर्व बंगाल पुन्हां बंगालला जोडला (१९१२). याच वेळीं बिहार आणि ओरिसा हे प्रांत वेगवेगळे करण्यांत आले. १९४७ सालीं पुन्हां बंगालची फाळणी झाली व प्रांताचा पूर्वभाग पाकिस्तानच्या राज्यांत गेला.

पश्चिम बंगालमध्यें बहुसंख्याक हिंदू व पूर्व बंगालमध्यें बहुसंख्याक मुसलमान आहेत. पाकिस्तानच्या इस्लामीकरणाच्या वृत्तीमुळें पूर्व बंगालमधील अल्पसंख्याक हिंदूंचे अत्यंत हाल होत असून ते निर्वासित होऊन पश्चिमबंगालमध्यें येत आहेत, व पश्चिमबंगालमधील कांहीं मुसलमानहि पाकिस्तानात जात आहेत. या परिस्थितीमुळें व कम्युनिस्टांच्या विध्वंसकारी चळवळीमुळें आज बंगाल अत्यंत त्रस्त झाला आहे व राज्यतंत्र अगदीं खिळखिळें झालें आहे.

पश्चिम बंगाल—१९४७ सालीं पाकिस्तान (पूर्व बंगाल) आणि भारत (पश्चिम बंगाल) यांत बंगालची विभागणी झाली. (पूर्व बंगाल पाहा); पश्चिम बंगालचें सध्यांचें क्षे. फ. २९,४७६ चौ. मै असून लो. सं. २,१३,७२,००० आहे. या पश्चिम बंगालचे उत्तर आणि दक्षिण असे दोन गट मधल्या पाकिस्तान मुलुखामुळें पडले आहेत; म्हणजे हा प्रांत सलग नाहीं. पूर्वीच्या अखंड बंगालमधील सबंध बरद्वान विभाग; प्रेसिडेन्सी विभागांतील जेसोर व खुलना सोडून इतर जिल्हे; राजशाही विभागांतील जलपैगुरी, दिनाजपूर व मालडा या जिल्ह्यातील कांहीं मुलूख व दार्जिलिंग जिल्हा आतां भारताकडे उरलेल्या बंगालमध्यें आहे. कुचबिहार संस्थान १९५० सालीं यांत विलीन झाल्याकारणानें क्षे. फ. १,३१८ चौ. मैलांनीं वाढलें आहे. या प्रातांत झाडी फार फारच कमी आहे. भारतसंघराज्यांत या प्रांताचा ताग, चहा आणि तांदूळ या बाबतींत अनुक्रमें पहिला, दुसरा व तिसरा क्रमांक लागेल. उद्योगधंदे

आणि व्यापार या प्रांतांत अतिशयच आहे. भारतांत निघणारा ५० टक्के कागद, ४० टक्के कांच, ५० टक्के रंग-रोगण, ६० टक्के चिनीमाती सामान, ८० टक्के पायमोजे वगैरे विणकाम, ५० टक्के एनॅमेलचे जिन्नस, ३० टक्के लोखंड-पोलाद व १०० टक्के पट्टे (बेल्टिंग) या प्रांतांत तयार होतात. भारताच्या परदेशी दर्यावर्दी व्यापारापैकीं ६३ टक्के या प्रांतांतला आहे.

या प्रांताचे आजचे गव्हर्नर (राज्यपाल) डॉ. काटजू आहेत.

**बंगाली भाषा व वाङ्मय**—१. भाषा—बंगाली लोक आपल्या भाषेला बांगला किंवा बंग भाषा म्हणतात. अरबी भूगोलकारांनीं बंगाला असा शब्दप्रयोग केला व त्याचा फारसींत 'बंगाल' झाला. ऐने-इ-अकबरींत 'बंगाल' असाच शब्द वापरला आहे. हिंदुस्थानींत 'बंगाली', 'बंगला' असे विशेषणार्थी शब्द बनले. बंगाली भाषा बिहार-ओरिसा सोडून भारताच्या पूर्वेकडील भागांत आसाम खोऱ्यापर्यंत व खालीं छोटा नागपूरपर्यंत बोलली जाते. ही भाषा हिंदुस्थानीपेक्षां प्रौढ आहे. हींत एकवचनी व अनेकवचनी भिन्न भिन्न रूपें फारशीं नाहींत. सर्वनामांत प्रथम व द्वितीय पुरुषी एकवचनी रूपें बहुधा वापरीत नाहींत. क्रियापदांत एकवचनी व अनेकवचनी रूपें निरनिराळीं नसतात. अनेकवचनीच सरसकट वापरतात.

ही भाषा प्रादेशिक भाषांत बरीच अर्वाचीन आहे. मागधी प्राकृतापासून ही निघाली. मोंगल साम्राज्याच्या ऱ्हासकाला-पासून ही जास्त वाढीस लागली. या भाषेंत पुन्हां पंडिती व बहुजनसमाजाची असे प्रकार आढळतात. सामान्य जनतेची बोली थोडथोड्या मैलांच्या अंतरानें बदलत जाते. पंडिती भाषा लेखनिविष्ट व मुद्रित असल्यानें तिचें वळण एकसांची आहे. इंग्रजी अमदानींत जुन्या बंगालीवर संस्कृतचा पेहराव चढविला जाऊं लागला. पण त्यामुळें मूळ भाषेची वाढ खुंटली. तसेंच संस्कृत शब्दांचे उच्चार चमत्कारिक होऊं लागले. अपभ्रष्ट शब्द तयार झाले. लेखन आणि उच्चार यांत फरक पडले. व व्याकरणहि बदललें. यांमुळें परकीयांना बंगाली वाचतां येतें पण बोलणें जमत नाहीं.

हिंदुस्थानांत बंगाली बोलणाऱ्यांची लोकसंख्या सु. ५३/४ कोटी आहे. म्हणजे भारतीय भाषात हिंदी पहिली व बंगाली दुसरी असा लोकसंख्येप्रमाणें अनुक्रम लागतो. पूर्व आणि पश्चिम या दोन्ही बंगालच्या विभागांत ही चालते. मानभूम (बिहार), गोलपारा (आसाम), सिल्हेट (पूर्व बंगाल) व काचार (आसाम) या जिल्ह्यांतून बंगाली बोलणारांची संख्या बरीच आहे.

२. वाङ्मय—बंगाली भाषा स्वतंत्रपणें सुमारें एक हजार वर्षांपासून अस्तित्वांत आहे. काव्य आणि गीत यांना ती विशेष अनुकूल आहे. बंगाली लिपींत छापलेलें पहिलें पुस्तक हालहेड या इंग्रज गृहस्थानें सन १७७८ मध्यें प्रसिद्ध केलें. त्याचें नांव 'बंगाली भाषेचें व्याकरण' असें होतें. जुनें बंगाली वाङ्मय सर्व पद्यमय आहे. भारत, रामायण व पुराणें यांतील कथांशिवाय दुसरे विषयच त्यांत नाहींत. सोळाव्या शतकात चैतन्य व इतर वैष्णव संतांचीं चरित्रें रचण्यांत आलीं. बंगाली भाषेंतील अगदीं जुनी ग्रंथरचना जी झाली ती सिद्धाचार्य नांवाच्या संतांनीं केलेलीं ४७ पदांच्या स्वरूपामध्यें अवशिष्ट राहिली आहे. हीं 'चर्यापदें' मूळ स्वरूपांत हल्लीं उपलब्ध नसून त्यांचीं तिबेटी भाषांतरेंच शिल्लक आहेत. या पदांत हजार वर्षांपूर्वीचें बंगाली जीवन दृष्टीस पडतें. इ. स. १२०० पासून १४०० पर्यंत मुसलमानांनीं जुनी हिंदु संस्कृति व वाङ्मय यांचा पद्धतशीर संहार केला. या तुर्की राज्यकर्त्यांनीं आपले सर्व व्यवहार फारसी व अरबी भाषांत चालविले. तुर्कांनीं बंगाल आत्मसात् केल्यावर बंगाली भाषेंत पहिला प्रसिद्ध बंगाली संत-कवि चंडीदास या नांवाचा झाला. राधा व कृष्ण यांच्या प्रेमलीलांवर चंडीदासानें अति सुंदर व भक्तिरसानें ओथंबलेली काव्यरचना केली. राधारूपी मानवी बुद्धीचें कृष्णरूपी जगदात्म्या-वर जें पवित्र प्रेम त्याचा आविष्कार बाह्यतः शृंगारिक, पण अंतरंगीं भक्तिरसपूरित भाषेमध्यें चंडीदासानें केला आहे. चंडीदासाचें शेवटीं नांव असलेलीं अशीं १२०० पदें (यांनाच कीर्तन म्हणतात) आज प्रचारांत आहेत. तीं सगळीं एकाच चंडीदासाचीं नसून एकाच नांवाच्या अनेक संतांचीं आहेत. चौदाव्या शतकांतील पहिला चंडीदास याचीं कृष्ण-कीर्तनें आहेत. त्यास बडा चंडीदास अशी संज्ञा आहे. दुसरा द्विज चंडीदास त्यानंतर झाला. तिसरा दीन चंडीदास सोळाव्या शतकानंतर झाला. पहिल्या चंडीदासाच्या पदांतील राधेची कृष्णभक्ति अतिशय प्रखर व तळमळीची आहे. याच्याच काव्यावरून बंगाली वाङ्मयात दीर्घकालपर्यंत कृष्णभक्तीची दिशा लागली.

कृत्तिवास ओझा (जन्म इ. १३९९) यानें रामायणकथा बंगालीमध्यें रचली व ती फार लोकप्रिय झाली. या कवीचा राम वाल्मीकीच्या रामासारखा धीरोदात्त व वीर्यशाली मानव नसून कृष्णासारखा देवगुणांनीं युक्त व प्रेमळ असा दैवी पुरुष आहे. मालाधर बसू यानें इ. स. १४८० च्या सुमारास रचलेलें कृष्ण-चरित्र फार लोकप्रिय झालें. नागकन्या मनसा व बहूला व लखिंदर यांच्या कथानकांवर दोन काव्यें विजयगुप्त व विप्रदास यांनीं केलीं, तींहि पुष्कळ लोकप्रिय झालीं.

बंगाली वैष्णव पंथाचा संस्थापक श्रीचैतन्य याचा जन्म इ. स. १४८६ मध्यें झाला. त्या वेळीं इस्लामी धर्म सूफी लोकांच्या प्रयत्नांनीं बंगालमध्यें पुष्कळ पसरूं लागला होता. पण चैतन्या

प्रभूंच्या उदयानंतर मुसलमान राज्यकर्तेंच चैतन्य संप्रदायानें भारले गेले. बंगालच्या सुलतान हुसेनशहा व चितगावचे सुभेदार परागलखान व छुटीखान यांनीं महाभारताचीं दोन भाषांतरें बंगाली भाषेंत करविलीं. भारत, रामायण व कृष्णकथा बंगाली भाषेंत सांगण्याची परंपरा १५ व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंत चालूच होती.

दक्षिण बिहार व बंगाल या प्रांतांची तुर्की राजवटीनें राखरांगोळी केली, पण मिथिला म्हणजे उत्तर बिहार या वावटळींतून सुदैवानें सुटला. मैथिली भाषा ही बंगालीचीच बहीण आहे. त्या भाषेंत ज्योतिरीश्वर कवि शेखरानें 'वर्णरत्नाकर' ग्रंथ लिहिला. विद्यापतीनें राधा-कृष्णाच्या प्रेमलीला अत्यंत मधुर पदांमधें गायिल्या. विद्यापतीच्या पदांचें रूपांतर बंगाली, आसामी व उडिया कवींनीं आपल्या भाषांत केलें. मैथिली भाषेच्या वळणावर गेलेली बंगाली भाषा ही 'व्रजबोली' या नांवानें शेंकडों वर्षें कृष्णलीलांच्या वर्णनाकरितां उपयोगांत येत होती. रवींद्रनाथ ठाकुरांनींहि एक सबंध काव्यग्रंथ या व्रजबोलीमध्यें लिहिला आहे. विद्यापतीचीं भावगीतें बंगाली लोक आपल्याच भाषेंतील गीतें आहेत, असें मानूं लागले, इतकीं तीं लोकप्रिय झालीं. चैतन्यप्रभूंच्या (इ. १४८६–१५३४) जीवनामुळें बंगालचें सबंध रूप बदलून गेलें. त्यानें काव्यरचना फार थोडी केली. संस्कृतमध्यें आठच श्लोक व एक जगन्नाथाचें स्तोत्र एवढेंच त्याचें काव्य शिल्लक आहे. परंतु बंगाली जीवनावर त्याच्या अवतारी जीवनाचा परिणाम अतिशयच झाला. बंगाली भाषेंत त्याचीं चैतन्य-भागवत (१५७३), चैतन्य-मंगल, चैतन्यचरितामृत, इ. एकाहून एक जास्त सरस चरित्रें लिहिण्यांत आलीं. शेवटला ग्रंथ श्रीकृष्णदास कविराज यानें इ. स. १५८१ च्या सुमारास लिहिला. तो बंगाली भाषेंतील अत्युत्तम ग्रंथ आहे. इतर वैष्णव संतांचीं चरित्रेंहि पुष्कळ लिहिण्यात आलीं. ईश्वरनागराचा 'अद्वैतप्रकाश' (१५६४), नित्यानंदाचा 'प्रेमविलास' (१६००), यदुनंदाचा 'कर्णानंद' (१६०७), राजा वल्लभचट्टाचा 'मुरली विलास' (१६२०), गोपीजनवल्लभाचा 'रसिकमंगल' (१६५२), मनोहरदासाची 'अनुरागावली' (इ. १६९७), नरहरी चक्रवर्तीचा 'भक्तिरत्नाकर' व 'नरोत्तमविलास' (१७२० चा सुमार), हे अशा प्रकारचे प्रमुख ग्रंथ आहेत. या ग्रंथांमधें श्रद्धा व भक्ति यांचा पुष्कळ भाग आहे. राधाकृष्णांच्या प्रेमविलास व चैतन्याचे चमत्कार यांस अनुलक्षून लिहिलेलीं अत्यंत मधुर व भक्तिरसानें थबथबलेलीं सुमारें २०० संतकवींचीं पदे अजून लोकांच्या म्हणण्यांत आहेत. त्यांतील प्रमुख कवी पुढील आहेत : (१) गोविंददास कविराज (१५३६–१६१२)– याचा पदें कल्पनासौंदर्य व भाषामाधुर्य यांनीं परिपूर्ण आहेत. (२) ज्ञानदास (जन्म १५३०)– याची भाषा शुद्ध बंगाली आहे. (३) कविरंजन विद्यापति. (४) राय शेखर. (५) बलरामदास. (६) नरोत्तमदास– याचीं पदें शुद्ध भक्तीनें परिपूर्ण आहेत.

सतराव्या शतकाच्या मध्यास या भक्तिसुधामृतानें भरलेल्या पदांचे बरेच संग्रह करण्यांत आले. त्यांतील कांहींचीं नावें अशीं आहेत : (१) श्रीराधाकृष्ण–रसकल्प–वल्ली, (२) रस–मंजरी, (३) गीत–चिंतामणि, (४) पदामृत–सिंधु, (५) पदकल्पतरु (१७७०). यांपैकीं शेवटल्यांत ३१०१ पदें एकत्र आहेत.

बंगालमध्यें मुसलमानी राज्य इ. स. १२०० च्या सुमारास सुरू झालें. त्यामुळें चितगांव, आराकान, वगैरे भागांत मुसलमानी संस्कृति चांगलीच रूढ झाली. तेथें इस्लामधर्म व आचार यांसंबंधीं बंगाली भाषेमध्यें पुष्कळ ग्रंथरचना सोळा–सतराव्या शतकांत झाली. दौलत काजी याचे 'सती मैना' व कुरीशीचें 'चंद्रावती' हें विस्तीर्ण कथानक, यांचे विषय हिंदु समाजांतीलच होते. महमदखानच्या 'मकतुल हुसेन' मध्यें करबेलाची शोककथा दिली आहे. 'अमीर हमझा' या वीररसपूर्ण काव्यांत पैगंबराचा मामा अमीर हमझा याचे पराक्रम वर्णन केले आहेत. या काव्याची भाषा रेखीव व बंगाली आहे. अरबी भाषेंतील सुरस गोष्टींचींहि रूपांतरें मुसलमान लेखकांनीं सुंदर बंगालीमध्यें केलीं.

या आकारानी मुसलमानी बंगाली कवींपैकीं सर्वश्रेष्ठ कवि आलाओल (इ. स. १६०७–१६८०) हा होय. यानें पद्मावती व इतर अनेक महाकाव्यें केलीं (सन १६५१). पद्मावती काव्यांत संस्कृत शब्दांचा भरणा पुष्कळ असून त्यांत सूफी विचारांची गुंफण असल्यामुळें पूर्व बंगालच्या मुसलमानांमध्यें त्याची लोकप्रियता फार काळपर्यंत टिकून आहे.

लाऊसेन हा एक धर्म–देवाचा निस्सीम भक्त म्हणून प्राचीन काळीं होऊन गेला. त्याच्या पराक्रमाचें वर्णन करणारीं अनेक काव्यें बंगालींत रचलीं गेलीं; त्याना 'धर्ममंगल' काव्यें म्हणतात. मयूरभट्टानें (सु. १२००) केलेलें 'धर्ममंगल' आज उपलब्ध नाहीं. रूपराम चक्रवर्ती (१६५०), माणिक गांगूली, घनराम चक्रवर्ती यांचीं धर्ममंगल काव्यें म्हणून एक विशेष काव्यप्रकार आहे. त्यात चंडी म्हणजे पार्वती हिचें चरित्र वर्णन केलेलें असतें. सोळाव्या शतकांत माधवाचार्य व मुकुंदराम चक्रवर्ती यांनीं चंडी काव्यें लिहिलीं. त्यात त्या काळचे बंगाली विचार व आचार यांचें विस्तृत प्रतिबिंब उमटलें आहे.

सोळाव्या शतकांत रघुनाथ भागवताचार्य यांनीं भागवत पुराणाचें कृष्ण-प्रेम-तरंगिणी या नांवाचें बंगाली रूपांतर केलें.

पुढल्या शतकांत काशीराम दासानें महाभारताचें बंगालींत भाषांतर केलें. तें सध्यां बंगालभर प्रेमानें वाचलें जात आहे. त्याचा वडील भाऊ कृष्णकिंकर यानें 'श्रीकृष्णविलास' नांवाचें एक भक्तिकाव्य केलें, व धाकटा भाऊ गदाधर यानें 'जगन्नाथ-मंगल' या काव्यांत जगन्नाथ-माहात्म्य वर्णिलें आहे.

राजा गोपीचंद व मैनावती यांची कथा मूळची बौद्धांची. या कथानकावर बंगालमध्यें १७ व १८ व्या शतकांत पुष्कळ काव्यरचना झाली. पुढें ही कथा सर्व भारतभर काव्यविषय झाली. बंगालीमध्यें भवानीदासाचें 'मैनावती-गान' व दुर्लभ मलिकचें 'गोविंदचंद्र-गीत' हे दोन ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत.

अठरावें शतक हें बंगालच्या अत्यंत अवनतीचें कालचक्र होतें. हिंदु व मुसलमानी संस्कृतींच्या मिश्रणानें सर्व प्रांत कर्तृत्वात अधोगतीस गेला. नबाबांचा कारभार अतिशय कुजलेला असा होता. त्यामुळें मराठे, शीख व इंग्रज यांचें प्राबल्य वाढलें. १७७० नंतर प्रांतभर भयंकर दुष्काळ पडला. तथापि कांहीं लेखक या काळांतहि प्रसिद्धीस आले. रामप्रसाद (१७७५) हा कालीचा भक्त होता. त्याचीं भक्तीनें ओथंबलेलीं गीतें अगदीं सोप्या भाषेंत असून अजून लोकप्रिय आहेत. भारतचंद्र (१७१२–१७६०) याचें 'कालिकामंगल' काव्य महत्त्वाचें आहे. या काव्याची भाषा अतिशय रेखीव असून त्याचे तीन भाग आहेत. पहिल्या भागांत विद्या व सुंदर यांची प्रेमकथा आहे. तिसऱ्या भागांत अंबरचा राजा मानसिंग व बंगालचा राजा प्रतापादित्य यांच्या युद्धाची हकीगत आहे. या भारतचंद्राची भाषा फार कसलेली आहे व घटना व व्यक्ति यांचें सरस चित्रलेखन करण्यांत तो फार कुशल आहे. इतर कोणत्याहि कवीपेक्षा याच्या काव्यांतील ओळी अजून लोकांच्या तोंडीं जास्त येतात. राजा जयनारायण घोशाल (१७५२–१८२१) यानें काशीखंड संस्कृतमधून भाषांतरित केलें व त्या वेळच्या काशीचें विस्तृत वर्णन स्वतः रचून त्यांत घातलें. अठराव्या शतकांत 'काव्य-युद्ध' हा प्रकार फार प्रचारांत आला. दोन कवि सद्यःस्फूर्तीनें काव्य रचून एकमेकांवर मात करण्याचा प्रयत्न करीत. अशा वाग्युद्धांस 'कवीर-लढाई' असें नाव देत. दाशरथीराय (१८०४–१८५७) याचें अशा लढायांत भाषाप्रभुत्व, कल्पनाचातुर्य व विचाराचें नावीन्य दिसून येत असे.

गद्य ग्रंथांमध्यें रामराम वसूचें 'प्रतापादित्यचरित्र' १८०१ मध्यें बंगाली टाइपांत लंडनमध्यें पहिल्यानें छापलें. पहिलें बंगाली वृत्तपत्र विल्यम कॅरे यानें श्रीरामपूर येथें 'समाचार-दर्पण' या नांवानें १८१८ मध्यें सुरू केलें. मुसलमानांतहि बंगाली काव्यलेखन चालूच होतें. रंगपूरच्या हयात महंमदनें 'अनचिया वाणी', 'जंगनामा', 'चित्त-उत्थान' व 'हेतु-ज्ञान' हे काव्यग्रंथ १७२०–१७५० या काळांत लिहिले. नसरुल्लाखान, याकूबअली, दौलत वजीर बहराम, इ. मुसलमानी लेखकांनीं पुष्कळ बंगाली ग्रंथरचना केली.

एकोणिसाव्या शतकांत बंगाली वाङ्मयाचें नवीन स्वरूपांत पुनरुज्जीवन झालें. राजा राममोहनरायनीं उपनिषदांचें बंगाली भाषांतर केलें व बंगाली भाषेचें व्याकरण लिहिलें. ईश्वरचंद्र विद्यासागर (१८२०–१८९१) यानीं बंगाली गद्यवाङ्मयास उज्ज्वल स्वरूप आणून दिलें, त्यामुळें त्यास 'बंगाली गद्याचे निर्माते' अशी पदवी मिळाली. संस्कृत शब्दाचें प्रमाणशीर मिश्रण असलेली त्याची सोपी, सुबोध व तर्कशुद्ध भाषा अनेक लेखकास मार्गदर्शक झाली. प्यारीचंद्र मित्र यानीं १८५८ मध्यें 'आलालेर घरेर दुलाल' (श्रीमंताचें लाडावलेलें मूल) म्हणून एक सामाजिक कथा प्रसिद्ध केली. तिची भाषा कलकत्त्यांतील लोकांच्या तोंडीं असलेली व अत्यंत चटकदार अशी आहे.

मायकेल मधुसूदन दत्त (१८११–१८५९) व बंकिमचंद्र चतर्जी (१८३८–१८९४) हे दोन प्रसिद्ध लेखक आधुनिक काळच्या पहिल्या पिढींत होऊन गेले. यावरून १९ व्या शतकाच्या उत्तरार्धास 'मधुसूदन–बंकिम–युग' म्हणण्याचा प्रघात आहे. मधुसूदन दत्त आरंभीं इंग्रजीमध्यें लिहीत, पण पुढें बंगालींत लिहूं लागले. यांचीं 'मेघनाद–वध' (इ. स. १८६१) व 'व्रजांगना काव्य' हीं दोन काव्यें फार उच्च स्वरूपाचीं आहेत. त्यांनीं उत्कृष्ट सुनीतें व परिणामकारक नाटकेंहि लिहिलीं आहेत. रवींद्रनाथाच्यापूर्वी झालेल्या कादंबरीकारांत बंकिमचंद्रांस प्रथम स्थान देण्यात येतें. त्यांनीं प्रथम १८६४ मध्यें 'Rajmohan's Wife' म्हणून एक इंग्रजी कादंबरी लिहिली. नंतर १८६५ मध्यें 'दुर्गेशनंदिनी' ही त्यांची पहिली बंगाली कादंबरी प्रसिद्ध झाली. यापुढें त्यांनीं १२–१३ दुसऱ्या ऐतिहासिक व सामाजिक कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या. १८७२ मध्यें त्यांनीं 'वंगदर्शन' मासिक सुरू करून बंगाली वाङ्मयास नवीनच वळण लावलें. 'राजसिंह' आणि 'सीताराम' या त्यांच्या प्रमुख ऐतिहासिक कादंबऱ्या आहेत. 'विषवृक्ष' व 'कृष्णकांताचें मृत्युपत्र' या दोन विशेष वाचनीय अद्भुत सामाजिक कथा आहेत. 'कपालकुंडला' (एका तंत्रमार्गी योग्यानें संभाळलेल्या मुलीचें चरित्र) ही कोणच्याहि भाषेंतल्या नवलकथेपेक्षां जास्त मोहक आहे. 'आनंदमठ' या त्यांच्या कादंबरीमध्यें 'वंदे मातरम्' हें राष्ट्रगीत त्यांनीं रचून घातलें आहे. त्यांच्या लेखनानें समाजाच्या बुद्धीस व कल्पनाशक्तीस अमूल्य खाद्य मिळालें. त्यांनीं स्वदेशाविषयीं प्रीति व उत्कृष्ट वाङ्मयाचा नमुना कसा असावा, याची कल्पना बंगाली लोकांना दिली.

बच्छराज यांनीं १८९४ मध्यें आपला नातू म्हणून दत्तक घेतलें. यांचें शाळेंत अथवा विद्यापीठांत शिक्षण झालें नाहीं. परंतु १९१६ मध्यें शेठ बच्छराज यांचा अंत झाल्यापासून यांनीं आपली इस्टेट व व्यापार फार कुशलतेनें पाहण्यास सुरुवात केली. त्यास गांधीजी, विनोबा भावे व श्रीकृष्णदास जाजू यांचा सहवास घडल्यामुळें यांच्या मनावर सुपरिणाम झाला व ते राष्ट्रकार्याकडे वळले. यांनीं वर्धा येथें गांधीसेवासंघ व मारवाडी शिक्षण मंडळ यांची स्थापना केली. तसेंच अखिल भारतीय मारवाडी आगरवाल महासभा स्थापन केली. यांनीं रावबहादुर ही सरकारी पदवी व ऑनररी मॅजिस्ट्रेटचा हुद्दा यांचा त्याग केला. यांनीं काँग्रेसच्या चळवळींत महत्त्वाचा भाग घेऊन त्या संस्थेस २५ लाखांवर अनेक मोठमोठ्या देणग्या दिल्या. खिलाफत चळवळींतहि यांनीं पुढाकार घेतला. यांनीं नागपूर येथें १९२३ मध्यें झेंडा-सत्याग्रह सुरू केला. त्यामध्यें त्यांस तुरुंगवासाची शिक्षा झाली. पुन्हां १९३० व १९३२ मध्यें सत्याग्रहाच्या चळवळींत त्यांस व त्यांच्या पत्नी श्रीमती जानकीदेवी व पुत्र कमलनयन यांस शिक्षा झाल्या. १९२० सालीं भरलेल्या नागपूर काँग्रेसच्या स्वागत-समितीचे ते अध्यक्ष होते. तसेंच अखिल भारतीय चरखा संघाचे ते अध्यक्ष व खजिनदार होते. १९२१ पासून ते ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे व वर्किंग कमिटीचे सदस्य होते. १९३४ सालीं ते तात्पुरते राष्ट्रीय सभेचेहि अध्यक्ष होते. त्यांनीं स्वतःच्या मालकीचें लक्ष्मीनारायण मंदिर १९२८ सालीं अस्पृश्यांस खुलें केलें. अशा प्रकारचें हें हिंदुस्थानांत त्या वेळीं पहिलेंच मंदिर होतें. हे स्वतः कर्ते सुधारक होते. राष्ट्रीय सभेचे ते १९२० पासून खजिनदार होते व महात्मा गांधींचे उजवे हात असत. ग्रामोद्योग संघाकरितां त्यांनीं वर्ध्याजवळ असलेली आपली मगनवाडी गांधीजींच्या स्वाधीन केली. अखिल भारतीय हिंदी प्रचार समितीचेहि ते अध्यक्ष होते. सामाजिक बाबतींतहि त्यांनीं अनेक सुधारणा केल्या. जयपूरच्या संस्थानी प्रजेस राजकीय हक्क मिळावे म्हणूनहि त्यांनीं सत्याग्रह केला. वर्ध्याच्या व्यापारी महाविद्यालयाची स्थापना यांच्या देणगीमुळें झाली. यांच्या मृत्यूनंतर यांच्या पत्नीनें अडीच लक्षांचा विश्वस्तनिधि वेगळा काढून एक मोठी आदर्श गोशाला स्थापन केली.

**बजाजी निंबाळकर**—एक मराठा वीर. फलटणचा पहिला राजा मुधोजी याचा हा कनिष्ठ पुत्र. विजापूरच्या इब्राहिम आदिलशहाच्या मृत्यूचा फायदा घेऊन मुधोजीनें पुंडाई माजविली होती ती मोडून विजापूरच्या लष्करानें मुधोजीस साताराच्या किल्ल्यांत अटकेंत ठेवलें होतें. त्या वेळीं त्याजबरोबर बजाजीनेंहि दहा वर्षें अटकेंत काढलीं. पुढें शहाजीच्या मध्यस्थीनें या बापलेकांची सुटका होऊन सन १६३९ मध्यें यांस फलटणची जहागीर मिळाली. पुढें या निंबाळकरांनीं विजापूरकरांविरुद्ध परत पुंडाई माजवल्यावरून विजापूरकरांनीं यांचा पाडाव करण्यासाठीं सैन्य पाठविलें होतें. त्या वेळीं मुधोजी मारला जाऊन बजाजीस विजापुरास बादशहाकडे पाठवण्यांत आलें. बादशहानें यास ठार करण्याचाच हुकूम दिला. परंतु यानें मुसलमानी धर्म स्वीकारण्याचें कबूल केल्यावरून बादशहानें यास माफी दिली. शिवाय यास आपली मुलगी दिली व याची फलटणची जत केलेली जहागीर यास परत केली. याची मुसलमान बायको विजापुरासच मरण पावली. हा सन १६५१ मध्यें फलटणास आल्यावर शिवाजीची आई जिजाबाई हिनें यास शुद्ध करून परत हिंदु धर्मांत घेतलें. नंतर यानें शिवाजीस गुप्तपणें बरेंच साहाय्य केलें. सन १६५९ मध्यें अफजलखान शिवाजीवर चालून आला असतां हा त्याच्या हातीं सांपडला. हा त्या वेळीं हत्तीच्या पायाखालीं मारला जावयाचा, परंतु नाईकजी राजे पांढरे याच्या मध्यस्थीनें साठ हजार होनांवरच याची सुटका झाली. सन १६६९ मध्यें औरंगजेबानें यास आपल्या बाजूस वळविण्यासाठीं केलेला प्रयत्न फुकट गेला. फलटणास याच्या नांवानें 'लांडेबजाजीचा घुमट' या नांवाचा एक घुमट आहे. विजापुरास मुसलमान धर्म स्वीकारण्यापूर्वी याला महादजी नांवाचा मुलगा होता. त्यास शिवाजीची मुलगी सखूबाई ही दिली होती.

**बजाणा**—मुंबई इलाखा, काठेवाडमधील एक संस्थान. हें आतां सौराष्ट्र संघांत सामील झालें आहे. क्षेत्रफळ १८३ चौरस मैल. लोकसंख्या १३,९९६. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सु. दोन लाख आहे. येथील जाट लोकांचें मूळ स्थान सिंधमध्यें बांगनानार येथे होतें. तेथून ते मांडव डोंगरांत आले. चंपानेर वेढ्यांत त्यांनीं शौर्य गाजविल्यामुळें त्यांस २४ खेडीं मिळालीं होतीं.

**बजाबा पुरंदरे**—सासवडच्या पुरंदरे घराण्यांतील एक मुत्सद्दी. हा महिपत त्रिंबक या नांवानेंहि प्रसिद्ध आहे. १६६२ मध्यें यास पेशव्याचा मुतालिक नेमण्यांत आलें. नाना फडणिसानें मोरोबादादाबरोबर यासहि कैदेंत अडकवून ठेवलें. त्यामुळें नानावर याचा दांत होता. दादास नानाविरुद्ध चिथवण्यांत याचा महत्त्वाचा भाग होता.

**बटलर, सॅम्युअल** (१८३५–१९०२)—एक इंग्रज ग्रंथकार. याच्या वडिलांच्या मनांत याला धर्मोपदेशक करावयाचें होतें. परंतु त्याच्या मनाचा कल तिकडे नसल्यामुळें तो न्यू झीलंड बेटांत निघून गेला व तेथें तो पांच वर्षांत आर्थिक दृष्ट्या स्वतंत्र झाला. नंतर तो इंग्लंडमध्यें परत आला व त्यानें चित्रकला, गायन, जीवशास्त्र व वाङ्मय याचा अभ्यास करून त्यांत बरेंच प्रावीण्य मिळविलें. त्यानें आपल्या चित्रांचें एक प्रदर्शन

रॉयल ॲकॅडमीमध्यें भरविलें, हँडेलच्या धर्तीवर कांहीं गीतें रचिलीं, जीवशास्त्रावर डार्विनच्या सिद्धान्ताच्या विरुद्ध एक ग्रंथ लिहिला व १८७२ मध्यें 'एऱ्हेवान' नांवाचें नाटक चसविलें. या नाटकांत न्यू झीलंडमधील पार्श्वभूमीवर एक काल्पनिक राज्याचें दिग्दर्शन केलें व तें विडंबनपद्धतीनें केलें आहे. या नाटकाचीच एक पुरवणी म्हणून दुसरें एक नाटक त्यानें १९०१ मध्यें लिहिलें. त्यानें स्वतःच्या आयुष्यक्रमावर लिहिलेली एक कादंबरी 'दि वे ऑफ ऑल फ्लेश' (सर्व सारखेंच) प्रसिद्ध आहे.

**बटवा**—ही नदी भोपाळ संस्थानांतून वाहत जाऊन भिलशानजीक ग्वाल्हेर संस्थानांत शिरते. पुढें जाऊन ती संयुक्त प्रांतांत हमीरपूरनजीक यमुनेला मिळते. हिच्या कांठीं पाडव आणि विदिशा नगरीचे राजे यांच्यामध्यें युद्ध झालें होतें.

**बटाटा**—[ वर्ग—सोलानासी ]. बटाटा हें तंबाकू, नाइट-शेड, हेनबेन, थॉर्नॲपल, वगैरे विषारी वनस्पतींच्या वर्गांतील एक रोप आहे. बटाट्याचें मूलस्थान दक्षिण अमेरिका हें होय. हें प्रथम कोणीं युरोपांत आणलें (१५६५), हें नक्की माहीत नाहीं. सर जॉन हॉकिन्स, सर फ्रान्सिस ड्रेक व सर वॉल्टर रॅले या सर्वांसच हें इंग्लंडमध्यें प्रथम आणल्याचें श्रेय देण्यांत येतें. आयर्लंडमध्यें प्रथम याची मोठ्या प्रमाणावर खाण्याकरितां अन्न म्हणून लागवड करण्यांत आली. हें बहुवर्षायु वानस्पतिक झाड आहे. याचीं पानें टोंकदार असतात. फुलें फिकट रंगाचीं असून त्यांचे गुच्छ असतात. याला जांभळसर फळ येतें व त्यांत लहान बिया असतात. यास तंतू फुटून ते जमिनींत जातात व तेथें फुगून त्यांच्या ग्रंथी बनतात. त्यास आपण बटाटे म्हणतों. यांचा आकार योग्य पद्धतीनें लागवड केली असतां वाढवतां येतो. बटाट्यांस डोळे असतात. हे डोळे म्हणजे पानांचे कळे असतात. हे डोळे थोड्या बटाट्याच्या भागासह जमिनींत लावले असतां नवीन झाडें तयार होतात. या नव्या झाडास प्रारंभीं त्या बटाट्याच्या भागापासूनच पोषण मिळतें. नंतर त्यास मुळें व पानें फुटतात व अशा रीतीनें स्वतंत्र झाड तयार होतें. बटाट्याचें पीक पुळणवट हलक्या जमिनींत वनस्पतिज द्रव्यामध्यें चांगलें येतें. बटाटे लावूनच यांची लागवड करण्यांत येते. हे कंद (बटाटे) खातात व याच्यापासून पिष्टसत्त्व, साखर व मद्यार्क तयार होतात. या झाडास रोग (ब्लाइट, वॉर्टडिसीज) फार होतात. तसेंच अनेक प्रकारचे कीटक यावर हल्ला करतात.

फायटोफ्थोरा [ कुल—पेरोनोस्पोरासी ] नांवाची एक बुरशी-सारखी वनस्पति आहे. या वनस्पतीपासून बटाट्यांवर रोग पडतो. ही प्रथम बटाट्याच्या वेलाच्या पानावर पिंगट चट्ट्यांच्या स्वरूपांत दिसूं लागते. हे चट्टे वाढूं लागले म्हणजे पानें वाळून कुजूं लागतात व थोड्याच दिवसांत सर्व वेल काळा पडून कुजून जातो. वेलांवर बोर्डो मिश्रण शिंपडलें असतां या रोगाचा प्रति-कार होऊं शकतो.

हिंदुस्थानांत बटाटा पहिल्यानें पोर्तुगीज लोकांनीं आणला असावा. इकडील बटाट्याची लागवड इटालियन बटाट्याची आहे. बटाटा फारच लवकर आपल्या अन्नपदार्थांत व उपवासाच्याहि पदार्थांत शिरला. हा बाजारांत बारामास मिळतो. बटाट्याच्या अनेक जाती आहेत व नव्या नव्या निर्माण होत आहेत. बटा-ट्याला हलकी, भुसभुशीत, बारीक रेंव असलेली, नदीकांठची निचरा होणारी मध्यम काळी जमीन लागते. बटाट्याचा फेर-पालट बाजरी, भुइमूग, मिरच्या, कांदे, वगैरेंशीं करतात. बटा-ट्यांतहि खरीप व रब्बी अशा दोन जाती आहेत. खरिपाचें पीक सप्टेंबरमध्यें निघतें व रब्बीचें पीकहि ३–३॥ महिन्यांत होतें. दर एकरीं उत्पन्न २,००० ते १५,००० पौंड पावेतों जमिनीच्या मगदुराप्रमाणें व इतर परिस्थितीच्या मानानें होतें. या बटाट्यास बांगडी नांवाचा रोग होतो.

पुणें जिल्ह्यात १८४१ सालीं हिवरें (खेड तालुका) व दापोडी या ठिकाणीं बटाट्याच्या बागा करण्यांत आल्या. यामुळेंच आज खेड—जुन्नर भागांत बटाटा फार पिकतो. महाबळेश्वरचा बटाटाहि आपल्या भागात प्रसिद्ध आहे.

जगात आज सर्वांत जास्त बटाटा रशियात होतो. त्या खालो-खाल जर्मनी, पोलंड, अमेरिका, ग्रेट ब्रिटन, आयर्लंड व फ्रान्स या देशांत होतो. १९३९–४० सालीं एकंदर जगांत सुमारें दोन हजार दशलक्ष क्विंटलइतकें बटाट्याचें पीक आलें असा अंदाज केलेला होता.

**बटेव्हिया**—जावा बेटाच्या उत्तर किनाऱ्यावरील एक शहर व बंदर. हें अतिपूर्वेकडील डच वसाहतींचें मुख्य ठिकाण व इंडोनेशियाची राजधानी आहे. वस्ती सुमारें चार लाख आहे. अनेक देशांचे व धर्मांचे लोक येथें असून मिश्र समाजहि बराच आहे. आयात व निर्यात व्यापाराचें हें एक मुख्य केंद्र आहे. येथून पुष्कळ साखर बाहेर रवाना होते. बहुतेक वस्ती मलायी लोकांची आहे. त्याखेरीज कांहीं चिनी व युरोपियन आहेत. येथें सरकारी विद्यापीठ आहे.

**बट्टा**—हुंडणावळ पाहा.

**वडनेरा**—वऱ्हाड, उमरावती जिल्हा व तालुका, एक गांव. हें जी. आय्. पी. रेल्वे स्टेशन आहे. येथून उमरावतीस फांटा जातो. अकबराच्या वेळीं हें गाविल सरकारच्या परगण्याचें मुख्य ठिकाण होतें. येथील किल्ला व तट मुसलमानांच्याच वेळचे

बांधलेले आहेत. येथें विद्यार्थ्यांची पानें होतात. सरकी व सूत काढण्याचे व कापडाचे कारखाने आहेत.

**बॅडमिंटन**—लॉन टेनिससारखा हा खेळ आहे. हा १८७३ च्या सुमारास हिंदुस्थानांतून ग्रेट-ब्रिटनमध्यें गेला. याला ड्यूक ऑफ बोफोर्ट याच्या ग्लूस्टरशायरमधील गांवावरुन नांव दिलें गेलें आहे. हा ड्यूक प्रसिद्ध क्रीडापटु असे. या खेळांतील चॅट फार हलकी असून चेंडूहि वाऱ्यानें उडणारा असा अगदीं हलका, बहुधा पिसांचा असतो. या खेळाचें पटांगण ४४ फूट लांब व २० फूट रुंद असतें. मध्यें ५ फूट उंच जाळें असतें. टेनिसप्रमाणेंच बहुधा खेळतात. १५ एक्क्यांचा एक डाव होतो. या खेळाचे आंतरराष्ट्रीय सामने होतात.

**बडवानी संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतलें एक संस्थान. संस्थानचें उत्पन्न १८ लाखांच्यावर आहे. क्षेत्रफळ ११७८ चौरस मैल. ३५२ खेडीं व बडवानी हें एकच शहर. लोक बहुतेक वन्य जातींचे. शेंकडा ६८ भील भाषा बोलतात. लोकसंख्या (१९४१) १,७६,६६६. संस्थानिक सिसोदिया रजपूत असून बाप्पा रावळाच्या वंशांतले आहेत. सध्यां देवीसिंग हे गादीवर आहेत. हें संस्थान आतां मध्यभारत संघांत सामील झालें आहे.

बडवानी शहर राजपुताना-माळवा रेल्वेवर महूपासून ८० मैलावर आहे. लोकसंख्या सु. आठ हजार. पांच मैलांवर बावनगज (५२ यार्ड) नावाची टेकडी आहे. हें क्षेत्र आहे. येथील देवळांत इ. स. ११६६ व १४५९ मधील लेख आहेत.

**बडहंस**—हा राग काफी थाटांतून निघतो. याच्या आरोहावरोहांत गांधार स्वर वर्ज्य आहे, म्हणून याची जाति षाडव-षाडव आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय मध्याह्न आहे. मध्यम सुटा सोडल्यानें हा राग विशेष चित्ताकर्षक होतो. हा एक सारंगप्रकार आहे.

**बडिशेप**—याचीं झाडें दोन हात उंच असून पानें बारीक कोथिंबिरीसारखीं असतात. झाडास तुरे येतात व त्यांत बडिशेपेचे दाणे असतात. उत्तर हिंदुस्थान, गुजराथ, खानदेश या भागांत बरीच लागवड होते. एकरीं सात-आठशें ते दोन हजार पौंड उत्पन्न होतें. जेवणानंतर मुखशुद्धीकरितां आणि आमांशावर औषधी म्हणून हिचा उपयोग करतात.

**बडोदें**—हिंदुस्थानांतील तिसरें मोठें संस्थान. क्षेत्रफळ ८,१७६ चौरस मैल. लो. सं. २८,५५,०१०. गुजराथ व काठेवाड यांत या संस्थानचा मुलूख पसरला आहे. गुजराथमध्यें कडी, बडोदें, नवसरी हे तीन व काठेवाडमध्यें अमरेळी हा चवथा असे याचे चार विभाग आहेत. साबरमती, मही, नर्मदा व तापी या चार मुख्य नद्या आहेत. पावसाचें सरासरी मान निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें आहे; उदा., नवसरी ५२ इंच, बडोदें ३८, कडी २७, आणि अमरेळी २२ इंच आहे. शेतीवर शेंकडा ६४ लोक निर्वाह करतात. नर्मदेच्या दक्षिण भागात ४० मैलपावेतों काळी जमीन आहे. बाकी उत्तर भागाची गोरठ आहे. काळ्या जमिनींत कापूस व गोरठ जमिनींत बाजरी व तंबाखू हीं पिकें होतात. वरून वाहत येणाऱ्या गाळानें नद्यांच्या तोंडाशीं समुद्रकांठीं खंबायतच्या आखातांत गाळ सांचून सुपीक जमीन तयार झाली आहे. तांदूळ, गहूं, हरभरा, कोद्रा, पावटा, कापूस, तंबाखू, बाजरी, वगैरे मुख्य धान्यें आहेत. अमरेळी प्रांतांत घोडे चांगले होतात. बडोद्यास व संस्थानांत अन्य ठिकाणीं सुमारें ४०० लहान-मोठे उद्योगधंदे व कारखाने आहेत. ४ शेतकी पेढ्या व सु. १५०० सहकारी संस्था आहेत. द्वारका, नवसरी, बिलिमोरा व उखा हीं बंदरें आहेत. संस्थानचा बहुतेक व्यापार मुंबईमार्फत होतो. संस्थानभर आगगाडीचें जाळें पसरलें आहे. संस्थानच्या मालकीची ७९५ मैलांची आगगाडी आहे. लहानमोठ्या शिक्षण-संस्था २६०९ आहेत. त्यांत ६ कॉलेजें आहेत. नुकतेंच बडोद्यास विद्यापीठ निघालें आहे. प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें आहे. वाचनालयें आणि ग्रंथालयें हीं संस्थानच्या खर्चानें खेड्या-पाड्यांतूनहि आहेत. संस्थानचें उत्पन्न १९४५-४६ सालीं सु. साडेचार कोटी होतें.

संस्थानाधिपति गायकवाड घराण्यांतील आहेत (गायकवाड पाहा). सध्यांचे महाराज प्रतापसिंह आपले आजोबा विख्यात राजर्षि सयाजीराव (गायकवाड पाहा) यांच्यानंतर १९३९ सालीं गादीवर बसले. हे १९०८ सालीं जन्मले व यांचें शिक्षण बडोदें आणि पुणें येथील कॉलेजांत झालें. राज्य-कारभाराचेंहि शिक्षण त्यांना देण्यांत आलें होतें. ते चांगले सुविद्य, क्रीडापटु व राजनीतिनिपुण आहेत. संस्थान १९४९ सालीं मुंबई प्रांतांत विलीन झालें.

प्रतापसिंहमहाराज गायकवाड

बडोदें हीं संस्थानची राजधानी मुंबईच्या उत्तरेस २५० मैलांवर विश्वामित्री नदीकांठीं आहे. बी. बी. सी. आय्. रेल्वेचें हें स्टेशन आहे. स्टेशनपासून जुन्या गांवा(मांडवी)पर्यंत शहर चांगलें नव्या पद्धतीनें वसलें आहे. राजवाडे, बागा, कोठी,

कॉलेजें, मध्यवर्ती ग्रंथालय, इ. कित्येक स्थळें प्रेक्षणीय आहेत. लो. सं. (१९४१) १,५२,३२६.

**बत्ता**—सुमात्राच्या मध्यभागात बत्ता नांवाच्या पूर्वी एक स्वतंत्र असलेल्या प्रदेशांतील रहिवासी. हे बहुधा मलायी रक्ताचे असावे. परंतु मलायी लोकांपेक्षां त्यांची शारीरिक ठेवण भिन्न आहे. त्यांचे खांदे रुंद, अवयव पिळदार, रंग काळसर पिंगट, डोकें लांबट, डोळे काळे व विशाल असतात. त्यांची राहणी व पोशाख फार घाणेरडा असून ते कोणतेंहि अन्न खातात. पूर्वी ते नरमांसभक्षक असत. सुधारलेले बत्ता लोक चांगले शेतकरी असून विणकाम, रंग देणें व उत्तम दुमजली घरें बांधणें, वगैरे कामें करतात. त्यांची शासनपद्धति सुव्यवस्थित असून त्यांच्यांत वंशपरंपरागत अधिकारी, लोकसभा व दिवाणी व फौजदारी कायदेसंग्रहहि आहेत. भुताखेतांची पूजा करणें हा त्यांचा धर्म होय. हे लोक बत्ता भाषा बोलतात. बत्ता भाषा ही पाश्चात्य पंडित लेडेन याच्या मतें सुमात्रांतील सर्वांत जुनी भाषा आहे. सुमात्रा बेटाच्या मध्यभागीं राहणारे बत्ता लोक ही भाषा वापरतात.

हे लोक कांहीं कांहीं बाबतींत मलायी लोकांपेक्षांहि सुधारलेले असून त्यांच्यामध्यें नरभक्षणाचा प्रघात असल्यामुळें या लोकांकडे फार प्राचीन काळापासून युरोपियन लोकांचें लक्ष गेलें आहे, परंतु त्यांच्याबद्दल अद्यापि विशेषशी माहिती मिळत नाहीं. त्यांच्याबद्दल मार्सडेन यानें आपल्या 'सुमात्राचा इतिहास' या ग्रंथांत कांहीं माहिती दिली आहे. परंतु लेडेन याच्या माहितीचा त्या माहितीशीं विरोध आहे. मार्सडेन यानें असें म्हटलें आहे कीं, हे लोक फक्त गुन्हेगार व शत्रूकडील कैदी यांनाच खातात, परंतु लेडेन याच्या माहितीप्रमाणें ते स्वतः असें सांगतात कीं, ते केव्हां केव्हां स्वतःचे नातलगहि वृद्ध व अशक्त झाले म्हणजे खातात, व तें केवळ नरमांसाची चटक लागल्यामुळें नव्हे तर धार्मिक विधीचा भाग म्हणून खातात. जेव्हां एखादा मनुष्य वार्धक्यामुळें या जगास कंटाळतो तेव्हां तो मीठ व लिंबें स्वस्त असतील अशा दिवसांत आपल्या मुलांना बोलावून स्वतःस भक्षण करण्यास सांगतो. नंतर तो एका झाडावर चढतो व त्या झाडाभोंवतीं त्याचे इष्टमित्र व आप्त जमतात आणि तें झाड हालवतात. झाड हालवते वेळीं ते एक अंतेष्टिगीत म्हणतात. त्याचा अर्थ–'ऋतु प्राप्त झाला आहे, फळ पिकलें आहे, तें पडलें पाहिजे,' असा असतो. नंतर तो खालीं उतरतो व जे त्याचे अगदीं जवळचे किंवा विशेष लाडके नातलग असतील ते त्याचा जीव घेतात व सर्व जण मिळून मोठ्या गंभीरपणें त्याची मेजवानी झोडतात. ही वरील गोष्ट मार्सडेन यानें सांगितलेल्या हकिकतीपेक्षां अधिक अविश्वसनीय असेल. परंतु ती बत्ता लोकांनींच सांगितलेली आहे व त्यांच्याजवळ राहणारे मलायी लोकहि याप्रमाणेंच सागतात. हिरोडोटस यानेंहि हुबेहूब असेंच वर्णन दिलें आहे. मात्र तेथें त्यानें लोकांचें नांव पदय अथवा पदइओइ असें दिलें आहे. पण पदइओइ हें नांव बत्ता याचाच अपभ्रंश असावा; कारण ग्रीक भाषेंत पाली याचें बलि असें रूप अनेक ठिकाणीं आढळतें.

बत्ता लोकांच्या ज्या निरनिराळ्या जाती लेडेन यास आढळल्या त्या: (१) बत्ता सेचलुंगु, (२) बत्ता पदेमनिम, (३) बत्ता कवलु (४) बत्ता पन्नइ, (५) बत्ता तोईऊ, (६) बत्ता कुरूलंग, (७) बत्ता सिपगलु, (८) बत्ताविल या होत. बत्ता लोकांतील चालीरीती बऱ्याचशा मलबारमधील नायर लोकांच्या चालीप्रमाणें आहेत. तेथें वारसा मातृकन्यापरंपरेनें चालतो, असें कांहीं लेखक लिहितात.

भाषा—बत्ता भाषेचा मलयु, घूगी व बिम भाषांशीं जरी विशेष संबंध असला तरी तिच्यांतहि बऱ्याच गोष्टी मूळच्याच आहेत. रचनेच्या बाबतींत ती मलयूप्रमाणेंच साधी आहे, परंतु तिचें बूगीशीं बरेंच साम्य आहे. बूगी लोकांतीलहि बऱ्याचशा चाली बत्ता लोकांप्रमाणेंच आहेत. घूगी लोकांतील रज्ज अथवा तरज्ज जातींतील लोक अद्यापिहि (लेडनच्या काळीं १८०० च्या सुमारास) युद्धांतील कैदी खातात असें सांगतात. सुमात्रा बेटांत ज्या निरनिराळ्या भाषा दिसतात त्यांच्या मुळाशीं बत्ता भाषा हीच आहे. मलायी लोकांमध्यें अचिनी जातीच्या लोकांत व मलबारकडील मापिल्ला लोकांत विशेष साम्य आहे; आणि त्यांच्या भाषेमध्येंहि बरेच मापिल्ला शब्द आहेत.

बत्ता भाषेमध्यें फार प्राचीन काळापासून अनेक ग्रंथ तयार झाले आहेत, परंतु लेडेन यास फक्त पुढील ग्रंथांची माहिती मिळाली: (१) शिव मरंगज, (२) शिवजरंग मुंदेप, (३) राजा इसिरि, व (४) महालमदेव. या भाषेची वर्णमाला फार चमत्कारिक असून तींतील अक्षरांच्या आकृती व अनुक्रमहि फार विचित्र दिसतात. एकंदर अक्षरें एकोणीस असून घूगीप्रमाणेंच सहा स्वरांनीं त्यांचे निरनिराळे उच्चार होतात. परंतु बत्ता भाषा लिहिण्याची पद्धति मात्र सर्वपरिचित पद्धतींहून निराळी आहे. या भाषेंतील अक्षरें एकापुढें एक डावीकडून उजवीकडे अगर त्याच्या उलट लिहीत नाहींत; व चिनीप्रमाणें वरून खालीं लिहीत येत नाहींत; तर त्याच्या उलट खालून वर एकावर एक लिहीत येतात. मेक्सिकोमधील चित्रलिपिहि अशीच लिहीत असत. त्यांचीं लिहिण्याचीं साधनें म्हणजे बांबूचा तुकडा अथवा झाडाची फांदी आणि कांट्याचें टोंक हीं होत. त्यांचे ग्रंथ म्हणजे या बांबूंच्या व लांकडांच्या मोळ्या होत.

मार्सडेन यानें आपल्या सुमात्राच्या इतिहासांत या भाषेची वर्णमाला दिली आहे. परंतु त्यानें ते वर्ण आडव्या ओळींत लिहिले आहेत. यामुळें थोडा घोटाळा होतो. वत्ता लोक केव्हां केव्हां जिवंत झाडावर लिहितात व अशा वेळीं ओळ सरल्यानंतर रिकामी जागा राहते ती वरच्या बाजूस असते. या भाषेंतील वर्ण बरेचसे घूगी व तागाल भाषांतील वर्णांशीं जुळतात.

**वदक**—हंस पक्ष्याच्या वर्गांतील एका पक्ष्याची ही जात आहे. यांच्या पायांचीं बोटें सांधलेलीं असतात. यांच्या रानटी व पाळीव अशा दोन्ही जाती आढळतात. रानटी जातीच्या वदकाची मान व डोकें हिरवेंगार असून मध्यें एक पांढरा पट्टा असतो. व नंतर शरीराचा भाग काळसर पिंगट असून शेपटीचीं टोंकें बांकदार पिसांचीं असतात. पाळीव वदकांच्या अनेक जाती आहेत. (आयडर वदक पाहा).

वदक हा पक्षी पाण्यांत राहणारा म्हणून याची रचना तशीच केली आहे. पिसांच्या विशिष्ट रचनेमुळें शरीराला गारवा लागत नाहीं व पिसाला शरीरांतील तेल सारखें लागत असल्यानें पाण्यांत राहून वदक कोरडेंच असतें. तसेंच शरीराचा आकार होडीसारखा रुंद व सपाट असतो. पाय वल्ह्याप्रमाणें उपयोगी पडतात. चोंच लांबट व रुंद असून आंत पडदे असतात. त्यामुळें तोंडांत जाणारें पाणी बाहेर पडतें. पाण्यांतील जीवजंतूंवर हे पक्षी उदरनिर्वाह करतात. यांचीं पिलें अंड्यांतून बाहेर आल्याबरोबर आईबरोबर पोहत जातात.

**वदक्शान**—मध्य आशिया, अफगाणिस्तानच्या ईशान्य सरहद्दीवरील रशियन राज्याच्या लगतचा अफगाणिस्तानचा मांडलिक प्रांत. यात वारवानचा समावेश होतो. याच्या उत्तरेस ऑक्सस व दक्षिणेस हिंदुकुश आहे. फैजाबाद शहर हें मुख्य ठिकाण आहे. काटधन धरून वदक्शानची लो. सं. साडेबारा लाख आहे. मुख्य पाळीव जनावरें म्हटलीं म्हणजे याक, शेळया, गाई, बकरीं, तट्टें, छानदार कुत्रीं व बॅक्ट्रियन उंट हीं होत. या देशांत ताजिक, तुर्क व अरब लोक राहतात. हे लोक फारसी व तुर्की भाषा बोलतात. धर्मानें हे सुनी आहेत. वदक्शान हा ग्रीक बॅक्ट्रियाचा भाग आहे. १२७२–७३ च्या पुढील काळांत येथें जे राजे झाले ते आपणांस शिकंदराचे वंशज असें म्हणवीत असत. १५५० च्या सुमारास उझबेग लोकांनीं या देशाचा ताबा मिळविला, परंतु त्यांना लवकरच हांकून लावण्यांत आलें. १८ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास मीर लोकांच्या सध्यांच्या घराण्यानें या देशाचा ताबा मिळविला. १८६७ सालीं अब्दुर रहमाननें मीर जहांदरशहाला हाकून देऊन त्याच्या जागीं मीर महंमदशहाला बसविलें व त्याच्यामागून त्याच्या घराण्यांतील दुसरे लोक गादीवर बसले.

**वंदर-व्यापार**—एकाच देशांतील बंदराबंदरांचा जो व्यापार चालतो तो. वास्तविक असा व्यापार परकीय लोकांना करूं देत नाहींत. ग्रेट-ब्रिटनमध्येंहि १८५४ पूर्वी असेंच असे. पण त्या सालापासून खुला व्यापार सुरू झाला. परकीय जहाजेंहि बंदरव्यापार करूं लागलीं. बंदरव्यापार करणाऱ्या जहाजांवर बरेच निर्बंध घातलेले असतात. १९३९–४० सालीं हिंदुस्थानचा बंदरव्यापार ७३,८९,९१,००० रुपयांचा होता.

**बंदरें**—गलबतांना ज्या ज्या ठिकाणीं वादळाच्या वेळींहि सुरक्षित राहतां येतें असा पाण्याचा भाग. कांहीं बंदरें स्वाभाविक तऱ्हेनेंच बनलेलीं असतात. लहान खाडी, नदीमुख व किनाऱ्यावरील खोल खांच हीं स्वाभाविक बंदरें होतात. सिडने आणि कॉर्क हीं स्वाभाविक बंदरें सर्वोत्कृष्ट म्हणून ठरलीं आहेत. न्यूयॉर्कला जाण्याची वाट देखील चांगलें स्वाभाविक बंदर म्हणतां येईल. मिलफोर्ड व पोर्ट्समाउथ हींहि अशींच आहेत. कृत्रिम बंदरें पाण्याला बांध घालून करतात. डोव्हर, साउदॅम्टन, ब्युएनोस आयरीज, वगैरे कृत्रिम बंदरें होत. मोठालीं जहाजें ठेवण्यासाठीं कृत्रिम बंदरें सुधारलेल्या नाविक राष्ट्रांना सज्ज ठेवावीं लागतात. गोद्या, माल काढण्या-ठेवण्याचीं यंत्रें, वगैरे सोयी मोठाल्या बंदरांतून असतात. लंडन, लिव्हरपूल, मुंबई, वगैरे मोठाल्या बंदरांची व्यवस्था पाहण्यासाठीं निराळेंच पोर्टट्रस्ट खातें असतें. हिंदुस्थानांत मुंबई, कराची व कोचीन हीं स्वाभाविक बंदरें आहेत. मद्रास व विजगापट्टण हीं कृत्रिम बंदरें आहेत. कलकत्ता चांगलें मोठें बंदर आहे, पण त्याची वाट अवघड आहे.

**बदलापूर**—मुंबई, ठाणें जिल्हा, कल्याण तालुक्यांतील एक गांव. हें नेरळ आणि कल्याण यांदरम्यान जी. आय्. पी. रेल्वेचें स्टेशन आहे. स्टेशनपासून गांव दोन मैल आहे. स्टेशनाजवळ 'उल्हास' नदी अडवून एक धरण बांधलें आहे. गांवांत मुसलमान लांकूड-व्यापाऱ्यांचीं बरींच घरें आहेत. गांवाची सविस्तर अर्थशास्त्रीय आणि सामाजिक माहिती 'आमचा गांव–बदलापूर' या ग्रंथांत गांवचे रहिवासी विद्वद्वर्य श्री. ना. गो. चापेकर यांनीं दिलेली आहे. वसईच्या मोहिमेंत चिमाजी अप्पाची येथें छावणी होती.

**बंदा** (मृत्यु १७१६)—शीखांचा एक धर्मयोद्धा. शीख धर्मगुरु गोविंदसिंग याच्या मृत्यूनंतर त्याचा हा तोतया सुमारें दोन वर्षांनीं लोकांपुढें आला. गुरु गोविंदसिंग हा जंबियाच्या वारानें मृत्युमुखीं पडला व मरतांना-"आपण परत लवकरच जिवंत होऊन शीखांचें राज्य परत स्थापन करणार आहोंत" असें त्यानें सांगितल्याचें हा सांगे. त्या गोविंदसिंगाच्या उद्गाराप्रमाणें "मी तुमचा गुरु गोविंदसिंग आतां तुमच्यापुढें उभा

आहे तरी आतां तुम्हीं स्वातंत्र्यप्राप्तीच्या कार्यांत मला साहाय्य करून परलोकीं मुक्ति मिळवावी," अशा तऱ्हेचें एक आज्ञापत्रक यानें शीखांना उद्देशून काढलें व त्याप्रमाणें दिल्लीपासून जवळच असलेल्या खरखोडा गांवीं याच्या नेतृत्वाखालीं सुमारें चाळीस हजार शीखांची एक सेना तयार झाली. या सेनेनें सरहिंद प्रांतावर स्वारी करून तेथील सरदार वझीरखान यास ठार केलें व तो प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. शीखांनीं या वेळीं केलेल्या अत्याचारांस गांजून तेथील बऱ्याच मुसलमानांनीं शीख धर्माची दीक्षा घेतली, असें म्हणतात. पुढें यानें मुखसिलपूर येथें लोहगड नांवाचा एक किल्ला बांधून तेथें स्वतःस राज्याभिषेक करवून घेतला व 'सच्चा पातशहा' हें नांव धारण केलें. पुढें सन १७१६ मध्यें अबदुस्सपदखानानें याला पकडून, "मुसलमान झाल्यासच जीवदान मिळेल" असें बजावलें. पण धर्मान्तरास यानें स्पष्ट नकार दिल्यानें अबदुस्सपदखानानें याचा अतिशय अमानुष रीतीनें वध केला.

**बदाऊन**—संयुक्तप्रांत, रोहिलखंड विभागाचा एक जिल्हा. क्षे. फ. १९९४ चौरस मैल. सोत किंवा यार-इ-वफादार, महाव, रामगंगा व गंगा या मुख्य नद्या आहेत.

दहाव्या शतकाच्या आरंभीं बुद्ध नांवाच्या अहर राजानें एक गांव वसविलें. त्यावरून या जिल्ह्याला बदाऊन असें नांव पडलें. मुसलमानी सैन्यानें हिंदुस्थानांत पूर्वेकडे जाण्यास सुरुवात केली त्या वेळेस येथें लखणपाल नांवाचा राठोड राजा राज्य करीत होता. कुतुबुद्दिन ऐबकनें सय्यद सालर राजाला मारून शहर लुटलें. १७७४ सालीं बुंदेलखंडाच्या इतर भागांबरोबर बदाऊन जिल्हा अयोध्येच्या नबाबाच्या हातीं गेला व अखेर १८०१ सालीं इतर प्रदेशाबरोबर तो इंग्रजांना देण्यांत आला. लो. सं. (१९४१) ११,६२,२२२. पैकीं शें. ८२ हिंदू आहेत. हिंदूंमध्यें मुख्य जात अहर ही आहे. शें. ६७ पेक्षां जास्त लोक शेतकीवर पोट भरतात. साखर करणें हा मुख्य धंदा असून कापड विणणें, सुतारकाम व पितळी काम हे दुय्यम धंदे आहेत. बदाऊन व उझानी हीं मोठीं गांवें व खेडीं ३८० आहेत. गहूं, ज्वारी, भात हीं पिकें येथें होतात.

जिल्ह्याचें व तालुक्याचें ठाणें बदाऊन गांव मोंगल व पठाण बादशहांच्या अमदानींत नांवारूपास आलें व कांहीं वेळ स्वतंत्र संस्थान म्हणून देखील होतें. १८३८ सालीं ब्रिटिशांच्या कारकीर्दीत हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण झालें. येथें इ. स. १२२३ मध्यें सुलतान शमसुद्दीन अल्तमश यानें बांधलेली मशीद आहे. तिला येथील देवळाचें बरेंच सामान लावलें आहे. येथें मोंगलाच्या वेळचे असंख्य दर्गे असून त्यांत सुलतान अल्लाउद्दीन व त्याची पत्नी यांच्या कबरी आहेत. तसेंच अकबराच्या नवरत्नांतील प्रसिद्ध कवि अबुलफजल याचा प्रतिस्पर्धी जो बदाऊनी (पाहा) त्याची ही जन्मभूमि आहे.

**बदाऊनी** (१५४०-१६१५)—अकबरकालीन एक फारसी पंडित. मुल्ला अबदुल कादिर बदाऊनी हा दिल्लीनजीक बदाऊन येथें जन्मला. गायन, ज्योतिष व इतिहास ह्या विषयांचा त्यास मोठा नाद असे. त्यानें संस्कृत शिकून अकबराच्या हुकुमानें पण नाखुशीनें समग्र रामायणाचें व महाभारताच्या दोन पर्वांचें फारसींत भाषांतर केलें. त्यानें मुन्तकबउत-तवारिख (अकबराच्या कारकीर्दीचा इतिहास) लिहिला. ह्याचें इंग्रजींत भाषांतर झालें आहे. मूजामउलबुल्दन, जामीउररशदी, नजातउरशीद व काश्मीरचा इतिहास हीं पुस्तकें त्यानें लिहिलीं. बदाऊनी कडवा मुसलमान असून विद्वान, बुद्धिमान् व स्पष्टवक्ता होता.

**बदाम**—[जाति-आमिग्डॅलस कॉम्यूनिस]. या झाडाचें मूलस्थान आफ्रिका व आशिया खंड होय. साधारण उंचीचें हें

झाड असून काश्मीर व पंजाब यामध्यें याची कधीं कधीं लागवड करतात. इंग्लंडमध्यें शोभेसाठीं हीं झाडें लावतात. फळ लांबट गोल असतें. बदामाच्या कडू व गोड अशा दोन जाती आहेत. बदामापासून एक तऱ्हेचा डिंक निघतो. बदामापासून (फळापासून) अर्क व न उडणारें तेल काढतात. हें तेल स्वच्छ व पिवळसर असून त्याला चांगली रुचि असते. कडू बदामापासून अर्क काढतात व त्याला 'कडू बदामाचें तेल' म्हणतात. बदामाचा औषधाकडे उपयोग बऱ्याच शतकापासून करतात. गोड बदामाचें बी भोजनोत्तर विड्यांत, उपाहारांत व मेवामिठाईत बरेंच उपयोगांत आणतात. बदामाचें तेल डोक्यास चोळल्यास मगज थंड होतो व डोकें दुखणें व इतर रोग बरे होतात. सालीचें दांतवण करतात. पूर्वी कडवे बदाम कांहीं ठिकाणीं हलकें चलन म्हणून वापरीत.

**बदामी**—मुंबई इलाखा, विजापूर जिल्ह्याचा नैर्ऋत्येकडील तालुका. क्षे. फ. ६१५ चौ. मैल. लो. सं. १,२८,०६४. तालुक्याचें मुख्य ठिकाण बदामी हें सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन आहे. लो. सं. (१९४१) ५,४०३. येथें एक कापडाची गिरणी आहे. हिंदू व जैन लोकांनीं तयार केलेलीं लेणीं येथें आहेत. त्यांतील शिल्प विशेष प्रकारचें व अभ्यसनीय आहे. येथें दोन किल्ले आहेत. चालुक्यांची राजधानी सहाव्या शतकांत येथें होती. बदामीचीं लेणीं या वेळचीं दिसतात. पुष्कळ वर्षे हें गांव विजयानगरच्या व नंतर मराठ्यांच्या राज्यांत होतें. स. १८१८ त तें इंग्रजांच्या हातांत आलें.

**बंदूक**—दारूच्या साहाय्यानें गोळ्या उडविण्याचें हत्यार. बंदुकीचा आकार प्रथम एका सरळ नळीसारखा असून ती नळी एका सरळ लांकडावर बसविलेली असे. तिच्या कान्यास बत्ती लावून दारू पेटविण्यांत येत असे व याप्रमाणें ती उडविण्यांत येत असे. हिच्याच स्वरूपांत थोडा फरक होऊन तोड्याची बंदूक प्रचारांत आली. ही पेटलेल्या तोड्याच्या साहाय्यानें शिलगावण्यांत येत असे. यानंतर गारेच्या चापाची बंदूक प्रचारांत आली. या बंदुकीमध्यें चापाच्या तोंडाशीं गारेचा तुकडा बसविलेला असे व कान्याजवळ पोलादाचा तुकडा बसविलेला असे. त्यावर चापाच्या घोड्याचा आघात झाला म्हणजे ठिणगी उडून कान्यांतील दारू पेट घेत असे व नंतर बंदूक उडत असे. यानंतर केपाची बंदूक प्रचारांत आली. या बंदुकीमध्यें कान्यावर एक आघातानें पेटणारी टोपी (केप) बसविण्यांत येत असे व त्या टोपीवर घोड्याचा आघात होतांच ती पेटत असे व याप्रमाणें दारू पेट घेऊन बंदूक उडत असे. या सर्व प्रकारच्या बंदुकींत दारू व गोळी तोंडाकडून भरावी लागत असे. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यकालीं दाबानें पेटणाऱ्या नत्रयुक्त पदार्थांचा शोध लागल्यापासून मोड-बंदुका प्रचारांत आल्या. या बंदुका हाताजवळ मोडून नळीच्या मागच्या बाजूनें त्यांत काडतूस भरतां येतें. पहिल्याप्रथम काडतुसास मागें एक टांचणी असे. तीवर घोड्याचा दाब पडला म्हणजे काडतूस उडत असे. आतां या मोड-बंदुकांत भरावयाच्या काडतुसांतच केप घातलेलें असतें. त्यावर घोड्याचा दाब पडल्याबरोबर तें उडतें. आतां फक्त घोडा बाहेर दिसतो; बाकी सर्व व्यवस्था बंदुकीच्या आंत असते. घोडा भलत्याच वेळीं दाबला जाऊन बंदूक उडूं नये म्हणून एक संरक्षक योजना केलेली असते.

**बंदूक मारणें**—(मस्केट्री). बंदूक व त्यासारखीं लहान हत्यारें चाळगणें, त्यांची निगा राखणें, त्यांच्या रचनेची माहिती करून घेणें व त्यांचे उपयोग समजावून घेणें, इत्यादि प्रकारचें जें शिक्षण देण्यांत येतें त्या सर्वांचा अंतर्भाव या विषयांत करण्यांत येतो. या शिक्षणाचें ध्येय सैनिकास लहान लहान हत्यारें वापरण्याच्या कामीं वाकबगार करणें हें असतें. त्यास ह्या हत्यारांचा उपयोग व शक्ति यांची कल्पना देऊन त्यांच्याबद्दलचें निश्चित ज्ञान देण्यांत येतें. तसेंच अधिकाऱ्यांस, आपल्या हाताखालील लोकांकडून या हत्याराचा मारा कसा करवावा हें शिकविण्यांत येतें. हें शिकवीत असतां त्यांस या लहान हत्याराचा उपयोग एकंदर युद्धामध्यें इतर हत्यारांच्या सान्निध्यांत व सहकार्यानें कसा करावा यासंबंधींहि माहिती देण्यांत येते व त्याकरितां सैन्यचलनाचेंहि शिक्षण त्याबरोबरच सैनिकांस व अधिकाऱ्यांस देण्यांत येतें.

या शिक्षणाचे दोन स्वतंत्र भाग करण्यांत येतात. पहिल्या भागांत शिकाऊ सैनिकांचा (रिक्रूट-रंगरूट) समावेश होतो व दुसऱ्या भागांत शिक्षित सैनिकांचा समावेश होतो. शिकाऊ सैनिकाचा शिक्षणक्रम प्राथमिक स्वरूपाचा असतो व त्यांत त्यास बंदूक कशी वापरावी, तिची रचना कशी असते, तिच्या भागांचीं नांवें, ठेवण, वगैरेची माहिती देण्यांत येते. नंतर बंदुकीची काळजी कशी घ्यावी हें शिकविण्यात येतें. नंतर त्यास बंदूक कशी उडवावी हें समजून सांगण्यांत येतें व गोळीशिवायच नेम कसा धरावा व बंदूक कशी उडवावी हें दाखविण्यात येतें. याच वेळीं त्यास दूरच्या वस्तू कशा पाहाव्या, त्या कशा ओळखाव्या व त्यांचें अंतर कसें ठरवावें, हें शिकविण्यांत येतें. यानंतर लहान बंदुकीनें जवळच्या लक्ष्यावर वेध कसा करावा हें शिकविल्यानंतर त्यास बाहेरच्या खुल्या लक्ष्यावर वेध घेण्याचें शिक्षण देण्यांत येतें व येथें तो युद्धांतील गोळ्यांनीं १०० ते ६०० यार्डांवरील लक्ष्याचा वेध करावयास शिकतो.

सामान्यतः प्रत्येक शिकाऊ सैनिकास २०० गोळ्या शिकण्याकरितां उडविण्यास देण्यांत येतात. परंतु तेवढ्यांत त्यास पक्कें शिक्षण मिळेल अशी काळजी घेण्यांत येते व अवश्य तर अधिक गोळ्या देण्यांत येतात. या कामीं वापरण्यांत येणारें लक्ष्य (टार्जेट) ४ फूट चौरस असून त्यांत केन्द्रलक्ष्य ८ इंच असतें व पांढऱ्या पृष्ठभागावर काळ्या रंगाचें असतें. यानंतर अधिकाधिक अस्पष्ट लक्ष्यावर वेध करण्यास सांगण्यांत येतें. या शिक्षणाचे सहा विभाग पाडण्यांत येतात. त्यांपैकीं पहिल्या चार विभागांमध्यें शिक्षण देण्यांत येतें व अखेरच्या दोहोंमध्यें वैयक्तिक अथवा सांघिक लक्ष्यवेध करण्यास सांगतात. शिक्षणक्रमांतील कांहीं फेऱ्यांत त्याच्या चुका दाखविण्यात येतात. याकरितां सर्व गोळ्या एकाच ठिकाणावरून नेम धरून एकाच अंतरावरील लक्ष्यावर मारण्यांत येतात व सर्व गोळ्या संपल्यावर त्याचा निकाल सांगण्यांत येतो. नंतर प्रत्येक गोळीनंतर

बनारस — घाट (पृ. १६३८)

बेलूर — चन्नकेशव-मंदिर (पृ. १७४७)

बल्गेरिया — सोफिया येथील मशीद (पृ. १६५१)

त्यास तिचा निकाल कळतो व त्यावरून त्यास आपल्या नेम धरण्यामध्यें किंवा बंदूक उडविण्यामध्यें बदल करतां येतो. बंदूक मारतांना सामान्यतः पालथें पडून ती उडविण्यांत येते; पण कांहीं वेळां ढोंपरें टेंकून आसऱ्याआडून बंदूक उडविण्यांत येते. याप्रमाणें लक्ष्यावरून पुढें युद्धांत बंदूक कशी उडवावी लागेल याची त्यास कल्पना येते. हा शिक्षणक्रम पुरा झाल्यावर शिकाऊ सैनिक शिक्षित होतो व त्यानंतर त्यास दरवर्षी अधिक तपशीलवार व विविध प्रकारचें शिक्षण देण्यात येतें. व त्यास सांधिक युद्धामध्यें काय करावयाचें असतें याचीहि कल्पना देण्यांत येते.

**बंदुकीचा परवाना**—इंग्लंडांत असा कायदा आहे कीं, बंदुकीचा परवाना असल्याशिवाय कोणाहि इसमानें बंदूक वापरतां कामा नये, किंवा बंदूक (रायफल, पिस्तूल व एअर-गन) घेऊन हिंडतां कामा नये, आणि सरकारी अधिकारी मागेल त्या वेळीं तो परवाना दाखवला पाहिजे. मात्र या कायद्याचे निर्बंध पुढील इसमांना लागू नाहींत—(१) लष्कर, आरमार, टेरिटोरियल फौज यांतील नोकर, किंवा प्रत्यक्ष कामावर असलेला पोलिस; (२) बंदुकी तयार करणारे (गनस्मिथ); (३) वाहनें चालवणारे (कॉमन कॅरियर्स); (४) शिकारीचा परवानावाले; (५) शेतजमिनी करणारे व पक्ष्यांचा व किड्यांचा उपद्रव न व्हावा म्हणून बंदूक वापरणारे इसम; (६) बंदुकीचा परवाना असणाऱ्या इसमाची बंदूक नेणारे. शिवाय घरांतल्या घरांत व घराच्या आवारांत बंदूक वापरणाराला परवाना-लायसेन्स लागत नाहीं. या कायद्यांतील अपराधाला कमाल दंड १० पौंड आहे.

हिंदुस्थानांत पूर्वी शस्त्रबंदीचा कायदा मुळींच नव्हता. ब्रिटिश अमदानींत इंडियन आर्म्स ॲक्ट (१८७८) लागू होऊन परवान्यावांचून बंदुका व इतर सर्व प्रकारच्या लढाऊ हत्यारांना बंदी करण्यांत आली. शस्त्र याची व्याख्या अग्न्यस्त्रें, बायोनेट, तलवार, खंजीर, भाले, धनुष्यबाण, तोफा, यांत्रिक तोफा, इत्यादि. या कायद्याला जोडून नियम केले आहेत व तदनुसार हत्यारें वापरणें, विकणें, वगैरेंचा परवाना (लायसेन्स) देण्यात येतो.

**बद्धकोष्ठता**—जेव्हां शरीरांतील आंतडीं मंद होतात तेव्हां मलविसर्जन बरोबर न झाल्यामुळें मलावष्टंभ उत्पन्न होतो. याचीं मुख्य कारणें : चलनवलन न करतां स्वस्थ बसून राहणें, शरीरप्रकृतीचे कांहीं विशेष, किंवा रक्ताशय, पोट, यकृत्, आंतडीं, वगैरेंचे कांहीं विकार, अथवा कांहीं अपायकारक औषधें घेणें, हीं होत. याचीं सामान्य लक्षणें म्हणजे अशक्तता वाटणें, ग्लानि येणें, मानसिक क्षीणता वाटणें, अरुचि उत्पन्न होणें, डोकें दुखणें, जीभ पांढरी होणें, व त्वचा मळकट होणें, हीं होत. यावर उपचार करतांना पुढील गोष्टी ध्यानांत ठेवाव्या : नियमित राहणी, व्यायाम, पोट चोळून घेणें, हलकें अन्न खाणें, फळें व भाजीपाला अधिक खाणें, वगैरे. उष्ण आणि थंड पाणी वरचेवर पिणें व अवश्य तर एखादें मृदु सारक औषध घेणें, हे उपचार सहज करण्यासारखे आहेत.

**बद्रिनाथ**—संयुक्त प्रांत, गढवाल जिल्ह्यामधील मध्य हिमालयाचें शिखर व देवस्थान. उंची २३,२१० फूट. येथें भीषणगंगा नदीचा उगम होतो. श्रीनगरपासून मानाघाटाच्या रस्त्यावरील डोंगरांत बद्रिनाथाचें देऊळ आहे. मूळचें देवालय श्रीशंकराचार्यांनीं बांधिलें असें म्हणतात. बर्फाच्या आघातानें कित्येक वेळां हें देऊळ मोडून जातें. हल्लींचें देऊळ बरेंच अर्वाचीन आहे. देवळाखालीं डोंगरांत तळें आहे, त्यांत ऊन पाण्याच्या झऱ्याचें पाणी असतें. या पवित्र ठिकाणीं पुष्कळ लोक स्नान करतात. मुख्य पुजारी नंबुद्री ब्राह्मण असतात. पुजाऱ्याला रावळ (राजकुलाचा अपभ्रंश) म्हणतात. हे ब्रह्मचारी असतात. एक पुजारी वारला तर दुसरा त्रावणकोरहून आणतात. या देवालयाचें वार्षिक उत्पन्न दहा-बारा हजार रु.वर आहे. देवस्थानची व्यवस्था टेहरीच्या राजाकडून होत असते; कारण देवस्थानास त्या संस्थानाकडून बारा गांवें इनाम आहेत.

येथील नारायणाची मूर्ति दोन फूट उंचीची व योगासनारूढ आहे. हिला वैष्णवांप्रमाणेंच शैव, जैन, बौद्ध, गाणपत्य, वगैरे भक्त भजतात. देवळांत नर आणि नारायण या दोन ऋषींच्याहि मूर्ती आहेत. बर्फ पडतें त्या वेळीं जोगीमठांत नारायणाची उत्सवमूर्ति असते त्याची पूजा होते.

**बंधारे**—पाणी अडवून ठेवून पाण्याचा सांठा करण्याकरितां, जमिनीला पाणीपुरवठा करण्याकरितां, पाण्याची खोली वाढवून त्यांतून होड्या वगैरे चालविण्याकरितां, किंवा प्रवाहाचा वेग कमी करण्याकरितां, एखाद्या नदीच्या किंवा ओढ्याच्या पात्रामध्यें मातीचा अथवा बांधकाम करून जो मोठा आडवा बांध घालण्यांत येतो त्यास म्हणतात. या बंधाऱ्याची माथ्यावरील रुंदी उंचीच्या एक-दशांशापासून एक-अष्टमांशापर्यंत ठेवण्यांत येते. तसेंच, पाण्याच्या बाजूस या धक्क्याचा उतार किंवा तिरपेपणा दहास एक (१० : १) या प्रमाणात असतो. बाहेरच्या बाजूचा उतार पायाच्या आकाराच्या मानानें कमी-अधिक नागमोडी करण्यांत येतो. याचा पाया सरळ रेषेच्या आकृतीचा किंवा सपाट माथ्याच्या कमानीसारखा असतो व तिचा फुगीर भाग पाण्याच्या बाजूला असतो. नाइल नदीवर बांधलेला आस्वान येथील बंधारा सव्वा मैल लांब असून ११२ फूट उंच आहे व त्यानें तयार झालेला तलाव भरला म्हणजे पाणी १३० मैल लांब पसरते. (बांध-बंधारे पाहा).

**जगांतील कांहीं मोठे बंधारे**

| नांव | पाण्याच्या सांठ्याचें प्रमाण (बिलियन-महापद्म गॅलन) | उंची (फूट) | खर्च (सहस्र डॉलर) |
|---|---|---|---|
| १ बोल्डर (अमे. सं. संस्थानें) | ९,९३८ | ७२७ | १,२८,००० |
| २ फोर्ट पेक (अमे. सं. सं.) | ६,३५४ | २४२ | ८६,००० |
| ३ ग्रँड कूली (अमे. सं. सं.) | ३,१४२ | ५५० | १,८६,००० |
| ४ गाटुन (अमे. सं. सं.) | १,४३७ | ११५ | ९,८२३ |
| ५ आस्वान (ईजिप्त) | १,३२२ | १४७ | २९,००० |
| ६ नॉरिस. (अमे. सं. सं.) | १,१०७ | २६५ | ३६,६०४ |
| ७ एलेफंट बट्ट (अमे. सं. सं.) | ८६० | ३०६ | ४,१४९ |
| ८ सालुडा (अमे. सं. सं.) | ७४९ | २०८ | ६,००० |
| ९ ओसाज (अमे. सं. सं.) | ७४९ | १४८ | ३०,००० |
| १० मेट्टूर (हिंदुस्थान) | ७०० | २३९ | |

**वनजिग**—दक्षिण हिंदुस्थानांतील एक जात. यांची लोकसंख्या सुमारें दीड लाख आहे, व ती बहुतेक म्हैसूर संस्थानांतच आहे. हे शेतकी व मजुरी करून उदरनिर्वाह करतात. यांच्यांत बऱ्याचशा पोटजाती आहेत व या पोटजातींत देखील रोटी-बेटीव्यवहार नाहीं. या जातींपैकीं बाळगार (कासार) म्हणून एक जात आहे. तींत मांसभक्षण अगर सुरापान करीत नाहींत. हे लोक शैव अगर वैष्णव असून ते यज्ञोपवीत धारण करीत नाहींत; अगर त्यांना वैदिक संस्कार मान्य नाहींत. विधवा-विवाहास परवानगी नाहीं. हे लोक प्रेतें पुरतात. वैष्णव ब्राह्मणाच्या गुरूस हे लोक आपला गुरु मानितात.

**वनारस**—संयुक्तप्रांत, बनारस विभाग, एक जिल्हा. क्षे.फ. १,०९४ व लो. सं. १२,१८,६२९. यांतून गंगा, गोमती, वर्णा व नंदा या नद्या वाहतात. त्यामुळें जमीन बहुतेक पुळणाची आहे. जंगल फार थोडें आहे. पाऊस सरासरी ४० इंच पडतो.

कनोजच्या राजांकडून हा मुलूख मुसलमानी घोरी घराण्याकडे गेला. १५ व्या शतकापासून हा जोनपूर विभागांत मोडूं लागला. अयोध्येच्या नबाबाकडे हा आल्यानंतर त्यानें मनसाराम या आपल्या गुमास्त्यास दिला. या मनसारामाचे वंशज आज बनारस संस्थानचे राजे आहेत.

जिल्ह्यांत पुराणवास्तू अनेक आहेत. त्यांपैकीं सारनाथ प्रसिद्ध आहे. काशी तर प्रख्यातच आहे.

वनारस शहर—काशी पाहा.

**वनारस संस्थान**—संयुक्तप्रांत. यांत तीन जिल्हे असून क्षेत्रफळ ८७५ चौरस मैल आहे. लोकसंख्या ४,५१,४२८ आहे. वार्षिक उत्पन्न चौतीस लक्ष रु. आहे. राजघराण्याचा मूळ पुरुष मनसाराम भुइनहार हा अयोध्येच्या नबाबाच्या हाताखालीं नोकर होता. त्याचा मुलगा बलवंतसिंग गंगापूरचा जमीनदार झाला; व त्याला राजा हा किताब मिळाला (१७५४). नंतर सुजाउद्दौला गादीवर आल्यावर त्याला अर्धा वसूल जहागीर म्हणून मिळाला. १७९४ सालीं ई. इं. कंपनी सरकारनें १ लाखाचें वार्षिक उत्पन्न राजास कबूल केलें. हल्लीं राजाला इतर संस्थानिकांप्रमाणें बहुतेक हक्क आहेत. आजचे महाराज विभूति नारायणसिंग हे १९३९ सालीं गादीवर आले. हें संस्थान १९४० सालीं संयुक्तप्रांतांत विलीन झालें.

संस्थानांत दुय्यम शिक्षणहि मोफत आहे. रामनगर येथें चांगलें नवीन इस्पितळ नुकतें बांधलें आहे. संस्थानांत कालवे असल्यानें सुबत्ता असते. कांच आणि सतरंज्या यांचे कारखाने मोठे आहेत. बनारस (काशी) व रामनगर हीं मोठीं ठिकाणें आहेत.

**वनारसीदास** (जन्म सन १५८६)—एक हिंदी कवि. हा जौनपूर येथील राहणारा. यानें आपलें तारुण्य दुर्वर्तनांत घालविलें. पण आयुष्याच्या उत्तरकाळांत हा सुधारला. 'बनारसी-विलास', 'नाटक-समयसार', 'मोक्षपदी', 'ध्रुव-वंदना', 'मारगन-विद्या', वगैरे ग्रंथ यानें लिहिले असून या ग्रंथांतील याची रचनाशैली वाखाणण्याजोगी आहे.

**वनास**—राजपुतान्यांतील एक नदी. लांबी ३०० मैल. ही नदी उदेपूर संस्थानांत अरवली डोंगरांत उगम पावून, ईशान्येकडे उदेपूर, जयपूर, बुंदी, टोंक, करोली, अजमीर, वगैरे प्रदेशांतून वाहत जाऊन रामेश्वराजवळ चंबळा नदीला मिळते. बरोच, कोठारी, खारी, डेन, माशी, धिल व मोरेल या बनासला मिळणाऱ्या नद्या होत. हिच्या काठीं बिलासपूर व राजमहाल हीं शहरें आहेत.

**वनियन, जॉन** (१६२८-१६८८)— एक इंग्रज धर्मविषयक लेखक. पहिल्या चार्लस राजाच्या कारकीर्दींत त्यानें यादवी युद्धांत सैनिक होऊन भाग घेतला. नंतर त्याला धर्माचें सत्यत्व व महत्त्व पटून बेडफर्ड येथील ॲनाबाप्टिस्ट

सोसायटींत सामील झाला. प्रचलित धर्मविरोधी लोकांविरुद्ध (डिसेन्टर्स) जे कायदे झाले ते मोडल्यामुळें बनियनला बारा वर्षे (१६६०–१६७२) कैदेंत ठेवण्यांत आलें होतें. या कैद-काळांत त्यानें 'प्रॉफिटेबल मेडिटेशन्स' (उपयुक्त चिंतन), 'दि होली सिटी', 'ग्रेस अबाउंडिंग टु दि चीफ ऑफ सिनर्स' (महान् पाप्यावर दयेचा पूर), इ. ग्रंथ लिहिले. १६७५ सालीं त्याला 'कॉन्व्हेंटिकल ॲक्ट' प्रमाणें झालेल्या गुन्ह्याबद्दल पुन्हां तुरुंगांत ठेवण्यांत आलें. या कैदखान्यांत त्यानें आपलें सर्वोत्कृष्ट पुस्तक 'पिल्ग्रिम्स प्रोग्रेस' हें लिहिलें. १९०९ सालपर्यंत या पुस्तकाचीं निरनिराळ्या ११२ भाषांत भाषांतरें झालीं. मराठींत 'यात्राक्रमण' हें याचें भाषांतर झालेलें आहे. 'दि लाइफ ॲंड डेथ ऑफ मिस्टर बॅडमन' (१६८०) आणि 'दि होली वॉर' (१६८२) हे याचे इतर ग्रंथ आहेत.

**बनेटी**—बोथाटी व्यायामाचा एक प्रकार. मूळ हिंदी शब्द 'बनेटी' आहे. भाला नीट वापरतां येण्यास मनगट, कोंपर, खांदा, वगैरे ठिकाणचे स्नायू मजबूत, चिवट व वाटेल तसे वळवितां येण्यासारखे लवचिक असावे लागतात. या हेतूनें बनेटीच्या मेहनतीचा प्रकार बसविण्यांत आला असावा. मराठेशाहींत घोड्यावर बसून भाल्याचा उपयोग लढाईच्या कामीं करण्याचा फार रिवाज होता. भाला नीट व सफाईनें वापरतां यावा म्हणून बोथाटीचा खेळ महाराष्ट्रांत सुरू करण्यांत आला. नेहमीं सरावासाठीं भाल्याचें द्वंद्वयुद्ध करताना खेळणारास इजा होऊं नये म्हणून भाल्याच्या बांसास अणकुचीदार पोलादी टोंकाऐवजीं कापडी चेंडू बसविण्याचा प्रचार सुरू झाला. या बोथट भाल्यास बोथाटी असें नांव पडलें. या बोथाटीच्या खेळास बनेटीच्या मेहनतीनें मदत होईल असें वाटल्यानें बनेटीच्या मेहनतीचा महाराष्ट्रांत फार प्रसार झाला. बनेटीस पुष्कळ लोक बोथाटी म्हणूं लागले.

बनेटी फिरविणाऱ्याच्या खांद्याइतकी उंच व अर्धा इंच जाडीची बांबूची अगर वेताची काठी घ्यावी. या काठीच्या दोन्ही टोंकांस एक इंच लांबीच्या तारेच्या चुका, काठीच्या बाहेर दोन्ही अंगांस चुकांचा सारखा भाग राहील अशा रीतीनें माराव्या. नंतर टोंकाच्याभोंवतीं चिंध्या गुंडाळून चेंडूचा आकार करावा व त्या चेंडूवर रंगीत बनात शिवून घ्यावी. वरप्रमाणें चुका मारून त्यांच्याभोंवतीं चिंध्या गुंडाळून चेंडू केल्यामुळें ते चेंडू बनेटी फिरवितांना पडत नाहींत. अशा प्रकारें दोन्ही टोंकांस चेंडू असलेल्या काठीस बनेटी म्हणतात. याचे बरेच प्रकार आहेत. (व्या. ज्ञा.)

**बन्नू**—पाकिस्तान, वायव्यसरहद्द प्रांत, एक जिल्हा. क्षेत्रफळ १६९५ चौरस मैल, लोकसंख्या २,९५,९३०. पैकीं शेंकडा ९० मुसलमान आहेत. येथें पुष्कळ वर्षांपासून अफगाण लोकांची वस्ती आहे. मुसलमानांच्या स्वारीपर्यंत येथें हिंदू लोक राहत असत. पण गझनीच्या महंमदानें हिंदूंचा नायनाट करून टाकला. रणजितसिंगानें हा प्रदेश जिंकला, तो पुढें पहिल्या शीख युद्धानंतर इंग्रजांच्या सत्तेखालीं आला. इंग्रजांनीं येथील किल्ले जमीनदोस्त करून शांतता प्रस्थापित केली. येथील मुख्य धंदा शेती असून गहूं, हरभरा, मका व बाजरी हीं मुख्य पिकें आहेत. बन्नू हें मुख्य ठिकाण कुरम नदीच्या दक्षिणेस एक मैलावर आहे. लोकसंख्या सु. वीस हजार आहे. लाहोरच्या महाराजांच्या स्मरणार्थ येथील किल्ल्याला धुलीपगड म्हणतात. बन्नू खोऱ्यांत अक्राव येथें व दुसऱ्या कांहीं ठिकाणीं जुन्या भंगलेल्या मूर्ती, दागिने, विटा, कौलें, ग्रीक अक्षरें असलेलीं नाणीं, वगैरे प्राचीन अवशेष सांपडले आहेत.

**बफेलो**—हें अमेरिकन सं. संस्थानांतील न्यू यॉर्क संस्थानांत एरी सरोवराच्या पूर्व किनाऱ्यावर व बफेलो नदीच्या मुखाशीं वसलेलें शहर आहे. या शहरानें पूर्व भाग व पश्चिम भाग जोडलेला असल्यामुळें हें शहर धान्य, गुरें व इतर जिन्नस यांच्या व्यापाराचें मोठें केंद्र बनलें आहे. येथें कारखाने पुष्कळ व विविध प्रकारचे आहेत. लो. सं. ५,७५,९०१ आहे.

**बभ्रुवाहन**— अर्जुनाला चित्रांगदेपासून झालेला पुत्र. हा मणिपूरचा मोठा शूर राजा होता. अश्वमेधाच्या दिग्विजयार्थ मोहिमेंत याचा अर्जुनानें जाणूनबुजून अपमान केल्यानें यानें त्याच्याशीं लढून त्याला ठार केलें. पण आईनें पित्याला मारल्याबद्दल याची निर्भर्त्सना केली. तेव्हां यानेंच शेषाशीं लढून पाताळांतून संजीवनी मणि आणला व अर्जुनाला उठविलें. असा हा मोठा मातृ–पितृभक्त राजा होता. जैमिनि अश्वमेधांत याची रसाळ कथा आहे.

**बयाणा**—या शब्दाचा कायद्यांत असा अर्थ आहे कीं, सॉलिसिटर व पक्षकार किंवा पक्षकारातर्फे सॉलिसिटर आणि वकील यांच्यामध्यें कोर्टांतील खटला किंवा दावा वकिलानें चालविण्याबद्दल जो करार होतो तो. याबद्दलचें करारपत्र सॉलिसिटर वकिलाच्या ताब्यांत देतो. या शब्दाचा आपल्याकडे सामान्य अर्थ वकिलाला वकील-फीबद्दल आगाऊ दिलेली रक्कम असा आहे.

**बयाना**—राजपुतान्यांत भरतपूर संस्थानांतील बयाना तहशिलीचें मुख्य ठिकाण. याचें प्राचीन नांव श्रीपथा. येथील दोन देवळांवर संस्कृत लेख खोदलेले आहेत. आग्रा या लहान खेड्यांत भुयारें, मोठ्या इमारती व एक उंच किल्ला आहे. याची प्रसिद्धि पांढरी शुभ्र साखर व नीळ यांविषयीं होती. हें पूर्वीं प्रांताचें मुख्य ठिकाण होतें. येथील विजयगडचा प्रसिद्ध

किल्ला राजा विजयपाल यानें बांधला. किल्ल्यांत तांबडा दगडी स्तंभ (लाट) असून त्यावर विष्णुवर्धन नांवाच्या राजाचा इ. स. ३७२ चा खोदीव लेख आहे.

**बयावाई आपटे** (१८४७-१९१८)—दुसऱ्या बाजीराव पेशव्याच्या या मुलीचा जन्म ब्रह्मवर्तास झाला. १८५५ सालीं हिचें लग्न ग्वाल्हेरच्या सरदार बाबासाहेब आपट्यांचे चिरंजीव रावसाहेब आपटे यांच्याशीं झालें. सन १८८३ मध्यें बयाबाईस वैधव्यदशा आल्याने तिनें आपलें पुढील आयुष्य काशीस दुर्गाघाटावरील आपल्या वाड्यांत परमेश्वरभक्तींत घालवलें. या बाईंना इंदूर दरबारनें कांहीं नेमणूक करून दिली होती.

**बयावाई रामदासी**—एक मराठी संत-कवयित्री. हिची थोडी कविता प्रसिद्ध आहे, तीवरून रामदासाच्या चरित्रावर काहीं प्रकाश पडतो. रामदासावर बयाबाईची गुरुभक्ति अपरंपार होती. बयाबाईनें आर्या केल्या आहेत; त्यावरून शिवकालीन महाराष्ट्रातहि आर्या रचण्याची चाल होती व आर्यायमकाचा छंद मोरोपंताच्याहि पूर्वीपासून महाराष्ट्रांतील कवींमध्यें होता असें वाटतें. बयाबाईची हिंदी रचना मराठीपेक्षां जास्त ठसकेदार आहे असें काहीं टीकाकार म्हणतात.

**बरगडी**—मनुष्य व इतर सपृष्ठवंशीय प्राण्यामध्यें पृष्ठवंशापासून दोन्ही बाजूंस ज्या वक्राकार अस्थी निघतात व पुढील बाजूस वक्षास्थीस जोडलेल्या असतात (किंवा कधीं नसतात) त्यांस बरगड्या असें म्हणतात. अशा बरगड्यांच्या बारा जोड्या असतात. लाम्प्रे, लान्सेट, वगैरे जातीच्या लहान माशांना बरगड्या नसतात. तसेच बेडकासहि बरगड्या नसतात.

**बरद्वान**—१. बंगाल प्रांत, एक जमीनदारी. क्षेत्रफळ ४,१९४ चौरस मैल. बरद्वानचा राजा हिंदुस्थानांतील साऱ्या राजांपेक्षां जास्त धारा देतो. ही जमीनदारी १९ जिल्ह्यांत विभागली आहे. १६५८ सालीं अबुराई नांवाचा लाहोरचा एक कापूर खत्री येथें आला. तो बरद्वान राजघराण्याचा मुख्य पुरुष. १७४१ सालीं या घराण्यांतील चित्रसेन राय यास राजा ही पदवी मिळाली.

२. जिल्हा—क्षेत्रफळ २,७०५ चौरस मैल व लोकसंख्या १८,९०,७३२ असून शेंकडा ८० हिंदू आहेत. येथील जमीन सुपीक व बागायती आहे. यांतून दामोदर, द्वारकेश्वर, खरी, बाका आणि अजय या नद्या वाहतात. सरासरी पाऊस ५४ इंच पडतो. येथें दगडी कोळसा व लोखंड सापडतें. मातीची भांडीं, तांब्याचीं भांडीं, चाकू, सुऱ्या, रंग, वगैरेंचे कारखाने येथें आहेत.

शहर—हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बाका नदीवर आहे. लोकसंख्या ६२,९१०, येथें महादेवाचीं १०८ देवळें आहेत. कांचन येथें दरसाल मोठी जत्रा भरते. येथें उत्तम तऱ्हेची नवार होते. येथें चरीच हायस्कुलें व बरद्वान राजकॉलेज आहे.

**बरवा**—हा राग काफी थाटाचा जन्य राग आहे. याच्या आरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत, व अवरोह सात स्वरानीं होतो, म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी ऋषभ असून संवादी पंचम आहे. हा राग सार्वकालिक मानितात. हा क्षुद्रगीताई राग आहे. याची प्रकृति चंचल आहे. या रागांत दोन निषादांचा प्रयोग दृष्टीस पडतो. हा राग कांहीं घराण्यात दोन गांधार देऊनहि गाण्याचा प्रचार आहे; याचें स्वरूप देसी रागासारखें कांहींसें भासतें; परंतु या रागांतील धैवत तीव्र आहे. देसीमध्यें तो कोमल आहे; यामुळें रागभेद स्पष्ट होतो.

**बरवे, अनंत वामन** (१८५६-१९२३)—एक मराठी नाटककार व नाट्यकलाभ्यासी. यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंतच झालें. कांहीं दिवस शिक्षकाची नोकरी केल्यावर ते नवीनच निघालेल्या 'केसरी' कचेरींत मुद्रितें तपासण्याच्या कामावर होते. या ठिकाणीं त्यांना लेखनाची आवड लागली व राष्ट्रीय वळण मिळालें. १८८२ सालीं त्यांनीं 'राजहंस' मासिक काढलें. दोन वर्षांनीं तें बंद पडल्यावर पौराणिक, ऐतिहासिक व भाषांतरित अशीं सुमारें वीस नाटकें लिहिलीं. या नाटकांत नवीन कलेची चमक नसली तरी त्यांचा दर्जा साधारण वर लागेल इतका खास आहे. नंतर नाट्यकलेची उन्नति करण्यासाठीं एक साधन म्हणून त्यांनीं 'नाट्यकला' मासिक १९०४ सालीं काढलें; व १९०५ सालीं 'भरत नाट्यसमाज' या नाट्यपरिषदेसारख्या संस्थेची स्थापना केली; तसेंच एक नाट्यशाळाहि काढली. तथापि कोठल्याच कार्यांत त्यांना फारसें यश लाभलें नाहीं. महाराष्ट्रांतील नाट्यकलेच्या अभिवृद्ध्यर्थ झटणारा म्हणून त्यांचें नांव राहील.

**बॅरिस्टर**—इंग्लंडमध्यें मिडल् किंवा इन्नर टेंपल, लिंकन्स इन् आणि ग्रेज इन् यांपैकीं कोणत्याहि एका कायद्याच्या विद्यालयानें ज्यांना न्यायकोर्टांत वकिली करण्याची सनद दिलेली असते त्या इसमांना बॅरिस्टर म्हणतात. वरिष्ठ कोर्टांत वकिलीचें काम करण्याचा हक्क फक्त बॅरिस्टरांनाच असतो, आणि सर्व प्रकारच्या खालच्या कोर्टांतहि त्यांना काम चालवितां येतें. मात्र या कामाबद्दल सर्व माहिती आणि सल्ला बॅरिस्टरांना सॉलिसिटरकडून घ्यावा लागतो. वकिलीची सनद मिळण्याकरितां वरीलपैकीं एका 'इन्' चा सभासद व्हावें लागतें. तीन वर्षें फी भरून टर्म्स भराव्या लागतात, आणि ठरलेल्या परीक्षेमध्यें उत्तीर्ण व्हावें लागतें. ज्यूनियर बॅरिस्टर यांनीं वापरण्याचा झगा साधा असतो; आणि किंग्ज कौन्सेल यांनीं वापरण्याचा झग

निराळा म्हणजे रेशमी असतो. सर्व बॅरिस्टरांना सामान्यतः कौन्सेल म्हणतात. पक्षकारांना सॉलिसिटरमार्फत बॅरिस्टरकडे काम द्यावें लागतें. मात्र फौजदारी खटल्यांतील कच्च्या कैद्यांना प्रत्यक्ष बॅरिस्टरबरोबर तुरुंगांत सल्लामसलत करतां येते. बॅरिस्टरला फी सॉलिसिटरकडून मिळते. या बाबतींत कौन्सेलला किंवा कौन्सेलविरुद्ध दावा लावतां येत नाहीं. वरिष्ठ कोर्टांचे आणि काउंटी कोर्टांचे न्यायाधीश ज्यांनीं निदान १५ वर्षे वकिली केली आहे त्यांनाच नेमतात.

हिंदुस्थानांत बॅरिस्टरांचा दर्जा याचप्रमाणें असतो. पण नुकताच सरकारनें कायदा करून बॅरिस्टर आणि वकील यांमध्यें हायकोर्टांतील प्रथम शाखेंत ( ओरिजिनल साइड ) काम चालविण्याबाबत भेद ठेवला नाहीं.

**बॅरी, सर जेम्स मॅथ्यू** ( १८६०–१९३७ )—एक इंग्रज कादंबरीकार व नाटककार. एडिंबर्ग विद्यापीठाची पदवी घेतल्यावर हा वर्तमानपत्राच्या धंद्यांत शिरला. त्यानें लिहिलेले अनेक निबंध व टांचणें यांमुळें तो बराच लोकप्रिय झाला. नंतर यानें कांहीं कादंबऱ्या लिहिल्या. त्यांपैकीं ‘ लहान मंत्री ’, ‘ भावनावश टॉमी ’ आणि ‘ थ्रम्समधील खिडकी ’ यांसारख्या नांवाच्या प्रसिद्ध आहेत. यानें कांहीं नाटकेंहि लिहिलीं; व तीं वरींच लोकप्रियहि झालीं. १९३० ते १९३७ या वर्षांत तो एडिंबर्ग विद्यापीठाचा कुलपति होता.

**बरीदशाही** ( बिदरची १४९२–१६५६ )—कासीम बरीद ( १४९२–१५०४ ) नांवाच्या पुरुषानें बहामनी राज्याची राजधानी जी अहमदाबाद–बिदर तेथें हें स्वतंत्र राज्य स्थापन केलें. कासीम हा प्रथम महंमदशहा बहामनीपाशीं गुलाम होता. हा जातीचा तुर्की किंवा जॉर्जियन गुलाम होता.

अमीर बरीद ( १५०४–१५४९ )—हा कासीमचा मुलगा. १५२९ त विजापूरच्या आदिलशहानें बिदरवर हल्ला करून अमीरचें बहुतेक राज्य हिरावून घेतलें. बिदर व त्याच्यासभोंवारचा पांच लाखांचा मुलूख मात्र त्याजकडे राहिला. अमीर यानें ४ राजे लागोपाठ गादीवर बसविले. शेवटचा शहा अहमदनगरास पळून गेल्यानें यानें स्वतःच सर्व राज्य ताब्यांत घेतलें होतें ( १५२७ ).

अली बरीद ( १५४९–१५६२ )— अलीनेंच प्रथम शहा हा किताब धारण केला. पण अहमदनगरच्या निजामशहानें त्याच्या राज्याचा बराच भाग हल्ला करून घेतला. हा अमीरचा पुत्र होता. हा सन १५६२ त मरण पावला. नंतर त्याचा पुत्र इब्राहीम बरीदशहा ( १५६९ पर्यंत ) व इब्राहीमचा धाकटा भाऊ कासीम बरीदशहा ( १५७२ ) ह्यांनीं बिदरास राज्य केलें. त्यांच्यामागें मिर्झा अलीशहा यानें स. १६०९ पर्यंत व अमीर बरीदशहा यानें १६५६ पर्यंत राज्य केलें. पुढें १६५६ सालीं औरंगजेब व त्याचा सरदार मीर जुम्ला ह्यांनीं विजापुरावर स्वारी केली. त्या वेळेस त्यांनीं बरीदशाहीच्या तख्तावर असलेल्या पुरुषापासून बिदर शहर व किल्ला घेतला; आणि त्याच वेळीं ( १७४८ ) महंमद गवानानें स्थापिलेली बिदरची पाठशाळा दारू भरून उडवून दिली. येणेंप्रमाणें बरीदशाहीचा अंत झाला.

**बरेली**—संयुक्तप्रांत, एक जिल्हा. क्षेत्रफळ १५९१ चौरस मैल व लोकसंख्या ११,७६,१९७ असून यांत अकरा शहरें व १९३८ खेडीं आहेत. मुख्य पिकें गहूं, हरभरा, भात, ताग, गळिताचीं धान्यें हीं आहेत. प्राचीन काळीं उत्तर पांचालांत याचा समावेश असे. बरेली शहर बरेलदेव राजानें वसविलें ( १५१७ ). रामनगर येथें ख्रिस्तपूर्व दुसऱ्या शतकांत राज्य करणाऱ्या राजांचीं नांवें असलेलीं नाणीं सांपडलीं आहेत व बौद्ध लोकांचे कांहीं वास्तूंचे अवशेष सांपडले आहेत. जैन लोकांचें हें पवित्र स्थान आहे.

तहशिलींत बरेली हें एकच मोठें शहर व ४१० खेडीं आहेत. येथून रामगंगा नदी वाहते. येथें उंसाची लागवड फार असून साखर पुष्कळ ठिकाणीं होते. बरेली शहराची लोकसंख्या १,८०,५२६ आहे. हें मोठें आगगाड्यांचें जंक्शन आहे. १८५७ च्या बंडाच्या वेळीं शिपायांनीं येथें बंड उभारलें. बरेली शहर बांबूंच्या व लांकडी कामाबद्दल प्रसिद्ध आहे. येथें एक कॉलेज आहे. येथील मोठा धंदा साखरेचा आहे.

**बरोट्सेलंड**—मध्य आफ्रिकेंतील एक जुनें राज्य. १९१६ सालीं हें राजाच्या इच्छेनेंच ब्रिटिश संरक्षणाखालीं आलें. येथें बेरोट्से लोक राहतात म्हणून या देशाला हें नांव पडलें आहे. झांबेझी नदी वाहते त्या प्रदेशांत हे लोक राहतात. ते काळ्या रंगाचे, उंच व सुबक बांध्याचे असून नीग्रो लोकांहून फार बुद्धिमान् आहेत. जातीचा मुख्य येथील राज्यकारभार पाहतो. लोक सूर्योपासक आहेत. पश्चिम भागांतून क्विटो नदी वाहते. पूर्वेस कॉफ्यू नदी व दक्षिणेस लिनँटी नदी आहे. या देशांत युरोपियनांचा भरणा होऊं लागल्यावर येथील लोकांनीं पाश्चात्य संस्कृतीवर लुब्ध होऊन आपला प्रदेश ब्रिटिशांच्या ताब्यांत दिला. देशी राजधानी लिआलुइ आहे पण मोंग्यू हें ब्रिटिशांचें मुख्य ठिकाण आहे.

**बर्क, एडमंड** ( १७२९–१७९७ )—एक प्रख्यात आंग्ल मुत्सद्दी आणि लेखक. याचा जन्म डब्लिन येथें झाला. १७४८ सालीं विद्यालय सोडतांना त्याची विद्वत्ता सर्वसाधारण विद्यार्थ्यांपेक्षां जास्त नव्हती; परंतु दिवसेंदिवस अविश्रांत श्रमानें व अंगच्या हुशारीनें तो लवकरच नांवारूपास येऊं लागला.

१७५६ सालीं त्यानें 'फिलॉसॉफिकल इन्कायरीज् इन्टु दि ऑरिजिन् ऑफ अवर आयडियाज् ऑन दि सब्लाइम ॲन्ड दि ब्यूटिफुल' (उदात्त आणि सुंदर वस्तूंच्या आपल्या कल्पनांच्या उगमासंबंधीं तात्त्विक शोध) या नांवाचें एक पुस्तक लिहिलें व तेव्हांपासून लोकांना त्याच्या स्वतंत्र विचारसरणीची कल्पना आली. त्याला मानवी कर्तव्यांची, मनोवृत्तींच्या खळबळींची, व एकंदर परिस्थितीची व्यापक माहिती होती. राजकीय वाङ्मयांत त्याचें नांव अजरामर झालें आहे.

१७६९ सालीं तो लॉर्ड रॉकिंगहॅमचा खाजगी चिटणवीस झाला व या वेळेपासून सार्वजनिक चळवळींत त्याचें अंग दिसूं लागलें. अमेरिकेवर नवीन कर बसवावयाच्या वेळीं त्यानें अमेरिकेतर्फे केलेलीं भाषणें फारच अप्रतिम आहेत.

ईस्ट इंडिया कंपनीच्या नोकरांच्या हिंदुस्थानांतील स्वैर वर्तनाची पूर्ण माहिती त्यानें तेथील (इंग्लंडमधील) लोकांनाहि दिली व वॉरन हेस्टिंग्जच्या गैरवर्तनाबद्दल त्याच्यावर आरोप होऊन चौकशीसाठीं त्याला न्यायासनासमोर आणण्याकरितां इंग्लंडांतील लोकमत त्यानें तयार केलें. १७८९ च्या फ्रान्समधील राज्यक्रांतींत नॅशनल असेंब्लीचें वर्तन त्याला बेकायदेशीर व सर्व युरोपच्या राज्यकारभारांत अनिष्ट क्रांति घडवून आणणारें असें वाटल्यावरून त्यानें 'रिफ्लेक्शन्स ऑन दि फ्रेंच रेव्होल्यूशन' (फ्रेंच राज्यक्रांतीसंबंधीं विवेचन) नांवाचें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्याच्या भविष्याचें प्रत्यंतर लवकरच लोकांना आलें व त्यामुळें सबंध युरोपचें मत फ्रेंच राज्यक्रांतीविरुद्ध झालें व इंग्लंड पक्कें राजनिष्ठ राहिलें. लॉर्ड मोर्ले याने लिहिलेलें त्याचें चरित्र वाचनीय आहे.

इ. स. १७८१-८२ मध्यें राघोबादादानें इंग्रज सरकारला आपल्या बाजूस वळविण्यासाठीं पाठविलेले वकील मणियार पारशी व हणमंतराव हे बर्ककडेच राहत असत. बर्कला हिंदी लोकांच्या दुःस्थितीबद्दल सहानुभूति वाटे व तो हिंदुस्थानांतील कंपनीच्या कारभारावर सडकून टीका करी.

**बर्कले, जॉर्ज** (१६८५-१७५३)—एक आयरिश बिशप व तत्त्ववेत्ता. १७३४ त त्याला क्लायनेच्या बिशपची जागा मिळाल्यावर अखेरपर्यंत तो तेथेंच राहिला. तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत बर्कलेचें विशिष्ट स्थान आहे. नामवाद (नॉमिनॅलिझम्), अजडवाद (इम्मटीरिॲलिझम्), व संपादित रूपबोधन (ॲक्वायर्ड व्हिज्युअल पर्सेप्शन) हे त्याचे तीन मुख्य सिद्धांत आहेत. त्याच्या चाक्षुप सिद्धांतानें तत्त्वज्ञानात किंवा मानसशास्त्रांत नवी भर घातली आहे यांत शंका नाहीं. नुसत्या दृष्टीनें संवेदनांखेरीज जास्त कांहीं आपणांस मिळत नाहीं; तर संपूर्ण ज्ञानासाठीं त्वगिंद्रियाची मदत घेतलीच पाहिजे. तसेंच बाह्य जडसृष्टि आहे ही कल्पनाहि चुकीची आहे व ज्यांना आपण इंद्रियज्ञेय जडवस्तू म्हणतों त्या बाह्य नसून मनोगतच असतात. सृष्टिनियमान्वयें परमेश्वराच्या प्रत्यक्ष कृतीनें त्यांचा आपल्या मनावर ठसा उमटलेला असतो. 'दि ट्रिटाइज् ऑन दि प्रिन्सिपल्स ऑफ ह्यूमन नॉलेज' व 'व्हिंडिकेशन' हे त्याचे प्रसिद्ध तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ आहेत.

**बर्गंडी**—फ्रान्समधील एक जुना प्रांत. बर्गंडियन नांवाच्या लोकांनीं तेथें वसाहत केल्यामुळें त्या प्रदेशाला हें नांव प्राप्त झालें. हे लोक मूळचे ओडर व व्हिस्चुला या दोन नद्यांमधील प्रदेशांतले रहिवासी असून ते पांचव्या शतकांत फ्रान्समध्यें येऊन स्थायिक झाले. या प्रदेशावर प्रथम फ्रँक लोकांचें वर्चस्व होतें; नंतर हा प्रांत स्वतंत्र झाला, व पुढें जर्मन राज्यांत तो सामील करण्यांत आला. तथापि याच प्रदेशापैकीं डची ऑफ बर्गंडी नांवाचा प्रदेश फ्रेंच राजांच्या अमलाखालीं ९ व्या शतकापासून आला, व त्याचेच हल्लीं फ्रान्स देशांतील चार 'डिपार्टमेंट' बनवले आहेत. या प्रदेशांत नाविक वाहतूक चालू असलेल्या कित्येक नद्या असल्यामुळें येथें पाणीपुरवठा भरपूर आहे व जमीन सुपीक आहे; विशेषतः द्राक्षांच्या लागवडीमुळें व दारूमुळें याची प्रसिद्धि आहे.

**बर्गमन, टॉरबर्न ओलोफ** (१७३५-१७८४)—एक स्वीडिश पदार्थविज्ञानी व रसायनशास्त्रज्ञ. त्यानें कृत्रिम खनिजोदकें तयार करण्याची कृति शोधून काढली, तसेंच खनिजोदकांतील उज्जगंधिद (सल्फ्युरेटेड हायड्रोजन) वायु शोधून काढला व खनिजांचें वर्गीकरण केलें. रासायनिक आसक्तीच्या त्याच्या सिद्धांतानें रसायनशास्त्राच्या पुढील वाढीस फार मोठी मदत केली आहे.

**बर्गसन, हेन्री लुई** (१८५९-१९४३)—एक फ्रेंच तत्त्ववेत्ता. तो १८८१ सालीं पदवीधर झाला, व प्रथम शिक्षकाचें काम अनेक वर्षें केल्यावर १९०० सालीं 'कॉलेज द फ्रान्स' मध्यें त्याला तत्त्वज्ञानाचा प्राध्यापक नेमण्यांत आलें. बुद्धि ही दोन वर्तनक्रमांतील फक्त शंका निरसन करीत असते व तीपासून ज्ञान होत नाहीं. त्यासाठीं प्रतिभेची मदत लागते व ती बुद्धीनेंच उत्पन्न केलेल्या आभासाचें निवारण करते; खरें ज्ञान म्हणजे नुसतें भावनिक असून तें सत्याचें ज्ञानच नव्हे, अशा प्रकारचे बर्गसनचे सिद्धांत आहेत. फ्रेंच भाषेंत त्याचे बरेच ग्रंथ असून ते इंग्रजींत भाषांतरलेहि आहेत.

**बर्गेलसन, डेव्हिड** (१८८४-    )—सोव्हिएट रशियन संयुक्त संस्थानांतील एक प्रख्यात ज्यिडिश कादंबरीकार. जन्म युक्रेनमध्ये सुखवस्तु व्यापारी कुटुंबांत झाला. देशाच्या वाढत्या दारिद्र्याच्या कालांत त्याच्या पहिल्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या.

राज्यक्रांतीनंतर कांहीं काळ तो हद्दपार झाला होता, पण पुढें नव्या राजवटीपुढें मान वांकवून व तिचा न्यायीपणाहि पटून तो तींत संतोषानें राहिला. नंतर त्यानें सुंदर व नवी ग्रंथरचना केली. अर्वाचीन ब्रिटिश वाङ्मयांतील तो एक प्रमुख शैलीदार लेखक आहे.

**बर्जेन**—हें बंदर नॉर्वेच्या पश्चिम किनाऱ्यावर नॉर्वेमधील दुसऱ्या प्रतीचें शहर आहे. या शहराभोंवतीं 'रॉकी हिल्स' ही पर्वताची रांग ८०० ते २००० फूट उंचीची असल्यामुळें या शहरांत बहुतेक बारा महिने पाऊस पडत असतो. येथें विजेच्या ट्रामगाड्या आहेत. येथें लांकूड, डांबर, कॉडलिव्हर ऑइल, चामडीं, आणि हेरिंग व इतर मासे यांचा मोठा व्यापार चालतो. हें शहर रेल्वेनें ओस्लो शहराला जोडलेलें आहे. येथील बंदरांत बिनतारी स्टेशन आहे. लो. सं. ९९,००० आहे.

**बर्जेस, जेम्स** (१८३२–१९१६)—एक इंग्रज प्राचीनवस्तुसंशोधक. ग्लासगो व एडिंबरो येथें यांचें शिक्षण झाल्यावर पश्चिम हिंदुस्थानचे आर्किऑलॉजिकल सर्व्हेअर म्हणून यांची नेमणूक झाली. १८८९ सालीं हे या खात्याचे डायरेक्टर-जनरल झाले. १८७२ सालीं 'इंडियन अँटिक्वेरी' हें मासिक सुरू करून यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासासंबंधीं विद्वानांच्या संशोधनांच्या प्रसिद्धीची सोय केली. सन १८८९–९४ या कालांत 'एपिग्राफिका इंडिका', 'आर्किऑलॉजिकल् सर्व्हे रिपोर्ट्स', 'फिलॉसॉफिकल् मॅगेझीन' यांमधूनहि यांनीं आपले शास्त्रीय लेख प्रसिद्ध केले. जिनेव्हा येथें १८९४ सालीं जी प्राच्यविद्यापरिषद् (ओरिएंट्ल काँग्रेस) भरली होती तींत हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हे उपस्थित होते. यांनीं घारापुरीचीं लेणीं, सोमनाथाचें देवालय, अजंठा लेणीं, हिंदुस्थानांतील बौद्ध शिल्पकला, वगैरे विषयांवर ग्रंथ लिहिले आहेत.

**बर्झेलियस** (१७७९–१८४८)—हा स्वीडनमधील रसायनशास्त्रज्ञ स्टॉकहोम येथें प्रोफेसर होता. यानें स. १८१८ त एक परमाणुभारांकमाला तयार केली व १८२६ सालीं ती सुधारली. हींत प्राणवायूचा परमाणुभारांक मूलमान धरला होता. यानें विद्युद्रसायनशास्त्राचा पाया घातला. तसेंच मूलद्रव्यांस संक्षिप्त संज्ञा दिल्या व अनेक नवीन मूलद्रव्यांचा शोध लावला.

**बर्टन, सर रिचर्ड फ्रॅन्सिस** (१८२१–१८९०)—एक इंग्रज प्रवासी व भाषाशास्त्रज्ञ. त्यानें १८४२ सालीं हिंदी लष्करांत नोकरी धरली आणि हिंदुस्थानांतील लोकांच्या भाषा व रीतीरिवाज यांचें ज्ञान मिळविण्यांत मोठी प्रगति केली. नंतर १८५३ सालीं तो अरबस्तानांत गेला, आणि तेथें मुसलमान यात्रेकरूचा वेष घेऊन मक्का व मदिना या पवित्र शहरांत हिंडला. पुढें क्रिमियन युद्धामध्यें भाग घेतल्यावर तो पूर्व आफ्रिकेंत प्रवासाला गेला, आणि तेथें कॅप्टन स्पेक याच्याबरोबर प्रवास करून टँगानिका हें मोठें सरोवर त्यानें शोधून काढलें. त्यानें पुष्कळ देशांत प्रवास केला व पुष्कळ ग्रंथ लिहिले. त्यांपैकीं महत्त्वाचे ग्रंथ आहेत ते—'पर्सनल नॅरेटिव्ह ऑफ ए पिल्ग्रिमेज टु एल् मदिना ॲन्ड मेक्का' (मक्का आणि मदिना येथील यात्रेचा वृत्तान्त), 'दि लेक रीजन्स ऑफ सेन्ट्रल आफ्रिका' (मध्य आफ्रिकेंतील सरोवर प्रदेश), 'दि नाइल बेसिन' (नाइलचें पात्र), 'दि हायलॅन्ड्स् ऑफ ब्राझील' (ब्राझीलचे डोंगरप्रदेश), 'दि बुक ऑफ दि सोअर्ड' (खड्ग ग्रंथ), कामेएनच्या 'लुसि आड' चें आणि अरेबियन नाइट्सचें भाषांतर.

**बर्टिलन, आलफोन्स** (१८५३–१९१४)—एक फ्रेंच मानववंशशास्त्रज्ञ. गुन्हेगारांना ओळखण्याची जी पद्धति त्यानें शोधून काढली तिला 'बर्टिलन सिस्टिम' हेंच नांव आहे. ही पद्धति अशी कीं, गुन्हेगारांच्या शरीराच्या भागांचीं अगदीं बरोबर मापें घ्यावयाचीं; उदाहरणार्थ, डोक्याची व कानाची लांबी व रुंदी, तसेंच मधल्या बोटाची लांबी, करंगळीची लांबी, शरीराची उंची, हाताच्या वितीची लांबी, इत्यादि. या मापनपद्धतींत शरीराच्या उजव्या बाजूपेक्षां डाव्या बाजूवर भर देण्यांत येतो. या पद्धतींत डोळ्याच्या बुबुळाच्या रंगालाहि महत्त्व आहे. ही गुन्हेगार ओळखण्याची पद्धति हल्लीं अनेक देशांत चालू असून ती यशस्वी झालेली आहे; पण कांहीं देशांत अंगठ्याच्या ठशावरून (फिंगरप्रिंट) गुन्हेगार ओळखण्याची पद्धति अधिक योग्य मानतात. या दुसऱ्या पद्धतींत गुन्हेगारांच्या अंगठ्यांचे ठसे कार्डांवर घेऊन त्यांचें वर्गीकरण करून ठेवतात व त्यामुळें अगदीं थोडक्या मिनिटांत गुन्हेगार ओळखून काढतां येतो.

**बर्ड, रिचर्ड एव्हेलिन** (१८८८– )—हा एक प्रसिद्ध अमेरिकन वैमानिक असून ध्रुवप्रदेशसंशोधकहि आहे. १९२५ मध्यें निघालेल्या मॅक्मिलन उत्तर ध्रुव संशोधक मंडळाचा हा प्रमुख होता. यानें १९२६ मध्यें उत्तर ध्रुवावर उड्डाण केलें. १९२७ मध्यें यानें आपल्या तीन मित्रांसह अटलांटिक महासागरावरून उड्डाण केलें व १९२९ मध्यें दक्षिण ध्रुवावरून पहिलेंच उड्डाण केलें. १९२८ ते १९३० या वर्षांत यानें दक्षिण ध्रुवप्रदेशाची सफर करून एडसेल फोर्ड पर्वत व मेरी बर्ड भूप्रदेश शोधून काढला. १९३३ ते १९३५ मध्यें यानें दुसरी दक्षिण ध्रुवप्रदेशाची सफर करून बरेच महिने तेथील एका तळावर वास्तव्य केलें. १९४० मध्यें त्यानें आणखी एक तिसरी सफर दक्षिण ध्रुवप्रदेशावर केली. (दक्षिण ध्रुवप्रदेश पाहा.)

**बर्न**—हें स्वित्झर्लंडच्या राजधानीचें शहर आहे. या शहरांतील ग्रंथसंग्रहालयांत हस्तलिखित ग्रंथांचाच विशेष भरणा

असून छापील पुस्तकें फार थोडींच आहेत. ह्याशिवाय येथें बरींच पदार्थसंग्रहालयें आहेत. बर्नमध्यें स. १८३४ मध्यें स्थापन केलेलें एक विश्वविद्यालय आहे. शहरास राजकीय-दृष्ट्या बरेंच महत्त्व आहे. लो. सं. १,३०,३३१. शें. ८७ लोक जर्मन भाषा बोलतात. शहर समुद्रसपाटीपासून १७८८ फूट उंचीवर आहे. निकेडचा प्राचीन किल्ला द्वीपकल्पाच्या पूर्व टोंकावर असून ह्यानें आरवरील मार्गाचें संरक्षण होतें. १३५३ त हें शहर स्विस संघास मिळालें. १८४८ च्या फेडरल कायद्यानें बर्न शहर राज्यकारभाराचें मुख्य शहर केलें व येथें चिरस्थायी फेडरल शासनसत्ता स्थापन झाली. येथेच परराष्ट्रीय वकील राहतात.

शेतकी आणि गुरांचें संवर्धन हा मुख्य व्यवसाय आहे. लिनन, सुती व रेशमी कापड, घड्याळें, कांच, भांडीं, इ. कारखाने आहेत.

**बर्नार्ड, सेंट** ( १०९०-११५३ )— हा मध्ययुगांतील एक अतिशय प्रसिद्ध ख्रिस्ती संत होता. याचें युरोपवर फार वजन असे. तुर्कांनीं एडेसा घेतल्यावर यानें नवीन धर्मयुद्ध पुकारलें व मोहिमेची तयारी केली; पण या कार्यांत त्याचे अनेक अनुयायी मारले गेले. ७२ मठांची स्थापना यानें केली किंवा याच्या नांवानें झाली. याचे अनेक ग्रंथ आहेत.

**बर्नार्ड, सेंट**—सेंट बर्नार्ड या नांवाचे दोन प्रसिद्ध घाट आल्प्स पर्वताच्या मुख्य रांगेंत असून दोन्हीहि घाटांना गाडीवाट आहे. सेंट बर्नार्ड घाट ५३ मैल लांबीचा आहे. घाटमाथ्या-वर सेंट बर्नार्ड यानें स्थापन केलेला एक मठ आहे. प्रवाशांस याचा फार उपयोग होतो. सुमारें १३ व्या शतकापासून ऑस्टिन संप्रदायी उपासक मंडळ या मठाची व्यवस्था पाहतें. दरवर्षी हजारों प्रवाशांचे प्राण मंडळाचे चाकर व कुत्रे वांचवि-तात. इ. स. १८०० त प्रसिद्ध नेपोलियन या घाटमार्गानें आपलें सैन्य घेऊन गेला. रोमन लोकांच्या वेळीं या घाटमार्गानें वाहतूक चालत असे. घाटमाथ्यावर ज्युपिटरचें एक मंदिर आहे. दुसऱ्या सेंट बर्नार्ड घाटांत एक उपयुक्त मठ असून मॉरिस व लॅझारस संप्रदायी हे या मठाची व्यवस्था पाहतात. मेन्थानचा सेंट बर्नार्ड यानें हा मठ स्थापन केला. या घाटांत प्रवाशांची विशेष रहदारी नाहीं.

**बर्नार्डो, थॉमस जॉन** ( १८४५-१९०५ )—एक इंग्रज समाजकार्यकर्ता. त्यानें वैद्यकशास्त्राचा अभ्यास लंडन, एडिं-बर्ग व पॅरिस येथें करून १८६७ सालीं लंडनमधील निराश्रित मुलांकरितां एक अनाथाश्रम स्थापला; व पुढें आयुष्यभर त्याच कार्याला त्यानें स्वतःस वाहून घेतलें. त्याच्या हयातींत त्यानें एकंदर ६०,००० निराश्रित मुलांचें पालनपोषण व शिक्षण केलें; व त्याकरितां त्यानें 'बर्नार्डो होम्स' व अशाच संस्था लंडनांत व इंग्लंडमधील अनेक परगण्यांत व कांहीं थोड्या संस्था कानडा देशांत स्थापल्या. अनेक अनाथशिक्षणसंस्थांमध्यें त्यानें एक नाविक-शिक्षण शाखा स्थापली. बर्नार्डो यानें असा नियम घातला होता कीं, कोणाहि अनाथ मुलाला आपल्या संस्थेंत प्रवेश नाकारूं नये. १८९९ पासून अशीं अनेक अनाथ-गृहें 'नॅशनल इन्कॉर्पोरेटेड वेफ्स असोसिएशन' या मध्यवर्ती संस्थेच्या देखरेखीखालीं कार्य करीत आहेत; कार्यपद्धति मूळ संस्थापकाच्या आंखणीप्रमाणेंच चालू आहे. हजारों अनाथ मुलें या गृहांतून आहेत व हजारोंनीं आतांपर्यंत याचा फायदा घेऊन आपलें जीवन सुखी केलें आहे.

**बर्नियर, फ्रान्सिस** ( मृ. १६८८ )—हा फ्रेंच वैद्य व प्रवासी शहाजहान बादशहाच्या वेळीं हिंदुस्थानांत आला. त्या वेळीं त्याचें वय तीस वर्षांचें होतें. स. १६५५ पासून १६६७ पर्यंत १२ वर्षें तो हिंदुस्थानांत होता. हा प्रथम दाराशुकोजवळ वैद्य म्हणून होता. पुढें तो दिल्ली, काश्मीर, बंगाला, दख्खन इकडे हिंडला. त्यानें शहाजहान व औरंगजेब यांच्या वेळची लिहिलेली हकीकत विशेष महत्त्वाची व साधारण-पणें निःपक्षपाती आहे. फजलखान वजीर ( दानिष्मंद ) बर्नियर-पासून युरोपच्या बऱ्याच भाषा शिकला व बर्नियरनें त्याज-करितां अनेक सुंदर लॅटिन ग्रंथांचीं भाषांतरें केलीं. औरंगजेबानें राज्यप्रातीकरितां जीं कारस्थानें केलीं, त्यांचें हुबेहुब व चित्त-वेधक वर्णन बर्नियरनें केलें आहे. याचा ग्रंथ १६७० त फ्रान्स-मध्यें प्रसिद्ध झाला. शिवाजीचें सर्वांत जुनें चित्र याच्याच ग्रंथांतील होय. यानें आपल्या ग्रंथास हिंदुस्थानचा एक नकाशा जोडला आहे तो उपयुक्त आहे.

**बर्नूफ, यूजेन** ( १८०१-१८५२ )—एक फ्रेंच प्राच्य-विद्या पंडित. त्याची मुख्य कीर्ति त्यानें झेंद ऊर्फ प्राचीन भाषा हिचा अभ्यास करून अगदीं प्रथम विद्वानांच्या निदर्शनास आणली त्यामुळें आहे. या भाषेत झरथुष्ट्र धर्मपंथीयांचे ग्रंथ लिहिलेले आहेत. ह्यानें युरोपमध्यें पहिल्यानेंच वेद शिकविण्यास आरंभ केला ( १८४० ). त्याचप्रमाणें ह्यानें पालीच्या अध्य-यनाचा प्रथम पाया घातला व बौद्ध वाङ्मयाच्या अभ्यासास सुरुवात केली. यानें बरेच शिष्य तयार केले होते.

**बर्नोली**—या नांवाच्या कुटुंबांत आठ सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ होऊन गेले. स्पेनमधील मुत्सद्दी व जनरल ड्यूक फर्डिनांड आल्व्हा ( १५०८-१५८३ ) याचा नेदर्लंडवर जुलमी अमल चालू

असतांना या कुटुंबाला अँटवर्प शहरांतून पळून जावें लागलें, म्हणून तें कुटुंब प्रथम फ्रांक्फुर्ट येथें, आणि नंतर बेसल येथें गेलें. या कुटुंबीयांपैकीं सर्वांत श्रेष्ठ व्यक्ति म्हणजे (१) जेम्स बर्नोली (१६५४–१७०५)—हा बेसल येथें गणितशास्त्राचा प्रोफेसर होता. यानें शून्यलब्धि किंवा चलनकलन (डिफरन्शियल कॅल्क्युलस) याचा भूमिति आणि यंत्रशास्त्र यांतील कठिण प्रश्न सोडविण्याच्या कामीं उपयोग केला; व इतर अनेक गणिती शोध लाविले. बर्नोली अंक (नंबर्स) याचेच आहेत. (२) जॉन (१६६७–१७४८)—जेम्सचा भाऊ. अतिवेगाच्या उताराची रेषा (बॅचिस्टोक्रोन) यानें शोधून काढली. (३) डॅनिएल (१७००–१७८२)—जॉनचा दुसरा मुलगा. वैद्यक, सृष्टिशास्त्र व गणित यांत पारंगत होता. यूलरच्या बरोबरीनें यानें फ्रेंच ॲकेडमीचीं दहा बक्षिसें मिळविलीं.

**बर्न्स** (१७५९–१७९६)—एक सुप्रसिद्ध स्कॉच कवि. याचें शिक्षण घरगुतीच झालें. १७८१ सालीं तो आयर्व्हिन येथें तागाच्या कारखान्यांत नोकरीस राहिला. बाप वारल्यानंतर आपल्या भावासह तो स्वतःच्या शेतीवर राहिला, पण त्यांत त्याला किफायत होईना. याच सुमारास स्नेह्यांच्या सांगण्यावरून त्यानें आपला काव्यसंग्रह प्रसिद्ध केला. त्यांत 'दि ट्वा डॉग्स', 'दि ॲड्रेस टु दि डेव्हल', 'दि माउस', 'दि डायसी', इत्यादि कविता होत्या. या काव्यसंग्रहामुळें त्याची लोकप्रियता थोडक्याच काळांत प्रस्थापित झाली. त्याचें जेन आरमोर या बाईशीं लग्न झालें. बर्न्सची कविता फार उच्च दर्जाची आहे. त्याच्या कवितेमध्यें वैविध्य, प्रसाद, स्फूर्ति, स्पष्टपणा, इत्यादि गुण दिसून येतात. त्याच्या बऱ्याच कवितांतून विनोद भरलेला आढळतो.

**बर्फ**—गोठलेल्या किंवा घनरूप पाण्याला बर्फ म्हणतात. याला रंग नसतो व याचे षट्कोनी रवे किंवा लहान उभे त्रिपार्श्वाकार तुकडे होतात. हिम, दंवकण, गारा हीं बर्फाचींच रूपें होत. पाणी ०° शतमान (सेंटिग्रेड) किंवा ३२ फारेनहाईट अंशावर गोठतें, पण ४° शत. (किंवा ३९·२° फारेन.)वर त्याची कमालीची घनता असते. गोठतांना पाणी प्रसरण पावतें व थंड पाण्याच्या वर बर्फ तरंगत राहतो. हवेचा दाब कमी होत गेला म्हणजे गोठण्याचा बिंदु खालीं येऊं लागतो. खाऱ्या पाण्याला साध्या पाण्यापेक्षां गोठण्याला उष्णमान जास्त खालचें लागतें. बर्फ कठिण आणि ठिसूळ आहे तरी त्यांत लवचिकपणा आहे असा शोध निघाला आहे. बर्फाच्या मोठ्या नद्या व पर्वत शीतकटिबंधांत पाहावयास मिळतात. बर्फ नैसर्गिक रीत्या तयार होत असलें तरी माणूस कृत्रिम रीतीनें वाटेल तेव्हां तयार करतो. आज जगांत कृत्रिम बर्फाचा केवढा तरी व्यापार चालतो. नाशिवंत पदार्थ टिकविण्यासाठीं बर्फ लागत असल्यानें त्याचें पीक काढण्याचाहि मोठा धंदा विस्कॉन्सिन, मिचिगन व मिनेसोटा या अमेरिकन संस्थानांतील सरोवरें आणि ओढे या ठिकाणीं चालतो. हडसन नदीहि या बाबतींत प्रसिद्ध आहे.

बनावट बर्फ—पाण्याचें उष्णमान ३२° पेक्षां कमी होऊं लागलें तर पाण्याचें बर्फ होऊं लागतें. पाण्याचें उष्णमान कमी होण्याकरितां दुसरा एखादा ती उष्णता शोषून घेणारा पदार्थ लागतो. तो म्हणजे मुख्य अमोनिया. याशिवाय कर्बद्विप्राणिद (कार्बन डायॉक्साइड) व गंधद्विप्राणिद (सल्फर डायॉक्साइड) हीं वापरतात. यांचें प्रमाण १०० भागांत ८० भाग अमोनिया व २० भाग कर्बद्विप्राणिद–गंधद्विप्राणिद असें आहे.

अमोनिया व इतर हे दोन वायू दाब देऊन व थंडपणा लावून द्रवरूप अवस्थेत आणतां येतात. मिठाचें पाणी भरलेल्या टाक्यांतून द्रव अमोनियाच्या नळ्या सोडतात. पण अमोनिया थोडा थोडा सोडतात. त्यामुळें त्यावरचा दाब कमी होऊन तो वायुरूप स्थितींत जाऊं लागतो. वायुरूप स्थितींत जाण्याकरितां लागणारी उष्णता बाहेरच्या मिठाच्या पाण्यांतून शोषली जाते. अर्थातच मिठाचें पाणी हलकें हलकें इतकें थंड होतें कीं, त्याचें बर्फ बनण्यास सुरुवात होते. हीच क्रिया तीनचारदां झाली कीं पाण्याचें संपूर्ण बर्फ बनतें.

बर्फाची पिशवी—जेव्हां एखाद्या शरीराच्या भागाला शीत उपचार करावयाचा असेल तेव्हां बर्फ-पिशवीचा उपयोग करणें सोयीचें असतें. ही पिशवी रबराची केलेली असून तीमध्यें बर्फाचे बारीक तुकडे करून अर्धी पिशवी भरण्यात येते. मुदतीच्या तापामध्यें जर कळा येत असतील किंवा रक्त जात असेल तर बर्फाची पिशवी पोटावर ठेवावी. आंत्रपुच्छदाह या विकारांतहि रोगोद्भवाच्या आरंभींच उपचार करावयाचा झाला तर बर्फाच्या पिशवीचा उपयोग होतो. जर पिशवीच्या वजनामुळें दुःख अधिक होत असेल तर पिशवी वर टांगून ठेवून पोटावर राहील अशा बेतानें ठेवावी. डोकेंदुखीमध्येंहि बर्फाची पिशवी डोक्यावर ठेविली असतां वेदना कमी होतात. ही पिशवी शरीरावर वाजवीपेक्षां जास्त वेळ राहणार नाहीं अशी काळजी घेणें आवश्यक असतें. नाहीं तर व्रण होण्याचा संभव असतो.

कोरडा बर्फ (ड्राय आइस) ज्याला म्हणतात तो कर्बद्विप्राणिद होय. शीतीकरणासाठीं हा वायु घन करतात.

**बर्बर**—उत्तर आफ्रिकेंतील मूळच्या लिबियन लोकांच्या निरनिराळ्या शाखा या नांवाखालीं मोडतात. बर्बर लोक अतिप्राचीन काळापासून भूमध्यसमुद्र व साहाराचें ओसाड वाळवंट यांच्या दरम्यानच्या प्रदेशांत ईजिप्तपासून अटलांटिकपर्यंत राहत आलेले आहेत. मोरोक्को, फेझ, अल्जेरिया, ट्युनिस आणि

ट्रिपोली या भागांस बर्बरी देश म्हणत. त्यांच्या झोओना, झेचालिया, चौरिया, कबिलीत, बेनीमिझब, इलूह, अमझीग, बर्बर, ट्यूरेग, अमोशघ, सोर्गू, वगैरे पुष्कळ पोटजाती आहेत. मानववंशशास्त्रदृष्ट्या बर्बर लोकांचा इतर लोकांशीं काय संबंध आहे, याबद्दल अद्याप बराच वाद आहे. बर्बर लोक गोरे असून त्यांनीं युरोपीय पद्धतीचा पोषाख केल्यास ते थेट युरोपियन लोकांप्रमाणेंच दिसतात. अरबांच्या स्वारीपासून बर्बर जातीवर सर्वांत जास्त परिणाम झाला. परंतु दोघांचा धर्म व राज्यपद्धति (शासन संस्था) एक असूनहि त्यांचा एकजीव मात्र विशेषसा झाला नाहीं. अरब हांजी हांजी करणारे, लांचखाऊ व अप्रामाणिक तर बर्बर सरळ, प्रामाणिक, अन्यायानें पैसे न मिळविणारे, बुद्धिमान व विश्वासू आहेत. बर्बर हे मुख्यतः लढवय्ये लोक आहेत. ते रानटी डुकराचें मांस खातात व अंजिराची दारू पितात; तथापि ते फार धर्मभोळे असून भुतें गाडल्याखेरीज कधींहि घर सोडीत नाहींत. अरब स्त्रियांपेक्षां बर्बर स्त्रियांची स्थिति पुष्कळ बाबतींत चांगली आहे.

भाषा—बर्बर भाषेची जागा अरबीनें घेतली आहे, तरी अद्याप लाखों लोक बर्बर भाषा बोलतात. बर्बर लोकांची स्वतंत्र लिपिहि आहे. बर्बर भाषेंत एकंदर ३२ मुळाक्षरें आहेत. या बर्बर भाषेंतले शिलालेख उपलब्ध आहेत.

**बर्मिंगहॅम**—इंग्लंड, वॉरविकशायर परगणा. या शहराचे म्युनिसिपल विभाग व प्रतिनिधि विभाग असे दोन भाग असून इंग्लंडांत व्यापारी जिल्ह्याच्या राजधानीचें हें शहर आहे. लोकसंख्या सुमारें दहा लाख आहे. येथें व्हिक्टोरिया राणी, नेल्सन, पील, वगैरेंचे पुतळे आहेत. येथें विद्यापीठ असून रसायनशास्त्र, वैद्यक व वाङ्मयकला या विषयांचीं कॉलेजें व इतर अनेक शिक्षण-संस्था आहेत. कांहीं रात्रीच्या शाळाहि आहेत. मोफत वाचनालयें, रुग्णालयें, भिक्षागृहें (आल्म्स हाउस) व सार्वजनिक बगीचे अनेक आहेत. खिळे, टांचण्या, तारा, आगगाडीचें सामान, मोटारी व इतर अनेक प्रकारच्या लोखंडी व पोलादी सामानाचे कारखाने येथें आहेत. तसेंच शस्त्रें, रत्नें, निरनिराळीं यंत्रें, कांच, रंग, इ. अनेक वस्तूंचे कारखाने मोठ्या प्रमाणावर चालले आहेत.

**बर्म्युडा बेटें**—हा अॅटलांटिक महासागरांत लहान लहान बेटांचा समूह आहे. त्यांची संख्या सुमारें ३६० आहे. हा द्वीपसमूह सर्वांत जुनी ब्रिटिश क्राउन कॉलनी होय. त्यांचें एकंदर क्षे. फ. २० चौ. मैल असून त्यांपैकीं सुमारें वीस बेटांवरच लोकवस्ती आहे. यांत सेंट जॉर्ज, बर्म्युडा (या बेटांतील हॅमिल्टन हें शहर या द्वीपसमूहाची राजधानी आहे), सॉमरसेट, सेंट डेव्हिड व आयर्लंड हीं प्रमुख बेटें आहेत, आणि या बेटांत ब्रिटिश नाविक व लष्करी महत्त्वाचीं ठाणीं आहेत. येथें १७,५०० टनी आगबोटी लागतील इतकी मोठी लोखंडी तरती गोदी आहे. येथील हवा फार आरोग्यदायक आहे. सुमारें ४००० एकर जमीन लागवडींत असून चांगली सुपीक आहे, व तेथें बटाटे, आरारूट, कांदे, केळीं, टोमाटो, नारिंगें व इतर फळफळावळ होते. येथें गोड्या पाण्याची टंचाई आहे. लो. सं. ३३,९२५ आहे.

**बर्लिन**—जर्मन साम्राज्याची राजधानी व सर्वांत मोठें शहर. पूर्वी जर्मन बादशहाच्या राहण्याचें हें ठिकाण असून येथें जर्मन पार्लमेंट (रीचस्टॅग) व वरिष्ठ न्यायकोर्ट यांशिवाय साम्राज्याच्या कामकाजासंबंधीं दुसऱ्या सर्व कचेऱ्या आहेत. स्प्री नदीच्या प्रवाहाच्या लगतच वसलेला जो बर्लिनचा भाग व त्यालाच लागून असलेला शहराचा पश्चिमेकडील भाग यांत व्यापाराच्या मोठमोठ्या घडामोडी चालतात. हें शहर एल्बा व ओडर या दोन नद्यांच्या मध्यें असल्यामुळें त्या नद्यांना जोडणाऱ्या कालव्यांचें शहराच्या आसपास जाळेंच पसरलें आहे. राजवाडा, दोन पदार्थसंग्रहालयें, एक राष्ट्रीय चित्रसंग्रहालय, कॅथेड्रल, नाटकगृह, सरकारी ग्रंथसंग्रहालय, नगरभवन, विश्वविद्यालय, फ्रेडरिक दि ग्रेटचें स्मारक, पहिला विल्यम व महाराणी फ्रेडरिक यांचे राजवाडे, पार्लमेंट गृह, इत्यादि अनेक उत्कृष्ट सार्वजनिक इमारती येथें आहेत. विश्वविद्यालयास जोडूनच खाणीसंबंधीं शिक्षणाची शाळा, शेतकी कॉलेज, पशुवैद्यकाचें कॉलेज, पौरस्त्य भाषांच्या अध्ययनाकरितां विद्यालय, इत्यादि दुसऱ्या संस्था आहेत. बर्लिनच्या आसपास नवीन वस्ती होऊं लागली आहे. बर्लिनची लोकसंख्या १९२९ सालीं ४३,३२,२४२ व क्षेत्रफळ ३४१ चौरस मैल होतें.

दुसऱ्या महायुद्धानंतर बृहद्बर्लिन शहराचा ताबा अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स व रशिया या चार राष्ट्रांकडे जाऊन त्याचे चार विभाग पडले. १९४५ च्या सप्टेंबरांत यांची लोकसंख्या अनुक्रमें ८,५५,२४१; ५,५६,५६७; ३,९९,०४६; व ११,११,३९८ याप्रमाणें होती. एकूण लोकसंख्या २९,३२,४३२ इतकी होती. पश्चिम जर्मनींत आतां पुन्हां जर्मन सरकार अस्तित्वांत आल्यानें बर्लिनच्या बऱ्याचशा भागांवर शरणागतीनंतर आलेल्या आपत्ती दूर होत आहेत. गेल्या महायुद्धांत जर्मनीवर बाँबहल्ले झाल्यानें तें शहर बरेंच उध्वस्त झालें. तेव्हां आतां त्याची पुनर्रचना होत आहे.

**बऱ्हाणपूर**—मध्यप्रांताच्या नेमाड जिल्ह्यातील तापीथडींतील एक तालुका. यांत १९४ खेडीं आहेत. यांत इतिहासप्रसिद्ध असिरगड किल्ला आहे. बऱ्हाणपूर गांव हें मजबूत तटबंदीचें आहे. लो. सं. सुमारें ४० हजार आहे. तें इंग्रजी राज्यास १८६० सालीं कायमचें जोडलें जोडलें गेलें. येथें जरा

मोडकळीस आलेली चिंची मशीद व अकबराच्या पूर्वीची जामा मशीद असून गांवाच्या बाहेर राजपुरुषांच्या कबरी आहेत.

हें गाव शेख बुऱ्हाणउद्दीन याच्या नांवानें इ. स. १४०० त वसविलें गेलें. १६०० मध्यें अकबरानें हें आपल्या ताब्यांत घेतलें. ऐने-इ-अकबरींत याचें वर्णन आहे. मोंगलांची ही दक्षिणेंतील राजधानी असून एक सुंदर आणि संपन्न नगर म्हणून याचीं वर्णनें येतात. बऱ्हाणपूरला सुती, रेशमी व जरीचें कापड चांगलें होतें.

**बल**—(फोर्स). कोणत्याहि क्रियेला कारक असें जें कारण असतें त्यास प्रेरणाशक्ति किंवा बल असें नांव देण्यांत येतें. गतिशास्त्रांतील विशिष्ट अर्थाप्रमाणें एखाद्या पदार्थास ज्यापासून गति प्राप्त होते अथवा असलेल्या गतींत फरक होतो तीस बल असें म्हणतात. न्यूटनच्या दुसऱ्या गतिनियमाप्रमाणें बलाचें मापन कोणत्याहि पदार्थास विशिष्ट कालामध्यें जी चालना (द्रव्य आणि गति यांचा गुणाकार) मिळते तीवरून करण्यांत येतें. बलाची आकृति सरळ रेषेमध्यें दाखवितां येते व त्या सरळ रेषेवरून तिची स्थिति, दिशा आणि महत्त्व कळून येतें. बल रेषेच्या सुलट किंवा उलट ज्या दिशेनें असेल ती दिशा. दाखविण्याकरितां बाणाची आकृति काढण्यांत येते. बल हें ताण किंवा दाब म्हणजे ओढण्याच्या किंवा पुढें ढकलण्याच्या स्वरूपांतहि असूं शकतें. परंतु या दोन प्रकारच्या बलांमधील भेद आपणांस जेव्हां एखाद्या द्रव्यांतील स्थितिस्थापकतेच्या गुणधर्माचा विचार करावयाचा असतो तेव्हांच लक्षांत घेणें अवश्य असतें.

**बलराम**—वसुदेवपुत्र व कृष्णाग्रज. हा शेषावतार होता. याच्या आईचें नांव रोहिणी. हा गदायुद्धांत प्रवीण असे. नांगर व मुसळ हीं याचीं शस्त्रें; त्यांवरून त्याला हलायुध, मुसली, वगैरे नांवें पडलीं आहेत. हा फार भोळा, उदार व न्यायी असे; पण फार रागीट असे. मद्यपान व अक्षक्रीडा त्याला फार प्रिय असत. याच्या पत्नीचें नांव रेवती होतें. हा दुर्योधनाचा पक्षपाती असे. यानें पुष्कळ यात्रा केल्या. सर्व यादवांचा नाश झालेला पाहून प्रभासक्षेत्रीं यानें योगसाधनानें देहत्याग केला.

**बलरामपूर**—अयोध्या प्रांतांतील सर्वांत मोठी जहागीर. ही गोंडा, बहरैच, लखनौ, फैजाबाद व प्रतापगड या जिल्ह्यांत आहे. क्षेत्रफळ १२६८ चौरस मैल. इ. स. १३७४ त फेरोझशहा तुघ्लखानें बहरैच जिल्ह्याच्या पूर्व भागांतील टोळ्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं पाठविलेला बरियरसा हा या इस्टेटीचा मूळ पुरुष होय. त्याच्यापासून सतरावा पुरुष माधवसिंग यानें राती व कुवाना याच्यामध्यें स्वतःकरितां नवीन जहागीर मिळविली. त्याचा मुलगा बलरामदास यानें बलरामपूर वसविलें. सादतखान हा अयोध्येचा नबाब असतां त्याच्या सत्तेला विरोध करण्यांत बलरामपूरचा सरदार मुख्य होता. सन १७७७ त नवलसिंग स्वतः राजा म्हणवून घेऊं लागला. १८५७ सालच्या बंडांत येथील राजानें इंग्रजांना मदत केल्याबद्दल गोंडा व बहरैच जिल्ह्यांतील बरीच मोठी जहागीर त्याला इंग्रजाकडून मिळाली. मुख्य व्यापारी गांवें बलरामपूर व तुलसीपूर हीं आहेत. देवीपाटण येथें मोठी जत्रा भरते.

बलरामपूर गांवची लोकसंख्या सुमारें २० हजार आहे. जहांगीरच्या कारकीर्दींत बलरामदासानें हें गांव वसविलेलें आहे. पूर्वीच्या महाराजानें बांधिलेलें सुंदर दगडी देऊळ, सर दिग्विजयीसिंगाचा पुतळा असलेली दगडी इमारत व राजवाडा ह्या येथील मोठ्या इमारती होत.

आजचे जहागीरदार महाराज पट्टेश्वरीप्रसादसिंग यांना १९३७ सालीं सर्व अधिकार मिळाले.

**बलसाड**—मुंबई इलाख्यांतील सुरत जिल्ह्याचा दक्षिणेकडील तालुका. यांत बलसाड हें तालुक्याचें गांव व ९५ खेडीं आहेत. लो. सं. १,२२,७६१. हा तालुका समुद्रकांठीं असल्यामुळें येथील हवा नेहमीं आरोग्यकारक असते. बलसाड गांव सुरतच्या दक्षिणेस ४० मैलांवर आहे. हें मुंबई—सुरत फाट्यावर असून औरंगा नदीकांठीं आहे. येथील लो. सं. वीस हजार आहे. पैकीं बरेचसे 'तैस' किंवा बाटून मुसलमान झालेले हिंदू आहेत. ते कापड विणण्याचा धंदा करीत असतात. येथें तयार झालेलें रेशमाचें कापड, इमारती लांकूड, वगैरे माल मुंबईस जातो.

**बलि**—प्रह्लादपुत्र विरोचनाचा मुलगा. हा इंद्रपदासाठीं शंभरावा यज्ञ करीत असतां विष्णूनें वामनाचें रूप घेऊन याच्याजवळून त्रिपादभूमीचें दान मिळविलें व यास पाताळांत घातलें. हा सप्तचिरंजीवांपैकीं एक आहे.

हा दैत्यांचा राजा मोठा बलाढ्य असून यानें स्वर्गलोक जिंकून देवांना पळावयास लाविलें. इंद्राची संपत्ति हरण करून नेत असतां ती समुद्रांत पडली. तेव्हां समुद्रमंथनाचा अवलंब देवदैत्यांनीं केला. या बलीची कथा विविध प्रकारची आहे. बलि हा विष्णुभक्त असल्यानें विष्णूला त्याला मारतां येईना. तेव्हां कपटानें त्याला पाताळांत दडपलें. तेथें बलि राज्य करतो आहे. 'इडापिडा जावो आणि बलीचें राज्य येवो!' अशी एक जुनी म्हण आहे ती बलीचें सुराज्य दर्शविते. कुणबी-शेतकऱ्यांत बलिराजाला मोठा मान आहे.

कार्तिक शुद्ध प्रतिपदेस बलीनें वामनास दान दिलें म्हणून ती तिथि बलिप्रतिपदा म्हणून ओळखली जाते व या दिवशीं बलीची पूजा होते.

या नांवाच्या अनेक पौराणिक व्यक्ति होऊन गेल्या.

**वलिजा**—मद्रास इलाख्यांतील या जातीची संख्या दहा लाखांवर आहे. यांचा धंदा बांगड्या करण्याचा व मोत्यांचे आणि पोंवळयाचे दागिने करण्याचा आहे. कुलनामें सिग्री, गुडारी, जदल, संगानाड व दासिरी अशीं आहेत. एकाच आडनावाच्या लोकांत विवाह होत नाहींत. यांचे पुरोहित जंगम लोक आहेत. पुनर्विवाह निषिद्ध आहे. हे प्रेतांना बसवून पुरतात.

**बलिद्वीप**—इंडोनेशियांतील एक बेट. बलि बेटाची लांबी ९३ मैल व सर्वांत जास्त रुंदी ५० मैल असून क्षे. फ. २०९५ चौरस मैल आहे. १८८२ सालीं बलि हें जावापासून काढून लॉम्बाक बेटाशीं जोडण्यांत आलें असून लॉम्बाक आणि बलि यांची डच रेसिडेन्सी बनविण्यांत आली. बुलेलेंग हें मुख्य शहर आहे. लो. सं. सु. सहा लाख आहे. येथें बरींच सरोवरें व नद्या असून या नद्यांचे येथील लोकांनीं कालवे काढले आहेत. सर्वांत उंच ज्वालामुखी टाबानत, बाङ्र व गुनंग-अनंग हे आहेत. येथील रहिवासी उत्तम शेतकरी व कुशल कारागीर असून विणकाम व हत्यारें करतात. बलि व लॉम्बाक बेटांत अद्याप हिंदु धर्माचा लोप झाला नसून सती जाण्याची चाल आहे. हिंदु धर्मांतील चार वर्ण व पांचवी अस्पृश्य (चांडाळ) जात येथें आहे. या धर्मांत बौद्ध धर्माचें मिश्रण होऊन व थोड्या अधिक प्रमाणानें भूतपिशाच यांवरील श्रद्धेमुळें या धर्मांत थोडा फरक झाला आहे. हे लोक ताडपत्रावर लिहितात. धर्मग्रंथ प्राचीन जावा (कवि) भाषेंत लिहिले आहेत. १ ल्या शतकाच्या पूर्वार्धांत येथें हिंदु वसाहत असावी व हिंदूंनींच 'बलि' संज्ञा ही दिली असावी. येथें तांदूळ, कॉफी, तंबाखू, कोको व नीळ यांची लागवड करतात. सोनें गाळणें, हत्यारें व वाद्यें करणें, लांकडाचें कोरीव काम, कलाबतू व जरतारी काम येथें होतें.

या द्वीपाची प्राचीन संस्कृति भारतीय संस्कृतिच कशी आहे, हें पुढील वाङ्मय आणि समाज यांसंबंधींच्या माहितीवरून दिसून येणार आहे. (जावा पाहा.)

बलिद्वीपांतील कविवाङ्मय—बलिद्वीपांत चारी वेदांच्या संहिता पूर्ण नाहींत, परंतु चारहि वेदांतील बराच आणि महत्त्वाचा भाग आहे. जावा बेटांतून येथील पुरोहित आले; तेव्हां जावामध्यें त्यांच्या पूर्ण संहिता असण्याचा संभव आहे. तेथील पुरोहित वेदांस फार गुप्त ठेवतात व ते शिकवितांनाहि गुप्तपणाची फार काळजी घेतात. त्यांच्या कांहीं भागावर बलि अथवा कविभाषेंतलि टीका असावी. वेदाखालोखाल बलीमध्यें ब्रह्माण्डपुराण हा ग्रंथ आढळतो. बलिद्वीपांत भारतवर्षीय ब्राह्मणांतील फक्त एक पंथ (शैव) होता आणि त्या लोकांचे जे पूर्वज प्रथम जावामध्यें आले त्यांनीं ब्रह्माण्डपुराण हाच आपला काय तो पुराणग्रंथ मानिला असावा; कारण त्यांना अद्यापिहि इतर पुराणांचीं नांवें माहीत नाहींत. बलिद्वीपांतलि पुरोहित हा ग्रंथ फार पवित्र मानतात व तो फार गुप्त ठेवतात. वेदांप्रमाणें या ग्रंथावरहि बलिभाषेंत टीका आहे.

ग्रंथविषयक सोपानपरंपरेंत वरील ग्रंथानंतर तुतुर अथवा तात्त्विक (तन्त्र) ग्रंथ येतात. यांचे दोन वर्ग आहेत : (१) पुरोहित वर्गाकरितां, व (२) इतर वर्णांकरितां, विशेषतः दुसऱ्या व तिसऱ्या वर्णांकरितां.

पहिला वर्ग—(१) बुवन संक्षेप, (२) बुवन कोस, (३) बृहस्पति तत्त्व, (४) सारसमुच्चय, (५) तत्त्वज्ञान, (६) कंदपत (?), (७) सजोक्रांति, व (८) तंत्रक मोक्ष.

दुसरा वर्ग—(१) राजनीति, (२) नीतिपथ अथवा नीतिशास्त्र, (३) कामन्दकनीति, (४) नरनाव्य, (५) रणजन्य (? रणयज्ञ), (६) तिथिदशगुणित.

यानंतर संस्कृत ग्रंथांचीं कविभाषेंतलि भाषांतरें येतात. त्यांत प्रथम रामायणाचें रूपांतर व इतर महाकाव्यांचीं रूपांतरें हीं येतात. यांतील रामायणाचें रूपांतर तनुकुंभग याचा पिता राजकुसुम योगीश्वर याच्या व 'स्मरदहन' काव्याचा कर्ता दार्मज या कवीच्या हातून झालें. भारतीय रामायणांत ७ काण्डें आहेत, परंतु कवि रामायणांत पहिल्या सहा कांडांतीलच मजकूर आहे व त्याचे २५ सर्ग केले आहेत. ७ वें उत्तरकाण्ड हें कथेचा भाग नसून निराळाच ग्रंथ आहे व त्याचा कर्ताहि वाल्मीकिच आहे अशी समजूत आहे. बाकीच्या रामायणापासून हा भाग अलग राहिला आहे, यावरूनच तो भाग भरतखंडांतूनच रामायणाचा भाग म्हणून आला नसून निराळा ग्रंथ म्हणून आला असावा असें फ्रेडरिक याचें मत आहे. यावरून वेबरनें असें अनुमान काढलें आहे कीं, ज्या वेळीं जावामध्यें रामायणाचा प्रवेश झाला त्या वेळीं भरतखंडांतील रामायणास उत्तरकाण्ड जोडलें गेलें नव्हतें.

बलिद्वीपामध्यें महाभारताचें नांव अज्ञात दिसतें, म्हणजे कदाचित् ज्या वेळीं ख्रिस्ती शकाच्या ५०० वर्षांच्या सुमारास भारतीय लोक जावामध्यें आले त्या वेळीं भरतखंडामध्यें महाभारताचें नांव अज्ञात असल्याचा संभव आहे असें वेबर म्हणतो. परंतु महाभारताच्या कर्त्याचें नांव व त्याच्या १८ पर्वांचीं नांवें जावामध्यें माहीत असून त्यांपैकीं ६ पर्वें पूर्ण होतीं व २ दोन अर्धवट होतीं.

वर दिलेलीं काण्डें किंवा पर्वें मुख्य असून विशेषतः पवित्र व धार्मिक मानण्यांत येतात. परंतु कांहीं ग्रंथांनाहि पर्व अशी संज्ञा आहे. पण त्यांना पवित्र मानण्यांत येत नाहीं. त्या ग्रंथांचीं नांवें कपिपर्व, अगस्तिपर्व, चंपक अथवा केतकीपर्व, बारतयुद्ध (भारतयुद्ध), विवाह, स्मरदहन, सुगानसंतक, बोमकाव्य, अर्जुनविजय, सुतसोम, मानवधर्मशास्त्र, अगस्त्यपर्व, अर्जुनप्रलब्ध, अर्जुनसहस्रबाहु, अर्जुनविजय, अर्जुनविवाह, भारतयुद्ध, भीष्मपर्व, भौमकाव्य, ब्रह्मांडपुराण, कुंतियज्ञ, नवरुचि अथवा अवरुचि.

वर वर्णन केलेल्या संस्कृत व कवि वाङ्मयाखेरीज बालि बेटामध्यें बरेंचसें जावा-बलि वाङ्मय आहे. तें हिंदुस्थानांतील ग्रंथांच्या आधारें रचलेलें नसून जे हिंदू लोक जावा व बलि बेटांत गेले त्यांनीं स्वतःच रचलेलें आहे. यामध्यें निरनिराळ्या प्रकारचे ग्रंथ येतात. प्रथम बाबद किंवा ऐतिहासिक बखरी हा वर्ग येतो. हे ग्रंथ अंशतः गद्यांत व अंशतः किडुंगमध्यें (जावा-बलि बेटांतील काव्याचा एक नवीन छन्द) असतात.

याखेरीज पॉलिनेशियामधील पुराणकथा किडुंग छंदोबद्ध आढळतात. तसेंच आत्म्याचें पुनरवतरण (जन्मपरंपरा) या विषयावर व कांहीं तात्त्विक विषयांवर किरकोळ ग्रंथ आहेत. येथें बालि बेटांतील पंचांग या महत्त्वाच्या ग्रंथाचा उल्लेख केला पाहिजे.

बलिद्वीपस्थ ब्राह्मणांची उत्पत्ति—बलिद्वीपांतील ब्राह्मण आपली उत्पत्ति पादण्ड बाहु राहु राबु यापासून सांगतात. याची उत्पत्ति केदिरीपासून दिसते. त्यांचे वंशज मयपहित येथें गेले व तेथून बलिद्वीपांत गेले. जावानी माहिती अशी आहे कीं, मयपहितच्या पाडावापूर्वी कांहीं शैव ब्राह्मण तेथें आले होते ते त्या शहराच्या नाशानंतर पूर्वेकडे आणि बलिद्वीपाकडे निघून गेले. ब्राह्मणांचा पोशाख धोतर, उपरणें व तांबडी टोपी हा होय. जानवें, रुद्राक्षमाला व इतर कर्णाभरणें व केशाभरणें हीं ब्राह्मणांच्या अंगावर दिसतात. ते माणिकाच्या अंगठ्या वापरतात. येथें माणिकास हिऱ्यापेक्षां अधिक महत्त्व आहे; कारण त्याच्या अंगीं अधिक दैवी शक्ति आहे असा समज. तेथें उच्चवर्णांतील स्त्रियांस वेदाधिकार आहे. ब्राह्मणांच्या ज्या हलक्या वर्णांच्या स्त्रिया असतील त्यांस नवऱ्याच्या योगानें थोरपणा प्राप्त होतो. ब्राह्मणांच्या इतर वर्णांच्या बायकांना स्वतःचें व मुलांचें पोट स्वतःच भरावें लागतें. तथापि त्यांच्या मृत्यूनंतर त्यांची क्रिया ब्राह्मण स्त्रियांप्रमाणें होते आणि त्यांचा पितृगणांत प्रवेश होतो.

क्षत्रिय—बलीमध्यें क्षत्रिय फारच थोडे आहेत. देव अगुंग आणि त्याच्या घराण्यास क्षत्रिय म्हणतात; पण इतर घराणीं वैश्य समजलीं जातात. इ. स. १६३३च्या सुमारास बलिद्वीपांतील सर्व क्षत्रिय घराणीं व राजघराणीं देव अगुंग याच्या सत्तेखालीं होतीं, परंतु पुढें युद्धामुळें ही सत्ता बरीच नष्ट होत गेली व पुढें केवळ नामधारी सत्ता आणि ती देखील कांहीं थोड्या राजघराण्यांवर कायम राहिली. ज्या क्षत्रियांमध्यें शूद्र रक्ताचा अंश बराच असतो त्यास देस्सक, प्रदेव आणि पुंगकन अशीं नांवें आहेत. सर्व क्षत्रियवर्ग देव अगुंगाचा वंशज म्हणवितो. बलिद्वीपांतील पहिला देव अगुंग कोण होता याबद्दल उशना जावामध्यें कांहीं माहिती आढळत नाहीं. बलिद्वीपांत (१८४९-५० सालीं) निरनिराळीं ७ घराणीं निरनिराळ्या प्रांतांवर राज्य करीत होतीं.

वैश्य—बलिद्वीपांत राजकीय सत्ता वैश्य जातीच्या हातांत बरीच गेली होती. करेंग असेम, बोलेलेंग, मेंगुइ, तबनन आणि बदोंग व लॉंबाक येथील राजे वैश्य जातीचे होते. त्यांची संख्याहि क्षत्रियांपेक्षां अधिक आहे. शूद्रांवर मात्र बऱ्याच कामाची सक्ती असून त्यांना हक्क मुळींच नाहींत. राजा अथवा पुंगव यांना शूद्रांच्या घरांतून वाटेल ती वस्तु नेण्याचा हक्क आहे. प्रक्बेल, पम्बकेल आणि पर्बकेल या जाती शूद्रांपेक्षां वरच्या दर्जाच्या आहेत. हाच दर्जा युरोपीय लोकांसहि देण्यात आला आहे. परंतु त्यांचें स्थान वरील तीन वर्ण आणि शूद्र यांच्या दरम्यान आहे; कारण ते द्विज नाहींत.

शूद्र—बलिद्वीपांतील शूद्र ही जावा व बलि द्वीपांतील शूद्रांची संतति आहे. जावांतील शूद्रांचा वर्षारंभ बलिद्वीपांतील शूद्रांपेक्षां सहा दिवस लवकर होतो, पण राजदरबारांत बलिवर्षारंभच मान्य आहे. बलिद्वीपांत सर्वच जाती एक एक पायरी खालीं आल्या आहेत. मूळ ब्राह्मणांची उत्पत्ति पादण्ड दंग ह्यंग कपाकिसन यापासून झाली व त्याच्या शापानेंच ते क्षत्रिय बनले व खालचे सर्व वर्ग एक एक पायरी खालीं आले असें म्हणतात. ब्राह्मण ब्राह्मणत्वापासून 'चुते' (च्युत) होतो तरी त्याला (ब्राह्मण च्युताला) बराच मान मिळतो. शूद्रांचें पौरोहित्य सामान्य पुरोहित किंवा शूद्रांतील वेद जाणणारे 'संगुहु' हे करितात. या संगुहूंना जर वेदांचें ज्ञान खरोखरीच असेल तर पूर्वी हे ब्राह्मण असले पाहिजेत. शूद्र जातींवर उच्च जातींचा, विशेषतः अधिकारी वर्गांचा जुलूम फारच होतो. या जुलुमापासून सुटका करून घेण्याचा एकच मार्ग म्हणजे राज्यांतून पळून जाणें.

बलिद्वीपामध्यें शालिवाहन शक चालू आहे व तेथें सण व उत्सव ठरविण्याच्या कामीं हिंदी पंचांगाचाच उपयोग करतात. त्यांचे महिने चांद्र असून वर्षारंभ इकडीलप्रमाणें मार्च महिन्यांतच बहुधा होतो. तथापि त्यांना सौर वर्षाबरोबर मेळ बसविणें आतां बरोबर ठाऊक नाहीं. त्यांच्या महिन्यांच्या नांवांपैकीं ज्येष्ठ व आषाढ हीं इकडीलच आहेत. बाकीचीं क्रमवाचक

कार्तिक शुद्ध प्रतिपदेस बलीनें वामनास दान दिलें म्हणून ती तिथि बलिप्रतिपदा म्हणून ओळखली जाते व या दिवशीं बलीची पूजा होते.

या नांवाच्या अनेक पौराणिक व्यक्ति होऊन गेल्या.

**बलिजा**—मद्रास इलाख्यांतील या जातीची संख्या दहा लाखांवर आहे. यांचा धंदा बांगड्या करण्याचा व मोत्यांचे आणि पोंवळयाचे दागिने करण्याचा आहे. कुलनामें सिग्री, गुडारी, जदल, संगानाड व दासिरी अशीं आहेत. एकाच आड-नावाच्या लोकांत विवाह होत नाहींत. यांचे पुरोहित जंगम लोक आहेत. पुनर्विवाह निषिद्ध आहे. हे प्रेतांना बसवून पुरतात.

**बलिद्वीप**—इंडोनेशियांतील एक बेट. बलि बेटाची लांबी ९३ मैल व सर्वांत जास्त रुंदी ५० मैल असून क्षे. फ. २०९५ चौरस मैल आहे. १८८२ सालीं बलि हें जावापासून काढून लॉम्बाक बेटाशीं जोडण्यांत आलें असून लॉम्बाक आणि बलि यांची उच रेसिडेन्सी बनविण्यांत आली. बुलेलेंग हें मुख्य शहर आहे. लो. सं. सु. सहा लाख आहे. येथें बरींच सरोवरें व नद्या असून या नद्यांचे येथील लोकांनीं कालवे काढले आहेत. सर्वांत उंच ज्वालामुखी टाबानत, बाइर व गुनंग-अनंग हे आहेत. येथील रहिवासी उत्तम शेतकरी व कुशल कारागीर असून विण-काम व हत्यारें करतात. बलि व लॉम्बाक बेटांत अद्याप हिंदु धर्माचा लोप झाला नसून सती जाण्याची चाल आहे. हिंदु धर्मा-तील चार वर्ण व पांचवी अस्पृश्य (चांडाळ) जात येथें आहे. या धर्मांत बौद्ध धर्माचें मिश्रण होऊन व थोड्या अधिक प्रमाणानें भूतपिशाच यांवरील श्रद्धेमुळें या धर्मांत थोडा फरक झाला आहे. हे लोक ताडपत्रावर लिहितात. धर्मग्रंथ प्राचीन जावा (कवि) भाषेंत लिहिले आहेत. १ ल्या शतकाच्या पूर्वा-र्धांत येथें हिंदु वसाहत असावी व हिंदूंनींच 'बलि' संज्ञा ही दिली असावी. येथें तांदूळ, कॉफी, तंबाखू, कोको व नीळ यांची लागवड करतात. सोनें गाळणें, हत्यारें व वाद्यें करणें, लांकडाचें कोरीव काम, कलाबतू व जरतारी काम येथें होतें.

या द्वीपांची प्राचीन संस्कृति भारतीय संस्कृतिच कशी आहे, हें पुढील वाङ्मय आणि समाज यांसंबंधींच्या माहितीवरून दिसून येणार आहे. (जावा पाहा.)

बलिद्वीपांतील कविवाङ्मय–बलिद्वीपांत चारी वेदांच्या संहिता पूर्ण नाहींत, परंतु चारहि वेदांतील बराच आणि महत्त्वाचा भाग आहे. जावा बेटांतून येथील पुरोहित आले; तेव्हां जावा-मध्यें त्यांच्या पूर्ण संहिता असण्याचा संभव आहे. तेथील पुरोहित वेदांस फार गुप्त ठेवतात व ते शिकवितांनाहि गुप्त-पणाची फार काळजी घेतात. त्यांच्या कांहीं भागावर बलि अथवा कविभाषेंतील टीका असावी. वेदाखालोखाल बलीमध्यें ब्रह्माण्डपुराण हा ग्रंथ आढळतो. बलिद्वीपांत भारतवर्षीय ब्राह्मणां-तील फक्त एक पंथ (शैव) होता आणि त्या लोकांचे जे पूर्वज प्रथम जावामध्यें आले त्यांनीं ब्रह्माण्डपुराण हाच आपला काय तो पुराणग्रंथ मानिला असावा; कारण त्यांना अद्यापिहि इतर पुराणांचीं नांवें माहीत नाहींत. बलिद्वीपांतलि पुरोहित हा ग्रंथ फार पवित्र मानतात व तो फार गुप्त ठेवतात. वेदांप्रमाणें या ग्रंथावरहि बलिभाषेंत टीका आहे.

ग्रंथविषयक सोपानपरंपरेंत वरील ग्रंथानंतर तुतुर अथवा तात्त्विक (तन्त्र) ग्रंथ येतात. यांचे दोन वर्ग आहेत : (१) पुरोहित वर्गाकरितां, व (२) इतर वर्णांकरितां, विशेषतः दुसऱ्या व तिसऱ्या वर्णांकरितां.

पहिला वर्ग—(१) बुवन संक्षेप, (२) बुवन कोस, (३) बृहस्पति तत्त्व, (४) सारसमुच्चय, (५) तत्त्वज्ञान, (६) कंद-पत (ष्ट), (७) सजोक्त्रांति, व (८) तंत्रक मोक्ष.

दुसरा वर्ग—(१) राजनीति, (२) नीतिपथ अथवा नीति-शास्त्र, (३) कामन्दकनीति, (४) नरनाट्य, (५) रणजन्य (? रणयज्ञ), (६) तिथिदशगुणित.

यानंतर संस्कृत ग्रंथांचीं कविभाषेंतील भाषांतरें येतात. त्यांत प्रथम रामायणाचें रूपांतर व इतर महाकाव्यांचीं रूपांतरें हीं येतात. यांतील रामायणाचें रूपांतर तनुकुंभग याचा पिता राजकुसुम योगीश्वर याच्या व 'स्मरदहन' काव्याचा कर्ता दार्मज या कवीच्या हातून झालें. भारतीय रामायणांत ७ काण्डें आहेत, परंतु कवि रामायणांत पहिल्या सहा कांडांतीलच मजकूर आहे व त्याचे २५ सर्ग केले आहेत. ७ वें उत्तरकाण्ड हें कथेचा भाग नसून निराळाच ग्रंथ आहे व त्याचा कर्ताहि वाल्मीकिच आहे अशी समजूत आहे. बाकीच्या रामायणापासून हा भाग अलग राहिला आहे, यावरूनच तो भाग भरतखंडांतूनच रामायणाचा भाग म्हणून आला नसून निराळा ग्रंथ म्हणून आला असावा असें फ्रेडरिक याचें मत आहे. यावरून वेबरनें असें अनुमान काढलें आहे कीं, ज्या वेळीं जावामध्यें रामायणाचा प्रवेश झाला त्या वेळीं भरतखंडांतील रामायणास उत्तरकाण्ड जोडलें गेलें नव्हतें.

बलिद्वीपामध्यें महाभारताचें नांव अज्ञात दिसतें, म्हणजे कदाचित् ज्या वेळीं ख्रिस्ती शकाच्या ५०० वर्षांच्या सुमारास भारतीय लोक जावामध्यें आले त्या वेळीं भरतखंडामध्यें महा-भारताचें नांव अज्ञात असल्याचा संभव आहे असें वेबर म्हणतो. परंतु महाभारताच्या कर्त्याचें नांव व त्याच्या १८ पर्वांचीं नांवें जावामध्यें माहीत असून त्यांपैकीं ६ पर्वें पूर्ण होतीं व २ दोन अर्धवट होतीं.

वर दिलेली काण्डें किंवा पर्वें मुख्य असून विशेषतः पवित्र व धार्मिक मानण्यांत येतात. परंतु कांहीं ग्रंथांनाहि पर्व अशी संज्ञा आहे. पण त्यांना पवित्र मानण्यांत येत नाहीं. त्या ग्रंथांचीं नांवें कपिपर्व, अगस्तिपर्व, चंपक अथवा केतकीपर्व, वारतयुद्ध (भारतयुद्ध), विवाह, स्मरदहन, सुगानसंतक, चोमकाव्य, अर्जुनविजय, सुतसोम, मानवधर्मशास्त्र, अगस्त्यपर्व, अर्जुनप्रलब्ध, अर्जुनसहस्रबाहु, अर्जुनविजय, अर्जुनविवाह, भारतयुद्ध, भीष्मपर्व, भौमकाव्य, ब्रह्मांडपुराण, कुंतियज्ञ, नवरुचि अथवा अवरुचि.

वर वर्णन केलेल्या संस्कृत व कवि वाङ्मयाखेरीज बालि बेटामध्यें बरेंचसें जावा–बलि वाङ्मय आहे. तें हिंदुस्थानांतील ग्रंथांच्या आधारें रचलेलें नसून जे हिंदू लोक जावा व बलि बेटांत गेले त्यांनीं स्वतःच रचलेलें आहे. यामध्यें निरनिराळ्या प्रकारचे ग्रंथ येतात. प्रथम बाबद किंवा ऐतिहासिक बखरी हा वर्ग येतो. हे ग्रंथ अंशतः गद्यांत व अंशतः किडुंगमध्यें (जावा-बलि बेटांतील काव्याचा एक नवीन छन्द) असतात.

याखेरीज पॉलिनेशियामधील पुराणकथा किडुंग छंदोबद्ध आढळतात. तसेंच आत्म्याचें पुनरवतरण (जन्मपरंपरा) या विषयावर व कांहीं तात्त्विक विषयांवर किरकोळ ग्रंथ आहेत. येथें बालि बेटांतील पंचांग या महत्त्वाच्या ग्रंथाचा उल्लेख केला पाहिजे.

बलिद्वीपस्थ ब्राह्मणांची उत्पत्ति—बलिद्वीपांतील ब्राह्मण आपली उत्पत्ति पादण्ड बाहु रहु रावु यापासून सांगतात. याची उत्पत्ति केदिरीपासून दिसते. त्यांचे वंशज मयपहित येथें गेले व तेथून बलिद्वीपांत गेले. जावानी माहिती अशी आहे कीं, मयपहितच्या पाडावापूर्वी कांहीं शैव ब्राह्मण तेथें आले होते ते त्या शहराच्या नाशानंतर पूर्वेकडे आणि बलिद्वीपाकडे निघून गेले. ब्राह्मणांचा पोशाख धोतर, उपरणें व तांबडी टोपी हा होय. जानवें, रुद्राक्षमाला व इतर कर्णाभरणें व केशाभरणें हीं ब्राह्मणांच्या अंगावर दिसतात. ते माणिकाच्या अंगठ्या वापरतात. येथें माणिकास हिऱ्यापेक्षां अधिक महत्त्व आहे; कारण त्याच्या अंगीं अधिक दैवी शक्ति आहे असा समज. तेथें उच्चवर्णांतील स्त्रियांस वेदाधिकार आहे. ब्राह्मणांच्या ज्या हलक्या वर्णांच्या स्त्रिया असतील त्यांस नवऱ्याच्या योगानें थोरपणा प्राप्त होतो. ब्राह्मणांच्या इतर वर्णाच्या बायकांना स्वतःचें व मुलांचें पोट स्वतःच भरावें लागतें. तथापि त्यांच्या मृत्यूनंतर त्यांची क्रिया ब्राह्मण स्त्रियांप्रमाणें होते आणि त्यांचा पितृगणांत प्रवेश होतो.

क्षत्रिय—बलीमध्यें क्षत्रिय फारच थोडे आहेत. देव अगुंग आणि त्याच्या घराण्यास क्षत्रिय म्हणतात; पण इतर घराणीं वैश्य समजलीं जातात. इ. स. १६३३च्या सुमारास बलिद्वीपांतील सर्व क्षत्रिय घराणीं व राजघराणीं देव अगुंग याच्या सत्तेखालीं होतीं, परंतु पुढें युद्धामुळें ही सत्ता बरीच नष्ट होत गेली व पुढें केवळ नामधारी सत्ता आणि ती देखील कांहीं थोड्या राजघराण्यांवर कायम राहिली. ज्या क्षत्रियांमध्यें शूद्र रक्ताचा अंश बराच असतो त्यास देस्सक, प्रदेव आणि पुंगकन अशीं नांवें आहेत. सर्व क्षत्रियवर्ग देव अगुंगाचा वंशज म्हणवितो. बलिद्वीपांतील पहिला देव अगुंग कोण होता याबद्दल उशना जावामध्यें कांहीं माहिती आढळत नाहीं. बलिद्वीपांत (१८४९–५० सालीं) निरनिराळीं ७ घराणीं निरनिराळ्या प्रांतांवर राज्य करीत होतीं.

वैश्य—बलिद्वीपांत राजकीय सत्ता वैश्य जातीच्या हातांत बरीच गेली होती. करेंग असेम, बोलेलेंग, मेंगुइ, तबनन आणि बदोंग व लँबाक येथील राजे वैश्य जातीचे होते. त्यांची संख्याहि क्षत्रियांपेक्षां अधिक आहे. शूद्रांवर मात्र बऱ्याच कामाची सक्ती असून त्यांना हक्क मुळींच नाहींत. राजा अथवा पुंगव यांना शूद्रांच्या घरांतून वाटेल ती वस्तु नेण्याचा हक्क आहे. प्रक्बेल, पम्बकेल आणि पर्बेकेल या जाती शूद्रांपेक्षां वरच्या दर्जाच्या आहेत. हाच दर्जा युरोपीय लोकांसहि देण्यात आला आहे. परंतु त्यांचें स्थान वरील तीन वर्ण आणि शूद्र यांच्या दरम्यान आहे; कारण ते द्विज नाहींत.

शूद्र—बलिद्वीपांतील शूद्र ही जावा व बलि द्वीपांतील शूद्रांची संतति आहे. जावांतील शूद्रांचा वर्षारंभ बलिद्वीपांतील शूद्रांपेक्षां सहा दिवस लवकर होतो, पण राजदरबारांत बलिवर्षारंभच मान्य आहे. बलिद्वीपांत सर्वच जाती एक एक पायरी खालीं आल्या आहेत. मूळ ब्राह्मणांची उत्पत्ति पादण्ड दंग ह्यंग कपाकिसन यापासून झाली व त्याच्या शापानेंच ते क्षत्रिय बनले व खालचे सर्व वर्ग एक एक पायरी खालीं आले असें म्हणतात. ब्राह्मण ब्राह्मणत्वापासून 'चुते' (च्युत) होतो तरी त्याला (ब्राह्मण च्युताला) बराच मान मिळतो. शूद्रांचें पौरोहित्य सामान्य पुरोहित किंवा शूद्रांतील वेद जाणणारे 'संगुहु' हे करितात. या संगुहूंना जर वेदांचें ज्ञान खरोखरीच असेल तर पूर्वी हे ब्राह्मण असले पाहिजेत. शूद्र जातींवर उच्च जातींचा, विशेषतः अधिकारी वर्गांचा जुलूम फारच होतो. या जुलुमापासून सुटका करून घेण्याचा एकच मार्ग म्हणजे राज्यांतून पळून जाणें.

बलिद्वीपामध्यें शालिवाहन शक चालू आहे व तेथें सण व उत्सव ठरविण्याच्या कामीं हिंदी पंचांगाचाच उपयोग करतात. त्यांचे महिने चांद्र असून वर्षारंभ इकडीलप्रमाणें मार्च महिन्यांतच बहुधा होतो. तथापि त्यांना सौर वर्षाबरोबर मेळ बसविणें आतां बरोबर ठाऊक नाहीं. त्यांच्या महिन्यांच्या नांवांपैकीं ज्येष्ठ व आषाढ हीं इकडीलच आहेत. बाकीचीं क्रमवाचक

संख्याविशेषणें आहेत. इतर चावर्तीत ते वर्लीतीलच एक निराळें पंचांग वापरतात. यांत ३५ दिवसांचा एक असे १० महिने आहेत. म्हणजे हें सरासरी चांद्र वर्ष आहे. राहूनें सूर्याला ग्रासिलें म्हणजे ग्रहण लागतें, अशीच कल्पना येथें आहे. तेथें एक 'बृग गर्ग' नांवाचा करणग्रंथ आहे. परंतु त्याबद्दल विशेष माहिती उपलब्ध नाहीं. गर्गसंहितेशीं या ग्रंथाचा कदाचित् कांहीं संबंध असेल.

**बलिया**—संयुक्त प्रांतांत बनारस विभागामधील एक जिल्हा. क्षे. फ. ११८३ चौ. मैल. यांतून गंगा, घोग्रा व छोटी शरयू या नद्या वाहतात. सर्व जमीन फार सुपीक झालेली आहे. मगधाच्या प्राचीन हिंदु राज्यांत बलियाचा समावेश होत होता. जिल्ह्याची लो. सं. १०,५३,८८०. भात हें मुख्य पीक होय. शिवाय गहूं, हरभरा, वाटाणे, वगैरे पिकें होतात. गांवाची लो. सं. सुमारें वीस हजार. वाल्मीकि ऋषीच्या नांवापासून बलिया हें नांव पडलें असावें. कार्तिकी पौर्णिमेस येथें मोठी जत्रा भरत असते. येथें साखरेचे व कापडाचे कारखाने आहेत.

**बलुचिस्तान**—पाकिस्तानचा एक भाग. याला ६०० मैल लांबीचा समुद्रकिनारा आहे. १९४७ सालच्या फाळणीपूर्वी याचे तीन भाग असत: (१) ब्रिटिश बलुचिस्तान—हा सर्वांत लहान असे. १८७९ पासून तो ब्रिटिश अमलाखालीं आला. क्षे. फ. ९४७६ चौ. मैल. यानंतर (२) ब्रिटिश एजन्सीखालचा प्रदेश. क्षे. फ. ४४,३४५ चौ. मै. व शेवटीं सर्वांत मोठा भाग (३) स्थानिक स्वतंत्र संस्थानें—कलात व लासबेला यांचा प्रदेश. क्षे. फ. ७९,५४६ चौ. मैल. एकूण क्षेत्रफळ १,३४,००२. वस्ती बलुची, पठाणी व इराणी यांची असून लोकसंख्या (१९४१) ८,५७,८३५ आहे.

पाऊस फारच कमी पडतो. लोक शेतकी, गुरें पाळणें व वाहतूक यांवर उदरनिर्वाह करतात. मकराणच्या किनाऱ्यावर मच्छीमारीचा धंदा मोठ्या प्रमाणांत चालतो. डोंगराळ प्रदेशांत फळफळावळ होते. कोळसा, क्रोमाइट व चुना हीं खनिजें निघतात. या प्रांतांत शिक्षण फारच कमी आहे. कलात पाहा.

पाकिस्तान होण्यापूर्वी येथील लोकसंख्येमध्यें हिंदूंचें प्रमाण दर हजारीं ४७ असे. बलुचिस्तानचा व सिंध प्रांताचा इतिहास फारच संलग्न आहे. अफगाणिस्तानांतील शेवटच्या हिंदु राज्याची परिसमाप्ति ११ व्या शतकांत झाली. बलुचिस्तानचें हिंदु राज्यहि त्याच सुमारास गेलें. राजानें आपल्यावर परचक्र आलें असतां कित्येक आसपासचे डोंगरी धनगर मदतीला बोलाविले आणि त्या डोंगरी धनगरांनीं नंतर तें राज्य आपल्या ताब्यांत घेतलें. हे डोंगरी धनगर ब्राह्मणी धर्माचे हिंदू नव्हतेच. ते जर मुसलमान नसतील तर बौद्ध असण्याचा संभव आहे. पण ते पुढें महंमदीय झाले. बलुचिस्तानात हिंदुत्वाचा आणखी एक अवशेष म्हणजे बेला नांवाचें एक शहर आहे. हें सिंध व इराण यांमध्यें चालणाऱ्या व्यापाराचें केंद्र आहे. यास लासबेला असेंहि म्हणतात. 'लास' हें लासी ऊर्फ लुमडी या रजपूत वंशाच्या नांवावरून लागलेलें उपपद आहे. सातव्या शतकामध्यें एक बौद्ध भिक्षु लासबेला येथें राज्य करीत होता. त्या वेळेस बलुचिस्तानांतील सर्व गंडावा प्रांत हा बुद्धानुयायी होता व सिंधमधील अरब राजघराणीं मुसलमान बनलेल्या रजपुतांनीं हांकलून दिलीं व त्यांपैकीं एक रजपूत घराणें पुढें पुढें सरकत चाललें आणि त्यानें बेला येथें राज्य स्थापिलें. गंडावा प्रांताशिवाय मकरान नांवाचा एक प्रांत बलुचिस्तानांत आहे. त्या प्रांतावर बलुचिस्तानाच्या खानाचा नामधारी अमल आहे. येथील मुख्य जात म्हटली म्हणजे 'गिचकी' ही होय. गिचकी हे आपणांस रजपूत वंशाचेच म्हणवितात, आणि ते सतराव्या शतकांत राजपुतान्यांतून आम्हांस हांकलून दिल्यामुळें येथें येऊन आम्हीं वसाहत केली, असें सांगतात.

**बलुतेदार**—हे बारा असतात. अलुतीबलुती हा लेख पाहा.

**बल्ख**—प्राचीन वाहीक अथवा वाल्हीक. हें एक अफगाणतुर्कस्तानातील शहर आहे. लो. सं. २०,०००. हल्लींचें बल्ख व जुनें बॅक्ट्रा अथवा झेनिस्पा हीं शहरें एकच होत. या शहराला 'शहराची आई' असें म्हणतात. फारसी रोम्युलस कैमूर यानें याचा पाया घातला, अशी पौराणिक दंतकथा आहे. हें शहर फार पुरातन काळीं एक बटाना, निनेव्हे व बाबिलोन या शहरांचें प्रतिस्पर्धी एक शहर होतें. बराच काळपर्यंत हें शहर झरथुष्ट्री (पारशी) धर्माचें आद्य पीठ होतें. ह्यूएनत्संग याच्या स्मरणवहीवरून त्याच्या प्रवासाच्या वेळीं (७ व्या शतकांत) शंभर बौद्ध मठ, ३००० बौद्ध धर्मानुयायी व पुष्कळसे स्तूप व इतर धार्मिक इमारती येथें होत्या. अतिशय प्रख्यात इमारत नवविहार होय. या मठांत बुद्धाचा फार मौल्यवान् पुतळा होता. सन १२२० मध्यें चेंगिजखानानें या शहराची लूट केली, लोकांची कत्तल उडविली व युद्धोपयोगी सर्व इमारती जमीनदोस्त करून टाकल्या.

**बल्गेरिया**—युरोपमधला एक देश. याच्या पूर्वेस काळा समुद्र आहे व बाकीच्या बाजूंस रुमानिया, युगोस्लाव्हिया, व ग्रीस यांच्या सरहद्दी लागून आहेत. क्षेत्रफळ ४२,८०८ चौरस मैल. लो. सं. ६५,४९,६६४. सोफिया हें राजधानीचें ठिकाण व वर्णा हें एक मोठें बंदर आहे. प्रदेश डोंगराळ असूनहि जमीन सुपीक आहे. लोकांचा मुख्य व्यवसाय शेती. गहूं, बार्ली, ओट, राय, बटाटे, तंबाखू, धान्यें, फळें, हीं मुख्य पिकें होत. रेशीम आणि गुलाबी अत्तरें यांची मोठी

पैदास आहे. खनिजांत अत्यंत महत्त्वाचा म्हणजे कोळसा आहे. तांबेंहि थोडें निघतें. या देशांत स्लाव्ह शेतकऱ्यांचाच विशेष भरणा आहे.

व्होल्गा नदीकांठीं राहणाऱ्या फिनिश वंशाच्या लोकांनीं इ. स. ६८० मध्यें येथें राज्य स्थापन केलें व तें १०१० मध्यें बायझन्टाइन लोकांनीं जिंकून घेतलें. ११८६त हा देश स्वतंत्र झाला. पण १४ व्या शतकाच्या अखेरीस तुर्कांच्या ताब्यांत गेला. पुढें फार काळानंतर रशिया आणि तुर्कस्तान यांमध्यें युद्ध झालें तेव्हां बल्गेरिया पुन्हां स्वतंत्र झाला (१८७८). पहिल्या महायुद्धांत हा जर्मनीच्या बाजूचा असल्यानें त्याला कांहीं प्रदेश गमवावा लागला. दुसऱ्या महायुद्धांत तो अक्ष राष्ट्रांच्या बाजूस होता व १९४४ सालीं दोस्तांना शरण गेला. त्यानंतर तो आतां रशियाच्या तंत्रानें असतो.

बल्गेरियन भाषा स्लाव्ह भाषावर्गांतील आहे. हिच्या जुनी व नवी अशा दोन बोली आहेत. जुनी बोली आतां प्रचारांत नसली तरी ग्रीक देवस्थानांतून पवित्र भाषा म्हणून वापरली जाते. सर्व स्लाव्हानिक भाषांत हीच उत्कृष्ट व संपन्न आहे.

प्रारंभीं बल्गेरियन वाङ्मय धार्मिक स्वरूपाचें व ग्रीक भाषेंत होतें. १२ व्या शतकांत ऐतिहासिक ग्रंथ निघूं लागले. १८ व्या शतकांत पैसी व सोफ्रिनी हे दोन स्वतंत्र लेखक पुढें आले. बल्गेरियन भाषेंत लिहिलेला पहिला ग्रंथ सोफ्रिनीचा आहे. सर्व्हियन आणि ग्रीक लोकांच्या छळामुळें बल्गेरियांतून पळून गेलेल्या बल्गर लेखकांनीं राष्ट्रीय वाङ्मयाचा पाया घातला. त्यानंतर आधुनिक वाङ्मयाचे सर्व प्रकार निघूं लागले.

**बल्बन गुलाम** (१२६६–८७)—दिल्लीचा एक बादशहा. बहाउद्दीन बल्बन, घियासुद्दीन बल्बन किंवा उलुघखान अशा नांवांनींहि हा प्रसिद्ध आहे. शमसुद्दीन अल्तमशनें यास गुलाम म्हणून विकत घेतलें होतें. पुढें यानें आपल्या शौर्यानें दिल्लीचा बादशहा नासिरुद्दीन महंमदशहा याचा गेलेला मुलूख परत मिळवून देऊन त्याची मर्जी संपादन केली. याच्यावर खुप होऊन नासिरुद्दीननें यास आपली मुलगी दिली. महंमदशहास संतान नसल्यामुळें त्यानें यासच आपल्या गादीचा वारस बनवलें. गादीवर येतांच यानें घियासुद्दिन असें नांव धारण केलें. याला मोंगल स्वारीची फार भीति होती व तिचा बंदोबस्त त्यानें फार केला. दिल्लीच्या आसपास जंगलांत राहून दिल्लीस त्रास देणाऱ्या मिओ लोकांच्या कत्तली उडवून यानें दिल्ली ते बंगालपर्यंतचा मार्ग सुरक्षित केला. त्याला तुर्क व हिंदू लोकांशीं विशेष झगडे घ्यावे लागले. यानें शेरखान संकरला ठार केलें व भयंकर कत्तल करून बंगालच्या तुघ्रीलखानाचें बंड त्यानें जातीनें जाऊन मोडलें. एकंदरींत हा अतिशय क्रूर पण शूर आणि शहाणा होता. दिसायला हा कुरूप व ठेंगू होता. यानें पुष्कळ विद्वानांना आश्रय दिला होता. यानें कांहीं शेतीविषयक सुधारणाहि केल्या. गुलाम घराणें पाहा.

**बल्लारशा**—मध्यप्रांत, चांद्यापासून ६ मैलांवर हें रेल्वेचें ठिकाण आहे. दिल्ली ते मद्रास असा आगगाडीचा जो थेट मार्ग आहे त्यावर बल्लारशा आहे. निजाम स्टेट रेल्वे व जी. आय्. पी. रेल्वे यांच्या सांध्यावर हें आहे. कोळशाच्या खाणी स्टेशनापासून १॥ मैलांवर आहेत. पूर्वीं बल्लारशा येथें गोंडराज्य होतें व त्याच्या खुणा अद्यापि दिसतात. वर्धा नदीवर एक सुंदर किल्ला असून त्यांत राजवाड्याचे अवशेष पाहावयास सांपडतात. आंत भुयारेंहि आहेत. गांवाच्या उत्तरेस एक मोठें पण पडकें तळें आहे व पूर्वेस एका गोंड राजाची छत्री दिसते. त्याच बाजूला नदींतील एका बेटावर एक कोरीव देऊळ आहे.

**बल्लारी**—मद्रास इलाख्यांतील अगदीं पश्चिमेकडील चार जिल्ह्यांपैकीं एक. याचें क्षेत्रफळ ५७१४ चौरस मैल आहे. यांतील मुख्य नदी तुंगभद्रा आहे. तिला मिळणाऱ्या हगरी अथवा वेदवती व चिक्कहगरी या नद्या आहेत. येथें एक जुनी खाण आहे. जैन देवळें येथें फार आहेत. आदवानी, बल्लारी व रायदुर्ग हे डोंगरी किल्ले फार महत्त्वाचे आहेत. लोकसंख्या (१९४१) १०,५१,२३५. पैकीं शेंकडा ५७ लोक कानडी व शेंकडा ३० तेलगू भाषा बोलतात. मुख्य धंदे कापूस व रेशीम यांचे आहेत. चोलम व कोरा हीं मुख्य धान्यें आहेत.

या भागांत विजयानगरचें राज्य असल्यानें हंपीजवळ त्याचे अनेक अवशेष दिसतात. हा जिल्हा इतिहास-प्रसिद्ध आहे. चालुक्य-होयसळपासून तों हैदर-टिपूपर्यंत या भागांत सारखीं सत्तांतरें चाललीं होतीं.

बल्लारी शहर—हें हनुमान आप्पा नाइकाचें राहण्याचें ठिकाण होतें. १६५८ सालीं शिवाजीनें हा किल्ला घेतला. येथें कापूस,' साखर, वगैरेंचे कारखाने आहेत. गांव वाढतें आहे. लो. सं. ५६,१४८. अद्यापिहि चांगलें लष्करी ठिकाण म्हणून याचें महत्त्व आहे.

**बल्लाळगड**—मुंबई, ठाणें जिल्हा. उंबरगांवच्या पूर्वेस १० मैलांवर २०० फूट उंचीच्या टेंकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. भोंवतीं जंगल असून याचें क्षेत्रफळ अवघें ८० फुटांजवळ आहे. दरवाजा पडून गेला आहे व किल्ला मोडकळीस आलेला आहे.

**बल्लाळ सेन** (११५८–११७०)—बंगालच्या सेन घराण्यांतील हा तिसरा राजा विजयसेनानंतर गादीवर आला. पाल राजाचा हा द्वेष्टा होता. यानें बंगालचे चार भाग पाडले: (१) भागीरथीच्या पश्चिमेस राढ (कर्णसुवर्ण भाग),

दक्षिणेकडील प्रदेशापेक्षां थंड असून हिंवतापाची आहे. बौद्ध लोकांच्या वेळचे अवशेष कांहीं ठिकाणीं सांपडले आहेत. १९४१ मध्यें लोकसंख्या १२,४०,५६९ होती. शें. ८१ लोक हिंदू आहेत. बुरणूस, कांबळीं, चटया, वगैरे जिनसहि थोडेबहुत तयार होतात. बहरैच हें नॉर्थ-वेस्टर्न रेल्वेचें स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें ३४ हजार.

**बहाई पंथ**—बाबी संप्रदाय. ह्या पंथाचा उदय सन १८४४-४५ त इराण देशांत झाला. याचा उत्पादक बाब-एल् दिन किंवा मिर्झा अली महंमद हा होय. बाबचीं मतें सरकारला पसंत न पडून त्याला फांशीं देण्यांत आलें (१८५०). याचें मत असें आहे कीं, बारा इमाम व त्यांचे अनुयायी यांच्यांत दुभाष्यासारखें काम करणारा कोणी तरी मध्यस्थ असला पाहिजे, व या मध्यस्थाच्या द्वारें इमाम आपल्या अनुयायांशीं भाषण वगैरे करतात. याचेच आदर्श (किंवा अवतार) जे चौथे 'बाब' त्यांच्या द्वारें इमाम आपल्या अल्पकालीन अंतर्धानांत आपल्या अनुयायांशीं व्यवहार करीत. ख्रिस्ती आणि बौद्ध या धर्मांची छाप या पंथावर आहे. 'बाब' ही पदवी प्रथमतः मिर्झा अली महंमद यानें घेतली. 'बाब' लोक व मुसलमानी धर्मपंथ यांमध्यें मुख्य विरोध हा दिसतो कीं, महंमद हा शेवटचाच पैगंबर व कुराण शेवटचाच धर्मग्रंथ असें बाब लोक मानीत नाहींत. परमेश्वरी सत्तत्त्व हें अज्ञेय आहे व तें केवळ त्याच्या बाह्य नामरूपांवरूनच मनुष्याला गम्य होणार; तेव्हां आपल्या पंथांतील, काळांतील अत्युच्च परमेश्वरी स्वरूप ओळखणें हेंच मनुष्याचें इतिकर्तव्य होय, अशीं यांचीं मतें होतीं. बाब लोकांचा ग्रंथसमूह अवाढव्य पण अव्यवस्थित असल्यानें, व त्या वेळीं त्यांचा भिन्न धर्मपंथ वगैरे नसल्यानें, त्यांचीं मतें कांहीं बाबतींत अत्यंत अनिश्चित व संदिग्ध स्वरूपाचीं आहेत. देहात्म्याचें पुनरुत्थान होतें असें हे लोक मानीत नाहींत. यांच्यांत स्त्रीस्वातंत्र्य मानलें जातें. पुढें बहाई लोकांच्या हातीं हा पंथ गेल्यावर त्यांतील आध्यात्मिक व विश्वैक्याच्या कल्पना जाऊन त्याला व्यावहारिक रूप प्राप्त झालें. अलीकडील पुस्तकांमध्यें मायरन फेल्प्सचें बहाउल्लाच्या मुलाखतीचें प्रश्नोत्तररूप पुस्तक बरेंच लोकप्रिय आहे. चीन, जपान, हिंदुस्थान व अमेरिका यांत हे लोक आहेत.

**बहादुरगड**—मुंबई, पुणें जिल्हा, एक किल्ला. १६७२ सालीं पावसाळ्यांत मोंगलांचा त्या वेळचा दक्षिणेचा सुभेदार बहादुरखान यानें भीमेतीरीं पांडे पेडगांव येथें छावणी दिली असतां तेथें त्यानें एक भुईकोट किल्ला बांधून त्यास बहादुरगड असें नांव दिलें. चाळिसाहूनहि अधिक वर्षेपर्यंत हा किल्ला पुणें प्रांतांतील मोंगल सैन्याची युद्धसामुग्री सांठविण्याचें एक मुख्य ठिकाण होतें. ग्रँट डफच्या वेळीं या किल्ल्याचें बहादुरगड नांव राहिलें नव्हतें. हल्लीं किल्ला सर्व पडून गेला आहे.

**बहादुरखान**—१. हा मोंगल सरदार दिलेरखानाबरोबर दक्षिणेंत शिवाजीचें पारिपत्य करण्याला आला होता.

२. खानजहान कोकलताश पाहा.

**बहादुरशहा** (१५२६-१५३६)—गुजराथचा एक सुलतान. सिकंदरशहाचा खून झाल्यावर बहादुरशहा हा अहमदाबादचा सुलतान झाला. तो उदार व दयाळू होता. गुजराथेंत मोठा दुष्काळ पडला असतां त्यानें जिकडेतिकडे अन्नसत्रें व सदावर्तें घातलीं. रायसेन किल्ला, उज्जयिनी, वगैरे ठिकाणें बहादुरशहानें सर केलीं. पुढें चितोडगडावर फौज पाठवून तेथच्या राजाचाहि त्यानें पाडाव केला. याप्रमाणें बहादुरशहा प्रबळ होत चालला. हुमायूनने बहादुरच्या एका सरदाराच्या मदतीनें गुजराथ प्रांत सर केला. पुढें बहादुरशहानें फौज जमवून दिल्लीच्या फौजेचा पराजय करून नऊ महिन्यांच्या आंत आपलें सर्व राज्य परत मिळविलें. इकडे दीव बंदरीं पोर्तुगीज लोकांनीं फारच पुंडाई माजविली तेव्हां बहादुरशहानें आपली फौज त्यांजवर पाठविली. बहादुरशहा तिकडे गेला असतां त्यांनीं कपट करून त्यास व त्याच्या लोकांस समुद्रांत लोटून ठार मारिलें. प्रसिद्ध संगीतज्ञ नायक बक्षु (बहादुरी तोडी पाहा) याच्या पदरीं होता.

**बहादुरशहा** (मृ. १८६२)—हा शेवटचा मोंगल बादशहा १८३७ सालीं गादीवर आला, पण दुर्दैवानें व अनिच्छेनें १८५७ च्या हिंदी शिपायांच्या बंडांत सांपडला. त्या वेळीं तो दिल्लीस फार हालांत तुटपुंजा वर्षासनावर राहत होता. त्याला दिल्लींतून काढून कलकत्त्यास न्यावें व तो वारल्यानंतर त्याचा बादशाही इतमाम व किताब काढून घ्यावा असें गव्हर्नर जनरल डलहौसीनें ठरविलें होतें. १८५७ त शिपायांनीं दिल्ली घेऊन या वृद्ध व दुर्बल बादशहाला मोठ्या समारंभानें गादीवर बसवून पुन्हां मोंगल बादशाही स्थापन झाल्याचें जाहीर केलें व त्याच्या नांवानें इंग्रजांविरुद्ध युद्ध सुरू केलें. पुढें इंग्रज सैन्यानें दिल्ली घेतल्यानंतर या बिचाऱ्या बादशहास कैद केलें व त्याचीं दोन मुलें व एक नातू यांना हॉडसन साहेबानें गोळ्या घालून ठार केलें. हें क्रांतियुद्ध संपल्यावर इंग्रज सरकारनें बहादुरशहाला कोर्टापुढें खेचून त्याला फांशीची शिक्षा फर्माविली. पण पुढें ही शिक्षा कमी करून त्याला रंगूनला हद्दपार केला व तेथें तो सामान्य माणसाप्रमाणें कालवश झाला.

**बहादुरी तोडी**—हा राग तोडी थाटांतून उत्पन्न होतो. याचे आरोहावरोह सात स्वरांनीं आहेत म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण होय. वादी मंद्र स्थानचा धैवत असून संवादी

मध्यस्थानचा गाधार स्वर आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानतात. याचें गायन मंद्र व मध्य सप्तकांत विशेष खुलतें. मध्यम व ऋषभ या स्वरांची संगति वैचित्र्यदायक आहे. याचें गायन विलंबित लयींत उठावदार होतें. हा तोडीचा प्रकार आहे. हा राग नायक बक्षु यानें नवा रचिला व गुजराथचा सुलतान बहादुरशहा याच्या नांवानें प्रचलित केला. नायक बक्षु या बादशहाच्या पदरीं होता.

**बहामनी राज्य** ( १३४७-१५२६ )—हें राज्य हसन नांवाच्या इसमानें गुलबर्गा येथें स्थापिलें. ( १ ) हसन ( १३४७-१३५८ )—हा दिल्ली येथें गंगु नावाच्या ब्राह्मणाच्या पदरीं गुलाम होता. तो अत्यंत इमानी असल्यामुळें त्याला मुक्त करून दिल्लीच्या सुलतानानें दक्षिणेंतील सुभेदाराच्या मदतीस पाठविलें. हसननें जाफरखान असा किताब घेऊन बिदर व कंधार हे किल्ले काबीज करून आणि स्वतंत्र राजा होऊन आपल्या नावाचीं नाणीं पाडलीं. तो हुशार व धोरणी होता, व हिंदुधर्मद्वेष्टा नव्हता. त्यानें आपल्या मूळ मालकाच्या स्मरणार्थ आपल्या नांवास गंगु-इ-बहामनी असा किताब जोडला. यानें आपल्या राज्याचा विस्तार महाराष्ट्रभर केला व मोठ्या न्यायानें राज्य केलें. त्याच्यानंतर त्याचा मुलगा ( २ ) महंमदशहा ( १३५८-१३७५ )-हा राजा झाला. त्याच्या कारकीर्दीत विजयानगरच्या राजाबरोबर सतत युद्धें चालू होतीं. ( ३ ) मुजाहिदशहा ( १३७५-१३७८ ) हा महंमदाचा मुलगा असून यानें विजयानगरच्या राजाबरोबर युद्ध करून अपार संपत्ति व पुष्कळ मुलूख मिळविला. परंतु त्याची बहीण रूपवरआघा हिनें त्याचा खून करविला. ( ४ ) महंमुदशहा ( १३७८-१३९७ )— हा हसनचा कनिष्ठ पुत्र होता. हा दयाळू, सद्गुणी व विद्वान् होता. पण त्याच्या वेळीं दुर्गादेवीचा दुष्काळ पडला असें म्हणतात. पुढला राजा ( ५ ) फिरोजशहा ( १३९७-१४२२ )— मोठा उदार असून ख्रिस्ती धर्मशास्त्र वाचण्याचा त्याला मोठा नाद होता. त्यानें आपलें राज्य वाढवून मुसलमानी धर्माचा बराच प्रसार केला. १४१७ सालीं तेलंगणावर त्यानें हल्ला केला, परंतु हिंदूंनीं मुसलमानांचा मोड करून सूड उगविला. या पराभवामुळें हा भ्रमिष्ट होऊन लवकरच मरण पावला. ( ६ ) अहंमदशहा वली ( १४२२-१४३५ )-हा विद्वान् असून साधूंस फार मान देई. त्यानें १४२४ सालीं वरंगळच्या राज्यावर स्वारी करून राजास ठार मारिलें, व तेथील बायकांपोरांस बाटवून मुसलमान केलें, व हिंदू लोकांचीं देवळें पाडून तेथें मशिदी बांधिल्या. हिंदूंची राजधानी बिदर येथें किल्ला बाधून तेथें त्यानें आपली राजधानी केली. ( ७ ) अल्लाउद्दीनशहा ( १४३५-१४५७ )—यानें विजयानगरच्या राजाबरोबर अनेक लढाया केल्या, परंतु त्याचा कायमचा निकाल कांहींच लागला नाहीं. तो धूर्त व विद्येचा भोक्ता होता व त्यानें अनेक धर्मकृत्यें केलीं. याच्याच कारकीर्दीत नरसिंह सरस्वती हे उदयास आले. ( ८ ) हुमायून ( १४५७-१४६३ )-याच्या भावानें अनेक बंडें केलीं, पण तीं यानें मोडिलीं. हा फार क्रूर होता. याच्या हुजऱ्यानीं याचा खून केला. ( ९ ) महंमदशहा २ रा ( १४६३-१४८२ ) -हा फार विद्वान् होता. त्यानें ओढ्या, कर्नाटक व तेलंगण प्रांतांवर स्वारी करून बराच मुलूख जिंकला. त्याचा कारभारी गवान यानें अनेक चांगल्या सुधारणा करून व जमिनीची मोजणी करून कायमचा शेतसारा ठरविला. गवान हा सुनीपंथी असून उदार, विद्वानाचा पोशिंदा, गणिती, परोपकारी, उत्तम सेनापति, साध्या राहणीचा, मनमिळाऊ व निःपक्षपाती होता ( महंमद गवान पाहा. ) ( १० ) महंमूदशहा दुसरा ( १४८२-१५१८ )-याच्या कारकीर्दीत शिया व सुनी यांचे तंटे विकोपास जाऊन त्यांतच बहामनी राज्याची अखेर झाली. या तंट्यामुळें राजधानींत वीस दिवस सारखा रक्तपात चालू होता, तरी हा शहा चैनबाजींत निमग्न राहत असे. त्याचें अखेरचें आयुष्य हाल-अपेष्टांत गेलें. ( ११ ) अहंमद २ रा ( १५१८-२० ) व शेवटचे राजे नालायक असल्यामुळें बहामनी राज्य १५२६ मध्यें लयास गेलें व बहामनी राज्याचीं ( १ ) विजापूरची आदिलशाही; ( २ ) गोवळकोंड्याची कुत्बशाही; ( ३ ) वऱ्हाडची इमादशाही; ( ४ ) अहमदनगरची निजामशाही; व ( ५ ) बिदरची बेरिदशाही अशीं पांच निराळीं राज्यें झालीं.

या बहामनी वंशांत १४ राजे झाले. त्यांत चौघांचा खून झाला, दोघांचे डोळे निघाले व एका दुसऱ्या महमदाशिवाय सर्व धर्मांध व जुलुमी निघाले. हे सर्व राजे व्यसनी व नादान निघाले.

**बहामा बेटें**— बहामा ( लुकॉयोस ) हा ब्रिटिश वेस्टइंडीजपैकीं एक द्वीपसमूह आहे. यांत २९ मोठीं बेटें व ६६१ लहान बेटें आहेत. क्षे. फ. ४,४०४ चौ. मैल आणि लो. सं. ७१,४७४. लोकसंख्येपैकीं सु. १५,००० श्वेतवर्णी लोक असून बाकीचे इतर आहेत. या द्वीपसमूहांत पुढील बेटें मुख्य आहेत : लहान व मोठें अबॅको, मोठें बहामा, एल्युथेरा, कॅट, वॅटलिंग ( अथवा ग्वानाहानी ), रमके, न्यूप्रॉव्हिडन्स, एक्झुमा लांग, अँड्रॉस, क्रुकेड, मयाग्वाना आणि इनाग्वा; यांपैकीं न्यू प्रॉव्हिडन्स बेटांत नॅसाऊ हें राजधानीचें शहर आहे. हीं प्रवाळाचीं बेटें आहेत. या बेटात विहिरींपासून पाण्याचा पुरवठा होतो. नॅसाऊ शहरांत मुख्य मुख्य सार्वजनिक इमारती व कांहीं जुने किल्ले

आहेत. वहामाची हवा चांगली आहे. वहामांत पुष्कळ जातींचीं फळें होतात. टोमाटो बाहेर फार जातात. स्पंज आणि सिसल हीं पूर्वी फार बाहेर जात व त्यांचें बरेंच उत्पन्न येई. पण आज तें नाहीं. येथें कापसाची लागवड होत असे.

**वहार**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहांत ऋषभ स्वर वर्ज्य व अवरोहांत धैवत वर्ज्य म्हणून याची जाति षाडव–षाडव आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय मध्यरात्र मानितात. या रागाचा संयोग अनेक रागांशीं होतो. घटकावयवांच्या धोरणानें भैरव–बहार, बागेश्री–बहार, हिंदोल–बहार, मालकंस–बहार, वसंत–बहार, अडाणा–बहार, वगैरे मिश्रनामें प्रचारांत आलीं आहेत. हा राग आधुनिक असून यावनिक आहे. वसंतऋतूंत हा राग हवा तेव्हां गावा अशी समजूत आहे.

**बहावलपूर**—पाकिस्तान, पंजाब, महत्त्वाचें मुसलमानी संस्थान. क्षे. फ. २०,००० चौ. मैल. येथें वार्षिक पाऊस ५ इंचापेक्षां जास्त क्वचितच पडतो. बहावलपूरच्या राजघराण्याचे पूर्वज अब्बासी दाउद पुत्र हे बगदादच्या अब्बासी खलिफांचे वंशज होत. येथील जुन्या अमिरांनीं प्रथमच सिंधूचे कालवे काढून प्रदेश सुपीक केला. सध्यां सादिक महंमदखान हे अमीर आहेत. संस्थानिकांना १७ तोफांची सलामी मिळते. या संस्थानची लो. सं. (१९२१) ७,८१,१९१ होती. शें. ८३ लोक मुसलमान आहेत. येथील मुख्य पिकें गहूं, तांदूळ, कडधान्य व हरभरा हीं होत. या संस्थानांत कापड विणणें, तेल काढणें, कातडीं कमावणें, साबण, इ. करणें यांसंबंधीं बरेच कारखाने आहेत. शिक्षणप्रसार बराच आहे. कायरोच्या अल्–अझार विद्यापीठाच्या धर्तीवर जामिया अब्बासिया ही संस्था कॉलेजखेरीज काढलेली आहे. उत्पन्न सुमारें चार कोटी रुपये होतें.

गांव—राजधानीचें ठिकाण. लो. सं. १८ हजार. हें शहर पहिला नबाब बहावलखान यानें वसविलें. ह्या गांवांत एक कॉलेज व एक हायस्कूल आहे. येथें व्यापार बराच चालतो. हें संस्थान १९४७ सालीं पाकिस्तानला मिळालें.

**वहिणाबाई** (शके १५५०–१६२२)—एक मराठी कवयित्री व तुकारामाची शिष्या. हिचें माहेर वेरूळजवळ देवगांवीं होतें. हिचें तिसऱ्या वर्षी ३० वर्षें वयाच्या बिजवराशीं लग्न झाल्यावर चार वर्षांनीं हें कुटुंब देशोधडीस लागलें. पुढें वहिणाबाई तुकोबाची शिष्या बनली व देहूस जाऊन राहिली. हिची पद्यरचना फार प्रेमळ आहे. हिनें एक आत्मचरित्र लिहिलें असून कांहीं आरत्या, पदें व संत-नामावली रचिली आहे. हिच्या अभंगांची गाथा प्रसिद्ध आहे.

**वहिरजी जाधव नाईक**—शिवाजीचा एक विश्वासू हेर. याच्याच आगाऊ बातमीवरून ता. ४ ऑक्टोबर सन १६७० रोजीं शिवाजीनें सुरतेवर हल्ला करून पंचेचाळीस कोट होन व चार हजार घोडीं इतकी लूट मिळविली. जालन्याहून मोठी लूट आणीत असतां मोंगल सैन्यानें जेव्हां वाट अडविली तेव्हा या बहिरजीनें शिवाजीस दुसऱ्या वाटेनें रायगडास सुरक्षित पोंचतें केलें (१६७९). बहिरजीच्या हेरगिरीच्या कौशल्यावर कवनें झालीं आहेत.

**वहिरवगड**—१. हा किल्ला सातारा जिल्ह्यांत पाटणच्या वायव्येस २० मैलांवर आहे. हा किल्ला सह्याद्रीच्या एका शिखरावर पन्हाळ्याच्या शिलाहार राजांनीं बांधलेला असून त्याची १०० फूट लांबीची एक सोंड कोंकणच्या बाजूकडे गेली आहे. पूर्वेच्या बाजूस जो तुटलेला कडा आहे तो व ही टेंकडी ह्याच्यामध्यें ३० यार्ड लांबीची एक अरुंद डोंगराची ओळ आहे. वर सांगितलेला कडा ह्या ओळीवर ३०० फूट उंच आहे. टेंकडीचें क्षेत्रफळ सुमारें ५ मैल आहे व तिच्या पूर्वेस बहिरोबाचें देवालय आहे. या नांवावरून ह्या किल्ल्याला बहिरवगड असें नांव मिळालें आहे. किल्ल्याची हल्लीं पडापड झाली आहे. हा १८१८ त कॅ. केपननें घेतला.

२. ठाणें जिल्हा. यास वैरामगड असेंहि म्हणतात. हा मुरबाड तालुक्यांत मुरबाडच्या पूर्वेस २२ मैलांवर मोरोशी नावाच्या खेड्याशेजारीं नाणे घाटाच्या ईशान्येस सह्याद्रीच्या एका ६०० फूट उंचीच्या फाट्यावर बांधलेला आहे. पायथा फार अरुंद असून १०० फूट चढण फार अवघड आहे. वर चढावयास एक २७ फूट उंचीची शिडी लावलेली असे व ती वरच्या बाजूस साखळदंडानें बांधलेली असे. किल्ल्याच्या बाजूस खोल दऱ्या आहेत. हा फार दुर्गम आहे, पण आतां पडक्या स्थितींत आहे.

३. रत्नागिरी जिल्हा. देवगड तालुक्यांत दिगवलें नांवाच्या खेड्यांत हा किल्ला मोडतो. क्षेत्रफळ ४ पासून ५ एकरापर्यंत आहे. याचा सध्यां फारसा मागमूस नाहीं.

४. रत्नागिरी जिल्हा. चिपळूण तालुक्यांत सह्याद्रीच्या एका उंच चिकट फाट्यावर बांधलेला आहे. रस्ता फार अवघड आहे. क्षेत्रफळ ८ एकर आहे. वर पाणीपुरवठा चांगला आहे.

**वहिरा (जातवेद)**—एक मराठी संतकवि. हा पैठणचा राहणार. मुसलमानांनीं यास पतित केलें तेव्हां वडवाळसिद्ध नागेश यास हा शरण गेला. नागेशानें यास पावन करून घेतलें. यानें भागवताच्या दशमस्कंदावर टीका लिहिली आहे व तींत आपल्या गुरूचें नांव चिंतामणि असें दिलें आहे.

**बहिरी ससाणा**—श्येन वर्गातील पक्ष्याची एक जात.  ऋग्वेदामध्यें श्येन हें एका प्रबळ हिंस्र पक्षाचें नांव आलेलें आहे. बहुतकरून हा पक्षी म्हणजे त्या वेळीं गरुड पक्षी असावा. वैदिक कालानंतरच्या वाङ्मयांत याचा अर्थ बहिरी ससाणा किंवा त्याच्यासारखा एखादा पक्षी असा बसविला असावा. हा सर्व पक्ष्यांत अतिशय जलद उडतो व त्यामुळें लहान पक्ष्यांस भीतिदायक असतो. याच्या अंगात शक्ति अतिशय असते. त्यामुळे तो पक्ष्यांच्या समुदायालाहि भारी होतो. त्याचा पहारा मनुष्यावरहि असतो (नृचक्षस्). अशा प्रकारचे उल्लेख ऋग्वेदांत आहेत. यावरून तो आकाशांत उंचावरून जातो असें अनुमान निघतें. तो स्वर्गांतून सोम आणतो असाहि उल्लेख आहे.

सर्वांत मोठे ससाणे स्वीडन व नॉर्वे देशांत आढळतात. हे २ फूट लांब असतात व रंगानें काळे असतात. ग्रीनलंडमधील ससाणा पांढरा असतो व फार मौल्यवान् असतो. हा सामान्यतः अरण्यांत राहतो व तेथील पक्ष्यांवर निर्वाह करतो. याची उडण्याची गति ताशीं १५० मैलपर्यंत असते असें म्हणतात. शिकारीच्या कामीं बहुधा मादीचा उपयोग करतात. नर आकारानें लहान असून कमी धीट असतो.

**बहिरेपणा**—मनुष्यास पूर्णतः किंवा अंशतः ऐकूं न येणें या विकारास म्हणतात. हा मुख्यतः कानाच्या विकारापासून संभवतो व त्याचें कारण कानांत सांचणारा मळ किंवा पडसें वगैरे तात्पुरतेंहि कारण असूं शकतें. परंतु कधीं कधीं याचें कारण दुसरेंच असूं शकतें व याकरितां या व्यंगाकडे मुळींच दुर्लक्ष करतां कामा नये. जर वेळींच लक्ष दिलें तर पुढें येणारी बधिरता पूर्णपणें टाळतां येणें शक्य असतें, परंतु जेव्हां बधिरता श्रोत्रेंद्रियांच्या मज्जातंतूंस विकार झाल्यामुळें उत्पन्न झाली असते, तेव्हां उपचारांचें कांहीं चालत नाहीं. अशा स्थितींत हा विकार एकाएकीं उत्पन्न होऊन फार लवकर वाढतो.

जन्मजात बहिरेपणाचें एक कारण सापिंड्य विवाह सांगतात. तसेंच आनुवंशिक परंपरा, गंडमाळा, दुःपरिस्थिति किंवा गर्भांत वाढ थांबणें हेंहि असूं शकतें. आकस्मिक किंवा उपार्जित बधिरता केव्हांहि कोणत्याहि वयांत येते. तथापि देवी, गोंवर, विषम, अर्धांगवायु, मेंदूचे विकार या रोगांत अशी बधिरता येत असते. युरोपांत लोहितांग ज्वरांत बहुधा हें व्यंग येतें.

जीं मुलें जन्मापासून बहिरीं असतात किंवा ज्यांस लहानपणींच कांहीं कारणामुळें ऐकूं येत नाहींसें होतें तीं बहुधा मुकीं असतात. त्यांस कोणताहि ध्वनि ऐकूं येत नसल्यामुळें त्याचें अनुकरण करणें अशक्य होऊन त्यांस बोलतां येत नाहीं. अशा बहिऱ्या-मुक्या मुलास बोलावयास शिकविण्याचे दोन प्रकार आहेत. एका प्रकारामध्यें त्यास दोन हातांचे पंजे निरनिराळ्या तऱ्हेनें एकाशीं एक जोडून निरनिराळे वर्ण त्या खुणांच्या साहाय्यानें उच्चारण्यास शिकवितात. दुसऱ्या पद्धतीमध्यें शिक्षकाच्या वर्णोच्चाराच्या वेळीं होणाऱ्या ओठांच्या हालचालींवरून मुक्या मनुष्यास बोलावयास शिकवितात. हिला तोंडी शिकविण्याची पद्धति म्हणतात. ही पद्धति अधिक उपयुक्त व परिणामकारक आढळून आलेली आहे. या पद्धतीमुळें मुलें आपल्या भावंडांची अथवा मित्रांची बोलतांना होणारी हालचाल पाहून तिचें अनुकरण करून बोलावयास शिकूं शकतात व त्यांचें बोलणें दुसऱ्यास ऐकूं येतें व समजतें.

**बहिष्कार**—(बॉयकॉटिंग). आयर्लंडमध्यें १८८० व १८८१ सालीं 'लँडलीग' या संस्थेनें जी चळवळ केली त्या वेळीं सामाजिक आणि व्यापारी बहिष्कार घालण्याची पद्धति अमलांत आणण्यांत आली व तिला 'बॉयकॉटिंग' असें नांव देण्यांत आलें. हें नांव देण्याचें कारण, ही बहिष्कारपद्धति कॅप्टन सी. सी. बॉयकॉट या नांवाच्या इसमास प्रथम बहिष्कृत करून अमलांत आणली म्हणून या इसमाचें नांव या बहिष्कारपद्धतीला देण्यांत आलें. असा बहिष्कार ज्या जमीनदाराविरुद्ध किंवा शेतकऱ्याविरुद्ध किंवा दुसऱ्या कोणाविरुद्ध घालण्यांत आला असेल त्याला रोज लागणारे खाद्यपेय पदार्थ मिळूं नयेत व कोणींहि त्याच्याशीं संबंध ठेवूं नये आणि त्याला कोणीं कामावरहि ठेवूं नये असे निर्बंध घालण्यांत येत असत व त्यामुळें अशा बहिष्कृत इसमाला अतिशय अडचणींत पडावें लागे.

आपल्याकडेहि अशी वाळींत टाकण्याची प्रथा असे (वाळींत टाकणें पाहा). पण या बहिष्कारशस्त्राचा उपयोग राजकीय क्षेत्रांत स्वराज्य मिळविण्यासाठीं हिंदुस्थानांत करण्यांत आला. १९०६ सालच्या राष्ट्रीय सभेंत असा बहिष्काराचा एक ठराव झाला. इंग्लंडच्या मालावर बहिष्कार, स्टॅट्युटरी कमिशनवर बहिष्कार, वगैरे बहिष्कार प्रसिद्धच आहेत.

**बहुपतित्व**—एका वेळीं एका स्त्रीला एकापेक्षां अधिक नवरे असणें. कित्येकदां हे नवरे भाऊ भाऊ असतात. तिबेटमध्यें सर्व भावांची बायको एक असते, तर नीलगिरीवरील तोडा जातींत या नवऱ्यांमध्यें कसलाहि आप्तपणा नसतो. एस्किमो, अमेरिकन इंडियनांतील कांहीं जाती, अल्युशिअन, वगैरे लोकांत ही चाल अद्यापि टिकून आहे. सीझरच्या वेळीं

ब्रिटनमधील केल्ट लोकांतहि बहुपतित्व होतें. समाज सुधारला म्हणजे या कुटुंबविघटक चाली बंद पडतात.

वैदिक काळीं बहुपतित्व नव्हतें. वैदिक ग्रंथांत असा एकहि आधार नाहीं कीं, त्यावरून ही चाल सर्रहा प्रचारांत होती असें सिद्ध होईल. फार तर एवढें म्हणतां येईल कीं, ऋग्वेद व अथर्ववेद यांमध्यें प्रसंगानुसार कांहीं मंत्र असे आले आहेत कीं, ज्यांत एकाच भार्येसबंधानें अनेक नवऱ्यांचा उल्लेख आलेला आहे. पण ते उल्लेख रूपकात्मक असावेत. महाभारतांतील पांच पांडवांची पत्नी जी द्रौपदी हिचें उदाहरण पुराणकालीन बहुपतित्वाचें म्हणून दाखविण्यांत येतें, पण त्या वेळींहि हा रूढधर्म नव्हता, व म्हणूनच तिच्या पूर्वजन्माची कथा सांगून दोषपरिहार केला आहे.

**बहुपत्नीत्व**—एका वेळीं एका पुरुषानें एकापेक्षां अधिक बायका करणें. प्राच्य देशांतून ही चाल प्राचीन व रूढ आहे. ग्रीक व ज्यू लोकांत देखील होती. वेदकालीन आर्य लोकांना अनेक बायका करण्याची परवानगी होती, ही गोष्ट ऋग्वेदांतील अनेक उल्लेखांवरुन सिद्ध होते. मैत्रायणी संहितेंतील उल्लेखावरून मनूला दहा बायका होत्या असें ठरतें. शतपथ ब्राह्मणात बहुभार्यात्व पद्धतीचें एका मजेदार कथेनें स्पष्टीकरण केलें आहे. शिवाय राजाला तर चार भार्या असत.

ख्रिस्ती धर्माचा उदय झाल्यापासून पाश्चात्य लोकात एकपत्नीत्व सर्वसंमत झालें. मुसलमान धर्मांत एकपत्नीत्वाचा निर्बंध नाहीं. हिंदू लोकांत वैदिक काळापासूनच बहुपत्नीत्व धर्मबाह्य मानलें जात नाहीं. एकपत्नीत्वाची सुधारणा इंग्रजी अमलापासून आली व आतां प्रांतोप्रांतीं तसे कायदेहि होत आहेत. हिंदू लोकांप्रमाणेंच इतर खंडांतून ख्रिस्ती लोकांत (उदा., निग्रो, ऑस्ट्रेलियन आदिवासी, मॅलॅनेशियन, इ.) बहुभार्यात्व हें धर्मविहित आणि समाजसंमत आहे. (द्विभार्यात्व-पतित्व पाहा.)

**बहुफलक**—(पॉलिहेड्रॉन). चार किंवा जास्त सपाट पृष्ठांनीं मर्यादित अशी घन आकृति. हीं सपाट पृष्ठें सम (रेग्युलर) म्हणजे याचे सर्व कोन सारखे व सर्व बाजू सारख्या लांबीच्या असल्यास खालील घन आकृति होतात :

(१) चार समभुज त्रिकोणांनीं मर्यादित आकृतीस चतुःसम पृष्ठ (रेग्युलर टेट्राहेड्रन) म्हणतात.

(२) आठ समभुज त्रिकोणांनीं मर्यादित आकृतीस अष्ट-समपृष्ठ म्हणतात.

(३) वीस समभुज त्रिकोणांनीं मर्यादित आकृतीस विंशति समपृष्ठ म्हणतात.

(४) सहा चौरस जोडून एक घन (क्यूब) होतो.

(५) बारा समपंचकोन जोडून द्वादश समपृष्ठ होतो.

**बहुरूपता**—(पॉलिमार्फिझम). एकाच पदार्थाचा अनेक स्फटिकरूपें धारण करण्याचा गुण. उदा., ॲल्युमिनियम सिलिकेट हें तीन खनिज प्रकारांच्या रूपांत (अंडाल्युसाइट, सिलिमनाइट, आणि कियानाइट) सांपडतें. स्फटिक पाहा.

**बहुरूपी**—त्वरित रूप आणि वेश बदलून भीक मागणाऱ्या लोकांचा हा वर्ग आहे. या जातीची लोकसंख्या सुमारें २,००० आहे. हा धंदा इतर जातींचे लोक देखील करतात. हे लोक आपल्या बेमालूम सोंगानें फसवून मग उघड इनाम मागतात. गुजराथेंत हे पशुपक्ष्यांची भाषा बोलतात. पंजाबांत हे बहुतकरून शीख आहेत. तेथें ते आतां शेतकरी वर्गांत मिसळून गेले आहेत.

**बहुविधत्ववाद**—(प्ल्युरॅलिझम). अध्यात्मविद्येंतील एक सिद्धांत असा आहे कीं, सत् आणि सत्य यांपासून एकात्म स्वतंत्र द्रव्यें अनेक निघूं शकतील. याप्रमाणें हा सिद्धांत एकत्वाचा किंवा अद्वैताचा प्रतिपक्षी म्हणतां येईल. डेमोक्रिटस, लीबनिझ, हेकेल, वगैरे या वादाचे पुरस्कर्ते होत.

**बळवंतगड**—मुंबई, ठाणें जिल्हा. शहापूरच्या ईशान्येस कांहीं मैलांवर विहीगांव या खेड्यांत हा किल्ला एका टेंकडीवर बांधलेला आहे. उंची १,००० फूट आहे. तटाची लांबी एक मैल आहे. सध्यां मोडकळीस आलेला आहे.

**बॉइल, रॉबर्ट** (१६२७–१६९१)—एक इंग्रज शास्त्रज्ञ. यानें ईटन येथील अभ्यास संपवून युरोपचा प्रवास केला व नंतर 'अदृश्य विद्यालय' नांवाची संस्था काढली. हा रॉयल सोसायटीच्या पहिल्या सभासदांपैकीं एक होय. यानें वाताकर्षक यंत्राच्या साहाय्यानें व रॉबर्ट हूक याच्या मदतीनें कित्येक प्रयोग करून पुढील नियम सिद्ध केला—"वायूचें आकारमान आणि त्याचा दाब हे परस्परांशीं व्युत्क्रम प्रमाणांत असतात." यास 'बॉईलचा नियम' म्हणतात. यानें रसायन व पदार्थ-विज्ञान शास्त्रांसंबंधीं बरेच परिश्रम केले. रासायनिक शास्त्रांत नवीन कल्पना यानें उतरविल्यानें याला 'रसायनशास्त्राचा जनक' म्हणून संबोधतात. ईश्वरविषयक प्रश्नाकडेहि त्यानें बरेंच लक्ष दिलेलें दिसतें.

**बॉयलरविषयक कायदा**—'दि इंडियन बॉयलर्स ॲक्ट' हा कायदा १९२३ सालीं तत्संबंधींचे मागील कायदे एकत्र करून व दुरुस्त करून मंजूर करण्यांत आला. हा कायदा १८८४ सालच्या 'दि इंडियन स्टीम शिप्स ॲक्ट', व १९१७ चा 'दि इनलंड स्टीम-व्हेसल्स ॲक्ट' आणि 'हिज मॅजेस्टीज् नेव्ही' आणि 'दि रॉयल इंडियन मरीन सर्व्हिस' यांच्या नियंत्रणाखालील तापका(बॉयलर)ला व बाष्पनलिके (स्टीम

पाइप )ला लागू नाहीं. बॉयलर्स ॲक्टचें मुख्य कलम असें आहे कीं, कोणाहि बॉयलरच्या मालकानें आपला बॉयलर या कायद्यान्वयें नोंदणी (रजिस्टर) करून दाखला घेतल्याशिवाय तो बॉयलर वापरतां कामा नये, व तसा दाखल्यावांचून बॉयलर वापरल्यास त्या मालकाला पहिल्या गुन्ह्याबद्दल रुपये ५०० पर्यंत दंड, व नंतर तोच गुन्हा केल्यास प्रत्येक दिवसाबद्दल रु. १०० दंड आहे ( कलमें ६ व २३ ). बॉयलरला किंवा स्टीम पाइपला अपघात झाल्यास त्याची वर्दी २४ तासांच्या आंत इन्स्पेक्टरला दिली पाहिजे. या व इतर नियमांविरुद्ध वर्तन घडल्यास रु. १०० पर्यंत दंड आहे (कलम २२ ). या कायद्यांत सांगितलेलीं कामें करण्याकरितां चीफ इन्स्पेक्टर व इतर इन्स्पेक्टर प्रांतिक सरकार नेमतें ( कलम ५ ).

**बांकुरा**—बंगाल प्रांत, बरद्वान विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. २६४६ चौ. मैल. दामोदर व द्वारकेश्वर किंवा धवलकिशोर ह्या दोन नद्या या जिल्ह्यांतून वाहतात. वार्षिक पावसाचें मान सरासरी ५६ इंच आहे. जिल्ह्याची लो. सं. ( १९४१ ) १२,८९,६४० आहे. लोकसंख्येपैकीं बहुतेक लोक हिंदू व थोडे मुसलमान आहेत. रेशमी व सुती कापड, पितळेचीं व कांशाचीं भांडीं व लाख करणें हे येथील मुख्य धंदे आहेत. गांव हें धवलकिशोर नदीच्या उत्तर तीरावर आहे. लो. सं. ३१,७०३. येथील बहुतेक वस्ती हिंदूंची आहे. बांकुराय नांवाच्या एका प्राचीन रहिवाशाच्या नावावरून या गांवाचें नांव पडलें. येथें 'टसर' रेशमाचे व निळीचे कारखाने असून इतर व्यापार बराच चालतो.

**बाकू**—ट्रॅन्स कॉकेशिया. हें याच नांवाच्या प्रांताचें मुख्य ठिकाण व अझरबैजनची राजधानी असून हें रशियन दक्षिण रेल्वेला व बाटूम व पोटी यांना आगगाडीनें जोडलेलें आहे. हें बंदर असून येथें रशियाच्या कास्पियन आरमाराचे कारखाने, वखारी, वगैरे आहेत. सु. १५०० पेट्रोलियमच्या विहिरी असून दरसाल साठ लक्ष टनांपर्यंत तेल निघतें. नळानें हें तेल बाटूमला नेलें जातें. येथें पेट्रोलियम शुद्ध करण्याच्या कारखान्याशिवाय, तेलाचे कारखाने, गहूं दळण्याच्या गिरण्या व तंबाखूचे कारखाने आहेत. पावसाचें वार्षिक मान ९४ इंच आहे. येथील लोकसंख्या सुमारें सात लक्ष आहे.

**बाकूनिन, मिचेल** (१८१४-१८७६)—हा रशियन अराजकतावादी व निहिलिझम( शून्यवाद )चा आद्य प्रवर्तक होता. हेगेलच्या तत्त्वज्ञानाचा नव्या क्रांतीला आधार घेऊन तो अराजकतेचा प्रचार करण्याकरितां १८४१ सालीं बर्लिनला व नंतर ड्रेसडेन, जिनीवा, व पॅरिस या ठिकाणीं गेला. तो जेथें जेथें प्रवास करी, तेथें दंगे सुरू होत; त्यामुळें अनेक देशांतल्या सरकारांनीं त्याला तुरुगांत टाकलें, व शेवटीं १८५१ सालीं ऑस्ट्रियानें त्याला रशियाच्या ताब्यांत दिलें; तेथें पांच वर्षे कैदेंत ठेवून नंतर त्याला सैबेरियांत हद्दपार करण्यांत आलें. तेथून पळून जाऊन तो जपानमार्गें युरोपांत परत आला. त्याच्या अतिरेकी मतांमुळें त्याचा मार्क्सबरोबर व इंटर नॅशनल या संस्थेबरोबर तंटा झाला. त्यामुळें रशियांत खुद्द त्याच्या पक्षानेंच त्याची बदनामी केली. त्यामुळें अगदीं एकाकी स्थितींत तो लवकरच बर्न येथें मरण पावला. सरकार ही संस्था( स्टेट )च नसावी, असा त्याचा प्रचार होता; तसेंच सर्व व्यक्तींमध्यें अगदीं पूर्ण समानता असावी, वडिलार्जित हक्क व धर्म यांचें पूर्ण उच्चाटन करावें. पण यानंतरची समाजव्यवस्था कशी असावी, याबद्दल विधायक योजना मात्र त्याला कांहींच सुचवतां आली नाहीं; त्यामुळें अखेर सर्वनाश अशा सर्व विध्वंसक स्वरूपांत त्याच्या मतांचें पर्यवसान झालेलें दिसतें.

**बांगड्या**—(अलंकार पाहा). अत्यंत प्राचीन काळापासून ईजिप्त, मीड, इराण या देशांतील बायका बांगड्या वापरीत असलेल्या आढळून येतात. यहुदी लोकांमध्यें स्त्री व पुरुष दोघेहि कांकणें वापरीत असत. ग्रीक लोकांत फक्त बायका कांकणें वापरीत. हीं सर्पाकृति असत व त्यांचे हातावर एक-दोन वळसे असत. रोमन लोकांमध्यें युद्धांत शौर्य दाखविणाऱ्या वीरांस कडीं बक्षीस देण्याचा प्रघात होता. रोमन उच्च घराण्यांतील स्त्रिया मनगटांत व दंडांवर कंकणें वापरीत. जर्मन लोकांतहि पूर्वी बहुधा कंकण हेंच भूषण असे. भरतखंडांत कंकणें वापरण्याची चाल फार प्राचीन कालापासून दृष्टीस पडते. मोहेंजोदारोमध्यें कंकणांचे अवशेष सांपडले आहेत. स्त्रिया आपल्या हातांत मनगटाजवळ व पुरुष मनगटामध्यें कडीं व बाहूंवर कंकणें वापरीत. यांच्या टोंकांस सिंहाच्या तोंडाचा वगैरे आकार असे. त्यांस वीरकंकण, बाहुभूषण, सिंहकडें, दंडकडें, वगैरे नांवें असत. स्त्रिया जीं दंडांवर कंकणें वापरीत त्यांस वांकी किंवा वेला म्हणतात. यांचे अनेक प्रकार असून त्यांत कलाकौशल्य बरेंच प्रगट करण्यांत येत असे.

मनगटांतल्या अलंकारांना आवापक, पारिहार्य, कटक, वलय अशांसारखीं संस्कृत नांवें आहेत. विरहावस्थेंत वलय कोपरापर्यंत जाई अशीं काव्यांतून वर्णनें आढळतात. वलयाच्या खालीं कंकण ( करभूषण ) घालीत. कंकणाचे उल्लेख संस्कृत साहित्यांत अनेक आहेत.

बांगड्यांना चुडे असें सौभाग्यार्थी म्हणतात. चुडेदान करणें म्हणजे सौभाग्य राखणें. बंगाल्यांत पूर्वी शंखाचे चुडे असत. शंखाच्या बांगड्यांनंतर धातूच्या बांगड्या आलेल्या दिसतात. कांशाच्या बांगड्या करणारांस कासार हें यथार्थ नांव आहे.

**बागलकोट**—मुंबई इलाखा, विजापूर जिल्ह्याचा नैर्ऋत्येकडील तालुका. क्षे. फ. ६८३ चौ. मै.. लो. सं. (१९४१) ९६,५१६. गांव घटप्रभा नदीच्या कांठीं असून मद्रास सदर्न मराठा रेल्वेचें स्टेशन आहे. लो. सं. (१९४१) २४,५२१. येथून ५ मैलांवर मुचकुंदी येथें शेतांना पाणी देण्याकरितां मोठें तळें बांधलेलें आहे. पूर्वीं हें गांव रावणाच्या पदरीं असलेल्या गायनवादनपटु मंडळींच्या ताब्यांत होतें असें म्हणतात. १६ व्या शतकात विजयानगर राजांच्याकडे होतें. १७५५ त सावनूरच्या नबाबाकडून पेशव्यांनीं घेतलें. कांहीं काळ हैदराच्या ताब्यांत होतें. पेशव्यांच्या वेळीं येथें टांकसाळ होती ती १८३५ त बंद झाली. येथें एक कॉलेज आहे.

**बागलाण**—मुंबई इलाखा, नाशिक जिल्ह्यामध्यें, सातपुडा डोंगराच्या उत्तरेकडील प्रदेश. यांत बागलाण व कळवण तालुके आहेत. प्राचीन काळीं हा प्रदेश राठोड घराण्याच्या ताब्यांत होता व दख्खन आणि गुजराथ यांच्या दरम्यान चालणाऱ्या व्यापाराचा मार्ग या प्रदेशांतून असल्यामुळें याची भरभराट असे. दक्षिणच्या इतिहासांत यास बरेंच महत्त्व होतें. मराठ्यांच्या इतिहासांत या बागलाणाचा नेहमीं उल्लेख येतो.

बागलाणी असा जुन्या मराठी भाषेचा एक प्रकार आहे. ज्ञानेश्वराचे कांहीं अभंग या बागलाणी भाषेंत आहेत.

**बागेवाडी**—मुंबई, विजापूर जिल्ह्यांतील मध्य तालुका. क्षे. फ. ७६५ चौ. मैल. लो. सं. (१९४१) १,१३,१८४. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बागेवाडी. वार्षिक पावसाचें सरासरी मान २५ इंच आहे. बागेवाडी सदर्न मराठा रेल्वेच्या तेलगी स्टेशनपासून बारा मैलावर आहे. गांवाची लो. सं. सुमारें ८०००. लिंगायत धर्माचा संस्थापक बसव याची ही जन्मभूमि आहे. येथें बसवेश्वराचें मंदिर असून तेथें गणपति, संगमेश्वर, मल्लिकार्जुन, वगैरे देवांचीं देवळें आहेत. या गांवाला पूर्वीं नीलगिरिपट्टण व पुढें बागोडी असें म्हणत.

**बागेसरी**—हा राग काफी थाटाचा जन्य आहे. याच्या आरोहांत पंचम स्वर वर्ज्य करतात व अवरोह सात स्वरांनीं होतो, म्हणून जाति षाडव संपूर्ण आहे. वादी मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय मध्य रात्र मानितात. कांहीं गुणी जन या रागांत पंचम स्वर मुळींच घेत नाहींत व कांहीं घराण्यांत पंचम स्वर आरोहांत व अवरोहांत घेतलेला दृष्टीस पडतो. वादी स्वर व सम यांत मात्र सर्वांचा एक मेळ आहे. पहिला प्रकार अधिक रूढ आहे.

**बाघ**—मध्य हिंदुस्थानांत, ग्वाल्हेर संस्थानच्या अमझेरा जिल्ह्यामधील एक खेडेगांव. वस्ती सु. दोन हजार. महू स्टेशनपासून ८७ मैलांवर गांव आहे. येथील बौद्ध अवशेष प्रसिद्ध आहेत. हें गांव बाघ किंवा बाघ व गिरण्या यांच्या संगमावर आहे. दहाव्या शतकांत राजा मोरधाज (मयूरध्वज) यानें हें गांव वसविलें असें म्हणतात. त्यानें बांधिलेल्या किल्ल्याचे अवशेष भाग अद्यापि दिसतात. अठराव्या शतकांत हें गाव प्रथम पेशव्यांकडे व नंतर शिंदे सरकारकडे गेलें.

बाघलेणीं—गांवापासून ३ मैलांवर लेणीं आहेत. या लेण्यांतील २, ३ आणि ४ या अनुक्रमांचीं लेणीं अतिशय महत्त्वाचीं मानलीं जातात. अनु. ४ मध्यें ९० चौ. फूट सभामंडप असून बाजूला लहान खोल्या आहेत. सभामंडपांत दोन्ही बाजूंना खांबांच्या रांगा आहेत. भिंतींवर रंगीत चित्रें आहेत. अनु. ४ आणि ५ या लेण्यांपुढें २२० फूट लांबीचा सोपा आहे. त्यावरचें छप्पर गेलें असून ऊन, वारा, पाऊस, इ. नीं तो उध्वस्तहि झाला आहे. पण त्यांत कोठें कोठें अद्यापिहि चित्रांचे अवशेष दृष्टीस पडतात. अजंठ्यांतील चित्रकलेपेक्षां येथील चित्रकला जरा निराळी आहे व ती एकाच माणसाची दिसते. एका चित्रफलकांत घोड्यांवर बसून जाणाऱ्यांची मिरवणूक आहे तर दुसऱ्यांत हत्तीवर बसून जाणाऱ्या मुलींची आहे. हत्ती आणि घोडे हीं वैभवदर्शक जनावरें फार सुंदर चितारलीं आहेत व खेळकर मुलींचें दृश्य सुंदर आहे. एका चित्रांत नाचणाऱ्या व गाणाऱ्या बायकांचा देखावा आहे. चित्र अतिशय सुंदर आहे. मुलींचे वेष, हावभाव व वाद्यें हीं भिन्न आहेत. रंगसंगति उत्कृष्ट साधली आहे.

हीं लेणीं बौद्धांचीं असून त्यांचा काळ बहुधा इ. स. ६ वें किंवा ७ वें शतक असावा.

**बाघेलखंड**—बुंदेलखंडाजवळचा मध्य हिंदुस्थानांतील एक भाग. रजपुतांच्या बाघेला जातीवरून या प्रदेशाला बाघेलखंड हें नांव पडलें असून आज सहा-सात शतकें हा प्रदेश त्यांच्याच ताब्यांत आहे. या प्रदेशांत नैर्ऋत्येपासून ईशान्येपर्यंत कैमूर पर्वताची रांग गेलेली आहे. या रांगेच्या पश्चिमेकडील भाग उंच असून सपाटीचा आहे व पूर्वेकडील डोंगराळ आणि जंगली आहे. पश्चिम भागांतून टोन्स व पूर्व भागांत शोण या नद्या वाहतात.

**बाजपई, रामलाल बाळाराम** (१८८३- )—अमेरिकेंतील एक हिंदी शास्त्रज्ञ. जन्म नागपूर येथें झाला. यांचें शिक्षण बी. एस्सी. पर्यंत नागपूर येथें होऊन पुढें अमेरिकेमध्यें मिनेसोटा येथील युनिव्हर्सिटीमध्यें झालें (१९१८-१९). यांनीं चीन व जपान यांमध्यें प्रवास केल्यावर १९१५ मध्यें अमेरिकेमधील सॅन फ्रॅन्सिस्को येथें प्रयाण केलें. तेथें बराच प्रवास केल्यावर त्यांस १९२० मध्यें एका कंपनींत औषधांचें सत्त्व काढण्याच्या खात्यांत मुख्य केमिस्ट म्हणून काम मिळालें. दुसऱ्याच वर्षी १९२१ मध्यें न्यूयॉर्क येथें जे. एल्. हॉपकिन्स आणि कंपनींत

त्यांस प्रथम केमिस्ट म्हणून व नंतर मुख्य केमिस्ट म्हणून नेमण्यांत आलें. यांचा औषधें करण्याचा फार मोठा कारखाना आहे. अमेरिकेंतील हिंदुस्थान असोसिएशनचे ते जनरल सेक्रेटरी होते. लाला लजपतराय व जे. टी. संडरलँड हे अमेरिकेंत प्रवास करीत असतांना हे त्यांच्याबरोबर होते. अमेरिकेंतील इंडिया होमरूल चळवळीचे ते चिटणीस होते. न्यू यॉर्क येथें निघणाऱ्या 'यंग इंडिया' पत्राचे ते साहाय्यक संपादक होते. अमेरिकेंतील इंडियन इन्फर्मेशन ब्यूरो (भारताची माहिती देणारी मंडळी), फ्रेंड्स ऑफ फ्रीडम फॉर इंडिया (हिंद स्वातंत्र्य मित्र मंडळ), इंडिया फ्रीडम फाउंडेशन (हिंद स्वातंत्र्य संघ), यंग इंडिया असोसिएशन (तरुण हिंद संघ) या संस्थांचे ते चिटणीस असून राष्ट्रीय सभेच्या अमेरिकेंतील शाखेचे ते मुख्य चिटणीस होते. वीस वर्षांवर अमेरिकेंत निवास केल्यावर ते हिंदुस्थानांत एकदां परत आले होते, पण पुन्हां अमेरिकेंत गेले.

**बाजपेयी, सर गिरिजाशंकर** (१८९१- )—एक हिंदी अधिकारी व मुत्सद्दी. यांचें शिक्षण मूर सेंट्रल कॉलेज अलाहाबाद व मर्टन कॉलेज, ऑक्सफर्ड यांमध्यें झालें. यांची आय्. सी. एस्. मध्यें नेमणूक १९१५ मध्यें झाली. यांनीं संयुक्त प्रांतांत नोकरी केली. यांची नेक नामदार व्ही. एस्. श्रीनिवासशास्त्री यांचे चिटणीस म्हणून व इंपीरिअल कॉन्फरन्सचे हिंदुस्थानचे सेक्रेटरी म्हणून १९२१ मध्यें नेमणूक झाली. नंतर १९२१-२२ मध्यें भरलेल्या वॉशिंग्टन येथील निःशस्त्रीकरण परिषदेकरितां यांस पाठविण्यांत आलें. हिंदुस्थानांतून गेलेल्या लोकांची सामाजिक स्थिति अवलोकन करण्यासाठीं त्यांस कॅनडा, ऑस्ट्रेलिया व न्यू झीलंड या राष्ट्रांत प्रतिनिधी म्हणून नेमण्यांत आलें. १९२३ मध्यें त्यांची हिंदुस्थान सरकारचे शिक्षण-खात्याचे अंडर सेक्रेटरी म्हणून नेमणूक झाली व १९२४ मध्यें त्यांस डेप्युटी सेक्रेटरी म्हणून नेमण्यांत आलें. दक्षिण आफ्रिकेंत पाठविलेल्या शिष्टमंडळाचे चिटणीस म्हणून त्यांनीं १९२५-२६ मध्यें काम केलें. १९२९ व १९३० मध्यें जिनिव्हा येथें पाठविलेल्या हिंदी प्रतिनिधिमंडळाचे ते खाजगी चिटणीस होते. गोलमेज परिषदेस गेलेल्या ब्रिटिश हिंदी प्रतिनिधि मंडळाचे ते संयुक्त चिटणीस होते (१९३०-३१). १९३५ मध्यें प्रथम त्यांची हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळांत तात्पुरती नेमणूक झाली. तेथें ते पुढें कायम होऊन त्यांस हिंदुस्थान सरकारतर्फे अमेरिकेंत अनुकूल लोकमत बनविण्याकरितां पाठविण्यांत आलें. १९४१-१९४६ पर्यंत ते अमेरिकेंत एजंट जनरल म्हणून होते. या कालांत ते अनेक समित्यांतून प्रतिनिधि होते. पंडित नेहरूंबरोबर ते १९४९ सालच्या त्यांच्या अमेरिकेंतील दौऱ्यांत होते. परराष्ट्रीय कारभारांत यांचा सल्ला घेण्यांत येत असतो.

**बाजबहादुर**—हा माळव्याचा शेवटचा बादशहा होता. यानें मांडवगड येथें इ. स. १५५४ पासून इ. स. १५६४ पर्यंत राज्य केलें. हा फार विलासी, मृगयाकुशल आणि संगीतलोलुप होता. एके दिवशीं नर्मदेच्या कांठीं शिकारीस गेला असतां ह्यानें रूपमतीस गातांना ऐकिलें. तिचें गानमाधुर्य व लावण्य पाहून आपली राणी होण्याविषयीं यानें आपली इच्छा तिजजवळ प्रदर्शित केली. तिनें सांगितलें कीं, मी रजपूत असल्यानें तुझ्याशीं लग्न लावणें शक्य नाहीं. परंतु तूं जर नर्मदा नदीस मांडवगडावर नेऊन, तेथून तिचा प्रवाह वाहत जाईल असें करशील तर मी तुझी राणी होईन. खालच्या प्रवाहापासून मांडवगड १,२०० फूट उंच होता. तथापि शहानें राज्यांतील सर्व संपत्ति व साधनें कामास लावून, मांडवगड फोडून नर्मदाप्रवाह वर आणला व तेथें एक रेवाकुंड बांधलें. रूपमतीशीं शहानें या कुंडाजवळ विवाह केला. हें कुंड आज अस्तित्वांत आहे व याच्याजवळच बाजबहादुराचा राजवाडा व रूपमतीचा महाल हीं विपन्न स्थितीमध्यें अद्यापि दिसतात. (मांडवगड पाहा). या लग्नानंतर शहानें राज्यकारभारांत दुर्लक्ष करून आपला काळ शृंगारसुखामध्यें घालविला. ह्यामुळें मोंगलांनीं १५६४ सालीं हें राज्य जिंकून घेतलें व बाजबहादुराचा खजिना व जनानखाना शत्रूच्या हातीं जाण्याचा प्रसंग आला. तेव्हां शहानें आपल्या राण्यांचा वध करविला. हा हिंदुधर्मद्वेष्टा नव्हता. बाजबहादुर व रूपमती यांच्यावर माळव्यांत पुष्कळ काव्यें केलेलीं आढळतात. हीं दोघेंहि कविता करीत. त्यांचें काव्य इंग्रजींत छापून निघालें आहे.

**बाजरी**—या धान्याला सजगुरा असेंहि म्हणतात. पांच ते सहा फूट उंचीचें व बहुधा आफ्रिकेंतून आलेलें हें तृणधान्य आहे. हिंदुस्थानांत बाजरीची लागवड ज्वारीपेक्षां कांहीं कमी प्रमाणावर परंतु ज्वारी होणाऱ्या सर्व प्रदेशांत (उत्तर, पश्चिम व दक्षिण हिंदुस्थानांत) केली जाते. हें पीक केवळ पावसाच्या पाण्यावर होत असून हवा साधारण कोरडी, पावसाच्या जोराच्या सरी व मधून मधून चांगलें ऊन मिळाल्यास तें चांगलें येतें. हें पीक खानदेशांतील कांहीं भाग सोडल्यास नेहमीं मिश्र असते. म्हणजे दुसऱ्या एखाद्या धान्याबरोबर पेरलें जातें व अशा रीतीनें एकाच शेतांत लागोपाठ बाजरीचें हें पीक करतां येतें. मारवाड व कच्छ या प्रदेशांतील बाजरी सर्वोत्कृष्ट असते.

मुख्यतः खालच्या वर्गांतील लोक या धान्याचा उपयोग करतात व हिंदुस्थानच्या कित्येक भागांतील तें मुख्य अन्नधान्य आहे. बाजरीची भाकरी भातापेक्षां अधिक पौष्टिक असते. पंजाबांत कधीं कधीं गुरांना चारा मिळावा म्हणूनच बाजरी पेरतात.

बाजरीचीं कणसें भाजून खातात. त्यास ‘निंभूर’ म्हणतात. बाजरीच्या कडब्याला सरम किंवा सरमाड असें नांव आहे. थंड हवेंत माणसाला बाजरी मानवते.

**बाजाची पेटी**—( हार्मोनियम ). हें वाद्य म्हणजे हात सव्वा हात लांबीचा व एक वीत रुंद व एक वीत उंच असा एक लांकडी खोका असतो. त्यांत स्वरांच्या पितळी जिव्हाळ्या बसविलेल्या असतात. त्यांवर दाबून वाजविण्याकरितां पांढऱ्या रांध्याच्या पट्टया बसविलेल्या असतात. त्या दाबल्यानें शुद्ध स्वर निघतात आणि विकृत स्वर काढण्याकरितां पांढऱ्या पट्टया एकमेकींस जेथें मिळतात तेथें काळे लांकडी तुकडे बसविलेले असतात. ह्या खोक्यास वारा भरण्याचा भाता लाविलेला असतो. तो मागेंपुढें हातानें हालविल्यानें सुरू होऊन स्वर वाजूं लागतात. ह्या बाजाच्या पेटीचे दोन प्रकार आहेत : एक हातपेटी व दुसरी पायपेटी. हातपेटींत हातानें भाता चालवावयाचा व पायपेटींत पायांनीं भाता चालवावयाचा असतो. प्रायः ह्या पेट्यांत तीन सप्तकें असतात. हें इंग्रजी वाद्य हल्लीं आपल्याकडे फारच प्रचारांत आलें आहे. गाण्याला याची साथ लागते.

**बाजार**—सामान्य अर्थी बाजार म्हणजे मालाची खरेदी-विक्री जेथें होत असते ती विशिष्ट जागा. अर्थशास्त्रीय दृष्टया बाजारांत देवघेवीसाठीं स्पर्धा असली पाहिजे. एखाद्या विवक्षित जागेंतच ती पाहिजे असें नसून स्थानिक, राष्ट्रीय आणि आंतर-राष्ट्रीय बाजार अशा व्यापक अर्थानें बाजार संज्ञा वापरतात. या बाजारांतले गिऱ्हाईक एका जागीं एकत्र आले पाहिजेत असेंहि नाहीं. त्यांचे समूह निरनिराळ्या मालासाठीं असले म्हणजे सोन्याचा, कापसाचा, शेअरचा, असे निरनिराळे बाजार पडतात. या बाजारांत चढाओढीनें दर वेळीं मालाची ठराविक किंमत ठरत असते. सट्टे होऊन धाऊक खरेदी-विक्री अशा बाजारांत चालते.

बाजारभाव बदलत असल्यानें ते देणारीं वृत्तपत्रें किंवा स्वतंत्र पत्रें असतात. व्यापारी जगांत बाजारभावाकडे लक्ष ठेवण्याला फार महत्त्व असतें.

**बाजी पासलकर**— एक शूर मराठा सरदार. हा पुणें जिल्ह्यांतील मुसें खोऱ्याचा देशमुख व शिवाजीचा बाळमित्र होता. मावळांतील देशमुखाचे वतनी तंटे मोडण्यांत हा प्रमुख असे. त्यानें अनेकांचे वतनी व इतर तंटे तोडल्याचे उल्लेख आहेत. फलटणचा वणगोजी नाईक निंबाळकर मावळांतील ह्या देशमुखांची मर्जी सांभाळून असे. एखाद्या देशमुखाचा खून वगैरे होऊन त्याचीं चायकामुलें देशोधडीस लागल्यास बाजी पासलकर त्यांस आश्रय देई. देशमुखांस कर्जाबद्दल किंवा चांगल्या वर्तणुकी-बद्दल जामीन राहून त्यांच्या तो उपयोगी पडत असे. अशा इभ्रतीचा बाजी पासलकर हा मावळा देशमुख शिवाजीस आढळ-तांच त्यास त्यानें हाताशीं धरिलें. बाजीचें पूर्ण नांव बाजी वल्द बापूजी यशवंतराव पासलकर असें होतें. ‘यशवंतराव’ हा किताब होय. शिवाजीचें विजापूरकरांशीं युद्ध सुरू असतां शिवाजीनें एके समयीं ( १६६० ) बाजी पासलकर यास वाडीच्या सांव-ताचा चंदोबस्त करावयास सांगितलें होतें. तेथें त्यानें बराच पराक्रम व्यक्त केला. १६७२ सालीं सिद्दी जेव्हां आरमार ठेवून शिवाजीच्या मुलुखास त्रास देऊं लागला तेव्हां २००० मावळे बरोबर देऊन शिवाजीनें यास त्याच्यावर पाठविलें. पण या लढाईंत बाजी पडला.

**बाजी प्रभु देशपांडे** ( मृ. १६६० )— शिवाजीचा एक शूर सरदार. बाजीचा बाप पिलाजी हा हिरडस मावळचा देश-कुलकर्णी असून त्या वेळीं कृष्णाजी नाईक बांदल हा देशमुख होता. या दोघांनीं मावळांत जबरदस्ती करून इतर देशमुखां-कडून दाइतें घेतलें. बाजी हा नांवाजलेला वीर व दांडपट्टा वगैरेंत निष्णात होता. आदिलशाही सुभेदार व बांदल यांच्या नेहमीं झटापटी होऊं लागल्या व शेवटीं दादाजी कोंडदेवालाच इ. स. १६४३ च्या सुमारास कृष्णाजीशीं लढाई देणें भाग पडलें. बाजीनें खास शिवाजीची भेट घेतली व दहा हजार फौज ठेव-ण्याचा अधिकार मिळवला. इ. स. १६४८ त ही सेना शिवाजी-बरोबर राहून तिनें पुरंदर, कोंडाणा, राजापूर, वगैरे किल्ले घेण्यांत मदत केली. शिवाजीला राज्यस्थापनेंत जेधे व बांदल ‘हनुमंत-अंगदा’प्रमाणें मदत करीत होते. १६३० सालीं मोंगल, सिद्दी, आदिल व सांवत यांच्या पन्हाळ्याच्या वेढ्यांतून पार पडणें म्हणजे नशिबाची परीक्षाच होती. शिवाजीची पन्हाळ्याहून निर्वेध मुक्तता ही हिंदुस्थानच्या इतिहासांतील अत्यंत महत्त्वाची काम-गिरी होती. त्यावर हिंदवी स्वराज्याचा उदय किंवा अस्त याचा निकाल लागावयाचा होता. शिवाजीनें रात्रीं रांगण्याकडे कूच केलें ; त्याचा पाठलाग फाजलच्या घोडदळानें केला. तेव्हां बाजीनें महाराष्ट्रांत दुसरी बिकट ‘थर्मापिली’ घोडखिंडींत केली. तीन–चार तासपर्यंत हातघाईचें तुंबळ युद्ध केलें. बाजीचा वडील भाऊ फुलाजी ठार झाला व कित्येक मावळे वीर पडले. शेवटीं बऱ्याच जखमा होऊन बाजीहि पडला. बाजीच्या तरवारीचा पट्टा बंद झाला, परंतु तोंडाचा पट्टा चालू राहिला. राहिलेल्या तुटपुंज्या मावळ्यांना धीर देऊन खिंड तशीच अडवून धरविली व शेवटीं शिवाजी रांगण्यास सुखरूप पोहोंचल्याच्या तोफा ऐकतांच बाजीनें कर्तव्यमुक्त झाल्याचा अखेरचा दीर्घश्वास सोडला ( १३ जुलै १६६० ).

**बाजी भीवराव रेटरेकर** ( मृ. १७३९ )—एक ब्राह्मण सरदार. हें रेटरेकर देशस्थ घराणें पेशव्यांचें ऋणानुबंधी होतें. भीवराव रेटरेकर व बाळाजी विश्वनाथ यांचा स्नेह असून, भीवरावास जे मुलगे झाले त्यांचीं नांवेंहि त्यानें बाजीराव व चिमाजी अशींच ठेविलीं. बाजी हा पेशव्यांच्या सैन्यांत एक पथकी होता. तो १७३४ सालीं सिद्दीवरील लढाईंत, १९३७ सालच्या साष्टीवरील स्वारींत व १७३९ सालच्या तारापूरच्या मोहिमेंत होता. तारापूरच्या हल्ल्यातच तो मारला गेला. त्या वेळीं त्याच्या मातुश्रीस व भावास बाजीराव पेशव्यानें लिहिलेलीं पत्रें फार प्रेमळ आहेत. याचा मुलगा बापूजी बाजी नानासाहेबाच्या वेळीं अनेक कामगिरींवर होता. नानासाहेबांच्या १७४१ सालच्या उत्तरेकडील स्वारींत बापूजी होता. नानासाहेबाच्या विरुद्ध ताराबाई व दमाजी गायकवाड, वगैरे असतां ज्या मंडळींनीं दमाजीचा गेंडयाच्या माळावर पराभव केला त्यांत हा प्रमुख होता ( १७५१ ).

**बाजीराव बल्लाळ पेशवे** ( १७००–१७४० )—मराठे साम्राज्याचा भट घराण्यातील दुसरा पेशवा. हा वडील बाळाजी विश्वनाथ याच्या तालमींत शिपाईगिरीचें काम करण्यास लहानपणींच तयार झाला. बाळाजी वारल्यानंतर याची हुषारी व धडाडी पाहून शाहूनें यालाच पेशवेपद दिलें. यानें उत्तरेकडे मोहिमा नेऊन मराठ्यांचें साम्राज्य वाढविलें. शिवाजी स्वराज्यसंस्थापक तर बाजीराव साम्राज्यसंस्थापक म्हणतां येईल. यानें निजामाचा अनेक वेळां पराभव केला; गुजराथ आणि माळवा आपल्या ताब्यात ठेविला, व दिल्लीच्या मोंगल बादशाहीवरहि वचक बसविला. शिंदे, होळकर, पवार, जाधव, बुंदेले, हिंगणे, विंचूरकर, इ. मराठे सरदार बाजीरावाच्या हाताखालीं तयार झाले. याचा भाऊ चिमाजीआप्पा हाहि बाजीरावाप्रमाणें शूर होता. त्यानें माळवा आणि वसई यांकडील मोहिमा फत्ते केल्या. मराठ्यांचा जुना सेनापति दाभाडे हा शत्रूला मिळाल्यामुळें बाजीरावाला त्याच्याशीं लढाई करावी लागली. जंजिऱ्याच्या सिद्दीबरोबर बाजीरावानें लढाया खेळल्या व आंग्र्यांच्या घरांतील भांडणें मिटविण्याचा प्रयत्न केला. तथापि संभाजी आंग्रे त्याच्याविरुद्ध गेला. बुंदेलखंडाच्या छत्रसाल राजास बंगषविरुद्ध यानें मदत दिली व बुंदेलखंड आपल्या वर्चस्वाखालीं आणलें. नादिरशहानें दिल्लीवर स्वारी केल्याचें ऐकून बाजीराव तिकडे निघाला होता, पण नादिरशहा अगोदरच इराणला परत गेला. बाजीरावास मृत्यु आला तो देखील नर्मदातीरीं छावणींतच. म्हणजे सबंध वीस वर्षें या पेशव्यानें अविश्रांत लढाया देण्यांत काढलीं. राज्यकारभाराची व्यवस्था त्याला प्रत्यक्ष पाहतां आली नाहीं. तथापि त्याचे कारभारी, आई राधाबाई व भाऊ चिमाजी हे चांगले कर्तबगार असल्यानें त्यांत देखील कमी पडलें नाहीं.

मराठ्यांचें शौर्य सर्व हिंदुस्थानास या पेशव्यानें दाखवून चकित करून सोडलें. शिवाजीनंतर एवढी हिंदुस्थानच्या इतिहासावर छाप टाकणारा हाच पुरुष होऊन गेला. याच्यामुळेंच मराठ्यांचें राज्य व लौकिक सर्वत्र पसरला. आजहि त्यांचे अवशेष व स्मारकें दिसतात.

बाजीरावाची बायको काशीबाई ही चासकर जोशी घराण्यांतील. हिचे बाळाजी ( नानासाहेब ) व रघुनाथ हे दोन मुलगे पुढील इतिहासांत गाजले. मुसलमानी रक्षा मस्तानी हिच्यापासून बाजीरावाला झालेला मुलगा समशेरबहाद्दर याचे वंशज अद्यापि आहेत.

**बाजीराव रघुनाथ पेशवे** ( १७७५–१८५१ )—मराठे साम्राज्याचा शेवटचा पेशवा. हा राघोबाचा पुत्र त्याच्या पळापळीच्या धामधुमींत धार येथें जन्मला. पुढें कोपरगांवीं आई-( आनंदीबाई )बरोबर नजरकैदेंत होता. तेव्हां याला मुत्सद्देगिरी किंवा शिपाईगिरी हिचें शिक्षणच मिळालें नाहीं. नुसता विलासी आणि धर्मभोळा निघाला. यात भित्रेपणाहि पुरेपूर होता. तेव्हां साहजिकच कपटनीति फक्त याच्या अंगीं बाणली. पेशवाईच्या गादीवर आल्यानंतर यानें नाना फडणिसाचें न ऐकतां पोरसवदा दौलतराव शिंदे याच्या नादीं लागून यानें जुन्या सरदारांचा छळ आरंभिला. नाना फडणीस मृत्यु पावल्यावर याला चांगला सल्लागार कोणी राहिला नाहीं व तो गैरमुत्सद्दीपणानें वागूं लागला. त्यामुळें यशवंतराव होळकरानें पुण्यावर स्वारी केली. तेव्हां होळकराच्या भीतीनें हा पुणें सोडून पळाला व इंग्रजांशीं कुप्रसिद्ध व नामुष्कीचा वसईचा तह केला ( १८०२ ). या तहामुळें त्याला गादी परत मिळाली खरी, पण स्वातंत्र्य आणि वरिष्ठाधिकार गेले. तेव्हां इंग्रजांविरुद्ध यानें कपट-कारस्थानें आरंभलीं. त्रिंबकजी डेंगळयाच्या नादीं लागून गंगाधरशास्त्री पटवर्धन या इंग्रजांचा पाठिंबा असलेल्या बडोद्याच्या वकिलाचा पंढरपूरच्या देवळांत खून करविला. त्यामुळें रेसिडेंट एल्फिन्स्टन यानें बाजीरावावर फार पाळत ठेविली. आंतून भिल्ल, पुंड व इतर हलके लोक यांच्याशीं दळणवळण ठेवून बाजीरावानें इंग्रजांना राज्यांतून घालविण्याची तयारी चालविली, पण बापू गोखल्याखेरीज त्याच्याजवळ शूर व निष्ठावंत सरदार कोणीहि नव्हता. इंग्रजांचें जाळें कसें पसरलें आहे व त्याचें सामर्थ्य किती आहे याची मुळींच कल्पना या भोळया पेशव्याला नव्हती असें म्हणावें लागतें. खडकीच्या पहिल्याच लढाईंत आपल्या सैन्याचा पराभव झालेला पाहतांच यानें पळ काढला व शेवटीं दमल्यावर इंग्रजांना सर्व राज्य अर्पण करून त्यांनें

एखाद्या उतारावरील माती वगैरे खालीं घसरून जाऊं नये अशी तजवीज करावयाची असेल, त्या वेळीं त्या ठिकाणीं बांध घालण्यांत येतो. जेव्हां असा बांध केवळ मातीचा बांधावयाचा असेल त्या वेळीं त्याचा छेद त्रिकोणाकृति असतो. जेव्हां हा बांध डबराचा अथवा मोकळ्या धोंडादगडांचा किंवा माती मिसळलेली वाळू किंवा गोटे यांचा बांधावयाचा असेल तेव्हां दीड फूट पायाच्या रुंदीस एक फूट उंची ( १·५ : १ ) हें प्रमाण असावें. जेव्हां कोरडी मोकळी माती असेल तेव्हां हें प्रमाण २ : १ असावें. कांहीं पोकळ मातीच्या बाबतींत यापेक्षांहि मोठें प्रमाण ठेवावें लागतें. जमीन दलदलीची किंवा चिखलवट असेल तर या बांधामध्यें पाण्यांत बोरू, लव्हाळे किंवा काव्यांच्या मोळ्या वगैरे घालण्यांत येतात; किंवा कृत्रिम पाया बांधण्यांत येतो. जेव्हा पाणी अडविण्याकरितां बांध घालावयाचा असतो त्या वेळीं पाणी जमिनींत जितक्या खोलीपर्यंत झिरपून जात असेल तितक्या खोलीच्या खालीं पाणी झिरपून न जाईल अशा तऱ्हेच्या जमिनीच्या थरापर्यंत एक जलाभेद्य (पाणी झिरपून न जाणारी ) भिंत बांधावी लागते.

**बांधबंधारे**—अन्नमय प्राण ही गोष्ट नित्य व सत्य असल्यानें अनादि कालापासून मानव अन्नधान्योत्पादनाच्या उद्योगांत गुंतलेला आहे. धान्यनिर्मितीसाठीं स्थल, जल व ज्ञान यांची गरज लागते. पृथ्वीच्या पाठीवर तीन-चतुर्थांश भाग पाणी व पाव हिस्सा जमीन अशी विभागणी असून त्यांतहि कांहीं भाग हिमाच्छादित, खडकाळ, आणि जंगलमय अतएव धान्योत्पादनास निरुपयोगी आहे. उरलेला लहान अंश पेराऊ कीर्दसारक्षेत्र तेवढेंच काय तें धान्योत्पादनाच्या उपयोगी पडणारें आहे.

धान्योत्पादनास जागा व ज्ञान यांपेक्षा पाण्याची गरज विशेषत्वानें भासते, आणि तें मुख्यत्वेंकरून पावसाच्या रूपानेंच मिळत असतें. जेथें पाऊस नियमित व पुष्कळ पडतो, तो प्रदेश समृद्ध असतो. पण पर्जन्य फार चंचल व टांचका असतो. तेथें समृद्धि नसतेच म्हटलें तरी चालेल. पण मानवानें आपलें ज्ञान वापरून पर्जन्याच्या लहरी स्वभावास अनुकूल करून घेण्याचे विविध प्रयत्न चालू ठेवले आहेत. विहिरी खोदणें, तळीं व तलाव बांधणें, बंधारे तयार करणें, डोहांतील पाणी उपसणें यासारखे अनेक उद्योग आजवर करीत आला तेच तो पुढेंहि चालवणार आहे. पाणी मिळण्याचा हा प्रयत्न सतत चालावयाचा आहे. वाहत्या पाण्याचा वापर ही सोपी बाबत असून तिच्या मोठ्या स्वरूपास कालवा तर लहान स्वरूपास बंधारा अगर धरण अशा संज्ञा दिल्या जातात.

सागरांतील पाण्याची वाफ सूर्याच्या तप्त किरणांनीं करावी, ती अंतराळांत चढून वाऱ्यावर सर्वत्र विभागली जावी. आणि ती अनुकूलता मिळेल तेथें व त्या वेळीं पर्जन्यरूपानें भूमीवर परत यावी असा क्रम आहे. भूरचनेच्या उतारानें भूमीवरील पाणी जलप्रवाहांतून नाले-नद्या या रूपानें परत सागरांत जाऊन पडावें, असें हें स्वाभाविक कर्मचक्र सतत चालू आहे. भूमीवर पडलेलें पाणी वाहतांना अनेक चमत्कार करीत असतें. कांहीं भूपृष्ठभागावरून वाहतें तर कांहीं भूमीमध्यें शिरून तिच्या पोटांतून वांकड्यातिकड्या दिशेनें प्रवास करीत असतें. या नैसर्गिक शक्तींचा उपयोग मानवानें आपल्या बुद्धीच्या बळावर करून घेऊन आपला चरितार्थ चालवावा, असा ईश्वरी संकेत असल्यानें पाणी मिळवण्याचीं विविध साधनें मानवानें निर्माण केलीं आहेत व अन्नोत्पादनाकरितां शेतीचा व्यवसाय त्यानें पत्करला आहे. इतकेंच नव्हे तर वसतीच्या जागा पसंत करतांना नदीकांठासारखी अगर सरोवरतीरासारखी पाणीपुरवठ्याची सोय पाहूनच माणसानें आपलीं लहान-मोठीं गांवें वसवण्याची रीति स्वीकारली आहे. जलाशयाचे अनेक प्रकार असल्याचें आपण पाहतों. त्यांत विहीर, तलाव यांतील पाणी संथ असतें तर नद्यांतील डोह आणि नाल्याओढ्यांतील बंधारे यांतील पाणी वाहतें असतें. जलप्रवाहांचें अल्पकाल, मध्यमकाल व बारमाही वाहणारें स्वरूप असतें व तेवढ्यापुरताच त्यांचा उपयोग करून घेणें प्राप्त असतें. पण आपल्यास कालव्यासारख्या मोठ्या भव्य कामाचा येथें विचार कर्तव्य नाहीं. ( कालवे पाहा ). तर बंधाऱ्यासारख्या लहान स्वरूपाच्या पण बहुसंख्यपणानें जास्त उपयोगी अशा योजनांचा विचारच थोड्याशा विस्तारानें करावयाचा आहे.

असल्या योजना कच्च्या व पक्क्या स्वरूपांत आढळतात. कच्चा बंधारा उभारण्याचा खर्च थोडा असला तरी तो दरसाल अगर प्रसंगीं दुबारहि करावा लागतो. पण बंधारा पक्का उभारण्याचा खर्च पहिल्यानें अधिकसा भासला तरी सोयीच्या दृष्टीनें व कालांतराच्या हिशोबानें परिणामीं काटकसरीचा व जास्त उत्पादकच ठरत असतो! पण प्रायः या तत्त्वाकडे फारसें कोणी पाहत नाहींत. विहिरी व तलाव यांची उपयुक्तता असली तरी त्यांच्या मर्यादा लहानच असतात. बंधाऱ्यांची मर्यादा थोडीशी मोठी असते, पण कालमर्यादेचें बंधन अधिक पडतें. कालव्यांची उपयुक्तता कमालीची असली तरी त्यांच्या उभारणीमधील कठिणपणाहि पण कमालीचा असतो. कालव्यासाठीं बांधलेलीं धरणें घाटमाथ्यावर सोयीच्या ठिकाणीं असलीं व जवळच खोल सखल प्रदेश असला तर धरणांतील पाणी वापरतांना प्रथम वीज उत्पन्न करून घ्यावी आणि नंतर वाहणारें पाणी पिकास, कारखान्यास अगर इतर उपयोगास घ्यावें, याकरितां योजना कराव्या लागतात. आपल्या

भारतांत तरी असल्या योजना अगदीं नवीन आहेत. खोपोली, मुळशी, भाटघर, शिवसमुद्रम्, इत्यादि योजना पुऱ्या झाल्या आहेत, तर राधानगरी योजना पूर्णतेस सत्वर पोंचणारी असून कोयना-योजना व दामोदर खोरें योजना यांना आरंभ झाला आहे. पण त्यांच्या पूर्णतेस लागणारा काल व पैसा तसाच मोठ्या प्रमाणांत लागणार हेंहि उघड आहे. म्हणून सद्यःफलदायी लहान भांडवली खर्चाच्या व त्वरित पुऱ्या होणाऱ्या बंधाऱ्यांच्या पक्क्या योजनांवर आतां भर देणें जरूर आहे. त्यामुळें बंधाऱ्यांचें स्वरूप सविस्तर सांगणें ओघानेंच येत आहे.

पाऊसकाल ओसरल्यानंतर नदीनाल्यांतून वाहणारें पाणी वाळूमातीच्या बांधानें अडवून, कांठाकांठानें पाटसरी काढून त्यांतून उतारानें नेत नेत, बाजूस असलेल्या सखल व सपाट जमिनीवर पोंचवण्याची पद्धत फार जुनी असून तीच बंधारा नांवानें आपणांस माहीत आहे. हाच कच्चा बंधारा होय. वाळूमातीच्या जागीं दगडचुन्याचा बांध घातला तर पक्का बंधारा होतो. (बंधारे पाहा.) बंधाऱ्यांचें बांधकाम परिस्थितीच्या मानानें वेगळाल्या नमुन्यांवर करावें लागतें व कल्पकाच्या बुद्धीप्रमाणें अनेक सोयी निर्माण होतात. येथें दिलेल्या अनेक चित्रांचा अभ्यासपूर्वक विचार केला तर वरील गोष्टी चटकन् ध्यानांत येतील. बंधाऱ्यांतील मुख्य तत्त्व असें आहे कीं, पाटाची पाणसळ शक्य तोंवर खालीं न आणतां पाणवुडें क्षेत्र वाढतें राखण्याचा यत्न करणें साधावें.

अधिक धान्य पिकवण्याच्या कामांत या बहुसंख्य बंधाऱ्यांचा कमाल उपयोग होणार असल्यानें बंधारे कोठें व कसे बांधावेत या विषयाचा विचार व आचार अधिक देशहिताचा ठरणार आहे. म्हणूनच थोडी तात्त्विक माहिती पुढें दिली आहे:

(१) नदीनाल्यांच्या उगमाजवळ जंगल वा झाडी दाट असून तेथें वार्षिक पर्जन्यमान व पावसाची माहेवार विभागणी व्यवस्थित आहे अगर कसें? झाडी वाढण्याची शक्यता कितपत आहे?

(२) जलप्रवाहाचें पात्र खोल वा उथळ आणि रुंद वा अरुंद कोणत्या प्रकारचें आहे?

(३) जलप्रवाहाच्या तळास एकसंधी सारखा उतार आहे का मध्यंतरीं जागोजाग लहान लहान धवधवे आहेत?

(४) ज्या भूमागांतून पाटसरी जावयाची तेथें बागाईत पिकांसाठीं भूमि कितपत योग्य आहे? किंवा तेथें दलदल माजण्याची शक्यता अगर संभव कितपत आहे?

(५) जलप्रवाहाच्या पात्रांत पक्कें बांधकाम करण्यास कठिण खडकांचा थर उथळ वर आहे का खोल खालीं आहे?

(६) धरणाच्या जागेच्या वर उगमाकडे किती वेगळाले प्रवाह येऊन मिळत आहेत व त्यांचा पाणीपुरवठा धरणास किती होत आहे?

(७) या धरण-योजनेमुळें बागाईत पिकाचें क्षेत्र कमालीनें वाढण्याची शक्यता आहे का?

ज्या प्रदेशांत वार्षिक पर्जन्यमान तीस इंचांवर असून जलप्रवाहांच्या उगमस्थानीं विपुल झाडी अगर दाट जंगल असतें, अगर पर्जन्यमान वीस इंचांवर पण विभागणी व्यवस्थित असा भूभाग बंधाऱ्यांच्या योजनेस योग्य होय. पसरट उथळ दऱ्या आणि उथळ पाणवटाचे प्रवाह असा प्रदेश बंधाऱ्यांना चांगला असतो. खोल अरुंद दऱ्या अगर जलप्रवाह असलेल्या प्रदेशांत पाणभरतीचें क्षेत्र लहान असतें. सामान्यतः पांच ते दहा फूट उंचीचें *धरण खर्चाच्या दृष्टीनें फायदेशीर असतें. तथापि* प्राथमिक खर्च स्थलपरत्वें थोडासा अधिक झाला तरी नित्याचा चालू खर्च कमी राहून सोयी जास्त होण्यांत फायदा जास्त असतो, हें तत्त्व विसरतां येत नाहीं. पाटसरीचा उतार दिशापरत्वें १ : १२०० पासून २५०० पर्यंत ठेवतां येतो. एका बंधाऱ्यानें जरी ५० एकर क्षेत्र भिजलें गेलें तरी त्यांत देशहितच साधत असतें. प्रायः प्रत्येक नदी-नाल्याचा प्रवाह याप्रमाणें थोपवून शेतीस जोडतां येईल व देशाचें दैन्य घालवता येणें शक्य होईल. थोडी व्यापक दृष्टि ठेवूनच असल्या योजना पूर्णत्वास न्यावयाच्या असतात. देशांतील विचारवंत, सामान्य जनता आणि सरकार या तीन घटकांचें सहकार्य या योजनांना लागत असतें.

बंधाऱ्यांच्या योजनेंत मुख्यत्वें पुढील कामें असावीं लागतात: (अ) बंधाऱ्याची मुख्य भिंत. (आ) पुराचें पाणी पाटांत शिरूं नये म्हणून दुसरी तटणीची भिंत. (इ) पाणी पाटांत घेण्याकरितां उघडझांप करण्याची सोय असलेलें दार. (ई) या दाराजवळ ठेवलेली पाण्याची सांडमोरी. (उ) पाणी नेणारा कमीअधिक लांबीचा मुख्य पाट. (ऊ) पाटांतील पाणी आजूबाजूच्या पिकांत नेणारे पोटपाट. (ए) ठिकठिकाणीं पाण्याचें माप दाखवणारीं दारें अगर बाऱ्या. (ऐ) पाटांतून वाहणारें पाणी क्यूसेक म्हणजे दर क्षणीं वाहणाऱ्या घनफुटाचें प्रमाण सांगणारा आंकडा याविषयींचें ज्ञान. खेडूत बांधवात हें प्रमाण मोटेच्या संख्येनें सांगण्याची चाल आहे.

बंधाऱ्यांचीं चित्रें जीं खालीं दिलीं आहेत त्यांचें त्रोटक स्पष्टीकरण त्यापुढेंच देत आहों. हीं चित्रें म्हणजे तत्त्वदर्शक नमुने होत.

## बंधाऱ्याचे प्रकार

(१) डोंगरी

(१) हा बंधारा डोंगरी भागांत माळावरील गुंड जमा करून बांधला आहे.

(३) नागमोडी

(३) नागमोडी– पाणसळ रेषेवर बंधाऱ्याची भिंत घातल्यानें पात्राच्या मध्यावर ही भिंत उंच झाली नाहीं, पण वळणामुळें लांबी वाढली आहे.

(२) बैठा

(२) बैठा बंधारा—यांत बंधाऱ्याची उंची फारच कमी आहे. याचा विशेष म्हणजे पाटाच्या तोंडाजवळ बंधाऱ्याच्या भिंतीस दिलेलें वळण होय. याचा उपयोग दाराजवळ सांठलेला गाळ काढण्याकडे होतो.

(४)

(४) यांत पाटाच्या तोंडाच्या दोन्ही बाजूंस पाणी काढून देऊन पाटांत गाळ न शिरण्याची व्यवस्था केली आहे.

(५) तटणीची भिंत

(५) पुराचें पाणी पाटांत शिरूं नये म्हणून पाटाच्या तोंडाजवळच घातलेली लांब तटणीची भिंत दिसत आहे. तसेंच पाटाच्या प्रवेशद्वाराजवळच आरंभीं सांडपाणी सोडण्याची व्यवस्था केलेली आहे. ती फार महत्त्वाची सोय आहे.

(६)

(७)

(६,७) बंधाऱ्यास प्रवेशद्वार म्हणजे पाटाचें तोंड प्रवाहाच्या कांठावर ठेवणें असेल तर त्यासाठीं फार उंचीची भिंत बांधावी लागते. तिचें प्रमाण या चित्रांतून दिसून येईल.

(८)

(८) या चित्रांत उजव्या बाजूस मुंबई–आग्रा रस्त्यावरील धुळ्यापाशीं असलेल्या मालेगांवाजवळचा पूल दिसत आहे. डाव्या बाजूस बंधाऱ्यावरून पडणाऱ्या पाण्याचें सुंदर दृश्य असून समोरच बंधाऱ्यांतील पाणी बाजूस वळवून घेऊन पुलाखालून जाणाऱ्या पाटाची भिंत दिसत आहे.

पाण्याच्या पाटावर कराव्या लागणाऱ्या आवश्यक अशा बांधकामाचे कांहीं नमुने पुढील चित्रांत दाखवले आहेत.

(९) अ—ओढ्यावरून

(९) पाट जातांना वाटेंत ओढा ओलांडण्यासाठीं केलेलें बांधकाम. यांत ओढ्याच्या पाण्याची वाट कमानींतून ठेवली असून पाटाचें पाणी माथ्यावरून नेलें आहे.

(१०) आ—ओढ्यावरून

(१०) यांत ओढ्याच्या कांठास दोन बुरूज दिसत आहेत व ओढ्याच्या पात्रांतील कमानींतून पाण्यास वाट आहे. माथ्यावरून पाट नेला आहे. प्रवाहाच्या कांठास करावी लागणारी बळकटी या बुरुजानें साधत असून प्रसंगीं फूटतूट झाली, तरी त्याची सांधमोड व दुरुस्ती सत्वर करतां येते.

(११) इ—ओढापोटांत घेऊन

(११) ओहोळ अथवा नाला आणि पाट जेव्हां एका पाणसळ रेषेवर येतात, तेव्हां पाटांतील पाणीपुरवठा वाढवतां येतो. पण नाल्याचें पाणी पुरामुळें अधिक वाढेल तर जास्त पाण्यास वाहून जाऊं देणें भाग पडतें. हें साधण्यासाठीं पाटाच्या एका अंगास खिडार अगर मोरी ठेवून तिची उघडझांप करण्याची सोय करावी लागते. त्या वाटेनें नाल्याच्या पात्रांत वाढलेलें पाणी सोडावयाचें आणि पूर ओसरल्यानंतर परत पाणी पाटांत घ्याव-याचें अशी व्यवस्था आपल्यास या चित्रांत दिसेल. या रीतीनें नाल्याचा प्रवाह पाटास पूरक म्हणून जोडावयाचा असतो. दार उघडल्यानें गाळ, वाळू, वगैरे खिडारांतून बाहेर पडतात व पाटाची पाणसळ कायम राहते.

(१२) ई—ओढ्याखालून

(१२) केव्हां मोठा ओढा ओलांडून पाटांतील लहान प्रवाह पलीकडे नेणें जरूर पडतें, अशा वेळीं ओढ्यांतून नळी बांधून पात्राखालीं पाट आणि वरून ओढ्याचें पाणी अशी व्यवस्था करतात.

बंधाऱ्यांच्या पाटांना पोटपाटांत अगर शेतांत पाणी सोडण्यास जीं दारें अथवा बाऱ्या केलेल्या असतात, त्यांची रचना सोपी व साधी असते. बारीच्या तळास, आणि डाव्या उजव्या अंगास एक खाच ठेवून त्यांत वरून खालीं सरकणारी फळी बसवतात. फळीच्या दाराची कमी-अधिक उघडझांप करून पाणी इच्छेप्रमाणें सोडतां येतें. या नमुन्यांत बदल केले तरी तत्त्व एकच असतें.

येणेंप्रमाणें पाणीपुरवठा करणाऱ्या बंधारा या रचनेचा हेतु, त्याचें स्वरूप आणि त्याचें कार्य असें त्रिविध महत्त्व त्रोटकपणें पण स्पष्टपणें या लेखांत वर्णिलें आहे.

**बॉन**—जर्मनी, प्रशियांतलें महत्त्वाचें शहर. हें अतिशय सुंदर असून र्‍हाइन नदीच्या डाव्या तीरावर वसलेलें आहे. येथें कांहीं कारखाने आहेत, पण या शहराची मुख्य प्रसिद्धि तेथल्या सुप्रसिद्ध विद्यापीठामुळें झाली आहे. हें विद्यापीठ १७७७ सालीं कोलोनचा इलेक्टर मॅग्झिमिलियन फ्रेडरिक यानें स्थापन केलें. युरोपांतील विद्वत्तेचें हें एक प्रमुख केंद्र आहे व तेथें ३,५०,००० ग्रंथ असलेलें मोठें ग्रंथालय आहे. येथें निरनिराळ्या पांच विषयांचीं कॉलेजें असून त्यांत सुमारें २०० प्राध्यापक आणि सुमारें ४००० विद्यार्थी आहेत. लो. सं. १,०१,३९१.

**बानर्जी, कालीचरण** ( मृ. १९०८ )—एक हिंदी राष्ट्रीय सभेचे पुढारी. हे कॉंग्रेसच्या चळवळींत अनेक वर्षें भाग घेत असत. १८९० सालीं इंग्लंडमध्यें जें राष्ट्रीय सभेचें शिष्टमंडळ गेलें होतें त्याचे हे सभासद होते व ब्रिटिश जनतेपुढें राष्ट्रीय सभेचें म्हणणें मांडण्याचें काम यांच्याकडे होतें. १८९३ सालीं न्याय व अमलबजावणी हीं खातीं वेगळीं करण्याचा ठराव राष्ट्रीय सभेंत यांनीं मांडला होता व त्या वेळीं अगदीं थरारून सोडणारें भाषण यांनीं केलें. विद्यार्थ्यांनीं राजकीय सभांतून भाग घेऊं नये असें ठरविणाऱ्या युनिव्हर्सिटी बिलावर यांनीं आपल्या १८९६ सालच्या भाषणांत टीका केली. १९०१ सालीं, प्रिव्हि कौन्सिलमध्यें हिंदी अपीलांत हिंदी वकिलास घेण्यांत यावें असें त्यांनीं सांगितलें. हे धर्मानें ख्रिस्ती होते.

**बानर्जी, प्रमथनाथ** ( १८७७- )—एक हिंदी अर्थशास्त्रज्ञ. कलकत्ता विद्यापीठांतून हे एम्. ए. झाले व नंतर पुढील उच्च शिक्षणासाठीं इंग्लंडला गेले. अर्थशास्त्र हा विषय घेऊन यांनीं लंडन युनिव्हर्सिटीची 'डी. एस्सी.' ची पदवी मिळवली व बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानला परत आले. त्यानंतर सन १९२०-२५ या काळांत कलकत्ता विद्यापीठामध्यें यांनीं प्रथम मिंटो प्रोफेसर ऑफ इकॉनॉमिक्स म्हणून व नंतर अनेक मानाच्या जागांवर कामें केलीं. बंगाल व मध्यवर्ती कायदेमंडळांचे हे कित्येक वर्षें सभासद होते. अर्थशास्त्राप्रमाणेंच शिक्षण व राजकारण या विषयांचा यांचा अभ्यास दांडगा होता. इंडियन पोलिटिकल सायन्स कॉंग्रेसच्या लाहोर येथें भरलेल्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना लाभला. तसेंच इंडियन इकॉनॉमिक कॉन्फरन्सच्या चौदाव्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदासाठीं यांचीच निवड झाली होती.

( १ ) हिंदी अर्थशास्त्राचा अभ्यास, ( २ ) हिंदी जकातीचें धोरण, ( ३ ) कंपनीच्या अमदानींतील हिंदी जमाखर्च, ( ४ ) हिंदी कर-पद्धतीचा इतिहास, इत्यादि ग्रंथ यांनीं लिहिले आहेत.

**बानर्जी, राखलदास** ( १८८२-१९३० )—हे बंगाली पंडित शिलालेखांचे तज्ज्ञ असून बंगाली भाषेंतील बंगालचा इतिहास, ओरिसाचा इतिहास व 'प्राचीन मुद्रा' या ग्रंथांचे लेखक होते. पुराणवास्तु खात्यांत यांची नेमणूक झाल्यावर थोड्याच अवधींत यांना या खात्याच्या पश्चिम विभागाचे सुपरिंटेंडेंट नेमण्यांत आलें. याच कालांत यांना अजमीर, उदेपूर, बिकानेर, इंदूर, इत्यादि ठिकाणीं हिंडून निरनिराळ्या शिलालेखांचें अध्ययन करण्याची संधि मिळाली. संस्कृत, फार्सी, उर्दू, मराठी, अरबी, गुजराथी यांसारख्या अनेक भाषा यांना अवगत असल्यामुळें हे कोणत्याहि शिलालेखाचें वाचन सहज करूं शकत. पुराणवास्तु खात्यामधून बाहेर पडल्यानंतर हे बनारस हिंदु विश्वविद्यालयांत गेले. तेथें त्यांना भारतीय संस्कृति व इतिहास या विभागाचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें. कलकत्ता इंडियन म्यूझियमच्या पुरातत्त्व-विभागाचे प्रमुख म्हणून यांचीच निवड झाली होती. यांनीं कांहीं कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत.

**बानर्जी, व्योमेशचंद्र** ( १८४४-१९०६ )—एक हिंदी मुत्सद्दी. हे अत्यंत हुषार विद्यार्थी असून शिष्यवृत्ति मिळवून विलायतेस गेले व बॅरिस्टर होऊन आले. पुढें उत्कृष्ट वकील म्हणून यांचें नांव झालें. ते बंगालच्या विधिमंडळाचे व कलकत्ता विद्यापीठाचे सभासद होते. हे राष्ट्रीय सभेचे पहिले अध्यक्ष होत. या वेळच्या भाषणांत त्यांनीं कॉंग्रेसचे हेतु स्पष्टपणें मांडले आहेत. १८९२ मध्यें अलाहाबाद येथें त्यांस पुन्हां राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष नेमण्यांत आलें होतें. त्या वेळीं संमति वयाच्या बिलासंबंधानें बरीच खळवळ उडालेली होती. राष्ट्रीय सभेनें सामाजिक बाबतींत लक्ष घालूं नये असें यांनीं या वेळीं प्रतिपादन केलें. १८९० सालीं विलायतेंत पाठविलेल्या शिष्टमंडळांत ते होते. १८८८ सालच्या पार्लमेंटरी कमिटींत व १८८५ मध्यें जूरी पद्धति या विषायवरील चर्चेंत यांनीं भाग घेतला होता. इंग्लंडमधील कॉंग्रेसची ब्रिटिश कमिटी कायम ठेवण्याबद्दल यांचा कटाक्ष असे. १९०२ सालापासून ते इंग्लंडांत जाऊन मरेपर्यंत तेथेंच राहिले. ते ख्रिस्ती होते.

**बानर्जी, सर सुरेन्द्रनाथ** ( १८४८–१९२५ )—एक हिंदी पुढारी. १८६८ मध्यें हे बी. ए. झाल्यावर इंग्लंडमध्यें जाऊन आय्. सी. एस्. परीक्षेंत वर आले व त्यांस सिल्हेट येथें मॅजिस्ट्रेट नेमण्यांत आलें. पण कांहीं भानगड उपस्थित होऊन त्यांस नोकरींतून दूर करण्यांत आलें; तेव्हां त्यामुळें त्यांस बॅरिस्टराहि होतां न आल्यामुळें ते अखेरीस एका शाळेंत शिक्षक झाले. नंतर त्यांनीं विद्यार्थ्यांच्या सभा वगैरे स्थापन करून देशभक्तीचा प्रचार चालविला व इंडियन असोसिएशनची स्थापना केली. ते १९१७ सालापर्यंत प्रत्येक राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनास हजर असत. १८७५ ते १९१३ पर्यंत हे शिक्षक होते. १८७९ मध्यें यांनीं 'बंगाली' पत्र विकत घेतलें व १९१९ पर्यंत त्याचें संपादन केलें. १८७७ ते १८९९ पर्यंत ते कलकत्ता कार्पोरेशनचे सभासद होते. १८९३ मध्यें कायदेमंडळांत लोकप्रतिनिधी पाठविण्याचा हक्क मिळाल्याबरोबर ते सभासद म्हणून निवडून आले. १८९३ ते १९०१ पर्यंत ते बंगाल कायदेमंडळाचे सभासद होते. १९०५ पासून बंगालची फाळणी होईपर्यंत कायदेमंडळावर बहिष्कार घालण्याचें ठरवून ते बाहेर राहिले. १९११ मध्यें फाळणी रद्द झाल्यावर पुढील निवडणुकींत हिंदुस्थान सरकारच्या वरिष्ठ कायदेमंडळांत ते निवडून आले. तेथें ते १९१६ पर्यंत सभासद होते. मॉंटेग्यु-चेम्सफर्ड सुधारणांनंतर ते बंगाल कायदेमंडळांत निवडून येऊन स्थानिक स्वराज्य खात्याचे मंत्री झाले. १८९० मध्यें ह्यूम, मेथा, प्रभृति हिंदी पुढारी असलेल्या कॉंग्रेसच्या शिष्टमंडळात, १८९७ मध्यें वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्यासाठीं, १९०९ मध्यें वृत्तपत्र परिषदेसाठीं व १९१९ मध्यें प्रागतिकांच्या शिष्टमंडळांत असे चार वेळां ते इंग्लंडमध्यें गेले. १९१९ सालीं प्रागतिकांच्या पहिल्या फेडरेशनचे ते अध्यक्ष झाले. त्यांनीं आपल्या आठवणींचें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. १८७५ ते १९२५ पर्यंत ५० वर्षें शिक्षक, वृत्तपत्रकार, वक्ते, कायदेमंडळाचे सभासद, मंत्री, वगैरे अनेक अंगांनीं त्यांनीं देशसेवा केली. प्रथम ते जहाल मनोवृत्तीचे होते, पण पुढें प्रागतिक झाले.

**बाना**—एक व्यायामाचें साधन. उत्तर हिंदुस्थानांतील पुरभय्या लोकांचें बाना हें आवडतें शस्त्र आहे. २८ इंच लांब व एक इंचापासून १॥ इंच जाड अशी पक्क्या बांबूची काठी घेऊन तिच्या बारीक टोंकाला बत्ताशाच्या आकाराचा एक लांकडी गोळा ( लट्टू ) बसवावा. त्या गोळ्यापासून ६ इंच अंतरावर दुसरा गोळा पहिल्या गोळ्याच्या दीडपट मोठा बसवावा. दुसऱ्या गोळ्यापासून १४ इंचांवर १ फूट घेराचा तिसरा लांकडी गोळा बसवावा. त्यापुढें २८ इंच लांबीचें निमुळत्या आकाराचें दोन्ही बाजूंस धार असलेलें एक पोलादी पातें बसवावें. ह्या पात्यास दोन्ही बाजूंस तीक्ष्ण धार असावी व पात्याचा पुढील भाग सहज वांकेल असा लवचिक असावा. अशा प्रकारच्या हत्यारास बाना म्हणतात. बान्याचे निरनिराळे हात आहेत. ( व्या. ज्ञा. )

**बॉप्, फ्रँझ्** ( १७९१–१८६७ )—एक जर्मन संस्कृत पंडित. हा श्लेजेलबरोबरच शेझीजवळ पॅरिस येथें संस्कृत शिकला ( १८१२ ). यानें तुलनात्मक भाषाशास्त्रावर पहिलाच उत्तम ग्रंथ लिहिला ( १८१६ ). यानें संस्कृत वाङ्मयाचा शोधबुद्धीनें अभ्यास करून, रामायण–महाभारतांतील कांहीं कथांचें छंदोबद्ध भाषांतर मूळ संस्कृतवरून केलें; व नलदमयंती आणि इतर सुंदर कथांचीं लॅटिन अर्थासह टीकात्मक पुस्तकें लिहिलीं. तसाच यानें एक संस्कृत कोश तयार केला (१८३०). संस्कृत, झेंद, ग्रीक, लॅटिन, गॉथिक, जुनी स्लाव्हानिक व जर्मन या भाषांचें तौलनिक व्याकरण यानें जें लिहिलें आहे तें फार महत्त्वाचें आहे.

**बापट, गोविंद शंकरशास्त्री** ( १८४४–१९०४ )—एक मराठी ग्रंथकार. वडिलांजवळ यांनीं संस्कृतचा चांगला अभ्यास केला. व पुढें ट्रेनिंग कॉलेजांत शिकून शिक्षक झाले. ते उत्तम लिहीत व शिकवीत. त्यांनीं इंग्रजी शिकून 'हरि आणि त्रिंबक' ( सँडफर्ड अँड मर्टनचें भाषांतर ), 'पाल आणि व्हर्जिनिया' यांसारखीं अनुवादित पुस्तकें लिहिलीं. 'संस्कृत ग्रंथार्थसंग्रह' मालेंत २५।३० पुस्तकें कथापुराणांच्या आधारें तयार केलीं. त्यांचा 'व्युत्पत्तिप्रदीप' हा ग्रंथ फार उपयुक्त आहे. त्यांची भाषा शुद्ध, सरळ व रसाळ असे.

**बापट, नागेश विनायक** ( मृ. १९०२ )—एक मराठी ऐतिहासिक कादंबरीकार. हे मूळ वांईचे. यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें होतें. विठोबा अण्णा दप्तरदार यांच्याकडून हे संस्कृत शिकले. कांहीं दिवस मुंबई सरकारच्या शाळाखात्यांत नोकरी केल्यानंतर ते बडोदें संस्थानांत नोकरीस गेले व मामलेदारीपर्यंत चढले. इतिहास विषयाचा त्यांचा खोल अभ्यास असे व ते लेखनकुशलहि होते. तेव्हां साहजिकच त्यांनीं लिहिलेलीं 'पहिले बाजीरावसाहेब पेशवे', 'पानपतची मोहीम', 'छत्रपति संभाजीमहाराज', 'चितूरगडचा वेढा' यांसारखीं अद्भुतरम्य कथानकांचीं पुस्तकें फार लोकप्रिय झालीं. या ग्रंथांत उपलब्ध ऐतिहासिक साधनें त्यांनीं वापरून स्कॉटप्रमाणें कथानकें चटकदार करण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

**बापट, ( सेनापति ) पांडुरंग महादेव** ( १८८०– )—एक क्रांतिवादी हिंदी देशभक्त. याचा जन्म १२ नोव्हेंबर १८८० रोजीं झाला. यांचे वडील पारनेर ( जिल्हा नगर ) येथें रजिस्टर खात्यांत होते; परंतु त्यांनीं १८९७ मध्यें नोकरीचा राजीनामा दिला व जवळच गणेशखिंड येथें येऊन राहिले. बापटांचें

शिक्षण पारनेर, नगर व पुणें येथें झालें. १९०३ सालीं ते पदवीधर झाले. कॉलेजमध्यें असतांनाच त्यांनीं देशाच्या स्वातंत्र्यार्थ प्रयत्न करण्याची प्रतिज्ञा घेतली होती. बी. ए. पदवी घेतल्यावर त्यांनीं मंगलदास नथूबाई शिष्यवृत्ति मिळविली व एडिंबर्ग येथें ते यंत्रविद्येचा अभ्यास करूं लागले. तेथें त्यांनीं 'ब्रिटिश रूल इन् इंडिया' (हिंदुस्थानांतील ब्रिटिशांचा राज्यकारभार) या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान देऊन तें छापून वांटलें. पण त्यामुळें त्यांची शिष्यवृत्ति गेली. पुढें ते श्यामजी कृष्णवर्मा यांच्या आश्रयास गेले. तेथें व पॅरिस आणि बर्लिन येथें त्यांची रशियन क्रांतिकारकांशीं ओळख झाली व बॅरिस्टर सावरकर वगैरे हिंदी क्रांतिकारकांशीं स्नेह जमला. तेथें त्यांनीं बाँबच्या कृतीचें ज्ञान मिळविलें. १९०८ सालीं बापट हिंदुस्थानांत परत आले त्या वेळीं वंगभंगाची चळवळ चालू असून बरेच अत्याचार झाले. त्यामुळें त्यांस बरींच वर्षें अज्ञातवासांत काढावीं लागलीं. १९१३ ते १९१५ पर्यंत ते पारनेरास येऊन राहिले. नंतर त्यांनीं कांहीं दिवस 'चित्रमयजगत्' मासिकांत व 'मराठा' पत्रांत संपादकीय काम केलें. नंतर १९१८ ते १९२१ पर्यंत ते डॉ. केतकर यांनीं काढलेल्या ज्ञानकोशाच्या संपादकवर्गांत होते. नंतर त्यांनीं मुळशी-सत्याग्रहाचें नेतृत्व पतकरलें; त्यांत त्यांना तीन वेळां दीर्घ मुदतीच्या शिक्षा झाल्या. त्यांतून सुटून आल्यावर काँग्रेसनें सुरू केलेल्या राजकीय सत्याग्रहांत शिरले. ते महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष असतांना त्यांना सात वर्षांची शिक्षा झाली. त्यांची १९३७ सालीं सुटका झाली. नंतर त्यांनीं सर्व राजकीय पुढाऱ्यांत ऐक्य प्रस्थापित व्हावें याकरितां खटपट केली व आत्मयज्ञ करावयाचें ठरविलें. परंतु त्या निश्चयापासून त्यांस परावृत्त करण्यांत आलें. सध्यां ते मुंबईस मुलाजवळ असतात व संयुक्त महाराष्ट्र चळवळीचा प्रचार करतात.

**बापू गोखले** (१७७७-१८१८)—मराठे साम्राज्याचा शेवटचा शूर सेनापति. मूळ हा तळेखाजण गांवचा असून याचें नांव नरहर गणेश असें होतें. धोंडोपंत नांवाचे याचे चुलते परशुरामभाऊ पटवर्धन याच्या पदरीं होते. त्यांचा धोंडजी वाघाकडून पराभव झाल्यावर त्यांची सरदारी बापूला मिळाली. या स्वामिनिष्ठ सेनापतीनें बऱ्याच मोठमोठ्या लढायांत भाग घेऊन उत्कृष्ट कामगिरी बजावली. इंग्रजांच्या साहाय्यानें यानें धोंडजी वाघाचा कांटा कायमचा दूर केला. तसेंच बारभाईंच्या व बावनपागे यांनीं सुरू केलेल्या बंडांचें निर्मूलन करून प्रतिनिधि व ताई तेलीण यांना माघार घेण्यास भाग पाडलें. यानंतर बापू पुण्यास आला. याच्याविरुद्ध पेशव्याकडे कोणीं तरी चहाडी केल्यामुळें पेशव्यानें याच्याकडे सरंजामी प्रांताच्या सोडचिठ्ठ्या देण्याबद्दल हुकूम पाठवला. बापूनें विलंब न लावतां पेशव्याच्या हुकुमाचें पालन केल्यामुळें पेशव्यानें खुष होऊन बापूला १२ लाखांचा सरंजाम देऊन लढायामुळें झालेलें सोळा लाखांचें कर्ज फेडण्याचें काम आपल्या अंगावर घेतलें. गणेशखिंडीच्या लढाईत व कोरेगांवच्या लढाईंत यानें इंग्रजांना यशस्वी रीतीनें तोंड दिलें होतें. सन १८१८ मध्यें स्मिथनें पळत असलेल्या पेशव्याचा पाठलाग केला. बाजीराव पेशवा हा त्या वेळीं भोजनास बसला असतांना बापूनें हल्ला आल्याची त्याला वर्दी दिली. परंतु या वेळीं पेशव्याकडून बापूला निष्कारण बोलणें बसल्यामुळें हिरीरीनें त्यानें 'जय झाल्यासच परत येऊं, नाहीं तर हें शेवटचेंच दर्शन!' असे उद्गार काढून पन्नास माणसांनिशीं स्मिथवर हल्ला केला व शौर्यानें लढतां लढतां बापूनें या अष्ट्याच्या लढाईंत आपला इहलोकवास संपवला. याच्या दोन पुत्रांपैकीं एक लहानपणींच वारला व दुसरा अष्टयावरील इंग्रजांशीं झालेल्या लढाईंत बळी पडला. बापूची बायको यमुनाबाई हिचा, सदाशिवरावभाऊ पेशव्याच्या पार्वतीबाईप्रमाणें, नवरा जिवंत असल्याबद्दल दृढ विश्वास होता. बंडवाला नानासाहेब पेशव्याप्रमाणें बापू गोखला हाहि कोठें तरी अज्ञातवासांत आहे, असा अनेकांचाहि समज परवांपावेतों होता. बापू गोखल्याचा पत्रव्यवहार आतां प्रसिद्ध झाला आहे.

**बापूजी श्रीपत चित्राव** (मृत्यु १७३९)—पेशवाईतील एक ब्राह्मण मुत्सद्दी. हा काण्व ब्राह्मण प्रथम शंकराजी नारायण सचिवाचा पुरंदर येथील एक अधिकारी होता. यास बापूजीपंत किंवा नाना असें म्हणत. नंतर थोरल्या बाजीरावानें यास पुणें प्रांताचा सुभेदार नेमलें व नंतर पुरंदरचा सबनीस म्हणून याची नेमणूक केली. बाजीरावाच्या विश्वासांतील लोकांपैकीं हा एक होता. सन १७३७ मध्यें ठाण्यावर मोहीम करण्याच्या बाबतींत चिमणाजीनें याचा सल्ला घेतला होता. जेजुरी येथील पेशव्यांच्या तलावाच्या बांधकामावर देखरेख ठेवण्याचें काम याजवरच सोंपवण्यांत आलें होतें. हा शके १६६१ आश्विन वद्य नवमीस पुण्यास वारला. यानें आपला भाचा शामराव अंबाजी किरकोळे याचा मुलगा दत्तक घेऊन त्याचें श्रीपतराव असें नांव ठेवलें.

**बाप्टिस्ट**—हा एक प्रॉटेस्टंट मतानुयायी ख्रिस्ती पंथांतील एक पोटपंथ आहे. या पंथामध्यें व मुख्य प्रॉटेस्टंट पंथामध्यें बाप्तिस्म्याबद्दल मतभेद आहे. हा पंथ बाप्तिस्मा घेतांना नवीन पंथ-प्रवेशेच्छूस पाण्यांत पूर्णपणें बुडविलें पाहिजे असें मानतो. तसेंच लहान मुलांस बाप्तिस्मा देण्यांत येऊं नये, पण प्रौढ मनुष्यांपैकींहि ज्यांस पश्चात्ताप झालेला आहे व ज्यांस तप व व्रतें मान्य असून जे श्रद्धाळू आहेत त्यांसच बाप्तिस्मा देण्यांत

यावा, असें मानतो. हे बाप्टिस्ट लोक स्वतंत्रपणें व ख्रिस्ती मंडळीच्या हातींच सर्व धर्माधिकार असावेत असें मानतात. या पंथाचें स्वतंत्र असें पहिलें चर्च एलिझाबेथ राणीच्या कारकीर्दींत स्थापन झालें. लंडनमध्यें १६३२ मध्यें असें चर्च स्थापन झाल्याचा दाखला आढळतो. १६८९ मध्यें या पंथाची एक परिषद् भरून तिनें एक ३२ कलमी पातकोच्चाराची व प्रश्नोत्तराची रचना केली. यांचा आणखी एक संघ १८३२ मध्यें स्थापन झाला. १९०५ मध्यें यांची एक जागतिक परिषद् भरून एक जागतिक संघ स्थापन करण्यांत आला. या पंथीयांचीं निराळीं देवळें आहेत. अमेरिकेंत यांची लो. सं. सुमारें पाऊण लाखावर आहे.

**बातिस्मा**—हा एक संस्कार असून ख्रिस्ती पंथ स्थापन होण्यापूर्वींच यहुदी लोकांत हा संस्कार रूढ होता व तो यहुदी संप्रदायांत नवीन प्रवेश करणारांकरितां होता. ख्रिस्त स्वतः हा संस्कार करीत नसे पण त्याच्या शिष्यांस हा करावयास सांगे व नंतर नवीन लोकांस त्याच्या पंथांत प्रवेश मिळे (मॅथ्यू. २८·१९). यामुळें ख्रिस्ती संप्रदायांत हा संस्कार इतर संस्कारांबरोबर रूढ झाला. प्रथम प्रथम ज्याचा हा संस्कार करावयाचा त्यास नदींत अथवा एखाद्या पाण्यानें भरलेल्या भांड्यांत बुडावयास लावीत व त्या वेळीं ख्रिस्तानें पढविलेले कांहीं शब्द म्हणत. त्यानंतर त्यास नवीन नांव देण्यांत येई. जे आजारी असत किंवा ज्यांस अंथरुणावरून उठतां येत नसे त्यांच्या बाबतींतच फक्त पाणी शिंपडून बातिस्मा करण्यांत येत असे. ग्रीक पंथामध्यें व पूर्वेकडील पंथामध्यें ही पाण्यांत बुडण्याची क्रिया संस्कारामध्यें अवश्य मानण्यांत येत असे. परंतु पश्चिमेकडील पंथांत हा संस्कार पाणी शिंपडून करण्यांत येऊं लागला व प्रॉटेस्टंट पंथानें तीच पद्धति उचलली. ही पद्धति ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकापासून तरी प्रचलित आहे. बाप्टिस्ट नांवाच्या पंथानें पाण्यांत बुडविणें व ख्रिस्ती मतावर श्रद्धा आहे असें उच्चारून दाखविणें या गोष्टी अवश्य मानल्या आहेत. हा प्रारंभिक संस्कार असल्यामुळें हा मनुष्याच्या आयुष्यामध्यें फक्त एकदांच होतो. या संस्कारांत नांव ठेवणें हा आवश्यक भाग नव्हता, परंतु अलीकडे तो आवश्यक मानण्यांत येऊं लागला आहे व बातिस्मा दिल्यानंतर मुलाचें नांव ठेवण्याचा प्रघात आहे.

बातिस्मा हा शब्द मूळ ग्रीक भाषेंतील शब्दापासून आला असून त्याचा अर्थ जलनिमज्जन असा आहे. सध्यां त्याचा उपयोग एका संस्काराचा वाचक म्हणून करण्यांत येतो. या संस्कारामुळें मनुष्याच्या सर्व पातकांचें क्षालन होतें, त्याचा दैवी पुनर्जन्म होतो आणि तो येशू ख्रिस्ताच्या गूढतनूचा एक अवयव होतो असा ख्रिस्ती लोकांचा विश्वास असतो. या संस्कारामध्यें जलस्नान व संस्कारकर्त्यानें उच्चारावयाचे पुढील शब्द या दोन मुख्य क्रिया असतात: 'मी तुला पिता, पुत्र व पवित्र आत्मा यांच्या नांवानें बातिस्मा देतों.' शिवाय हा संस्कार करतांना पातकांवरील विजय व दैवी प्रकाश आणि जीवित यांची प्राप्ति यांच्या निदर्शक अशा बऱ्याच क्रिया करण्यांत येतात. सामान्यतः हा संस्कार धर्मोपदेशक करतो. परंतु विशेष निकडीच्या प्रसंगीं—उदाहरणार्थ, मृत्यूची भीति असल्यास—कोणीहि एखादा ख्रिस्ती नसलेला इसमहि हा संस्कार करूं शकतो. बातिस्मा या संस्कारानें पुढील परिणाम घडून येतात: १ ख्रिस्ताशीं कायमचें ऐक्य म्हणजेच त्याच्या गूढतनूचें अवयव बनणें. याचा अर्थ बातिस्मा घेणाऱ्याच्या आत्म्यावर एक कायमचें चिन्ह उमटतें असा धरण्यांत येतो. २ जे अशा तऱ्हेनें येशू ख्रिस्ताशीं एकरूप होतात त्यांच्या सर्व पातकांची येशू ख्रिस्त क्षमा करतो आणि त्यांच्या ठिकाणीं दिव्य जीवनाचें आरोपण करतो. अर्थात् याकरितां बातिस्मा घेणाऱ्याची वृत्ति सत्प्रवृत्त असली पाहिजे. बातिस्मा घेतल्यानें सर्व प्रकारचीं पापें—मूळ पातक अथवा वैयक्तिक हीं सर्व—क्षालन होतात. मोक्ष मिळण्याकरितां बातिस्मा आवश्यक आहे, कारण त्यामुळें येशू ख्रिस्ताशीं ऐक्य होतें व तोच एक दिव्य जीवित प्राप्त होण्याचा मार्ग आहे. तथापि जर कोणत्याहि कारणामुळें बातिस्मा हा विधि करतां आला नाहीं तर अशा वेळीं इच्छासंस्कारानें काम भागतें. याचा अर्थ संस्कार प्राप्त होण्याची अथवा ख्रिस्ताशीं ऐक्य पावण्याची किंवा निदान मोक्ष मिळविण्यासाठीं ज्या आवश्यक गोष्टींची परमेश्वर आपणांपासून अपेक्षा करतो त्या करण्याची इच्छा केली असतांच त्या केल्याचें श्रेय मिळतें.

**बाप्पा रावळ** (७१३-७७३)—गुहिलोत रजपूत राजघराण्याचा संस्थापक. हा ईदरच्या वल्लभी घराण्याच्या एका उपशाखेंतला असून उदेपूरच्या उत्तरेस असलेल्या नागडा गांवचा हा मूळचा राजा. पुढें पराक्रमानें यानें चितोडचें राज्य मिळविलें. याच्याच वेळेस सिंधवर महंमद कासिमनें स्वारी केली होती. यानें अरबांचे हल्ले परत लावून इराणपर्यंतचा प्रदेश जिंकला होता. याच्याविषयीं अनेक दंतकथा आहेत. हा शिवस्वरूप एकलिंगजीचा कट्टा उपासक असे.

**बाफळी**—(सं. हिंगुपत्री). हें झाड लहान असतें. याच्या पानांची भाजी चांगली होते. ही वातहारकहि आहे. बियांचें लोणचें चांगलें होतें. वायुरोगावर याचें चूर्ण देतात. बी दुधांत उगाळून पाजल्यास पोटांतील रोग बरे होतात.

**बांव**—(सं. जलब्राह्मी). हिचीं झाडें जमिनीवर पसरलेलीं असतात. रंग तांबूस असून पानें कडू असतात. संधिवातावर बांवेचा रस देतात.

**बाँब**—ज्वालाग्राही पदार्थांनीं भरलेला, हातांनीं किंवा एखाद्या यंत्राच्या साहाय्यानें फेंकण्यांत येणारा व पडल्याबरोबर किंवा वात पेटून पोंचेल तेव्हां स्फोट होणारा एक विध्वंसक गोळा. इतरहि स्फोटक पदार्थांस हा शब्द कधीं कधीं लावण्यांत येतो. जेव्हां तोफांतून, बंदुकांतून सामान्यतः शिशाचे वगैरे गोळे फेंकण्यांत येत असतात त्या वेळीं अशा प्रकारच्या स्फोटक गोळ्यांसहि बाँब म्हणत असत. सध्यां युद्धामध्यें जे हातांतून स्फोटक गोळे फेंकण्यांत येतात त्यांसहि हा शब्द लावण्यांत येतो. सध्यां हातानें फेंकावयाच्या लहान गोळ्यांस व विमानांतून टाकावयाच्या मोठमोठ्या गोळ्यांसहि बाँब हाच शब्द लावण्यांत येतो. प्रत्येक बाँब हा आपटल्याबरोबर त्याचा स्फोट होण्याची व्यवस्था केलेली असते. कांहीं बाँब गोळ्यांना, ते फेंकले असतां एकाच दिशेनें जावे व त्याचें फुटणारें टोंक पुढें असावें याकरितां एक शेपटीसारखी व्यवस्था केलेली असते. तसेंच बाँब भलत्याच वेळीं उडूं नयेत म्हणून त्यांस विशिष्ट संरक्षक योजना केलेली असते; तीमुळें योग्य ठिकाणीं हालविल्याशिवाय बाँबचा स्फोट होत नाहीं.

युद्धामध्यें जे हातांनीं बाँब गोळे (हँडग्रेनेड) टाकण्यांत येत ते सामान्यतः जास्तींत जास्त ४५ यार्ड जात व साधारणपणें ३५ यार्ड फेंकण्यांत येत. यांचा मारा सामान्यतः २५ यार्डपर्यंत परिणामकारक होतो. बंदुकींतून उडविण्याचे गोळेहि अनेक प्रकारचे वापरण्यांत येतात.

नवीन नवीन शास्त्रीय शोधांनीं या बाँब गोळ्यांतहि क्रांति घडवून आणली आहे. नवीन परमाणु बाँबनें तर या क्षेत्रांत फार मोठी क्रांति केली आहे व या शक्तीचा कांहीं उपयुक्त कार्याकडे उपयोग करतां येईल काय, यासंबंधीं संशोधन चालू आहे. परमाणु बाँब पाहा.

**बाब संप्रदाय**—बहाई पंथ पाहा.

**बाबर** (१४८३-१५३०)—हिंदुस्थानांतील पहिला मोंगल बादशहा. संपूर्ण नांव जहीरुद्दीन महंमद बाबर असें होतें. फारसींत बाबुर म्हणजे वाघ. तेव्हां या बादशहास हें नांव शोभण्यासारखें होतें. हा बापाकडून तैमूरलंग तुर्काचा व आईकडून चेंगीजखान मोंगलाचा वंशज होता. तैमूरच्या राजधानींत त्यास राज्याभिषेक झाला आणि त्या ठिकाणीं आपला नीट बंदोबस्त करण्याच्या उद्योगास तो लागला. सन १५१९ त बाबरानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली. पंजाबचा सुभेदार दौलतखान लोदी स्वतंत्र कारभार करूं लागला होता; त्यानें दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध लढण्यास सन १५२४ त बाबरची मदत मागितली. बाबरास हेंच पाहिजे होतें. त्यानें पानपतावर इब्राहिम लोदीचा पराभव करून मोंगल बादशाही स्थापिली (१५२६). त्याला इतर शत्रूंशींहि तोंड द्यावयाचें होतें. रजपुतांच्या सर्व राज्यांत ह्या वेळेस मेवाडचें राज्य फार बलिष्ठ होतें. चितोडवर राणा संग राज्य करीत होता. दोन्ही सैन्यांची शिक्री येथें गांठ पडली, व अखेर संग राण्याचा पराभव झाला (१६ मार्च, १५२७).

बाबरानें एकंदर ३६ वर्षें राज्य केलें; त्यांत हिंदुस्थानांतील त्याची कारकीर्द फार थोडी झाली. त्याच्या राज्याचा विस्तार पूर्वेस आसामपासून पश्चिमेस आमूदर्या नदीपावेतों, तसेंच उत्तरेस सियालकोटपासून दक्षिणेस रतनमोरपर्यंत होता. मराठी राज्याचा संस्थापक शिवाजी याच्याशीं त्याची तुलना करतां येईल. बाबर विद्वान् व रसिक असून त्यानें आपलें आत्मचरित्र इत्थंभूत लिहून ठेविलें आहे. तें अत्यंत रसभरित व वाचण्यालायक आहे.

**बाबा पदमजी** (१८३१-१९०६)—मराठींतील प्रसिद्ध कोशकार, लेखक व ख्रिस्ती धर्मप्रसारक. हे जातीनें कासार असून यांचें उपनांव 'मुळे' असें होतें. बेळगांव हें यांचें जन्म ठिकाण. तेथेंच मराठी शिक्षण घेऊन इंग्रजी शिक्षणाकरितां हे मुंबईच्या फ्री चर्चस्कूलमध्यें दाखल झाले. 'प्रभाकर' कर्ते भाऊ महाजन व 'लोकहितवादी' यांच्या लिखाणांचा यांच्यावर फार परिणाम झाला. सन १८५४ मध्यें यांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारला व सन १८५७ मध्यें पुण्याच्या मिशनमध्यें यांना 'पालक' दीक्षा मिळाली. सुमारें सोळा वर्षें यांनीं पुण्याच्या 'फ्री चर्च मिशन स्कूल'मध्यें शिक्षकाचें काम केलें. यांच्या लेखनकार्याची सुरुवात सन १८७३ पासून झाली. 'बायबल सोसायटी' व 'ट्रॅक्ट सोसायटी' यांचें संपादकत्व यांच्याकडेच असे. वर्तमानपत्रांत तर यांचें लिखाण असेच. परंतु त्याशिवायहि शंभराहून अधिक पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत. साधी परंतु चटकदार भाषा व हृदयांतील तळमळ या गुणांमुळें यांच्या लिखाणाची छाप वाचकांवर झटकन् बसते.

इंग्रजी–मराठी कोश, मराठी–इंग्रजी कोश, संस्कृत–मराठी कोश, 'अरुणोदय' नांवाचें स्वतःचें चरित्र, सटीक मराठी नवा करार, इत्यादि वाङ्मय यांनीं निर्माण केलें आहे. यांची 'शब्दरत्नावली' म्हणजे मेजर कँडीच्या इंग्रजी–मराठी कोशाचा संक्षेप होय.

**बाबा फरिदुद्दीन शकरगंज** (मृ. १२६५)— एक मुसलमान साधु. याचें थडगें पंजाबमधील मॉंटगॉमेरीपासून तीस मैलांवर असलेल्या पाकपट्टण येथें आहे. येथें दरसाल मोहरममध्यें फार मोठी यात्रा भरते. मॉंटगॉमेरी व पाकपट्टण यांमध्यें चांगला रस्ता आहे. बाबा फरिद हा काबूलमधील सरदार घराण्यांपैकीं होता. चेंगिजखानाच्या स्वारीच्या वेळीं याचा आजा पंजावकडे पळाला व मुलतानजवळील काठेवाल येथें येऊन राहिला. त्या ठिकाणींच फरिदुद्दीनचा जन्म झाला. तो सतरा वर्षांचा असतांना ख्वाजा कुतुबुद्दीन काकी मुलतान येथें कांहीं काळ राहिला होता. तेव्हां बाबा फरिद त्याचा शिष्य झाला. नंतर लवकरच तो दिल्लीस गेला. तेथें त्यानें आपलें आयुष्य तपाचरणांत घालविलें. शेवटचीं सोळा वर्षें त्यानें काठवाल या आपल्या जन्मभूमींत घालविलीं.

त्याला शकरगंज पदवी कशी मिळाली याची मनोरंजक कथा आहे. तो लहान असतांना त्याला प्रार्थनेची आवड लागावी म्हणून त्याची आई त्याच्या प्रार्थनेच्या वस्त्राखालीं कांहीं गोड पदार्थ ठेवीत असे. एके दिवशीं ती तसें करण्यास विसरली, तरी पण बाबा फरिदुद्दीनास वस्त्रामध्यें गोड पदार्थांची मोठी रास दिसली. तेव्हांपासून तो शकरगंज म्हणून प्रसिद्धि पावला. तोंडामध्यें घेतलेल्या माती, दगड, वगैरेंची साखर बनविण्याची अद्‌भुत् शक्ति त्यास होती अशी त्याची प्रसिद्धि होती. बाबा फरिद वयाच्या ९३ व्या वर्षी मरण पावला व त्याला पाटण येथें पुरण्यांत आलें. त्याच्या दर्ग्यास बिहीश्ती दरवाजा म्हणजे 'नंदनवनाचा दरवाजा' आहे. मोहरममध्यें यात्रेस येथें साठ हजारांपर्यंत लोक येतात. मोहरमच्या शेवटच्या दिवशीं दुपारीं व रात्रीं 'नंदनवनाच्या दरवाजां'तून जाण्यासाठीं असंख्य यात्रेकरू एकमेकांशीं धक्काबुक्की करतांना दिसतील.

**बाबा राघवदास** (१८९६– )—एक निष्ठावंत समाजसेवक व राष्ट्रीय कार्यकर्ते. पुणें हें यांचें जन्मस्थान. यांचें समग्र नांव राघवेंद्र शेषो पाच्छापूरकर असें असून हे जातीनें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण होत. स्वामी रामकृष्णपरमहंस व स्वामी विवेकानंद यांच्या त्यागमय आयुष्याचा यांच्या मनावर परिणाम होऊन यांनीं ब्रह्मचर्य व्रतानें राहण्याचा निश्चय करून त्याग आणि सेवाधर्म यांचा स्वीकार केला. १९१३ सालीं योगाभ्यासासाठीं हे हिमालयांत गेले. यानंतर काशी, ज्वालापूर व गोरखपूर येथें संस्कृत व इंग्रजी भाषांचें अध्ययन करून १९१६ सालीं हे गोरखपूर येथें वास्तव्य करून राहिले. गोरखपूर येथील गीताप्रेस, गीता–प्रचारसमिति, रामायण–प्रचारसमिति व आर्यधर्मप्रचारसमिति यांसारख्या संस्था काढण्यांत यांनींच पुढाकार घेतला. भारतीय संस्कृतीचा प्रसार करण्याची मोहीम यांनीं सुरू केली. त्यासाठीं गीतेच्या व तुलसीदास रामायणाच्या स्वस्त किंमतींत देतां येणाऱ्या आवृत्त्या यांनीं काढल्या. तसेंच जैन, बौद्ध व शीख धर्मग्रंथांच्या परीक्षा सुरू करून त्यांचीं केंद्रें हिंदुस्थानांत व हिंदुस्थानाबाहेरील देशांतहि निर्माण केलीं. त्यामुळें हजारों विद्यार्थ्यांची या परीक्षांना बसण्याची सोय झाली. वेदविद्यालय, संस्कृत कॉलेज व अनेक पाठशाळा स्थापन होण्यास यांचेच परिश्रम कारणीभूत झाले आहेत.

१९२० सालीं हे राजकारणांत पडले व त्यासाठीं यांना अनेकदां कारावासहि घडला. दुष्काळ, पूर यांसारख्या अडचणींच्या वेळीं अनेक दृष्टींनीं यांनीं जनसेवा केली. खादी, हिंदीप्रचार व ग्रामोद्योग यांसारख्या चळवळींतहि यांनीं आस्थापूर्वक भाग घेतला. त्यानंतर जिल्हा कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष म्हणूनहि यांनीं यशस्वी कामगिरी करून दाखवली आहे.

गोरखपूरजवळीलें गौतमबुद्धाचें निर्वाणस्थान जें कुशीनगर तेथें अनेक बौद्ध यात्रेकरू येत असतात. त्यांच्याशीं येथील हिंदूंचें गैरसमजुतीमुळें अत्यंत तुटक वर्तन होत असे. बाबांनीं हा तुटकपणा घालवून बौद्ध व हिंदू यांच्यांत प्रेमभाव व आपलेपणा निर्माण करण्याचे प्रयत्न केले. या प्रयत्नामुळें चीन–सिलोन यांसारख्या देशांकडून धर्मशाळा वगैरे सोयी करण्यासाठीं यांना लक्षावधि रुपयांची मदत मिळाली. बुद्धदेव हायस्कूल उघडण्यास यांचेच परिश्रम कारणीभूत झाले आहेत.

**बाबिट धातु**—कथिल, तांबें आणि अँटिमनी ह्यांच्या विविध प्रमाणानें तयार केलेला एक मिश्र धातु. बोस्टनचा एक सोनार आयझॅक बाबिट ह्यानें त्याचा शोध लावला. हा धातु मऊ असून घर्षण कमी करण्यासाठीं याचा उपयोग करतात. यांतील धातूंचें सरासरी प्रमाण असें: कथिल शें. ८५–८९, तांबें शें. २–७ व अँटिमनी शें. ८–९.

**बाबिट्स, मिचेल** (१८८३–१९४१)—एक हंगेरियन साहित्यिक. विविध आकांक्षा आणि मनोगंड बाळगणारा हा बुद्धिमान पुरुष एकांतांतून बाहेर सामान्य जनतेंत येण्याविषयीं धडपडत होता. पण ज्ञान आणि अध्यात्म यांच्याकडेच शेवटीं तो वळला. 'दि स्टोर्क कालीफ' या पहिल्या कादंबरींत त्यानें एका तरुणाचें दुहेरी जीवन रंगविलें आहे; तर 'टायमार' मध्यें एक वृत्तव्यवसायी आणि मठवासी या दोघांच्या ध्येयवादामधील झगडा दिला आहे. 'हाउस ऑफ कार्ड्स' (पत्त्यांचें

बाबिलोन — प्रागैतिहासिक सिंहप्रतिमा ( पृ. १६७७ )

बोल्डरडॅम — धरणाखालीं ८ फुटी वारा बोगदे दिसतील ( पृ. १७५९ )

ब्राझील — रायो द जानीरो येथील ताड वृक्षांचा मार्ग ( पृ. १७७७ )

घर) यांत उपनगरवासीयांची गोष्ट आहे. बाबिट्सनें सोफोक्लीज, डान्टे, शेक्स्पियर, पो, इत्यादींचीं भाषान्तरें केलीं आहेत.

**बाबिलोन**—(आधुनिक हिला). हें प्राचीन शहर युफ्रेटीस नदीच्या डाव्या तीरावर असून बगदादच्या दक्षिणेस ७० मैलांवर आहे. याला बैबल, सुआना, दिंतीर, इत्यादि बरींच नांवें आहेत. बाबिलोनचें पहिलें घराणें व नंतर खमुरब्बीचें साम्राज्य (ख्रि. पूर्व २२५०) यांची राजधानी बाबिलोनच होती. पुढें बाबिलोनियाची राजधानी व पश्चिम आशियांतील पवित्र शहर या दृष्टींनीं बाबिलोनचें महत्त्व फार वाढलें. ख्रिस्तपूर्व ६८९ त सेनाचेरिबनें येथील मंदिरें, इमारती व राजवाडे जमीनदोस्त करून त्यांतील सामान अराख्तूच्या कालव्यांत फेकून दिलें. नंतर असुर लोकांनीं बाबिलोनला वेढा दिला व शहरांतील लोकांची उपासमार करून शहर घेतलें. पुढें नेबोपोलोसरच्या अमलाखालीं बाबिलोनला स्वातंत्र्य प्राप्त झालें व याच्या व याचा नातू नेबुचडनेझर याच्या अमदानींत हें फार बलिष्ठ शहर असून नव्यानें बांधलें गेलें होतें. आज शहराचे बरेच अवशेष युफ्रेटीसच्या पूर्व किनाऱ्यावर आहेत. या शहराभोंवतीं जे तट होते ते पन्नास मैलांवर लांबीचे असून शहर बारा चौरस मैल पसरलें होतें. त्यांत नेबुचडनेझरनें आपल्या मीडियन बायकोसाठीं मुद्दाम तयार केलेली झुलती बाग होती. सुप्रसिद्ध बाबेल मनोरा येथेंच होता. अलीकडच्या येथील उत्खननांतून अनेक अवशेष सांपडले आहेत.

**बाबिलोनिया**—तैग्रीस व युफ्रेटीस ह्या दोन नद्यांच्यामधील प्रदेश भौगोलिक व ऐतिहासिक दृष्ट्या एकच देश होय. प्राचीन ग्रंथकार ह्याला असीरिया म्हणत. असुरखेरीज निनेव्हे, कॅला व अरबेला हीं शहरें तैग्रीस नदीच्या पश्चिम तीरावर होतीं. असीरिया हें नांव असुर शहरावरून पडलें आहे. हें शहर तैग्रीस नदीच्या उजव्या तीरावर असून याला सध्यां काले शेरगट नांव आहे. या शहरीं बरेच दिवस राजधानी होती. नंतर कॅला (निमरूड), निनेव्हे (नेबीयुनुस व कुयुंजीक) आणि दुरसारजिना ह्या शहरीं राजधानी गेली. तैग्रीसच्या पश्चिम तीरावर असलेल्या मेसापोटेमियाच्या मैदानाला विसदृश असें सुपीक खाल्डियन मैदान आहे. याच मैदानांत जुन्या राजधानीचें उर (पाहा) हें शहर होतें. बाबिलोन व सिपरा हीं दोन शहरें नदीच्या अरबस्तान व खाल्डिया या दोन बाजूंस होतीं. अराख्तू अथवा 'बाबिलोनची नदी' दक्षिणेस व नेजेफ हा गोड्या पाण्याचा समुद्र नैर्ऋत्येस आहे. युफ्रेटीसच्या पूर्वेस व सिपराच्या दक्षिणेस किस व निप्पुर शहरें होतीं. ह्या ठिकाणीं एललिलचें मंदिर होतें. बाबिलोनियन मैदानाला एदिन नांव होतें. दक्षिण बाबिलोनियाला केंगी सुमेर हें नांव होतें. अक्कड नांव उत्तर बाबिलोनियाला असे. येथें झपझलात, कुथा व आरमाल्का अथवा राजाचा कालवा हे तीन कालवे प्रसिद्ध होते. फ्रेंच वकील दसार्झेक यानें टेलो येथें संशोधनार्थ खणण्यास सुरुवात केली. टेलो येथील शोधांत ख्रिस्तपूर्व ४००० पर्यंतच्या इतिहासाची सामुग्री मिळून शिवाय ३०,०००इष्टिकालेख सांपडले.

बाबिलोनियांतील अति प्राचीन वसाहत आतांच्या पृष्ठभागावरील पाण्याच्या पातळीखालीं होती. हा भाग खणणाऱ्यांना उत्कृष्ट रंगीत मातीचीं भांडीं व तांब्याचीं हत्यारें सांपडतात. नंतर बाहेरून सुमेरियन लोक आले. त्यांची संस्कृति उरसारख्या ठिकाणच्या उत्खननावरून दिसून येते. पुढें अक्कड लोकांचें राज्य या भागावर झालें. ख्रि. पू. २१०० च्या सुमारास खमुरब्बी नांवाच्या बलिष्ठ राजानें यावर वैभवशाली राज्य केलें. त्याची राजधानी बाबिलोन येथें होती. ख्रि. पू. १९०० च्या सुमारास बाबिलोनियन लोकांनीं ॲसीरियाच्या वसाहतीस आरंभ केला. पण पुढें या ॲसीरियाच्या राज्यानेंच बाबिलोनियाशीं स्पर्धा चालविली व या दोन राष्ट्रांत सारखे झगडे सुरू झाले. ख्रि. पू. १७८२ पासून पांच शतकांवर मीडियांतील कॅसाइट लोकांनीं बाबिलोनियावर राज्य केलें. पुढें अडीचशें वर्षें हे कॅसाइट आणि मूळचे बाबिलोनियन यांमध्यें सत्तेबाबत उलथापालथ चालली होती. ख्रि. पू. १०२६ मध्यें बाबिलोनियन राजा गादीवर बसला, पण या वेळीं ॲसीरियन लोकांनीं या राज्यांत ढवळाढवळ सुरू केली. ख्रि. पू. ७१० सालीं २ रा सार्गन या ॲसीरियन राजानें बाबिलोनिया हा ॲसीरियन राज्याचा एक प्रांतच करून सोडला. नंतर सारगॉनचा मुलगा सेनाचेरिब यानें तर बाबिलोनचा निःपात करून टाकला (६८९). याचा सूड म्हणून कीं काय, यानंतर शंभर वर्षांच्या आंतच ॲसीरियन सत्ता खालावत गेली व बाबिलोनियन लोकांनीं खाल्डियाचा नेबोपोलोसर आणि मेडीजमधील एक लढाऊ टोळी यांच्या मदतीनें ॲसीरियावर चाल केली व निनेव्हे घेऊन असुरी सत्ता उध्वस्त करून टाकली.

पण नेबोपोलासरनेंच आपलें नवें राज्य बाबिलोनियावर सुरू केलें (ख्रि. पू. ६२६). त्याचा नातू नेबुचडनेझर (पाहा) हा बाबिलोनियांत अतिशय बलाढ्य राजा होऊन गेला. पण त्याच्या मागूनचे राजे दुबळे होते. शेवटीं ख्रि. पू. ५३८ त सायरसनें बाबिलोन जिंकून घेतलें व यापुढें बाबिलोनिया हा इराणचा एक प्रांत बनला. अलेक्झांडरनें इराण जिंकल्यावर हा ग्रीकांच्या अमलाखालीं आला व नंतर पार्थेनियनांच्या ताब्यांत गेला. १३ व्या शतकांत मोंगलांची स्वारी येईपर्यंत हा प्रदेश फार भरभराटींत होता.

बाबिलोनियन लोक फार हुषार, साक्षर व व्यापारी वृत्तीचे असत. त्यांनीं शांततेच्या काळांत अनेक उद्योगधंदे केले. त्यांची भाषा हीब्रू आणि फोनिशियन लोकांच्या भाषेसारखी असे. लिपि पाचरीच्या आकाराची असून प्रथम ते पापीरसच्या पानांवर व नंतर विटांवर लिहीत. या लिपींत त्यांचें बरेंच वाङ्मय उपलब्ध आहे. गाणीं, स्तोत्रें, कथा, मंत्र, शकुन, महाकाव्यें, इतिहास, इ. प्रकार त्यांत आढळतील. तसेंच शास्त्रें, कायदे यांसारख्या विषयांतहि हे लोक प्रवीण दिसतील. यांचा धर्म म्हणजे मृतांची उपासना होय. यांचीं घरें भाजलेल्या विटांचीं असून बांधणींत कौशल्य प्रतीत होतें. निरनिराळें मूर्तिशिल्पहि आढळून येतें. पण ॲसीरियनांप्रमाणें त्यांना दगड उपलब्ध नसल्यानें दगडी काम दिसत नाहीं.

बाबिलोनी वाङ्मय—आज लोकांना असुरांची जरी अधिक माहिती आहे तरी त्यांच्या संस्कृतीला बाबिलोनी संस्कृति हें नांव अधिक सार्थ होईल. बाबिलोनी संस्कृति पुढें ॲसीरियांत प्रसार पावली, तरी पण या दोन देशांतील संस्कृतींमध्यें कांहींसा फरक आहे. ॲसीरियन वाङ्मयामध्यें स्वतंत्र ग्रंथरचना अशी फार थोडी झालेली आहे. आणि बाबिलोनियामध्यें जें शिक्षण सामान्यतः सर्व समाजांत पसरलेलें असे, तेंच उत्तरेकडील ॲसीरिया या देशांत समाजांतील फक्त एका वर्गास मिळत असे. बाबिलोनियांत ज्ञानप्रसाराची परंपरा चालत आलेली होती. तेथें बहुतेक सर्व शहरांत व देवालयांत ग्रंथशाला असत. बाबिलोनी लोकांत अशी एक जुनी सुमेरियन म्हणहि प्रचलित होती कीं, "ज्याला लेखक व ग्रंथकार यांमध्येंहि श्रेष्ठ पदवीला चढावयाचें असेल त्यानें उषःकाल होतांच उठलें पाहिजे." बाबिलोनियांत पुरुष व स्त्रिया दोघेहि लिहिण्यावाचण्यास शिकत असत व सेमेटिक काळांतील त्यांच्या शिक्षणक्रमांत तसेंच अत्यंत घोटाळ्याच्या व संख्येनें पुष्कळ अशा शब्दावयवदर्शक चिन्हांचा (वर्णांचा) त्यांना अभ्यास करावा लागत असे.

सेमेटिक बाबिलोनियन वाङ्मयांतील ग्रंथ मूळ सुमेरियन भाषेंतील ग्रंथांचीं भाषांतरेंच होतीं; आणि धर्म व कायदा या दोन्ही प्रकारच्या व्यवहारांत जुनी खाल्डियांतील चिकटी भाषा (शब्दांच्या रूपांत किंवा अर्थांत फरक बिलकुल न करतां ते समासांतल्याप्रमाणें एकमेकांना जोडून बनवावयाची भाषा) पुष्कळ काळपर्यंत उपयोगांत होती. शब्दकोश, व्याकरणग्रंथ व मूलाधोलिखित भाषांतर-ग्रंथ विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां केलेले होते. तसेंच जुन्या ग्रंथांवर टीकात्मक ग्रंथ व जुने अपरिचित शब्द व म्हणी यांच्या अर्थविवरणात्मक ग्रंथहि झालेले होते.

शब्दावयवात्मक लिपीचे सर्व वर्ण नीट एकत्र जुळवून त्यांना नांवें दिलेलीं होतीं, व सविस्तर व श्रमपूर्वक सर्व वर्ण लिहून त्यांच्या याद्या तयार केलेल्या होत्या. बहुतेक ग्रंथ चिकणमातीच्या विटांवर धातूच्या खिळ्यांनीं खोदून लिहून तयार केलेले होते. शिवाय ईजिप्तमध्यें पापीरस नामक लव्हाळ्यापासून तयार केलेल्या कागदांवरहि ग्रंथलेखन करीत असत, परंतु ते सर्व नष्ट झाले आहेतसें दिसतें. पुढें द्वितीय ॲसीरियन साम्राज्याच्या काळांत जेव्हां निनेव्हे मोठें शहर बनलें, त्या वेळीं व्यापार व राज्यव्यवहार यांची जी अरेमाइक भाषा तिचाहि अभ्यास विद्यार्थ्यांस करावा लागूं लागला. पुढें सेल्यूकिडी कारकीर्दीपासून ग्रीक भाषेचाहि बाबिलोनियांत प्रवेश झाला आणि सुमेरियन व ॲसीरियन (म्ह. सेमिटिक व बाबिलोनियन) शब्द ग्रीक लिपींत लिहून तयार केलेले त्या वेळचे कित्येक लेख उपलब्ध झालेले आहेत.

त्या काळांतील कित्येक ग्रंथांचीं आज आपणांस नांवें उपलब्ध झालीं आहेत. अशा अत्यंत प्रसिद्ध ग्रंथांपैकीं गिलगमेश महाकाव्य हें एक होय. त्याचीं एकंदर बारा पुस्तकें असून प्रत्येकांत गिलगमेशच्या चरित्रांतील साहसांचें वर्णन केलेलें आहे. दुसरें प्रसिद्ध महाकाव्य सृष्ट्युत्पत्तिविषयक असून त्यांत माड्कच्या तियामतशीं झालेल्या युद्धाचें वर्णन आहे. शिवाय राजाच्या नोकरांनीं बखरीवजा लिहून ठेवलेल्या लेखांत कित्येक जुन्या पौराणिक कथा उपलब्ध झालेल्या आहेत.

या शुद्ध वाङ्मयात्मक ग्रंथांशिवाय खाजगी किंवा निमसरकारी रीत्या लिहिलेले लेख व पत्रें पुष्कळ सांपडलेलीं आहेत. त्यांपैकीं खमुरब्बी यांचीं पत्रें फारच मनोवेधक आहेत. तीं एल्. डब्ल्यू. किंगनें प्रसिद्ध केलीं आहेत. शिवाय ज्योतिषशास्त्र व फलज्योतिष यावरहि पुष्कळ महत्त्वाचे ग्रंथ आहेत. बाबिलोनियांत ज्योतिषशास्त्र बऱ्याच प्राचीन काळापासून अस्तित्वांत होतें व त्यावरील सर्वमान्य ग्रंथ फार पूर्वी अक्कड येथील सार्गनच्या काळीं तयार झालेला असून त्याचें बेरॉससनें ग्रीक भाषेंत भाषांतर केलें होतें. आकाशांतील नक्षत्रमाला हिचा शोध प्रथम बाबिलोनी लोकांनीं बऱ्याच प्राचीन काळीं लावलेला आहे; आणि सूर्याचीं व चंद्राचीं ग्रहणें वर्तविण्यास लागणारें ग्रहणविज्ञान व गणितशास्त्र यांचीहि त्यांना माहिती होती. आकाशांतील ग्रहांची स्थिति व गति पाहण्याच्या वेधशाला देवालयांना जोडलेल्या असत व तत्संबंधीं सर्व अहवाल राजाकडे नियमितपणें ज्योतिषांना कळवावा लागत असे. बऱ्याच प्राचीन काळीं ग्रहांची संख्या ठरवून त्यांना नांवें देऊन टाकलेलीं होतीं. आणि चंद्र व शुक्र यांचे उदयास्तकाल व त्यांच्या कला यांविषयीं निश्चित माहिती देणारी त्या काळीं तयार करून ठेवलेलीं कोष्टकें आहेत.

सेल्यूकिडी व पार्थियन यांच्या काळांतील ज्योतिषशास्त्रविषयक नमूद करून ठेविलेली माहिती पूर्णपणें शास्त्रशुद्ध असल्याचें दिसतें. पण ही इतकी प्रगति सदरहू शास्त्रांत किती पूर्वीपासून झालेली होती हें नक्की ठरावितां येण्यासारखें नाहीं. वार्षिक पंचांग फार काळजीपूर्वक तयार करीत असत, व त्यावरून सात दिवसांचा आठवडा व दुसरा पांच दिवसांचा आठवडा त्या काळीं प्रचलित होता असें दिसतें. या ज्योतिषशास्त्राच्या प्रगतीवरून गणितशास्त्राचीहि वाढ बरीच झालेली असली पाहिजे हें उघड होतें. बाबिलोनियनांनीं आंकडे मोजण्याची अत्यंत सोपी रीत शोधून काढली असली किंवा अत्यंत उपयुक्त द्वादशमान पद्धतीचा शोध लावला असला तर त्याचें आश्चर्य वाटावयास नको. त्याचा सॉस किंवा ६० चें परिमाण भूमध्यरेषेच्या एका अंशाबरोबर असून त्यावरून त्यांनीं आपला ६०० चा 'नेर' व ३६०० चा 'सॉस' बनविला होता. सेंकेरा येथें ज्यावर एकापासून साठापावेतों सर्व आंकड्यांचे वर्ग व घन लिहून ठेवले आहेत अशा पट्ट्या सांपडल्या आहेत; ज्या लोकांना छायायंत्र, घटकापात्र, तरफ व कप्पी यांचें ज्ञान झालें होतें, त्यांचें यंत्रशास्त्रविज्ञान कांहीं टाकाऊ नसलें पाहिजे. लायार्ड यास निमरुड येथें कातून तयार केलेलें एक बाह्यगोल भिंग (लेन्स) व सार्गन याचें नांव असलेलें एक कांचेचें भांडें सांपडलेलें आहे. यावरून कित्येक ॲसीरियन शिलालेखांत आढळणारीं अत्यंत बारीक अक्षरें त्यांना कशीं काढतां येत व आकाशांतील ग्रहांचे वेध ते कोणत्या साधनांनीं घेत असत, हें स्पष्ट होतें.

**बांबू**—[जाति–बांबूसा]. ही एक गवताची जात आहे. बांबू हे उष्ण प्रदेशांत होतात. कांहीं बांबू ८ ते १० इंच व्यास जाडीचे असतात; व लांबी १२५ फुटांपावेतोंहि असते. बांबूच्या अनेक पोटजाती आहेत. कांहीं बांबू सारख्या जाडीचे असून त्यांचीं कांडीं लांब लांब असतात. या बांबूचा उपयोग छत्रीचे दांडे करण्याकडे होतो. कांहीं बांबूच्या बारीक नळ्या असतात. असे बांबू हुक्क्याच्या नळ्या करण्याकडे उपयोगांत आणितात. कांहीं बांबूंची पोकळी फार मोठी असते व कांब पातळ व एकसारखी असते, ह्यामुळें यांचे पोहरे, पाणी पिण्याचीं भांडीं, इत्यादि जिनसा तयार करतात. कांहीं बांबूच्या चटया, टोपल्या, इत्यादि जिनसा फार सुबक होतात. ब्रह्मदेशांत होणारीं लाखेचीं भांडीं कांहीं विशिष्ट जातीच्या बांबूंचीं केलेलीं असून त्यांवर लाखेचें रोगण दिलेलें असतें. कांहीं बांबू फार मजबूत असल्यामुळें घरकामाला फार उपयोगी पडतात. कांहीं बांबूंत लवचिकपणा चांगला असतो. अशा बांबूंचे ब्रश वगैरे जिन्नस करतात. बांबूंचीं बहुतकरून बेटें असतात. बांबू बहुधा ३० वर्षेंपर्यंत टिकतो व ह्या अवधींत वर्षास १० बांबू या प्रमाणानें एका झाडापासून ३०० बांबू निघतात. कांहीं बांबू कांटेरी असतात, व ते कुंपणाच्या कामीं फार उपयोगी पडतात. कागद तयार करण्यास योग्य, किफायतशीर व स्वस्त अशी बांबूइतकी चांगली वनस्पती दुसरी कोणतीच नाहीं. चीनमध्यें होणारा कागद बांबूच्या रांध्यापासून करतात. हिंदुस्थानांतहि असे कागदाचे कारखाने बरेच चालावितां येण्याजोगे आहेत. कारवार–कानडा जिल्ह्यांत असे कारखाने निघूं शकतील; तसे प्रयत्नहि झाले आहेत. बांबूपासून बरींच औषधें होतात. पानांचा गुरांना चारा होतो. बांबूचें बीं धान्याप्रमाणें खातात. हिंदुस्थानांत दरवर्षी सुमारें १५ कोटी बांबू खपतो. बांबूचा उपयोग इमारती व घरें बांधण्याकडे, त्याचप्रमाणें चटया, बुरूडकाम, इत्यादि पदार्थ करण्याकडे होतो.

**बाबूजी नाईक जोशी** (१६९४–१७७७)—मराठे साम्राज्यांतील एक मुत्सद्दी व सावकार. बारामतीकर जोशी हे मूळचे कोंकणांत केळशी गांवचे राहणारे; त्यांच्यापैकीं केशव नाईक नांवाचा एक पुरुष काशीस जाऊन सावकारी करूं लागला. हा बहुधा शिवाजीचा समकालीन असावा. कृष्णाजी केशव व्यंकोजीकडे सुमंत होता. पुढें शाहूबरोबर दक्षिणेंत आला. साताऱ्यास येऊन राज्य मिळेपर्यंत शाहूस पैसा लागला तो नाइकानें पुरविला, म्हणून शाहूचा त्याजवर लोभ जडून त्यानें नाइकास उदयास आणण्याची खटपट केली. सदाशिव केशव नाईकहि सावकारींत हुशार म्हणून गणला जात असे. त्याच्या पेढ्या सर्व मोठमोठ्या ठिकाणीं देशभर होत्या. याचा मोठा मुलगा बाबूजी हा चांगला शूर असून शाहूनें त्यास कर्नाटकाच्या मोहिमेवर पाठविलें होतें. बाजीरावानंतर पेशवेपद त्यालाच द्यावें असा कांहीं दरबारी मंडळीचा आग्रह होता. बाळाजी विश्वनाथानें आपली मुलगी भिऊबाई बाबूजीचा धाकटा भाऊ आबाजी नाइक यास दिली, त्यामुळें नाइकांस विशेष पाठिंबा मिळून त्यांना राज्याचीं कामें करण्यास संधि मिळाली. नाइकांचें व पेशव्यांचें कांहीं दिवस वितुष्ट होतें. इ. स. १७५२ त नाइकांनीं पेशव्यांशीं समेट केला. माधवराव पेशव्यांस त्यांचें साहाय्य चांगलें होतें. रघुनाथरावाची मुलगी दुर्गाबाई ही बाबूजीचा मुलगा पांडुरंगराव यास दिलेली असून हें लग्न ता. ६।२।१७७३ रोजीं झालें. परशरामभाऊ पटवर्धनाची मुलगी बाबूजीच्या चौथ्या मुलास दिली असून तो मुलगा लग्नाच्या पंधराव्या दिवशीं वारला. याच विधवा मुलीसंबंधानें पुनर्विवाहाचा प्रश्न उपस्थित झाला होता. भट घराण्यांत पेशवाई गेल्यापासून सुमारें सत्तर वर्षें मराठेशाहीच्या कारभारांत वावरत असलेला असा बाबूजी नाईक हा एकच पुरुष दिसतो. तो रसिक व गुणज्ञ होता. मोरोपंत कवींचें प्रचंड वाङ्मय

प्रगट होण्यास याच बाबूजीचा आश्रय कारण झाला. याचे वंशज पुण्यास इनामदार बावडेकर या नांवानें आहेत.

**बाबूराव विश्वनाथ वैद्य** (१७४२-१७९५)—नागपूरकर भोसल्याकडील पेशव्यांचा हा वकील होता. उत्तर मराठेशाहींत या वैद्य वकिलांची महत्त्वाची कामगिरी दिसून येते. बाबूराव हा नाना फडणिसाचा मोठा साहाय्यक होता. हें लावगनकर वैद्य घराणें सावकारी होतें. भोसल्यांकडून या घराण्याला कांहीं इनाम गांवें होतीं. वांईस व पुण्यास यांचे वाडे आहेत.

अहल्याबाई होळकर व निजाम यांच्याकडील पेशव्यांच्या हिशोबाचा फडशा करण्याचें महत्त्वाचें काम नानानें याच्याकडे सोंपविलें होतें. खर्ड्यांच्या लढाईत नाना फडणिसाबरोबर हाहि होता. बाबूराव हा टोंक्यास जाऊन संन्यास घेऊन समाधिस्थ झाला. याचा मुलगा नारायणराव हाहि बापाप्रमाणेंच कर्तबगार निघाला.

**बाबेज, चार्लस** (१७९२-१८७१)—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ व हिशोबी यंत्राचा (कॅल्क्युलेटिंग मशीनचा) संशोधक. केंब्रिज येथें तो ११ वर्षें गणितशास्त्राचा प्राध्यापक होता. १८२३ सालीं हिशोबी यंत्र तयार करण्याकरितां त्याला सरकारी मदत मिळाली. त्यानें आठ वर्षें सतत प्रयोग करून तत्प्रीत्यर्थ १७,००० पौंड खर्च केले व नंतर तो प्रयत्न सोडून देऊन 'ॲनॅलिटिकल एंजिन' नांवाचें मोठें यंत्र तयार करण्याची योजना त्यानें हातीं घेतली, पण तीहि अपुरी राहिली. त्यानें बनवलेलें हें अपूर्ण स्थितींतील यंत्र साउथ केन्सिंग्टन म्यूझियममध्यें ठेवलेलें आहे.

**बाबेल मनोरा**—खिस्ती बायबलांतील उत्पत्ति-विभागाच्या ११ व्या प्रकरणांत अशी कथा सांगितली आहे कीं, मोठ्या जलप्रलयानंतर नोहाच्या वंशजांनीं मेसापोटेमियामध्यें शिनारच्या मैदानांत एक आकाशास जाऊन पोंचेल असा बुरूज बांधण्यास सुरुवात केली; परंतु तो अपुराच राहिला. कारण या देवावर मात करण्याच्या अतिप्रसंगाचा राग येऊन जेहोवा या देवाधिदेवानें मनोरा बांधणाऱ्यांत भाषाभिन्नत्व उत्पन्न करून भांडणें लावून दिलीं. बाबेल या शब्दाचा वाच्यार्थ देवाचें द्वार असा आहे. त्या शब्दास अलीकडे जो गोंधळ, घोंटाळा, वगैरे अर्थ बायबलांत प्राप्त झाला आहे तो वास्तविक दुसऱ्या यासारख्याच स्वरूपाच्या शब्दाचा आहे.

**बाबेल-मांडेब**—(मूळ शब्द बाहबेल माहनदेब=अश्रूंचें द्वार). ही सामुद्रधुनी हिंदी महासागर व तांबडा समुद्र यांच्यामध्यें आहे. अरबस्तानचें टोंक आणि अबिसिनियाचें टोंक पुढें येऊन ही सामुद्रधुनी बनली आहे. सर्वांत संकुचित जागीं हिची रुंदी १५ मैल आहे. सुएजचा कालवा झाल्यावर हिचें महत्त्व फार वाढलें, कारण युरोपचा हिंदुस्थानशीं होणारा व्यापार या मार्गावरून आहे.

**बाभूळ**—[वर्ग-लेग्युमिनोसी. उपवर्ग-मिनोसी]. या जातीचीं झाडें व झुडपें असतात. यांचीं पानें संयुक्त असून चिंचेच्या पानासारखीं एका शिरेच्या दोन्ही बाजूंस लहान लहान अशीं असतात. हीं झाडें आफ्रिका, अरबस्तान, पूर्वेकडील बेटें व ऑस्ट्रेलिया, वगैरेमध्यें आढळतात. यांच्या अनेक जाती असून त्यांपैकीं बहुतेकांपासून गोंद निघतो. या झाडांची साल तुरट असून तिचा व शेंगांचा कातडें कमावण्याच्या कामीं उपयोग करतात. ऑस्ट्रेलियामध्यें या जातीचें डेलबाटा म्हणून झाड आहे तें पंधरावीस फूट उंच वाढतें. याच्या सालींत टॅनिनचें प्रमाण बरेंच असतें. हिंदुस्थानांतील बाभळीपासून डिंक, साली व शेंगा यांपासून टॅनिन मिळतें व शेंगांचा काळी शाई, काळा रंग किंवा तीट करण्याकडे उपयोग होतो. याचीं पानें शेळ्या खातात. कंकरी म्हणून याची एक जात आहे. तिचें फूल सुवासिक असतें.

हें झाड हिंदुस्थानांत बहुतेक सर्वत्र आढळतें. ह्याची वाढ विशेषतः कोरड्या हवेंत होते. या झाडाच्या तीन जाती आहेत. बाभळीचा गोंद, साल व लांकूड वगैरेंचे गुणधर्म बाभळीच्या प्रकारावर अथवा जातीवर आणि हवामानावर अवलंबून असतात. कातडें कमावण्याला लागणाऱ्या सालीकरितां व जळाऊ लांकडाकरितां बाभळीची लागवड करणें झाल्यास दर ६ ते १० वर्षांनीं तोड करून नवी लागण करणें फायदेशीर असतें. जाळण्याकरितां व इमारतीकरितां लांकडाचा उपयोग होतो. चीट (कॅलिको प्रिंटिंग) छापण्याकरितां व ज्या ज्या कामाकरितां चिकट पदार्थाची जरूर असून डिंकाच्या विशिष्ट गुणधर्मामुळें तो वापरणें सोयीचें असतें अशा वेळीं बाभळीच्या डिंकाचा उपयोग करतात. बाभळीच्या बिया, साल व पानें हीं औषधी आहेत.

बाभळीच्या सालीचा कातडीं कमावण्यास व रंगविण्यास फार उपयोग करितात. बाभळीच्या सालींत जें एक रांपट द्रव्य (टॅनिक ॲसिड) असतें तें प्राण्यांचें कच्चें चामडें कमावण्याच्या कामीं अत्यंत उपयोगी पडतें. चामड्यांतील प्राणिज द्रव्यें (अल्ब्युमिन व जिलेटिन) ओलीं असतां जलद कुजून नाश पावतात. तींच बाभळीच्या सालींतील रांपट द्रव्याच्या (टॅनिक ॲसिडच्या) कार्यानें पाण्यांत अविद्राव्य अशीं होतात व तेणेंकरून कच्च्या चामड्याचें टिकाऊ कमावलेलें कातडें बनतें.

**बाम**—[मेलिसा ऑफिसिनॅलिस]. हें एक थोडेंसें सुगंधी मिंट कुलांतील झाड असून याचीं पानें दाटोळसर असतात. हें

चार्गेतून लावतात. हें बहुवर्षायु असून याची उंची दोन फूट असते. खोड उभें असून त्याला शाखा फुटतात. याचीं पानें व दांडे गुणाला उत्तेजक असून पौष्टिक आहेत. यापासून एक पिवळसर अर्क निघतो. तो सुवासिक असून त्यास लॅमचें तेल म्हणतात. युरोपच्या दक्षिणेस आणि पश्चिम आशिया खंडांत हीं झाडें होतात. सायबेरियांत मोल्डाव्हिआ म्हणून याची जात आहे.

**बामरा**—ओरिसामधील एक मांडलिक संस्थान. क्षे. फ. १५७४ चौरस मैल. देवगड हें राजधानीचें ठिकाण आहे. ब्राह्मणी ही एकच महत्त्वाची नदी या संस्थानांतून वाहते. संस्थानची लो. सं. (१९४१) १,७८,२७७. उडिया, चासा, किसान, गाहरा व गाडा या येथील मुख्य जाती आहेत. तांदूळ, नीळ, एरंडी हीं येथील मुख्य पिकें आहेत. जंगलांत साल नांवाचीं झाडें होतात. लाख, रेशीम, कात, हिरडे हेहि पदार्थ होतात. संस्थानचें एकंदर उत्पन्न तीनचार लाख रुपये होतें व संस्थान ब्रिटिश सरकारला १५०० रुपये खंडणीदाखल देत असे. हें संस्थान आतां ओरिसा प्रांतांत १९४८ सालीं विलीन झालें.

**बायकल सरोवर**—पूर्व सायबेरियांतील एक सरोवर. आकारमानानें जगांतील हें सहावें मोठें सरोवर आहे. लांबी ३८६ मैल व रुंदी २० पासून ५० मैलांपर्यंत असून याचें एकंदर क्षे. फ. १३,२०० चौरस मैल आहे. पश्चिम किनाऱ्यावर 'लिस्टाव्हिनिचो' नांवाचें एक मुख्य बंदर आहे. हिंवाळ्यांत सरोवर वर्फाच्छादित झाल्यावर आगबोटींच्या ऐवजीं स्लेज गाड्या वापरल्या जातात.

**बायजाबाई शिंदे** (१७८४–१८६३)—एक ग्वाल्हेरची महाराणी. हिच्या वडिलाचें नांव सखारामराव ऊर्फ सर्जेराव घाटगे. सर्जेराव हा अत्यंत दुष्ट व दुर्गुणी होता, पण ही मुलगी फार देखणी व सालस होती व घोड्यावर बसण्यांत पटाईत होती. बायजाबाई हिचें लग्न हें देखील महाराष्ट्रांतील एक राजकारस्थान घडवून आणण्यास कारणीभूत झालें. (दौलतराव शिंदे पाहा.) बाजीरावानें सर्जेरावाचें मन वळवून बायजाबाईचें लग्न दौलतराव शिंद्याशीं लावून दिलें. पुढें दौलतराव १८२७ सालीं मरण पावला. त्याला संतति नव्हती. तेव्हां तिनें शिंदे घराण्यापैकीं पाटलोजी म्हणून एक पुरुष होता त्याचा पुत्र मुकुटराव हा बारा वर्षांचा असतां दत्तक घेतला व त्याचें जनकोजी नांव ठेविलें. ६ वर्षांच्या अवधीमध्यें तिनें मोठ्या दक्षतेनें व शहाणपणानें राज्यकारभार चालविला. पुढें मुलाशीं न पटून ती आग्र्यास जाऊन राहिली. ब्रिटिश सरकार तिला फार मानीत असे. बेगम सुमरू, नागपूरची राणी, झांशीची राणी, लाहोरची चंदाराणी आणि भोपाळची बेगम या सुप्रसिद्ध स्त्रियांमध्यें ही राजस्त्रीहि आपल्या परीनें प्रख्यात असून हिनें अनेक वेळां आपल्या देशाच्या शत्रूंशीं घोड्यावर बसून टक्कर दिली होती.

**बायझन्टाइन कला**—कॉन्स्टंटाइन बादशहानें बायझॅंटियम येथें आपली राजधानी करून त्या शहरास आपलें नांव दिल्यानंतर (सन ३३०) साधारणतः आग्नेय युरोप खंडांत जी कला प्रचलित झाली तिला हें नांव देण्यांत येतें. या कलेमध्यें प्रत्येक गोष्टीवर ख्रिस्ती संप्रदायाचा ठसा उमटलेला दिसतो. या कालीं एकंदर कलेवर जरी पौरस्त्य कलेचा परिणाम होत होता तरी बायझंटाइन संप्रदायानें पूर्वीच्या अभिजात कलेचें वळण कायम ठेवलें हा विशेष होय. शिल्पामध्यें पूर्वीची नैसर्गिक नग्नपद्धति मागें पडून भर पोशाखास विशेष महत्त्व देण्यांत येऊं लागलें. परंतु या वेळीं शिल्पकलेला थोडें गौण स्थान प्राप्त होऊन मोझेइक अथवा चित्रविचित्र रंगांतील जडावाचें काम विशेष प्रचारांत येऊं लागलें व त्यांत अनेक तेजस्वी व चकचकीत मौल्यवान् खडे वापरण्याची पद्धति विशेष प्रचारांत आली. ख्रिस्ती संप्रदायाचा प्रभाव प्रथम चित्रांमध्यें दिसून येऊं लागला. तत्कालीन चित्रकार जिवंत व्यक्तीवरून किंवा साक्षात् डोळ्यांस दिसणाऱ्या गोष्टीवरून क्वचितच चित्रें काढीत. एवढेंच नव्हे तर अचूकपणाकडेहि त्यांची दृष्टि नसून केवळ बाह्यरेषा मारून आंतील भाग सजावटीनें भरून काढीत.

बायझंटाइन शिल्पकलेचा उत्कृष्ट नमुना सोळाव्या शतकांत जस्टीनियन बादशहानें बांधलेल्या सेंट सोफाया या ख्रिस्त मंदिरामध्यें पाहावयास सांपडतो. याची आतां मशीद बनविण्यांत आली आहे. या पद्धतींतील विशेष म्हणजे वाटोळ्या कमानी, वर्तुळाकार रचना व घुमट हे होत. विशेषतः कोपऱ्यांतील लोंबत्या कमानींच्या साहाय्यानें चौकोनी आकाराच्या इमारतीवरहि जेव्हां घुमट बांधण्याची कला साधली तेव्हांपासून असे घुमट सर्वत्र दिसूं लागले. या कलेचा इटली व सिसिली येथील शिल्पावर फार परिणाम झाला. व्हेनिस येथील सेंट मार्कचें ख्रिस्त मंदिर या परिणामाचें द्योतक आहे. याप्रमाणेंच दक्षिण फ्रान्स व पश्चिम जर्मनी यांमध्यें या शिल्पाचा प्रभाव दिसून येतो. विशेषतः दगडावरील कोरीव काम, तसेंच धातु व हस्तिदंत यांचें कोरीव काम, कांशाचें कलाकुसरीचें काम, कांचमिन्याचें काम व विणकाम यांमध्यें बायझंटाइन झांक दिसून येते. तसेंच लघुचित्रांमध्येंहि या कलेचा परिणाम दृष्टीस पडतो.

**बायझन्टाइन साम्राज्य**—पूर्व रोमन साम्राज्याला हें नांव पडण्याचें कारण या साम्राज्याची राजधानी बायझॅंटियम ऊर्फ कॉन्स्टॅंटिनोपल हें शहर होय. हें साम्राज्य इ. स. ३९५ मध्यें थिओडोशियस या रोमन बादशहानें आपल्या मृत्युसमयीं

आपलें अवाढव्य साम्राज्य आपले दोन मुलगे आर्केडियस व होनोरियस यांना वांटून दिल्यामुळें अस्तित्वात आलें, व तें पश्चिम रोमन साम्राज्य नष्ट झाल्यानंतरहि सुमारें एक हजार वर्षे टिकलें. या साम्राज्यांत आशिया मायनर, सीरिया, ईजिप्त, ग्रीस, थ्रेस, मोसिया, मॅसेडोनिया व क्रीट इतक्या प्रदेशांचा समावेश होता. या साम्राज्यावर हूण, गॉथ, वल्गेरियन व पर्शियन लोकांनीं हल्ले केल्यामुळे या साम्राज्याला अतिशय आपत्ती सहन कराव्या लागल्या. तथापि या साम्राज्याचे कित्येक बादशहा फार थोर व पराक्रमी होऊन गेले. ५२७ सालीं बादशहा झालेला जास्टिनियन यानें रोमन कायद्याला 'कोड'चें स्वरूप दिलें; व त्यानें व्हँडॉल व गॉथ या रानटी लोकांचे आपल्या साम्राज्यावरील हल्ले परतविले. महमद पैगंबरनें आपला धर्म स्थापल्यावर इस्लामी साम्राज्याचे खलीफ हे या साम्राज्याला मोठें शत्रू निर्माण झाले व त्यांनीं सायप्रस, ऱ्होडस्, सिसिली, इटलीचा व आफ्रिकेचा कांहीं भाग हीं जिंकून कॉन्स्टॅंटिनोपलवरहि हल्ले केले. पुढें ११०० पासून ख्रिस्ती व इस्लामी लोकांत धर्मयुद्धें (क्रूसेड) सुरू होऊन १२६१ पर्यंत अरबांच्या हातून बहुतेक मुलूख सोडविण्यांत आला, व या बायझन्टाइन साम्राज्यावर मायकेल बादशहानें चांगलें राज्य केलें. तथापि नंतर तुर्कस्तानच्या सुलतानांनीं पुन्हां पुन्हां स्वाऱ्या करून अखेर १४५३ त कॉन्टॅंटिनोपल राजधानी हस्तगत करून हें साम्राज्य नष्ट केलें.

बायझन्टाइन साम्राज्यानें युरोपांतील कला विशेषतः वास्तुशिल्प आणि वाङ्मय यांमध्यें चांगली भर घातली. कलेसंबंधीं विवेचन वर स्वतंत्र दिलेंच आहे. वाङ्मयांत नावीन्य नसलें तरी पांडित्य भरपूर आहे. या वाङ्मयामुळें अभिजात ग्रीक वाङ्मय आज आपल्याला चांगल्या स्थितींत उपलब्ध झालें आहे. तुर्कांनीं कॉन्स्टॅंटिनोपल घेतल्यावर बायझन्टाइन पंडित तेथून पळाले व पश्चिमेकडे गेले. युरोपच्या सुधारणेला वेगळेंच वळण लावणाऱ्या विद्यापुनरुज्जीवनाचा काळ त्यांच्यामुळें सुरू झाला.

**बायझन्टियम**—प्राचीन युरोप, बॉस्परसच्या किनाऱ्यावरील ग्रीसमधील एक प्राचीन शहर. हें अर्वाचीन कॉन्स्टॅंटिनोपल ज्या टेंकड्यांवर आहे, त्या टेंकड्यांच्या पूर्व टोंकास वसलें होतें. हें मेगोरियल आणि आर्गाईव्ह या लोकांनीं ख्रिस्तपूर्व ६५७ च्या सुमारास वसविलें असें सांगतात. पुढें तें रोमची एक वसाहत होऊन बसलें. इ. स. १९६ त सीव्हेरस यानें शहर उध्वस्त करून बरेचसे लोक तरवारीला बळी दिले. त्यावर गालीइनसची अवकृपा होऊन रहिवाशांची कत्तल व शहराची होळी करण्यांत आली. इ. सन ३३० त कॉन्स्टंटाइन बादशहानें जुन्या शहराच्या जागेवर नवीन शहर वसविलें, व आपला सर्व राज्यकारभार तो तेथूनच चालवूं लागला.

**बायबल**—हा शब्द मूळ ग्रीक भाषेंतील असून त्याचा अर्थ पुस्तक असा आहे. हा ज्यू आणि ख्रिस्ती लोकांचा पवित्र धर्मग्रंथ आहे. या ग्रंथांत निरनिराळ्या प्रकारचे उपग्रंथ असून ते निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या लेखकांनीं लिहिलेले आहेत. यांपैकीं जे ख्रिस्तपूर्व काळांत लिहिलेले आहेत त्यांस जुना करार व ख्रिस्तोत्तर काळांत लिहिलेले आहेत त्यांस नवा करार असें म्हणतात. जुन्या करारांत ३९ व नव्या करारांत २७ विभाग आहेत. पुन्हां प्रत्येक विभागांत प्रकरणें आहेत. त्यांची एकंदर संख्या ११८९ आहे. या ग्रंथांत जरी कांहीं भिन्नता दिसली तरी त्यांमध्यें एक प्रकारची एकरूपताहि आढळते. कारण यांतील निरनिराळे उपग्रंथ बहुतेक कमीअधिक प्रमाणानें प्रत्यक्षपणें येशू ख्रिस्तासभोंवतीं केंद्रित आहेत. कांहींमध्यें प्राथमिक जगाचा धार्मिक इतिहास ग्रथित केलेला आहे; विशेषतः त्यांत हीब्रू लोकांचा धार्मिक इतिहास वर्णन करण्यांत आलेला आहे. इतरांमध्यें—उदाहरणार्थ, शुभवर्तमान या ग्रंथांत—येशू ख्रिस्ताचें चरित्र व उपदेश आणि त्यानें स्थापन केलेल्या संप्रदायाचा प्रारंभ व प्रसार यांचा इतिहास व बाकीच्यामध्यें भविष्यें व धार्मिक गोष्टींसंबंधीं शिक्षण ग्रथित करण्यांत आलें आहे.

यांपैकीं कांहीं ग्रंथ हीब्रू भाषेंत व कांहीं ग्रीक भाषेंत लिहिलेले असून त्यांचा लेखनकाल ख्रि. पू. १४०० ते इ. स. १०० यांच्या दरम्यानचा आहे. यद्यपि मूळ ग्रंथाची एकहि प्रत आज उपलब्ध नाहीं तरी, फार प्राचीन काळींच त्यांचीं जीं निरनिराळीं भाषांतरें झालेलीं आहेत त्यांपैकीं कांहीं पूर्णपणें व कांहीं अंशतः आजहि अस्तित्वांत असल्यामुळें, इतर कारणांबरोबर या कारणावरून तरी त्या ग्रंथांची व त्यांच्या विद्यमान प्रतींची अकृत्रिमता नैतिक दृष्ट्या निश्चितपणें सिद्ध मानण्यास हरकत नाहीं. जुन्या कराराचें भाषांतर ख्रि. पू. २०० वर्षांपूर्वींच करण्यांत आलें होतें. नव्या कराराचीं जीं निरनिराळ्या भाषांतील रूपांतरें रक्षण करून ठेवण्यांत आलीं आहेत तीं शुभवर्तमानें लिहिलीं गेल्यानंतर १०० वर्षांच्या आंतच झालेलीं आहेत. इसवी सनाच्या पहिल्या शतकापासूनच बायबलांतील अवतरणें घेतलेलीं आळढतात. ओरिजिनस या तिसऱ्या शतकांत होऊन गेलेल्या एका लेखकानेंच आपल्या ग्रंथांत बायबलातील ९२३१ वेळां अवतरणें घेतलीं आहेत. मूळ भाषेंतील, किंवा भाषांतरित बायबलाच्या हजारों हस्तलिखित संपूर्ण प्रती सुरक्षितपणें जतन करून ठेवलेल्या आढळतात. त्यांपैकीं कांहीं चौथ्या शतकांतील असून कांहीं प्रतींत त्या पूर्वींचाहि कांहीं भाग आढळतो. पहिलें मुद्रित बायबल लॅटिन भाषेंत १४५२ सालीं छापलेलें आढळतें. याच्या सुमारें शंभर निरनिराळ्या आवृत्ती इ. स. १५०० पूर्वींच प्रसिद्ध झाल्या. याचें पुनर्मुद्रण किती झालें आहे हें सांगणें

अशक्य आहे. पृथ्वीवरील निरनिराळ्या भाषांतील आवृत्ती लक्षांत घेतल्या तर हजारों आवृत्ती व कोट्यावधि प्रती आतां-पर्यंत प्रकाशित झाल्या आहेत. लॅटिनवरून पहिलें इंग्रजी भाषांतर जॉन वायाक्लिफनें १३८० च्या सुमारास केलें. आज सर्वमान्य झालेलें इंग्रजी भाषांतर १६११ च्या सुमारास तयार झालें. आपल्याकडे कोंकणी भाषेंत फादर स्टीफन्सनें १६१५ सालीं त्याचें छंदोबद्ध रूपांतर केलें. आपल्या गीतेहून जास्त टीका आणि भाष्यें या बायबलवर झालेलीं आढळतील.

वेद हे अपौरुषेय आहेत असें आपल्याकडे जसें मानण्यांत येतें तसाच प्रकार बायबलसंबंधीं दृष्टीस पडतो. ख्रिस्ती लोक बायबलास परमेश्वराचे शब्द मानतात. अर्थात् तो हें प्रत्यक्ष बोललेला नाहीं, परंतु त्याच्या प्रेरणेनेंच लोकांनीं जें त्यास पाहिजे होतें, तें त्यांत लिहिलेलें असून इतर कांहींहि नाहीं. यामुळें बायबल या ग्रंथाचे कर्ते दोन आहेत: परमेश्वर व मनुष्य, व या दोहोंचाहि ठसा त्यावर उठलेला आहे. त्यांतील अतिमानवीय अंश परमेश्वर आहे. त्यामुळें लेखकाकडून कोणतेंहि चुकीचें विधान लिहिलें गेलेलें नाहीं व ही गोष्ट अशा तऱ्हेनें अगदीं बिनचूक रीतीनें लिहिणें अशा ग्रंथाच्या बाबतींत मान-वाला अशक्य आहे. त्यामध्यें जी वैयक्तिक लेखनशैली दिसून येते, तो मानवी अंश आहे आणि ही लेखनशैली प्रत्येक लेख-कांची भिन्न आहे.

बायबल, विशेषतः त्यांतील जुना करार सहज समजण्या-सारखा नाहीं व त्याकरितां तो वाचतांना विश्वासार्ह मार्गदर्शक किंवा टीका यांची आवश्यकता वाटते. याकरितां अनेक बाय-बलांच्या प्रतींत तळटीपा दिलेल्या असतात.

**बायरन, जॉर्ज गॉर्डन** ( १७८८–१८२४ )— एक

सुप्रसिद्ध आंग्ल कवि. याचें शिक्षण हॅरो व केंब्रिज येथील विश्वविद्या-लयांत झालें. तेथें शिकत असतां त्यानें १८०७ सालीं 'अवर्स ऑफ आयडलनेस' (आळसां-तील तास) हें काव्य लिहिलें. याच्यावरील 'एडिंबरो रिव्ह्यु'च्या झणझणीत टीकेला उत्तर म्हणून 'इंग्लिश बार्ड्स अँण्ड स्कॉच रिव्ह्यूअर्स' (इंग्रज भाट व स्कॉच टीकाकार) हें काव्य यानें प्रसिद्ध केलें. १८०९ सालीं तो युरोपमध्यें प्रवासाला गेला. या प्रवासांत त्यानें 'चाइल्ड हॅरोल्ड' या त्याच्या अतिप्रसिद्ध काव्याचे दोन सर्ग लिहिले. याचें ॲना इझाबेला चॅंठे हिच्याशीं लग्न झालें, व या विवाहापासून ऑगस्टा इडा या नांवाची त्याला मुलगी झाली. पुढें त्याचें बायकोशीं पटेनासें होऊन व त्याच्या स्वैरवर्तनामुळें सर्व इंग्रज समाज त्याच्यावर ताशेरा झाडूं लागल्यामुळें त्यानें वैतागानें इंग्लंडला रामराम ठोकला व बेल्जम, जिनिव्हा, स्वित्झर्लंड, व्हेनिस, इत्यादि ठिकाणीं मनसोक्त प्रवास केला. स्वित्झर्लंड येथें अस-तांना त्यानें 'चाइल्ड हॅरोल्ड'चा तिसरा खंड व व्हेनिस येथें चौथा खंड लिहिला. १८२३ सालीं ग्रीसला जाऊन त्यानें ग्रीसच्या स्वातंत्र्याच्या चळवळीला मनोभावें मदत केली. शेक्स-पिअरच्या खालोखाल बायरनची कवि या नात्यानें प्रसिद्धि आहे. त्याची भाषा अत्यंत जोरदार असून वर्णनशैलीहि वाखाणण्यासारखी होती. वरील काव्यांशिवाय कॉर्सेर, लारा, मॅनफ्रेड, केन, दि डीफॉर्म्ड ट्रॅन्सफॉर्ड, मॅरीनो फालेरो, लिबरल, व्हिजन ऑफ जजमेंट, इत्यादि त्याचीं काव्यें व नाटकें प्रसिद्ध आहेत.

**बायसिकल**—( दुचाकी ). दोन चाकांचें एक वाहन. याचा प्रथम शोध १८१६ त एका जर्मन यांत्रिकानें केला. ड्राइस या त्याच्या नांवावरून या सायकलीला 'ड्राइसिन' नांव पडलें होतें. तथापि आजच्यासारखी सायकल इंग्लंडमध्यें १८६६ च्या सुमारास निघाली. तिला एक मोठें व एक लहान अशीं दोन चाकें असून पायटें ( पेडल ) मारून तीं चालवीत. नंतर दोन सारख्या आकाराचीं चाकें आलीं व कॉव्हेन्ट्री येथें मोठा कारखाना निघाला. रबरी चाकांत हवा भरून सायकल चाल-विण्याची युक्ति निघाल्यापासून बसणाराला फार सोयीचें झालें आहे व तिचा वेगहि वाढला आहे.

स्त्रियांच्या, शर्यतीच्या, मुलांच्या, वगैरे सायकलीचे प्रकार झाले आहेत.

**बाया**—सातभाई. हा एक विणकर पक्षी असून पूर्व हिंदुस्थानांत आढळतो. याचें घरटें बाटलीसारखें असून झाडाला टांगलेलें आढळतें. हे पक्षी नेहमीं कळप करून हिंडतात व राहतातहि, म्हणून यांना 'सातभाई' (सात भाऊ) म्हणतात. इंग्रजींत 'सातबहिणी' अशा अर्थाचेंच नांव आहे.

'बायां'चा आकार साळुंकीएवढाच असून त्यांचे पंख भुरकट रंगाचे असतात. त्यांच्या शेपट्यांच्या बाजूंचीं पिसें नुसतीं खोंचल्यासारखीं दिसतात, व त्या ठिकाणीं तांबडसर रंगाची छटा दिसून येते. चोंचीचा रंग पांढरा असतो. यांचे पंख फारसे बळकट नसल्यामुळें या पांखरांना लांबवर उडतां येत नाहीं. झाडांच्याखालीं व खालच्या फांद्यांवर किंवा लहानशा बाभळीच्या झाडांवर इकडून तिकडे हिंडतांना हे दिसतात. या त्यांच्या संवयीमुळें त्यांचीं घरटीं लहान झाडां-

वर खालच्या बाजूस असतात. तीं गवताचीं व काटक्यांचीं बांधलेलीं असून पेल्याच्या आकाराचीं असतात. तीं फारशीं घट्ट नसून कशीं तरी बांधलेलीं असतात. मादी दर खेपेस सुमारें तीनचार चकचकीत निळया रंगाचीं अंडीं घालते. यांच्या पायाचीं बोटें पुढें तीन व मागें एक अशीं असतात. हे पक्षी उन्हाळ्यांत फारसे दृष्टीस पडत नाहींत.

**बायालिक, हायिम नहमन** (१८७३–१९३४)—एक अत्यंत मोठा हीब्रू कवि. याला लहानपणीं हीब्रू धार्मिक वाङ्मयाचें शिक्षण मिळालें होतें व पुढें त्यानें इतर वाङ्मयाचा अभ्यास केला. तो अहद हा-आमच्या या झिओनिस्ट पक्षास मिळून त्याचा कार्यकर्ता बनला. त्यानें जुन्या साधारण प्रतींच्या हीब्रू काव्याला उच्च दर्जा मिळवून दिला, व तसेंच प्राचीन हीब्रू संस्कृतीला मानाचें स्थान प्राप्त करून दिलें. तो चांगला कथालेखकहि होता. त्यानें जुन्या धर्मग्रंथांतून आख्यानें गोळा करून तीं प्रसिद्ध केलीं व इब्न गाबिरोल आणि मोझेस इब्न एत्रा यांच्या कवितांचा सटीक संग्रह प्रसिद्ध केला.

**बार कौन्सिल**—१९४६ सालीं 'इंडियन बार कौन्सिल्स ॲक्ट' या नांवाचा कायदा मंजूर करून हिंदुस्थानांतील प्रत्येक हायकोर्टाला जोडलेली अशी 'बार कौन्सिल' ही नवी संस्था स्थापण्यांत आली. तिचे सभासद पंधरा असतात, त्यांपैकीं एक ॲडव्होकेट-जनरल, व चार सभासद हायकोर्टानें नेमलेले असून त्यांपैकीं जास्तींत जास्त दोन सभासद हायकोर्ट जज्ज असतात, आणि बाकीचे १० सभासद ॲडव्होकेटांनीं म्हणजे हायकोर्टांत वकिली करण्याची सनद ज्यांना आहे अशा वकिलांनीं निवडलेले असतात (कलम ४). या बार कौन्सिलची कामें : (१) ॲडव्होकेटांना म्हणजे हायकोर्टांत वकिली करण्याची सनद घेऊं इच्छिणारांना द्यावयाच्या सनदाबाबत हायकोर्टाच्या मंजुरीनें नियम तयार करणें; (२) अशा ॲडव्होकेटाविरुद्ध त्याच्या वकिली धंद्याबाबतच्या किंवा इतर गैरवर्तनाचा आरोप असल्यास किमान तीन व कमाल पांच बार कौन्सिलच्या सभासदांचें न्यायकोर्ट-ट्रायब्यूनल-हायकोर्टाच्या चीफ जज्ज किंवा चीफ जस्टिस याकडून नेमून त्याची चौकशी करून त्याचा निर्णय बार कौन्सिलमार्फत हायकोर्टाकडे पाठवणें; (३) कायदेशिक्षण देण्याची व त्याची परीक्षा घेण्याची तजवीज करणें; वकील किंवा ॲडव्होकेट यांना एल्एल्. बी. ची म्हणजे युनिव्हर्सिटीची कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर बार कौन्सिलने कोर्टांतील प्रत्यक्ष काम-काजाच्या माहितीबाबतची ठेवलेली परीक्षा द्यावी लागते, व परीक्षा उत्तीर्ण झाल्यावरच वकिलीची सनद मिळूं शकते.

**बारवा सागर**—मध्य हिंदुस्थान, ओरछा संस्थान, झांशी माणिकपूर आगगाडीच्या फांट्यावर हें गांव आहे. येथून बेटवा नदी तीन मैलांवर आहे व बारवा सागर सरोवराकांठीं हें सुंदर रीतीनें वसलें आहे. बारवा सागरावर पाऊण मैलाचा घाट बांधलेला असून सरोवरांत दोन बेटें आहेत. गांवाजवळच मोठी आंबराई आहे. बारवा सागराचें काम ओरछाचा राजा उदितसिंग यानें १७०५ ते १७३७ या काळांत केलें. गांवाच्या वायव्येस याच उदितसिंगानें बांधलेला एक किल्ला आहे. पश्चिमेस तीन मैलांवर एक जुनें चंदेल्यांचें देवालय आहे.

**बारसिलोना**—स्पेनमधील बारसिलोना प्रांताची राजधानी. लोकसंख्या ११,२९,८३७. बारसिलोना हें स्पेनमधील भरभराटींत असलेलें शहर असून भूमध्यसमुद्रावरील मुख्य बंदर आहे. या शहराचे जुनें शहर व नवें शहर असे दोन भाग आहेत. पहिल्यांत पौरस्त्य पद्धतीवर इमारती बांधलेल्या आहेत व दुसऱ्यांत इंग्लिश पद्धतीवर बांधलेल्या आहेत. शिक्षणसंस्थांची संख्या पूर्वीपासून पुष्कळ आहे. १४३० सालीं येथें विश्वविद्यालय स्थापण्यांत आलें. याशिवाय येथें सृष्टिशास्त्र, वैद्यकी व शस्त्रक्रिया, इत्यादिकांचीं विद्यालयें असून बहिरे, मुके यांची शाळा व विविध शिक्षणसंस्था आहेत. कापूस, रेशीम, व लोंकर यांचें सूत काढणें व विणणें हे मुख्य धंदे आहेत.

**बारा अलुतीं-बलुतीं**—'अलुतीं-बलुतीं' पाहा.

**बारा आदित्य**—हीं बारा नांवे पुढीलप्रमाणें निरनिराळीं आढळतात:—

(अ) मित्र, रवि, सूर्य, भानु, खग, पूष्णि, हिरण्यगर्भ, मरीचि, आदित्य, सविता, अर्क व भास्कर.

(आ) विवस्वान्, अर्यमा, पूषा, त्वष्टा, सविता, भग, धाता, विधाता, वरुण, मित्र, शक्र व उरुक्रम.

(इ) धाता, मित्र, अर्यमा, रुद्र, वरुण, सूर्य, भग, पूषा, सविता, विवस्वान्, त्वष्टा व विष्णु.

(ई) भग, अंश, अर्यमा, मित्र, वरुण, सविता, धाता, विवस्वान्, त्वष्टा, पूषा, इंद्र व विष्णु.

**बारा एकादशी**—चैत्र ते फाल्गुन या बारा महिन्यांतील एकादशी—

(अ) शुक्ल पक्ष—कामदा, मोहिनी, निर्जला, शयनी, पुत्रदा, परिवर्तिनी, पाशांकुशा, प्रबोधिनी, मोक्षदा, पुत्रदा, जया व आमलकी.

(आ) कृष्ण पक्ष—वरूथिनी, अपरा, योगिनी, कामिका, अजा, इंदिरा, रमा, उत्पत्ति, सफला, षट्तिला, विजया व पापमोचनी.

**बारा ज्योतिर्लिंगें**—शंकराचीं भारतांतील पुढील बारा देवस्थानें पूज्य मानलीं जातात. हीं ज्योतिर्लिंगें म्हणजे मृत ज्वालामुखींचीं केंद्रें असावींत असा कांहीं तर्क चालवितात.

१ सोरटी सोमनाथ—सौराष्ट्र, काठेवाड. वेरावळ बंदराकडून रस्ता आहे.

२ श्रीशैल्य मल्लिकार्जुन—मद्रास इलाखा. नंद्याळ स्टेशनवर उतरून जातात. ४० मैलांवर पर्वताचा पायथा आहे. चढण २३ मैलांची आहे.

३ महाकालेश्वर (उज्जयिनी). उज्जैन रेल्वेचें स्टेशन आहे.

४ ओंकार-अमलेश्वर—मध्यप्रांत. मोरटक्का स्टेशनवर उतरून जातात. नर्मदेच्या पात्रांत मांधाता बेटावर आहे.

५ परळी वैजनाथ—हैद्राबाद संस्थान. परभणीहून बारा कोसांवर आहे.

६ भीमाशंकर—पुणें जिल्हा, खेड तालुका. पुण्याहून किंवा कर्जतहून थेट सडक आहे.

७ आवंढ्या नागनाथ—हैद्राबाद संस्थान.

८ काशी विश्वनाथ—बनारस, संयुक्तप्रांत.

९ त्र्यंबकेश्वर—नाशिक जिल्हा. नाशकापासून वीस मैलांवर.

१० केदारेश्वर—हिमालय.

११ घृष्णेश्वर—वेरूळपासून एक मैलावर आहे.

१२ रामेश्वर—मद्रास इलाखा. रामनाड जमीनदारींत समुद्रतीरीं आहे.

प्रातःस्मरणांतील भूपाळ्यांत यावरची एक भूपाळी आहे.

**बारायंकी**—संयुक्तप्रांत, फैजाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ १७२५ चौरस मैल. घोग्रा नदीशिवाय, गोमती व तिला मिळणाऱ्या रेठ व कल्याणी या नद्या या जिल्ह्यांतून वाहतात. वार्षिक पाऊस सरासरी ४० इंच पडतो. जिल्ह्याची लो. सं. (१९४१) ११,६२,५०८. शेंकडा ८३ लोक हिंदू व शेंकडा १७ मुसलमान आहेत. अयोध्येच्या इतिहासाशीं या जिल्ह्याचा इतिहास संबद्ध आहे. हा प्रदेश मुसलमानांच्या अमलाखालीं होता. या जिल्ह्यांत रायवाड लोक बरेच चळवळ्ये असून त्यांनीं जहागिरी मिळविल्या. १८५६ त हा प्रदेश इंग्रजांकडे गेला. तांदूळ, हरभरा व गहूं हीं या जिल्ह्यांतील मुख्य पिकें आहेत. कापसाचें कापड विणणें हा येथील मुख्य धंदा आहे. नबाबगंज येथें उत्तम चीट तयार होतें. बहराम घाट येथें उंसाचे लोखंडी चरक करण्याचा कारखाना आहे. याशिवाय पितळेचीं भांडीं, कुलुपें, अडकित्ते, वगैरे जिन्नस एक-दोन ठिकाणीं होतात.

**बारामती**—मुंबई, पुणें जिल्ह्यामध्यें भीमथडी तालुक्यांतील सर्वांत मोठें व व्यापारी गांव. हें पुण्यापासून ५० मैलावर कऱ्हा नदीकांठीं आहे. लोकसंख्या सुमारें १६ हजार. येथें दोन सरकारी दवाखाने व एक खाजगी हायस्कूल आहे. येथील ऑस्ट्रेलियन मिशन गुन्हेगार जातींच्या मुलांना शिक्षण देत असतें. येथें कालव्याच्या पाण्यावर ऊंस, द्राक्षें, संत्रीं, मोसंबीं होतात. गुळाचा मोठा व्यापार चालतो. रेशीम-कांठी धोतर-जोडे चांगले निघतात. पेशवाईत या गांवीं बाबूजी नाईक हे प्रसिद्ध मुत्सद्दी सरदार राहत. त्यांचा मोठा वाडा असे. सिद्धेश्वराचें चांगलें बांधलेलें देऊळ यांचेंच आहे. यांच्या पदरीं प्रसिद्ध मोरोपंत कवि येथें राहत असत.

येथें म्युनिसिपालिटी व पाटबंधाऱ्याच्या व इतर कचेऱ्या आहेत. कापूस दाबण्याचा व पोलादाचा कारखाना आहे.

**बारा मावळें**—'बारा मावळ पुण्याखालीं', 'बारा मावळ जुनराखालीं' असें तानाजी मालुसऱ्याच्या पोवाड्यात म्हटलें आहे. हिरडस मावळातील बांदल देशमुखाच्या एका सनदपत्रांत (१६१४) बारा मावळें हे शब्द आहेत असें इतिहासाचार्य राजवाडे सांगतात. शिवाजीच्या वेळीं जुन्नरापासून चाकणपर्यंत व पुण्यापासून शिरवळापर्यंत चोवीस मावळें प्रसिद्ध होतीं. जुन्नरपासून चाकणपर्यंत पुढील मावळें प्रसिद्ध होतीं—(१) शिवनेर, (२) जुनेर, (३) मिननेर, (४) घोडनेर, (५) भीमनेर, (६) जामनेर, (७) भामनेर, (८) पिंपळनेर, (९) पारनेर, (१०) सिन्नर, (११) संगमनेर, व (१२) अकोळनेर. हीं बारा नेरे-नेहेरें ऊर्फ मावळें प्रसिद्ध आहेत.

पुण्याखालील बारा मावळें पुढीलप्रमाणें आहेत—(१) अंदर मावळ, (२) नाणें मावळ, (३) पवन मावळ, (४) घोटण मावळ, (५) पौड खोरें, (६) मोसें मावळ, (७) मुठें मावळ, (८) गुंजण मावळ, (९) वेळवंड मावळ, (१०) भोर खोरें, (११) शिवतर खोरें, व (१२) हिरडस मावळ.

**बारामुळा**—काश्मीर संस्थानांतील एक गांव. लोकसंख्या सुमारें ५०००. हें गांव झेलम नदीकांठचें बंदर असल्यामुळें याला महत्त्व आलेलें आहे. बारामुळा येथें धरणीकंप वारंवार होतात. १८८५ सालीं धरणीकंपानें गांवाचा बहुतेक नाश झाला होता. प्राचीन वराहमूल या नांवावरून बारामुळा हें नांव पडलें आहे. हल्लींच्या बारामुळा गांवीं, पूर्वीं हुविष्क नांवाच्या राजानें वसविलेलें हुष्कपूर नावाचें गांव होतें. या ठिकाणीं काश्मीरवर चालून येणाऱ्या आक्रमकांनीं १९४७–४८ मध्यें बरेच अत्याचार केले. या आक्रमकांवर पाठविलेल्या हिंदी सैन्याचे सेनापति रॉय हे एका चकमकींत निधन पावले.

**बारा वफत**—महंमद पैगंबराचा जो जन्मदिवस (छ १२ रबिलावल) तोच मृत्युदिवस असें कांहीं मुसलमानी धर्मशास्त्रज्ञ

मानतात व तो दिवस म्हणजे बारा वफत होय. हा सणाचा दिवस म्हणून मुसलमान त्या दिवशीं गोडधोड करतात, गरिबांना दानधर्म करतात व देवाच्या प्रार्थनेंत दिवस घालवितात.

**बारिया**—एक अरब सरदार. सन १२४६ मध्यें यानें पुण्यावर हल्ला केला. त्या वेळीं नदीकांठीं असलेल्या पुण्येश्वर ऊर्फ केदारेश्वर व नारायणेश्वर या दोन देवळांचा विध्वंस करून यानें त्या जागीं मशिदी स्थापन केल्या. देवळांचें उत्पन्न मशिदींना लावून दिलें. हिसा मोहिद्दिन कलाल नांवाच्या एका दिल्लीच्या फकिरानें हें कृत्य केलें असेंहि कोठें लिहिलें आहे. थोरला शेखसल्ला व धाकटा शेखसल्ला या नांवांनीं आज या मशिदी प्रसिद्ध आहेत. बारियानें सन १२९० मध्यें पुण्यास कोट बांधला. या पांढरीच्या कोटाचे अवशेष कुंभार वेशीजवळ दिसून येतात. यानें निर्मूलन केलेल्या नारायणेश्वराची स्थापना पुढें मराठेशाहींत पुरंदरच्या पायथ्याशीं नारायण पेठ वसवून करण्यांत आली.

**बारिया संस्थान**—मुंबई इलाखा, पंचमहाल जिल्हा, रेवाकांठामधील एक संस्थान. याचें क्षे. फ. ८४५ चौ. मैल आहे. बारियाचे जहागीरदार चव्हाण रजपूत आहेत. इ. स. १२४४ च्या सुमारास पालनसिंहानें चांपानेर व इतर मांडलिक राज्यें घेऊन राजघराणें स्थापलें. या वंशाच्या दोन शाखांपैकीं एका शाखेनें छोटा उदेपूरचें घराणें व दुसरीनें बारियाचें घराणें स्थापन केलें. स. १८२५ पर्यंत हें संस्थान सेंट्रल इंडिया एजन्सींचा भाग होता. नंतर तें मुंबई इलाख्यांत घालण्यांत आलें. या जहागीरदाराला देवगड–बारियाचा महारावळ असें म्हणतात; व त्याला ९ तोफांची सलामी मिळते. संस्थानांत देवगड–बारिया राजधानी व ४८३ खेडीं असून एकंदर लो. सं. (१९४१) २,०२,०५५ आहे. त्यांत भिल्ल, कोळी व नाइकडा या मुख्य जाती होत. मुख्य पिकें गहूं, हरभरा व मका. लांकडांचें उत्पन्न बरेंच येतें. पिपलोद ते देवगड–बारियापर्यंत संस्थानची आगगाडी आहे. संस्थानचें उत्पन्न वीस लाखांचें आहे. येथें प्राथमिक व दुय्यम शिक्षण मोफत आहे.

हल्लींचे महाराज महारावळ रणजितसिंह हे १९०८ सालीं गादीवर आले. *यांना लष्करी मानमरातब आहेत. संस्थान* आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**बारिसाल**—बंगाल, बकरगंज जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. हें बारिसाल नदीच्या पश्चिम तीरावर आहे. लो. सं. ६१,३१६. अठराव्या शतकाच्या मध्यंतरीं बारिसाल येथें महत्त्वाची मिठाची चौकी होती, व येथें मिठावर कर गोळा करीत असत. १८७६ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. शहरांतील रस्ते रुंद व सरळ असून चांगले ठेवलेले आहेत. येथें १८८५ सालीं स्थापिलेलें सार्वजनिक वाचनालय आहे. येथें दोन-तीन कॉलेजें, बरींच हायस्कुलें व औद्योगिक शाळा आहेत.

**बारी**—या जातीस देशपरत्वें सूर्यवंशी, सुरज, बारी, बरई, तांबोळी, पाटील, महाजन, वगैरे नांवें आहेत. ह्या जातीची सुमारें १५ लक्ष लोकसंख्या असावी व बहुतेक सर्व प्रांतांतून हे लोक आहेत. आपल्याकडे खानदेश–वऱ्हाडात हे लोक बरेच आहेत. या जातींत फार प्राचीन काळापासून आपसांतील तक्रारी पंचांमार्फत मिटविण्याची वहिवाट आहे. ह्या जातीच्या फंडांतून बहुतेक ठिकाणीं पानाच्या व्यापाऱ्यांकरितां धर्मशाळा, सराया, वगैरे इमारती व जनावराकरितां विहिरी, हौद (पाणपोया), वगैरे बांधले आहेत. जातीच्या नियमांचें उल्लंघन करणारांस दंड, बहिष्कार, पंचगव्य प्रायश्चित्त, क्षौर, जेवण, लोटांगण, वगैरे शिक्षा देतात. या जातींत कांहीं पोटभेद आहेत. आपण मूळचे क्षत्रिय (सूर्यवंशीय) आहोंत असें बारी लोक मानतात. या जातींत पुनर्विवाहाची चाल फार जुनी आहे.

**बारी, सर जेम्स मॅथ्यू** (१८६०–१९३७)—एक इंग्रज कादंबरीकार व नाटककार. त्याचें पहिलें पुस्तक 'बेटर डेड' (१८८७) हें लंडनच्या शहरी जीवनक्रमावर उपरोधपर लेख असून त्यानंतर प्रसिद्ध झालेलीं 'ओल्ड लिच आयडिल्स' हीं काव्यें, व त्यानंतरचे 'ए विंडो इन् थ्रम्स' हीं सर्व फारच यशस्वी झालीं. त्याच्या कादंबऱ्या व कथा (टेल्स) ज्या विशेष प्रसिद्ध आहेत त्या म्हणजे 'व्हेन ए मॅन इज सिंगल', (माणूस अविवाहित असतो तेव्हां), 'दि लिटल मिनिस्टर', 'सेंटिमेंटल टॉमी', 'टॉमी अँड ग्रिझेल', आणि 'दि लिटल व्हाइट बर्ड'. त्याचीं लोकप्रिय नाटकें म्हणजे 'पीटर अँड वेंडी', 'दि प्रोफेसर्स लव्ह स्टोरी', 'दि लिटल मिनिस्टर', 'दि अॅडमिरेबल क्रिचटन', 'क्वॉलिटी स्ट्रीट', 'लिटल मेरी', 'पीटर पॅन', 'व्हॉट एव्हरी वुमन नोज्', 'डीअर ब्रूटस', 'ए किस फॉर सिंडेरेला', 'मेरी रोझ्', इ. होत. हा १९३०–१९३७ पर्यंत एडिंबर्ग विद्यापीठाचा कुलपति होता.

**बॉरो, जॉर्ज हेन्री** (१८०३–१८८१)—एक इंग्रज ग्रंथकर्ता, प्रवासी व भाषाशास्त्रज्ञ. त्याचा बाप सैन्यांत कॅप्टन असल्यामुळें या कुटुंबाला अनेक ठिकाणीं राहावें लागलें व त्यामुळें बॉरोचें शिक्षण व्यवस्थित झालें नाहीं. प्रथम त्यानें कांहीं वर्षें वकिलाच्या कचेरींत नोकरी केली व नंतर लंडनमध्यें किरकोळ लेखनाचें काम केलें. पुढें त्याची प्रकृति खालावली म्हणून तो एका जिप्सी लोकांच्या टोळीबरोबर पुष्कळ ठिकाणीं हिंडला. नंतर तो एका बायबल सोसायटीचा एजंट म्हणून स्पेनमध्यें गेला. त्यानें ग्रंथ लिहिले ते 'दि बायबल इन् स्पेन', 'लॅव्हेंग्रो',

'दि रोमनी रॅाय', (या दोन ग्रंथात त्यानें आपलें विचित्र आत्मचरित्र दिलें आहे.), 'वाइल्ड वेल्स', इत्यादि होत.

**बार्डोली**—मुंबई प्रांतांत, सुरत जिल्ह्यामधील याच नांवाचा तालुका व त्याचें मुख्य ठिकाण. तालुक्याची लो. सं. ७०,५९५. बार्डोली गांव हें ताप्तीव्हॅली रेल्वेचें स्टेशन असून सुरतपासून १९ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें आठ हजार. येथें ४०० वर्षांचें जुनें केदारेश्वराचें देवालय आहे. तेथें वार्षिक जत्रा भरते. कापसाची सरकी काढण्याचे व कापूस दाबण्याचे कारखाने व तांदूळ सडण्याची गिरणी आहे.

१९२२ सालीं म. गांधींनीं बार्डोली येथें प्रथमच कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याचें ठरविलें होतें. पण चौरीचुरा येथील दंग्यामुळे ती तहकूब केली. १९२८ सालीं सारावाढ न देण्याची चळवळ थी. वल्लभभाई पटेल यांच्या नेतृत्वाखालीं या तालुक्यानें करून सरकारला पडतें घ्यावयास लाविलें. त्यामुळें बार्डोलीचें नाव भारताच्या राजकीय इतिहासात गाजलें आहे.

**बार्थोले**—एक फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ. आर्कुइल येथें त्याची रसायन शाळा होती. त्यानेंच सन १७८५ त ओपविण्याकरितां हर (क्लोरिन) वायूचा उपयोग केला. यानें बंदुकीची दारू तयार करण्याकरितां सोऱ्याच्याऐवजीं पालाशहरिता (पोटॅशिअम क्लोरेट)चा उपयोग करून पाहिला. यानें रंगकलेची सोपपत्तिक माहिती लोकांस दिली व या विषयावर त्यानें एक पुस्तकहि लिहिलें. स. १७९८ त नेपोलियनबरोबर जे शास्त्रज्ञ ईजिप्तमध्यें गेले त्यांत हा होता. रासायनिक द्रव्यें एकमेकांशीं संयोग पावतांना कांहीं ठराविक प्रमाणांत संयोग पावतात हें तत्त्व व यावरून पुढें उद्भूत झालेलें रासायनिक स्नेहाचें तत्त्व या दोन तत्त्वांचा उगम बार्थोलेपासूनच झाला यांत शंका नाहीं.

**बार्थेलो** (१८२७–१९०७)—एक फ्रेंच रसायनशास्त्रज्ञ व राजकारणी पुरुष. हा सेंद्रिय रसायनशास्त्राचा अध्यापक होता. भौतिक शक्तीचें मापन करतां येतें व त्यावर रासायनिक चमत्कार अवलंबून असतात, ही कल्पना बार्थेलोनें प्रथम निदर्शनास आणली. सेंद्रिय पदार्थाचें पृथक्करणच शक्य आहे, व हे पदार्थ त्यांच्या घटकद्रव्यांपासून तयार होणें शक्य नाहीं; किंबहुना यांच्या घटनेचे नियम वानस्पत्य रसायनशास्त्रीय पदार्थांच्या घटनेच्या नियमांहून भिन्न आहेत, या कल्पनेचें उच्चाटन त्यानें, कित्येक कर्बोज्ज पदार्थ त्यांच्या घटक द्रव्यांच्या संयोगानें तयार करून प्रथम केलें. याचे कर्बोज्ज पदार्थासंबंधीं कित्येक शोध पुस्तकरूपानें व निबंधरूपानें प्रसिद्ध झाले. यंत्रशास्त्राला जे नियम लागू आहेत तेच रासायनिक संस्कारास लागू आहेत हेंहि त्यानें सिद्ध केलें. या सिद्धीकरितां यांत्रिक रसायनशास्त्रासंबंधीं त्यानें अनेक प्रयोग केले. या शास्त्राच्या याच शाखेंत प्रयोग करीत असल्यामुळें त्याला स्फोटक द्रव्यांचा व त्यांच्या शक्तीचा शोध लागला.

**बार्थोलोम्यु (संत)**—ख्रिस्ती धर्मातील एक प्रेषित. नॅथॅनेल व हा एकच असावेत. जीझसच्या पहिल्या शिष्यांपैकीं हा एक होता. दक्षिण अरबस्तानांत ख्रिस्तमताच्या प्रचारामध्यें याला मरण आलें. २४ ऑगस्ट हा त्याचा मृत्युदिन पाळतात.

**बार्बाडोज**—बार्बाडोज हें ब्रिटिश वेस्टइंडीजपैकीं एक बेट असून सेंट व्हिन्सेंटच्या पूर्वेस ७८ मैलांवर आहे. क्षेत्रफळ १६६ चौरस मैल आहे. येथील हवा चांगली आहे. दरवर्षी पाऊस सुमारें ६० इंच पडतो. साखर व कापूस यांची लागवट मोठ्या प्रमाणावर होते. याशिवाय दारू, रासायनिक द्रव्यें, बर्फ व तंबाखू यांचे कारखाने आहेत. येथें १९४४ सालीं १२६ प्राथमिक शाळा, ८ दुय्यम शाळा, ३ हायस्कूलें व डरहॅम विद्यापीठास जोडलेलें एक कॉलेज असून ८ वृत्तपत्रें चालतात. बेटासाठीं एक गव्हर्नर असतो. वेस्टइंडीजच्या साम्राज्य शेतकी खात्याचें मुख्य ठिकाण बार्बाडोज आहे. लोकसंख्येंत नीग्रो लोकांचें प्रमाण जास्त आहे. एकंदर लोकसंख्या सुमारें दोन लाख. ब्रिजटाउन हें राजधानीचें शहर आहे. या बेटावर वादळें फार होतात. हें १६२७ त इंग्रजांच्या ताब्यात आलें.

**बार्बिएर, आन्त्वान आलेक्झांद्र** (१७६५–१८२५)—एक फ्रेंच ग्रंथसूचीकार. नेपोलियननें त्याला १८०७ सालीं ग्रंथपाल (लायब्रेरियन) नेमलें व पुढें १८ व्या लुईचाहि तो ग्रंथपाल होता. त्यानें केलेली फ्रेंच राज्यांतील पुस्तकांची सूची (१८०३) आणि अनामिक आणि टोपणनांवें असलेल्या ग्रंथांचा कोश (१८०६–१८०९) हे दोन्ही ग्रंथ उपयुक्त आहेत.

**बार्ली**—[वर्ग–होर्डेअम सातिवम. जात–ग्रॅमिनी]. हें जगांतील पहिलें माणसानें तयार केलेलें धान्य असून याच्या अनेक जाती आहेत. हिंदी जात जव म्हणून प्रसिद्ध आहे. (जव पाहा). ब्रिटनची हवा बार्लीच्या निपजाला फार चांगली आहे. पण दारू गाळण्यासाठीं पाहिजे तितकी तयार होत नसल्यानें हिची लागवड कमी होत आहे. उत्तर अमेरिकेंत कानडा देशांतच काय ती बरीचशी बार्ली काढतात व तिचा दर्जाहि वरचा असतो. सर्वांत जास्त पीक रशियांत होतें. तेथें २ कोटी एकरच्या वर जमिनींत १९१४ सालीं लागवड होती. १९३९–४० सालीं आठ कोटी वीस लक्ष क्विंटल इतकें पीक निघालें. जर्मनींत सव्वाचार कोटी तर

हिंदुस्थानांत सुमारें दोन कोटींच्या जवळपास हिचें पीक होतें. 'पर्ल बार्ली' (मोती जव) दिसावयास मोत्यासारखी असते. याच्या परागाला 'पेटंट बार्ली' म्हणतात.

गेल्या महायुद्धानंतर अन्नाचा तुटवडा जेव्हां झाला तेव्हां खाण्याच्या नेहमींच्या धान्यांत बार्लीचा समावेश केला गेला. गहूं खाणाऱ्या लोकांना गव्हाबरोबर बार्ली किंवा बार्लीचें पीठ घ्यावें लागतें. हिंदुस्थानांत उत्तर प्रदेश व बिहार या प्रांतांत हें रवीचें पीक येतें. गेल्या दोन-तीन वर्षांपासून सु. पंचवीस लाख टन बार्ली निघते. जव पाहा.

**बार्लो, सर जॉर्ज** (१७६२–१८४७)—एक अँग्लो-इंडियन मुत्सद्दी व हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. १८०५ सालीं लॉर्ड कॉर्नवालिस गाजीपूर येथें मृत्यु पावल्यामुळें, बार्लो यास त्याच्या जागीं गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें. ह्यानें येथील संस्थानिकांच्या भांडणांत न पडण्याचें धोरण सुरू करून चालू असलेलीं युद्धें एकदम बंद केलीं व तह केले. ह्याच्या वेळीं झालेली विशेष गोष्ट म्हणजे वेलोर येथील शिपायांचा दंगा होय (१० जुलै १८०६). कर्नल गिलेस्पीनें हा दंगा मोडून टिपूच्या कुटुंबांतील मंडळीस कलकत्त्यास पाठविलें. या वेलोरच्या बंडामुळें 'होम गव्हर्नमेंट'नें बार्लो यास गव्हर्नर जनरलच्या जागेवरून कमी करून, त्याच्या जागीं 'बोर्ड ऑफ कंट्रोल' सभेचा अध्यक्ष लॉर्ड मिंटो याची नेमणूक केली. पुढें कांहीं दिवस हा मद्रासचा गव्हर्नर होता. १८१२ सालीं त्याचा कारभार पसंत न पडल्यामुळें त्यास विलायतेस परत बोलविण्यांत आलें.

**बार्शी**—मुंबई इलाखा, सोलापूर जिल्ह्यांतील एक तालुका. याच्या चोहों बाजूंस निजामाचा मुलूख असून याचें क्षे. फ. ५९७ चौ. मैल आहे. यांत दोन शहरें असून २२१ खेडीं आहेत. १९४१ सालीं लो. सं. १,५६,४०४. या तालुक्यांत लहान नद्या पुष्कळ असून जंगलेंहि बरींच आहेत. पाऊस नियमित व पुष्कळ पडतो. बार्शी शहर हें व्यापाराचें मोठें ठिकाण आहे. अंबरीष राजानें द्वादशीचें पारणें येथें फेडलें म्हणून 'द्वादशी' क्षेत्र नांव पडलें व त्याचा अपभ्रंश बार्शी झाला असें सांगतात. कापूस, जवस, ज्वारी हीं पिकें होतात. येथें भगवानाचें प्राचीन देऊळ आहे. लो. सं. सुमारें चाळीस हजार आहे. सुताच्या, कापडाच्या व शेंगदाण्याच्या गिरण्या येथें आहेत.

**बार्हस्पत्य संवत्सर**—बार्हस्पत्य संवत्सरें दोन प्रकारचीं आहेत. एक महाकार्तिकादि बारा वर्षांचें व दुसरें प्रभवादि साठ वर्षांचें चक्र आहे. यांतील दुसऱ्या चक्रास आपण व्यवहारांत नुसतें संवत्सर असेंच म्हणतों. पहिलें चक्र अजमासें बारा वर्षांत गुरूचें बारा राशींतून जें परिभ्रमण होतें त्यावर बसविलें असल्यामुळें चांद्रमासाप्रमाणें त्यांतील वर्षांत चैत्र-वैशाखादि नांवें पडलेलीं आहेत. तथापि चांद्रमासांच्या व बार्हस्पत्य संवत्सरांच्या नांवांमध्यें घोंटाळा होऊं नये म्हणून बार्हस्पत्य संवत्सरांच्या नांवामागें कधीं कधीं 'महा' हा शब्द लाविलेला आढळून येतो. राशींतील भ्रमणांत सूर्याची गति गुरूहून अधिक असल्यामुळें तो बहुधा दरवर्षी गुरूच्या जवळ येऊन पुढें निघून जातो. सूर्य गुरूच्या जवळ आला कीं गुरूचा अस्त होतो व तो त्याचा पुन्हां २५ पासून ३१ दिवसांनीं उदय होईपर्यंत तसाच राहतो. हा उदय ज्या वर्षी कृत्तिका किंवा रोहिणी नक्षत्रीं होतो त्यास कार्तिक किंवा महाकार्तिक म्हणतात व याप्रमाणेंच इतर महिने होतात. बारा वर्षांत गुरूचे अस्तोदय फक्त ११ च होत असल्यामुळें तेवढ्या अवधींत एका बार्हस्पत्य संवत्सराचा क्षय होतो. खिस्तपूर्व सातव्या शतकापूर्वीच्या शिलालेखांत व दानपत्रांत बार्हस्पत्य संवत्सर दिलेलें पाहावयास मिळतें.

**बॉल, सर रॉबर्ट स्टावेल** (१८४०–१९१३)—एक आयरिश ज्योतिषशास्त्रज्ञ. त्यानें अनेक सरकारी हुद्यांवर कामें केलीं. व १८७४ सालीं त्याला आयर्लंडचा 'राजज्योतिषी' नेमण्यांत आलें. १८९२ सालीं केंब्रिज युनिव्हर्सिटींत ज्योतिष व भूमिति या शास्त्रांचा प्राध्यापक आणि वेधशाळेचा संचालक म्हणून त्याला नेमण्यांत आलें. त्यानें जे ग्रंथ लिहिले त्यांतील मुख्य ग्रंथ (१) 'दि स्टोरी ऑफ दि हेवन्स' (आकाशांतील कथा), (२) 'स्टार लँड' (तारांगण), (३) 'इन् स्टारी रेल्म्स' (तारांच्या राज्यांत), (४) 'टाइम अँड टाइड' (काळ आणि भरती), आणि (५) 'दि स्टोरी ऑफ दि सन' (सूर्याची कथा) हे होत. त्याचे हे शास्त्रीय ग्रंथ फार सोप्या भाषेंत असून वायका–मुलांनाहि समजण्यासारखे आहेत.

**बॉल कॉक**—(गोळा–चावी). हा विशेषतः पाण्याच्या टाकींत लावलेला असतो. याला लागणारा कॉक (चावी) साधाच असतो. फक्त तो कॉक उघडण्यासाठीं व मिटण्यासाठीं त्याला एक लांब दांडा लावून त्यावर एक पोकळ गोळा बसवलेला असतो. टाकींतील पाणी अगर इतर द्रव पदार्थ कांहीं एका विवक्षित पातळींत राहण्यासाठीं याचा उपयोग करतात. जेव्हां पाणी ठरलेल्या पातळीच्याखालीं जातें तेव्हां तो कॉक उघडा राहून पाणी त्या टाकींत येत असतें. पाण्यानें टाकी भरूं लागली असतां हळूहळू या पोकळ गोळ्याला लागत असतें. गोळा पोकळ असल्यामुळें हलका असतो व पाण्यावर तरंगत असतो. पाणी जसजसें वाढत जातें तसतसा हा गोळा वर उचलला जातो व कॉक हळूहळू बंद होत जातो. शेवटीं पाणी पुरेसें टाकींत आल्यावर हा पूर्ण बंद

होतो. पाणी ठराविक पातळीखालीं गेलें म्हणजे पुनः हा आपोआप उघडतो. या कामासाठीं बॉलचा किंवा गोळयाचा उपयोग केला असल्यामुळें याला बॉलकॉक असें म्हणतात.

**याल, लोकनाथ**—एक हिंदी क्रांतिकारक. बंगालमध्यें १९३० सालीं दहशतवादी क्रांतिकारकांनीं 'हिंदी प्रजासत्ताक सेने'ची स्थापना केली व चितगांव येथील शस्त्रागारावर हल्ला केला. या कटांतच लोकनाथ बाल हे सामील होते. ते प्रथम आपले सहकारी सूर्यसेन, अनंतसिंह, गणेश घोष यांच्याप्रमाणेच फरारी झाले. त्यांस पकडून देणाऱ्यास सरकारनें पांच हजारांचें बक्षीस लावलें होतें. अखेरीस १ नोव्हेंबर १९३० रोजीं त्यांस पकडण्यांत आलें व चितगांव शस्त्रागार खटल्यांत त्यांस जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा फर्मावण्यांत आली. त्या वेळीं त्याचें वय २४ वर्षांचें होतें.

**बालगुन्हेगार**—७ ते १६ वर्षें वयाच्या गुन्हेगारांना बालगुन्हेगार म्हणतात. १९०८ च्या 'चिल्ड्रेन ॲक्ट' या कायद्यानें असें ठरवलें कीं, सामान्यतः अशा गुन्हेगारांना जामीन घेऊन सोडून द्यावें आणि कैदेची शिक्षा दिली तर त्यांना प्रौढ गुन्हेगारांपासून अलग-निराळें ठेवण्यांत यावें. अशा बालगुन्हेगारांच्या चौकशीच्या वेळीं त्यांच्या पालकांना कोर्टांत हजर राहण्याचा हुकूम कोर्टांनीं करावा, आणि पालकानें दुर्लक्ष केल्यामुळें गुन्हा घडला, असें शाबीत झाल्यास पालकाला दंड करावा. सामान्य कोर्टाखेरीज जुव्हेनाइल कोर्टें इंग्लंडांत निराळीं स्वतंत्र असून तेथें चौकशीच्या वेळीं न्यायाधीशाच्या परवानगीवांचून कोणाला हजर राहतां येत नाहीं. अशा बालगुन्हेगारांना कैदेची शिक्षा झाल्यास त्यांना ठेवण्याचीं बालगुन्हेगार गृहें (रेफर्मेटरी) निराळीं असतात. बालगुन्हेगारांना इतर शिक्षा म्हणजे दंड, फांशी, वगैरे देत नाहींत.

इंग्लंडांत 'इंडस्ट्रियल स्कूल्स' आहेत व शिवाय बालवयांत म्हणजे अज्ञानदशेंत गुन्हे करणाऱ्या मुलांकरितां 'रेफर्मेटरी स्कूल्स' आहेत. जर गुन्हा करणारा मुलगा १२ ते १६ वर्षें वयाचा असेल तर त्याला या शाळेंत ठेवण्यांत येतें. तेथें त्याला दोन ते पांच वर्षेंपर्यंत ठेवून उपयुक्त धंदेशिक्षण देण्यांत येते. १९ वर्षें वय झाल्यानंतर अशा शाळेंत कोणालाहि ठेवीत नाहींत. आपल्याकडेहि अशा शाळा काढलेल्या आहेत. (औद्योगिक शाळा पाहा).

**बालगृहें**—(क्रेश). आईबाप नोकरीच्या कामांत असलीं म्हणजे त्यांस मुलांकडे लक्ष देण्यास वेळ मिळत नाहीं. अशा वेळीं बालकें व लहान मुलें ज्यांस शाळेंत पाठवितां येत नाहीं अशा मुलांची काळजी घेण्याकरितां जीं घरें केलेलीं असतात त्यास 'क्रेश' बालगृहें असें म्हणतात. युरोपांत फ्रान्समध्यें १८४४ सालीं असें एक गृह निघालें व त्याचा परिणाम मुलांच्या आरोग्यावर होऊन बालमृत्यूची संख्या घटली. तेव्हां इतर राष्ट्रांतून अशींच बाल-संगोपनगृहें स्थापण्यांत आलीं. आतां हिंदुस्थानांतहि अशा तऱ्हेचीं बालगृहें मोठमोठ्या गिरण्याकारखान्यांस जोडलेलीं असतात व त्यांचा सर्व खर्च कारखानदार चालवितात. इतर देशांत अशीं बालगृहें सार्वजनिक असतात. आई कामावर जातांना सकाळींच आपल्या मुलास अशा घरांत ठेवून प्रत्येक मुलामागें दोन किंवा तीन पेन्स देते. मुलास खाण्यास द्यावयाचे पदार्थहि बहुतेक आईच पुरविते. जर मूल आईच्या अंगावर पीत असेल तर आईला त्या ठराविक वेळीं तेथें बोलाविण्यांत येतें. बालगृहांतील नोकरवर्ग मुलांची सर्व काळजी घेतो. त्यांस न्हाऊं घालणें, खावयास देणें, वगैरे सर्व कामें वेळच्या वेळीं करण्यांत येतात. तसेंच त्यांस उघड्या हवेंत शक्य तितका वेळ खेळूं देऊन त्यांस व्यवस्थित राहण्याचेंहि शिक्षण देण्यांत येतें. सायंकाळीं पांच वाजतां आई येऊन आपल्या मुलास घेऊन जाते. अशा तऱ्हेचीं बालगृहें आतां मोठमोठ्या शहरांतून पुष्कळ ठिकाणीं निघूं लागलीं आहेत.

**बाल्झॅक, होनोरे द** (१७९९-१८५०)—एक फ्रेंच कादंबरीकार. वयाच्या २४ व्या वर्षापूर्वींच त्यानें अनेक कादंबऱ्या, अनेक टोपणनांवें धारण करून प्रसिद्ध केल्या; पण त्या फारशा लोकप्रिय झाल्या नाहींत. पुढें १८२९ सालीं त्यानें स्वतःच्या नांवानें 'ल दर्निए चुआन' (हल्लींचें नांव 'ले चुआन') ही कादंबरी प्रसिद्ध केली आहे. तेव्हां कोठें या असामान्य बुद्धिमान् लेखकाकडे लोकांचें लक्ष वेधलें. त्यानंतर एकाहून दुसरी अधिक सरस अशा त्याच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. त्याची 'युजेनी ग्रान्देत' ही कादंबरी जगांतील उत्कृष्ट कादंबऱ्यांत पडते असें कांहीं विद्वान् मानतात. या कादंबऱ्यांत शेक्स्पियरप्रमाणेंच त्यानें मनुष्यस्वभावावर झणझणीत व उद्बोधक विचार प्रकट केले आहेत. त्याचें मनुष्यस्वभावविषयक अप्रतिम ज्ञान व भिन्न भिन्न स्वभावांचीं पात्रें रेखाटण्याचें अप्रतिम कौशल्य त्याच्या सर्व कादंबऱ्यांत दिसून येतें. पण त्याच्या गोष्टींतून अत्यंत अनीतिमान् व बदफैली पात्रें रंगविलीं आहेत व त्यामुळेंच त्याचें वाङ्मय तरुण आवडीनें वाचतात. मरणापूर्वीं कांहीं महिनेच त्यानें एका पोलिश सरदारणीशीं लग्न केलें होतें.

**बाल मजुरांचा कायदा**—उद्योगधंद्यांत लहान मुलांना नोकरीवर ठेवावें किंवा नाहीं याबद्दल १९ व्या शतकापर्यंत काळजीपूर्वक विचार केला गेला नव्हता. इंग्लंडमध्यें १८०२ सालीं पहिला फॅक्टरी ॲक्ट मंजूर होऊन कापसाच्या व इतर

हिंदुस्थानांत सुमारें दोन कोटींच्या जवळपास हिचें पीक होतें. ‘पर्ल बार्ली’ (मोती जव) दिसावयास मोत्यासारखी असते. याच्या परागाला ‘पेटंट बार्ली’ म्हणतात.

गेल्या महायुद्धानंतर अन्नाचा तुटवडा जेव्हां झाला तेव्हां खाण्याच्या नेहमींच्या धान्यांत बार्लीचा समावेश केला गेला. गहूं खाणाऱ्या लोकांना गव्हाबरोबर बार्ली किंवा बार्लीचें पीठ घ्यावें लागतें. हिंदुस्थानांत उत्तर प्रदेश व बिहार या प्रांतांत हें रबीचें पीक येतें. गेल्या दोन-तीन वर्षांपासून सु. पंचवीस लाख टन बार्ली निघते. जव पाहा.

**बार्लो, सर जॉर्ज** (१७६२–१८४७)—एक अँग्लो-इंडियन मुत्सद्दी व हिंदुस्थानचा एक गव्हर्नर जनरल. १८०५ सालीं लॉर्ड कॉर्नवालिस गाजीपूर येथें मृत्यु पावल्यामुळें, बार्लो यास त्याच्या जागीं गव्हर्नर जनरल नेमण्यांत आलें. ह्यानें येथील संस्थानिकांच्या भांडणांत न पडण्याचें धोरण सुरू करून चालू असलेलीं युद्धें एकदम बंद केलीं व तह केले. ह्याच्या वेळीं झालेली विशेष गोष्ट म्हणजे वेलोर येथील शिपायांचा दंगा होय (१० जुलै १८०६). कर्नल गिलेस्पीनें हा दंगा मोडून टिपूच्या कुटुंबांतील मंडळीस कलकत्त्यास पाठविलें. या वेलोरच्या बंडामुळें ‘होम गव्हर्नमेंट’नें बार्लो यास गव्हर्नर जनरलच्या जागेवरून कमी करून, त्याच्या जागीं ‘बोर्ड ऑफ कंट्रोल’ सभेचा अध्यक्ष लॉर्ड मिंटो याची नेमणूक केली. पुढें कांहीं दिवस हा मद्रासचा गव्हर्नर होता. १८१२ सालीं त्याचा कारभार पसंत न पडल्यामुळें त्यास विलायतेस परत बोलविण्यांत आलें.

**बार्शी**—मुंबई इलाखा, सोलापूर जिल्ह्यांतील एक तालुका. याच्या चोहों बाजूंस निजामाचा मुलूख असून याचें क्षे. फ. ५९७ चौ. मैल आहे. यांत दोन शहरें असून २२१ खेडीं आहेत. १९४१ सालीं लो. सं. १,५६,४०४. या तालुक्यांत लहान नद्या पुष्कळ असून जंगलेंहि बरींच आहेत. पाऊस नियमित व पुष्कळ पडतो. बार्शी शहर हें व्यापाराचें मोठें ठिकाण आहे. अंबरीष राजानें द्वादशीचें पारणें येथें फेडलें म्हणून ‘द्वादशी’ क्षेत्र नांव पडलें व त्याचा अपभ्रंश बार्शी झाला असें सांगतात. कापूस, जवस, ज्वारी हीं पिकें होतात. येथें भगवानाचें प्राचीन देऊळ आहे. लो. सं. सुमारें चाळीस हजार आहे. सुताच्या, कापडाच्या व शेंगदाण्याच्या गिरण्या येथें आहेत.

**बार्हस्पत्य संवत्सर**—बार्हस्पत्य संवत्सरें दोन प्रकारचीं आहेत. एक महाकार्तिकादि बारा वर्षांचें व दुसरें प्रभवादि साठ वर्षांचें चक्र आहे. यांतील दुसऱ्या चक्रास आपण व्यवहारांत नुसतें संवत्सर असेंच म्हणतों. पहिलें चक्र अजमासें बारा वर्षांत गुरूचें बारा राशींतून जें परिभ्रमण होतें त्यावर बसविलें असल्यामुळें चांद्रमासाप्रमाणें त्यांतील वर्षांत चैत्र-वैशाखादि नांवें पडलेलीं आहेत. तथापि चांद्रमासांच्या व बार्हस्पत्य संवत्सरांच्या नांवांमध्यें घोटाळा होऊं नये म्हणून बार्हस्पत्य संवत्सरांच्या नांवामागें कधीं कधीं ‘महा’ हा शब्द लाविलेला आढळून येतो. राशींतील भ्रमणांत सूर्याची गति गुरूहून अधिक असल्यामुळें तो बहुधा दरवर्षी गुरूच्या जवळ येऊन पुढें निघून जातो. सूर्य गुरूच्या जवळ आला कीं गुरूचा अस्त होतो व तो त्याचा पुन्हां २५ पासून ३१ दिवसांनीं उदय होईपर्यंत तसाच राहतो. हा उदय ज्या वर्षी कृत्तिका किंवा रोहिणी नक्षत्रीं होतो त्यास कार्तिक किंवा महाकार्तिक म्हणतात व याप्रमाणेंच इतर महिने होतात. बारा वर्षांत गुरूचे अस्तोदय फक्त ११ च होत असल्यामुळें तेवढ्या अवधींत एका बार्हस्पत्य संवत्सराचा क्षय होतो. खिस्तपूर्व सातव्या शतकापूर्वींच्या शिलालेखांत व दानपत्रांत बार्हस्पत्य संवत्सर दिलेलें पाहावयास मिळतें.

**बॉल, सर रॉबर्ट स्टावेल** (१८४०–१९१३)—एक आयरिश ज्योतिषशास्त्रज्ञ. त्यानें अनेक सरकारी हुद्यांवर कामें केलीं. व १८७४ सालीं त्याला आयर्लंडचा ‘राजज्योतिषी’ नेमण्यांत आलें. १८९२ सालीं केंब्रिज युनिव्हर्सिटींत ज्योतिष व भूमिति या शास्त्रांचा प्राध्यापक आणि वेधशाळेचा संचालक म्हणून त्याला नेमण्यांत आलें. त्यानें जे ग्रंथ लिहिले त्यांतील मुख्य ग्रंथ (१) ‘दि स्टोरी ऑफ दि हेवन्स’ (आकाशांतील कथा), (२) ‘स्टार लँड’ (तारांगण), (३) ‘इन् स्टारी रेल्म्स’ (तारांच्या राज्यांत), (४) ‘टाइम अँड टाइड’ (काळ आणि भरती), आणि (५) ‘दि स्टोरी ऑफ दि सन’ (सूर्याची कथा) हे होत. त्याचे हे शास्त्रीय ग्रंथ फार सोप्या भाषेंत असून बायका–मुलांनाहि समजण्यासारखे आहेत.

**बॉल कॉक**—(गोळा–चावी). हा विशेषतः पाण्याच्या टांकींत लावलेला असतो. याला लागणारा कॉक (चावी) साधाच असतो. फक्त तो कॉक उघडण्यासाठीं व मिटण्यासाठीं त्याला एक लांब दांडा लावून त्यावर एक पोकळ गोळा बसवलेला असतो. टांकींतील पाणी अगर इतर द्रव पदार्थ कांहीं एका विवक्षित पातळींत राहण्यासाठीं याचा उपयोग करतात. जेव्हां पाणी ठरलेल्या पातळीच्याखालीं जातें तेव्हां तो कॉक उघडा राहून पाणी त्या टांकींत येत असतें. पाण्यानें टांकी भरूं लागली असतां हळूहळू या पोकळ गोळ्याला लागत असतें. गोळा पोकळ असल्यामुळें हलका असतो व पाण्यावर तरंगत असतो. पाणी जसजसें वाढत जातें तसतसा हा गोळा वर उचलला जातो व कॉक हळूहळू बंद होत जातो. शेवटीं पाणी पुरेसें टांकींत आल्यावर हा पूर्ण बंद

होतो. पाणी ठराविक पातळीखालीं गेलें म्हणजे पुनः हा आपोआप उघडतो. या कामासाठीं बॉलचा किंवा गोळ्याचा उपयोग केला असल्यामुळें याला बॉलकॉक असें म्हणतात.

**बाल, लोकनाथ**—एक हिंदी क्रांतिकारक. बंगालमध्यें १९३० सालीं दहशतवादी क्रांतिकारकांनीं 'हिंदी प्रजासत्ताक सेने'ची स्थापना केली व चितगांव येथील शस्त्रागारावर हल्ला केला. या कटांतच लोकनाथ बाल हे सामील होते. ते प्रथम आपले सहकारी सूर्यसेन, अनंतसिंह, गणेश घोष यांच्याप्रमाणेंच फरारी झाले. त्यांस पकडून देणाऱ्यास सरकारनें पांच हजारांचें बक्षीस लावलें होतें. अखेरीस १ नोव्हेंबर १९३० रोजीं त्यांस पकडण्यांत आलें व चितगांव शस्त्रागार खटल्यांत त्यांस जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा फर्मावण्यांत आली. त्या वेळीं त्याचें वय २४ वर्षांचें होतें.

**बालगुन्हेगार**—७ ते १६ वर्षें वयाच्या गुन्हेगारांना बालगुन्हेगार म्हणतात. १९०८ च्या 'चिल्ड्रेन ॲक्ट' या कायद्यानें असें ठरवलें कीं, सामान्यतः अशा गुन्हेगारांना जामीन घेऊन सोडून द्यावें आणि कैदेची शिक्षा दिली तर त्यांना प्रौढ गुन्हेगारांपासून अलग-निराळें ठेवण्यांत यावें. अशा बालगुन्हेगारांच्या चौकशीच्या वेळीं त्यांच्या पालकांना कोर्टांत हजर राहण्याचा हुकूम कोर्टानीं करावा, आणि पालकानें दुर्लक्ष केल्यामुळें गुन्हा घडला, असें शाबीत झाल्यास पालकाला दंड करावा. सामान्य कोर्टाखेरीज जुव्हेनाइल कोर्टें इंग्लंडांत निराळीं स्वतंत्र असून तेथें चौकशीच्या वेळीं न्यायाधीशाच्या परवानगीवांचून कोणाला हजर राहतां येत नाहीं. अशा बालगुन्हेगारांना कैदेची शिक्षा झाल्यास त्यांना ठेवण्याचीं बालगुन्हेगार गृहें (रेफर्मेटरी) निराळीं असतात. बालगुन्हेगारांना इतर शिक्षा म्हणजे दंड, फांशी, वगैरे देत नाहींत.

इंग्लंडांत 'इंडस्ट्रियल स्कूल्स' आहेत व शिवाय बालवयांत म्हणजे अज्ञानदशेंत गुन्हे करणाऱ्या मुलांकरितां 'रेफर्मेटरी स्कूल्स' आहेत. जर गुन्हा करणारा मुलगा १२ ते १६ वर्षें वयाचा असेल तर त्याला या शाळेंत ठेवण्यांत येतें. तेथें त्याला दोन ते पांच वर्षेंपर्यंत ठेवून उपयुक्त धंदेशिक्षण देण्यांत येतें. १९ वर्षें वय झाल्यानंतर अशा शाळेंत कोणालाहि ठेवीत नाहींत. आपल्याकडेहि अशा शाळा काढलेल्या आहेत. (औद्योगिक शाळा पाहा).

**बालगृहें**—(क्रेश). आईबाप नोकरीच्या कामांत असलीं म्हणजे त्यांस मुलांकडे लक्ष देण्यास वेळ मिळत नाहीं. अशा वेळीं बालकें व लहान मुलें ज्यांस शाळेंत पाठवितां येत नाहीं अशा मुलांची काळजी घेण्याकरितां जीं घरें केलेलीं असतात त्यास 'क्रेश' बालगृहें असें म्हणतात. युरोपांत फ्रान्समध्यें १८४४ सालीं असें एक गृह निघालें व त्याचा परिणाम मुलांच्या आरोग्यावर होऊन बालमृत्यूची संख्या घटली. तेव्हां इतर राष्ट्रांतून अशींच बाल-संगोपनगृहें स्थापण्यांत आलीं. आतां हिंदुस्थानांतहि अशा तऱ्हेचीं बालगृहें मोठमोठ्या गिरण्याकारखान्यांस जोडलेलीं असतात व त्यांचा सर्व खर्च कारखानदार चालवितात. इतर देशांत अशीं बालगृहें सार्वजनिक असतात. आई कामावर जातांना सकाळींच आपल्या मुलास अशा घरांत ठेवून प्रत्येक मुलामागें दोन किंवा तीन पेन्स देते. मुलास खाण्यास द्यावयाचे पदार्थहि बहुतेक आईच पुरविते. जर मूल आईच्या अंगावर पीत असेल तर आईला त्या ठराविक वेळीं तेथें बोलाविण्यांत येतें. बालगृहांतील नोकरवर्ग मुलांची सर्व काळजी घेतो. त्यांस न्हाऊं घालणें, खावयास देणें, वगैरे सर्व कामें वेळच्या वेळीं करण्यांत येतात. तसेंच त्यांस उघड्या हवेंत शक्य तितका वेळ खेळूं देऊन त्यांस व्यवस्थित राहण्याचेंहि शिक्षण देण्यांत येतें. सायंकाळीं पांच वाजतां आई येऊन आपल्या मुलास घेऊन जाते. अशा तऱ्हेचीं बालगृहें आतां मोठमोठ्या शहरांतून पुष्कळ ठिकाणीं निघूं लागलीं आहेत.

**बाल्झॅक, होनोरे द** (१७९९-१८५०)—एक फ्रेंच कादंबरीकार. वयाच्या २४ व्या वर्षापूर्वीच त्यानें अनेक कादंबऱ्या, अनेक टोपणनांवें धारण करून प्रसिद्ध केल्या; पण त्या फारशा लोकप्रिय झाल्या नाहींत. पुढें १८२९ सालीं त्याने स्वतःच्या नांवानें 'ल दर्निए चुआन' (हल्लींचें नांव 'ले चुआन') ही कादंबरी प्रसिद्ध केली आहे. तेव्हां कोठें या असामान्य बुद्धिमान् लेखकाकडे लोकांचें लक्ष वेधलें. त्यानंतर एकाहून दुसरी अधिक सरस अशा त्याच्या कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या. त्याची 'युजेनी ग्रान्देत' ही कादंबरी जगांतील उत्कृष्ट कादंबऱ्यांत पडते असें कांहीं विद्वान् मानतात. या कादंबऱ्यांत शेक्स्पियरप्रमाणेंच त्यानें मनुष्यस्वभावावर झणझणीत व उद्बोधक विचार प्रकट केले आहेत. त्याचें मनुष्यस्वभावविषयक अप्रतिम ज्ञान व भिन्न भिन्न स्वभावांचीं पात्रें रेखाटण्याचें अप्रतिम कौशल्य त्याच्या सर्व कादंबऱ्यांत दिसून येतें. पण त्याच्या गोष्टींतून अत्यंत अनीतिमान् व बदफैली पात्रें रंगविलीं आहेत व त्यामुळेंच त्याचें वाङ्मय तरुण आवडीनें वाचतात. मरणापूर्वी काहीं महिनेच त्यानें एका पोलिश सरदारणीशीं लग्न केलें होतें.

**बाल मजुरांचा कायदा**—उद्योगधंद्यांत लहान मुलांना नोकरीवर ठेवावें किंवा नाहीं याबद्दल १९ व्या शतकापर्यंत काळजीपूर्वक विचार केला गेला नव्हता. इंग्लंडमध्यें १८०२ सालीं पहिला फॅक्टरी ॲक्ट मंजूर होऊन कापसाच्या व इतर

गिरण्या आणि कारखाने यांतील कामशिकाऊ मुलांना संरक्षण देण्यांत आलें. १८४० मध्यें 'चिमनी स्वीपर्स', 'चिमनीज् रेग्युलेशन ॲक्ट' या कायद्यानें २१ वर्षांच्या आंतील मुलांना धुराडीं झाडण्याचें काम सांगणें बेकायदेशीर ठरविण्यांत आलें. १९०१ ते १९२१ पर्यंत 'फॅक्टरी अँड वर्कशॉप्स ॲक्ट्स' या प्रकारचे निरनिराळे कायदे मंजूर होऊन त्यांत फॅक्टरी आणि वर्कशॉप्स या प्रकारच्या कारखान्यांत बालमजुरांना कामावर ठेवण्याबद्दलचे मुख्य नियम करण्यांत आले ते असे—(१) बारा ते चौदा वर्षें वयाच्या मुलांना निम्मा वेळ काम सांगावें व निम्मा वेळ शाळेंत पाठवावें. (२) १३ वर्षांच्या पुढील मुलांना विशेष शिक्षण झालें असल्यास भरपूर तास काम देण्याची मोकळीक देण्यांत आली. (३) मुलांना रात्रीं कामावर लावणें बेकायदे ठरविण्यांत आलें. (४) दिवसा त्यांच्या कामाचे दररोज १० तास, अर्ध्या दिवसाच्या कामाचे ४॥ तास असें प्रमाण ठरविण्यांत आलें. १९११ सालच्या 'कोल माइन्स ॲक्ट'नें १४ वर्षांच्या आंतील मुलांना, आणि कोणाहि स्त्रीला किंवा मुलीला जमिनीखालील खाणींत कामावर ठेवण्याची मनाई करण्यांत आली. १९२१ च्या 'एज्युकेशन ॲक्ट' या कायद्यान्वयें पुढील नियम केले आहेत—१. चौदा वर्षांच्या आंतील मुलांना कामावर ठेवण्याच्या बाबतींत, आणि सोळा वर्षांच्या आंतील मुलांना फेरीवाल्यांचा धंदा देण्याच्या बाबतींत नियम करण्याचा अधिकार स्थानिक शिक्षणाधिकाऱ्यांना देण्यांत आला. २. चौदा वर्षांच्या आंतील मुलाला, आणि सोळा वर्षांच्या आंतील मुलीला मादक पदार्थांच्या विक्रीच्या दुकानाच्या इमारतींत किंवा नजीक सडकेवर रात्रीं ९ ते सकाळीं ६ वाजेपर्यंत गाणीं म्हणणें, किंवा खेळ करणें, वगैरे गोष्टी दुकानाला फायदा व्हावा म्हणून करण्यास सांगणें, किंवा तसले पदार्थ विकण्याचें काम सांगणें हा गुन्हा आहे असें ठरविण्यांत आलें. ३. चौदा वर्षांच्या आंतील मुलांना वरील बाबतींत अजीबात मनाई करण्यांत आली. लीग ऑफ नेशन्सच्या इंटर नॅशनल लेबर ऑर्गेनायझेशननें १९१९ सालीं वॉशिंग्टन येथें आणि १९२० सालीं जिनेव्हा येथें भरलेल्या परिषदेंत बालमजुरांना संरक्षण देण्याच्या बाबतींत पुष्कळ विचारविनिमय केला. १९२० सालीं ग्रेट-ब्रिटनमध्यें वीमेन, यंग पर्सन्स, अँड चिल्ड्रेन (एम्प्लॉयमेंट) ॲक्ट मंजूर होऊन चौदा वर्षांच्या आंतील कोणाहि मुलाला किंवा मुलीला कोणत्याहि उद्योगधंद्यांत कामावर लावणें बेकायदेशीर आहे, असें ठरविण्यांत आलें. समुद्रावरील नोकरीलाहि हेच नियम लागू करण्यांत आले.

हिंदुस्थान—हिंदुस्थान देशांत सुमारें ६५ टक्के लोक खेडेगांवात राहून शेतीवर उपजीविका करणारे आहेत. परंतु केवळ शेतीच्या उत्पन्नावर कुटुंबाचा वर्षभर निर्वाह होत नाहीं, व शेतीचें कामहि वर्षभर करावें लागत नाहीं, म्हणून बरेच शेतकरी लोक वर्षांतील कांहीं महिने मुंबई, पुणें, वगैरे मोठाल्या शहरांत उद्योगधंद्याकरितां जातात. १९ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत शहरांत गिरण्या व इतर ठिकाणीं काम करणाऱ्या मजुरांबद्दल सरकारी नियंत्रण कांहींच नव्हतें. त्यामुळें मुंबई शहरांतील कापडाच्या गिरण्यांत आणि बंगालमधील तागाच्या गिरण्यांत विजेच्या दिव्यांची सोय झाल्यावर मजुरांना दररोज १५ ते २० तास कामावर लावण्यांत येऊं लागलें. याप्रमाणें कामाचे फाजील तास, मध्यंतरीं सुट्टीचाहि अभाव, फारच कमी पगार, बाल-मजुरांबद्दल वयोमर्यादेचा अभाव, आणि गिरणींत काम करीत असतांना झालेली इजा किंवा अपघात याबद्दल नुकसानभरपाई न मिळणें, वगैरे अनेक प्रकारच्या तक्रारी सरकारपुढें मांडण्याचें काम प्रथमतः श्री. सोराबजी शापूरजी बंगाली व त्याचे कांहीं मदतगार पुढारी यांनीं सुरू केलें. त्यामुळें १८८१ सालीं 'पहिला इंडियन फॅक्टरीज ॲक्ट' मान्य झाला. त्या कायद्यानें पुढील नियम केले: १. सात वर्षांच्या आंतील मुलांना मजूर ठेवण्याची मनाई; २. त्या वयाच्यावरील मुलांना कामाचे तास दररोज नऊ; ३. दरमहा चार दिवस सुट्टी; ४. दररोज मधल्या वेळची सुट्टी. याप्रमाणें सदर कायद्यानें फक्त मुलांच्या बाबतींत निर्बंध घातले, पण वयांत आलेल्या मजुरांबद्दल कांहींच तजवीज केली नाहीं. म्हणून यानंतर मजुरांतर्फे सार्वजनिक चळवळ व तक्रारी करण्याचें काम मजुरांच्या अनेक संस्थांमार्फत चालू आहे. त्यामुळें हिंदुस्थान सरकारनें वेळोवेळीं चौकशी-कमिशन नेमून मजुरांबाबत कायदे केले. १८९१ सालच्या कायद्यानें, नऊ वर्षांच्या आंतील मुलांना मजूर म्हणून ठेवण्याची पूर्ण मनाई, व नऊ ते चौदा वर्षें वयाच्या मुलांना दररोज फक्त सात तास काम, हे निर्बंध घालण्यांत आले. १९११ सालीं व त्यानंतर १९१४ सालीं इंडियन फॅक्टरीज ॲक्टमध्यें ज्या पुष्कळ महत्त्वाच्या सुधारणा करण्यांत आल्या त्यायोगें मुलांच्या कामाचे तास दररोज फक्त सहा ठरविण्यांत आले. पहिलें महायुद्ध संपल्यानंतर मजुरांतर्फेच्या चळवळी पुन्हां फार जोरानें सुरू झाल्या आणि १९२२ सालीं फॅक्टरीज ॲक्टमध्यें बऱ्याच दुरुस्त्या करण्यांत आल्या. त्यांत बालमजुरांबद्दल नियम झाले ते: १. बारा वर्षें वयाच्या आंतील मुलांना कामावर ठेवण्याची पूर्ण मनाई; २. बारा ते पंधरा वर्षें वयाच्या मुलांना दररोज कामाचे तास फक्त सहा, आणि चार तास काम झाल्यावर अर्धा तास सुट्टी; ३. एकाच मुलाला दोन गिरण्यांत कामावर ठेवण्यास मनाई, हे होत. शिवाय १९२३ सालीं वर्कमेन्स कॉम्पेन्सेशन ॲक्ट आणि इंडियन

माइन्स ॲक्ट हे दोन मजूरविषयक कायदे मंजूर होऊन त्यांत बालमजुरांच्याहि हिताचे नियम करण्यात आले.

**बालमृत्यु**—या शब्दाचा अगदीं बरोबर अर्थ एक वर्षाच्या आंतील वयाच्या बालकांची मृत्युसंख्या असा आहे. १९०५ पर्यंत अशा बालकांची मृत्युसंख्या कमी करण्याचे विशेष प्रयत्न युरोपांतहि मुळींच झाले नव्हते. त्यामुळें इंग्लंडांत ७ पैकीं १ बालकाचा मृत्यु असें सरासरी प्रमाण बालमृत्यूचें होतें. अलीकडे अशा बालकांची परिस्थिति सुधारण्याकरितां पाश्चात्य देशांत स्वतंत्र आरोग्याधिकारी (सॅनिटरी ऑफिसर्स) प्रत्येक शहरांत आणि प्रत्येक परगण्यांत नेमण्यांत येतात आणि अशा बालकांचें आरोग्य सुधारणें हें त्यांचें काम असतें. शिवाय या कामाकरितां खासगी संस्थाहि पुष्कळ निघाल्या आहेत. उदा., 'मदर्स क्लब', 'बेबीज वेल्कम्स', 'इन्फंट-वेल्फेअर सेंटर्स', 'डे नर्सरीज अँड क्लिनिक्स', इ..

हिंदुस्थानांत बालमृत्यूचें प्रमाण इंग्लंडपेक्षां बरेंच अधिक होतें. तथापि अलीकडे या बाबतींतलें प्रमाण कमी होत आहे. मुंबई शहरांत बालमृत्यूचें प्रमाण इतर शहरांपेक्षां सर्वांत अधिक म्हणजे १९३५ सालीं एक हजारांत २४८ आणि १९४१ सालीं २११·४ इतकें होतें, आणि कराचींत सदर सालीं अनुक्रमें १५१ व १२७·८ होतें. मुंबई शहरांत बालमृत्यूचें प्रमाण ४ : १ पडतें; पण याचीं कारणें अनेक आहेत. येथील लोकांत बालवयांत विवाह होतात. पतिपत्नी पूर्ण शारीरिक वाढ होण्यापूर्वी एकत्र राहूं लागतात, व मुलें जन्माला येतात. शिवाय प्रसूतीची खाजगी कुटुंबांत व्यवस्था आरोग्यदृष्ट्या चांगली नसते व सुईणी सुशिक्षित नसतात. यामुळें बालकाची व त्याच्या आईची प्रकृति पहिल्या वर्षांतच फार ढांसळते. अशा बालकांना फीट, हगवण, आंत्रज्वर, वगैरे रोग होऊन बालकें लवकर मृत्युमुखीं पडतात. अलीकडे मोठाल्या शहरांत डॉक्टरांच्या देखरेखीखालीं सरकारी आणि बिनसरकारी प्रसूतिगृहें बरींच निघालीं आहेत. त्यामुळें शहरांतील बालमृत्यूची संख्या कमी होत आहे.

अगदीं अलीकडचे आंकडे पाहतां चिली देशांत एका वर्षाखालील एक हजार मुलांत १९४ व रुमानियांत १८३ मुलें मरतात. तर त्याच्याखालोखाल ईजिप्तमध्यें १६८ व ऑस्ट्रेलियांत ३६. स्वीडनमध्यें २९ हें प्रमाण जगांत अगदीं कमी मृत्यूचें आहे. अमेरिकेंत ४० तर ग्रेट-ब्रिटनमध्यें ५२ आहे. पण हिंदुस्थानांत हजारांत १६३ मरतात.

**बालवाङ्मय**—पाश्चात्य देशांत बालवाङ्मय पुष्कळच आहे व बालांना स्वतंत्र वाङ्मय लागतें हें आपण तिकडूनच शिकलों. बंगाली आणि हिंदी भाषेंत बालवाङ्मय समृद्ध आहे. आपल्या मराठींत कसें आहे याचा आढावा 'अर्वाचीन मराठी साहित्यां'त जो घेतलेला आहे तो पुढीलप्रमाणें आहे.

सर्व मराठी वाङ्मयच अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. तेव्हां त्याची एक लहानशी शाखा जें बालवाङ्मय त्याचें शैशव अजून संपलेलें नसावें, हें साहजिकच आहे. मराठी वाङ्मय उत्कृष्ट होण्यास निर्मात्यांच्या अंगीं जी तयारी व कुशलता अवश्य आहे तीच तयारी व कुशलता बालवाङ्मय निर्माण करूं इच्छिणारांना आवश्यक आहे. सामान्यतः आपण बालवाङ्मय शिक्षणापासून फारसें दूर नेऊं शकत नाहीं, आणि तें फारसें चूकहि नाहीं. शिक्षणाप्रमाणेंच वाङ्मयाचाहि उद्देश मुलांच्या मनोवृत्तीला इष्ट वळण लावणें आणि त्यांच्या ठिकाणीं असलेल्या सुप्त गुण-बीजांचा विकास करणें हा असला पाहिजे. परंतु शिक्षणांत जो शिस्तीचा थोडाफार रुक्षपणा आहे, तो या वाङ्मयांत असतां कामा नये. वाङ्मय हें स्वतंत्र, आनंददायी व आकर्षक असलें पाहिजे. अलीकडे पुष्कळ शिक्षकच बाल-वाङ्मयनिर्मितीला सक्रिय हातभार लावीत असलेले दिसतात. एका प्रख्यात लेखकानें एकंदर मराठी वाङ्मयावरच पंतोजीपणाची छाप पडलेली असल्याचें एके ठिकाणीं म्हटलें आहे. बालवाङ्मयावर तर ती फारच काळीकुट्ट पडली आहे. शिक्षणशास्त्र व बालमानसशास्त्र यांची उत्कृष्ट बालवाङ्मयनिर्मितीला अत्यंत जरूरी आहे. परंतु बालवाङ्मयाचें स्वरूप शालोपयोगी नसावें; त्यांत वाङ्मय-गुणांचा पूर्ण आविष्कार व्हावा व तें सुंदर असावें. अलीकडे शिक्षणतज्ज्ञ व विख्यात वाङ्मयसेवक बालवाङ्मयाकडे विशेष आस्थेनें पाहूं लागले आहेत. तेव्हां बालवाङ्मय उत्तरोत्तर निर्दोष, सर्वांगसुंदर व प्रतिभाशाली होत जाईल अशी आशा वाटते.

'बालबोधा'चा जन्म म्हणजे महाराष्ट्र बालवाङ्मयाचा आरंभ होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. विनायक कोंडदेव ओक ह्यांना 'बालवाङ्मयाचे जनक' ही पदवी देणें युक्त होईल. ओकांनीं लहान-मोठीं ५० पुस्तकें लिहिलीं व तीं बालवाङ्मयांतच जमा होतात. ओकांची भाषा साधी, सरळ व अनलंकृत असे. तरी पण 'बालबोध' मासिकांत विविधता व वैचित्र्य यांचा अभाव असे ही गोष्ट खोटी नाहीं. वा. गो. आपटे यांनीं १९०६ च्या ऑगस्ट महिन्यांत 'आनंद'चा पहिला अंक काढला. 'बालबोधा'नंतर 'आनंद' ही बालवाङ्मयांतली मोठीच प्रगति होती. जगांतली मनोरंजक माहिती, कोडीं, गमतीचीं चित्रें, लहान मुलांसाठीं ठळक टाइपांतल्या गोष्टी, इत्यादि नवे नवे प्रकार 'आनंदां'त येऊं लागले. 'आनंद'खेरीज बालमासिकांचे थोडेफार प्रयत्न झाले आणि त्यांपैकीं कांहीं नांवारूपालाहि आले आहेत. मध्यंतरीं मुद्रणतज्ज्ञ सहस्रबुद्धे यांनीं 'बालोद्यान' हें बालमासिक काढलें होतें. यांत गोष्टींतून

निरनिराळ्या जनावरांना माणसांचे वेष देऊन त्यांच्या गमती चितारलेल्या असत. पुढें हें धोरण न टिकल्यामुळें मासिकाची लोकप्रियता कमी झाली, व तें बंद पडलें. 'शालापत्रक' हें चित्रशाळेचें मासिक अलीकडेच चांगलें निघूं लागलें आहे. भरपूर चित्रें हें या मासिकाचें वैशिष्ट्य आहे. श्री. दे. ना. टिळक यांचें 'बालबोधमेवा' हें मनोरंजक गोष्टी व माहिती यांनीं युक्त असें एक मासिक असे. मुंबईचें 'खेळगडी' (सं. पालवणकर) आणि नागपूरचें 'मुलांचें मासिक' (सं. बा. रा. मोडक) हीं मासिकें चांगलीं आहेत. 'बालकमंदिर' या नांवाचें एक मासिक प्रो. स. बा. हुदलीकर यांनीं चालविलें होतें.

मराठींत मुलांकरितां वर्तमानपत्रें नव्हतीं. ती उणीव मालवण येथील प्रसिद्ध बालवाङ्मयसेवक रा. पा. ना. मिसाळ यांनीं १९३४ त 'बालसन्मित्र' पाक्षिक सुरू करून भरून काढली. 'संजीवनी', 'प्रावीण्य', 'मनोहर', इत्यादि नियतकालिकांतील बालविभाग जमेस धरले म्हणजे बालनियतकालिकांचा हा आढावा पूर्ण होतो.

बालवाङ्मयांत तर प्राधान्येंकरून कथांचाच भरणा फार मोठा असतो. मराठी बालवाङ्मयाच्या कथाविभागाचा उगम शिळा-प्रेसवर छापल्या गेलेल्या 'वेताळपंचविशी' (१८५२) व सिंहासनबत्तिसी (१८५४) या पुस्तकांत सांपडतो. हीं पुस्तकें सदाशिव काशिनाथ छत्रे यांनीं लिहिलीं. अद्भुताची पखरण ही बालकथेच्या यशाची गुरुकिल्ली होय. अद्भुत व काल्पनिक गोष्टींच्या योगें मुलांचें मन संकुचित न राहतां कल्पनेच्या अंतराळांत तें वावरूं लागतें, असें मॉंटेसरीबाईनीं प्रतिपादिलें आहे.

देशोदेशीं सांगितल्या जाणाऱ्या 'लोककथा' हें एक उत्कृष्ट बालमनोरंजक वाङ्मय आहे. मागें ज्ञानकोश मंडळानें चालविलेल्या 'विद्यासेवक' मासिकांतून निरनिराळ्या देशांतील 'कहाण्या' या सदराखालीं पुष्कळ सरस गोष्टी प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या सर्व संकलित करून 'प्राचीन कहाण्या' नांवानें बालवाङ्मयांत एका सुंदर पुस्तकाची भर टाकली आहे. पौराणिक कथांत अद्भुतता आणि आदर्शवाद यांचा मनोहर संगम झाला असल्यामुळें मुलांच्या पुढें उच्च नैतिक आदर्श ठेवण्यास पौराणिक कथांचा फार उपयोग होतो. स्वभावनिदर्शक सामाजिक गोष्टी मात्र फार अल्प प्रमाणांत निर्माण झाल्या आहेत. स्वभावनिदर्शक सामाजिक गोष्टी लिहावयास सूक्ष्म अवलोकन, बालमानसशास्त्राचें ज्ञान, रचनाचातुर्य, इत्यादि अनेक गुणांची जरूरी असते. कविश्रेष्ठ रवींद्रनाथ टागोरांच्या गोष्टींतून व कवितांतून बालस्वभावाचे बारकावे, त्यांच्या विचारसरणींतील विरोधाभास, त्यांच्या कोंवळ्या कल्पनाशक्तीच्या लीला हीं इतकीं हुबेहुब दाखविलेलीं असतात कीं, गोष्टींतील गोजिरवाणीं बालकें सदेह होऊन आपल्यापुढें वावरत आहेत असा भास होतो. अशा जिवंत आणि प्रतिभापूर्ण गोष्टी मराठींत निर्माणच झालेल्या नाहींत. अलीकडे प्रा. श्री. चा. रानडे, प्रा. ज. नी. कर्वे, वगैरे विज्ञानशास्त्रज्ञ रसिक लेखकांनीं आपली लेखणी बालवाङ्मयाकडे वळविली आहे. रा. ज. शं. मेढेकर यांचें 'शास्त्रीय सुरस गोष्टी' या नांवाचें एक पुस्तक प्रसिद्ध आहे. यापूर्वी श्री. वाडदेकर अशा गोष्टी लिहीत असत. 'शृंगारिक नाटकें व कादंबऱ्या वाचून मुलांचीं मनें बिघडतील' असें जर वाटत असेल तर मुलांची जिज्ञासा पोसेल व जिगीषा वाढेल असें कथावाङ्मय भरपूर निर्माण झालें पाहिजे. परंतु अशा तऱ्हेचें वाङ्मय फारसें निर्माण झालेलें नाहीं. बालमासिकांतून संवाद हवे तेवढे येतात, पण त्यांत संस्मरणीय असे फारच थोडे असतात.

बालवाङ्मयांतील नाट्यविभागांत प्रि. प्र. के. अत्रे यांची कामगिरी विशेष संस्मरणीय आहे. 'गुरुदक्षिणा' आणि 'वीरवचन' या नाटकांत इतर अनेक रसांबरोबर विनोदाचा उत्कृष्ट परिपोष केलेला आहे. ऐतिहासिक कथा व चरित्रें आजवर बहुतेक बालवाङ्मयलेखकांनीं लिहिलीं आहेत. वि. कों. ओक आणि धनुर्धारी यांनीं या शाखेचा आरंभ केला. 'रशियाचे गांधी' हें प्रा. निरंतर यांनीं लिहिलेलें टॉलस्टॉयचें चरित्र नमुनेदार असून आतां मुलांसाठीं अनेक लहान चरित्रें निघालेलीं पाहून समाधान वाटतें.

शिशुगीतांची रचना ही एक अत्यंत अवघड कला आहे. सामान्य माणसासारखा कवि शैशवाला सर्वस्वीं पारखा होत नाहीं. वास्तविक कवीला बाल्यवृत्तींत उतरणें फारसें जड जाऊं नये. परंतु आधुनिक मराठी कवितेचा इतका विस्तार झाला पण त्यांत उत्कृष्ट शिशुगीतांची संख्या अद्यापि अत्यंत लहान आहे. कृष्णशास्त्री चिपळूणकरांच्या 'पद्यरत्नावली' त कांहीं कविता अशा आहेत कीं, त्या बालसुबोध होऊं शकतील. शिशुगीतांत दोन-तीन प्रकार संभवतात. एक मुलांचा स्वभाव प्रतिबिंबित करणारीं गीतें व दुसरा प्रकार मुलाच्या दृष्टीनें सृष्टि किंवा व्यवहार यांच्याकडे पाहून लिहिलेलीं गीतें. औत्सुक्य, कुतूहल, मानवीकरण या गोष्टी सामान्यपणें त्यांत येतात. तिसरा प्रकार संकीर्ण गीतांचा—त्यांत अभिनव गीतें, राष्ट्रीय गीतें व स्तोत्रें, अंगाई गीतें, प्रबोधन-गीतें, इत्यादि अनेक प्रकार येतात. सुबोधपणा हें एकच शिशुगीतांचें वैशिष्ट्य नाहीं. नाद, ताल, आणि अर्थ हे तीनहि गुण असतील तरच शिशुगीत सुंदर ठरेल. मात्र ध्वनि हा जो काव्याचा परमोच्च गुण मानला जातो त्याची शिशुगीताला आवश्यकता नाहीं. ओळींवर साधलेलीं पूर्ण यमकें

व ठायीं ठायीं द्विरुक्ति त्याला फार आवडते. कविवर्य तांबे यांनीं मनोहर व शास्त्रशुद्ध शिशुगीतें लिहिलीं आहेत. दत्त-कवींचें 'या बाई या, बघा बघा कशि माझी बसलि बया!' हें एकच शिशुगीत आकर्षक आहे. तोकड्या ओळीच्या अंतीं उपांत्य स्वरांसह साधलेलीं यमकें हा शिशुगीतांचा एक मोठाच गुण आहे. तो माधव जूलियन् यांच्या कवितांत प्रकर्षानें प्रकट झाला आहे. 'नर्सरी ऱ्हाइम' च्या धर्तीवरच्या पद्यपङ्क्तींची रचना आधुनिक बालवाङ्मयाच्या काव्यविभागांत फारच कमी प्रमाणांत झालेली आढळते. प्रा. मायदेव व श्री. भ. श्री. पंडित यांची शिशुगीताच्या बाबतींतली कामगिरी डोळ्यांत भरण्यासारखी आहे. प्रा. मायदेव तर या गीतांत आज आघाडीवर आहेत. त्यांचेंच अनुकरण इतर करतात पण साधत नाहीं. शिशुगीतांच्या वर्गांत मोडणारा एक अलौकिक पद्यप्रकार लोक-गीतांचा होय. बडोद्यांचे श्री. प्र. वा. देशपांडे व माजी एज्यु. इन्स्पेक्टर श्री. विठ्ठलराव घाटे यांनीं अशीं विपुल लोकगीतें संकलित केलीं आहेत. जात्यावरचीं गाणीं सानेगुरुजी व डॉ. कमलाबाई देशपांडे यांनीं संकलित केलीं आहेत.

वा. गो. आपटे यांनीं रचिलेलें 'कां व कसें'. (भाग ४) हें पुस्तक आणि वि. कों. ओक यांचीं २।३ पुस्तकें हीं बालवाङ्मयांतलीं पहिलीं शास्त्रीय पुस्तकें होत. बालवाङ्मयांतलें आदर्श शास्त्रीय पुस्तक कसें असावें याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे पं. जवाहरलाल नेहरूंनीं लिहिलेलें 'इंदिरेस पत्रें' हें पुस्तक होय. अमरावतीचे श्री. बोडस यांनीं प्रस्तुत पुस्तकाचें भाषांतर केलें आहे. उत्पत्ति, स्थिति आणि प्रगति यांचा सुबोध व रसाळ इतिहास या पत्रांतून सांगितला आहे व जगाच्या सांस्कृतिक विकासाचीहि त्यांत चर्चा केली आहे; पण विषय अवघड असूनहि निवेदन करतांना त्यांत अवघडपणा कोठेंहि आणलेला नाहीं. बालवाङ्मयांत या पुस्तकाची महती शाश्वत राहील. 'नाना देशचे नाना लोक' हें श्री. विठ्ठलराव घाटे यांचें चटकदार पद्धतीनें लिहिलेलें पुस्तक वाचतांना सुद्धां प्रौढांची बालवृत्ति जागृत होईल. मग मुलें तर त्यांत तल्लीन होतीलच. श्री. रा. स. शिर्के व अनेक प्राथमिक शिक्षक यांचीं शाळेंतील खेळासंबंधींचीं व इतर पुस्तकें उल्लेखिण्याजोगीं आहेत. यावरून बालवाङ्मयाच्या सर्व शाखांची प्रगति कशी व कोठवर झाली आहे याची थोडी कल्पना येईल. चित्रकलेचा उपयोग बालवाङ्मयांत फारच करून घेतला पाहिजे. पण तीं चित्रें सुबक व सार्थ असलीं पाहिजेत. निव्वळ सोपेपणा अथवा बिन जोडाक्षरीपणा हा बालवाङ्मयाचा अनन्य गुण आहे असें कोणीं समजूं नये. बालवाङ्मय हें मानसशास्त्राच्या आधारावरच उभारलेलें असावें. तेव्हां बालवाङ्मयाची रचना करण्यापूर्वी बाल-मानसशास्त्राचा अभ्यास झालेला पाहिजे. महिला वर्गाचा संबंध बालसृष्टीशीं विशेष येतो. या दृष्टीनें सुविद्य लेखिकांकडून बालवाङ्मयाला भरपूर मदत होण्यासारखी आहे. उच्च, उदात्त व परमसुंदर असें ध्येय नेहमीं अशा वाङ्मयसंपादकाच्या डोळ्यांपुढें असलें पाहिजे.

**बालविवाह**—पूर्वी वैदिक कालांत पुरुष व स्त्री पूर्णपणें वयांत आल्यावरच त्यांचीं लग्नें होत असत. ह्या गोष्टीला पुरावा म्हणजे वैदिक ग्रंथांत अविवाहित स्त्रियांबद्दलचे आलेले अनेक उल्लेख होत. या अविवाहित स्त्रिया बापाच्या घरीं वाढत असत आणि लग्न होऊन चांगला नवरा मिळावा यासाठीं स्वतःस नटवीत असत. त्याचप्रमाणें पुरुषांनीं व स्त्रियांनीं एक-मेकांना आपणांवर प्रेम करण्यास भाग पाडण्यास अथर्ववेदा-मधल्या मंत्राचा (एका कथेंत उपयोगांत आणिलेल्या तोड-ग्याचा) उपयोग करण्याची चाल होती. बाल वधूंच्या विवाहाचा उल्लेख प्रथम सूत्रग्रंथांत आलेला आहे. तरी पण रजोदर्शन होण्याच्या अगोदर किती मुलींचा विवाह होत असे हें सूत्रग्रंथा-वरून नक्की ठरवितां येणें कठिण आहे. लग्नाचे जे विधी आहेत त्यांवरूनसुद्धां लग्न म्हणजे स्मृतिग्रंथांप्रमाणें बाहुलाबाहुलीचें लग्न नव्हे तर खरेंखुरें लग्न होय असें स्पष्ट दिसतें. कारण लग्नांतील मुख्य विधि म्हणजे वधूला तिच्या नवऱ्याच्या घरीं नेऊन पोचवावयाची व तेथें त्या दोघां वधूवरांनीं एकशय्या करावयाची हा होय.

बालविवाहाची हिंदूंमध्यें जी पुढें चाल पडली ती मुसलमानी अमदानींत स्त्री-अपहरणाच्या भीतीनें असावी. शिवाय पातिव्रत्यपालनाच्या अत्युच्च तत्त्वानुसार बालविवाहाचा निर्बंध कांहीं स्मृतिकारांनीं घातलेला असावा. इंग्रजी अमदानींत संमति-वयाचा कायदा व सामाजिक सुधारणांची चळवळ यांमुळें हळूहळू बालविवाह बंद पडले. विवाह पाहा.

**बालवीर**—(बॉय स्कॉउट). ही चळवळ १९०८ सालीं इंग्लंडमध्यें सर रॉबर्ट बेडन पॉवेलनें काढली. नंतर ती जगांत सर्व राष्ट्रांतून पसरली. हिंदुस्थानांतील बालवीर चळवळ ही प्रथम इंग्लंडांतील संस्थेला जोडलेली असे. आतां हिंदुस्थान स्काउट्स असोसिएशन ही स्वतंत्र राष्ट्रीय संस्था बालवीर तयार करण्याचेंच स्तुत्य कार्य करते. मुलांमध्यें शील आणि बुद्धिमत्ता तयार करण्याचा व त्याबरोबरच आरोग्य आणि स्वतःची काळजी घेणें या गोष्टी शिकविण्याचा हींत प्रधान हेतु असतो. या शिक्षणांत विविध हस्तव्यवसाय, सृष्टिज्ञान, छावणींतील आयुष्य-क्रम, इ. अत्यंत उपयुक्त गोष्टी येत असून यामुळें मुख्यतः मुलांमध्यें शिस्त बाणते. 'सन्नद्धोभव'— तयार राहा, हें बालवीराचें ब्रीदवाक्य आहे.

८ ते ११ वर्षांच्या मुलांना 'शिशुवीर' (वुल्फकब्स), ११ ते १७ वर्षांच्या मुलांना 'बालवीर' (स्काउट्स) व १७ च्या वरच्या मुलांना 'तरुणवीर' (रोव्हर्स) म्हणतात.

'बालवीर' हा शब्द इंग्रजीमधील स्काउट या शब्दाचा वाचक आहे. ह्या शब्दाचा इंग्रजीमधील व्युत्पत्ति-अर्थ, सैन्याच्या आघाडीवर राहून शत्रुपक्षाची टेहेळणी करणारा हेर असा होतो. हाच शब्द परमार्थ दृष्टीनें योजला व त्याकडे अधिक व्यापक आणि तात्त्विक अशा दृष्टीनें पाहूं लागलें तर 'बाल-वीरां'च्या ध्येयांची व कर्तव्यांची बरोबर कल्पना येईल. आपल्याबरोबरचे आपल्या पक्षाकडील सर्व शिपाई निद्रित असतां, त्यांच्या सुखासाठीं व स्वास्थ्यासाठीं, आघाडीवर राहून, स्वतःचा जीव धोक्यांत घालून अनिमिष नेत्रांनीं जो एकसारखा खडा पहारा करतो तोच 'स्काउट'. 'सन्नद्धोभव' हें बाल-वीरांचें ब्रीद असल्यानें बालवीर हा नेहमीं सावध असतो. अचानकपणें येऊन कोसळलेल्या आपत्तीबरोबर वीराला साजेल अशा वृत्तीनें झगडण्याची त्याची नेहमीं तयारी असते. भावी आयुष्यांतील जबाबदारी आपल्या हातून होईल तितक्या उत्कृष्टपणें पार पाडली जावी यासाठीं पूर्व वयामध्यें जरूर ती सर्व तरतूद तो आगाऊ करून ठेवतो.

देशाच्या सेवेस लायक व समर्थ असे उत्कृष्ट नागरिक तयार करणें हें या संस्थेचें ध्येय आहे. नागरिकत्वास लागणाऱ्या जरूर त्या सर्व सद्गुणांची जोपासना व संवर्धन हीं बालवयांत जेणेंकरून होतील त्या सर्व उपायांचा अवलंब करणें हा या चळवळीचा मुख्य उद्देश असून याच पायावर तिच्या सर्व अंगांची आणि उपांगांची रचना व उभारणी करण्यांत आली आहे. बालवीरांना स्काउटिंगचा उपयोग व्यक्तिविषयक जीवनकलहांमध्येंहि व्हावा अशा प्रकारची व्यवस्था तीमध्यें केली आहे. लहानपणीं शिकविण्यांत आलेल्या कला मोठेपणीं त्याच्या चांगल्या उपयोगी पडतात व प्रसंगविशेषीं त्याचा चरितार्थहि त्यांजवर चालू शकतो. तसेंच आपणांवर आलेल्या अनेक संकटां-मधून स्काउटिंगच्या ज्ञानाच्या जोरावर बालवीर पार पडतो. अशा अर्थानें स्काउटिंग शिकण्यांत परमार्थापेक्षांहि स्वार्थच अधिक आहे असें म्हणतां येईल. लहान मुलांचें शील बनविणें हा या चळवळीचा तिसरा उद्देश आहे. मुलांच्या भोंवतालची परिस्थिति, त्यांची संगत, त्यांचे नित्य व्यवसाय याच गोष्टी मुलांचें शील बनविण्यास पुष्कळ अंशांनीं कारणीभूत होतात. लहान मुलांच्या स्वभावाचें व मनोरचनेचें सूक्ष्म निरीक्षण करून स्काउटिंगमधील नियम व व्यवसाय हे ठरविण्यांत आले आहेत.

बालवीरांचा ब्रह्मचर्याश्रम—लॉर्ड बेडन पॉवेल यांनीं सुरू केलेली ही बालवीरांची नागरिक शिक्षणाची चळवळ आपल्या-कडे अगदीं नवीन नाहीं. निरनिराळ्या धर्मग्रंथांवरून अशा प्रकारच्या उत्तम नागरिकत्वाचें शिक्षण देणाऱ्या संस्था पूर्वीपासून चालत आलेल्या आहेत. हिंदूंच्या दृष्टीनें असेंहि म्हणतां येईल कीं, मन्वादि स्मृतिकारांनीं ब्रह्मचर्याश्रमाची जी व्यवस्था घालून दिली तिचेंच स्काउटिंग हें अलीकडील रूपांतर होय. बालवीर म्हणजे ब्रह्मचारी असें समीकरण मांडलें तरी तें वावगें होईल असें नाहीं. या बालवीरांच्या संस्थेमध्यें जुन्या-नव्यांचा मिलाफ अगदीं बेमालूम रीतीनें घालून देण्यांत आला आहे. या चळवळीचें श्रेष्ठत्व जर कशांत असेल तर तें याच बाब-तींत आहे. आपण आपल्या हल्लींच्या हिंदुस्थानाकडे पाहिलें म्हणजे त्यांत हिंदू, मुसलमान, पार्शी, खिस्ती, वगैरे नाना धर्मांचे लोक दिसतात. या सर्वांचे आचारविचार भिन्न व प्रत्येकाचा पंथ निराळा. त्यांना एकत्र करण्यास 'स्काउटिंग' हें चांगलें साधन आहे. आपल्या जुन्या ब्रह्मचर्याश्रमामध्यें साधी राहणी व निसर्गाशीं एकतानता या गोष्टींवर विशेष भर आहे. त्याच-प्रमाणें तो 'स्काउटिंग' मध्येंहि आहे. ज्याचा त्याला उपयोग नाहीं अशी एकहि गोष्ट बाल-वीर आपल्या शरीरावर धारण करीत नाहीं. त्याच्या गरजा शक्य तेवढ्या थोड्या असतात. त्याची राहणी अतिशय साधी असते. त्याची प्रवृत्ति उपभोगा-कडे वळूं नये, तो सुखासीन न व्हावा, अशी व्यवस्था त्याच्या दिनचर्येच्या घालून दिलेल्या नियमांत केली आहे. त्याच्या अंगीं जेणेंकरून हालअपेष्टा सोसण्याचें सामर्थ्य येईल, तो जेणें-करून राकट व सोशीक बनेल, असें धोरण त्याच्या या शिक्षणांत ठेवलेलें असतें. शहराबाहेर दूर अंतरावर जाऊन चार चार दिवस, आठ आठ दिवस वसति करून राहणें यांतलाहि उद्देश तोच आहे. आपली नेहमींची शहरामधली राहणी व प्रवासामधील राहणी यांत जमीनअस्मानाचें अंतर असतें. कँपमध्यें अंथरुणें गोळा करणें, बसण्या-उठण्याच्या अथवा जेवणाखाण्याच्या जागा झाडणें, सारवणें, स्वयंपाक करणें, भांडीं घासणें, इत्यादि सर्व लहान-मोठीं कामें स्वतः बालवीरच करतात. नवीन पाठ घेण्याच्या वेळीं झाडाच्या सावलींत वर्गांची व्यवस्था करणें, जवळच्या झाडांच्या कापलेल्या लांकडांचे ओंडे बाकांऐवजीं वापरणें, ताटांऐवजीं पानांच्या पत्रावळींवर जेवणें, एखाद्या झाडाच्या ढोलीचा पोस्टाच्या पत्रें टाकावयाच्या पेटीसारखा उपयोग करणें, यांत एकप्रकारची निसर्गरमणीयता आहे. कोणत्याहि प्रकारची चर्चा अथवा कुर-कुर न करतां, वरिष्ठांनीं केलेली आज्ञा ताबडतोब आनंदानें पाळणें हें बालवीराचें ब्रीद आहे. याप्रमाणें बालवीर नियमांमध्यें सांगितलेली अहिंसा, सत्य, भूतदया, आज्ञाधारकता, शुचिर्भूत-पणा, इत्यादि तत्त्वें व आपल्या ब्रह्मचर्याश्रमामधील नियम हीं

सर्व तंतोतंत एकच आहेत. आपल्या ब्रह्मचाऱ्यांजवळ ज्याप्रमाणें दण्ड असे त्याप्रमाणें हल्लींच्या बालवीरांपाशींहि त्याचा दण्ड असतो. मुलाला गुरुगृहीं पाठविणें झाल्यास मौंजीबन्धन करून ज्याप्रमाणें त्याचा उपनयनसंस्कार करीत व दण्ड, कमंडलु, यज्ञोपवीत, कौपीन, इत्यादि वस्तू या संस्काराच्या वेळीं त्यास देण्यांत आल्यावर ज्याप्रमाणें तो ब्रह्मचारी बनतो त्याचप्रमाणें मुलाला बालवीर करण्याचे वेळीं एक विधि करावा लागतो व मौंजीबंधनाप्रमाणें याहि विधीस मंत्रतंत्र वगैरे सर्व कांहीं लागतें.

बालवीरांच्या शिक्षणांतील विविध अंगें—बालवीराला नित्याच्या व्यवहाराला लागेल व उपयोगी पडेल अशी प्रत्येक गोष्ट व असा प्रत्येक विषय शिकवण्यांत येतो. बालवीराला पोहतां आलें पाहिजे, सायकलवर बसतां आलें पाहिजे, गाईची आणि म्हशीची धार काढतां आली पाहिजे, स्वतःचा स्वयंपाक स्वतः करतां आला पाहिजे, कपडे थोडेसे फाटल्यास शिवतां आले पाहिजेत, चित्रें काढतां आलीं पाहिजेत, थोडें गाणेंबजावणें आलें पाहिजे, सुतारकाम आलें पाहिजे, बागबागाईत आली पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे बालवीराला प्रत्येक गोष्ट थोडथोडी आली पाहिजे. या योगानें तो स्वावलंबी व व्यवहारदक्ष बनतो. कोणत्या गोष्टीची कोणत्या वेळीं गरज लागेल याचा नियम नसतो; म्हणून व्यवहारांत उपयोगी पडतील व आपलें काम तात्पुरतें भागेल इतक्या बेताच्या शक्य तेवढ्या कला व धंदे हीं बालवीरानें माहीत करून घेतलीं पाहिजेत. मुलांचे वर्षांतून सुट्टीचे दिवस किती तरी सांपडतात. त्यांतील बराचसा वेळ नुसत्या गप्पा मारण्यांत आणि दांडगाई करण्यांत जातो. मिळालेल्या वेळेचा, प्रत्येक तासाचा आणि घटकेचा जर उपयोग केला तर यांपैकीं किती तरी गोष्टी साध्य करतां येतील. हिंवाळ्याच्या सुट्टींत शरीर कमावतां येईल.

कलांच्या व लहान किरकोळ धंद्याच्या या यादीपेक्षां शास्त्रांची यादी जास्त लांब आहे. ठळक ठळक ताऱ्यांचीं नांवें व आकाशामधील निरनिराळया वेळेची त्यांची स्थिति व गति हीं बालवीरांस माहिती पाहिजेत. म्हणजे अडीअडचणींच्या प्रसंगीं रानावनांतून हिंडतांना रात्रीच्या वेळीं त्यांस आपला मार्ग काढण्यास सोईचें पडेल. यासाठीं ज्योतिषशास्त्राची एवढ्या-पुरती माहिती त्यानें कोणाजवळून तरी करून घेतली पाहिजे. लांबलांबचा प्रवास करतांना जंगलांमध्यें एखाद्या प्रसंगीं उपासमार होण्याची वेळ आली असता, अमक्या अमक्या झाडांचीं फळें पुष्टिदायक आहेत, अमक्यांचीं विषारी आहेत, इत्यादि माहिती बालवीरास जरूर पाहिजे. कित्येक वेळां औषधी म्हणूनहि त्यांचा चांगला उपयोग होतो. पूर्वीचे राजे, सरदार, शिपाई, वगैरे लोकांना शिकारीचा नाद असे. त्यामुळें निरनिराळ्या श्वापदांचे स्वभाव, चालीरीती, संवयी, इत्यादिकांचें ज्ञान त्यांना होई. अलीकडे आपण नित्य सुधारलेल्या जगांत वावरत असल्यामुळें पुस्तकांत अथवा फार झाल्यास सर्कशींत जीं काय जनावरें आपल्या नजरेस पडतील तेवढेंच आपलें त्यांच्यासंबंधीं ज्ञान. जसजसे आपण अधिकाधिक सुधारत जाऊं, तसतशी निसर्गदेवतेची आपली ओळख बुजत जाणार. सुधारणांच्या फायद्यास न आचवतां, निसर्गदेवतेची मैत्री कायम टिकवावयाची सोय स्काउटिंगमध्यें आहे. एखाद्या मुलाची आई आजारी पडली तर नुसता कपाळाला हात लावून तो रडत बसतो, पण स्काउटिंगच्या तालमींत तयार झालेला मुलगा धीर धरून तिच्या शुश्रूषेचा प्रयत्न करील. स्काउटिंगच्या शास्त्रामधील बऱ्याचशा गोष्टी सर बेडन पॉवेल यांनीं रानटी व अडाणी जातींपासून घेतल्या असें म्हणतात. जखम झाली असताना प्राथमिक उपचार काय करावा व पट्ट्या कशा गुंडाळाव्यात; एखाद्या झाडाची अथवा मनोऱ्याची उंची अदमासानें कशी काढावी; दिशा-साधन कसें करावें; मार्गांत ओढा अथवा नाला आल्यास त्यावर तुजची पूल कसा बांधावा; गुप्त चिन्हांच्या धोरणानें आपल्या सोबत्यांचा मार्ग कसा काढावा; निशाणें फडफडवून आपलें मनोगत आपल्या मित्रास कसें कळवावें, अशा कित्येक गोष्टी बालवीराला शिकविण्यांत येतात. याप्रमाणें शाळेमधील शिक्षण व स्काउटिंगमधील या गोष्टी परस्परोपकारक व एकमेकांची पूर्तता करणाऱ्या अशा आहेत. शाळेमधील शिक्षण पुस्तकांवरून दिलें जातें, त्यांत प्रत्यक्ष व्यवहाराचा भाग आलाच तर तो फार थोडा. त्याच्या उलट स्काउटिंगला पाट्या, पेन्सिली, वह्या, पुस्तकें, इत्यादि गोष्टींची गरज कधींच लागत नाहीं व व्यवहारांत उपयोगी पडणार नाहीं अशी एकहि गोष्ट बालवीराला शिकविण्यांत येत नाहीं. शाळेमधील शिक्षणानें मुलांचा मेंदू तरतरीत होतो, स्मरणशक्ति वाढते तर 'स्काउटिंग'नें अंतःकरणांतील सद्भावना प्रबळ होतात. चांगल्या संवयींनीं व चांगल्या विचारांनीं मुलांचें शील बनतें. शरीर स्वच्छ, निरोगी व सुदृढ कसें ठेवावें याचें ज्ञान त्यांनां प्राप्त होतें.

मुलांच्या अंगीं अनेक सद्गुण उत्पन्न होऊन जिच्या योगें त्यांचा विकास होईल अशा प्रकारची योजना बालवीरांच्या शिक्षणांत केलेली असते. वैयक्तिक आरोग्य व सार्वजनिक आरोग्य यांचे सामान्य नियम प्रत्येक बालवीराला माहीत असावे लागतात. मलेरिया, नारू इत्यादि रोग कसे उद्भवतात व त्यांच्या निवारणासाठीं आपण कोणती काळजी घेतली पाहिजे हें स्काउटिंगमध्यें त्यांस शिकवलें जातें. कोणकोणत्या प्रकारचें अन्न किती प्रमाणांत आपल्या शरीरास जरूर असतें आणि आपण

त्यात असलेल्या वेगवेगळ्या पदार्थांचे गुणधर्म काय काय आहेत याचें ज्ञान त्यास असतें. शरीराची सामान्य रचना कशी असते व शरीराच्या निरनिराळ्या अवयवांना कोणकोणते व्यायाम अवश्य आहेत याची माहिती त्यांस पाहिजे. स्काउटिंगमध्यें शेंकडों प्रकारचे नवीन नवीन गमतीचे खेळ आहेत व त्यांयोगें मुलांच्या शरीरास भरपूर व्यायाम मिळतो. सदा सर्वकाळ मोकळी हवा व भरपूर व्यायाम हीं मिळत असल्यामुळें फुलांप्रमाणें मुलांची वृत्ति ही नेहमींच प्रफुल्ल राहते.

नैतिक शिक्षण—बालवीर सत्यवचनी असतो अशी या शिक्षणांतील पहिली आज्ञा आहे. एखादी गोष्ट बालवीरानें आपल्या प्रतिज्ञेवर सांगितली म्हणजे ती गोष्ट तशी असलीच पाहिजे अशी खात्री बाळगण्यास हरकत नाहीं. बालवीरं आज्ञा विनतक्रार पाळतो, असा स्काउट-पंथांतील आणखी एक कायदा आहे. बालवीराला शिस्तीचें बाळकडू अगदीं प्रथम-पासून पाजण्यांत येतें. लष्करामधील शिस्तीबरहुकूम बाल-वीराच्या पथकामधील शिस्त असते. आई, बाप, गुरु आणि वरिष्ठ यांच्या आज्ञा कशाहि असल्या तरी बालवीर त्या प्रथम पाळतो व नंतर त्यांत ज्या गोष्टी त्यांस वावग्या दिसतील त्या त्यांच्याकडे जाऊन तो मर्यादेनें सांगतो. बालवीर सर्वांचा मित्र असतो असा एक स्काउट-नियम आहे. बालवीर-उपनयन-विधीच्या वेळीं मी दुसऱ्यांस मदत करीन अशा प्रकारची प्रतिज्ञा बालवीरानें आपल्या सहाध्यायांस व गुरूंना साक्ष ठेऊन जाहीर रीतीनें केलेली असते. बालवीरानें रोजच्या रोज निदान एक तरी सत्कृत्य केलेंच पाहिजे अशी त्याजवर सक्ति असते. याच्या स्मरणदाखल आपल्या रुमालाला तो एक गांठ-मारीत असतो व त्या दिवसाचें सत्कृत्य झालें म्हणजे तो ती सोडून टाकतो. हें रोज करावयाचें सत्कृत्य अगदीं लहानसें असलें तरी हरकत नाहीं. एक बालवीर दुसऱ्या बालवीराचा बंधु असतो, यामध्यें सात्त्विक भावना आहे. गरीब, श्रीमंत, उच, नीच, लहान, मोठा असा फरक बालवीरांजवळ नसतो.

स्काउटिंगमुळें मुलगा स्वावलंबी बनतो. स्वतःचें प्रत्येक काम होतां होईल तों स्वतः करणें यांत आपल्या शरीरावर व मनावर आपला ताबा तर राहतोच, परंतु कसाहि प्रसंग आला तरी मनुष्य त्या अडचणींतून निभावतो. स्वतःची खोली स्वतः झाडणें, सारवणें, स्वतःचीं धोतरें स्वतः धुणें, रेल्वे वगैरेसारख्या ठिकाणीं आपला बोजा आपण उचलणें, स्वयंपाक करणें, पाणी भरणें, इत्यादि प्रकारचीं कामें करण्यांत कोणच्याहि प्रकारचा कमीपणा नाहीं. बालवीराला या सर्व संवयी असतात. देशासाठीं कांहीं ना कांहीं तरी करण्यासाठीं मी आपल्या प्रयत्नांची शिकस्त करीन अशा प्रकारची दीक्षाविधीच्या वेळींच बालवीराची पहिली प्रतिज्ञा असते व मरेपर्यंत तो या आपल्या प्रतिज्ञेस जागतो. अंतःकरणामधील भावांना अत्यंत उत्कट आणि प्रबळ करण्यास शिकवणारी स्काउटिंग ही शाळा आहे. नेभळ्या, कर्तृत्वशून्य आणि बावळट मुलांना हुशार, कर्तृत्ववान् व धीट करणारी स्काउटिंगची संस्था आहे.

जगांतील सर्व बालवीरांचा मेळावा भरावा अशीहि व्यवस्था केलेली आहे. महायुद्धापूर्वी असे मेळावे वरचेवर कोठें तरी भरत. १९४७ सालीं फ्रान्समध्यें म्वासाँ येथें जागतिक जांबोरी (मेळावा) भरली. मध्यंतरीं १९३७ पासून अशी जांबोरी भरली नव्हती. तेथें पन्नासावर राष्ट्रांतून बालवीर आले होते. हिंदुस्थानांतूनहि पुष्कळ गेले होते.

जगांत एकंदर २८,५०,००० वर बालवीर आहेत. त्यांपैकीं १०,०९,६७१ ब्रिटिश आहेत. पुन्हां या ब्रिटिश बालवीरांच्या वरील संस्थेत ३,२८,२८६ शिशुवीर, ५२,१८१ तरुणवीर व ९,८३९ दर्यावीर आहेत. ब्रिटिश कॉमनवेल्थचा आजचा चीफ स्काउट लॉर्ड रोवालान आहे. हिंदुस्थानांत बालवीरांची संख्या सुमारें तीन लाख आहे.

**बाल व्यंगोपचार**—(ऑर्थोपीडिक्स). ही आधुनिक शस्त्र-वैद्यक शास्त्राची फार महत्त्वाची शाखा आहे. प्रथम या शाखे-मध्यें लहान मुलांस ज्या जन्मतःच विकृती झालेल्या असतात त्यांवरच उपचार करण्यांत येत असत. परंतु हळूहळू पहिल्या महायुद्धापूर्वींच या शाखेची बरीच वाढ झालेली होती. परंतु त्या युद्धामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितीच्या योगानें या शाखेची प्रगति व वाढ होणें आवश्यक झालें. या तऱ्हेचीं शस्त्र-क्रिया करण्याचीं केंद्रें निरनिराळ्या ठिकाणीं उघडण्यांत आलीं. व त्यांमध्यें शस्त्रवैद्यांस निरनिराळ्या तऱ्हेच्या अनेक विकृती दृष्टीस पडूं लागल्या. सामान्यतः या शाखेमध्यें शरीराचे जे अग्रभाग असतात त्यांच्याच विकृतीवर उपचार करण्यांत येतो. यामध्यें पृष्ठवंश व त्याचीं टोकें यांस झालेले विकार, मग ते जन्मजात असोत किंवा नंतर उद्भवलेले असोत, त्यांवर उपचार करण्यांत येतो. तसेंच प्रौढ लोकांस अथवा लहान मुलांस झालेल्या पक्ष-घातामुळें उत्पन्न झालेल्या विकृतीवरहि उपचार करण्यांत येतो. तसेंच शरीराच्या निरनिराळ्या सांध्यांचे व्यापार जर नीट चालत नसतील किंवा मान वांकडी झाली असेल किंवा अशा तऱ्हेच्या दुसऱ्या कांहीं विकृती उद्भवल्या असतील तर त्यांवर उपचार करण्यांत येतो. लहान मुलांच्या विकृतींवर जितक्या लवकर उपचार करण्यांत येईल तितका तो अधिक फलदायक होतो. या शस्त्रवैद्यकामध्यें वैद्याचें मुख्य कार्य निरनिराळ्या इंद्रियांच्या क्रिया चालू ठेवणें हें असतें.

**बालशिक्षण-संवर्धन**—लहान मुलांच्या शारीरिक आणि मानसिक वाढीकडे लक्ष देणें आवश्यक आहे हें आतां सुधारलेल्या शिक्षणसंस्थांना पटलें आहे व शिक्षक आणि पालक यांच्या सहकार्यानें या वाढीसाठीं प्रयत्न करण्यांत येत असतात. बालमानसशास्त्र हा अध्यापनशास्त्रांत एक स्वतंत्र विषयच बनला आहे. (पुढील पानावर पाहा.)

**बालशिक्षण-संवर्धन तक्ता**

| वर्ष | शीलसंवर्धन | बौद्धिकसंवर्धन | इंद्रियसंवर्धन | खेळ आणि व्यायाम | विश्रांतिकाल |
|---|---|---|---|---|---|
| १ लें | अधीनता इच्छांवर ताबा | बोललेले शब्द समजण्याला शिकणें | विशिष्ट पंचेंद्रियांचें प्रबोधन | खेळण्याच्या वस्तूंशीं खेळतांना हाताच्या स्नायूंचा उपयोग. रांगणें. | प्रत्येक दिवशीं १६ ते २२ तासपर्यंत निजणें. |
| २ रें | आज्ञांचें चटदिशीं पालन. जास्त संयम. | बोलणें | स्पर्शेंद्रियांची विशेष वाढ | चालणें. जास्त सुधारलेल्या खेळण्यांशीं खेळणें. खातांना भांडीं, चमचे, इ. वापरणें. | रात्रीं १२ तास निजणें. दिवसाची डुलकी. |
| ३ रें | आपली बुद्धि चालविणें. निःस्वार्थीपणा आणि सुजनता यांची वाढ. | शिशुगीतें म्हणणें. चित्रांचीं पुस्तकें पाहणें. | सर्व इंद्रियांचा उपयोग करणें. रुचि आणि रंग ओळखणें. | पेन्सिल वापरणें. मणी ओवणें. कल्पना चालविणें. जरूर असणारे खेळ. पुष्कळ शारीरिक हालचाल. | रात्रीं १२ तास निजणें. दिवसाची डुलकी. |
| ४ ते ६ | प्राण्यांवर दया. व्यवस्थेशीरपणा. चांगली चालचलणूक सत्यवादीपणा. उदारपणा. | सांगितलेल्या गोष्टी ऐकणें. दहापर्यंत अंक मोजणें. | वाद्यांचे प्रकार व आवाजांतील कमजास्तपणा कळणें. | एकटें किंवा समूहांत खेळणें. स्वतः कपडे चढविण्याचा प्रयत्न करणें. | रात्रीं ११ तास निजणें. डुलकी घेणें. |
| ७ ते ९ | स्वावलंबन. वक्तशीरपणा. धीमेपणा. बरेंवाईट वर्तन समजणें. | वाचनाची आवड असणें. सुवाच्य लिहिणें. सहज स्मरण ठेवणें | एकटेंच गाणें. पक्ष्यांचे आवाज इ. ओळखतां येणें. | घरकाम करणें. स्वतः कपडे करणें. | रात्रीं ११ तास वेळेवारी निजणें. |
| १० ते १२ | टापटीप. शारीरिक स्वच्छता. विश्वासपात्रता. | वर्तमानपत्रें व नियतकालिकें वाचणें. चरित्रांची आवड असणें. विनोदबुद्धि. | वाद्य वाजविणें | खेळतांना लबाडी न करण्यास शिकणें. संघ-मनोवृत्ति वाढीस लागणें. | रात्रीं १० तास निजणें. |

असे तक्ते पाश्चात्य देशांतीलच मुलांचें अवलोकन करून केलेले असले तरी मुलें हीं सर्वत्र सारखींच या न्यायानें आपणांकडेहि ते बरेचसे लागू पडतील.

( मागील पानावरून चालू )

अमेरिकेंत सर्व संस्थानांतून मानसशास्त्रानुसार बालशिक्षण देण्यासाठीं मुद्दाम शिक्षक तयार करण्यांत येतात. या शिक्षणासाठीं उपकरणें असतात. शिक्षक मुलांवर सारखी देखरेख ठेवून ठराविक वेळीं त्यांचीं मोजमापें घेतात व त्यांवरून निष्कर्ष काढून त्यांप्रमाणें मुलांची काळजी घेण्यास सांगतात. मुलांच्या इंद्रियांची वाढ कशी होत आहे, त्यांना कसली आवड आहे, त्यांची कुवत व सहनशक्ति किती आहे, त्यांची बुद्धि व ग्रहणशक्ति किती आहे, या गोष्टी नमूद करण्यांत येतात. त्यांवरून त्यांची सुधारणा कशी व कोठें करावी हें समजून येतें.

पौगंडावस्था वयाच्या १४ व्या वर्षापासून सुरू होते, व ती दहा वर्षेपर्यंत असते. या काळांत तर मुलांची फार काळजी घ्यावी लागते. त्यांना सहानुभूति आणि प्रोत्साहन पाहिजे असतें. हीं न मिळाल्यास मुलें बिघडतात किंवा शिक्षक-पालकांच्या कह्यांत राहत नाहींत.

मुलांच्या शिक्षणांत शीलाला पहिलें स्थान दिलें पाहिजे. ज्यामुळें शक्य तितक्या जास्त विद्यार्थ्यांत, शक्य तितक्या जास्त काळ, शक्य तितके जास्त गुण उत्पन्न होतील व टिकतील अशा प्रकारचा जीवनक्रम आंखणें म्हणजे शीलशिक्षण होय. मुलांच्या स्वभावाला आणि नैसर्गिक प्रवृत्तींना अनुसरून हें शीलशिक्षण द्यावें लागतें. मुलांचें घरचें वातावरण हें फार परिणामकारक असतें. कुटुंबामार्फतच मुलें समाजांत प्रवेश करतात. तेव्हां शाळेप्रमाणें घरींहि मुलांकडे बारीक लक्ष ठेवावें लागतें. त्यासाठीं पालकांना योग्य शिक्षण लागतें. मुलांना मार्गदर्शन करण्यासाठीं संयम आणि सुसंस्कृतता पालकांत आली पाहिजे. मुलांवर विनाकारण दाब ठेवणें व धाक दाखविणें या पालकांच्या गोष्टी हितावह नसतात. मुलांच्या इच्छा-आकांक्षा मित्राप्रमाणें समजून घेतल्या पाहिजेत.

अर्धपोटी मुलें, घरांत सुख नसणारीं मुलें, व्यंगें असणारीं मुलें, घरीं पुष्कळ काम करावें लागणारीं मुलें, इ. मुलांचे प्रकार असतात. त्यांकडेहि लक्ष देणें जरूर झालें आहे.

शील ही संज्ञा किती व्यापक अर्थानें वापरली आहे हें यावरून दिसून येईल. शीलसंवर्धनाचे प्रयोग एकसारखे चालू ठेवावे लागतात. तात्काल फलाची आशा धरून चालत नाहीं. या बाबतींत घर आणि शाळा या दोघांनींहि आपली कसोशी करावी लागते.

**बालसाहाय्यक कायदे**—मुलांना क्रूरपणानें वागविण्याच्या बाबतींत प्रतिबंध करण्याकरितां प्रथम अमेरिकेंत संस्था स्थापन करण्यांत आल्या, आणि १८८३-८४ सालीं अशा संस्था इंग्लंडमध्येंहि स्थापन करण्यांत आल्या. १८८९ सालीं या बाबतींत पहिला कायदा होऊन १९०८ ते १९१३ पर्यंत 'चिल्ड्रेन ॲक्ट' या नांवाचे विविध कायदे करण्यांत आले. या कायद्यांनीं असें ठरविण्यांत आलें कीं, १६ वर्षांच्या वरील ज्या इसमाच्या ताब्यांत १६ वर्षांच्या आंतील मूल असेल, तर त्यानें अशा मुलाला मारणें, वाईट रीतीनें वागविणें, किंवा त्याच्याकडे दुर्लक्ष करणें, किंवा त्याला टाकून देणें, किंवा अशा मुलाची प्रकृति बिघडेल असें कृत्य करणें, तसेंच त्याची पाहण्याची व ऐकण्याची शक्ति कमी होईल किंवा शरीराचा कोणताहि अवयव निकामी होईल, मेंदू बिघडेल अशा प्रकारचें वर्तन करणें गुन्हा आहे. अशा गुन्ह्याबद्दल गुन्हेगाराची चौकशी करून त्याच्या अपराधाबद्दल १०० पौंडांपर्यंत दंड किंवा दोन वर्षेपर्यंत साधी किंवा सक्त मजुरीची कैद किंवा दोन्ही शिक्षा या कायद्यानें सांगितल्या आहेत. अशा गुन्हेगार इसमाचा त्या मुलाच्या मृत्यूमुळें कांहीं आर्थिक फायदा होण्यासारखा असेल तर त्याला शिक्षा २०० पौंडपर्यंत दंड किंवा ५ वर्षेपर्यंत सक्त मजुरीची शिक्षा त्या कायद्यांत सांगितलेली आहे. तसेंच या कायद्यानें सोळा वर्षांच्या आंतील मुलांना रस्त्यांतून गाणीं म्हणून किंवा खेळ करून किंवा इतर कोणत्याहि प्रकारें भिक्षा मागत हिंडण्यास सांगणें हा गुन्हा आहे. शिवाय अशा मुलांना गुन्हा करणाऱ्या इसमाच्या ताब्यांतून काढून दुसऱ्या नातेवाइकाच्या किंवा इतर कोणा लायक इसमाच्या ताब्यांत देण्याचा, आणि त्या मुलाला पोटगी देण्यास भाग पाडण्याचा अधिकार कोर्टास आहे. तथापि या कायद्यांत आईबापांना किंवा पालकांना किंवा शिक्षकांना मुलांच्या अपराधाबद्दल योग्य प्रमाणांत शिक्षा करण्यास मनाई केलेली नाहीं. मुलांना मादक दारू विकण्यास कायद्यानें मनाई करण्यांत आली आहे. शिवाय गुन्हेगार मुलांना शिक्षा देण्याऐवजीं त्यांना सुधारणागृहें (रेफर्मेटरीज्) किंवा औद्योगिक शाळा (इंडस्ट्रियल स्कूल) यांमध्यें ठेवावें अशी या कायद्यानें तरतूद केली आहे. औद्योगिक शाळा पाहा.

हिंदुस्थान—हिंदुस्थानांत १९२७ सालीं 'चिल्ड्रेन्स एड सोसायटी' ही संस्था स्थापन झाली, आणि बाँबे चिल्ड्रेन ॲक्ट या कायद्याची अमलबजावणी योग्य प्रकारें करण्याकडे या संस्थेनें लक्ष दिलें. त्याकरितां उमरखाडी 'चिल्ड्रेन्स रिमांड होम' या नांवाची संस्था स्थापन करून त्या संस्थेंत गुन्हेगार मुलगे व मुली यांना ठेवून त्याना तेथें सामान्य शिक्षण व धंदेशिक्षण देण्याची व्यवस्था केलेली आहे. तसेंच डेव्हिड ससून इंडस्ट्रिअल, माटुंगा, चिल्ड्रेन्स होम, चेंबूर, आणि होम फॉर मेंटल डेफिशियेंट्स या संस्था चालविण्याची जबाबदारी सदर संस्थेनें घेतलेली आहे. यांत हिंदुस्थानच्या कोणत्याहि

भागांत निराश्रित मुलांना आश्रय देण्यांत येतो व १६ वर्षांच्या आतील गुन्हेगार मुलांना, आणि पालक योग्य तऱ्हेनें वागवीत नाहींत अशा मुलांनाहि आश्रय देण्यांत येतो. मुंबई शहरांत रस्तोरस्तीं भीक मागत हिंडणाऱ्या मुलांना वर दिलेल्या माटुंगा येथील संस्थेंत ठेवण्यांत येतें. पुण्यासहि अशी एक निमसरकारी संस्था आहे.

**बालहत्या प्रतिबंधक कायदा**--'दि फीमेल इन्फंटिसाइड प्रिव्हेन्शन ॲक्ट' हा कायदा १८७० सालीं मंजूर झाला. त्याचा उद्देश ब्रिटिश हिंदुस्थानांतील कांहीं भागांत अगदीं लहान मुलींची हत्या होते ती हत्या करण्यास बंदी करणें हा आहे. ज्या जिल्ह्यांत किंवा त्यांतील एखाद्या वर्गांत, किंवा कुटुंबांत, किंवा लोकांत बालहत्या सामान्यतः होते, तो जिल्हा किंवा वर्ग, कुटुंब किंवा लोक सरकारी गॅझेटांत जाहीर करावें. नंतर (१) त्या जिल्ह्यांतील, वर्गांतील, कुटुंबांतील किंवा लोकांतील होणारे जन्म, विवाह आणि मृत्यू यांबद्दल नोंद (रॅजिस्टर) ठेवण्याबद्दल, (२) सदर ठिकाणीं अशा हत्या बंद पाडण्याकरितां आणि असले गुन्हे शोधून काढण्याकरितां जादा पोलिस नेमल्याबद्दल, (३) जन्म, विवाह व मृत्यू यांची कोणीं व कशी माहिती द्यावी त्याबद्दल, (४) ज्या इसमांना हा कायदा लागू केला असेल त्या इसमांनीं लग्नकार्याकरितां कराव्याच्या खर्चावर नियंत्रण व मर्यादा घालण्याबद्दल, (५) या कायद्यान्वयें होणारा जादा खर्च कोणाकडून वसूल करावा त्याबद्दल, व (६) सदर ठिकाणीं नेमलेल्या सरकारी अधिकाऱ्यांचीं व नोकरांचीं कर्तव्यें कोणतीं त्याबद्दल, प्रांतिक सरकारनें नियम करावे व ते नियम सरकारी गॅझेटांत प्रसिद्ध करावे व त्या नियमांच्या प्रती जाहीर ठिकाणीं लावाव्या व वांटाव्या (कलमें २-३). एखादा पालक आपल्या ताब्यांतील लहान मुलीच्या पालनपोषणाकडे दुर्लक्ष करीत असेल तर डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें त्यावर योग्य देखरेख ठेवावी, किंवा त्या मुलीला त्या पालकाच्या ताब्यांतून काढून दुसरीकडे हालवावी व तिच्या पोषणाचा खर्च दरमहा ५० रुपयेपर्यंत त्या पालकाकडून देववावा (कलम ६).

**बालाघाट**--१. वऱ्हाड, अजंठ्यावरील उंचवट्याचा प्रदेश. हा दखनच्या डोंगरसपाटीचा अगदीं उत्तरेकडील भाग होय.

२. म्हैसूर आणि बल्लारी यांचा ईशान्य भाग, आणि अनंतपूर, कर्नूळ व कडाप्पा हे मद्रासचे जिल्हे मिळून होणाऱ्या प्रदेशाला विजापूरच्या मुसलमानांनीं बालाघाट असें नांव दिलें आहे.

३. हैद्राबाद संस्थानच्या पश्चिमार्धामध्यें असलेली एक डोंगरांची रांग.

४. मध्यप्रांत, नागपूर विभागामधील एक जिल्हा.

बालाघाट नांवाचा उंचवट्याचा प्रदेश पूर्वी उत्तरेकडे तुंगभद्रा-कृष्णा या नद्यांपासून खालीं म्हैसूरच्या टोंकापर्यंत पसरला होता. म्हैसूर संस्थान सोडून याचें क्षे. फ. २८,६६९ चौ. मै. होतें. बालाघाट याचा अर्थ 'घाटावर' व याच्या उलट पैनघाट म्हणजे 'घाटाखालीं'. हा प्रदेश पूर्वी विजयानगरच्या साम्राज्यांत मोडत असे. पुढें निरनिराळ्या मुसलमानी राज्यांत विभागून गेला व त्यानंतर हैदर-टिपूच्या अमलाखालीं आला. ब्रिटिशांनीं टिपूचें राज्य घेतल्यावर यापैकीं कांहीं कर्नूळचा नबाब व निजाम यांना वांटून दिला. पुढें म्हैसूरखेरीज मुलूख ब्रिटिशांकडे आला व बालाघाट कर्नूळ, कडाप्पा व बल्लारी या भागांत विभागला गेला.

**बालाघाट**--मध्यप्रांत, छत्तिसगड विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३,६३४ चौ. मैल. लो. सं. ६,३४,३५०. यांतील मुख्य नद्या वैनगंगा व हिच्या शाखा बागनदी, नहरा, उरकाल, मसमार, माहार, इत्यादि. लोखंड पुष्कळ मिळतें सोनें कोठें कोठें-देव, सोन, सोनबेरा व नहरा या नद्यांत-सांपडतें. त्याचप्रमाणें गेरू, सुरमा व अभ्रक हेहि सांपडतात. मॅंगॅनीझ व बॉक्साइट ह्या धातू अलीकडेच या जिल्ह्यांत सांपडूं लागल्या आहेत. कापड विणणें, पितळेचीं भांडीं करणें, कांचेच्या बांगड्या करणें, इ. व्यापार येथें चालू आहेत. भाताचें उत्पन्न विशेष आहे. पण गहूं वगैरे इतर धान्यें होतात. पर्जन्यवृष्टि इतर जिल्ह्यापेक्षां अधिक (६२ इंच) असते. या ठिकाणीं पूर्वी बौद्धकालीन घडीव व कोरीव दगडांचीं बांधलेलीं सुंदर मंदिरें अत्यंत पुरातन संस्कृतीचें चिन्ह म्हणून सांपडतात. बैहर तहशिलीमध्यें गोव्यांनीं बांधलेलीं तळीं व मोडकळीस आलेलीं मंदिरें हीं आहेत. ह्यांपैकीं कांहीं हेमाडपंती आहेत. लांजींतील किल्ला गोंड राजांनीं अठराव्या शतकाच्या आरंभीं बांधलेला आहे. येथून एक मैलावर कोटेश्वराचें देवालय आहे. या ठिकाणीं वार्षिक यात्रा भरते. वैनगंगेच्या दोन्ही कांठांनीं उत्तम भातजमीन आहे. बालाघाट या गावाचें मूळचें नांव बुऱ्हा असें होतें. येथें थोडासा व्यापार चालतो.

**बालासिनोर**--मुंबई इलाखा, जुन्या रेवाकांठा पोलिटिकल एजन्सीपैकीं एक संस्थान. क्षे. फ. १८९ चौरस मैल. येथील राजघराण्याचा मूळ पुरुष शीरखान बाबी हा मोंगलांच्या पदरीं होता (१६६४). त्याच्यापासून पांचवा पुरुष सलाबतखान यानें जुनागडचें राज्य मिळविलें. नंतर राज्याचे दोन विभाग होऊन धाकट्या मुलाला जुनागड मिळालें व बालासिनोर

मोठ्याकडे राहिलें. येथील नबाब हा दुसऱ्या वर्गाचा संस्थानिक आहे. संस्थानची लोकसंख्या (१९४१) ५२,५२५ आहे. संस्थानचें उत्पन्न सुमारें चार लाख आहे. संस्थानला ब्रिटिश सरकारला ९,७६६ रु. व बडोदें सरकारला ३,०७७ रु. खंडणी द्यावी लागत असे. सध्यांचे संस्थानिक बाबी श्री जमियतखानजी मनवरखानजी १८९९ सालीं गादीवर आले. हें संस्थान आता मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**बालासोर**—ओरिसा प्रांतांतील उत्तरेकडील जिल्हा. क्षे. फ. २१९४. याच्या किनाऱ्यावरील ३ मैल रुंदीच्या पट्टींत मीठ असल्यामुळें तेथील जमीन लागवडीला निरुपयोगी आहे. सुवर्णरेखा, हास्कुरा, सारथा, पाचपारा, बझबलंग, कांसवांस, साळंदी व वैतरणी या नद्या आहेत. या जिल्ह्यामध्यें सरासरी वार्षिक पाऊस ६० इंच पडतो. या जिल्ह्याची लोकसंख्या (१९४१) १०,२९,४३० आहे. मुख्य पीक तांदुळाचें आहे.

बालासोर हें मुख्य ठिकाण असून जुनें बंदरहि आहे. १८६६ च्या दुष्काळापर्यंत ओरिसांत हें एकच बंदर होतें. येथें मद्रासहून तांदुळाच्या बोटी व लखदीव आणि मालदीव बेटांकडून कवड्या येत. या ठिकाणीं १७ व्या शतकात प्रथमच इंग्रज, डच, डेन्स, पोर्तुगीज व फ्रेंच व्यापाऱ्यांनीं आपल्या वखारी घातल्या. १९०४ सालापासून परदेशी गलबतांसाठीं हें बंदर म्हणून राहिलें नाहीं.

**बालिका समिति**—(गर्ल गाइड्स). बालवीर चळवळ १९०८ मध्यें निघाल्यावर दोन वर्षांनीं मुलींची त्याच धर्तीवर एक संघटना तयार झाली. बेडन पॉवेल हेच या चळवळीचे मुख्य सूत्रधार असून त्यांची भगिनी कुमारी ॲग्नेस हिची त्यांना बालिका समिति स्थापतांना फार मदत झाली. ८ ते १६ वर्षें वयाच्या मुली समितींत घेण्यांत येतात व त्यांच्या निरनिराळ्या तुकड्या करतात. त्यांवर कॅप्टन, लेफ्टनंट, इ. लष्कराप्रमाणेंच अधिकारी ठेवलेले असतात. ठराविक शिक्षण घेऊन परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर मुलगी पूर्ण 'गाइड' बनते. आरोग्य, शील, ज्ञान, समाजसेवा, कलाशिक्षण, इ. गोष्टी मुलींमध्यें याव्यात हा या चळवळीचा हेतु आहे. जगांत एकूण सुमारें दहा लक्ष समितिबालिका असून हिंदुस्थानांत अर्ध्या लाखाच्या जवळ त्यांची संख्या भरेल. गेल्या महायुद्धांत यांची लष्करी कामाला फार मदत झाली.

**बॉलिंग्ब्रोक, हेन्री सेंट जॉन, व्हायकाउंट** (१६७८–१७५१)—एक इंग्रज मुत्सद्दी व राजकारणी लेखक. १७०१ सालीं तो पार्लमेंटचा सभासद झाला व टोरी पक्षांत शिरला. १७०४–८ पर्यंत वॉर सेक्रेटरी होता. १७१० सालीं टोरी पक्ष अधिकारावर आल्यावर तो स्टेट सेक्रेटरी, आणि १७१२ सालीं व्हायकाउंट बॉलिंग्ब्रोक बनला. १७१३ सालीं त्यानें युट्रेटचा तह लोकमत बरेंच विरुद्ध असतांहि केला. १७१५ सालीं ॲन राणीनें त्याला मुख्य प्रधान नेमलें, पण नंतर चार दिवसांनींच राणी मरण पावली व व्हिग पक्षानें पहिला जॉर्ज याला इंग्लंडचा राजा म्हणून जाहीर केलें. त्यामुळें बॉलिंग्ब्रोक फ्रान्समध्यें पळून गेला. १७२३ सालीं त्याला परत येण्यास सरकारी परवानगी मिळाल्यावर इंग्लंडमध्यें येऊन तो वॉलपोल प्रधानमंडळाच्या विरोधी पक्षांत सामील झाला. त्यामुळें १७३५ सालीं पुन्हां फ्रान्समध्यें पळून जाणें त्याला इष्ट वाटलें. १७४२ सालीं वॉलपोल प्रधानपदावरून च्युत झाल्यावर बॉलिंग्ब्रोक इंग्लंडांत येऊन मरेपर्यंत निवृत्त स्थितींत राहिला. 'देशभक्त राजा म्हणजे काय' व 'इतिहासाचा अभ्यास आणि उपयोग यांसंबंधीं पत्रें' हीं पुस्तकें त्यानें लिहिलीं आहेत.

**बालोद्यान (शिक्षण) पद्धति**—किंडरगार्टन पाहा.

**बाल्कन द्वीपकल्प**—या युरोपांतील द्वीपकल्पांत आज युगोस्लाव्हिआ, ग्रीस, बल्गेरिया, रुमानिया आणि आल्बानिया हीं राष्ट्रें येतात. क्षे. फ. सुमारें ३,५०,००० चौ. मै. असून लो. सं. ४ कोटी आहे. हा प्रदेश बहुतेक डोंगराळ आहे. यांतून बाल्कन पर्वतांच्या व इतर रांगा गेल्या आहेत. डॅन्यूबखेरीज कोणतीहि नदी मोठी व नौकानयनाला योग्य नाहीं. १४५३ त तुर्कांनीं कॉन्स्टँटिनोपल घेतल्यावर त्यांनीं बाल्कन प्रदेश जिंकून आपल्याकडे १९ व्या शतकापर्यंत ठेविला. नंतर हळूहळू यांतील देश स्वतंत्र होऊं लागले व गेल्या महायुद्धानंतर तर तुर्कांची यावर बिलकुल सत्ता राहिली नाहीं.

**बाल्खश**—तेंगिस. आशिया खंडातील रशिया देशांतील एक सरोवर. आरल सरोवरापासून हें सरोवर ६०० मैलांवर आहे व चीनच्या हद्दीपासून १२० मैल आंत आहे. याचें क्षे. फ. ८५०० चौरस मैल असून युरेशियामधील सरोवरांत याचा चौथा क्रम लागतो. याचें पाणी खारें आहे. या सरोवरास मुख्य पाण्याचा पुरवठा इली नदीपासून होतो. नोव्हेंबरपासून एप्रिलपर्यंत याचें पाणी गोठलें. गेल्या कित्येक वर्षांपासून या सरोवराचें पाणी वर वर येत आहे.

**बाल्टिक समुद्र**—हा समुद्र युरोपच्या वायव्य भूप्रदेशांत असून त्याभोंवतीं डेन्मार्क, जर्मनी, लिथुआनिया, लॅटव्हिया, एस्थोनिया, रशिया व स्वीडन हे देश आहेत. याची लांबी सुमारें ९०० मैल, व बोथनिया व फिनलंड या दोन आखातांसह क्षे. फ. १,८०,००० चौ. मैल आहे. या समुद्राचा उत्तर भाग व दक्षिण भाग यांच्यामध्यें एक द्वीपसमूह आहे. दरसाल तीन-चार महिने पाणी गोठून बर्फ बनल्यामुळें नाविक वाहतूक बंद पडते. या समुद्राला नीवा, ड्वीना, ओडर, व्हिश्चुला व

नीमेन या नद्या मिळतात. बाल्टिक समुद्र व उत्तर समुद्र ( नॉर्थ सी ) हे कील कालव्यानें जोडलेले आहेत. यांतील द्वीपसमूहापैकीं कांहीं बेटें डेन्मार्कच्या मालकीचीं, दोन स्वीडनचीं, रुजेन हें प्रशियाचें, दोन बेटें रशियाचीं आणि आलंड बेटें फिनलंडच्या मालकीचीं आहेत. १६ व्या आणि १७ व्या शतकांत बाल्टिक समुद्र हा व्यापारी दृष्ट्या अत्यंत महत्त्वाचा होता. गेल्या महायुद्धांत रशिया आणि जर्मनी यांच्या नाविक लढाया यांत झाल्या.

**बाल्टिमोर**—अमेरिकन सं. संस्थानांतील मेरीलॅन्डची राजधानी व एक बंदर. लो. सं. (१९२०) ८,५९,१००. मेरीलॅड वसाहतीचा संस्थापक लॉर्ड बाल्टिमोर याच्यावरून शहराला नांव पडलें. येथील मुख्य इमारती सिटी हॉल, कोर्ट हाउस, रोमन कॅथॉलिक हॉपकिन्स हॉस्पिटल, वगैरे आहेत. चार्लस रस्त्यांत जॉर्ज वॉशिंग्टनचा एक १६ फूट उंचीचा पुतळा उभारण्यांत आला आहे. दुसरेहि कांहीं पुतळे व स्मारकें येथें आहेत. येथील जॉन हॉपकिन्स विश्वविद्यालय फार प्रसिद्ध आहे. पिबोडी नांवाच्या संस्थेंत मौक्तिकशास्त्रांचा, वाङ्मयाचा व कलांचा अभ्यास होतो. मॉरगन कॉलेजांत येथील नीग्रो लोकांस शिक्षण मिळूं शकतें. याशिवाय मेरीलॅड व बाल्टिमोर विश्वविद्यालयांत उद्योगधंद्यांचें शिक्षण मिळूं शकतें. येथें धर्मार्थ संस्था बऱ्याच आहेत. येथील मुख्य व्यापार माशांचा आहे. याशिवाय गलबतें बांधणें, कपडे तयार करणें, डक नांवाचा कपडा विकणें, दारू, तंबाखू, लोखंडी सामान, वगैरे बरींच कामें करण्याचे कारखाने येथें आहेत. सुकविलेलीं फळें येथें फार तयार करण्यांत येत असून त्यांचा खपहि फार होतो.

**बाल्डविन, स्टॅनले** (१८६७–१९४५)—एक थोर ब्रिटिश मुत्सद्दी व प्रधानमंत्री. हा १९०८ सालापासून पार्लमेंटचा सभासद होता. बोनर लॉ याच्या मंत्रिमंडळांत तो होता व कांहीं दिवस बोनर लॉचा खाजगी चिटणीस होता. बोनर लॉनंतर १९२३ च्या मे महिन्यांत मुख्य प्रधान झाला व युनियनिस्ट पक्षाचा पुढारी बनला. १९२३ डिसेंबरमध्यें व्यापारांत संरक्षक पद्धति लागू करण्याच्या प्रश्नाबाबत पुन्हां पार्लमेंटची निवडणूक करण्यांत आली. पण त्या निवडणुकींत बाल्डविनच्या पक्षाला बहुमत लाभलें नाहीं. त्यामुळें बाल्डविनच्या प्रधानमंडळाला राजीनामा द्यावा लागला. तथापि १९२४ नोव्हेंबरमध्यें बाल्डविन दुसऱ्यांदा पंतप्रधान झाला.

१९२७ मध्यें त्याला रॉयल फेलो व ब्रिटिश म्यूझियमचा विश्वस्त निवडण्यांत आलें. १९२९ जानेवारींत सेंट ॲंड्र्यूज युनिव्हर्सिटीच्या चॅन्सेलरच्या जागीं त्याची निवड झाली. १९२९ सालीं पार्लमेंटची निवडणूक झाली तींत कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाला बहुमत न मिळाल्यामुळें ता. ४ जून रोजीं त्यानें प्रधानपदाचा राजीनामा दिला. नंतर स्थापन झालेल्या राष्ट्रीय प्रधानमंडळांत १९३१ च्या ऑगस्टांत त्यानें कौन्सिलच्या लॉर्ड प्रेसिडेन्टची जागा पत्करली. १९३२ सालीं ओटावा परिषदेंत ब्रिटिश शिष्टमंडळाचा तो पुढारी होता. १९३४ च्या जुलै ते सप्टेंबरपर्यंत रॅम्से मॅक्डोनल्डच्या गैरहजेरींत बाल्डविननें पंतप्रधानाचें काम केलें व १९३५ च्या जूनमध्यें मॅक्डोनल्डनंतर तो मुख्य प्रधान झाला. १९३५ नोव्हेंबरांत पार्लमेन्टची निवडणूक झाली, तींत त्याच्या पक्षाला बहुमत लाभल्यामुळें तो मुख्य प्रधान झाला. १९३७ मेमध्यें सेवानिवृत्त झाला त्या वेळीं त्याला लॉर्ड व के. जी. या पदव्या देण्यांत आल्या. आठवा एडवर्ड बादशहा जेव्हां एका सधवा व हलक्या कुळांतील बाईशीं विवाहबद्ध होऊं पाहत होता तेव्हां बाल्डविननें फार शहाणपणानें राजाची व राज्याची अब्रू राखली. मुकाट्यानें एडवर्डनें सिंहासन सोडलें व त्याचा भाऊ ( आतांचा सहावा जॉर्ज ) त्यावर बसला. या वेळची बाल्डविनची मुत्सद्देगिरी फार उठून दिसते.

**बाल्तिस्तान**—काश्मीरांत, लडखच्या वझीर वझारतच्या सत्तेखालील एक प्रदेश. याला लहान तिबेट असेंहि म्हणतात. सिंधु, शिओक, शिगर, द्रास, सुरू, व शिगरला मिळणाऱ्या ब्राल्डू व बशर, आणि शिओकला मिळणाऱ्या हुशे व सल्तरो या नद्या या प्रदेशांतून वाहतात. पाऊस थोडा म्हणजे वर्षास ६ इंच पडतो. थंडी फार असल्यामुळें नद्या गोठून जातात व त्यांचे स्वाभाविकच रस्ते बनतात.

बाल्तिस्तानचे प्राचीन राजे ( शियाल्पो ) हे एका फकिराचे वंशज होते. त्यांच्यापैकीं अलीशेर हा सर्वांत प्रसिद्ध होता. अहमदशहा हा त्यांच्यापैकीं शेवटला स्वतंत्र राजा होय. बाल्ती लोक सुस्वभावी, धीराचे व रंगेल आहेत. बाल्ती लोकांनीं इस्लामी धर्म स्वीकारल्यावर त्यांच्यांतील बहुपतित्वाची चाल बंद झाली. राजा, बाल्ती, सैयद, व ब्रुक्प या येथील जाती होत. येथील लोक तिबेटी भाषा बोलतात. पाऊस फार थोडा पडत असल्यामुळें येथील शेती पाटाच्या पाण्यावर अवलंबून असते. गहूं, जव, वाटाणे, मसूर हीं वसंत ऋतूंतील, व पांढरा गहूं, चीण, कंगणी हीं शरदृतूंतील मुख्य पिकें होत. या

प्रदेशांत सोनें, सोमल, गंधक व तांबें हे खनिज पदार्थ सांपडतात. बाल्तिस्तान हें लडखच्या वझीर वझारतच्या सत्तेखालीं असून त्याच्या हाताखालीं स्कार्डू व कारगिल या तालुक्यांवर तहशिलदार आहेत. लो. सं. ६०,०००

**बाल्फोर, अर्थर जेम्स** (१८४८–१९३०)—एक ब्रिटिश मुत्सद्दी व पंतप्रधान. त्याचें शिक्षण ईटन स्कूल व केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉलेजमध्यें झालें. तो लॉर्ड सालिसबरीचा प्रायव्हेट सेक्रेटरी कांहीं काळ होता, नंतर स्कॉटलंडचा सेक्रेटरी व प्रधानमंडळाचा सभासद (१८८६), आणि १८८७–१८९१ पर्यंत आयर्लंडचा सेक्रेटरी होता. या जागांवरील काम त्यानें फार हुशारीनें व निश्चित धोरणानें केलें. त्यामुळें १८९१ सालीं तो कॉमन्ससभेंत सरकारपक्षाचा पुढारी (लीडर) व मुख्य कोशाध्यक्ष (ट्रेझरी फर्स्ट लॉर्ड) या हुद्यावर चढला, आणि १९०२ सालीं लॉर्ड सालिसबरी पंतप्रधानपदावरून निवृत्त झाल्याबरोबर बाल्फोर मुख्य प्रधान झाला व १९०५ पर्यंत त्या जागीं राहिला. पुढें १९१५ सालीं संयुक्त प्रधानमंडळांत तो आरमाराचा फर्स्ट लॉर्ड व १९१६ सालीं फॉरिन सेक्रेटरी झाला. १९१७ सालीं त्यानेंच ब्रिटिश सरकारातर्फे पॅलेस्टाइन ही ज्यू लोकांची राष्ट्रीय भूमि आहे असें जाहीर केलें व यामुळेंच ब्रिटनकडे पॅलेस्टाइनची 'मँडेट' सत्ता आली. १९१९ सालीं शांतता-परिषदेंत ब्रिटिश साम्राज्याच्या प्रतिनिधींपैकीं तो एक होता. तो तत्त्वज्ञानाचा व्यासंगी होता. 'डिफेन्स ऑफ फिलॉसॉफिक डाउट' (तत्त्वज्ञानांतील शंकेच्या बाजूनें), 'एसेज् अँड ॲड्रेसेस' (निबंध आणि भाषणें), 'दि फाउंडेशन्स ऑफ बिलीफ' (श्रद्धेचा पाया), 'एकॉनॉमिक नोट्स ऑन् इन्शुलर फ्री ट्रेड' (द्वीपसंबद्ध खुल्या व्यापारावरील आर्थिक टांचणें), 'क्रिटिसिझम अँड ब्यूटी' (चिकित्सा आणि सौंदर्य), 'थीइझम अँड ह्युमॅनिझम' (ईश्वरवाद आणि मानववाद), यांसारखे ग्रंथ त्यानें लिहिले आहेत. १९१९ सालीं तो केंब्रिज युनिव्हर्सिटीच्या चॅन्सेलरच्या जागीं निवडला गेला. यांखेरीज त्याचा अनेक संस्थांनीं हुद्दे, पदव्या व पारितोषिकें देऊन सन्मान केला.

**बॉल्सॅम**—१. रसाळ रोपांची एक जात. हीं पूर्वेकडील बेटांत आढळतात. इंपेशिअन्स बालसमिना ही यांतील लागवड करण्यांत येणारी जात आहे.

२. कांहीं वनस्पतींपासून एक सुगंधी राळेसारखा पदार्थ निघतो त्यास म्हणतात. विविध पदार्थांना हें नांव आहे. रसायनशास्त्रांत बाष्पशील तेलांशीं मिश्रण झालेल्या राळेला ही संज्ञा आहे. अल्कोहल आणि ईथर यांत बालसम विरघळतो व त्यापासून बेन्झोनिक अम्ल निघतें. बालसम द्रव किंवा घन रूपांतहि आढळतें. सुगंधी द्रव्यें, औषधें व इतर कांहीं पदार्थ यांत बालसम वापरतात.

**बालसा**—हें जगांतील अत्यंत हलकें लांकूड आहे. बुचाच्या ⅔ इतकें हें हलकें असतें. हें दक्षिण अमेरिकेंत होत असून तेथील स्थानिक लोकांना फार काळापासून बुचाचें लांकूड म्हणूनच माहीत आहे. याचा व्यापारी उपयोग १९२० सालापासून सुरू झाला.

**बाल्हिक**—हें एका जातीच्या लोकांचें नांव अथर्ववेदांत येतें. त्यांत तापा(तक्मन्)ला मूजवन्त, महावृष व बाल्हिक यांच्याकडे जाण्यास सांगितलें आहे. राथ व वेबर यांच्या मतें या बाल्हिकांचा इराणी (बल्ख) जातीकडे संबंध असावा. बल्ख पाहा.

बाल्हिक हें प्राचीन राष्ट्र म्हणजे बॅक्ट्रिया असावा असें कांहीं संशोधकांचें मत आहे. हा देश उत्तरेकडे चोल आणि दरद या दोन देशांच्या मध्यें पांडवांच्या काळीं असल्याचा उल्लेख आहे.

**बावची**—हीं झाडें हिंदुस्थानांत सर्वत्र होतात. झाड सुमारें दोन हात उंच असून याचीं पानें लहान असतात. झाडावर काळसर रंगाचें भिन्थाहून बारीक असें बीं येतें त्यास बावच्या म्हणतात. उटण्यांत व सुगंधी पदार्थांत यांचा उपयोग करतात. यांचें तेल त्वग्रोगावर लावतात.

**बावडा किल्ला**—पन्हाळ्याच्या भोजराजानें जे पंधरा किल्ले बांधले त्यांपैकीं हा होय. हा कोल्हापूरच्या वायव्येस ३६ मैलांवर सह्याद्रीच्या एका शिखरावर बांधलेला आहे. समुद्रसपाटीपासून याची उंची २५०० फूट आहे. कोंकणच्या बाजूनें हा उंच व तुटलेला दिसतो व मार्गहि बिकट आहे. १६६० मध्यें हा शिवाजीनें घेतला व तो निळो सोनदेव याजकडे दिला. तो शिवाजीपासून मोंगलांनीं घेतला होता; पण तो त्यानें पुन्हां घेतला. १८६९ मध्यें संभाजी हा मोंगलांच्या हातीं लागल्यावर हा किल्लाहि त्यांनीं घेतला. राजारामाच्या कारकीर्दींत रामचंद्र निळकंठ अमात्य (पाहा) यानें तो मोंगलापासून घेतला तेव्हां राजारामानें तो त्यास दिला. पुढें सातारा व कोल्हापूर यांमध्यें वितुष्ट आल्यावर रामचंद्रपंत कोल्हापूरच्या संभाजीच्या पक्षास धरून राहिला व त्याच्या वंशांत ही जहागीर मालवण–विजयदुर्ग येथपर्यंतच्या मुलखासुद्धां राहिली. १७८२ त कोल्हापूरकरांनीं आपली राजधानी बावड्याहून कोल्हापुरास नेली. १८०० मध्यें भगवंतराव पंतअमात्य यानें किल्ला दुरुस्त केला व तो घेण्यास आलेल्या पेशव्यांच्या सरदाराचा पराभव करून त्यास ठार मारलें. १८४४ मध्यें सामानगड व बावडा येथील शिबंदीनें बंड केलें होतें. पण तें इंग्रजांनीं मोडलें व त्यांनीं किल्ल्याची तटबंदी पाडून टाकली. अद्यापि हा किल्ला साधारण

बऱ्या स्थितींत आहे. पायथ्याशीं बावडें नांवाचें लहानसें खेडें आहे.

**बावडा जहागीर**—ही कोल्हापूर संस्थानच्या आधिपत्याखालील एक जहागीर आहे. क्षे. फ. २४३ चौ. मै.. लो. सं. सुमारें पन्नास हजार. जहागिरीचें उत्पन्न सुमारें एक लाख रु. आहे. बहुतेक मुलूख डोंगराळ आहे. वरघाट व तळघाट असे जहागिरीचे दोन भाग पडतात. भोगवती, भद्रा, कुंभी, सुक, जामदा, वगैरे नद्या आहेत. देश आणि कोंकण यांच्या रहदारीस फोंडा, बावडा, करूळ यांसारखे घाट आहेत. गगनगड व शिवगड असे दोन किल्ले जहागिरींत आहेत. भात, नागली, वरी, कडधान्यें, तीळ, भुईमूग, ऊंस हीं पिकें होतात. जंगलांतील झाडांचेंहि उत्पन्न येतें. कोल्हापूर, राजापूर व खारेपाटण यांशीं येथून व्यापार चालतो.

जहागिरदारांचा मूळ पुरुष निळो सोनदेव (पाहा) असून पुढें रामचंद्रपंत अमात्य (पाहा) याच कुळांत फार प्रसिद्धीस आला. त्यानंतर भगवंतराव (पाहा) इतिहासांत आपल्या चळवळीनें गाजला आहे. पण त्यानंतर कोणी प्रसिद्ध पुरुष झाला नाहीं. कोल्हापूर राज्याचें हें अमात्य घराणें इतर जहागिरीप्रमाणें जीव धरून राहिलें आहे. हल्लींच्या जहागिरदारांचे आजोबा माधवराव बाळासाहेब यांनीं चांगला लौकिक मिळविला होता. ते वैद्यकींत निष्णात होते. त्यांचे चिरंजीव परशुरामपंत भाऊसाहेब कांहीं वर्षांपूर्वी तरुणपणांतच वारले. कोल्हापूर संस्थानच आतां खालसा झाल्यामुळें त्याच्या जहागिऱ्यांना फारसें महत्त्व उरलें नाहीं.

**बावनगजा**—ही प्रचंड जैन देवतेची मूर्ति मध्यभारतांत बडवानी संस्थानांत बडवानी शहरापासून ५ मैल दूर असलेल्या चूलीगिरि डोंगरांत आहे. हा डोंगर सातपुडा पर्वतांत असून त्याचें शिखर सातपुड्याचें सर्वोच्च शिखर आहे.

ही मूर्ति एका अखंड शिळेंत कोरली आहे. सुमारें ११०० वर्षांपूर्वींची ती दिसते. उंची ८४ फूट आहे. म्हणजे श्रवणबेळगोळा, कारकळ व वेणूर येथील मूर्तीहून उंच आहे. पण सर्वांत जास्त ओबडधोबड आहे. उंचीच्या मानानें सर्व अवयव आहेत. ही मूर्ति जैन तीर्थंकर ऋषभदेव याची आहे.

**बावनी** (कडौरा)—मध्य हिंदुस्थान, बुंदेलखंड एजन्सींतील एक लहान संस्थान. क्षेत्रफळ १२२ चौरस मैल. मूळ सनदेंत बावन गांवें दिलेलीं असल्यानें याचें नांव 'बावनी' पडलें. पाऊस सुमारें ३२ इंच पडतो. बुंदेलखंडांत हें एकच मुसलमानी संस्थान आहे. हैद्राबादचा निजाम असफजहा याचा नातू जो इमाद-उल्मुल्क गाझीउद्दीन तो या संस्थानिकांचा पूर्वज होय. १७८४ सालीं गाझीउद्दीनानें पेशव्यांशीं तह करून काल्पीजवळील ५२ गांवांची जहागिरी मिळविली. १८५७ च्या बंडांतील कामगिरीबद्दल या घराण्याला दत्तक घेण्याची सरकारनें सनद दिली. पुढील सालीं संस्थानिकांच्या पदव्या वाढविण्यांत आल्या. लोकसंख्या सुमारें २५,००० आहे. यांपैकीं शें. ८७ हिंदू आहेत. या संस्थानचें एकंदर उत्पन्न २½ लक्षाचें आहे. सध्यांचे संस्थानिक मीर महंमद मुस्ताक-उल्-हसनखान हे १९१८ सालीं गादीवर आले. आतां हें संस्थान विंध्यप्रदेश संघांत सामील झालें आहे.

**बावा मलंग**—मलंगगड पाहा.

**बाष्कल**—ऋग्वेदाची एक शाखा. या शाखेचे लोक आज क्वचित् आढळतात. सध्यां ऋग्वेदाची फक्त शाकल शाखाच विशेष आढळते.

**बाष्प व बाष्पयंत्र**—बाष्पयंत्र म्हणजे पाण्याच्या वाफेवर चालणारें एंजिन. वाफ उत्पन्न करणारा जो तापक (बॉयलर) त्याचें सविस्तर वर्णन मागें आलेंच आहे. शक्ति उत्पन्न करण्यासाठीं सुरुवातीस बाष्पयंत्रा(स्टीम एंजिन)चाच उपयोग झाला व अद्यापहि त्याचाच उपयोग मोठ्या प्रमाणावर चालू आहे. तैलयंत्रें (ऑइल एंजिन) साधारणपणें ५ अश्वशक्तीपासून १००० अश्वशक्तीपर्यंत वापरण्यांत येतात. यापेक्षां मोठीं क्वचित् असतात. परंतु वाफेचीं एंजिनें कोणत्याहि शक्तीचीं असूं शकतात. तथापि वाफेचें एंजिन चालविण्यास लागणारी वाफ उत्पन्न करण्यासाठीं तापकाची गरज असल्यामुळें ज्या ठिकाणीं जळण स्वस्त नसेल अशा ठिकाणीं वाफेचीं लहान एंजिनें वापरणें शक्य नसतें. ५०० अश्वशक्तीपासून पुढें विशेषतः २००० अश्वशक्तीहून अधिक—म्हणजे जेथें जलभ्रामक (टर्बाइन) वापरतां येते अशा ठिकाणीं बहुधा तैलयंत्रांपेक्षां वाफेनें चालणारीं जलभ्रामकेंच वापरलीं जातात. हीं जलभ्रामक एंजिनें १,००,००० अश्वशक्तीइतकीं मोठीं तयार करतां येतात. यांचा उपयोग फार मोठ्या बोटी चालविण्याच्या कामीं होतो.

वाफेच्या एंजिनांत दोन्ही बाजूंनीं बंद असलेल्या पंचपात्रा-(सिलिंडर)मध्यें दट्ट्या (पिस्टन) वाफेनें मागें-पुढें होत असतो. पंचपात्राच्या एका टोंकानें पुष्कळ दाबाची हवा दट्ट्याची धांव (स्ट्रोक) थोडीशी होईपर्यंत येत असते. नंतर वाफ येण्याचें थांबलें तरी दट्ट्याच्या दुसऱ्या बाजूस कांहीं जोर नसल्यानें वाफेच्या प्रसरणशक्तीच्या जोरानें दट्ट्या पुढें जातो. धाव पुरी होण्याच्या सुमारास दट्ट्याच्या दुसऱ्या बाजूनें वाफ पंचपात्रा(सिलिंडर)मध्यें येऊं लागते. धांव पुरी झाल्यानंतर या वाफेच्या योगानें दट्ट्या मागें यावयास लागतो. या वेळेस दट्ट्याकडे प्रथम आलेली वाफ पूर्ण पसरलेली असल्यानें तिच्यामधील जोर नाहींसा होतो. परत येणाऱ्या दट्ट्यानें

ही वाफ दुसऱ्या एका भोकांतून हवेंत किंवा धारणी (कंडेन्सर) मध्यें निघून जाते. दट्टयाच्या दोन्ही बाजूंस ही क्रिया होत असते. त्यामुळें एंजिन चालतें. या प्रत्येक एंजिनमध्यें दट्टयाच्या मागें-पुढें होणाऱ्या गतीचें वर्तुळाकार गतींत रूपांतर होण्यासाठीं दट्टयाचा दांडा, जोडदांडा, बाकदांडा (क्रँक), वगैरे असतातच. अगदीं सुरुवातीस वाफेचीं एंजिनें निघालीं तेव्हां वाफेचा दाब कमी असल्यामुळें एका पंचपात्रामध्यें काम होत असे. वाफ किंवा कोणतेहि वायू प्रसरण पावूं लागले म्हणजे त्यांचें उष्णतामान उतरतें. जसजसा वाफेचा दाब वाढत चालला त्या त्याप्रमाणें वाफ एंजिनमध्यें येण्याची वेळ कमी होत चालली; त्यामुळें आंत येणारी व बाहेर जाणारी वाफ यांच्या उष्णतामानांत अतिशय फरक होऊं लागला. यामुळें पंचपात्र बरेंच थंड होई व वाफेचें कांहींसें पाणीहि होई. तसेंच थंड झालेल्या पंचपात्राला पुनः गरम करण्यासाठीं नवीन आलेल्या वाफेची उष्णता खर्ची पडत असे. हें टाळण्यासाठीं एकाऐवजीं दोन किंवा अधिक पंचपात्रांची योजना करण्यांत येऊं लागली. अशा एंजिनला द्विधावक (कँपाउंड) एंजिन असें म्हणतात. अशा एंजिनमध्यें पहिल्यानें ज्या पंचपात्रामध्यें वाफ येते, त्या पंचपात्राचा व्यास कमी असतो. या पंचपात्रामध्यें वाफ येऊन बऱ्याच वेळांनंतर तिचें अर्धवट प्रसरण होऊन ती दुसऱ्या पंचपात्रामध्यें जाते. याचा व्यास पहिल्या पंचपात्रापेक्षां मोठा असतो. यांत वाफेचें प्रसरण पूर्ण होतें. जमिनीवर चालणाऱ्या एंजिनपैकीं या जातीचीं एंजिनें बहुधा दोन पंचपात्रांचीं असतात व बोटीवर बसविलेलीं एंजिनें बोटीच्या लहान-मोठ्या आकाराप्रमाणें दोनपासून चार पंचपात्रांचीं असतात.

एंजिनमध्यें वापरलेली वाफ हवेंत सोडली असतां तिचा दाब हवेच्या दाबापेक्षां अधिक असावा लागतो व तो तसा असतो म्हणूनच ती हवेंत निघून जाते. हा दाब २३ पौंडांइतकाच जास्त असतो. याच वाफेचें थंड करून पाणी केलें तर पाण्याचा आकार वाफेच्याहून अतिशय कमी असल्यानें तेथें पोकळी उत्पन्न होते; म्हणजे बाहेर जाणाऱ्या वाफेचा दाब हवेच्या दाबापेक्षांसुद्धां फार कमी असतो. हवेचा दाब १५ पौंड धरलेला आहे. त्यांत बाहेर जाणाऱ्या वाफेचा ३ पौंड दाब मिळविल्यास १८ पौंड होतात. त्यांतून ३ पौंड कमी केल्यास बाकी राहिलेल्या १५ पौंडांचा फायदा होत असतो. अशा म्हणजे ज्या एंजिनमध्यें वाफेचें पाणी करण्याची व्यवस्था केलेली असते या एंजिनला शीतक (कन्डेन्सिंग) एंजिन असें म्हणतात. एंजिनचे त्यामध्यें बसविलेल्या पडद्या(व्हाल्व)प्रमाणेंहि भाग पडतात. सुरुवातीच्या एंजिनांमधून वाफ आंत येण्यासाठीं व ती बाहेर जाण्यासाठीं एकच पडदा असे. त्यावर पडदा मागें-पुढें सरकत जात असे. या पडद्यावर वाफेचा दाब असे व त्यामुळें घर्षण बरेंच होई. अद्यापहि लहान एंजिनमध्यें किंवा २००-२५० अश्वशक्तीच्या एंजिनांतून तसेंच आगगाडी व बोट यांच्या एंजिनमध्येंहि याच तऱ्हेचे पडदे वापरतात. ते घसरत चालत असल्यामुळें त्यांना सरक पडदे असें नांव आहे. एंजिनें जसजशीं मोठीं तयार होऊं लागलीं त्या वेळीं घर्षण अधिक होतें असें आढळून आलें. म्हणून पंचपात्राच्या दोन्ही टोंकांस वाफ आंत घेणारा व बाहेर सोडणारा असे दोन फिरते पडदे बसविण्यांत आले. कॉर्लिस नांवाच्या एंजिनिअरनें हे पडदे शोधून काढले. म्हणून हे पडदे असणाऱ्या एंजिनना 'कॉर्लिस' एंजिन असें म्हणतात. पण यासुद्धां पडद्यामध्यें एंजिनें मोठीं झाल्यामुळें घर्षणांत पुष्कळशी शक्ति फुकट जाते. यासाठीं उचलले जाऊन खालीं पडणारे असे पडदे वापरण्यांत येऊं लागले. या पडद्याला पडता पडदा (ड्रॉप व्हाल्व) असें म्हणतात व तेंच नांव पडदे असणाऱ्या एंजिनला आहे.

वाफेच्या एंजिनामध्यें ज्या बाजूनें वाफ एंजिन चालण्यासाठीं आंत येई त्याच बाजूनें ती परत जात असे. परत जाणारी वाफ बरीचशी थंड असल्यामुळें या परत जाणाऱ्या वाफेनें पंचपात्र थंड होत असे. नव्या येणाऱ्या वाफेमधील बरीचशी वाफ थंड झालेलें पंचपात्र पुनः गरम करण्यासाठीं फुकट जात असे. तसेंच आंत येणारी व बाहेर जाणारी वाफ यांची प्रवाहाची दिशा परस्पर विरुद्ध असल्यामुळें ती वाफ बाहेर काढून टाकण्यासाठीं सुद्धां कांहीं शक्ति खर्ची पडत असे. हे दोष काढून टाकण्यासाठीं एंजिनची धांव पुरी होतांच तेथेंच वापरलेली सर्व वाफ बाहेर निघून जावी अशी योजना केली. या प्रकारच्या एंजिनमध्यें वाफेच्या प्रवाहाची दिशा एकच असल्यामुळें त्यांना सरलवाही (युनीफ्लो) एंजिन असें म्हणतात. हें एंजिन एकाच पंचपात्राचें असून सुद्धां द्विधावक (कँपाउंड) एंजिनपेक्षां उत्कृष्ट तऱ्हेनें काम देऊं शकतें. अशा तऱ्हेचीं एंजिनें शीतक (कन्डेन्सिंग) असतात.

वाफेनें चालणारें जलभ्रामक हाहि एक एंजिनचाच प्रकार आहे. जलभ्रामक पाहा.

**बाष्पघण**—वाफेनें चालणारा हातोडा. हा उभ्या वाफेच्या एंजिनप्रमाणें असतो. पण यामध्यें वाफेच्या एंजिनची गति वर्तुळाकार करण्यासाठीं जी योजना असावी लागते ती यांत नसते. त्याच्या जोडदांड्याला एक वजन बसवून लोहाराच्या घणाप्रमाणें वाफेच्या दाबानें त्यानें घाव मारावा अशी योजना असते. घाव लहान-मोठा बसण्याचीहि व्यवस्था यांत केलेली

असते. घण मारण्यासाठीं याचा उपयोग केला जात असल्यानें त्याला हातोडा किंवा घण असें म्हणतात.

**बाष्पीभवन**—(इव्हॅपोरेशन). एखाद्या द्रव पदार्थाची जी स्वाभाविकपणें वाफ होत असते त्या क्रियेस बाष्पीभवन असें म्हणतात. जेव्हां एखाद्या बंद अवकाशामध्यें एखाद्या द्रव पदार्थाचें त्याच्यावरील बंद जागेमध्यें बाष्पीभवन होत असतें तेव्हां एकदां अशी स्थिति निर्माण होते कीं, वरील जागा बाष्पसंपृक्त होते आणि त्यामुळें पुढें बाष्पीभवन होणें अथवा त्या द्रवाच्या स्थितींत फरक पडणें या गोष्टी आपल्या दृष्टीस पडत नाहींत. बाष्पीभवन होत असतांना जी वाफ तयार होत असते ती कांहीं उष्णता शोषून घेत असते व ही उष्णता द्रवरूपाचें बाष्परूपांत स्थित्यंतर झाल्यामुळें त्या वाफेंत अनुद्भूत उष्णता म्हणून वास करीत असते. या स्थित्यंतरास लागणारीहि उष्णता त्या द्रव पदार्थांतूनच मुख्यत्वें घेतली जाते व त्या द्रवरूप पदार्थाशेजारीं असलेल्या वस्तूहि या क्रियेमुळें थंड होतात. याच क्रियेमुळें आपले कपडे भिजल्यानंतर आपणांस थंडी वाजूं लागते. उष्ण प्रदेशामध्यें पाणी थंड होण्याकरितां माठामध्यें किंवा सच्छिद्र पात्रामध्यें ठेवण्यांत येतें. वातावरणामध्यें जी आर्द्रता असते तिचें कारणहि हें बाष्पीभवनच होय. बर्फ करण्याच्या कारखान्यामध्यें याच बाष्पीभवनाच्या गुणधर्मांचा उपयोग करण्यांत येतो.

**बांसडा संस्थान**—मुंबई इलाख्यांत, जुन्या सुरत एजन्सीमधील एक संस्थान. क्षे. फ. २१५ चौरस मैल. पावसाचें सरासरी वार्षिक मान ८० इंच आहे. येथील रजपूत संस्थानिक सोळंकी वंशांतील आहेत. बांसडाजवळच्या एका तटाचे अवशेष, देवालयें, कालवे यांवरून हें संस्थान पूर्वी भरभराटींत असावें असें ओळखूं येतें. येथील संस्थानिकाला महारावळ म्हणतात व त्याला ९ तोफांची सलामी मिळते. संस्थानिकांचे एक पूर्वज जयसिंह यानें दक्षिण गुजराथेंत एक मोठें राज्य स्थापन केलें. त्यापैकीं आजचें बांसडा संस्थान आहे. सध्यांचे महारावळ इंद्रसिंहजी प्रतापसिंहजी १९११ त गादीवर आले. संस्थानची लो. सं. (१९४१) ५४,७६४. बहुतेक लोक कोकणा, चेभ्रा, धोंडिया, गमतां, वगैरे रानटी टोळयांपैकीं आहेत. त्यांचा धर्म हिंदु आहे. भात, नागली, कोद्रा, कडधान्यें हीं येथील मुख्य पिकें आहेत. थोडा कापूस व गहूंहि होऊं लागला आहे. सुताची फीत, चटया, पंखे, गालिचे, वगैरे जिन्नस येथें तयार होतात. संस्थानचें एकंदर उत्पन्न ७½ लक्ष रु. आहे. हें संस्थान आतां मुंबई प्रांतांत विलीन झालें आहे.

**बांसवाडा संस्थान**—राजपुतान्यांतील सर्वांत दक्षिणेकडील संस्थान. क्षे. फ. १,९४६ चौरस मैल. माही व तिला मिळणारी अनास या ह्या संस्थानांतील मुख्य नद्या आहेत. सर्व राजपुतान्यांत हा प्रदेश फार सुंदर आहे. वार्षिक पावसाचें मान सरासरी ३८ इंच आहे. १५३१ सालीं बांसवाडा हें निराळें संस्थान झालें. संस्थानची लो. सं. (१९४१) २,९९,९१३. शें. ६३ वन्य लोक व शें. ३० हिंदू आहेत. संस्थानचा अर्धाअधिक भाग जंगलानें व्याप्त असून ईशान्येकडील भागांतील जंगलें दाट आहेत. जंगलांत साग, पिंपळ, वगैरे झाडें आहेत. ओबडधोबड कापड, लाखेच्या बांगड्या, लांकडी खेळणीं, वगैरे जिन्नस या संस्थानात तयार होतात. उत्पन्न साधारणपणें ९ लक्ष आहे. बांसवाडा हें राजधानीचें शहर आहे. गांवाभोंवतीं तट असून त्याच्या दक्षिणेकडील भागाखेरीज इतर भाग चांगल्या स्थितींत आहे. दीड मैलावर एका बागेंत येथील राजाची छत्री (समाधि) आहे. ऑक्टोबर महिन्यांत येथें जत्रा भरत असते.

हें घराणें अहर सिसोदिया रजपूत असून त्यांतील महारावळ जगमल सिंघजीनें हें १५२७ सालीं स्थापन केलें. या घराण्यांतील कुशलसिंह व पृथ्वीसिंह हे शूर निघाले व त्यांनीं राज्यविस्तार केला. पुढें हें संस्थान धारचें मांडलिक बनलें. हल्लींचे महाराज चंद्रवीरसिंह १९४४ सालीं गादीवर आले. प्राथमिक व दुय्यम शिक्षण मोफत आहे. हें संस्थान आतां राजस्थान संघांत सामील झालें आहे.

**बासोडा**—याला हैदरगड बासोडा किंवा महंमदगड बासोडा म्हणतात. हें मध्य हिंदुस्थानांतील एक संस्थान माळव्यामध्यें आहे. क्षे. फ. सरासरी ४५ चौरस मैल आहे. लो. सं. तीन हजार. या संस्थानचें नांव बासोडा शहरावरून पडलें आहे व हें शहर १० व्या शतकांत ओर्च्छाचा राजा वीरसिंगदेव यानें वसविलें. बासोड्याचे नबाब हे अठराव्या शतकांतील बराकसाई फिरोज खेलच्या महंमद दिलेरखान नांवाच्या अफगाणानें स्थापिलेल्या कोरवाई कुळाचे वंशज आहेत. हें संस्थान ग्वाल्हेर संस्थानचें ताबेदार आहे, तरी खंडणी वगैरे कांहीं देत नाहीं. संस्थानांत एकंदर २० खेडीं आहेत. जमीन सुपीक असून पिकें चांगलीं होतात. संस्थानचें उत्पन्न अर्धा लाख रुपये आहे. हें संस्थान आतां मध्यभारत संघांत सामील झालें आहे.

**वास्क लोक**—हा फ्रान्सच्या नैर्ऋत्य भागांत राहणारा वैशिष्टयपूर्ण लोकसमाज आहे. या लोकांची मुख्य वस्ती स्पेनच्या उत्तर भागांत आहे. हे लोक प्राचीन आयबेरी लोकांचे वंशज असावेत. आयबेरी लोक स्पेनमध्यें केल्ट लोक येण्यापूर्वी राहत असत. ह्या बास्क लोकांची प्राचीन भाषा, रीतिरिवाज व राष्ट्रीय नाचाचे प्रकार अद्यापहि कायम आहेत. हे लोक युद्धकलेंत विशेषतः गनिमी काव्याच्या डावपेचांत विशेष तरबेज असतात. त्यांची भाषा इतर युरोपीय भाषांहून अगदीं भिन्न

आहे, व ती अनेक शब्दसमासयुक्त (पॉलिसिन्थेटिक) आहे. बास्क लोकांची एकंदर लो. सं. ६,००,००० (४,५०,००० स्पेनमध्यें व १,५०,००० फ्रान्समध्यें) आहे.

**बॉस्को, सेंट जॉन** (१८१२-१८८८)—यानें सालेसियन पंथाची स्थापना केली. याचा जन्म एका गरीब इटालियन कुटुंबांत झाला. याला धार्मिक अभ्यास करण्याकरितां धर्मादायाची मदत घ्यावी लागली. तो लहान असतांनाच आपल्या गरीब संवगड्यांची काळजी घेत असे. धर्मोपदेशक झाल्यानंतर त्यानें आपल्या गरीब सहचरांकरितां एक प्रवचनालय, एक रात्रीची शाळा, एक अनाथगृह व पुढें एक तांत्रिक शाळा स्थापन केली व तीस जोडून एक कारखाना काढला. आपल्या कांहीं शिष्यांसह त्यानें सॅलेशियन पंथाची स्थापना केली. या पंथास १८७४ मध्यें मान्यता मिळाली. आतांपर्यंत जें कार्य त्यानें मुलांकरितां केलें तेंच कार्य मुलींकरितां करण्यासाठीं त्यानें 'सेंट मेरी ऑक्सिलिॲट्रिक्स' नांवाचा एक मुलींचा पंथ काढला.

सेंट जॉन बास्को याची प्रसिद्धि कांहीं लोकप्रिय ग्रंथांचा कर्ता म्हणूनहि झालेली आहे. तसेंच त्यानें अनेक देवळें बांधलीं व चमत्कारहि केल्याची प्रसिद्धि आहे. त्याच्या स्वभावांतील मर्म व त्याच्या शिक्षणाची गुरुकिल्ली दानशीलता व कृपाळुपणा ही होय. त्याला १८३४ सालीं संत-मालिकेंत प्रविष्ट करण्यांत आलें.

**बॉस्कोव्हिच, रॉजर जोसेफ** (१७११-१७८०)—एक इटालियन ज्योतिषशास्त्रज्ञ आणि गणितशास्त्रज्ञ. तो जेसुइट पंथाचा सभासद झाला; आणि त्यानें ज्योतिषशास्त्रांत व भूमापनशास्त्रांत (जिऑडेसी) महत्त्वाची भर घातली.

**बॉस्परस सामुद्रधुनी**—हिला कॉन्स्टांटिनोपलची सामुद्रधुनी असेंहि म्हणतात. ही १९ मैल लांब असून काळा समुद्र मार्मोराच्या समुद्राला जोडते. लॅसेनच्या तहानें ही सामुद्रधुनी सर्व राष्ट्रांच्या नाविक वाहतुकीला मोकळी करण्यांत आली आणि या सामुद्रधुनीच्या भोंवतालच्या आशियांतला व युरोपांतला प्रदेश बिनलष्करी म्हणून ठरविला; पण १९३६ सालीं तुर्कस्ताननें यांत लष्कर ठेवण्याची सवलत मिळविली. या सामुद्रधुनीवर (सुमारें ३,००० फूट रुंदी असलेल्या) दरायस बादशहानें आपल्या सिथियन स्वारीच्या वेळीं एक बोटींचा पूल बांधला होता. काळा समुद्र अझोव्हच्या समुद्राला जोडणाऱ्या सामुद्रधुनीला प्राचीन काळीं 'दि सिमेरिअन बॉस्परस' असें नांव होतें.

**बॉस्वेल, जेम्स** (१७४०-१७९५)—डॉक्टर जॉनसनचा मित्र व त्याचा चरित्रकार. स्कॉटिश न्यायाधीश लॉर्ड ऑचिनलेक याचा हा वडील मुलगा. तो स्कॉटलंडमध्यें वकिलीचा धंदा करीत असे, पण त्या धंद्याकडे त्याचें फारसें लक्ष नसे. १७६३ सालीं त्याची जॉनसनबरोबर ओळख झाली. नंतर त्यानें फ्रान्समध्यें व्होल्टेअरची व रूसोची, आणि कॉर्सिका बेटांत पाओली या पुढाऱ्यांची भेट घेतली; आणि १७६८ त त्यानें आपली 'कॉर्सिकाची हकीकत' लिहिली. पुढें जॉनसनबरोबर त्याचा निकट स्नेह जमल्यामुळें जॉनसनच्या आयुष्यक्रमाची त्यानें तपशीलवार दैनंदिन नोंद लिहिण्याचें काम केलें. १७७३ सालीं जॉनसनबरोबर त्यानें स्कॉटिश हायलंड प्रदेशांत व हेब्रिडीज बेटांत प्रवास केला. त्यासंबंधींहि त्याचा एक ग्रंथ आहे. १७८४ सालीं जॉनसन वारल्यावर त्यानें जॉनसनचें उत्कृष्ट चरित्र प्रसिद्ध केलें (१७९१).

**बाहवा वर्ग**—[वर्ग-लेग्युमिनोसी; उपवर्ग-सिसालपिनी]. या जातीच्या वनस्पतींत कांहीं झाडें, झुडपें व वनस्पती येतात. यांचीं पानें देंठापासून एकदम दोन्ही बाजूंना फुटलेलीं असतात. व बहुधा त्यांच्या देठांवर ग्रंथी असतात. यापैकीं कांहीं जातींचीं वाळलेलीं पानें म्हणजेच सेन्ना नांवाचें मिळणारें रेचक औषध होय. यांचीं पानें व फुलेंहि रेचक आहेत. हिंदुस्थानांत आढळणाऱ्या या झाडाच्या कांहीं जातींची साल व मुळें औषधीकरितां वापरण्यांत येतात.

कॅसियाची साल म्हणून एक साल बाजारांत मिळते. ती निराळ्याच एका झाडाची (सिनामोनम कॅसिया) साल असते. ती दालचिनीसारखी दिसते पण हलकी असते. ती दालचिनी म्हणूनच विकली जाते व दालचिनीचा अर्क किंवा तेल काढण्याच्या कामीं तिचा उपयोग करतात.

हीं झाडें फार मोठीं होतात. यांना पिवळीं फुलें व हातभर लांबीच्या शेंगा येतात. ऊन करून यांतील मगज काढतात. तो रेचक म्हणून उपयोगी आहे. साल औषधी असून कातडी कमविण्याच्या कामीं तिचा उपयोग करतात. बंगाल्यांत ओढण्याची तंबाखू जास्त सुवासिक करण्याकरितां याचा उपयोग करतात. बाहव्याचीं पानें त्वग्रोगावर गुणकारी असतात.

**बाहु**—मनुष्याच्या शरीरांत वक्षःस्थळाशीं स्कंधास्थीनें किंवा कंठास्थीनें जोडलेलें एक गात्र. यामध्यें तीन हाडें असतात: एक भुजास्थि व दुसरीं दोन कूर्परास्थी. यास पंजाच्या अस्थी जोडलेल्या असतात. भुजास्थीचें वरचें टोंक स्कंधास्थीच्या खोबणीमध्यें उखळीच्या सांध्यानें जोडलेलें असतें व खालचें टोंक रुंदट असून त्यास कप्पीसारखी योजना केलेली असते व त्यास कोपराचीं हाडें जोडलेलीं असतात. हा सांधा बिजागरीचा असतो. त्यामुळें या हाडांची हालचाल एकाच दिशेनें करतां येते. यांतील आंतील हाड वरच्या बाजूस जाड असून त्यांत दोन पुढें आलेले भाग असतात व त्यांमध्यें भुजास्थि बसविलेला असतो. बाहेरचें हाड

बारीक असून तें वरच्या टोंकाशीं रुंद होत गेलेलें असतें व तेथें तें मनगटाचा मुख्य भाग असतें. सामान्यतः सर्व सपृष्ठवंश प्राण्यांमध्यें हीच हाडांची रचना आढळून येते.

**बाहुपाद प्राणी**—(ब्राकिओपोडा). हा एक कवचधारी प्राण्यांचा वर्ग आहे. हे मृदुकाय शिंपासारखे प्राणी असून यांना दोन कवचें असतात. जुन्या दिव्याप्रमाणें यांचा आकार दिसतो म्हणून यांना 'दिव्याच्या शिंपा' म्हणतात. यांना नैसर्गिक गति नसते व ते कांहीं समुद्रामध्यें पाण्यांतील इतर प्राण्यांस किंवा वस्तूंस चिकटून राहतात, व त्या वस्तूंस यांच्या तोंडाजवळ असलेल्या एका छिद्रांतून बाहेर येणाऱ्या अवयवानें धरून ठेवतात. हा अवयव खालच्या कवचीमधून बाहेर आलेला असतो.

**बाहुल्या**—लहान मुलांना-विशेषतः मुलींना-खेळण्याकरितां बाहुल्या देण्याची पद्धत गेल्या पांच हजार वर्षांपासून चालू आहे. सुमेरियन, ईजिप्शियन, ग्रीक आणि रोमन सांस्कृतिक अवशेषांतून बाहुल्या सांपडतात. बाहुलीच्याच आकृतीच्या कांहीं मनुष्यांच्या आकृतींची पूजा किंवा त्यांचा धार्मिक कृत्यांत उपयोगहि आज हजारों वर्षें चालू आहे. कदाचित् सध्यांची बाहुली ही पूर्वीच्या देवतांच्या आकृतींवरूनच बनविण्यांत आली असावी. बाहुल्या बहुतेक स्त्रीच्या आकृतीच्या असतात. यावरून विश्वाची जननी जी मातृदेवता तिचें त्या प्रतीक असण्याचा संभव आहे.

पाश्चात्य देशांत खेळणीं करण्याच्या धंद्यांत बाहुल्यांना फार महत्त्वाचें स्थान आहे. बाहुल्यांचीं घरें, त्यांचे कपडे, दागदागिने वगैरे गोष्टी या धंद्यांत येतात. आपल्याकडे पूर्वी जिनगर लोक चांगल्या बाहुल्या व निरनिराळ्या प्रसंगांचे देखावे करीत. आतां त्यांची ही कला लुप्त होऊन विलायती पद्धतीवर बाहुल्या करण्याचा धंदा कांहीं बायकांनीं उचलला आहे. बाहुल्या करण्याचें सर्व सामानहि आयतें मिळतें. महायुद्धापूर्वी जपानचीं खेळणीं फार येत व तीं स्वस्तहि असत. आतां परदेशी खेळणीं फार येत नसल्यानें या धंद्याला बराच वाव आहे.

**बाहेरची धांव**—(टायर). पायगाडीच्या व मोटारगाडीच्या चाकांना या रबरी धांवा असतात. प्रथम पायगाडीला भरीव रबराच्या धांवा बसवीत असत. पुढें १८८७ सालीं बेलफास्ट येथील एक पशुवैद्य जे. बी. डनलॉप (१८४८-१९२१) यानें अलीकडील हवा भरण्याच्या पोकळ धांवा शोधून काढल्या. या धांवा बहुधा कापडावर रबर चढवून तयार केलेल्या असतात. यांचे कांठ अशा तऱ्हेनें बनविलेले असतात कीं, ते चाकाच्या खोबणींत घट्ट बसून राहतील. या धांवामध्यें एक रबराची नळी घातलेली असते. ती हवा भरून फुगविली म्हणजे धांवा घट्ट होऊन रस्त्याचा दाब सहन करण्यास समर्थ होतात.

**बाहेरवटे**—हिंदुस्थानांत कित्येक लोकांमध्यें आग्रह करून दुसऱ्यास वश करण्याच्या चाली होत्या. रजपूत लोकांत बाहेरवटे म्हणून होतात. म्हणजे कोणास राजाचा जुलूम किंवा अन्याय झाला असें वाटूं लागलें म्हणजे, ज्यास तो जुलूम लागू होतो तो मनुष्य घर सोडून रानांत जाऊन अनेक प्रकारचे दंगे करतो, वाटा मारतो व गांव लुटतो. असा दहा दहा वर्षें त्याचा उपद्रव चालतो. राजाच्या फौजा त्याजवर जातात, तरी तो सांपडत नाहीं. दक्षिणेंत रामोशी लोक याच प्रकारचे दंगे करीत. याप्रमाणें उमाजी नाईक १८२८ सालीं झाला व राघोजी भांगऱ्या वगैरे याच प्रकारचे दंगे करून गेले. गुजराथेंतहि ब्राह्मण व भाट हे त्रासा व त्रागा करीत; म्हणजे खून करूं, लुटूं, अशा प्रकारचीं पत्रें लिहून झाडांस बांधीत, दुसऱ्याच्या घरीं जाऊन आपलाच गळा कापीत, किंवा आपल्या घरचें एखादें पोरबाळ नेऊन मारीत, आणि त्याचें डोकें कापून त्याचें तोरण ज्यावर त्रागा केला त्याच्या घरास बांधीत; व जरी ते ती हत्या स्वतः करीत, तरीहि 'हत्या तुझ्यावर आहे' असें ते म्हणत. १८६० सालीं खंडेराव गायकवाडांनीं पैमाप करण्याचा हुकूम केला, तेव्हां सर्व भाट वगैरे जमून 'पैमाप करूं नये' म्हणून म्हणाले, आणि कित्येक तर कडी प्रांतांत आपल्या अंगावर तेल ओतून उभे जळाले! तेव्हां अशा त्रागा करणाऱ्यांस धरून खंडेरावांनीं त्यांचें पारिपत्य केलें. तरी लोकांमध्यें त्यांचें भय फार आहे व म्हणून अद्यापिहि जामीन घेणें तर भाटास घेतात अशी पूर्वापार रीत गुजराथेंत चालू आहे. कर्नाटकांत काटक लोक आहेत, त्यांस कांहीं पीडा झाली किंवा पीडा नसूनहि त्यांस ती पीडा अशी वाटली तर ते तळई करतात. म्हणजे ज्यांच्याकडून पीडा होते असें त्यांस वाटतें त्यांचीं गुरें चोरतात, त्यांचीं खळीं व घरें जाळतात आणि शेतें कापतात. याचप्रमाणें आपल्या इकडे बाजारकरी वाणी यांस कांहीं विरुद्ध वाटलें म्हणजे ते हरताळ पाडतात; रयतेस वाईट वाटलें म्हणजे ती फरारी होते व गांव सोडून देते. अशा अनेक प्रकारच्या चाली पूर्वी या देशांत होत्या, परंतु त्या इंग्रज सरकारच्या राज्यांत बंद झाल्या व पूर्वीप्रमाणें पीडाहि कमी झाल्या. तरी खानदेशांत जेव्हां पैमापी झाली तेव्हां लोक आडवे झाले व त्या वेळीं फौज पाठवून त्यांचा बंदोबस्त करावा लागला. सत्याग्रहाचीं अशींच उदाहरणें कधीं कधीं घडतात. अशा लोकांस युरोपांत 'औटलॉ' म्हणतात. मध्ययुगांत एखाद्या बंडखोरास ही शिक्षा देण्यांत येई. अशा माणसाला कोणीं ठार मारलें किंवा त्याची मालमत्ता लुटली तर सरकार त्याला कायद्याचें संरक्षण देत नसे.

**बाह्यगोल भिंग**—(लेन्स). दृक्शास्त्रामध्यें गोल अशा कांचेच्या किंवा एखाद्या पारदर्शक पदार्थाच्या दोन्ही बाजूंस घासून गुळगुळीत केलेल्या तुकड्यास भिंग असें म्हणतात. सामान्यतः हीं भिंगें बाह्यगोल किंवा अंतर्गोल असतात. बाह्यगोल भिंगें हीं मध्य भागीं जाड असून त्यांतून जाणाऱ्या प्रकाशकिरणांस केंद्रित करतात. अंतर्गोल भिंगें मध्य भागीं पातळ असून त्यांतून जाणाऱ्या किरणांचें प्रसारण करतात. जेव्हां किरणें अशा भिंगाच्या अक्षाशीं समांतर म्हणजे दोन्ही पृष्ठभागाशीं काटकोनाच्या दिशेनें या भिंगावर पडतात, तेव्हां बाहेर पडणारे किरण एका मुख्य केंद्रामध्यें अक्षावर संकेंद्रित होतात. असे दोन केंद्रबिंदू असतात व ते भिंगाच्या प्रत्येक बाजूस एक याप्रमाणें असतात. या केंद्राचें भिंगापासून जें अंतर असतें त्यास केंद्रांतर (फोकल लेंग्थ) असें म्हणतात. या केंद्रांतराचा व्यस्त अंक म्हणजे त्या भिंगाची शक्ति समजली जाते. जेव्हां एखादा तेजोमय पदार्थ बाह्यगोल भिंगाच्या अक्षरेषेमध्यें असतो, तेव्हां त्या बिंदूंतून किरण प्रसरण पावतात व त्यांतील कांहीं किरण या भिंगांतून जातात आणि तें जर केंद्रगतिक असलें तर अक्षरेषेवर त्यांची एक प्रतिमा पडते. हे दोन बिंदू म्हणजे एक केंद्रयुग्म होय. हे दोन बिंदू स्थानांतर करूं शकतात. म्हणजे प्रकाशबिंदूच्या ठिकाणीं प्रतिमा व प्रतिमेच्या जागीं प्रकाशबिंदु अशीहि स्थिति राहूं शकते. जेव्हां प्रकाशदायक बिंदु भिंगापासून दूर असतो तेव्हां त्याची प्रतिमा मुख्य केंद्राच्या ठिकाणीं पडते. फोटोग्राफरच्या कॅमेऱ्यामध्यें तो लांब-आंखूड करण्याची योजना केलेली असते ती अशाकरितां कीं, हें प्रकाशकेंद्र नेमकें कांचेच्या पडद्यावर यावें व निरनिराळ्या अंतरावर असलेल्या पदार्थांची प्रतिमा त्या कांचेच्या पडद्यावरच पडावी.

**बाह्य त्वचा**—(एपिडर्मिस). वनस्पतिशास्त्रांत पानांवरील व कोंवळ्या खोडांवरील पेशीमय आवरणास बाह्य त्वचा म्हणतात. या आवरणाचें मुख्य कार्य वनस्पतींतून बाष्प बाहेर येऊं न देणें हें होय. याकरितां या आवरणाची बाहेरील बाजू अभेद्य बनली असते; म्हणजे या आवरणांतील अगदीं बाहेरच्या पापुद्र्यावर अशी रासायनिक क्रिया होत असते कीं, तिच्यामुळे तो पापुद्रा अभेद्य होतो म्हणजे त्यांतून पाणी किंवा वायु बाहेर पडूं शकत नाहीं. या बाह्य त्वचेवर केव्हां केव्हां निरनिराळ्या प्रकारची लव किंवा केंस असतात. ज्या झाडांचीं खोडें जाड होत जातात म्हणजे अनेक सालींचे थर धारण करतात त्या झाडांची साल पुष्कळदां निघून पडते व त्यांचें आवरण त्यांच्या आंतील बुचासारख्या पदार्थानें किंवा दुसऱ्या सालीनें होतें.

**बाळंतशेप**—हिंदुस्थानामध्यें उष्णकटिबंधांत व त्याच्या जवळच्या प्रदेशांत होणारें झुडुप. याचा भाजीपाल्याप्रमाणें उपयोग होतो. साबणाला सुवास आणण्याकरितांहि याचा उपयोग करतात. याचीं फळें किंवा पानें आमटींत टाकल्यास तिला चांगला वास लागतो. बाळंतशेप स्निग्ध व गोड असते. ती पानथरी, जंत व मूळव्याध हे रोग घालविणारी व क्षयरोगांत हितकारक आहे. ही बलकारक व वात आणि कफ यांस घालविणारी आहे.

**बाळंभट्ट पायगुंडे** (१७३०–१८२०)—एक संस्कृत पंडित. यांचे 'धर्मशास्त्रसंग्रह', 'जीवत्पितृकर्तव्यनिर्णय' व 'उपाकृतितत्त्व' हे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. यांनीं मिताक्षरेवर 'बालम्भट्टी' नांवाची टीका लिहिली असून ती आपल्या आईच्या शांतवनासाठीं लिहिली असें म्हणतात. यांच्या वडिलांचें नांव वैद्यनाथ व आईचें लक्ष्मीबाई होतें.

**बाळाजी आवजी चिटणवीस** (मृ. १६८१)—शिवाजीचा मुख्य चिटणीस. बाळाजी आवजीचे वडील आबाजी हरि मुजुमदार; उपनाम चित्रे. आबाजी हा सुमारें ११ वर्षेपर्यंत जंजिऱ्याचा बाबजीखान हबशी याचा मुख्य कारभारी होता. इ. स. १६३५ च्या सुमारास बाबजीखान अत्यवस्थ असतां आबाजीचा भाऊ खंडोबा 'बाबजीखान उदईक मरेल' असें बोलला. 'बाबाजीखानास खंडोबांनीं आपलें जें कुलदैवत खंडेराय त्याच्या साहाय्यानें कुडें करून मारिलें', असें बेगमांच्या व त्याच्या पुत्राच्या मनांत कोणीं भरवून दिलें. त्यामुळें आबाजीवर सर्वांचा रोष झाला व त्याला 'आमुचे चित्तीं ती स्वामीभक्ति एक' हा एकच मंत्र जपीत दिलेला विषाचा पेला सेवन करावा लागला. नंतर आबाजी व खंडोबा यांना पोत्यांत घालून समुद्रांत फेंकून दिलें व आबाजीची पत्नी रखुमाई किंवा बुलगाई हिला व तिचे पुत्र बाळाजी, चिमणाजी व शामजी अशा चौघांस गुलाम म्हणून दूर नेऊन विकण्यास आज्ञा केली. त्यांचें घरदार जप्त करून जाळपोळ केली. परंतु या चौकडीला तारवांतून नेत असतां वादळ झालें व खलाशांना जीव वांचविण्यास राजापुरींत शिरावें लागलें. मामांनीं या तीनहि मुलांची चांगली संगोपना केली व तीं मोठीं होतांच बाळाजीला राजापूरच्या कसबेदारापाशीं शिकण्यास ठेविलें. इ. स. १६४८ त शिवाजीनें राजापुराकडे मोहीम करण्याचें ठरविलें. तें ऐकून तेथील कसबेदारानें जीं कांहीं सामोपचाराचीं पत्रें पाठविलीं त्यांतच बाळाजीनें शिवाजीला एक गौरवपर पत्र लिहून आपला मनोदय कळविला. त्या पत्रांतील अक्षर, लेखन-कौशल्य व विशेषतः कळकळ पाहून शिवाजीनें बाळाजीला नोकरी दिली. त्याची सेवा पाहून बाळाजीस ता. १६ ऑगस्ट १६६२ रोजीं चिटणीशी दिली. बाळाजीस नेहमींच शिवाजीबरोबर राहावें लागे. मोंगल व इंग्रज यांच्याकडील राजकारणें बाळाजीनेंच साधलीं. बाळाजीला

पालखीचा सन्मान मिळाला. राज्याभिषेकाच्या वेळीं शिवाजीनें बाळाजीस मंत्रिपद देऊं केलें, पण त्यानें तें न स्वीकारतां राज्याची कारखानविसी व जमनिसी यांची वंशपरंपरा सनद घेतली. तो राज्याचा एक आधारस्तंभ होता. बाळाजीची लेखनशैली इतकी साधी, स्पष्ट व पूर्ण असे कीं, त्यामुळें राजकीय हुकुमांत कधींहि घोंटाळा उडत नसे. संभाजीनें बाळाजीस मानानें वागविलें. इंग्रजांकडील राजकारणहि बाळाजीनें तसेंच पुढें चालविलें. सोयराबाईनें जो विषप्रयोगाचा कट केला त्यांत बाळाजीचें अंग आहे, असें खोटेंच सांगून कलुशानें त्याला मारण्याचा हुकूम संभाजीकडून घेतला, व बाळाजी व त्याचा भाऊ चिमणाजी व पुत्र आवाजी यास परळीखालीं स. १६८१ च्या ऑगस्टांत ठार मारलें. मराठ्यांच्या इतिहासांत एकनिष्ठेच्या अनेक थोर उदाहरणांपैकीं बाळाजी आवजीचें एक आहे. तसेंच मोडी लेखनांत सुबोध व स्पष्ट वळणाचाहि आद्य मान बाळाजीकडे आहे.

**बाळाजी बाजीराव पेशवे** ( १७२१–१७६१ )— भट घराण्यांतील मराठे साम्राज्याचा तिसरा पेशवा. हा नानासाहेब या नांवानें प्रसिद्ध आहे. हा बाजीरावाचा थोरला मुलगा. लहानपणींच याला लष्करी व मुत्सद्देगिरीचें शिक्षण चांगलें मिळाल्यामुळें पोरवयांतच पेशवाई मिळतांच यानें राज्याचा सर्व कारभार आवरला. याचे प्रतिस्पर्धी बाबूजी नाईक, प्रतिनिधि, रघूजी भोसले, वगैरे शाहूच्या दरबारांत याच्या चुका काढण्यासाठीं टपून होते. पण यानें शाहू जिवंत असतां त्याची मर्जी फार सांभाळली. इतकेंच नव्हे तर त्याच्याखेरीज राज्यकारभाराला लायक दुसरा कोणी नाहीं असें अनेकदां पटवून दिलें.

शाहूच्या हयातींत सुरंजमेलसें, माळवा, प्रयाग, बंगाल, कर्नाटक या भागांत हा स्वतः मोहिमांवर गेला होता. राज्याला झालेलें अवाढव्य कर्ज यानें बरेंचसें फेडलें. यानें आपला चुलतभाऊ (चिमाजीआप्पाचा मुलगा) सदाशिवरावभाऊ याला आपल्यासारखेंच तरबेज करून कांहीं जबाबदाऱ्या त्याच्यावर सोंपविल्या. सख्खा भाऊ रघुनाथराव याला व मुलगा विश्वासराव याला असेंच तयार केलें. शाहूनें मरते वेळीं राज्याचा सर्व कारभार याच्याकडे सोंपविला. त्यामुळें पुढें या पेशव्याला एकतंत्री कारभार करतां आला. राजारामाची बायको कोल्हापूरची ताराबाई साताऱ्यास येऊन बसली होती व तिचें पेशव्यांविरुद्ध कारस्थान चाललेंच होतें. तिचा हस्तक जो दमाजी गायकवाड याचा नानानें पुरा मोड करून निम्मा गुजराथ त्याच्यापासून घेतला व त्याला ताबेदार केलें.

तसेंच निजामाला वठणीवर आणून दक्षिण मोकळी करण्याचा त्याचा प्रयत्न होता. तोहि बराचसा सिद्धीस गेला. दिल्लीच्या बादशहानें पेशव्याशीं करार करून आपल्याला व बादशाहीला संरक्षण मागितलें ( १७५४ ). तें पेशव्यानें दिल्यामुळें रघूजी भोसल्याशीं वितुष्ट आलें व एकाच मराठे साम्राज्याचे दोघे आधारस्तंभ परस्परांशीं लढतात असा प्रसंग आला. हीच गोष्ट आंग्ऱ्यांच्या बाबतींत झाली. पेशवे आणि आंगरे यांचें वैर जुनेंच होतें. तुळाजी आंगरे पेशव्यास जुमानीना. तेव्हां इंग्रजांच्या मदतीनें पेशव्यानें तुळाजीचें आरमार नष्ट केलें व त्याला कैदेंत ठेवलें. पण यामुळें इंग्रजांना वरचढ होऊं दिलें व शिवाजीनें मुद्दाम तयार केलेलें मराठ्यांचें आरमार बुडविलें व आपलें साम्राज्य कमकुवत करून घेतलें, हा नानावरचा आक्षेप खोडून काढणें जड जातें. ही चूकच झाली असें कोणीहि दूरदृष्टीचा विचारी इतिहासकार म्हणेल.

१७५८ च्या सुमारास मराठे साम्राज्याची सत्ता व वैभव कळसास पोंचलें होतें. हिंदुस्थानांत दुसरें एवढें मोठें व प्रबळ राज्य नव्हतेंच. इंग्रजांनीं हें तात्काळ ओळखून आपला वकील पुण्याच्या दरबारीं पाठविला. पण नंतर लवकरच उत्तरेकडे मुसलमानांची एकजूट या मराठेशाहीविरुद्ध झाली. अहमदशहा अबदाली या इराणच्या दुराणी बादशहाच्या स्वाऱ्या पंजाबवर १७४८ पासून चालल्या होत्या. त्याला पायबंद घालण्याचा रघुनाथराव व शिंदे-होळकर सरदार यांनीं प्रयत्न केला होता. पानपतावर शेवटीं उत्तर हिंदुस्थानांतील मुसलमान राजे अबदालीच्या नेतृत्वाखालीं एक होऊन त्यांनीं मराठ्यांशीं मोठी लढाई दिली. तींत मराठे साम्राज्याचें फार मोठें नुकसान झालें. ( पानपत पाहा ).

या पराभवाचा व विशेषतः भाऊ आणि मुलगा यांच्या मृत्यूचा नानासाहेबावर परिणाम होऊन तो उत्तरेकडे चाललेला परत पुण्यास परतला व लगेच पर्वतीस मृत्यु पावला ( ज्येष्ठ वद्य ६ शक १६८३ ).

हा पेशवा चांगला सुशिक्षित, कलमबहाद्दर, धोरणी व उमद्या स्वभावाचा होता. हा विलासप्रिय होता तरी याचें लक्ष सर्वत्र असे. याच्या कारकीर्दींत महाराष्ट्र देश व पुणें शहरहि वाढलें व अनेक ब्राह्मण-मराठे सरदार पुढें आले. मराठे साम्राज्याचा हाच मध्यान्ह काळ म्हणतां येईल. शिवाजीच्या स्वराज्याचें जें साम्राज्य झालें तें नंतर कांहीं काळ टिकलें. याची कारकीर्द चिरस्मरणीय राहील यांत शंका नाहीं.

सु. वि. भा. ४–४०

**बाळाजी विश्वनाथ पेशवे** ( मृ. १६६०–१७२० )— भट घराण्यांतील मराठे साम्राज्याचा पहिला पेशवा. हा मूळ जंजिरा संस्थानांतील श्रीवर्धनचा देशमुख. पण सिद्दीच्या छळा-

मुळें शिवाजीच्या कारकीर्दींत देशावर आला व सासवडच्या पुरंदऱ्यांच्या आश्रयानें राहिला. नंतर प्रथम सचिव व पुढें धनाजी जाधव याजकडे नोकरी केली व आपल्या हुशारीनें पुणें प्रांताचा सरसुभेदार झाला (१६९९). औरंगजेबाच्या दरबारींहि याचें वळण दिसतें. कारण यानें औरंगजेब भीमेकांठीं असतांना शाहूची व्यवस्था नीट राहावी अशी तरतूद केली होती.

शाहू सुटून आल्यावर यानें धनाजी जाधवास शाहूस मिळण्याचा योग्य सल्ला दिला व त्यामुळें शाहूच्या पक्षाची सरशी होऊन शाहूचें आसन स्थिर झालें. पुढें ताराबाईच्या पक्षास नामोहरम करण्याचा बाळाजीनें उद्योग केला व त्यांत त्याला यश लाभलें. राज्याच्या संरक्षणासाठीं यानें सैन्यबल वाढविलें. तेव्हां शाहूनें याला सेनाकर्तेपद देऊन गौरविलें (१७११). याच्यामुळें शाहूचें राज्य वाढलें. तेव्हां शाहूनें बहिरोपंत पिंगळ्याकडून पेशवाई काढून याला दिली (१७१३).

यानंतर बाळाजी दिल्लीच्या राजकारणांत शिरला. बादशहा आणि सय्यदबंधू यांचें वितुष्ट मराठ्यांना फायद्याचें झालें. कारण दोघेहि त्यांची मदत मागत. बाळाजीनें बादशहाचें संरक्षण करण्याचें पत्करून त्यापासून दक्षिणेंत चौथाई–सरदेशमुखी व कांहीं नवा मुलूख मिळविला. पुढें शाहूच्या बायकामाणसांची सुटका करून घेतली. बाळाजी स्वतः दिल्लीस जाऊन आला व तेथें त्यानें आपले लोक वकील म्हणून ठेवले व येतांना स्वराज्याच्या सनदा बरोबर आणल्या. या घटनेमुळें मराठे साम्राज्याच्या वाढीस आरंभ झाला. ही वाढ याच्या मुलांनीं व नातवांनीं पुरी केली. एव्हांपासून सर्व हिंदुस्थानांत मराठे दृष्टींत भरण्यासारखे पराक्रमी ठरले.

यानंतर बाळाजीनें राज्याची व्यवस्था उत्तम लावून दिली. चौथाई वसुलीसाठीं सरदारांना प्रदेश वांटून दिले व त्यांना पराक्रम दाखविण्याला उत्तेजन दिलें. त्याचे बाजी आणि चिमाजी हे मुलगे त्याच्याहून पराक्रमी निघाले. बायको राधाबाई हीहि फार हुशार व राजकारणी होती. याप्रमाणें राज्याची सुस्थापना बाळाजीनें जी केली ती पुढें पन्नास वर्षें टिकली.

**बाळाजी हरि (मज्यालसी) मेंडजोगी**—मराठेशाहींतील एक कुलकर्णी. नाशिक जिल्ह्यांतील चांदवड गांवचा हा कौशिक गोत्री, देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण तेथील चिटणीस होता. परंतु रोजगारानिमित्त आपलें गांव सोडून हा शहाजीबरोबर कर्नाटकांत गेला. हा अतिशय विश्वासू असल्यानें शहाजीनें यास शिवाजीकडे पाठविलें. शिवाजीबरोबर पुण्यास आल्यावर यानें पुणें प्रांतांतील वडगांव, नेवरज, चांदखेड, पिरगुट, वगैरे गांवांचें व खुद्द पुणें शहरांतील पेठ मलकापूर ऊर्फ रविवार यांचें कुलकर्णीपद मिळवलें. याचा मुलगा रघुनाथ बल्लाळ हा याच्या हयातींतच पायदळाचा सबनीस झाला. याचा दुसरा मुलगा नरहरपंत याजकडे स्वारीची बक्षीगिरी होती.

**बाळापूर**—वऱ्हाड, अकोला जिल्हा, क्षे. फ. ५६९ चौ. मैल. या तालुक्यांत १९३ खालसा आणि ९ जहागिरीचीं गांवें आहेत. तालुक्यांतील जमीन काळी व सुपीक आहे. बाळापूर गांव तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. मण व म्हैस यांच्या संगमाजवळ एक बाळा देवीचें देऊळ आहे त्यावरून गांवास बाळापूर हें नांव पडलें आहे. येथील छत्री व किल्ला प्रेक्षणीय आहे. हें नबाबांचें राहण्याचें ठिकाण होतें. येथें बऱ्याच प्राचीन मशिदी पाहवयास सांपडतात. लो. सं. दहा हजार असून निम्मे लोक मुसलमान आहेत. सतरंज्या, पागोटीं व इतर कापड यांबद्दल अद्याप बाळापूर प्रसिद्ध आहे.

**बाळा–बहिरू** (१७६१–१७८५)—एक मराठी लावणीकार. साताप्पा शिलारखान्याचा हा दुसरा मुलगा. याचें मूळ नांव बाळा. बहिरू रंगारी व हा यांमध्यें दाट मैत्री असल्यानें व दोघांनाहि लावण्या करण्याचा व म्हणण्याचा अतिशय नाद असल्यानें ही जोडी बाळा-बाहिरू या नांवानें तमाशांत चांगलीच चमकली. लावण्यांतील वर्णनांवरून असें दिसतें कीं, बाळा–बहिरूचा फड पुण्यांत माधवरावाच्या कारकीर्दीपासून गाजत असे व त्या वेळीं त्याचे सगनभाऊच्या फडाशीं अनेकवार सामने होत. बाळा-बाहिरूचा स्वतंत्र असा लावण्यांचा संग्रह नाहीं. मात्र नाना फडणीसावरील याचा पोवाडा अद्यापि गोंधळ्यांच्या तोंडून ऐकावयास मिळतो. यांचा कवनें करण्याचा उद्योग सवाई माधवरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीपर्यंत चालू होता असें यांच्या नाना फडणीसाच्या पोवाड्यावरून दिसून येतें. सासवडला बाळाची समाधि आहे.

**बाळीबाई (दीपाबाई)**—शिवाजीची सोयराबाईपासून झालेली मुलगी. हिला विश्वासराव घराण्यांत दिली होती.

**बाळोजी सुभानजी कुंजीर** (मृत्यु सन १८१७)—पेशवाईअखेरचा एक मुत्सद्दी. अंबाजी पुरंदरे याच्या घराण्याकडे इनाम असलेल्या वाघापूर गांवचा हा पाटील. हा गांव सासवडपासून चारपांच कोसांवर आहे. पुरंदऱ्यांनीं बाळोजीस कांहीं दिवस आपल्या खानदेशांतील गांवचा कमाविसदार नेमलें होतें. पुरंदऱ्यांच्या एका शाखेचा हा कांहीं दिवस कारभारीहि होता. शिंद्याच्या कैदेंतील बाजीरावाचा नानाशीं पत्रव्यवहार याच्यामार्फतच होत असे. बाजीराव पेशव्यानें नानानंतर जो दिवाण नेमला होता तो हाच. वसईच्या तहाच्या वेळीं बाजीरावानें यास शिंद्याकडे पाठवलें. आपल्या कारकीर्दींत यानें अनियंत्रित अमल गाजवला. हजारों जतींच्या सनदा काढून यानें लोकांना

फार त्रास दिला. सन १८१७ च्या एप्रिल महिन्यांत हा पंढरपुरास मृत्युमुखीं पडला.

**बाळोबा तात्या पागनीस** ( मृत्यु १८०० )—उत्तर पेशवाईतील एक मुत्सद्दी. जिवबादादा बक्षीनंतर हा हुशार सारस्वत ब्राह्मण दौलतराव शिंद्याचा कारभारी झाला. दुसऱ्या बाजीरावास गादीवर येण्यास याच्या मदतीचा फार उपयोग झाला. परंतु बाजीरावानें गादीवर येतांच नानाशीं संधान बांधण्याचें धोरण ठेवलें व दौलतरावास कबूल केल्याप्रमाणें रक्कम देण्याचें नाकारलें. तेव्हां बाळोबानें परशुरामभाऊच्या साहाय्यानें नानाच्या विरुद्ध कारवाई करून बाजीरावास कैद केलें व चिमाजीस गादीवर आणलें. परशुरामभाऊचें साहाय्य होतें म्हणूनच बाळोबाचीं पुण्यांतील कारस्थानें यशस्वी होत. पुढें नानानें हरएक प्रयत्नानें बाजीरावास व दौलतरावास याच्या विरुद्ध आपल्या बाजूस वळवलें. या वेळीं दौलतरावाचें मन बाळोबाविषयीं कलुषित झाल्यानें त्यानें यास कैदेंत टाकलें. परंतु महादजी शिंद्याच्या बायांचा दौलतरावास त्रास होऊं लागल्यानें यास सन १७९९ मध्यें कांहीं दिवस मुक्त करण्यांत आलें होतें. परंतु हा आपणांस त्रास देईल या भीतीनें बाजीरावानें यास परत कैद करण्याबद्दल दौलतरावास लिहिलें. त्याप्रमाणें दौलतरावानें यास परत नगरच्या किल्ल्यांत कैद करून ठेवलें. तेथेंच हा ता. १–११–१८०० रोजीं मरण पावला. याचें धाडस व हुशारी खरोखर वाखाणण्याजोगी होती.

**बिअर्डस्ले, ओब्रे व्हिन्सेंट** (१८७२–१८९८)—एक इंग्रज चित्रकार. त्यानें पुस्तकांकरितां आणि नियतकालिकांकरितां पुष्कळ चित्रें काढलीं. त्यांत त्याची कल्पकता, कलातज्ज्ञता आणि नावीन्यप्रेम हीं चांगलीं दिसून येतात. त्याच्या चित्रांचे तीन–चार संग्रह प्रसिद्ध झाले आहेत.

**बिआस**—पंजाबांतील पांच नद्यांपैकीं एक. हिलाच विपाशा असें प्राचीन नांव आहे. ही कुलूंतील रोहतंग घाटाच्या दक्षिणेस उगम पावते. नंतर मंडी संस्थानांतून वाहत जाऊन कांग्रा जिल्ह्यांत जाते. मंडी या शहरीं नदीवर चांगला झुलता पूल आहे. व कांग्रा जिल्ह्यांत डेरागोपीपूर येथें हिंवाळ्यांत हिच्यावर बोटींचा पूल केलेला असतो. ही नदी कांहीं मैल जालंदर जिल्ह्याशेजारून जाऊन अमृतसर व कपुरथळा संस्थानांमध्यें शिरते. शेवटीं ही सतलज नदीस जाऊन मिळते. या नदीची एकंदर लांबी २९० मैल आहे. हिला येऊन मिळणाऱ्या मुख्य नद्या चक्का व वेन या होत.

**बिओट, जीन बॅप्टिस्ट** ( १७७४–१८६२ )—एक फ्रेंच गणितशास्त्रज्ञ आणि पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. त्यानें प्रकाशाच्या वर्तुलध्रुवीभवनाचा शोध लावला व त्यामुळें त्याची विशेष प्रसिद्धि झाली आहे. त्यानें नियतकालिकातून पुष्कळ लेख लिहिले, आणि पदार्थविज्ञानशास्त्र आणि ज्योतिषशास्त्र या विषयांवर निबंध लिहिले. तसेंच प्राचीन ज्योतिषशास्त्राचा इतिहास आणि राज्यक्रांतिकाळांतील सृष्टिशास्त्रांचा इतिहास हे ग्रंथ लिहिले.

**बिकानेर संस्थान**—हें संस्थान राजपुतान्यामध्यें आहे. विस्ताराच्या मानानें राजपुतान्यांत याचा दुसरा क्रम लागतो. क्षे. फ. २३,३१७ चौरस मैल. हा प्रदेश सपाट, वालुकामय व ओसाड दिसतो. या जिल्ह्यांत घग्गर व काटली या दोन नद्या आहेत. हरण, काळवीट व लांडगे हीं जनावरें आहेत. पाऊस १२ इंच पडतो.

ह्या संस्थानचा मूळपुरुष बिका नांवाचा एक राठोड रजपूत होता. यानें १४६५ मध्यें या संस्थानची स्थापना केली. याच्या वंशजानीं भोंवतालचा मुलूख काबीज करून राज्याचा विस्तार वाढविला व त्यास बळकटी आणली. १५४१ सालीं मारवाडच्या मालदेवानें अर्धा मुलूख जिंकून घेतला व राजधानी आपल्या ताब्यांत घेतली. राजा कल्याणसिंग आपल्या मुलासह अकबराच्या भेटीस गेला व त्यानें आपली मुलगी अकबरास दिली. याचा मुलगा रायसिंग हा अकबराचा सेनापति होता. त्याच्या स्वामिभक्तीबद्दल त्यास ५२ जिल्ह्यांची जहागिरी बक्षीस देण्यात आली. यानें आपली मुलगी जहांगीरास दिली. याच्या कारकीर्दीत बिकानेरचा किल्ला बांधण्यांत आला. यानंतर करणसिंग नांवाचा एक थोर पुरुष या घराण्यांत होऊन गेला. यानें करणपूर, पद्मपूर व केसरीसिंगपूर हीं गांवें वसविलीं. १८५७ सालच्या बंडांत येथील राजानें म्हणजे रतनसिंगानें इंग्रज सरकारास मदत केली. गोऱ्या लोकांस आश्रय दिला म्हणून इंग्रज सरकारनें सिरसा जिल्ह्यातील तिरी परगणा या संस्थानास दिला. १८९८ सालीं गंगासिंग महाराज गादीवर बसले. १९०० सालीं दुष्काळांत त्यांनीं आपल्या प्रजेस फार मदत केली. गेल्या महायुद्धांत त्यांनीं साम्राज्य सरकारास बरीच मदत करून स्वतः रणांगणावर हजर राहिले. त्यामुळें त्यांना १९ तोफांच्या सलामीचा मान मिळाला. १९१८–१९ च्या तह–परिषदेंत हे हिंदी संस्थानिकांतर्फें प्रतिनिधि म्हणून होते. १९२१ सालीं नरेंद्र मंडळाचे पहिले चॅन्सलर निवडले गेले. यांचे चिरंजीव महाराज सादुलसिंह १९४३ सालीं गादीवर आले. यांनींहि दुसऱ्या महायुद्धात प्रत्यक्ष भाग घेतला होता.

संस्थानांत बिकानेर, चुरु, रतनगड व सरदार शहर हीं मोठीं गांवें आहेत. लो. सं. ( १९४१ ) १२,९२,९३८. लोकसंख्येपैकीं शें. ७० हिंदू आहेत. पाऊस १२ इंच पडतो. बाजरी, जोंधळा, हरभरा, वगैरे येथील मुख्य पिकें आहेत. दगडी कोळसा, मीठ, वालुकामय पाषाण, तांबें हे खनिज पदार्थ होत.

संस्थानचें उत्पन्न तीन कोटींवर आहे. संस्थान आतां बृहद्-राजस्थान संघांत सामील झालें आहे. बिकानेर ही या संस्थानची राजधानी आहे. लो. सं. १,२७,२२६. याच्याभोंवतीं एक तट आहे. बिका राजानें बांधलेला किल्ला एका उंच खडकावर आहे. विधिमंडळ व लालगड राजवाडा, प्रदर्शनाची इमारत, कचेऱ्या व कोर्टें, व्हिक्टोरिया क्लब व कॉलेज हीं पाहण्यासारखीं आहेत. सार्वजनिक बागेंत ६० फूट उंचीचा जयस्तंभ उभारलेला आहे. येथें खडीसाखर, शाली, ब्लॅंकेटें, रजया तयार करतात. या शहरापासून ५ मैलांवर देवीकुंड नांवाचा एक तलाव आहे. तेथें १४ राजपुरुषांच्या छत्र्या आहेत.

**बिगबेन**— लंडनच्या वेस्ट मिन्स्टर इमारतीवरील हें अजस्र घड्याळ असून, सर बेंजामिन हॉल, 'कमिशनर ऑफ वर्क्स' याच्यावरून बिगबेनमधील सर्वांत मोठ्या घंटेला बिगबेन म्हणूं लागले व तेंच नांव पुढें घड्याळाला पडलें. हें लंबकाचें जुन्या प्रकारचें घड्याळ आहे. हा लंबक १३ फूट लांब असून २½ टनांचीं वजनें त्याला वेग देतात. मनोऱ्यावरील चारहि बाजूंस लावलेल्या तबकड्या २३ फूट व्यासाच्या आहेत. त्यांतील प्रत्येक मिनिट-कांटा १४ फूट लांब व २०० पौंड वजनाचा आहे. वर्षांतून हा साधारणपणें १०० मैल फिरतो. बिगबेन घंटेखेरीज आणखी चार घंटा आहेत; त्या वाजल्यानंतर बिगबेनचे तासाचे ठोके पडतात. या घड्याळाच्या मनोऱ्यावर एक दिवा असतो व पार्लमेंटची बैठक चालू असतांना तो जळत राहतो व बैठक संपली म्हणजे स्पीकर आपल्या खुर्चीजवळचा स्विच दाबून दिवा मालवतो. या घड्याळाला ९० वर्षें होऊन गेलीं तरी त्यांत एक मिनिटाचाहि फरक दिसत नाहीं. जगांत सर्व ठिकाणीं रेडिओवरून या बिगबेनचे ठोके ऐकूं येतात.

**बिचवा**—( सं. निर्विषी. ठाकरी नांव कोंचडा ). हीं झाडें डोंगराळ प्रदेशांत होतात. पानें रुंद व कातरीदार असतात. त्यांची भाजी होते. मूळ विंचवाच्या नांगीप्रमाणें असतें व तें फार औषधी आहे. साप-विंचू वगैरेंच्या विषावर उगाळून लावतात. जखमेवरहि लावतात.

**बिजनोर**—सं. प्रांतांत रोहिलखंड भागांतील हा एक उत्तरेकडील जिल्हा आहे. क्षे. फ. १८६९. चौ. मै.. यांतून गंगा, मालिनी व कोह या नद्या वाहत जातात. या जिल्ह्यांत आंब्याच्या बागा व कुरणें फार आहेत. हिमालयाच्या सान्निध्यामुळें येथील हवा थंड व चांगली आहे. पाऊस सुमारें ४४ इंच पडतो. बिजनोर वेन राजानें वसविलें असे म्हणतात. त्याची राजधानी सध्यांच्या मंडावर गांवीं होती. या जिल्ह्यांत १६ मोठीं गांवें व २,१३० खेडीं आहेत. लो. सं. ( १९४१ ) ९,१०,२२३. यांतील शें. ६४ हिंदू व ३५ मुसलमान असून भाषा हिंदी आहे. मुख्य पिकें भात, गहूं, जव, बाजरी, हरभरा, ऊंस हीं आहेत. गूळ, साखर, दोरखंड व कांचेचीं भांडीं हे जिन्नस तयार होतात. बिजनोर तहशिलींत बिजनोर, दारानगर, मंडावर, चांदपूर, चासा हे परगणे आहेत. खेडीं ५७२ व बिजनोर, मंडावर, झालु, हालदौर, इत्यादि मोठीं गांवें आहेत. बिजनोर गांव हें नगीनापासून १९ मैलांवर आहे. येथें चाकू-कात्र्या तयार होतात.

**बिजावर संस्थान**—हें सनदी संस्थान मध्य हिंदुस्थानांत जुन्या बुंदेलखंड एजन्सींत आहे. क्षे. फ. ९८० चौ. मैल. गढामंडळ येथील गोंड संस्थानिकांच्या घराण्यांतील विजयसिंग नामक पुरुषानें या संस्थानचा पाया घातला म्हणून यास हें नांव पडलें आहे. येथील संस्थानिकास महाराजा सवाई असा किताब इंग्रज सरकारकडून मिळाला आहे व ११ तोफांच्या सलामीचा मानहि देण्यांत आला आहे. संस्थानची लो. सं. (१९४१) १,२०,९९०. यांत खेडीं ३१८ व मुख्य गांव बिजावर हें होय. येथील लोक बुंदेली भाषा बोलतात. कांदे, कुटकी, हरभरा, जव, वगैरे पिकें होतात. मुख्य ठिकाण बिजावर हें झांशी माणिकपूर रेल्वेचें स्टेशन आहे. हें संस्थान आतां विंध्यप्रदेश संघांत सामील झालें आहे.

**बिज्जल कलचुरी** ( ११५६-११६८ )—एक राजा. यास विज्जल असेंहि नांव आहे. चालुक्यांच्या सार्वभौम सत्तेवर यानें आक्रमण करण्याचे प्रयत्न केले. परंतु सन ११८३ मध्यें चौथ्या सोमेश्वर चालुक्यानें परत आपली सत्ता स्थापली व याचे प्रयत्न निष्फळ ठरले. तैल तिसरा ( चालुक्य ) याचा हा सेनापति असतांना यानें तैलाला बाजूस ठेवून आपणच महाराजाधिराज अशी पदवी घेतली. हा जैन होता. कर्नाटकांत याच्या वेळीं बौद्ध व जैन धर्मांविरुद्ध लाट उसळली असतां हल्लेमग्ग व मधुवरम् या दोघां साधूंचे डोळे काढल्याच्या आरोपावरून याच्या बसव नांवाच्या ब्राह्मण प्रधानानें याचा वध केला. असेंहि सांगतात कीं, यानें आपला मुलगा सोविदेव याच्यासाठीं राज्यत्याग केला.

**बिझिक**—पत्त्यांचा एक खेळ. यांत दोन गडी किंवा चार गडी असून दोन किंवा अधिक पत्त्यांचे जोड घेऊन खेळतात. दोन ते सहापर्यंत पत्ते काढून टाकतात व सत्त्यापासून राजा-एक्क्यापर्यंत पानें खेळांत घेतात. या खेळांत साध्य ठेवावयाचें तें असें कीं, शक्य तितके एक्के व दश्शे मिळविणें व आपल्या हातांत कांहीं ठराविक पानांच्या जोड्या जमविणें. या जोड्या जमतांच तावडतोब खालीं टाकून दाखवाव्या लागतात. यांत जोड्यांना गुण ( मार्क ) ठेवण्यांत आलेले असतात. १००० गुण होईपर्यंत हा खेळ खेळतात.

**बिट्टिदेव होयसळ** ( राज्य. ११००-४१ )—होयसळ राजघराण्यांतील एरेयंग होयसळाचा पुत्र. हा विष्णुवर्धन, बिट्टिग, त्रिभुवन मल्ल २ रा, उदयादित्य, वीरगंग व विक्रमगंग या नांवांनींहि ओळखला जातो. हा होयसळ वल्लाळ घराण्याचा संस्थापक होय. द्वारसमुद्र या शहराची स्थापना करून यानें तेथें राज्य केलें. आजच्या म्हैसूर संस्थानावर याचें राज्य होतें. याचा जैन धर्मास आश्रय असल्यानें याच्या कारकीर्दींत बरींच जैन मंदिरें बांधलीं गेलीं. परंतु ज्या वेळीं रामानुजानें वैष्णव धर्माचा प्रसार सुरू केला त्या वेळीं याच्या मनानें त्या धर्माकडे ओढ घेतली व हा वैष्णव धर्माचा उपासक बनला. होयसळ घराण्यांतील हा पहिलाच सुप्रसिद्ध राजा असून यानें आपल्या अनुयायांच्या साहाय्यानें होयसळ यादवांची सत्ता पुष्कळच वाढविली.

**बिठूर**—ब्रह्मावर्त. संयुक्तप्रांतांत, कानपूर जिल्ह्यांत व तहशिलींत कानपूर-अछेनरा या आगगाडीच्या फांट्यावर हें गांव गंगेच्या कांठीं वसलें आहे. लोकसंख्या ७१७२. सृष्टयुत्पत्तिकार्य संपल्यावर ब्रह्मदेवानें येथें अश्वमेध केला, अशी हिंदू लोकांची समजूत आहे. प्राचीन काळच्या बाणांचीं कांहीं मुखें येथें सांपडलीं आहेत. दुसरा बाजीराव पेशवा आपलें राज्य सोडल्यावर येथें येऊन कायमचा राहिला. येथें त्याचे वाडे व मोठा इतमाम होता. १८५७ सालच्या बंडांत इंग्रज शिपायांनीं पेशव्यांच्या मोठ्या वाड्यास आग लावून दिली व गांव उध्वस्त केला. बाजीरावाच्या वेळीं या गांवीं वस्ती वाढली होती. पुढें बाजीरावाचा कारभारी ( सुभेदार ) येथें राहूं लागला. त्याला ब्रिटिशांकडून कांहीं जहागिरी असे.

**बिडपाई, पिलपाई**—( विद्यापतीचा अपभ्रंश ). हा फार प्राचीन व लोकप्रिय पौरस्त्य कल्पित कथासंग्रहाचा सुप्रसिद्ध कर्ता आहे. या कथा पंचतंत्र नामक प्राचीन संस्कृत कथासंग्रहांतून घेतलेल्या आहेत. पंचतंत्र या ग्रंथाचें पेहलवी भाषेंत भाषांतर ६ व्या शतकांत करण्यांत आलें व या भाषांतरावरून पुढें ८ व्या शतकांत या कथांचें अरबी भाषेंत भाषांतर करण्यांत आलें; आणि नंतर या अरबी भाषेंतील ग्रंथावरून या कथांचें पाश्चात्य भाषांत भाषांतर करण्यांत आलें. या कथांचें पहिलें इंग्रजी भाषांतर १५७० सालीं प्रसिद्ध झालें.

**बिथिनिया**—हा प्राचीन जिल्हा आशिया मायनरच्या वायव्य भागांत होता. येथील मुख्य नद्या, सॅंगेरियस ( आधुनिक सॅकारिया ), ऱ्हिडेसस, बिलेयस ( फिलियस ) व पार्थेनियस ह्या आहेत. येथील जंगलांत इमारतीचें लांकूड विपुल आहे. दगडी कोळसाहि सांपडतो. रेशमासाठीं तुतीच्या झाडांची लागवड केलेली आहे. बिथिनिया हा प्रथम लिडियन राज्याचा भाग होता, नंतर त्याचा इराणी राज्यांत समावेश झाला ( खिस्तपूर्व ५४६ ). नंतर अलेक्झांडरनें हा पादाक्रांत केला. बिथिनियन राज्य खि. पू. २७८ त पहिल्या निकोमीडीजनें स्थापलें व खि. पू. ७४ पर्यंत तें स्वतंत्र होतें. त्या वर्षी तें रोमनांकडे गेलें व धाकटा प्लिनी त्याचा राजा बनला. १२९८ त तुर्कांनीं हा भाग जिंकून घेतला. बायझन्टाइन साम्राज्यांत सॅंगेरियसमुळें दोन भाग होऊन तिच्या पश्चिमेकडील भागाला बिथिनिया हें नांव मिळालें. राजधानीबद्दल स्पर्धा करणारीं निकोमीडिया व निकेई हीं दोन शहरें होतीं. सांप्रत इस्मीद ( निकोमीडिया ) व स्कुटारी हीं शहरें प्रसिद्ध आहेत.

**बिंदुसार मौर्य** ( राज्य. खि. पू. २९७-२७२ )—हा मौर्य वंशांतील चंद्रगुप्ताचा पुत्र. हा बिंदुसार, वारिसार व भद्रसार या नांवांनींहि प्रसिद्ध आहे. ग्रीक लेखकांनीं याचा उल्लेख एमित्रोचेटस या नांवानें केला आहे. असें सांगतात कीं, एकदां चंद्रगुप्ताची गरोदर पत्नी भोजनास बसली असतां अन्नांत विष लागल्यानें मृत्युमुखीं पडली. ती गरोदर असल्यानें पोट फाडून मुलास बाहेर काढावें लागलें. परंतु त्या मुलास बाहेर काढून पाहतां त्याच्या डोक्यास विषाचा एकच बिंदु लागला असल्याचें दिसून आलें. या प्रसंगावरून चाणक्यानें याचें बिंदुसार हें नांव ठेवलें. चाणक्य हाच याचा प्रधान होता. चाणक्याच्या साहाय्यानें यानें सोळा राजांना आपल्या वर्चस्वाखालीं आणलें. दक्षिणेंतील आंध्र राजांना यानेंच जिंकलें असावें. चंद्रगुप्ताच्या पश्चात् चाणक्याच्या इच्छेवरून यानें सुबंधु यास आपला प्रधान नेमलें. परंतु सुबंधूनें चाणक्याविषयीं बिंदुसाराचें मन बिथरवलें. परंतु थोड्याच दिवसांत चाणक्याच्या विश्वासूपणाबद्दल बिंदुसाराची खात्री पटून सुबंधूस चाणक्याविषयीं भलते संशय घेतल्याबद्दल चाणक्याची व बिंदुसाराची क्षमा मागावी लागली. यानें सेल्युकस, ॲंटिओकस व इतर ग्रीक राजे यांच्याशीं स्नेहाचें दळणवळण ठेविलें होतें. याच्या कारकीर्दींत तक्षशिलेस दोन बंडें झालीं तीं यानें आपले मुलगे अशोक व सुशिमा यांच्या साहाय्यानें मोडलीं.

**बिनतारी तारायंत्र**—बिनतारी संदेश अथवा दूरध्वनि पाठविण्याच्या पद्धतीमध्यें प्रत्यक्ष विद्युद्वाहक पदार्थाची माध्यम म्हणून योजना न करतां विद्युच्चुंबक लहरींच्या साहाय्यानें दूर अंतरावर कांहीं सांकेतिक चिन्हें अथवा ध्वनी पाठविण्याची योजना केलेली असते. या पद्धतीची कल्पना प्रथम लॉर्ड केल्व्हिन ( पाहा ) आणि क्लार्क मॅक्स्वेल यांनीं आपल्या प्रयोगशाळांतून जें औपपत्तिक संशोधन केलें त्यामध्यें उगम पावली असें म्हणतां येईल. या दोन शास्त्रज्ञांनीं जे सिद्धांत किंवा उपपत्ति पुढें मांडल्या त्यास हर्ट्झ या शास्त्रज्ञानें केलेल्या प्रयोगा-

वरून पुष्टि मिळाली. ही पद्धति प्रत्यक्ष व्यवहारांत येण्याच्या कामीं अनेक शास्त्रज्ञांनीं प्रयत्न केलेले आहेत. त्यांपैकीं अगदीं प्रसिद्ध अशा शास्त्रज्ञांचीं नांवें घ्यावयाचीं तर तीं पुढें दिल्याप्रमाणें सांगतां येतील : लॉज, ब्रॅन्ली, मार्कोनी, फ्लेमिंग, डि फॉरेस्ट, डुडेल, पाउल्सेन, मेसनेर आणि फ्रँक्लिन. ही पद्धति पुढील तत्त्वांवर बसविलेली आहे : १. विद्युत् आणि चुंबकीय शक्ति यांचें प्रेषण लहरीरूपानें अवकाशामध्यें करतां येतें. या लहरी प्रकाशलहरींसारख्याच स्वरूपाच्या असतात. मात्र त्यांची लांबी बरीच अधिक असते. या लहरी विद्युच्छक्तीच्या साहाय्यानें उत्पन्न करतां येतात व त्यांची लांबी इच्छेप्रमाणें वाढवितां येते. २. या लहरी जेथें जाऊन पोंचतात तेथें योग्य तऱ्हेनें बसवून ठेवलेल्या विद्युन्मंडलामध्यें कंप पावणारे किंवा आंदोलन होणारे विद्युत्प्रवाह उत्पन्न होतात. हे विद्युत्प्रवाह उलटसुलट गतीचे असतात. परंतु त्यांस सरळ करतां येतें, म्हणजे त्यांचें रूपांतर सरलगति प्रवाहामध्यें करतां येतें. ३. हा सरलगति प्रवाह अगदीं पूर्णपणें सतत वाहणारा नसतो. त्याचा काल मूळस्थानाहून येणाऱ्या लहरींवर अवलंबून असतो. परंतु हा काल इतका अल्प असतो कीं, त्याचा परिणाम दूरध्वनि यंत्रासारख्या एखाद्या मंदगतीनें चालणाऱ्या यंत्रावर सतत प्रवाहासारखाच होतो, म्हणजे सामान्यतः या प्रवाहामध्यें फारसा फरक पडत नाहीं. परंतु मूळ ठिकाणाहून पाठविलेल्या लहरींमध्यें जर फरक करण्यांत आला किंवा त्या विशिष्ट व नियंत्रित रीतीनें पाठविण्यांत आल्या व त्यांमध्यें आपण सामान्यतः ज्याप्रमाणें बोलतों त्याप्रमाणें जर शब्दांतील कालाप्रमाणें लहरींच्या कालांत फरक करण्यांत आला तर असे फरक या लहरींचें ग्रहण करणाऱ्यादूरध्वनि यंत्रामध्येंहि दिसून येतात.

नियंत्रित गतीनें चालणाऱ्या विद्युद्गतिशक्तीमुळें एखाद्या विद्युन्मंडलांतील विद्युत्प्रवाहामध्यें जे फरक होतात किंवा ज्या क्रिया होतात, त्यांचे गुणधर्म म्हणजे, १ प्रवर्तन ( इन्डक्टन्स ), २ प्रतिबंध अथवा रोधकता ( रेझिस्टन्स ), आणि ३ पात्रता अथवा संभाव्यता ( कपॅसिटी ), हे होत. जर विद्युद्गतिशक्ति मध्येंच बंद केली तर, विद्युन्मंडलामध्यें फारसा प्रतिरोध नसेल तर विद्युत्प्रवाह व कंप चालू राहणें शक्य असतें. या स्वाभाविक कंपाचा काल $2\pi\sqrt{LC}$ इतके सेकंद असतो. याठिकाणीं L हा प्रवर्तन ( हेन्री या प्रमाणांत ) आणि C हा पात्रता ( फॅरड या प्रमाणांत ) दाखवितो. या कालांत चालू केलेल्या विद्युद्गतिशक्तीमुळें विद्युन्मंडलामध्यें बऱ्याच मोठ्या शक्तीचा विद्युत्प्रवाह चालू होतो. जेव्हां विद्युन्मंडलांतील विद्युत्प्रवर्तन आणि पात्रता यांची योजना अशी करण्यांत येते कीं, त्यावर स्वीकृत होणाऱ्या लहरींचा काल आणि या मंडलांतील आंदोलन-काल सारखेच असतील तेव्हां हें विद्युन्मंडल दुसऱ्या विद्युन्मंडलाशीं एक सुरांत किंवा अनुनादी आहे असें म्हणण्यांत येतें.

आज मोठ्या प्रमाणामध्यें जो बिनतारी विद्युत्संदेशवाहकाचा उपयोग करण्यांत येतो त्याचें श्रेय सिनेटोर गुग्लीएल्मो मार्कोनी यास आहे. यानें प्रथम या यंत्राचा प्रयोग १८९५ मध्यें करून दाखविला आणि त्यानंतर लवकरच एरियल आणि अनुनादपद्धति शोधून काढली. शक्तिसंचायक विद्युन्मंडलाचें तत्त्वहि त्यानेंच शोधून काढलें. एरियलमध्यें प्रत्यक्ष शक्तीचें प्रेषण करण्याऐवजीं ज्यामध्यें शक्तीचें उत्सर्जन कमी होतें अशा एका बंद व कंपन पावणाऱ्या विद्युन्मंडलामध्यें विद्युच्छक्तीच्या साहाय्यानें चेतना आणण्यांत येते. आणि या विद्युन्मंडलाच्या साहाय्यानें त्यास जोडलेल्या उघड्या एरियलमध्यें प्रवर्तनपद्धतीनें विद्युज्जागृति करण्यांत येते व हें उघडें एरियल मोठ्या प्रमाणांत उत्सर्जन करीत राहतें. हीं बंद व उघडीं विद्युन्मंडलें एकमेकांशीं अनुनादित पद्धतीनें जोडलेलीं असतात.

उत्सर्जन उत्पन्न करण्याकरितां निरनिराळ्या पद्धती योजण्यांत येतात. डुडेल यानें प्रथम १९०० मध्यें कमानीचा विद्युदुत्पादक उपयोगांत आणला. त्यांत १९०३ मध्यें पाउलसेन यानें बरीच सुधारणा केली. त्यानें यांत उज्ज वायूचें वातावरण कमानीशीं काटकोनांत असलेलें चुंबकीय क्षेत्र, पाण्याच्या योगानें थंड होत असलेला तांब्याचा धनध्रुव आणि फिरता कार्बनचा ऋणध्रुव इतक्या गोष्टींचा उपयोग केला. अलेक्झांडरसन यानें १९०९ मध्यें उच्च कंपशक्ति असलेले उलटसुलट विद्युत्प्रवाह उत्पन्न करणारे विद्युज्जनक प्रथम यशस्वी रीतीनें उपयोगांत आणले, परंतु हे सर्व निरनिराळे विद्युज्जनक आतां जे. एफ्. फ्लेमिंग आणि ली द फॉरेस्ट यांनीं शोधून काढलेल्या तप्त पड्या( थर्मिऑनिक व्हॉल्व्ह )मुळें मागें पडले आहेत. हा तप्त पडदा किंवा व्हॉल्व्ह म्हणजे एक निर्वात केलेला कांचेचा किंवा गारेचा फुगा असून त्यामध्यें तीन विद्युद्ध्रुव बसविलेले असतात. त्यांस तंतु ( फिलॅमेन्ट ), पत्रा ( प्लेट ) व वर्तुळ ( ग्रिड ) असें म्हणतात. फ्लेमिंग यानें बनविलेल्या व्हॉल्व्हमध्यें फक्त दोनच विद्युद्ध्रुव होते. फ्लेमिंग यानें तिसरा वर्तुळ ( ग्रिड ) हा नवीन ध्रुव घातला. यांतील तंतु हा सामान्य विजेच्या दिव्यांतील तारेसारखाच बारीक तारेचा असतो. तो जेव्हां विद्युत्प्रवाहाच्या साहाय्यानें उष्ण करण्यांत येतो तेव्हां त्यापासून विद्युत्कण निघूं लागतात. जर हे तंतू आणि पत्रा यांच्या दरम्यान दुसरा विद्युज्जनक जोडला तर विद्युत्प्रवाहाचें एक विद्युन्मंडल तयार होतें. या मंडलांतील फुग्याच्या आंतील भाग म्हटला म्हणजे तंतूपासून पत्र्याकडे जाणाऱ्या ऋणविद्युत्

कणांचा प्रवाह हा होय. हा विरुद्ध दिशेनें जाणाऱ्या धनप्रवाहाइतकाच असतो. वर्तुळ ही एक सर्पिल आकाराची तार असून ती या दोन ध्रुवांच्या दरम्यान असते. या वर्तुळाचा विद्युद्भार बदलला असतां त्याचा पाण्याच्या तोटीसारखा उपयोग करतां येतो किंवा अजीबात बंद करतां येतो.

या व्हॉल्व्हचा उपयोग विद्युत्प्रवाह सरळ करण्याकडे (रेक्टिफायर) किंवा तो वाढविण्याकडे (ॲंप्लिफायर) किंवा उत्पन्न करण्याकडे (जनरेटर) करतां येतो. यांपैकीं पहिला उपयोग या गोष्टीवर अवलंबून असतो कीं, तंतूपासून निघणाऱ्या विद्युत्कणांचा प्रवाह हा ऋण स्वरूपाचा असतो. त्यामुळें त्याच्या साहाय्यानें फक्त एकाच दिशेनें विद्युत्प्रवाह नेतां येतो. दुसऱ्या तऱ्हेचा उपयोग अशामुळें होतो कीं, वर्तुळामध्यें थोड्या प्रमाणांत शक्त्यंतर केलें असतांहि पत्र्यापासून निघणाऱ्या विद्युत्प्रवाहांत फार मोठ्या प्रमाणांत फरक होतो. जेव्हां दुसऱ्या यंत्राकडून येणारा प्रवाह प्रथम सरळ करून घेण्यापूर्वीच (रेक्टिफायर) तो वाढविला तर अतिशय तीव्र कंपशक्ति असलेल्या लहरी उत्पन्न होतात (हायफ्रिक्वेन्सी ॲंप्लिफिकेशन); परंतु तो जर आधीं सरळ करून घेतला (रेक्टिफाय), तर लघुकंपनसंख्येची वृद्धि होते (लोफ्रिक्वेन्सी ॲंप्लिफिकेशन). जर पत्र्याच्या विद्युन्मंडलांतील शक्तीचा कांहीं भाग वर्तुळांतील विद्युन्मंडलाकडे खर्च केला तर विरुद्ध क्रिया अथवा प्रतिक्रिया उत्पन्न होते व त्यामुळें कंपसंख्या वाढते.

बिनतारी संदेशाचा स्वीकार करणाऱ्या यंत्राची रचना पुढें दिल्याप्रमाणें असते : १. संग्राहक म्हणजे एरियल विद्युन्मंडल; २. संवरक अथवा निवड करणारें अनुनादक विद्युन्मंडल; ३ दिग्दर्शक—यावरून येणाऱ्या संदेशाचें अस्तित्व कळून येतें. हे दिग्दर्शक निरनिराळ्या प्रकारचे वापरण्यांत येतात, व त्यांचा प्रकार दूरध्वनियंत्राच्या ज्या कार्याकरितां उपयोग करावयाचा असतो त्यावर अवलंबून असतो. संदेशवाहक यंत्रामध्यें जेव्हां ध्वनि उत्पन्न करावयाचा असतो तेव्हां सतत येणाऱ्या लहरींचे कांहीं गटामध्यें तुकडे पाडावे लागतात. हे तुकडे अर्थातच ज्या लहरी मनुष्याच्या कानांस ऐकूं येतील अशा तऱ्हेच्या कंपनसंख्येच्या अनुरोधानें पाडावे लागतात. अशा तऱ्हेच्या लहरी अथवा नाद प्रथम संदेशग्राहक यंत्राला जोडलेल्या यंत्रामध्यें कंप उत्पन्न करून करण्यांत येतात व त्या येणाऱ्या लहरींशीं अनुनाद न होणारे असतात. नंतर त्या दोहोंचें अनुनादन सरल-प्रवाहरूपात केल्यावर ध्वनि ऐकूं येऊं लागतो.

बिनतारी दूरध्वनिप्रक्षेपक यंत्रहि अशाच तऱ्हेच्या विद्युन्मंडलावर व सतत वाहणाऱ्या प्रवाहावर बसविलेलें असतें व तें मनुष्याच्या ध्वनीपासून उत्पन्न होणाऱ्या लघुकंपसंख्येच्या लहरींस अनुरूप असें बनविण्यांत आल्यामुळें सामान्य दूरध्वनियंत्रांतून बोलल्याप्रमाणेंच ऐकूं येतें. अशा तऱ्हेच्या संदेश-वाहक यंत्रांतील लहरींची लांबी सामान्यतः ३०० ते ३००० मीटरपर्यंत असते व यास अनुसरून कंपसंख्या दर सेकंदास $१०^६$ पासून $१०^५$ पर्यंत असते. (लहरींची लांबी × कंपसंख्या = $३ \times १०^८$ मीटर दर सेकंदास ही प्रकाशाची गति असते.) आपण जे शब्द बोलतो त्यांची कंपसंख्या दर सेकंदास २० पासून ४०,००० पर्यंत कंपसंख्येचें मिश्रण असतें.

निरनिराळ्या दिशांनीं संदेश पाठविण्यामध्यें अलीकडे बरीच प्रगति झालेली आहे. कांहीं संदेशप्रेषक ठिकाणांहून एका विशिष्ट पद्धतीनें बदलणारे संदेश वरचेवर पाठविण्यांत येत असतात. यांच्या योगानें या संदेशाचा स्वीकार करणाऱ्या गलबतास आपलें स्थान निश्चित करतां येतें. १९२६ पूर्वी सामान्यतः व्यापारी संदेश पाठविणाऱ्या यंत्रांतील लहरींची लांबी ८००० ते ३०,००० मीटरपर्यंत असे. परंतु यानंतर मार्कोनी कंपनीनें कॅनडा, दक्षिण आफ्रिका, हिंदुस्थान आणि ऑस्ट्रेलिया या देशांमध्यें नवीन कमी लांबीच्या लहरींच्या प्रवाहपद्धतीनें संदेश पाठविण्याचा करार केला.

संदेशवाहक यंत्रांतून जी बातमी, जीं भाषणें, गाणीं, वगैरे निरनिराळ्या दिशांनीं पाठविण्यांत येतात त्यास नभोवाणी असें म्हणतात. या नभोवाणीचा स्वीकार करणाऱ्या यंत्राचा आकार व रचना यांत पुष्कळच फरक असतो. यांतील अगदीं साधा ग्राहक म्हटला म्हणजे एक कुरुंदाचा स्फटिक बसवून तयार केलेला असतो. अनेक व्हॉल्व्ह असलेल्या ग्राहकामध्यें एक व्हॉल्व्ह सरलगतिकारक असतो व बाकीचे गतिवर्धक असतात. साध्या ग्राहकामध्यें स्फटिकाची योजना सरलगति करण्याच्या कामीं आणि व्हॉल्व्हची योजना गतिवर्धनाच्या कामीं केलेली असते. प्रत्येक संदेश-प्रेषकयंत्र विशिष्ट लांबीच्या लहरींच्या साहाय्यानें संदेशप्रेषण करीत असतें व ग्राहक त्याला पाहिजे त्या ठिकाणच्या ध्वनिलहरींचें ग्रहण करीत असतो. कांहीं महत्त्वाच्या बातम्या साध्या दूरध्वनियंत्रावरून स्थानिक प्रेषक यंत्राकडे पाठविण्यांत येतात व तेथून त्या संदेशप्रेषक यंत्रांतून सर्वत्र पाठविण्यांत येतात.

आज बिनतारीचें महत्त्व अतिशय वाढलें आहे. आगबोटी, विमानें, आगगाड्या, पोलिस ठाणीं, इ. ना याची जरूरी लागते. पूर्वी साध्या तारा पाठवून किंवा सोय असेल तेथें टेलेफोन करून जें काम करण्यांत येई त्या साधनांची जागा बिनतारीनें घेतलेली आहे.

**बिना**—मध्यप्रांत, सागर जिल्हा. खुरई तहशिलींतील एक रेल्वे जंक्शन. बिना नदीवरून गांवाला हें नांव पडलें. गांव

लहानच आहे. विनापासून इटावा शहर २ मैलांवर आहे. कानपूर–आग्र्याकडे जो आगगाडीचा फांटा जातो त्यावर विना हें स्टेशन आहे. हें प्रसिद्ध जैन क्षेत्र आहे. बरेचसे रेल्वे–कामगार या ठिकाणीं राहतात.

अकबराचा एक बुंदेला सरदार इंद्रजित् यानें हें गांव वसविलें व १८ व्या शतकाच्या प्रारंभीं पन्नाचा राजा अनूपसिंग याच्याकडे हें होतें. यानें येथें एक लहानसा किल्ला बांधला. १७५१ त हें गांव पेशव्यांकडे गेलें. मराठ्यांच्या अमदानींत गांवाला वैभव प्राप्त झालें व सुंदर इमारती बांधल्या गेल्या.

**विनामी व्यवहार**—आपल्या पैशानें कोणी इसम आपल्याकरितां फक्त दुसऱ्याच्या नांवानें मिळकत विकत घेतो, तेव्हां त्या व्यवहारास बिनामी व्यवहार असें म्हणतात. जो त्या मिळकतीची किंमत देतो त्याचें खरें प्रभुत्व असतें, पण बाहेरच्या देखाव्याकरितां खरेदीखत दुसऱ्याच्या नांवें केलेलें असतें. बहुतकरून असले व्यवहार, सावकाराच्या धाकानें मिळकतीचा बचाव व्हावा, म्हणजे ती जप्त होऊन विकली जाऊं नये म्हणून होतात. बिनामी व्यवहार करण्याची चाल हिंदु लोकांत इतकी आहे कीं, ती एक रूढिच बनली आहे व तिला शास्त्राची योग्यता आली आहे. एखाद्या कायद्याचें उल्लंघन करण्यास किंवा बिनामीदारापासून मोबदला घेऊन बेचन घेतलेल्या प्रामाणिक मनुष्याचे हक्क नष्ट करण्यास किंवा सावकारास फसविण्याच्या इराद्यानें असा व्यवहार बिनामी आहे असें प्रतिपादन करतां येत नाहीं. कारण स्वतःच्या लबाडीचा फायदा कोणास घेतां येत नाहीं. परंतु बिनामी व्यवहार लबाडी करण्याच्या किंवा कोणास फसविण्याच्या अगर अन्यायानें फायदा घेण्याच्या इरायानें केलेला नसतो त्या वेळीं हा व्यवहार बेकायदेशीर नसतो. ज्याच्या नांवें मिळकत खरेदी केली असेल तो अप्रत्यक्ष विश्वस्त (इंप्लाइड ट्रस्टी) समजला जातो. एकत्र हिंदु कुटुंबांत कोणीहि सहभागीदाराच्या नांवें मिळकत खरेदी घेतली असली तरी ती एकत्र कुटुंबाची असते. हिंदु बापानें आपल्या मुलाच्या किंवा बायकोच्या नांवानें मिळकत खरेदी घेतली असली तर ती त्यांच्याकरितां घेतली आहे व ती त्यांच्या मालकीची आहे असें अनुमान होत नाहीं. अशा रीतीनें व्यवहार करण्याची फार पुरातन चाल हिंदु लोकांत आहे. एकत्र हिंदु कुटुंबाची अविभक्त मिळकत सर्वांची समाईक आहे असें अनुमान असतें.

**बिनीवाला**—मराठ्यांच्या लष्करांतील एक अधिकारी. याचें काम फौजेच्या तळाची व्यवस्था लावण्याचें असे. फारशींत 'मीरमंजल' असें याचें दुसरें नांव आहे. रयतेचा बंदोबस्त व लष्करची व्यवस्था हीं महत्त्वाचीं कामें बिनीवाल्याकडे असल्यानें चांगला सरदार या कामावर नेमीत. विसाजी कृष्ण बिनीवाले (पाहा) याचें नांव मराठ्यांच्या इतिहासांत प्रसिद्ध आहे. बिनीवाल्याबरोबर आजच्या पाश्चात्य सॅपर्स ॲंड मायनर्स प्रमाणें बेलदार व तवलदार असत. मुख्य सेनापतीच्या हुकमानें बिनीवाला आपलीं कामें करी.

**बिंबराजा**—पैठणच्या यादवकुळांतील एक बिंब नांवाचा राजपुरुष उत्तर कोंकणांत तेराव्या शतकांत आला व त्यानें वसाहत केली. या वसाहतीला बिंबस्थान असें नांव पडलें. बिंबाची राजधानी माहीम (महिकावती) होती. पाठारे व शुक्लयजुर्वेदी ब्राह्मण यांचे पूर्वज या बिंबाबरोबरच अपरांतांत आले.

**बिंबली**—हें झाड उष्ण प्रदेशांत होतें. पानें सर्व काळ हिरवीं असतात. द्राक्षांच्या घडासारखे फळांचे घड येतात. फळें आंबट असून तोंडल्यासारखीं दिसतात. रंगारी लोक रंगांत हीं घालतात. यांच्या रसांत हळदीचीं कुडीं टाकून गंधाचे रवे बनवितात. कपड्यावरचा डाग बिंबल्याच्या रसानें निघतो.

**बिबळा**—याचें झाड मोठें असून पानें असाण्याच्या पानांसारखीं असतात. यास बारीक फळें येतात. झाडावर आघात केल्यास आंतून रक्ताप्रमाणें लाल चीक निघतो. याचें लांकूड इमारतीस वापरतात. बिबळ्याचा चीक अतिसार, धातुविकार, आंव, वगैरेंवर देतात. हाड मोडल्यास साल किंवा चीक दुधांत वांटून प्यावयास देतात.

**बिब्बा**—याला भेला, भिलावा, कोंकी, इत्यादि नांवें आहेत. सतलज नदीपासून पूर्वेस ३,५०० फूट उंच हिमालय पर्वताच्या लगतच्या प्रदेशांतील व पूर्वेस आसामपर्यंतच्या हिंदुस्थानच्या उष्ण भागांतील हें एक नियमित काळीं फळें, पुष्पें व पानें गळणारें झाड आहे. या झाडास काजूसारखीं बोंडें येतात व त्यांवर बिया असतात. तेच बिब्बे होत. हीं बोंडें (गोडंब्या) पौष्टिक व वातहारक असून दांत बळकट करतात. या झाडाच्या बुंध्यास खांचा पाडल्यानंतर त्यांतून एक प्रकारचा तिखट, चिकट रस निघतो. याचें वॉर्निश बनवितात. हिंदुस्थानांत देशी औषधांतील बिब्बा एक महत्त्वाचा पदार्थ मानला जातो. कांहीं दुखापत झाली किंवा वायूनें अंग धरलें असतां त्यावर बिब्बा घालतात. मात्र हें फोड आणणारें— उतणारें औषध आहे. तो उतल्यास लोणी व तीळ वांटून लेप देतात; किंवा गोपीचंदन उगाळून लावतात. अनेक रोगांवर बिब्बा उपयोगी आहे. जंत झाले असल्यास बिब्याचा लहान तुकडा दुधांत कढवून देतात. सूज, वळ, इ. वर तेल लावतात. इसबावर बिब्बे व राळ तेलांत कढवून तें लावतात.

**बिभास**—१. हा राग भैरव थाटांतून उत्पन्न होतो. या रागांत मध्यम व निषाद हे स्वर वर्ज्य असल्यानें याची जाति

औडुव–औडुव आहे. वादी धैवत व संवादी गांधार आहे. गान-समय प्रातःकाळ सुसंमत आहे. पंचम व गांधार या स्वरांची संगति रक्तिदायक आहे.

२. (प्रकार दुसरा). हा राग मारवा थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागतात म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गान–समय प्रातःकाळ आहे. या रागाच्या पूर्वांगांत गौरी व उत्तरांगांत देसकार या रागांच्या छाया दृष्टीस पडतात. गांधार आणि पंचम, तसेंच मध्यम व धैवत या स्वरांच्या संगती या रागांत रक्तिदायक आहेत. हा राग उत्तरांगप्रबल आहे. विलंबित लयींनें हा फार खुलतो. याची प्रकृति गंभीर आहे.

**बिभीषण**— विश्रवा ऋषीचा पुत्र व रावण–कुंभकर्णांचा धाकटा भाऊ. सीता पळवून आणून रामाशीं वैर संपादल्याबद्दल यानें रावणास दोष दिला व रावण जेव्हां याचें एकेना तेव्हां बिभीषण रामास जाऊन मिळाला. याचा रामास बराच उपयोग झाला. रामरावण–युद्धांत यानें बराच पराक्रम गाजवला होता. रावणवधानंतर तो लंकेचा राजा झाला. हा सप्त चिरंजीवांपैकीं एक आहे. याच्या बायकोचें नांव सरमा होतें व ती अशोक वनांत सीतेच्या दिमतीला असे. याला अमरत्व ब्रह्मदेवानें दिलें होतें.

**बिमलीपट्टम्**— मद्रास, विजगापट्टम् जिल्हा. वाल्टेरच्या वायव्येस २२ मैलांवर हें बंदर आहे. या बंदरांतून ताग, हिरडा, भुइमूग, कारळे, वगैरे माल बाहेर जातो. पूर्वी येथें डचांची वखार होती. लो. सं. सु. दहा हजार.

**बिमा**—बिमा भाषा ही बिमा नांवाच्या इंडोनेशियांतील एका राज्यांत प्रचलित आहे. या राज्यामध्यें सुंबा बेटाचा पूर्व भाग आणि एन्डे बेटाचा पश्चिम भाग हे येतात. पहिल्या पहिल्या पोर्तुगीज प्रवाशांनीं व त्यांच्यामागून आलेल्या कांहीं प्रवाशांनीं व भूगोलवेत्त्यांनीं या एन्डे बेटासच फ्लोअर्स असें म्हटलेलें आढळतें. एन्डे बेटाच्या बहुतेक भागावर बिमा भाषा प्रचलित आहे असें संशोधक लेडेन याचें मत आहे. बिमा भाषेचा बूगी व जावानी भाषांशीं संबंध असावा असें दिसतें व किनाऱ्यावरील भाषेमध्यें मलयु भाषेचें मिश्रण झालेलें आढळतें. बूगी भाषेशीं जो संबंध दिसतो तो वास्तविक बूगी भाषेशीं नसून मकासर भाषेशीं आहे. सुमात्रा बेटाचा जो भाग बिमा येथील सुलतानाच्या ताब्यांत नाहीं त्या भागांतील भाषा बिमा, जावानी व बूगी यांच्या मिश्रणानें बनलेली आहे. बिमा किंवा सुंबा या दोन्ही भाषांस स्वतंत्र लिपि नसून त्या बूगी किंवा मलयु भाषेचीच लिपि वापरतात.

**बियालिस्टोक**—पोलंडमधील एक शहर. हें ग्रॉडनोपासून ५४ मैलांवर असून मॉस्को–वार्सा या आगगाडीच्या रस्त्यावर आहे. हें १३२० सालीं वसविलें गेलें व पोलंडच्या तिसऱ्या विभागणीनंतर तें प्रशियाच्या ताब्यांत गेलें. १८०७ सालीं तें रशियाला जोडण्यांत आलें. आतां पोलंडच्या राज्यांत याचा अंतर्भाव होतो. १८४५ सालीं येथें लोंकरीच्या गिरण्या निघाल्या. येथील लोकसंख्या ९१,३३१. येथील लोंकरीच्या व रेशमाच्या, साबणाच्या व कातड्याच्या कारखान्यांत कित्येक हजार लोक काम करीत आहेत.

**बिरवाडीचा किल्ला**—मुंबई, कुलाबा जिल्हा. हा रोह्याच्या नैर्ऋत्येस ६ मैलांवर एका डोंगराच्या रांगेच्या टोंकावर आहे. हा फक्त रेवदंड्याच्या खाडींतून दृष्टीस पडतो. दरवाजा उत्तरेस आहे. यांतील एक उंच शिखर तटापासून २०० फूट व पायथ्यापासून ८०० फूट आहे. १६४८ मध्यें शिवाजीनें बिरवाडी व लिंगाणा हे दोन किल्ले बांधले.

**बिर्ला, घनश्यामदास** (१८९४– )—हे हिंदुस्थानांतील एक मोठे गिरणीमालक, व्यापारी व जमीनदार आहेत. बिर्ला ब्रदर्स लिमिटेड या कंपनीचे ते मॅनेजिंग डायरेक्टर आहेत. यांच्या मालकीच्या कलकत्ता येथें एक ताग व कापूस यांची व ग्वाल्हेर व दिल्ली येथें कापसाची व इतरत्रहि कांहीं गिरण्या आहेत. तसेंच साखरेच्या चार गिरण्यांची मालकी यांच्याकडे असून रांचीची जमीनदारीहि यांच्याकडे आहे. यांचा मुंबई व कलकत्ता येथें आयातनिर्यात मालाचा मोठा व्यापार आहे. हे मध्यवर्ती विधिमंडळाचे सभासद होते पण साम्राज्य–पुरस्कार (इंपीरिअल प्रेफरन्सचें) तत्त्व अमान्य असल्यामुळें त्यांनीं १९३० मध्यें राजीनामा दिला. कलकत्ता येथील इंडियन चेंबर ऑफ कॉमर्सचे ते १९३४ मध्यें अध्यक्ष होते व १९२९ सालीं फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्सचे ते अध्यक्ष होते. यांनीं सर्व देशभर अनेक शैक्षणिक व इतर संस्था स्थापन करून चालविल्या आहेत. हे इंडियन फिस्कल कमिशन, रॉयल कमिशन ऑन लेबर (१९३०) व बंगाल कायदे कौन्सिल, यांचे सभासद असून जिनिव्हा येथील इंटर नॅशनल लेबर कॉन्फरन्सला धंदामालकांचे प्रतिनिधि म्हणून १९२७ सालीं गेले होते. दुसऱ्या गोलमेज परिषदेचे ते सभासद होते (१९३०). अखिल भारतीय हरिजन सेवक संघाचे ते अध्यक्ष आहेत.

**बिलावल**—हा बिलावल थाटाचा आश्रय राग आहे. याचा आरोहावरोह सात स्वरांनीं होतो, म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गान-काल प्रातःकालचा पहिला प्रहर मानितात. हा उत्तरांगप्रधान असल्यानें याचें स्वरूप अवरोहांत व्यक्त होतें. आरोहांत मध्यम

व निषाद या स्वरांचें अल्पत्व आहे. अवरोहांत गांधार दुर्बल ठेवितात. धैवत व मध्यम या स्वरांची संगति या रागांत रक्तिदायक आहे. या रागास सकाळचा कल्याण म्हणण्याचा प्रघात आहे. अलैया, देवगिरी, यमनी, शुक्ल, सर्पर्दा, कुकुम, इत्यादि या रागाचे बरेच प्रकार आहेत. त्यांचीं वर्णनें त्या त्या स्थळीं केलीं आहेत.

**विलासखानी तोडी**—हा राग भैरवी थाटांतून उत्पन्न होतो. आरोह-अवरोह सातहि स्वरांनीं होत असल्यामुळें याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गान-समय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. शुद्ध तोडींत मध्यम व निषाद हे स्वर तीव्र आहेत. पण या रागांत ते कोमल आहेत. यामुळें यांत थोडा भैरवीचा भास होतो, तथापि चलन तोडीचेंच ठेविलेलें असतें. हा एक तोडी रागाचा प्रकार आहे. हा राग मियां तानसेन याचा मुलगा बिलासखां यानें प्रचलित केला अशी आख्यायिका आहे.

**विलासपूर**—मध्यप्रांत (प्रदेश), छत्तिसगड विभागांतील एक जिल्हा. क्षेत्रफळ ७५१३ चौ. मैल. ह्या जिल्ह्यांत एकंदर १० जमीनदाऱ्या आहेत. त्यांचें क्षेत्रफळ २००० चौरस मैल आहे. शिवनाथ नदी बिलासपूर तहशिलीच्या दक्षिण भागांतून वाहत जाऊन महानदीस मिळते. ह्या जिल्ह्यांत कोर्व्याच्या कोळशाच्या खाणी आहेत. पाऊस ५० इंच पडतो. बिलास नांवाच्या एका कोळिणीच्या नावावरून गांवाला नांव पडलें. ह्याची व्यवस्था १८१८ सालपावेतों मराठे सुभेदारांनीं पाहिली. येथें मराठी अमल १८५३ सालपावेतों होता. १८५३ सालीं छत्तिसगड ब्रिटिश राज्यास जोडण्यांत आला. बिलासपूर गांवाच्या उत्तरेस १५ मैलांवर रत्नपूर आहे. जिल्ह्याच्या दक्षिणभागीं सिओरी नारायण व खरोड हीं बाराव्या शतकांतील देवालयें आहेत. जांजगीर येथेंहि दोन देवालयें आहेत. पाली येथें उत्तम नकशीकाम केलेलें देवालय आहे. अमरकंटक पर्वतांतून नर्मदा, शोण व जोहला या नद्यांचा उगम होतो. अमरकंटक हें हिंदूंचें पवित्र स्थान आहे. पहाडावर काममंदिर नांवाचें सुंदर देवालय आहे. जिल्ह्याची लोकसंख्या (१९४१) १५,४९,५०९. यांत बिलासपूर, मुंगेरी व रत्नपूर हीं तीन गांवें असून खेडीं ३२५८ आहेत. शेंकडा ९० लोक हिंदू आहेत. कोर्वा व छुरी येथील जमीनदारींत कोळसा आहे असें म्हणतात. पेन्ड्रा येथें अभ्रक सांपडतें. शिवरीनारायण येथें स्लेट पाट्यांचा दगड सांपडतो. बम्निदीही व कमोद येथें उत्तमपैकीं सुती कापड तयार होतें. कोटा येथें आगपेट्यांचा कारखाना आहे. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण बिलासपूर हें अर्पा नदीतीरावर वसलें आहे. लोकसंख्या सुमारें बत्तीस हजार आहे. कापड विणण्याचा धंदा मोठा आहे.

**बिलियर्ड**—हा 'चौरंग गोट्यां' चा खेळ मूळ बहुधा फ्रान्स देशांत सुरू झाला. हा हस्तिदंताच्या गोट्या घेऊन एका टेबलावर खेळण्यांत येतो. हें टेबल १२ फूट लांब आणि ६ फूट रुंद असून त्यावर एका पूर्ण समपातळींत असलेल्या स्लेटीच्या दगडावर गुळगुळीत व नरम हिरवें कापड पसरलेलें असतें व सभोंवतीं उंच कडा असतात व त्या कडा कापडानें गिरदीसारख्या मढविलेल्या असून घट्ट व लवचिक केलेल्या असतात. या टेबलाच्या चारी कोंपऱ्यांस चार व लांबीच्या बाजूंस बाजूच्या मध्य भागीं दोन असे सहा अर्धवर्तुळाकृति खिसे असतात. खेळाडूच्या हातांत एक काठी (क्यू) असून त्या काठीनें तो चेंडू ढकलतो. ही काठी चार फूटपासून आठ फूटपर्यंत लांब वाटोळ्या आकाराची व निमुळती असून तिचा व्यास मागील बाजूस १॥ इंचापर्यंत व टोंकाशीं ½ इंचापर्यंत असा निमुळता असतो, व टोंकाशीं एक चामड्याचा तुकडा बसविलेला असून चेंडू ढकलतांना सरकूं नये म्हणून त्यावर खडू लावण्यांत येतो.

सामान्यतः हा खेळ दोन गड्यांत खेळण्यांत येतो. या प्रत्येकाचा एक पांढरा चेंडू असतो, व एक तांबडा चेंडू टेबलावर सामान्य असतो. खेळाच्या प्रारंभीं तांबडा चेंडू टेबलाच्या एका टोंकाजवळ बाजूशीं समांतर अशा एका ठिपक्यावर ठेवण्यांत येतो. दुसऱ्या बाजूजवळ एक रंगण आंखलेलें असतें. त्याचा आकार अर्धवर्तुळाकृति असतो. या रंगणांत आपला पांढरा चेंडू ठेवून व त्याला काठीनें ढकलून तो तांबड्या चेंडूवर आपटून खेळावयास आरंभ करण्यांत येतो. पांढरा चेंडू तांबड्या चेंडूस लागला नाहीं तर तीस हुकणी (मिस्) असें म्हणतात व प्रत्येक हुकणीबद्दल विरुद्ध पक्षास एक मार्क मिळतो. एकदां खेळ सुरू झाल्यावर खेळाडूनें आपला चेंडू ढकलून आपल्या विरुद्ध पक्षाच्या गड्याच्या पांढऱ्या चेंडूस किंवा तांबड्या चेंडूस मारावयाचा असतो. या खेळांत मार्क मोजण्याच्या निरनिराळ्या पद्धती आहेत. जेव्हां खेळाडू आपला चेंडू दुसऱ्या चेंडूस मारून तिसऱ्या चेंडूसहि मारतो तेव्हां त्यास दुढ्ढी (कॅनन) असें म्हणतात व त्याचे दोन मार्क असतात. जेव्हां तो दुसऱ्या चेंडूस मारून आपल्या चेंडूस एकाद्या खिशांत घालवतो तेव्हां पांढऱ्या चेंडूवरून गेल्यास दोन व तांबड्या चेंडूवरून गेल्यास तीन मार्क मिळतात. तसेंच आपल्या प्रतिस्पर्ध्याचा पांढरा चेंडू आपल्या प्रतिस्पर्ध्याच्या टोल्यानें खिशांत घालविल्यास दोन मार्क व तांबडा चेंडू घालविल्यास तीन मार्क मिळतात. ही सामान्य खेळण्याची पद्धति झाली.

यालेरीज मनोरा (पिरॅमिड), संच (पूल), वगैरे या खेळाचे आणखी कांहीं प्रकार आहेत. पहिल्या प्रकारांत १५ चेंडू घेऊन ते मनोऱ्याच्या आकारांत मांडावयाचे असतात व ते खिशांत घालावयाचे असतात. जो खेळाडू सर्वांत जास्त चेंडू खिशांत घालवील तो डाव जिंकतो. दुसऱ्या प्रकारांतहि मुख्य डाव चेंडू खिशांत घालविण्याचाच असतो. परंतु तो खेळण्याचा प्रकार थोडा निराळा असतो. फ्रान्समध्यें या खेळाचें टेबल इंग्लिश टेबलापेक्षां लहान आकाराचें असून त्यास खिसे नसतात व केवळ चेंडू चेंडूस मारूनच खेळ खेळावयाचा असतो. अशाच तऱ्हेचा खेळ अमेरिकेमध्येंहि खेळण्यांत येतो. पण तेथें चार खिशाचें टेबलहि वापरण्यांत येतें.

बिल्डरबॅक, विल्यम (१७९६-१८३१)—एक डच कवि. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते : 'रूरल लाईफ' (ग्रामीण-जीवन); 'दि लव्ह ऑफ फादरलॅन्ड' (स्वदेश प्रेम); 'दि मेलडीज ऑफ स्कॉलर्स'; 'दि डिस्ट्रक्शन ऑफ दि फर्स्ट वर्ल्ड', इत्यादि. जेव्हां नेपोलियन एल्बाहून परत आला, त्या वेळीं बिल्डरडिकनें कांहीं रणगीतें (वॉर सॉंग्ज) लिहिलीं; तीं डच काव्यामध्यें सर्वोत्कृष्ट मानलीं जातात.

बिल्हण (१०२०-११००)—काश्मीर प्रांतांतील एक कवि. जुन्या प्रवरपूर राजधानीनजीक खोनमुख गांवीं याचा जन्म झाला. बापाचें नांव ज्येष्ठकलश व आईचें नागादेवी. वेद, व्याकरण व अलंकारशास्त्र यांचें अध्ययन संपल्यावर १०६५ सालच्या सुमारास काश्मीर सोडून तो ठिकठिकाणच्या राजाच्या दरबारीं गेला व शेवटीं पश्चिम चालुक्य सहावा विक्रमादित्य, याच्या दरबारीं तो मुख्य पंडित झाला. विक्रमादित्याच्या सन्मानार्थ त्यानें १०८५ च्या सुमारास 'विक्रमांकदेवचरित' नांवाचा मोठा ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत त्यानें विक्रमादित्यानें चोळ लोकांवर केलेल्या स्वाऱ्यांचें वर्णन केलें आहे. याशिवाय त्यानें 'चौरीसुरतपंचाशिका' हें खंडकाव्य व 'कर्णसुंदरी नाटिका' हे दोन ग्रंथ लिहिले आहेत.

बिवड—पिकांचा पालट. शेतीमध्यें एका शेतांत एकच पीक सतत दरवर्षी घेत राहण्यापेक्षां दरवर्षी कांहीं क्रमानें निरनिराळें पीक घेण्याची पद्धति आहे. या पद्धतीमध्यें पुढील फायदे असतात : (१) अशा तऱ्हेनें पिकांचा पालट करण्यामुळें जमिनीच्या पोटांत जीं निरनिराळ्या थरांत वनस्पतिपोषक द्रव्यें असतात त्यांचा भरपूर फायदा मिळतो. (२) बिवड केल्यानें खत कमी लागतें. (३) याच्यामुळें इतर तण किंवा परोपजीवी वनस्पती व पिकावर होणाऱ्या किडी यांची वाढ होत नाहीं. (४) एका पिकाचा जमिनींत राहिलेला अंश त्याच्या पुढील पिकास अधिक उपयुक्त होतो. (५) पिकांचा पालट करीत गेल्यानें एकाच जमिनीपासून सर्व वर्षभर एकामागून एक निरनिराळीं पिकें घेतां येतात. (६) निरनिराळीं पिकें एकामागून एक घेत गेल्यामुळें तीं एकामागून एक वर्षाच्या निरनिराळ्या काळांत तयार होतात व त्यामुळें गुरांना वर्षभर भरपूर चारा मिळत राहतो आणि गुरें बाळगण्यास कमी खर्च लागतो. पिकें पाहा.

बिशप—ख्रिस्ती संप्रदायामध्यें ज्या पंथांत उपदेशकांचे बिशप, प्रीस्ट व डीकन असे तीन वर्ग मानतात अशा पंथांतील सर्वांत उच्च प्रतीचा धर्मोपदेशक. हा शब्द मूळ ग्रीक भाषेंतील एपिस्कोपस म्हणजे देखरेख करणारा या शब्दापासून उत्पन्न झाला आहे. प्रथम हा शब्द ख्रिस्ती संप्रदायामध्यें ख्रिस्ती मंडळांत जो वडील किंवा देखरेख करणारा असेल त्यास लावीत असत; परंतु बऱ्याच प्राचीन काळापासून ख्रिस्ती मंडळीमध्यें जो प्रमुख असेल त्याला त्या त्या मंडळीपुरते स्थानिक बरेच अधिकार असत व यामुळें बिशपला ते अधिकार प्राप्त होऊन, बिशप म्हणजे ते अधिकार धारण करणारा असा अर्थ झाला. या अधिकाऱ्याच्या पदवीच्या इतिहासाबद्दल मतभेद व शंकास्थानें आहेत. रोमन कॅथॉलिक संप्रदायामध्यें हा अधिकार ईश्वरप्राप्त असून पहिल्या बारा प्रवक्त्यांपासून तो चालत आला आहे असें मानतात व व तो ख्रिस्तापासून त्या प्रवक्त्यांस प्राप्त होऊन तो अत्रुटित परंपरेनें चालत आला आहे अशी त्याची श्रद्धा आहे. प्रेसबिटेरियन पंथास ही दैवी परंपरा मान्य नसून हे अधिकार कालांतरानें प्राप्त झाले असें त्यांचें मत आहे.

रोमन संप्रदायामध्यें कार्डिनलच्या खालचा अधिकारी बिशप हा मानतात. या अधिकाराचीं मुख्य चिन्हें म्हणजे दंड, सोन्याची मुद्रिका, वगैरे होत. ग्रीक पंथांत बिशप यास त्या मानानें कमी अधिकार असतात. ते बहुधा मठवासीयांमधून निवडतात.

इंग्लंडमध्यें बिशपची नेमणूक राजाकडून होते. मात्र राजाच्या आज्ञेवरुन होणाऱ्या निवडणुकीचें स्वरूप त्यास देण्यांत येतें. बिशपचें स्थान बॅरनच्या वरच्या दर्जाचें मानण्यांत येतें.

'लॉर्ड' ही पदवी बिशपांना लावण्यांत येत असते. यांपैकीं कांहीं पार्लमेंटच्या वरिष्ठ विधिमंडळाचे अधिकारपरत्वें सभासद असतात. बहुतेक सर्व ख्रिस्ती धर्मपंथांतून हे बिशप असतात. जगांत ज्या ज्या ठिकाणीं ख्रिस्ती धर्मसंस्था आहेत त्या त्या ठिकाणीं असे अधिकारी नेमलेले असतात. हिंदुस्थानांत मुंबई, कलकत्ता, लाहोर, लखनौ, नागपूर व मद्रास या ठिकाणीं बिशपदर्जाचे धर्माधिकारी नेमलेले आहेत.

बिश्नोई—हा पंथ पूर्वी पंजाबांत सुरू झाला. राजपुतान्यांत या लोकांची वस्ती सर्वांत जास्त आहे. एकंदर लोकसंख्या (१९११) ७२३९३. याचा संस्थापक जंभाजी नावाचा परमार

रजपुत १४६१ सालीं विकानेर येथें होऊन गेला. पंथाचें धर्म-पुस्तक म्हणजे एक पोथी आहे. ती हिंदी भाषेंत लिहिली आहे. तींत खालीलप्रमाणें कांहीं आज्ञा आहेत—स्त्रियांनीं बाळंत झाल्यावर ३० दिवस व विटाळशी झाल्यापासून ५ दिवस स्वयंपाक करूं नये; सकाळीं स्नान करावें; पाणी गाळून प्यावें; प्राण्यांवर दया करावी; अफू वगैरे मादक पदार्थांचें सेवन करूं नये; अग्नींत आहुति द्यावी; व मुलें झाल्यावर जातकर्म करून त्यास बिश्नोई पंथांत घ्यावें. आग्रा व अयोध्या प्रांतांत याची कांहीं वस्ती आहे.

**विष्णुपूर**—बंगाल, बांकुरा जिल्हा, एक गांव. ढालकिशोर नदीच्या दक्षिणेस हें आहे. ही या जिल्ह्याची राजधानी होती. लो. सं. सुमारें २० हजार आहे. ८ व्या शतकांत विष्णुपूरचें राजघराणें अस्तित्वांत आलें; व एके काळीं बंगालच्या इतिहासांत हें फार महत्त्वाचें होतें. तें मुसलमान नबाबाचें मांडलिक होतें. प्राचीन काळीं या शहराचें किती मोठें वैभव होतें याची साक्ष येथील किल्ल्यांचे व इमारतींचे अवशेष आज देत आहेत. सध्यां हें तांदूळ, गळितांचीं धान्यें, लाख, कापूस, रेशीम या जिनसांच्या व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. येथें रेशमी कापड व त्यावरील नक्षीकाम हीं फार चांगलीं होतात.

**बिस्किटें**—एक प्रकारचा टिकाऊ खाद्य पदार्थ. बिस्किटांपैकीं कांहीं आंबलेल्या पिठाचीं करतात व कांहीं बिन आंबवलेल्या पिठाचीं करतात. समुद्रावरील खलाशी लोक बहुधा दुसऱ्या जातीचीं बिस्किटें वापरतात. त्यामुळें त्यांस समुद्रबिस्किटें म्हणतात. या प्रकारचीं बिस्किटें करावयाचीं म्हणजे कणिक पाण्यामध्यें भिजवून तिचा गोळा करतात व तो रुळांत घालून लाटतात. नंतर त्याचे तुकडे पाडण्यांत येऊन त्यांवर ठसे उठविण्यांत येतात; यानंतर एका सांखळया असलेल्या लांकडी रचनेनें ते तुकडे दोन्ही तोंडें उघडीं असलेल्या एका भट्टींतून पलीकडे नेण्यांत येतात, नंतर तीं सुकविण्यांत येऊन डब्यांतें भरण्यांत येतात. ही सर्व कृति हात न लावतां करण्यांत येते. एका दहा तासाच्या दिवसांत २००० रत्तल पिठाचीं बिस्किटें एका भट्टींत तयार करण्यांत येतात. हीं बिस्किटें १८ महिनेपर्यंत टिकतात. हीं पावरोटीच्या मानानें पाऊणपट पौष्टिक असतात.

बिस्किटांत निरनिराळे खाद्यपदार्थ घालून अनेक प्रकार करतात. घरींहि बिस्किटें तयार करतात.

**बिस्मथ**—हा तांबुस पांढऱ्या रंगाचा, ठिसूळ धातु असून लांबट, पातळ पत्तीचा बनलेला आहे. याचा परमाणुभारांक २०९ व विशिष्टगुरुत्व ९·८ असून, २८८ शतमानाला हा वितळतो. घनरूप होतांना ह्याचा आकार वाढतो. इतर धातूंबरोबर विशेषतः कोबाल्टच्या धातूबरोबर हा शुद्ध स्फटिकमय स्वरूपांतहि सांपडतो. ह्याचे प्राणिद आणि गंधिद हीं निसर्गांत सांपडतात. सुद्राव्य मिश्रधातु तयार करण्यासाठीं बिस्मथचा अतिशय उपयोग होतो. प्युटर आणि टाईप मेटल यांमध्यें हा वापरलेला असतो. वुडच्या धातूंत बिस्मथ, शिसें, कथिल आणि कॅडमियम असून ६०·५ शतमानाला तो वितळतो. औषधें, कांच आणि सौंदर्यप्रसाधनें तयार करण्यासाठीं बिस्मथचा उपयोग होतो.

याचे दगड बहुधा चांदी व कोबाल्ट यांच्या दगडांशीं मिश्र झालेले सांपडतात. हे दगड बोहेमिया व सॅक्सनी येथें सांपडतात. बिस्मथ गंधकिदाचेहि दगड सांपडतात. ते बोहेमिया, सैबिरिया, कॉर्नवाल व फ्रान्स या देशांत सांपडतात. पहिल्या प्रकारच्या दगडांत हें द्रव्य मूळरूपांत असतें म्हणून ते दगड भट्टींत घालून वितळवितात, म्हणजे या धातूचा रस होऊन तो तळीं बसतो. दुसऱ्या प्रकारच्या दगडांत बिस्मथ हा गंधकाशीं मिश्रित असतो, म्हणून या दगडांना भट्टींत घालून जाळतात. म्हणजे गंधक जळून जातो व धातु शिल्लक राहतो. तिसऱ्या पद्धतींत बिस्मथ इतर धातूशीं मिश्र झालेला असतो. या मिश्रणांत गंधकाम्ल ओततात; नंतर त्यांत लोखंडाचे तुकडे घालतात, म्हणजे बिस्मथ धातु बाहेर पडतो. हा जंतुनाशक आहे. परंतु याचा विषारी परिणाम होत नाहीं. याचें नत्रित पोटांत देतात. तेथें गेल्यावर त्याचें नत्राम्ल बनतें. याच्याइतकें जंतुघ्न औषध पोटांत देण्यास दुसरें नाहीं.

**बिस्मार्क द्वीपसमूह**—न्यू गिनीच्या उत्तर व ईशान्य या दिशांकडील पुष्कळशा बेटांच्या समूहास 'बिस्मार्क द्वीपसमूह' हें नांव दिलें आहे. हा समूह महायुद्धापर्यंत जर्मनीच्या ताब्यांत होता. मुख्य बेटें न्यू ब्रिटन, न्यू आयर्लंड, लाव्होंगाई (न्यू हॅनोव्हर), ड्यूक ऑफ यॉर्क बेटें व अडमिरॅलिटी बेटें हीं आहेत. लहान बेटांचेहि निरनिराळे गट आहेत. एकंदर क्षेत्रफळ १,११५ चौ. मै. असून स्थानिक लोकांची संख्या दीड लक्ष असावी. स. १८८४ नंतर या द्वीपसमूहास बिस्मार्क हें नांव देण्यांत आलें. पहिल्या महायुद्धानंतर हा प्रदेश न्यू गिनीबरोबर 'मँडेटरी' होऊन मध्य ऑस्ट्रेलियाच्या ताब्यांत गेला आहे. राबौल ही याची राजधानी आहे.

**बिस्मार्क, प्रिन्स फॉन** (१८१५–१८९८)—एक जर्मन मुत्सद्दी व जर्मन साम्राज्याचा पहिला चॅन्सेलर. याचा जन्म शॉन होसेन येथें झाला. गॉटिंजन, बर्लिन व ग्रीफस्वाल्ड येथें त्यानें कायद्याचा अभ्यास केला. १८४७ सालीं प्रशियन लांडटगमध्यें तो निवडून आला. १८५१ सालीं फ्रांकफोर्ट येथील

जर्मन डायेटचा तो सभासद निवडला गेला. या डायेटमध्यें तो असतांना त्यानें प्रशियाच्या नेतृत्वाखालीं जर्मन साम्राज्याची स्थापना व्हावी, असें आपलें मत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. १८५९ सालीं तो प्रशियाचा प्रधान झाला व १८६२ सालीं त्याची पॅरिसच्या वकिलातीवर नेमणूक झाली. तथापि त्याच वर्षी त्याला प्रशियन परराष्ट्रमंत्र्याची जागा मिळाली. फ्रँको-प्रशियन युद्ध, प्रशियानें केलेला ऑस्ट्रियाचा पराभव या सर्व गोष्टींचा त्यानें जर्मन संस्थानांचें एकीकरण करण्याच्या कामीं उपयोग करून १८७१ सालीं व्हर्सेलिस येथें त्यानें विल्यम राजाला जर्मन बादशहा बनविलें. या साम्राज्याचा बिस्मार्क हा प्रधान झाला व त्याला प्रिन्स ही पदवी मिळाली. सैन्य व आरमार यांची त्यानें उत्कृष्ट सुधारणा केली. १८७२ सालीं त्यानें जेसुइट लोकांना जर्मनींतून हांकलून लावलें. समाजसत्तावाद्यांविरुद्ध कायदे केले व पैतृक साम्यवाद (पॅटर्नल सोशॅलिझम) या मताचा त्यानें पुरस्कार केला. १८९० सालीं त्याचें व तिसऱ्या विल्यम बादशहाचें न पटल्यामुळें त्यानें आपल्या प्रधानकीचा राजीनामा दिला.

गेल्या शतकांतील युरोपियन राजकारणांत बिस्मार्क ही फार मोठी व्यक्ति होऊन गेली. तो अतिशय कणखर वृत्तीचा असून भावना किंवा नैतिक शंका तो राजकारणांतील आपले हेतु सिद्धीस आणतांना आड येऊं देत नसे. जर्मनींत त्यानें पुष्कळ सुधारणा केल्या व उद्योगधंद्यांत देश पुढें आणला.

**बिस्मिल, पंडित रामप्रसाद** (१९००–१९२७)—एक हिंदी क्रांतिकारक. याचा जन्म ग्वाल्हेर येथें झाला. १९ व्या वर्षापासूनच यानें आगगाडीवर डाके घालण्याच्या कामांत भाग घेण्यास सुरुवात केली. मैनपुरी खटल्याच्या वेळीं हा फरारी झाला. त्या वेळीं त्यानें फार कष्ट सहन केले. जवळ बिलकुल द्रव्य नसल्यामुळें त्याला गवत व झाडपाला खाऊन राहण्याचीहि पाळी आली होती. हा अविवाहितच राहिला. याचें संघटनचातुर्य अपूर्व होतें. त्यानें अनेक क्रांतिकारक कृत्यें केलीं. अखेरीस काकोरी कटाच्या खटल्यांत सांपडून त्यास फांशीची शिक्षा झाली. त्यास १९ डिसेंबर १९२७ रोजीं फांशीं देण्यांत आलें.

**बिहाग**—हा राग बिलावल थाटाचा जन्य आहे. याच्या आरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य होतात व अवरोह सात स्वरांनीं होतो म्हणून याची जाति औडुव संपूर्ण आहे. वादी स्वर गांधार व संवादी निषाद आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर संमत आहे. तीव्र मध्यमाचा अल्प प्रयोग विवादी या सर्व नात्यानें या रागांत होत असतो. याच्या अवरोहांत सुद्धां धैवत व ऋषभ हे स्वर दुर्बल ठेवावे लागतात. नाहीं तर बिलावल रागाची छाया उत्पन्न होण्याचा संभव असतो.

**बिहागरा**—हा राग बिलावल थाटांतून निघतो. याच्या आरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत व अवरोह सात स्वरांनीं होतो. म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा दुसरा प्रहर मानितात. या रागांत दोन निषादांचा व दोन मध्यमांचा प्रयोग होतो, म्हणून हा बिहाग रागापासून वेगळा राहूं शकतो.

**बिहारीलाल चौबे**—एक जुना हिंदी कवि. 'सतसई' अथवा सातशें दोह्यांचा संग्रह, या ग्रंथामुळें याची फार कीर्ति झाली. या ग्रंथामधील सौंदर्य, रस आणि भाषाचमत्कार हे कोणालाहि साधावयाचे नाहींत असे आहेत. फक्त तुळशीदासालाच ते साधले आहेत. बिहारीच्या काव्यावर अनेकांनीं टीका लिहिलेल्या आहेत. या ग्रंथावरील उत्कृष्ट टीका सुरतमिश्र आगरवाल याची आहे. यामधील आढळून येणारी श्लोकांची रचना आणि क्रम ही अझीमशहा युवराजासाठीं केलेली असल्याकारणानें या ग्रंथाला अझीमशाही ग्रंथ हें नांव आहे. काशीचा राजा चेतसिंग याच्या आश्रयाखालीं पंडित हरिप्रसाद यानीं याचें संस्कृतांत सुंदर पद्यमय भाषांतर केलें आहे. हा कबीराचा समकालीन असावा असें म्हणतात.

**बिही**—एक फळझाड. याचें फळ वाटोळें व साधारण मध्यम आकाराचें असतें. चव अमसुलासारखी असून वास मात्र मधुर येतो. याच्या फळांत जोंधळ्याहून मोठाल्या बिया असतात. त्यांस 'मोगली बेदाणा' म्हणतात. फळांचा मोरंबा घालतात. मुखपाकावर मोगली बेदाण्याच्या पाण्याच्या गुळण्या करतात. मूत्राघातावरहि पाणी देतात.

**बी (कवि)** (१८७२–१९४७)—(गुत्ते, नारायण मुरलीधर). महाराष्ट्रांतील एक अर्वाचीन कवि. यांची पहिली कविता 'प्रणय-पत्रिका' या नांवाची १८९१ त 'करमणूक' पत्रांत प्रसिद्ध झाली. पण १९११ पर्यंत ते बहुशः गद्यलेखनच करीत. त्यासाठीं 'मनोरंजन' मासिकांत 'बी' हें टोपण नांव धारण केलेलें आढळतें. काव्यरत्नावलि, महाराष्ट्र–साहित्य, नवयुग, इ. मासिकांतूनहि त्यांच्या कविता येत. ते प्रसिद्धिपराङ्मुख असल्यानें 'फुलांची ओंजळ' हा त्यांचा एकच लहानसा काव्य-संग्रह उपलब्ध आहे.

**बीकन्सफील्ड, लॉर्ड (बेंजामिन डिझरायली)** (१८०४–१८८१)—एक थोर ब्रिटिश मुत्सद्दी. याचें घराणें मूळ ज्यू असून पुढें ख्रिस्ती बनलें. त्यानें बापाच्या मोठ्या ग्रंथसंग्रहाचा व ग्रंथकर्तृत्वाचा फायदा घेऊन घरच्या घरीं आपलें ज्ञान वाढविलें. १७ व्या वर्षीच एका सॉलिसिटरच्या कचेरींत भागीदार

होऊन राहिला व त्या धंद्यांत चागलें कौशल्य मिळविलें. त्यानें कायद्याचा अभ्यास सुरू केला व कादंबरीलेखनहि हातीं घेतलें. त्याची 'व्हिव्हियन ग्रे' नांवाची कादंबरी बरीच लोकप्रिय झाली. त्याचा मेंदू बिघडल्यामुळें त्यानें वकिलीचा नाद सोडून दिला व कादंबऱ्या, कविता व राजकीय लेख लिहिण्याचा उद्योग आरंभला. त्याच्या कादंबऱ्या लोकांना बऱ्याच आवडल्या. पुढें तो उघड टोरी पक्षात शिरला. इ. स. १८३७ मध्यें मेडस्टोनतर्फे कॉमन्ससभेचा सभासद झाला. डिझरायलीनें राजकारणांतील विषयांचा मनःपूर्वक अभ्यास केला व पार्लमेंटमधील कामाच्या प्रत्यक्ष अनुभवामुळें तो लवकरच व्यवहारचतुर मुत्सद्दी बनला. तो भाषणांतून, तात्त्विक निबंधद्वारां व कादंबऱ्यामधून आपलीं मतें प्रतिपादन करीत असे. डिझरायलीचीं खुल्या व्यापारापासून होणाऱ्या तोट्यासंबंधीं मतें पुष्कळांना पटलीं व कॉन्झर्व्हेटिव्ह पक्षाचा पार्लमेंटमधील पुढारी तोच बनला. स. १८५२ त डर्बी प्रधानमंडळांत त्याला मुख्य फडणिसाची (चॅन्सलर ऑफ एक्स्चेकरची) जागा मिळाली. डिझरायली १८६८ सालीं मुख्य प्रधान झाला. १८७४ च्या निवडणुकींत लिबरल पक्षाचा पूर्ण मोड झाला व डिझरायली मुख्य प्रधान झाला. १८७५ मध्यें सुवेझ कॅनॉल कंपनीचे भाग (शेअर्स) ईजिप्तच्या खेदिवापासून ब्रिटिश सरकारनें विकत घेतल्याची बातमी प्रधान मंडळानें जाहीर केली तेव्हां सर्व देश अत्यंत आनंदित झाला. वरील आनंदांत व लोकप्रियतेंत आणखी भर घालण्याकरितां डिझरायलीनें व्हिक्टोरिया राणीला हिंदुस्थानचें सम्राज्ञीपद अर्पण करण्यासंबधींचें बिल पुढें आणलें. परंतु कित्येक इंग्लिशांना तें पसंत न पडून पुन्हां डिझरायलीविरुद्ध तट उत्पन्न झाले. परंतु इतक्या प्रतिकूल परिस्थितींतहि त्यानें बर्लिन येथील परिषदेंत चागला विजय व लौकिक मिळविला. व्हिक्टोरिया राणीनें कोणाहि प्रधानापेक्षां अधिक आदर व सौजन्य डिझरायलीबद्दल दाखविलें. याप्रमाणें लोकमान्यता व राजमान्यता या दोहोंचें त्यानें उच्च शिखर गांठलें. पण १८८० मधील निवडणुकींत त्याच्या पक्षाचा पराजय झाला. स. १८७६ मध्येंच 'अर्ल ऑफ बीकन्सफील्ड' पदवी मिळून तो लॉर्डांच्या सभेचा सभासद बनला. साम्राज्यसंरक्षणक्षम असें आरमार त्याच्या धोरणामुळेंच निर्माण झालें. स्वतःचें मत व धोरण सर्व राष्ट्राची गैरमर्जी व उपहास पत्करूनहि तो पुढें मांडीत असे.

**वीच**—[वर्ग-क्युप्युलिफेरी]. हें झाड जगातील अनेक प्रदेशांत होतें. युरोपांतील जंगलात वाढणाऱ्या या झाडांची उंची १२० फूटपर्यंत असते. याचें लाकूड टणक व ठिसूळ असतें व तें घरगुती सामान करण्याकरितां वापरण्यात येतें. हें पाण्यांत टिकतें, यामुळें त्याचा उपयोग गिरणीमध्यें मोऱ्यांचीं दारें वगैरे करण्याकरितां करण्यांत येतो. याचें चीं डुकरें, कोंबडीं, वगैरे प्राण्यास घालतात. याच्या एका जातीच्या झाडाच्या पानाच्या बाह्य त्वचेमध्यें तांबडा रस असतो.

**बीज**—वनस्पतीच्या गर्भाशयामध्यें गर्भधारणा झाली म्हणजे त्याचा जो परिपाक होतो त्यास बीज म्हणतात. याचे मुख्य आवश्यक भाग म्हटले म्हणजे सफल गर्भाशयामुळें उत्पन्न होणारा गर्भ (एंब्रिओ) व त्याचें रक्षण करणारें बीजावरण (टेस्टा) अथवा साल किंवा कवच. गर्भ म्हणजे एक प्राथमिक मूळ (रॅडिकल). एक प्राथमिक अंकुर (प्लुमुल) व (एकदलामध्यें-मोनोकॉटिलेडॉन्स) एक किंवा (द्विदलांमध्यें-डायकोटिलेडॉन्स) दोन गर्भपर्णें, किंवा कित्येक गर्भपर्णें (जिम्नास्पर्म्स) अथवा पर्णबीजें (कॉटिलेडॉन्स) मिळून झालेला असतो. म्हणजे गर्भ हें एक लहान आकाराचें झाडच असतें पण तें सुप्तावस्थेंत असतें. याची योग्य वेळीं रोपामध्यें वाढ व्हावी याकरितां अन्नाचा सांठाहि ठेवलेला असतो. हा अन्नसंचय त्या गर्भामध्येंच (बहुधा कॉटिलेडॉन्समध्यें), किंवा चिदांमध्यें बलकरूपानें किंवा कांहीं विशिष्ट पोषक पेशींमध्यें (एंडोस्पर्म्स) गर्भाजवळ किंवा त्यासभोंवतीं (बलकयुक्त बियामध्यें) ठेवलेला असतो.

**बीजगणित**—गणितशास्त्राची एक शाखा. बीजगणितांत प्राचीन हिंदूंनीं बरीच प्रगति केली होती. ते ज्या संख्याची बेरीज करावयाची असेल त्या फक्त एकमेकांजवळ ठेवीत असत; जी संख्या वजा करायची असेल तीवर एक बिंदु ठेवीत असत. गुणकाच्या पुढें भा हें अक्षर ठेवीत असत; भाजक भाज्याच्याखालीं मांडीत असत. राशीच्या पूर्वी का व करण लिहून वर्गमूळ व घनमूळ दाखवीत असत. अज्ञात राशीला ब्रह्मगुप्त यावत्तावत् म्हणत असे. ऋणराशींचें व करणीगत राशींचें अस्तित्व प्रथम हिंदूंनींच शोधून काढलें.

वर्गात्मक समीकरणाचीं दोन उत्तरें असतात, हें हिंदूंनाच प्रथम समजलें. हेरॉन $\text{अक्ष}^{२} + \text{बक्ष} = \text{क}$ ह्या समीकरणाचें उत्तर

$$\text{क्ष} = \frac{\sqrt{\text{अक} + \left(\frac{\text{ब}}{२}\right)^{२}} - \frac{\text{ब}}{२}}{\text{अ}}$$ असें देतो.

श्रीधरनें निराळ्या रूपांत हेंच दिलें आहे—

$$\text{क्ष} = \frac{\sqrt{४\,\text{अक} + \text{ब}^{२}} - \text{ब}}{२\,\text{अ}}$$

डायोफँटसची तीन निरनिराळीं समीकरणें $\text{अक्ष}^{२} + \text{बक्ष} = \text{क}$; $\text{अक्ष}^{२} = \text{बक्ष} + \text{क}$; $\text{अक्ष}^{२} + \text{क} = \text{बक्ष}$ हीं हिंदूंनीं एकाच पद्धतीनें सोडविलीं. कारण त्याना ऋण राशींची माहिती होती.

ऋणराशी व धनराशी ह्यांचा वर्ग धनच असतो, धनराशीचें वर्गमूळ काढणें शक्य नाहीं, ह्या गोष्टी प्रथम भास्कराचार्य यानीं सिद्ध केल्या. द्विपदकरणीगत राशीचें वर्गमूळ काढण्याची पद्धति प्रथम भास्कराचार्य यांनीं दिली.

$$\sqrt{अ \pm \sqrt{ब}} = \sqrt{\frac{अ + \sqrt{अ^२ - ब}}{२}} \pm \sqrt{\frac{अ - \sqrt{अ^२ - ब}}{२}}$$

त्याचप्रमाणें $\sqrt{अ + ब + २\sqrt{अब}} = \sqrt{अ} + \sqrt{ब}$ हीं सूत्रें भास्करार्यांनीं दिलीं आहेत. हँकेलचें असें म्हणणें आहे कीं, जर बीजगणित याचा अर्थ अंकगणितांतील कृत्यें सर्व करणीगत अथवा अकरणीगत राशींना लावावयाचीं असा केला तर हिंदुस्थानांतील ब्राह्मण हेच बीजगणिताचे संशोधक समजले पाहिजेत.

मिसरी लोकांस फक्त उदाहरणें सोडविण्याचें ज्ञान होतें; परंतु ग्रीकांनीं सर्वसामान्य सिद्धांत शोधून काढण्याचा प्रयत्न केला. त्यांच्यामध्यें हिपासिक्लस, निकोमॅकस, वगैरे गणितज्ञ होऊन गेले. युरोपमध्यें गणिताचा प्रसार रोममधून झाला. अरब गणितज्ञ ग्रीकांपासूनच शिकलेले वाटतात. टोबिट बिन कोरा (८३६-९०१) यानें वर्गसमीकरणें सोडवून दाखविलीं आहेत. अबलगुडनें वर्तुळाच्या आंत किंवा बाहेर काढलेल्या सप्तकोनांची बाजू समीकरणाच्या साहाय्यानें शोधून काढली. इटालियन गणिती टार्टॉग्लिया यानें १५३५ मध्यें घन-समीकरण सोडविण्याची सामान्य रीत काढली. त्याचा शिष्य कार्डेन यानें ती प्रसिद्ध केली म्हणून त्याचें नांव त्या रीतीला आहे. *जर्मन गणितज्ञ स्टायफेल यानें अधिक, उणें व वर्ग यांचीं* चिन्हें सुरू केली; तीं आपल्याकडील अक्षराचिन्हांपेक्षां सोयीचीं वाटतात. १५५२ सालीं = हें चिन्ह प्रचारात आलें. १६३१ च्या सुमारास अधिकतर ( > ) व लघुतर ( < ) हीं चिन्हें निघालीं. १६३७ सालीं डेकार्ट यानें भूमिति आणि बीजगणित यांची सांगड घालून दिली. याचें साधें उदाहरण म्हणजे असें :

समांतर चतुर्भुजा( पॅरॅलेलोग्रॅम )चें क्षेत्रफळ काढावयाचें झाल्यास पायाच्या लांबीला लंबाच्या उंचीनें गुणतात. हेंच बीजगणितांत असें मांडतां येईल अ × ब = क किंवा अब = क. ( त्यांत अ = पाया; ब उंची; आणि क = क्षेत्रफळ )

अर्वाचीन काळांत भिन्न भिन्न नियमांवर बीजगणितें रचिलीं आहेत. जॉर्ज पीकॉक, डी. एफ. ग्रेगरी, मार्टिन ओहम, ऑगस्टस मार्गन, वगैरेंचीं या बाबतींत कामगिरी संस्मरणीय आहे.

बीजगणिताला इंग्रजी Algebra नांव आहे. (al हें अरबी निश्चित उपपद व जिब्रा म्हणजे सारखें करणें). हें अंकगणिताचें सामान्य स्वरूप होय. यांत संख्या वर्णांनीं दाखवितात. आणि बेरजा वगैरे संख्येवर होणारे सहा प्रकार चिन्हांनीं दाखवितात. जसें क्षय + क ज + ड य$^२$ या वाक्याचा अर्थ असा : क्ष नें य ला गुणावयाचें, क या संख्येनें ज ला गुणावयाचें व ड नें यच्या वर्गाला गुणावयाचें व तीन पदांची बेरीज करावयाची. क्ष$^२$ - ७क्ष + १२ = ० ह्या समीकरणाचा अर्थ, क्ष या संख्येच्या वर्गांतून ७क्ष याचा गुणाकार वजा करावयाचा व त्यात १२ मिळवावयाचे म्हणजे उत्तर शून्य येतें. ह्या समीकरणांत क्ष = ३ अथवा ४ घातले असतां समीकरणाच्या दोन्ही बाजू सारख्या होतात. परंतु ( अ + ब ) ( अ - ब ) = अ$^२$ - ब$^२$ हें सूत्र अ व ब च्या कोणत्याहि किंमती घातल्या असता खरें ठरतें. गुंतागुंतीच्या गणितामध्यें बीजगणिताचा फार उपयोग होतो. गणितानें अशक्य असे हिशेब सुलभतेनें बीजगणितानें करतां येतात.

**बीजधारी नेचे**—( प्टेरिडोस्पेरस ). अपुष्प वनस्पतींच्याच एका जातीचीं हीं झाडें आहेत. हीं प्रास्तर अवशेष स्वरूपांत आढळतात. त्यांचा काल कलियुग हा होय. यांस पूर्वी नेचेच समजण्यांत येत असे; परंतु अलीकडे असें दिसून आलें आहे कीं, यांची उत्पत्ति बियांपासूनच होत असे व अपुष्प वनस्पतींमध्यें यांची जातिहि बरीच परिणत अवस्थेंतील असावी. ( कोळसा पहा ).

**बीजफलविकीरण**—झाडांचें बीं किंवा फळें याचा दूरवर प्रसार अथवा विकीरण होण्याचीं मुख्य साधनें म्हणजे वारा व प्राणी होत. झाडांचीं बारीक लहान फळें वाऱ्याच्या प्रवाहाबरोबर उडून जातात. *कांहीं थोड्या मोठ्या फळांस पंखा*सारखे अवयव असतात त्यामुळें तीं वाऱ्याबरोबर उडून जाऊं शकतात. कांहींना म्हाताऱ्या म्हणजे केंसासारखे छत्रीच्या आकाराचे तंतू असतात.

कांहीं फळें प्राणी खातात. त्याच्या बिया कठिण असून त्या प्राण्याच्या पोटांत पचून न जातां त्याच्या विष्टेबरोबर बाहेर पडतात. कांहीं फळांस आंकडे असतात व ते आंकडे मेंढ्या वगैरे प्राण्यांच्या लोंकरीसारख्या केंसांत अडकतात व यामुळें दूरवर पसरतात.

**बीट**—[ वर्ग-चेनोपोडियासी ]. हें एक रोप असून याची मुळें खाण्याकरितां किंवा साखर करण्याच्या कामीं उपयोगांत आणतात. याच्या मुख्य दोन जाती आहेत. एका जातीमध्यें ( चार्ड ) मुळें लहान, पांढरीं व जरा कठिण असतात व पानामध्यें एक रुंद जाड शीर असते. दुसऱ्या साध्या जातीमध्यें मुळें

मांसल असून त्यांत तांबडे, पिवळे, साखरेचें वगैरे प्रकार आहेत. या झाडाचीं मुळें ऑगस्टमध्यें तयार होतात परंतु त्यांची वाढ ऑक्टोबरपर्यंत पुरी होत नाहीं. नेपोलियनच्या युद्धाच्या काळीं फ्रेंच लोकांनीं प्रथम पांढऱ्या बीटच्या मुळांपासून साखर तयार केली. त्यानंतर जर्मनीमध्यें हा धंदा मोठ्या प्रमाणावर करण्यांत येऊं लागला. याप्रमाणेंच चेकोस्लोव्हाकिया, बेल्जम, हॉलंड, ग्रेट ब्रिटन, स्वीडन, स्पेन, इटली, वगैरे देशांतहि बीटपासून साखर तयार करण्यांत येते. १९४०-४१ सालीं जगांत बीटसाखरेचें उत्पादन १० कोटी क्विंटलइतकें होतें; यांपैकीं रशिया, जर्मनी व अमेरिका या राष्ट्रांत सर्वांत अधिक साखर तयार झाली.

ही भाजी आहे. बिटाचें बीं पालकाच्या बियासारखें असतें व त्याच्याच वर्गापैकीं बीट ही एक जात आहे. पालकाचीं पानें हिरवीं असतात. बीटाचीं काळीं, जांभळीं अथवा जांभळ्या शिरा व देठ असलेलीं हिरवीं पानें असतात. बिटाच्या पानांची कोवळेपणीं पालकाप्रमाणें भाजी होते. जनावरांच्या खुराककरितां विलायतेंत बीट करतात, त्यास "मॅंगल वर्झेल" हें नांव आहे. तो तांबडा अगर पिवळा असतो. बिटाची लागवड कोबी, कॉलीफ्लावर, वांगीं, टोमाटो, विलायती गवत, वगैरे मोठ्या जातींच्या पिकांत मिश्र करतात.

**बीड**—हैद्राबाद संस्थान, औरंगाबाद विभागांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४१३२ चौ. मै., खालसा आणि सरफ-इ-खास जमिनीचें क्षे. फ. ३९२६ चौ. मै.. पाऊस सरासरी ३० इंच पडतो. बीडचें मूळचें नाव दुर्गावती असून नंतर चंपावती नगर झालें. हें आंध्र, चालुक्य, राष्ट्रकूट आणि यादव यांच्याकडून हातोहात जाऊन शेवटीं दिल्लीच्या मुसलमान राजांच्या हातीं गेलें. १३२६ च्या सुमारास महंमद तुघ्लखनें याचें नांव बीड असें ठेविलें. जोगाईचें आंबें व परळी वैजनाथ हीं या जिल्ह्यांत मोडतात. लो. सं. सु. सात लाख. ज्वारी, गहूं व इतर धान्यें आणि कडधान्यें, कापूस, जवस हीं पिकें होतात. मुख्य गांव बीड असून हें बेंदसुरा नदीच्या कांठीं आहे. गांवांची लो. सं. वीस हजार. या गांवचे किल्ले व इमारती पुराणवस्तुसंशोधनाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत. येथें लोंकरीचें कापड व गुती तयार होतात. कनकालेश्वराचें देवालय प्रेक्षणीय आहे.

**बीदर**—मोहमदाबाद. निजामच्या राज्यांत गुलबर्गा विभागांत हा एक जिल्हा आहे. क्षेत्रफळ ४,१६८ चौरस मैल. १४३० सालीं अहमदशहा वली बहामनी यानें येथील किल्ला बांधून, बीदर गांव वसविलें. १६१५ मध्यें किल्ला काबीज केला व बरीच लूट मिळविली. बीदरचा किल्ला अजून चांगल्या स्थितींत आहे. या किल्ल्यावर पुष्कळ तोफा आहेत. आतां किल्ल्यांत उत्खनन चाललें असून बरेच अवशेष निघत आहेत. कल्याणी येथें पुष्कळ प्राचीन काळच्या इमारतींचे अवशेष दृष्टीस पडतात. कल्याणी ही चालुक्य राजांची राजधानी होय. याखेरीज निलंगा, करूस, नारायणपूर, साकोलसिरूरी, सीतापूर व तिपरथ या खेडेगांवीं जुन्या इमारतींचे अवशेष आहेत. लो. सं. सु. दहा लाख. या जिल्ह्यांतील जमीन फार सुपीक आहे. गेरू व संगजिरें हे खनिज पदार्थ येथें सांपडतात. बीदरचीं भांडीं फार प्रसिद्ध आहेत; यावर पूर्वीं नक्षीकाम फार उत्तम करीत असत.

गांव—वरंगळच्या काकतीय राजानें येथील महादेवाचें देऊळ बांधिलें व त्याभोंवतीं १३ व्या शतकांत वस्ती होण्यास सुरवात झाली. अहमदशहा वलीनें किल्ला बांधून सध्यांचें शहर वसविलें. १४३० सालीं बहामनी राज्याची राजधानी येथें आणली. महमद गवान यानें येथें एक मोठी मद्रसा बांधिली. ही इमारत फार शोभिवंत आहे. किल्ला फार प्रेक्षणीय आहे. अहमदशहा वली बहामनी याच्या कबरींत सुंदर चित्रें आहेत. येथें अली बरीद, कासीम बरीद या राजे लोकांचीं थडगीं आहेत. येथील खुजे व हुक्के प्रसिद्ध आहेत. साखरहि प्रसिद्ध आहे. लो. सं. सु. पंधरा हजार.

**बीन**—हें उत्तरेकडील वाद्य आहे. 'बीन' हा शब्द सुद्धां 'वीणा' या शब्दाचा अपभ्रंश आहे असेंहि म्हणतां येईल. सुमारें तीन-चार इंच व्यासाची व तीन ते चार फूट लांब अशी पोकळ वेळूची सरळ दांडी ह्या वाद्यास पसंत करावी लागते. दांडीच्या दोनहि शेवटांस चार बोटें रुंदीच्या पितळी किंवा रुप्याच्या मायण्या बसवितात. सुमारें पंचवीस ते तीस इंच परिघाचे दोन गोल कडू भोंपळे घेऊन त्यांचे देंठ काढून टाकून तेथें वर सांगितलेली दांडी बसेल अशा खांचा प्रत्येक भोपळ्यास घेतात. दोन हस्तिदंती अटी एका शेवटापासून सुमारें सहासात इंच अंतर सोडून बसवितात, दुसऱ्या शेवटास हस्तिदंती घोडी बसवितात. घोडीखालीं दिलेल्या लांकडी तुकड्यासच तारदान बसविलेलें असतें. दांडीच्या दोन्ही अंगांस अटीच्या वर एका अंगास तीन व दुसऱ्या अंगास दोन तारा लावण्यासाठीं बऱ्याच मोठ्या खुंट्या बसवितात. चिकारीची तार दुपटीच्या पड्जांत ठेवितात, खरज व पंचम ह्या स्वरांच्या तारा पितळेच्या कच्च्या असतात. बाकीच्या सर्व तारा पोलादी पक्क्या असतात. दांडीवर वीस लांकडी पडदे मेणांत बसविलेले असतात. प्रत्येक पडद्यास खांच करून तींत पोलादाचा पातळ तुकडा पडद्याइतक्या लांबीचा बसवितात. ह्या तुकड्यावर वाद्याच्या तारा दाबल्या जातात. ह्या वीस पडद्यांमुळें या वाद्यांत अडीच सप्तकें पुरीं होतात. हें सर्व वाद्यांचा राजा आहे असें मानितात. 'अनिरुद्ध' गानाचें

योग्य प्रकाशन याच्याइतकें दुसऱ्या कोणत्याहि वाद्यांत होऊं शकत नाहीं.

**बीरबल** (१५२८–१५८३)—हा अकबराच्या दरबारांतील कवि व मंत्री होता. औदार्याबद्दल, तसेंच गानकौशल्य व काव्यनैपुण्य यांबद्दल तो फार प्रसिद्ध आहे. त्याच्या छोट्या कविता आणि विनोदपर गोष्टी लोकांच्या तोंडीं आहेत. धार्मिक मुसलमानांकडून ह्याचा द्वेष केला जात असे. याचें कारण त्यांच्या मतें इस्लामविषयीं अकबराचें मन दूषित करण्याचा यानें प्रयत्न केला. याचें मूळचें नांव महेशदास असून हा काल्पीचा कनोजी ब्राह्मण होता. हा प्रथम अंबेरचा राजा भगवानदास याच्या पदरीं कवि म्हणून होता. पण अकबराच्या राज्यारोहणाच्या वेळीं भगवानदासानें अकबरास नजर म्हणून याला दिलें. या वेळीं तो आपल्याला ब्रह्मकवि हें नांव लावीत असे. त्याचीं छोटीं हिंदी काव्यें फार लोकप्रिय होतीं. अकबरानें त्याला 'कविराय' ही पदवी दिली. १५८३ सालीं युसफझई लोकांच्या विरुद्ध झैनखान कोका याला मदत करण्यासाठीं अकबरानें बीरबलाला पाठविलें, पण तो तेथें ठार मारला गेला. बीरबलानें अकबरपूर नांवाचें एक शहर वसविलें होतें व तो तेथेंच राहत असे. या शहराच्या नारनौल भागामध्यें त्याचे वंशज अद्यापि राहतात. बीरबलनामा नांवाचा एक ग्रंथ विकत मिळतो त्यांत अकबर व बीरबल यांच्याविषयींच्या अनेक विनोदी गोष्टी आढळून येतात.

**बीरभूम**—बंगाल इलाख्यांत बरद्वान भागांतील एक जिल्हा. क्षे. फ. १७४३ चौरस मैल. बीरभूम हा शब्द वीरभूमि यापासून झाला असावा. मुख्य गांव सुरी आहे. मोर व अनय या मुख्य नद्या आहेत. एकंदर पाऊस ५० इंच पडतो. १३ व्या शतकांत यावर हिंदु राज्य होतें. राजधानी राजनगर अथवा नगर. १७८७ सालीं इंग्रजांनीं याची व्यवस्था आपल्याकडे घेतली. लो. सं. (१९४१) १०,४८,३१७. पैकीं हिंदू सु. ६८,००० आहेत. वन्य हिंदूंत संताळांची गणना होते. मुख्य पीक भाताचें आहे. थोडाबहुत मका, ऊंस व हरबरा होतो. लोहमिश्रित दगड, अभ्रक, ग्रॅनाइट वालुकामय दगड, चुनखडी हींहि सांपडतात. हातमागावर सुती कापड काढतात. रेशीम काढण्याचा धंदा या जिल्ह्याच्या पूर्व भागांत चांगला चालतो. लाखेच्या बांगड्या, दौती, लोखंडाचीं व पितळेचीं भांडीं हे जिन्नस तयार होतात. येथें कायमधारा पद्धत सुरू आहे.

सु. वि. भा. ४–४२

**बीव्हर**—उत्तर गोलार्धांत आढळणारा सर्वांत मोठा तीक्ष्णदंती चतुष्पाद-प्राणी. याची लांबी, शेपटी सोडून, दोन फूट असते. युरोप व आशिया यांमध्यें हे एकाकीं राहतांना आढळतात; पण अमेरिकेमध्यें कळप करून राहतात. याची लव फार मौल्यवान् असते. हे प्राणी आतां ब्रिटनमधून नष्ट झाले आहेत. हे आपलीं घरें बांधण्यांत फार कुशल असतात. झाडें पाडून तीं पाण्यांतून सोयीच्या ठिकाणीं नेतात व त्यांचा बांध घालतात. या बांधांत जी माती येऊन बसते तिच्यामुळें यांच्या घराचें रक्षण होतें.

**बीव्हरब्रूक, विल्यम मॅक्सवेल ऐटकेन, लॉर्ड** (जन्म १८७९– )— हा एक मोठा वर्तमानपत्रांचा मालक आहे. त्याच्या वृत्तपत्रांत 'लंडन एक्सप्रेस' आणि 'ईव्हनिंग स्टॅंडर्ड' हीं प्रसिद्ध आहेत. याच्या धडाडीमुळें आणि खळबळ उडवून देण्याच्या पद्धतीमुळें वर्तमानपत्री जगामध्यें यानें मोठी क्रान्ति घडवून आणली. पहिल्या महायुद्धामध्यें यानें कांहीं सरकारी अधिकारांच्या जागीं कामें केलीं व दुसऱ्या महायुद्धांत युद्ध-सामुग्रीचा उत्पादनमंत्री होता. १९४२ मध्यें त्यानें हें मंत्रिपद सोडलें.

**बुकॅनन, जॉर्ज** (१५०६–१५८२)—एक स्कॉटिश धर्मसुधारक, इतिहासकार, पंडित व लॅटिन कवि. १५२९ सालीं सेंट बार्बे येथील कॉलेजात तो प्रोफेसर झाला. नंतर बोर्डो येथें लॅटिनचा प्रोफेसर व नंतर पोर्तुगालमध्यें कोइम्ब्रा युनिव्हर्सिटींत प्रोफेसर झाला. पण तेथें इन्क्विझिशन कोर्टानें त्याला शिक्षा देऊन बंदींत ठेवलें. पण तेथून सुटून पॅरिसला कांहीं काळ राहून स्कॉटलंडला १५६० सालीं परत आला आणि उघडपणें धर्मसुधारणावादी लोकात सामील झाला. १५६६ सालीं त्याला सेंट लिओनार्ड कॉलेजचा प्रिन्सिपॉल नेमलें व १५७० सालीं जेम्स राजाच्या शिक्षणावर देखरेख करण्यास नेमलें आणि 'कीपर ऑफ दि प्रिव्हि सील' या हुद्यावरहि नेमण्यांत आलें. प्राथमिक लॅटिन व्याकरण; सोम्नीयम व फ्रॅन्सिस्केनस हे दोन फ्रॅन्सिस्कन पंथीयांवर उपरोधक लेख; 'जेफथेस' आणि 'बॅप्टिस्टस' हीं दोन दुःखान्त नाटकें; व एक प्रजाजनांचे हक्क प्रतिपादन करणारा ग्रंथ, वगैरे त्याचें लिखाण आहे.

**बुकॅनन, रॉबर्ट** (१८४१-१९०१)—एक ब्रिटिश कवि. त्याचे बरेच काव्यसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. नंतर त्यानें कादंबऱ्या लिहिल्या. त्यांपैकीं 'दि शॅडो ऑफ दि सोवर्ड' (असिपत्राची छाया), 'गॉड अॅन्ड दि मॅन' (माणूस आणि देव), 'दि चाइल्ड ऑफ नेचर' (सृष्टीचें बालक), इ. प्रसिद्ध आहेत. त्यानें नाटकेंहि लिहिलीं.

**बुक्क संगम** (राज्यकाल सन १३५५-१३७७)—विजयानगरचा एक राजा. यदुकुलांतील संगम यास पांच पुत्र झाले. त्यांपैकीं बुक्क हा आपल्या पराक्रमानें विशेष प्रसिद्धीस आला. संगमानंतर त्याची गादी त्याचा वडील पुत्र हरिहर ऊर्फ हरियम म्हणजे बुक्काचा वडील भाऊ यांजकडे स्वाभाविकच आली. हरिहरनें आपल्या प्रत्येक भावाला एका एका प्रांताचा युवराज नेमून राज्यकारभार सुरू केला. त्या वेळीं बुक्काची नेमणूक होयसण ऊर्फ होसण म्हणजे हल्लींच्या म्हैसूर प्रांतांतील हसन या जिल्ह्यावर युवराज म्हणून झाली होती. पुढें हरिहरनें आपला उतार काल व बुक्काचे राज्यकारभारांत उपयोगी पडणारे गुण जाणून बुक्कावरच राज्यकारभाराचा भार टाकला. यानंतर हरिहर मृत्यु पावला, तरी त्याखालचा बुक्काचा वडील भाऊ कंप याच्या हातीं सत्ता न जातां ती बुक्काकडेच राहिली. बुक्क हा अनुभवी व शूर असून यानें दक्षिणेंतील मुसलमानी आक्रमणाला मागें सारून हिंदु संस्कृति व परंपरा अबाधित ठेवण्याचें महत्त्वाचें काम पार पाडलें. याशिवाय याची विशेष नांवाजण्यासारखी अशी दुसरी कामगिरी ही कीं, यानें माधवाचार्यांच्या मदतीनें वेदांचें व धर्मग्रंथांचें पुनरुज्जीवन केलें. वेदावर भाष्यें लिहिलीं. त्यामुळें चौदाव्या शतकांतील लेखांतून यास 'वैदिकमार्गप्रवर्तक' असें म्हटलें आहे. यानें सुमारें बावीस वर्षें राज्य केलें.

**बुखारा**—मध्य आशिया, उझबेग या सोव्हिएट सोशॅलिस्ट लोकसत्ताक राज्यांतील एक संस्थान. हें मध्य ऑक्सस नदीच्या दक्षिण तीरावर आहे. क्षे. फ. ६९,४४० चौरस मैल आहे. ऑक्सस ही मुख्य नदी होय. बुखाराची लो. सं. ३०,००,००० आहे. यांत उझबेग ही मुख्य जात होय. पूर्वी बुखारा हें सोगडिआना या नांवानें माहीत होतें. बुखारा राजधानी अल्लासीआच या इराणी वीरानें वसविली असें म्हणतात. ६४०-४२ सालीं अरबांनीं इराण जिंकलें तेव्हां हा मुलूख त्यांच्याकडे आला व तेथें इस्लामी धर्माचें बीजारोपण करण्यांत आलें. यांत बुखारा व समरकंद अशीं दोन महत्त्वाचीं शहरें होतीं. १९१९ सालीं राज्यक्रांति होऊन अमीरास हांकलून दिलें व बुखाऱ्यांत सोव्हिएट राज्य सुरू झालें. १९२४ च्या सप्टेंबरांत बुखारा व खीवा एकत्र जोडून उझबेगचें सोव्हिएट सोशियालिस्ट लोकसत्ताक राज्य बनविण्यांत आलें. आतांची राजधानी बुखाराच आहे.

गांव—२८ फूट उंचीच्या व ८ मैल लांबीच्या भिंतीचा या शहराला कोट आहे. हें झेरफशान नदीकांठीं आहे. शहरांत ३६० मशिदी, १४० मद्रसा व बऱ्याच प्राथमिक शिक्षणाच्या शाळा आहेत. या शहरांत उत्तमोत्तम व मौल्यवान् ग्रंथांचे संग्रह अजूनहि आहेत. लो. सं. सुमारें पाऊण लाख ते एक लाख आहे.

**बुखारेस्ट**—रुमानियाची राजधानी. स. १९४५ मध्यें येथील लो. सं. सुमारें दहा लाख होती. येथें १९१७ सालीं ४०,००० वर ज्यू लोक व ५०,००० वर परदेशचे लोक होते. या शहरांतून डिम् बोव्हिट्झा नदी वाहते. येथील बगीच्यांमुळें, धर्ममंदिराच्या मनोऱ्यांमुळें व घुमटांमुळें हें शहर अतिशय सुंदर आणि रमणीय दिसतें. बुखारेस्टला पूर्वेकडील पॅरिस म्हणतात. हें शहर विद्येचें मोठें केंद्र आहे. येथें व्यापार, कला व शास्त्र यांच्या शाळा आहेत. येथें १८६४ सालीं एका विश्वविद्यालयाची स्थापना करण्यांत आली. येथें पुष्कळ वाचनालयें असून राष्ट्रीय वाचनालयांत पुष्कळ मौल्यवान पौरस्त्य ग्रंथ आहेत. १५९५ सालीं हें शहर तुर्कांनीं जाळलें. येथील तट व किल्ला अतिशय मजबूत असूनहि गेल्या महायुद्धांत हें जर्मनांनीं काबीज केलें होतें.

**बुडणें**—बुडालेल्या माणसास सावध करण्याचे उपाय बरेच आहेत. मनुष्यास बाहेर काढल्यावर तो निश्चेष्ट असेल तर डॉक्टरला लवकर बोलवावें. डॉ. सिल्व्हेस्टर आणि डॉ. बेंजामिन हॉवर्ड यांचे उपाय बहुतेक योजण्यांत येतात. प्रथम बुडालेल्या माणसाचा गळा व छाती यांवरील घट्ट असलेले कपडे काढून टाकावे. नंतर त्यास उघड्या हवेंत तोंडाला, मानेला व छातीला वारा लागेल अशा जागीं पालथें करून निजवावें. प्रथम त्याचा श्वासोच्छ्वास चालू करण्याची खटपट करावी. श्वासोच्छ्वास चालू झाल्यावर त्याच्या अंगांत उष्णता आणावयाची व त्याचें रुधिराभिसरण चालू करण्याची खटपट करावी. बुडालेल्या माणसाचा घसा प्रथम चांगला साफ करावा. नंतर त्याचाच हात त्याच्या कपाळाखालीं ठेवून त्याला जमिनीवर पालथें निजवावें. याप्रमाणें निजविल्यानें पोटांत गेलेलें पाणी बाहेर येतें व जीभ पुढें येऊन घशाचें द्वार खुलें होतें. याप्रमाणें करून देखील त्याचा श्वास सुरू झाला नाहीं तर त्याच्या डोक्यास आधार ठेवून एका कुशीवर करावें. नंतर त्याच्या नाकांत शिंक येण्यासारखी चेतना उत्पन्न करण्यासाठीं तपकिरीसारख्या पदार्थाचा उपयोग करावा अथवा घशांत मऊ मऊ पिसांनीं खाजवावें. तसेंच छातीवर थंड व गरम पाणी आळीपाळीनें जोरानें मारावें. इतकेंहि करून श्वास सुरू झाला नाहीं तर त्यास पुनः पालथा

करावा व कपड्याची गुंडाळी त्याच्या छातीखालीं देऊन त्याची छाती उंच करावी. नंतर हलकेच त्याला कुशीवर अधिक कलता करावा व पुनः झटकन् पालथा करावा. याप्रमाणें एका मिनिटांत १४-१५ वेळ हालवीत असावें. मधून मधून कूसहि पालटावी. अशा मनुष्यास छातीवर निजविल्यानें शरीराच्या वजनानें आंतील हवा दाबली जाऊन बाहेर पडते. नंतर कुशीवर वळविल्यानें दाब नाहींसा होऊन हवा फिरून छातींत शिरते. मधून मधून त्यास दाब द्यावा म्हणजे हवा बाहेर येण्यास मदत होते.

बंद पडलेला श्वासोच्छ्वास सुरू करण्यासाठीं पायाकडील बाजू उतरती करून त्यास सपाटीवर उताणें निजवावें. एखादी कापडाची उशी त्याच्या खांद्याखालीं देऊन त्याचें डोकें व खांदा उंच करावा. नंतर त्याची जीभ धरून एका माणसानें बाहेर काढावी व ती धरून ठेवावी. मग एका दुसऱ्या माणसानें त्याच्या डोक्याच्या मागें बसावें. नंतर डोक्यामागें बसलेल्या माणसानें बुडालेल्याचे हात कोपरांच्या वरच्या अंगास आपल्या हातांनीं धरावे व दोन्ही हात संथपणें डोक्याच्या वर नेऊन दोन सेकंदांपर्यंत लांब धरावे. यामुळें फुफ्फुसांत हवा शिरते. नंतर हात खालीं नेऊन संथपणें त्याच्या छातीच्या दोहों बाजूंस दाबून धरावे. यामुळें फुफ्फुसांतील हवा दाबल्यामुळें बाहेर पडते. याप्रमाणें एका मिनिटांत १५ वेळा या गतीनें या क्रिया सारख्या सुरू ठेवाव्या. श्वासोच्छ्वास सुरू होत नसला तरी १-१॥ तास हा प्रयत्न न कंटाळतां चालू ठेवावा. ही दुसरी रीत जास्त चांगली समजली जाते. ( व्या. शा. )

**बुडापेस्ट**—हंगेरी देशाची राजधानी. बुडा आणि पेस्ट हे शहराचे दोन्हीहि भाग डॅन्यूब नदीच्या तीरावर एकमेकांसमोर वसले आहेत, व एका भागातून दुसऱ्या भागांत जाण्यास ठिकठिकाणीं सात पूल बांधले आहेत. ह्या शहराचें क्षेत्रफळ ७८ चौरस मैल आहे. ह्या शहराच्या बुडा भागांत १३ व्या शतकांत बांधलेलें मॅथियसचें ख्रिस्ती देवालय आहे. ह्याचसारखें पेस्ट भागांतहि एक जुनें मंदिर गॉथिक पद्धतीनें बांधलेलें आहे. हें शहर हंगेरी देशाचें ज्ञानकेंद्र असून येथें एक विद्यापीठ आहे. हें विद्यापीठ १८३५ त स्थापलें. ह्या शहराची लोकसंख्या सु. अकरा लाख असून तींपैकीं निम्म्याच्यावर मगियार लोक आहेत. येथें खनिजोदकाचे उष्ण झरे आहेत. दारू तयार करण्याचा धंदा मोठा आहे.

**बुडीद**—( लेड लाइन ). समुद्राच्या पाण्याची खोली किती आहे व त्याच्या तळाशीं काय आहे हें पाहण्याकरितां गलबतावर जें साधन वापरण्यांत येतें त्यास बुडीद म्हणतात. या बुडीदास खालून एक पोकळ भाग असून त्यांत चरबी भरलेली असते, व त्याचें वजन १० ते १४ पौंड असतें. या पोकळींत किंवा बुडीदास चिकटून जे पदार्थ येतील त्यांवरून समुद्राच्या तळाशीं काय आहे हें कळतें व त्यास लावलेल्या दोरीवरून किंवा सांखळीवरून समुद्राची विशिष्ट ठिकाणची खोली कळून येते. फार खोल समुद्रामध्यें वापरण्याकरितां अलीकडे एक नवीन यंत्र निघालें आहे.

**बुंदी संस्थान**—राजपुतान्याच्या आग्नेयीकडील एक संस्थान. क्षेत्रफळ २२०० चौरस मैल. पाऊस सुमारें ४२ इंच पडतो. बुंदीचा राजा चव्हाण रजपुतांचा मुख्य आहे. सन १३४२ च्या सुमारास देवराजानें बुंदी शहर घेतलें. तेव्हांपासून त्याचा वंश येथें राज्य करीत आहे. १७ व्या शतकाच्या सुमारास झालावती व कोटा हीं दोन वेगळीं वेगळीं संस्थानें झालीं. बुंदीचा राजा रतनसिंग ह्यानें आपल्या मुलास जहागीर म्हणून कोटा व इतर प्रांत तोडून दिला. संस्थानची लोकसंख्या (१९४१) २,४९,८७४. नैनवा व बुंदी हीं दोन मोठीं शहरें असून एकंदर १२ तहशिली आहेत. हिंदूंची संख्या शें. ९१ आहे. मीनार जातीचे लोक ह्या संस्थानांत फार आहेत. जमिनीला पाणी बहुतेक विहिरींचें दिलें जातें. मूग, ज्वारी, मका, गहूं, जव, हरभरा, अफू हीं पिकें होतात. वायव्येकडील भागांत लोखंडाच्या खाणी होत्या. त्यांतून पुष्कळ लोखंड निघत असे. चुनखडीहि बऱ्याच ठिकाणीं सांपडते. धर्मार्थ म्हणून ब्राह्मणांना किंवा गोरगरिबांना दिलेल्या जमिनीला खैरात जमिनी असें म्हणतात. संस्थानचें उत्पन्न ४० लाख रु. आहे. हल्लींचे महाराज बहादुरसिंग हे १९४५ सालीं गादीवर आले. संस्थानची राजधानी बुंदी या शहरास मीनार ज्ञातीचा बुंद नांवाचा एक सरदार होता त्यावरून हें नांव पडलें आहे. शहराच्याभोंवतीं मोठा कोट आहे. राजवाडा भव्य असून तो एका उंच जागेवर बांधलेला आहे. येथें तारागड नावाचा एक किल्ला व सूरज नांवाची एक छत्री असून फुलसागर नांवाचा राजाचा उन्हाळ्यांत राहण्याचा एक वाडा आहे. आतां हें संस्थान राजस्थान संघांत सामील झालें आहे.

**बुंदेलखंड**—संयुक्त प्रांतांतील हल्लींच्या झांशी विभागाला बुंदेलखंड विभाग हें नाव कायम ठेवलें होतें; पण तें आतां बदललें. या विभागाचें क्षे. फ. १०,५५३ असून लो. सं. सु. पाव कोटी आहे. या भागांत राहणाऱ्या बुंदेला ठाकूर जातीच्या नांवावरून हें नांव पडलेलें आहे. विंध्याचलं येथें विंध्यवासिनी देवीच्या समोरील यज्ञवेदीवर एका गहरवालाच्या आत्मयज्ञांत पडलेल्या रक्ताबिंदू( बुंद )पासून त्याला मुलगा उत्पन्न झाला, म्हणून त्याच्या वंशजांना बुंदेल हें नांव प्राप्त झालें. बटवा, धसान, बिरमा, केन, बाघेन, पैशुनी व दक्षिण तान्सा

या मुख्य नद्या आहेत. महोबाच्या पूर्वेस ३ मैलांवर असलेलें विजयानगर नांवाचें तळें सर्वांत मोठें आहे. बुंदेले लोक हे आत्मयज्ञाचा प्रयत्न करणाऱ्या पंचम नांवाच्या एका गहरवाडाचे वंशज होत अशी समजूत आहे, पण त्यांच्या उत्पत्तीचा खरा इतिहास अज्ञात आहे. प्रथम ते महू येथें व नंतर कालिंजर आणि काल्पी येथें राहूं लागले. १५०७ च्या सुमारास रुद्रप्रताप हा त्यांचा मुख्य होता. त्याला बाबरनें सुभेदार नेमिलें. त्याच्या मुलापासून बुंदेल्यांचीं बहुतेक प्रसिद्ध घराणीं निघालीं. यांत मराठे लोकांच्या लहान लहान जहागिऱ्या आहेत. बुंदेलखंडाचा राजा छत्रसाल (पाहा) यानें आपल्या राज्याचा तिसरा हिस्सा मराठ्यांना दिला, तेव्हांपासून मराठ्यांचा बुंदेलखंडाशीं निकट संबंध आला. बुंदेले सरदार मराठ्यांविरुद्ध लढूं लागले व इंग्रजांनींहि त्यांना मदत केली. १८०२ च्या वसईच्या तहानंतर बुंदेलखंडाचा भाग मराठ्यांच्या हातातून जात चालला. १८८६ सालीं ब्रिटिशांनीं शिंद्यांकडून झांशीहि घेतली. बुंदेलखंडावरचा मराठ्यांचा सुभेदार गोविंद बल्लाळ (खेर) याचें आडनांव 'बुंदेले' असेंच पडून गेलें होतें.

**बुद्ध, गौतम** (खि. पू. सु. ५६७-४७८)—आशिया खंडांतील एक महान् धर्मसंस्थापक. बुद्धाच्या चरित्रावर अनेक भाषांतून अनेक लहान-मोठे ग्रंथ आहेत. त्याचा जन्म बिहारालगत लुंबिनी नांवाच्या राईत कपिलवस्तु (पाहा) नांवाच्या प्राचीन नगराजवळ झाला. या राईत बौद्ध राजा अशोक यानें उभा केलेला स्तंभ सांपडला व त्यायोगें बुद्धाचें जन्मस्थान निश्चित झालें. त्याचा बाप शाक्य कुलांतील शुद्धोदन राजा व आई मायावतीदेवी होती. राजानें पुत्रजन्मानिमित्त मोठा उत्सव करून मुलाचें नांव सर्वार्थसिद्ध असें ठेवलें. जन्मानंतर सातच दिवसांनीं त्याची आई मायावती मरण पावली. गौतमाचें शिक्षण ज्या शाळेमध्यें झालें तेथें १०,००० मुलें होतीं. तेथील शिक्षक विश्वामित्र यानें राजपुत्राचें तेजःपुंज शरीर पाहून स्वतःच त्याला साष्टांग नमस्कार घातला. त्या शाळेंत गौतम आपल्या विद्यार्थी मित्रांना पूर्ण ज्ञानाचा उपदेश करूं लागला, राजपुत्र मोठा झाल्यावर शुद्धोदन राजानें त्याचा विवाह दंडपाणि नांवाच्या शाक्य इसमाची गोपा नांवाची कन्या हिच्याबरोबर केला व तिचें नांव यशोधरा ठेवलें. गौतमाचा जन्म ज्या दिवशीं यशोधरा जन्मली त्याच दिवशीं झाला. म्हणजे गौतम व त्याची पत्नी हीं एकाच वयाचीं होतीं. राजपुत्रानें कांहीं काळ अत्यंत सुखानें कालक्रमणा केली. पुढें एके दिवशीं देवपुत्र ऱ्हीदेव यानें स्वप्नामध्यें गौतमास गृहत्याग करण्याची सूचना केली. नंतर लवकरच शुद्धोदन राजालाहि असें स्वप्न पडलें कीं, राजपुत्र राजवाड्यांतून बाहेर पडून भगवीं वस्त्रें धारण करून संन्यासी बनला. यानंतर राजपुत्र रथांतून हिंडत असतां वाटेंत त्याला एक जराग्रस्त असा इसम दिसला. दुसऱ्या दिवशीं राजपुत्रानें ज्वरादिरोगांनीं ग्रस्त असा इसम पाहिला आणि तिसऱ्या वेळीं एका मेलेल्या माणसाचें प्रेत जाळावयास नेत असलेलें पाहिलें. जगांतील हीं मानवी दुःखें पाहून त्याचें मन उद्विग्न झालें आणि संसार सोडून, भिक्षु होण्याचा निश्चय करून तो पित्याच्या परवानगीनें गृहत्याग करून नगराबाहेर पडला.

नंतर गौतमानें वैशाली नगरी येथें आराड कालाम नावाच्या साधूकडे, आणि नंतर राजगृह नगरांत रामपुत्र रुद्रक नांवाच्या साधूकडे योगमार्गाचें ज्ञान मिळविलें व ६ वर्षें त्याकरितां अतिशय घोर तपाचरण केलें व त्यामुळें तो अतिशय कृश झाला. नंतर गौतमाचा आणि दुर्नेता मार यांचा संवाद होऊन तपाचरणाचा हा मार्ग त्यानें सोडून दिला व बोधी वृक्षाखालीं आसनस्थ होऊन आठवडाभर राहिला व तेथें त्याला खऱ्या धर्माचें ज्ञान वैशाख शुद्ध पौर्णिमेच्या दिवशीं झालें. आणि त्या वेळेपासून त्या धर्माचा प्रसार करण्यास त्यानें सुरवात केली. वरील हकीगत मुख्यतः ललितविस्तर नामक बुद्धचरित्रपर संस्कृत ग्रंथांत दिलेली आहे. हा ग्रंथ हिंदु धर्मांतील पुराणाच्या पद्धतीवर लिहिलेला आहे.

गौतम बुद्धाचा मुख्य धर्मोपदेश असा होता कीं, अपकारकर्त्यांवर उपकार करावा, चित्त अक्षोभ असावें व सर्वभूतीं दया, क्षमा व शांति असावी. यज्ञयागादि कर्मांच्या पसाऱ्यापेक्षां जीवनांतील सदाचाराच्या वागणुकीनेंच मनुष्याला अंतिम शुद्धता येते. याकरितां हिंसा, चोरी, खोटें बोलणें, मद्य पिणें हे व अशा तऱ्हेचे हीन अवगुण टाकून माणसानें, अहिंसेनें, समतेनें व प्रेमानें वागावें अशी याच्या धर्माची सहज पटण्याजोगी व सर्वांना सहज आचरतां येण्याजोगी शिकवण आहे.

गौतमानें आपला नवा संप्रदाय स्थापून त्याचा प्रसार चोहोंकडे जोरांत सुरू केला. आपला सावत्र भाऊ व मुलगा यांना सुद्धां आपल्या उपदेशानें त्यानें बौद्ध भिक्षूंची दीक्षा दिली. बौद्ध भिक्षूंसाठीं अनेक विहार व मठ बांधण्यांत आले. यामुळें अगदीं

थोडक्या अवधींत बौद्ध धर्म सर्वत्र पसरला. बुद्धानें आपल्या उरलेल्या आयुष्यांत नव्या संप्रदायाच्या प्रसाराचें कार्य फार कष्ट सोसून केलें. त्याचीं उपदेशपर भाषणें फार सुंदर व उद्बोधक आहेत. कोटिग्रामास झालेलें 'चार सत्यें' या विषयावरील बुद्धाचें भाषण मननीय आहे. आपल्या धर्माचें भरीव कार्य करून पायानगरीजवळील कुसिनारा येथील उपवनांत बुद्धानें आपला देह ठेवला. त्याच्या अस्थींवर अनेक ठिकाणीं स्तूप बांधलेले आहेत व हे स्तूप बौद्धांचीं तीर्थक्षेत्रें बनलीं आहेत. बौद्ध संप्रदाय पाहा.

**बुद्धगया**—या नांवाचा अर्थ बुद्धाची गया किंवा बोधाची, ज्ञानाची गया असा आहे. विहारमधील पाटणा विभागांतील गया जिल्ह्यांतील फल्गु किंवा लिलाजान या नदीच्या पश्चिम तीरावरील हें क्षेत्रस्थान आहे. हें गया स्टेशनापासून ७ मैल लांब आहे. येथील बोधिद्रुमाचें—परमपूज्य अश्वत्थ वृक्षाचें 'महाबोधी' हेंहि नांव या गांवास देतात. याच वृक्षाखालीं बसून शाक्यमुनि पुष्कळ वर्षांच्या सत्यान्वेषणानें 'मारा' वर विजय मिळवून गौतम बुद्ध झाला. इ. स. पूर्वी तिसऱ्या शतकांतील अशोक राजानें येथील भव्य बौद्ध मंदिर बांधिलें आहे. देऊळ १६० फूट उंच आहे व तें सात मैलांवरून दिसतें. अशोकानंतर देऊळ दोनदां दुरुस्त केलें गेलें. १८८४ सालीं हिंदुस्थान सरकारनें दोन लाख रुपये खर्चून पुन्हां दुरुस्त केलें. देवळाभोंवतीं अनेक स्तूप दिसतील. देवालय अश्वत्थ वृक्षाजवळच असून त्याभोंवतीं अशोकाच्या वेळीं बांधिलेला दगडी कोट अद्याप आहे. त्यांतील खांबावर गौतम बुद्धाच्या निरनिराळ्या तऱ्हेच्या मूर्ती आहेत. हल्लींचा वृक्ष मूळच्या अश्वत्थ वृक्षाची एक शाखा आहे. वृक्षाखालीं बुद्धाचें अति प्राचीन वज्रासन आहे. देवळांत बोधी वृक्षाखालीं बसलेली अशी बुद्धाची मूर्ति आहे. पण तिची पूजा हिंदु पुजाऱ्याकडूनच होत असते. हें स्थान बौद्धांप्रमाणेंच हिंदूहि पवित्र मानतात. गया पाहा.

**बुद्धघोष**—एक बौद्ध पंडित. त्याचा जन्म बोगयजा या गांवाच्या जवळपास राहणाऱ्या एका ब्राह्मण कुळामध्यें झाला असें दिसतें. त्यानें ब्राह्मणांची सर्व विद्या संपादन केली होती. पण पुढें तो बौद्धधर्माचा अभ्यास करण्याकरितां सिंहलद्वीपास गेला. सिंहलद्वीप येथें असतांना त्यानें विसुद्धिमग्ग; समंत पासादिका (विनय पीटकावरील टीका), सुमंगल विलासिनी (दीघनिकायावरील टीका), पपंचसूदनी (मज्झिम निकायावरील टीका), मनोरथपूरणी (अंगुत्तरनिकायावरील टीका), इत्यादि टीका-ग्रंथ लिहिले. यांशिवाय कंखा वितारणी (पातिमोक्खावरील टीका), परमत्थ कथा, खुद्दकपाठ, धम्मपद, सुत्तनिपात, जातक यांवरील टीकाहि यानेंच लिहिल्या. हा ख्रिस्ती शकाच्या आरंभीं उदयास आला असावा.

**बुद्धनिर्वाणशक**—बौद्ध लोकांत गौतम बुद्धाच्या निर्वाणापासून ज्या शकाचा आरंभ समजण्यांत येतो त्यास बुद्धनिर्वाणशक हें नांव आहे. ह्या शकाचा उपयोग बहुधा बौद्ध ग्रंथांतूनच केलेला पाहण्यांत येतो. तथापि हा शक घातलेले थोडेसे शिलालेखहि (उदाहरणार्थ, गयेचा लेख, इं. अँ. पु. १०, पा. ३४३) आढळण्यांत आले आहेत. या शकाच्या आरंभाविषयीं इतक्या परस्पर भिन्न समजुती प्रचलित आहेत व विद्वानांतहि इतका मतभेद आहे कीं, ख्रि. पू. १०९७ पासून ३५० पावेतोंचीं ११ निरनिराळीं वर्षे या शकाचा आरंभकाळ म्हणून सुचविण्यांत आलीं आहेत. बुद्धनिर्वाणाच्या काळासंबंधीं निरनिराळ्या विद्वानांचीं निरनिराळीं मतें पडत आहेत, तरी त्यांतल्या त्यांत निदान आज तरी ख्रि. पू. ४७८ हाच काळ स्थूलमानानें अधिक बरोबर असण्याचा संभव आहे असें भारतीय प्राचीन लिपिमालेचे संपादक पं. ओझा यांना वाटतें.

**बुद्धि**—(इंटलेक्ट). हा तत्त्वज्ञानांतील पारिभाषिक शब्द आहे. बाह्य जगाचें ज्ञान होतांना जी मानसिक क्रिया घडते, म्हणजे ज्ञान प्राप्त करून घेण्याची जी शक्ति असते तिला 'बुद्धि' म्हणतात. मनुष्याची बुद्धि हा शब्द अधिक व्यापक अर्थानें वापरतात, आणि बुद्धीमध्यें स्मरणशक्ति, कल्पनाशक्ति, विचारशक्ति, सदसद्विवेक, आत्मज्ञान, वगैरेंचा समावेश होतो. मात्र कान्टसारख्यांच्या मताप्रमाणें त्यात इंद्रियद्वारां होणाऱ्या संवेदनांचा समावेश होत नाहीं.

**बुद्धिप्रामाण्यवाद**—(रॅशनॅलिझम). ईश्वरविज्ञानशास्त्रांतला हा सिद्धांत आहे. याचा अर्थ असा कीं, 'आप्तवाक्य' ऊर्फ धर्मग्रंथ कांहींहि म्हणोत, धर्मशास्त्रांतील आणि नीतिशास्त्रांतील सर्व बाबतींत बुद्धीचेच निर्णय मान्य केले पाहिजेत, बुद्धीचाच तो हक्क व विशेष अधिकार आहे. या बुद्धिवादाचें केंद्र जर्मनी असून जर्मनींतच या पंथाचा अतिशय विजय झाला. तथापि या वादाचा मूळ उगम इंग्लंडमधील १७ व्या व १८ व्या शतकांतील ईश्वर-जगत् भेद या द्वितत्त्ववादा(डीइझम)पासून झाला. या वादाचें अंतिम स्वरूप व परिणाम द्वितत्त्ववाद आणि सृष्टीश्वरवाद (नॅचरॅलिझम) हे असून त्याचे कट्टे पुरस्कर्ते लॉर्ड हर्बर्ट, व्हॉब्ज् आणि ब्लौंट (ओरॅकल्स ऑफ रीझन) हे होत, आणि ख्रिस्ती धर्माभिमानी अशा विद्वानांनींसुद्धां बुद्धिप्रामाण्यवाद सौम्य स्वरूपांत मान्य केलेला त्यांच्या ग्रंथांत दिसतो. जर्मनींतील बुद्धिप्रामाण्यवादावर व्होल्टेयरच्या व फ्रेंच ज्ञानकोशकारांच्या लेखांचा आणि फ्रेडरिक दि ग्रेट (१७४०-१७८६) राजाच्या दरबारीं असलेल्या फ्रेंच पंडितांच्या मतस्वातंत्र्याचा परिणाम झाला. 'ख्रिश्चि-

ॲनिटी ॲज् ओल्ड ॲज् दि क्रिएशन' (सृष्टयुत्पत्तीइतका जुना ख्रिस्ती संप्रदाय) या टिंडालच्या ग्रंथाचें जर्मन भाषेंत भाषांतर झालें (१७४१), तेव्हांपासून हा वाद जर्मनींत सुरू झाला. या पंथाचा पुरस्कार एबरहार्ड, ईचहॉर्न, पॉलस, टेलर आणि स्टीनबार्ट यांनीं केला. १९ व्या शतकाच्या आरंभीं श्लीर्मेचरनें आपला ग्रंथ 'डिस्कोर्सेस ऑन रिलिजन' (धर्मसंवाद) १७९९ सालीं प्रसिद्ध केला. तेव्हांपासून या वादाला एक नवीच दिशा लागली. डी वेटे, फ्रीएज् आणि याकोबी यांनीं या नव्या स्वरूपाचा पुरस्कार कला. स्ट्रॉस या विद्वानानें आपल्या 'लाइफ ऑफ जीझस' (जीझस चरित्र) या पुस्तकांत हेगेलच्या दृष्टिकोनाचा अवलंब करून 'न्यू टेस्टामेंट' या नांवाच्या बायबल-ग्रंथांतील उत्तरार्धाची ख्रिस्तीधर्मविध्वंसक मनोवृत्तीनें चिकित्सा केली. या पुस्तकामुळें शास्त्रीय जडवादाला जोर लागला आणि धर्मविषयक विवादांतून अज्ञेयवाद आणि बुद्धिप्रामाण्यवाद यांचें प्राबल्य नाहींसें झालें.

आपल्याकडे ब्रिटिश अमदानी आल्यापासून राजा राममोहन राय, टागोर, लोकहितवादी, आगरकर, फुले, इ. नीं या वादाचा पुरस्कार करून समाजांत खळबळ उडवून दिली. आतां बुद्धिप्रामाण्यवाद सुशिक्षितांत रुजला आहे पण त्यामुळें पाखंड मात्र माजत चाललें आहे. धर्माची गरज आहे कीं नाहीं अशी प्रामाणिक शंका घेणारे जसे पुष्कळ निघतात तसे आपल्या स्वैर आचार-विचारांचें समर्थन करण्यासाठीं बुद्धिप्रामाण्याची कास धरणारेहि कित्येक असतात. याच्याउलट समाजधारणेसाठीं धर्म व त्याचीं बंधनें पाहिजेत असें आग्रहानें प्रतिपादन करणारे विद्वानहि आहेत.

**बुद्धियळें**—हा बैठा खेळ अस्सल हिंदी आहे. हिंदुस्थानांतून तो इराण-अरबस्तानाच्या मार्गें युरोपांत गेला. ११ व्या शतकांत तरी तो तेथें होता. मात्र युरोपांत या खेळाची वाढ होऊन त्याला नियमबद्धता आली. या खेळासंबंधीं तिकडे केवढें तरी अफाट पाश्चात्य वाङ्मय आहे. हिंदुस्थानांत त्याच्या उलट स्थिति आहे व या खेळाची आवड झपाट्यानें कमी होत आहे.

बुद्धिबळाच्या पटावर ६४ घरें असतात व मोहरीं आणि प्यादीं मिळून ३२ असतात. दोन खेळाडू समोरासमोर बसून खेळतात. राजा, वजीर, २ घोडे, २ उंट, २ हत्ती व ८ प्यादीं अशीं प्रत्येकाकडे असतात. राजा, मोहरीं व प्यादीं यांची चाल निरनिराळी असते. राजा शह नसेल तेव्हां कोठल्याहि बाजूस एकच घर जातो. हत्ती पुढें, मागें व आडवा एक घर, उंट पुढें-मागें तिरकस रेषेंत एक घर, घोडा अडीच घरें, व वजीर मात्र वाटेल तसा वाटेल तितकीं घरें जातो. प्यादीं पुढें एक घर सरकतात. मोहरीं मेलीं तर जिवंत होतात, पण प्याद्यांचें तसें नाहीं.

विरुद्ध पक्षाच्या मोहऱ्या-प्याद्यांना मारीत व पुढें सरकत राजाला अडचणींत आणून शह देणें हाच खेळाचा उद्देश असतो. हा शह उठविण्यासाठीं काटशह, नाशह, शहशह यांसारखे पेंच घालण्यांत येतात. खेळाचा शेवट मात, बुर्जी, प्यादी, घोडमली, वगैरे प्रकारांनीं होतो.

विदेशी खेळाची पद्धत व मोहऱ्यांचीं नांवें वेगळीं आहेत (उदा., किंग, क्वीन, बिशप, नाइट, रूक किंवा कॅसल, इ.). युरोपियन खेळाच्या पद्धतींत मात हा एकच डाव मानतात. दरसाल मोठे आंतरराष्ट्रीय सामने होतात व सर्वश्रेष्ठ खेळाडूस वर्ल्ड चँपियन म्हणजे जगज्जेता म्हणून मान देतात.

**बुध**—१. सूर्यमालेंतील पहिला अंतर्ग्रह. हा सूर्यापासून थोडा लांब गेला म्हणजे सकाळीं-संध्याकाळीं सुमारें १॥ तास दिसतो. हा उन्हाळ्यांत संध्याकाळीं व पावसाळ्यांत सकाळीं नुसत्या डोळ्यांनीं दिसूं शकतो. याचा रंग पिवळसर आहे. बुधाचें सूर्यापासून अंतर ४,०३,८९,००० मैल आहे व तो सूर्याभोंवतीं साधारणपणें ८८ दिवसांत प्रदक्षिणा करतो. त्याच्या बिंबाचा व्यास ३,१४० मैल आहे.

२. एक पौराणिक देव. हा चंद्राला बृहस्पतीची पत्नी तारा हिच्यापासून झाला. बुधास इलेपासून पुरुरवा नांवाचा पुत्र झाला.

फलज्योतिषांत बुध हा शुभग्रह मानतात. हा कन्या राशीचा स्वामी आहे. एका राशीमध्यें हा एक महिना असतो व कोणत्याहि राशींत सर्वकाल फल देतो.

**बुन्सेन, रॉबर्ट विल्हेल्म फॉं** (१८११-१८९९)—एक जर्मन रसायनशास्त्रज्ञ. कॉलेजचें शिक्षण घेऊन तो प्रथम शिक्षक व नंतर रसायनशास्त्राचा अध्यापक झाला. स. १८३४ त त्यानें तालस (आर्सेनिक) विषयावर लोहउज्जप्राणिद (हायड्रोऑक्साइड ऑफ आयर्न) हें औषध शोधून काढलें व पुढें ककोडिल नांवाच्या द्रव्याचा शोध लावला. या शोधामुळें सेंद्रिय पदार्थांचा धातुरूप पदार्थांशीं होणारा संयोग स्पष्ट होऊन रसायनशास्त्राचें एक पाऊल पुढें पडलें. जर्मनींत भट्टीला दिल्या जाणाऱ्या उष्णतेचा अर्धा भाग व इंग्लंडातल्या भट्ट्यांतील उष्णतेचा ⅘ भाग फुकट जातो असें त्यानें दाखविलें. या शोधामुळें लोखंडाच्या कारखान्यांत क्रांति झाली. १८४१ सालीं त्यानें कर्बजस्त विद्युत्पात्र शोधून काढलें. या पात्राचा उपयोग त्यानें विद्युत्कमान करण्याकडे केला, व १ तासांत १ पौंड जस्त खर्च होऊन ११७१·३ मेणबत्त्यांच्या प्रकाशाइतका प्रकाश पडूं शकतो असें दाखविलें. हा प्रकाश मोजण्याकरितां त्यानें प्रकाशमापन यंत्र तयार केलें. १८५२ त त्यानें विद्युत्पृथक्करणाची युक्ति प्रथम काढली व प्रथम मग्न धातु धातुरूपांत काढून दाखविली

व ती जळतांना पडलेल्या प्रकाशांत अत्यस्मानी किरण असतात हें दाखविलें. १८५५ सालीं त्यानें धूर न निघतां कर्बं वायु जाळण्याकरितां बुन्सेन दिव्याचा शोध लावला. हा दिवा (बुन्सेन बर्नर) खाणींत काम करणाऱ्यांना फार उपयोगी आहे. त्याचे इतर शोध, बर्फाचें उष्णमानमापक यंत्र, बाष्पोष्णतामापक यंत्र व गाळण्याचा पंप हे होत. रंगपृथक्करणावर यानें फार परिश्रम केले. यानें रसायनशास्त्रज्ञ व ज्योतिषशास्त्रज्ञ यांच्या हातात एक नवीन शास्त्र दिलें. या पृथक्करणानें त्यानें खट (कॅल्शियम) व रूपद (रुबिडियम) या धातुद्रव्यांचा शोध लाविला.

बुरूड--बुरूड हें वास्तविक एका विशिष्ट जातीचें नांव नसून धंद्याचे वाचक नांव आहे. हा धंदा अनेक जातींचे लोक करतात. त्यांत क्षत्रियापासून अंत्यज वर्गाचेहि लोक मोडतात. तथापि 'बुरूड' या नांवानें एक विशिष्ट जात ओळखली जाते. त्याची लो. सं. (१९११) ४२,५१४. पैकीं हैदराबाद संस्थानांत सर्वांत जास्त लोक आहेत (सु. २५०००). लिंगायत बुरूड कानडी बोलतात व महाराष्ट्रीय बुरूड मराठी भाषा बोलतात. हे वांयूच्या टोपल्या, पंखे, इत्यादि वस्तू तयार करतात. नित्यनैमित्तिक कार्यें ब्राह्मण पुरोहितांकडून करवितात. मध्यप्रांत व पंजाब या इलाख्यांतूनहि बुरुडांची वस्ती आढळते.

बुर्झ्वाझी—या फ्रेंच शब्दाचा अर्थ नागरिकांचा वर्ग (सिटिझन क्लास) असा आहे. मार्क्सवादी सोशॅलिस्ट पक्षानें हा शब्द शेतजमिनीव्यतिरिक्त इतर भांडवलवाले, कारखानदार, व्यापारी व इतर अनेक प्रकारचे कारखाने व धंदे ज्यांच्या मालकीचे आहेत आणि ज्यांचें उत्पन्न, शिक्षण आणि सामाजिक दर्जा, इत्यादि सारख्या प्रतीचे आहेत अशा मालकवर्गाला उद्देशून वापरण्यास सुरुवात केली. या मालक-वर्गाला विरोधी किंवा प्रतिस्पर्धी वर्ग मजुराचा म्हणजे ज्या इसमांना स्वतःच्या मालकीची अशी मुळींच इस्टेट नाहीं व ज्या इसमांना शारीरिक श्रम करून मजुरी मिळवून उदरनिर्वाह करावा लागतो अशा इसमांना प्रोलेटरिएट म्हणजे मजूरवर्ग हा शब्द रूढ झाला. बुर्झ्वाझी ऊर्फ मालकवर्ग यांच्यामध्यें वरिष्ठ व कनिष्ठ असे दोन पोटवर्ग होते. वरिष्ठ वर्गांत बडे बडे कारखानदार, भांडवलदार अशा फार श्रीमंत लोकांचा समावेश होत असून, कनिष्ठ वर्गांत थोड्या भांडवलावर लहान लहान धंदे करणारे, दुकानदार, वगैरे इसमांचा समावेश होत असे. अलीकडे औद्योगिक क्रांति होऊन मोठमोठाले यांत्रिक कारखाने सुरू झाल्यावर हा वरिष्ठ मालकवर्ग, जेथें फार मोठाले यांत्रिक कारखाने आहेत अशा देशांत सर्वसत्ताधीश बनला आणि सरकारचा राज्यकारभार अप्रत्यक्षपणें त्यांच्या तंत्रानें चालू लागला आणि पूर्वीचा सरंजामी पद्धतींतला (फ्यूडल सिस्टिम) बडा जमीनदारवर्ग हतबल व अधिकारच्युत झाला. नवा बुर्झ्वाझी वर्ग जुन्या सरंजामदार वर्गापेक्षां अधिक उदारमतवादी होता आणि जमीनदारमालक आणि शेतकरी कुळें यांच्यामधील गुलामगिरीसारखे असलेले जुलमी संबंध नष्ट करण्याचा प्रचार बुर्झ्वाझी वर्गानें सुरू केला. हा बुर्झ्वाझी वर्ग सोशॅलिस्ट प्रोलेटेरिएट म्हणजे समाजसत्तावादी मजूरवर्ग बलिष्ठ झाल्यावर नष्ट होईल असें मार्क्सनें भविष्य वर्तवलें होतें. हें भविष्य ज्ञात झाल्यावर या बुर्झ्वाझी वर्गानें आपलें उदारमतवादी धोरण सोडून देऊन हुकूमशाही राज्यपद्धति सुरू करण्याचें धोरण स्वीकारलें. मोठमोठाले कारखाने निघाल्यामुळें बारीकसारीक धंदे नष्ट होत जाऊन कनिष्ठ बुर्झ्वाझी वर्ग हळूहळू मजूरवर्गांत सामील होऊं लागला आणि बड्याबड्या कारखानदारांचा आणि भांडवलदारांचा वर्ग संख्येनें लहान पण अधिकारानें मोठा होत होत राष्ट्रामध्यें अप्रत्यक्षपणें सर्वसत्ताधीश बनत गेला. कारण राष्ट्रांतल्या सर्व आर्थिक घडामोडींवर या वरिष्ठ बुर्झ्वाझी वर्गाचें नियंत्रण चालू झालें.

बुऱ्हाण निजामशहा (१५०८-१५५४)—हा अहमदनगरचा शियापंथीय निजाम, अहमद निजामाचा मुलगा होता. हा फार हुशार असून यानें कंवरसेन नामक ब्राह्मणास आपला प्रधान नेमलें होतें. शहा ताहीर नांवाच्या विद्वानास यानें आश्रय दिला. यानें आपल्या राज्यात शिया पंथाचा प्रसार केला. मर्यम नांवाची विजापूरच्या इसाइल आदिलशहाची मुलगी यास दिली होती.

बुलढाणा—वऱ्हाडांतील एक जिल्हा. क्षे. फ. ३७६३ चौ. मैल. पैनगंगा व पूर्णा या दोन नद्या आहेत. बालघाटांतील तालुक्यांतून पाऊस फार पडतो. लोणार व मेहकर या ठिकाणीं दोन अत्युत्कृष्ट हेमाडपंती देवालयें आहेत. फत्तेखर्डा (१५८१) व रोहणखेड (१५८२) येथें जुन्या मशिदी आहेत. बुलढाणा हा शब्द भिल-ढाणा या शब्दाचा अपभ्रंश असावा. जिल्ह्याची लो. सं. (१९४१) ८,२०,८६२. यांत ९ गांवें व ११७४ खेडीं आहेत. मलकापूर, नांदूर, व देऊळगांव-राजा हीं मोठीं गांवें होत. ज्वारी हें मुख्य पीक होय. कापसाचा मोठा व्यापार चालतो. लोणार सरोवरापासून पूर्वी मीठ काढीत असत. बुलढाणा हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण. येथील हवा थंड आहे. मलकापूर स्टेशनापासून २८ मैलांवर हें गांव आहे. वस्ती फार नाहीं.

बुलंदशहर--सं. प्रांत, मिरत विभागांतील जिल्हा. क्षे. फ. १८८९ चौ. मैल. गंगा, यमुना, हिंदन, बुरिया व पूर्वकाली या नद्या या जिल्ह्यांतून वाहतात. वार्षिक पाऊस सरासरी २६ इंच पडतो. ५ व्या शतकांत या जिल्ह्यांत गौड ब्राह्मणांची वस्ती

असून येथें गुप्त घराणें राज्य करीत असे. १०१८ सालीं गझनीचा महंमद वरण येथें आला. त्या वेळीं तेथें हरदत्त नांवाचा राजा राज्य करीत होता. त्यानें आपल्या १०,००० अनुयायांसह मुसलमानी धर्म स्वीकारून आपले प्राण व मालमत्ता यांचें तात्पुरतें संरक्षण केलें. ११९३ सालीं कुतुबुद्दीननें वरणवर चाल केली. त्याच्या एका नातेवाइकानें त्याचा विश्वासघात केल्यामुळें अखेर मुसलमानांनीं तें शहर काबीज केलें. त्या विश्वासघातकी मनुष्यानें मुसलमानी धर्म स्वीकारला व त्याला वरणचें चौधरीपद मिळालें. असुर व बुलंदशहर येथें प्राचीन अवशेष आहेत. लो. सं. (१९४१) १३,१७,२२३. पैकीं शें. ७९ हिंदू आहेत. मुख्य पिकें गहूं, हरभरा, मका, ज्वारी, बाजरी, कापूस व ऊंस हीं होत. जहांगिराबाद येथें चीट, शिकंदराबाद येथें मलमल, खुर्जा येथें मातीचीं भांडीं, व जेवार येथें केंसाळ चटया होतात. बुलंदशहर आणि शिकारपूर येथील लांकडी कातकाम फार प्रसिद्ध आहे. पुष्कळ ठिकाणीं हातमागावर कापड विणलें जातें. बुलंदशहर जिल्ह्याचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लो. सं. सुमारें २०,०००. याचें जुनें नांव बरण असें होतें. पण हें एका उंचवट्यावर असल्यामुळें यास उंचानगर किंवा बुलंदशहर म्हणूं लागलें. हें अहारच्या 'तोमर' राजानें वसविलें. येथील राजाच्या शौर्याबद्दल एक ताम्रपट सांपडला असून कांहीं पोवाडेहि उपलब्ध आहेत. येथें निळीचे कारखानेहि बरेच आहेत.

**बुल्बुल्**—आवाजावरून या पक्ष्याला नांव पडलें. हा पक्षी प्राच्य देशांतील आहे. बुल्बुल् पुष्कळ प्रकारचे आहेत. तरी आपल्याकडे त्यांतील दोनच जाती फार आढळण्यांत येतात. एक 'लालबुड्या' व दुसरा 'लालगाल्या'. पहिला काळसर असून बुडाशीं लाल असतो. याचा तुराहि काळाच असतो. प्रत्येक पंख शेवटीं फिक्या रंगाचा होत गेल्यामुळें पंखाची रचना खवल्याखवल्यासारखी दिसते. शेंपटाच्या टोंकास पांढरा रंग असतो. दुसऱ्या जातीच्या बुल्बुलाचें डोकें व तुरा काळाच असतो. पण तुरा जरा मोठा व बांकदार दिसतो. याच्या गालावर पांढरा पट्टा असतो. छातीवरहि पांढरा रंग असतो. या दोन्ही पांखरांची वागण्याची पद्धत बहुतेक सारखीच असते. हीं दोन्ही गातात म्हणून यांना पुष्कळ लोक बाळगतात. हीं नेहमीं जोडपीं असतात. हे पक्षी बहुतेक फळांवरच राहतात. पण केव्हां केव्हां किडेहि खातात. यांना अंजीर फार आवडतात.

लालबुड्याचें घरटें लहानसें पेल्यासारखें असतें. तें वाळलेल्या गवताचें असून आंतलें अस्तर केसांचें असतें. घरटें नेहमीं झाडावर बांधलेलें असतें. लालगाल्याचें घरटें नेहमीं झुड्यांत, एखाद्या वेलींत किंवा झुडपांत असतें. तें गवताचें किंवा गवताच्या मुळ्यांचें असतें व बाहेरून पानांनीं मढवलेलें असतें. दोन्ही जातींचे बुल्बुल् सारख्याच प्रकारचीं अंडीं घालतात. अंड्यांचा रंग तांबडा किंवा गुलाबी असून त्यांवर काळसर तांबड्या रंगाच्या रेघा असतात. यांची वीण मार्चपासून सप्टेंबर महिन्यापर्यंत सुमारें दोन वेळां होते. मादी दरखेपेस सुमारें दोन ते तीन अंडीं घालतात. यांचीं घरटीं जमिनीपासून फार वर नसल्यानें साप, मांजर, वगैरे प्राणी यांचीं अंडीं नेहमीं खातात.

**बुल्हर, योहान जॉर्ज** (१८३७–१८९८)—एक जर्मन संस्कृत पंडित. गॉटिंजेन येथील विश्वविद्यालयांत अभ्यास करून बुल्हरनें 'डॉक्टर' ही पदवी संपादन केली, व नंतर पॅरिस, ऑक्सफोर्ड व लंडन या ठिकाणच्या ग्रंथसंग्रहालयांतील संस्कृत शाखेंत त्यानें वेदग्रंथाच्या हस्तलिखिताच्या नकला व शुद्ध संस्करणें तयार करण्याचें काम केलें. अलेक्झांडर ग्रांट यानें यास मुंबई येथील एल्फिन्स्टन कॉलेजांत प्राच्य भाषांचा अध्यापक नेमलें. १८८० सालीं बुल्हरनें पेन्शन घेऊन परत गेल्यावर व्हिएन्ना येथील विश्वविद्यालयांत संस्कृत व प्राच्यविद्या या विषयांच्या अध्यापकाची जागा पत्करली. १८८६ सालीं त्याच विश्वविद्यालयांत एक प्राच्य विद्यामंदिर त्यानें स्थापन केलें व याच्याच जोडीला 'व्हिएन्ना ओरिएन्टल जर्नल' नांवाचें नियतकालिक सुरू केलें. डॉ. बुल्हरनें प्रो. किलहार्नच्या मदतीनें 'बाँबे संस्कृत सीरीज्' या ग्रंथमालेची रचना केली. या मालेंतील पंचतंत्र, दशकुमार–चरित, विक्रमांकदेवचरित, इत्यादि ग्रंथांचें संशोधन त्यानें स्वतःच केलें आहे. हिंदुस्थानांत येताच १८६७ सालीं सर रेमंड वेस्ट याच्या सहकारित्वानें बुल्हरनें सुप्रसिद्ध 'डायजेस्ट ऑफ हिंदु लॉ' हा कायदे ग्रंथ तयार केला. त्यानें आपस्तंब धर्मसूत्राचें प्रकाशन केलें व मॅक्समुल्लरच्या 'सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट' ह्या ग्रंथमालेकरितां दुसऱ्या व चौदाव्या खंडांचीं भाषांतरें केलीं. त्यानें 'इंडियन अँटिकेरी' या नियतकालिकांत ८५ लेख लिहिले. 'हिंदुस्थानी ब्राह्मी लिपि' व 'हिंदु प्राचीन लिपिविद्या' या विषयांवर बुल्हरचे दोन सर्वमान्य ग्रंथ आहेत. पुराणवस्तुसंशोधनशास्त्र, प्राचीन लिपिशास्त्र, भाषाशास्त्र, वाङ्मय, इत्यादि हिंदुस्थानासंबंधींच्या संशोधनाच्या अनेक शाखांपैकीं दर-एक शाखेंत बुल्हरनें परिश्रम केले आहेत. इ. स. १८८७ मध्यें जर्मन भाषेंत 'जैनांचा हिंदु संप्रदाय' हा महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध केला.

**बुशमेन**—या जातीचे लोक द. आफ्रिकेंत पश्चिम भागांत बहुतेक कलहारी वालुकारण्यांत राहतात. हे लोक अतिशय अवनत स्थितींत आहेत. ते क्रूरपणाचीं कृत्यें करतात खरें पण त्याबद्दलचें वर्णन अतिशयोक्तीचें असतें. ते आपापसांत संघ करून राहत नाहींत, तथापि स्वसंरक्षणाकरितां किंवा लुटालूट

करण्याकरितां मात्र एकत्र जमून जातात. ते शेतकी करीत नाहींत तर आपला निर्वाह शिकारीवर करतात. त्याची व्यवस्थित बनलेली अशी भाषा नाहीं व ते जी कांहीं वेडीवांकडी भाषा बोलतात ती भाषा लिहिण्याची लिपिहि तयार झालेली नाहीं. यांचा रंग पिवळसर असतो व बांधा ठेंगणा असतो. हे अगदींच निर्बुद्ध नाहींत. यांच्यांतील कलाकौशल्य खडकांवर काढलेल्या चित्रांतून दिसतें.

**बुशायर**—हें इराणांतील एक महत्त्वाचें बंदर असून इराणच्या आखाताच्या उत्तर किनाऱ्यावर एका लहान द्वीपकल्पावर वसलेलें आहे. पहिल्या सस्सानियन राजानें तिसऱ्या शतकांत या ठिकाणाला 'बोक्त-आर्देशीर' असें नांव दिलें होतें, त्याचें 'बुशायर' हें रूपांतर असावें. येथील वस्ती २५ हजार आहे. इंग्रजांचें आरमारी पथक येथें असतें. फ्रान्स, रशिया व तुर्कस्तान या देशांचे वकील येथें असतात. लो. सं. १५,०००.

**बुसी** (१७१८–१७८५)—एक फ्रेंच सेनापति. १७४६ सालीं लाबूर्दोनेबरोबरच तो पांडेचरीस आला, व तेव्हांपासून तो इकडेच राहिला. डुप्लेच्या हाताखालीं वागण्याचे त्यास अनेक प्रसंग येऊन, दोघांनीं स्वराष्ट्रहिताचीं अनेक कृत्यें केलीं. जिंजी किल्ला काबीज करण्यांत बुसीचें खरें शौर्य प्रगट झालें. बुसीनें निजामावर मोठ्या युक्तीनें वजन पाडून सर्व कारभार आपल्या हातांत घेतला, पण त्याबद्दल लोकांस वैषम्य वाटूं नये म्हणून स्वतःची शेखी त्यानें मिरविली नाहीं. सावनूरच्या लढाईत त्यानें पेशव्यांस चांगली मदत केली (१७५५). मराठे व फ्रेंच (नानासाहेब व बुसी) यांनीं गुप्तपणें संगनमत करून निजामाचें राज्य हळूहळू खालसा करण्याचा बेत केला होता. वांदिवाशच्या लढाईत बुसी इंग्रजांच्या हातीं लागला. त्यास त्यांनीं पुढें सोडून दिल्यावर तो स्वदेशीं परत गेला. त्यानें जो मुबलक पैसा मिळविला होता, त्यावर त्यानें पुष्कळ दिवस चैन केली. नंतर तो पुन्हां हिंदुस्थानांत आला (१७८१). या वेळीं तो फ्रेंच सैन्याचा सेनापति होता. परंतु या खेपेस त्याच्या हातून विशेष पराक्रम झाले नाहींत, व तो इकडेच मेला.

**बुळकांडी**—हा रोग गुरांस (गाई-बैल यांस) होतो. हा सांसर्गिक असून फार भयंकर आहे. या रोगाचे अत्यंत सूक्ष्म जंतू असतात, व ते रक्तामध्यें व विष्टेमध्यें आढळतात. या रोगाची गर्भावस्था दोन ते दहा दिवस असते. याचीं लक्षणें म्हणजे ताप चढणें व तोंडांतील श्लेष्मल त्वचा लाल होणें, हिरड्या, ओठ, जीभ, टाळू व गाल यांवर पिवळसर पुटकुळ्या येणें हीं होत. या रोगांत कातडीवर खवले दिसूं लागतात, व डोळ्यांतून आणि नाकांतून एक प्रकारचें चिकट पाणी वाहूं लागतें. या रोगावर प्रतिबंधक लस टोंचली असतां हा रोग बरा होतो.



**बूगी**—ही जमात हिंदी द्वीपसमूहां(इंडियन आर्किपेलागो) मधील सेलीबीस बेटांत मुख्यतः राहते. त्यांच्या वस्तीचें मुख्य शहर बोनी हें आहे. बूगी लोक लोखंड, तांबें, कापूस, वगैरेंच्या कारखान्यांत कामें करतात. तसेंच मच्छीमारीचाहि धंदा करतात. या लोकाच्या मोठाल्या जमाती बोर्निओ व सुमात्रा या बेटांतहि राहतात.

ज्याप्रमाणें जावा बेटाची मूळची भाषा जावा अथवा जावानी मानतात, त्याप्रमाणेंच सेलिबीस बेटाची मूळची भाषा बूगी ही होय. या शूर आणि लढवय्ये लोकांच्या प्राचीन राष्ट्राची ओळख युरोपीयांस त्यांच्या ऱ्हासकालींच झाली. तथापि बऱ्याच गोष्टींवरून हें राष्ट्र जावापेक्षांहि प्राचीन असावें अशी कल्पना होते. धैर्य, धाडस, विश्वास व व्यापारांतील सचोटी या बाबतींत ते सर्व पौरस्त्य लोकांत श्रेष्ठ आहेत, असें मलायी व जावानी लोकहि सांगतात; आणि यांची चिनी अथवा इंडो-चिनी लोकांशीं तुलना करावयाची, म्हणजे एखाद्या सोनेरी खोगीर घातलेल्या गाढवाची, एखाद्या उमद्या घोड्याबरोबर तुलना करण्यासारखें आहे असें म्हणण्यापर्यंत पाश्चात्य संशोधक पंडित लेडेन या लोकांवर खुष झाला होता. या राष्ट्रामध्यें आणि जपानी लोकांत बरेंच साम्य आहे, परंतु त्यांच्या भाषांत साम्य आहे किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं.

सेलिबीस बेटांत प्रथम लहान लहान संस्थानें होतीं. परंतु पुढें तीं एकत्र होऊन, एका नियतसत्ताक व लोकनियुक्त राजाच्या सत्तेखालीं आलीं. यानंतर हें बेट म्हणजे पूर्वेकडील व्यापाराचें केंद्र बनलें आणि त्यांनीं बलीपासून मोलक्कापर्यंत आपली सत्ता पसरली. बूगी भाषेच्या वृद्धीसाठीं बरेंच परिश्रम करण्यात आले. त्यांचीं पुराणें, परंपरागत कथा, कायदेकानू, धर्मशास्त्र व इतिहास यांचा ग्रंथांमध्यें समावेश करण्यांत आला. या ग्रंथांपैकीं बरेचसे ग्रंथ या बेटाच्या अंतस्थ भागांत, व जे लोक आपले प्राचीन धर्म पाळतात त्या लोकांत अद्यापिहि उपलब्ध आहेत. किनाऱ्यावरील प्रदेशांत मात्र महंमदी संप्रदाय प्रचलित आहे. आणि या प्रदेशांतील ग्रंथ मलायी लोकांतील नंतरच्या चरित्रग्रंथांप्रमाणें आहेत. इ. स. १६०३ या वर्षी मंकासर राजानें मंकासर राष्ट्राच्या साहाय्यानें विलक्षण क्रांति करून जुन्या धर्मांचा त्याग केला व महंमदी संप्रदायाचा स्वतः स्वीकार करून इतर राष्ट्रांसहि त्यानें आपलें अनुकरण करावयास लावलें.

किनाऱ्यावरील प्रदेशांतील बूगी भाषा बरीचशी पूर्वेकडील मलयु भाषेशीं मिश्र झाली आहे. हिचें शुद्ध स्वरूप प्राचीन धर्म-

ग्रंथांत व अंतर्देशांत मात्र सापडतें. या भाषेंतील शब्दांवरून ही स्वतंत्र भाषा असावी अशी कल्पना होते. पण हिची रचना मलयु व तागाल या भाषासारखी आहे. या भाषेचें एकंदरींत मलयु, जावानी व तागाल या भाषांशीं साम्य आहे. परंतु हिच्या मूळच्या स्वरूपांत संस्कृतजन्य शब्द मुळींच सापडत नाहींत. तेरनत अथवा मोलक्का या भाषेशीं देखील बूगी भाषेचें थोडेंसें साम्य आहे, परंतु या दोन्ही भाषांचा विशेष अभ्यास झाल्यावर या बाबतींत निश्चित मत देतां येईल. मलयु व जावानी भाषांपेक्षा ही भाषा अधिक स्वतंत्र दिसते.

बूगी भाषेंत बावीस वर्ण असून त्यांचें अ, उ, इ, ए, ओ, उंग अशा सहा स्वरांनीं निरनिराळे उच्चार होतात. वर्णांचा आकार चमत्कारिक दिसतो. पण ते बत्ता व तागाल भाषांच्या वर्णांप्रमाणें कांहींसे दिसतात. परंतु या वर्णांचे आकार निरनिराळ्या राज्यांत निरनिराळे असून कांहीं ठिकाणीं त्यांच्या अनुक्रमांत व संख्येंतहि फरक आहे. यांची संख्या १७ पासून २२ पर्यंत आहे. हीं अक्षरें छापलेलीं अशीं फारेस्ट यानें आपल्या 'मेगुइ द्वीपसमूहाचा प्रवास' या ग्रंथास जोडलेल्या नकाशांत पाहावयास सांपडतात. मलयु ग्रंथांतहि बूगी लिपीचा उपयोग केलेला आढळतो.

बूगी भाषेंतील जुन्या ग्रंथामध्यें सर्वत्र सामान्यतः एकच भाषा आढळते. परंतु सध्यांच्या भाषेमध्यें व संभाषणांतून पाहिल्यास निरनिराळ्या संस्थानांतील भाषांत बराच फरक आढळतो. मंकासर अथवा मकासर या सर्वांत शूर व प्रसिद्ध बूगी राष्ट्रजातीची भाषा मूळ बूगी भाषेपेक्षा बरीच निराळी आहे. त्याचप्रमाणें लुवु, एनरेकग, मन्दर व विशेषतः तरज्ज या जातींच्या भाषा जवळजवळ अगदीं स्वतंत्र दिसतात.

**बूच**—हीं झाडें मूळ दक्षिण आफ्रिकेंतील व उत्तर युरोपांतील होत. उत्तम जातीचीं बुचें स्पेन व पोर्तुगाल देशांमधून येतात. त्या देशांत बुचाचा ओक (क्वेर्कस सुबेर) नांवाचीं झाडें असतात. त्यांच्या सालीपासून रासायनिक क्रियेनें तीं जलभेद्य व वातभेद्य करून तयार करण्यांत येतात. हें झाड पंधरा ते वीस वर्षांचें झालें म्हणजे प्रथम त्याची साल बुचें करण्याकरितां काढण्यांत येते व त्यानंतर दर आठदहा वर्षांनीं पुन्हां साल मिळते. जसजशी अधिक वेळां याची साल काढण्यांत येते तसतशीं पुढें पुढें या सालीचीं बुचें अधिक चांगलीं तयार होतात. ही साल काढण्याकरितां मुद्दाम तयार केलेले विशेष तऱ्हेचे चाकू वापरण्यांत येतात, व झाडावर उभ्या व आडव्या चिरा पाडून साल काढण्यांत येते. त्या वेळीं अंतर्सालीला इजा होणार नाहीं अशी काळजी घेण्यांत येते. बुचाचें विशिष्टगुरुत्व व उष्णतावाहकता हीं फारच थोडीं असतात.

बुचाचें झाड
(झाडापासून साल कापून काढीत आहेत.)

बूच हलकें, सुसंकोच्य, स्थितिस्थापक आणि द्रवांस अभेद्य असतें. या गुणांमुळें हें अनेक कामांस फार उपयोगी पडतें. हलकेपणामुळें याच्या छोट्या नावा करितात, व त्यांच्या योगानें पाण्यांत बुडणाऱ्या मनुष्याचे जीव तत्काळ वांचवितां येतात. जड पदार्थ पाण्यांत तरंगावे म्हणून त्यांवर यांचीं आच्छादनें करितात. बूच संकोच्य, स्थितिस्थापक व द्रवास अभेद्य असल्यानें कुप्यांस झांकणें करण्यास फार उपयोग होतो. बूच जोरानें कुपीच्या तोंडांत बसविलें म्हणजे तें दावलें जाऊन आंत जातें व आपल्या स्थितिस्थापकतेनें तोंडाच्या सर्व भागीं असें गच्च बसतें कीं, कुपींतील द्रव बाहेर पडत नाहीं व बाहेरील हवा वगैरे आत शिरत नाहीं. बुटांच्या व जोड्यांच्या तळव्याला आंतून कधीं कधीं बुचाचे चपटे तुकडे बसवितात. मोठ्या व रुंदट पात्याच्या चाकूंनीं हव्या त्या आकाराचे याचे तुकडे पाडतात. मोठ्या पिंपास डिक्या मारण्यासहि याचा उपयोग करितात. बुचास दाबून थोडें लहानहि करतां येतें.

**बूटपॉलिश**—हें सामान्यतः मेणामध्यें कृत्रिम काळा किंवा पिंगट रंग घालून बनविण्यांत येतें. हें लावलें असतां बुटावर येणारा रंग चिकट असतां कामा नये. याकरितां कार्नूबा नांवाचें कडक मेण वापरणें चांगलें. हें तयार करण्याकरिता मेणामध्यें बोरॅक्स किंवा सोडा घालून तें उकळण्यांत येतें व त्याचा लगदा झाला म्हणजे त्यांत साबणाचा द्रव घालून नीग्रोसीन नांवाचा काळा रंग घालण्यांत येतो.

स्त्रियांच्या बुटास लावण्याकरितां निराळ्या तऱ्हेचें एक लाखेचें पॉलिश करण्यांत येतें. तें करण्याकरिता लाख बोरॅक्स

किंवा सोडा यांमध्यें विरघळविण्यांत येतें. यांत जर साचण घातला तर तकतकी कमी येते. यामध्यें क्वचित् हाडांचा कोळसाहि वापरण्यांत येतो.

**बूत्रो, एत्यान एमिल मारी** ( १८४५-१९२१ )—एक फ्रेंच तत्त्ववेत्ता. त्याच्या तत्त्वज्ञानाचा मुख्य सिद्धान्त सयुक्तिक आणि कारणिक ( लॉजिकल अँड कॉझल ) गरज यांच्यामधील पृथक्करणावर आधारलेला आहे. तसेंच त्याच्या तत्त्वज्ञानांत गुण ( क्वॉलिटी ) आणि परिमाण ( क्वॉंटिटी ) यांचे दोन पृथक् पृथक् दृष्टिकोन आहेत, या मुद्याला महत्त्व दिलेलें आहे. त्याचे बरेच ग्रंथ आहेत.

**बूथ, विल्यम** ( १८२९-१९१२ )—हा साल्व्हेशन आर्मी ( मुक्तिफौजे )चा जनरल ऊर्फ प्रमुख होता. त्याचें शिक्षण खाजगी रीतीनें झालें व नंतर वेस्लेयन मेथॉडिस्ट या धार्मिक पंथाचा प्रचारक म्हणून त्यानें कांहीं काळ काम केलें. नंतर तो मेथॉडिस्ट न्यू कनेक्शन याचा उपाध्याय ( मिनिस्टर ) झाला. पुढें त्यानें ती संस्था सोडून १८६५ सालीं लंडन शहराच्या ईस्ट एन्ड या भागांत एक मिशनरी संस्था स्थापन केली. व त्या संस्थेचें १८७८ सालीं साल्व्हेशन आर्मी (मुक्ति फौज) या संस्थेंत रूपांतर केलें आणि या संस्थेच्या शाखा त्यानें सर्व जगभर स्थापन केल्या. बहुजन-समाजांत व्यावहारिक धर्म वाढविण्याचा उद्देश या संस्थेचा असे. 'मुक्तिफौज' पाहा. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'इन डार्केस्ट इंग्लंड ॲन्ड दि वे आउट' (अत्यंत अंधारमय इंग्लंडांतून बाहेर वाट), 'लव्ह, मॅरेज, ॲन्ड दि होम' (प्रेम, विवाह आणि गृह), 'दि ट्रेनिंग ऑफ चिल्ड्रेन' (मुलांचें शिक्षण), 'रिलिजन फॉर एव्हरी डे' (नित्यधर्म), इत्यादि.

**बूमरँग**—हें एक ऑस्ट्रेलियामध्यें आदिवासी लोकांतील फेंकून मारण्याच्या कामीं वापरण्यांत येणारें हत्यार आहे. हें कठिण लांकडाचें सामान्यतः विळ्याच्या आकाराचें बनविलेलें असतें. बूमरँग फेंकलें असतां तें फेंकलेल्या वस्तूकडे सरळ जाण्याच्याऐवजीं उंच जाऊन आकाशांत घिरट्या घालतें व फेंकणाऱ्याकडे परत येतें.

**बूरियट लोक**—हे तातार जातीचे फिरते लोक इर्कुटस्क व ट्रान्सबैकल प्रदेशांच्या दक्षिण भागांत राहतात. त्यांची संख्या सुमारें २,५०,००० आहे. ते मोंगोलियन भाषा बोलतात. त्यांपैकीं कांहीं बौद्धधर्मी व कांहीं शामानी पंथाचे आहेत. ते गुरें व मेंढ्या पाळण्याचा धंदा करतात. शिकारीवर उदरनिर्वाह करतात.

**बूर्जे, पॉल** ( जन्म १८५२ )—एक फ्रेंच कादंबरीकार, कवि, निबंधकार व टीकाकार. प्रथम तो कवि म्हणून पुढें आला व त्यानें आपले कित्येक काव्यसंग्रह प्रसिद्ध केले. पण त्याची मुख्य कीर्ति कादंबरीकार व टीकाकार म्हणून आहे. त्याचे बरेच ग्रंथ आहेत.

**बृहदारण्यकोपनिषद्**—हें उपनिषद् सर्व उपनिषदांमध्यें अतिशय मोठें व महत्त्वाचें आहे. त्याचप्रमाणें सर्व उपनिषदां-मध्यें हें अत्यंत जुनें उपनिषद् आहे. हें उपनिषद् शुक्लयजुर्वेद शाखेचें आहे. या उपनिषदाचा कर्ता अगर संपादक हा वाजसनेयी याज्ञवल्क्य असावा असें म्हणता येईल. पहिल्या भागाला 'मधुकांड' असें नांव आहे. दुसऱ्या कांडांत याज्ञ-वल्क्याचे अश्वल, आर्तभाग, भुज्यु, उपस्त, कहोळ, गार्गी, उद्दालक, शाकल्य, इत्यादिकांशीं झालेले संवाद आले असून त्यांत याज्ञवल्क्याची सरशी झालेली दाखविली आहे. याज्ञ-वल्क्य संसाराचा त्याग करावयास निघाला असतां त्याच्या बायकोशीं-मैत्रेयीशीं झालेला संवाद सुंदर आहे. एका खिल-कांडांत संसारवादाची चर्चा आहे.

**बृहद्गोधिका**—( मेगॅलोसॉरस ). सरपटणाऱ्या प्राणि-वर्गांतील अश्मीभूत असा एक मोठा सरडा. हा चाळीस फूट लांब असावा. हा ज्युरासिक आणि खटिकमय ( क्रेटेसिअस ) थरांत दिसून आला. प्रथम हा इंग्लंडकडून माहीत झाला; नंतर हिंदुस्थान आणि उत्तर अमेरिका या देशातहि या प्राण्याचा सुगावा लागला.

**बृहन्नटा(-ला-)-डा**—पांडवाच्या अज्ञातवासात हें नांव धारण करून अर्जुन षंढवेशानें विराट राजाची कन्या उत्तरा, हिला नृत्यगायन शिकविण्यास राहिला होता. पुढें जेव्हां दुर्योधनादिकांनीं विराटाच्या राज्यांत गोहरण केलें तेव्हां विराटाचा मुलगा उत्तर त्यांच्याशीं लढण्यास सिद्ध झाला; असतां बृहन्नट-अर्जुनानें त्याचें सारथ्य केलें व ऐन वेळीं स्वतः निकरानें शत्रूशीं युद्ध करून गायी परत आणल्या.

**बृहन्नारदीय पुराण**—याला नारद किंवा नारदीय पुराण असेंहि म्हणतात. यांत विष्णुभक्तीच्या कथा, स्तोत्रें व विधी मात्र दिले आहेत. श्राद्ध व प्रायश्चित्तें यांबद्दलहि यांत मोठा भाग आहे. याशिवाय नारद-उपपुराण म्हणूनहि एक आहे.

**बृहस्पति**—हा ऋग्वेदात एक सूक्तकार म्हणून येतो. तसेंच एक पराक्रमी देवता म्हणूनहि तेथें बृहस्पति आढळतो. याचीं ब्रह्मणस्पति, सदसस्पति, ज्येष्ठराज व गणपति अशींहि वेदात नांवें आलीं आहेत. तैत्तिरीय संहितेंत कांहीं याग याच्या नांवावर आहेत. पुराणांतरीं याला सर्वश्रेष्ठ पुरोहित व देवगुरु या नात्यानें मान आहे. यास शुभा व तारा या दोन पत्न्या होत्या. सोमानें तारेला पळवून नेल्यावरून 'तारकामय' नावाचें युद्ध झालें. याच्यासंबंधीं अनेक कथा-पुराणांतून आहेत. बृहस्पतीला बुद्धीचा आगर मानतात.

बृहस्पति नांवाचा एक स्मृतिकार होऊन गेला. दिवाणी व फौजदारी असे न्यायदानाचे विभाग याच स्मृतींत प्रथम दिसतात. निपुत्रिक विधवांचा वारसा-हक्क याला मान्य आहे.

बार्हस्पत्यशास्त्र, स्वप्नाध्याय व एक वास्तुशास्त्र बृहस्पतीच्या नांवावर आहेत. तेव्हां एकापेक्षां अधिक बृहस्पति नांवाच्या व्यक्ती होऊन गेल्या असाव्यात.

**बृहस्पति-स्मृति**—या स्मृतीचें महत्त्व इतर स्मृतींप्रमाणेंच पण कांहीं भिन्न कारणांमुळें फार आहे. हींत हिंदु कायद्याचें विस्तृत विवरण असून मनुस्मृतीशीं तिचा फार संबंध आहे. स्कंद पुराणांत अशी एक दंतकथा आहे कीं, मूळ मनुस्मृतीचे भृगु, नारद, बृहस्पति आणि अंगिरस् यांनीं चार भाग केले. बृहस्पतीचें कित्येक गोष्टींत (उदाहरणार्थ, स्त्रियांचे हक्क) विचार-प्रागल्भ्य दिसून येतें व एकंदरींत ज्या विचारसरणीचा अवलंब केला आहे त्यावरून नारदस्मृतीनंतरच बृहस्पतिस्मृति झाली असावी. नारदस्मृतीप्रमाणें याहि स्मृतीचें मृच्छकटिक नाटकां-तील न्यायपद्धतीशीं जुळतें. दान, व्रत, प्रायश्चित्त व इतर धार्मिक विधी, इत्यादिकांसंबंधानें जीं वचनें या स्मृतींत आहेत त्यांचे उल्लेख हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणींत, देवभट्टाच्या स्मृतिचंद्रिकेंत आणि इतर कित्येक धर्मनिबंधांत सांपडतात.

**बेअदबी** (कोर्टाची)—कोणाहि न्यायाधीशाचा किंवा कायदेमंडळाचा दर्जा, हुकूम आणि अधिकार यांच्याविरुद्ध वर्तन केल्यास बेअदबी (कॉन्टेम्प्ट ऑफ दि कोर्ट) हा गुन्हा होतो. अशा प्रकारचा बेअदबीचा गुन्हा कोर्टाच्या बाहेर कोठें केल्यास गुन्हेगाराला दंड किंवा कैद ही शिक्षा देतां येते आणि प्रत्यक्ष न्यायकोर्टांत काम चालू असतांना असा गुन्हा केल्यास संक्षिप्त पद्धतीनें लगेच चौकशी करून त्याच न्यायधीशाला दंड किंवा कैदेची शिक्षा देण्याचा अधिकार असतो. हिंदुस्थानांत क्रिमिनल प्रोसीजर कोडमध्यें कोर्टाच्या बेअदबीच्या गुन्ह्याची चौकशी व शिक्षा त्याच कोर्टाला तात्काल करण्याचा अधिकार दिलेला आहे (कलमें ४८० ते ४८५). अशा कोर्टाला अशा गुन्ह्याची चौकशी स्वतः न करतां दुसऱ्या मॅजिस्ट्रेटकडे इन्साफाकरितां ती केस पाठवण्याचाहि अधिकार आहे (कलम ४८२). कोर्टाच्या बेअदबीचे गुन्हे पीनल कोडांत दिले आहेत ते:—कोर्टांत कागद-पत्र हजर करण्याचा कोर्टाचा हुकूम मोडणें, कोर्टांत कायदेशीर शपथ घेण्याचें नाकारणें; कोर्टांत विचारलेल्या प्रश्नांचें उत्तर देण्याचें नाकारणें; कोर्टांत लिहून घेतलेल्या जबानीखालीं सही करण्याचें नाकारणें; कोर्टांत चालू असलेल्या कोर्टाच्या कामाला अडथळा, किंवा न्यायधीशाला अपशब्द बोलणें. हे सर्व कोर्टाच्या बेअदबीबाबतचे गुन्हे आहेत (कलमें १७५-१७८-१७९-१८३-२२८).

बेअब्रू—इंग्लंडच्या कायद्यांत अब्रूनुकसानीच्या गुन्ह्याचे (१) 'लायबेल' म्हणजे लेखी किंवा छापील मजकुरानें केलेली किंवा कायम स्वरूपाच्या चित्रानें केलेली अब्रूनुकसानी, (२) नुसते तोंडानें शब्द बोलून किंवा शारीरिक हावभाव करून केलेली अब्रूनुकसानी 'स्लँडर', असे दोन प्रकार आहेत. या कृत्याबद्दल फौजदारी व दिवाणी दोन्ही प्रकारांनीं न्याय मागतां येतो. अब्रूनुकसानीच्या खटल्यांत आरोपीच्या बचावाचे प्रकार आहेत ते:—(अ) अब्रूनुकसानीकारक शब्द खरे आहेत; (ब) सार्वजनिक हिताकरितां सार्वजनिक केलेली योग्य टीका आहे; (क) तसें बोलण्याचा किंवा लिहिण्याचा हक्क आहे. उदा., आईबाप, किंवा पालक, किंवा शिक्षक, किंवा मालक यांनीं आपल्या नियंत्रणाखालील मुलें, विद्यार्थी व नोकर यांच्याबद्दल अशा प्रकारचा मजकूर बोलणें किंवा लिहिणें. हिंदुस्थानांत 'लायबेल' आणि 'स्लँडर' असा फरक केलेला नसून 'डिफेमेशन' या नांवाच्या गुन्ह्यांत लेखी व तोंडी दोन्ही प्रकारच्या अब्रूनुकसानीचा अंतर्भाव होतो व त्यांत अपवाद म्हणजे आरोपीच्या बचावाचे मुद्दे १० आहेत. (पीनल कोड, कलम ४९९ पाहा.)

**बेकन, फ्रॅन्सिस (लॉर्ड)** (१५६१-१६२६)—सुप्र-सिद्ध आंग्ल तत्त्वज्ञानी, मुत्सद्दी व निबंधलेखक. सर निकोल बेकन या कायदेपंडिताचा हा मुलगा. सर विल्यम सेसिल याचा मामा लागत असे. याचें शिक्षण केंब्रिज येथील ट्रिनिटी कॉले-जांत झालें. पुढें त्यानें वकिलीचा अभ्यास केला. आरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाचा त्यानें खोल अभ्यास केल्यावर त्याचें तत्त्व-ज्ञान सदोष आहे असा याचा ग्रह झाला होता. १५८४-९७ पर्यंत निरनिराळ्या भागातर्फे तो पार्लमेन्टमध्यें निवडून आला. त्यानें अनेक अधिकारांच्या जागांवर काम केलें. १६०५ सालीं 'ॲडव्हान्समेंट ऑफ लर्निंग' (शिक्षणसंवर्धन) हा मह-त्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. १६२० सालीं त्याचा 'नोव्हम ऑर्गॅनुम' हा शास्त्रीय संशोधनाच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा असलेला ग्रंथ बाहेर पडला. पुढें त्याच्यावर लांचलुचपतीचा आरोप शाबीत होऊन त्याला पार्लमेंटमधून हांकलण्यांत आलें. बेक-नची बुद्धिमत्ता फार दांडगी होती. त्याचप्रमाणें त्याची संशोधक-बुद्धिहि अत्यंत तीव्र होती. त्याचे निबंध म्हणजे व्यवहार-ज्ञानाची खाणच असून त्याची भाषा अत्यंत सुंदर पण सूत्रमय आहे. 'इंडक्टिव्ह' (आगमन) तत्त्वज्ञानपद्धतीचा त्याला जनक मानण्यांत येतें. त्याचें खाजगी वर्तन मात्र अतिशय गर्हणीय होतें.

शेक्सपिअरच्या नांवावर खपणारीं नाटकें यानेंच लिहिलीं होतीं असे तर्कवितर्क निघालेले आहेत.

**बेकन, रॉजर** (१२१४–१२९४)—एक इंग्रज तत्त्ववेत्ता व शास्त्रज्ञ. त्यानें ऑक्सफोर्ड व पॅरिस युनिव्हर्सिटींत विद्याभ्यास करून रसायन, पदार्थविज्ञान, गणित, ज्योतिष व भूगोल यांचें चांगलें ज्ञान करून घेतलें व अनेक नवे शोध (बृहद्दर्शक कांच, बंदुकीची दारू, इ.) लावले. पण ते तत्कालीन लोकांना इतके चमत्कारिक वाटले कीं, बेकन जादूगार आहे, असें लोक म्हणत. तो फ्रॅन्सिस्कन जोगी झाला होता. पुढें ख्रिस्ती धर्माधिकारी यांनीं बेकनला चेटक्या व नास्तिक अशा आरोपावरून तुरुंगांत १० वर्षे ठेवलें. व त्याला पुस्तकें व लेखनसाहित्य, शास्त्रीय प्रयोगांचीं उपकरणें, वगैरेंतील कांहीं एक मिळूं दिलें नाहीं. ४ था क्लेमंट पोप असतांना त्यानें बेकनला तुरुंगातून मुक्त केलें; पण पुन्हां १२७८ सालीं त्याला बंदिवासांत टाकलें. तेथें १० वर्षे तो होता; व त्याचा अंतकाळ कसा झाला तें अज्ञात आहे. त्यानें 'ओपस मॅगस' नांवाचा (शास्त्रीय ज्ञानकोशासारखा) ग्रंथ लिहिला; दृष्टिविज्ञान व रसायनशास्त्र, तसेंच ज्योतिषशास्त्रांतील दिनगणना यांत त्यानें अनेक शोध लावले, व जुन्या चुका दुरुस्त केल्या. बंदुकीच्या दारूचा शोध बहुधा त्यानेंच लावलेला आहे. ब्रिटनमधील आद्य तत्त्ववेत्ता व शास्त्रज्ञ असें याला यथार्थानें म्हणतां येईल.

**बेकर, सर सॅम्युएल व्हाइट** (१८२१–१८९३)—एक इंग्रज प्रवासी. तो सिलोनमध्यें कांहीं वर्षे राहिला; नंतर आफ्रिकेंत १८६१ पासून कित्येक वर्षे अपर नाइल नदीच्या प्रदेशांत त्यानें प्रवास केला, व बरेच नवे शोध लावले. त्यांपैकीं १८६४ सालीं आल्बर्ट सरोवराचा व त्यांतून निघणाऱ्या व्हाइट नाइल नदीचा शोध हे होत. १८६९ सालीं ईजिप्तच्या खेदिवानें आफ्रिकेंतील नवसंशोधित प्रदेशांपैकीं मोठा प्रदेश आपल्या राज्यास जोडून त्या प्रदेशांत व्यापार सुरू करण्याकरितां जी एक मोहीम पाठवली, तींत बेकर होता. त्यानें आपल्या प्रवासासंबंधीं कांहीं पुस्तकें लिहिलीं आहेत.

**बेकारिआ, सिझार योनेसाना** (१७३८–१७९४)—हा इटालियन अर्थशास्त्रज्ञ आणि फौजदारी कायद्यासंबंधींचा लेखक असून त्याची मुख्य प्रसिद्धि 'ऑन क्राइम्स ॲन्ड पनिशमेन्ट्स' (गुन्हे आणि शिक्षा) यावरच्या निबंधानें झाली आहे. या निबंधाचीं भाषांतरें ताबडतोब अनेक भाषांत झालीं; आणि त्यामुळें युरोपांतील प्रमुख देशांतल्या फौजदारी कायद्यांत पुष्कळ सुधारणा करण्यांत आल्या.

**बेकारी**—उपजीविकेचें साधन नसणें, म्हणजे कांहीं नोकरीधंदा नसणें. अशी स्थिति आधुनिक उद्योगधंद्यांच्या यांत्रिक रचनेमुळें व व्यापारी चढ–उतारामुळें येत असते. जेव्हां एखादा धंदा किंवा कारखाना कांहीं कारणांनीं चालेनासा होतो, तेव्हां त्यांतील मजूर बेकार होतात. हातकामाची जागा जेव्हां यंत्र घेतें तेव्हां किंवा अडाणी कामगारांना काढून कुशल कारागीर नेमण्यांत येतात; किंवा आजकालच्याप्रमाणें उत्पादन जास्त होऊन गिरण्या काम बंद करतात तेव्हां, बरेच लोक नोकरींतून सुटतात. लढायांच्या अमदानीनंतरहि कित्येक बेकार होतात. आधुनिक सुधारलेल्या जगांत बेकारी वाढते आहे. ग्रेट ब्रिटनमध्यें वीस लाख तर जित जर्मनींत याच्या तिप्पट–चौपट बेकार मागच्या महायुद्धापूर्वी होते. अमेरिकेंतहि या संख्येहून अधिक संख्या साहजिक लोकसंख्येच्या प्रमाणानें होती. बेकारांसाठीं विम्याची तरतूद सरकारी देखरेखीखालीं केलेली असते खरी; पण पुरेसें वेतन मिळण्यासाठीं भरपूर उद्योग हा लागतोच. तेव्हां सरकारी प्रयत्नांनीं नवीन उद्योगधंदे देशांत निर्माण होणें व लोकांना उद्योगधंद्याचें व्यवस्थित शिक्षण देणें हाच मुख्यतः बेकारीवर उपाय असतो.

**बेकिंग पावडर**—ही पूड पुढें दिलेल्या द्रव्यांची करतात. १ द्राक्षाम्ल (टॅरटॅरिक ॲसिड) १८ औंस; २ सिंधुद्विकर्बिद (बायकार्बोनेट ऑफ सोडा) २० औंस; व ३ तांदुळाचें पीठ २ पौंड. दुसरी कृति अशी– १ क्रीम ऑफ टार्टर २ पौंड; २ बायकार्बोनेट ऑफ सोडा १ पौंड; व ३ तांदुळाचें पीठ १॥ पौंड. जर टॅरटॅरिक ॲसिड, क्रीम ऑफ टार्टर महाग वाटत असेल किंवा वापरावयाचें नसेल तर खटस्फुरित अम्ल (ॲसिड फॉस्फेट ऑफ कॅल्शियम) अथवा पालाश गंधकित अम्ल (ॲसिड सल्फेट ऑफ पोटॅशियम) हीं वापरावीत. ही बेकिंग पावडर–पूड पाण्यांत घातल्याबरोबर रासायनिक क्रियेस आरंभ होतो. याकरितां ज्या पिठांत ही घातली असेल तें ताबडतोब भट्टींत घालण्याची तजवीज करावी. भट्टींतील उष्णतेमुळें या पुडींतील वायु ताबडतोब निघूं लागतो, व त्यामुळें पीठ फुगूं लागतें. त्या वेळीं त्या पिठावर एक जाड पापुद्रा तयार होतो त्यामुळें आंतील वायु निसटून जात नाहीं.

**बेकेलर**— बेकेलर नांवाच्या फ्रेंच कुटुंबांतील तीन पुरुषांनीं शास्त्रीय क्षेत्रांत बरेंचसें कार्य केलें आहे.

१. बेकेरल, अन्टोनी सीझर (१७८८–१८७८)— यानें विद्युत् आणि चुंबक या दोन शास्त्रांत मन घातलें. सन १८३७ मध्यें त्याला रॉयल सोसायटीकडून 'कोपले' पदक बक्षीस मिळालें. प्राणिज उष्णता, सेंद्रिय रसायनशास्त्र, वनस्पतिविषयक रसायनशास्त्र आणि हवामानशास्त्र, इत्यादि विषयांवर यानें बरींच पुस्तकें लिहिलीं आहेत.

२. बेकेरल, अलेक्झांडर एडमंड (१८२०–१८९१)— यानें स्वतः प्रकाशशास्त्र, सूर्यप्रकाशाचें पृथक्करणशास्त्र व सूर्यप्रकाशाचा कलेच्या दृष्टीनें उपयोग, विद्युत्प्रकाशाविषयीं

संशोधन आणि गंधकिद (सल्फाइड) नावाच्या रासायनिक द्रव्यापासून आणि युरेनियमजन्य रासायनिक द्रव्यापासून निघणाऱ्या प्रकाशाविषयीं संशोधन इतक्या विषयांवर स्वतंत्र परिश्रम घेतले. तसेंच चुंबकशास्त्राच्या कांहीं अंगांसंबधानें यानें परिश्रम घेतले आहेत.

३. बेक्वेरल, हेन्री ॲन्टोनी (१८५२–१९०८)— रेडियम-सदृश किरणें युरेनियम नांवाच्या धातूपासून निघतात असें यानें प्रथमतः दाखवून दिलें. हीं किरणें रान्टजेन किरणांसारखीं असतात असें यानें सिद्ध केलें. हा शोध त्यानें १८९६ सालीं लावला. या शोधाबद्दल हा व पेरी क्युरी या दोघांना मिळून सन १९०३ मध्यें नोबेल पारितोषिक देण्यांत आलें. चुंबकत्व, प्रकाशाचें ध्रुवीभवन व स्फटिकाकडून प्रकाशाचें अपशोषण, इत्यादि विषयांसंबंधानें त्यानें बरेच परिश्रम घेतले होते.

**बेगम सुमरू** (मृ. १८३६)—एक हिंदी–खिस्ती वीर स्त्री. ही सारधान्याची जहागीरदारीण होती. हिचा नवरा जर्मन असून त्याचें नांव सॉमर्स होतें. त्यावरून 'सुमरू' पडलें. सॉमर्स हा कांहीं सैनिक पदरीं ठेवून लागेल त्याला लढाईत मदत देत असे. तीच प्रथा बेगमनें चालविली. सॉमर्सनें लहानपणीं एक सुंदर पोरगी विकत घेतली व तिच्याशीं लग्न केलें. तीच ही बेगम होय. ही नवऱ्याच्या सहवासानें फार हुशार व लढवय्यी बनली. गुलाम कादरच्या बंडांत हिनें शहाअलम बादशहाला साहाय्य दिलें. तेव्हां हिला बेगम किंवा शहाजादी ही पदवी दिल्लीच्या बादशहानें दिली व नवऱ्याच्या मृत्यूनंतर तिच्याकडे जहागिरी कायम ठेवली. ही सारधान्याची जहागिरी १५ लाखांची होती. गव्हर्नर जनरल हेस्टिंग्ज यानें हिची १८१५ त भेट घेतली, त्या वेळीं ती पोक्त होती; तथापि तिचें सौंदर्य आणि हुशारी हीं त्याला कमी दिसलीं नाहींत.

**बेचुआनालँड**—हें ब्रिटिशसंरक्षित राज्य म्हणजे ब्रिटिश दक्षिण आफ्रिकेंतील (केप कॉलनी) झांबेझी आणि मोलोपो या नद्यांमधील प्रदेश होय. याचे उत्तर आणि दक्षिण असे दोन भाग पडतात. क्षे. फ. २,७५,००० चौरस मैल असून लो. सं. २,६५,७५६. पैकीं युरोपियन दोन हजारांच्या आंत आहेत. पश्चिमेकडील भागांत १० इंच पाऊस व पूर्वेकडील भागांत २६ इंच पाऊस पडतो. मेफकिंग व्ह्रायबर्ग, टॉंग्ज, टायगर-क्लूफ, अपिंग्टन, कुरमन, गेबरॉडस व सेरोवे हीं मुख्य शहरें यांत आहेत. टाटी जिल्ह्यांत सोन्याच्या खाणी आहेत. मॅडीवी येथील स्फटिकमय खडकांत सोनें सांपडतें. व्हायबर्गजवळ हिरे सांपडतात. पेलेपीजवळ कोळशाच्या खाणी आहेत. फ्रॅंझिसकुच-जवळ अशुद्ध तांबें सांपडतें. पूर्वी हें शहामृगाच्या पंखांच्या व हस्तिदंती सामानाच्या व्यापाराकरितां प्रसिद्ध होतें. १८ व्या शतकाच्या शेवटीं युरोपीय लोक येथें आले. लंडन धर्मप्रसारक मंडळानें १८०३ सालीं ग्रीक्वालँडमध्यें व १८१८ सालीं खुद्द बेचुआनालँडमध्यें संस्था स्थापिल्या. १८६४ सालीं कार्ल मौच्यनें टाटी जिल्ह्यांत सोन्याचा शोध लावला. १८८५ सालीं हा मुलूख ब्रिटिश सत्तेखालीं आला. १८९१ सालीं दक्षिण आफ्रिका जकात संघांत या शहराचा समावेश झाला. यांत अनेक लहान लहान देशी राज्यें आहेत. त्यावर एक नाईक असतो. दर राज्यांत ब्रिटिशांचा एक रेसिडेंट असतो.

**बेझंट, डॉ. ॲनी** (१८६७–१९३४)—थिऑसॉफिकल सोसायटीची अधिष्ठात्री व हिंदी राजकारणी विदुषी. या आयरिश असून १८६७ सालीं लंडन येथें जन्मल्या. विसाव्या वर्षी त्यांचा एका धर्मोपाध्यायाशीं विवाह झाला. पण बाई खिश्चन धर्माविषयीं पाखंडी असल्यामुळें नवऱ्यानें त्यांना घराबाहेर घालविलें. पुढें सुमारें पंधरा वर्षें त्यांनीं इंग्लंडच्या सार्वजनिक जीवनांत पुढाकार घेतला. ब्रॅडलॉ यांची व त्यांची मैत्री जमून त्या नास्तिकवादाच्या एक पुढारी झाल्या. तसेंच फेबियन सोशलिस्ट पंथास मिळाल्या. संततिनियमन, वृत्तपत्राचें स्वातंत्र्य, मजुरांचे संप, वगैरे उद्योगांचें नेतृत्व त्या काळीं बाईकडे असे. १८८९ त मॅडम ब्लॅव्हॅटस्की नांवाच्या योगविद्यापारंगत स्त्रीची व यांची गांठ पडली; व बेझंटबाई आस्तिक व थिऑसॉफिकल सोसायटीच्या सभासद झाल्या. मरेपर्यंत त्या थिऑसॉफिकल सोसायटीच्या पुढारी होत्या. त्यांनीं स्वतः राजयोगाचा अभ्यास करून सिद्धि संपादन केल्या व अदृश्य सृष्टीचें प्रत्यक्ष अवलोकन करून प्राचीन विद्या, वगैरे अनेक थिऑसॉफिकल व आध्यात्मिक ग्रंथ लिहिले.

१८९३ सालीं त्या प्रथम हिंदुस्थानांत आल्या व पुढें कायमच्याच हिंदुस्थानांत राहूं लागल्या. थिऑसॉफीच्या प्रसारार्थ त्या सर्व जगभर वारंवार प्रवास करून व्याख्यानें देत. त्यांनीं हिंदुस्थानांत काशी येथें धर्मशिक्षण देणारें पहिलें कॉलेज १८९८ सालीं काढलें. तें वाढून त्या केंद्रांतून १९१६ सालीं पंडित मालवीय यांची बनारस युनिव्हर्सिटी निघाली. १९१४ सालीं वयाच्या सदुसष्ठाव्या वर्षी त्या हिंदी राजकारणांत पडल्यानंतर लोकमान्य टिळक व बाई यांनीं एक प्रचंड स्वराज्यविषयक

राजकीय चळवळ केली. १९१७ सालीं त्यांस सरकारनें स्थानबद्ध केलें होतें, पण लोकांच्या निषेधपर चळवळीमुळें सरकारला त्यांना सोडावें लागलें. त्याच सालीं त्यांना राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आलें. महात्मा गांधींच्या राजकीय धोरणाविषयीं त्यांचे कित्येक मतभेद होते. हिंदुस्थानला स्वराज्य देण्याचें बिल त्यांनीं १९२५ सालीं ब्रिटिश पार्लमेंटसमोर आणलें होतें. १९३४ सालीं त्या थिऑसॉफिकल सोसायटीच्या मुख्यस्थानीं अड्यार येथें वारल्या. त्यांच्या देहास अग्निसंस्कार करण्यांत आला. थिऑसॉफिकल सोसायटीचें अध्यक्षपद त्यांच्याकडे २७ वर्षें होतें. त्यांनीं लहान-मोठीं तीनशेंवर पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत.

**बेझंट, सर वॉल्टर** (१८३६-१९०१)--एक इंग्रज ग्रंथकार. तो त्याच्या कादंबऱ्यांमुळें विशेष प्रसिद्धि पावला आहे. त्यानें आपल्या कांहीं कादंबऱ्या जेम्स राइस या लेखकाच्या सहकार्यानें लिहिल्या आहेत. त्यांतील प्रमुख कादंबऱ्या 'रेडी-मनी मॉर्टीबॉय', 'दि गोल्डन बटरफ्लाय' (सोनेरी फुलपांखरूं), 'दि मंक्स ऑफ थेलेमा' (थेलेमाचे भिक्षू), इत्यादि होत. राइसच्या मरणानंतरहि (१८८२) त्यानें 'ऑल सॉर्ट्स ॲन्ड कंडिशन्स ऑफ मेन' (मनुष्याचे सर्व प्रकार व परिस्थिती—लंडनच्या ईस्टएंड भागांतील मजुराची स्थिति यांत वर्णिली होती व त्याचा परिणाम म्हणजे मजुरांचीं घरें सुधारलीं.), 'ऑल इन् ए गार्डन फेअर', 'दि वर्ल्ड वेन्ट व्हेरी वेल देन' (त्या वेळीं जग सुस्थितींत होतें.), 'दि रेबेल क्वीन' (बंडखोर राणी), इ. कादंबऱ्या लिहिल्या. त्यानें चरित्रें व टीकात्मक निबंधहि लिहिले आहेत.

**बेझवाडा**—मद्रास, कृष्णा जिल्हा, एक तालुका व त्याचें मुख्य शहर. बेझवाडा नायझॅम गॅ. स्टेट रेल्वे आणि मद्रास स. म. रेल्वे यांचें हें जंक्शन आहे. लो. सं. (१९४१) ८६,१८४. या ठिकाणीं बौद्ध लेणीं व बरींच हिंदु देवालयें पाहण्यासारखीं आहेत. बरेच जिन व प्रेस आणि तांदुळाच्या गिरण्या आहेत. आंध्र विद्यापीठ या ठिकाणीं आहे व त्याला जोडलेलीं बरींच महाविद्यालयें आहेत.

**बेझोर रत्न**—खरा बेझोर हा दगड कांहीं प्राण्यांच्या शरीरांत, विशेषतः इराणी रानबकऱ्याच्या शरीरांत सांपडतो. बेझोर हा शब्द मूळ फारसी 'पदजहर' (विषहारक) या शब्दावरून प्रथम फ्रेंचमध्यें व नंतर इंग्रजींत व इंग्रजींतून मराठींत आला आहे. हा जनावरांच्या पोटांतील दगडासारखा कठिण पदार्थ आहे. बकरा, उंट, मासा अथवा साप यांपैकीं ज्याच्या शरीरांत सापडला असेल त्याप्रमाणें बेझोर हा खडा निरनिराळ्या प्रकारचा असतो. गाईबैलांच्या शरीरांतल्या या खड्याला गोरोचन किंवा गोवर्धन म्हणतात. सर्पांच्या शरीरांत सांपडलेल्या खड्याला सर्पमणि म्हणतात. दीव व गोवळकोंडें हीं ठिकाणें बेझोरकरितां प्रसिद्ध आहेत. खरा पौरस्त्य बेझोर अंडाकृति व अक्रोडापेक्षां लहान असतो. ऑलिव्हसारखा हिरवा रंग सर्वांत उत्तम समजतात. त्याला चव नसते, परंतु विशिष्ट प्रकारचा वास असतो. हा खडा विषहारक आहे असें मानतात.

**बेंटले, रिचर्ड** (१६६२-१७४२)—एक इंग्रज ग्रीक-लॅटिन भाषांचा पंडित व टीकाकार. १६८० सालीं हा केंब्रिज युनिव्हर्सिटीचा बी. ए. झाला. १६९४ सालीं त्याला सेंट जेम्सेस पॅलेसमधील राजग्रंथालयाचा पालक नेमण्यांत आलें. १७११ सालीं त्यानें होरेसच्या ग्रंथांची आवृत्ति प्रसिद्ध केली. व १७२६ सालीं टेरेन्सच्या व फेड्रसच्या ग्रंथांची आवृत्ति प्रसिद्ध केली. होमरच्या महाकाव्याची आवृत्ति काढण्याची तयारी त्यानें केली; पण फक्त टीपा तयार झाल्या, आवृत्ति निघाली नाहीं. १७१६ सालीं त्याला 'डिव्हिनिटी' या विषयाचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. त्याचें शेवटचें प्रकाशन मिल्टन कवीच्या 'पॅरडाइज लॉस्ट' या महाकाव्याची संशोधित आवृत्ति हें होय (१७३२). बेंटले हा युरोपियन विद्वानांत उच्च प्रतीचा मानला जातो.

**बेटसन, विल्यम** (१८६१-१९२६)—एक ब्रिटिश वनस्पतिशास्त्रज्ञ. तो १९०८-१९०९ सालीं केंब्रिज येथें जीवशास्त्र (बायॉलजी) चा प्रोफेसर होता व १९१० सालीं त्याला सरे परगण्यांतील मर्टन पार्क येथील जॉन इन्नेस हॉर्टिकल्चरल इन्स्टिटयूशन या संस्थेचा डायरेक्टर नेमण्यांत आलें. १९०४ सालीं त्याला रॉयल सोसायटीचें डार्विन पदक देण्यांत आलें आणि १९१४ सालीं तो ब्रिटिश असोसिएशनचा अध्यक्ष झाला. त्याचे मुख्य ग्रंथ आहेत ते—'मटीरिअल्स फॉर दि स्टडी ऑफ व्हेरिएशन' (प्रकारणाच्या अभ्यासाचीं साधनें), 'मेन्डेल्स प्रिन्सिपल्स ऑफ हेरेडिटी अँड प्रॉब्लेम्स ऑफ जेनेटिक्स' (मेंडेलचे आनुवंशिकतेचे सिद्धांत आणि जननशास्त्राचीं प्रमेयें).

**बेंटिंक, लॉर्ड विल्यम** (१७७४-१८३९)—एक ब्रिटिश मुत्सद्दी व हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल. प्रथम हा मद्रासचा गव्हर्नर असून वेलोरच्या दंग्यामुळें त्याला परत बोलावण्यांत आलें होतें. हा १८२८ ते १८३५ पर्यंत गव्हर्नर जनरलच्या अधिकारावर होता. त्यानें दिवाणी आणि मुलकी खात्यांत ज्या सुधारणा केल्या त्या परवांपर्यंत चालू होत्या. याच्या कारकीर्दींत अनेक हिंदी संस्थानिकांच्या गाद्यांची घालमेल झाली. काचार व कुर्ग संस्थान खालसा झालें. सतीची चाल बंद करणें, ठगी दरोडेखोरांचा बंदोबस्त करणें, इंग्रजी शिक्षण जनतेला देणें, परदेशी व्यापार वाढविणें, हिंदी लोकांस सरकारी वरिष्ठ नोकऱ्या

देणें, वगैरे वरींच देशहिताचीं कामें यानें केलीं. लॉर्ड मेकॉले हा याच्याच कारकीर्दींत पहिला कायदेमंत्री होता. याच्या अमदानींत कलकत्त्यास पहिलें वैद्यक महाविद्यालय उघडण्यांत आलें. हिंदुस्थानवर रशियाच्या आक्रमणाची भीति असल्यानें यानें अधिकार सोडण्यापूर्वी सिंधचे अमीर आणि लाहोरचा रणजितसिंग यांच्याबरोबर मैत्रीचे तह केले. एक शहाणा, धोरणी व उदार गव्हर्नर-जनरल म्हणून याची प्रसिद्धि आहे.

**बेटें**--प्राकृतिक भूगोलशास्त्रांत पाण्यानें वेढलेल्या जमिनीच्या भागास बेट म्हणतात. पण हा भाग द्वीप किंवा खंड इतका मोठा नसून लहानच असतो. नाहीं तर आफ्रिका किंवा अमेरिका हें बेटच म्हणावें लागेल. बेटांचे दोन प्रकार आहेत : खंडाजवळ असणारीं बेटें व महासागरांत असणारीं बेटें. खंडाजवळचें बेट भूप्रदेश, वनस्पती, प्राणी, वगैरे बाबतींत खंडाप्रमाणेंच आढळतें; तर महासागरांतील बेटें बहुधा ज्वालामुखींचीं किंवा पोवळ्यांचीं असतात. वेस्ट इंडीज, हेब्रिडीज, यांसारख्या बेटांच्या समुदायास द्वीपसमूह किंवा द्वीपपुंज ( आर्किपेलॅगो ) म्हणतात.

खालीं प्रमुख बेटांची यादी त्यांच्या उतरत्या क्षेत्रफळांच्या अनुक्रमानें दिलेली आहे.

**पृथ्वीवरील प्रमुख बेटें**

| बेटाचें नांव | क्षेत्रफळ (चौ. मै.) |
|---|---|
| ग्रीनलंड | ७,३६,५१८ |
| न्यू गिनी | ३,३०,००० |
| बोर्निओ | २,८०,००० |
| मादागास्कर | २,४१,०९१ |
| बॉफिन ( उ. अमेरिका ) | २,३६,००० |
| सुमात्रा | १,६३,००० |
| ग्रेटब्रिटन | ८९,०४१ |
| होनशू ( जपान ) | ८८,९१९ |
| सेलिबेस | ७३,००० |
| प्रिन्स अलबर्ट ( उ. अमेरिका ) | ६०,००० |
| दक्षिण बेट ( न्यू झीलंड ) | ५८,०९२ |
| जाव्हा | ४८,००० |
| उत्तर बेट ( न्यू झीलंड ) | ४४,२८१ |
| क्यूबा | ४४,००० |
| न्यू फाउंडलंड | ४२,७३४ |
| लुझान ( फिलिपाइन ) | ४१,००० |
| एलेसमीर ( उ. अमेरिका ) | ४०,००० |
| आइसलँड | ३९,७०९ |
| मिन्डानाओ ( फिलिपाइन ) | ३६,९०६ |
| होकाइडो ( जपान ) | ३४,२७६ |
| आयर्लंड | ३२,६०० |
| नोव्हाय झेम्लीया ( आर्टिक स. ) | ३०,००० |
| सालालीन ( पूर्व रशिया ) | २९,१०० |
| हाइती ( वेस्ट इंडीज ) | २८,२०० |
| टास्मानिया | २६,२१५ |
| सिलोन | २५,३३२ |
| बँक्स ( उ. अमेरिका ) | २५,००० |
| नॉर्थ डेव्हान | २४,००० |
| मेलव्हिले ( उ. अमेरिका ) | २०,००० |
| टेराडेल फ्यूगो ( द. अमेरिका ) | १८,५०० |
| साउथॅम्पटन ( उ. अमेरिका ) | १७,८०० |
| व्हॅन्कुव्हर ( उ. अमेरिका ) | १६,००० |
| पश्चिम स्पिट्स्बर्जेन (आर्क्टिक म. सा.) | १५,२६० |
| प्रिन्स ऑफ वेल्स ( पेनांग ) | १५,००० |
| उत्तर सॉमरसेट | १२,००० |
| सिसिली | १०,००० |
| न्यू ब्रिटन | १०,००० |
| न्यू कॅलेडोनिया ( ऑस्ट्रेलिया ) | ८,५४८ |
| जमेका | ४,४५० |
| हवाई | ४,०१५ |
| पोर्टोरिको ( वेस्ट इंडीज ) | ३,४३५ |
| क्रीट | ३,२३२ |
| पूर्व फॉकलंड ( द. अमेरिका ) | २,५८० |
| पश्चिम ,, | २,०३८ |
| कांगारू ( द. ऑस्ट्रेलिया ) | १,९७० |
| ट्रिनिदाद | १,८६२ |
| केरगुएलन ( हिंदी महासागर ) | १,४०० |
| सोकोत्रा | १,३८२ |
| गॉडेलूप ( वेस्ट इंडीज ) | १,३८० |
| दक्षिण जॉर्जिया ( ऑस्ट्रेलिया ) | १,००० |
| रियुनियन ( हिंदी महासागर ) | ९७० |
| टेनेरिफी ( कॅनरी बेटें ) | ७४७ |
| मॉरिशस | ७२० |
| स्टुअर्ट ( न्यू झीलंड ) | ६७० |
| ऱ्होड्स ( जर्मनी ) | ५४५ |
| ग्रँड कॅनेरिआ ( कॅनरी बेटें ) | ५३२ |
| मार्टिनिक ( वेस्ट इंडीज ) | ५८५ |
| डोमिनिका ( वेस्ट इंडीज ) | ३१४ |
| सेंट लुसिया ( ,, ) | ३०५ |

| | |
|---|---|
| आइल ऑफ मॅन | २३३ |
| बारबेडॉस ( अटलांटिक महासागर ) | २२१ |
| सेंट व्हिन्सेंट ( वेस्ट इंडीज ) | १६६ |
| ग्रेनेडा | १५० |
| माल्टा | १३३ |
| टोबॅगो ( वेस्ट इंडीज ) | ११४ |
| सेंट हेलेना | ४७ |
| ट्रिस्टान डा कुन्हा | ४५ |
| आसनशन | ३४ |

**बेट्टिहा इस्टेट**—बिहार, चंपारण जिल्ह्यांतील या नांवाच्या पोटविभागांतील एक मोठी इस्टेट. क्षे. फ. १८२४ चौरस मैल. ही १७ व्या शतकांत राजा उग्रसेनसिंग या नांवाच्या शूर पुरुषानें मिळविली. १८३० सालापासून यांना महाराज बहादुर ही पदवी आहे. इंग्रज सरकारला ५ लक्ष रुपये या इस्टेटीपासून मिळत. बेट्टिहा राजधानीचें गांव असून यांत महाराजांचा सुंदर व भव्य राजवाडा आहे.

**बेंड**—( पॅलिपस ). हें एक प्रकारचें गळूं असून तें नाक, कान, गुद आणि गर्भपिंड यांमध्यें होतें. विशेषतः नाकावर हीं गळवें फार होतात. हीं बेंडें कित्येक वेळां सुजेमुळें श्लेष्मल त्वचेची वाढ होऊन होतात.

**बेडन**—सहाशें फूट उंचीच्या टेंकडीवर वसलेलें जर्मनीचें बेडन संस्थानांतील एक डौलदार आरोग्यकारक स्थळ. लो. सं. ३०,५००. परंतु दरवर्षी ७०,००० पेक्षां जास्त लोक, जगाच्या सर्व भागांतून या ठिकाणीं कांहीं दिवस राहावयासाठीं येतात. येथें ऊन पाण्याचे २९ झरे आहेत. त्यांच्या पाण्याचें उष्णतामान ११५° पासून १५३° अंशांपर्यंत असतें. या पाण्यानें दीर्घकालीन संधिवात, वातरक्त, पक्षघात, मज्जातंतुव्यथा, मूतखडा, मूत्राम्ल, इत्यादि विकार बरे होतात. येथें असलेल्या एका शिलालेखावरून असें अनुमान काढतात कीं, हें शहर हॅड्रियन बादशहानें वसविलें असावें.

**बेडन पॉवेल, सर रॉबर्ट** (१८५७–१९४१)—एक ब्रिटिश सेनानी. दक्षिण आफ्रिकन युद्धांत ( १८९९–१९०२ ) त्यानें मेफकिंगचें संरक्षण, १८९९ ऑक्टोबर ते १९०२ मेपर्यंत करून प्रसिद्धि मिळविली; तेव्हां त्याला मेजर–जनरल करण्यांत आलें. १९०३ ते १९०७ पर्यंत तो घोडदळाचा इन्स्पेक्टर-जनरल होता, आणि १९०९ सालीं के. सी. बी. व जी. सी. व्ही. ओ. या पदव्या आणि १९२१ सालीं बॅरोनेटचा दर्जा त्याला मिळाला. तो १९०८ सालीं निघालेल्या बालवीर ( बॉय स्काउट्स ) या सुप्रसिद्ध संस्थेचा संस्थापक होय. १९२०–१९४१ पर्यंत तो जगांतील बालवीर–प्रमुख होता. बालवीर पाहा.

सु. वि. भा. ४–४४

**बेडपॅन**—शौचपात्र; मलभाजन. निरनिराळ्या प्रकारच्या आजारांत रोग्यास अंथरुणांतून उठल्यास थंडीची बाधा किंवा कांहीं अपाय होण्याचा संभव असतो. याकरितां हें भांडें वापरण्यांत येतें. वापरण्यापूर्वी हें भांडें गरम करून त्याच्या बाजूवर फ्लॅनेलचा तुकडा टाकावा. उपयोगानंतर तें तावडतोब धुण्यांत यावें. या कामीं लायसॉल सारखे किंवा कॅर्बॉलिक ॲसिडसारखें कांहीं तरी जंतुघ्न औषध वापरणें चांगलें.

**बेडूक**—एक जलस्थलचर प्राणी. मंडूक हें एक बेडकाचें नांव ऋग्वेद व तदनंतरचे ग्रंथ यांत आलें आहे. याचें मंडुकी हें स्त्रीलिंगी रूपसुद्धां ऋग्वेदांत आलें आहे. ऋग्वेदाच्या या प्रसिद्ध ऋचेंत बेडकांची ब्राह्मणांशीं तुलना केली आहे. कारण पर्जन्यकालाच्या प्रारंभीं बेडूक जागृत होऊन ड्राव ड्राव करावयास सुरुवात करतात. बेडूक पाण्यांत राहत असल्यामुळें त्यांच्या अंगांत थंडपणाचा गुण जास्त आहे अशी समजूत आहे. मृत मनुष्याचें दहन झाल्यावर तेथें बेडकांना बोलाविण्यांत येतें ( ऋ. १०, १४, १६ ); हेतु हा कीं, तो बेडूक त्या प्रेतास

बेडकाच्या अवस्था

[ १ नवीन घातलेलें अंडें. २ वाढत असलेलें अंडें. ३ लांबणारा गर्भ ( आंत फट दिसत आहे ). ४ श्लेष्मल भागांतून काढून दाखविलेला गर्भ ( बाजूचें दृश्य ). ५ डोकें, धड आणि शेपटी तयार होत आहे. ६ त्याचें श्लेष्मल भागांतून बाहेर काढून दाखविलेलें दृश्य ( बाजूचें ). कल्ले दिसताहेत. ७ अंड्यांतून बाहेर निघण्यापूर्वी श्लेष्मल भागांतला बेडकाचा गोळा. ८ अंड्यांतून नुकताच बाहेर आलेला बेडूक ( पार्श्व दृश्य ). ९ कल्ले उगवले आहेत असा. १० उजव्या बाजूस कल्ल्यांवर एक चूण आहे, तरी डावी बाजू दिसत आहे. ११ असेच दोन्ही बाजूंचे कल्ले. कल्ल्यांतील पाणी बाहेर पडण्यासाठीं डाव्या बाजूस एक नळी दिसत आहे. १२ ही नळी यांत दिसते आहेच. मागचे पाय निघाले आहेत ( पार्श्व दृश्य ). १३ पुढले पाय निघाले आहेत. चूण व शेपटी नाहींशी झाली. बेडूक आतां पाण्याबाहेर पडत आहे. ]

शांति देईल. त्याचप्रमाणें अथर्ववेदांत बेडकाला तापाचा दाह शांत करण्याकरितां बोलाविलें आहे.

१. पाण्यांतील बेडूक— (फ्रॉग). हे विनशेपटाचे पाण्यांत राहणारे प्राणी आहेत. यांच्या कांहीं जातींचें मांस खातात. हे उन्हाळ्यांत संथ पाण्यांत व डबक्यामध्यें अंडीं घालतात. या अंड्यांभोंवतीं एक चिकट पदार्थ असतो. या अंड्यांपासून माशासारखे प्राणी उत्पन्न होतात. यांचीं फुप्फुसें प्रथम बाहेर असतात, पण पुढें ते मोठे झाले म्हणजे शरीरांत तयार झालेल्या फुप्फुसांमधून श्वासोच्छ्वास करतात. व बाहेरील फुप्फुसें आणि शेपटी हीं नाहींशीं होतात.

बेडूक लहान असतांना सर्वस्वीं पाण्यांतच असतात. तेथें ते किडे वगैरे खाऊन राहतात. यांच्या अंगावरील कातडें शरीराच्या आंतील भागास चिकटलेलें नसतें. अंगाचा रंग भोंवतालच्या सृष्टीशीं साम्य पावेल असा पालटत असतो. बेडकाला मान व शेपूट नसतें. डोळे मोठे व वटवटीत असतात. जबडा फारच रुंद असतो. जीम उलटी व ओठाच्या बाजूस चिकटलेली असते. ती बाहेर काढून तो किडे पकडतो. कानाच्या जागीं जें कातडें असतें त्यामुळें त्याला ऐकूं येतें. याचे पुढील पाय आंखूड व मागील लांब असतात. बोटें पातळ पडद्यांनीं जोडलेलीं असतात. बेडकी संथ पाण्यांत अंड्यांचे पुंजके घालते. पुढें या अंड्यांची वाढ होत जाते.

२. जमिनीवरचे बेडूक— (टोड). हे विनशेपटाचे पाण्यात व जमिनीवर राहणारे प्राणी आहेत. यांचें शरीर जड व मोठें असून त्यावर टेंगळें असतात. यांस दांत नसतात. आणि यांची जीम तोंडाच्या पुढील भागास चिकटलेली असते, परंतु तिचें मागील टोंक मोकळें असतें आणि तें पुढें आणतां येतें. मागच्या पायांचीं बोटें थोडींशीं कातड्यानें सांधलेलीं असतात. हे चमत्कारिकपणें उडया मारतात व बहुधा प्रसूतीच्या वेळेखेरीज पाण्यांत राहण्याचें टाळतात. हे किडयांवर वगैरे निर्वाह करतात. याला माणसाळवितां येतें. हिंवाळ्यांत हा एखाद्या बिळांत स्वस्थ पडून राहतो. याच्या जिमेवर एक प्रकारचा चिकट पदार्थ असतो व आपली जीम लांबवून हा आपलें भक्ष्य मिळवतो. हा मोठा जिवट प्राणी आहे. मादी अंडयाचे पुंजके न घालतां माळा घालते.

**बेथ्लेहेम**—हें लहान शहर पॅलेस्टाइनमध्यें आहे. जेरुसलेमपासून हें पांच मैलांवर आहे. डेव्हिड राजा व जॉब यांचें राहण्याचें ठिकाण येथें होतें व येथेंच येशू ख्रिस्ताचा जन्म झाला. ख्रिस्तजन्म-गुहा या ठिकाणाखेरीज करून इतर म्हणजे मॅजीची वेदी, युसेबियसचें थडगें, जेरोमीनें ज्या ठिकाणीं बायबलचें भाषांतर केलें ती गुहा, वगैरे अजून दाखविण्यांत येतात. येथें बरेच मठ, देवळें व शाळा आहेत.

**बेदाणा-मनुका वर्ग**—[ वर्ग-रोझासी, उपवर्ग-अमिग्डाली प्रूनस. (इं.) प्लम ]. हीं एक झाडांची जाति आहे. हीं झुडपासारखीं लहान असतात. यांस एकाआड एक पानें येतात. यांचे अनेक प्रकार आहेत. हीं मूळ आशिया मायनरमधून प्रसार पावलीं. हीं फळें ओलीं, सुकविलेलीं किंवा मुरवून, याप्रमाणें अनेक प्रकारांनीं खाण्याच्या कामांत उपयोगांत आणतात. यांतील लागवड करण्यास सुलभ जात म्हटली म्हणजे पी. डामासेना ऊर्फ डॅमसन ही होय. याचें लांकूड कठिण व घट्ट असून त्यांत लालसर शिरा असतात. यास चांगली तकाकी आणतां येते. याचा उपयोग पेट्या वगैरे करण्याच्या कामीं व कांतकामांत होतो. याची एक रानटी जात आहे तिचीं फळें लहान, वाटोळीं, निळसर काळीं व अतिशय आंबट असतात.

कूरँट—कॉरिंथ या ग्रीक शहराच्या नांवावरून कूरँट हें फळांना नांव पडलें. याच्या दोन जाती आहेत:—

(१) भूमध्यसमुद्राच्या पूर्व भागांतून (लिव्हँट) या जातीचीं वाळलेलीं फळें बाहेर पाठविण्यांत येतात. याचें झाड नाजुक असून पीक अनिश्चित असतें. याच्या लागवडीस भांडवल फार लागतें.

(२) [ वर्ग-ग्रोस्सुलारिआसी ]. या झुडुपांची फळांकरितां बगीच्यांतून लागवड करतां येते. यांचें फळ तांबडें असतें. हीं दक्षिण युरोप, आशिया व उत्तर अमेरिका या देशांत होतात. याचीच एक पांढरी जात आहे. तीं फळें जेवणानंतर मुखशुद्धीकरितां खातात व त्यांची दारू तयार करतात. काळ्या मनुका हाहि एक निराळा प्रकार आहे. ह्याच्या कांहीं जाती शोभेकरितां लावण्यांत येतात. द्राक्षें पाहा.

**बेदुइन**—अरब लोकांच्या एका पोटजातीस हें नांव आहे. बेदुइन लोक पशुपालनजीवी, भटकणारे व उघडया हवेंत राहणारे आहेत. त्यांची लो. सं. पंधरा लक्षांपेक्षां जास्त नाहीं. यांच्यामध्यें बहुपतित्वाची अथवा बहुपत्नीत्वाची चाल आढळत नाहीं. बेदुइन लोक खुजट व काळे असून त्यांचे केंस काळे व जाड, आणि डोळे काळे व लांबट असतात. भाला फेंकण्यांत ते फार निष्णात आहेत. अरब लोक पाहा.

**बेन, अलेक्झांडर** ( १८१८–१९०३ )— एक स्कॉटिश तत्त्ववेत्ता व शिक्षणशास्त्रज्ञ. कॉलेजचें शिक्षण घेऊन ग्लासगो युनिव्हर्सिटींत तो सृष्टिशास्त्र व गणित या विषयांचा प्रोफेसर झाला. १८५५ सालीं 'इंद्रियें आणि बुद्धि' आणि १८५९ सालीं 'विकार आणि इच्छा' हे त्याचे ग्रंथ प्रसिद्ध झाले. १८६० सालापासून ॲबर्डीन युनिव्हर्सिटींत इंग्रजी भाषा व तर्कशास्त्र

या विषयांचा तो वीस वर्षे प्रोफेसर होता. त्या अवधींत त्यानें विद्यार्थ्यांकरितां व्याकरण, वक्तृत्व, स्वभावविज्ञान, मानसशास्त्र व नीतिशास्त्र, तर्कशास्त्र, मस्तकसामुद्रिक, इत्यादि विषयांचीं क्रमिक पुस्तकें तयार केलीं व या कामगिरीबद्दल एडिन्बर्ग युनिव्हर्सिटीनें त्याला 'डॉक्टर'ची पदवी दिली.

**बेनी प्रवीन** (सु. १८००)—एक हिंदी कवि. लखनौच्या गाजीउद्दीन हैदराचा दिवाण दयाकृष्ण कायस्थाचा पुत्र नवलकृष्ण ऊर्फ लालनजी याच्या पदरीं हा होता. पुढें नानाराव राजाच्या पदरीं असतांना यानें 'नानारावप्रकाश' हा ग्रंथ व कांहीं कविता लिहिल्या. नवरसतरंग व शृंगारभूषण हे ग्रंथहि याचेच होत. याचे हे ग्रंथ अप्रकाशितच राहिले. बंदीजाननें याच्या अपूर्व वादकौशल्यामुळें यास 'प्रवीण' ही पदवी दिली. अयू येथें रोगानें पछाडल्यामुळें हा मरण पावला.

**बेने इस्राएल**—हें नांव मुंबई इलाख्यांत राहणाऱ्या ज्यू लोकांना आहे. यांची वस्ती सुमारें दहा हजार आहे. त्यांच्या हिंदुस्थानांतील आगमनाची एक दंतकथा अशी आहे कीं, प्राचीन काळीं एका फुटक्या जहाजांतील सात पुरुष व सात बायका हिंदुस्थानच्या किनाऱ्यावरील मुंबई बेटाच्या दक्षिणेस सुमारें तीन मैलांवर जमिनीस लागल्या. त्यांच्याबरोबर इतर मंडळींचीं प्रेतें किनाऱ्यावर लागलीं. वांचलेल्या ज्यू स्त्रीपुरुषांची पुढें प्रजा वाढून त्यांनीं उत्तर कोंकणांतील निरनिराळ्या गांवीं वस्ती केली. या ठिकाणीं ते मुख्यत्वें तेल–घाणे चालवून तिळाचें तेल, पेंड, वगैरे जिन्नस विकण्याचा धंदा करीत. ते शनिवार हा धार्मिक विश्रांतीचा दिवस पाळून घाणे बंद ठेवीत. त्यावरून त्यांना 'शनिवार तेली' असें म्हणत. बेने इस्राएलचे पूर्वज उपाध्याय वर्गापैकीं होते असें म्हणतात.

प्राचीन काळीं ईजिप्त, अरबस्तान, इराण, वगैरे अनेक देशांतील बंदरांचा मुंबईनजीकच्या चौल बंदराशीं व्यापारी संबंध फार वर्षें होता. या बंदराचा उल्लेख चेमूल, सिमुल्ला, तिमौल (भूगोलशास्त्रज्ञ टॉलेमी स. १५०), चेमुल्ला (बौद्ध), चिमोलो (चिनी), सैमूर व जैमूर (अरबी लेखक), वगैरे अनेक नांवांनीं प्राचीन परकीयांनीं केलेला आढळतो. यांचेच जे बांधव मलबार किनाऱ्यावर वसाहत करून राहिलेले आहेत, त्यांत काळे व गोरे असे भेद आहेत. बेने इस्राएल ही जात चांगली देखणी असून त्यांनीं हिंदु लोकांच्या चालीरीती व पोशाख उचलला आहे. मराठी हीच त्यांची मातृभाषा बनली आहे. बेने इस्राएल लोकांनीं आपली मूळ हिब्रू नांवें थोडा फेरफार करून हिंदु बनविलीं आहेत. खेडेगांवांत तेलाच्या धंद्याशिवाय अलीकडे हे लोक शेतकी, सुतारकी, पाथरवट काम, वगैरे धंदे करतात. ईस्ट इंडिया कंपनीच्या सैन्यांतहि शिपाईगिरीच्या नोकऱ्या करून स्वशौर्यानें वरच्या हुद्यापर्यंत चढलेले बरेच इसम आढळतात. यांची नीतिमत्ता चांगली असून आदर व आतिथ्य हे गुण त्यांच्यांत विशेष आहेत. या जातीच्या बायका शिक्षण घेऊन शिक्षकिणी व नर्स झाल्या आहेत. सर्वांत जुनें मंदिर मुंबई येथें असून त्यावर १७९६ हा सन खोदलेला आहे. अपत्यजन्म, विवाह, मृत्यु, अंगावर येणाऱ्या देवी, वगैरे बाबतींतील कित्येक हिंदूंचे धार्मिक विधी खेड्यांतील बेने इस्राएल लोकांनीं–विशेषतः बायकांनीं– स्वीकारले आहेत. या जातीच्या अंतर्गत व्यवस्थेंत मुकादम (व्यवस्थापक) व काझी (न्यायाधीश) असे दोन अधिकारी असतात. सुंता करणें, शनिवार शुभदिन पाळणें, ज्यू लोकांतले उपवास व सण करणें, वगैरे धार्मिक बाबी आहेत. सणांमध्यें दारफळणीचा सण, वगैरे मुख्य असून कांहीं सण तर हिंदूंचे स्वीकारलेले आहेत.

वाङ्मय—हे लोक दोन हजार वर्षें हिंदुस्थानांत आहेत. पण यांचें जुनें वाङ्मय मुळींच नाहीं. १९ व्या शतकांत बरेच म्हणजे सुमारें २०० ग्रंथ प्रसिद्ध झाले. अलीकडील लेखकांत एस्. एस्. मांजगांवकर, एस्. एस्. आष्टमकर, बी. एस्. आष्टमकर, आय्. एस्. आवासकर, एस्. ए. भास्तेकर, ए. जे. दिवेकर, एच्. आय्. गलसुलकर, आय्. एस्. घोसाळकर, एच्. एस्. किहिमकर, डी. एस्. खरीलकर, डॉ. आर्. कोरलेकर, जे. डी. पेणकर, जे. इ. राजपूरकर, ई. जे. तळकर, ई. एस्. वालवटकर, वगैरे लेखक असून धर्मविधी, गीतें, चरित्रें, नाटकें, वगैरे प्रकारचीं पुस्तकें त्यांनीं लिहिलीं आहेत. 'स्वदेशमित्र' हें वृत्तपत्र, इस्रायलाश्रम, प्रासंगिक विचार, वगैरे मासिकें निघत असत. एक सांप्रदायिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे बेने इस्राएल लोकांनीं हिंदूंतील कीर्तन हा धर्मोपदेशाचा प्रकार उचलला असून इस्राएल धर्मांतील अनेक पूज्य व्यक्तींवर कविताबद्ध कीर्तनें पुष्कळांनीं तयार केलीं आहेत. नाटक कंपन्या काढून स्वतःचीं नाटकें या समाजानें रंगभूमीवर आणलीं आहेत.

**बेनेट, अर्नॉल्ड** (१८६७–१९३१)—एक ब्रिटिश ग्रंथकार व वृत्तपत्रसंपादक. हा ज्या गांवीं जन्मला व वाढला त्या ठिकाणीं मातीचीं भांडीं करण्याचे कारखाने होते. त्यातील आयुष्यक्रमाचा बेनेटच्या मनावर बराच परिणाम होऊन त्यांतील प्रसंग त्यानें आपल्या लेखनांत चित्रित केले आहेत. यानें कांहीं उत्कृष्ट कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. त्यांपैकीं 'ओल्ड वाइव्हज् टेल' (जुन्या बायकांची गोष्ट) व 'हिल्डा लेस वेज' या प्रसिद्ध आहेत. तसेंच यानें कांहीं नाटकेंहि लिहिलीं आहेत. त्यांपैकीं 'मैलांचे दगड' (माइल्स स्टोन्स), 'महत् साहस' (ग्रेट ॲडव्हेंचर), आणि 'मि. प्रोह्रॅक' हीं प्रसिद्ध आहेत.

**बेल, अँन्ड्र्यू** ( १७५३–१८३२ )—एक ब्रिटिश शिक्षणशास्त्रज्ञ, आणि मद्रासशिक्षणपद्धतीचा जनक. त्यानें मद्रास येथें 'मेल ऑर्फन असायलम' ( अनाथ बालकाश्रम ) ही संस्था स्थापली, परंतु तेथें शिकवण्याकरितां लायक शिक्षक न मिळाल्यामुळें त्यानें तेथील विद्यार्थ्यांमधील कांहीं हुशार विद्यार्थ्यांनाच इतर विद्यार्थ्यांना शिकवण्याचें काम सांगितलें; आणि याप्रमाणें विद्यार्थ्यांनींच आपसांत एकमेकांना शिकवण्याची पद्धति सुरू केली. हिंदुस्थानांतून ब्रिटनमध्यें परत आल्यावर त्यानें 'मॉनिटोरियल' ऊर्फ परस्परविद्यार्थिशिक्षणपद्धति या विषयावरचा आपला निबंध प्रसिद्ध केला. त्याची ही शिक्षणपद्धति बारातेरा हजार राष्ट्रीय शाळांत चालू असून त्या पद्धतीनें सुमारें दहा लाख इंग्रज मुलें शिक्षण घेत आहेत.

**बेल, अलेक्झांडर ग्रॅहॅम** ( १८४७–१९२२ )—एक ब्रिटिश शास्त्रसंशोधक. जन्म स्कॉटलंड देशांतील एडिंबर्ग शहरीं झाला. लंडन आणि एडिंबर्ग येथील विश्वविद्यालयांत याचें शिक्षण झालें. ध्वनिशास्त्रावर त्याची प्रीति आनुवंशिक होती. बोस्टन येथील विश्वविद्यालयांत तो १८७२ सालीं प्रोफेसर झाला. स. १८८६ सालीं त्यानें विद्युत्प्रवाहाच्या योगानें ध्वनि वाहून नेणारें एक यंत्र तयार केलें. याच यंत्रात सुधारणा होऊन सध्यांचें टेलिफोन यंत्र तयार झालें आहे. प्रकाशध्वनिवाहक यंत्रहि यानेंच तयार केलें आहे. यानें फोनोग्राफचाहि शोध लावला. आकाशोड्डाणासंबंधानें यानें कांहीं प्रयत्न केले आहेत. मानवजातींत भिन्न भिन्न प्रकारचे चेहिरे कसे उत्पन्न होतात याविषयीं यानें एक पुस्तक लिहिलें आहे.

**बेल, अलेक्झांडर मेलव्हिल** ( १८१९–१९०५ )—एक अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ. तो दृश्यभाषेचा आद्य संशोधक होय. यानें मनुष्य आपल्या मुखाच्या द्वारें जे अनेक निरनिराळे उच्चार करतो, त्या सर्व उच्चारांकरितां ज्या निरनिराळ्या मुखांतील उच्चारस्थानांपासून ते भिन्न भिन्न उच्चार होतात त्या त्या स्थानांस अनुसरून भिन्न भिन्न वर्णचिन्हें बनविलीं. या वर्णचिन्हपद्धतीचा उपयोग मुक्या व बहिऱ्या लोकांस बोलण्यास शिकवण्याच्या कामीं करण्यात येतो. त्यानें कांहीं महत्त्वाचीं पुस्तकें ( उदा., 'इंग्लिश व्हिजिबल स्पीच अँड इट्स टोपोग्राफी ) लिहिलीं आहेत.

**बेल, सर चार्लस** ( १७७४–१८४२ )—एक स्कॉटिश शारीरशास्त्रज्ञ व शस्त्रक्रियाविशारद. १८१४ सालीं त्याला मिडल सेक्स हॉस्पिटलमध्यें सर्जन नेमण्यांत आलें आणि १८२१ सालीं त्यानें रॉयल सोसायटीकडे एक निबंध लिहून पाठविला. त्या निबंधांत त्यानें शारीरशास्त्रविषयक महत्त्वाची माहिती दिली असून शिवाय त्यानें लावलेला महत्त्वाचा शोध वर्णन केला आहे. तो शोध म्हणजे ज्ञानवाहक मज्जातंतू ( नर्व्हफिलॅमेन्टल ऑफ सेन्सेशन ) हे कार्यप्रवर्तक मज्जातंतूहून ( नर्व्हफिलॅमेन्टस् ऑफ मोशन ) पृथक् असतात हा होय. त्याला १८२४ सालीं लंडन कॉलेज ऑफ सर्जन्स या संस्थेंत शारीरशास्त्र आणि शस्त्रक्रिया यांचा प्रोफेसर नेमण्यांत आलें आणि १८३६ सालीं एडिन्बर्ग युनिव्हर्सिटींत शस्त्रक्रिया ( सर्जरी ) या विषयाचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. त्यानें शारीरशास्त्र व शस्त्रक्रिया या विषयांवर डॉक्टरीचा धंदा करणारांना उपयुक्त असे ग्रंथ लिहिले आहेत.

**बेल, हेन्री** ( १७६७–१८३० )—एक स्कॉटिश एंजिनिअर व आगबोटीचा संशोधक. त्यानें युरोपांत वाफेच्या एंजिनानें जहाजें चालवण्याची योजना प्रथम यशस्वीपणें अमलांत आणली. १७९८ सालीं त्यानें वाफेनें चालणाऱ्या आगबोटी तयार करण्याकडे विशेष लक्ष दिलें. १८१२ सालीं बेलच्या देखरेखीखालीं 'कॉमेट' नांवाची वाफेच्या एंजिनानें चालणारी ३० टनी आगबोट बांधण्यांत आली, ती आगबोट बेलनें स्वतः तयार केलेल्या तीन अश्वशक्तींच्या एंजिनानें चालत असे. या आगबोटीची वाहतूक प्रथम ग्लासगो ते ते ग्रीनॉक या दोन बंदरांमध्यें सुरू झाली. ती १८२० सालापर्यंत चालू होती. सदर सालीं ही आगबोट फुटून निकामी झाली.

**बेलग्रेड**—( नांवाचा अर्थ श्वेतदुर्ग असा आहे ). ही युगोस्लाव्हियाची व जुन्या सर्व्हियाची राजधानी आहे. लोकसंख्या २,६६,८४०. पूर्वी या शहराचें जुनें शहर, रशियन शहर व तुर्की शहर असे तीन भाग होते. येथें दारू गाळणें, लोखंड ओतणें, कापड, बूट, कमावलेलें कातडें, सिगारेट, आगपेट्या, मातीचीं भांडीं, जोगवलेलें मांस व मिठाई वगैरे तयार करणें, हे मुख्य उद्योगधंदे आहेत. येथें १८३८ सालीं स्थापन झालेलें एक विश्वविद्यालय आहे. बेलग्रेडचें ७ व्या शतकापावेतों सिंजिदनम असें नांव होतें व रोमन लोकांचा तेथें अमल होता. ८ व्या शतकांत फ्रेंच, ९ व्या शतकांत बल्गेरियन, ११ व्या शतकांत ग्रीक, पुढें हंगेरियन, १६ व्या शतकांत तुर्क, १७ व्या शतकांत ऑस्ट्रियन, नंतर पुन्हां तुर्क याप्रमाणें अनेकांची सत्ता या शहरावर होती. पहिल्या महायुद्धांत याला महत्त्व होतें.

**बेलदार**—एक मजूर जात. यांची लो. सं. सुमारें दोन लाख आहे. बिहार, ओरिसा, संयुक्तप्रांत, वऱ्हाड व मध्यप्रांत यांतून व मुंबई इलाख्यांत ( चार हजारांपर्यंत ) हे लोक आढळतात. माती खणणें, दगड फोडणें, गवंडी काम, वगैरे बांधकामाकरितां लागणारीं कामें हे लोक करतात. हे वड्डराप्रमाणेंच आहेत किंवा वड्डरांना बेलदार असेंहि म्हणतात. वड्डर पाहा.

**बेलफास्ट**—उत्तर आयर्लंड. हें बंदर अल्स्टर परगण्याची राजधानी आहे. हल्लीं येथें अल्स्टरच्या स्वतंत्र पार्लमेंटची सभा भरत असते. लो. सं. सुमारें ४ लाख. हें आयर्लंडमधील एक मोठें व्यापारी व औद्योगिक शहर असून तागाच्या कापडाच्या व्यापाराचें केंद्रस्थान आहे. येथें सुती कापडाचे व मोठमोठीं जहाजें बांधण्याचे प्रचंड कारखाने आहेत. आलिंपिया, टिटॅनिक, वगैरे प्रचंड बोटी येथेंच बांधल्या गेल्या. येथें औद्योगिक शिक्षणाच्याहि मोठाल्या शाळा आहेत. येथें एक विश्वविद्यालय आहे. येथील टाउन-हॉल ही इमारत फारच प्रेक्षणीय असून इतकी भपकेदार इमारत ग्रेटब्रिटनमध्यें इतर कोठेंहि पाहण्यास मिळत नाहीं.

**बेलाडोना**—[वर्ग-सोलॅनेसी. जात-ॲट्रोपा बेलाडोना]. हें झाड दक्षिण युरोप व पश्चिम आशिया यांत होतें. या झाडापासून हायोसायामिन ॲट्रोपिन आणि इतर विषारी क्षार निघतात. याच्या मुळांपासून व पानांपासून निरनिराळीं औषधें तयार करण्यांत येऊन तीं वर लावण्याकरितां किंवा पोटांत घेण्याकरितां वापरतात. तसेंच डोळ्यांतील बुबुळ मोठें होण्याकरितां ॲट्रोपिन घालण्यांत येतें.

**बेलापूर**—(श्रीरामपूर). मुंबई इलाखा, अहमदनगर जिल्हा, राहुरी तालुक्यांतील एक गांव. हें प्रवरातीरीं वसलें आहे. दौंड–मनमाड रेल्वेवरील राहुरीच्या उत्तरेस १५ मैलांवर असून लोकसंख्या सुमारें ७,००० आहे. येथें भानुदासबोवा म्हणून प्रसिद्ध साधु होऊन गेला. या ठिकाणीं बेलापूर शुगर कंपनी या कारखान्याची मुख्य कचेरी आहे. महाराष्ट्र शुगर मिल्स हा साखरेचा कारखाना स्टेशनापासून दोन मैलांवर आहे. याचें नांव नुकतेंच श्रीरामपूर असें ठेवण्यांत आलें आहे. जुनें गांव लहान आहे. तेथें एक जुना महानुभावी मठ आहे. एक हायस्कूल व कांहीं प्राथमिक शाळा चालतात. साखरेच्या कारखान्यामुळें स्टेशनाजवळची वस्ती फार वाढली आहे.

**बेलापूरचा किल्ला**—मुंबई, कुलाबा जिल्हा. पनवेलच्या पश्चिमेस ५ मैलांवर पनवेलच्या खाडीच्या मुखाशीं बेलापूर नांवाच्या एक मैल लांब व एक मैल रुंद अशा बेटावर हा किल्ला बांधलेला आहे. बेलापूरचें बंदर किल्ल्यापासून ५२ फूट लांबीवर असून त्याच्या रक्षणाकरितां तट घातलेला होता व त्यास दोन बुरूज होते. किल्ल्याची दक्षिणोत्तर लांबी ४०० फूट व पूर्व–पश्चिम रुंदी २०० फूट होती. १७३८ सालीं नारायण जोशी मुरूडकर यानें हा किल्ला घेतला. येथें पेशव्यांची शिबंदी असे. याला शहाबाद असेंहि नांव आहे. १८१७ मध्यें कॅप्टन चार्लस ग्रे यानें हा घेतला.

**बेली, जीन सिल्व्हेन** (१७३६–१७९३)—एक फ्रेंच ज्योतिषशास्त्रज्ञ व मुत्सद्दी. त्यानें ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला व तो ॲकेडमी ऑफ सायन्सेस या संस्थेंत प्रविष्ट झाला. त्यानें ज्योतिशास्त्रविषयक अनेक पुस्तकें लिहिलीं, त्या सर्वांत अधिक प्रसिद्ध पुस्तक 'हिस्टरी डी एल् आस्ट्रॉनमी' हें असून तें १७७५ व १७८७ च्या दरम्यान प्रसिद्ध झालें. पुढें १७८९ च्या फ्रेंच राज्यक्रान्तीमुळें तो सार्वजनिक कार्यांत शिरला व या सालींच त्याला नॅशनल असेंब्लीचा अध्यक्ष करण्यांत आलें. १७९१ च्या सुमारास त्याची लोकप्रियता कमी होत गेली व नंतर दोन वर्षांनीं राजपक्षाचा गुप्तकटवाला असल्याचा आरोप त्याच्यावर ठेवला जाऊन त्याचा वध करण्यांत आला.

**बेली, नॅथॅनिएल** (मृ. १७४२)—एक इंग्रज शब्दकोशकार. त्याचा कोश १७२१ सालीं प्रसिद्ध झाला; नंतर त्याच्या अनेक आवृत्ती निघाल्या. सुप्रसिद्ध डॉ. जॉनसनच्या कोशाला आधार ह्या कोशाचा घेतलेला होता म्हणतात.

**बेलीनी, जेकपो** (१४००–१४७१)—एक इटालियन चित्रकार. हा व त्याचे दोन मुलगे जेन्टाइल व गिओव्हनी हे व्हेनेशियन चित्रपद्धतीचे संस्थापक होत. जेकपो हा माणसांचीं चित्रें (पोर्ट्रेट) काढण्यांत प्रवीण होता, परंतु त्याचीं चित्रें फारच थोडीं उपलब्ध आहेत. त्याचा मुलगा जेन्टाइल (१४२७–१५०७) हा १४७९ सालीं दुसरा महंमद या खलिपानें व्हेनिस शहराकडे उत्कृष्ट चित्रकाराची मागणी केल्यावरून कॉन्स्टॅंटिनोपल येथें गेला. जेकपोचा दुसरा मुलगा गिओव्हनी (१४२८–१५१६) यानें तैलचित्रें लोकप्रिय करण्याच्या कामीं महत्त्वाचें कार्य केलें. आणि त्याचीं पुष्कळ उत्तम तैलचित्रें आज उपलब्ध आहेत. टिटीयन आणि जॉर्जाइन हे गिओव्हनीचे प्रमुख शिष्य होत.

**बेलीफ**—दिवाणी कोर्टांतला समन्स बजावणीचें काम करणारा कनिष्ठ प्रतीचा अधिकारी. इंग्लंडांत बेलीफांचे प्रकार पुष्कळ आहेत, आणि त्यांचीं कामेंहि निरनिराळ्या प्रकारचीं असतात. शेरीफाला राजाचा बेलीफ म्हणतात. परंतु सामान्यतः बेलीफ हा शेरीफच्या हाताखालचा नोकर असून त्याला समन्स किंवा वॉरंट बजावणें, जप्ती करणें, वगैरे कामें करावीं लागतात. हिंदुस्थानांत दिवाणी कोर्टांतील समन्सें, वॉरंटें बजावणें, जप्ती करणें, वगैरे बजावणीचीं कामें करणारांना बेलीफ म्हणतात.

**बेलूर**—म्हैसूर, हसन जिल्हा, बेलूर तालुका, एक गांव. पश्चिमेकडील डोंगराळ प्रदेशांतील जंगलांत कॉफीची लागवड करतात. नदीकांठीं तांदूळ पिकतो. पूर्वेकडे तंबाखू चांगला होतो.

इ. स. ११०० मध्यें होयसळ घराण्यांतील पहिल्या बल्लाळ राजानें ही राजधानी केली. याचा भाऊ बिट्टिग यानें (चन्नकेशव) विजय नारायणाचें देऊळ चोळांवरच्या विजयाचें स्मारक म्हणून बांधलें. पुढें येथील राजधानी हळेबीडला गेली. महंमद

तुघ्लकाच्या सेनापतीनें येथील देऊळ उध्वस्त केलें; पण विजयानगरच्या राजांनीं तें सुधारलें. विजयानगरच्या श्रीरंगरायानें १६४६–६६ या काळांत येथें आपली राजधानी ठेवल्यानें या स्थळाला पुन्हां महत्त्व आलें; पण तें लवकरच गेलेंहि.

येथील चन्नकेशवाचें देऊळ अप्रतिम शिल्पाचें म्हणून प्रसिद्ध आहे. गर्भगृह नक्षत्राकार असून पुढला मंडप अधिक चिन्हाप्रमाणें आहे. देवळांत अनेक लेख आहेत. नक्षीखेरीज कोणताहि लहानसा देखील भाग नाहीं. हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध शिल्पकामाच्या वास्तूंत बेलूर प्रामुख्यानें येतें.

**बेल्जिअम**—युरोपांतील एक राष्ट्र. नेदर्लंड, फ्रान्स व जर्मनी यांच्या सरहद्दींवर व उत्तर समुद्राकांठीं हा देश आहे. क्षे. फ. ११,७५५ चौरस मैल व लो. सं. ८३,८६,५५३. युरोपमध्यें अत्यंत दाट वस्ती ( दर चौ. मै. सु. ६७५ ) असलेला हा देश आहे. ब्रुसेल्स हें याच्या राजधानीचें ठिकाण आहे. या देशाचा आग्नेय भाग उद्योगधंदे व कारखाने यांचें क्षेत्र असून वाफेचीं इंजिनें, वाहनें, शस्त्रें, चिनीमातीचीं भांडीं, कांच, रसायनें, सिमेंट, वगैरे माल निघतो. देशांत कोळशाच्याहि खाणी आहेत. बाकीचा भाग बहुतेक शेतीखालीं आहे. परंतु बराच मोठा भाग जंगलांनीं व्याप्त आहे. कालवे ५० वर आहेत. युरोपांतील पहिली आगगाडी येथें सुरू झाली. बहुतेक लोक रोमन कॅथॉलिक आहेत. वलून म्हणजे फ्रेंच बोलणारे व फ्लेमिंग्ज म्हणजे फ्लेमिश भाषा बोलणारे, असे लोकांचे दोन भाग पाडले आहेत.

ख्रि. पू. ४ थ्या शतकांत आल्टिक आणि जर्मन लोक येथें होते. रोमन साम्राज्यांत हा भाग होता. कांहीं काळ बर्गंडीच्या ड्यूकांनीं व नंतर स्पेनच्या राजांनीं यावर राज्य केल्यावर १७१४ मध्यें हा देश ऑस्ट्रियाकडे गेला. १७९५ पासून तो पुन्हां फ्रेंचांकडे गेला व १८१४ मध्यें हॉलंडला जोडून नेदर्लंडच्या साम्राज्याचा एक भाग केला. पण देशामध्यें या सत्तांतरांचे परिणाम केव्हांहि सुखकर झाले नाहींत. अखेरीस १८३० मध्यें बेल्जिअमनें स्वतःचें राज्य स्थापन करून घेतलें. १९१४ च्या महायुद्धांत बेल्जिअम तटस्थ होता. परंतु जर्मनीनें या तटस्थतेचा भंग करून बेल्जिअमवर स्वारी केली व त्याच्या बऱ्याच मोठ्या भागाचा कबजा केला. युद्धानंतरच हा मुलूख परत मिळाला. सर्व राज्याधिकार राजा, व मंत्रिमंडळ पार्लमेंट यांच्या स्वाधीन आहेत. १९३४ मध्यें राजा अल्बर्ट हा एका गिर्यारोहणांत मरण पावला व त्याच्यामागें त्याचा पुत्र तिसरा लिओपोल्ड हा गादीवर बसला. दुसऱ्या महायुद्धांत १९४० सालीं हें राज्य जर्मनीनें घेतलें होतें. महायुद्धानंतर देशावर पुन्हां राजसत्ता पाहिजे कीं नको याबद्दल वादविवाद सुरू झाले व ते अद्यापि मिटले नाहींत. राजा लिओपोल्ड परत राज्यावर बसेल असें वाटत नाहीं.

घेंट, लीज, ब्रुसेल्स व लूव्हेन येथें विद्यापीठें आहेत. शेतकी शिकविणाऱ्या संस्था बऱ्याच आहेत. ॲन्टवर्प येथें ललित कलांचें चांगलें शिक्षण मिळतें. संगीत विद्यालयें अनेक आहेत. १९४२ सालीं २३२४ ग्रंथालयें असून त्यांत सु. ६५ लक्ष ग्रंथ होते.

बेल्जिअम वाङ्मय—सामान्यपणें या देशाचें वाङ्मय फ्लेमिश, वलून व फ्रेंच या तीन भाषांत विभागलें गेलें आहे. सन १८३० मध्यें बेल्जिअमचा नेदर्लंडपासून संबंध सुटला व तेव्हांपासून फ्लेमिश वाङ्मयास जास्त जोर आला. बेल्जियन ग्रंथकारांच्या अंगीं १८७०–८० पर्यंत प्रांताभिमान होता व त्याला अनुसरून ते ग्रंथनिष्पत्ति करीत. बेल्जियन–फ्रेंच वाङ्मयांत राष्ट्रीय दृष्टि थोडी असून पॅरिस किंवा फ्रेंच वाङ्मयाचीच छाप त्याच्यावर आढळून येते; हे ग्रंथकार फ्लेमिश जातीचे आहेत; *काल्पनिक व गूढ वर्णनें फ्रेंच धर्तीवर आणि सत्य व स्पष्ट वर्णनें* फ्लेमिश धर्तीवर करण्याची यांची रीत असे. परंतु सन १८८० नंतर हा मनू पालटत चालला. सन १८३० च्या पूर्वी कांहीं नामांकित ग्रंथकार होऊन गेले. ॲडॉल्फ मॅथ्यू याच्या लेखनांत बहुशः प्रेमविषयच प्रधान असे. ऑगस्ट क्लॅव्हॅरिओ ( १७८७ ) हा एक कवि होता. याच्या आनंदपर्यवसायी गोष्टींतून डच व फ्रेंच वाङ्मयाची छाया आढळते. स्मिट्स् याच्या ग्रंथांत देशभक्ति दृग्गोचर होते. बंडानंतर बेल्जियन वाङ्मयाची वाढ झपाट्यानें होऊं लागली. ॲड्रे व्हान हॅसेल्ट याच्या घराण्यांत तर कवी, ग्रंथकार, कारागीर, गायक, वादक, वगैरे लोक बरेच निपजले. चार्लस द कोस्टरच्या प्रणयी कादंबऱ्या हे त्या विषयांतील उत्तम ग्रंथ होत. पिरमेझ, क्लेसी, क्विनेट, बेकन, लॅवारे, डेल्मोटे, पोट्वीन, वगैरे कोणी कवी, कोणी नाटककार, तर कोणी ग्रंथकार या काळांत प्रख्यातीस आले ( १८००–८० ). डेल्मोटेनें बेल्जियन वाङ्मयाचा इतिहास चार भागांत लिहिला आहे व वेमलनें ( १८८० ) बेल्जिअम देशाचा इतिहास व बेल्जियन ज्ञानकोश रचला आहे. कोस्टरप्रमाणेंच रूइलेन्स ही कादंबरी-लेखिका प्रसिद्ध होती ( १८७८ ). परंतु या बहुतेक लिखाणांस परकीय वाङ्मयाचा आधार आहे; फक्त कोस्टर व पिरमझ हे स्वतंत्र प्रतिभावान् लेखक आहेत. त्यामुळें त्यांत कांहीं नावीन्य आढळत नाहीं. पण तें लेमॉनिएर याच्या काळापासून मात्र आढळतें. तो स्वतः एका अर्थानें अभिनव बेल्जिअमचा जनक होता. त्याच्या ग्रंथांत, त्याच्यानंतर वाङ्मयक्षेत्रांत ज्या ज्या सुधारणा किंवा बनाव बनून आले, त्यांचा उगम सांपडतो. मासिक पुस्तकांत 'ल ज्युने बेल्जिक' हें मासिक श्रेष्ठ दर्जाचें होतें. त्याचे लेखक वार्लोमॉन्ट–गिरौडसारखे विद्वान् होते. पिकार्ड ( हा उत्तम वकील होता ) या लेखकानें नूतन

लेखकांसाठीं लेखनकलेवर एक 'प्रो आर्ट' नांवाचा उत्कृष्ट ग्रंथ लिहिला आहे (१८८६). एकहौड या लेखकानें सन १९०० पर्यंत अनेक कादंबऱ्या लिहिल्या आहेत. त्यांत फ्लँडर्स शेतकऱ्यांचें व त्यांच्या चालीरीतींचें चित्र पाहावयास सांपडतें. अभिनव बेल्जिअमच्या तरुण लेखकांनीं १८७० पासून लेखनव्यवसायाला आरंभ केला. त्यांनीं 'मर्क्युरी द फ्रान्स' या प्रख्यात फ्रेंच नियतकालिकांत प्रथम लिहिण्यास आरंभ केला. बेल्जियन कवी बहुतेक प्राचीनसंस्कृतिप्रिय असतात व त्यांचें काव्यहि तिच्यावरच साधारणपणें आधारलेलें असतें. रॉडेन बाक (१८९८) यानें खेड्यांतील साधारण जनतेंत सर्व तऱ्हेचें चैतन्य उत्पन्न होईल अशी ग्रंथनिष्पत्ति केली. अर्वाचीन ग्रंथकारांत मॉरिस मॅटरलिंक याची योग्यता फार मोठी आहे. मनांतील उच्च भाव अथवा कल्पना उत्कृष्टपणें सामान्य लोकांच्या मनांवर बिंबवण्याचें काम याच्यासारखें दुसऱ्यास साधलें नाहीं (१८९७). इतिहास, पुराणवस्तुसंशोधन, भूगोल, गायन, पुरातत्त्व, वगैरे विषयांवर गेल्या ४०-५० वर्षांत कांहीं लेखकांनीं ग्रंथ लिहिले आहेत.

**बेल्बी, सर जॉर्ज थॉमस** (१८५०-१९२४)—एक स्कॉटिश रसायनशास्त्रज्ञ व एंजिनिअर. त्यानें १८९१ सालीं अल्कनीलिदा(अल्कलि स्यानाइड)चें कृत्रिम रीतीनें उत्पादन करण्याचा ग्रेट-ब्रिटनमधील पहिला कारखाना लीथ येथें काढला. धूम्रनिर्मूलन योजना आणि जळणाची काटकसर या दोन विषयांतला तो प्रमुख तज्ज्ञ मानला जात असे म्हणून त्याला १९१७ सालीं फ्युएल रिसर्च बोर्डाचा डायरेक्टर नेमण्यांत आलें. धातुकर्मविद्येंतहि त्यानें महत्त्वाचें कार्य केलें आहे. १९१६ सालीं त्याला नाइट ही पदवी देण्यांत आली. तो रॉयल सोसायटीचा फेलो होता आणि ग्लासगो येथील रॉयल टेक्निकल कॉलेजच्या डायरेक्टर बोर्डाचा अध्यक्ष होता.

**बेवारसी मिळकत**—'एस्चीट' या शब्दाचा कायद्यांत अर्थ असा आहे कीं, ज्या मिळकतीला त्या मिळकतीच्या मालकाच्या मृत्यूनंतर कायदेशीर वारस कोणीहि नाहीं, ती मिळकत सरकारी मालकीची म्हणून सरकारजमा होणें. इंग्लंडमध्यें नॉर्मन राजांची सत्ता सुरू झाल्यावर इंग्लंडची सर्व जमीन राजाच्या मालकीची आहे, असें कायदेशीर तत्त्व प्रस्थापित झालें. त्यामुळें बेवारसी माल पुन्हां सरकारच्या मालकीचा होतो, हें तत्त्व कायद्यानें मान्य केलें व अद्याप तेंच तत्त्व व कायदा इंग्लंडांत लागू असून बेवारसी इस्टेट राजाच्या मालकीची किंवा लँकॅस्टरच्या ड्यूकच्या मालकीची किंवा कॉर्नवॉलच्या ड्यूकच्या मालकीची होते. ब्रिटिश अमलांत हिंदुस्थानांतील कायद्यांनीं हेंच तत्त्व मान्य केलेलें आहे. परंतु मनुस्मृति आदि जुन्या हिंदु कायदेग्रंथांना हें तत्त्व मान्य नाहीं.

**बेसडाऊ, जॉन बर्नहार्ड** (१७२३-१७९०)— एक जर्मन शिक्षणशास्त्रज्ञ. १७७४ सालीं त्याला एका शिक्षणसंस्थेचा प्रमुख नेमण्यांत आलें व तेथें त्यानें आपल्या मताप्रमाणें शिक्षणविषयक अनेक प्रयोग करून पाहिले. या संस्थेंत कोठल्याहि धर्मपंथाचा पुरस्कार न करतां विद्यार्थ्यांच्या शारीरिक, बौद्धिक व नैतिक उन्नतीला पोषक अशा सर्व विषयांचें शिक्षण देण्यांत येत असे. या संस्थेंत तत्त्ववेत्ता लॉक व रूसो यांच्या मतानुसार लहान मुलांच्या नैसर्गिक इंद्रियशक्तींची पूर्ण वाढ करणें हा मुख्य उद्देश असे. शिक्षणशास्त्राच्या इतिहासांत बेसडाऊचें नांव चिरस्मरणीय झालें आहे. त्यानें आपल्या संस्थेला नांव फिलॅन्थ्रोपिनम असें दिलें होतें.

**बेसबॉल**—हा अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचा एक राष्ट्रीय खेळ आहे. इंग्लंडमध्यें क्रिकेट या खेळास जितकें महत्त्व आहे तितकेंच या खेळास अमेरिकेमध्यें आहे. या खेळांत प्रत्येक बाजूस नऊ गडी असतात. याकरितां शंकरपाळ्याच्या आकाराची चौकोनी जमीन आंखण्यांत येते. या चौकोनाची प्रत्येक बाजू ९० फूट लांबीची असते व त्या चौकोनाचे कोन यांस पाया म्हणतात. यांतील एक बाजू क्षेत्ररक्षणाचें काम करते व दुसऱ्या बाजूंतील एक मनुष्य फळी घेऊन खेळावयास येतो. क्षेत्ररक्षकांनीं आपापल्या जागा घेतल्यावर गोलंदाज (पीचर) क्षेत्राच्या मध्याजवळ उभा राहून फलंदाजाकडे एक चेंडू फेंकतो व तो घरच्या पायामध्यें उभा राहून विशिष्ट खुणा केलेल्या जागेच्या आंतून तो चेंडू क्षेत्ररक्षकांच्या पलीकडे व क्षेत्राबाहेर शक्य तितक्या लांब टोलावण्याचा प्रयत्न करतो. अशा रीतीनें चेंडूस टोला मारल्यावर प्रत्येक पायांतून तो एक फेरी करतो. या फेरीस धांव असें म्हणतात. चारहि पायांतून फेरी न झाल्यास कोणत्या तरी एका पायाच्या रिंगणांत तो उभा राहतो व नंतर दुसरा फलंदाज त्याची जागा घेतो. फलंदाजानें टोला दिलेला चेंडू वरच्यावर क्षेत्ररक्षकानें झेलल्यास तो फलंदाज बाद होतो. तसेंच तो पळत असतांना त्याला त्याच्या अंगास चेंडू लागला तरीहि तो बाद होतो. आणखीहि कांहीं बाद होण्याच्या अटी आहेत. एका बाजूचे तीन खेळाडू बाद झाल्यानंतर दुसऱ्या बाजूचे गडी खेळावयास येतात. अशा तऱ्हेनें नऊ वेळां पाळी झाली म्हणजे खेळ पुरा होतो व ज्या पक्षानें अधिक धांवा काढल्या असतील तो पक्ष जिंकतो. या खेळांतील फळी २॥ इंचांपेक्षां अधिक रुंद असतां कामा नये व तिची लांबी ४२ इंचांपेक्षां अधिक चालत नाहीं. चेंडूचा घेर सुमारें नऊ इंच असतो आणि त्याचें वजन ५ ते ५॥ औंस असतें. हा खेळ

फारसा जुना नाहीं. यास विशेष स्वरूप १८४५ नंतर आल्याचें दिसतें.

**बेसल**—हें स्वित्झर्लंडमध्यें एक कँटन (संस्थान) व शहर आहे. या संस्थानचें क्षे. फ. १७७ चौ. मैल आणि लो. सं. २,४७,५७१ आहे. हें संस्थान र्‍हाइन नदीच्या कांठीं आहे. त्यामुळें सर्व जमिनींत लागवड असून येथें द्राक्षें व इतर फळफळावळ होते. बेसल हें शहर र्‍हाइन नदीच्या दोन्ही कांठांवर वसलेलें आहे. येथील मुख्य धंदे रेशमी फिती, निरानिराळ्या धातूंचे जिन्नस, चामड्याचे कारखाने, कागद, ॲनीलीनचे रंग व इतर अनेक रासायनिक द्रव्यें आणि दारू हे आहेत. फ्रेंच रेल्वे व जर्मन रेल्वे यांच्या दरम्यानची वाहतूक या शहरांतून होत असल्यामुळें बेसल शहर हें व्यापाराचें मोठें केंद्र बनलें आहे. मिशनरी चळवळींचें हें केंद्र आहे.

**बेसारेबिया**—रशिया, युक्रेनियन सोव्हिएट लोकराज्यांतील एक प्रांत. क्षे. फ. १७,३२५ चौ. मैल. लो. सं. सुमारें तीन लक्ष असून त्यांत मुख्य जाती वालाचियन, जिप्सी व तातार या आहेत. हा पूर्वी रुमानियाचा एक स्वतंत्र प्रांत होता. या प्रांताचा उत्तर भाग डोंगराळ असून दक्षिण भाग सपाट व खोलगट आहे. येथें धान्य पुष्कळ पिकतें आणि गवताचीं कुरणें उत्तम आहेत. या प्रांताची राजधानी किशीनेव्ह. इ. स. १८१२ पूर्वी हा प्रांत तुर्की साम्राज्यांत होता. १८१२ ते १९१८ पर्यंत रशियाकडे होता. नंतर बेसारेबियांतील रहिवाशांच्या स्पष्ट इच्छेमुळें हा प्रांत रशियांतून काढून रुमानियांत सामील करण्यांत आला (१९१८); पण दुसरें महायुद्ध सुरू झालें तेव्हां रशियानें हा परत देण्याची सक्ती केली. येथें मुख्य कारखाने आहेत. ते म्हणजे चामडीं, साबण, मेणबत्त्या, तंबाखू व दारू यांचे होत. येथून परदेशीं पुढील माल जातो—धान्य, लोंकर आणि इमारती लांकूड.

**बेसिल, (सेंट) दि ग्रेट** (३२९–३७९)—हा एक ग्रीक धर्माचार्य होऊन गेला. त्यानें ख्रिस्ती धर्मातील धर्मोपदेशक (क्लर्जी) आणि मठवासी यांच्यामध्यें कडक शिस्त व सुव्यवस्था राहण्याकरितां फार प्रयत्न केले, त्यामुळें ग्रीक चर्च या धर्मपंथांत सेंट बेसिलला फार मोठा मान देण्यांत येतो व ता. १ जानेवारी रोजीं त्याच्या नांवाचा स्मारकोत्सव करण्यांत येतो. सेंट बेसिलनें आज्ञापालन, ब्रह्मचर्य, आणि निर्धनता या तीन व्रतांची प्रतिज्ञा घेऊन ती पाळण्याकरितां नियम तयार केले, ते ख्रिस्ती धर्माच्या सर्व पंथांत मान्यता पावले आहेत. मात्र सेंट बेसिल हा पूर्व पंथाचा आचार्य मानण्यांत येतो आणि सेंट बेनेडिक्ट हा पश्चिम पंथाचा पॅट्रीआर्क मानण्यांत येतो.

**बेसेमेर, सर हेन्री** (१८१३–१८९८)—एक इंग्रज एंजिनिअर आणि संशोधक. त्याची अत्यंत महत्त्वाची कामगिरी म्हणजे भट्टींतून काढलेल्या अशुद्ध लोखंडापासून त्वरित पोलाद बनवण्याची क्रिया होय. या पोलादाला त्याचेंच नांव आहे. हें पोलाद फार भक्कम व दमदार असून आगगाडीचे रूळ व इतर असेच जिन्नस यांना वापरतात. ब्राँझची पूड, ज्याच्या बनावट नकला होणार नाहींत असे शिक्के, टाकाऊ मालापासून शिसपेन्सिली, इ. चे त्याचे शोध उपयुक्त आहेत. क्रिमियन युद्धांत नव्या तोफा करण्याची युक्ति त्यानें काढली, पण त्याच्या देशाला ती न पटल्यामुळें तो फ्रान्सला गेला व तेथें प्रयोग करून श्रेष्ठ प्रतीचें पोलाद तयार केलें. १८७९ सालीं त्याला 'नाइट' चा मान मिळाला.

**बेसेल, फ्रेडरिक विल्यम** (१७८४–१८४६)— एक जर्मन ज्योतिषशास्त्रज्ञ. त्याला १८१० सालीं कोनिंग्जबर्ग येथील वेधशाळेचा डायरेक्टर नेमण्यांत आलें. त्यानें १८२४ पासून १८३३ पर्यंत आकाशांतील उ. १५° ते द. १५° पर्यंतच्या भागाचे ७५०११ वेध घेतले. गणितशास्त्रांत 'बेसेल्स फंक्शन्स' हा भाग त्याच्या नांवानें प्रसिद्धच आहे. त्याचे कांहीं ज्योतिषविषयक ग्रंथ आहेत. त्याची व्यावहारिकदृष्ट्या सर्वांत महत्त्वाची कामगिरी ६१ राजहंस (सिग्नी) ताऱ्याचें लंबन (पॅरॅलॅक्स) ठरविणें ही होय.

**बेस्ता**—एक तेलगू जात. यांची एकंदर लो. सं. सु. दोन लाख आहे. पैकीं म्हैसूर संस्थानांतच १॥ लाख आहेत. यांचे मुख्य धंदे मासे मारणें, चुनखडी भाजणें, पालखी वाहणें व शेती करणें हे होत. यांच्यांत घटस्फोट करण्याची चाल आहे. या जातींत शैव व वैष्णव असे दोन्ही पंथांचे लोक आहेत. यांच्या भिक्षुकांतहि दोन भेद आहेत; पहिला शैव जोगी व दुसरा वैष्णव दासरी हा होय.

**बेहडा**—(सं. बिभीतक). हिंदुस्थान, ब्रह्मदेश, व सिलोन या भागांमध्यें ३,००० फुटांखालच्या जंगलांत हें झाड आढळतें. सिंध व राजपुताना या रुक्ष भागांत मात्र आढळत नाहीं. याचीं पानें दरवर्षी गळतात. या झाडाला डिंक पुष्कळ येतो. परंतु तो पाण्यांत विरघळत नाहीं. हलक्या प्रतीच्या रंगाकरितां व कातडीं कमाविण्याकरितां याच्या फळांचा उपयोग करतात; व त्यांची निर्गतहि बरीच होते. याचा मगज खातात; परंतु फार खाल्ल्यास गुंगी येते. याच्या फळाची साल औषधी आहे. त्रिफळ्यांत हा घालतात. खोकल्यावर साल तोंडांत धरतात. बेहड्याचा मुरावळा खोकल्यासाठीं घेतात.

**बेहरिंग**—१. सामुद्रधुनी—ही सामुद्रधुनी आशिया व अमेरिका या दोन खंडांना विभागणारी असून, तिची किमान

रुंदी सुमारें ३६ मैल आहे. हिंवाळ्यांत येथें बर्फ गोठलेलें असतें आणि बहुतेक वर्षभर हा भाग धुक्यानें आच्छादित असतो.

२. समुद्र—यालाच कामच्छाटकाचा समुद्र असेंहि म्हणतात. हा उत्तर पॅसिफिक महासागराचा एक भाग आहे.

३. बेट—हें कामच्छाटकाच्या पूर्व किनाऱ्यानजीक आहे व तें निर्जन आहे. तेथें मनुष्यवस्ती नाहीं.

**बेहरिंग (बेरिंग), व्हिटस** (१६८०-१७४१)—एक डॅनिश जलपर्यटनकार. त्यानें १७२८ सालीं व नंतर कामच्छाटका, ओखोटस्क, आणि सायबेरीचा उत्तर भाग यांच्या किनाऱ्यांचें संशोधन केलें. १७४१ सालीं तो अमेरिकेहून परत येत असतांना बेहरिंग बेटानजीक त्याचें जहाज फुटलें व तेथेंच तो मरण पावला.

**बेहरीन बेटें**—हा द्वीपसमूह इराणी आखातांत असून १८६७ पासून हीं बेटें ब्रिटिश संरक्षणाखालीं आहेत. यांपैकीं मुख्य बेहरीन बेट सु. २७ मैल लांब व १० मैल रुंद आहे. या बेटांतला प्रदेश बहुतेक सपाट, पण फारसा सुपीक नाहीं. कालवे बांधून शेतीला पाणी पुरवण्याची योजना अधिकाधिक होत आहे. येथील मुख्य शहर मानामा. त्याची लो. सं. ३५,००० आहे. बेहरीनपेक्षां लहान बेट मोहरेक. त्यांत मोठें शहर मोहरेक हेंच असून त्याची लो. सं. २५,००० आहे. मोत्यांकरितां चालणाऱ्या मच्छीमारीच्या धंद्यामुळें या बेटांना विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. येथून निर्यात होणारा मुख्य माल मोतीं, तांदूळ, खजूर व जहाजांच्या शिडांचें कापड हा होय. या सर्व बेटांचें मिळून क्षे. फ. २५० चौ. मैल व लो. सं. १,१०,००० आहे.

**बेहिस्तन**—बिस्तन. इराणमध्यें हें एक कर्खा नदीला मिळणाऱ्या समास-आब नांवाच्या नदीच्या उजव्या तीरावर, १७०० फूट उंचीच्या एका उभ्या खडकाच्या पायथ्याशीं वसलेलें खेडें आहे. या नांवाचें जुनें रूप बागिस्तान-ईश्वराचें ठिकाण आहे. हें ग्रीक लेखक बायझानियम येथील स्टिफानस व डायडोरस यांनीं कायम ठेविलें आहे. येथें ५०० फूट उंचीवर खडकाच्या भिंतीसारख्या भागावर इराणचा राजा दरायस (पहिला) यानें एक मोठा कीलाकृति अक्षरात शिलालेख खोदविला आहे. या लेखांत दरायसच्या पराक्रमाचें वर्णन आहे. या खडकाच्या पायथ्याशीं शिल्पकामाचे कांहीं अवशिष्ट भाग व लेख आहेत. हे अरबी भाषेंत आहेत. येथेंच पार्थियन राजा गोयर्झेस याचा ग्रीक शिलालेख आहे.

**बेळगांव**—मुंबई इलाख्यात दक्षिण भागांतील एक जिल्हा. याचें क्षे. फ. ६४९ चौरस मैल आहे. मुख्य नद्या कृष्णा, घटप्रभा आणि मलप्रभा या होत. सरासरी ५० इंच पाऊस पडतो. हें ५५० ते ७६० पर्यंत चालुक्यांच्या, नंतर १२५० पर्यंत राष्ट्रकूटांच्या ताब्यांत होतें. प्रथम सौंदत्ती हें राजधानीचें शहर होतें; नंतर बेळगांव झालें. पुढें यादवांच्याकडे हा प्रदेश होता. कांहीं काळ विजयानगरच्या अमलांत राहून पुढें विजापूरचे व नंतर दिल्लीचे बादशहा यांच्या ताब्यांत हा भाग गेला. यानंतर निजाम, हैदर आणि मराठे यांच्यांत तो विभागला गेला.

या जिल्ह्यांतील अगदीं जुनें गांव हळसी हें होय. हें शहर कदंब घराण्याची राजधानी होतें व त्या घराण्याचे एकंदर ९ राजे झाले. हळसी येथें कांहीं ताम्रपट सांपडले आहेत. कांहीं ठिकाणचीं देवळें जखनाचार्यांनीं बांधलीं आहेत. सर्वांत उत्तम असें देऊळ देगांव येथें आहे. बेळगांव जिल्ह्यांत अनेक ठिकाणीं आणखी चांगलीं व प्रसिद्ध देवळें आहेत. ज्वारी व कापूस हीं मुख्य पिकें आहेत. कोल्हापुराकडे गारगोट्यांत कधीं कधीं हिरे सांपडतात म्हणतात. मलप्रभेच्या कांठच्या प्रदेशांत सोनें सापडतें. बेळगांव, गोकाक, सूपगांव व रामपारू याजवळ लोखंड गाळतात. शेतकीशिवाय हातमागावर कापड विणणें हाहि या जिल्ह्यांतील मुख्य धंदा आहे. येथें मातीचीं व लांकडाचीं खेळणीं तयार होतात. लो. सं. १२,२५,४२८ आहे.

तालुक्याचें क्षे. फ. ६४४ चौ. मैल आहे. यात एक शहर (बेळगांव) व १९८ खेडीं आहेत. लो. सं. १,५८,२२९. वार्षिक पाऊस ५२ इंच पडतो.

शहर—या ठिकाणीं वेळू पुष्कळ होतात यावरूनच याचें प्राचीन नांव 'वेळुग्राम' पडलें असावें. आंब्याचीं, वडाचीं व चिंचेचीं झाडें पुष्कळ आहेत. शहरांत हातमाग बरेच आहेत. लो. सं. ५८,३१९. म्युनिसिपल हद्दीखेरीज गांवहद्द (लो. सं. २,७३२), कॅन्टोन्मेंट (९,०८८) व मिलिटरी (५,३४३) असे विभाग आहेत. शहराजवळच शहापूर व ठळकवाडी हीं गांवें आहेत. शहर वाढतें आहे. तीन कॉलेजें व बरींच हायस्कुलें चाललीं आहेत. ग्रंथसंग्रहालय मोठें आहे. किल्ल्याची तटबंदी चांगली आहे पण किल्ल्यांत वस्ती नाहीं. खुद्द शहरांत मराठी बोलणारांची संख्या जास्त आहे. भाषावार प्रांत होतील तेव्हां बेळगांव जिल्ह्यांतील बेळगांव, चंदगड व खानापूर हे तीन तालुके महाराष्ट्रांत पडतील असें मराठी भाषिकांच्या संख्येवरून वाटतें.

**बेळग्रामे**—म्हैसूर संस्थानांतील एक प्राचीन विद्यापीठ. ही बनवासी प्रांताची राजधानी होती. म्हैसूरमधील शिलालेखांतून या गांवची माहिती मिळते. शातवाहनांच्या १ ल्या किंवा २ ऱ्या शतकांतील दानपत्रांवरून या ठिकाणीं ब्राह्मण कुटुंबांची वस्ती झालेली कळते. याजवळच ताळगुंडे येथें ब्राह्मणी अग्रहार होता. कदंब राजांनीं येथील विद्येला प्रोत्साहन दिलें. बेळग्रामे येथील कोडीय मठाचा अधिपति वामाशक्ति फार विद्वान्

असल्याबद्दल ख्याति होती. या ठिकाणीं तीन दरवाजे इ. स. ११५८ त असल्याची नोंद आहे.

**वेळवडी मल्लवा**—एक शूर देसायीण. शिवाजी इ. स. १६७७ मध्यें तंजावरास जाऊन परत येत असतां वेळवडीनजीक आपल्या मोठ्या सैन्यानिशीं उतरला. त्याच्या कांहीं सैनिकांनीं वेळवडींत शिरून शिरजोरपणा केला. म्हणून देसायाच्या शिपायांनीं शिवाजीच्या कांहीं सैनिकांस ठार केलें. तेव्हां मराठा सेनेनें किल्ल्यास वेढा दिला व लढाई आरंभिली. देसाई ईश्वप्रभु लढाईंत मारला गेला. पण त्याची राणी मल्लवा हिनें आपल्या सैन्यास धीर देऊन घनघोर युद्ध केलें. शेवटीं किल्ल्यांतील अन्नसामुग्री व दारूगोळा संपला, म्हणून मल्लवानें आपल्या सैन्यानिशीं शत्रूवर तुटून पडून पराक्रमाची शर्थ केली. लढत असतां तिला जबर जखम होऊन ती बेशुद्ध होऊन पडली. तेव्हां मराठे शिपायांनीं तिला शिवाजीकडे आणिलें. तेव्हां शिवाजीनें तिची उत्तम शुश्रूषा ठेववून ती शुद्धीवर आल्यावर तिचा मोठा सन्मान केला व तिला वेळवडीस परत पाठविलें. कर्नाटकांत शाहिरांनीं हिचा पराक्रम वर्णिला आहे.

**वैकल**—दक्षिण सायबेरियामधील सरोवर. जगांतील सर्व सरोवरांत या सरोवराचा सहावा क्रम लागतो. बैकल हें युरेशियामधील सरोवरांमध्यें सर्वांत मोठें गोडें सरोवर आहे. याची लांबी ३८६ मैल व रुंदी २० ते ५० मैल आहे. हें सरोवर सुमारें १५०० फूट उंचीवर असून याचें क्षे. फ. १३,२०० चौरस मैल आहे. सरोवराच्या बहुतेक भागाची खोली २४०० फूट आहे. या सरोवराला सुमारें ३०० प्रवाह येऊन मिळतात. याच्या किनाऱ्यावरील प्रांतावर ज्वालामुखी पर्वताचे स्फोट पूर्वीपासून होत आहेत. या सरोवरांत वादळें फार होत असल्यामुळें व चांगलीं बंदरें व उपसागर असल्यामुळें यांतून गलबतानें व्यापार करणें फार कठिण जातें. ट्रान्ससायबेरियन रेल्वे याच्या दक्षिण अंगानें जाते.

**वैठका**—एक देशी व्यायाम. शरीरांतील सर्व स्नायूंत पायांचे स्नायू मोठे असून फार उपयोगी आहेत. कमरेच्या वरचें शरीर बळकट तयार केलें तरी पायाचे स्नायू मजबूत केल्याशिवाय रोजच्या व्यवहारांत चालावयाचें नाहीं. पायांच्या सर्व स्नायूंस पुरेसा व्यायाम घरच्या घरीं कोणत्याहि साधनाशिवाय देतां यावा म्हणून बैठकीचे निरनिराळे प्रकार बसविले आहेत. बैठकीच्या व्यायामास कृत्रिम साधनांची जरूर लागत नाहीं व घरच्या घरीं आपल्या खोलींत हा व्यायाम करतां येतो. जोर व बैठका असा जोड व्यायाम करण्याचा रिवाज आहे. पायांचे स्नायू मोठे असल्यामुळें त्यास जास्त मेहनत दिल्याशिवाय ते तयार होत नाहींत, म्हणून जोरांची संख्या असेल तीपेक्षां दुप्पट बैठका काढण्याचा रिवाज आहे. एकदां जोर व नंतर त्यापेक्षां जास्त बैठका, पुनः पुनः जोर व बैठका अशा रीतीनें मेहनत केल्यानें निरनिराळ्या स्नायूंस मेहनत व विश्रांति मिळते व सर्व शरीर फार लवकर तयार होतें. बैठकांचे घरेच प्रकार आहेत.

साधी बैठक—सरळ उभें राहावें; नंतर गुडघ्यांतून पाय वाकवून खालीं बसावें. दोन पायांत एका वितीचें अंतर ठेवावें व पाय सहज रीतीनें तिरपे ठेवून उभें राहावें. यांत गुडघे पायांच्या अंगठ्याच्या पुढें आले तरी हरकत नाहीं. वर उठतांना छाती चांगली पुढें काढावी. या प्रकारच्या बैठकीनें मांडीचे पुढील स्नायू तयार होतात व त्यांस चांगला आकार येतो. ( व्या. ज्ञा. )

**वैगा**— एक आद्य द्राविड जात. मध्य भारत व मध्य प्रदेश यांत या लोकांची जास्त वस्ती आहे. लो. सं. सु. ८०,०००. हे गोंडांचे उपाध्ये म्हणवितात व त्यापेक्षां आपणांस उच्च समजतात. यांच्यांत नियोग व घटस्फोट या पद्धती आहेत. हे जंगलांतील उद्योगधंदे करून निर्वाह करतात. या जातीचा समाजशास्त्रीय अभ्यास फादर एल्विन या मिशनऱ्यानें चांगला केला असून एक मोठा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे.

**वैतूल**—मध्यप्रांतांतील सातपुडा पठारावरील एक जिल्हा. या जिल्ह्यांत मुख्य नद्या तापी, वर्धा, बेल, मचना, सांपना व मोरेन ह्या आहेत. या जिल्ह्यांत पुष्कळ ठिकाणीं दगडी कोळसा सांपडतो. येथें जंगलहि विस्तीर्ण आहे. सागवान, साज, कोहचा, शिरस, वगैरे झाडें आहेत. या जिल्ह्यांत मुख्य पैदास ज्वारी, गहूं व कडधान्यें यांची आहे. या ठिकाणीं पाहण्यायोग्य असा खेर्ल्याचा किल्ला आहे. मुलताईमध्यें अनेक देवालयें जुनीं व तऱ्हतऱ्हेच्या आकारांचीं तापी कुंडाच्या सभोंवतीं दृष्टीस पडतात. मुक्तागिरी या ठिकाणींहि पुष्कळ देवालयें आहेत. हीं देवालयें पहाडावर पाण्याच्या धबधब्याजवळ बांधलीं असल्यामुळें हें स्थान रम्य दिसतें. पडके किल्ले वौरगड, श्यामगड, सौलीगड व जेतपूर या ठिकाणींहि दिसतात. विवेकसिंधूचा कर्ता मुकुंदराज याची समाधि खेर्ल्याच्या किल्ल्यांत दाखवितात. या जिल्ह्याचें क्षे. फ. ३८८५ चौ. मैल व लो. सं. ४,३८,३४२ आहे. वैतूल तहशिलींत बदनूर व बैतूल अशीं दोन मोठीं गांवें आहेत; पैकीं बदनूर हें जिल्हा व तहशिलीचें मुख्य ठिकाण आहे. बैतूल येथें मातीचीं भांडीं व लाखेच्या बांगड्या होतात.

**वैरागी**—( संस्कृत वैरागी-विरक्त या शब्दापासून ). हा प्रथम वैष्णव पंथाच्या लोकांचा संघ होता. आजकाल वैरागी या नांवाचा उपयोग कबीरपंथी, सत्नामी, स्वामिनारायण या पंथांच्या लोकांसच नव्हे तर ब्राह्मणधर्माहून भिन्न अशा पंथांनाहि होतो. वैराग्यांचे चार सांप्रदाय आहेत. ते—(१)

रामानुजी, रामानंदी किंवा श्रीवैष्णव; (२) निंबानंदी किंवा निमावत; (३) विष्णुस्वामी किंवा वल्लभ; व (४) माध्व. रामानुजी गोसाव्यांत रामानुजांचें पदार्थत्रितयम् हें मुख्य तत्त्व आहे. संस्कृताऐवजीं हिंदी भाषेंत ग्रंथरचना केल्यानें हा पंथ वाढला. पुढें रामभक्त रामानंदी व कृष्णभक्त निंबानंदी यांच्यांत तेढ उत्पन्न होऊन त्यांचे निरनिराळे पंथ झाले. पूर्वी बैरागी लोक ब्रह्मचारी असत; परंतु आतां कांहीं गोसावीपंथांतल्याप्रमाणें लग्नें करूं लागले आहेत. एकंदर लो. सं. (१९११) साडेसात लाखांवर आहे. पेशवाईंत बैराग्यांची पलटणें होतीं व ते सावकारीहि करीत. (गोसावी पाहा.)

**बैरूट**—सिरिया प्रांतांतील एक जिल्हा व या जिल्ह्याचें मुख्य शहर. बैरूट हें एक महत्त्वाचें बंदर आहे. लो. सं. अजमासें अडीच लक्ष आहे. हें शहर दक्षिण सिरियांतील व्यापाराचें एक केंद्र आहे. १८९४ सालीं एका फ्रेंच कंपनीनें येथील बंदर बांधलें. या शहरांत अमेरिकन व युरोपियन संस्था पुष्कळ आहेत. अमेरिकन, सिरियन व स्कॉटिश मिशनरी लोकांच्या शाळा, विद्यालयें, छापखाने व त्याचप्रमाणें जर्मन व फ्रेंच रुग्णालयें, अनाथाश्रम, इत्यादि बऱ्याच लोकोपयोगी संस्था आहेत. प्रवासी लोकांसाठीं पुष्कळ चांगल्या खाणावळी आहेत. एक फ्रेंच व दुसरें अमेरिकन अशीं दोन विद्यापीठें येथें आहेत.

**बैल**—हा एक रवंथ करणारा गोवर्गांतील प्राणी असून याला पोकळ, चंद्रकोराकृति शिंगें असतात. याला सहा छेदक दांत असून दोन श्वदंत (कॅनाइन टीथ) असतात व हे सर्व खालच्या जबड्यांत असतात. याचें तोंड रुंद असतें. बैल बडविण्यापूर्वी त्यास गोऱ्हा किंवा सांड म्हणतात व बडविल्यानंतर त्यास बैल म्हणतात. हिंदुस्थानातील बैलांस वशिंड असतें. तसें युरोपांतील बैलास नसतें. हिंदुस्थानांतील बैलांतहि नेमाडी, गीर, खिल्लारी, अमृतमहाल, वगैरे निरनिराळ्या जाती आहेत. (गाय, गुरेंढोरें पाहा).

हिंदुस्थानांत पूर्वी गांवात पोळ म्हणजे एक धडधाकट बैल रिकामा सोडण्याची जी वहिवाट होती ती गुरांची चांगली निपज होण्यासाठीं असावी. कारण हा बैल देवाच्या नांवानें सोडला असल्यानें याला खाणेंपिणें चांगलें मिळे व मनसोक्त वागतां येई. त्यामुळें हा वळू म्हणून प्रजोत्पादनाला फार उपयुक्त असे. आतां मुद्दाम वळू तयार करावे लागत आहेत.

**बैलझोंबी**—स्पेन देशांतील हा एक राष्ट्रीय खेळ आहे. बैलाला राग आणण्यासाठीं रंगाचीं वस्त्रें किंवा इतर साधनें वापरतात. बैलांचीं शिंगें लागूं नयेत म्हणून तीं तासतात किंवा त्यांवर फडकीं गुंडाळतात. प्रथम घोड्यावर बसलेला एक योद्धा आपल्या भाल्यानें बैलाला रंगणांत घालतो. नंतर दुसरा एक त्याला सारखा भोसकत असतो व तिसरा त्याला ठार करतो. याप्रमाणें बैल-माणसाची झोंबी होते.

**बोइलो-देस्प्रो, निकोलस** (१६३६–१७११)—एक फ्रेंच कवि. त्यानें १६६० सालीं आपलें पहिलें उपरोधिक काव्य लिहिलें व नंतर लागोपाठ एकंदर ११ उपरोधिक काव्यें लिहिलीं. १६६४ सालीं त्यानें आपला गद्यग्रंथ 'डायलो ग देस हिरोज द रोमन' प्रसिद्ध केला. त्यानें लिहिलेलीं 'एपिस्टल्स्' १६६९ नंतर वेळोवेळीं प्रसिद्ध झालीं. पण त्याचे सर्वोत्कृष्ट काव्यग्रंथ 'काव्यकला' आणि 'ल ल्युत्रँ' १६७४ सालीं प्रसिद्ध झाले. त्याच्या लेखनामुळें फ्रेंच काव्याला निराळें वळण लागलें, इतकेंच नव्हे तर इंग्रज कवि ड्रायडन, पोप व इतर तत्कालीन कवी यांच्या मार्फत इंग्रजी काव्य-वाङ्मयावरहि परिणाम झाला.

**बोकेशियो, गियोव्हॅनी** (१३१३–१३७५)—एक इटालियन ग्रंथकर्ता. व्हर्जिलचें थडगें पाहिल्यापासून त्यानें स्वतःला काव्याला वाहून घेण्याचें ठरविलें. 'डेकॅमेरॉन' या त्याच्या सर्वोत्कृष्ट व प्रसिद्ध गद्यग्रंथांत १०० कथा ग्रथित केल्या आहेत. एकदां फ्लॉरेन्समध्यें प्लेग असतांना कांहीं स्त्रीपुरुष जवळच्या शेतवाडींत जाऊन राहिले व तेथें दहा दिवसांत परस्परांनीं सांगितलेल्या चटकदार गोष्टींचा हा संग्रह आहे. या कथा बऱ्याचशा भावनात्मक, शृंगारिक व अश्लील असून रेनॉल्डच्या कादंबऱ्यांप्रमाणें त्यांचा प्रौढांना तिटकारा वाटणें साहजिक आहे. पण बोकेशियोच्या काळींच हा ग्रंथ तरुणांत फार लोकप्रिय झाला. त्यावरून त्याला 'इटलींतील गद्यात्मक वाङ्मयाचा जनक' असें कोणी मानतात. शिवाय त्याच्या स्वतंत्र भाषाशैलीचें वर्चस्व त्याच्यानंतर झालेल्या सर्व लेखकांवर असल्याचें दिसून येतें.

**बोखाडा**—काळा उंबर. हीं झाडें खोरेतीच्या झाडांप्रमाणें असून कोंकणांत प्रसिद्ध आहेत. हें औषधी आहे. कुत्र्याच्या विषावर याचें मूळ व धोत्र्याचें फळ तांदुळाच्या धुवणांत वांटून देतात. प्रदरावर फळांचा रस मधाबरोबर देतात. सुजेवर मूळ उगाळून लेप करतात.

**बोगदा**—एखाद्या डोंगरांतून किंवा नदीखालून रस्ता करावयाचा असला म्हणजे बोगदा खणण्यांत येतो. हा तयार करण्याच्या पद्धती निरनिराळ्या प्रकारच्या आहेत. एका पद्धतीमध्यें एक तीक्ष्ण धारेचें पोलादाचें मोठें नळकांडें बोगद्याच्या तोंडाशीं जलोचालकानें फिरविण्यांत येतें व अशा रीतीनें बोगदा तयार करण्यात येतो. खडकांतून बोगदा तयार करावयाचा असल्यास सुरुंग लावून खडक फोडून कमानीच्या आकाराचें लांबलचक छिद्र तयार करण्यांत येतें. नदीखालून बोगदा न्यावयाचा अस-

त्यास मधून मधून विहिरी खणण्यांत येतात व नंतर त्या एकमेकांस जोडण्यांत येतात. किंवा एक सबंध चर खणून तो बांधून काढण्यांत येतो किंवा जमिनींत खांब पुरून त्यांच्या आधारावर बोगदा बांधण्यांत येतो.

जगांतील सर्वांत लांब आगगाडीचे बोगदे म्हणजे लंडन शहरांतील जमिनीखालून नेलेले नळ होत. यांतून शेंकडों मैल लांब विजेच्या गाड्या जातात. हे जमिनींत ५० ते १०० फूट पर्यंत खोल घातले आहेत. मॉर्डन ते गोल्डर्स ग्रीनपर्यंत १९ मैलांत मध्यें कोठें सूर्यप्रकाश नाहीं. मधून मधून स्टेशनें आहेत; तेथें उतरून वर जिन्यांनीं यावें लागतें.

असें एखादेंहि स्टेशन नसणारा जगांतील सर्वांत लांब बोगदा म्हणजे सिंप्लॉनचा होय. हा इटली आणि स्वित्झर्लंड यांना जोडणारा १२ मैल ५६० यार्ड लांबीचा आहे. हा १९०६ सालीं तयार झाला.

या आगगाडीच्या (जमिनीखालच्या) बोगद्याखेरीज ग्रेट ब्रिटनमधील सर्वांत मोठा बोगदा म्हणजे सेव्हर्नचा होय. हा ४ मैल ६२४ यार्ड लांब आहे व पाण्याखालून गेलेला आहे. यानें इंग्लंड आणि वेल्स जोडलीं गेलीं आहेत.

**बोगार**—महाराष्ट्रांत ज्याना कांसार म्हणतात त्यांना कर्नाटकांत बोगार म्हणतात. ही जात निवृत्तमांस आणि ब्राह्मणानुयायी आहे व व्यापारी पेशाची आहे. कर्नाटकाकडील भागांत यांचीं कांहीं कुटुंबें जैन धर्मीय आहेत. तथापि हिंदु-जैनांमध्यें लग्नव्यवहार होतो. कांसार पाहा.

**बोगोटा**—कोलंबियाच्या प्रजासत्ताक राज्याची राजधानी. येथील लो. सं. (१९४२) ३,९५,३०० आहे. बगीच्यांनीं सुशोभित केलेले पुष्कळ चौक राखले आहेत. येथें रस्त्यांतील गाड्या, विजेचे दिवे, टेलिफोन, हीं आहेत. येथें एक १५७२ सालीं स्थापन झालेलें विश्वविद्यालय, तीन महाविद्यालयें, रसायनशास्त्र व खनिजशास्त्र शिक्षणाची शाळा, राष्ट्रीय ॲकेडमी, लष्करी शाळा, ५०,००० ग्रंथांचें सार्वजनिक ग्रंथालय, राष्ट्रीय वेधशाळा, वस्तुसंग्रहालय, वनस्पती बाग हीं आहेत. चांगली टांकसाळदेखील येथें आहे. १५३८ सालीं गोंझलेस क्विसमेनेस क्वेसाडा यानें हें शहर वसविलें व लवकरच हें न्यू ग्रानाडाची राजधानी बनलें. १८१९ सालीं कोलंबिया प्रजासत्ताक राज्य झालें तेव्हां त्याची राजधानी बोगोटाच झाली. हें शहर आंतरराष्ट्रीय व्यापाराचें एक केंद्र असून दक्षिण अमेरिकेंत विद्येसंबंधीं प्रसिद्ध आहे.

**बोग्रा**—पाकिस्तान, पूर्व बंगाल, एक जिल्हा. क्षेत्रफळ १४७५ चौरस मैल. जिल्ह्याची लो. सं. १२,६०,४६३. यांत खेडीं ३,८६५ असून लो. सं. सारखी वाढत आहे. येथील कोरव लोक मुसलमान झाल्यामुळें त्यांची संख्या जास्त आहे. भात, ताग, ऊंस, तंबाखू व गळिताचीं धान्यें हीं मुख्य पिकें आहेत. तागाचें पीक चांगलें होत असल्यामुळें व जलमार्गानें आणि खुष्कीच्या मार्गानें दळणवळणाची सोय असल्यामुळें या जिल्ह्याची भरभराट होत आहे. या भागांत केव्हां केव्हां वादळें व भूकंप होतात.

येथें कामरूप व पौंड्रवर्धन हीं राज्यें प्राचीन काळीं होतीं. मुख्य गांव बोग्रा अथवा बगुरा हें होय. याची लो. सं. सुमारें दहा हजार आहे.

**बोजा**—(लीयेन). कायद्यांत या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, कांहीं विशिष्ट परिस्थितींत ज्या मनुष्याच्या ताब्यांत दुसऱ्या इसमाच्या मालकीचा माल असेल तो माल त्या पहिल्या इसमाचें त्या मालाच्या मालकाकडून जें कांहीं कायदेशीर येणें असेल तें मालकाकडून मिळेपर्यंत तो माल अडकवून ठेवण्याचा हक्क. उदा. शिंप्याकडे शिवण्यास दिलेले कपडे शिलाईचे पैसे येईपर्यंत अडकवून ठेवण्याचा हक्क शिंप्यास असतो. असा कायदा इंग्लंडांत आहे व तसाच हिंदुस्थानांतहि आहे. (इंडियन कॉंट्रॅक्ट ॲक्ट, कलम १७० पाहा).

**बोटुलिझम रोग**—अन्नांत बोटुलिनस नांवाचा जंतु जाऊन हा रोग उत्पन्न होतो. हा अवायुजीवी (ॲनीरोबिक) जंतु असून तीव्र विष निर्माण करतो. याचा मध्यवर्ती मज्जासंस्थेवर परिणाम होऊन डोळे जातात व अंग विकल होऊन मृत्यु येतो. बोटुलिनस-विघ्न औषधानें हा रोग बरा होतो.

**बोडण**—महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचा एक कुलाचार. कोंकणस्थांचें बोडण तसें देशस्थांचेंहि बडण म्हणून असतें. हें प्रतिमंगलकार्यानिमित्त सिद्ध करावेंच लागतें. तें कुलदेवतेप्रीत्यर्थ असतें. बडणांत 'वेण्याफण्यादि' अलंकार करावे लागत असून तेलच्या इत्यादि पांच अन्नें सिद्ध करावीं लागतात. यांनीं एक पाटी-दुरडी भरून तींत एक कणकेचा मोठा दिवा लावून ठेवून तें सर्व झांकून देवीपुढें (देव्हाऱ्याजवळ) ठेवतात. या कुलाचाराला पांच देशस्थच सुवासिनी बोलावतात. त्यांना हळदकुंकू, दक्षिणा, विडा देऊन भोजनानें तृप्त करतात. देवीपुढें ठेवलेलें बडण हें दुसरे दिवशीं घरांतील सासुरवासिनींनींच खावयाचें असतें. आदल्या रात्रीं म्हणजे बडण ठेवण्याच्या रात्रीं गोंधळ असतो. बडणांतील दिवा माहेरवासिनीनें पाहावयाचा नाहीं किंवा त्यांतील अन्न उष्टावयाचें नाहीं. (म. सा. पत्रिका).

कोंकणस्थांत कांहीं कुटुंबांत मंगलकार्य झाल्यास बोडण भरावेंच लागतें. चार सुवासिनी व एक कुमारिका यांना बोलावून त्यांच्याकडून परातींत घातलेलें पुरणवरणाचें अन्न कालवून घेतात. या अन्नात देवी ठेवतात. नंतर या बोडणाचा कुटुंबियांना अंगारा

लावतात. बोडणाप्रमाणेंच मंगलकार्यानंतर गोंधळहि करवावा लागतो. हा बोडणाचा विधि देशस्थापासून घेतलेला दिसतो.

**बोडलीन ग्रंथालय**—हें ग्रंथ-संग्रहालय ऑक्सफर्ड विद्यापीठांत असून सर टॉमस बोडले या गृहस्थाच्या नांवावरून या ग्रंथ-संग्रहालयास नांव मिळालें आहे. त्यानें १५९८ सालीं या ग्रंथ-संग्रहालयाची पुनर्रचना व बरीच वाढ केली. ब्रिटनमध्यें मुद्रित होणाऱ्या प्रत्येक पुस्तकाची एक प्रत या ग्रंथ-संग्रहालयास विनामूल्य पाठविण्यांत येते. दुर्मीळ ग्रंथ आणि हस्तलिखितें या बाबतींत जगांत दुसरा म्हणजे व्हॅटिकनच्या खालोखाल याचा क्रम लागेल. ( ग्रंथालयें पाहा ).

**बोडेनस्टेड, फ्रेडरिक मार्टिन** ( १८१९-१८९२ )—एक जर्मन कवि व संकीर्ण लेखक. त्यानें १८४८ सालीं कॉकेशस पर्वतांतील रहिवाशांबद्दल एक ग्रंथ लिहिला आणि 'ए थाउजंड ॲन्ड वन् डेज इन् दि ईस्ट' ( पूर्वेकडील एकशें एक दिवस ) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्याचीं हीं दोन्ही पुस्तकें फार लोकप्रिय झालीं. त्याचा 'दि सॉंग्ज ऑफ मिरझा-शॉफी' हा काव्यसंग्रह उत्तम आहे. याच्या १०० हून अधिक आवृत्ती निघाल्या आहेत.

**बोडो**—तिबेटी-ब्रह्मी भाषेच्या उपभाषा बोलणाऱ्या लोकांना सर्वसाधारण बोडो या नांवानें ओळखतात. मानववंशशास्त्रदृष्टया खरे बोडो लोक आसाम प्रांत, कुचबिहार, उत्तरबंगाल व सुरमा नदीची थडी या प्रदेशांत राहतात. त्यांच्या सोयरिकी अहोम जातीशीं होऊं शकतात. बोडोंचा पेहराव व अंगलट सुद्धां अद्याप मोंगोलियन धर्तीची दिसून येते. हिंदु बोडो लोक धर्मभोळे, जादुटोण्यांवर व भुतांखेतांवर विश्वास ठेवणारे आहेत. सांप्रत त्यांच्यांत हिंदुदेवता ( विशेषतः कुबेर ) शिरल्या आहेत. मंत्रतंत्राचें काम बायका करतात. आज हे लोक शेती करतात. यांच्यात पूर्वी मातृकन्यावारसाची पद्धति होती, पण आतां ती नाहींशी होत चालली आहे.

**बोथा, लुई** ( १८६२-१९१९ )—एक बोअर मुत्सद्दी व जनरल. त्यानें पूर्ववयांत बोअर लोकांबरोबर झुलू लोकांचा प्रदेश जिंकून घेण्याच्या कामीं लढाईत भाग घेतला. सदरहू जिंकलेला प्रदेश ट्रान्सव्हालमध्यें सामील करण्यांत आला. दक्षिण आफ्रिकन युद्ध सुरू झाल्यावर त्यानें नाताळवर झालेल्या स्वारींत प्रत्यक्ष भाग घेतला. लेडी स्मिथवरील हल्ल्यांत तो लढला. जेव्हां जनरल जोबर्ट आजारी झाला तेव्हां बोथाला सैन्याचा जनरल नेमण्यांत आलें. कोलेनसो व स्पियॉनकोप या दोन लढायांत तोच मुख्य सेनापति होता. जोबर्ट मरण पावल्यावर ( १९०० मार्च ) तो बोअर सैन्याचा मुख्य सेनापति झाला. क्रोन्जे शरण आल्यावर त्यानें बोअर सैन्याचा हल्ला लीडेनबर्ग भागावर केला; परंतु शेवटीं त्यानें तहाच्या अटींना मान्यता दिली ( १९०२ ). पुढें १९०७ सालीं ट्रान्सव्हालचा तो पहिला पंतप्रधान झाला. दक्षिण आफ्रिकन वसाहतींचें संघराज्य बनवण्यास तो अनुकूल होता ( १९०९ ); आणि १९१० सालीं 'साउथ आफ्रिकन युनिअन' स्थापन झाल्यावर तो संघराज्याचा पंतप्रधान झाला. पहिल्या महायुद्धांत आपल्या युनिअन सैन्याचा कमांडर होऊन त्यानें नैर्ऋत्य आफ्रिकेंतील जर्मन सैन्यावर पूर्ण विजय मिळवला ( १९१५ ).

**बोधला, माणकोजी**—एक महाराष्ट्र संत. हा सोलापूर जिल्ह्यांतलि धामण गांवचा पाटील असून मोठा भगवद्भक्त होता. 'लिंबुर हुरडा घेऊनि आला, तो हा माणकोजी बोधला।' असा याचा उल्लेख संताच्या भूपाळींत आहे. हा जातीचा शूद्र असून त्याचें उपनांव जगताप होतें. त्याची बायको, मुलगा, सून, वगैरे सर्व साधुवृत्तीचीं माणसें होतीं. याच्यासंबंधीं कित्येक गोष्टी, चमत्कार, वगैरे भक्तविजयाच्या ५२ व्या अध्यायांत वर्णिलीं आहेत. हा तुकारामाचा समकालीन होता असें महिपतीनें म्हटलें आहे. हल्लीं याचे वंशज धामणगांव येथें आहेत.

**बोधिधर्म**—एक बौद्ध प्रवासी. हा तुरखार देशचा असून अंगानें चांगला सशक्त होता. तो चिनास जाऊन उपदेशक बनला व सांप्रदायिक भिक्षूप्रमाणें नऊहि प्रांतांतून भिक्षा मागत फिरला. त्याला नालंद येथें इत्सिंग भेटला. हा उत्तर हिंदुस्थानांत वयाच्या ५० व्या वर्षी वारला.

**बोनस-आरीर**—अर्जेंटिनाची राजधानी व बंदर. लो. सं. २४,८५,३५०. दक्षिण गोलार्धांत हें सर्वांत मोठें शहर आहे. तसेंच येथील कॅथेड्रल ( देऊळ ) दक्षिण अमेरिकेंत सर्वांत जुनें व मोठें आहे. येथें निराश्रित मुलांकरितां वीस आश्रम व एक वेड्यांचें इस्पितळ आहे. हीं सार्वजनिक खर्चानें चालविलीं आहेत. कॅसा रोसाडा ( सरकारी कोठी ), नवीन काँग्रेस मंडप, बोल्सा अथवा सराफी, पाण्याचा सांठा, टांकसाळ, वगैरे महत्त्वाच्या इमारती आहेत. उच्च शिक्षणाची सोय विश्वविद्यालय, चार राष्ट्रीय विद्यालयें, तीन अध्यापन शाळा व कित्येक धंदेशिक्षणाच्या शाळा यांनीं केली आहे. येथील राष्ट्रीय पुस्तकालय, राष्ट्रीय पदार्थ-संग्रहालय, प्राणिबाग, प्राण्यांचें संग्रहालय हीं मोठीं उपयुक्त आहेत. लोक गाण्याचे फार शोकी आहेत. येथें दोनतीन मोठालीं सार्वजनिक स्नानगृहें व कित्येक क्लब आहेत. येथें उद्योगधंदे अनेक असून दीड लाख लोक तरी त्यांत कामाला आहेत. यंत्रें, वाहनें, कातडीं, पादत्राणें, कापड, तंबाखू व दारू हा माल येथें प्रामुख्यानें तयार होतो. शहरांत कम्युनिस्टांचा जोर आहे व त्यामुळें कलकत्त्याप्रमाणें दंगेधोपे, जाळपोळ व रक्तपात नेहमीं होत असतात.

**बोनाई संस्थान**—ओरिसा प्रांतांत हें मांडलिक संस्थान असून याचें क्षे. फ. १२८० चौ. मैल आहे. लो. सं. (१९४१) ९२,५३७. ब्राह्मणी नदी मुख्य असून तिला टेकडयांतून निघालेले कित्येक नाले मिळाले आहेत. येथील जंगलांत साल, असाणा, शिसू व कुसम हीं मौल्यवान् झाडें असून, लाख, टसर, रेशीम, सवै गवत हेहि उपयुक्त वन्य पदार्थ आहेत. अगदीं थोड्या प्रमाणावर सोनें सापडतें व लोखंडहि जरूरीपुरतें लोक काढतात. येथें मुख्य पीक तांदुळाचें असून कापूस व गळिताचीं धान्येंहि पिकतात. हें संस्थान प्रथमतः स. १८०३ मध्यें रघूजी भोसल्याकडून देवगांवच्या तहान्वयें इंग्रजांस मिळालें. हें संस्थान १८९९ सालीं येथलि संस्थानिकास एका बंडाचा मोड केल्याबद्दल बक्षीस म्हणून मिळालें. संस्थानिक इंग्रजांस ठराविक खंडणी व विशेष प्रसंगीं लष्करी मदत देण्याबद्दल बांधले गेले असत. हें संस्थान आतां ओरिसा प्रांतात विलीन झालें आहे.

**बोपदेव** (१२६०–१३२६)—एक संस्कृत ग्रंथकार. व्याकरणावरील ग्रंथांत, बोपदेवाचें व्याकरण विशेष प्रसिद्ध आहे. ह्यालाच 'मुग्धबोध' असें म्हणतात आणि बंगालयांत त्याचें अध्ययन फार लोक करितात. ह्याजवर, रामानन्द, रामतर्कवागीश, मधुसूदन, देवीदास, रामभद्र, रामप्रसादतर्कवागीश, श्रीवल्लभाचार्य, दयारामवाचस्पति, भोलानाथ, कार्तिकसिद्धान्त रतिकांत, तर्कवागीश, गोविंदराम, खुद्द बोपदेव, इत्यादींचीं निरानिराळीं भाष्यें आहेत. शिवाय 'छाया' नांवाची कोणा एका मिश्राची, व 'सुबोधिनी' नामक दुर्गादासाची ह्याजवरच टीका आहे.

बोपदेवानें व्याकरणावर दहा, वैद्यकावर नऊ, तिथिनिर्णयावर एक, साहित्यावर तीन व भागवतावर तीन याप्रमाणें ग्रंथ केले. या त्याच्या नावावरच्या अफाट ग्रंथकर्तृत्वावरून दोन बोपदेव असावेत असा कांहीं संशोधकांचा तर्क आहे.

**बोबिली जमीनदारी**—ही जमीनदारी मद्रास इलाख्यांत विजगापट्टम जिल्ह्यांत आहे. त्यांत बोबिली तहशील व पालकोंडा तालुका यांचा व सालूर तहशिलीचा समावेश होतो. यांत नागावली नदीच्या पाणवठ्याचा प्रदेश येतो. सध्यांच्या बोबिलीच्या महाराजांचा मूळ पुरुष पेड्डारायुडु हा होता. या पुरुषास त्याच्या शौर्याबद्दल ही जमीनदारी बक्षीस करण्यांत आली होती. जमीनदारीचें उत्पन्न पांच लाखांवर आहे. मुख्य गांव बोबिली. येथें जमीनदार राहतात. फ्रेंच सेनापति बुसीनें वेढिलेल्या जुन्या किल्ल्याचे अवशेष येथें अजून दृष्टीस पडतात.

सध्यांचे राजे श्वेतचेलपति रामकृष्ण राणा १९२० सालीं गादीवर आले. १९३१ पासून हे आंध्रविद्यापीठाचे प्रो. चॅन्सेलर आहेत. १९३२–३७ या काळांत ते मद्रास सरकारचे मुख्य मंत्री होते. ते घटनासमितीचे एक सभासद होते.

**बोमार्शे, पिएर ऑगस्टिन** (१८३२–१७९९)—एक फ्रेंच नाटककार. त्यानें 'मे मॉयरे' या नांवाचें पुस्तक लिहिलें व मोठी प्रसिद्धि मिळवली. या पुस्तकांत त्यानें एका दाव्यातील जबान्या लिहिल्या असून, त्यांत त्याची विनोदी बुद्धि आणि उपरोधिक लेखनकला इतकी उत्तम साधली आहे कीं, त्या पुस्तकानें फ्रान्समधील सर्वांचें मनोरंजन केलें. नंतर त्यानें लिहिलेल्या 'दि बार्बर ऑफ सेव्हिल' आणि 'दि मॅरेज ऑफ फिगारो' या दोन नाटकांनीं त्याचें नांव अजरामर केलें आहे. त्याचा शेवटचा ग्रंथ 'मे सिक्स एपोक' यांत त्यानें फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं त्याला ज्या संकटांना तोंड द्यावें लागलें, त्यांचें वर्णन केलें आहे. त्यानें व्होल्टेअरच्या ग्रंथाची एक आवृत्ति प्रसिद्ध केली (१७८५); पण त्यांत त्याला सुमारें १०,००,००० लिव्हर (फ्रेंच नाणें) इतका तोटा सोसावा लागला. अष्टपैलू बुद्धिमत्तेचा तो एक अलौकिक विद्वान् होता; कारण त्याची बुद्धिमत्ता चित्रकला, राजकारण, व्यापार, नाट्यकला, इत्यादि अनेक क्षेत्रांत दिसून येते.

**बोर वर्ग**—(ऱ्हाम्नासी). हा एक द्विदल बहुपर्णपुष्प वनस्पतींचा मोठा वर्ग आहे. यामध्यें झाडें व झुडपें दोन्ही प्रकार असतात. या वर्गातील झाडांचीं पानें साधीं, क्वचित् एका समोर एक असलेलीं असून फुलें लहान व हिरवट पिवळ्या रंगाचीं असतात. या फुलांचा पुष्पकोश पडद्यापडद्याचा असतो, पाकळ्या फडांसारख्या असतात; व फळें रुक्ष किंवा मांसल असतात. या वर्गातील सुमारें २५० झाडांची माहिती मिळालेली आहे. यांतील कांहीं वनस्पतींचा रंगकामांत पिंवळ्या रंगाकरितां उपयोग करतात.

दांडेबोर, चणेबोर, इ. बोराच्या जाती आहेत. बोराटी ही लहान जात कुंपणासाठीं उपयोगी पडते.

दांडेबोर—(वर्ग–ऱ्हाम्नासी; जाति–झिझिफस. इं. ज्यूजूब). हीं एका जातीचीं कांटेरी झाडें आहेत. यांचीं पानें दरवर्षी गळून पडतात. याच्या अनेक जाती आहेत. याचें फळ खावयास चांगलें पथ्यकर असतें. साध्या बोरीचें मूलस्थान सीरिया देश होय. तेथून या झाडाचा प्रसार झाला. बोरें वाळवून बाहेरदेशांत पाठवितात.

बोरीचीं झाडें फार प्राचीन काळापासून भारतीय लोकांत माहीत आहेत. बदरीनाथ येथील बदरिकाश्रमांतील ऋषी बोरें खाऊन राहत असत, असा उल्लेख पुराणांत सांपडतो. बोरीचीं झाडें अफगाणिस्तान, वायव्यप्रांत, हिमालयापासून तों तहत सिलोनपर्यंत सर्व हिंदुस्थान देश, ब्रह्मदेश यांमध्यें

सांपडतात. मलाका, सयाम, चीन, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, वगैरे देशांत बोरीची थोडीबहुत लागवड आहेच. राहुरी येथील बोरी पेशवाईत फार प्रसिद्ध होत्या. गांवठी बोरें आंबटगोड असतात. नागपुरी बोरें मोठीं व गोड असतात. सिंध, बडोदें, खानदेश या प्रांतांत बोरीची लागवड बरीच सुधारली आहे.

उ. हिंदुस्थानांत, तसेंच मुंबई, मद्रास व ब्रह्मदेश या भागांत बोरीच्या झाडाच्या सालीचा कातडीं कमावण्याकडे उपयोग करतात. छोटानागपूर प्रांतांत साल व फळ या दोहोंचा वरील कामाकरितां उपयोग करतात. हरितरंजकद्रव्य तळाशीं बसावें म्हणून कधीं कधीं या झाडाची साल निळीच्या पिपांत टाकतात. याच सालींत टॅनिन अम्ल असतें. देशी वैद्यकांत बोरीच्या झाडाचे बहुतेक भाग उपयोगी पडतात. झाडावर उत्तम लाख येते. लांकूड नांगर, गाड्या, वगैरे करण्यास उपयोगी आहे.

**बोरसद**—मुंबई इलाख्यांत खेडा जिल्ह्याच्या बोरसद तालुक्यांतील दुहेरी तटबंदीचें एक गांव. याचा बाहेरील तट पडला असून आंतील चांगल्या स्थितींत आहे. मराठेशाहीच्या वेळच्या बांधणीचे हे तट असून येथें १७३८ पर्यंत मोठमोठ्या लढाया झाल्या. १४९७ सालीं बांधलेली जुनी सात मजली तेरा कमानींची येथील विहीर प्रसिद्ध आहे.

**बोरिवली**—मुंबई, ठाणें जिल्ह्यांत साष्टी तालुक्यांतील एक गांव व बी. बी. ॲन्ड सी. आय्. रेल्वेचें स्टेशन. याच्या सभोंवारच्या २ ते ५ मैलांच्या टापूंत ऐतिहासिक प्राचीन संस्कृतिदर्शक स्थळें आहेत. पूर्वेस पांच मैलांवर 'कान्हेरी' गुहा आहेत; उत्तरेस २ मैलांवर मंडपेश्वर किंवा 'मोनपझीर' ज्यास पोर्तुगीज मांनपशर असें म्हणतात, तेथें प्रसिद्ध पोर्तुगीज पाद्र्याचा श्वेतबुरूज व हजारों वर्षांपेक्षांहि जुनीं ब्राह्मणी लेणीं आहेत. डोंगरावर जुन्या व विस्तृत मठाचे व पाठशाळेचे अवशेष आहेत. बोरिवलीच्या वायव्येस १ मैलावर आंबराईत इ. स. ११ व्या व १२ व्या शतकांतील जमिनीवरील लढायांचें स्मारक म्हणून मोठमोठे कोरीव कामाचे ६ दगड आहेत. बोरिवली स्टेशनच्या पूर्वेस ½ मैलावर खडकांत कोरलेले हौद (टांक्या) व बौद्ध लेणीं आहेत; त्याच्याजवळच बहुतेक ५ व्या व ६ व्या शतकांतील बौद्ध समाधी व मठाचे अवशेष आहेत. नैर्ऋत्येस दोन मैलांवर आकुर्ली येथें एका उंचवट्यावर सरासरी २ हजार वर्षांपूर्वीचे पाली लिपींतील कांहीं लेख आहेत. येथून दोन मैलांवर इ. स. ६ व्या ७ व्या शतकांतील ब्राह्मणसंस्कृतिदर्शक जोगेश्वरी गुहा आहेत. (जोगेश्वरी पाहा).

**बोरू**—या झाडांचीं बेटें असतात. हीं नदीच्या किंवा झऱ्याच्या किनाऱ्यांवर होतात. बोरूचें झाड जोंधळ्याप्रमाणें वाढतें. यांत काळा व पांढरा अशा दोन जाती आहेत. त्यांच्या



लेखण्या करतात. टांक येण्यापूर्वी बोरूच्या लेखण्या सर्वत्र प्रचारांत होत्या. पत्रावळी शिवण्यास याच्या काड्या वापरतात.

**बोर्डो**—हें शहर फ्रान्सच्या नैर्ऋत्य भागांत असून गिरॉंडी विभागांतील मुख्य शहर आहे. हें फ्रान्स देशांतील अति मोठ्या, रमणीय शहरांपैकीं एक आहे. शहरांतील मुख्य विहार मध्यभागाच्या जवळच आहेत. ह्यांत उत्तम उत्तम सार्वजनिक बागा आलेसडीयरनी, प्लेस–डेस–क्विकान्सेस, इत्यादि विहार आहेत. सार्वजानिक बागेजवळच रोमन लोकांच्या वेळच्या नाटकगृहाची अर्धचंद्राकृति एक भिंत अजून अर्धीमुर्धी उभी आहे. येथील विद्यापीठ १४४१ सालीं स्थापन झालेलें आहे. येथील शिक्षणविषयक संस्थांत कायद्याची शाखा, शास्त्रशाखा, वाङ्मयशाखा, वैद्यकशाखा व औषधी तयार करणारी शाखा ह्या होत. ह्याशिवाय कॅथॉलिक तत्त्वज्ञान-शाखा, शिक्षक तयार करण्याची मोठी शाळा, व्यापारी शिक्षणाची उच्च शाळा, कृषि विद्यापीठ, नाविकांची शाळा व वैद्यक शाळा ह्या संस्था आहेत. येथें बरींच पदार्थसंग्रहालयें आहेत. येथें एक विश्वविद्यालय आहे. बोर्डोचा व्यापार मुख्यत्वें समुद्रांतूनच होतो. येथें दारूची सर्वांत अधिक विक्री होते. येथील दारू प्रसिद्ध असून तिचा मोठा व्यापार आहे. लो. सं. २,६२,९९०.

**बोर्नमाउथ**—इंग्लंडमधील हॅंपशायरचें हें समुद्रकांठचें आरोग्यकारक शहर आहे. लो. सं. १,१६,७८०. हें शहर पूलवेअर बोर्न नदीच्या खोऱ्यांत आहे. इमारती सुंदर आहेत. या शहरांत व बॉसकॉम्बे येथें मोठमोठे धक्के आहेत. येथील स्नानगृहें फार उत्तम आहेत. येथील सडका व बगीचे प्रशस्त आहेत. विजेच्या ट्रामगाड्या आहेत. मेरिक व राणीच्या बागेंत गोल्फ खेळ खेळण्याचीं मैदानें आहेत.

**बोर्निओ**—मलाया आर्किपेलागो, इंडोनेशियामधलें दुसरें मोठें बेट. याची कमाल लांबी–रुंदी ८०० व ६०० मैल आहे. क्षेत्रफळ २,९०,००० व लो. सं. २१,९५,०००. भूमध्यरेषा अगदीं मध्यभागावरून जाते. बेटाचा २/३ भाग (२,०६,००० चौ. मैल) डच ईस्ट इंडीजमध्यें आहे. बाकीचा (१/३ भाग) ब्रिटिश अमलाखालीं आहे. ब्रिटिश बोर्निओचें क्षे. फ. सु. २९,५०० चौ. मै. असून लो. सं. (१९३१) २,७०,२२३ आहे. बहुतेक लोक मुसलमान आहेत. सु. ५०,००० चिनी व १२,००० मलायांतील द्वीपसमूहांतील स्थानिक रहिवासी आहेत. संदकन हें मुख्य ठिकाण आहे. रबर, लांकूड, नारळ, ताग, तंबाखू, सागू, तांदूळ, वगैरे पिकें असून खनिज द्रव्यें सर्व आहेत, पण त्यांचा मोठा व्यापार नाहीं.

बोर्निओ बेटांत अनेक जातींचे लोक आहेत. बोर्निओ हें बेट एकराष्ट्र कधींच नव्हतें आणि आपल्या बेटावरील लोक

इतर लोकांपासून निराळे आहेत, अशा प्रकारची भावना देखील या लोकांत नव्हती. अशी भावना नसण्याचें कारण या बेटाचें विस्तीर्णत्व आणि लोकांची असंस्कृति हे होय. या बेटात हिंदुत्वाचा स्पर्श होऊन हिंदु संस्कृतीची छाप येथें पडूं लागली होती, पण ती क्रिया फारशी जोरानें वृद्धिंगत झाली नाहीं. सध्यां या देशांतील रानटी लोक सोडून दिले तर उरलेले लोक मुसलमान आहेत आणि बोर्निओ बेटाच्या उत्तरेच्या भागात एक ब्रुनाई नांवाचें संस्थान आहे, तेथील शास्ता मुसलमान आहे. बोर्निओमध्यें आग्नेयीस हिंदूंच्या वसाहती फार पूर्वापारपासून होत्या. त्या वसाहतींचीं नांवें 'अमुंगताई' आणि 'मार्तापूर' हीं होत. प्राचीन हिंदूंच्या वसाहतींचे इमारती वगैरे अवशेषांखेरीज इतर परिणाम अजून दिसून येतात. ब्रुनाई या संस्थानांमध्यें १५ व्या शतकामध्यें हिंदु राज्य होतें व नंतर तेथें मुसलमानी राज्य झालें असें कळतें. तथापि पुन्हां जावा येथील राजा अदयमिंग्रत याचा सेनापति अंकविजय यानें १५ व्या शतकाच्या शेवटीं ब्रुनाई जिंकलें असें जावा येथील इतिहासकार लिहितात. बोर्निओमध्यें एक इंग्रजी संस्थान सारावाक नांवाचें आहे, तेथील शास्त्यास राजा असें म्हणतात. तेथील पहिला इंग्रज 'राजा' सर जेम्स ब्रुक होता ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे.

**बोलन घाट**—बलुचिस्तानांतील एक जिल्हा. ह्यास हें नांव बोलन घाटावरून पडलें आहे. क्षे. फ. ४०७ चौ. मैल. बोलन घाटाची लांबी ५४ मैल व उंची ७५० ते ५९,००० फुटांपर्यंत आहे. पाऊस ८ इंच पडतो. बोलन घाटांतून हिंदुस्थानवर आजपर्यंत पुष्कळ स्वाऱ्या झाल्या. इंग्रजांनीं कलातच्या खानापासून वार्षिक ३०,००० रुपये खंडणी देऊन बोलन घाट आपल्याकडे घेतला होता. या जिल्ह्यांत माच व किती हीं दोन खेडीं आहेत. लो. सं. (१९४१) ६,००९. जुन्या माच शहराजवळ दगडी कोळशाची खाण सांपडली आहे.

**बोलपूर**—बंगाल, बीरभुम जिल्ह्याच्या एका पोटविभागाचें मुख्य गांव. हें ईस्ट इंडियन रेल्वेवर हौऱ्यापासून ९५ मैलांवर आहे. लो. सं. सु. पांच हजार. हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. या ठिकाणीं रवींद्रनाथ टागोर यांनीं काढिलेलें 'शांतिनिकेतन' व 'विश्वभारती' विद्यालय आहे.

**बोलबद्धरस**—एक आयुर्वेदीय औषध. यांत मुख्य औषधें पारागंधक कज्जली व तांबडा बोळ व गुळवेल सत्त्व हीं असतात. हें औषध स्त्रियांना होणाऱ्या रक्तप्रदरावर अतिशय उपयुक्त आहे. मूत्रमार्गाची जळजळ, पुन्हां पुन्हां लघवीला जावें लागणें, मुतखडा, पोटांत दुखणें, घशांतल्या गांठी सुजणें, कंबर दुखणें, हातापायाला गोळे येणें, प्रमेह, इत्यादि विकारांवर हें औषध चांगलें उपयोगी पडतें. मध, तांदुळाचें धुवण व जिरें, किंवा साखर यांबरोबर १ ते ३ गुंज देतात.

**बोलिव्हर, सायमन** (१७८३–१८३०)—स्पॅनिश दक्षिण अमेरिकेचा स्वातंत्र्यसंपादक. तो न्यूग्रॅनडाच्या देशभक्तांना स्वातंत्र्यसंपादनाच्या कामांत १८१२ सालीं सामील झाला आणि त्यानें स्पॅनियर्ड लोकांचा अनेक ठिकाणीं पराभव केला. नंतर थोड्या सैन्यानिशीं तो आपल्या व्हेनेझुएला देशावर चालून गेला, आणि कॅरॅकस ही राजधानी त्यानें हस्तगत केली (१८१३). परंतु त्या सालच्या अखेरीस पुन्हां राजपक्ष प्रबळ होऊन, व्हेनेझुएला देशावर राज्य करूं लागला. त्यामुळें तो पुन्हां व्हेनेझुएला देशावर चाल करून गेला आणि त्यानें राजपक्षाचा पूर्ण मोड केला (१८१९). तेव्हां त्याला त्या राज्याचा अध्यक्ष व कॅप्टन जनरल नेमण्यांत आलें. नंतर व्हेनेझुएला व न्यूग्रॅनडा हीं दोन राज्यें एकत्र करून त्यांना रिपब्लिक ऑफ कोलंबिया हें नांव देण्यांत आलें व त्याचा पहिला अध्यक्ष बोलिव्हरच निवडला गेला. १८२२ सालीं पेरू देशाला स्वतंत्र होण्याला त्यानें मदत केली आणि पेरू हा देश पूर्ण स्वतंत्र होऊन त्याला बोलिव्हिया हें नांव बोलिव्हरच्या सन्मानार्थ देण्यांत आलें (१८२७). १८२६ सालीं बोलिव्हर कोलंबियाचा अध्यक्ष झाला व १८२८ सालीं पुन्हां अध्यक्ष झाला. १८३० सालीं राजीनामा देऊन तो निवृत्त झाला.

**बोलिव्हिया**—दक्षिण अमेरिकेंतलें एक लोकसत्ताक संस्थान. हें ब्राझील, पेराग्वे, अर्जेंटिना, चिली आणि पेरू यांच्यामध्यें आहे. क्षेत्रफळ ५,००,००० चौरस मैल. लो. सं. ३४,२६,२९६. बहुतेक प्रदेश डोंगराळ आहे. मामोरी व बेमी या नद्या आहेत. लापाझ ही राजधानी आहे. कथिल धातूची पैदास व निर्यात मोठी आहे. रबर व अँटिमनी यांचाहि व्यापार चालतो. १८२४ पूर्वीं हा भाग स्पेनच्या मुलुखामध्यें सामील होता; तो १८२४ मध्यें स्वतंत्र झाला व सायमन बोलिव्हर यांच्या नेतृत्वाखालीं लोकसत्ताक राज्य स्थापन झालें. पूर्वी या राज्यांत इंका इंडियन लोक होते. त्यांना १५५९ त गोंझालो पिझारो यानें जिंकलें. देशाच्या डोंगराळ सरहद्दी निश्चित नसल्यानें त्यांच्याबाबत अनेक वेळां झगडे होतात. चाको प्रांतांत सरहद्दीबाबत १९३३ सालीं लढाई झालीच. गेल्या दोन्ही महायुद्धांत हें राज्य जर्मनीविरुद्ध होतें. १९ ते ५० वयाच्या माणसांना लष्करी नोकरी सक्तीची आहे.

सुक्रे येथें विद्यापीठ आहे. लापाझच्या मोठ्या देवळांत १२,००० उपासक बसूं शकतात.

**बोलोन्या**—हें इटलीमधील एक अतिशय प्राचीन, मोठें व श्रीमंत शहर आहे. बोलोन्या नांवाच्या प्रांताची हें शहर राजधानी असून त्याच्याभोंवतीं विटांची भिंत आहे. या शहरांत

रेशमी कापडाचे, तसेंच मखमली आणि कृत्रिम फुलांचे फार मोठाले कारखाने आहेत. या शहरांत पुष्कळ भव्य देवळें आहेत आणि प्रत्येक देवळामध्यें मौल्यवान् चित्रांचा संग्रह आहे. या शहरांत जीं अनेक अत्यंत प्रेक्षणीय स्थळें आहेत त्यांत डेल्गी, असिनेली आणि गारिसेंडा हे दोन झुलते मनोरे १२ व्या शतकापासूनचे आहेत. बोलोन्या येथें ११ व्या शतकापासूनचें फार जुनें विद्यापीठ आहे. तसेंच एक मोठा फार जुना ग्रंथसंग्रह १६०५ सालीं स्थापन झालेला आहे. त्यांत २,५०,००० छापील ग्रंथ आणि ९,००० हस्तलिखित ग्रंथ आहेत. येथल्या ॲकेडमी ऑफ फाइन आर्ट्स या संस्थेंत इटालियन चित्रकारांच्या मौल्यवान् चित्रांचा मोठा संग्रह आहे. या शहराची लो. सं. २,६९,६८७ असून याच नांवाचा प्रांत पूर्वी पोपच्या मालकीच्या प्रदेशांत सामील होता. प्रांताचें क्षे. फ. २,४६५ चौ. मैल आणि लो. सं. ६,८७,७०० आहे.

प्रथम हें शहर एट्रुस्कनांकडे असून त्या वेळीं त्याचें नांव फेलासिना होतें. ख्रि. पू. १८० मध्यें हें रोमन वसाहतींत आलें. इ. स. ८०० मध्यें शार्लमेननें हें स्वतंत्र शहर केलें. १२ व्या-१३ व्या शतकांत हें इटालियन लोकराज्यांत होतें.

**बोल्टन**—हें इंग्लंडमध्यें लॅंकेशायर परगण्यांतलें सर्वांत मोठें कारखान्यांचें शहर असून, त्याचे मोठें व छोटे असे दोन भाग आहेत व त्यांच्यामध्यें क्रोल नदी आहे. या शहरांत जगांतील सर्वांत मोठाल्या व सर्वांत उत्तम कापसाच्या, कापडाच्या गिरण्या असून तेथें अतिशय उत्तम बारीक सूत व भपकेदार कापडाचे अनेक प्रकार तयार होतात. शिवाय कपडा स्वच्छ व शुभ्र करण्याचें कामहि येथें होतें. यांशिवाय येथें यांत्रिक कामाचे कारखाने, कागदाच्या गिरण्या, रासायनिक द्रव्यांचे कारखाने, वगैरे अनेक प्रकारचे कारखाने आहेत. येथें दोन मोठाल्या सार्वजनिक बागा व तीन क्रीडांगणें आहेत. लो. सं. १,७७,२५२.

**बोल्डर धरण**—अमेरिकेंत आरिझोना आणि नेवाडा संस्थानांतून वाहणाऱ्या कोलोरॅडो नदीला हें प्रचंड धरण बांधलें आहे. कोलोरॅडो नदी फार अवखळ व डोंगरदऱ्यांतून वाहत कॅलिफोर्निया आखातास मिळत होती व एवढें मोठें पाणी फुकट जात होतें; एवढेंच नसून या नदीच्या प्रवाहामुळें आजूबाजूच्या प्रदेशांचें फार नुकसान होई. तेव्हां १८६९ त मेजर पॉवेल यानें या नदीची पाहणी मोठें संकट सोसून केली. १९२९ पर्यंत धरणाच्या योजनेंत अडचणीच येत गेल्या. सात संस्थानें आणि मेक्सिको यांचे हक्क या नदीवर होते. अचाट स्थापत्यकौशल्य लढवून १९३५ सालीं हें अलौकिक धरण पुरें करण्यात आलें. याची उंची ७२७ फूट असून लांबी १,१८० फूट आहे. जगांत एवढें मोठें क्रॉंकीटचें धरण नाहीं. याच्याखालीं इतर कांहीं धरणें बांधलेलीं आहेत. पुराचा प्रतिबंध, पाणीपुरवठा, विजेचें उत्पादन, सृष्टि सौंदर्य, इत्यादींचा मोठा फायदा या धरणामुळें अमेरिकेला झाला आहे. कोलोरॅडोला बांधून ताब्यांत ठेवण्याच्या या उद्योगावरून मनुष्याचें सामर्थ्य कसोटीला लागलें खरें!

**बोल्शेव्हिझम**—मजूर-कामगारशाही. साम्यवादी पंथांतील हा सर्वांत जहाल व पराकोटीला गेलेला पंथ होय आणि या पंथाला रशियन लोकसत्ताक राज्यांतच यश आलें; इतर कोठेंहि हा पंथ चळावला नाहीं. बोल्शेव्हिक पंथाचें बहुमत १९०५ च्या सोशालिस्ट कॉन्फरन्समध्यें झालें. 'बोल्शेव्हिकी' म्हणजे बहुमतवाला पंथ अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे. या पंथाचा उद्देश कार्ल मार्क्सचीं तत्त्वें अमलांत आणणें म्हणजे भांडवलशाहीचें उच्चाटन करणें आणि कामकरी वर्गाच्या हातीं सर्व सरकारी सत्ता आहे अशीं लोकशाही राज्यें स्थापणें हा होता. रशियांत १९१७ सालीं राज्यक्रांति झाल्यावर बोल्शेव्हिझमचा शेतकरी वर्गानें मोठ्या उत्साहानें स्वीकार केला आणि हातीं आलेल्या स्वातंत्र्यानें व सत्तेनें बेहोष होऊन त्यानीं वरिष्ठ वर्गावर भयंकर अत्याचार केले. नंतर नवीं लोकशाही राज्यें स्थापन होऊन लेनिन, ट्रॉट्स्की, राडेक, कामेनेव्ह, वगैरे पुढारी लोक हे सत्ताधीश बनले. ते मोठे हुषार, विद्वान् होते, तरी पण प्रथमपासून क्रूर व दुष्ट कृत्यें करावीं लागत असल्यामुळें त्यांनीं आपलें लाल सैन्य (रेड आर्मी) उभारलें आणि बोल्शेव्हिक पंथाच्या तत्त्वांना फाटा देऊन शेतकरी वर्गाचा छळ केला. अनेकांना शेतीवरील गुलाम बनवलें; पूर्वीपेक्षां काम अधिक देऊन मजुरी कमी केली आणि विशेषतः ख्रिस्तीधर्मपंथ, चर्चें, वगैरे नष्ट करून विवाहसंबंधानें उत्पन्न होणारी खासगी मालकीहि अमान्य करणारे आणि लैंगिक स्वातंत्र्य ऊर्फ स्वैराचार याचा पुरस्कार करणारे कायदे केले. याप्रमाणें बोल्शेव्हिकांनीं स्थापन केलेलें सोव्हिएट सरकार इतकें जुलमी बनलें कीं, इतर राष्ट्रांकडून त्यांना मानमान्यता मिळणें अशक्य झालें.

सोव्हिएट ऊर्फ रशियन लोकशाहीचा मूलभूत कायदा—हा कायदा म्हणजे रशियाची शासनघटना जी ता. १० जुलै १९१८ रोजीं मंजूर झाली ती. त्यांतील महत्त्वाचीं कलमें आहेत तीं-(१) रशियाचें राज्य हें कामगार सैनिक व शेतकरी यांच्या प्रतिनिधींच्या संघांचें लोकराज्य आहे. (२) मनुष्यांनीं एकमेकांना नाडवण्याचे सर्व प्रकार बंद करण्याकरितां सर्व नाडवणारे वर्ग (जमीनदार, भांडवलदार, वगैरे) नष्ट करणें; (३) खासगी मालकी नष्ट करून सर्व जमीन राष्ट्राच्या मालकीची करणें व ती शेतकऱ्यांच्या स्वाधीन करणें; (४) जंगलें, खनिज संपत्ति व जलसंचय, सर्व जनावरें व शेतीचीं इतर साधनें सार्वजनिक मालकीचीं आहेत. (५) समाजाला उपयुक्त काम करण्याची

सर्वांवर सक्ती ठेवली आहे. आयतखाऊ लोकांचा पूर्ण नायनाट करणें आहे. (६) देशरूढींच्या व आचारविचारांच्या बाबतींत समानधर्मी लोकांनीं निरनिराळीं प्रादेशिक समुच्चय राज्यें ऊर्फ संस्थानें स्थापावीं व रशियाच्या संयुक्त संघराज्यांत सामील व्हावें. (७) सदसद्विवेकबुद्धीस पूर्ण स्वातंत्र्य मिळावें म्हणून धर्मखातें राज्यसंस्थेपासून आणि शाळाखातें धर्मखात्यापासून अलग करण्यांत येत आहे. (८) स्वमतप्रसार, परमतखंडन किंवा नास्तिक्याचार करण्याचें सर्वांस पूर्ण स्वातंत्र्य आहे. (९) शिक्षणाचा फायदा सर्वांना मिळाला पाहिजे म्हणून मजूर व शेतकरी वर्गाला सर्व शिक्षण मोफत देण्याची जबाबदारी रशियन सांघिक लोकशाही सरकारवर आहे. (१०) रशियन लोकशाहीच्या संरक्षणार्थ प्रत्येक नागरिकानें मदत केली पाहिजे म्हणून सर्वांना लष्करी नोकरीची सक्ती करण्यांत येत आहे. (११) रशियन लोकशाहीच्या हद्दींत स्वतःच्या श्रमानें पोट भरणारे परदेशीय मजूर व शेतकरी यांना रशियन नागरिकांचे सर्व राजकीय हक्क दिलेले आहेत. (१२) राजकीय किंवा धार्मिक गुन्ह्याबद्दल इतर देशांत शिक्षा झालेल्या गुन्हेगारांना व छळ होत असलेल्या इसमांना रशियांत आश्रय घेण्याचा हक्क आहे. या १९१८ च्या मूलभूत राज्यघटना कायद्यांत १९३६ सालीं व नंतर १९४४ सालीं बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा झाल्या.

राष्ट्रसंघाची (लीग ऑफ नेशन्स) घटना बनवणारा डॉ. विल्सन आणि रशियांत बोल्शेव्हिक घटना बनवणारा लेनिन यांचें पुढील बाबतींत ऐकमत्य आहे:—(१) निरनिराळ्या लोकांना व राष्ट्रांना राज्यघटनेच्या बाबतींत आणि संघराज्य बनवण्याच्या बाबतींत स्वयंनिर्णयाचा हक्क असावा; (२) युद्धें बंद होऊन जगांत शांतता नांदावी; (३) गुप्त तहनामे बंद व्हावे; (४) राष्ट्रांचे संघ असावेत; व (५) पारमार्थिक व उपासनाविषयक स्वातंत्र्य सर्वांना असावें.

आज बोल्शेव्हिझम ही संज्ञा समाजवाद (कॉम्युनिझम) या संज्ञेत रूपांतर पावली आहे. रशियांत जुनी बोल्शेव्हिक मंडळी स्वतःला कॉम्युनिस्ट म्हणवितात.

**घोस, आनंदमोहन** (१८४६–१९०६)— एक बंगाली पुढारी. हे बंगालमधील सामाजिक व धार्मिक चळवळींत पुढाकार घेणारे ब्राह्मो समाजांतील प्रमुख गृहस्थ म्हणून प्रसिद्ध होते. यांस 'बंगालचा एक तेजस्वी तारा' म्हणत. १८७६ सालीं स्थापन झालेल्या इंडियन असोसिएशनचे हे पहिले सेक्रेटरी होते. १८९६ मध्यें शिक्षण खात्याच्या पुनर्घटनेसंबंधींच्या ठरावावर यांनीं काँग्रेसमध्यें भाषण करून या कायद्यांतील उद्देश एतद्देशीयांस मोठ्या नोकऱ्या मिळूं नये असा आहे हें स्पष्ट केलें. हे १८९८ सालीं मद्रास येथें भरलेल्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. त्या वेळीं काँग्रेसवर प्रतिपक्षीयांनीं केलेल्या टीकेस यांनीं योग्य उत्तरें दिलीं.

**घोस, खुदीराम** (१८९०–१९०८)—एक बंगाली क्रांतिकारक. याचा जन्म मिदनापूर जिल्ह्यांत झाला. याचे आईबाप लहानपणींच वारल्यामुळें हा आपल्या बहिणीकडे राहत असे. मिदनापूर येथील हायस्कूलमध्यें असतांनाच हा राजकीय आंदोलनांत पडला व पुढें लवकरच क्रांतिकारकांच्या कटांत सामील झाला. त्याच्याकडे मुझफरपूरचे मॅजिस्ट्रेट किंग्जफोर्ड यास बाँब टाकून ठार मारण्याची कामगिरी सोंपविण्यांत आली. या कामांत प्रफुल्लचंद्र चक्रवर्ती यास त्याच्या साहाय्यास देण्यांत आलें होतें. ३० एप्रिल १९०८ या दिवशीं या दोघांनीं किंग्जफोर्ड याची गाडी समजून दुसऱ्या एका गाडीवर बाँब टाकला; व त्यांत मिसेस केनेडी व आणखी एक बाई असल्यामुळें त्याच या बाँबला बळी पडल्या. तेथून खुदीराम रातोरात पळून जाऊन २५ मैलांवरील एका रेल्वे स्टेशनांत आला. तेथें त्यानें अकस्मात् उच्चारलेल्या शब्दामुळें त्याचा संशय घेऊन तो पकडला गेला. लवकरच त्याच्यावर खटला होऊन त्यास खुनाच्या आरोपावरून देहांताची शिक्षा होऊन २१ ऑगस्ट १९०८ रोजीं त्यास फांशीं देण्यांत आलें. त्या वेळीं त्याचें वय अवघें १७ वर्षांचें होतें. तो गीता हातांत घेऊन मोठ्या आनंदानें फांशीं गेला. त्याच्या शवाची प्रचंड प्रेतयात्रा निघाली होती व त्याचें चिताभस्म अनेकांनीं सोन्याचांदीच्या डब्या भरून जतन करून ठेवलें.

**घोस, (सर) जगदीशचंद्र** (१८५८–१९३७)—एक जगत्प्रसिद्ध हिंदी वनस्पतिशास्त्रज्ञ व संशोधक. विक्रमपूर जिल्ह्यांतील राणीखेल या गांवीं यांचा जन्म झाला. यांचें शिक्षण कलकत्त्याच्या सेंट झेवियर स्कूलमध्यें व सेंट झेवियर कॉलेजमध्यें झालें. यानंतर पुढील उच्च शिक्षणासाठीं हे परदेशीं गेले. प्रथम डॉक्टरीचा कोर्स घेण्याचा यांचा विचार होता. परंतु मलेरियामुळें क्षीण झालेल्या यांच्या प्रकृतीला तो अभ्यास न झेपल्यानें हे लंडनच्या ख्राइस्ट चर्च कॉलेजमधून विज्ञान, रसायन व वनस्पतिशास्त्र यांची पदवी घेऊन स्वदेशीं परतले. यानंतर सन १८८५–१९१५ या कालांत कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत यांनीं भौतिक विज्ञाना (फिजिकल सायन्स)-च्या प्राध्यापकाचें काम केलें. पुढें हे इंडियन एज्युकेशनल सर्व्हिसमध्यें शिरले व तेथून कार्यनिवृत्त झाले.

यांचें पहिलें संशोधन विद्युतासंबंधीं आहे. विद्युच्चुंबकलहरींचा संचायक शोधून काढणारे हेच होत. तंतुलाभ (टॅमलाइट)च्या मदतीनें बिनतारी संदेश पाठवण्याची पद्धति व त्यावरूनच अणुपीडन (मोलेक्युलर स्ट्रेस) आणि प्रेपसिद्धांत (स्ट्रेनथिअरी) यांनीं शोधून काढली. पुढें इंग्लंडमधील रॉयल

सोसायटीच्या असहकारामुळें या संशोधनशाखेचा यांना त्याग करावा लागला. यानंतरचें यांचें सर्व संशोधन वनस्पतिशास्त्रांत झालें. सचेतन व अचेतन अशा पदार्थांच्या जीवनांतील मूलभूत तत्त्वें एकच आहेत, या कल्पनेवर यांनीं वनस्पतिजीवन व प्राणिजीवन यांमधील साम्य अनेक उपकरणांच्या साहाय्यानें जगाच्या नजरेस आणून दिलें. इतर प्राण्यांप्रमाणें रात्रीं झोपणारें, दिवसां इतर व्यवहार करणारें, वायुमय अन्न पचविणारें व मादक पदार्थ शरीरांत गेल्यामुळें झिंगणारें असें झाड जगासमोर आणून यांनीं जगांतील मोठमोठ्या संशोधकांच्याकडून वाहवा मिळविली.

या कार्यक्षेत्रांत आपल्या कल्पनेप्रमाणें आपणांस कार्य करतां यावें या हेतूनें १९१७ सालीं यांनीं कलकत्त्यास बोस रीसर्च इन्स्टिटयूटची स्थापना केली. या संशोधन-संस्थेंत होणाऱ्या कार्यास जगापुढें आणण्यासाठीं पुढल्याच वर्षी यांनीं 'ट्रॅन्झॅक्शन्स ऑफ बोस इन्स्टिटयूट' या नांवाचें पत्र सुरू केलें. यांचीं सर्व कार्यें राष्ट्रीय वृत्तीवर आधारलेलीं असत. आपल्या मौल्यवान् यंत्रांचीं पेटंट्स न घेतां यांनीं तीं सर्व व बोस इन्स्टिटयूटहि राष्ट्राला अर्पण केलीं. अंगीकृत कार्यासाठीं यांनीं स्वतः त्याग केला व आपल्या विद्यार्थ्यांनाहि तसाच उपदेश दिला.

वनस्पतिजीवनावर यांनीं (१) अनुनादी लेखक (रेझोनंट रेकॉर्डर), (२) आंदोलन लेखक, संयुक्त उच्चालक क्रेस्कोग्राफ, (३) चुंबकीय क्रेस्कोग्राफ, (४) तोलक उपकरण, इ. उपकरणें निर्माण केलीं आहेत. क्रेस्कोग्राफनें वनस्पतीची हालचाल एक लाख पटीनें मोठी दिसते.

'सजीव आणि अजीव यांची प्रतिक्रिया', 'वनस्पति प्रतिक्रिया', 'वनस्पतींच्या सजीव हालचाली', इ. बारा-तेरा पुस्तकें वनस्पति-जीवन दर्शविणारीं त्यांनीं लिहिलीं आहेत.

**बोस, नंदलाल** (१८८३- )—एक विख्यात बंगाली चित्रकार. अवनींद्रनाथ टागोरांचे हे शिष्य होत. पाश्चिमात्य चित्रकलेचा गाढ अभ्यास करूनहि यांनीं भारतीय चित्रकला व पाश्चात्य चित्रकला यांची भेसळ होऊं न देतां भारतीय चित्रकलेचें श्रेष्ठत्व अबाधित राखलें आहे. शिवचरित्रावरील शिवतांडव, शिवविलाप व शिवविषप्राशन हीं यांचीं अप्रतिम चित्रें यांचें अलौकिक बुद्धिवैभव, कल्पनाचातुर्य, धर्मभावना व चित्रकलमावरील प्रभुत्व, इत्यादि गुणांची साक्ष देतात. यांच्या शिवविलाप या चित्रानें जगांतील अत्युत्तम चित्रांच्या मालिकेंत स्थान मिळवलें आहे.

रवींद्रनाथ टागोरांच्याबरोबर यांनीं जपानचा प्रवास केला असून तिकडील चित्रकलेचीहि यांनीं सांगोपांग माहिती करून घेतली आहे. रवींद्रनाथ टागोरांच्या विश्वभारतीच्या कलाभुवनाचे हे प्रमुख होत. नूतन कलकत्ता चित्रसंप्रदायाचे हे एक प्रमुख पुरस्कर्ते मानले जातात.

**बोस, नितिन** (१९०१- )—एक सिनेमा चित्रकलेचे हिंदी तज्ज्ञ. यांनीं प्रथम 'दि इंटरनॅशनल न्यूज रील्स ऑफ अमेरिका' या प्रख्यात संस्थेंत नोकरी करून प्रतिमालेखनाची कला पूर्ण हस्तगत केली. नंतर १९२५ सालीं चित्रपटाच्या धंद्यांत शिरले. तेव्हांपासून अनेक फिल्मकंपन्यांतून यांनीं दिग्दर्शकाचें काम केलें. नंतर 'न्यू थिएटर्स' या विख्यात कंपनींत 'चंडिदास', 'दुष्मन्', 'प्रेसिडेंट', इ. बोलपटांच्या दिग्दर्शकाचें काम उत्कृष्ट बठविलें व कीर्ति मिळविली.

**बोस, राशविहारी** (१८८४-१९४५)—एक सुप्रसिद्ध हिंदी क्रांतिकारक व पहिल्या आझाद हिंद सेनेचे संस्थापक. डेहराडून येथें सरकारी नोकर असतांना यांनीं स्वामी रामतीर्थांचे एक प्रमुख शिष्य अमीरचंद यांच्या साहाय्यानें पंजाबमध्यें एका क्रांतिकारक संघटनेची स्थापना केली. या बाबतींत सरकारनें यांना पकडण्याचे प्रयत्न सुरू करतांच हे अज्ञातवासांत राहूं लागले. १९१२ सालीं डिसेंबर महिन्यांत व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांच्यावर जो बॉंब टाकण्यांत आला त्याबाबत सरकारनें यांच्यावर आरोप ठेवून यांना पकडण्यासाठीं अनेक प्रयत्न केले; परंतु सरकारला यांचा पत्ता लागला नाहीं.

तळेगांवचे विष्णु गणेश पिंगळे यांच्या साहाय्यानें शीख सैन्यास वश करून यांनीं बनारस कटाची उभारणी केली. या वेळीं सर्व हिंदुस्थानभर बंड घडवून आणण्याचा यांचा कार्यक्रम होता. परंतु या कटाची वार्ता पंजाबचे गव्हर्नर सर मायकेल ओडवायर यांना लागल्यानें यांच्यापैकीं बरेच कटवाले पकडले गेले. या कटांत सर मायकेल ओडवायर यांच्या शरीररक्षकांनाहि यांनीं सामील करून घेतलें होतें. हा कट फसला तरी पुन्हां मिरतच्या सैनिकांशीं पिंगळ्यांकरवीं संबंध जोडून यांनीं दुसऱ्या कटाची तयारी केली. परंतु त्यांत अपयश येऊन पिंगळ्यांना फांशी झाली. तेव्हां १९१५ सालीं हे जपानला गेले व तेथून इकडील क्रांतिकारकांना शस्त्रें पुरवण्याची कामगिरी यांनीं हातीं घेतली. या वेळीं जपाननें जर्मनीच्याविरुद्ध इंग्रजांच्या बाजूनें युद्धांत भाग घेतला असल्यानें ब्रिटिशांनीं राशविहारींना आपल्या ताब्यांत देण्याबद्दल जपानकडे मागणी केली व जपान सरकारला ती मान्य करणें प्राप्त होतें. परंतु या वेळीं जपानमधील अतिशय वजनदार अशा ब्लॅक ड्रगन संस्थेच्या प्रमुखांच्या आश्रयामुळें यांचें संरक्षण झालें. यानंतर आठ वर्षें यांनीं अज्ञातवासांत काढलीं. हे हिंदुमहासभेच्या तत्त्वज्ञानाचे कट्टे पुरस्कर्ते असून जपानमधील भारतीय स्वातंत्र्यसंघाचे संस्थापक व अध्यक्ष होते.

उत्कृष्ट लेखनशैलीचा लाभहि यांना झालेला आहे. यांची आत्मकथा चंद्रनगरच्या 'प्रवर्तक' मासिकांतून प्रसिद्ध झाली आहे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यावर जपानी भाषेंत यांनी पांच पुस्तकें लिहिलीं आहेत. टोकिओंत शंकराचें देवालय बांधण्यासाठीं निधि जमविण्याचें कार्य यांनीं सुरू केलें होतें.

पहिल्या आझाद हिंद सेनेची संस्थापना करणारे हेच होत. चीफ ऑफ स्टाफ म्हणून यांनीं मोहनसिंगांची निवड केली होती. परंतु मोहनसिंगांचें धोरण जपानविरुद्ध दिसतांच त्यांना जपाननें पकडलें. तेव्हां त्यांच्या जागीं यांनीं कर्नल जगन्नाथराव भोसले यांची निवड केली. यांच्या तेथील अनुभवांचा सुभाषचंद्र बोसांना आझाद सेना स्थापण्याच्या कामीं बहुमोल उपयोग झाला.

**बोस, शरच्चंद्र** (१८८९–१९५०)—एक हिंदी पुढारी. हे बॅरिस्टर होते. सुभाषचंद्र बोस यांचे हे बंधु व बंगालमधील एक काँग्रेसचे जुने पुढारी असून यांस असहकारिता व सत्याग्रह यांमध्यें १९२१, १९३० व १९३२ मध्यें भाग घेतल्यामुळें अनेकवार शिक्षा झाल्या. यांच्या सुटकेबद्दल लोकांनीं सभा व वर्तमानपत्रद्वारां फार चळवळ केल्यामुळें त्यांची १९३५ मध्यें अटकेंतून सुटका करण्यांत आली. त्यांस लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें निवडून दिलें असतांहि अटकेमध्यें असल्यामुळें प्रत्यक्ष भाग घेता आला नाहीं, म्हणून त्यांनीं राजीनामा दिला. १९४१-४५ या काळांत ते अटकेंत होते. नंतर हंगामी मध्यवर्ती मंत्रिमंडळांत एक सभासद झाले, पण राजीनामा देऊन यांनीं समाजवादी लोकशाही पक्ष काढला. या डाव्या गटाचे ते पुढारी होते.

**बोस, सुभाषचंद्र** (१८९७– ? )— भारताचे एक श्रेष्ठ

हिंदी क्रांतिकारक पुढारी व स्वतंत्र हिंदी फौजेचे 'नेताजी'. यांचे वडील जानकीनाथ बोस हे कटक येथें सरकारी वकील होते. यांचें शिक्षण कलकत्ता व केंब्रिज येथें झालें. यांनीं आय्. सी. एस्. मध्यें प्रवेश केला; पण १९२१ मध्यें राजीनामा देऊन ते असहकारितेच्या चळवळीस मिळाले. १९२२ ते १९२४ पर्यंत ते कलकत्ता येथें निघणाऱ्या 'फारवर्ड' पत्राचे व्यवस्थापक होते. १९२४ मध्यें ते कलकत्ता कार्पोरेशनचे सदस्य निवडले गेले व त्या संस्थेचे चीफ ऑफिसर म्हणून लवकरच त्यांची नेमणूक झाली. त्यांस १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनप्रमाणें अटकेंत ठेवण्यांत आलें. १९२६ मध्यें त्यांची बंगालच्या कायदे कौन्सिलांत निवडणूक झाली. ते अनेक वर्षें बंगाल प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. १९२७ सालीं त्यांची सुटका झाल्यावर त्यांनीं सायमन कमिशनवरील बहिष्कारामध्यें प्रामुख्यानें भाग घेतला व नंतर १९३० च्या सत्याग्रहाच्या चळवळींतहि त्यांचें अंग असल्यामुळें त्यांस अनेक वेळां तुरुंगवासाची शिक्षा झाली. सत्याग्रहाच्या चळवळींत राजबंदी म्हणून त्यांस अटकेत ठेवलें असतां सरकारनें त्यांची सुटका करुन त्यांस औषधोपचाराकरितां युरोपमध्यें (इंग्लंडखेरीज) जाण्याची परवानगी दिली. नंतर तेथून त्यांचे वडील अस्वस्थ असल्यामुळें डिसेंबर १९३४ मध्यें त्यांस परत येण्याची परवानगी मिळाली; पण पुन्हां वडिलांच्या मृत्यूनंतर युरोपांत जाण्याचा हुकूम झाला. ते त्रिपुरी काँग्रेसचे अध्यक्ष होते. त्यांनीं 'हिंदुस्थानचा लढा' (Indian Struggle) नांवाचें एक पुस्तक लिहिलें होतें; तें लंडन येथें प्रसिद्ध झालें; पण लगेच हिंदुस्थान सरकारकडून जप्त करण्यांत आलें. दुसरें महायुद्ध जोरांत असतां हे एकाएकीं अदृश्य झाले (१९४१).

असें सांगतात कीं, पठाणाचा वेष घेऊन ते काबूलमार्गानें बर्लिनला गेले. तेथून सिंगापूरला येऊन त्यांनीं आझाद हिंदी फौजेची उभारणी केली. या सेनेस जपाननें मान्यता देऊन मदतहि केली. १९४३ सालीं यांनीं स्वतंत्र हिंदुस्थानचें तात्पुरतें सरकार स्थापन केलें व आपल्या नेतृत्वाखालीं मंत्रिमंडळ निवडून कारभार सुरू केला. या स्वतंत्र हिंदी सरकारनें दोस्तांविरुद्ध युद्ध पुकारून हिंदुस्थानवर चाल करून जाण्याची तयारी केली. अंदमान–निकोबार बेटांत या सरकारचें अधिष्ठान होतें. या सरकारनें स्वतःचीं तिकिटें व नोटाहि काढल्या होत्या. या स्वतंत्र हिंदी सरकारला अकरा राष्ट्रांनीं मान्यताहि दिली होती. या सरकारची आझाद–हिंदसेना प्रत्यक्ष आघाडीवरहि होती.

पण लवकरच जपानला जर्मनीनंतर शरणागति पत्करावी लागली. तेव्हां नेताजी सिंगापूरहून विमानानें निघाले असतां वाटेंत त्यांचें विमान कोसळलें. त्या अपघातांत सुभाषबाबू दिवंगत झाले असावेत. तथापि त्यांचे बंधु व इतर कांहीं अनुयायी ते अद्यापि जिवंत असून कधीं तरी प्रगट होतील असें मानतात.

परतंत्र हिंदुस्थानच्या एका पुढाऱ्यानें परदेशांत जाऊन हिंदुस्थान स्वतंत्र करण्यासाठीं सरकार स्थापून युद्धाची तयारी करावी ही केवढी कर्तबगारीची व अत्यंत धाडसाची गोष्ट आहे. 'क्रांतिकारकांचे अग्रणी' असें नांव त्यांना शोभेल. १८५७ च्या स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं झालेल्या उठावानंतर हा पद्धतशीर उठाव हिंदुस्थानच्या इतिहासांत संस्मरणीय होय.

**बोस्टन**—अमेरिकन संयुक्त संस्थानें, मॅसाच्युसेट्सची राजधानी. त्याचें क्षे. फ. ४८ चौ. मैल आहे. समुद्र अडवून बरीच जागा वाढविण्यांत आली आहे. लो. सं. (१९४७) ७,७०,८१६ आहे. शहरामध्यें कॉमन पार्क नांवाचा मोठा व प्रसिद्ध बगीचा आहे तो प्रेक्षणीय आहे. येथील कलाकौशल्याच्या संग्रहांत बऱ्याच जुन्या व प्रेक्षणीय वस्तू असून चार्लस समनरसारख्या मोठ्या लोकांचे पुतळे येथें आहेत. येथील सार्वजनिक वाचनालयांत ९ लाखांवर पुस्तकें आहेत. याशिवाय येथें दुसरीं वाचनालयें अनेक आहेत. मॅसाच्युसेट्सचें कलाविद्यालय, बोस्टनचें विश्वविद्यालय, हार्वर्ड विश्वविद्यालयाच्या कांहीं शाखा आणि यांशिवाय चित्रकला व संगीत विद्यालयें येथें आहेत. येथें साखर करण्याचे कारखाने, कपड्यांचे कारखाने, जोड्यांचे कारखाने, त्याचप्रमाणें मिठाई, तंबाखू, पियानो, रबर व नौकाबंधन यांचे कारखाने बरेच आहेत. येथील लोकांत आयरिश, कॅनेडियन, इंग्लिश, रशियन, इंटालियन, जर्मन, वगैरे लोकांची भेसळ आहे. म्हणून येथें निरनिराळ्या चालीरीती आढळतात. या ठिकाणीं प्युरिटन लोकांचें वर्चस्व असूनहि कॅथॉलिक चर्चें बरींच आहेत. हें शहर १६३० सालीं वसलें गेलें. बोस्टन बंदरांत १७७३ सालीं झालेली 'बोस्टन चहापार्टी' इतिहासांत प्रसिद्ध आहे. इंग्लिश कंपनीनें बोटींतून आणलेले ३४२ चहाचे पेटारे वसाहतवाल्यांनीं इंग्लंडनें वसाहतींवर बसविलेल्या करांचा निषेध म्हणून पाण्यांत फेंकून दिले. तेव्हां इग्लंड-अमेरिका युद्ध पेटलें.

**बोहन, हेन्री जॉर्ज** (१७९६-१८८४)—एक इंग्रज ग्रंथप्रकाशक. हा एका जर्मन बुक-बायंडरचा मुलगा होता. यानें १८३१ सालीं धंदा सुरू करून प्रथम २३,००० पुस्तकांची एक सूचि काढली. नंतर पुस्तककारांचे हक्क, कागदावरचा कर, सुवचनें, खेळ, वगैरे विषयांवर पुस्तकें प्रसिद्ध केलीं. लौन्डेसचें 'बिब्लिओग्राफर्स मॅन्युअल' (१८५७-६४) याची सुधारलेली आवृत्ति काढली. ७५० वर चांगल्या पुस्तकांच्या आवृत्ती व भाषांतरें त्यानें प्रसिद्ध केल्यानें त्याचा प्रकाशक म्हणून मोठा लौकिक झाला. या पुस्तकांचे हक्क आतां जे. बेल अॅन्ड सन्स या कंपनीकडे आहेत.

**बोहर, नील्स हेन्रिक डेव्हिड** (१८८५- )—हा एक डेन्मार्क देशांतील पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ आहे. यानें परमाणूच्या घटनेचें संशोधन केल्यामुळें याला सर्व जगांत प्रसिद्धि मिळाली. यानें हाफ्नियम हें मूल द्रव्य शोधून काढलें आणि लॉर्ड रूधरफोर्ड याच्या सहकार्यानें शक्तिपुंज (क्वान्टम) उपपत्तीचें स्पष्टीकरण केलें.

**बोहरा**—बोहरा (सं. व्यवहारपासून हा शब्द बनला असावा.). एक व्यापारी मुसलमान जात. यांची एकंदर संख्या (१९११) १,८७,७४२ असून तींपैकीं १,२६,००० मुंबई इलाख्यांत व २५,००० बडोदें संस्थानांत आहे. मध्यहिंदुस्तान व राजपुताना यांतून १०।१५ हजार बोहरा आढळतात. व्यापारी बोहरा लोक शियापंथी व शेतकरी बोहरा सुनी पंथी आहेत. अकराव्या शतकांत इस्माइल पंथाच्या शिया मिशनऱ्यांनीं हिंदुस्थानांत येऊन पुष्कळ हिंदू बाटविले, तेच हे बोहरा लोक होत. कांहीं जण आपणांस अरब ईजिप्शियन व अरब यामन वंशाचे म्हणवितात. शिया बोहऱ्यांत मुख्य वर्ग दाउदी बोहऱ्यांचा होय. सुनी किंवा शेतकरी बोहऱ्यांच्या बऱ्याचशा चालीरीती हिंदूंप्रमाणें आहेत. बोहरी व्यापारी खोजांप्रमाणेंच फार श्रीमंत असतात. यांची मुंबईस मोठी वस्ती आहे. बोहरी या नांवानें ओळखले जाणारे कांहीं हिंदू सावकारहि आहेत. त्यांची संख्या सुमारें चार हजार आहे. हे विशेषतः पंजाबांत आढळतात व हे गुजराथी भाषा बोलतात.

दाउदी बोहरी हिंदुस्थानाबाहेर एडन, झांझिबार, रंगून, सयाम, चीन व जगांत इतर अनेक ठिकाणीं व्यापारासाठीं राहिलेले आहेत. यांचा गुरु मुल्ला असतो. तो सर्व भांडणतंटे मिटवितो. सुलेमान बोहरा ही दुसरी बोहऱ्यांची पोटजात आहे. अली आणि जाफरी अशा आणखी पोटजाती आहेत. या पोटजातींत परस्पर बेटीव्यवहार होत नाहींत. रोटिया बोहरा निवृत्तमांस आहेत.

**बोहेमिया**—हा झेकोस्लोव्हाकिया लोकराज्याचा पश्चिम भाग आहे. क्षे. फ. २०,१०१ चौ. मै. व लो. सं. ७१,०९,३७६ असून त्यांपैकीं २० लक्ष जर्मन आहेत. १९१९ त हा प्रांत झेकोस्लोव्हाकियांत सामील करण्यांत आला. हा प्रदेश डोंगराळ आहे, पण तेथील पठारावरची जमीन सुपीक असून तेथें अन्नधान्यें, बटाटे, साखरेचे बीट, कंद व फळें होतात. खनिज द्रव्यें रुपें, तांबें, जस्त, अँटिमनी, गंधक, दगडी कोळसा, लोखंड, ग्राफाईट, कथील, वगैरे सांपडतात. येथें मातीचीं भांडीं, कांचेचे पदार्थ, साखर, रासायनिक द्रव्यें, कापसाचें व लोकरीचें व तागाचें कापड यांचे पुष्कळ कारखाने आहेत. बोहेमियांत

प्रथम केल्टिक वंशांतील बोई लोक असत. पुढें झेक व स्लोव्हाक हे वरचढ झाले. राजधानी प्राग आहे.

बोहिमियाचें वाङ्मय १५ व्या व १६ व्या शतकांत फार तयार झालें तें महत्त्वाचें आहे. या प्रांतांत १२३० पासून स्वतंत्र राजघराणें चालू होतें, पण १५२७ सालीं ऑस्ट्रियाचा बादशहा फर्डिनांड हा या देशाचा राजा झाला व तेव्हांपासून हा प्रांत ऑस्ट्रियन साम्राज्यांत सामील करण्यांत आला. पहिल्या महायुद्धानंतर ऑस्ट्रियन सत्तेविरुद्ध बंड केलेल्या झेक व स्लोव्हाक लोकांनीं आपलें संयुक्त स्वतंत्र राज्य स्थापन केलें. पण १९३९ सालीं जर्मन सरकारनें हा प्रांत आपल्या साम्राज्यास जोडला. दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीचा पराभव झाल्यावर पुन्हां १९४५ मध्यें झेकोस्लोव्हाकिया हें स्वतंत्र राज्य झालें आहे.

**बोळ**—हें झाड मोठें असून याचा जो रस निघतो तो वाळला म्हणजे घट्ट होतो व त्यासहि बोळ म्हणतात. ह्यांत मुख्य द्रव्य ॲलोइन असतें. बोळाच्या अंगीं पाचक धर्म आहेत. त्यापासून आंतड्यांत पित्त अधिक जोरानें उतरतें. बोळांत पांढरा बोळ ( बाळंत बोळ ), काळा बोळ ( एलिया किंवा कडू बोळ) व रक्त्या बोळ ( हिरा बोळ ) असे तीन प्रकार आहेत. बाळंत बोळ बाळंतिणीस व व्यालेल्या जनावरास देतात. काळा बोळ औषधांत घालतात व रक्त्या बोळाचा जखमेवर लेप करतात. काळा बोळ कोरफडीपासून काढतात.

**बौद्ध संप्रदाय**—गौतम बुद्धानें स्थापन केलेला एक धर्मपंथ (बुद्ध पाहा). कोसल व मगध देशांत या बौद्ध संप्रदायाचा उगम झाला. बुद्धानंतर अशोकानें तो बराच प्रवृद्ध केला. कनिष्काच्या काळीं महायान व हीनयान असे दोन पंथ पडून संप्रदायांतील एकी नाहींशी झाली. इ. स. च्या ८ व्या शतकापासून बौद्ध संप्रदायाचा हिंदुस्थानांत ऱ्हास होत गेला. बौद्ध संप्रदायाच्या आश्रयानें शिल्पकला व चित्रकला यांस चांगलें उत्तेजन मिळालें. स्तूप, चैत्य व विहार हीं या गोष्टींची साक्ष देतील. सिंहलद्वीप, पांड्य देश, कांची, महिष मंडल, बनवासी, अपरांत व महाराष्ट्र यांसारख्या ठिकाणीं बौद्ध संप्रदायाचा दक्षिणेंत प्रसार झाला. या संप्रदायाबरोबर जैन संप्रदायहि दक्षिणेंत गेला असावा. या संप्रदायाचा दक्षिणेंत जो ऱ्हास झाला त्याला कारण म्हणजे त्यांचे कोणी पुढारी राहिले नाहींत व शैववैष्णव पंथांकडून त्यांना विरोध होत गेला. भूतानमध्यें या बौद्ध संप्रदायास दक्पा पंथ म्हणतात. येथील मुख्य महोपाध्यायास धर्मराजा असें म्हणतात. अकराव्या शतकापासून ब्रह्मदेशांतील बौद्ध संप्रदाय पुढें येऊं लागला. तेथील भिक्षू विद्वान् व सदाचरणी असतात. आसामांत या संप्रदायाचा ऱ्हास होत आहे. सिलोनांतहि बौद्ध लोकांची संख्या कमी होत आहे. पण त्यांची धर्माविषयीं आस्था विशेष आहे. सातव्या शतकापर्यंत चीन देशांत बौद्ध संप्रदायाचा उत्कर्ष झाला. पण पुढें कन्फ्युशिअनी पंथ व ताओ पंथ यांनीं उचल केल्यामुळें त्याचें तेज कमी झालें. जपानांत बौद्ध संप्रदाय टिकून आहे व त्यांत सुधारणा होत आहे. यवद्वीपांत ( जावांत ) शैव व बौद्ध हे दोन्ही पंथ एकत्र सलोख्यानें राहत. सुमात्रांत चौदाव्या शतकांत बौद्ध संप्रदायाची पिछेहाट होत जाऊन हल्लीं तो तेथें नामरूपानें आहे. कोरियांत मिंग घराण्याच्या कारकीर्दींत बौद्ध संप्रदाय निकृष्टावस्थेस पोहोंचला. पण त्यावर जपानचें वर्चस्व आल्यापासून तो पुन्हां सावरूं लागला. पण आतां ख्रिस्ती व कम्युनिस्ट यांचा पगडा तेथें असल्यानें बौद्ध धर्म टिकणार नाहीं. सयामांतील या संप्रदायाचें स्वरूप शुद्ध नाहीं. तिबेटांतलि लामा धर्म बौद्ध संप्रदायाचें एक विकृत स्वरूप म्हणून चांगला अस्तित्वांत आहे. आज बौद्ध धर्माचे लोक जगांत सुमारें पंधरा कोटी उरले आहेत.

**बौद्ध तत्त्वज्ञान**—सनातन धर्माप्रमाणें पुनर्जन्म व कर्मवाद बुद्धानें गृहीत धरून जन्म म्हणजेच पाप होय व उत्तम कर्मांनीं हें पाप टाळतां येतें, म्हणजे पुनर्जन्म होत नाहीं व उत्तम कर्में घडण्यास आचार, विचार व उच्चार यांत नीतिमत्ता कडक असावी लागते, या मुख्य मतांचा प्रचार केला. यासाठीं त्यानें दहा आज्ञा ( 'दससीलम्' ) प्रगट केल्या. त्या म्हणजे, हत्या न करणें ( अहिंसा ), अस्तेय, व्यभिचार न करणें, सत्य भाषण, चहाड्या न सांगणें, दोष न देणें, निर्लोभ, निर्द्वेष, वडील माणसांना मान देणें, व सजीव प्राण्याबद्दल आदर ठेवणें, या होत. चार सत्यें व आर्य अष्टांगिक मार्ग ( विश्वास, विचार, भाषण, कृति, उपजीविकासाधन, यत्न, स्मृति व ध्यान हीं सत्य असावीं ), म्हणजे केवळ संन्यास व केवळ विषयसेवन यांच्यामधील मार्ग बुद्धानें काढून त्यास मध्यम मार्ग असेंच नांव दिलें. गृहस्थधर्मात स्त्रीपुरुषांना मोक्ष ( निर्वाण ) जितक्या प्रयासानें मिळेल, त्यापेक्षां अल्प श्रमानें संघांत दाखल झालेल्या भिक्षु-भिक्षुणी यांना थोड्या काळांत मिळेल, असें त्याचें तत्त्वप्रतिपादन होतें. संघांत भिक्षुणींना मोठेंसें महत्त्व नव्हतें. हे भिक्षुसंघ बुद्धाच्या वेळीं शिस्तीचे, श्रीमंत व एकबंधुत्व ऊर्फ आत्मीय भावनेचे बनले होते. त्याच्यानंतरहि कांहीं काळ हे गुण त्यांच्यांत असल्यानें त्यांनीं आशिया खंडांत आपल्या धर्माचा प्रसार केला. केवळ हिंदुस्थानांतून चीनमध्यें प्रसारास जाऊन ग्रंथकार बनलेल्या पंचाहत्तर साधूंची माहिती ज्ञानकोशाच्या 'हिंदुस्थान व जग' या पुस्तकांत दिली आहे व प्रस्तुत कोशांत कांहीं प्रमुखांची स्वतंत्र दिली आहे.

ईश्वर आणि आत्मा यांच्या स्वरूपाविषयीं व जगाच्या अनंतत्वाविषयीं बुद्ध हा कधींहि वाद घालीत नाहीं. साधारणपणें तो

निरीश्वरवादी व वेद–अप्रामाण्यवादी आहे. परंतु हिंदु देवता व भोळ्या समजुती यांच्याविरुद्ध फारसा नाहीं. लौकिक बौद्धधर्म हा शास्त्रप्रणीत बौद्धधर्मापेक्षां पुष्कळ सुलभ होता. बुद्धानें नवीन धर्म काढला असें म्हणण्याऐवजीं, स्वतः ठरविलेल्या व्यवहारोपयोगी नीतिशास्त्राच्या तार्किक पायाला उपयोगी पडतील अशी अध्यात्म विषयांतील कांहीं गूढ प्रमेयें शोधून त्यांचा त्यानें प्रसार केला, हें म्हणणें जास्त खरें ठरेल, असें कांहीं पंडितांचें मत आहे. बुद्धाबद्दल त्याच्या शिष्यांत इतकी भक्ति होती कीं, त्याच्या मृत्यूनंतर थोड्याच काळांत त्यांनीं त्याला देवत्व दिलें आणि त्यामुळें बौद्ध धर्मांत दोन पंथ पाडले. ज्या पंथानें बुद्धाचें ऐतिहासिक स्वरूप बरेंचसें कायम ठेवलें त्या पंथास 'हीनयान' (मुक्तीप्रत नेणारें हलकें वाहन) व जो बुद्धास देव मानून त्याची (त्याच्या मूर्तीची) पूजा–प्रार्थना करी त्याला 'महायान' (मुक्तीप्रत नेणारें श्रेष्ठ वाहन) म्हणूं लागले. हा महायानी पंथ जवळजवळ सनातन हिंदु धर्माप्रमाणें चनला. पुढें अशोकानें हा धर्म जास्त पसरवला. परंतु त्यानेंहि जुलमानें त्याचा प्रचार केला नाहीं. फक्त खाण्यापिण्याच्या बाबतींत प्रजेनें कांहीं नियम पाळावेत म्हणून त्यानें सरकारी हुकूम काढले होते एवढेंच. सारांश, जैन किंवा बौद्ध धर्मानें सनातनी ब्राह्मण धर्मास फारसा धक्का बसला नाहीं. त्याची साक्ष चिनी प्रवाशांच्या वृत्तांतून आढळून येते. केव्हांहि सनातन धर्मीयांचीच संख्या या दोन्ही संप्रदायांपेक्षां हिंदुस्थानांत जास्त होती. मात्र यामुळें सनातन धर्मीयांच्या यज्ञ–संस्थेवर बराच परिणाम झाला. अहिंसेचा पगडा बसून महावीराच्या खटपटीमुळें तो वाढला. अगोदरच लोक जिला कंटाळले होते त्या यज्ञसंस्थेविरुद्ध व अन्यकर्मदर्शक असें एक तत्त्वज्ञान उत्पन्न झालें. अहिंसेचें महत्त्व खरोखर बुद्धानें वाढविलें नसून जैनांनीं वाढविलें व महाभारतकारांनाहि अहिंसेचें स्तुतिस्तोत्र गावें लागलें. अहिंसेच्या तत्त्वाचा परिणाम ब्राह्मण व वैश्य या दोन वर्गांवरच झाला असें म्हणावें लागेल. बुद्धानें कांहीं तत्त्वज्ञान तर कांहीं कर्में यांची सांगड घालून सर्व लोकांसाठीं एक संप्रदाय निर्माण केला. त्याची स्पर्धा जेव्हां ब्राह्मणांस जाणवूं लागली तेव्हां त्यांच्या धार्मिक क्षेत्रांतील धोरणांवर परिणाम झाला. श्रौत आणि गृह्य कर्में नांवानें त्रैवर्णिकांसाठीं पण वस्तुतः तीं ब्राह्मणांसाठीं होतीं. उपनिषदांतील तत्त्वज्ञान केवळ विचारी लोकांसाठीं होतें व त्यामुळें सामान्य लोकांच्या धार्मिक भुकेसाठीं कांहीं तरी खाद्य हवें होतें. अद्यापि खालच्या वर्गांत ही बलिदानाची पद्धत चालू आहे. यामुळें पूर्वींच अस्तित्वांत आलेल्या विष्णु अथवा वासुदेव याच्या भक्तियोगास अथवा भक्तिमार्गास जास्त जोर चढला असावा.



हा भक्तिपंथ (नारायणीय धर्म) बहुधा मथुरेजवळील ब्रह्मर्षि देशांत उत्पन्न झाला असावा.

बौद्ध वाङ्मय—तिपिटकांतील कांहीं भाग बुद्धाचीं प्रत्यक्ष वचनें मानल्यास गैर होणार नाहीं. बुद्धाचीं संभाषणें, वचनें, गीतें, कथा व सांप्रदायिक नियम यांचा संग्रह तिपिटकांत येतो. तिपिटकांतील भाग निरनिराळ्या काळचे आहेत. बुद्धनिर्याणानंतर पहिल्या शतकांत बौद्ध धर्मशास्त्राचीं आधारसूत्रें निश्चित झालीं होतीं. ख्रि. पू. २४२च्या नंतर भरलेल्या तृतीय संगीतींत बौद्धांचें पाली भाषेंतील धर्मशास्त्र–तिपिटक रचलें गेलें, असें सिंहलद्वीपस्थ बौद्ध समजतात. पण तें त्या वेळचें धर्मशास्त्र मागधी भाषेंत असलें पाहिजे. त्यांत व पाली तिपिटकांत बराच फरक असावा. तथापि पाली तिपिटकांतील कांहीं भाग अशोककालीन दिसतो. बौद्ध संप्रदायाचे संस्कृतादि पालीशिवाय दुसऱ्या भाषांतून लिहिलेले धर्मग्रंथ पाहिल्यास त्यांतील मूलतत्त्वें या पाली धर्मशास्त्राशीं जुळतात. तेव्हां हें फारसें अपभ्रष्ट नाहीं. विनयपिटकांत सुत्तविभंग, खंधक व परिवार यांचा समावेश होतो. सुत्तविभंगांत पापांची यादी व प्रायश्चित्तें दिलीं आहेत. खंधकांत संघाच्या व्यवस्थेबद्दल नियम आहेत. यांतील कथा प्राक्कालीन भारतवर्षीयांच्या आयुष्यक्रमावर प्रकाश पाडतात. विनयपिटकांत दृष्टांतादाखल दिलेल्या गोष्टीहि सुंदर आहेत. परिवार उत्तरकालीन व कमी महत्त्वाचा आहे. सुत्तपिटकांत दीघ, मज्झिम, संयुत्त, अंगुत्तर व खुद्दक असे पांच निकाय आहेत. पहिल्या चारांत उपदेशपर भाषणें आहेत. दीघनिकायांत चौतीस मोठीं सूत्रें आहेत. त्यांत महापरिनिब्बान हें अति महत्त्वाचें. हा निकाय अलीकडे पूर्ण झाला. मज्झिम निकायांत १५२ सुत्तें असून त्यांत विविध विषय आले आहेत. या सुत्तांवरून प्राचीन संप्रदाय व बुद्धाची उपदेशपद्धति कळते. या सुत्तांचा काल एक नाहीं. संयुत्तनिकायांत ५६ संयुत्त (गुच्छ) असून त्यांत निरनिराळ्या सांप्रदायिक तत्त्वांचें विवेचन आहे. यांत वाङ्मयाच्या दृष्टीनें बरेच महत्त्वाचे भाग आहेत. अंगुत्तर निकायामध्यें वाङ्मयदृष्ट्या महत्त्वाचा भाग थोडा आहे. सारख्या गोष्टी एकत्रित करण्याची कल्पना यांत दिसून येते. या चार निकायांत पुष्कळ वेळां तींच तींच सुत्तें व पुनरुक्त्या आढळतात. त्यांतील संवाद बुद्धाची विवेचनपद्धति कशी होती हें दाखवतात. यांत दृष्टांताची रेलचेल आहे. हे दृष्टांत फार सयुक्तिक व विनोदी आहेत. ते तत्कालीन सांस्कृतिक इतिहास सांगतात. खुद्दक निकायांत पंधरा ग्रंथ आहेत. यांतील विषय काव्यमय आहे. खुद्दक पाठांत नऊ सूत्रें असून तीं मंत्राप्रमाणें म्हणावयाचीं असतात. धम्मपदांत नीतिविषयक सुभाषितांचा संग्रह आहे. उदान ग्रंथांत बुद्धकालीन लहान लहान पोरकट गोष्टी आढळतात.

इतिवुत्तकात गद्यपद्यभाग असून पैकीं गद्य फार सुंदर व श्रेष्ठ आहे. सुत्तनिपात हा पद्यमय सूत्रांचा संग्रह असून, त्यांत बोधपर संवाद व कथा आहेत. विमानवत्थूंत देवप्रासादांच्या व पेतवत्थूंत भुतांच्या कथा आहेत. थेर व थेरी गाथा हे दोन वृद्ध भिक्षू व भिक्षुणी यांनीं रचिलेल्या सुंदर काव्यांचे संग्रह आहेत. यांत आध्यात्मिक तत्त्वें व तत्कालीन परिस्थितीचीं चित्रें चांगलीं रेखाटलीं आहेत. प्रत्येक सूत्राचा काल वेगळा आहे. खुद्दक निकायांत समाविष्ट केलेल्या जातककथा लौकिक कथांना धार्मिक स्वरूप तयार देऊन केल्या आहेत. या कथांपैकीं कांहीं बुद्धपूर्वकालीन आहेत. गद्यभाग अर्वाचीन दिसतो. या कथांत कांहीं कल्पित, कांहीं प्राणिविषयक, कांहीं विनोदी, कांहीं चातुर्यदर्शक तर कांहीं नीतिपर व सुभाषितांसारख्या आहेत. याशिवाय कांहीं इतिहास व प्रचलित दंतकथांवरून तयार केलेल्या गोष्टी जातकांत आढळतात. हीं जातकें लोकप्रिय असून त्यांनीं भारतीय संस्कृतीचा प्रसार सर्वत्र केला आहे. त्यांचें महत्त्व सर्व दृष्टींनीं आहे. अपदानामध्यें साधूंच्या पराक्रमासंबंधीं गोष्टी आहेत. बुद्धवंसांत चोवीस बुद्धांच्या कथा आहेत. खुद्दक निकायांतील शेवटचा ग्रंथ चरियापिटक यांत बोधिसत्त्वाच्या ठायीं पारमिता कशा भाल्या हें वर्णिलें आहे. अभिधम्मपिटकांत सात ग्रंथ आहेत. त्यांपैकीं पुग्गल पञ्ञत्ति व कथावत्थु हे प्रथम होत. कथावत्थु हा खि. पू. ३ ऱ्या शतकांतील बौद्धधर्मस्वरूपदर्शक म्हणतां येईल.

बौद्ध शिल्पकला व चित्रकला—बौद्धसंप्रदायाच्या आश्रयानें चित्रकलेस, मूर्तिशिल्पास व वास्तुशिल्पास विशिष्ट रूप आलें. हिंदुस्थानांतील बौद्ध शिल्पकलेनें स्तूप, चैत्य व विहार अशीं तीन प्रकारचीं बांधकामें अस्तित्वांत आणलीं आहेत. स्तूप हे प्रथमतः बुद्धाचे अवशेष ज्या ठिकाणीं पुरून ठेविलेले होते त्या ठिकाणीं उभारण्यांत आले. परंतु पुढें बुद्धासंबंधीं ज्या ज्या ठिकाणीं महत्त्वाच्या गोष्टी घडल्या त्या त्या ठिकाणींहि त्या गोष्टींचीं स्मारकें म्हणून स्तूप उभारले जाऊं लागले. सांची येथील स्तूप प्रसिद्ध आहे. तो खिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत बांधण्यांत आला असावा. चैत्य म्हणजे सभागृह. हें खिस्ती लोकांच्या उपासनामंदिरासारखें असतें. कालांतरानें या चैत्यामध्यें मूर्ती वगैरे ठेवण्याचा प्रघात पडून त्यांना हिंदु लोकांच्या देवळाचें स्वरूप प्राप्त झालें. विहार किंवा मठ हे बौद्धभिक्षूंना राहण्यासाठीं बांधलेले असत. अजंठा येथील विहार महत्त्वाचे आहेत. कारण त्यावरून शुद्ध बौद्धकला अवगत होते. खि. पू. २०० पासून इ. स. ६०० पर्यंतच्या कालामध्यें ते बांधलेले असावेत. वेरूळ येथील विहारांवरून बौद्धसंप्रदाय, ब्राह्मणधर्म व जैन संप्रदाय यांचा परस्पर संबंध दिसून येतो. या ठिकाणीं मूर्ती दृष्टीस पडतात. अगदीं प्राचीन काळीं बुद्ध किंवा बोधिसत्त्व यांच्या मूर्ती अस्तित्वात नव्हत्या. त्या इसवी सनाच्या पहिल्या शतकांत दिसूं लागल्या, व पुढें लवकरच चित्रकलेचाहि बौद्ध लोकांत प्रवेश झाला. धर्मपरायण बौद्धांच्या ज्ञानवृद्धीसाठीं, भिंतींवर, स्तंभांवर बुद्धाचीं चित्रें काढण्यांत येऊं लागलीं. जातककथांतील कित्येक प्रसंगांचीं चित्रें कांहीं ठिकाणीं काढलेलीं आढळतात. पुढें पुढें इतर लोकांप्रमाणेंच बौद्ध लोकहि मूर्तींचा उपयोग करूं लागले व अखेरीस अमुक मूर्ति सामान्य हिंदूंची कीं बौद्धांची हें ओळखणेंहि दुरापास्त झालें. अशा रीतीनें बौद्ध संप्रदायाचें वैशिष्ट्य नष्ट होऊन तो संप्रदाय सामान्य हिंदु संस्कृतींत समाविष्ट झाला.

**बौध संस्थान**— ओरिसांतील ब्रि. सरकारला खंडणी देणाऱ्या संस्थानांपैकीं अगदीं पश्चिमेकडील संस्थान. क्षे. फ. ११५६ चौ. मै.. हें ओरिसांतील सर्वांत जुनें संस्थान आहे. हें एका ब्राह्मणानें प्रथम स्थापिलें होतें असें म्हणतात. येथें एकंदर ४५ संस्थानाधिपति होऊन त्यांनीं १,४०० वर्षें राज्य केलें. संस्थानचें एकंदर उत्पन्न सु. दोन लाख रुपये आहे व ८०० रु. खंडणी इंग्रजांस मिळे. लो. सं. (१९४१) १,४६,१७५. खेड्यांची संख्या १,०७०. गौर, खोंड, पाण, सुधे व चास या येथील मुख्य जाती आहेत. जमीन सुपीक आहे. संस्थान आतां ओरिसा प्रांतांत विलीन झालें आहे. बौध हें संस्थानचें मुख्य ठाणें असून येथें पुष्कळ जुनीं देवालयें आहेत. नवग्रहाचें देऊळ हें तांबड्या दगडांचें बांधलेलें असून त्यावर फार नक्षी काढली आहे. हें ९ व्या शतकापासून अस्तित्वांत आहे. शिवाचीं तीन देवळें असून त्यांतहि नक्षीचें काम फार सुंदर आहे.

**बौधायन**—एक सूत्रकार ऋषि. याच्या नांवावर श्रौत, गृह्य व धर्म अशीं तीन सूत्रें आढळतात. बौधायनाचें धर्मसूत्र अगदीं जुन्या वळणाचें आहे. बौधायनाच्या वेळीं आर्यावर्ताच्या विस्ताराची कल्पना फार संकुचित होती. याचें गृह्यसूत्रहि आपस्तंबापेक्षां प्राचीन आहे. हल्लीं बौधायन शाखेचे लोक क्वचित् आढळतात. दक्षिणेकडचा सायणाचार्य बौधायन शाखेचा होता. ज्या कोणास स्वतःचें आध्वर्यव सूत्र नसेल त्यानें ज्यांच्याबरोबर शरीरसंबंध होतो अशा एखाद्या यजुर्वेदी शाखेचें आध्वर्यव सूत्र घेतल्यास तें एका दृष्टीनें योग्य आहे. कोंकणस्थ ऋग्वेद्यांना स्वतःचें आध्वर्यव सूत्र नसल्यामुळें त्यांनीं ज्यांच्याशीं शरीरसंबंध होतो अशा कोंकणस्थ यजुर्वेद्यांच्या म्हणजे हिरण्यकेशी लोकांच्या सत्याषाढ सूत्राचा परिग्रह करावयास पाहिजे. परंतु सर्व कोंकणस्थ ऋग्वेदी बौधायन याच आध्वर्यव सूत्राचा परिग्रह करतात. अलीकडे मात्र क्वचित् कोंकणस्थ ऋग्वेदी आध्वर्यवाकरितां सत्याषाढ सूत्राचा परिग्रह करूं लागले आहेत. सध्यां प्रचलित असलेलें बौधायन धर्मसूत्र अर्वाचीन व प्रक्षिप्त मजकूर

घालून केलेलें दिसतें. एक स्मृतिकार बौधायन आहे. या स्मृतीचे ८ अध्याय प्रश्नोत्तर-रूपाचे आहेत. एक ब्रह्मसूत्रावरील वृत्तिकार बौधायन आढळतो. तेव्हां हे तिघे एकच कीं स्वतंत्र व्यक्ती होत्या, हें निश्चित नाहीं.

**ब्युनिन, इव्हान अलेक्स्येविश** ( १८७०- )—१९३३ सालीं वाङ्मयांतील 'नोबेल' पारितोषिक मिळविणारा एक रशियन लेखक. हा प्रथम एका लेखकाकडे लेखक होता. आरंभीं कविता व नंतर गद्यलेखन तो करूं लागला. शेतीवाडी करून राहणाऱ्यांचें जीवन रंगविणारा तो शेवटचा लेखक ठरेल. त्याची 'व्हिलेज' (खेडेगांव) ही कादंबरी या दृष्टीनें महत्त्वाची आहे. क्रांतीनंतर ब्युनिन परदेशांत जाऊन राहिला व आपलें एकोद्देशी कथानकाचें तंत्र जास्त फुलविण्यांत गर्क झाला. कथानकांतील पात्रें क्रांतींतीलच होतीं. थोडक्याशा साधनांनीं व नाजुक शैलीनें रचना करण्यांत तो हातखंडा होता. पण सुशिक्षित समाजाला प्रिय होण्याला जो उत्साह लागतो तो त्याच्या ठिकाणीं नव्हता.

**ब्यूफॉं, जॉर्ज लुइ**—एक फ्रेंच सृष्टिशास्त्रज्ञ. त्याला १७३९ सालीं पॅरिस येथील राजबागेचा ( हल्लींचें नांव जार्दां दे प्लांत ) सुपरिंटेंडेंट नेमण्यांत आलें. तेथें त्यानें आपला मोठा ग्रंथ 'नॅचरल हिस्टरी'-सृष्टेतिहास हा लिहिण्यांत सर्व आयुष्य घालविलें. या ग्रंथाची पहिली आवृत्ति प्रसिद्ध झाली ती ४४ विभागांची होती आणि हे ४४ भाग प्रसिद्ध होण्याला अर्ध्याहून अधिक शतकाचा काळ लागला. यांपैकीं ८ भाग या लेखकाच्या मरणानंतर प्रसिद्ध झाले. या ग्रंथाच्या पहिल्या १५ भागांत पृथ्वीच्या उत्पत्तीविषयीं वर्णन आणि मानव व सस्तन प्राणी यांची ऐतिहासिक माहिती आहे. त्यापुढील ९ भागांत पक्षांविषयींची ऐतिहासिक माहिती दिली असून त्यानंतरच्या ५ भागांत खनिज द्रव्याबद्दलची माहिती आहे. त्याच्या मरणोत्तर प्रसिद्ध झालेल्या ८ भागांत मासे, सरपटणारे प्राणी व व्हेल जातीचे मासे यांविषयीं माहिती दिली आहे. या ग्रंथांतील माहिती बिनचूक नाहीं, पण या ग्रंथामुळें युरोपांतील सर्व देशांत सृष्टिशास्त्राचा अभ्यास करण्याची आवड फार फैलावली.

**ब्यूमॉंट, फ्रान्सिस** ( १५८४-१६१६ ) आणि **फ्लेचर, जॉन** ( १५७९-१६२५ )—हे दोन इंग्रज शेक्सपिअरकालीन नाटककार व कवी होऊन गेले. या दोघांच्या संयुक्त नांवानें ५२ नाटकें, एक प्रहसन व कांहीं किरकोळ कविता प्रसिद्ध आहेत. पण वास्तविक ५२ पैकीं ८ नाटकें त्या दोघांनीं मिळून लिहिलेलीं असून, दोन नाटकें एकट्या ब्यूमॉंटनें, आणि १५ नाटकें एकट्या फ्लेचरनें लिहिलेलीं आहेत; आणि सुमारें १८ नाटकें फ्लेचर आणि मासिंजर यांनीं मिळून लिहिलेलीं आहेत; आणि चार नाटकें फ्लेचरनें इतराच्या मदतीनें लिहिलीं आहेत. तथापि ब्यूमॉंट व फ्लेचर यांची मैत्री अखेरपर्यंत इतकी जिवलग होती कीं, ते एकाच घरांत राहत असत, इतकेंच नव्हे तर त्यांचे दोघांचे कपडेहि एकच असत. त्यांचीं विशेष प्रसिद्ध नाटकें आहेत तीं—'दि मेड्स ट्रॅजेडी', 'फिलॅस्टर', 'दि वाइल्ड गूज चेस', 'दि नाइट ऑफ दि बर्निंग पेसल', इत्यादि. फ्लेचर सुखान्त नाटकें व भावगीतें लिहिण्यांत प्रवीण होता; आणि ब्यूमॉंट दुःखान्त नाटकें चांगलीं लिही. शेक्सपिअरच्या नाटकांत उच्च नैतिक दर्जा राखलेला आहे, तर उलट ह्याचीं नाटकें नैतिक दृष्ट्या हिणकस व सामाजिक अधःपात दर्शविणारीं आहेत.

**ब्यूरॉक्रसी**—हा मूळ फ्रेंच शब्द ब्यूरो आणि ग्रीक शब्द क्रॅटिन्, या दोन शब्दांपासून साधित असा शब्द आहे. त्याचा मूळचा अर्थ सरकारी अधिकार चालवणारा नोकरवर्ग असा असून, नंतर त्याला उपहासात्मक अर्थ आला; व आपल्याकडे 'नोकरशाही' असा प्रतिशब्दप्रयोग रूढ झाला. डेमॉक्रसी म्हणजे लोकशाही, आणि ॲरिस्टॉक्रसी म्हणजे उमरावशाही या शब्दांप्रमाणें ब्यूरॉक्रसी म्हणजे सरकारी वरिष्ठ अधिकारी वर्गाचा राज्यकारभार, या अर्थानें हा शब्द रूढ झाला आहे. हिंदुस्थानांतलि इंग्रजी ब्यूरॉक्रसी जुलमी नोकरवर्गाची असल्यानें तिच्यावर आपले राष्ट्रीय पुढारी फार कडक टीका करीत. लो. टिळकांनीं अशाच एका टीकेच्या भरांत 'नोकरशाही' संज्ञेची निर्मिति केली ( १९१७ ) व पुढें ती रूढ झाली.

**ब्योर्नसन, ब्योर्नस्टेर्न** ( १८३२-१९१० )—एक नॉर्वेजियन कादंबरीकार, कवि व नाटककार. त्याच्या कथा व कादंबऱ्या आहेत त्या—'आर्ने दि फिशरमेडन' ( धीवरकन्या आर्ने ), 'ए हॅपी बॉय' ( आनंदी मुलगा ), 'रेल्वेज् ॲन्ड चर्च यार्ड्स्' ( आगगाड्या आणि स्मशानें ), आणि 'इन् गॉड्स वे' ( देवमार्गांत ). त्याचीं प्रमुख नाटकें आहेत तीं—'दि न्यूली मॅरिड कपल' ( नवविवाहित जोडपें ), 'मेरी स्टुअर्ट इन् स्कॉटलंड', 'ए बॅंकरप्टसी' ( दिवाळें ), 'बियॉंड अवर पॉवर्स' ( आपल्या शक्तीबाहेरचें ), 'लेबरमस', 'ङ्लानेट', इत्यादि.

यानें नॉर्वेंतील शेतकऱ्यांच्या जीवनांतील विविध प्रसंग आपल्या कथानकांतून रंगविले आहेत. हा विश्वविद्यालयांतून बाहेर पडल्यानंतर इकडेतिकडे लेख लिहूं लागला व १८५७-५९ या काळांत एका नाट्यगृहाचा व्यवस्थापक होता. तो अनेक नियतकालिकांचा संपादक किंवा सहसंपादकहि असे; तसेंच त्यानें अमेरिकेंत व इतरत्र प्रवासहि बराच केला. तो देशांतील राष्ट्रीय चळवळींतूनहि प्रामुख्यानें भाग घेई. १९०३ सालीं त्याला वाङ्मय विभागाचें नोबेल पारितोपिक मिळालें.

**ब्रॅग, सर विल्यम हेन्री** ( १८६२–१९४२ )—एक इंग्रज पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. १८८४ सालीं तो थर्ड रॅंग्लर झाला. नंतर ॲडेलेड येथें ( १८८६ ), लीड्स येथें ( १९०९ ), आणि लंडन येथें ( १९१५ ) प्रोफेसर झाला. १९२३ सालीं त्याला रॉयल इन्स्टिटयूटमध्यें रसायनशास्त्राचा प्रोफेसर नेमण्यांत आलें. त्याचें महत्त्वाचें संशोधन कार्य म्हणजे 'क्ष–किरणांच्या योगानें स्फटिक रचनेचें संशोधन' हें होय. त्याचा मुलगा डब्ल्यू. एल्. ब्रॅग ( जन्म १८९० ) व तो या दोघांना मिळून १९१५ सालीं नोबेल पारितोषिक देण्यांत आलें. १९३६–४० पर्यंत सर विल्यम हेन्री हा रॉयल सोसायटीचा अध्यक्ष होता. याचा मुलगाहि आतां 'सर' असून कॅंब्रिज विद्यापीठांत कॅव्हें-डिश प्रोफेसर आहे.

**ब्रॅडफर्ड**—हें महत्त्वाचें कारखान्याचें शहर इंग्लंडांतील यार्कशायर परगण्यांत आहे. या शहरांत बऱ्याच सार्वजनिक बागा असून पाणीपुरवठ्याची भरपूर सोय केलेली आहे. ब्रॅडफर्ड हें इंग्लंडमधील कापसाच्या व लोंकरीच्या कापडाच्या गिरण्यांचें मुख्य केंद्र असून शिवाय येथें यंत्रें तयार करण्याचे, व अल्पाक, रेशीम, व्हेल्व्हेल, प्लश, वगैरे प्रकारचे कापड तयार करण्याचे कारखाने आहेत. लोकसंख्या २,९८,०४१.

**ब्रॅडलॉ, चार्लस** ( १८३३–१८९१ )—एक धर्मग्रंथांचें प्रामाण्य न मानणारा, प्रत्यक्षप्रमाणवादी ( बुद्धिवादी ) व राजकारणी इंग्रज पंडित. तो आपल्या लेखांमुळें व भाषणांमुळें फार प्रसिद्ध आहे; पण त्याची आधीं विशेष प्रसिद्धि त्याच्या पार्लमेंटमधील निवडणुकीमुळें झाली. तो १८८० सालीं नॉर्थम्पटनतर्फे पार्लमेंटचा सभासद निवडला गेला, पण पार्ल-मेंटांत त्यानें देवाची शपथ घेण्याचें नाकारलें; तेव्हां नुसती प्रतिज्ञा करण्याची त्याला परवानगी नाकारण्यांत आली व त्याचें सभासदत्व रद्द करण्यांत आलें; व पुन्हां निवडणूक झाली. मतदारांनीं पुन्हां त्यालाच निवडून दिलें. पुन्हां त्यानें शपथ घेण्याचें नाकारलें व पुन्हां त्याचें सभासदत्व रद्द झालें. असें अनेक वेळां झालें, व कांहीं वेळां तर त्याला पार्लमेंट सभागृहांतून खेचून बाहेर काढण्यांत आलें. अखेर १८८६ सालीं नुसती प्रतिज्ञा ( ॲफर्मेशन ) करण्याची परवानगी त्याला देऊन त्याचें सभासदत्व मान्य करण्यांत आलें. आपल्या 'नॅशनल रिफॉर्मर' या नियतकालिकांतून तो आपल्या स्वतंत्र व पाखंडी मतांची प्रसिद्धि करी. ॲनी बेझंटबाई त्याच्या जोडीदार बनल्या. संतति-नियमनासंबंधीं लिहिल्याबद्दल या दोघांना शिक्षा झाली होती, पण पुढें ती रद्द झाली.

ब्रॅडलॉ यांना हिंदी लोकांच्या स्वराज्यविषयक चळवळीबद्दल फार सहानुभूति असे. त्यांनीं १८८९ सालीं हिंदी राष्ट्रीय सभेला भेट दिली. तेव्हां त्यांचें प्रतिनिधींनीं मोठें स्वागत केलें. त्यांनीं हिंदी कायदे कौन्सिलाच्या सुधारणांबाबत एक बिलहि तयार करून पार्लमेंटच्या सभासदांकडे पाठविलें होतें; पण तें पुढें आलें नाहीं.

**ब्रॅडले, जेम्स** ( १६९२–१७६२ )—एक इंग्रज ज्योतिष-शास्त्रज्ञ. त्याला १७२१ सालीं ऑक्सफर्ड येथें ज्योतिषशास्त्राचा प्रोफेसर नेमलें. त्यानंतर त्यानें ८ वर्षांनीं प्रकाशच्युति ( ॲबे-रेशन ऑफ लाइट ) हा आपला मूलगामी शोध प्रसिद्ध केला. त्याचा दुसरा महत्त्वाचा शोध अक्षविचलन ( न्युटेशन ऑफ अर्थ्स ॲक्सिस ) हा होय ( १७४८ ). या दोन शोधांमुळें आधु-निक ज्योतिषशास्त्राला चिनचूकपणा प्राप्त झाला आहे. १७४१ सालीं त्याला राजज्योतिषी ( ॲस्ट्रॉनमर रॉयल ) या हुद्यावर नेमण्यांत आलें. त्याचा ग्रंथ 'ॲस्ट्रॉनॉमिकल ऑब्झर्व्हेशन्स' ( ज्योतिषविषयक निरीक्षण ) १८०५ सालीं प्रसिद्ध झाला.

**ब्रन्झविक**—जर्मनी, ब्रन्झविक संस्थानाच्या राजधानीचें शहर. लो. सं. सु. दोन लाख. शहराच्या सभोंवतीं असलेली जुनी तटबंदी पाडून त्या ठिकाणीं आतां रमणीय बगीचे व सहल करण्याचे रस्ते केलेले आहेत. या वर्तुळाकृति उद्यानांच्या कड्यामध्यें जुनें शहर आहे. गॉथिक पद्धतीवर बांधलेलें नगर भवन, ड्यूकांचा राजवाडा, ड्यूकांच्या उद्यानाजवळ ऐसपैस जागेवर बांधलेलें नाट्यगृह व कांहीं पुरातन देवालयें या येथील ठळक व प्रेक्षणीय इमारती आहेत. पदार्थ-संग्रहालय, वनस्पति-बाग व दोन ग्रंथसंग्रहालयेंहि या ठिकाणीं आहेत. बॉयलर यंत्रें, वायुभारमापक, मद्य, पियानो, रासायनिक द्रव्यें, ब्रश, इत्यादि वस्तू येथें तयार होतात. ब्रन्झविक हें पुस्तकांच्या व्यापाराचें प्रमुख केंद्र आहे.

**ब्रॅन्डी**—हें मद्य ऊर्ध्वपातनक्रियेनें तयार करतात. हें मुख्यतः फ्रान्समध्यें होतें. मनुष्यास मूर्च्छा किंवा झीट आली असतां तकवा येण्याकरितां ब्रॅन्डीचा उपयोग फायदेशीर ठरतो. तसेंच न्यूमोनिया, इन्फ्लुएन्झा, आंत्रज्वर, वगैरेसारख्या रोगांतून मनुष्य उठला असतां त्यासहि ब्रॅंडी दिल्यानें ताकद येण्यास उप-योग होतो. सामान्यतः एका वेळीं एक चमचाभर ब्रॅंडी दुधांत मिसळवून दिल्यास गुणकारी होते. आजारी माणसास रात्रीच्या वेळीं झोंपण्यापूर्वी ब्रॅंडी व पाणी मिसळवून देण्यांत येते.

**ब्रश**—केस, तंतू किंवा तारा यांची जुडगी एकत्र घट्ट बांधून घासण्यासाठीं किंवा इतर कामासाठीं त्यांचा उपयोग करतात. ब्रशाचे कडक व लवचिक केसांचे असे दोन प्रकार असतात. तारा, माशाचीं हाडें, डुकराचे केस, ताडामाडाच्या काड्या, इ. चे कडक ब्रश होतात. तर उंट, खार, बकरें, इ. कांहीं प्राण्यांच्या मऊ केसांपासून लवचिक किंवा नरम ब्रश कर-

तात, व ते चित्रकलेसाठीं उपयोगी पडतात. जाडी ब्रश धुण्या-घासण्यासाठीं उपयोगी असतात.

ब्रह्म—नामरूपात्मक पदार्थांच्या बुडाशीं असणारें जें मूलभूत, नित्य व अव्यक्त तत्त्व त्याला वेदान्तांत ब्रह्म असें म्हणतात. ऋग्वेदांत ब्रह्म हा शब्द आढळतो, पण तेथें त्याचा अर्थ बाह्यसृष्टीच्या मूळाशीं असणारें नित्य द्रव्य असा नाहीं. सायणानें ब्रह्म या शब्दाचें आपल्या ऋग्वेद भाष्यांत निरनिराळे अर्थ केलेले आढळतात. ब्रह्म हा शब्द बृह् = वाढणें यापासून आला आहे. वैदिक कालीं ब्रह्माची देवता बृहस्पति होती. शतपथ ब्राह्मणांत 'ब्रह्म' हा शब्द श्रेष्ठतत्त्व व देवांची प्रेरकशक्ति या अर्थी वापरलेला आढळतो. अशा रीतीनें ब्रह्माचा अर्थ अधिकाधिक व्यापक होत जाऊन सर्व बाह्य सृष्टीच्या मूळाशीं असलेलें नित्य द्रव्य असा त्याचा अर्थ उपनिषद्‌काळामध्यें रूढ झाला. अशा रीतीनें ब्रह्म हें चराचर सृष्टीचें मूलतत्त्व असें मानण्यांत येऊं लागल्यावर त्याच्या स्वरूपासंबंधीं उपनिषद्‌कारांनीं अनेक सिद्धान्त काढण्यास सुरुवात केली. ब्रह्मस्वरूप निर्गुण असून त्याचें ज्ञान होण्यास त्याचा अपरोक्षानुभवच घ्यावा लागतो असें शास्त्रकारांनीं प्रतिपादन केलें आहे.

ब्रह्मात्म्यैक्यज्ञान—कर्माच्या कैचींतून अजीबात सुटून त्याच्या बुडाशीं अमृत व अविनाशी तत्त्व आहे त्यांत मिळून जाण्याचा व जन्ममरणाची कटकट कायमची दूर करण्याचा म्हणजे मोक्ष मिळविण्याचा अध्यात्मशास्त्राप्रमाणें ज्ञान हा एकच मार्ग आहे. ज्ञान म्हणजे व्यवहारज्ञान अगर नामरूपात्मक सृष्टिशास्त्राचें ज्ञान असा अर्थ नसून, ब्रह्मात्म्यैक्यज्ञान असा या ठिकाणीं अर्थ आहे. यासच विद्या असेंहि म्हणतात. भगवद्गीतेंत (४·३७) 'ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुतेऽर्जुन।' (ज्ञानरूप अग्नीनें सर्व कर्मे भस्म होतात), असें भगवंतानें अर्जुनास सांगितलें असून, महाभारतांतहि—

> बीजान्यग्न्युपदग्धानि न रोहन्ति यथा पुनः।
> ज्ञानदग्धैस्तथा क्लेशैर्नात्मा संपद्यते पुनः॥
>
> —शांति. २११·१७.

"भाजलेलें बीं ज्याप्रमाणें रुजत नाहीं त्याप्रमाणें ज्ञानानें (कर्मांचे) क्लेश दग्ध झाले म्हणजे ते आत्म्यास पुन्हां प्राप्त होत नाहींत" असा सिद्धांत दिला आहे. उपनिषदांतूनहि याप्रमाणें ज्ञानाची महती प्रतिपादन करणारीं अनेक वचनें आहेत. [उदा.—'य एवं वेदाहं ब्रह्मास्मीति स इदं सर्वं भवति' (मीच ब्रह्म आहें असें जो जाणितो तो अमृतब्रह्म होतो); ज्याप्रमाणें कमळाच्या पानाला पाणी चिकटत नाहीं त्याप्रमाणें ज्याला हें ब्रह्मज्ञान झालें त्याला पापात्मक कर्में चिकटत नाहींत; 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' (ब्रह्म जाणतो तो ब्रह्मच होतो); सर्व आत्ममय आहे हें त्यानें जाणलें त्याला पापात्मक कर्मांचा लेप लागत नाहीं; 'ज्ञात्वा देवं मुच्यते सर्व पाशैः' (परमेश्वराचें ज्ञान झाल्यावर सर्व पाशांतून मुक्त होतो); 'क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे' (परब्रह्माचें ज्ञान झाल्यावर त्याच्या सर्व कर्मांचा क्षय होतो); 'विद्ययामृतमश्नुते' (विद्येनें अमृतत्व प्राप्त होतें); 'तमेव विदित्वाऽतिमृत्युमेति नान्यः पंथा विद्यतेऽयनाय' (परमेश्वराला जाणिलें म्हणजे अमर होतो, याखेरीज मोक्षप्राप्तीचा मार्ग नाहीं).] मात्र या ठिकाणीं 'ज्ञान' म्हणजे नुसतें शाब्दिक ज्ञान असा अर्थ नसून ज्ञान म्हणजे "मानसिक ज्ञान, प्रथम होऊन इंद्रियांचा जय केल्यावर ब्रह्मीभूत होण्याची अवस्था किंवा ब्राह्मी स्थिति" एवढा सर्व अर्थ दर वेळीं विवक्षित आहे हें विसरतां कामा नये. ज्याप्रमाणें अग्नि केव्हांहि उत्पन्न केला तरी तो दहन करण्याचा आपला धर्म सोडीत नाहीं तद्वत् ब्रह्मात्मैक्यज्ञान कोणत्याहि कालीं होवो, तें झाल्याबरोबर त्याचा कर्मक्षयरूप परिणाम घडून येण्यास कालावधीची अपेक्षा राहत नाहीं. ज्ञान झालें कीं तत्क्षणींच कर्मक्षय होत असतो. तथापि मरणापूर्वी एका कालीं ब्रह्मज्ञान होऊन अनारब्ध संचिताचा जरी क्षय झाला असला तरी प्रारब्ध नष्ट होत नाहीं. म्हणून हें ब्रह्मज्ञान जर शेवटपर्यंत एकसारखें कायम न राहील तर, मरण येईंपर्यंत मध्यंतरीं प्रारब्धकर्मानुसार जीं बरींवाईट कर्में घडतील तीं सर्व सकाम होऊन त्यांचें फल भोगण्यास पुन्हां जन्म घेणें चुकणार नाहीं. जो पुरा जीवन्मुक्त झाला त्याला ही भीति राहत नाहीं, पण ज्याच्या अंगीं ब्रह्मज्ञान पूर्णपणें बाणलें नाहीं अशा मनुष्याचें तें ज्ञान जर कदाचित् शेवटपर्यंत टिकलें नाहीं तर त्याला पुन्हां जन्म घेणें टळत नाहीं. म्हणून मरणकालीं पूर्ण ब्रह्मात्मैक्यज्ञानाचा अनुभव जरूर घडलेला पाहिजे. एरवीं मोक्षप्राप्ति शक्य नाहीं. मरणसमयीं हें ब्रह्मज्ञान आवश्यक असण्याचें कारण उघड आहे. कारण सबंध आयुष्यभर भोगलेलें प्रारब्धकर्म जरी सकाम घडलें असलें तरी त्याचीं फळें एकंदर संचितांतच जाऊन मिळतात. आतां प्रारब्धकार्यकर्मांचीं फळें त्यांतच मिळणें शक्य नसल्यानें तीं अनारब्धकार्यकर्मांतच मिळालीं पाहिजेत आणि आयुष्याच्या शेवटच्या क्षणीं झालेलें ब्रह्मज्ञान सर्व अनारब्धकार्यकर्मांचा एकदम अजीबात नाश करतें व देहारंभक प्रारब्धकार्यकर्म देहाच्या अंतीं आपोआपच भोगून संपतें. म्हणून त्याला कोणतेंच कर्म भोगावयाचें राहत नाहीं. अशा तऱ्हेनें मनुष्य कर्मपाशांतून कायमचा मुक्त होतो व मोक्ष पावतो. उलटपक्षीं आयुष्याच्या शेवटच्या क्षणीं जरी ब्रह्मज्ञानाचा अनुभव नसेल त्या वेळीं झालेलें प्रारब्धकर्म सकाम होऊन त्याचीं फळें भोगण्यासाठीं पुनः जन्म घेणें प्राप्त होतें व अर्थातच मोक्ष दुरावतो.

म्हणून मोक्षप्राप्तीकरितां मरणसमयीं ब्रह्मज्ञानाचा अनुभव जरूर घडलेला असला पाहिजे.

हें ब्रह्मज्ञान पांतजलयोग, अध्यात्मविचार, इत्यादि मार्गांनीं किंवा सुलभरीत्या भक्तिमार्गानें प्राप्त होतें.

**ब्रह्मगुप्त** (५९८-६६५)—एक भारतीय ज्योतिषी. हा ज्योतिषविद्येंत आर्यभट्टाच्याहि पुढें गेला होता. तो गुजराथेंत भिनमाळ गांवचा राहणारा. त्याचे 'ब्राह्मस्फुटसिद्धांत' व 'खंडखाद्य' असे दोन ग्रंथ उपलब्ध आहेत. तो स्वतः वेध घेऊन स्वतंत्रपणें शोध करणारा होता. ब्रह्मसिद्धांताच्या कुट्टक नामक अध्यायांत बीजगणितांतले बरेच विषय आले असून पहिला बीजगणितकार तोच असावा असें दिसतें. खंडखाद्य हा ग्रंथ त्यानें आपल्या वयाच्या ६७ व्या वर्षी रचिला. ब्रह्मगुप्ताच्या सिद्धांताची त्याच्या हयातींत चहा झाली नाहीं, तरी पुढें भास्कराचार्यकृत 'सिद्धांतशिरोमणी' या ग्रंथानें 'ब्रह्मसिद्धांता'चें उद्दिष्ट उत्कृष्ट साधल्यामुळें ब्रह्मगुप्ताचें पुस्तक लोपून गेलें. त्याच्या दोन्ही ग्रंथांचीं अरबी भाषान्तरें 'सिंधिंद' आणि 'अलअरकंद' या नांवाचीं झालीं असावीं असें दिसतें.

**ब्रह्मचर्य**—धार्मिक विद्यार्थ्याची किंवा ब्रह्मचारी आयुष्याची स्थिति. हा विशिष्ट अर्थ प्रथम ऋग्वेदाच्या १० व्या मंडलांत सांपडतो. ही विद्यार्थिदशा हळूहळू वाढली व पुढें तर ब्रह्मचर्याची रूढि पडून तें फार कडकपणें पाळण्यांत येऊं लागलें. पुढें तर वैदिक समाजांत तें पाळणें अवश्यच आहे असें ऋषी ठाम समजूं लागले व त्याप्रमाणें वैदिक वाङ्मयांत वाद येऊं लागले. अथर्ववेदांत ब्रह्मचर्यावर एक ऋचा आहे. तींत धार्मिक विद्यार्थिदशेचे सर्व विशिष्ट गुण वर्णिले आहेत. तरुणाची नवीन जीवनक्रमाशीं गुरु ओळख करून देतो (उपनि); विद्यार्थी मग मृगाजिन परिधान करितो व जटा वाढवितो. समिधा गोळा करणें, भिक्षा मागणें व तप करणें अशी त्याची दिनचर्या असते. ह्या सर्व विशिष्ट गोष्टी तत्कालीन वाङ्मयांत आढळून येतात. विद्यार्थी आपल्या गुरुगृहीं राहतो (आचार्यकुलवासी, अंतेवासिक); तो भिक्षा मागतो, यज्ञाप्रीत्यर्थ लांकडें गोळा करतो व घर संभाळतो.

हिंदु धर्मांत अविवाहित राहण्याची सक्ती नाहीं. ब्रह्मचर्य हा मनुष्याच्या आयुष्यांतील चार आश्रमांपैकीं पहिला आश्रम म्हणजे विद्यार्जनाचा काल, त्यांत मात्र ब्रह्मचर्यपालनाची सक्ती आहे. हिंदु धर्मांत पहिला ब्रह्मचर्याश्रम हा विद्यार्जनासाठीं आहे. पुढें विद्यार्थ्यानें गृहस्थाश्रमी-गृहस्थ बनावें. पण पुढें या ब्रह्मचर्याला भलतेंच महत्त्व येऊन आमरण अविवाहित व संन्यस्तवृत्तीनें राहण्याचा उपदेश होऊं लागला. बौद्ध आणि जैन धर्मांत भिक्षू आणि भिक्षुणी यांची मोठी संख्या वाढून मठसंस्था निघाली.

पूर्वी ख्रिस्ती धर्मांतील क्लर्जी व इतर चर्चमधील धार्मिक वृत्तीनें राहणारे इसम लग्न न करतां त्यागवृत्तीनें राहत असत. प्राचीन ईजिप्तमधील धर्मोपाध्याय (प्रीस्ट) कडक ब्रह्मचर्य पाळीत असत. प्राचीन ग्रीक व रोमन याजिका (प्रीस्टेस) या आमरण कौमार्यव्रत पाळीत असत. बौद्धधर्मी भिक्षू व भिक्षुणी ब्रह्मचर्याचा नियम पाळीत असत. ख्रिस्ती धर्मस्थापना झाल्यावर प्रथम तीन शतकें क्लर्जी इसमांना विवाहास मोकळीक होती; पण नंतर इ. स. ३०५ मध्यें स्पेनमध्यें एल्व्हीराच्या कौन्सिलनें असा सक्तीचा नियम केला कीं, वेदीजवळ धार्मिक विधी करणारांनीं ब्रह्मचर्य पाळलेंच पाहिजे. पण या नियमाबद्दल पुढें कित्येक शतकें ख्रिस्ती धर्माधिकाऱ्यांत मतभेद माजला होता; त्याचा निकाल पोप ७ वा ग्रेगरी यानें लावला, व क्लर्जींनीं विवाह करतां कामा नये, असें आज्ञापत्र काढलें व १५९३ सालीं ट्रेंटच्या कौन्सिलनें हें आज्ञापत्र मान्य केलें. ग्रीक चर्च पंथांत सामान्य क्लर्जीमनला ब्रह्मचर्य पाळण्याची सक्ती नाहीं आणि प्रॉटेस्टंट धर्मपंथानें तर हा ब्रह्मचर्यपालनाचा नियम त्याज्य ठरवला. प्रॉटेस्टंट पंथाचें मत असें कीं, ब्रह्मचारी आणि विवाहित यांच्यामध्यें नैतिक दृष्ट्या श्रेष्ठकनिष्ठपणा मुळींच नाहीं, आणि ख्रिस्ती धर्मपीठाला आपल्या धर्माधिकाऱ्यांवर ब्रह्मचर्यपालनाचा निर्बंध घालण्याचा मुळींच अधिकार नाहीं.

**ब्रह्मदंडी**—एक औषधी वनस्पति. हिला अधःपुष्पी असेंहि नांव आहे. ही पारदबंधक आहे. एकाहिक विषमज्वरावर हिच्या रसाचें नस्य देतात व गंडमाळेवर मूळ तांदुळाच्या धुवणांत उगाळून प्यावयास देतात व त्याचा गांठीवर लेपहि देतात.

**ब्रह्मदेव**—सृष्टीच्या उत्पत्तीस कारणीभूत जो रजोगुण त्याची मूर्तिमान देवता व हिंदु त्रैमूर्तींतील एक. यास चार मुखें असल्यानें चतुर्मुख, चतुरानन म्हणतात. यानें संकल्पमात्रेंकरून सर्व सृष्टि निर्माण केली. संपूर्ण देव, ऋषी व मानव यांचा हाच कर्ता असल्यामुळें यास धाता, विश्वसृट्, इत्यादि अर्थाचीं अनेक नांवें असून पुत्रांकडून कांहीं प्राणी उत्पन्न केल्यामुळें यास पितामह असेंहि म्हटलेलें आहे. याच्याबद्दल पुराणांतून अनेक कथा आहेत, पण नेहमीप्रमाणें एकीचा दुसरीशीं मेळ बसत नाहीं. याला प्रथम पांच तोंडें होतीं, पण एक शंकरानें तोडलें म्हणून चारच उरलीं. याची पत्नी सावित्री. कधीं गायत्री व सरस्वती यांचींहि पत्नीवाचक नांवें येतात. सरस्वती ही याची कन्या म्हणूनहि कोठें उल्लेख येतो. पूर्वी ब्रह्मदेवाची पूजा करीत असावेत. कारण याचीं प्राचीन देवळें व मूर्ती आढळतात. पण पुढें ही देवता मागें पडून फक्त पुराणांतच उरली.

**ब्रह्मदेश**—हा देश हिंदुस्थानच्या पूर्वेस आहे. याच्या पूर्वेस चीनचा कांहीं भाग, आनाम व सयाम आहेत; उत्तरेस

माणिपूर संस्थान व चीनचा भाग असून दक्षिणेसहि सयामचा भाग आहे. पश्चिमेस हिंदुस्थान आणि बंगालचा उपसागर आहे. क्षेत्रफळ २,६१,६१० चौ. मैल. लोकसंख्या (१९३१) १,४६,६७,१४६. उत्तर ब्रह्मदेश व दक्षिण ब्रह्मदेश असे याचे दोन मोठे विभाग केलेले आहेत. दक्षिण ब्रह्मदेश १८५२ पासून इंग्रजांच्या ताब्यांत आलेला असून उत्तर ब्रह्मदेशचें स्वातंत्र्य १८८६ सालीं संपुष्टांत येऊन तोहि प्रांत इंग्रजांकडे आला. १९३७ पावेतों इंग्रजी अमदानींत ब्रह्मदेश हिंदुस्थानासच जोडलेला होता. १९३५ च्या ब्रह्मी राज्यशासन कायद्यान्वयें ब्रह्मदेश त्या वेळीं हिंदुस्थानापासून अलग व स्वतंत्र देश करण्यांत आला व त्यावर एक गव्हर्नर ब्रिटिश सरकारनें नेमला. १९४२ त दुसऱ्या महायुद्धांत जपाननें हा प्रदेश व्यापला. नंतर १९४५ त तो मुक्त करण्यांत आला. महायुद्धाच्या वेळीं व नंतरहि राजकीय चळवळींवर दडपण असूनहि तेथील लोकांनीं हिंदुस्थानप्रमाणेंच स्वातंत्र्यसंपादनाचे प्रयत्न जोरानें चालवले. हिंदुस्थानाप्रमाणेंच त्यांसहि आतां स्वातंत्र्य देण्यांत आलें आहे.

ब्रह्मदेशांत ६ उत्तरेकडील व २९ दक्षिणेकडील अशी एकूण ३४ शान संस्थानें आहेत. तीं हिंदी संस्थानांच्या दर्जाचीं नसलीं तरी त्यांचा कारभार ब्रह्मी सरकाराकडे नाहीं. त्यांचें एकंदर क्षे. फ. ५७,८१६ चौ. मै. असून लो. सं. १६,१५,७६५ आहे. दक्षिण शान संस्थानांच्या खालीं तीन करेणी संस्थानें आहेत. या करेणी व शान संस्थानांवर ब्रिटिश सरकारचा एक कमिशनर होता. ब्रह्मदेशाला स्वातंत्र्य प्राप्त झाल्यावर करेणी जनता पुन्हां स्वतंत्र होऊं पाहत होती. यामुळें ब्रह्मी सरकारला या लोकांशीं लढून मुलूख आपल्या ताब्यांत घ्यावा लागला.

ब्रह्मदेशाच्या १,४६,६७,१४६ इतक्या लोकसंख्येंत ९० लक्ष ब्रह्मी, १२ लक्ष करेण, १० लक्ष शान, ३ लक्ष चीन व १॥ लक्ष काचीन लोक आहेत. स्थानिक नसलेल्या लोकांत १,५०,००० चिनी, १,२०,००० हिंदी-ब्रह्मी, ८,८७,००० हिंदी, ८,००० युरोपियन व १७,००० ॲंग्लो-इंडियन असे महत्त्वाचे घटक आहेत. लोकांच्या धर्मावरून आंकडे काढल्यास १९३१ सालच्या १,००० लोकांत ८४३ बौद्ध, ५२ वन्यधर्मीय, ४० मुसलमान, ३९ हिंदू, २३ ख्रिस्ती व ३ इतर असें प्रमाण पडतें.

शिक्षणाची व्यवस्था हिंदुस्थानाप्रमाणें ठेवलेली आहे. रंगून विद्यापीठ अध्यापनाच्या प्रकाराचें असें १९२० सालीं स्थापन झालें. पूर्वी इंग्रजी शिक्षण फक्त सरकारकडे असे व बाकी देशी भाषांचें व इतर शिक्षण खासगी शिक्षण-संस्था पाहत. पूर्वीपासूनच खेडेगांवांतून बौद्ध मठांतून लिहिणें-वाचणें शिकवितात.

ब्रह्मदेशाचें मुख्य पीक म्हणजे तांदूळ होय. याखेरीज तीळ, भुईमूग, कापूस, मका, तंबाखू हीं होतात. पेट्रोल, कथील, तुंगस्तेन, रुपें, जस्त, वगैरे खनिजें निघतात. तेलाविषयीं ब्रह्मदेश प्रसिद्धच आहे. १९३९-४० सालीं देशाचें उत्पन्न सुमारें १७ कोटी होतें. रंगून हें राजधानीचें शहर व मोठें बंदर आहे.

महायुद्धाच्या काळांत ब्रह्मदेशांतील राष्ट्रीय पक्ष हिंदुस्थानांतील कॉंग्रेसपक्षाप्रमाणेंच ब्रिटिशांशीं असहकार करणारा होता. युद्धकाळांत ब्रह्मी सरकार सिमल्यास होतें. १९४५ सालीं ब्रिटिश सरकारनें कार्यकारी मंडळ व कायदे कौन्सिल जें नवीन तयार केलें, त्यांत या पक्षानें भाग घेतला नाहीं. नंतर राष्ट्रीय पक्ष व ब्रिटिश सरकार यांमध्यें तडजोड होऊन २८ सप्टेंबर १९४३ त यु ऑंगसान याच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रीय सरकार स्थापन झालें; पण ऑंगसान व त्याचे मंत्री यांचे एकदम खून झाले. पुढें थाकिन नू हा पंतप्रधान झाला. ब्रह्मदेशाची नवीन राज्यघटना १९४७ त तयार झाली व ब्रह्मदेशाचें स्वतंत्र संघराज्य तयार झालें. ४ जानेवारी १९४८ हा ब्रह्मदेशाचा स्वतंत्र लोकराज्याचा दिवस आहे.

ब्रह्मदेशाला आतां स्वातंत्र्य लाभलें आहे तरी तें सांभाळणें हिंदुस्थानापेक्षांहि फार जड जाईल. देशांत करेण लोक व कम्युनिस्ट यांची बंडाळी आणि बाहेरून चिनी कम्युनिस्टांचें दडपण यामुळें ब्रह्मी सरकार त्रस्त झालें असणें साहजिक आहे. त्यांतून देश अत्यंत दरिद्री बनला आहे. तेव्हां बाहेरून ब्रिटिश साम्राज्यांतील घटकांकडून मोठी मदत मिळाल्याखेरीज टिकाव लागणार नाहीं.

ब्रह्मदेश हा आज बऱ्याच हिंदूंचें आश्रयस्थान झालेला दिसतो आहे, तथापि ब्रह्मदेशांतील हिंदूंची वस्ती आजकालची नाहीं. अनेक शतकांपूर्वी येथील व्यापारी आणि साहसी लोक ब्रह्मदेशास जाऊन त्यांनीं तेथील लोकांस सुसंस्कृत बनविलें. भारतांतून प्राचीन कालीं देशाच्या उत्तरेकडून आसामच्या मार्गानें आणि दक्षिणेकडून पेगूच्या मार्गानें असे दोन प्रवाह ब्रह्मदेशांत आले, असें येथील इतिहासग्रंथ सांगतात. पेगूंत वस्ती करणारे तलैंग लोक हे मूळचे तेलंगी. परंतु त्यांची भाषा लवकरच नष्ट होऊन एक निराळीच भाषा तलैंग या नांवानें लोकपरिचित झाली. ब्रह्मदेशांतील भाषा संस्कृत भाषेशीं द्राविडी भाषांप्रमाणेंच असंबद्ध असून त्यांवर संस्कृत भाषेचा कांहीं संस्कार मात्र झाला आहे. ब्रह्मी जनता मूळची भिन्न वंशीय असून समान संस्कृतीनें मात्र आपणांस स्वकीय झाली आहे. हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांची सरहद्द आज जी आहे, तीच पूर्वी नव्हती. आसाम, आराकान आणि तेनासरीम या तीन प्रांतांचा संबंध ब्रह्मदेशाशीं फार जुना आहे; आणि कांहीं बौद्धिक परिस्थिति

लक्षांत घेतां ब्रह्मदेश आणि आराकान इत्यादि भाग हे एकाच स्वरूपाचे होते असें म्हणण्यास हरकत नाहीं. आसाम, आराकान आणि ब्रह्मदेश येथील राजघराणीं बौद्ध होतीं आणि त्यांनीं इतिहासलेखनास उत्तेजन देण्याच्या कामीं बरीच खटपट केली. यामुळें या तिन्ही ठिकाणीं कांहीं ऐतिहासिक वाङ्मय आहे. तें पद्धतशीर रीतीनें हुडकून काढण्याचा व चाळण्याचा प्रयत्न अजून झालेला नाहीं. मलबार प्रांतांत आणि ब्रह्मदेशांत वास्तुविषयक कांहीं सादृश्यें सांपडतात आणि तीं तिकडून इकडे आलीं कीं इकडून तिकडे गेलीं याविषयीं संशोधकांमध्यें तर्कवितर्क चालू आहेत. ब्रह्मदेशाशीं वळण पूर्वापार आहे ही गोष्ट खरी. तथापि आज ब्रह्मदेशाकडे जितकीं माणसें जातात तितकीं पूर्वी जात असल्याचें दिसत नाहीं. सिंहलद्वीप ज्याप्रमाणें रामायण, रत्नावली, पद्मिनी, इत्यादि काव्य-नाटकादि ग्रंथांनीं व स्त्रियांच्या मनोहर कथांनीं भारतीय अंतःकरणाशीं बद्ध झालें आहे त्याप्रमाणें ब्रह्मदेश झालेला नाहीं. ब्रह्मदेशाचा पदच्युत राजा थीबा रत्नागिरी येथें आणून ठेवला तो तेथें मरेपर्यंत होता, तरी त्याच्याविषयीं अगर त्याच्या देशाविषयीं आपल्या देशांत ग्रंथरूपानेंहि जिज्ञासा फारशी व्यक्त झाली नाहीं.

आज आपण ब्रह्मदेशाच्या नकाशाकडे पाहिलें तर भाषांचे पट्टे तेथें अनेक दिसून येतात. देशांत लोकवस्ती थोडी पण भाषांचे प्रकार मात्र पुष्कळ. चिनी सरहद्द जेथें ब्रह्मदेशास भिडते तेथें काचीन जात व तिची विशिष्ट भाषा दृष्टीस पडते. हिंदुस्थानाकडून निराळ्याच भाषांची पाचर देशांत घुसलेली दिसते आणि मार्तोबानच्या आखाताच्या आसपास मोनख्मेर, पेगू अगर तलैंग भाषांचें प्रामुख्य दिसून येतें. उत्तरेकडून आणि पूर्वेकडून शान भाषा चिकटलेली दिसते तर तलैंगच्या क्षेत्राभोंवतालीं करेण भाषेचें प्रामुख्य दिसतें. या निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्यांची राजकीय व आर्थिक खळबळ आपणास या प्रदेशांत नजरेस येते. करेण लोकांनीं दक्षिण किनारा व्यापिला, परंतु त्यांच्यापासून बराचसा अंश तलैंग लोकांनीं जिंकून घेतला. पण त्या तलैंग लोकांस तेथें स्थायिक होण्यास स्वतःची भाषा सोडून एका निराळ्याच भाषेचा आश्रय करावा लागण्याइतकें स्वत्व सोडावें लागलें. इरावतीच्या उत्तर भागापासून तो बंगालच्या उपसागराच्या पूर्व किनाऱ्यापर्यंत ब्रह्मी भाषेनें आपलें स्थान कायम राखिलें तर त्यांत हिंदुस्थानांतील आराकानी वगैरे लोकांनीं आपल्या लोकसमूहाची पाचर घातली.

ब्रह्मदेशाची सोंवळ्या-ओंवळ्याच्या कल्पनांपासून अलिप्तता, ब्रह्मी स्त्रियांची वाटेल त्याच्याबरोबर लग्न करण्याची प्रवृत्ति, इत्यादि गोष्टींवरून तेथें राष्ट्रीकरण फार सोपें असावें अशी आपणांस कल्पना येईल. परंतु या बाबतींत आपली निराशा होते. निरनिराळ्या भाषा बोलणारे लहान लहान पृथक् लोकसमूह ब्रह्मदेशांत जेवढे दिसतात तेवढे हिंदुस्थानांत दिसत नाहींत. ब्रह्मदेशाच्या डोंगराळपणामुळें लोकांचें पृथक्त्व अधिक झालें असावें. तसेंच चीन, तिबेट, सयाम आणि हिंदुस्थान येथील निरनिराळ्या प्रकारचे लोक ब्रह्मदेशांत आल्यानें त्यांचें राष्ट्रीकरण कठिण झालें असावें; किंवा निरनिराळ्या लहान लहान राष्ट्रकांचें वैशिष्ट्य नाहींसें करून आत्मसंस्कृतिमूलक एकत्व सर्व प्रदेशावर लादण्यास जबरदस्त डोक्याचा वर्ग तेथें निर्माण झाला नसावा; अथवा झाला असल्यास त्यास आपलें कार्य पूर्ण करण्यास अवसर सांपडला नसावा. कांहीं असो. आज या प्रदेशांतील अनेक राष्ट्रकांस एकत्र करण्याच्या कामांत विघात आणणारें भाषांचें विविधत्व फार प्रचुर दिसतें, यांत शंका नाहीं.

सुंदर ब्रह्मी ग्राम-तरुणी

एकंदरींत ब्रह्मी लोकांतील संस्कृति थई किंवा सयामी लोकांतील संस्कृतीच्या दर्जाचीच आहे. मात्र ब्रह्मी लोकांच्या राज्यपद्धतींत असे कांहीं दोष आहेत कीं, ते सयामी राज्यपद्धतींत आढळत नाहींत. ब्रह्मी लोकांत स्वाभिमानाची कल्पना फार कमी असून ते लोक वरिष्ठांच्या तंत्राने चालणारे फार आहेत. युद्धापेक्षां त्यांना शेतकीच फार आवडते. त्यांच्यामध्यें गोंदण्याची रानटी चाल कायम आहे. ब्रह्मी राज्यांतले सर्व स्त्रीपुरुष कानांना भोंकें पाडून त्यांत सोन्यारुप्याचे दागिने घालतात. गरीब लोक त्यांच्याऐवजीं लांकूड किंवा कागद यांचे तुकडे वापरतात. त्यांच्यांत सुपारी खाण्याचा फार शोक आहे. तंबाखूचें व्यसनहि सर्व दर्जांच्या लहानमोठ्या वयाच्या स्त्रीपुरुषांत आढळतें. इतर बाबतींत मात्र ते लोक बहुतेक नेमस्तपणानें वागतात.

उपयुक्त कलांत व ललित कलांत ब्रह्मी लोकांची प्रगति बेताबाताचीच झालेली आहे. पण त्यांना संगीत फारच आवडतें. शास्त्रीय विषयांत त्यांची बुद्धि अगदींच कमी चालते. धर्मोपदेशक खगोलशास्त्राचा अभ्यास करतात, पण तो फलज्योतिषाला मदत व्हावी म्हणून आणि वार्षिक पंचांगें वगैरे करण्याकरितां तात्पुरता करतात. या देशांत मठ इतके असंख्य आणि जिकडे तिकडे पसरलेले आहेत कीं, त्यांमुळें सर्व लोकांच्या मुलांना वाचन, लेखन, व बेरीज, वजाबाकी इत्यादि गणित, इतक्या विषयांचें शिक्षण सहज मिळतें. बौद्ध भिक्षू या विषयांचें शिक्षण व धार्मिक शिक्षण देण्याचें काम करतात व या विद्यादानाबद्दल दक्षिणा म्हणून त्या मुलांना मठांतील व देवालयांतील कामें करावीं लागतात.

भाषा आणि वाङ्मय—ब्रह्मी भाषा प्रथम एकाक्षरी असावी. पुढें तींत पाली भाषेचें मिश्रण होऊन तिच्यांतील मूळ शब्द एकाला एक असे चिकटून नवेच शब्द बनविलेले आढळतात. या भाषेंत शब्दांचीं स्वरूपें मुळींच बदलत नाहींत. त्यामुळें शब्दांचा अर्थ केवळ त्यांच्या वाक्यांतील स्थानावरून अगर शेजारच्या शब्दांवरून निश्चित होतो. या भाषेंत निरनिराळ्या दर्जाच्या माणसांनीं निरनिराळे शब्द वापरावयाचे असतात. हें सर्व भाषावैशिष्ट्य ब्रह्मी लोकांचें भारतीयांपासून भिन्नत्व दाखवितें. ब्रह्मी भाषेची लिपि मात्र भारतीय आहे. या लिपींत वर्णांचा आकार कांहींसा कानडी, सिंहली अथवा तलैंग लिपीसारखा पण त्याहून थोडासा साधा आहे. ब्रह्मी लिपीचा त्या भाषेंतील वाङ्मयावर बराच परिणाम झाला आहे. या भाषेंतील काव्यांत यमक व प्रास फार आढळतात असें जे कार्पोनिअससारखे भाषापंडित म्हणतात त्याचें कारण या भाषेंतील शब्दच असे आहेत कीं, त्यामुळें आपोआप यमकें साधतात. बरेचसे ब्रह्मी भाषेंतील ग्रंथ गद्य आहेत. परंतु त्यांत कांहीं ठिकाणीं शब्दावर जो जोर द्यावा लागतो तो सामान्यतः नियमित स्थळीं येत असल्यामुळें तें गद्य कानाला पद्याप्रमाणें वाटतें. ब्रह्मी भाषेंत ग्रंथसंख्या बरीच आहे. विशेषतः सांप्रदायिक व शास्त्रीय विषयांवर ग्रंथ अनेक आहेत. त्यांत पौराणिक, फलज्योतिषविषयक, वैद्यकीय व धर्मशास्त्रीय ग्रंथ हे प्रमुख आहेत. धर्मशास्त्रामध्यें 'दम्मसत्वयि' हा ग्रंथ सर्वांत महत्त्वाचा आहे. बुकॅनन म्हणतो कीं, ब्रह्मी वाङ्मयांत ऐतिहासिक ग्रंथ अनेक असून त्यांत 'महाराजा वयंगी' हा ग्रंथ मुख्य आहे. ब्रह्मी लोकांनीं चिनी व सयामी लोकांचे इतिहास व त्याप्रमाणेंच काथी, कोपनपयी, पगू, सायम्मय, लयनझयन, इत्यादि राष्ट्रांच्या इतिहासांचीं भाषांतरें केलीं आहेत. ब्रह्मी वाङ्मयांत बरींचशीं लहान लहान काव्यें, गाणीं व नाटकेंहि आहेत. त्यांपैकीं बरींचशीं संस्कृतवरून आलीं असावीं असें वाटतें. यांच्या नाटकांच्या विषयांत रामाची लंकेवरील स्वारी हा विषय प्रमुख आहे. ब्रह्मी लोकांचे विशेष आवडते जे ग्रंथ आहेत त्यांपैकीं बरेचसे रूखेंग, सयामी व मलयु भाषेंतहि आहेत. त्यांपैकीं बरेचसे ग्रंथ पौराणिक आहेत, तथापि यांत कांहीं चरित्रें व ऐतिहासिक ग्रंथहि आहेत.

त्यांचें एकंदर वाङ्मय पाली भाषेंतील ग्रंथ वगळले तर फारसें महत्त्वाचें नाहीं. यांचे पाली ग्रंथ व दक्षिणेकडील जे बौद्ध लोक पाली भाषेला पवित्र मानतात त्यांचे ग्रंथ एकच आहेत. ब्रह्मी लोकांचें विशिष्ट वाङ्मय म्हणजे गाणीं, धार्मिक कथा व बखरी एवढेंच आहे. यांपैकीं दुसऱ्या प्रकारच्या ग्रंथांची काव्यग्रंथ या दृष्टीनें बरीच योग्यता आहे. पहिल्या प्रकारांत मात्र ह्या काव्यमयत्वाच्या गुणाची उणीव दिसते. बखरींकडे अर्थातच त्यांतील हकिकतीपुरतेंच लक्ष द्यावयाचें असतें. ब्रह्मी वाङ्मयांतील बहुधा एकाच नाटकाचें भाषांतर इंग्लिशमध्यें झालेलें आहे. ह्या एका नाटकावरून पाहतां ब्रह्मी लोकांत नाट्यकला मोठ्या उच्च दर्जाला पोंचल्याचें दिसत नाहीं. त्यांत नाटककारांनीं पात्रानें स्वगत बोलण्याचीं भाषणें, कांहीं संभाषणें व कांहीं पदें इतकें लिहिलेलें असतें व बाकीचीं भाषणें पात्रांनीं आपआपलीं तयार करून घ्यावयाचीं असतात. या ब्रह्मी लोकांच्या नाटकांतील कथानकें बहुतकरून रामायण व महाभारत या हिंदू लोकांच्या महाकाव्यांतून घेतलेलीं असतात. तथापि त्यांत दोष असा असतो कीं, प्रयोगस्थळें खरीं अस्तित्वांतलीं घेतलेलीं नसून तीं कल्पित, अद्भुत देशांतील असतात व नाटकाच्या गोष्टींतील परस्परसंबंध व शेवट योग्य प्रकारें दाखविलेला नसतो.

ब्रह्मदेशांतील हिंदुत्व—ब्रिटिश लोकांनीं ब्रह्मदेश जिंकल्यानंतर जी एकंदर शेतकीची, व्यापाराची आणि उद्योगधंद्याची वृद्धि झाली तीमुळें हिंदुस्थानांतून ब्रह्मदेशांत बऱ्याच लोकांचें प्रयाण झालें. बरेचसे लोक आपलें भाडें खर्चून जात आणि तें जाण्यास कारण म्हटलें म्हणजे ब्रह्मदेशांत मिळणारे मजुरीचे दर आणि व्यापारी किफायत हीं अधिक चढाओढ असलेल्या हिंदुस्थानांतील दरांपेक्षां अधिक आहेत हें होतें. हिंदूंची वृद्धि ब्रह्मदेशांत तीन कारणांमुळें झाली. पहिलें कारण नवीन लोकांचें येणें; दुसरें कारण मृत्यूपेक्षां जननाचें आधिक्य; आणि तिसरें कारण ब्रह्मी स्त्रियांशीं विवाह. यांपैकीं पहिलें कारण सर्वांत अधिक प्रबल आहे. हिंदू पुरुष आणि ब्रह्मी स्त्रिया यांचीं लग्नें झाल्यामुळें ज्या हिंदूंस आपली जात सांगतां येत नाहीं अशांची संख्या बरीच आहे आणि ती सारखी वाढत आहे. हिंदूंची वस्ती शहरांत अधिक आहे आणि आज रंगून येथें

बौद्धांपेक्षा हिंदू अधिक आहेत. ब्रह्मदेशाच्या नवीन परिस्थितींत जे हिंदू जातात ते जातिनिर्बंध फारसे पाळीत नाहींत हे निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. जेथें हिंदूंची एकसारखीच वस्ती आहे तेथें कांहीं पैतृक आचार ते पाळतात. जेथें चकाल वस्ती असते तेथें हे आचार ठेवणें शक्य नसतें.

जे कांहीं ब्राह्मण ब्रह्मी लोकांनीं आपलीं कर्में चालविण्यासाठीं देशांत राखले आहेत ते स्वभावतःच थोडाबहुत आचार पाळतात. तेथें स्थानिक ब्राह्मणवर्ग आहे. ब्रह्मदेशांत ब्राह्मणांचें ब्रह्मी राजदरबारानें स्वागत प्रथम केव्हां केलें तें अजून कळलें नाहीं. ब्रह्मी इतिहासांत काळे व गोरे ब्राह्मण या नांवानें ब्राह्मणांचा उल्लेख वारंवार येतो. काळे ब्राह्मण म्हणजे देशांत अनेक शतकें असलेले व गोरे ब्राह्मण म्हणजे नवीन आलेले. राजा बोधवपय यानें आपल्या कारकीर्दीत (१७८१-१८१९) काशीहून कांहीं ब्राह्मण व ग्रंथ आणविले. या ब्राह्मणांना हिंदू अजून ब्राह्मण म्हणून कबूल करतात आणि ते जुना आचार बऱ्याच अंशीं पाळतात व ब्रह्मी लोकांशीं लग्नव्यवहार करीत नाहींत. अजूनदेखील ब्रह्मी लोक लग्न, प्रवास आणि उत्सव यांस मुहूर्त पाहण्यासाठीं त्यांची योजना करतात. ब्रह्मदेशच्या राजघराण्यांत, तसेंच सरदारांत ब्राह्मणांस आणि श्रमणांस दक्षिणा देण्याची चाल होती. लग्नें लावण्यासाठीं ब्राह्मणांचा उपयोग होत होता. एक प्रकारचें उपाकर्म आणि कर्णवेधसंस्कार ब्राह्मणांकरवीं होत असे. जुन्या काळांत ब्रह्मी समाजांत ब्राह्मणांची मान्यता मोठी होती. ब्राह्मणांस ब्रह्मदेशांत पावन म्हणतात आणि ते निवृत्तमांस असतात.

ब्रह्मी लोकांचें हिंदुत्व पूर्णपणें पटण्यास कांहीं महत्त्वाचीं सध्यां दिसून येणारीं समाजसादृश्यें आणि इतर कांहीं गोष्टी म्हणजे (१) मनुप्रणीत धर्मशास्त्र आपण वापरतों अशी ब्रह्मी लोकांची भावना आहे आणि मनूच्या नांवावर खपणारे दोन ग्रंथ त्यांचें आचारनियमन करितात. (२) ज्योतिष पाहण्यास व इतर अनेक कारणांसाठीं ते ब्राह्मणांचा उपयोग करितात. (३) त्यांच्यांतील तलैंग लोक हिंदुस्थानांतूनच पूर्वी तिकडे गेले. (४) त्यांचा पारमार्थिक संप्रदाय हिंदुस्थानांतीलच आहे. (५) पुष्कळ ब्रह्मी लोक हिंदुस्थानांत यात्रेकरितां येतात. (६) आपलें विशिष्टत्व ब्रह्मी लोकांवर लादण्याचा हिंदू प्रयत्न करीत नाहींत त्यामुळें त्यांच्या दरम्यान जरी जातिविषयक द्वेष असला तरी संस्कृतिविषयक दूरीभाव नाहीं. (७) ब्रह्मी आणि हिंदू यांचीं लग्नें झालीं असतां जेरबादी लोकांप्रमाणें निराळी जात उत्पन्न होत नाहीं. यामुळें पुढें-मागें ब्रह्मी लोकांत राष्ट्रीय जागृति उत्पन्न झाली म्हणजे मुसलमानापासून तुटकपणा, पण हिंदूंच्या बाबतींत मात्र तुटकपणाचा अभाव या गोष्टी त्यांच्यांत उत्पन्न होतील. (८) हिंदूंमध्यें जशीं कुलदैवतें आहेत तशीं त्यांच्यांत नाट नांवाचीं दैवतें आहेत.

ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून निराळा झाला तेव्हांपासूनच तेथील हिंदी लोकांचें वर्चस्व आणि संख्याधिक्य स्थानिक सरकारास जास्त खपेनासें झालें आहे. त्यामुळें हिंदी लोकांवर कांहीं अटी लादण्यांत आल्या आहेत. नवीन बाहेरून येणाऱ्या हिंदी लोकांच्या संख्येवरहि नियंत्रण घातलें आहे. यामुळें हिंदी लोकांत फार असंतोष उत्पन्न झाला आहे.

**ब्रह्मपुत्रा**—तिबेट व ईशान्य हिंदुस्थान यांतील नदी. हीस ब्रह्मपुत्र नद असेंहि म्हणतात. हिची अंदाजें लांबी सरासरी १,८०० मैल असून ३,६१,२०० चौरस मैल भागांत हिचें पाणी पुरविलें जातें. सॅनपो, जमुना, झयुलचू, दिहांग अशीं नांवें या नदीस आहेत. हिला मिळणाऱ्या नद्या सुबान्सिरी, भरेली, धान्सिरी, बारनदी, मानस, तिस्ता, संकोश, बुन्ही, दिहींग, दिसाग, दिखो, झांशी, जिंजीराम, वगैरे होत. अत्युच्च पर्वतांवरून ही वाहत येत असल्यानें हिला फारच वेग आहे. हिच्या कांठीं ताग, कापूस, चहा, तंबाखू, नीळ, वगैरे सर्व प्रकारचीं धान्यें उत्पन्न होतात. समुद्रापासून वर डिब्रूगडापर्यंत आठशें मैल या नदींतून मालाचीं आणि प्रवाशांचीं साधीं व वाफेचीं जहाजें सहज चालतात.

**ब्रह्मपुराण**—हें अत्यंत जुनें पुराण आहे असें मानिलें जातें म्हणून याला आदिपुराण असें म्हणतात. हें पुराण लिहिलें गेलें त्या काळीं सूर्यपूजा या देशांत प्रचलित असावी. कारण सूर्यपूजेचें या पुराणांत विशेष महत्त्व सांगितलें आहे. त्यामुळें याला सौरपुराण या नांवानें ओळखतात. या देवतेशिवाय शिव व जगन्नाथ या देवतांचें महत्त्व या पुराणांत सांगितलें आहे. ब्रह्मपुराणाची श्लोकसंख्या आठ हजार आहे. या जुन्या भागास नंतर ब्रह्मोत्तर व ब्रह्मोत्तरखंड असे दोन भाग जोडले गेले. हे मूळचे ब्रह्मपुराणांतर्गत नाहींत असें कांहीं पंडितांचें मत आहे. ब्रह्मोत्तरखंड हा स्कंदपुराणाचा भाग आहे. ब्रह्मपुराण सांगणारा लोमहर्ष हा असून त्यानें दक्षास तें कथन केलें अशी कथा आहे. ब्रह्मपुराणांत जगदुत्पत्तीचें वर्णन, मन्वन्तराच्या आणि सूर्य व चंद्रवंशीय राजांच्या कथा संक्षेपानें सांगितल्या आहेत.

**ब्रह्मवैवर्त पुराण**—याचें ब्रह्मकैवर्त हें नांव दक्षिणेंत रूढ आहे. यांत अठरा हजारांवर श्लोक आहेत. याचे चार खंड असून त्यांचीं नांवें अनुक्रमें ब्रह्म, प्रकृति, गणेश, आणि कृष्णजन्मखंड अशीं आहेत. राधाकृष्णाची भक्ति वाढविणें हाच या पुराणाचा मुख्य हेतु दिसतो. पहिल्या तीन खंडांत कांहीं देवतांच्या कथा असून यांच्यापासून निघालेल्या शिल्पादि धंदे करणाऱ्या जातींचा नामनिर्देश करण्यांत आला आहे. अर्थात् कित्येक

शिल्पविद्येनें पोट भरणाऱ्या जातींचा उगम कांहीं देवतांपासून झाला आहे, हेंच या पुराणांत सांगितलेलें आहे.

**ब्रह्म-क्षत्री**—एक जात. हे मुंबई इलाख्यांत ( लो. सं. सुमारें ५००० ) व बडोदें संस्थानांत ( सु. १ हजार ) आढळतात. हे क्षत्रिय असून पंजाब प्रांतांतून गुजराथेंत आलेले आहेत. या लोकांचे उपाध्याय सारस्वत ब्राह्मण आहेत. एका पोटभेदांतील लोक दुसऱ्या पोटभेदांतील लोकांशीं रोटी व बेटी व्यवहार करीत नाहींत. नाग्रवळ व चुडागर हीं नांवें धंद्यांवरून पडलेलीं असून, नाग्रवळ लोक मूर्तींचे डोळे व चुडागर लोक बांगड्या करतात. यांच्यांत जातिपंचायती नाहींत.

**ब्रह्मांडपुराण**—स्कंदपुराणाप्रमाणेंच ब्रह्मांडपुराणांत अनेक स्कंद व माहात्म्यें आहेत. तेव्हां साहजिकच ब्रह्मांडपुराणाची संपूर्ण प्रत एका ठिकाणीं मिळत नाहीं. या पुराणांचा एक भाग वायुपुराणाप्रमाणें आहे आणि दुसऱ्या भागांत कोंची क्षेत्रांत विष्णूनें हयग्रीवावतार घेऊन अगस्ति ऋषीस दर्शन दिल्याचें सांगितलें आहे. दुर्गा किंवा ललिता देवीची म्हणजे पराशक्तीची उपासना करण्यापासून मुक्ति मिळते, असें हें पुराण सांगतें. यांत सुमारें १२,००० श्लोकसंख्या असल्याचा उल्लेख आहे. बालिबेटांत हें पुराण प्रचारांत असे.

**ब्रह्मेंद्रस्वामी, धावडशीकर** ( १६४९–१७४५ )—महाराष्ट्रांतील एक साधुपुरुष. यांचें पूर्वाश्रमीचें नांव विष्णु. वऱ्हाडांत दुधेवाडीचे राहणारे. हे बालवयांत चतुर्थाश्रम स्वीकारून चिपळूणनजीक परशुरामक्षेत्रीं राहिले. त्यापूर्वी हिमालयापासून रामेश्वरापर्यंत फिरून तीर्थयात्रा केली. परशुरामास त्यांचें भक्तमंडळ वाढून तेथील परशुरामाच्या देवळाचा जीर्णोद्धार त्यांनीं केला, व तांबे, भागवत, वगैरे मंडळीस देवस्थानचे कारभारी नेमलें. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव पेशवा, शाहू छत्रपति, परशुरामपंत प्रतिनिधि, कान्होजी आंग्रे, फलटणचे निंबाळकर, नागपूरकर भोसले, अक्कलकोटकर भोसले, वगैरे महाराष्ट्रांतील सर्व प्रमुख राजकारणी मंडळींवर स्वामींची छाप होती व या मंडळींशीं पैशाची देवघेव व व्याजबट्टा करून परशुराम देवस्थानास धावडशी, वीरमाडे व अनेवाडी हीं गांवें इनाम मिळविलीं. जंजिऱ्याच्या हबशांवरहि त्यांचें वजन होतें. स्वामींनीं त्याच्याकडून पेढें व आंबडस हीं गांवें इनाम मिळविलीं. १७२८ ते १७४५ पर्यंत मराठेशाहींतील बहुतेक कारस्थानांत त्यांचें अंग होतें, व त्यांचा पत्रव्यवहार मोठा विस्तृत होता. ते विद्वान् व लिहिणारे बाकच होते. १७२६ च्या सुमारास सिद्दीचा व स्वामींचा तंटा झाल्यानें सिद्दीनें परशुरामाचें देऊळ लुटलें. तेव्हां स्वामी धावडशीस येऊन राहिले व तेथेंहि परशुरामाचें देऊळ, तलाव, वाडा, वगैरे त्यांनीं बांधलीं. स्वामींची धावडशीस समाधि आहे. शिवाजी आणि रामदास यांमध्यें जें नातें होतें तेंच शाहू व पेशवे आणि स्वामी यांमध्यें होतें यांत शंका नाहीं. शाहूच्या राज्यास पाठिंबा देण्याचें कार्य स्वामींनीं केलें. त्यांची आक्षेप घेतली जाणारी सावकारी वृत्ति परोपकार आणि दानधर्म यांसाठीं असे.

**ब्राइट, जॉन** ( १८११–१८८९ )—एक इंग्रज वक्ता व राजकारणी पुरुष. तो धान्यविधिविरोधक संघ ( ॲन्टी-कॉर्न-लॉ लीग ) या चळवळीमध्यें कॉबडेनबरोबर प्रथम प्रसिद्धीस आला. १८४३ सालीं तो डरहॅमतर्फे पार्लमेंटचा सभासद निवडला गेला. १८४७ सालीं तो मँचेस्टरतर्फे पार्लमेंटांत निवडून आला, पण १८५७ सालीं क्रिमियन युद्धाला त्यानें विरोध केल्यामुळें तो लोकांमध्यें इतका अप्रिय झाला कीं, तो पुढील निवडणुकींत मँचेस्टरतर्फे पुन्हां निवडून आला नाहीं. तथापि त्याला बर्मिंगहॅमतर्फे निवडून देण्यांत आलें. १८६५ सालीं मताधिकार ( फ्रँचाइझ ) अधिक विस्तृत व्हावा म्हणून चाललेल्या चळवळींत त्यानें प्रमुख भाग घेतला आणि आयर्लंडमध्यें राजकीय सुधारणा करण्याची आवश्यकता प्रतिपादन केली. त्याला १८६८ सालीं ग्लॅडस्टन प्रधानमंडळांत व्यापारी संघाचा (दि बोर्ड ऑफ ट्रेडचा) अध्यक्ष ही जागा देण्यांत आली. १८८६ सालीं ग्लॅडस्टनच्या आयर्लंडबाबत योजनांना विरोध करणाऱ्या लिबरल सभादांना तो सामील झाला आणि त्याच्या वजनामुळें आणि लेखांमुळें ग्लॅडस्टन पक्ष पदच्युत झाला. हिंदुस्थानांतील राजकीय घडामोडींकडेहि त्याचें लक्ष असे.

**ब्राइस, जेम्स** ( १८३८–१९२२ )—एक ब्रिटिश इतिहासकार आणि मुत्सद्दी. तो ऑक्सफर्ड येथें १८७० पासून १८९३ पर्यंत दिवाणी कायद्या (सिव्हिल लॉ)चा प्राध्यापक होता. १८८० सालीं तो पार्लमेंटचा सभासद झाला. १८८६ सालीं त्याला परराष्ट्रीय कारभाराचा दुय्यम चिटणीस नेमण्यांत आलें. नंतर १८९४ सालीं व्यापारी बोर्डाचा अध्यक्ष, १९०५ सालीं आयर्लंडचा मुख्य चिटणीस आणि १९०७–१९१३ पर्यंत वॉशिंग्टन येथें जादा वकील, या हुद्यांवर त्यानें कामें केलीं. १९१६ सालीं जर्मन अत्याचारांची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या समितीचा अध्यक्ष त्याला नेमलें. या समितीनें तयार केलेल्या ब्राइस अहवालांत असें पूर्णपणें शाबीत करण्यांत आलें कीं, बेल्जिअमच्या पुष्कळ भागांत जर्मनांनीं बिनलष्करी लोकांच्या, हेतुपुरस्सर व पद्धतशीर कत्तली केल्या. तसेंच युद्धविषयक नियम व परंपरा अनेक वेळां मोडल्या, आणि रेडक्रॉस व व्हाइट फ्लॅग ( युद्धबंदी निशाण ) यांचा दुरुपयोग केला. त्यानें ग्रंथ लिहिले ते—'दि होली रोमन एम्पायर', 'दि अमेरिकन कॉमनवेल्थ', 'स्टडीज् इन् काँटेंपोररी बायॉग्रफी' (सम-

कालीन चरित्रांचा अभ्यास ), दक्षिण अमेरिका, 'ऑब्झर्व्हेशन्स ॲन्ड इम्प्रेशन्स ' ( निरीक्षणें आणि त्यांचे मनावर परिणाम ), इ. होत.

**ब्राउन, रॉबर्ट** ( १७७३–१८५८ )—एक ब्रिटिश वनस्पतिशास्त्रज्ञ. वनस्पतिशास्त्रावर ग्रंथ लिहिणारा हा पहिलाच इंग्रज लेखक असून, त्यानें वनस्पतींच्या वर्गीकरणाची नैसर्गिक पद्धति अवलंबिली होती. पण पुढें लीनॉस याच्या वर्गीकरणपद्धतीमुळें ब्राउनची पद्धति अजीबात रद्द ठरली. १८२८ सालीं त्यानें आपला ग्रंथ प्रसिद्ध केला. त्यांत वनस्पतींतील परागांत जे कण दुर्बिणींतून दिसतात त्यांच्यासंबंधीं विचार, तसेंच सेंद्रिय आणि निरिंद्रिय पदार्थांतील सजीव अणूंच्या अस्तित्वासंबंधीं विचार, त्यानें व्यक्त केले आहेत. या पुस्तकांत वर्णन केलेल्या हालचाली 'ब्राउनियन मूव्हमेन्ट्स' या नांवानें प्रसिद्ध आहेत. आणि त्या हालचाली आधुनिक आणविक पदार्थविज्ञाना( मोलेक्युलर फिजिक्स )मध्यें महत्त्वाच्या गणल्या जातात.

**ब्राउनिंग, एलिझाबेथ बॅरेट** ( १८०९–१८६१ )—एक इंग्रज कवयित्री. तिच्या बापाची फार मोठी इस्टेट हरफर्डशायरमध्यें असल्यामुळें तेथें ती राहत असे. तिची प्रकृति अतिशय नाजूक असून लहानपणीं एका तट्टावरून पडल्यामुळें तिला दुखापत झाली. तथापि तिचें मन जोमदार असल्यामुळें तिनें प्राचीन ग्रीक व लॅटिन विद्वानांच्या ग्रंथांचा अभ्यास केला. १७ व्या वर्षीच तिनें आपला स्वतः केलेल्या कवितांचा संग्रह प्रसिद्ध केला. १८४६ सालीं तिनें पळून जाऊन रॉबर्ट ब्राउनिंग या सुप्रसिद्ध कवीबरोबर विवाह केला, व तीं दोघें इटलींत जाऊन फ्लॉरेन्स शहरीं आपल्या आयुष्याचा बराच काळ सुखानें राहिलीं. तिचे निरनिराळे कवितासंग्रह १८३३ ते १८६० या काळांत प्रसिद्ध झाले. शिवाय 'लास्ट पोएम्स,' ( अखेरच्या कविता ) आणि 'दि ग्रीक ख्रिश्चियन पोएट्स अँड दि इंग्लिश पोएट्स' ( ग्रीक ख्रिस्ती कवी व इंग्रज कवी ) हे ग्रंथ तिच्या मरणोत्तर प्रसिद्ध करण्यांत आले.

**ब्राउनिंग, रॉबर्ट** ( १८१२–१८८९ )—एक सुप्रसिद्ध इंग्रज कवि. लहानपणापासून त्याला काव्यें वाचण्याचा नाद असे. १८३३ सालीं 'पॉलीना' व १८३५ सालीं 'पारासेलसस' या त्याच्या काव्यांनीं कार्लाइल, वर्डस्वर्थ, इत्यादि विद्वानांचें लक्ष त्याच्याकडे वेधलें. त्यानें 'स्ट्रॅफोर्ड', 'ए ब्लॉट इन् दि स्कुशोन' हीं नाटकें, आणि 'सार्डेलो', 'मेन अँड वीमेन,' ( पुरुष आणि बायका ), 'ड्रॅमॅटिक आयडियल्स,' ( नाट्य ध्येयें ), इत्यादि अनेक काव्यें लिहिलीं. त्याच्या कवितेंत गंभीर विचार, विचारवैचित्र्य, दृढतर मनोभावना, इत्यादि गुण आहेत, व तो इंग्लंडच्या कविमंडळांत एक प्रमुख कवि मानण्यांत येतो. त्यानें १८४६ सालीं एलिझाबेथ बॅरेट नांवाच्या तरुणीशीं विवाह केला. तीहि चांगल्या प्रकारची कवयित्री होती ( वर पाहा ). याचें शव वेस्ट मिन्स्टर ॲबेंत पुरण्यांत आलें. इंग्लंड देश आपल्या अत्यंत थोर व्यक्तींना हा मान देत असे. त्याचीं कांहीं भावगीतें ( उदा., 'कोणत्याहि नवऱ्याची कोणतीहि बायको' ) फारच सुंदर असून कोणत्याहि भाषेंत तीं लोकप्रिय ठरतील.

**ब्राउने, सर थॉमस** ( १६०५–१६८२ )—एक इंग्रज वैद्यकशास्त्रज्ञ व लेखक. तो नॉर्विच येथें वैद्यकीचा धंदा करूं लागला. तेथेंच त्याचा विवाह झाला व वैद्यकीचा धंदा मोठ्या प्रमाणांत चालू लागून, त्याची कीर्ति फार पसरली. १६४२ सालीं त्यानें आपला 'रिलीजिओ मेडिसी' ( वैद्याचा धर्म ) हा ग्रंथ प्रसिद्ध केला. नंतर १६४६ सालीं त्यानें आपला 'स्यूडो-डॉक्सीआ एपिडेमिका' ( अडाणी चुकांवर प्रबंध ) हा दुसरा ग्रंथ प्रसिद्ध केला. व त्यामुळें त्याची कीर्ति अधिकच वाढली. हा ग्रंथ अतिशय विद्वत्तापूर्ण आहे. १६५८ सालीं त्यानें आपला 'हॅड्रायोटाफिया' ( अस्थिपात्रांवर प्रबंध ) हा आपला तिसरा ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथांनीं प्राचीनवस्तुसंशोधक म्हणून त्याची कीर्ति अतिशय वाढली. इंग्रजी वाङ्मयांतील एक उत्कृष्ट गद्य लेखक म्हणून ब्राउने प्रसिद्ध आहे.

**ब्रॉकहौस, हरमन** ( १८०६–१८७७ )— एक युरोपियन प्राच्यविद्यापंडित. याचा जन्म ॲमस्टर्डॅम येथें झाला. हा येना व लाइपझिक विश्वविद्यालयांत प्रोफेसर होता. ब्रॉकहौस हा पौरस्त्य भाषांचा खरा अभ्यासक होता. त्याला हिब्रू, अरबी, फारसी, संस्कृत, पाली या भाषा चांगल्या येत असून यांवर तो व्याख्यानें सुद्धां देऊं शके. त्याचा अतिशय मोठा ग्रंथ म्हटला म्हणजे सोमदेवाचें 'कथासरित्सागर' याचें केलेलें रूपांतर होय. त्यानें त्यानंतर 'प्रबोधचंद्रोदय' नांवाचें तत्त्वज्ञानविषयक नाटक प्रसिद्ध केलें.

**ब्रॉंझ**—पंचलोह. तांबें आणि कथिल ह्यांच्या मिश्रणानें तयार केलेला मिश्र धातु. क्वचित् प्रसंगीं इतरहि धातू थोड्या प्रमाणांत ह्यांत मिसळलेल्या असतात. तांब्यापेक्षां ब्रॉंझ हें कठिण असून लवकर वितळतें. ह्यावर झिलई चांगली चढते. ह्याचा रंग तांबूस पिंगट असतो व हवेमुळें तो पुढें काळा पडतो. नाणीं, घंटा, पुतळे, वगैरे करण्यासाठीं ब्रॉंझचा उपयोग करतात. पूर्वी ब्रॉंझमध्यें कथिलाचें प्रमाण शें. ४ ते १५ पर्यंत असे. ब्रिटिश नाण्यांतील धातूंचें प्रमाण तांबें शें. ९५, कथिल शें. ४ व जस्त शें. १ असें असतें.

पुतळ्याकरितां उपयोगांत आणावयाच्या ब्रॉंझमध्यें तांबें शें. ८५, जस्त शें. ११, व कथिल शें. ४ असतें. अल्युमिनियम

ब्राँझमध्यें तांबें आणि अल्युमिनियम असतें व त्यांचें प्रमाण ज्या कामासाठीं त्याचा उपयोग करावयाचा असेल, त्यावर अवलंबून असतें. सोन्याच्या रंगाचा एक अल्युमिनियम ब्राँझचा प्रकार आहे. त्याचा घड्याळासाठीं सांखळ्या, पट्टे, किंवा दागिने करण्याकडे उपयोग होतो.

सिलिको ब्राँझमध्यें लहान प्रमाणांत सिलिकॉन असतें. हें ब्राँझ चांगलें विद्युद्वाहक असून टेलेफोनच्या तारांसाठीं ह्याचा उपयोग करतात.

*ब्राँझ धातु प्राच्य देशांत व ईजिप्तमध्यें ख्रिस्ती शतकाच्या* आधींपासून माहीत आहे. मानवी सुधारणेंतील एक टप्पा ब्राँझ युगाचा आहे व तो पाषाण आणि लोह या युगांमधील आहे. ब्राँझ धातूचीं हत्यारें व उपकरणीं करीत असतील तो काळ निरनिराळ्या राष्ट्रांत निरनिराळा असूं शकतो. पॉलिनेशियांतल्या-प्रमाणें कांहीं देशांत हा टप्पा गाळलाहि असेल.

**ब्राँझ मुलामा**—पिवळा आणि तांबडा असे ब्राँझच्या मुलाम्याचे दोन प्रकार आहेत. तांब्याच्या बारीक भुकटीच्या साहाय्यानें पिवळा मुलामा चढवतात व तांबड्यासाठीं तांब्याच्या भुकटीबरोबर थोडी काचेची पूड घालतात. ब्राँझमध्यें जी हिरव्या रंगाची छटा असते ती सिरक्यांत नवसागर आणि चुक्रिकाक्षार (सॉल्ट ऑफ सोरेल) विरघळवून तयार केलेल्या मिश्रणानें आणतां येते. विद्युल्लेपना (इलेक्ट्रोप्लेटिंग)च्या पद्धतीनेंहि लहान लहान पदार्थांवर ब्राँझचा मुलामा चढवतां येतो.

**ब्राझील**—दक्षिण अमेरिकेंतील एक संस्थान. अमेरिका खंडांतील हा सर्वांत मोठा देश आहे. क्षेत्रफळ ३२,७१,५१० चौरस मैल व लो. सं. ४,१३,५६,६०५. जमीन बहुतेक सपाट व सुपीक, परंतु फार मोठाले भाग जंगलमय व अज्ञात आहेत. अमेझॉन, मदीरा, पराणा ह्या नद्या आहेत. रायो डी जानिरो हें मुख्य ठिकाण व सर्वांत मोठें शहर आहे. वस्ती बहुतेक किनाऱ्याच्या भागांतूनच आहे. कॉफी, रबर, मका, गहूं, कापूस, तंबाखू, व इतर पिकें निघतात. कांहीं कारखानेहि आहेत. जंगलापासून विपुल उत्पन्न निघतें. खनिज संपत्तिहि विपुल आहे. त्यांत विशेषेंकरून मँगॅनीज, सोनें व लोखंड हीं महत्त्वाचीं आहेत. रायो येथें विद्यापीठ आहे. विमानतळ ५०० वर विमानें राहतील इतका मोठा आहे. लष्करी शिक्षण १८ ते ४६ वयापर्यंत सक्तीचें आहे. विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे घटस्फोटबंदीचा कायदा आहे. इ. स. १५०० मध्यें एका पोर्तुगीजानें या प्रदेशाचा शोध लावला. पुष्कळ वर्षें यावर पोर्तुगालची सत्ता होती. मध्यंतरीं बरींच स्थित्यंतरें होऊन १८८९ सालीं लोकराज्य स्थापन झालें. १९२६ पावेतों ब्राझील राष्ट्रसंघांतहि होतें. मध्यंतरीं १९३० पासून संस्थानांत बरीच दंगल माजली होती. १९३४ मध्यें पुनर्घटना व स्थिर-स्थावर करण्यांत आली. गेल्या महायुद्धांत हें दोस्तांच्या बाजूला होतें.

**ब्रॉन्टे, चार्लोटी** (१८१६–१८५२)—एक इंग्रज कादंबरीकर्त्री. हिची आई लहानपणींच वारली आणि हिचा बाप विचित्र स्वभावाचा असल्यामुळें त्यानें चार्लोटीला व तिच्या बहिणींना प्राचीन स्पार्टन पद्धतीनें वाढविलें. म्हणजे तो त्यांना सर्व प्रकारचीं कष्टाचीं कामें करावयास लावीत असे. हिचें *शिक्षण कांहींसें घरीं व कांहीं शाळेमध्यें झाल्यावर हिनें शिक्षिकेची* नोकरी धरली व पुढें ती एका कुटुंबांत शिक्षकीण (गव्हर्नेस) झाली. १८४२ सालीं ती आपल्या एमिली (१८१८–१८४८) या बहिणीबरोबर ब्रुसेल्स येथें फ्रेंच व जर्मन भाषांचें ज्ञान मिळवण्याकरितां राहिली; आणि एक वर्ष अभ्यास केल्यावर तेथील शाळेंत तिनें अध्यापनाचें काम केलें. नंतर १८४४ सालीं चार्लोटी, एमिली व अॅन (१८२०–१८४९) या तीन बहिणींनीं मिळून एक शाळा काढण्याचें ठरवलें; पण तो त्यांचा बेत सिद्धीस गेला नाहीं. नंतर त्या तिघी बहिणींनीं काव्यलेखन सुरू केलें; आणि १८४६ सालीं त्या तिघींनीं टोपण नांवें देऊन एक काव्यसंग्रह प्रसिद्ध केला; पण त्या पुस्तकाकडे कोणीं फारसें लक्ष दिलें नाहीं. तेव्हां त्या तिघी बहिणींनीं काव्यलेखन बंद करून गद्य कादंबरी-लेखन सुरू केलें. चार्लोटीनें 'दि प्रोफेसर' या नांवाची कादंबरी लिहिली, पण ती प्रसिद्ध करण्यास कोणी प्रकाशक मिळेना. एमिलीनें 'वुदरिंग हाइट्स' ही कथा आणि अॅननें 'अॅग्नेस ग्रे' ही कथा लिहिली. या दोन्ही पुस्तकांना यश लाभलें व त्यांचा खप झाला. इकडे चार्लोटीनें पहिल्या अपयशामुळें निरुत्साही न होतां 'जेन आयर' या नांवाची कादंबरी लिहिली व ती १८४७ सालीं प्रसिद्ध झाली. ही कादंबरी त्वरित लोकप्रिय झाली. त्यामुळें चार्लोटीनें 'शर्ले' ही आपली दुसरी कादंबरी १८४९ सालीं प्रसिद्ध केली. या दोन कादंबऱ्या आत्मचरित्रपर आहेत. पुढें १८५२ सालीं चार्लोटीनें आपली तिसरी कादंबरी 'व्हिलेटी' प्रसिद्ध केली. नंतर लवकरच तिनें रेव्हरंड आर्थर बेल निकोल्स ह्याच्याबरोबर विवाह केला; परंतु विवाहानंतर ९ महिन्यांनींच ती मरण पावली.

या ब्रॉन्टे लेखिकांबद्दल बरींच पुस्तकें प्रसिद्ध झालीं असून एक ब्रॉन्टे सोसायटी म्हणूनहि स्थापन झाली होती. तसेंच एक ब्रॉन्टे संग्रहालयहि उघडण्यांत आलें होतें (१९२८).

**ब्रान्डीज, जॉर्ज** (१८४२–१९२७)—अत्यंत मोठा डॅनिश टीकाकार. याला अर्वाचीन काळांतील जागतिक वाङ्मयाचा एक प्रमुख टीकाकार म्हणतां येईल. युरोपांतील सर्व विचार-

संप्रदायांचा त्यानें आपल्या लेखनांत परामर्ष घेतलेला आढळतो. 'मेन करंट्स इन् नाइन्टीन्थ सेंचरी लिटरेचर' (१९ व्या शतकांतील वाङ्मयांतील प्रमुख प्रवाह) भाग ६-या ग्रंथांत त्याचे सर्व विचार संक्षेपानें पाहावयास मिळतात. तो पक्का नास्तिक होता तरी त्यानें आपल्या काळांतील समाजाची दृष्टि जास्त समदर्शी आणि बौद्धिक करण्याचें कांहीं अंशीं श्रेय मिळविलें आहे यांत शंका नाहीं.

**ब्रायटन**—इंग्लंड, ससेक्स परगण्यांतील समुद्रकांठचें एक हवा खाण्याचें ठिकाण. हें लंडनपासून ५१ मैलांवर आहे. लो. सं. १,४७,४२७. सेंट निकोलस प्रार्थनामंदिरांत ड्यूक ऑफ वेलिंग्टनचें स्मारक आहे. पॅव्हिलियन इमारतींत पदार्थ-संग्रहालय व चित्रांचीं दालनें आहेत. एका इमारतींत सर्व सजीव जलचर प्राणी पाण्यांत ठेवले आहेत. आणि एका दुसऱ्या इमारतींत सर्व जातीचे पक्षी आहेत.

**ब्राहुई**—बोलन घाटाजवळून अरबी समुद्रावरील मॉझ भूशिरापर्यंत असणाऱ्या ब्राहुई पर्वतावर राहणाऱ्या बलुची लोकांना ब्राहुई म्हणतात. बहुधा ते द्राविड वंशाचे असून पुष्कळ वर्षांपूर्वी आपल्या देशांतून येथें आले असावे. त्यानंतर त्यांच्यावर अरब संस्कृतीचा बराच परिणाम झालेला दिसतो. प्राचीन काळापासून त्यांच्या हातीं बलुचिस्तानची बरीच सत्ता आहे. ते सुनी पंथाचे मुसलमान आहेत. ते ठेंगणे परंतु बळकट असून त्यांचे चेहरे रुंद व ओबडधोबड असतात. पण ते विश्वासू व शांत स्वभावाचे आहेत.

ब्राहुई लोकांची भाषा आज द्राविड भाषावंशांत समाविष्ट करतात. ही भाषा बोलणारे लोक सुमारें दोन लाख तरी असावेत.

**ब्राह्मण**—ही हिंदु-समाजांतील एक जात आहे. ब्रह्मन्‌चा पुत्र तो ब्रह्मपुत्र अगर ब्राह्मण. ब्रह्मन् म्हणजे बृह्=स्तुति करणें + मत् या अर्थी याज्ञिक वाङ्मयांत हा शब्द मूळ रूढ झाला. हिंदुधर्मांतील पुरोहित, उपाध्याय किंवा उपासकाचा धंदा करणारा हा ब्राह्मणवर्ग पर्शुभारतीय काळांत अथर्वन् किंवा अथ्रवन् या नांवानें ज्ञात होता. मूलगृहकालींहि हा वर्ग होता. पुरुषसूक्तांत चार वर्णांची उत्पत्ति दिली आहे, त्यावरून हें स्पष्ट होतें. त्यापूर्वी कांहीं शतकें तरी हे चारहि वर्ण समाजांत उत्पन्न झालेले असले पाहिजेत. मूलगृहकाल म्हणजे उत्तरध्रुवाजवळील आर्यांच्या वसतिस्थानाचा काल खि. पू. आठ हजार वर्षांपलीकडचा ठरतो, असें मत लो. टिळकांनीं दिलें आहे ('ओरायन' व 'आर्क्टिक होम इन् दि वेदाज्' पाहा). पुरुषसूक्तांतील ब्राह्मणादि वर्णांच्या उत्पत्तिविषयक उपपत्तिच मनुस्मृत्यादि स्मृतिग्रंथांत व पुराणांत ग्राह्य मानली आहे (लोकानां तु विवृध्द्यर्थं मुखबाहुरुपादतः। ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं शूद्रं च निरवर्तयत्॥ -मनुस्मृति १.३१). पुराणांत व बायबलांत जी जलप्रलयाची कथा आहे त्या जलप्रलयापूर्वीच्या कालांत म्हणजे पौराणिक वर्णनाप्रमाणें सत्य, त्रेता, द्वापार व कलि या चार युगांपैकीं आद्य सत्ययुगांतहि हे ब्राह्मणादि चार वर्ण होते, असें प्रतिपादिलें आहे. नवी ऐतिहासिक व विकासवादी उपपत्ति अशी आहे कीं, हिंदुस्थानांत मंत्र संस्कृतीचे लोक आले त्यापूर्वीच त्यांच्यांत दोन वर्ण म्हणजे वर्ग उत्पन्न झाले असावे; ते म्हणजे आर्य व दास होत. पर्शुभारतीय काळामध्येंच अथर्वणांचें ऊर्फ पुरोहितांचें सामाजिक अग्रेसरत्व स्थापन झालें होतें. जोंपर्यंत यज्ञसंस्था रूढ असून पुरोहितांचा धंदा चालू होता तोंपर्यंत या वर्गांत इतर वर्गांतील व्यक्तीहि प्रवेश करूं शकत असत. याला जातिस्वरूप कुरुयुद्धोत्तर कालांत येऊं लागलें असावें असें दिसतें.

प्राचीन काळीं गोत्रें हीं कुलदर्शक नामें म्हणून प्रचारांत होतीं. प्रवर म्हणजे आव्हान करण्यास योग्य अशा समजलेल्या व निवडलेल्या व्यक्ती. गोत्रांचा व वेदाध्ययनाचा संबंध कांहीं एक नव्हता. अनेक कुलांतील ब्राह्मण वाटेल तो वेद पत्करीत व त्यांत सुद्धां जेव्हां शाखाभेद किंवा सूत्रभेद झाले तेव्हां ते कोणत्या तरी पक्षास मिळाले. ब्राह्मणांचें काम देवतांचे स्तुतिपाठ करून त्यांचे यज्ञ करण्याचें होतें व क्षत्रियांचें काम लढण्याचें होतें. ऋषी लढाईत पडत असत व पुढें ब्राह्मणहि पडत. याच प्रकारचें काम विश्वामित्र, भरद्वाज, कण्व, आंगिरस, वगैरे करीत व भरताकरितां स्तुति करून देवतांस संतुष्ट करीत. क्षत्रियांच्या मुली ब्राह्मण करीत असत व ब्राह्मणांच्या मुली क्षत्रिय करीत असत. सोमवंशीय क्षत्रियांपैकीं कित्येक क्षत्रिय आपला क्षत्रियाचा धंदा सोडून ब्राह्मण होत असत. कण्व हा मतिनार याच्या वंशांत उत्पन्न होऊन ब्राह्मण झाला व पुढें त्याचे सर्व वंशज ब्राह्मणच झाले. ब्राह्मणांनींच यज्ञयागादिकांच्या क्रिया कराव्या, असा ब्राह्मणांचा आग्रह होता. वेदविद्या पठण करण्याचें कठिण काम ब्राह्मणांनीं सुरू केलें होतें. ब्राह्मणांचें काम कठिण होऊन त्यांना आपली बौद्धिक शक्ति वाढवावी लागली होती. कोणत्याहि धंद्यास आनुवंशिक संस्कार उपयोगी पडतो हें प्रसिद्ध आहे. अर्थात् ब्राह्मणांचीं मुलें हींच स्मरणशक्तीनें वेदग्रहण करण्यास योग्य असत. यामुळें साहजिकच ब्राह्मणाचा मुलगा हाच ब्राह्मण व्हावा असा आग्रह उत्पन्न होणें अपरिहार्य होतें. त्याजविषयीं मोठा तंटा केला गेला, ही गोष्ट आपल्यास वसिष्ठ व विश्वामित्र यांच्या पौराणिक वादावरून स्पष्ट होते. नहुष-अगस्ति या कथेमध्यें जातीच्या दुसऱ्या एका गोष्टीचें परीक्षण झालें. ब्राह्मणाचा धंदा इतरांनीं कां करूं नये, या वादाप्रमाणें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, ब्राह्मणांना इतर जातींचा धंदा करावयास कां लावूं

नये ? नहुषानें सर्व ऋषींस आपली पालखी उचलावयास सांगितलें व त्यांस जेव्हां त्याची पालखी खांद्यावर घेऊन जलदीनें चालतां येईना तेव्हां त्यांस तो मोठमोठ्यानें ‘सर्प! सर्प!’ म्हणजे ‘चाला! चाला!’ असें म्हणूं लागला. तेव्हां अगस्ति ऋषींनें रागावून त्यास ‘तूं सर्प हो!’ असा शाप दिला आणि तो सर्प होऊन खालीं पडला. या कथेंतील तात्पर्य हें कीं, जे बौद्धिक धंदा करतील त्यांच्यावर शारीरिक मेहनत करण्याची सक्ती होऊं शकणार नाहीं!

ब्राह्मण ही हिंदूंची एक जात असल्यामुळें ‘हिंदु’ शब्दाची धार्मिक व्याख्या पुढीलप्रमाणें करतात. “जातिस्तत्सदृशं कर्म मूर्तिपूजाशिखादिकम्। श्रुतौ श्रद्धा पुनर्जन्मविश्वासो हिंदुलक्षणम्॥” हीं सर्व लक्षणें ब्राह्मणांत असलीं पाहिजेत. शिवाय ब्राह्मणाचीं कर्तव्यें सांगितलीं आहेत तीं—जातकर्मादि सोळा संस्कार, वेदाध्ययन, सुरापान व मांसाशन वर्ज्य करणें, यांसारखे नियम पाळणें, होम, त्रैविद्याख्य व्रत, ब्रह्मचर्यावस्थेंतील देवर्षिपितृतर्पणरूप इज्या, गृहस्थाश्रमांतील पुत्रोत्पादन, ब्रह्मयज्ञादि पंचमहायज्ञ, ज्योतिष्टोमादियज्ञ, हीं कर्तव्यें करणारा तो ब्राह्मण, अशी विस्तृत व्याख्या मनुस्मृतींत आहे (मनुस्मृति २·२८). त्याचाच आशय थोडक्यांत म्हणून अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान व प्रतिग्रह अशीं सहा कर्में ब्राह्मणवर्गाचीं असल्याचा उल्लेख अनेक ठिकाणीं केलेला आहे. ब्राह्मणवर्गाचें प्रामुख्य हजारों वर्षे सतत टिकण्याचें कारण असें कीं, ब्राह्मणांनीं वेदविद्या पठण करण्याचें कठिण काम वंशपरंपरा चालू ठेवून वेदमूलक विद्येचा विकास केला. आणि षट्शास्त्रें व विद्या यांचा अभ्यास करून संस्कृत विद्येंतील आपलें नैपुण्य आणि शास्त्रविहित सदाचरण आजतागायत कायम टिकविलें आहे. चाराहि वर्णांचें उपाध्येपण करून अखिल हिंदूंची धर्मश्रद्धा सतत जाज्वल्य टिकविली आहे, आणि हजारों वर्षे क्षत्रिय राजघराण्यांतील राजांचें मंत्रिपद पत्करून निर्लोभवृत्तीनें राजधर्म पाळण्यास हिंदु राजांमहाराजांना प्रवृत्त केलें आहे. गेलीं ३-४ शतकें म्हणजे शिवाजीच्या काळापासून ब्राह्मणांनीं क्षात्रकर्म म्हणजे प्रत्यक्ष युद्धकर्म स्वीकारलें व पेशवाईंत या क्षात्रकर्मांत नैपुण्य दाखवून मोगल साम्राज्य नष्ट केलें व मराठ्यांचें साम्राज्य स्थापन केलें. ब्रिटिश अमदानींत तर ब्राह्मण जातींत भिक्षुक व गृहस्थ असे दोन स्पष्ट पोटभेद होऊन ‘गृहस्थ’ ब्राह्मणांनीं क्षत्रिय-वैश्य-शूद्रादिकांच्या बहुतेक सर्व धंद्यांत शिरकाव केला असल्यामुळें आणि मद्यमांसाशनाबाबतहि कडक निर्बंध न पाळल्यामुळें प्राचीन ब्राह्मणवर्णाच्या आदर्शाशीं तुलना करून आजच्या सर्व ब्राह्मण जातीची अवहेलना होऊं लागली आहे. तथापि ही गोष्ट अपरिहार्य आहे.

ब्राह्मणांच्या पोटजाती—ब्राह्मणांमध्यें दोन मुख्य भेद म्हणजे पंचगौड (सारस्वत, कान्यकुब्ज, गौड, उत्कल व मिथिल म्हणजे प्रायः उत्तर हिंदुस्थानी ब्राह्मण) आणि पंचद्राविड (महाराष्ट्रीय, आंध्र किंवा तेलगू, द्राविडी, कानडी व गुजराथी म्हणजे दक्षिण हिंदुस्थानांतील ब्राह्मण). या दोहोंचे याप्रमाणें दहा मुख्य प्रादेशिक भेद आहेत. ब्राह्मण जातीची एकूण लो. सं. (१९११) १,४५,९८,७०८ होती. वरील दहा पोटजातींपैकीं प्रत्येक जातींत आणखी बऱ्याच उपपोटजाती आहेत.

ब्राह्मणांच्या कांहीं विशिष्ट पोटजाती—ठाणें जिल्ह्यांत डहाणू-उंबरगांवाकडे जंबू ब्राह्मण राहतात. जुनागडास गिरनारे ब्राह्मण, मथुरेस चोबे, गोकुळांत सनाढ, द्वारकेस गुगुळिये ब्राह्मण, नडियादेस खाळ, खेड्यास खेडावळ व वालिम ब्राह्मण, आणि अहमदाबादेस औदीच्य ब्राह्मण राहतात. परंतु औदीच्यांचे तीन संप्रदाय आहेत: हळवद, सिहारे व सितपूर. या ठिकाणीं औदीच्य सहस्र म्हणून ब्राह्मण बरेच आहेत; व त्यांचे संप्रदायहि वरिष्ठ गणले जातात. अलीबाग वगैरे अष्टागरांत किरवंत ब्राह्मण राहातात. पंढरपुरास बडवे ब्राह्मण आहेत. पंजाबांत सारस्वत ब्राह्मण राहतात; परंतु त्यांत दोन भेद आहेत: पंजाबी व सोरटिया; सोरटिया सारस्वत हे काठेवाडांत राहतात; नाशकास मैत्रायणी ब्राह्मण राहतात; सावंतवाडीस शेणवी सारस्वत ब्राह्मण राहतात; सोरटी सोमनाथास सोमपुरे ब्राह्मण आहेत. गयेच्या वाटेवर पुनः पुन्हा नदीच्या कांठीं शाकलद्वीपी ब्राह्मण राहतात. गयेस गयावळ राहतात. अयोध्येस सरवरिये व कनोजेस कनोजे ब्राह्मण राहतात; वऱ्हाडांत हिंगणघाट आहे, तेथें कलंकी ब्राह्मण; नागपुरास चरक ब्राह्मण; वसईस सामवेदी ब्राह्मण; ठाण्यास पळशे ब्राह्मण; भडोचेस भार्गव ब्राह्मण; अहमदाबाद, जुनागड, भावनगर येथें नागर ब्राह्मण; कोंकणांत चित्पावन ब्राह्मण; व महाड तालुक्यांत गोवर्धन ब्राह्मण आहेत. जनकपुरास मैथील ब्राह्मण; जगन्नाथास उत्कल ब्राह्मण; त्रावणकोरास नंबुद्री ब्राह्मण; बोरसदेस बोरसदी ब्राह्मण; आणि श्रीक्षेत्र काशी येथें सर्व जातींचे ब्राह्मण आहेत. (लोकहितवादी—ऐतिहासिक गोष्टी).

निरनिराळ्या प्रांतांतील प्रमुख ब्राह्मण जाती खालीं दिल्या आहेत. यांत पोटजाती अनेक आहेत.

बंगाल—पाश्चात्य वैदिक, राधीय, बारेंद्र, दाक्षिणात्य वैदिक, मध्यश्रेणी.

मिथिला—श्रोत्रीय किंवा सोटे, जोग, पंजीबध, नागर, जैवर.

दक्षिण बिहार—शाकलद्वीपी.

संयुक्त प्रांत—कनोजिया, शरुजुपारिया, सनाढ्य.

काश्मीर—काश्मिरी, डोग्रा.

पंजाब—सारस्वत.
सिंध—श्रीकर, बारी, बावनजाही, शेटपल, कुवाचंद.
ओरिसा—दाक्षिणात्य, जयपुरी.
राजपुताना—श्रीमाळी, पल्लिवाल, पोकरण, सांचोरा, दाहिमा, दिवा, पारिक, खंडेलवाल, नंदवाणी, शिखवळ, असोपा, राजगोर, गुजरगोर, भोजक.
गुजराथ—औदीच्य, नागर, राइकवार, भार्गव, श्रीमाळी, गिरनार.
महाराष्ट्र—देशस्थ, कोंकणस्थ, शुक्ल यजुर्वेदी, कऱ्हाडे, सारस्वत ( शेणवी ), देवरुखे, सवाशे, किरवंत, पळशे, आभीर, जवळ, कास्त, त्रिगुळ, सोपार, इ.
कर्नाटक—बब्बुर कम्मे, कन्नड कम्मे, उळच कम्मे, हैसणिग, अरवट्ट वक्कलू, हळे कर्नाटक, कर्नाटक, वडुगनाड्ड, सिरनाड्ड, हविक.
मद्रास—अ. स्मार्त—वर्मा, बृहच्चरण, अष्टसहस्त्र, संकेत.
आ. वैष्णव—वडगळा, तेंगळा.
तेलंगण—अ. स्मार्त—वैदिक, नियोगी.
आ. रामानुजी—आंध्रवैष्णव, श्रीवैष्णव.
इ. माध्व—वेळनाड्ड, वेंगीनाड्ड, कसलनाड्ड, मुरकनाड्ड, याज्ञवल्क्य, नियोगी, आराध्य.
मध्यप्रांत—गोंड ब्राह्मण ( झाडी ब्राह्मण ), चरकी, माळवी, नर्मदी.
दक्षिण कानडा व कुर्ग—तुळुवा, कावेरी ( अम्माकोडगा ).
केरळ, मलबार—नंबुद्री.

उपपोटजाती—सारस्वत ५०० वर पोटभेद, काश्मिरी २२१, कनोजी २०१, गौड २०, उत्कल ३२, महाराष्ट्री २४, आंध्र १६, कर्नाटकी १५, गुजराथी ९३, राजपुताना ३१, नेपाळी ८१, इतक्या सामान्यपणें उपपोटजाती आढळतील.

**ब्राह्मणधर्म**—ब्राह्मणधर्म म्हणजे ब्राह्मण वर्णाचा धर्म असा अर्थ करतां येईल. परंतु त्या अर्थानें हा शब्द कोणीहि वापरीत नाहींत. हिंदुमात्राचें शास्त्र अथवा स्मृतिग्रंथोक्त धर्म ह्याला ब्राह्मणधर्म ( ब्राहॅनिझम् ) म्हणण्याचा प्रघात कित्येक पाश्चात्य ग्रंथकारांनीं पाडला आहे. मनु वगळून बाकी सर्व स्मृतिकार ब्राह्मण आहेत. त्यांनीं प्रतिपादिलेला धर्म तो ब्राह्मणधर्म असें म्हणतां येईल. हा धर्म ब्राह्मणांनीं सर्व वर्णांकरितां सांगितला आहे असें जरी आहे तरी स्मृतिकारांनीं जातिधर्म व कुलधर्म पाळण्याची मोकळीक ठेविली असल्यामुळें स्मार्त धर्मव्यतिरिक्त परंपरागत धर्माचें पालन कसोशीनें ब्राह्मणेतरांकडून होत असतें. स्मृत्युक्त धर्माचें पालन ब्राह्मणवर्ग दक्षतेनें करतो. तरीसुद्धां कुलधर्म व जातिधर्म ह्यांना त्यानें सोडलें आहे असें नाहीं. प्रत्येक स्मृतिकार मनूला अतिशय मान देतो. त्याच्या वचनाला विरोध करावयाचा झालाच तर मोठ्या कष्टानें करतो. आणि मनु तर क्षत्रिय. असें असून स्मार्त धर्म हा ब्राह्मणी धर्म आहे, असा ग्रह झाल्यावांचून राहत नाहीं. ह्यांदिरीज ब्राह्मणी धर्म ह्याला कांहीं अर्थ नाहीं. जैन, बौद्ध, लिंगायत व महानुभाव हे पंथ म्हणजे ब्राह्मण्याविरुद्ध स्थापलेले संप्रदाय होत.

**ब्राह्मणाबाद**—( सिंधी नांव बुंब्राकेथूल ). सिंधमधील थर व पारकर जिल्ह्याच्या झिंझोरो तालुक्यांतील एक प्राचीन पण आज नष्ट झालेलें शहर. हें ११ व्या शतकांत सिंधु नदाच्या पूर्वीच्या प्रवाहाच्या किनाऱ्यावर तंटचंदीचें व भरमराटीचें शहर होतें. शिकंदरच्या इतिहासकारांनीं वर्णिलेलें ब्राह्मणांचें शहर तें हेंच असावें. डायाडोरसचें हर्मेटेलिया म्हणजे ब्राह्मणाबादच असें दिसतें. दाहिरनें याला महत्त्वास चढविलें असावें. भूकंपासारख्या कांहीं आधिभौतिक क्षोभामुळें हें एकदम जमिनींत जसेंच्या तसेंच गाडलें गेलें.

**ब्राह्मणें**—वेदांचें उपबृंहण करणारे हे ग्रंथ आहेत. देवदेवतांस प्रसन्न करून आपल्याकडे ओढून घेण्याचा मार्ग या ग्रंथांत दाखविला आहे. ज्या यज्ञांच्या योगानें देवादिकांस संतुष्ट करावयाचें त्या यज्ञकर्मांस मंत्र योजणारे हे ग्रंथ आहेत. प्रत्येक वेदाचीं निराळीं ब्राह्मणें आहेत. त्यांचीं कांहीं नांवें : ऋग्वेद— १ ऐतरेय ब्राह्मण; २ कौषीतकी ( सांख्यायन ) ब्राह्मण. यजुर्वेद— ३ शतपथ ब्राह्मण; ४ तैत्तिरीय ब्राह्मण. सामवेद—५ तांड्य पंचविंश ब्राह्मण; ६ आर्षेय ब्राह्मण; ७ अद्भुत ब्राह्मण; ८ दैवत ब्राह्मण; ९ षड्विंश ब्राह्मण ( जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण); १० सामविधान ब्राह्मण. अथर्ववेद—११ गोपथ ब्राह्मण. हे सर्व गद्य ग्रंथ आहेत. त्यांत यज्ञविषयक विचार, ऋतुपरत्वें व्यावहारिक व आध्यात्मिक कर्मांचें वर्णन, वैदिक देवतांचें वर्णन व त्यांच्या कथा यांचा समावेश झाला आहे.

**ब्राह्मसमाज**—एक अर्वाचीन धर्मपंथ. इंग्रजी शिक्षणाचा परिणाम हिंदुस्थानांतील सुशिक्षितांच्या धार्मिक विचारांवर होऊन ज्या संस्था या देशांत उत्पन्न झाल्या त्यांपैकीं बंगाल्यांत कलकत्ता येथें १८२८ सालीं स्थापन झालेली ब्राह्मसमाज ही संस्था पहिली होय. हिचे संस्थापक राजा राममोहन राय हे होत. परब्रह्म परमेश्वर ‘ एकमेवाद्वितीयम् ’ असा आहे. तोच ज्ञानस्वरूप, सर्वशक्तिमान् व सर्वसाक्षी असून त्याच्याशीं कोणाचीहि तुलना करूं नये ( अर्थात् अवतारमालिका समाजाला मान्य नाहीं ). परमेश्वराची उपासना करणें म्हणजे त्यास प्रिय अशीं कार्यें करणें आहे ( अर्थात् या धर्मांत जनसेवेस प्राधान्य देण्यांत आलें आहे ). परमेश्वर हा पिता व मानवजात ही त्याचीं लेंकरें असें मानल्यामुळें जातिभेदास या

ब्रुसेल्स — न्यायालय (पृ. १७८६)

भुवनेश्वर — मुक्तेश्वर-मंदिर (पृ. १८२२)

भाजें — लेणें (पृ. १८०३)

पंथांत थारा दिलेला नाहीं. स्त्री-पुरुषांच्या दर्जांत अंतर मानलें जात नसून सर्वांस समानतेनें वागविण्याची शिफारस आहे. विधवा-पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण, पतितोद्धार, वगैरे सामाजिक बाबींत या समाजाचीं मतें उदार आहेत. देवेंद्रनाथ ठाकूर, केशवचंद्रसेन, वगैरे विद्वान् सदस्यांमुळें या संप्रदायाचें महत्त्व बंगाल्यांत प्रस्थापित झालें व पुढें या समाजाचीं तत्त्वें या देशाच्या बऱ्याच भागांत ग्राह्य मानलीं गेलीं. याचा परिणाम म्हणजे ब्राह्मसमाजाच्या धर्तीवर महाराष्ट्रांतील प्रार्थनासमाजाप्रमाणें लहान-मोठ्या संस्था सर्वत्र निघाल्या. या सर्वांचें ध्येय धार्मिक प्रगति हें आहे.

राममोहन रायांनीं प्रथम ब्राह्मसमाज स्थापन करते वेळीं जीं तत्त्वें ठेविलीं होतीं तींत देवेंद्रनाथ टाकूर यांनीं वेदप्रामाण्य सोडल्यामुळें थोडा बदल केला. देवेंद्रांचे शिष्य केशवचंद्र सेन यांनीं 'संगतसभा' काढून ब्राह्मसमाजाचीं धार्मिक किंवा सामाजिक मतें फैलावण्याचें कार्य केलें. पण केशवचंद्र सेनांचीं मतें फारच सुधारकी होतीं; मिश्रविवाहास त्यांची अनुकूलता वनत चालल्यामुळें जुन्या पंथियांना तें आवडेना. तेव्हां केशवांचा 'भारतवर्षीय ब्राह्मसमाज' व जुना 'आदिब्राह्मसमाज' अशी फाटाफूट झाली. केशवांनीं वैष्णवांच्या भक्तिमार्गाची मदत आपल्या संप्रदायाला घेतली व जयंत्या, कीर्तनें आणि प्रवचनें हीं सुरू केलीं.

पण केशवचंद्र सेनांचें वागणें कांहीं अनुयायांना न पटून त्यांनीं फुटून दुसरा 'साधारण ब्राह्मसमाज' काढला. या संप्रदायाचे प्रमुख शिवनाथशास्त्री होते. इकडे केशवांनींहि 'नवविधान समाज' स्थापन केला व हिंदु आणि खिस्ती विधींचा त्यांत अंतर्भाव केला. याप्रमाणें एका ब्राह्मसमाजाचे तीनचार पोटपंथ झाले. आज साधारण ब्राह्मसमाज काय तो बरा चालला आहे. (प्रार्थनासमाज पाहा.)

**ब्राह्मी**—एक औषधी वनस्पति. हिला कपोतवंका, सोमवल्ली, सरस्वती अशींहि नांवें आहेत. हिचा एक ब्रह्ममांडुकी असा भेद आहे. तिला मंडूकपर्णी, मांडुकी, त्वाष्ट्री, महौषधि असेंहि म्हणतात. डोकें हलकें झालें किंवा फिरलें म्हणजे हिचा नेहमीं उपयोग करतात. रक्तशुद्धीकरतांहि हिची योजना करतात. अपस्मारावर रस मधाशीं देतात. ब्राह्मीचें तेल काढतात; हें डोक्याच्या विकारावर गुणकारी आहे.

**ब्राह्मी वर्ग**—(स्क्रोफुलारिआसी). हा द्विदल वानस्पतिक झाडांचा मोठा वर्ग आहे. या वर्गातील झाडें थंड प्रदेश सोडून जगाच्या सर्व भागांत होतात. या वर्गांत फॉक्सग्लव्ह, कॅल्सिओलारिआ, व्हेरोनिका, मिम्युलस, ॲटिन्हिनम, आणि पेंटस्टेमॉन, इत्यादि झाडें मोडतात.

सु. वि. भा. ४-४९

**ब्राह्मी लिपि**—मौर्यवंशी अशोक राजाच्या शिलालेखांवरून व खि. पू. चौथ्या शतकापासून पुढील सहासात शतकांतील जीं प्राचीन नाणीं सांपडलीं आहेत त्यांवरून असें दिसून येतें कीं, प्राचीन काळीं आपल्या भरतखंडांत दोन निरनिराळ्या लिपि प्रचलित होत्या. एक ब्राह्मी व दुसरी खरोष्ठी. (खरोष्ठी लिपि पाहा.) जैनांच्या सूत्रांत ब्राह्मीला 'बंभी,' म्हटलें आहे व तिला लिपीमध्यें अग्रस्थान दिलें आहे. 'नमो बंभीए लिविए' असा भगवतीसूत्राचा आरंभच आहे. बौद्धांच्या 'ललितविस्तरां'त देखील ६४ लिपींच्या यादींत ब्राह्मी व खरोष्ठी यांना आरंभीं घातलें आहे. चिनी ग्रंथांतहि यांचे उल्लेख आहेत. तेव्हां ब्राह्मी ही भारतांत स्वतंत्र लिपि असून तिचा प्रचार सर्वत्र होता हें निर्विवाद ठरतें. या ब्राह्मी लिपीलाच पाश्चात्य पंडितांनीं 'पाली', 'साउथ अशोक', 'लाट' अशीं वेगवेगळीं नांवें दिलीं आहेत. या लिपीच्या उत्पत्तीसंबंधीं पंडितांत एकमत नाहीं. पण आज देवनागरी लिपीची प्रथमावस्था या ब्राह्मीवर्णांत शोधावी लागते.

**ब्रिआन्द, आरिस्तिद** (१८६५–१९३२)—एक फ्रेंच मुत्सद्दी. तो प्रथम बॅरिस्टर होऊन 'लालान्तर्न' या समाजसत्तावादी वृत्तपत्राचा राजकारणतज्ज्ञ संपादक झाला. १९०२ सालीं तो फ्रेंच कायदेमंडळांत निवडून आला. १९०६ सालीं शिक्षणमंत्र्याची जागा त्यानें पत्करली, म्हणून त्याला सोशॅलिस्ट पक्षांतून काढून टाकण्यांत आलें. १९०९ सालीं तो प्रथम पंतप्रधान झाला. तो एकंदर अकरा वेळां पंतप्रधान, सोळा वेळां परराष्ट्रमंत्री, तीन वेळां न्यायमंत्री, चार वेळां गृहमंत्री व दोन वेळां शिक्षणमंत्री झाला. यावरून त्याच्या भरीव कारकीर्दीची कल्पना येईल. आरंभीं त्याचें महत्त्वाचें कार्य म्हणजे शासनसंस्था आणि धर्मसंस्था हीं वेगळीं करणें. पहिल्या महायुद्धानंतर झालेल्या लोकार्नोच्या तहनाम्यावर त्याची सही आहे. १९२० सालीं त्यानें युरोपांतील राष्ट्रांची एकजूट करण्याची कल्पना काढली होती. ती आज दुसऱ्या महायुद्धानंतर अमलांत आलेली दिसते आहे.

**ब्रिग्ज, हेन्री** (१५६१–१६३१)—एक इंग्रज गणितशास्त्रज्ञ. तो प्रथम ग्रेशॅम कॉलेजमध्यें भूमितिशास्त्राचा प्रोफेसर झाला व नंतर ऑक्सफर्ड येथें ज्योतिषशास्त्राचा प्रोफेसर होता. त्यानें लॉगॅरिथमची एक पद्धत प्रथम सुरू केली.

**ब्रिज**—(लिलांवाचा डाव). हा एक ५२ पानी पत्त्यांचा खेळ आहे. हा खेळ प्रथम लॉर्ड ब्रोगहॅम यानें १८९४ मध्यें पोर्टलॅंड क्लबमध्यें सुरू केला. हा खेळ सामान्यतः साध्या सातहाती डावाप्रमाणेंच खेळला जातो. या खेळांत प्रथम पत्ते वांटणारा गडी आपणास पाहिजे ती मागणी (कॉल) करतो; म्हणजे तो डाव कसा खेळावयाचा, बिनहुकुमी किंवा कोणता

| | | |
|---|---|---|
| हाँगकाँग | ३९१ | ९,००,००० |
| हिंदुस्थान | १८,०८,६७९ | ३५,२८,३८,००० |
| पॅलेस्टाइन (मँडेट) | १०,४२९ | १४,१८,६१८ |
| मलाया वसाहत | १,३५५ | ११,१४,००० |
| मलाया फेडरेटेड | २७,६४८ | २०,८९,८०० |
| मलाया अन्फेडरेटेड | २३,४८६ | १७,३९,६०९ |
| एकूण | २३,५६,४६४ | ३८,१३,३४,११८ |
| **आफ्रिकेंत—** | | |
| केनिया | २,२४,९६० | ३३,३४,१९१ |
| युगांडा | ९३,९८१ | ३७,११,४९४ |
| झांझीबार व पेंबा | १,०२० | २,३५,००० |
| मॉरिशस | ७२० | ३,९३,४१८ |
| न्यासालँड | ३७,८९० | १६,३९,३०० |
| सेंट हेलेना व अॅसन्शन | ८१ | ४,६०० |
| सिचीलीस | १५६ | ३०,९४० |
| सोमालीलँड | ६८,००० | ३,४५,००० |
| बासुटोलँड | ११,७१६ | ६,६०,६५० |
| बेचुआनालँड | २,७५,००० | २,६५,७५६ |
| दक्षिण ऱ्होडेशिया | १,५०,००० | १३,७५,५०० |
| उत्तर ऱ्होडेशिया | २,९०,००० | १३,९२,००० |
| स्वाझीलँड | ६,७०४ | १,५६,७०० |
| युनियन ऑफ साउथ आफ्रिका | ४,७२,५५० | ९६,८९,८९८ |
| नायजेरिया | ४,१३४ | २,००,००० |
| गँबिया | ३,४१,५६० | २,०४,४५,७९५ |
| गोल्डकोस्ट | ७९,००० | ३४,१०,३७० |
| सिरारा लिओन | ३०,००० | १७,७६,८०० |
| ए. इ. सुडान | ९,६९,६०० | ६१,८६,८५० |
| टांगानिका | ३,६५,००० | ५१,८२,५१५ |
| नैर्ऋत्य आफ्रिका | ३,१७,७२५ | ३,५७,३५८ |
| कॅमेरॉन | ३४,०८१ | ८,३१,१०० |
| टोगोलँड | १३,०४१ | ३,३८६०० |
| एकूण | ३७,८६,९११ | ६,१६,८३,८४५ |
| **अमेरिकेंत—** | | |
| बरमुडास | १९ | ३१,००० |
| डोमिनियन ऑफ कॅनडा | ३७,२९,६६५ | १,०३,७७,००० |
| फॉकलंड बेटें व सेंट जॉर्जिया | ५,६१८ | ३,००० |
| ब्रिटिश गिआना | ८९,४८० | ३,३७,०३९ |
| ब्रिटिश होंडुरास् | ८,५९८ | ५६,९०० |
| न्यूफाउंडलंड व लॅब्राडोर | १,५२,७३४ | २,९४,३०० |
| बहामा | ४,४०४ | ६६,९०० |
| बारबेडास | १६६ | १,९०,९३९ |
| जमेका (वसाहती) | ४,६७४ | ११,३८,५५८ |
| लीवर्ड बेटें | ७२७ | १,४२,०६३ |
| त्रिनिदाद व टोबँगो | १,९७४ | ४,५६,०४३ |
| विंडवर्ड बेटें | ५१६ | २,०३,५६६ |
| एकूण | ३९,९८,५७५ | १,३३,९७,३०८ |
| **ऑस्ट्रेलियांत—** | | |
| कॉमनवेल्थ | २,९४,५८१ | ६८,६६,५९० |
| पापुआ | ९०,५४० | २,७६,००० |
| न्यूझीलंड | १,०४,७५१ | १५,७४,००० |
| फिजी | ७,०८३ | १,९८,४०० |
| पॅसिफिकमधील बेटें | ११,४५० | २,६५,००० |
| न्यूगिनी (मँडेट) | ९३,००० | ५,८३,३८७ |
| पश्चिम समोआ (मँ.) | १,२५० | ५७,७५९ |
| नाअरू (मँ.) | १० | ३,४०० |
| एकूण | ३२,८२,६६५ | ९८,२४,५३६ |

दुसऱ्या महायुद्धानंतर इंग्लंडला साम्राज्यभावनेनें या प्रदेशांवर वर्चस्व ठेवणें अनिष्ट वाटल्यावरून आतां एका कुटुंबांतीलच पण स्वतंत्र स्वायत्त घटकांप्रमाणें 'कॉमनवेल्थ ऑफ नेशन्स' (राष्ट्रांचें एक लोकराज्य) ही कल्पना पुढें आली व आज ब्रिटिश साम्राज्य म्हणून नांवानें राहिलें नाहीं.

**ब्रिंडिसी**—हें बंदर इटलीच्या दक्षिण किनाऱ्यावर आहे. याची लो. सं. ४१,६९९. कोळसा, मीठ, गंधक, इमारतीचें लांकूड आणि धातू परदेशांहून या बंदरांत येतात. स्फोटक दारू, गाळलेली दारू, तेल आणि सुकीं फळें या बंदराहून परदेशांस जातात. सेन्ट जिऑव्हेनी या प्रार्थनामंदिरांत पदार्थसंग्रहालय आहे.

**ब्रिंदावनी सारंग**—हा राग काफी थाटांतून उत्पन्न होतो. या रागाच्या आरोहावरोहांत गांधार व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत. म्हणून याची जाति औडुव–औडुव होय. वादी स्वर ऋषभ व संवादी पंचम आहे. गानसमय माध्यान्ह आहे. या रागांत तीव्र व कोमल हे दोनहि निषाद अनुक्रमें आरोह व अवरोह यांत घेतले जातात. हा एक सारंग प्रकार आहे.

**ब्रिलियंटाइन**—केस चापूनचोपून बसण्यासाठीं असणारें एक मलम. याचे तीन प्रकार असतात. १ वेगळें होणारें—हें करण्याची कृति अशी : अम्लाचा अंश नसलेलें बदामी तेल बारा औंस घेऊन त्यांत सेंट अथवा सुगंधी द्रव वीस थेंब टाकावा, व सहा औंस मद्यार्क घालून तें मिश्रण ढवळून तयार करावें. २ वेगळें न होणारें—हें करण्याची कृति अशी : दोन औंस एरंडेल तेल घेऊन त्यांत आठ औंस शुद्ध मद्यार्क घालावा व त्यांत साठ थेंब सुवासिक अर्काचे घालावे. ३. घट्ट ब्रिलियंटाइन करावयाचें असल्यास चार औंस पांढरें व्हॅसलिन घेऊन त्यांत दहा थेंब सुवासिक अर्काचे टाकावे व यास हिरवा रंग द्यावयास पाहिजे असल्यास झाडाच्या पानांचें क्लोरोफिन टाकण्यांत यावें.

**ब्रिस्टल**—इंग्लंडचें एक बंदर व बरो. लो. सं. सुमारें चार लाख आहे. आठव्या हेन्रीनें १५४२ सालीं ब्रिस्टल येथें विद्यापीठ स्थापन केलें. येथें बरींच व चांगलीं प्रार्थनामंदिरें आहेत. याच शहरीं १७७४ सालीं रॉबर्ट सौदे कवीचा जन्म झाला. येथें जहाजें बांधणें, चाकोलेट, साखर, तंबाखू, कांच, साबू, बूट, कमावलेलें कांतडें, जस्त, दारू, वगैरेंचे कारखाने आहेत. कोळशाच्या खाणीहि आहेत.

**ब्रुनेई**—ब्रिटिश बोर्निओ, एक संस्थान. या संस्थानाचें क्षे. फ. सुमारें २२२६ चौरस मैल आहे. १९०६ सालीं ब्रुनेईच्या सुलतानानें राज्याचीं सूत्रें ब्रिटिश रेसिडेंटाच्या ताब्यांत दिलीं. सध्यांचा सुलतान अहमद ताजुद्दिन अरवद्धुल खैरीवद्दिन हा १९२४ सालीं गादीवर आला. संस्थानची लो. सं. सुमारें ३०,००० आहे. यांत हिंदी लोक सु. ४०० आहेत. जरीचें कापड व साबुदाणा हे जिन्नस येथें तयार होतात. ब्रुनेई शहर ही राजधानी ब्रुनेई नदीकांठीं असून त्याची लो. सं. सुमारें १२,००० आहे.

संस्थानची भाषा मलायी असून तींत प्राथमिक शिक्षण मोफत दिलें जातें. या प्राथमिक शाळांखेरीज चिनी व इंग्रजी शिक्षणाच्या कांहीं शाळा आहेत.

**ब्रूक, रूपर्ट** (१८८८–१९१५)—एक इंग्रज कवि. त्याचें शिक्षण रुकची व केंब्रिज येथें झालें. त्याचा पहिला कवितासंग्रह १९११ सालीं निघाला. १९१४ सालीं तो लष्करांत शिरला व पुढील सालीं एक्सपेडिशनरी फोर्समध्यें असतांना मेडिटरेनियनमधील स्किरोज येथें मरण पावला. तेथें त्याचें स्मारक उभारलें आहे. त्याच्या कवितांतील 'ग्रँटचेस्टर' ही अत्यंत लोकप्रिय आहे. 'जर मी मेलों तर—' हें सॉनेट–सुनीत तर पहिल्या महायुद्धानंतर तरुणवर्गांत फार आवडतें असें होतें. त्याच्या मृत्यूनंतर त्याचें बरेंच लिखाण प्रसिद्ध झालें आहे.

**ब्रूटस, मार्कस ज्युनिअस** (खि. पू. ८५–४२)—एक प्राचीन रोमन मुत्सद्दी. त्याला सीझरनें मॅसेडोनियाचा गव्हर्नर नेमलें, तरीहि तो सीझरविरुद्ध झालेल्या गुप्त कटांत सामील झाला. आणि आपल्या वजनानें तो कट त्यानें यशस्वी केला. पण पुढें सीझरचा खून केल्यावर, तो आश्रयार्थ पौरस्त्य प्रदेशांत पळून गेला. नंतर स्वपराक्रमानें ग्रीसचा व मॅसिडोनियाचा अधिपति बनला. दरम्यानच्या काळांत ऑक्टेव्हियॅनस, ॲन्टनी व लेपिडस या तिघांनीं संगनमत करून मोठ्या सैन्यानिशीं वरील गुप्त कटवाल्यांच्या सैन्यावर चाल केली. त्यांत ब्रूटसचा पूर्ण पराजय झाला. तेव्हां स्वतःच्या पक्षाचा पूर्ण नाश झाला आहे असें पाहून ब्रूटसनें तलवारीनें तेव्हां आत्महत्या केली.

**ब्रूनेल, सर मार्क इझमबार्ड** (१७६९–१८४९)—एक ब्रिटिश एंजिनिअर. १८८६ सालीं तो फ्रेंच आरमारी नोकरींत शिरला. १७९३ सालीं तो अमेरिकेंत पळून गेल्यामुळें मरणाच्या शिक्षेंतून वांचला. १७९९ सालीं इंग्लंडला परत येऊन, तो प्लीमाउथ येथें स्थायिक झाला. त्यानें अनेक यांत्रिक शोध लावले, त्यांत खिळे करण्याचें यंत्र व लांकडी पेट्या करण्याचें यंत्र, तसेंच कारबॉनिक ॲसिड गॅसनें चालणारें एंजिन, हीं यंत्रें विशेष प्रसिद्ध आहेत. परंतु त्याचें सर्वांत मोठें एंजिनिअरिंगचें काम म्हणजे त्यानें तयार केलेला थेम्सचा बोगदा हें होय. या बोगद्याचें काम १८२५ मार्चमध्यें सुरू होऊन १८४३ सालीं त्या बोगद्यांतून वाहतूक सुरू झाली.

याचा मुलगाहि (१८०६–१८५९) याच्या हाताखालीं तयार होऊन चांगला नांवारूपास आला. समुद्रावरील बाष्पनौकानयन सुरू करण्यांत याची फार मोठी कामगिरी आहे. 'ग्रेट वेस्टर्न' ही पहिली आगबोट त्यानें बांधली. मळसूत्री पंख्यानें (स्क्रू प्रोपेलरनें) चालणारी 'ग्रेट ब्रिटन'हि त्याचीच. त्यानें बऱ्याच गोद्यांची आंखणी केली.

**ब्रूनो, गिओर्डानो** (१५४९–१६००)—हा युरोपांतील प्राचीन विद्यांच्या पुनरुज्जीवनाच्या काळांतील (रेनेसन्स) एक इटालियन तत्त्ववेत्ता होता. तो प्रथम डॉमिनिकन या धार्मिक संस्थेंत शिरला. परंतु लवकरच त्याच्यावर अपवित्र वर्तणुकीचा आरोप येऊन त्याला १५७७ सालीं रोममधून पळून जावें लागलें. नंतर कांहीं काळ त्यानें पॅरिस येथें आरिस्टॉटलच्या पंथा(आरिस्टॉटेलियॅनिझम)विरुद्ध व्याख्यानें दिलीं. नंतर तो लंडन, ऑक्सफर्ड, मारबर्ग, लिटेनबर्ग, प्राग, हेन्सटेड व फ्रँकफोर्ट इतक्या ठिकाणीं हिंडून शेवटीं पाडुआ येथें राहिला. पण तेथें त्याला व्हेनिसच्या इन्क्विझिशन कोर्टानें कैद करून रोमला पाठवून दिलें. तेथें तो सात वर्षें कैदेंत होता. पण त्यानें अखेरपर्यंत आपलीं मतें सोडून देण्याचें नाकारल्यामुळें, त्याच्यावर

धर्मभ्रष्ट, पाखंडी व मठवासीयांच्या शपथा ( मोनॅस्टिक व्हाउज ) मोडणारा असे आरोप ठेवून त्याला १६०० सालच्या ता. १६ फेब्रुआरी रोजीं जिवंत जाळण्यांत आलें. त्याचे बरेच ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**ब्रूस, रॉबर्ट** ( १२७४–१३२९ )—स्कॉटलंडमधील सर्वांत थोर राजा. १२९६ सालीं अर्ल ऑफ कॅरिक ह्या हुद्यावरून त्यानें इंग्लंडचा राजा पहिला एडवर्ड याच्यापुढें राजनिष्ठ राहण्याची शपथ घेतली. आणि १२९७ सालीं तो इंग्लिशांच्या बाजूनें वॅलिसबरोबर लढला. पुढें तो स्कॉटिश सैन्याला मिळाला, पण त्याच सालीं तो पक्ष सोडून त्यानें पुन्हां एडवर्डशीं राजनिष्ठ राहण्याची शपथ घेतली. पुढें १२९९ सालीं तो पुन्हां स्कॉटिश राष्ट्रीय पक्षांत सामील झाला व स्कॉटलंड राज्याच्या चार रीजंट-पैकीं तो एक रीजंट म्हणून नेमला गेला. पुढें स्कॉडलंडच्या इंग्लंडबरोबर झालेल्या लढायांत अखेरीस तीन स्वाऱ्यांत तो पुन्हां एडवर्डच्या पक्षाला मिळाला आणि कांहीं काळ एडवर्डच्या दरबारीं जाऊन राहिला. पण तेथें रॉबर्ट ब्रूसला ठार मारण्याचा गुप्त कट एडवर्ड राजानें केला आहे अशी बातमी त्याला कळली म्हणून फेब्रुवारींत तो स्कॉटलंडला पळून गेला. तेथें त्यानें लॉकमॅबेन किल्ल्यांत आपल्या सरदारांना एकत्र जमविलें. या सरदारांनीं १३०६ सालीं मार्चच्या २७ तारखेस स्कून येथें रॉबर्ट ब्रूसला राजमुकुट अर्पण करून त्याला आपला राजा म्हणून मान्य केलें. पुढें इंग्लंडबरोबर चालवलेल्या लढ्यांत त्याचा दोनदां पराजय झाला, त्यामुळें त्यानें आपल्या सैन्याला रजा देऊन तो राथलीन बेटांत अज्ञात स्थितींत जाऊन राहिला. तो मरण पावला, अशी समजूत होती; पण १३०७ सालीं तो स्कॉटलंडांत परत आला, व पुन्हां सैन्य जमवून त्यानें लौडन हिल येथें इंग्रज सैन्याचा पराभव केला. आणि पुढें दोन वर्षांत त्यानें बहुतेक सर्व स्कॉटलंड देश इंग्रजांच्या अमलांतून काढून घेऊन स्वतंत्र केला. इतकेंच नव्हे तर त्यानें नंतर इंग्लंडवर स्वारी करून बॅनॉकबर्न येथें इंग्रज सैन्याचा १४ जून १३१४ रोजीं पूर्ण पराभव केला. नंतर १३२८ सालीं इंग्लंड व स्कॉटलंड यांच्या दरम्यान तह होऊन इंग्लंडनें स्कॉटलंडचें संपूर्ण स्वातंत्र्य मान्य केलें.

**ब्रूसेल्स**—बेल्जिअमची राजधानी. विल्यम दि सायलेंट याच्या राजवाड्यांत प्रख्यात वाचनालय असून आधुनिक चित्रांचें एक प्रदर्शनहि आहे. सेंट गुडूलचें प्रार्थनामंदिर सुळकेदार असून तें गॉथिकगृहशिल्पकलेचा एक सर्वोत्कृष्ट नमुना आहे. टेप, सतरंज्या, पडदे, लांकडी सामान, गाड्या, इत्यादि वस्तू येथें होतात. बेल्जियन लोक गानलुब्ध असल्यामुळें, येथें मोठमोठ्या गायनशाळा व नाटकगृहें आहेत. लो. सं. सु. नऊ लाख आहे. येथें एक विश्वविद्यालय आहे. जुन्या स्पॅनिश धर्तीच्या इमारतीकडे पाहिलें म्हणजे मध्ययुगांतील या शहराच्या अप्रतिम सौंदर्याची कल्पना होते. या शहरानजीक एक मोठा बाग आहे; तो इहलोकींचें नंदनवनच होय. जर्मनी आणि फ्रान्स या देशांतील प्रमुख शहरांशीं ब्रूसेल्स आगगाडीनें जोडलें आहे. कालव्यांतूनहि वाहतूक आहे.

१८३१ सालीं ही बेल्जिअमची राजधानी बनली. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धांत ही जर्मनीच्या ताब्यांत होती. या ठिकाणीं बऱ्याच आंतरराष्ट्रीय परिषदा भरतात.

**ब्रूस्टर, सर डेव्हिड** ( १७८१–१८६८ )—एक पदार्थ-विज्ञानशास्त्रज्ञ. यानें प्रकाशाच्या विकृतीसंबंधीं जे शोध लाविले त्यांची यादी अशी—( १ ) परावर्तन आणि वक्रीभवन यांच्या योगानें होणारें प्रकाशाचें ध्रुवीभवन व एतत्संबंधीं कांहीं नियम; ( २ ) दाब आणि उष्णता यांच्या योगानें होणारें ध्रुवीभवन; ( ३ ) दोन अक्षरेषा असणाऱ्या स्फटिकाच्या योगानें उत्पन्न होणारें द्विवक्रीभवन आणि तद्विषयक माहिती; (४) धातुमय परावर्तनाचे नियम; ( ५ ) प्रकाशाच्या अपशोषणाविषयीं प्रायोगिक माहिती. यांशिवाय पुढील महत्त्वाच्या तीन भागांसंबंधानें त्यानें उत्तम शोध लावले आहेत—( १ ) वक्रीभवनाचा गुणक आणि ध्रुवीभवनाचा कोन यांचा परस्परसंबंध; ( २ ) दोन अक्षरेषा असणारे स्फटिक; व ( ३ ) विषम उष्णता लाविल्यानें उत्पन्न होणारें द्विवक्रीभवन. शास्त्रीय शोधांव्यतिरिक्त त्यानें आणखी कांहीं बाबतींत बरेच परिश्रम केले आहेत, त्यांत चारुरूपदर्शक( क्यालिडोस्कोप ) आणि घनचित्रदर्शक ( स्टेरिओस्कोप ) यंत्र यांचा उल्लेख केला पाहिजे. दीपगृहांतील दिव्यांतहि त्यानें कित्येक सुधारणा केल्या.

**ब्रेक**—कोणतीहि वस्तु वेगांत असतां तिला विरोध करण्यासाठीं जी योजना केली जाते तिला ब्रेक ( रोधक ) असें म्हणतात. हे ब्रेक मोटारगाड्या, रेल्वेगाड्या, वगैरेंना लावलेले असतात व यांचीच सर्वसाधारणपणें माहिती असते. मोटारमधील ब्रेकमध्यें चाकावर एक ड्रम बसवलेला असून, तिच्याभोंवतीं हातानें केव्हांहि आवळतां येईल अशी लोखंडी पट्टी बसविलेली असते. त्या पट्टीवर ड्रमवर घासेल अशा तऱ्हेनें ॲसबेस्टॉसचा एक पट्टा बसविलेला असतो. जेव्हां मोटार वेगानें चालत असते, त्या वेळेस हा पट्टा सैल असल्यामुळें मोटरच्या वेगास अडथळा होत नाहीं. परंतु मोटार थांबविण्याच्या वेळेस हा पट्टा ड्रमवर जोरानें आवळून मोटारचा वेग बंद करतां येतो. ड्रममध्यें ही क्रिया हवेच्या दाबानें केली जाते. परंतु रेल्वेगाड्यामध्यें हीच क्रिया व्हॅक्युम( निर्वात )नें केली जाते म्हणून त्याला व्हॅक्यूम ब्रेक (निर्वातरोधक) असें म्हणतात.

**ब्रेमेन**—जर्मनी, ब्रेमेन संस्थानच्या राजधानीचें शहर. लो. सं. ३,१८,५००. शार्लेमेनच्या लांकडी देवळाच्या जागयावर जें सेंट पीटरचें देऊळ आहे त्यांत एक शिशाचें शवागार आहे. म्युनिसिपल नाटकगृह, ग्रंथसंग्रहालय व अजबखाना, टपालकचेरी, न्यायकचेऱ्या, जर्मन पेढी व रेल्वे स्टेशन या येथील मुख्य इमारती होत. यांशिवाय फ्रँको–जर्मन युद्धाचें स्मारक, बादशहा १ ला विल्यम याचा अश्वारूढ पुतळा व इतर कांहीं स्मारकें असून, एक रम्य उपवन आहे. जहाजें बांधणें, ओतीव काम व एंजिनें तयार करणें, दोऱ्या बनविणें, वगैरे नौकानयनाशीं संबंध असणारेच बहुतेक धंदे आहेत. याशिवाय तंबाखू, सिगारेट व त्यांच्या पेट्या, तपकीर, तांदूळ सडणें, साखर शुद्ध करणें, इत्यादि कामांचे कारखानेहि येथें आहेत. कापसाच्या व निळीच्या व्यापारांत या शहराचा युरोप खंडांत पहिला क्रम लागेल.

**ब्रेसी, थॉमस** ( १८०५–१८७० )—एक इंग्रज रेल्वे-कॉंट्रॅक्टर. त्यानें युरोपांतील बहुतेक देशांत, तसेंच अमेरिकेंत, हिंदुस्थानांत व ऑस्ट्रेलियांत रेल्वेसंबंधींचीं बांधकामें केलीं आहेत. त्याचें सर्वांत मोठें बांधकाम 'दि ग्रँड ट्रंक रेल्वे ऑफ कॅनडा' आणि त्या रेल्वेलाइनवरील मॉन्ट्रील शहरानजीकचा सेंट लॅरिन्स नदीवरचा मोठा पूल हें होय.

याचा मोठा मुलगा सर थॉमस ( १८३६–१९१८ ) हा 'नेव्हल अॅन्युअल' चा संस्थापक असून त्यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत. तो पार्लमेंटचा सभासद असून नाविक बाबतींत फार लक्ष देत असे. तो १८९५–१९०० पर्यंत व्हिक्टोरिया प्रांताचा गव्हर्नर होता.

**ब्रेस्टेड, जेम्स हेन्री** ( १८६५–१९३६ )—एक अमेरिकन प्राच्यविद्याविशारद आणि इतिहासकार. हा १८९४ मध्यें शिकागो विद्यापीठांत ईजिप्त–विद्येचा प्राध्यापक होता. तेथून तो हॅस्केल प्राच्यपदार्थसंग्रहालयाचा संचालक झाला. १९०५ ते १९०७ या वर्षांत शिकागो विद्यापीठानें पाठविलेल्या ईजिप्त-संशोधन मंडळाचा हा संचालक होता. शिकागो विद्यापीठांत हा ईजिप्त विद्या व प्राच्य इतिहास या विषयांचा प्राध्यापक असून, प्राच्य भाषा आणि वाङ्मय या शाखेचा अध्यक्ष होता. १९१९ मध्यें हा अमेरिकन ओरिएन्टल इन्स्टिटयूट ( अमेरिकन प्राच्य सभा ) हिचा संचालक म्हणून नेमला गेला व ईजिप्त आणि पश्चिम आशिया यांमध्यें पहिलें अभ्यासक मंडळ घेऊन गेला. यानंतर त्यानें इराणी आखातापासून नाइल नदीपर्यंतच्या सुपीक चंद्राकार प्रदेशांत अभ्यासक मंडळें नेलीं. यानें प्राचीन इतिहासावर वीसपेक्षां अधिक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं ईजिप्तचा इतिहास व जगाचा आद्य इतिहास यांची जगाच्या अनेक भाषांत भाषांतरें झालीं आहेत. सदसद्विवेकबुद्धि या नांवाचाहि त्याचा एक लोकप्रिय ग्रंथ आहे.

**ब्रेस्लो**—जर्मनी, सायलेशिया नांवाच्या प्रशियन प्रांताच्या राजधानीचें शहर. लो. सं. ६,२४,०००. विश्वविद्यालय, कलाकौशल्याच्या कामांचा व पुराणवस्तूंचा अजबखाना, हुंडीबाजार, नाटकगृह, मुख्य रेल्वे स्टेशन, टपालकचेरी, इत्यादि अनेक प्रेक्षणीय इमारती या शहरांत आहेत. पहिला विल्यम, बिस्मार्क, मोल्टके आदिकरून प्रसिद्ध पुरुषांचीं येथें अगणित स्मारकें आहेत. यहुदी लोकांचें कॉलेज म्हणून येथील विश्वविद्यालयाची १७०२ सालीं प्रथम स्थापना झाली. याच्या ग्रंथसंग्रहालयांत ३,०५००० पुस्तकें व ४००० हस्तलेख असून त्यांत पौरस्त्य वाङ्मयीन ग्रंथांचा पुष्कळ भरणा केला आहे. याला जोडूनच वनस्पतिबाग, वेधशाळा आणि शारीरशास्त्राच्या, इंद्रियविज्ञानशास्त्राच्या व तशाच आणखीहि कित्येक संस्था आहेत. मुलींच्या उच्च शिक्षणासाठीं दोन विद्यालयें आहेत. यंत्रें, हत्यारें, आगगाडीचे व ट्रामचे डबे, बिडाचें सामान, सोन्यारुप्याचें काम, सुती व लोंकरीचीं वस्त्रें, सतरंज्या, वाद्यें, कांचसामान, चिनीमातीचीं भांडीं, इत्यादि वस्तू या ठिकाणीं तयार होतात.

**ब्रोघॅम, लॉर्ड** ( १७७८–१८६८ )—एक इंग्रज कायदेपंडित व मुत्सद्दी. 'एडिंबर्ग रिव्ह्यू' या सुप्रसिद्ध नियतकालिकाच्या स्थापनेस याची मदत होती. तो कॉमन्स सभेचा सभासद असून, वक्तृत्वाबद्दल त्याची ख्याति होती. चौथ्या जॉर्जची राणी कॅरोलाइन हिचा खटला यानेंच चालविला. 'सुधारणा बिला'चा हा पुरस्कर्ता होता. १८३० सालीं त्याला मुख्य फडणीस ( लॉर्ड चॅन्सेलर ) व उमराव करण्यांत आलें. इंग्लंडमधील कायद्यांत त्यानें बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या. त्यानें लेखनहि बरेंच केलें आहे. ब्रोघॅम नांवाची घोड्याची गाडी त्यानेंच तयार करविली. ( घोडागाडी पाहा ).

**ब्रोमेलिया**—[ वर्ग ब्रोमेलियासी ]. या वर्गास ब्रोमेलिया नांवाच्या झाडावरून नांव पडलें आहे. या वर्गांत प्रथम अननसाची चुकीनें गणना करण्यांत येत असे. या झाडांचीं पानें करड्या रंगाचीं, कठिण व रुक्ष असतात. हीं झाडें अमेरिकेंतील उष्णकटिबंधांत फार आढळतात. बहुतेक हीं दुसऱ्या झाडांच्या फांद्यांवर पण बांडगुळाप्रमाणें त्यांचा रस शोषण न करतां वाढतात.

**ब्लॅक, जोसेफ** ( १७२८–१७९९ )—एक स्कॉच पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ व रसायनशास्त्रज्ञ. त्यानें असें सिद्ध केलें कीं, खडूंत दाहकता येण्याकरितां त्यांतून कांहीं पदार्थ बाहेर जातो व तो एक प्रकारचा वायु आहे; त्याला १७८१ सालीं लव्हायझर यानें कर्बद्विप्राणिद ( कॉर्बन डाय् ऑक्साइड ) असें नांव दिलें,

निवेदनम् ॥" हे होत. मोक्षाचा मार्ग जो केवळ तीन वर्णांच्या पुरुषांसच खुला होता तो भक्तिमार्गानें व्यापक करून भक्तीचें द्वार सर्व वर्णांच्या व वर्णाबाहेरच्याहि स्त्री-पुरुषांना खुलें करून दिलें व त्यामुळें समाजांत विलक्षण प्रकारची धार्मिक जागृति घडवून आणली.

**भंखार**—हा राग मारवा थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहांत सातहि स्वर लागतात, म्हणून याची जाति संपूर्ण-संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर मानितात. यांत दोनहि मध्यमांचा प्रयोग होतो. हा उत्तरांगप्रधान राग आहे. यांत दोन धैवत घेण्याचा कांहीं घराण्यांचा परिपाठ आहे. यांत शुद्ध मध्यम सुटा ठेवीत नाहींत म्हणून भटियार रागापासून हा भिन्न राहूं शकतो. हा एक आधुनिक राग आहे.

**भगतसिंग, सरदार** (१९०७-१९३१)—एक हिंदी क्रांतिकारक. यांच्या कुळांत पूर्वीपासूनच कांहीं क्रांतिकारक पुरुष होऊन गेले होते. यांचा एक चुलता अजितसिंग (पाहा) यांस लाला लजपतराय यांच्याबरोबर हद्दपारीची शिक्षा झाली होती व दुसऱ्या एका चुलत्यास राजद्रोहाबद्दल तुरुंगवास घडला होता. यांचे वडील सरदार किसनसिंग यांसहि राजद्रोहाबद्दल तुरुंगवास घडला होता. यांनीं लाहोरच्या राष्ट्रीय विद्यालयांत तीन वर्षें शिक्षण घेतल्यानंतर वडिलांनीं यांचा विवाह ठरविला; परंतु रामदासाप्रमाणें त्यांनीं ही बातमी लागतांच घरास रामराम ठोकला. असहकारितेच्या चळवळीपासून ते महात्मा गांधी यांचे अनुयायी बनले होते; पण सायमन कमिशनविरुद्ध केलेल्या बहिष्काराच्या चळवळींत लाला लजपतराय यांचा मृत्यु ओढवून आल्यामुळें त्यांचें मत क्रांतिकारक मार्गाकडे वळलें. तारीख ८ एप्रिल १९२९ रोजीं बटुकेश्वर दत्त यांच्यासह त्यांनीं मध्यवर्ती असेंब्लीमध्यें बाँब टाकला. त्यामुळें त्यांचें नांव सर्वत्र गाजलें. या प्रकरणांत त्यांस काळ्या पाण्याची शिक्षा झाली. लाहोरच्या कटाच्या खटल्यांतील आरोपींमध्येंहि त्यांचें नांव होतें. तसेंच लाहोरचे असिस्टंट पोलिस कमिशनर मि. सॉंडर्स यांचा खून करण्यांत राजगुरुबरोबर यांनींहि सहकार्य केलें होतें. अधिकाऱ्यांचे खून करणें, पोस्ट व बँक यांवर दरवडे घालणें, असेंब्लींत बाँब फेकणें, इत्यादि अनेक आरोपांवरून त्यांस राजगुरु व सुखदेव यांच्याबरोबर फांशीची शिक्षा देण्यांत आली व ती २३ मार्च १९३१ रोजीं अमलांत आली. 'आझादी और जिंदगी एक बात है। गुलामी और मौत एक बात है।' हा त्यांचा अखेरचा संदेश होता.

**भगवंतगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. मालवण तालुक्यांत एका उंच डोंगरावर हा किल्ला असून गडावर पाण्याचा पुरवठा नाहीं. एक लहानसें देवालय आहे. फोंडसावंत यानें १७०१ मध्यें भरतगड बांधला म्हणून त्याचे प्रतिस्पर्धी बावडेकर यांनीं हा किल्ला बांधला. हा कर्नल इमलॉक यानें १८१८ त घेतला.

**भगवंतराव रामचंद्रपंत अमात्य** (१६७६-१७५५)—कोल्हापूर राज्याचा एक अमात्य. मराठेशाहींतील प्रसिद्ध मुत्सद्दी रामचंद्रपंत अमात्य याचा हा थोरला मुलगा. अमात्य घराण्यावर कोल्हापूरचा संभाजी व सातारचा शाहू या दोघांचीहि खप्पा मर्जी असल्यानें भगवंतरावानें प्रयत्न करूनहि त्यास संभाजी व शाहू यांची सेवा करतां आली नाहीं. उदाजी चव्हाणाच्या साहाय्यानें यानें संभाजीच्या तर्फेनें लढण्याची शिकस्त केली. परंतु त्यांत यास यश न येऊन उलट संभाजीस हा आपल्याविरुद्ध कारस्थान करतो आहे अशी शंका आली व त्यानें अमात्यांचीं गांवें जप्त केलीं. पुढें संभाजी व हा साताऱ्यात शाहूकडे गेले असतांना शाहूनें यांच्यामध्यें दिलजमाई करण्याचे प्रयत्न केले. शाहूस आपल्या अंतकाळीं रामराजास जवळ आणण्याकरितां याची मदत झाली. रामराजाच्या कारकीर्दींत यास सातारचें अमात्यपद लाभलें. निळोपंत पिंगळे याची मुलगी व्यंकूबाई हिच्याशीं याचें लग्न झालें होतें. याचा मुलगा कृष्णराव हा सन १७५० मध्यें कोल्हापूरचा अमात्य झाला. सन १७५५ मध्यें पुणें येथें भगवंतराव मरण पावला. याचीं बरींच पत्रें वैद्यदप्तराच्या ४ थ्या खंडांत आहेत.

**भगवद्गीता**—हा भारतीय तत्त्वपर व नीतिपर असा अत्यंत प्रभावी संस्कृत ग्रंथ आहे. जगांत तत्त्वज्ञानविषयक जे अनेक ग्रंथ आहेत त्यांमध्यें या ग्रंथाचा अनुक्रम पुष्कळच वर लागेल. पाश्चात्य लोकांना पौरस्त्य तत्त्वज्ञानाची गोडी भगवद्गीतेनेंच लावली.

भगवद्गीता हा महाभारतांतील एक तत्त्वचर्चेचा प्रसंग आहे. उपनिषदांमध्यें जशी गंभीर तत्त्वचर्चा आहे, तशीच महाभारतामध्यें आहे. महाभारत हा ग्रंथ वैविध्यपूर्ण आणि वैचित्र्ययुक्त अशा विश्वाचें व मानवी आयुष्याचें प्रगल्भ विवेचन करणारा ग्रंथ आहे. महाभारतकालीं जी सामाजिक, धार्मिक, राजकीय, सांस्कृतिक अशी परिस्थिति होती, तिचें परिणत फल गीतेच्या तत्त्वज्ञानाच्या रूपानें बाहेर पडलेलें आहे.

सर्व जगांत ऋग्वेदसंहिता ही अत्यंत प्राचीन असून, तिचा काल विद्वानांच्या मतें ख्रि. पू. ५००० किंवा त्याहिमागें जातो आहे. ऋग्वेदसंहितेनंतर बऱ्याच वर्षांनीं महाभारताचा काल देतो. भगवद्गीतेच्या कालाविषयीं चर्चा अनेक पाश्चात्य व भारतीय विद्वानांनीं केलेली आहे. त्यामध्यें कै. डॉ. भांडारकर, न्या. चिंतामणराव वैद्य, शं. बा. दीक्षित, इत्यादि प्रमुख होत.

**ब्रेमेन**—जर्मनी, ब्रेमेन संस्थानच्या राजधानीचें शहर. लो. सं. ३,१८,५००. शार्लेमेनच्या लांकडी देवळाच्या जागेवर जें सेंट पीटरचें देऊळ आहे त्यांत एक शिशाचें शवागार आहे. म्युनिसिपल नाटकगृह, ग्रंथसंग्रहालय व अजबखाना, टपाल-कचेरी, न्यायकचेऱ्या, जर्मन पेढी व रेल्वे स्टेशन या येथील मुख्य इमारती होत. यांशिवाय फ्रँको-जर्मन युद्धाचें स्मारक, बादशहा १ ला विल्यम याचा अश्वारूढ पुतळा व इतर कांहीं स्मारकें असून, एक रम्य उपवन आहे. जहाजें बांधणें, ओतीव काम व एंजिनें तयार करणें, दोऱ्या बनविणें, वगैरे नौकानयनाशीं संबंध असणारेच बहुतेक धंदे आहेत. याशिवाय तंबाखू, सिगारेट व त्यांच्या पेट्या, तपकीर, तांदूळ सडणें, साखर शुद्ध करणें, इत्यादि कामांचे कारखानेहि येथें आहेत. कापसाच्या व निळीच्या व्यापारांत या शहराचा युरोप खंडांत पहिला क्रम लागेल.

**ब्रेसी, थॉमस** ( १८०५–१८७० )—*एक इंग्रज रेल्वे-कॉंट्रॅक्टर.* त्यानें युरोपांतील बहुतेक देशांत, तसेंच अमेरिकेंत, हिंदुस्थानांत व ऑस्ट्रेलियांत रेल्वेसंबंधींचीं बांधकामें केलीं आहेत. त्याचें सर्वांत मोठें बांधकाम 'दि ग्रँड ट्रंक रेल्वे ऑफ कॅनडा' आणि त्या रेल्वेलाइनवरील मॉन्ट्रील शहरानजीकचा सेंट लॉरेन्स नदीवरचा मोठा पूल हें होय.

याचा मोठा मुलगा सर थॉमस ( १८३६–१९१८ ) हा 'नेव्हल ॲन्युअल'चा संस्थापक असून त्यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत. तो पार्लमेंटचा सभासद असून नाविक बाबतींत फार लक्ष देत असे. तो १८९५–१९०० पर्यंत व्हिक्टोरिया प्रांताचा गव्हर्नर होता.

**ब्रेस्टेड, जेम्स हेन्री** ( १८६५–१९३६ )—एक अमेरिकन प्राच्यविद्याविशारद आणि इतिहासकार. हा १८९४ मध्यें शिकागो विद्यापीठांत ईजिप्त-विद्येचा प्राध्यापक होता. तेथून तो हॅस्केल प्राच्यपदार्थसंग्रहालयाचा संचालक झाला. १९०५ ते १९०७ या वर्षांत शिकागो विद्यापीठानें पाठविलेल्या ईजिप्त-संशोधन मंडळाचा हा संचालक होता. शिकागो विद्यापीठांत हा ईजिप्त विद्या व प्राच्य इतिहास या विषयांचा प्राध्यापक असून, प्राच्य भाषा आणि वाङ्मय या शाखेचा अध्यक्ष होता. १९१९ मध्यें हा अमेरिकन ओरिएन्टल इन्स्टिटयूट (अमेरिकन प्राच्य सभा) हिचा संचालक म्हणून नेमला गेला व ईजिप्त आणि पश्चिम आशिया यांमध्यें पहिलें अभ्यासक मंडळ घेऊन गेला. यानंतर त्यानें इराणी आखातापासून नाइल नदीपर्यंतच्या सुपीक चंद्राकार प्रदेशांत अभ्यासक मंडळें नेलीं. यानें प्राचीन इतिहासावर वीसपेक्षां अधिक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं ईजिप्तचा इतिहास व जगाचा आद्य इतिहास यांची जगाच्या अनेक भाषांत भाषांतरें झालीं आहेत. सदसद्विवेकबुद्धि या नांवाचाहि त्याचा एक लोकप्रिय ग्रंथ आहे.

**ब्रेस्लो**—जर्मनी, सायलेशिया नांवाच्या प्रशियन प्रांताच्या राजधानीचें शहर. लो. सं. ६,२४,०००. विश्वविद्यालय, कलाकौशल्याच्या कामांचा व पुराणवस्तूंचा अजबखाना, हुंडीबाजार, नाटकगृह, मुख्य रेल्वे स्टेशन, टपालकचेरी, इत्यादि अनेक प्रेक्षणीय इमारती या शहरांत आहेत. पहिला विल्यम, बिस्मार्क, मोल्टके आदिकरून प्रसिद्ध पुरुषांचीं येथें अगणित स्मारकें आहेत. यहुदी लोकांचें कॉलेज म्हणून येथील विश्वविद्यालयाची १७०२ सालीं प्रथम स्थापना झाली. याच्या ग्रंथसंग्रहालयांत ३,०५००० पुस्तकें व ४००० हस्तलेख असून त्यांत पौरस्त्य वाङ्मयीन ग्रंथांचा पुष्कळ भरणा केला आहे. याला जोडूनच वनस्पतिबाग, वेधशाळा आणि शारीरशास्त्राच्या, इंद्रियविज्ञानशास्त्राच्या व तशाच आणखीहि कित्येक संस्था आहेत. मुलींच्या उच्च शिक्षणासाठीं दोन विद्यालयें आहेत. यंत्रें, हत्यारें, आगगाडीचे व ट्रामचे डबे, बिछान्याचें सामान, सोन्यारुप्याचें काम, सुती व लोंकरीचीं वस्त्रें, सतरंज्या, वाद्यें, कांचसामान, चिनीमातीचीं भांडीं, इत्यादि वस्तू या ठिकाणीं तयार होतात.

**ब्रोघॅम, लॉर्ड** ( १७७८–१८६८ )—एक इंग्रज कायदेपंडित व मुत्सद्दी. 'एडिंबर्ग रिव्ह्यू' या सुप्रसिद्ध नियतकालिकाच्या स्थापनेस याची मदत होती. तो कॉमन्स सभेचा सभासद असून, वक्तृत्वाबद्दल त्याची ख्याति होती. चौथ्या जॉर्जची राणी कॅरोलाइन हिचा खटला यानेंच चालविला. 'सुधारणा बिला'चा हा पुरस्कर्ता होता. १८३० सालीं त्याला मुख्य फडणीस (लॉर्ड चॅन्सेलर) व उमराव करण्यांत आलें. इंग्लंडमधील कायद्यांत त्यानें बऱ्याच सुधारणा घडवून आणल्या. त्यानें लेखनहि बरेंच केलें आहे. ब्रोघॅम नांवाची घोड्याची गाडी त्यानेंच तयार करविली. ( घोडागाडी पाहा ).

**ब्रोमेलिया**—[ वर्ग ब्रोमेलियासी ]. या वर्गास ब्रोमेलिया नांवाच्या झाडावरून नांव पडलें आहे. या वर्गांत प्रथम अननसाची चुकीनें गणना करण्यांत येत असे. या झाडांचीं पानें करड्या रंगाचीं, कठिण व रुक्ष असतात. हीं झाडें अमेरिकेंतील उष्णकटिबंधांत फार आढळतात. बहुतेक हीं दुसऱ्या झाडांच्या फांद्यांवर पण बांडगुळाप्रमाणें त्यांचा रस शोषण न करतां वाढतात.

**ब्लॅक, जोसेफ** ( १७२८–१७९९ )—एक स्कॉच पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ व रसायनशास्त्रज्ञ. त्यानें असें सिद्ध केलें की खडूंत दाहकता येण्याकरितां त्यांतून कांहीं पदार्थ बाहेर [illegible] तो एक प्रकारचा वायु आहे; त्याला १७८१ [illegible] यानें कर्बद्विप्राणिद ( कॉर्बन डाय ऑक्झाइड )

या शोधानें रसायनशास्त्रांत हवेच्या व्यतिरिक्त एका वायूची भर पडली. तराजूचा योग्य उपयोग करण्यांत ब्लॅकनें लव्हायझरादि शास्त्रज्ञांवर मात केली. त्याचा सुत-उष्णते(लेटंट हीट)चा सिद्धांत प्रसिद्ध आहे. तो वैद्य म्हणूनहि प्रसिद्ध होता. त्यानें विशिष्ट उष्णता व उष्णतेच्या योगानें होणारें पदार्थांचें प्रसरण या शोधांची प्रस्तावना केली. 'एडिन्बर्ग विद्यालयांतील रसायन-शास्त्रांवरील व्याख्यानें' हा त्याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**ब्लॅक, मॉन्ट**—युरोप. पेनाइन आल्प्स पर्वतांपैकीं याच नांवाच्या एका आल्प्सचें हें अत्युच्च शिखर (१५७८२ फू.) आहे. तें फ्रेंच लोकांच्या ताब्यांत असून कॉकेशियसमधील कांहीं शिखरें वगळलीं असतां युरोपांत याच्याइतकें उंच शिखर दुसरें कोणतेंच नाहीं. या शिखरावर जाण्याकरितां जरी बऱ्याच वाटा आहेत, तरी कॅमोनिक्सची वाट बरीच रहदारीची आहे. चोंते ग्रु द्रोमदेर येथें एक वेधशाळा आहे, व शिखराच्या अगदीं वरील टोंकाशीं आणखी एक वेधशाळा आहे.

**ब्लॅकहोल ऑफ कलकत्ता**—(कलकत्त्याची अंधार-कोठडी). कलकत्त्याच्या जुन्या किल्ल्यांतील २० फुटांची एक लहान खोली. ही हिंदुस्थानच्या इतिहासांत कुप्रसिद्ध आहे. बंगालचा नबाब सुराजउद्दौला यानें कलकत्ता शहर काबीज केल्यावर, तेथें कैद केलेल्या १४६ इंग्रज इसमांना त्यानें या लहानशा खोलींत ता. २१ जून १७५६ रोजीं रात्रभर कोंडून ठेवलें, त्यामुळें दुसऱ्या दिवशीं त्यांच्यापैकीं फक्त २३ इसम जिवंत निघाले. या गोष्टीचा इंग्रजांनीं फार गवगवा केला व वरील हकीगत इंग्रजी इतिहासांतून भडकपणें दिलेली आहे. परंतु ती सर्वस्वीं खरी नाहीं, असें मेजर बसू यांनीं 'राइज ऑफ ख्रिश्चन पॉवर इन् इंडिया' या पुस्तकांत साधार दाखवून दिलें आहे. अलीकडील इतिहाससंशोधनावरून असें सिद्ध झालें आहे कीं, या कृत्याशीं सुराजउद्दौल्याचा मुळींच संबंध नसून, वरील एकंदर वर्णनांत बरीच अतिशयोक्ति आहे. पुण्याच्या घाशीराम कोतवालासंबंधीं अशीच विपर्यस्त हकीगत आहे.

**ब्लॅकेट, पी. एम्. एस्.** (१८९८- )—नोबेल पारितोषिक मिळविणारे एक आधुनिक पदार्थविज्ञानशास्त्रज्ञ. प्रथम यांनीं केंब्रिज येथील प्रयोगशाळेंत लॉर्ड रूदरफर्ड यांच्या हाताखालीं १९१९-३८ पावेतों काम केलें. यांचा पहिला संशोधन विषय म्हणजे, विल्सन मेघमंजूषा (विल्सन क्लाउड-चेंबर) या उपकरणाला पूर्णता आणणें, हा होता. तसेंच विश्वकिरणां(कॉस्मिक रेज)संबंधींहि यांनीं पुष्कळच संशोधन केलें. भूचुंबकाचें रहस्य उलगडणारा एक फार महत्त्वाचा सिद्धांत १९४८ सालीं यांनीं प्रतिपादिला व त्यामुळें खगोलस्थांमध्यें जो चुंबक गुण असतो त्याचें कारण समजून आलें. दुसऱ्या महायुद्धांत यांना ब्रिटिश सरकारतर्फें युद्धोपयोगी गुप्त शास्त्रीय संशोधन करण्यास नेमण्यांत आलें होतें. परमाणुशक्तिसंशोधन समितींतहि ते होते. १९४७ सालीं इंडियन सायन्स काँग्रेसला ते हिंदुस्थानांत आले होते तेव्हां दिल्ली विद्यापीठानें त्यांना 'डॉक्टरेट' पदवी अर्पण केली. नंतर १९४८ मध्यें त्यांना हिंदुस्थान सरकारनें संरक्षण योजनेसंबंधीं सल्ला देण्यास मुद्दाम बोलाविलें होतें. १९५० च्या पुण्यास भरलेल्या अखिल भारतीय शास्त्रीय परिषदेसाठींहि इकडे ते आले होते.

**ब्लम्, लिऑं** (१८७२-१९५०)—एक फ्रेंच मुत्सद्दी. यांचा जन्म पॅरिसमध्यें एका ज्यू घराण्यांत झाला. यांनीं ड्रेफस खटल्यामध्यें त्याच्या बाजूनें काम केल्याबद्दल यांना बरीच प्रसिद्धि मिळाली होती. १९३६-३८ या वर्षांत हे फ्रान्सचे मुख्य प्रधान होते.

**ब्लॅव्हॅट्स्की, हेलेना पेट्रोव्हना** (१८३१-१८९१)—या थिऑसॉफिकल सोसायटीच्या संस्थापकांपैकीं एक होत. यांचा जन्म दक्षिण रशियांत झाला. कर्नल पीटर व प्रिन्सेस डोलगोरोकी यांची मुलगी हेलेन फडीफ यांच्या या कन्या होत. त्यांचें घराणें सरदारी दर्जाचें होतें. १७ व्या वर्षीं त्यांचें लग्न, साठी उलटलेल्या जनरल ब्लॅव्हॅट्स्की नांवाच्या रशियांतील एका प्रांताच्या गव्हर्नराशीं लावण्यांत आलें. लहानपणापासून या बाईचा स्वभाव अभिमानी, संतापी, चंडखोर व जनरीतीस न जुमानणारा असा होता. संसारांत राहण्याची इच्छा नसल्या-मुळें लग्नानंतर रशिया देश सोडून त्यांनीं युरोप, आफ्रिका, अमे-रिका, हिंदुस्थान, तिबेट, वगैरे देशांत प्रवास करून, पुष्कळ श्रेष्ठ विभूतींच्या नेतृत्वाखालीं अध्यात्मविद्येचा अभ्यास केला, व 'दि सीक्रेट डॉक्ट्रिन', 'की टु थिऑसफी', 'दि व्हाइस ऑफ दि सायलेन्स', वगैरे ग्रंथ लिहिले. पुढें त्यांची योगशास्त्रांत प्रगति होऊन त्यांना सिद्धी प्राप्त झाल्या होत्या म्हणतात. एक जीवन्मुक्त ऋषि आपले गुरु आहेत, असें त्या म्हणत. थिऑसफी-च्या संशोधनास सुरवात करून तें काम त्यांनीं बरेंच सिद्धीस नेलें, व सोसायटींत ज्ञानदानाचें त्या वेळचें सर्व काम त्यांनींच केलें. यांच्यामागें ॲनी बेझंट यांनीं त्यांची परंपरा चालविली.

**ब्लेक, रॉबर्ट** (१५९९-१६५७)—एक इंग्रज ॲडमिरल. हा प्रथम बापाच्या व्यापारी कामकाजांत असे. नंतर पार्लमेंटांत शिरला. पुढें पहिल्या चार्लसविरुद्ध असलेल्या प्रजापक्षांत सेनानी झाला व त्यानें बऱ्याच लढाया जिंकल्या. क्रॉमवेलनें त्याला आरमाराधिपतीच्या हुद्यावर नेमलें (१६४९). त्यानें जर्से व सिसिली हीं बेटें जिंकून घेऊन अनेक लढायांत डचांचा पराभव केला. १६५७ त टेनेरिफच्या बाजूस एका स्पॅनिश आरमाराचा धुव्वा उडविला, पण परत येत असतां मरण पावला.

**ब्लेक, विल्यम** (१७५७-१८२७)—एक इंग्रज चित्रकलातज्ज्ञ आणि कवि. १४ व्या वर्षी एका कुशल खोदचित्रकलावंताजवळ तो ती कला शिकण्याकरितां राहिला आणि तें शिक्षण पुरें झाल्यावर त्यानें कांहीं वर्षें ग्रंथविक्रेत्यांकरितां खोदचित्रें तयार करून देऊन त्यावर आपला उदरनिर्वाह केला. १७८३ सालीं त्यानें आपला 'पोएटिकल स्केचेस' (काव्यरेखाचित्रें) हा ग्रंथ चित्रांविरहित प्रसिद्ध केला. त्याचा नंतरचा 'साँग्ज ऑफ इनोसन्स' (निरागस गाणीं) हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यास कोणी प्रकाशक मिळाला नाहीं, म्हणून त्या ग्रंथाला चित्रें काढण्याचें आणि तो ग्रंथ छापण्याचें हीं दोन्हीं कामें त्यानेंच केलीं, व हीं दोन्ही कामें एकत्र करण्याची एक नवी योजना त्यानें शोधून काढली. ती योजना अशी कीं, त्यानें तांब्याच्या पत्र्यावर आपली एकेक कविता खोदून लिहिली आणि त्या कवितेभोंवतीं शोभिवंत वेलबुट्टी खोदली. याप्रमाणें तयार केलेल्या तांब्याच्या पत्र्यावरून त्यानें आपला ग्रंथ छापला आणि नंतर त्या पुस्तकांतील पानांना स्वतः हातानें योग्य जागीं रंग दिला. या पद्धतीनें त्यानें तें सर्व पुस्तक तयार केलें. त्याचे आणखी कांहीं उत्तम ग्रंथ आहेत ते म्हणजे 'गेट्स ऑफ पॅराडाइस' (नंदनवनाचें द्वार), 'बुक ऑफ थेल', 'मॅरेज ऑफ हेव्हन अँन्ड हेल' (स्वर्ग आणि नरक यांचें लग्न), 'साँग्ज ऑफ एक्सपिरिअन्स' (अनुभवगीतें), 'बुक ऑफ युरिझेन', 'साँग ऑफ लॉस', 'बुक ऑफ आहेनिया', इत्यादि होत. याशिवाय त्यानें यंग या ग्रंथकर्त्याच्या 'नाइट-थॉट्स' (रात्र-विचार) या ग्रंथाकरितां आणि ब्लेअर या ग्रंथकर्त्याच्या 'ग्रेव्ह' या पुस्तकाकरितां आणि 'दि बुक ऑफ जॉब' या ग्रंथाकरितां चित्रें काढून दिलीं.

**ब्लोएम फाँटेन**—ऑरेंज फ्रीस्टेटची राजधानी. पूर्वी येथें ऑरेंज फ्रीस्टेटच्या राड (शासनमंडळ)च्या सभा होत. या इमारतीसमोर प्रेसिडेन्ट ब्रँडचा पुतळा आहे. डग्लस सडकेवरील इमारतींत पदार्थसंग्रहालय आहे. फ्रीस्टेटच्या बोअर लोकांना ज्या करारनाम्यानें स्वतंत्रता मिळाली, तो करारनामा येथेंच झाला. वार्डन सडकेवर सार्वजनिक वाचनालय व त्याच्यासमोर राष्ट्रीय पदार्थसंग्रहालय आहे. हें प्रांताच्या व्यापाराचें ठिकाण असून येथील हवा आरोग्यकारक आहे. लो. सं. सु. ५०,००० असून पैकीं तीस हजारांवर लोक गोरे आहेत. बॅकुआना व बासुटो जातीचे लोक येथें राहतात.

---

## भ

**भ**—या वर्णाच्या पांच अवस्था दिसतात. त्यांचीं स्थळें म्हणजे गिरनार (अशोककालीन), नाणेघाट (खि. पू. २ रें शतक), मथुरा (जैनलेख इ. स. १ लें शतक), अलाहाबाद स्तंभ (समुद्रगुप्तकालीन), व हैहयवंशी जाजल्लदेवाचा लेख (इ. स. ११११४), हीं होत.

**भक्तिमार्ग**—मनुष्याला मोक्षपद प्राप्त करून देणारे जे परमार्थमार्ग आहेत, त्यांपैकीं हा एक मार्ग होय. ईश्वराची केवळ भक्ति केल्यानें मुक्ति मिळूं शकते, असें या मार्गाचें प्रधान तत्त्व आहे. ज्ञानमार्ग व कर्ममार्ग या दोहोंहून हा मार्ग भिन्न आहे. हिंदु धर्मांतल्या वैष्णवपंथाचें भक्ति हें आद्य तत्त्व असून या पंथाचे निदान १५ कोटी अनुयायी आहेत. याशिवाय भक्तिमार्गाचें तत्त्व मान्य करणारा शैवपंथहि काशीच्या आसपासच्या भागांत असून त्यांतीलहि संख्या बरीच आहे. भक्ति हा शब्द 'भज्'=भजणें या धातूपासून आला आहे. शांडिल्यसूत्रांत 'सा परानुरक्तिरीश्वरे' अशी भक्तीची व्याख्या दिलेली आहे. म्हणजे ईश्वराच्या ठिकाणीं निरतिशय व निष्काम अशी जी रक्ति तिलाच भक्ति असें मानण्यांत येतें. ही व्यक्तोपासना ऊर्फ मानवदेहधारी ईश्वराची उपासना आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. ख्रिस्ती धर्मानें बौद्ध धर्माच्या द्वारानें हिंदु धर्मांतील भक्तीची कल्पना घेतली असावी. भक्तिमार्गाचा मुख्य संप्रदाय जो भागवतधर्म तो खि. पू. १४०० वर्षांपूर्वी उदयास आला होता. वैदिक काळांतहि भक्तीची अस्फुट कल्पना अस्तित्वांत होती, असें ऋग्वेदांतील वरुणसूक्तावरून दृष्टोत्पत्तीस येतें. अव्यक्त आणि निर्गुण परब्रह्माचें आकलन होणें कठिण असल्यामुळें, मन, आकाश, सूर्य, अग्नि, यज्ञ, इत्यादि सगुण प्रतिकांची उपासना केली पाहिजे हें तत्त्व उपनिषद्‌कारांनाहि मान्य असल्याचें दिसतें. या भक्तिमार्गांत प्रथमतः वासुदेवभक्तीचें प्राधान्य होतें. यापुढें या भक्तीला व्यापक स्वरूप प्राप्त होऊन निरनिराळ्या देवतांच्या व विभूतींच्या उपासना अस्तित्वांत आल्या. भक्तिमार्गांत परब्रह्माच्या सगुण स्वरूपाची उपासना करून तद्द्वारां परब्रह्माची ओळख करून घेणें हें अंतिम साध्य होय. अशा तऱ्हेनें ज्ञानरूपी साध्याचें भक्ति हें साधन होय. भक्तीचे मुख्यतः सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकार आहेत. इहलोकांतील अर्थ साधण्याकरितां केलेली भक्ति ही तामस भक्ति होय; विषयोपभोगाचा अभिलाष मनांत धरून आपल्याला यशःप्राप्ति व्हावी यासाठीं केलेली भक्ति राजस होय; व ईश्वरार्पणबुद्धीनें केलेली भक्ति ही सात्विक होय. भक्ति करण्याचे मार्ग मुख्यतः नऊ आहेत; ते म्हणजे "श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनं। अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्म-

निवेदनम् ॥" हे होत. मोक्षाचा मार्ग जो केवळ तीन वर्णांच्या पुरुषांसच खुला होता तो भक्तिमार्गानें व्यापक करून भक्तीचें द्वार सर्व वर्णांच्या व वर्णांबाहेरच्याहि स्त्री-पुरुषांना खुलें करून दिलें व त्यामुळें समाजांत विलक्षण प्रकारची धार्मिक जागृति घडवून आणली.

**भंखार**—हा राग मारवा थाटांतून उत्पन्न होतो. याच्या आरोहावरोहांत सातहि स्वर लागतात, म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर पंचम व संवादी षड्ज आहे. गानसमय रात्रीचा तिसरा प्रहर मानितात. यांत दोनहि मध्यमांचा प्रयोग होतो. हा उत्तरांगप्रधान राग आहे. यांत दोन धैवत घेण्याचा कांहीं घराण्यांचा परिपाठ आहे. यांत शुद्ध मध्यम सुटा ठेवीत नाहींत म्हणून भटियार रागापासून हा भिन्न राहूं शकतो. हा एक आधुनिक राग आहे.

**भगतसिंग, सरदार** (१९०७–१९३१)—एक हिंदी क्रांतिकारक. यांच्या कुळांत पूर्वींपासूनच कांहीं क्रांतिकारक पुरुष होऊन गेले होते. यांचा एक चुलता अजितसिंग (चाहा) यांस लाला लजपतराय यांच्याबरोबर हद्दपारीची शिक्षा झाली होती व दुसऱ्या एका चुलत्यास राजद्रोहाबद्दल तुरुंगवास घडला होता. यांचे वडील सरदार किसनसिंग यांसहि राजद्रोहाबद्दल तुरुंगवास घडला होता. यांनीं लाहोरच्या राष्ट्रीय विद्यालयांत तीन वर्षें शिक्षण घेतल्यानंतर वडिलांनीं यांचा विवाह ठरविला; परंतु रामदासाप्रमाणें त्यांनीं ही बातमी लागतांच घरास रामराम ठोकला. असहकारितेच्या चळवळीपासून ते महात्मा गांधी यांचे अनुयायी बनले होते; पण सायमन कमिशनविरुद्ध केलेल्या बहिष्काराच्या चळवळींत लाला लजपतराय यांचा मृत्यु ओढवून आल्यामुळें त्यांचें मत क्रांतिकारक मार्गाकडे वळलें. तारीख ८ एप्रिल १९२९ रोजीं बटुकेश्वर दत्त यांच्यासह त्यांनीं मध्यवर्ती असेंब्लीमध्यें बाँब टाकला. त्यामुळें त्यांचें नांव सर्वत्र गाजलें. या प्रकरणांत त्यांस काळ्या पाण्याची शिक्षा झाली. लाहोरच्या कटाच्या खटल्यांतील आरोपींमध्येंहि त्यांचें नांव होतें. तसेच लाहोरचे असिस्टंट पोलिस कमिशनर मि. सॉडर्स यांचा खून करण्यांत राजगुरूबरोबर यांनींहि सहकार्य केलें होतें. अधिकाऱ्यांचे खून करणें, पोस्ट व बँक यांवर दरवडे घालणें, असेंब्लींत बॉंब फेकणें, इत्यादि अनेक आरोपांवरून त्यांस राजगुरु व सुखदेव यांच्याबरोबर फांशीची शिक्षा देण्यांत आली व ती २३ मार्च १९३१ रोजीं अमलांत आली. 'आझादी और जिंदगी एक बात है। गुलामी और मौत एक बात है।' हा त्यांचा अखेरचा संदेश होता.

**भगवंतगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा. मालवण तालुक्यांत एका उंच डोंगरावर हा किल्ला आहे. क्षेत्रफळ १॥ एकर आहे. गडावर पाण्याचा पुरवठा नाहीं. एक लहानसें देवालय आहे. फोंडसावंत यानें १७०१ मध्यें भरतगड बांधला म्हणून त्याचे प्रतिस्पर्धी बावडेकर यांनीं हा किल्ला बांधला. हा कर्नल इमलॉक यानें १८१८ त घेतला.

**भगवंतराव रामचंद्रपंत अमात्य** (१६७६–१७५५)—कोल्हापूर राज्याचा एक अमात्य. मराठेशाहींतील प्रसिद्ध मुत्सद्दी रामचंद्रपंत अमात्य याचा हा थोरला मुलगा. अमात्य घराण्यावर कोल्हापूरचा संभाजी व सातारचा शाहू या दोघांचीहि खप्पा मर्जी असल्यानें भगवंतरावानें प्रयत्न करूनहि त्यास संभाजी व शाहू यांची सेवा करतां आली नाहीं. उदाजी चव्हाणाच्या साहाय्यानें यानें संभाजीच्या तर्फेनें लढण्याची शिकस्त केली. परंतु त्यांत यास यश न येऊन उलट संभाजीस हा आपल्याविरुद्ध कारस्थान करतो आहे अशी शंका आली व त्यानें अमात्यांचीं गांवें जप्त केलीं. पुढें संभाजी व हा साताऱ्यास शाहूकडे गेले असतांना शाहूनें यांच्यामध्यें दिलजमाई करण्याचे प्रयत्न केले. शाहूस आपल्या अंतकाळीं रामराजास जवळ आणण्याकरितां याची मदत झाली. रामराजाच्या कारकीर्दींत यास सातारचें अमात्यपद लाभलें. निळोपंत पिंगळे याची मुलगी व्यंकूबाई हिच्याशीं याचें लग्न झालें होतें. याचा मुलगा कृष्णराव हा सन १७५० मध्यें कोल्हापूरचा अमात्य झाला. सन १७५५ मध्यें पुणें येथें भगवंतराव मरण पावला. याचीं वरींच पत्रें वैद्यदप्तराच्या ४ थ्या खंडांत आहेत.

**भगवद्गीता**—हा भारतीय तत्त्वपर व नीतिपर असा अत्यंत प्रभावी संस्कृत ग्रंथ आहे. जगांत तत्त्वज्ञानविषयक जे अनेक ग्रंथ आहेत त्यांमध्यें या ग्रंथाचा अनुक्रम पुष्कळच वर लागेल. पाश्चात्य लोकांना पौरस्त्य तत्त्वज्ञानाची गोडी भगवद्गीतेनेंच लावली.

भगवद्गीता हा महाभारतांतील एक तत्त्वचर्चेचा प्रसंग आहे. उपनिषदांमध्यें जशी गंभीर तत्त्वचर्चा आहे, तशीच महाभारतामध्यें आहे. महाभारत हा ग्रंथ वैविध्यपूर्ण आणि वैचित्र्ययुक्त अशा विश्वाचें व मानवी आयुष्याचें प्रगल्भ विवेचन करणारा ग्रंथ आहे. महाभारतकालीं जी सामाजिक, धार्मिक, राजकीय, सांस्कृतिक अशी परिस्थिति होती, तिचें परिणत फल गीतेच्या तत्त्वज्ञानाच्या रूपानें बाहेर पडलेलें आहे.

सर्व जगांत ऋग्वेदसंहिता ही अत्यंत प्राचीन असून, तिचा काल विद्वानांच्या मतें खि. पू. ५००० किंवा त्याहिमागें असा आहे. ऋग्वेदसंहितेनंतर बऱ्याच वर्षांनीं महाभारताचा काल येतो. भगवद्गीतेच्या कालविषयीं चर्चा अनेक पाश्चात्य व भारतीय विद्वानांनीं केलेली आहे. त्यामध्यें के. डॉ. भांडारकर, न्या. तेलंग, चिंतामणराव वैद्य, शं. बा. दीक्षित, इत्यादि प्रमुख होत.

लो. टिळकांनीं आपल्या गीतारहस्य ग्रंथांत गीतेचा काल ख्रिस्ती शकापूर्वी सुमारें ५०० वर्षे ठरविला आहे. अलीकडे श्री. मोडक, श्री. लेले, श्री. दप्तरी, कै. श्री. केतकर, व रा. ज. स. करंदीकर यांनींहि गीतेच्या कालाविषयीं पुष्कळच ऊहापोह केलेला आहे. पाश्चात्त्य विद्वानांची प्रवृत्ति वैदिक वाङ्मय व गीता यांचा काल शक्य तितका अलीकडे आणण्याची आहे; तर भारतीय विद्वानांची प्रवृत्ति तत्कालीन वस्तुस्थिति सप्रमाण माडण्याकडे आहे. श्री. ज. स. करंदीकर यांनीं गीतेचा काल शालिवाहन शकपूर्व २००९ हा निश्चित केला आहे. त्याची भिस्त मुख्यतः ज्योतिषावर आहे. महाभारतांतील इतर वचनें निरनिराळ्या ग्रहांच्या स्थितीचें जें वर्णन करतात, त्यांचें त्यांनीं सूक्ष्म परीक्षण केलें आहे.

सांप्रतची गीता अठरा अध्यायाची व सातशें श्लोकांची आहे. कौरव व पांडव या दोन्ही बाजूंचीं सैन्यें युद्धास सज्ज झालेलीं, अठरा अक्षौहिणी इतका प्रचंड सेनासागर युद्धास उभा ठाकलेला, अशा वेळीं हा ७०० श्लोकांचा अठरा अध्यायांचा ग्रंथ सांगितला असेल हें मुळींच शक्य नाहीं. युद्धाच्या वेळीं अर्जुनाची विषण्णता, धर्मसंमूढता व दिङ्मूढता घालविण्याकरितां प्रश्नोत्तर रूपानें हा संवाद झालेला असावा. तोच पुढें व्यासानें महाभारतांत श्लोकबद्ध करून मांडला आहे.

'जय नामेऽतिहासोऽयं श्रोतव्यो विजिगीपुणा।' (हा जयनामक ग्रंथ विजिगीपूनें ऐकावा) असें म्हटलें आहे. जय ग्रंथांत जयाचा म्हणजे अर्जुनाचा इतिहास आहे. त्यावरून मूळ गीता पांच अध्यायांच्या अखेर समाप्त झाली असावी. सहाव्या अध्यायापासून जे विषय गीतेंत आलेले आहेत ते तत्कालीन लोकांत जीं निरनिराळीं मतमतांतरें होतीं आणि जे तत्त्वज्ञानाचे विविध पंथ होते, त्या सर्वांचें संकलन करण्याच्या उद्देशानें रचलेले आहेत.

गीतेच्या पहिल्या अध्यायांत अर्जुनानें युद्ध न करण्याची स्वजनवध, कुलक्षय, पाप, वर्णसंकर, इत्यादि कारणें दिलेलीं आहेत. त्या सर्वांचें निरसन करून, युद्ध करणें हें क्षात्रधर्मोचित आहे, समष्टिदृष्ट्या तुला युद्ध अपरिहार्य आहे, एवढें कृष्णानें अर्जुनाला पटवून दिल्यानंतर मुख्य गीतेचा विषय 'कर्मयोगो विशिष्यते।' या सिद्धांतानेंच संपलेला आहे.

भगवद्गीतेंत कर्मसंन्यासाचा व क्लैब्याचा अवलंब करण्याचा निषेध केला आहे. भूतदया म्हणजे शांति नव्हे. कौशल्याचें कर्म करून दुष्टदंडन करावें हें गीतेंतील तत्त्वज्ञान. या सिद्धांताचें महत्त्व समाजाच्या मनाला पटलें म्हणूनच शकयवनादि म्लेंच्छांना हांकून लावून शातवाहनादि हिंदु राजांनीं आपलीं राज्यें स्थापिलीं. चालुक्याच्या वेळचे मराठे अपमानाचें उट्टें प्राण देऊन व घेऊन करीत, असें चिनी प्रवासी लिहितात.

गीतेच्या तत्त्वज्ञानाचें स्पष्ट स्वरूप पुढील चार प्रश्नांच्या उत्तरांत आहे:—(१) कर्म म्हणजे काय? (२) तें कां केलें पाहिजे? (३) कोणतें कर्म करावें, कोणतें न करावें? व (४) तें कसें करावें? गीतापूर्वकालचा समाज हा विजिगीपु, प्रवृत्तिपर व आक्रमणशील होता. अर्थात् अशा समाजाचें कर्म हें नित्य, नैमित्तिक, काम्य आणि प्रायश्चित्त एवढ्यांत कधींच गुरफटून राहणें शक्य नाहीं. म्हणून गीतेनें कर्म म्हणजे प्राणिमात्राची होणारी यच्चयावत् हालचाल अशी व्यापक व्याख्या ठरविली आहे. यामध्यें श्वासोच्छ्वास करणें, जिवंत राहणें, मरणें हीं सुद्धां कर्मेंच होत. म्हणून मनुष्यानें कर्म केलें पाहिजे, असें गीतेचें उत्तर आहे.

कर्म कां केलें पाहिजे यासंबंधानें गीतेंतील तिसऱ्या अध्यायामध्यें फार मार्मिक व सयुक्तिक प्रमाणें दिलीं आहेत: (१) कोणीहि मनुष्य क्षणभरसुद्धां कर्मांशिवाय राहूं शकत नाहीं. (२) शरीराचा व्यापारहि कर्मांशिवाय चालणार नाहीं. (३) हें सृष्टिचक्र यज्ञमूलक आहे, तें चालण्यास प्रत्येकानें आपापलें कर्म केलें पाहिजे. (४) ज्ञानीसुद्धां लोकसंग्रहार्थ सामान्य जनांचा बुद्धिभेद होऊं नये म्हणून अनासक्त बुद्धीनें कर्म करतो; वगैरे.

गीता म्हणते, प्रत्येक मनुष्यानें आपले जे संस्कार, जो स्वभाव व जी परिस्थिति असेल त्यांचा विचार करून समाजाच्या धारणपोषणाकरितां जीं अनेक कर्में आवश्यक असतात त्यांतलि जें कर्म उत्तम आणि कौशल्यानें करतां येईल तें समष्टिहितार्थ करावें.

भारतीय तत्त्वज्ञानांत गीतेचें स्थान फारच उच्च आहे. किंबहुना जगाच्याहि तत्त्वज्ञानांत गीतेचें स्थान फारच वरचें आहे. सृष्टीच्या बुडाशीं जें आदितत्त्व आहे त्याचा पत्ता अद्याप कोणालाहि लागलेला नसला तरी यासंबंधाचें तर्कशुद्ध विवेचन गीतेइतकें अन्यत्र आढळत नाहीं. जगाचें कोडें कसें सोडवावें, कर्म करून त्याच्या बंधनांतून कसें सुटावें, अहंकार व आसक्ति यांविरहित कर्म करून आत्मोन्नति कशी साधावी आणि आयुष्याचें परमध्येय जें परमशांति तें संपादन करून शांतिस्वरूपांत शेवटीं कसें लीन व्हावें, याचें विवेचन जगांतील तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांमध्यें जें आढळतें त्यापेक्षां गीतेंतील विवेचन फारच बुद्धिग्राह्य आहे, असें डॉ. बेझंट, लो. टिळक, महात्मा गांधी आणि अनेक पाश्चात्त्य विद्वान् यांचें मत आहे.

भारतीय तत्त्वज्ञानांत उपनिषदांच्या बरोबरीनें गीतेला मान आहे. प्रसिद्ध अशा चार आचार्यांचीं आणि मोठमोठ्या पंडि

ग्रंथावरील टीका, राहुन्नाकरण, करणपात व श्रुधर असे आणखी चार ग्रंथ भटोत्पलाचे म्हणून अल्बेरुणीनें दिले आहेत. उत्पलाचें प्राचीन ग्रंथांचें वाचन फारच दांडगें होतें असें बृहत्संहितीटीकेवरून दिसतें. संहिता शाखेवरील विविध विषयांचें ज्ञान आपल्या देशात प्राचीन काळीं कसें होतें आणि तें कसें वाढत गेलें याचा इतिहास समजण्यास बृहत्संहितेवरील उत्पलटीका हें चांगलें साधन आहे.

**भट्टाकलंकदेव**—'कर्नाटक शब्दानुशासन' या कानडी भाषेच्या व्याकरणग्रंथाचा कर्ता. हा ग्रंथ यानें संस्कृत भाषेंतच लिहिला. यांतील उदाहरणें मात्र कानडी ग्रंथांतून घेतलीं आहेत. हा जैनधर्मी कानडी कवि अकलंकदेवाचा शिष्य असून विजयनगरच्या श्रीरंगाचा आश्रित होता. यानंतर पेनगुंडीच्या व्यंकटपतिरायानेंहि यांस आश्रय दिला होता. यास संस्कृत, प्राकृत, कानडी, इत्यादि सहा भाषा चांगल्याच अवगत होत्या.

**भट्टि**—सुप्रसिद्ध भट्टिकाव्याचा कर्ता. या काव्याची प्रकीर्णकांड, अधिकारकांड, प्रसन्नकांड व तिङन्तकांड अशीं चार कांडें असून हें काव्य बावीस सर्गांचें आहे. व्याकरणाच्या नियमांनीं सिद्ध झालेल्या रूपांचे प्रयोग दाखविण्याच्या हेतूनेंच भट्टीनें हें काव्य निर्माण केलें आहे. या काव्यग्रंथाच्या शेवटच्या श्लोकांवरून असें दिसतें कीं, भट्टीनें हें काव्य वल्लभीनगरीच्या श्रीधरसेन मैत्रक नामक राजाच्या संरक्षणाखालीं असतांना लिहिलें. भट्टिकाव्याच्या हस्तलिखित प्रतींत याचें नांव भट्टस्वामी किंवा भर्तृस्वामी असें लिहिलें असल्याचें दिसून येतें. याच्या कालाबाबत विद्वानांत अजून एकमत झालेलें नाहीं. तरी मिळालेल्या पुराव्यांवरून हा कवि सन ५०० पासून ६५० पर्यंतच्या कालांतील असावा असें वाटतें. भारवि व दंडी यांचा काल भट्टीच्यानंतरचा आहे.

**भट्टी**—(फरनन्स). ज्या ज्या ठिकाणीं कांहींहि वस्तु मुद्दाम गरम करण्यासाठीं जी खाई पेटवलेली असते तिला भट्टी म्हणतात. बहुधा हिची कल्पना म्हणजे हींत बरेंचसें काम चाललें पाहिजे. बॉयलरमध्यें पेटवलेली भट्टी, कुंभार व लोहार याची किंवा कांच तापविण्याची भट्टी, चिनीमातीच्या वस्तू तयार झाल्यावर त्या तापवून जाळण्याची भट्टी, हे सर्व भट्टीचेच प्रकार होत. तसेंच कांहीं पदार्थ जाळून त्यांतील वायु किंवा खालीं राहणारे अवशेष मिळविण्यासाठीं ते जाळण्यासाठीं जी योजना असते तिलाहि हेंच नांव आहे. साधारणपणें हीमध्यें लांकूड, दगडी कोळसा, कोक, इ. वापरावे लागतात व ते जळण्यास लागणारी पुरेशी हवा मिळण्यासाठीं चिमणी किंवा पंखा लावावा लागतो. भट्टींत ज्या प्रमाणांत उष्णता कमीअधिक राखावयाची असेल त्या प्रमाणांत त्याला अग्निमृत्तिके(फायरक्ले)चा थर द्यावा लागतो. निरनिराळ्या कामासाठीं यांचा जो उपयोग केला जातो त्या कामावरून किंवा पद्धतीप्रमाणें त्यांची निरनिराळीं नांवें आहेत. चुनखडी जाळून चुना तयार करण्याच्या भट्टीला 'किल्न' म्हणतात. कांच करण्याचा रांजण ज्या तऱ्हेनें बसवून तयार केलेला असतो त्याला कांचभट्टी असें म्हणतात. एखाद्या भट्टींत जळलेले वायू जी वस्तु भाजावयाची असेल तिचे वरील बाजूनें त्या वस्तूवर आणले जातात त्याला परावर्तन किंवा क्षेपण (रिव्हरबेटरी) भट्टी असें म्हणतात. आतांपर्यंत या भट्टीमध्यें कोळसा किंवा कोक यांचा उपयोग करून चालवितात असें सांगितलें; पण त्याच्याऐवजीं कोळशाच्या वायूचा उपयोग केल्यास त्या भट्टीस वातभट्टी असें म्हणतात.

वातभट्टी (ब्लॅस्ट फरनन्स)

अ— सांठवणीची जागा (स्टॅक).

ब— भट्टीच्या खालची निमुळती जागा (बॉश).

क— संचारण तोंड (चार्जिंग हॉपर).

ड— शेगडी.

विजेवर चालणारी भट्टी—यांत दोन प्रकार असतात: एकीमध्यें प्रत्यक्ष विजेची ज्योत (आर्क) उत्पन्न होते. यामध्यें कार्बनचे मोठाले आर्क वापरल्यानें त्यामध्यें प्रवाह जात असतांना वरीच उष्णता उत्पन्न होते. या ज्योतीमध्यें कोणताहि पदार्थ ठेवला तरी तो तावडतोब वितळून त्याचा रस तयार होतो. म्हणून या जातीच्या भट्टीला ज्योत (आर्क) भट्टी असें नांव पडलें. दुसऱ्या तऱ्हेच्या भट्टींत जिला प्रेपण (इन्डक्शन) भट्टी म्हणतात, तीमध्यें बाहेरील वेटोळ्यांतून वीज जात असते व या वेटोळ्याच्यामध्यें जर कसलीहि वस्तु ठेवली तर तीमध्यें फार थोड्या व्होल्टचा परंतु अतिशय मोठ्या अँपीयरचा विजेचा प्रवाह उत्पन्न होतो. विजेचा प्रवाह जितका मोठा असेल त्या मानानें तिकडे उष्णता उत्पन्न होते. अशा भट्टीमध्यें इतका मोठा विजेचा प्रवाह उत्पन्न होतो कीं, त्यायोगें उत्पन्न होणारी

उष्णता ती धातु वितळविण्यास पुरेशी होते. ही सर्व क्रिया प्रेपणानें होत असल्यामुळें तिला प्रेपणभट्टी असें म्हणतात.

कांचभट्टी—यांतील तत्त्व वर पहिल्या प्रकारांत सांगितल्यासारखेंच असतें.

धातुभट्टी—अशोधित लोखंडापासून बीड तयार करण्यासाठींच हिचा उपयोग केला जातो. हें बीड तयार करण्याचें प्रमाण फार मोठें असल्यानें ही भट्टी सुद्धां बरीच मोठी असावी लागते. लोखंडाच्या कारखान्यांतील हा एक अत्यंत महत्त्वाचा भाग आहे. ओतकामा(पाहा)मध्यें सांगितलेल्या किपोलाप्रमाणें याची व्यवस्था असते. तिच्याप्रमाणेंच यामध्यें १५–१६ फूट व्यासाच्या चिमणीमधून आंतील बाजूनें अग्नीष्टिका व अग्निमृत्तिका यांचा थर द्यावा लागतो. ही चिमणी बरीच उंच असावी लागते. यामध्यें वरील बाजूनें अशोधित धातु व कोक यांचें मिश्रण पडत राहतें. या मिश्रणानें खालचा बराचसा भाग भरलेला राहत असतो. खालील बाजूनें या मिश्रणांतील कोक जळण्यासाठीं दाबलेली गरम हवा सोडण्याची व्यवस्था केलेली असते. लोखंडाचें बीड होऊन पातळ झालें म्हणजे तें खालील बाजूस येतें. त्यावरच अशुद्ध धातु व कोक यांचा थर असतो. खालीं पुरेसें बीड जमा झालें म्हणजे तें काढून घेण्याची व्यवस्था असते.

भट्टोजी दीक्षित— एक महाराष्ट्रीय वैयाकरण. इ. स. १६३० च्या सुमारास हा हयात होता. याच्या बापाचें नांव लक्ष्मीधर. याच्या घराण्यांत याच्यापूर्वी व नंतर व्याकरणावर लिहिणारे अनेक प्रसिद्ध पुरुष झाले. याचा मुलगा भानुभट ऊर्फ वीरेश्वर ऊर्फ रामाश्रम. भट्टोजीनें पाणिनीच्या व्याकरणावर 'सिद्धांतकौमुदी' ही प्रख्यात टीका लिहिली आहे. ही इतकी लोकप्रिय झाली आहे कीं, तिच्यामुळें पाणिनीचें व्याकरण व इतर व्याकरणकारहि मागें पडले. भट्टोजीच्या नांवावर 'प्रौढमनोरमा', 'वैयाकरणभूषण', 'संध्यामंत्रव्याख्यान', 'शब्दकौस्तुभ', 'अशौचनिर्णय', इत्यादि बरेच ग्रंथ आढळतात. यानें उतारवयांत न्यायशास्त्राचा अभ्यास केला होता. हा काशीस वारला. याला मनाजोगता विद्यार्थी न मिळाल्यानें हा ब्रह्मराक्षस झाला व पुढें यानें एका विद्यार्थ्यास व्याकरण शिकवून त्याच्याकडून गति घेतली, अशी आख्यायिका आहे.

भडगांव—मुंबई, पूर्व खानदेश, एका पेट्याचें मुख्य ठिकाण. लो. सं. ८,९२१ आहे. हा गांव गिरणा नदीच्या दुबेळक्यांतील बेटावर वसलेला आहे. या गांवास चार वेशी होत्या. मोंगलांनीं खानदेश जिंकला त्या वेळीं येथील रामोजीपंत नांवाच्या मनुष्यानें अशीरगडच्या वेढ्यांत पराक्रम दाखविल्यामुळें त्यास नशिराबाद, एरंडोल, जामनेर, बाहुळ व भडगांव या परगण्यांची सुभेदारी मिळाली. त्यानें हें गांव पुष्कळ भरभराटीस आणलें. त्याच्या मरणानंतर त्याची बायको लाडकुबाई हिनें कारभार पाहिला व एकदां ३०० लुटारू भिल्लांचा पराभव केला असें सांगतात.

भडभुंजे—एक जात. यांची संख्या (१९११) ३,२१,८३३ आहे. धान्य भाजणारा (भ्राजक) तो भडभुंजा असें म्हणतात. मध्यप्रांतांत व उत्तरेकडे यांची संख्या जास्त आहे. कहार बाप व शूद्र आई यांच्यापासून यांची उत्पत्ति झाली असें जाति-अभ्यासक इलियट म्हणतो. सकसेना, श्रीवास्तव, झिनवार व भटियारें अशा यांच्या पोटजाती आहेत. हे लग्न वगैरे विधी ब्राह्मणांकडून करवितात. लग्नांत नवरदेव स्त्रीवेषांत नवरीच्या मांडवांत नाचतो. विधवा धाकट्या दिराबरोबर पाट लावते. यांच्यांत भाजण्याचें काम बायकांकडे असतें. त्यामुळें कांहीं म्हणी बनल्या आहेत. (उदा., भडभुंजेकी लडकी और केसरका टिकला.) नाशिकाकडे भुजारी म्हणून एक भडभुंजांचा वर्ग आहे.

भंडारा—मध्यप्रांत, नागपूर विभागामधील एक जिल्हा. याचें क्षे. फ. ३,५८० चौरस मैल आहे. मुख्य नदी वैनगंगा आहे. वार्षिक पाऊस ५५ इंच पडतो. हा प्रदेश एके काळीं गवळी राजांच्या ताब्यांत होता. तिसऱ्या रघोजीच्या मृत्यूनंतर (१८५३) हा जिल्हा ब्रिटिशांकडे आला. तिल्लोटाखैरी येथें कांहीं प्राचीन अवशेष व दगडी खांब आहेत. लो. सं. (१९४१) ९,६३,२२५. जिल्ह्यांत गांवें ४ व खेडीं १६३३ आहेत. शें. ७२ लोक शेतकीवर उपजीविका करतात. जमीनदाऱ्या २८ असून त्यांचें क्षेत्रफळ १४७९ चौरस मैल आहे. तांदूळ, ज्वारी, गहूं, चणे, अळशी व कडधान्यें हीं पिकें होतात. तुमसरनजीक मँगेनीझ धातूची खाण आहे. तिरोड तहशिलींत चांगल्यापैकीं लोखंड सांपडतें. सोनझरी दुधी नदींतील रेती धुतली असतां तींत सोनें आढळतें.

शहर—हें वैनगंगेच्या कांठीं आहे. लो. सं. १६,७३८. येथें पुरातन काळीं गवळ्यांनीं बांधलेला एक किल्ला आहे. भंडाऱ्यास पितळेचीं भांडीं पुष्कळ होतात. सुती कापडहि विणलें जातें. एक मोठी इंग्रजी शाळा आहे.

भंडारी—कोंकणपट्टींतील एक जात. जातीची एकंदर लो. सं. (१९२१) १,७९,१०२ आहे. मुंबई शहरांतच तीन लाखांवर लोक आहेत. त्याखालोखाल रत्नागिरी जिल्ह्यांत. यांच्यांत हेटकरी, किर्त्ते, वगैरे सहा मुख्य भेद आहेत. हेटकरी ही पोटजात विशेष नांवाजलेली आहे. किर्त्ते जात सधन आहे. क्रियापाल ही एकदां बाटून पुन्हां शुद्ध झालेली जात आहे. देवळी जात कलावंतिणीची संतति मानतात. शालिवाहन आणि कदंब या

राजघराण्यांशीं भंडारी आपला संबंध जोडतात व आपणांस क्षत्रिय समजतात. राजपुतान्यांत भंडारी नांवाची एक क्षत्रिय पोटजात आहे, तिच्याशींहि आपल्या जातीचा संबंध दाखवितात. पण इतर जाती ही जात मराठ्यांच्या खालोखाल मानतात. क्षत्रियांप्रमाणेंच भंडारी आपले लग्नविधि करतात. या जातीच्या मालकीचीं कांहीं देवस्थानें आहेत. जातिहितार्थ निघालेल्या संस्थाहि आहेत.

नौकानयनाशीं भंडाऱ्यांचें नांव प्राचीन काळापासून निगडित आहे. यांच्यांत बौद्धकालीन 'महानायक' या नौकाध्यक्षाचें नांव अपभ्रंशानें (मायनाक) आढळतें. सारंग, तांडेल अशीं आडनांवेंहि हेंच दर्शवितात. पूर्वी हे लोक समुद्रावर चांचेगिरी करीत. शिवाजीनें आरमार केल्यानंतर हे त्यांत शिरले. शिवाजीच्या नौकाधिकाऱ्यांत मायनाक (१६४५-१६९०), दर्यासारंग, उदाजी पडवळ, सावळ्या तांडेल, वगैरे भंडारीच होते. मराठ्यांखेरीज इतरांच्या आरमारांतहि हे असत. पुढें आरमार खातीं बंद झाल्यानें नाइलाजानें या लोकांनीं ताडीमाडी काढण्याचे धंदे चालविले.

**भडोच**—मुंबई इलाख्यांतील उत्तर विभागांतील एक जिल्हा. याच्याशीं पंचमहाल जोडला आहे. क्षे. फ. १४६७ चौ. मैल. भडोच हा भृगुकच्छ (भृगूचा प्रदेश) या शब्दाचा अपभ्रंश आहे. यांतून घघर व नर्मदा या नद्या वाहतात. वार्षिक पाऊस सरासरी ३५ इंच पडतो. एके काळीं भडोच जिल्हा मौर्यांच्या राज्यांत असून त्या घराण्यांतील प्रसिद्ध राजा चंद्रगुप्त हा शुक्लतीर्थ येथें राहत होता, अशी दंतकथा आहे. जिल्ह्याची लो. सं. (पंचमहालासह) ९,२४,५२७. शेंकडा ९३ लोक गुजराथी भाषा बोलतात. शें. ६० शेतकीवर व शें. १६ उद्योगधंद्यांवर पोट भरतात. काळ्या जमिनींत कापूस, ज्वारी, तीळ, तूर, गहूं व तांदूळ आणि हलक्या जमिनींत बाजरी, ज्वारी व कडधान्यें हीं पिकें होतात. रेशमी व सुती कापडाविषयीं भडोचची पूर्वी ख्याति होती. भडोच येथें सूत काढण्याच्या व कापड विणण्याच्या गिरण्या आहेत. आमोद येथें सुऱ्या व हत्यारें होतात. हें गांव नर्मदेच्या मुखापासून तीस मैलांवर तिच्या उजव्या तीरावर असून बाँबे बरोडा अँड सेंट्रल इंडिया रेल्वेचें स्टेशन आहे. भडोच हें पश्चिम हिंदुस्थानांतील जुन्या बंदरांपैकीं एक आहे. लो. सं. ५५,८१०.

टॉलेमीनें (इ. स. २००) या शहराच्या वैभवाचें विस्तृत वर्णन केलें आहे. परदेशांशीं येथून व्यापार चाले. महाभारतांत येथील कापसाच्या वस्त्रांचा उल्लेख आहे. जुन्नर, नाशिक, व जुनागड येथील शिलालेखांतून मरुकच्छ नांव येतें. इ. स. ४२० ते ८०० पर्यंत यावर जें राजघराणें होतें तें चेदी शक वापरी. दद्द राजाचें नांव इतिहासांत ऐकूं येतें. तिसरा गोविंद राष्ट्रकूट यानें हें राज्य घेऊन आपल्या भावास दिलें. १३९१ ते १५७२ पर्यंत हें शहर अहमदाबादच्या सुलतानांकडे होतें. नंतर दिल्लीकरांच्या ताब्यांत गेलें. याच अमदानींत ब्रिटिश आणि डच व्यापाऱ्यांनीं येथें वखारी घातल्या. १७ व्या शतकाच्या अखेरीस मराठ्यांनीं यावर हल्ले केले व स्वामित्व मिळविलें. इंग्रजांना भडोच पाहिजे होतें व त्यासाठीं मराठे आणि इंग्रज यांत लढा होता. शेवटीं १८०२ मध्यें शिंद्यांपासून इंग्रजांनीं भडोच मिळविलें.

**भद्रबाहु** (मृ. खि. पू. २९७)—हा जैन आचार्य मौर्य सम्राट् सम्प्रति याचा गुरु. भद्रबाहुचरित्र नांवाच्या चरित्रग्रंथांत मौर्य साम्राज्यविषयक घडामोडींची प्रसंगानुरूप माहिती आलेली आहे. त्यांतील एक हकीगत अशी कीं, अवंती देशांतील उज्जयिनी नगरांत वास करणाऱ्या चंद्रगुप्ती नांवाच्या राजास, तो रात्रीं झोंपला असतां, भावी अरिष्टसूचक अशीं सोळा स्वप्नें पडलीं. त्याच्या दुसरे दिवशींच भद्रबाहु स्वामीचा मुक्काम उज्जयिनींतील एका सुंदर बागेंत पडला होता. राजानें भद्रबाहूच्या दर्शनास जाऊन त्यास पडलेल्या स्वप्नांची कारणमीमांसा त्याला विचारली. ती समजल्यावर राजाचा त्याच्यावर विश्वास बसला. व त्यानें त्याच्यापासून जैनधर्माची दीक्षा घेतली व त्याच्याच सेवेंत तो निमग्न झाला. पुढें स्वामी आपल्या पांचशें शिष्यांसह दक्षिणेंत आले. आपला मृत्युकाल जवळ आला आहे असें कळतांच स्वामींनीं विशाखाचार्य नांवाच्या योग्य पुरुषावर आपली जबाबदारी सोंपवून ते एकांतांत राहूं लागले. या वेळींहि चंद्रगुप्ती त्याच्याजवळच होता व अखेरच्या क्षणापर्यंत तो त्याचे जवळच राहिला. भद्रबाहूनें श्रीमंडलप्रकरणवृत्ति, कल्पसूत्र, दशश्रुतस्कंधसूत्र, व्यवहारसूत्र, श्रीभाषितसूत्र, वगैरे बारा ग्रंथांची निर्मिति केली.

**भद्राचलम्**—मद्रास, गोदावरी जिल्हा, एक जमीनदारी व तिचें मुख्य ठिकाण. जमीनदाराला १३२४ मध्यें दिल्लीच्या बादशहाकडून जमीनदारी मिळाली. भद्राचलम् गांव गोदावरीच्या कांठीं आहे. येथें रामचंद्राचें प्राचीन देवालय आहे. चैत्रांत मोठी यात्रा भरते. नदींतून मालाची वाहतूक होते. नुकत्याच दिवंगत झालेल्या रमण महर्षींचें स्थान जवळच आहे.

**भनसाळी**—एक जात. यांची वस्ती मुंबई इलाख्यांत असून यांचें दुसरें नांव वेगु असें आहे. लो. सं. १५,०००. भानुसल म्हणून एक पौराणिक राजा होता त्यापासून 'भनसाळी' शब्दाची व्युत्पत्ति लावतात. हे आपणांस सोळंकी रजपूत म्हणवितात. भनसाळी व्यापारी आहेत. परंतु शेतीहि करतात. हे लोक शाकाहारी असून ते लुहाणा, खत्री व कायस्थ

या लोकांशीं रोटीव्यवहार करतात. यांचे उपाध्याय सारस्वत ब्राह्मण आहेत.

**भमो**—उत्तर ब्रह्मदेश, एक जिल्हा. यास ब्रह्मी भाषेंत 'बमो' असें म्हणतात. या जिल्ह्यांतून इरावती नदी वाहत जाते. हत्ती, वाघ, सांबर हीं जंगलांत आणि डुकरें, हरिण व चित्ता हीं सर्वत्र आढळतात. पाऊस सुमारें ७२ इंच पडतो. भमो हा मूळचा शान शब्द आहे. त्याचा अर्थ त्या भाषेंत कुंभाराचें अथवा मातीच्या भांड्यांचें खेडें असा होतो. तापिंग व इरावती या दोन नद्यांमध्यें जो भाग आहे, त्यांत जुन्या राजधानीचे अवशेष दृष्टीस पडतात. या जिल्ह्याची लोकसंख्या सुमारें दीड लाख आहे. येथील लोक बौद्ध धर्माचे आहेत, तरी पण वन्यधर्मीय लोक बरेच आहेत. येथील जंगल फार मोठें आहे. इरावती नदींत सोनें सांपडतें.

भमो गांव इरावतीच्या डाव्या तीरावर वसलेलें आहे. लोकसंख्या सुमारें १०,०००. यांत सुमारें दोन हजार हिंदु लोकांचा समावेश आहे.

**भरत**—१. दुष्यन्त व शकुंतला याचा पुत्र भरत हिंदुस्थान देशाचा सार्वभौम राजा झाला, म्हणून या देशाला भरतखंड, भारतवर्ष असें नांव पडलें म्हणतात. तसेंच भरत कुरुकुलांतील असल्यामुळें कुरुकुलांतील कौरव-पांडवांच्या यादवीबद्दलच्या पुराणाला महाभारत, व युद्धाला भारतीय युद्ध अशीं नांवें आज प्रचलित आहेत. पण ऋग्वेदांत भरत या नांवाचा उल्लेख तिसऱ्या, सहाव्या व सातव्या मंडलांत वारंवार येतो, व भरत लोक तृत्सूंप्रमाणें पुरूंचे शत्रू आहेत, असें म्हटलें आहे (ऋ. ७·८·४). यावरून ऋग्वेदांत भरत नांवाचे लोक वर्णिलेले दिसतात. ऋग्वेदांत वर्णिलेल्या दाशराज्ञ युद्धांत भरतांचें वर्णन आहे; आणि भरतांचे यज्ञसमारंभ पंचविंश ब्राह्मण, ऐतरेय ब्राह्मण, शतपथ ब्राह्मण आणि तैत्तिरीय आरण्यक यांतून सारखे उल्लेखले गेले आहेत. यावरून भरतकुल फार प्राचीन असून भरतकुलोत्पन्न राजा दिवोदास हा गांधार देशापासून दिग्विजय करीत या देशांत आला. नंतर भरतकुलाची वसाहत उत्तर हिंदुस्थानांत होऊन या खंडास भरतखंड नांव पडलें. दुष्यन्त-शकुंतला यांचा पुत्र भरत याच भरतकुलांतील पराक्रमी सम्राट् झाल्यामुळें महाभारतकारांनीं भरतखंडाचें नांव या भरत सम्राटाशीं जोडलें असावें. वसिष्ठामुळें तृत्सूंचें व भरतांचें एकीकरण झालें असावें.

२. ऋषभदेवाचा पुत्र. याच्यामुळें अजनाभवर्षाचें भारतवर्ष असें नांव पडलें. हाच पुढें जडभरत झाला.

३. दुष्यंत-शकुंतलेचा पुत्र. याच्यापासून कुरुवंश निघाला. याच्या जन्माची कथा शकुंतलाख्यानांत आहे. कौरव, पांडव हे भरताचे वंशज असल्यानें त्यांना भारत असें नांव होतें; विशेषतः पांडवांना भारत म्हणत. तेव्हां साहजिकच त्यांच्यांतील युद्धाला भारतीय युद्ध हें नांव मिळालें. भरतानें गंगातीरीं ५५ व यमुनातीरीं ७८ अश्वमेध यज्ञ केले. सरस्वतीच्या तीरींहि यज्ञ केल्याचे उल्लेख आहेत. हा मोठा सम्राट् होता. हा दीर्घायुषी होता म्हणतात.

४. इक्ष्वाकुकुलोत्पन्न दशरथाचा कैकेयीपासून झालेला पुत्र. याला राज्य मिळावें म्हणून कैकेयीनें जो मोठा खटाटोप केला तो वायां जाऊन हा रामाच्या नांवानें राज्य करूं लागला व मोठा रामभक्त बनला. भरताची रामावरील अत्यंत भक्ति ही अनेक काव्यांचा विषय बनली आहे. बंधुप्रेमाचा दाखला यावरून देतात. राम वनवासांत असेपर्यंत हाहि असिधाराव्रतानें तपश्चर्या करीत राहिला होता. रामानें स्वतःच्या अभिषेकानंतर याला यौवराज्याभिषेक केला. रामाच्या मागून यानें अयोध्येपासून दीड कोसावर असलेल्या गोप्रतारतीर्थीं देह ठेवला.

**भरतकाम**—कापडावर नक्षी-कशिदा काढण्याच्या कलेला किंवा आकृति काढून त्या दोऱ्यांनीं किंवा तारांनीं भरण्याच्या कामाला (उदा. जीगचें काम) भरतकाम म्हणतां येईल. ही कला शिवण्याच्या कलेइतकी प्राचीन आहे. वैदिक वाङ्मयांत कशिदा काढलेलें वस्त्र या अर्थी 'पेशस्' हा शब्द येतो (ऋ. २·३·६; ४·३६·७; ७·३४·२१; ऐत. ब्रा. ३·१०; इत्यादि). भरतकाम करण्याचा एक बायकांचा धंदा वैदिक काळीं होता, असें पेशस्-कारी म्ह. कशिदा काढणारी या यजुर्वेदांतील पुरुषमेधाच्या बळींच्या यादींतील आढळणाऱ्या नांवावरून सिद्ध होतें. आज सुद्धां काश्मीरच्या वेलबुट्टीच्या शाली फार प्रख्यात आहेत. भरतकामाचे उत्कृष्ट नमुने हिंदुस्थानांत सर्वत्र आढळतात. अंगावर घेण्याचीं वस्त्रें, रुमाल, पडदे, निशाणें, वगैरे जिनसांवर कशिदा असतो. फुलें, पक्षी, प्राणी, नैसर्गिक देखावे, वगैरे भरतकामाचे विषय असतात.

प्राचीन काळीं चीन, जपान, इराण, तुर्कस्तान, ईजिप्त, ग्रीस, वगैरे सर्व देशांत भरतकामाची कला उत्कृष्ट असल्याचें दिसून येतें. आधुनिक इंग्लंड, फ्रान्स, स्पेन, जर्मनी, वगैरे देशांत जाळीदार कापडावर रेशीम व लोकर भरण्याची कला फार लोकप्रिय असल्याचें दिसतें. नेदर्लंडचें भरतकाम सर्व जगांत अतिशय सुरेख असे. कापडावर वेलबुट्ट्या व पडद्यांवर नक्षीकाम विविध प्रकारांनीं केलें जातें. नक्षीचे ठसे असतात. आज बायकांना हा एक धंदा किंवा छंद म्हणून शिकविण्यांत येतो. रुमाल, उश्या, कपडे, इ. वर भरतकाम घरगुती बायकाहि

शिकून करूं लागल्या आहेत. पाश्चात्य देशात हिला फारच महत्त्व आहे.

**भरतगड**—मुंबई, रत्नागिरी जिल्हा, मालवण तालुक्यांत मसुरें नांवाच्या गांवाशेजारीं एका उंच डोंगरावर हा किल्ला बांधलेला आहे. क्षेत्रफळ ५१६ एकर आहे. बालेकिल्ला १५० यार्ड लांब व ६० यार्ड रुंद आहे. तट १८ फूट उंच व ५ फूट रुंद आहे. १७०१ मध्यें फोंड सावंतानें हा किल्ला बांधला.

**भरतपूर संस्थान**—हें राजपुतान्यांतील पूर्वेकडील संस्थान आहे. क्षे. फ. सु. २,००० चौ. मै.. मुख्य नद्या बाणगंगा, गंभीर, काकंद व रूपवेल या होत. पाऊस २४ इंच पडतो. प्राचीन काळीं तोमर वंशाचे रजपूत दिल्लीवर राज्य करीत होते. पुढें ५ शतकें हा मुलूख दिल्लीच्या राजांच्या ताब्यांत होता. बयाना, कामन व रूपवास हीं प्राचीन प्रेक्षणीय स्थळें संस्थानांत आहेत. संस्थानची लो. सं. (१९४१) ५,७५,६२५. या संस्थानात ७ मोठीं गांवें आहेत. त्यांपैकीं भरतपूर, दिग व कामन हीं मुख्य होत. एकंदर लोकसंख्येंत शें. ८१ हिंदू आहेत. चांभारकाम, कुंभारकाम, सूत काढणें व विणणें, वगैरे उद्योगधंदे आहेत. मुख्य पिकें बाजरी, जोंधळा, हरभरा, गहूं व थोडा कापूस. दक्षिणेंतील टेंकड्यांत तांबें व लोखंड सांपडतें. येथें जाडेंभरडें कापड, बांगड्या, लोखंडाच्या थाळ्या व मातीचीं भांडीं तयार होतात. हस्तिदंताच्या फण्या अथवा चंदनाच्या चवऱ्या कारागीर चांगल्या तयार करतात. संस्थानचें उत्पन्न ३४ लाख रुपये आहे. १९४८ सालीं हें संस्थान मत्स्यसंघांत सामील झालें.

सध्यांचे महाराज श्रीब्रिजेंद्रसिंग हे १९२९ सालीं अज्ञानपणींच गादीवर आले. दहा वर्षांनीं त्यांना राज्याधिकार प्राप्त झाले. हें राजघराणें सिनसिनवारच्या जाटांपासून निघालें. या जाटांचा मूळपुरुष मदनपाल होता. सिनसिनी हें एक गांव आहे.

दिल्लीच्या बादशहांबरोबर या सिनसिनी जाटांचें वितुष्ट असे व नेहमीं दिल्लीच्या सैन्याशीं यांना लढावें लागे. सुरजमल जाटाच्या कारकीर्दींत या राज्याचा लौकिक वाढला. त्यानें १७३३ त भरतपूर घेतलें व आग्रा–मथुरा प्रांत काबीज केले. याला १७६३ त मोंगलांच्या टोळीनें शिकार करतांना मारलें. पुढें राजघराण्यांत दुही माजली व तिचा फायदा मराठे आणि अलवारचा राजा यांनीं घेतला. सगळीकडून राज्याचे लचके तोडण्यांत येऊं लागले. सुरजमल्लाच्या विधवा राणीला हातांपायां पडून राज्य टिकवावें लागलें. मराठे–इंग्रज युद्धांत भरतपूरचा राजा इंग्रजांच्या बाजूस गेल्यामुळें कांहीं फायदा झाला. पुढें इंग्रजांना राजघराण्यांतील यादवींत हात घालतां आला व त्यांनीं राजास अंकित करून सोडलें.

भरतपूर शहर राजपुताना-आग्रा या आगगाडीच्या फांट्यावर आहे. येथून आग्रा ३४ मैल आहे. येथें चवऱ्या चांगल्या होतात. राजधानीचें शहर असल्यानें राजवाडे, हायस्कूल, वगैरे मोठ्या इमारती आहेत. भरतपूरचा किल्ला फार बळकट म्हणून इतिहासांत प्रसिद्ध आहे.

**भरती–ओहोटी**—सूर्य आणि चंद्र यांच्या आकर्षणामुळें पृथ्वीवरील समुद्रांच्या पाण्याचा होणारा चढ-उतार. चंद्रोदयापासून पुन्हां चंद्रोदय होईपर्यंत २ वेळां भरती व २ वेळां ओहोटी होते. सूर्यापेक्षां चंद्र पाण्याला दुप्पट जोरानें ओढून घेत असतो. चंद्र मध्यान्हीं आला म्हणजे भरती पूर्ण होऊन १२ मिनिटें पाणी स्थिर राहतें, त्याला समा म्हणतात. चंद्रास्तानंतर ओहोटी पूर्ण होऊन १२ मिनिटें पुन्हां पाणी स्थिर राहतें, त्यास निखार म्हणतात. समा आणि निखार सहा सहा तासांनीं एकामागून होत असतात. पौर्णिमा आणि अमावास्या या दिवशीं सूर्यचंद्रांचीं आकर्षणें एका रेषेंत होतात व त्यामुळें मोठाल्या भरत्या येतात. त्यांना उधानाच्या भरत्या म्हणतात. पौर्णिमा-अमावास्येनंतरच्या दोन अष्टमींसहि सूर्यचंद्रांचीं आकर्षणें होतात. पण तीं काटकोनांत असल्यामुळें पाणी फार वर येत नाहीं. या भरतीस भांगाची भरती म्हणतात. याप्रमाणें एका चांद्रमासांत दोन मोठाल्या (उधानाच्या) व दोन लहान (भांगाच्या) भरत्या येतात.

भरतीची लाट—अशी मोठी उचंबळलेली लाट जेव्हां नदीचा प्रवाह जोराचा, नदीचें तोंड नसराळ्यासारखें व मोठा वाळूचा दांडा पडला आहे अशा स्थितींत उत्पन्न होते व भरतीचें पाणी जोरानें नदीमुखांत सरळ शिरतें तेव्हां अशी कित्येक फूट उंचीची लाट उठते. गंगा, सिंधु, ब्रह्मपुत्रा यांतील अशा लाटा कधीं १२ फूट उंच असतात. सेव्हर्न, ट्रेंटसारख्या नद्यांतून ५० फुटांपर्यंत वर लाटा उसळतात.

**भरवाड**—या धनगर जातीची मुख्य वस्ती मुंबई इलाख्यात आहे. लो. सं. (१९११) ३८,५२८. गुजराथेंत हे लोक आपणांस मेहेर म्हणजे गोकुळच्या नंदाच्या जातीचे म्हणवितात. वैश्य पुरुष व शूद्र स्त्रिया यांचे हे वंशज असावेत. हे धनगर किंवा गुराखी आहेत, व कांहीं शेतकरी व मजूरहि आहेत. काडीमोड व धाकट्या दिराशीं पाट या चाली या जातींत आहेत. सामाजिक तंट्यांचे निकाल या जातींतले पाटील ५-१० पंचांच्या मदतीनें देतात. मक्याची भाकरी व दूध हें यांचें मुख्य अन्न होय. कडवा कुणब्यांप्रमाणें १२, १५ किंवा २५ वर्षांनीं एकदां वैशाखांत एकाच ठिकाणीं, एकाच दिवशीं लग्नें होतात.

**भरहुत**—मध्य हिंदुस्थान, नागौद संस्थान, बाघेल खंडांतील हें खेडें अलाहाबादच्या नैर्ऋत्येस ९५ मैलांवर आहे. याची प्रसिद्धि येथील स्तूपाबद्दल आहे. हा स्तूप वर्तुलाकृति असून त्याभोंवतीं चारी बाजूंला नक्षीदार कठडे व चार दरवाजे आहेत. प्रत्येक बाजूस सोळा खांब आहेत, व प्रत्येक बाजूस सुशोभित तोरण आहे. या खांबाच्या पदकाकार भागांवर कमलें, फुलें, इत्यादि सुंदर चित्रें व बौद्ध वाङ्मयांतील निरनिराळे प्रसंग कोरलेले आहेत; त्यांवरून तत्कालीन पोषाख व चालीरीती यांची कल्पना येते. हा स्तूप अशोककालीन असावा असें संशोधक व पुराणवास्तुशास्त्रज्ञ कनिंगहॅम म्हणतो. पण खि. पू. २ च्या शतकांतील शुंग घराण्याच्या वेळचा हा स्तूप असावा असें दुसरें कांहीं प्रतिपादितात. यावरील चित्रांत साधेपणांत मोठी सूचकता दिसून येते, हेंच या काळच्या शिल्पाचें वैशिष्ट्य होय.

**भर्तृहरि** ( मृत्यु अदमासें इ. स. ६५० )— हा सुप्रसिद्ध राजकवि, व्याकरणपण्डित व योगी होता. याच्याबद्दल निश्चित माहिती नाहीं. पातंजल महाभाष्यावर वाक्यपदीय टीकाग्रंथ लिहिणारा एक भर्तृहरि असून या ग्रंथाचें दुसरें नांव 'हरिकारिका' आहे, असें कैय्यट म्हणतो. भट्टीकाव्य, राहटकाव्य हींहि याच्या नांवावर मोडतात.

कांहींच्या मतें ( दंतककथांवरून ) भर्तृहरि हा विक्रमसंवत् चालू करणाऱ्या विक्रमादित्याचा वडील भाऊ असून त्याच्यापूर्वी तो उज्जयिनीचा राजा होता ( खि. पू. ५७ ). त्याच्या बापाचें नांव वीरसेन आणि बायकोचें नांव पद्माक्षी. तिचा अनैतिक संबंध अश्वशाळेवरील एका अधिकाऱ्याशीं होता. भर्तृहरीस राणीचें हें कर्म समजल्यावर त्यानें विक्रमास गादीवर बसवून अरण्यावास पत्करला. या प्रसंगाला अनुसरून त्यानें 'यां चिंतयामि...मां च ॥' हा श्लोक व वैराग्यशतक लिहिलें; तत्पूर्वी त्यानें नीतिशतक व शृंगारशतक रचिलें होतें. पुढें एका चर्पटीनाथानें भर्तृहरीस उपदेश केला व भर्तृहरि हा नवनाथांपैकीं एक नाथ बनला.

१६५१ सालीं अब्राहाम रॉजर या डच मिशनऱ्यानें एक भर्तृहरिचरित्र प्रसिद्ध केलें. त्याचा सारांश असा—भर्तृहरीचा बाप चंद्रगुप्तनारायण ब्राह्मण याला चार वर्णांच्या चार बायका होत्या, पैकीं शूद्रेपासून भर्तृहरि जन्मला. भर्तृहरि फार विषयलंपट असून त्याच्या ३०० बायका होत्या. बापाच्या मरणानें दुःख होऊन भर्तृहरीनें संन्यास घेतला.

**भवनगड**—१. मुंबई, केळवें-माहीमच्या दक्षिणेस ४ मैलांवर हा किल्ला पडक्या अवस्थेंत आहे. लांबी १८८ फूट व रुंदी ७० फूट आहे.

२. मुंबई, रत्नागिरी जिल्हा, संगमेश्वर तालुक्यांत चिखली गांवाच्या शेजारीं आहे. हा लहान असून क्षेत्रफळ अवघें अर्धा एकर आहे. किल्ल्यावर पाणीपुरवठा नाहीं.

**भवभट्ट**—एक संगीतज्ञ. अनूपसिंह नांवाच्या एका राजाच्या दरबारीं हा होता. त्याचें घराणें माळव्यातील आभीर प्रदेशांतलें असून त्याचा बाप जनार्दनभट्ट शहाजहानच्या दरबारीं गवई होता. शहाजहाननें 'कविराज' अशी पदवी ज्याला दिली तो जगन्नाथ हाच असावा असें रे. पॉपले यास वाटतें; याच्या मतें हें घराणें मूळ दक्षिणेकडे असावें. कारण भवभट्ट याला दक्षिणेकडील संगीतपद्धतीची बरीच माहिती होती असें दिसतें. त्यानें सर्व रागांचें २० थाटामध्यें वर्गीकरण केलें आहे; आणि त्याचें शुद्ध सप्तक कनकांगी हेंच आहे. कनकांगी हें दक्षिणेकडील शुद्धस्वरसप्तक होय. भवभट्टानें उत्तरेकडील राग दक्षिणेकडील संगीतपद्धतींत बसविण्याचा प्रयत्न केला आहे.

**भवभूति**—हा प्रसिद्ध संस्कृत नाटककार सातव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला. त्याच्या बापाचें नांव नीळकंठ व आईचें नांव जातुकर्णी असून त्याचें मूळ नाव श्रीकंठ, हा पद्मपूरचा राहणारा, अशी माहिती 'मालतीमाधव' नाटकावरून समजते. उज्जयिनी येथें ज्ञाननिधि नांवाच्या गुरूपाशीं त्यानें अनेक शास्त्रांचें अध्ययन केलें, व तेथेंच त्याची तत्कालीन नटांशीं दोस्ती होती, असें त्याच्या नाटकांच्या प्रस्तावनेवरून दिसतें. त्यानें 'महावीरचरित', 'मालती-माधव' व 'उत्तररामचरित' हीं तीन नाटकें लिहिलीं. महावीरचरितांत रामाच्या पूर्वचरित्रापासून रावणवधानंतर रामाच्या राज्याभिषेकापर्यंतची कथा असून उत्तररामचरितांत सीतेच्या त्यागापासून पुनर्मीलनापर्यंतची कथा आहे. मालतीमाधवांत एक कपोलकल्पित प्रेमकथा आहे. हीं तिन्ही नाटकें पूर्वी धार्मिक उत्सवप्रसंगीं केलीं जात. करुणरस हा या तिन्ही नाटकांतील प्रधान रस आहे. पण कालैक्य व स्थलैक्य याचा तिन्ही नाटकांत अभाव दिसून येतो. नाटकांतील भाषा क्लिष्ट व ओबडधोबड असून कित्येक वर्णनें लांबलचक व कंटाळवाणीं आहेत. स्वभावरेखनांत अतिशयोक्ति व फाजील भावनोत्कटता हे दोष असले तरी भवभूति हा कालिदासाच्या खालोखाल उत्कृष्ट प्रकारचा संस्कृत कवि व नाटककार होता यांत शंका नाहीं. याचें 'उत्तररामचरित' हें नाटक लोकांना विशेष आवडतें व प्रसिद्ध आहे.

**भवानी काळो-ळू** ( मु. १७६४–१८०३ )—नागपूरकर भोसल्यांच्या पदरचा एक मुत्सद्दी व वऱ्हाडांतील मंगरूळ तालुक्यांतील खडीधामणी वगैरे गांवांचा वतनदार पटवारी. हा देशस्थ ब्राह्मण असून याच्या वडिलांच्या काळोजी या नांवावरून

याचें आडनांव काळोन्‍खू असें पडलें. साबाजी भोसल्याचा दिवाण म्हणून यानें काम केलें. या मुदतींत यानें जानोजीचें साबाजीशीं सख्य करून दिलें. पुढें हा जानोजीकडे गेला व त्याच्या फौजेचा प्रमुख झाला. साबाजी-मुधोजी तंट्यांत यानें मुधोजीचा पक्ष घेतला असावा. हा चिमणाजी बापूच्या पक्षाचा असून यानें त्यास बंगालवरील स्वारींत साहाय्य केलें. कटक प्रांताचा सुभेदार शिवभट साठे यानें बंड उभारल्यानें त्याच्या जागीं यास नेमलें होतें (सन १७६१). दिवाकरपंतानंतर यास त्याची दिवाणगिरीची जागा मिळाली.

**भवानीबाई महाडीक** (१६७९-१७२८)—थोरल्या शिवाजीची ही नात व संभाजीची मुलगी ता. २९ जानेवारी सन १६७९ रोजीं शृंगारपूर येथें जन्मली. ही आपली आई येसूबाई व भाऊ शाहू यांच्याबरोबर औरंगजेबाच्या कैदेंत होती. औरंगजेबाच्या नोकरींत कर्नाटकांत असणाऱ्या शंकरजी राजे या हरजी राजे महाडीक याच्या पुत्राबरोबर भवानीबाईचें लग्न झालें. शाहूच्या सुटकेपूर्वी भवानीबाईसह शंकरजी दक्षिणेंत आला. शाहूची हिच्यावर माया असल्यानें त्यानें आपण राज्यावर येतांच वडिलार्जित तारळे महालाच्या देशमुखीच्या सनदा हिच्या नावानें सन १७०९ मध्यें करून दिल्या. सन १७२८ मध्यें शंकरजी मृत्यु पावल्यानें हिनें सहगमन केलें. दुर्गोजी व अंबाजी असे हिला दोन मुलगे होते.

**भविष्यपुराण**—एक पुराणग्रंथ. या पुराणाच्या उपलब्ध प्रतींत सात हजार श्लोक आहेत. ही संख्या चौदा हजार पांचशें आहे असेंहि कोठें सांगितलें आहे. परंतु इतका मोठा ग्रंथ आढळत नाहीं. भविष्योत्तर नांवाचें एक पुराण आहे. त्यांत सुमारें सात हजार श्लोक आहेत; परंतु हें पुराण भविष्यपुराणाचा भाग आहे असें म्हणतां येत नाहीं.

भविष्यपुराणाच्या पहिल्या भागांत जगाच्या उत्पत्तीविषयीं विचार केला आहे. हा मनुस्मृतींतील पहिल्या अध्यायाप्रमाणेंच आहे. यांत दहा संस्कार, संध्यावंदन, चतुर्थाश्रमाचें व चातुर्वर्ण्याचे धर्म, व्रतोपवास, च्यवनऋषीची कथा, नागपंचमी, सूर्योपासक मग लोकांविषयीं माहिती, वगैरे कथाभाग आहे. भविष्योत्तर पुराणांत अनेक व्रतवैकल्यें सांगितलीं असून रथयात्रा, मदनोत्सव, वगैरे उत्सवांची माहिती आ[illegible]. सूर्योपासक, भोजक आणि मग जाती यांच्या वर्णनावरून झरथुष्ट्र धर्माशीं संबंध दिसून येतो. मोंगल बादशहा, व्हिक्टोरिया राणी, यांसारखे उल्लेख या पुराणाचें अर्वाचीनत्व किंवा प्रक्षित मजकुरांना वाव मिळेल असा उघडेपणा व्यक्त होतो.

**भस्मासुर**—शिवाच्या भस्मापासून उत्पन्न झालेला एक असुर. यानें ज्याच्या मस्तकीं हात ठेवावा तो दग्ध व्हावा, असें यास वरप्रदान होतें. परंतु पुढें यानें सर्वांचा छळ आरंभिल्यामुळें विष्णूनें मोहिनीचें रूप घेऊन त्यास स्वतःकडूनच दग्ध करविलें. याची कथा मराठी शिवलीलामृतांत (अ. १२) आहे; पण भागवतांत वृकासुर अशाच प्रकारचा आहे. स्कंदपुराणांत कालपृष्ठ हाहि जणुं भस्मासुरच दाखविला आहे.

**भाकरीचें झाड**—[वर्ग-मोरासी]. दक्षिण समुद्रांतील बेटांतून रानांत आढळणारें एक झाड. याला कलिंगडाएवढीं हिरव्या रंगाचीं फळें येतात. हें ४० फूटपर्यंत उंच वाढतें. फळ बहुतेक तान्हेंच खाण्यांत येतें. यांतील खाण्यासारखा भाग साल आणि गाभा यांमध्यें असतो व तो पावासारखा असतो.

**भांग**—एक मादक वनस्पति. हिचा उल्लेख अथर्ववेदांत येतो. ऋग्वेदांत (९,६१,१३) हें सोमाचें विशेषण म्हणून आलें आहे, व त्या ठिकाणीं त्याचा बहुधा अर्थ 'मादक' असा आहे, व तोच अर्थ आतां भांगेचा विशेष म्हणून समजतात.

भांग ही एक वनस्पति असून तिच्या पानांपासून तयार केलेलें जें पेय असतें त्यामुळें एक प्रकारची उल्हसित वृत्ति उत्पन्न होते व थोडा माद येतो. या वनस्पतीचीं वाळलेलीं पानें तंबाखूसारखीं ओढतात. या वनस्पतीच्या कळ्याचे तुरे सुकविले म्हणजे त्यास गांजा म्हणतात.

**भागलपूर**—बिहार, भागलपूर विभागांतील एक जिल्हा. भागलपूर हा 'भगलीपूर' याचा अपभ्रंश असून 'भगली' याचा अर्थ चांगलें नशीब अथवा पळून आलेले लोक असा होतो. याचें क्षे. फ. ४,२४८ चौ. मैल आहे. कोसी व गंगा या मोठ्या नद्या आहेत. आंबा व ताड यांच्या बागा मोठ्या आहेत. पाऊस सरासरी ५१ इंच पडतो. पुराणवस्तूंचे अवशेष मंदागिरि येथें आढळतात. जहांगिरी व पाथरघाट येथें शिल्पकामाचे सुंदर नमुने आढळतात. कोलोंगे येथें खडकांवर कोरीव देऊळ आहे. त्याचप्रमाणें सुलतानगंज या गांवीं बौद्ध मठांचे अवशेष दिसतात. लो. सं. (१९४१) २४,०८,८७९. धान, मका, गहूं, जव, जोंधळा व हरभरा हीं मुख्य पिकें आहेत. गौरीपूर, दहीजार, खांडा, गमहरिया, वगैरे ठिकाणीं शिसें अशुद्ध स्थितींत सांपडतें. यांखेरीज तांबें, अभ्रक, क्लोराइट, जॅस्पर (राहूचा खडा) व लोखंड हीं सांपडतात. टसर रेशमाचें कापड, नीळ, तूप, लोखंड व पितळेचीं भांडीं, कांचेच्या व लाखेच्या बांगड्या, वगैरे जिन्नस येथें तयार होतात. मोगल साम्राज्यांत हा एक सुभा होता. येथें राजा मानसिंगाचें लष्कर असे. पुढें हा दिवाणींत ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकारांत गेला. भागलपूर हें जिल्ह्याचें व विभागाचें मुख्य ठिकाण गंगेच्या तीरावर आहे. लो. सं. (१९४१) ९३,२५४. येथें दोन कॉलेजें व बरींच हायस्कुलें आहेत.

**भागवत, राजाराम (शास्त्री) रामकृष्ण** (१८५१-१९०८)—एक महाराष्ट्रीय संस्कृत पंडित, वेदाभ्यासक व सुधारक. यांचा जन्म राजापूर तालुक्यांत केळशी गांवीं व शिक्षण मुंबईस झालें. १८७७ सालीं यांनीं रॉबर्ट मनीस्कुलांत शिक्षकाची नोकरी पत्करली व पुढें सेंट झेवियरमध्यें शास्त्र्याच्या जागीं यांची नेमणूक झाली. या कॉलेजांत यांची बढती होऊन तेथें शेवटपर्यंत हे संस्कृतचे प्राध्यापक होते. शेवटचीं पांचसात वर्षें यांना मुंबई विद्यापीठांत संस्कृतचे परीक्षक नेमिलें होतें. हे निर्भीड व कट्टे सुधारक होते. अस्पृश्य जातीच्या उन्नतीविषयीं यांना मोठी कळकळ वाटे. तथापि आपल्या स्वतंत्र विचारांमुळें यांनीं अति विक्षिप्त म्हणून कीर्ति संपादन केली होती.

यांचे किरकोळ लेख व ग्रंथ अनेक आहेत. हिंदुस्थानच्या इतिहाससंबंधानें यांचीं कांहीं मतें होतीं तीं येणेंप्रमाणें:—(१) महाराष्ट्रांतील लोकांपैकीं बहुतेक लोक मूळचे येथीलच; ते उत्तर हिंदुस्थानांतून आलेले नव्हेत. महार, कुणबी, मराठे, कोळी, प्रभु, ब्राह्मण हे एका वंशांतील व एकाच जातचि लोक होत. (२) महाराष्ट्रांतील दैवतें, चालीरीती हीं मूळचीं स्थानिक होत. यांचेंच संस्कृतीकरण ब्राह्मणांनीं केलें. (३) ब्राह्मण म्हणजे 'ब्रह्म' नांवाचा पूर्वीं एक देश होता तेथील लोक. (४) वेदांतील देव, दानव, गंधर्व, अद्रि, पणि, असुर, नाग हीं सर्व राष्ट्रें होतीं. इंद्र ही ऐतिहासिक व्यक्ति अगर ऐतिहासिक राष्ट्रांतील पदवी होती. (५) म्लेच्छ म्हणजे मोम्लेच, असुर म्हणजे असिरिया देश, तायर ही सुरांची वसाहत, पणि म्हणजे फिनिशियन, इत्यादि. मराठीच्या अभ्यासाला भाषाशास्त्राची जोड यांनीं प्रथम दिली. 'मराठ्यांसंबंधीं चार उद्गार' हा त्यांचा निबंध मननीय आहे.

**भागवतधर्म**—हिंदुस्थानांतील एक महत्त्वाचा धर्मपंथ. खिस्ती शकापूर्वीं या पंथाचीं तत्त्वें रुजलेलीं होतीं. प्राचीन वैदिक धर्माचें स्वरूप मुख्यतः यज्ञमय म्हणजे कर्मप्रधान होतें, त्यांत हिंसा होती. या कर्मपर धर्माविरुद्ध दुसरी एक धार्मिक चळवळ सुरू झाली, ती अशी कीं, केवळ यज्ञयागादि बाह्य साधनांनीं परमेश्वराचें ज्ञान होणें शक्य नाहीं. म्हणून परमेश्वराचें स्वरूप सांगणारें तत्त्वज्ञान व परमेश्वरप्राप्तीचा ज्ञानमार्ग उपनिषद् ग्रंथांतून प्रतिपादिला गेला. तथापि हा ज्ञानमार्ग अवलंबिणें सर्वसाधारण लोकांना शक्य नसल्यामुळें ब्रह्माचें सगुण प्रतीक म्हणून मानवरूपधारी देवतांची उपासना करण्याचा भक्तिमार्ग (पाहा) निघाला, व या भक्तिमार्गांतूनच भागवतधर्माचा उदय झाला. या पंथाला एकांतिक, नारायणीय, पंचरात्र (पाहा), सात्वत हीं नांवें रूढ होतीं. परब्रह्माचे अवतार नर व नारायण, नर-नारायणाचे अवतार अर्जुन व भगवान् श्रीकृष्ण, आणि श्रीकृष्णानें सांगितलेला तो भक्तिमार्ग म्हणून याला भागवतधर्म हें नांव रूढ झालें. श्रीकृष्णाच्या काळीं म्हणजे खि. पू. १४०० च्या सुमारास हा भागवतधर्म उदयास आला. भागवतधर्माचा मुख्य आधारभूत पाया म्हणजे पंचरात्र संहिता हा होय. भक्तीच्या द्वारें श्रीहरीची उपासना करण्याचे सहा मार्ग: (१) स्मरण, (२) कीर्तन, (३) वन्दन, (४) पादसेवन, (५) पूजन, व (६) आत्मनिवेदन हे सांगितले आहेत. भागवतपुराणांत श्रवण, सेवा व सख्य हे आणखी तीन मार्ग भरीला घातले आहेत.

भागवतधर्माच्या इतिहासाचे चार भाग पडतात. प्रथम हा धर्म एकेश्वरी भक्तीचें प्रतिपादन करणारा होता. नंतर देव ईश्वराचे अवतार आहेत म्हणून अनेकेश्वरी मताचा पुरस्कार करण्यांत आला. क्षत्रिय विभूतींची अवतारांत गणना करून ब्राह्मणधर्म व भागवतधर्म यांची एकवाक्यता करण्यांत आली. आद्य शंकराचार्यांनीं अद्वैत मताचा पुरस्कार करून भागवतधर्मावर टीका केली, पण पुन्हां रामानुजाचार्य व मध्वाचार्य यांनीं भागवतधर्माचें पुनरुज्जीवन केलें. नंतर त्यांत चार पोटभेद झाले ते— रामानुजांचा श्रीसंप्रदाय, मध्वाचार्यांचा ब्रह्मसंप्रदाय, विष्णुस्वामींचा रुद्रसंप्रदाय आणि निंबादित्यांचा सनकादिक संप्रदाय. भागवतधर्मांत गुरूला फार महत्त्व आहे. प्रत्येक भागवत धर्मीयाला गुरुकडून दीक्षा घ्यावी लागते. रामानंद, कबीर, वल्लभ व चैतन्य यांनीं उत्तरेंत व नामदेव-तुकाराम यांनीं महाराष्ट्रांत या धर्माचा मोठा प्रसार केला.

**भागवतपुराण**—भक्तिमार्गाचें महत्त्व पटविणारें हें पुराण फार प्रसिद्ध आहे. इतर कोणत्याहि पुराणापेक्षां यांतील विषयांची मांडणी, आणि भक्ति, तत्त्वज्ञान, कर्म, वगैरे धार्मिक विषयांची चर्चा निराळ्या प्रकारची आहे. भगवान् श्रीविष्णूची महती या पुराणांत गायिली असल्यामुळें त्याला भागवत असें म्हणतात. यांत अठरा हजार श्लोक आहेत आणि बारा स्कंद किंवा भाग आहेत. सृष्टिरचनेविषयींचा विचार, वेदान्त, वासुदेवभक्तीचा महिमा, समुद्रमंथन, वराह, वामन व मत्स्य हे अवतार, भक्त प्रल्हाद याविषयींच्या कथा, या पुराणांत सुरस रीतीनें वर्णिल्या आहेत. भागवतांत विष्णुभक्तीचा महिमा वर्णिला आहे. श्रीकृष्णाचेंहि चरित्र यांत फार मनोवेधक रीतीनें दिलें आहे. तथापि हरिवंशाइतकें तें शृंगाररसपूर्ण नाहीं. भागवतपुराणाचा १० वा व ११ वा स्कंद फार महत्त्वाचा मानला जातो. यावर बऱ्याच टीका आहेत. दशमस्कंदांत कृष्णाच्या लीला रसाळपणें वर्णिल्या आहेत. एकादशस्कंदांत श्रीकृष्णानें आपला भक्त उद्धव यास योगाविषयीं उपदेश केला आहे. यांतच यादवांच्या नाशाची व कृष्णाच्या मृत्यूची कथा आहे. हिंदुस्थानांतील बहुतेक भाषांतून या संस्कृत पुराणाचें भाषांतर झालेलें आहे.

मराठी कवींनीं भागवतपुराणाच्या आधारें अनेक ग्रंथ रचलेले आढळतील; एकनाथी भागवत प्रसिद्धच आहे. युरोपांत भाषांतराला घेतलेलें पहिलें पुराण हेंच होय ( पॅरिस१८४० ).

**भागीदारी**—कायद्यांत भागीदारी ( पार्टनरशिप् ) या शब्दाचा अर्थ असा आहे कीं, दोन किंवा अधिक इसमांनीं एखादा धंदा, व्यापार किंवा कारखाना एकमेकांच्या सहकारितेनें चालविण्याचें ठरवून स्थापन केलेलें मंडळ किंवा मंडळी ( ॲसोसिएशन ). इंग्लंडांत अशा भागीदारीसंबंधीं कायद्याचे नियम आहेत ते— १. अशा भागीदारींतील प्रत्येक भागीदार भागीदारीचा व्यवहार चालू असतांना झालेल्या कर्जाबद्दल इतर भागीदारांसह जबाबदार असतो. २. प्रत्येक भागीदार हा इतरांचा एजंट असून त्यानें स्वतः एकट्यानें केलेल्या व्यवहाराचा हिशोब व फायदा इतरांच्या पुढें ठेवला पाहिजे. ३. अशा मंडळाचे किंवा फर्मचे भागीदार दहापेक्षां अधिक असतील आणि बँकिंग हा त्यांचा धंदा असेल तर 'जॉइंट स्टॉक कंपनी' ( संयुक्त भांडवल मंडळ ) म्हणून त्यांनीं आपलें मंडळ सरकारांत नोंदविलें पाहिजे; आणि इतर कोणताहि धंदा करणाऱ्या मंडळाचे भागीदार २० हून अधिक असतील तर त्यांनाहि 'जॉइंट स्टॉक कंपनी' म्हणून आपलें मंडळ रजिस्टर करावें लागतें. अशा कंपनींचे मर्यादित व अमर्यादित जबाबदारी ( विथ ऑर विदाउट लिमिटेड लायाबिलिटि ) असे दोन प्रकार असतात. म्हणजे कंपनीला जें देणें होईल त्याची जबाबदारी फक्त कंपनीच्या मालकीच्या मिळकतीवर असेल तर त्या कंपनीला 'कंपनी विथ लिमिटेड लायाबिलिटि' असें म्हणतात आणि जर कंपनीच्या देण्याची जबाबदारी त्या भागीदारांच्या खाजगी मिळकतीवरहि असेल तर त्या कंपनीला 'कंपनी विदाउट लिमिटेड लायाबिलिटि' असें म्हणतात.

हिंदुस्थानांत अशा भागीदारीसंबंधीं 'इंडियन कॉंट्रॅक्ट ॲक्ट' आणि 'इंडियन कंपनीज् ॲक्ट' या दोन कायद्यांत तरतूद केलेली आहे. त्यांत वरील प्रकारचींच कलमें आहेत.

भागीदारीचा कायदा—( दि इंडियन पार्टनरशिप ॲक्ट, १९३२ ). कराराचा कायदा १८७२ सालीं मान्य झाला. त्यांत भागीदारीबद्दलचीं कलमें ११ व्या प्रकरणांत आहेत; पण कराराचा कायदा जितका पाहिजे तितका विस्तृत झालेला नाहीं; आणि अलीकडे उद्योगधंदे व व्यापार फार वाढत चालल्यामुळे कराराच्या कायद्यांतील भागीदारीसंबंधींच्या प्रकरणांत सुधारणा करणें जरूर वाटूं लागलें, तसेंच विक्री वगैरे प्रकरणांतहि सुधारणा करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. तेव्हां तो कराराचा मूळ कायदा दुरुस्त करण्याऐवजीं एकेका प्रकरणाचा स्वतंत्र कायदा करण्यांत आला, व तदनुसार 'ट्रान्स्फर ऑफ प्रॉपर्टी ॲक्ट' ( भूस्वामित्वांतर कायदा, १८८२ ), 'नीगोशिएबल इन्स्ट्रुमेंट्स ॲक्ट' ( वेचनीय दस्तऐवज कायदा, १८८१ ), 'मर्चंट शिपिंग ॲक्ट' ( व्यापारी नौकानयन कायदा ), 'दि सेल ऑफ गुड्स ॲक्ट' ( मालविक्रीचा कायदा, १९३० ) हे कायदे मंजूर झाले. त्यांत मूळ कराराच्या कायद्यांतलीं सर्वमान्य तत्त्वें कायम ठेवून त्यांचा विस्तार केला आहे.

'भागीदारी' ( पार्टनरशिप् ) याचा अर्थ, जे इसम एखादा धंदा करून त्यांत होणारा नफा आपसांत वांटून घेण्याचा करार करून धंदा करतात, तो भागीदारीचा धंदा होय. अशा इसमांना सामुदायिकपणें 'फर्म' ( मंडळ ) असें म्हणतात. अशी फर्म 'रजिस्ट्रार ऑफ फर्म्स' या सरकारी अधिकाऱ्याकडे अर्ज करून नोंदवून घ्यावी. जी 'फर्म' या कायद्याप्रमाणें नोंदली नसेल, त्या फर्मच्या भागीदाराला फर्मविरुद्ध किंवा भागीदाराविरुद्ध कोर्टांत दावा लावतां येणार नाहीं. तसेंच त्या फर्मला एखाद्या तिऱ्हाईत इसमाविरुद्ध फर्मच्या व्यवहाराबाबत कोर्टांत दावा लावतां येणार नाहीं ( कलम ६९ ). हें फार महत्त्वाचें कलम आहे, कारण या कलमामुळें प्रत्येक फर्म व्यावहारिक दृष्ट्या रजिस्टर करणें आवश्यक आहे.

**भागीरथी**—हिमालयांतील गंगेच्या मुख्य उगमास व मुर्शिदाबाद जिल्ह्यांतून जो एक गंगेस फांटा फुटतो त्यास भागीरथी हें नांव दिलें आहे. भागीरथीस हिंदू लोक फार पवित्र मानतात. प्राचीन काळीं तिच्या कांठीं गौर, पडुआ, राजमहाल व नवद्वीप हीं गांवें होतीं. भागीरथीचा प्रवाह गाळ सांचून बुजल्यासारखा झाला आहे. ह्या नदीच्या कांठचीं मुख्य शहरें मुर्शिदाबाद, जिआगंज, जंगीपूर, बहरामपूर, काटवा व नवद्वीप हीं होत. गंगा नदी पाहा.

**भाजीपाला**—अन्नामध्यें भाजीपाल्याला फार महत्त्व आहे. त्यांत आवश्यक जीवनसत्त्वें असतात व त्यांमुळें बरेच रोग बरे होत असतात. भाजीचा मळा करण्यास जमीन फार उत्तम नको पण अगदीं हलकीहि चालणार नाहीं. इमारतीचा चुना, रोडे, कपऱ्या, वगैरे पडलेल्या जमिनींत भाजीपाला चांगला येणार नाहीं. उत्तम जमीन थंड असते; तींत मुळांचा शिरकाव होत नाहीं. म्हणून भाजी जोरानें वाढत नाहीं. उत्तम भाजीची जमीन म्हणजे तांबूस काळसर रंगाची, थोडी चुनखडी असलेली, भुसभुशीत राहणारी, पाण्याचा निचरा होण्यास योग्य अशा प्रकारची असावी. नदीकांठच्या पोयट्याच्या जमिनींत भाजी उत्तम प्रकारची होते. अशा जमिनींत खताची विशेष जरूर नसते. पोयटा, गाई-म्हशींचें शेण, बकऱ्यांच्या लेंड्या, जनावरांचें मूत, घरांतील केर, राखुंडा हीं खतें विहिरीच्या पाण्यावरील भाजीपाल्यास उत्तम.

भाज्यांचे वर्ग— (१) कंदमुळें भाज्या— कांदा, गाजर, बटाटा, मुळा, वगैरे; (२) पालेभाज्या— अळू, आंबाडी, चाकवत, चुका, पोकळा, वगैरे; (३) फुलभाज्या— अगस्ता, केळफूल, शेवगा, कालीफुलवर, वगैरे; (४) फळभाज्या— पडवळ, भेंडी, भोपळा, वांगीं, फणस, तोंडली, घोसाळी, इत्यादि; (५) शेंगभाज्या— गवार, घेवडा, शेवगा, वगैरे; (६) बींभाज्या— वाल, चवळी, मूग, वाटाणा, मसूर, मटकी, हुलगा, वगैरे.

ताज्या भाज्या फार औषधी, गुणकारी असतात. त्यांत बरींच जीवनसत्त्वें असतात. भाज्यांचा रस रोग्याला मुद्दाम देण्यांत येतो. हिंदुस्थानांत पांढरपेशांत शाकाहारी बरेच असल्यानें त्यांच्या जेवणांत भाज्यांचें प्राधान्य असतें.

**भाजें**—मुंबई, पुणें जिल्हा, मावळ तालुका, एक खेडें. लोणावळ्याजवळील मळवली स्टेशनापासून हें २ मैलांवर आहे. येथें बौद्धांचीं १८ लेणीं आहेत. यांचा काल खि. पू. दुसरें शतक असावा. कार्ल्याच्या लेण्यांप्रमाणेंच यांत चैत्य व स्तूप आहेत.

**भाट**—ही जात उत्तर हिंदुस्थान, मध्यप्रांत, वऱ्हाड, मुंबई, बंगाल, आसाम, इत्यादि ठिकाणीं आढळून येते. लो. सं. (१९११) ३,६४,८६२. भाट हा शब्द संस्कृत भट्ट या शब्दापासून झाला असावा असें दिसतें. ब्राह्मण स्त्री व क्षत्रिय यांच्यापासून भाटांची उत्पत्ति झालेली असावी, असें कांहींचें म्हणणें आहे. तर वैश्य पुरुष व क्षत्रिय स्त्री यांच्यापासून भाटांची उत्पत्ति झालेली असावी असें दुसऱ्या कांहींचें म्हणणें आहे. आपल्या आश्रयदात्यांचें गुणवर्णन करणें, व त्याच्या वंशाचा इतिहास लिहिणें, हीं त्यांचीं मुख्य कामें होत. पूर्वी प्रत्येक राजाजवळ एक तरी भाट असे व त्याचें काम राजाची व त्याच्या पूर्वजांची स्तुति गाणें हें असे. स्पष्टवक्तेपणा हा भाटाचा प्रमुख सद्गुण अगर दुर्गुण होता त्यामुळें राजे लोकहि त्यांना वचकून असत. स्वामिनिष्ठा, विश्वासूपणा व प्रामाणिकपणा हे गुण त्यांच्या अंगीं प्रामुख्यानें वसत असत. पूर्वी भाट हे परदरबारचे वकील असत. यामुळें राजदरबारीं भाटांना फार मान असे. राजाकडून विडा घेण्याचा मान भाटांना मिळत असे.

ब्राह्मणांप्रमाणेंच भाटांमध्येंहि उपनयनादि सर्व संस्कार करण्याची पद्धत असे. प्रत्येक भाटाच्या हातांत भाला व कमरेस कट्यार हीं असावयाचींच. पूर्वी भाटांना राजे लोकांकडून मोठमोठ्या देणग्या व इनामें मिळत असत. पृथ्वीराजाच्या पदरीं असलेला प्रख्यात भाट म्हणजे चंदभाट (पाहा) होय. गंगाभाट हा अकबराच्या पदरीं होता. शिवाजीच्या पदरीं भूषणभाट असे. (भूषणकवि पाहा.) याशिवाय बडोदा संस्थानांतील साळबाईचा धीरोभगत, नडीयादमधील संदसरचा प्रीतमदास, खेडामधील डाकोरचा थोमन बारोट हेहि प्रसिद्ध भाट होऊन गेले.

गुजराथेंत बरोट ही एक भाटांचीच जात आहे. ब्रह्मभाट म्हणून दुसरी एक अशीच जात आहे. बरोटांना राव ही पदवी लावण्यांत येते. ते जुनीं ऐतिहासिक गाणीं म्हणतात. रजपूत राजे व धनिक हे यांचे आश्रयदाते होत. यांच्या वहींत वंशावळी सांपडतात व त्या कायद्याच्या कामींहि उपयोगी पडतात. पूर्वी यांना हमी म्हणून ठेवीत असत; व अटी न पाळल्या गेल्यास हे त्रागा करीत किंवा 'धरणें' धरून बसत.

युरोपांत प्राचीन केल्टिक लोकांत वीर पुरुष आणि राजेरजवाडे यांचीं पराक्रमाचीं कृत्यें सारंगीसारख्या वाद्यावर वाजवून गाऊन उपजीविका करणारांचा एक वर्ग असे. खि. पू. २ ऱ्या शतकापासून यांचें अस्तित्व शोधतां येतें. गालिक भाटांची लोकप्रियता प्रसिद्ध आहे. इ. स. ६ व्या शतकापासून वेल्श भाटांची नामावली सांपडते. इंग्लंडच्या पहिल्या एडवर्ड राजानें राज्यद्रोहाच्या संशयावरून सर्व वेल्श भाटांना फांसावर लटकाविलें. आयर्लंडमध्येंहि भाटांचा वर्ग असे. त्यांतील कांहीं वंशावळी आणि घराण्यांचे इतिहास गाऊन दाखवीत, कांहीं शास्त्रविधिनियम गात तर कांहीं वीरांचीं वर्णनें सांगत. स्कॉटलंडच्या हायलंड्स भागांतील भाटांचा परिचय सर वाल्टर स्कॉटनें करून दिलेलाच आहे. स्कॉटिश भाटकाव्याचे बरेच अवशेष आजहि उपलब्ध आहेत.

**भाटवडेकर, सर भालचंद्र कृष्ण** (१८८५–१९२०)— हे मुंबईचे एक प्रागतिक पुढारी व डॉक्टर होते. १८८५ पासून वैद्यकी व्यवसाय करीत. शिक्षण मुंबईस एल्फिन्स्टन हायस्कूल व ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें झालें. १८९७–९९ व १९०१ सालीं मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सभासद होते. तसेंच इम्प्रूव्हमेंट ट्रस्टचे सभासद व इंडियन टेंपरन्स असोसिएशनचे अध्यक्ष व टेंपरन्स कौन्सिलचे सभासद होते. १९०७ सालीं भरलेल्या १४ व्या मुंबई प्रांतिक परिषदेचे ते अध्यक्ष होते. १९१२–१३ सालीं मुंबई विद्यापीठाच्या सिंडिकेटमध्येंहि होते.

**भाटिया, भाटे**—एक जात. यांची लो. सं. (१९११) ५९,००६ असून त्यांत हिंदू, शीख, यांच्याप्रमाणें मुसलमानहि (५११२) आहेत. यांची जास्त वस्ती मुंबई इलाख्यांत व त्यांतहि मुख्यत्वें कच्छ-काठेवाडांत आहे. गझनीकर महंमुदाच्या वेळीं भेडा अथवा भाटिया येथें भाटियांचें एक राज्य होतें. त्यानंतरच्या मुसलमानांच्या स्वाऱ्यांमुळें ते कच्छकडे वळले असावेत (१३५०). काठेवाडामधून मग गुजराथ–मुंबईकडे हे लोक पसरले. यांचें ८४ नुख (गोत्रें) आहेत. हे लोक देखणे, हुशार व्यापारी, महत्त्वाकांक्षी, काटकसरी व अत्यंत व्यवहारी असतात. हे १६ व्या शतकांत वैष्णवपंथी व वल्लभा-

नुयायी झाल्यापासून मद्यमांसास बिलकुल शिवत नाहींत. यांचा मुख्य धंदा व्यापार व दलाली. मुंबईत यांच्यापैकीं पुष्कळ लोक स्थायिक झाले आहेत. कांहीं इराणच्या आखातावरील बंदरांत, झांझीबार, अरबस्तान, काबूल, जावा, चीन इकडेहि स्थायिक बनले आहेत. यांच्या बायका कशिदा काढण्यांत फार कुशल असतात. यांच्यांत पुनर्विवाह व घटस्फोट विहित नाहींत, परंतु अलीकडे हें बंधन शिथिल झालें आहे.

**भांडवलदार आणि मजूर**--समाजाच्या बाल्यावस्थेंत हे दोन वर्ग नसतच. ज्याचा तो भांडवलदार आणि मजूर. पुढें गिरण्या, कारखाने सुरू झाले तेव्हां हे दोन निराळे वर्ग स्पष्टपणें पडले व त्यांचे हितसंबंध विरोधी झाले. यामुळें मजुरांच्या हितासाठीं झटणाऱ्या मजूरसंघा(ट्रेड युनियन)सारख्या संस्था निर्माण झाल्या. कारखानदारांचें हित पाहणाऱ्याहि संस्था साहजिकच यामागून अस्तित्वांत आल्या (उदा०, मिल-ओनर्स असोसिएशन).

प्रथम मालक आणि मजूर यांमधील तंटे आपआपसांत तडजोड होऊन मिटत. त्यासाठीं मध्यस्थ संस्थाहि कांहीं असत. पुढें सरकारी मदत घेऊन मजुरांची उन्नति करण्याचे प्रयत्न होऊं लागले. कारखान्यांचे कायदे, तंटे मिटविण्यासंबंधीं कायदे, औद्योगिक न्यायालयें (इंडस्ट्रियल कोर्ट), मजूर विम्याचा कायदा, वगैरे गोष्टींनीं घरगुती आणि शेतीचे मजूर याखेरीज सर्व धंद्यांतलि मजुरांना चांगलें संरक्षण मिळालें. पहिल्या महायुद्धापासून मजूरसंघाच्या प्रतिनिधींना सरकारनें नेमलेल्या सल्लागार समितींतून कारखानदारांच्या जोडीनें स्थान मिळूं लागलें. मजुरांचें हित पाहण्यासाठीं एक स्वतंत्र मंत्री सरकारच्या कार्यकारी मंडळांत आला. याप्रमाणें राजशासनांत मजुरांचें वर्चस्व वाढत गेलें. धंद्यांतील भांडवलावर मालक आणि मजूर यांची जोडसत्ता असावी असे प्रयत्न चालू आहेत. राष्ट्रीय जीवनांतील एक भाग म्हणून औद्योगिक वाढीसाठीं व उद्योगधंद्यांत गुंतलेल्या सर्वांच्या सुधारणेसाठीं मालक आणि मजूर यांनीं सहकार्य करणें अत्यावश्यक आहे, अशा विचारानें संयुक्त औद्योगिक संघ अस्तित्वांत येत आहेत. या सहकार्यांत रशिया, जर्मनी व त्याखालोखाल ग्रेट ब्रिटन हे देश पुढें आहेत. नुकत्याच संपलेल्या महायुद्धामुळें तर मजुरांचा प्रश्न अगदीं प्रामुख्यानें सर्वांपुढें आहे.

**भांडवलशाही**—(कॅपिटॅलिझम). देशांतील उत्पादनाची एका विशिष्ट प्रकारची आर्थिक व्यवस्था, असा या शब्दाचा अर्थ आहे. भांडवलशाही याचा अर्थ असा कीं, आर्थिक उत्पादनाचीं सर्व साधनें म्हणजे कच्चा माल व पक्का माल तयार करण्याचीं सर्व यांत्रिक साधनें व कारखाने खाजगी व्यक्तींच्या मालकीचे असावेत आणि कच्च्या व पक्क्या मालाचें उत्पादन आणि त्या मालाची विभागणी म्हणजे तो माल गिऱ्हाइकाला विकण्याची व्यवस्था, या दोहोंवर भांडवलदारवर्गाची सर्व सत्ता व नियंत्रण असावें. या भांडवलशाही सत्तेचा उपयोग भांडवलदारांना जास्तींत जास्त नफा मिळावा या दृष्टीनें केला जातो. त्यामुळें या भांडवलदारांच्या हुकमतीखालीं काम करणारा मजूरवर्ग अत्यंत निर्दयपणें राबवला जातो; म्हणजे मजुरांकडून शक्य तितकें अधिक तास काम करून घेऊन, मजुरांना शक्य तितके कमी वेतन देण्यांत येतें, अशा तक्रारी निर्माण होऊन भांडवलशाहीला विरोधी असा संघटित मजूरवर्ग (प्रोलेटरिएट) प्रत्येक पुढारलेल्या राष्ट्रांत निर्माण झाला.

या भांडवलशाही उत्पादनव्यवस्थेला समाजसत्तावादी विद्वानांनींहि उच्च तात्त्विक भूमिकेवरून विरोध सुरू केला. सोशॅलिस्ट पक्षाच्या विद्वान् पुढाऱ्यांनीं असें प्रतिपादन केलें कीं, देशांतील सर्व जमीन आणि पक्का माल तयार करणारे सर्व कारखाने यांवरील खाजगी मालकांची सत्ता सरकारी कायद्यानें नष्ट करून सर्व जमीन व सर्व कारखाने राष्ट्रांतील सरकारच्या मालकीचे करावे आणि सर्व उत्पादनाची व्यवस्था सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें सरकारनें चालवावी. शेतजमीन आणि कारखाने खाजगी मालकीचे असल्यामुळें मालक आणि मजूर यांच्यामध्ये फार तंटेबखेडे निर्माण होतात आणि त्यामुळें देशांत अशांतता व बेबंदशाही माजते.

उलट पक्षीं भांडवलदार व मालकवर्ग यांची कैफियत अशी कीं, खाजगी मालकी असल्यामुळें प्रत्येक धंद्यांत स्पर्धा सुरू होऊन त्या धंद्याची चांगली वाढ होते. उलट पक्षीं खाजगी मालकी नष्ट करून सर्व कारखाने व उद्योगधंदे सरकारी नियंत्रणाखालीं सरकारी नोकरवर्गानें चालवल्यास स्पर्धेमुळें होणारी वाढ व खाजगी मालकांना आपल्या उद्योगधंद्यांबद्दल वाटणारा जिव्हाळा समाजसत्तावादी व्यवस्थेंत कधींहि उत्पन्न होणार नाहीं. या कैफियतीला सोशॅलिस्ट पक्षाचें उत्तर असें कीं, आपसांत स्पर्धा करणारा संख्येनें फार मोठा असलेला भांडवलदारवर्ग अलीकडील यांत्रिक युगांत संख्येनें कमी कमी होत जाऊन आतां प्रत्येक देशांत बडेबडे भांडवलदार संख्येनें अगदीं थोडे राहिले आहेत व त्यांनीं आपला एक गट बनवल्यामुळें पूर्वींप्रमाणें त्यांच्यामध्यें स्पर्धा चालू नसून सदर भांडवलदारांचा वर्ग राष्ट्रांतील आर्थिक जीवनावर अप्रत्यक्षपणें पूर्ण नियंत्रण ठेवूं शकतो. त्यामुळें राष्ट्राची आर्थिक बाब ही या भांडवलदारांची ‘मोनापोली’ झाली आहे. या आक्षेपाला सांप्रतच्या भांडवलवर्गाचें उत्तर असें कीं, उत्पादनाचीं सर्व साधनें राष्ट्राच्या मालकीचीं करण्याऐवजीं सर्व कारखाने आणि शेतजमिनीची उत्पादनव्यवस्था भांडवलदारांच्या आणि कामगारांच्या पुढारीवर्गाच्या हातीं देण्यांत यावी; म्हणजे

स्पर्धेच्याऐवजीं एकमेकांच्या सहकारितेनें राष्ट्राच्या उत्पादनांत चांगली वाढ होईल. या नव्या भांडवलदारवर्गाला उत्पादनांच्या साधनांची समाजसत्तावाद्यांची योजना मान्य नाहीं. वर लिहिल्याप्रमाणें भांडवलदार व मजूर यांच्या सहकारितेनें उत्पादनाची सर्व व्यवस्था चालवून जो नफा होईल तो सर्व भागीदारांनीं वांटून घ्यावा म्हणजे नफ्याची वांटणी मजूरवर्गालाहि मिळेल.

**भांडारकर, रामकृष्ण गोपाळ** ( १८३७-१९२५ )— महाराष्ट्रांतील एक सुप्रसिद्ध संशोधक, समाजसुधारक व संस्कृत पंडित. यांचा जन्म रत्नागिरि जिल्ह्यांतील मालवण येथें झाला. यांचें शिक्षण मालवण, राजापूर, रत्नागिरि व मुंबई येथें झालें. १८६३ सालीं ते एम्. ए. होऊन प्रथम सिंध हैदराबाद व रत्नागिरि येथील शाळांत हेडमास्तर म्हणून त्यांनीं काम केल्यावर १८६८ सालीं

एल्फिन्स्टन कॉलेजांत त्यांस संस्कृतचे असिस्टंट प्रोफेसर नेमलें. १८७४ मध्यें त्यांनीं सार्वदेशीय प्राच्य विद्या परिषदेपुढें नाशिक येथील लेण्यांवरील निबंध पाठविला. त्यामुळें त्यांची वाहवा झाली. १८७९ सालीं त्यांस सरकारनें प्राचीन इतिहासाचे संशोधक नेमलें व त्याच वर्षी त्यांस डेक्कन कॉलेजमधील संस्कृत प्रोफेसरची जागा मिळाली. १८८६ सालीं व्हिएन्ना येथील प्राच्य विद्या परिषदेस ते हजर राहिले. ते मुंबई विश्वविद्यालयाचे व्हाइस चान्सेलर होते. त्यांस गॉटिंजन व एडिंबर्ग या युनिव्हर्सिट्यांनीं पीएच्. डी. व एल्एल्. डी. या पदव्या दिल्या व अनेक देशांतील विद्वत्संस्थांनीं सन्मान्य सभासद करून घेतलें. ब्रिटिश सरकारनें त्यांस के. सी. आय्. ई., सी. आय्. ई. या पदव्या दिल्या. त्यांच्या वयास ८० वर्षें पूर्ण झाल्यावर त्यांच्या शिष्यांनीं एक 'गौरव-ग्रंथ' त्यांस अर्पण केला व त्यांच्या नांवानें पुण्यास 'भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर' काढलें. भांडारकरांनीं अनेक विषयांवर संशोधक निबंध लिहिले ते अनेक नियतकालिकांत छापले आहेत. याशिवाय मालतीमाधव वगैरे संस्कृत ग्रंथांवर त्यांनीं टीका लिहिल्या आहेत. तसेंच त्यांनीं दोन संस्कृत क्रमिक पुस्तकें लिहिलीं आहेत. 'अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन' व 'वैष्णविझम् अँड शैविझम', 'पीप इंटु दि अर्ली हिस्टरी ऑफ इंडिया', इत्यादि त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. हे मोठे समाजसुधारक व प्रार्थना समाजाचे एकनिष्ठ अनुयायी व आधारस्तंभ होते. यांचें २४ ऑगस्ट १९२५ रोजीं देहावसान झालें. यांचा स्तूप पुण्यांतील प्रार्थना समाजांत बांधला आहे.

**भाडें**—जमीन, घर व इतर इमारत वापरण्याबद्दल त्या घरांतला भाडेकरी किंवा शेतजमिनीचें कूळ मालकाला जो वार्षिक मोबदला म्हणून पैका किंवा धान्य देतात त्याला खंड किंवा भाडें म्हणतात. हें भाडें किंवा खंड किती असावा याचा सामान्य नियम असा आहे कीं, इमारत बांधण्याला आणि जमिनीची सुधारणा करण्याला जो खर्च झाला असेल, त्या भांडवलावर सामान्य दरानें होणारें व्याज आणि ती जागा-जमीन वापरण्याबद्दल कांहीं मोबदला इतकें भाडें किंवा खंड असावा. जमिनीचा खंड ठरवितांना जमिनीचा सुपीकपणा आणि तिची परिस्थिति लक्षांत घ्यावी लागते. शिवाय जमिनीचें क्षेत्र कायमचें ठरलेलें आहे. इतर जिनसांप्रमाणें जमिनीची निर्मिति वाटेल तितकी करतां येण्यासारखी नाहीं. त्यामुळें जमिनीची किंमत आणि खंड यांत फेरबदल पुष्कळ होऊं शकतो. जमिनीला मागणी पुष्कळ असेल तर किंमत किंवा खंड अधिक येतो आणि याप्रमाणें एखाद्या जमिनीची इतर सामान्य जमिनीपेक्षां जी विशेष अधिक किंमत किंवा अधिक खंड मिळतो त्याला अर्थशास्त्रांत अनार्जितवृद्धि ( अनूअर्न्ड इन्क्रिमेंट ) म्हणतात. लोकसंख्या वाढली आणि समाजाची सुधारणा झाली म्हणजे लोकवस्तीच्या ठिकाणांतील आणि ठिकाणानजीकच्या जमिनींची किंमत फार वाढते, आणि अशा अचानक प्राप्तीवर विशेष कर बसवावा असें सुचविलें जातें. जमिनीचा खंड कमीजास्त घेण्याचा मालकाला जो हक्क असतो, त्यामुळें सर्वसामान्य समाजाचें असें हित होतें कीं, जमिनीची उपयुक्तता किंवा सुपीकपणा जास्तींत जास्त वाढत असतो.

**भाडेखरेदी पद्धति**—( हायरपरचेस सिस्टिम ). अलीकडे एखादी वस्तु हप्त्याहप्त्यांनीं किंमत देऊन विकत घेण्याची पद्धति बरीच प्रचारांत येत आहे. या पद्धतीनें मोटरगाडी, ग्रामोफोन, घरगुती सामान, रेडिओ, वगैरेसारख्या घरगुती वस्तू घेण्यांत येतात. एवढेंच नव्हे तर कारखान्यांतील यंत्रें वगैरेहि याच पद्धतीनें घेण्याची प्रथा पडत चालली आहे. सामान्यतः मोटारींपैकीं व घरगुती सामानापैकीं निम्मे व्यवहार या पद्धतीनें होतात. तसेंच दागदागिने जवाहीर, वगैरेचे व्यवहार शेंकडा दहा टक्के या पद्धतीनें करण्यांत येतात.

या पद्धतीमध्यें माल विकत घेणाऱ्यास थोडीशी रक्कम ठेव म्हणून ठेवल्यावरोबर वस्तूचा तावडतोब उपयोग करून

घेतां येतो व बाकीची किंमत हळूहळू हप्त्यांनीं देतां येते. या पद्धतीचा उपयोग नीट केल्यास ही पद्धति खरोखरच फार उपयुक्त आहे. परंतु या पद्धतीमुळें थोडी रक्कम ठेव म्हणून ठेवून तावडतोब वस्तु मिळत असल्यामुळें आपल्या ऐपतीपेक्षां जास्त जबाबदारी घेण्याचा मोह मनुष्याला होण्याचा संभव असतो. कधीं कधीं विकत घेणारा मनुष्य आजारी पडतो, किंवा त्याचा धंदा नीट चालत नाहीं, किंवा त्याची नोकरी जाते व अशा वेळीं त्यास पुढील हप्ते देतां येत नाहींत व त्यामुळें वस्तु जप्त होऊन तिचे दिलेले हप्ते फुकट जातात.

या व्यवहारासंबंधीं करावयाच्या करारामध्यें विक्रेता आपला माल ग्राहकास कांहीं मुदतीपर्यंत ठराविक भाड्यानें देतो. जर ग्राहकानें भाड्याचे सर्व हप्ते वेळेवर देऊन इतर सर्व अटी पाळल्या तर त्यास ती वस्तु विकत घेण्याचा हक्क प्राप्त होतो व अखेरीस विकत घेण्याची किंमत नाममात्र असते. ग्राहक हा केव्हांहि झालेल्या मुदतीचें भाडें देऊन ती वस्तु परत करावयास मोकळा असतो; तसेंच उरलेले हप्ते एकदम देऊन ती वस्तु विकत घेण्याची त्यास सवलत असते; परंतु कोणतीहि अट मोडल्यास दिलेले हप्ते भाडें समजून ती वस्तु परत घेण्याचा हक्क विक्रेत्यास असतो. त्याशिवाय त्या वस्तूची किंमत कमी झाली असल्यास किंवा नुकसानी झाली असल्यास त्यास नुकसान मागण्याचाहि हक्क असतो.

अखेरचा हप्ता दिला जाईपर्यंत वस्तु विक्रेत्याच्या मालकीची असते व ग्राहक ती वस्तु विकूं शकत नाहीं, अगर गहाण ठेवूं शकत नाहीं. तसा त्यानें प्रयत्न केल्यास मूळ करार तावडतोब रद्द होतो. ग्राहकानें मोटर वगैरे वस्तु आडगिऱ्हाइकी घेण्याच्या कामीं या बाबतींत फार काळजी घेतली पाहिजे. अशा वस्तू घरमालकाला भाड्याच्या बाकीकरितां जप्त करतां येतात. विक्रेत्यास जरी हप्ता थकल्यास वस्तु ताब्यांत घेऊन दिलेले हप्ते भाडें म्हणून घेण्याचा हक्क असला तरी कांहीं बाबतींत ग्राहकास थोडीफार सवलत देण्यांत येते, व त्यापैकीं कांहीं भाग परत देण्यांत येतो. अशा मालाबरोबर विम्याची पॉलिसी देण्याचा कांहीं व्यापाऱ्यांचा प्रघात असतो. अशा बाबतींत ग्राहक मध्यंतरींच मेल्यास विम्यांतून रक्कम दिली जाऊन वस्तु त्याच्या घरींच राहते.

**भाडेंचिठ्ठी**—एखाद्याची स्थावर मिळकत कांहीं मुदतीपर्यंत भाड्यानें घेतांना भाडेकऱ्यानें त्याला (मालकाला) लिहून दिलेला करार. यांत मिळकतीचें वर्णन, भाड्याची मुदत, भाड्याचा आकार, व त्यासंबंधीं अटी व मिळकतीच्या उपभोगासंबंधीं मालक आणि भाडेकरी यांमध्यें ठरलेल्या शर्ती या सर्वांचा सविस्तर उल्लेख करावा लागतो. ही भाडेंचिठ्ठी एक वर्षापेक्षां अधिक मुदतीची असेल तर ती सरकारांत नोंदवावी लागते. ही भाडेंचिठ्ठी मालकाजवळ राहते व मालक याची नक्कल भाडेकऱ्याला करून देतो. म्हणजे दोघांजवळ लेखी पुरावे राहतात.

**भाण**—हा संस्कृत नाटकाचा प्रकार प्राचीन आहे. परंतु त्या प्रकारचीं बहुतेक नाटकें अर्वाचीन आहेत. हल्लीं प्रचलित असलेले सर्व भाण दक्षिण हिंदुस्थानांत लिहिलेले आहेत. कारण हा नाटकाचा प्रकार तिकडे बराच लोकप्रिय झालेला दिसतो. सर्व भाणांचीं बाह्य व अंतःस्वरूपें जवळजवळ सारखीं असतात. या तऱ्हेच्या कांहीं नाटकांची मोडणी एकदां लक्षांत आली म्हणजे तीवरून या जातीच्या सर्व नाटकांची सहज अटकळ करतां येण्यासारखी आहे. ज्यांनीं भाण लिहिले त्यांनीं अन्य तऱ्हेचींहि नाटकें लिहिलीं असल्यामुळें आतांपर्यंत बऱ्याच भाणकारांचा नामनिर्देश केला गेला आहे.

चौदाव्या शतकाच्या शेवटीं व पंधराव्या शतकाच्या प्रारंभीं पार्वतीपरिणयाचा कर्ता वामनभट्टबाण यानें 'शृंगारभूषण' नांवाचा एक भाण लिहिला. तसेंच सतराव्या शतकाच्या शेवटीं व अठराव्या शतकाच्या प्रारंभीं होऊन गेलेला जानकीपरिणय नाटकाचा कर्ता तंजावरचा कवि रामभद्र दीक्षित यानें एक 'शृंगारतिलक' नांवाचा भाण लिहिला आहे. रामभद्राचा शिष्य रघुनाथ याच्या सांगण्यावरून हा भाण मीनाक्षीपरिणयमहोत्सवाकरितां मदुरा येथें लिहिण्यांत आला होता. रामभद्राचा समकालीन यतिराजविलासाचा कर्ता वैष्णवगुरु वैष्णवाचार्य ऊर्फ अम्मालाचार्य यानें 'वसंततिलकभाण' व 'चोलभाण' असे दोन भाण लिहिले आहेत. 'वसंततिलकभाण' यास अम्मातिलकंभाण असेंहि म्हणतात.

सुभद्रापरिणय कर्त्याचा समकालीन नल्लकवि याचा 'शृंगारसर्वस्व' या नांवाचा भाणहि अशाच प्रकारचा आहे. त्यानें आपला मित्र वैद्यनाथ दीक्षित याच्या सांगण्यावरून आपल्या वयाच्या २० व्या वर्षाच्या आंतच सदरहू नाटक व सदरहू भाण लिहिला असे म्हणतात. या भाणांत अनंगशेखर हा नायक असून, त्याची व जिची ताटातूट झाली अशी त्याची कनकलता नांवाची प्रियतमा नायिका आहे. बाकी इतर मजकूर इतर भाणांप्रमाणेंच आहे. यांतील नवीन प्रकार म्हटला म्हणजे एक मदोन्मत्त हत्ती मोकळा सुटला असल्यामुळें रस्त्यांतील सर्व लोकांची दाणादाण झाली आहे. भाणांतील नायक त्याला गणेश समजून त्याची आराधना करतो व तूं शिवाचा दूत आहेस त्या अर्थीं माझ्या सर्व कामना पूर्ण करण्यास मदत कर अशी त्यास विनंति करितो, तेव्हां हत्ती त्यास प्रसन्न होतो व अखेर त्याची व कनकलतेची गांठ पडते.

'रससदन' भाणांतील मजकूर इतरांपेक्षां थोडा निराळा आहे. त्याचा कर्ता आपणास युवराज म्हणवितो. तो केरळ प्रदेशांतील कोटिलिंग या गांवचा रहिवासी. आनंदतिलकभाण याचा कर्ता कोण होता हें कळत नाहीं. अनेक भाणांच्या नांवांत मदनवाचक शब्द आढळतो. उदा., 'अनंगसर्वस्व', 'अनंगविजय', 'कंदर्पदर्पण', 'कुसुमबाणविलास', 'मदनभूषण', 'पंचायुधप्रपंच', इ. इ. कांहीं भाणांच्या नांवाचा शृंगार या पदानें आरंभ होतो; उदा., शृंगारमंजरी, शृंगारपावन, शृंगारराजतिलक, शृंगारसर्वस्व, इत्यादि. अनेक भाणांच्या हस्तलिखित प्रती हल्लीं उपलब्ध आहेत.

मिश्रभाण हा भाणाचाच एक प्रकार आहे. या प्रकाराचा मिश्रभाण एकच प्रसिद्ध झाला आहे व तो काशीपति कविराज याचा 'मुकुंदानंद' भाण हा होय. या कविराजानें संगीतरत्नाकरावरहि टीका लिहिली आहे. मुकुंदानंद भाणामध्यें भुजंगशेखर हा नायक असून तो मुकुंदाचें म्हणजे कृष्णाचें रूप घेतो. या भाणांत कृष्णचरित्र म्हणजे गोपीसहवर्तमान केलेल्या क्रीडा यांचें वर्णन आहे. यावरून मिश्रभाण हें नांव दोन अर्थीनीं दिलें आहे हें समजून येईल. 'शृंगाररसोदय' या नांवाचा दुसरा एक मिश्रभाण आहे. त्याचा कर्ता राम सुकविशेखर अथवा लिंगमगुंटमराम हा होता.

**भात**—[ वर्ग-ग्रामिनासी. ओरिझा साटिव्हा ]. एक तृणवर्गांतील वनस्पति. हें पूर्वेकडील देशांत खाद्य अन्न म्हणून फार प्राचीन काळापासून प्रचारांत होतें. तेथून तें ईजिप्त व ग्रीस देशांत गेलें. सध्यां त्याची लागवड सर्वत्र फार मोठ्या प्रमाणावर होते. भाताचें रोप १ ते ६ फूट उंच वाढतें. तें एकवर्षायु सरळ वाढणारें, साधें, वाटोळें आणि पेरांनीं युक्त असें असतें. याचीं पानें लांब, ताठ व टोंकदार असतात, व तीं लांब, वाटोळया पन्हाळासारख्या आवरणांतून बाहेर येतात. याला चवरीसारखे तुरे येतात. याचें बीं पांढरें व लांबट असतें, पण त्याचा आकार निरनिराळया जातींत निरनिराळा असतो.

ईजिप्त देशांत नाइल नदीचा पूर ओसरून गेल्यावर त्या मळींत भाताचें पीक काढतात. चीन देशांत अशाच तऱ्हेच्या नदीच्या मळींत भाताचीं दोन पिकें काढतात. पहिलें मे महिन्यांत येतें व दुसरें ऑक्टोबर-नोव्हेंबरमध्यें मिळतें. हिंदुस्थानांतहि विशेषतः बंगालमध्यें त्याच जागीं भाताचीं दोन पिकें काढण्यांत येतात. हिंदुस्थानांत ८,००० फूट उंचीवर डोंगरी भात पिकविण्यांत येतें. तें जरा कमी नाजूक असतें. भात कांडून त्याचे तांदूळ करतात. सर्व जगामध्यें इतर धान्यापेक्षां तांदूळ अधिक प्रमाणांत खाण्यांत येतो, पण त्यांत नत्रयुक्त द्रव्याचें प्रमाण फक्त ७ टक्के असतें. युरोपमध्यें पूर्वेकडील देशांतून तांदूळ जातो. तांदूळ कुजवून त्यापासून जपानमध्यें साकी, व पूर्वेकडील देशांत अरक नांवाचीं मद्यें तयार करण्यांत येतात. तांदुळापासून पिष्ठसत्त्व करण्यांत येतें व त्याच्या पेंढ्याचे दोर करण्यांत येतात. तांदूळ पाहा.

हिंदुस्थानांत बंगाल, बिहार, ओरिसा व मद्रास या भागांत फार भात पिकतें. सुमारें सात कोटी एकरांवर जमीन हिंदुस्थानांत भाताखालीं असून सु. तीन कोटी टन भात निघतें. हिंदुस्थानांत पिकतो त्यापेक्षां जास्त तांदूळ लागतो. पूर्वीं ही तूट ब्रह्मदेशांतून तांदूळ येऊन भरून निघत असे. आतां आयात फारशी होत नसल्यानें अडचण भासते. शास्त्रीय पद्धतींनीं भातावर प्रयोग करून अनेक प्रकार काढण्यांत आलेले आहेत.

जगांत १९४०-४१ सालीं सुमारें ९० कोटी क्विंटल भात पिकलें. चीन, हिंदुस्थान, नंतर जपान असा उत्पादनाचा अनुक्रम येतो. आशिया खंड हाच तांदुळाचा सर्वांत मोठा प्रदेश आहे. युरोपांत अगदींच थोडा तांदूळ होतो.

भाताच्या मुख्य २० जाती आहेत. दमट हवेंत व पाऊस पुष्कळ पडणाऱ्या व उष्ण हवेच्या प्रदेशांत भात पिकतें. लवकर तयार होणारें भात (तांदूळ) तांबड्या रंगाचें व उशीरां येणारें भात पांढऱ्या रंगाचें असतें. व्रीहि हा संस्कृत शब्द फार जुना असून त्याचा अपभ्रंश फारसी विरिंजी आहे व यावरून युरोपीय भाषांतील भाताचे वाचक शब्द निघाले. साध्या पेरणीचें पीक एकरीं १,८०० पौंड निघतें; व लावणीचें पीक २,८०० ते ३,२०० पौंड निघतें. दक्षिण कानडांत एका वर्षांत तीन पिकें, मद्रासकडे दोन पिकें, व बंगाल्यांत भाताचीं पांच पिकें काढतात. महाराष्ट्रापैकीं कोंकण व मावळ भागांत भाताचें एकच पीक निघतें; त्याच्या जाती: कमोद, आंबेमोहोर, कोळंबा, बोडकें, राजावळ, जिरेसाळ, चिमणसाळ, वगैरे बारीक तांदुळाच्या; भडस, पटणी, दोडका, किंजळ, कुडा, खुडा, वगैरे जाड्या तांदुळाच्या जाती आहेत. बंगाल व ब्रह्मदेश इकडे भातापासून पचवै नांवाची लक्षावधि रुपयांची दारू करतात. भाताच्या कोंड्यापासून रंग व पेंढ्यापासून कागद करतात. भाताच्या पेजेंत थोडा चुना टाकून गोंदासारखा चिकट पदार्थ करतात.

**भातखंडे, विष्णु नारायण** (१८७५-१९३६)—एक भारतीय संगीताचे अभ्यासक व ग्रंथकार. लहानपणापासूनच यांना संगीताचा नाद होता. सन १८९० मध्यें हे एलएल. बी. झाले व मुंबईस वकिली करूं लागले. रावजीबुवा बिडकर व जयपूरचे मुहम्मद अल्लीखाँ यांच्याजवळ यांनीं संगीताचें अध्ययन केलें. मुहम्मद अल्लीखाँ यांच्या तीनशें चिजांचें रेकॉर्ड यांनीं घेऊन ठेवलें आहे. 'हिंदुस्थान संगीत पद्धती' चे चार भाग लिहून त्यांत यांनीं सुमारें दोनशें चिजांची उत्कृष्ट माहिती करून

दिली आहे. याशिवाय यांनीं लिहिलेल्या संगीताच्या क्रमिक पुस्तकांत अनेक अप्रसिद्ध रागांची ओळख करून दिलेली आहे. सन १९१० मध्यें यांनीं 'लक्ष्यसंगीत' हा ग्रंथ लिहिला असून त्यांत यांनीं चतुर पंडित असें नांव घेऊन आधुनिक संगीत, उदाहरण व लक्षण अशा स्वरूपांत मांडलें आहे. संगीतावरील यांचा दुसरा महत्त्वाचा ग्रंथ 'अभिनवरागमंजरी' हा होय. ग्वाल्हेर व लखनौ येथें संगीत कॉलेज उघडण्याच्या कामीं यांनींच पुढाकार घेतला. भारतीय स्वरूपाच्या पांच संगीत परिषदाहि यांनीं भरवल्या.

**भांदक**—मध्यप्रदेश, चांदा जिल्हा, वरोडा तालुका, एक प्राचीन स्थान. याला भद्रावती पारसनाथ असेंहि म्हणतात. ही वाकाटकांची राजधानी होती. जुन्या असंख्य देवळांचे व वास्तूंचे अवशेष येथें दिसतात. येथील भद्रनागाचें देऊळ अतिशय प्रसिद्ध आहे. देऊळ नवेंच पण जुन्या अवशेषांच्या साधनांनीं उभारलें आहे. गांवाच्या पूर्वेस एक तळें आहे. त्यांत जें बेट आहे त्याला जाण्याला रस्ता म्हणून एक मोठा पूल जुन्या काळींच बांधलेला आहे. त्याची लांबी १३६ फूट व रुंदी ७ फूट आहे. जवळच डोंगरांत एक बौद्ध लेणें आहे. त्याला मोठी ७१ फूट लांबीची सज्जासारखी वाट आहे. आंत मोठी बुद्ध मूर्ति आहे. हें लेणें इ. स. १ ल्या किंवा २ ऱ्या शतकांतील असावें.

**भानुदास** (शके १३७०–१४३५)—एक महाराष्ट्रीय संत व एकनाथस्वामीचा पणजा. हा सूर्याच्या प्रसादानें झाला म्हणून याचें भानुदास हें नांव पडलें. अध्ययन करतांना याचा बाप याच्यावर रागावला म्हणून हा घराच्या तळघरांत सात दिवस लपून राहिला व तेथें त्याला सूर्यानें दर्शन दिलें अशी आख्यायिका आहे. बापाच्या मरणानंतर त्यानें कापडविक्याचा धंदा मोठ्या नेकीनें सुरू केला, व त्यांत त्याला बराच फायदाहि झाला. पण पुढें तो धंदा सोडून देऊन भगवद्भजनांत सर्व काळ घालविण्यास त्यानें सुरुवात केली, त्यामुळें त्या वेळच्या साधुमंडळांत त्याची प्रामुख्यानें गणना होऊं लागली. हा दामाजीपंताचा समकालीन असून शक १३९०–९७ चा दुष्काळ त्यानें अनुभविला होता. याच्या घराण्यांत विठ्ठलभक्ति पूर्वापार होती. भानुदास पंढरीची आषाढी-कार्तिकी वारी करीत असे. अशी आख्यायिका आहे कीं, एकदां पंढरीचा विठोबा अनागोंदीस नेलेला पाहून भानुदास तिकडे गेला. तेथें देव भेटल्यावर देवाच्या गळ्यांतील नवरत्नांचा हार देवानेंच याच्या गळ्यांत घातला; पण त्यामुळें याच्यावर चोरीचा आळ येऊन सुळावर चढविण्याची शिक्षा झाली. तेव्हां सुळाला पानें फुटलीं. हा आत्यंतिक भक्तीचा चमत्कार पाहून रामराजानें विठ्ठलाची मूर्ति याच्याबरोबर पंढरीस पाठविली. याविषयीं भानुदासाचेच अभंग आहेत. तसेंच हंपी येथील विठ्ठल मंदिरांत आज मूर्ति नाहीं. भानुदासानें पुष्कळ अभंग रचिले. पण ते सर्व प्रकाशित नाहींत. याचा मुलगा चक्रपाणि– त्याचा सूर्यनारायण (एकनाथाचा पिता). एकनाथ पाहा.

**भाभा, होमी जहांगीर** (१९०९– )—एक सुप्रसिद्ध पारशी गणिती व शास्त्रज्ञ. मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेज व रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्स यांमधून विश्वविद्यालयीन अभ्यासक्रम संपवून गणित व विज्ञान यांच्या उच्च शिक्षणासाठीं केंब्रिजच्या गॉनव्हिल व कॉयस कॉलेजमध्यें यांनीं प्रवेश मिळवला. तेथून बी. ए. व गणिताची रौस बॉल ट्रॅव्हलिंग शिष्यवृत्ति मिळवून सन १९३४ सालीं हे पीएच्. डी. झाले. विज्ञानाचा विशेष अभ्यासक्रम हातीं घेऊन ऐझॅक न्यूटन शिष्यवृत्तिहि यांनीं मिळविली.

हिंदुस्थानांत आल्यावर १९४० सालीं यांना बंगलोरच्या इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्समध्यें सिद्धांतिक पदार्थविज्ञान (थिऑरेटिकल फिजिक्स) विषयाची स्पेशल रीडरची जागा देण्यांत आली. कांहीं दिवस हे विश्वकिरण संशोधन केंद्राचे (कॉस्मिक रे रीसर्च युनिटचे) प्राध्यापक म्हणूनहि होते. सन १९४५ मध्यें मुंबईच्या टाटा इन्स्टिटयूट ऑफ फन्डामेन्टल् रीसर्चमध्यें प्रमुख डायरेक्टर व सिद्धांतिक पदार्थविज्ञानाचे प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली.

विज्ञानशास्त्रांतील कणपुंजवाद (क्वॉन्टम थिअरी), प्राथमिक वैज्ञानिक परमाणूंचा सिद्धांत व विश्वकिरण–विसर्जन (कॉस्मिक रेडिएशन) या विषयांवर यांनीं अनेक महत्त्वपूर्ण लेख लिहिले असून या विषयांतील एक तज्ज्ञ म्हणून यांचा उल्लेख केला जातो. इंग्लंडच्या रॉयल सोसायटीचे फेलो होण्याचा मानहि यांना लाभला आहे.

**भामह** (सु. ६५०)—दंडीचा समकालीन ग्रंथकार. याचा बाप रक्रिलगोमिन्. गोमिन् या नांवावरून हा बौद्ध असावा असें वाटतें, परंतु या नांवाबाबत अजून विद्वानांत एकमत नाहीं. भामहाच्या काव्यालंकारांत न आढळणारीं अशीं बरींचशीं पद्यें वामनकाव्यालंकारसूत्रवृत्तीवरील कामधेनु या टीकेंत भामहाचीं म्हणून दिलीं असून त्यांत सूत्र, वृत्ति यांच्या व्याख्या व साहित्यशास्त्रावर विवरण आलें आहे. काव्यालंकारकर्ता भामह व वररूचीच्या प्राकृत व्याकरणावरील टीकाकार भामह यांच्या वृत्ती एकच होत्या कीं भिन्न होत्या हें अजून निश्चित नाहीं. भामहानें छंदशास्त्रावरहि लिखाण केलें असावें.

**भार धातु**—(बेरिअम. हें नांव जड-भार या अर्थाच्याच) ग्रीक शब्दावरून पडलें). अणुमान १३७·३७. विशिष्टगुरुत्व ३·७५. हा शुद्धस्वरूपांत सांपडत नाहीं. गंधित (सल्फेट बेरिटीस

किंवा कर्बित (कार्बोनेट) म्हणून हा निसर्गांत सांपडतो. बॅरिटा म्हणजे भारधातूचा प्राणिद (ऑक्साइड) हा धातु १८०८ सालीं डेव्हीनें म्हणून स्वतंत्र स्वरूपांत निराळा काढला. हा क्षार मृत्तिकेंतील धातु असून खट (कॅल्शियम) आणि स्त्रांत (स्ट्रॉंशियम) यांचा निकटचा संबंधी आहे. हा पिवळ्या रंगाचा असून ह्याचे पत्रे तयार करतां येतात. प्राणवायूबरोबर ह्याचा सहज संयोग होतो व त्यामुळें हा पाण्याचें पृथक्करण करूं शकतो. ८५०° शत.(सेंटि.)ला हा द्रवरूप होतो. भारनत्रित (बेरियम नायट्रेट) आणि भारहरित (बेरियम क्लोरेट) ह्यांचा शोभेची दारू तयार करण्यासाठीं उपयोग करतात. भारधातूमुळें निष्प्रभ ज्वालेला हिरवा रंग येतो. याचीं संयुक्तें विषारी असतात.

**भारंग**—हें झाड साधारणपणें ६ फूट उंच असतें व याचीं पानें मोहाच्या पानासारखीं व कात्रीदार असतात. कोंवळ्या पानांची भाजी करतात. तुरे रंगीबेरंगी असून त्यांचीहि भाजी चांगली होते. याचें पाळ औषधी आहे. तें घोणसाच्या, सर्पाच्या व उंदराच्या विषावर उगाळून पोटांत देतात. उचकीवर मुळाचें चूर्ण साखरेच्या पाकांत देतात. भाजीचें पाणी कृमिनाशक आहे.

**भारतचंद्र** (१७२२–१७६०)—या बंगाली कवीचा जन्म वसन्तपूरच्या एका जमीनदार घराण्यांत झाला. नरेंद्रनारायणाचा हा पुत्र. यानें ताजपूरच्या संस्कृत शाळेंत अध्ययन केलें. खालच्या ज्ञातींतील मुलीशीं आपल्या बापाच्या इच्छेविरुद्ध यानें विवाह केल्यानें यास आपल्या घरास पारखें व्हावें लागलें. हा कृष्णचंद्र मुनशीचा व नंतर फरासदंगचा इंद्रनारायण चौधरी याचा आश्रित होता. याची प्रभावी प्रतिभा जाणून नवद्वीपाचा राजा श्रीकृष्णचंद्र यानें यास दरमहा चाळीस रुपये वेतन करून दिलें. तसेंच सिवा राजानें यास 'रायगुणाकार' ही पदवी देऊन याचा गौरव केला व लहानशी जहागीर दिली. सन १७५२ मध्यें यानें लिहिलेल्या 'अन्नदामंगल' या ग्रंथानें बंगालमधील लोकांच्या मनाची चांगलीच पकड घेतली आहे. या ग्रंथाशिवाय यानें लिहिलेली रसमंजरी, चंडीनाटक व गानसंग्रह हीं पुस्तकेंहि सुप्रसिद्ध आहेत.

**भारती, सुब्रह्मण्य** (१८८२–१९२१)—तामिळ भाषेंतील एक प्रसिद्ध राष्ट्रीय कवि, लेखक, व वृत्तपत्रचालक. यांचे वडील पंडित असल्यामुळें यांना अल्पवयांतच कविता करण्याचा नाद लागला. यांच्या अपूर्व काव्यगुणामुळें लवकरच यांना 'भारती' हें गौरवदर्शक उपपद प्राप्त झालें. यानंतर यांचे वडील वारल्यामुळें बनारसला जाऊन यांनीं प्रवेशपरीक्षेपर्यंतचें शिक्षण घेतलें. त्याचबरोबर अनेक देशी व परदेशी भाषांचें अध्ययन या वेळीं यांनीं केलें.

यानंतर मदुरेच्या सेतुपति हायस्कूलमध्यें कांहीं काल शिक्षकाचा व्यवसाय केल्यावर हे सुब्रह्मण्यम् अय्यर यांच्या 'स्वदेशमित्रम्' या पत्राचे उपसंपादक झाले. पुढें यांनीं स्वतःच 'इंडिया' नांवाचें साप्ताहिक सुरू केलें. या पत्रांतील यांच्या सडेतोड, मर्मभेदक व प्रखर लिखाणामुळें हे सरकारच्या रोषास पात्र झाले व त्यामुळें यांना फ्रेंचांच्या पॉंदिचरीचा आश्रय घ्यावा लागला. अरविंद घोषांच्या सहवासामुळें उदात्त तत्त्वज्ञानाचा छंद यांना लागला व जिवंत राष्ट्रभावनेप्रमाणेंच यांच्या काव्यांतून तत्त्वज्ञानाचा ओघहि वाहूं लागला. कालिदास व शक्तिदास या नांवांनीं हे आपलें लिखाण करीत. १९१८ सालीं हे पुन्हां मद्रास प्रांतांत आले व अनेक आर्थिक आपत्तींना तोंड देत १९२० सालीं 'स्वदेशमित्रम्' चे संपादक झाले.

यांच्या लेखनाचे गद्य व पद्य असे दोन भाग पडतात. पद्याचे देश, देव व तत्त्वज्ञान असे, व गद्याचे चिकित्सा, भाषांतर, टिपण व सूक्ति असे भाग पाडलेले आहेत.

यांच्या स्मारकासाठीं चक्रवर्ती राजगोपालाचारीसारख्या थोर तामिळ पुढाऱ्यांनीं निधि जमविला. ॲटम बॉंचशीं यांच्या कवितेची तुलना करण्यांत येते. यांचें नांव अमर करणाऱ्या यांच्या कलाकृती यांच्या हलाखीच्या परिस्थितीच्या काळातच तयार झाल्या आहेत.

**भारद्वाज**—(कुक्कुडकुंभा). हा पक्षी साधारण कावळ्यांच्या आकाराचा आणि कोकिळेपेक्षां जरासा मोठा आहे. कोकीळ किंवा भारद्वाज हे एका वर्गांत मोडतात तरी ते अगदीं भिन्न आहेत. भारद्वाजाच्या आकाराच्या मानानें पंख लहान व पाय लांब असतात. त्याचें डोकें, अंग व शेपूट काळ्या रंगाचें असतें; पण त्याचे पंख तांबडसर व उदी रंगाचे असतात, व डोळे तांबडे असतात. साधारणपणें आंब्याच्या, लिंबाच्या दाट फांद्या असलेल्या एखाद्या झाडावर किंवा वेळूच्या बेटांत याची वस्ती असते. याच्या विशिष्ट प्रकारच्या 'हुट् हुट् हुट्' अशा आवाजावरून कुक्कुडकुंभा हें नांव दिलेलें आहे. हे पक्षी कळप करून हिंडत नाहींत. नर व मादी असें जोडपें मात्र हिंडतांना दिसतें. यांचें भक्ष्य निरनिराळ्या प्रकारचे कीटक असलें तरी क्वचित् प्रसंगीं पाली किंवा साप हे सोडीत नाहींत. याचें घरटें झाडाच्या पाला व फांद्या यांचें केलेलें असतें व तें एखाद्या मोठ्या चेंडूसारखें असून त्यांत जाण्याकरितां वरच्या बाजूला भोंक असतें. मादी चार पांढरीं अंडीं घालते. अंड्यांतून पिलें बाहेर आलीं म्हणजे लहानपणीं त्यांच्या काळ्या पंखांत पांढरे पट्टे असतात. पुढें ते नाहींसे होतात.

**भारवि**—एक प्रसिद्ध संस्कृत कवि. 'किरातार्जुनीयम्' हें एकच काव्य त्यानें केलें, पण यावरूनच तो महाकवि गणला गेला आहे. 'उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम्।' असें एक वचन आहे. भारवीच्या काव्यांत अर्थगौरव विशेष दिसून

येतो. त्याच्या काव्यांत वीर रस उत्तम रीतीनें रंगविलेला आहे. लढायांची तेजस्वी वर्णनें, राजनीतिविषयक प्रश्नांची चर्चा, स्वाभिमानाबद्दलचे उल्लेख, इत्यादि गोष्टींवरून तो राजदरबारी चमकला असावा. त्याच्या काव्यांत जागजागीं सुंदर उक्ती असून त्या सुभाषितें संस्कृत वाङ्मयांत रूढ झालीं आहेत. हा धारा नगरीचा असून बापाचें नांव श्रीधर होतें. बाप विद्वान् होता. भारवीची बायको भडोचची. तिनें याच्या काव्यांतील 'सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम्।' या श्लोकावर पसे मिळविल्याचें सांगतात. भारवीचा उल्लेख ऐहोळ शिलालेखांत प्रसिद्ध कवि म्हणून आहे. तेव्हां हा सहाव्या शतकांत होऊन गेला असावा.

**भारित**—(वारिटीज). अमेरिकन वारिटा. निसर्गांत सांपडणारा व भारगंधित (बेरियम सल्फेट) असलेला एक समचतुर्भुजी आकाराचा धातु. हा रंगानें पांढऱ्या शुभ्र रंगापासून पिंगट रंगापर्यंत असतो. विशिष्टगुरुत्व ४·५. पांढऱ्या शुभ्र जातीच्या रंगांत (व्हाइट लेड) सफेत्याच्याऐवजीं ह्याचा उपयोग होत असल्यामुळें ह्याला नेहमीं मागणी असते.

**भार्गव, डॉ. गोपीचंद** (१८८९- )—पंजाबचे एक पुढारी. यांचें शिक्षण लाहोर येथील मेडिकल कॉलेजांत झालें. १९१२ सालीं परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर पुढल्याच वर्षी त्यांनीं वैद्यकीच्या धंद्यास सुरुवात केली. १९१९ मध्यें ते राजकीय चळवळींत पडले व त्यांनीं किफायतशीर धंदा सोडून दिला. त्यांचा अनेक संस्थांशीं संबंध आहे. अखिल भारतीय चरखा संघाचे ते निर्वेतन प्रचारक होते. अखिल भारतीय ग्रामोद्योग संघाच्या पंजाब शाखेचे ते सभासद असून पंजाबतर्फे प्रतिनिधि होते. पंजाब जर्नल्स लि. व अखबारात प्रेस लि. चे ते डायरेक्टर व लाहोर हरिजन सेवकसंघाचे ते अध्यक्ष होते. लक्ष्मी इन्शुअरन्स कंपनीचे ते मुख्य वैद्यकीय सल्लागार असून इतर कांहीं रुग्णालयाचे ते विश्वस्त आहेत.

१९३२ सालीं यांनीं वैद्यकी धंदा सोडून राजकारणाला सर्वस्वी वाहून घेतलें. हे पंजाब कायदेमंडळांत सभासद व विरुद्ध पक्षाचे पुढारी होते. १९४६ त असेंब्लींत निवडून गेले. म. गांधींच्या कार्यावर त्यांचा दृढ विश्वास असे. हे १९४७ सालीं पूर्व पंजाबचे प्रधान मंत्री झाले.

**भार्गवपट्टी**—रत्नागिरि जिल्ह्यांत परशुरामक्षेत्र (मौजे पेढें) आहे. तेथें भार्गवरामाचें प्रसिद्ध पुरातन देवालय आहे. हें देवालय ब्रह्मेंद्रस्वामी चालवीत होते, पण सिद्दीच्या त्रासानें ते घाटावर गेले तेव्हां गांव ओसाड पडलें. कांहीं वर्षांनीं वेळास येथील शिवदेवमामा पाटणकर यांनीं पुन्हां भार्गवरामाच्या पूजेची व्यवस्था केली व देवस्थानखर्चासाठीं आंगरे यांजकडून दाभोळ प्रांतीं दर गांवास दोन रुपये वसूल करण्याची सनद मिळविली. या पट्टीचें नांव भार्गवपट्टी होय. पुढें लहान गांवास दोन रुपये जास्त होतात म्हणून दर हिंदु घरामागें एक आणा भार्गवपट्टी घ्यावी, अशी पेशवे सरकारांतून आज्ञापत्रें झालीं. ही भार्गवपट्टी इंग्रजी अमलांतहि बरेच दिवस चालू होती. पुढें १८४७ सालीं मुंबई सरकारनें ती ऐच्छिक केली. तेव्हां अलीकडे ती कोणीच देत नाहीं.

**भालदेवपूजा**—हें एक व्रत आहे. याचा प्रारंभ भाद्रपद शुद्ध १ रोजीं करण्यांत येतो. हें व्रत ३,७,९ किंवा १३ दिवस पाळण्याचा प्रघात आहे. खानदेश जिल्ह्यांत राहणाऱ्या सर्व जातींच्या लोकांत हें व्रत करण्याचा प्रघात आहे. विशेषतः गवळी लोकांचें हें खास व्रत आहे. भाद्रपद शुद्ध १ पूर्वी सर्व घर झाडून साफ करण्यांत येतें. घरांतील केर गोळा होईल तो घराच्या अंगणांत—घरास अंगण नसल्यास, घराच्या पुढील रस्त्यावर— एके जागीं सांठवून ठेवण्यांत येतो. या सांठविलेल्या केरावर शेण टाकतात. शुद्ध १ पासून व्रतसप्तमीच्या दिवसापावेतों दुभत्या जनावराचें दूध, दहीं, ताक व तूप जें होईल तें घरांतील माणसांखेरीज अन्य कोणासहि फुकट अगर विकत द्यावयाचें नाहीं. जरूरीपेक्षां अधिक राहतील ते पदार्थ खाण्याकरितां इष्टमित्र, शेजारीपाजारी यांस आपल्या घरीं बोलावून आणून त्यांना खाऊं घालावयाचे. तेव्हां साहजिकच व्रत करणाराचे इष्टमित्र आपल्या भाकरी, पोळ्या, वगैरे घेऊन व्रत करणाराकडे दहीं, दूध, तूप, ताक खाण्याकरितां जातात. दहीं, दूध, ताक, वगैरे खाण्यास कोणी न आल्यामुळें ते पदार्थ शिल्लक राहिल्यास नदीच्या अगर ओढ्याच्या पाण्यांत टाकून देण्यांत येतात. या व्रताच्या दिवसांत दारावर भिक्षेकरी भिक्षा मागण्यास आल्यास त्यास भिक्षा वाढावयाची नसते.

व्रतोद्यापनाच्या दिवशीं नदीच्या अगर नाल्याच्या वाळवंटांतील सात खडे व मूठभर वाळू, त्याचप्रमाणें नदींतील लव्हाळे घरीं आणावयाचे. हे पदार्थ घरीं आणल्यानंतर घरांतील धुसळखांबाशेजारीं ते सात खडे ठेवून तेथेंच आणलेली वाळू पसरावयाची. वाळू पसरल्यानंतर तीवर शेणाची बाहुली करून ती बसवावयाची व तिच्या भोंवतालीं नदींतून आणलेले लव्हाळे भिंतीस लावून उभे करावयाचे. याप्रमाणें बाहुलीची स्थापना केल्यावर तिची पूजा गंध, अक्षता, हळद-कुंकू, इत्यादि द्रव्यांनीं करून धूपदीप करावयाचा. बाहुलीस ओवाळण्याकरितां केलेले सांजाचे दिवे प्रसाद म्हणून देण्यांत येतात. भोजनोत्तर सायंकाळीं धुसळखांबाशेजारीं स्थापन केलेली शेणाची बाहुली, खडे, वाळू, लव्हाळे हीं सर्व एकत्र करून नदींत टाकून देण्यांत येतात व घराच्या अंगणांतील केराचा पुंजका उकिरड्या-

वर फेकून देण्यांत येतो. या व्रताचा मूळ हेतु गोपालन हा असावा.

**भालेमाला**—लहान मुलींचा एक खेळ. दोघी दोघींच्या जोड्या करून एकमेकींकडे तोंडें करून गाणें म्हणतात. गाणें म्हणतांना एक हात जोडीदारणीच्या खांद्यांवर व दुसरा पुढें करतात. कधीं समोरच्या मुलींच्याहि खांद्यांवर हात ठेवतात व 'भाले भाल। कुसुंबी शाल। दंडावरची चोळी माझी गुजरी लाल॥' असें गाणें म्हणतात.

**भालेराई**—एक शिवकालीन धामधूम. संभाजीच्या वधानंतर महाराष्ट्रांत मुसलमानांचीं ठाणीं बसलीं तेव्हां प्रथम राजाराम व त्याचे प्रधान हे चंदीच्या किल्ल्यांत राहिले व तेथून त्यांनीं आपलीं कारस्थानें लढविलीं. इतकें सर्व घडेपर्यंत मध्यंतरीं रामचंद्रपंत अमात्याच्या हुकमतीखालीं मराठे लोकांनीं मुसलमानांचीं ठाणीं उठविण्याचा निरनिराळा स्वतंत्र यत्न केला. या धामधुमीमुळें रयत मात्र हैराण होई. ह्या धामधुमीस 'भालेराई' म्हणण्याचें कारण असें कीं, त्या वेळीं रूपाजी व बाबाजी भालेराव ह्या नांवाचे दोन सरदार होते. ते ह्या धामधुमीचे उत्पादक व पुढारी होते. ह्यांचें उपनांव भोसले असें होतें. ह्यांनीं महाराष्ट्रांत कोठेंहि मुसलमानांचीं कायमचीं ठाणीं बसूं दिलीं नाहींत. ह्या वेळेपासून 'भालेराई' हा शब्द धामधूम, अंधाधुंदी ह्या अर्थी वापरतात.

**भाव**—मनोविकार, मनोभाव. साहित्यशास्त्रांत याचे स्थायी आणि व्यभिचारी असे दोन प्रकार आहेत. स्थायी भावाचे रति, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा आणि विस्मय असे आठ भेद; आणि व्यभिचारी भावांचे निर्वेद, ग्लानि, शंका, असूया, मद, श्रम, आलस्य, दैन्य, चिंता, मोह, स्मृति, धृति, व्रीडा, चपलता, हर्ष, आवेग, जडता, गर्व, विषाद, औत्सुक्य, निद्रा, अपस्मार, सुप्त, विबोध, अमर्ष, अवहित्था, उग्रता, मति, उपालंभ, व्याधि, उन्माद आणि मरण असे बत्तीस प्रकार आहेत. कोणाच्या मतें या व्यभिचारी भावांतून उपालंभ काढून त्रास आणि वितर्क यांची योजना केल्यास हे तेहेतीस होतात. यांशिवाय मध्यम प्रकारचे स्तंभ, प्रलय, रोमांच, स्वेद, वैवर्ण्य, वेपथु, अश्रु आणि वैस्वर्य हे सात्त्विक भाव आहेत.

**भावगीतें**—इंग्रजी 'लिरिक' या काव्यप्रकारासारखें काव्य. लायर म्हणजे सारंगी वाजवून पूर्वी अशीं भावगीतें म्हणण्यांत येत. वर्णनात्मक काव्याच्या अगदीं उलट याची रचना असते. साफो, अलसीअस, सायमानिडीज, पिंडार, इत्यादि ग्रीक कवी व त्याच तोडीचे कॅटुलस-होरेससारखे रोमन कवी यांचीं भावगीतें प्रसिद्ध आहेत. इंग्रजींतहि अनेक भावकवी होऊन गेले. शेक्सपियरच्या नाटकांतूनहि असें काव्य आढळतें. हेरिक, लव्हलेस, डॉन, इ. पुढचे कवी नांव घेण्यासारखे होऊन गेले. तथापि १८ व्या शतकांत हा प्रकार मागें पडला, पण पुढल्या शतकांत शेले आणि कीट्स यांनीं मागच्या सर्वांवर ताण केली. फ्रान्समध्यें ला मार्तिन, ह्यूगो, म्युसे, व्हेरलेन; इटलींत लिओपर्डी आणि कार्डुसी; जर्मनींत गोएटे, शिलर व हीन; रशियांत पुष्केन, व पोलंडमध्यें मिकी विएझ यांचीं नांवें भावात्मक काव्याच्या इतिहासांत प्रामुख्यानें घ्यावीं लागतात.

मराठींत संतवाङ्मयांत भावगीतांप्रमाणें अगदीं निराळा प्रकार नसला तरी त्या वाङ्मयांत देवाविषयीं दाखविलेला केवळ नितांत भक्तिभाव हा भावगीतांचा विषय म्हणतां येईल. आधुनिक कवि प्रियेवर जो प्रेमभाव व्यक्त करतो तोच संतकवि देवावर करतो. केशवसुतांनीं आत्मलेखनाला जें प्राधान्य दिलें तेंच पुढें गिरविलें गेलें व भावगीतें निर्माण झालीं. नाट्यगीताचा एक जो प्रकार आहे तो भावगीतांशीं जुळता असून तांबे यांनीं तशीं गीतें रचिलीं आहेत. रविकिरणमंडळांतील कवींनीं भावगीतें बरींच रचलेलीं आहेत. त्यानंतरच्या कवींनीं त्यांची परंपरा चालविली व चालवीत आहेत. पण त्यांच्या साऱ्याच कविता भावगीतें होऊं शकत नाहींत. ज्यानें उठावें त्यानें एखादें दहावीस ओळींचें स्फुट गीत विषयावर लिहावें व त्याला भावगीत हें भारदस्त नांव द्यावें, असें झालें आहे. आज भावनेशिवाय काव्य नाहीं; पण ती भावना एकविषयक व उत्कृष्ट रीतीनें रंगविलेली असली पाहिजे. या दृष्टीनें पाहतां खऱ्या भावनांची उत्कटता आढळत नाहीं. शांता शेळके यांचीं प्रेमगीतें भावगीतें म्हणतां येतील. अनिलांची मुक्त छंदांतील कांहीं गीतें सुंदर आहेत. संत, वि. म. कुलकर्णी, वसंत चिंधवडे, माडगूळकर, वगैरे नामवंत कवी भावगीतकार म्हणतां येतील.

**भावनगर संस्थान**—मुंबई इलाख्यांत जुन्या काठेवाड एजन्सींतील एक संस्थान. क्षे. फ. २,९६१ चौ. मैल. हवा कोरडी व उष्ण आहे. पाऊस सरासरी २५ इंच पडतो. भावनगरचे संस्थानिक गोहेलवंशीय रजपूत आहेत. या रजपुतांचा पुढारी सावकजी असून तो १२६० त इकडे स्थायिक झाला. याचा राणोजी नांवाचा मुलगा होता. हाच भावनगरच्या संस्थानिकांचा मूळ पुरुष होय. संस्थानची लो. सं. (१९४१) ६,१८,४२९ आहे. धान्यें, कापूस हीं पिकें होतात व मीठहि होतें. तेल काढणें, तांब्यापितळेचीं भांडीं तयार करणें हे धंदे लोक करतात. ५ सुताच्या व कापडाच्या गिरण्या, १ रेशमाची गिरणी, १ साखरेचा, १ रबराचा, व १ काड्याच्या पेट्यांचा कारखाना आहे. इतर लहान धंदे पुष्कळ आहेत. देशी दारू गाळणें व विकणें हें संस्थाननें बंद केलें आहे. भावनगर हें पहिल्या प्रतीचें संस्थान आहे. जुनागडच्या संस्थानिकाला झोडतलचीदाखल २२,८५८ रु.

व गायकवाडांस पेशकशीबद्दल ३,५८१-८-० रु. मिळत असत. संस्थानचें वार्षिक उत्पन्न सरासरी सु. दीड कोटी रुपये आहे.

गुजराथ व काठेवाड यांची वांटणी जेव्हां पेशवे आणि गायकवाड यांमध्यें झाली तेव्हां भावनगरचा कांहीं भाग पेशव्यांच्या सत्तेखालीं आला. तेव्हां संस्थानिकांनीं पेशव्यांस ११,६७० रु. द्यावयाचे असत. वसईच्या तहानंतर पेशव्यांची यावरची सत्ता व खंडणी इंग्रजांकडे गेली. गायकवाडांची खंडणी मात्र चालू राहिली.

सध्यांचे महाराज कृष्णकुमारसिंह हे १९१९ सालीं गादीवर आले तेव्हां ते अज्ञान होते. सज्ञान झाल्यावर १९३१ सालीं यांना सर्व राज्याधिकार मिळाले. यांचें शिक्षण इंग्लंडमध्यें झालें. यांचा विवाह १९३१ सालीं गोंडलच्या राजकन्येशीं झाला. हें संस्थान आतां सौराष्ट्र संघांत सामील झालेलें आहे. भावनगरचे महाराज १९४८ पासून मद्रास प्रांताचे गव्हर्नर आहेत.

शहर—हें राजधानीचें शहर खंबायतच्या आखातावर बंदर आहे. लो. सं. ६०,०००. येथें सूत काढण्याची व कापड विणण्याची गिरणी आहे. येथील लोक धातूचीं भांडीं करणें, गाड्या करणें, खडीसाखर करणें, वगैरे धंदे करतात. कौलें व विटा करण्याचे कारखाने आहेत. येथें एक कॉलेज व हायस्कूल ह्या शिक्षणसंस्था असून सरकारी २ दवाखाने आहेत. येथें गौरीशंकर नांवाचा तलाव असून बरींच प्रेक्षणीय देवळें व मशिदी आहेत. बंदरापर्यंत आगगाडी असल्यानें मालाची मोठी वाहतूक चालते. भावनगर शहर १७२३ त भाऊसिंगानें वसविलें.

**भावमिश्र** (१६ वें शतक).—एक वैद्यकग्रंथकार. हा कान्यकुब्ज असावा. याच्या 'भावप्रकाश' या ग्रंथाचा उल्लेख माधवकृत 'आयुर्वेदप्रकाश' या ग्रंथांत आला आहे. वैद्यकशास्त्रावरील विख्यात ग्रंथकार शार्ङ्गधर वङ्गसेन यांच्यापेक्षां हा अलीकडील दिसतो.

इ. स. १५५० च्या सुमारास भावमिश्र यानें पुष्कळ ग्रंथांच्या आधारानें एक पुस्तक तयार करून त्यास 'भावप्रकाश' असें नांव दिलें. पूर्वीच्या ग्रंथकारांस ज्या वनस्पती व जे रोग माहीत नव्हते त्या सर्वांचें वर्णन या ग्रंथांत दिलें आहे व याच कारणावरून या पुस्तकांतील निघंटावर लोक बराच विश्वास ठेवतात. पोर्तुगीज लोकांची वसाहत इकडे झाल्यापासून ज्या रोगास भावप्रकाशांत फिरंगरोग (गर्मी) म्हटलें आहे तो रोग इकडे आला. चोपचिनीचें वर्णनहि या पुस्तकांत सांपडतें. हरएक प्रकारची माहिती या पुस्तकांत मिळते. या कारणाकरितां बहुतेक प्रत्येक वैद्याजवळ हें पुस्तक असतें.

**भावलपूर**—बहावलपूर पाहा.

**भावसार**—एक जात. महाराष्ट्रांतील भावसारासाठीं 'शिंपी' पाहा. गुजराथेंत हे कापडावरचें छापकाम करतात. मूळचे आपण क्षत्रिय आहों व परशुरामाच्या भीतीनें मातेच्या देवळांत तिच्यावर भाव ठेवून लपून बसलों म्हणून हें नांव पडलें असें सांगतात. हे मूळचे मथुरेकडचे आहेत. अंबाजी व हिंगलाज या यांच्या देवता होत. यांच्यांत हिंदू व जैन असे भेद आहेत. तसेंच रेवाकांठी, राधदेशी व तळपदे असे स्थानांवरून पडलेले भेद आहेत. यांच्यांत लग्नें वाणी किंवा श्रावक जातींतल्याप्रमाणेंच होतात. पाट व नियोग आहे.

**भाविणी व देवळी**—हे लोक रत्नागिरि व कानडा जिल्ह्यांत आणि सावंतवाडी व गोवें संस्थानांत आढळतात. लो. सं. (१९२१) ६,२५४. सावंतवाडी व मालवण येथील सरदारांपासून दासींना झालेल्या संततीचे हे वंशज आहेत. या लोकांत पुरुषांना देवळी अथवा नाईक व बायकांना भावीण किंवा नायकीण अशीं नांवें आहेत. मराठा व भंडारी या दोन जातींपासून झालेल्या लोकांचा यांमध्यें भरणा फार आहे. भाविणी बायका जेजुरी येथील मुरळ्यांप्रमाणें देवाला वाहिलेल्या असतात व त्यामुळें इतर वेश्यांहून भिन्न आहेत. त्यांचा सामाजिक दर्जा मुरळ्यांप्रमाणें असून कलावंतिणींपेक्षां खालीं असतो व भरसमाजांत नाचण्याची व गाण्याची त्यांना मनाई असते. भाविणी मुली वयांत आल्यावर आपल्याला देवाला वाहून घेतात. ज्या विधीनें त्यांचें देवाशीं लग्न लागतें त्याला शेपविधि असें म्हणतात. वराची प्रतिमा म्हणून देवाच्या धुंगराबरोबर लग्न लावण्यांत येतें. या लोकांचे संस्कार, खाण्या-पिण्याचे रीतिरिवाज व धर्म हे मराठे लोकांप्रमाणेंच आहेत.

**भावे, विनायक लक्ष्मण** (१८७१-१९२६)— जुन्या मराठी वाङ्मयाचे अभ्यासक, इतिहाससंशोधक व सार्वजनिक कार्यकर्ते. बी. एस्सी. पर्यंत शिक्षण झाल्यावर हे आपल्या वडिलांच्या मिठागराच्या धंद्यांत शिरले. याच धंद्यांत चिकाटीनें श्रम करून पुढें हे लक्षाधीश झाले. प्राथमिक शाळेंत असल्यापासूनच यांना प्राचीन कवींच्या कवितांचा नाद लागला होता. कॉलेजांत असतांना यांनीं 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथाची जी पहिली आवृत्ति तयार केली, ती प्रा. वि. गो. विजापूरकर यांच्या ग्रंथमालेंत १८९५ सालीं प्रसिद्ध झाली. यांनींच पुढें या ग्रंथाच्या आणखी दोन आवृत्त्या काढल्या. यांनीं लिहिलेल्या चक्रवर्ती नेपोलियनच्या चरित्रांत नेपोलियनची तुलना शिवाजीशीं केली असल्यानें या ग्रंथाला एक विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. मराठ्यांच्या इतिहासाची अस्सल पत्रें प्रसिद्ध करण्यासाठीं यांनीं 'मराठी दप्तरांचे रुमाल' हि प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली होती. १८९३ सालीं यांनीं ठाणें

येथें मराठी ग्रंथालय स्थापून त्यातर्फे १९०३ सालीं 'महाराष्ट्र कवि' हें मासिक काढलें. चिरोल केस प्रकरणाच्या वेळीं लो. टिळकांना एक लाख रुपये उसनें देणारे हेच होत.

**भावे, विष्णु अमृत** (१८१९-१९०१)— विष्णुदास. आद्य महाराष्ट्र नाटककार. यांचे वडील सांगलीकरांच्या पदरीं एक लष्करी अधिकारी होते. विष्णुपंतांना लहानपणापासून गाणें, पदें करणें, भाषणें तयार करणें, वगैरेचा नाद असे. १८४२ सालीं उत्तर कानडांतील भागवत नांवाच्या मंडळीचे सांगलीस नाट्यप्रयोग झालेले पाहून विष्णुदासांनीं सांगलीकरांच्या सांगण्यावरून सीतास्वयंवराचा प्रयोग बरीच मेहनत घेऊन तयार करून दाखविला. यापुढें श्रीमंतांनीं चांगला आश्रय दिल्यानें दहा नाट्यप्रयोग विष्णुदासांनीं तयार केले. त्यांच्या नाटकांत सूत्रधार, विदूषक, गजाननमहाराजांचें स्तवन, त्यांचें व सरस्वतीचें आगमन, देवांची, राक्षसांची व स्त्रियांची कचेरी, राळेच्या उजेडात तरवारींच्या फेकाफेकी, वगैरे गोष्टी असत. पडदा एकच असे, व एकाच बैठकीवर व देखाव्यांत सारे प्रवेश होत. १८५१ नंतर भावे यांच्या कंपनीनें पुणें, मुंबई, वगैरे ठिकाणीं नाट्यप्रयोग केले. त्या कंपनींत गोपाळराव मनोळीकर (सूत्रधार), रघुपति फडके (स्त्रीपार्टी), बापू ताके (राक्षस), वगैरे पात्रें नांवाजण्यासारखीं होतीं. सर्व कथाभाग पौराणिक घेऊन हरिश्चंद्राख्यान, भरतभेट, वामनावतार, चक्रव्यूह, प्रल्हादचरित्र, बभ्रुवाहन, वगैरे सुमारें पन्नास नाटकें पद्यरचनेसह विष्णुदासांनीं रचिलीं होतीं. १८६१ सालीं विष्णुदासांनीं नाटककंपनी सोडली, व कळसूत्री बाहुल्यांचा खेळ तयार केला. लांकडी चित्रें हातानें तयार करून त्यांकडून रासांत गोफ विणणें, नृत्याभिनय करणें, कसरत करणें, वगैरे कामें करवून घेत. अखेर सांगलीस एंजिनियरिंग खात्यांत त्यांनीं नोकरी केली.

*भावे व्यास*—तेराव्या शतकांतील एक महानुभावी कवि. हा व भास्करभट हे गुरुबंधू होते.

**भाषाशास्त्र**—भाषेच्या उत्पत्तीविषयीं आपणांस फारच थोडी माहिती असते. मनुष्य व इतर प्राणी यांच्यामध्यें मुख्य फरक भाषेमुळेंच करण्यांत येतो. बहुतेक प्राणी—विशेषतः संघजीवी प्राणी—आपल्या सहचरांस आगामी भीतीची किंवा जवळपास मिळणाऱ्या अन्नासंबंधींची सूचना देऊं शकतात. परंतु त्या भयाच्या स्वरूपाची निश्चित कल्पना किंवा त्यास आढळणाऱ्या अन्नाचें निश्चित स्वरूप इतरांस फक्त मनुष्यच कळवूं शकतो. म्हणून मनुष्यास बोलका प्राणी असें संबोधण्यांत येतें.

सुखदुःख व इतर भावना दर्शविणाऱ्या शब्दांमुळें प्राथमिक भाषेचे घटक तयार झाले. त्याप्रमाणेंच कांहीं प्राण्यांच्या शब्दांच्या अनुकरणामुळें कांहीं शब्द प्रथम तयार झाले. तसेंच कांहीं आश्चर्य, भीति, इत्यादि उद्गारात्मक शब्द प्रथम अस्तित्वांत येऊन भाषा बनली, अशी एक उपपत्ति मानण्यांत येत असे. तिला 'बाऊ-वाऊ' किंवा 'पुः-पुः' उपपत्ति असें म्हणण्यांत येतें. मुलें खेळतांना कांहीं शब्द उच्चारतात त्याचाहि भाषा बनण्याच्या कामीं कांहीं उपयोग झाला असावा व याच तत्त्वावर प्राथमिक अवस्थेंतील मनुष्यानें आपली बरीचशी शब्दरचना केली असावी.

*भाषेंत होत जाणारे बदल*—भाषेचें स्वरूप नेहमीं पालटत असतें. भाषा जरी वाङ्मयामुळें कांहींसें स्थैर्य पावत असली तरी तिच्यामध्यें एकसारखा बदल होत असतो. हे फरक होण्याचीं कारणें अनेक आहेत. त्यांचा संबंध मनुष्याच्या वागिंद्रियाशीं असतो; त्यास ध्वनिभेद असें म्हणतात. कांहीं फरक दुसऱ्या भाषांच्या संपर्कामुळें होतो. परंतु बरेचसे फरक सादृश्यमूलक असतात. उदा., अनेकत्वाचें चिन्ह 'स' या अक्षराशीं संबद्ध असावेंसें मानण्यांत येऊं लागलें. त्यामुळें 'स' हा प्रत्यय लावून अनेकवचन बनविण्यांत येऊं लागलें; उदा., देव-देवस्-देवासस् = देवाः. तसेंच उच्चारणसुलभतेकडे प्रवृत्ति असल्यामुळें पुष्कळसे भेद अस्तित्वांत येत गेले. एखाद्या भाषेंतील शब्दसंग्रहाचा इतिहास पाहूं गेल्यास तो ध्वनीच्या इतिहासाइतकाच घोटाळ्याचा असलेला आपणांस आढळून येईल. मूळ स्वतःसिद्ध शब्द असे फारच थोडे असतात. बरेचसे शब्द साधित अथवा निरनिराळ्या शब्दांमध्यें रूपांतर होऊन किंवा वाढ होऊन बनलेले असतात. तसेंच परकीय भाषेंतून किंवा पोटभाषांतून घेतलेले शब्दहि भाषेमध्यें बरेच असतात. इंग्रजी भाषा त्या दृष्टीनें सर्वांत अधिक संग्राहक आहे.

*भाषेची स्वरूपरचना*—भाषेच्या शब्दांच्या स्वरूपावरून भाषाशास्त्रज्ञांनीं भाषांचे तीन मोठाले वर्ग पाडले आहेत व त्यांमध्यें निरनिराळीं भाषांचीं कुलें त्यांतील सादृश्यावरून अंतर्भूत केलीं आहेत.

१. एकाकी भाषा—या प्रकारच्या भाषांत चिनी भाषा ही विशेष आहे. या भाषेमध्यें नामविशेषणादि भेद नसतात. प्रत्येक चिन्ह हें एक स्वतंत्र एकाक्षरी शब्द असतें व त्यावरून एक विशिष्ट कल्पना व्यक्त होते, मग ती कल्पना नामाची असो अथवा क्रियापदाची असो.

२. चिकट्या भाषा—या भाषांमध्यें धातूंस त्यांचे निरनिराळे संबंध दाखविण्याकरितां प्रत्यय लावण्यांत येतात. एकच प्रकारचे प्रत्यय नामास व क्रियापदास निरनिराळ्या संबंधांत लावण्यांत येतात. चिकट्या भाषा आणि प्रत्ययी भाषा यांच्यामधील सीमारेषा तितकीशी निश्चित नाहीं. उदा., या वर्गातील

फिनिश भाषा ही तिच्यांतील नामें व त्यांचे प्रत्यय पाहिले तर फार परिणत अशी प्रत्ययी भाषा आहे असेंच वाटेल. कारण त्या भाषेंत कमीत कमी पंधरा विभक्ती आढळतात.

३. प्रत्ययी भाषा—या भाषांचे दोन वर्ग पडतात:—एक सेमिटिक भाषा—यामध्यें हिब्रू, अरबी, अरेमाइक आणि असीरियन भाषा अंतर्भूत आहेत. या भाषांमध्यें परस्परांत फ्रेंच, इटालियन किंवा स्पॅनिश यांपेक्षां अधिक फरक आढळत नाहीं. व दुसरा वर्ग इंडो-युरोपियन भाषा—यांचे पुनः गट पडतात. यांतील पहिला गट हिंदी भाषांचा होय. (१) या गटांतील सर्वांत प्राचीन भाषा संस्कृत ही आहे. या भाषेपासून पुढें प्राकृत, पाली, वगैरे भाषा निघाल्या. आणि त्यांपासून पुढें हिंदुस्थानांतील अर्वाचीन हिंदी, बंगाली, गुजराथी, मराठी, वगैरे देशी भाषा उत्पन्न झाल्या. (२) दुसरा गट इराणी भाषांचा होय. यामध्यें झेंद ही प्राचीन इराणी साम्राज्याची भाषा मोडते. झरथुष्ट्रानें प्रसृत केलेल्या संप्रदायाची हीच भाषा होय. अद्यापहि पूर्व इराणी लोकांत ही भाषा प्रचलित आहे. (३) यानंतर पश्चिमेकडे आर्मेनियन भाषेचा गट येतो. या भाषेमध्यें पांचव्या शतकापासून वाङ्मय उपलब्ध आहे. (४) यानंतर इतिहासांत अत्यंत महत्त्वाचा असा ग्रीक भाषांचा गट येतो. ग्रीस देशाच्या भौगोलिक परिस्थितीमुळें या भाषेच्या अनेक पोटभाषा बनल्या. (५) यानंतर अल्बेनियन भाषेचा गट येतो. ही भाषा प्राचीन इलिरियन भाषेची वंशज असून तीमध्यें.गेल्या १७ शतकांहून अधिक जुनें वाङ्मय उपलब्ध आहे. (६) यानंतर इटली देशांत प्रचलित असलेल्या इटालिक बोलभाषांचा गट लागतो. यांचें लॅटिनमध्यें आणि दुसऱ्या फॅलेरी आणि प्रीनेस्त या फारच अल्पज्ञात असलेल्या पोटभाषांमध्यें वर्गीकरण करण्यांत येतें. तसेंच याच गटांत सॅम्नाइट लोकांत व कॅपानियामध्यें प्रचलित असलेली ऑस्कन भाषा अंतर्भूत होते. तसेंच इतर लहान लहान राष्ट्रांच्या भाषा- उदा.. सॅबाइन, पेलिग्नियन, इत्यादि लोकांच्या भाषा- तसेंच ईशान्य इटलींतील उम्ब्रिया येथील पोटभाषा, वगैरे सर्व याच गटांत मोडतात. लॅटिन भाषेच्या ग्रामीण स्वरूपावरून रोमान्स भाषा निघाल्या व त्याच आज फ्रेंच, इटालियन, स्पॅनिश, पोर्तुगीज, व्हीटा रोमॅनिक किंवा रोमांश, रोमॅनियन आणि प्रॉव्हिन्सल या नांवांनीं प्रचलित आहेत. (७) यानंतर केल्टिक भाषांचा गट येतो. यामध्यें प्राचीन गॉल प्रांतांतील भाषा, तसेंच वेल्स, कॉर्निश ब्रेटन या भाषांचा एक संघ, आणि आयरिश, स्कॉटिश गेलिक आणि मँक्स या भाषांचा दुसरा संघ याच गटांत मोडतो. (८) यानंतर जर्मानिक अथवा टयुटॉनिक या बोलभाषांचा गट आढळतो. या भाषांमध्यें सर्वांत जुनें चौध्या शतकांतील बिशप बुल्फिला यानें केलेलें बायबलचें भाषांतर आढळतें. या गटापैकीं व्हायकिंग राजांच्या नंतर नोर्स भाषेच्या चार पोटभाषा बनल्या. त्या आयस्लंडिक, नॉर्वेजियन, स्वीडिश आणि डॅनिश या होत. याच गटामध्यें पश्चिम जर्मानिक भाषांचा एक संघ येतो; त्यामध्यें जुनी इंग्लिश किंवा ॲंग्लो-सॅक्सन, फ्रिजियन, नीच जर्मन, नीच फ्रँकेनियन (त्यापासून डच व फ्रेमिश भाषा बनल्या) आणि उच्च जर्मन या भाषा येतात. (१०) यानंतर अखेरचा स्लॅव्हॅनिक भाषांचा गट येतो. याचे प्रथम दोन भाग पडतात: (अ) बाल्टिक किंवा लेटिक- हिच्यामध्येंच लिथोॲनियन आणि लेटिश या भाषांचा अथवा जुन्या प्रशियन भाषांचा अंतर्भाव होतो. (आ) मूळ स्लॅव्हॅनिक-हिच्यामध्यें अनेक पोटभाषांचा अंतर्भाव होत असून त्यांपैकीं प्राचीन बल्गेरियन भाषेंत किंवा जुन्या स्लॅव्हॅनिक भाषेंत सर्वांत जुनें वाङ्मय उपलब्ध आहे.

तौलनिक भाषाशास्त्र— या सर्व भाषा एकमेकांशीं संबद्ध आहेत ही गोष्ट त्यांमध्यें असलेल्या अनेक शब्दांचें साम्य, तसेंच त्यांच्या रचनेमध्यें, त्यांच्या प्रत्ययांमध्यें, त्यांच्या समासक्रियेमध्यें वगैरे जें साम्य आढळून येतें त्यांवरून दृष्टोत्पत्तीस येतें. या साम्यासंबंधीं ग्रिमचा नियम, व्हर्नरचा नियम, वगैरे कांहीं नियम बसविण्यांत आलेले आहेत. तौलनिक भाषाशास्त्राचा आरंभ बराच अलीकडील आहे. तें १९ व्या शतकांतच प्रथम उत्पन्न झालें. जेव्हां पाश्चात्य लोकांस संस्कृत भाषेचें ज्ञान झालें त्या वेळीं संस्कृत आणि ग्रीक या भाषांत जें अनेक दृष्टीनें साम्य आढळून येतें त्यावरून या तौलनिक भाषाशास्त्राची स्थापना करण्यांत आली. या शास्त्राच्या अभ्यासामध्यें बॉप, पॉट, श्लेशेर, इत्यादि पंडितांनीं बरेच परिश्रम केले. यानंतर १८७० ते १८८० यांच्या दरम्यान ऑस्थोफ, ब्रुगमन, ग्रासमन, डेल्ब्रुक यांनीं बरेच नवीन नियम शोधून काढले व विशेषतः प्राचीन स्वरप्रक्रियेचे नियम बसविले. प्राचीन भाषाशास्त्रज्ञांनीं मृतभाषांच्या अभ्यासापासून सुरुवात केली होती. परंतु नवीन भाषाभ्यासकांनीं जिवंत भाषांपासून सुरुवात करून पाठीमागें मृतभाषांपर्यंत अभ्यास करण्याची प्रथा पाडली. यांनींच शब्दार्थशास्त्राची प्रथा सुरू केली, व त्यामध्यें मायकेल ब्रेअल यानें प्रथम परिश्रम केले.

जगांतील प्रमुख भाषा—जगांत आज ज्यांत प्रत्यक्ष लिहिलें बोललें जातें अशा भाषा २,७९६ आहेत. यांपैकीं इंग्रजी भाषा बोलणारे लोक २७ कोटी आहेत. यांतील सुमारें १५ कोटी अमेरिकन संयुक्त संस्थानांचे नागरिक आहेत व सुमारें ११ कोटी ८५ लक्ष लोक ब्रिटिश साम्राज्यातील आहेत. चिनी भाषा बोलणारे सुमारें ५० कोटी व भारतीय भाषा बोलणारे ३३ कोटी १० लक्ष आहेत. रशियन भाषा बोलणारे १६ कोटी

६० लक्ष, स्पॅनिश भाषा बोलणारे १० कोटी ३० लक्ष व आफ्रिकन भाषा बोलणारे ९ कोटी ३० लक्ष लोक आहेत. आणखी कांहीं प्रमुख भाषा बोलणारांची संख्या पुढीलप्रमाणें आहे :

| | | |
|---|---|---|
| जपानी | ९ कोटी | ७० लक्ष |
| जर्मन | ७ ,, | ८० ,, |
| फ्रेंच | ६ ,, | ८० ,, |
| पोर्तुगीज | ४ ,, | ९० ,, |
| इटालियन | ४ ,, | ४० ,, |
| जावानीज | ४ ,, | २० ,, |
| पोलिश | ३ ,, | २० ,, |
| अरबी | २ ,, | ९० ,, |

एक जागतिक भाषा तयार करण्याचे बरेच प्रयत्न झाले आहेत. त्यांत व्होलॅपुक, एस्पेरॅन्टो व बेसिक इंग्लिश हे तीन मुख्य होत.

**भास**—एक प्राचीन संस्कृत नाटककार. सुमारें १०।१५ वर्षांपूर्वी पंडित गणपतिशास्त्री यांना मनलिकर मठांत कांहीं नाटकें सांपडलीं; तीं भासाचीं आहेत, असें या शास्त्र्यांचें मत आहे, पण त्याला बराच विरोध आहे. स्वप्नवासवदत्ता, प्रतिज्ञा-यौगंधरायण, पंचरात्र, चारुदत्त, दूतघटोत्कच, अविमारक, बाल-चरित, मध्यमव्यायोग, कर्णभार व ऊरुभंग, यांपैकीं पहिलीं दोनच भासकृत असावीं. भास कवि कालिदासापूर्वी दोन शतकें झाला असावा. त्याच्या नाटकांची भाषा सोपी व मनोहर आहे; संविधानकें चातुर्ययुक्त असून स्वभावपरिपोष चांगला साधलेला दिसतो, व नाटकांत सुभाषितांची विपुलता आहे, यांमुळें तो एक उत्कृष्ट नाटककार आहे, यांत शंका नाहीं. याचा काल खि. पू. ४ थें शतक असावा असें कांहीं पंडित मानतात.

**भास्कर (भानुभट) बोरीकर**—तेराव्या शतकांतील एक महानुभाव कवि. हा नागदेवाचार्याचा पट्टशिष्य असून याचा जन्म मोंगलाईत कासार बोरी येथें झाला व शिक्षण पैठण आणि काशी येथें झालें. यानें अनेक ग्रंथ लिहिले त्यांपैकीं 'शिशुपालवध' हें काव्य उत्कृष्ट आहे. याचा काळ शके ११९५ हा आहे. पदलालित्य, विचार, भाषासौंदर्य, उपमा-चातुर्य, इ. गुण या काव्यांत आढळतात. हें शृंगारिक काव्य आहे. आणखी यानें भागवताच्या एकादशस्कंधावर 'उत्तरगीता' किंवा 'उद्धवगीता' नांवाचा टीकाग्रंथ (११९८) लिहिला. हा भक्तिपर आहे. याचा श्रीकृष्णचरित्र हा गद्यग्रंथ आहे.

**भास्कर राम कोल्हटकर** (मृ. १७४४)—मराठेशाहीं-तील एक ब्राह्मण वीर. हा नेवरें (जि. रत्नागिरि) गांवच्या रामाजीपंत कोल्हटकराचा मुलगा. या कोल्हटकर घराण्याची माहिती 'कोन्हेर राम कोल्हटकर' या लेखांत आहे. भास्कर रामास नागपूरकर भोसल्यांच्या पदरीं सरंजाम मिळाला होता व त्यानें बंगाल प्रांतावर स्वाऱ्या करून तिकडे मराठ्यांचा दरारा बसवून ओरिसा व बंगाल्याकडील बराचसा प्रांत मराठी राज्यास जोडला. त्याच्या स्वाऱ्यांमुळें कलकत्तेकर इंग्रजांनीं कल-कत्त्यास एक किल्ला बांधून त्याभोंवतीं 'मराठा डिच' नांवाचा खंदक तयार केला. बंगालचा सुभेदार अलीवर्दीखान याच्या-बरोबर पंतांच्या नेहमीं लढाया जुंपत. शेवटीं त्यांत निभाव लागत नाहीं, असें पाहून खानानें तहाचें बोलणें लावलें, आणि भास्कर-पंताला विश्वासानें भेटीस बोलावून तो असावध आला असतां आपल्या डेऱ्यांत विश्वासघातानें त्याचा खून केला. त्यानंतर या खुनाचा वचपा पुढें रघूजी भोसल्यानें चांगलाच काढला. या मोहि-मेंत भास्कर रामाची बायको होती. ती गरोदर असून नवऱ्याचा खून पडल्यावर पळून काशीस गेली. तेथें तिला जो मुलगा झाला तो काशीराव. रघूजीनें वऱ्हाडचा सुभा हिच्या नांवाचा केला होता.

**भास्कराचार्य** (जन्म स. १११४)—एक अतिविख्यात भारतीय ज्योतिषशास्त्रज्ञ. हा सह्य पर्वतानजीकच्या विज्जलवीड गांवचा राहणारा. हें गांव खानदेशांत चाळीस-गांवच्या नैर्ऋत्येस १० मैलांवर असलेल्या पाटण नामक खेड्याच्या आसपास असावें, असा तेथील शिलालेखावरून तर्क होतो. त्याचे 'सिद्धान्तशिरोमणि' आणि 'करणकुतूहल' हे दोन ज्योतिषगणित ग्रंथ आहेत, व शिवाय 'वासनाभाष्य' हा टीकाग्रंथ आहे. 'भास्करव्यवहार' व 'विवाहपटल' हे ग्रंथ त्याचेच असावे. पहिला ग्रंथ त्यानें शके १०७२ सालीं आपल्या ३६ व्या वर्षी केला, व दुसरा ग्रंथ ६९ व्या वर्षी लिहिला. सिद्धान्तशिरोमणि ग्रंथाचा पहिला खंड पाटीगणित किंवा लीलावती हा अंकगणित व महत्त्वमापन यांवरचा स्वतंत्र ग्रंथच आहे असें म्हटलें तरी चालेल. दुसरा खंड बीजगणित. यांत एकवर्ण समीकरण, अनेकवर्ण समीकरण, एकानेकवर्ण वर्गादि समीकरणें, इत्यादि विषय आले आहेत. गणिताध्याय व गोलाध्याय यांत ज्योतिषशास्त्र आहे. पहिल्यांत ग्रहगणित हा विषय व दुसऱ्यांत ग्रहगणिताध्यायांतील सर्व विषयांची उपपत्ति, त्रैलोक्य संस्थावर्णन, यंत्राध्याय, इत्यादि विषय आहेत. सिद्धान्त-शिरोमणि हा इतका उत्कृष्ट ग्रंथ आहे कीं, त्यावरून भारतीय ज्योतिषशास्त्रासंबंधीं संपूर्ण माहिती कळते. करणकुतूहल ग्रंथांत अहर्गणावरून मध्यमग्रहसाधन केलें आहे. या ग्रंथांची फारसी व इंग्रजी भाषेंत भाषांतरें झालीं आहेत. पाटण येथें याच्या नात-वाचा शिलालेख आहे.

**भास्वरकृमि**—(काराबिडी). ही एक मांसभक्षक शेण-किड्यासारख्या जातीच्या किड्यांची जात आहे. हे किडे मोठे असून त्यांचें अंग एखाद्या धातूसारखें चकाकतें. यांचे रंग

निरनिराळे असतात. यांना बहुधा पंख नसतात किंवा असले तरी त्याचा उडण्याच्या कामीं उपयोग होत नाहीं. हे पृथ्वीच्या सर्व भागांत आढळतात.

**भिंडावर्ग**—[ वर्ग—मालव्हॅसी. जाति–मालवा ]. या वनस्पतीस तांबडसर जांभळीं फुलें येतात व तीं वाळलीं म्हणजे *निळीं होतात. यांची एक खुजी जात आहे. ती ठेंगणी* असून तिचीं मुळें फार लांब असतात आणि फुलें फिकट येतात. कस्तुरीभेंडा ( मस्कमॅलो. एम्. मोश्चाटा ) याला गुलाबी फुलें येतात.

**भित्तिचित्रें**—( म्युरल पेंटिंग ). चित्रकलेचा आरंभ भित्तिचित्रांपासूनच झाला. खि. पू. ३ ऱ्या शतकांतील रामगड येथें व नंतर खि. पू. २ तें इ. स. ७ व्या शतकांतील अजंठा येथें अशीं चित्रें उपलब्ध आहेत. बदामी, सित्तनवासल, सिगिरिया व बाघ येथील भित्तिचित्रें प्रसिद्ध आहेत. या चित्रकलेच्या पुढील चार पद्धती आहेत : १ टेम्पोरा, २ फ्रेस्को, ३ एनकॉस्टिक, व ४ तैलचित्रें.

१. टेम्पेरामध्यें रंगांत गोंद, अंड्याचा बलक, वगैरे घालतात. पूर्वी वज्रलेपाची अशीच कृति असे. कातड्यापासून तो करीत व पोथ्यांतून चित्रें काढतांना वापरीत. टेम्पेरा चित्रें प्राचीन ईजिप्त, बाबिलोन, ग्रीस, हिंदुस्थान, चीन, इत्यादि ठिकाणीं आढळतात.

२. गिलावा ओला असतांना जलरंगानें फ्रेस्को चित्रें रंगवितात. चित्र वाळल्यावर अखेरचा हात ( फिनिशिंग ) देतात. *अशा चित्रांना फ्रेस्को सेको म्हणतात. फ्रेस्कोचा उल्लेख खि. पू.* १ ल्या शतकांतील रोमन ग्रंथांत आढळतो. हिंदुस्थानांत ६ व्या शतकापासून आरंभ दिसतो. जयपूरजवळ हीं चित्रें दिसतील. मीनाक्षी मंदिरांत 'फ्रेस्को' चित्रें आहेत. गिलावा-चित्रें पाहा.

३. पृष्ठभाग गरम करून त्यावर मेणांतील रंग लावून चित्रें काढीत. फुलांच्या चित्रांसाठीं विशेषतः या पद्धतीचा उपयोग करीत. हीं चित्रें युरोपांत अभिजात ( क्लासिकल ) युगांत दिसतात. ९ व्या शतकांत ही कला पूर्ण उत्कर्षास पोंचली होती. आज या पद्धतीचें पुनरुज्जीवन होत आहे.

४. गिलावा पूर्ण वाळल्यावर तैलचित्रें काढतात. लिन्सिड तेल व टरपेन्टाइन रंग कोरडे व्हावेत म्हणून वापरतात. व्हेनेशियन चित्रकार या पद्धतींत फार प्रवीण आहेत. लिओनार्डोचें 'लास्ट सपर' चित्र प्रसिद्ध आहे.

भित्तिचित्रांत पृष्ठभाग तयार करणें, रंग तयार करणें व चित्रांचे नियम पाळणें या तीन गोष्टी मुख्य आहेत. संस्कृत ग्रंथांतून सुधालेपाचीं वर्णनें आहेत. त्यांत गूळ घालीत. रंगासाठीं पीत, रक्त, श्याम व सित धातु, काजळ, सिन्दूर, लाख, मनशीळ या जिनसा घेत. हे रंग निंबाच्या गोंदांत उपयोगांत आणीत. रंग तयार करण्याची कृति 'शिल्परत्नां'त सांगितली आहे. कुंचले कसे करावेत याचेंहि वर्णन आहे. प्रथम फिकट पिवळा किंवा तांबडा रंग घेऊन आलेखन करीत. नंतर बाह्य रेपा स्पष्ट करीत. मग आंत रंग भरीत. छायाकरण ( शेडिंग ) श्याम, उज्वल, गडद व फिकें करीत.

आज भित्तिचित्रांची प्रथा पुन्हां सुरू आहे. प्राचीन पद्धतींचा आपल्याकडे अभ्यास करणारांत नंदलाल बोस, असितकुमार हलधर हे प्रमुख आहेत.

**भिंद्**—ग्वाल्हेर संस्थानांतील ईशान्येकडील एक जिल्हा. क्षे. फ. १५५४ चौ. मैल. लो. सं. सु. ४॥ लक्ष. या जिल्ह्याचे चार परगणे आहेत. जमीन सुपीक आहे. नद्या चंबळा, सिंद, वगैरे आहेत. या जिल्ह्याचें मुख्य ठाणें भिंद हें होय. हें ग्वाल्हेर-भिंद रेल्वेवर असून प्राचीन काळीं चव्हाण जातीच्या भादौरिया शाखेची ही राजधानी होती. गांव १८ व्या शतकांत शिंद्यांच्या हातीं आलें. येथें कापूस व पितळेचीं भांडीं यांचा व्यापार चालतो.

**भिनमाल**—(भिन्नमाळ किंवा श्रीमाळ). ही राजपुतान्यांतील प्राचीन गुर्जर ( गुर्जर प्रतिहार ) राजांची राजधानी अबू पर्वताच्या वायव्येस २५ कोसांवर आहे. याच राजांनीं पुढें कनोज येथें सम्राट्-सत्ता गाजविली. भडोच येथील गुर्जर राजेहि याच भिन्नमालच्या घराण्याच्या एका शाखेचे वंशज होते. ह्युएनत्संगानें या गांवाचा उल्लेख केला आहे. येथें चाप घराणें इ. स. ५५० ते ५७० पर्यंत नांदत होतें. चावडा रजपुतांना यांची मदत होती.

**भिन्नध्वजा**—( हेटेरोस्टाइली ). कांहीं वनस्पतींच्या फुलांमध्यें एक विशिष्ट गोष्ट आढळून येते. ती प्रिम्युला या जातीच्या प्रिमरोज वगैरे फुलांमध्यें विशेषत्वानें दृष्टीस पडते. या वनस्पतींच्या बाबतींत दोन झाडांवर दोन अगदीं भिन्न प्रकारचीं फुलें आढळतात. त्यांतील पुंकेसरांची व स्त्रीकेसरांची लांबी निरनिराळी असते.

**भिरूड**—आंब्याच्या झाडांस भिरूड नांवाचा एक किडा लागतो. हा किडा म्हणजे एक प्रकारची बिनपायाची सुमारें दीड-दोन इंच लांब व अंगठ्याएवढी जाड अळी असते. ह्या अळीचीं अंडीं झाडाच्या सालींत घातलेलीं असतात. तीं पावसाळ्याच्या आरंभीं फुटून लहान अळ्या बाहेर पडून त्या साल पोखरून आंत शिरतात; व पुढें अंतर्सालींत व लांकडामध्यें पोखरीत असतात. त्यामुळें झाडांना भोंकें पडून आंतून भुसा बाहेर येतो. आंतील किडा पोखरीत पोखरीत वर किंवा खालीं जातो व त्यामुळें झाड सुकतें व लवकरच उपाय न झाल्यास मरतें. आंतील किडा पोसला गेल्यावर त्याच्या पंखाचा किडा–भुंगेरा बनतो. त्याचीं शिंगें फार लांब व टणक असतात.

**भिल्ल**—भिल्ल हा शब्द द्राविडी भाषेंतील बिल्ला=धनुष्य धारण करणारा, या शब्दापासून निघाला आहे. भिल्ल हे द्राविड वंशाचे लोक असून त्यांची प्राचीन काळीं पश्चिम व मध्य हिंदुस्थानांत वस्ती होती. राजपुताना, माळवा अगर गुजराथ प्रांतांतील रजपूत संस्थानांत ज्या वेळीं रजपूत राजा राज्यारोहण करतो त्या वेळीं भिल्लांच्या अंगठ्यांतून काढलेल्या रक्ताचा राजाच्या कपाळावर टिळा लावण्याची चाल आहे. आपण महादेवाचे वंशज आहों असें भिल्ल लोक मानतात. मुसलमानी अमदानींत नव्हे तर मराठेशाहींत मात्र त्यांनीं पुष्कळदां दंगेधोपे माजविण्याचा प्रयत्न केला. पण मराठ्यांनीं त्यांना सतावून सोडून डोंगराळ मुलुखाचा आश्रय घेण्यास भाग पाडलें. भिल्ल लोकांची एक पलटण तयार करून त्यांचा इतर रानटी जातींना ताब्यांत आणण्याच्या कामीं ब्रिटिशांनीं पुष्कळ उपयोग करून घेतला.

१९११ सालीं भिल्लांची लो. सं. सुमारें १६ लाख होती. हल्लीं भिल्लांचे मुख्य धंदे म्हणजे शेतकी, मजुरी व पहारा करणें हे होत. ते अंगानें धडधाकट पण खुजे आहेत. ते रुंद नाकाचे, काळया रंगाचे असून त्यांचें शरीर राकट असतें. चोऱ्या व दरवडे घालण्यांत हे पटाईत असतात. ते अत्यंत धाडसी व शूर असतात. चैनीची त्यांना फार हौस असते. भिल्लांमध्यें दारूचें व्यसन मोठ्या प्रमाणावर आढळतें. घोडा, वाघ व कुत्रा या प्राण्यांना भिल्ल फार पवित्र मानतात. या लोकांत वैवाहिक नीतिबंधनें फार शिथिल आहेत. आसुर व पैशाची या प्रकारचे विवाहहि या जातींत घडून येतात. यांच्यांत प्रत्येक टोळीचा एक मुख्य असतो, त्याला नाईक, पाटील अगर गमती असें म्हणतात. याशिवाय प्रत्येक जातीची एक पंचायत असते. खानदेशांत भिल्लांची वस्ती आहे. तेथें यांचें यात्रेचें ठिकाण म्हणजे हणमंत नायकाची वाडी होय. हें संगमनेरच्या दाक्षिणेस आहे. गुजराथेंतहि मोठी वस्ती आहे. कांहीं आपणांस वाल्मीकीचे वंशज म्हणवितात. हे देवी-उपासक आहेत. यांचा भुतांखेतांवर फार विश्वास असतो. पूर्वी यांची चोरीसंबंधानें मोठी दुष्कीर्ति असे. आतां सुधारणा होत आहे. श्री. अमृतलाल ठक्करांसारखे समाजसेवक यांच्यांत जागृति करीत आहेत.

**भिल्लम यादव** (राज्य. ११८७-९१)— देवगिरीच्या यादव घराण्यांतील मल्लुगीचा हा मुलगा आपणांस प्रतापचक्रवर्ती व महाराजाधिराज अशीं बिरुदें धारण करून गादीवर आला. होयसळ राजपुत्राचा वध करून यानें कल्याणी घेतली व देवगिरि (दौलताबाद) ही आपली राजधानी केली. होयसळ राजा बल्लाळ २ रा यानें याचा पराभव केल्यावर थोडयाच दिवसांत हा मरण पावला. यानें सोमेश्वर चालुक्याचें मांडलिकत्व गुंडाळून ठेवलें. नादोलच्या केल्हण राजाशीं झालेल्या युद्धांत यास माघार घ्यावी लागली. याच्या पश्चात् याचा मुलगा जैतुगी १ ला हा गादीवर आला.

**भिवगड**—यास भीमगड असेंहि म्हणतात. हा कर्जतच्या पूर्वेस सुमारें ३ मैलांवर ५०० ते ६०० फूट उंचीच्या टेंकडीवर बांधलेला आहे. किल्ल्यांत दोनतीन पाण्याचीं टाकीं आहेत.

**भिवंडी**— मुंबई इलाखा, ठाणें जिल्ह्यांतील मध्यवर्ती तालुका. क्षे. फ. २४९ चौरस मैल. लो. सं. ९३६१९ आहे. या तालुक्यांतील जमीन फार सुपीक असल्यामुळें तेथें दाट वस्ती आहे. पश्चिमेकडील भाग डोंगराळ आहे. भिवंडी हें या तालुक्याचें मुख्य गांव. लो. सं. १८,७७६. गांवांत मुसलमानांची वस्ती बरीच आहे. येथें १८६५ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. या गांवचें व्यापारीदृष्ट्या महत्त्व वाढत आहे. व्यापाराचे जिन्नस तांदूळ, खारावलेले मासे, कापड, गवत, लांकूड, वगैरे होत. येथें हातमाग व भाताच्या गिरण्या आहेत.

**भिवा सुतार**—पेशवाईच्या अखेरीस हा मूर्तिकार होऊन गेला. यानें पुण्यांतील रास्तेवाड्यांतील राम, वांईचा मुरलीधर व इतर कांहीं देवमूर्ती घडविल्या. त्या अत्यंत सुंदर आहेत. औंधच्या प्रतिनिधींच्या जवळचें रामपंचायतन या भिवा सुताराचेंच आहे.

**भिसे, डॉ. शंकर आबाजी** (१८६७-१९३५)— एक महाराष्ट्रीय संशोधक. मुंबईस यांचा जन्म झाला. धुळें हायस्कुलांत शिक्षण झाल्यावर यांनीं कांहीं दिवस बॉंबे पेपर मिलचे व्यवस्थापक म्हणून व आग्रा लेदर फॅक्टरीचे प्रमुख डायरेक्टर म्हणून काम केलें. प्रथमपासूनच यांना लहान लहान यंत्रें तयार करण्याची आवड होती व तिला सन १८९७ मध्यें हे लंडनमध्यें गेल्यावर मूर्तस्वरूप आलें. आपोआप वजन होणारीं यंत्रें तयार करून यांनीं इंग्लंडमध्यें नांव मिळवलें. यानंतर 'पुष्कळ जाहिरातींचें एकदम प्रदर्शन करणारा दिवा', 'समुद्राच्या तळाशीं प्रकाश देणारा दिवा', 'सायकल थांबतांच तिला जागच्या जागीं उभें करणारें यंत्र', इत्यादि नवीन शोध यांनीं लावले. १९०८ सालीं यांनीं एकाच वेळीं अनेक टाइप पाडणाऱ्या यंत्राची कृति काढली. याप्रमाणें यांच्या नांवावर चाळिसाहून अधिक स्वामित्वाधिकार (पेटंट्स) आहेत.

१९१० सालीं सर रतन टाटा यांच्या आर्थिक साहाय्यानें इंग्लंडला जाऊन यांनीं ॲटोमिडिन (ॲटॉमिक आयोडिन)चा शोध लावला. 'वेसलीन'चा शोधहि यांचाच आहे. या अपूर्व संशोधनकार्यांमुळें सर्व जगभर यांची कीर्ति झाली. लंडनच्या रॉयल सोसायटीनें यांना फेलोशिप दिली. तसेंच यांच्या साठाव्या वाढदिवशीं न्यूयॉर्क युनिव्हर्सिटीनें यांना डी. एस्सी. ही पदवी अर्पण केली.

**भिक्षेकरी**—जगात हिंदुस्थानइतके दानधर्मावर चेपिकीर-पणें निरुद्योगी राहून जगणारे लोक बहुधा नसतील. १९३१ च्या खानेसुमारीप्रमाणें यांची संख्या सुमारें १४ लाख होती. या भिकाऱ्यांत लहान मुलें, शारीरिक व्यंगें असणारे, मानसिक व्याधि असणारे, रोगी, धट्टपुष्ट, धार्मिक संप्रदायी, धर्माच्या नांवाखालीं भीक मागणारे, भिकारी जातींचे, नोकर भिकारी, किरकोळ धंदे करणारे, तात्पुरता किंवा कायमचा उद्योग नसणारे, इ. अनेक प्रकारचीं माणसें असतात. या १४ लाखांपैकीं सुमारें निम्मे तरी शरीरानें धडधाकट आहेत. बाकीचे कांहीं तरी शारीरिक किंवा मानसिक व्याधींनें ग्रस्त झालेले असतात. हिंदुस्थानांत ६ लाख आंधळे, २॥ लाख बहिरे-मुके, १ लाख वेडे व १॥ लाख महारोगी असून यांच्याकडे समाजाला किंवा सरकारला लक्ष देतां येत नाहीं. बेकारांना कांहीं काम देतां येत नाहीं म्हणून तेहि भिकारी बनतात. या भिकाऱ्यांचें नीट संगोपन करून काम दिल्यास आज समाजाला जो व्यर्थ खर्च लागतो त्यांत किती तरी बचत होणार आहे. लखनौ शहरांत भीक मागणें हा गुन्हा समजला जातो व गुन्हेगारांना 'गरीबघरां'तून ठेवण्यांत येतें. दररोज अशा भिकाऱ्यांना पोसण्यासाठीं लखनौच्या नागरिकांना ५०० रु. खर्च करावा लागतो. मुंबईला ५००० भिकाऱ्यांसाठीं दरसाल ९ लाख रुपये खर्चावे लागतात. १९४५ च्या मुंबई भिक्षेकऱ्यांच्या कायद्यान्वयें त्यांना पोटाचा उद्योग सरकार शिकवितें व शक्य तर काम लावून देतें. यांच्या जाती बऱ्याच आहेत. जाती पाहा.

**भीम**—१. विदर्भदेशाधिपति एक राजा व नलपत्नी दमयंतीचा पिता.

२. पांडवांपैकीं दुसरा. भीम हा कुंतीस वायूपासून प्राप्त झाला. यास दहा हजार हत्तींचें बल होतें. यानें आपल्या अंगच्या शक्तीनें दुष्टांना बऱ्याच वेळां शासन केलें आहे. यानें बकासुर, हिडिंब, जरासंध, कीचक, वगैरे मोठ्या वीरांनाहि ठार मारिलें. यानेंच दुर्योधनाला मारून भारतीय युद्ध संपविलें. हा बलरामाचा शिष्य होता. यास द्रौपदीपासून श्रुतसेन (सुतसोम) व हिडिंबेपासून घटोत्कच असे पुत्र झाले. तिसरी एक स्त्री म्हणजे काशीराजाची कन्या जलंधरा; हिला शर्वत्रात (सर्वगत) पुत्र झाला. याच्या ध्वजावर सिंह असून रथाचे घोडे आस्वली रंगाचे असत. याच्या धनुष्याचें नांव वायव्य व शंखाचें नांव पौंड्र असे. याचें मुख्य आयुध म्हणजे गदा होय. भीमासंबंधीं बऱ्याच कथा आहेत; त्यांत याचें बल व निष्कपट स्वभाव हीं दिसून येतात. हा अत्यंत मातृभक्त व भ्रातृभक्त होता.

**भीमक**—भीष्मक. विदर्भ देशाचा अधिपति व रुक्मिणीचा पिता. याची राजधानी कुंडिनपुर होती. यास रुक्मी, रुक्मरथ, रुक्मबाहु, रुक्मकेश व रुक्ममाली असे पांच मुलगे व रुक्मिणी ही एकच कन्या होती.

**भीमथडी**—मुंबई, पुणें जिल्हा, पूर्वेकडील एक तालुका. दौंड पेटा धरून क्षे. फ. १०३६ चौ. मै. व लो. सं. (दौंड पेटा सोडून) (१९४१) १,१२,९३८. तालुका साधारणतः सपाट आहे. भीमा, कऱ्हा व नीरा या मोठ्या नद्या यांतून वाहतात. पाऊस कमी, पण कालव्याच्या पाण्यावर पिकें होतात. ज्वारी, ऊंस, हरभरा, भुईमूग, वगैरे पिकें होतात. तालुक्याचें मुख्य ठिकाण बारामती. तालुक्यांत माळेगांवची जहागिरी आहे. यांतील मोरगांवचा गणपति अष्टविनायकांपैकीं आहे. सुपें हें इतिहासप्रसिद्ध गांव आहे.

**भीमदेव**—१. (१०२६-१०७२)—गुजराथच्या चालुक्य वंशांतील एक महापराक्रमी राजा. याचा समकालीन माळव्याचा परमारवंशीय भोजराजा होता. भीमदेवानें अबूवरील जैनमंदिरें व पालिठाणा-चंद्रावती येथील सुंदर मंदिरें बांधलीं. यानें प्रजापालन चांगलें करून शांततेनें राज्य केलें. नंतर कर्ण नांवाच्या पुत्रास गादीवर बसवून आपण वानप्रस्थाश्रम स्वीकारला.

२. चितोडच्या पद्मिनीच्या पतीचें नांव. याचें नांव भीमसिंह किंवा रतनसिंह असेंहि आढळतें. पद्मिनी पाहा.

**भीमदेव (भोळा)** (११७९-१२१५)—हा गुजराथच्या चालुक्य वंशांतील एक राजा होय. याची हकीगत विशेषतः चंदभाटाच्या रासाग्रंथांत आढळते. दिल्लीचा पृथ्वीराज चव्हाण हा त्याचा समकालीन होता. त्या वेळेस भीमराजा महाबलाढ्य म्हणून गणला जात असे. त्याचें सैन्य फार मोठें असून सिंध देशापर्यंत त्याचीं जहाजें वावरत असत. अमरकोशकर्ता अमरसिंह त्याच्याच दरबारीं होता. भीमदेव व पृथ्वीराज यांच्यामध्यें इच्छिनीकुमारी नांवाच्या एका राजकन्येमुळें हाडवैर माजलें. ह्या वैरामुळेंच मुसलमानांस हा देश हस्तगत करतां आला. पृथ्वीराजाचा नाश झाल्यानंतर शियाबुद्दीन घोरीचा सरदार कुत्बुद्दीन यानें भीमदेवावर स्वारी केली (११९४). तींत भीमदेवाचा पराभव झाला, परंतु तो १२१५ सालापर्यंत गादीवर होता. त्याच सालीं तो मेला व गुजराथचें राज्य सोळंखी वंशाकडून गेलें. याला भोळा भीम असें म्हणतात.

**भीमपलासी**—हा राग काफी थाटांतून निघतो. याच्या आरोहांत ऋषभ व धैवत हे स्वर वर्ज्य आहेत आणि अवरोह सात स्वरांनीं होतो म्हणून याची जाति औडुव-संपूर्ण आहे. वादी स्वर मध्यम व संवादी षड्ज आहे. गान-समय दिवसाचा तिसरा प्रहर समजतात.

**भीमसिंह**—१. (१४६९-१४८९)—मुधोळच्या घोरपडे घराण्याचा संस्थापक. हा चितोडच्या सुजनसिंहाचा वंशज व

कर्णसिंहाचा मुलगा. कर्णसिंह आणि भीमसिंह यांनीं कोंकणावर स्वारी करून घोरपडीच्या साहाय्यानें एक किल्ला सर केला म्हणून त्यांना घोरपडे बहादर ही पदवी मिळाली व त्यांना मुधोळच्या भोंवतालचा मुलूख बक्षीस देण्यांत आला.

२. (१७६८-१८२८)—मेवाडचा एक राणा. यानें प्रथम होळकरांची व पुढें इंग्रजांची शत्रूशीं लढण्यास मदत घेतली, पण त्याचा परिणाम वाईट झाला. याची मुलगी कृष्णाकुमारी (पाहा) विष घेऊन मेली व इंग्रजांनीं याचा राज्यकारभार आपल्या हातीं घेतला. हा कवि असून यानें 'भीमविलास' नांवाचें काव्य रचलें आहे. पुत्रकन्याविरहानें हा मृत्यु पावला.

**भीमस्वामी**—१. (शके १५६४-१६६३)—रामदासस्वामींचा एक शिष्य व चरित्रकार. यास शहापूर येथील मठाचें महंतपण मिळालें होतें. शके १५९७ च्या सुमारास हा शिवाजीबरोबर तंजावरकडे गेला असतां व्यंकोजीनें तेथें एक मठ बांधून दिला; तेथें त्याची परंपरा अद्याप चालत आहे. यानें समर्थांचें एक लहान चारित्र लिहिलें असून शिवाय कांहीं पदें केलीं आहेत.

२. (समाधि शके १६९३)—एक रामदासी महंत. यास बिडकर भीमस्वामी म्हणतात. याचा मठ बीड येथें आहे. हा नरहरि मोरेश्वर देशपांडे (पाहा) याचा गुरु होता.

३. रामदासाचा एक शिष्य व महंत. हा शिरगांव मठाचा अधिपति होता. यानें 'भक्तलीलामृत' हा ग्रंथ शके १७१९ मध्यें रचला; व अवंती येथें समर्थचरित्रात्मक १२१ अभंग केले.

**भीमा**—महाराष्ट्र व दक्षिण हिंदुस्थान यांतील एक नदी. ही भीमाशंकराजवळ सह्याद्रि पर्वतांत उगम पावून पुणें, सोलापूर, विजापूर या जिल्ह्यांतून वाहत जाऊन पुढें निजामच्या राज्यांत शिरून रायचुरापासून १६ मैलांवर कृष्णेस मिळते. पहिले ४० मैल हिचा प्रवाह एका दरींतून जातो. रांजणगांवाजवळ हीस मुळा व मुठा या नद्या मिळतात व तेथेंच घोडनदी हिला मिळते. टेंभुर्णीजवळ हिला निरा मिळते. यांखेरीज दुसऱ्या हिला मिळणाऱ्या नद्या माण व सिना (अहमदनगराजवळ) या होत. या नदीच्या कांठीं पंढरपूर हें क्षेत्र आहे. तेथें तिला चंद्रभागा असें नांव आहे. या नदीला भीमरथा, भीमरथी अशींहि नांवें आहेत. प्रातःस्मरणांत या नदीचें नांव आहे.

**भीमाशंकर**—मुंबई इलाखा, पुणें जिल्हा, खेड तालुका. यांत भोवरागिरि नांवाचें एक खेडें आहे; तेथें या नांवाचा किल्ला व महादेवाचें देऊळ आहे. भीमाशंकर हें एक सह्याद्रि पर्वताचें ३४४८ फूट उंचीचें शिखर आहे. येथें भीमा नदीचा उगम आहे. येथील महादेव बारा ज्योतिर्लिंगांपैकीं असल्यानें शिवरात्रीस मोठी यात्रा भरते. हें स्थान जंगलांत आहे. देवळाचा नाना फडणिसानें जीर्णोद्धार केला. आतां पुण्यापासून थेट देवळापर्यंत सडक आहे व मोटारी जातात. दुसरा रस्ता कर्जत-नेरळकडून आहे. पण तो रस्ता डोंगराळ असून शेवटपर्यंत बैलगाड्याहि जात नाहींत. पुण्याचे भिडे सावकार यांनीं हें देऊळ प्रथम बांधल्याचा तेथें शिलालेख आहे.

**भीवराव पानसे** (मृत्यु १७७९)—मराठ्यांच्या तोफखान्यावरील एक सरदार. तारीख ८ मार्च १७७९ रोजीं इट्टुर फांकड्यास मारून तळेगांवाजवळ इंग्रजांचा यानें पराभव केला. सदाशिवरावाच्या तोतयानें कोंकणांत पुंडाई चालवली असतां यानें व शिंद्यांनीं तोतयाचा मोड केला. बोरघाटांतील तीन-चार लढायांत याचें शौर्य विशेष दिसून आलें. नंतर हा एकाएकीं तापानें मरण पावला. पानसे घराणें पाहा.

**भीष्म**—सोमवंशीय शंतनु राजास गंगेपासून झालेला पुत्र. यानें लहानपणीं पित्याला धीवरकन्या मत्स्यगंधा हिच्याशीं लग्न करतां यावें म्हणून राज्यावर न बसण्याची शपथ वाहिली व पुढेंहि आपल्या संततीचा सावत्रपणा बाधक होऊं नये म्हणून आमरण ब्रह्मचारी राहिला. तेव्हां 'इच्छामरणी होशील' असा पित्यानें त्याला आशीर्वाद दिला; तेव्हांपासून हा चिरंजीव झाला आहे. हा भारतीय युद्धांत १० दिवस लढला. यानें आपला बंधु विचित्रवीर्य याच्याकरितां काशीराजाच्या कन्या अंबा, अंबिका, अंबालिका यांस सर्व राजांचा पराजय करून आणिलें. परशुरामाचा हा शिष्य होता, पण युद्धामध्यें त्याचाहि भीष्मानें पराभव केला होता. धृतराष्ट्रपुत्र व पंडुपुत्र यांच्यामध्यें युद्ध होऊं नये म्हणून यानें पुष्कळ प्रयत्न केला, पण तो व्यर्थ गेला. शेवटीं यालाच पांडवांविरुद्ध संगर करावा लागला. याचा पराभव करणें पांडवांना जड होतें. तेव्हां यानेंच आपल्या वधाचा उपाय पांडवांस सांगितला. त्याप्रमाणें शिखंडीला पुढें घालून अर्जुनानें यास जिंकलें. तेव्हां दक्षिणायन होतें. तें मृत्यूला शुभ नव्हतें. म्हणून हा इच्छामरणी असल्यानें उत्तरायणापर्यंत शरपंजरीं राहिला व नंतर यानें देहत्याग केला. भारतीय युद्धानंतर कुलक्षयामुळें खिन्न झालेल्या धर्मराजास यानें राजधर्म, वर्णधर्म, इत्यादींचा उपदेश केला. सत्यवचनी, स्वार्थत्यागी, अत्यंत निष्कपटी म्हणून भीष्माला मोठा मान आहे. त्यानें पित्यासाठीं ब्रह्मचर्य पाळून कौरवकुलाची हानि करविली, व कौरवांना अन्याय्य वर्तनांपासून परावृत्त केलें नाहीं, म्हणून कोणी चिकित्सक पंडित याला दोष देतात.

**भीष्माचार्य**—एक महानुभावी ग्रंथकार. हा तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेला. हा रामदेवरावाच्या दरबारांतील बोपदेवाचा शिष्य असून उपाध्य आम्नायांतील हेतुस्थळकर्ता न्यायव्यास याच्याकडून यानें दीक्षा घेतली. 'दिन-

करप्रबंध', 'दत्तात्रेयप्रबंध' व ब्रह्मोपनिपदांवरील 'धाराविंच भाष्य' हे याचे प्रमुख सुप्रसिद्ध ग्रंथ होत. यांशिवाय 'पदार्थ-दीपिका', 'मार्गप्रभाकर', 'मुक्तामाला', 'पंचवार्तिक', 'सिद्धांतस्थळ', वगैरेहि अनेक ग्रंथ यानें लिहिले. याचा 'पंचवार्तिक' हा ग्रंथ भाषाशास्त्रावर व 'नामविभक्ति' हा ग्रंथ व्याकरणविषयक आहे. आनेराज चास याच्या 'द्वात्रिंशलक्षण' या संस्कृत ग्रंथावर याची मराठींत टीका आहे. तिचें नांव 'लक्षणरत्नाकर' असें आहे.

**भीष्माष्टमी**—माघ शुक्ल अष्टमीला भीष्माष्टमी म्हणतात. या दिवशीं भीष्म दिवंगत झाला. या दिवशीं सर्वांनीं, जीवत्पितृकांनीं सुद्धां भीष्माच्या तृप्त्यर्थ तर्पण करावें असें पुराणांत सांगितलें आहे व त्याप्रमाणें करण्याचा प्रघातहि दृष्टीस पडतो. भीष्म ब्रह्मचारी असल्यानें त्याला कोणी तर्पण देण्याला राहणार नाहीं म्हणून ही सार्वजनिक तर्पणाची चाल पडली असावी असें वाटतें.

**भुइया**—अथवा भुइन्यार. ह्या नांवाची एक रानटी जात आहे. यांची लो. सं. सुमारें ८॥ लाख आहे. बहुतेक या लोकांची वस्ती छोटा नागपूर व संताळ परगणे यांत आहे. भुइया हा शब्द संस्कृतांतील भूमि शब्दापासून झाला आहे. बंगल्यांतील कांहीं विवक्षित जातीस भुइया असें म्हणतात. कांहीं ठिकाणीं एकाच जातीस हें नांव देण्यांत आलें आहे. हे लोक छोटा नागपूर व ओरिसा संस्थानें यांतून आले असा कांहींचा तर्क आहे. सिंगभूम, रांची, मानभूम या भागांतून त्यांस हो, मुंडा, ओराओना, वगैरे लोकांनीं हांकलून दिलें असावें. यांच्या दैवताचें नांव रिखमुन अथवा रिखिआसन आहे. भुमिया जातहि यांच्यांत मोडते.

**भुईकोहोळा**—ही भोंवरीच्या वेलाची जात आहे. यास जांभळ्या रंगाचीं फुलें पावसाळ्यांत येतात. वेल पुष्कळ वर्षें टिकतो. वेलास फळें व बीं कधीं कधीं येतें. वेलाच्या मुळाशीं जमिनींत मोठमोठाले गड्डे, सुरणाएवढाले पण निरनिराळ्या आकारांचे लागतात; तेच भुईकोहोळे होत. ते औषधी असून त्यांची भाजी करून खाण्यांत येते. त्यांचें कुटून पीठ करून तें दुधांत घालून लापशी करतात. हे गड्डे रताळ्याप्रमाणें भाजून खाण्यासहि गोड लागतात. कोहोळा हा फार पौष्टिक आहे. याचा पाक करतात. साधा व दुध्या असा दोन जाती आहेत. साध्या वेलास कोंकणांत चेंद्रीचा वेल म्हणतात. घोडवेल असेंहि नांव आहे. दुध्या कोहोळ्याच्या कांद्यास 'हळद्या कांदा' असें दुसरें नांव आहे. मस्तकशूळावर साधा भुईकोहोळा उगाळून लेप देतात. अंगास कळा लागतात तेव्हां रस पोटांत देतात.

**भुईचांफा**—हें झाड लहान असतें. पण कर्दळीप्रमाणें याचें बेट माजतें. हीं झाडें पावसाळ्यांत फुटतात. फूल मधुर सुवासिक असतें. गालगुंड, कर्णमूळ, गंडमाळा, वगैरेंवर मुळी पाण्यांत उगाळून लावतात.

**भुईतरवड**—पानांवरून याचे दोन-तीन प्रकार पडले आहेत. 'सोनामुखी' जात लांबट पानाची आहे. भुईतरवडीचीं झाडें वेलाप्रमाणें जमिनीवर पसरतात. यास चापट शेंगा येतात. रेच होण्यास पाल्याचा रस किंवा काढा देतात. कानठाळ्या बसल्या असतां याचें चूर्ण ऊन पाण्यांत देतात.

**भुईपात्रा**—ही एक रानभाजी आहे. पानें चपटीं असून जमिनीवर पसरलेलीं असतात. हिची क्वचित् भाजी करून खातात; पण ती बरी लागत नाहीं.

**भुईमूग**—( चिनी बदाम ). भुईमुगाचे ताणे जमिनीवर

पसरतात. यांस पिवळ्या रंगाचीं फुलें येतात. फुलें सुकलीं म्हणजे वेलास आऱ्या फुटून त्या जमिनींत जातात व तेथें मोठ्या शेंगा बनतात. भुईमुगाची लागवड हिंदुस्थानांत थोड्याबहुत प्रमाणावर सर्वत्र होते. तथापि मुंबई, मद्रास, व ब्रह्मदेश या ठिकाणीं या पिकाची लागवड विशेष होते. हें पीक दक्षिण अमेरिका ( पेरू व ब्राझील ) खंडांतून चीनमधून हिंदुस्थानांत आलें असावें, असा अंदाज आहे. बंगाल्याकडे भुईमुगाला अद्यापि चिनई बदाम म्हणतात. १९०१ सालापर्यंत मुंबई इलाख्यांत भुईमुगाची एकच 'गांवठी' जात होती. त्या सालीं पहिल्यानें पोंडेचेरी नांवाची जात परदेशाहून आणून तिचा प्रसार शेतकीखात्यानें सातारा व पुणें या जिल्ह्यांत केला. १९०२ सालीं अमेरिकेंतून दोन जाती 'व्हर्जिनिया' व 'स्पॅनिश पीनट' आणि जपानांतून दोन जाती, 'मोठा व धाकटा

भुवनेश्वर — पुष्करणी (पृ. १८२२)

भोर — श्रीमंत राजे बाबासाहेब पंतसचिव (पृ. १८४३)

जपान' या आणिल्या. या सर्व जातींचें उत्पन्न चांगलें असल्यामुळे यांचा प्रसार स. १९०३ मध्यें शेतकरी लोकांत करण्यांत आला. विलायती भुईमुगाचें उत्पन्न जास्त येऊं लागल्यामुळे व शेतकरी लोकांकडून मागणी वाढत चालली म्हणून पुन्हां १९०६ व १९०७ सालीं बीं आणिलें. या नवीन जाती देशी भुईमुगापेक्षां लवकर तयार होतात, उत्पन्न जास्त येतें, पाणी कमी पुरतें व त्या हलक्या जमिनींत होतात; त्यांत तेलाचें प्रमाणहि जास्त असतें. यांस तयार होण्याला सुमारें पांच महिने लागतात. देशीला सहासात महिने लागतात.

भुईमुगाला हलकी, भुसभुशीत जमीन चांगली. मध्यम काळ्या जमिनींतहि भुईमूग चांगला येतो. जमीन निचऱ्याची असावी. शेंगा जमिनींत तयार होत असल्यामुळे जमीन नांगरून, कुळवून ढेकळें फोडून तयार करावी. पेरणी झाल्यावर सुमारें एक आठवडाभर कावळे व इतर पांखरें यांपासून पिकाची राखण केली पाहिजे. पीक तयार झालें म्हणजे डुकरें व कोल्हे यांच्यापासून त्याचा बचाव करावा लागतो.

याच्या शेंगाचे दाणे खातात. आपल्याकडे उपवासाच्या पदार्थांत भुईमुगाचा वापर फार असतो. तेलाचा जाळण्यास व खाण्याच्या पदार्थांत पुष्कळ उपयोग होतो. पेंड गुरांना सर्वोत्कृष्ट असून तिचा खताकडेहि उपयोग होतो. हल्लीं पेंडींत गव्हाचें पीठ मिसळून त्याचे पाव व बिस्किटें तयार करतात. याचा पाला व देंठ यांचा चारा गुरांना फार पौष्टिक आहे. हिंदुस्थानांतून–विशेषतः फ्रान्स देशांत–भुईमूग फार जातो. तिकडे या तेलाचें मार्जोरिन करतात. साबण व मेणबत्त्या करण्याकडे याचा फार उपयोग होतो. भुईमुगाच्या पिठांत सोडियम कार्बोनेट व गोठलेलें दूध मिसळून एक न्यूट्रोझ नांवाचें अन्न तयार करतात. डाल्डासारखी 'वनस्पति' (तेलें) भुईमुगापासून करतात. त्याचा तुपाप्रमाणें उपयोग करतात.

या पिकानें जेवढी जमीन हिंदुस्थानांत व्यापली गेली आहे तेवढी जगांत कोठेंच नाहीं. मद्रास प्रांतांत वहित जमिनीच्या निम्मी जमीन यासाठीं आहे. त्याच्याखालोखाल मुंबई व हैद्राबाद येतात. १९४१–४२ सालीं हिंदुस्थानांत सु. ७० लक्ष एकर जमिनींत भुईमूग पेरला होता. त्या सालीं ३० टन उत्पन्न आलें. महायुद्धापूर्वी भुईमुगाची निर्यात फार होत असे. पण युद्धकालांत देशांतल्या उपयोगासाठीं ती कमी करण्यांत आली. गुरांना याची पेंड देतातच, पण त्याखेरीज 'वनस्पति तूप' करण्याकडे युद्धकालापासून फार उपयोग होऊं लागला आहे. सुमारें दीड लक्ष टन भुईमूग मागच्या युद्धोत्तर ४ वर्षांत 'वनस्पती'-साठीं खर्च झाला. हिंदुस्थानच्या $\frac{1}{2}$ भुईमूग चीनमध्यें होतो.

सु. वि. भा. ४–५४

**भुईरिंगणी वर्ग**—[ जात सोलानासी ]. हा एक अविभक्त पुष्पकोश असणाऱ्या द्विदल वनस्पतींचा वर्ग आहे. यामध्यें कांहीं झुडपें व कांहीं वानस्पतिक रोपें येतात. यांचीं पानें एकाआड एक येतात. यांच्या अग्रभागीं मोहोर येतो व फुलें साधीं असतात. या वर्गांत वांगीं, तंबाखू, बटाटे, टमाटे, वगैरे झाडें येतात.

**भुईशिरड**—गुदांवीचा कांदा. याचें झाड फार लहान असतें. कांदा चांगला हातभर देखील लांब असतो. याचा चीक चिव्याप्रमाणें उततो. गुरांच्या डोळ्यांस भूर येते किंवा फूल पडतें तेव्हां चिकाचा आंखावर एक ठिपका देतात. गंडमाळेवर कांदा वांटून लावतात.

**भुंगेरे**—कवचपक्ष वर्गांत हे किडे पडतात. यांच्या वरच्या पंखाखालीं दुसरे पातळ पंख असतात. उडते वेळीं हे पातळ पंख दिसतात. या भुंगेऱ्यांच्या तोंडाची रचना अन्न चावून खातां येण्याजोगी असते. या कीटकांत रूपांतर असल्यामुळे अंडें, अळी, कोश व भुंगेरा अशा चार अवस्था आढळतात. अंडीं पांढरीं, गोल असतात. त्यांतून बाहेर पडणाऱ्या अळ्या साधारणपणें पांढऱ्या रंगाच्या तांबडसर डोक्याच्या असून त्यांचा जबडा व दांत तीक्ष्ण असतात. यांचें अन्न झाडांचीं फळें, मुळें, बुंधे, फांद्या, पानें, तसेंच वाळलेलें धान्य, वगैरे होय. अळ्यांचे पुढें कोश बनतात. त्यांतून बाहेर येणारे भुंगेरेहि तेंच अन्न खातात. जुनीं लांकडें फोडतांना बाहेर पडणाऱ्या किंवा शेणखतांत सांपडणाऱ्या पांढऱ्या लठ्ठ अळ्या भुंगेऱ्यांच्याच होत. या अळ्यांस फक्त उरासच सहा पाय असतात. काजवे, पलिस्तराचे किडे, धान्यांत सांपडणारे किडे याच वर्गांत येतात.

**भुज**—मुंबई इलाखा, कच्छ संस्थानची राजधानी. 'भुजंग' या शब्दावरून हें नांव पडलें. हें गांव तटबंदी टेंकडीच्या पायथ्याशीं आहे. लो. सं. २६,७५०. येथें म्युनिसिपालिटी, २ हायस्कुलें, तुरुंग, दवाखाना, इस्पितळ, वगैरे संस्था आहेत. पुराणवस्तुसंशोधनाच्या दृष्टीनें हें स्थळ फार महत्त्वाचें आहे. राव लाखाचा राजवाडा प्रेक्षणीय आहे.

**भुयारें**—आपल्या देशांत देवांकरितां व तपस्वी लोकांकरितां भुयारें करण्याची चाल फार होती. अहमदाबादेस जीं भुयारें आहेत त्यांत तर मोठमोठीं देवळें आहेत. तेथें 'भुयरियो कुवो' म्हणून एक विहीर असून तींत एक भुयार काढलें आहे. याशिवाय तेथील लोकांच्या घरांतहि पुष्कळ भुयारें असून त्यांतील कित्येक हल्लीं बुजून गेलीं आहेत. तेथील नदीच्या कांठीं पांचपिंपळीजवळ असेंच एक भुयार आहे. व नदीच्या पलीकडे काश्मिरी बोवांच्या मठांत एक मोठें भुयार आहे. याचप्रमाणें प्रभासाजवळ गोरखमठी आहे तेथेंहि एक भुयार आहे. अशीं

ठिकठिकाणीं अनेक भुयारें आहेत. पूर्वी राजे लोक हीं भुयारें घरांत करीत होते. वडोद्याजवळ पावागड येथें पूर्वीच्या क्षत्रिय राजांचे जे महाल आहेत ते डोंगरांत कोरून त्यांस मजले केले आहेत. त्यांत माणसें व खुद्द राणी चंपावती राहत होती असें म्हणतात. याशिवाय काठेवाड प्रांतांत जसदन येथें असलेलें भुयार तर प्रख्यातच आहे. भरतपुराजवळ डीग म्हणून एक शहर आहे तेथील राजांनीं 'भुवनें' म्हणून जमिनींत अशाच इमारती केल्या आहेत त्या पाहण्यासारख्या आहेत. त्या भुयारांतील इमारतींत थंडीच्या दिवसांत व उन्हाळ्यांत राहणें सुखकर असतें. व तेवढ्याकरितांच त्या केल्या असाव्यात असा तर्क आहे. महाराष्ट्रांतहि जुन्या वाड्यांतून भुयारें ठेवण्याची प्रथा होती. किल्ल्यांत तर अशीं भुयारें जागजागीं असत. जीवित व वित्त यांच्या संरक्षणासाठीं यांचा उपयोग होत असे. कांहीं वांटा जमिनीखालून असत. आजचीं तळघरें भुयारेंच म्हणतां येतील.

**भुरभुरणारा कोळसा**—(कॅनेल कोल). दगडी कोळशाची एक जात. याला शिलाजित कोळसा असें म्हणतां येईल. रंगानें मंद काळा असून त्याचे सहज तुकडे करतां येतात. जळतांना त्याची ज्योत पांढरी आणि लांब पसरणारी असते. ह्याचें घटनाप्रमाण (कॉंपोझिशन) कर्ब शें. ६६ ते ८४, उज्ज शें. ५ ते ९, प्राणवायु आणि नत्र शें. ५ ते १०, आणि राख शें. २ ते ६ असते. ह्याची उष्णताक्षमता (कॅलोरिक व्हॅल्यू) ब्रिटिश उष्णता-परिमाणाप्रमाणें १२००० ते १४००० पर्यंत असते व १ टनांतून सु. ११००० घनफूट ज्वलनवायु निघूं शकतो.

**भुलेश्वर**—मुंबई, पुणें जिल्हा. सह्याद्रीच्या फांट्यावरील एक प्राचीन देवस्थान. याला 'दौलत मंगल' असेंहि ऐतिहासिक नांव आहे. हें सुमारें पांचशें वर्षांपूर्वीचें शंकराचें हेमाडपंती बांधणीचें देवालय आहे. यावर बरेंच प्रेक्षणीय शिल्प आहे. मुरार जगदेव यानें पुणें जाळल्यानंतर (स. १६२९) याभोंवतीं एक किल्ला बांधला होता; पण आतां तो सर्व पडला. ब्रह्मेंद्रस्वामीनें बराच खर्च करून या देवळाचा जीर्णोद्धार केला होता. पण आज देवालय पडक्या स्थितींत आहे.

**भुवनेश्वर**—ओरिसा, पुरी जिल्हा. खुर्दा पोटविभागांतील एक गांव. हें फार प्राचीन आहे. आम्रतीर्थ असेंहि यास नांव आहे. भुवनेश्वर हें या प्रांतांतील शैव मताचें आद्यपीठ होतें. ५ व्या ते १२ व्या शतकापर्यंत येथें केसरी घराण्यांतील राजे राज्य करीत होते. त्यानीं बौद्धधर्मी यवनांना म्हणजे ग्रीक राजांना जिंकून, बौद्धधर्माचें उच्चाटन करून शैवधर्माचा प्रसार केला. येथें भुवनेश्वर नांवाचा तलाव आहे. त्याभोंवतालीं २०० देवळें आहेत. लिंगराज (१० वें शतक), मुक्तेश्वर (८ वें शतक) व राजाराणी (१० वें शतक) हीं देवळें पाहण्यासारखीं आहेत. भुवनेश्वर महादेवाचें देऊळ फार उंच तीन कोसांवरून दिसणारें होतें व त्याभोंवतीं ७००० देवळें त्या वेळीं होतीं म्हणतात. हल्लीं ५०० | ६०० तरी आहेत. देवळांवरील शिल्पमूर्ती जिवंत वाटतात. एक स्त्री हत्तीवरून जात आहे; नृत्य चाललें आहे; तपस्वी ध्यानस्थ आहेत; साप फणा काढून आहेत, तर सिंह भांडत आहेत, वगैरे दृश्यें मनोरम वाटतात. सरोवरांतील दोन देवळें फार सुंदर दिसतात. यावरून ओढ्या देशांतील शिल्पकलेची कल्पना होते. भुवनेश्वराचें मंदिर स. ५०० पासून ६५० पर्यंतच्या कालांत झालें. आतां भुवनेश्वर ही ओरिसा प्रांताची राजधानी करण्यांत आली आहे. भुवनेश्वराजवळ धौली येथें अशोकाचें एक शिलाशासन आहे. याजवळच उदयगिरि, खंडागिरि व नीलगिरि लेणीं आहेत.

**भुसावळ**—मुंबई इलाखा, पूर्व खानदेशाचा एक तालुका. यांत एदलाबाद पेट्याचा समावेश होतो. क्षे. फ. ५६० चौ. मैल. लो. सं. सु. सव्वा लाख. मुख्य गांवें भुसावळ, चोदवड व वरणगांव हीं आहेत. यांत जंगल नाहीं. यांतून तापी नदी व तिला मिळणाऱ्या नद्या पूर्णा व वाघूर या गेल्या आहेत. भुसावळ हें एक मोठें रेल्वे जंक्शन आहे. येथें आगगाडीच्या यंत्रांचे कारखाने आहेत. ही रेल्वे अधिकाऱ्यांची नवी वसाहतच म्हणतां येईल. बागा, वाचनालयें व इंग्रजी शाळा आहेत. पिण्यासाठीं तापीचें पाणी आणिलें आहे. येथें कापूस दाबण्याच्या व सरकी काढण्याच्या गिरण्या आहेत. लो. सं. २६,३५२.

**भूकंप**—पृथ्वीच्या पोटांत कांहीं घटना होऊन जेव्हां पृष्ठभाग हादरतो तेव्हां भूकंपाचा धक्का बसला असें म्हणतात. ही घटना आंत तीस मैलांपेक्षां अधिक खोल होत नसते. भूकंपाची नाभि किंवा केंद्रस्थान बहुधा समुद्रांत असतें. त्यामुळें भूकंपानंतर समुद्राची भयंकर लाट जमिनीवर आपटून मोठें नुकसान होत असतें. भूकंपाला कांहीं कारणें होतात तीं अशीं : मोठ्या भारानें जमिनीचे थर तुटतात; किंवा पुष्कळ युगांपासून पृथ्वी थंड होत चालली आहे त्यामुळें पृष्ठभाग कोठें आकुंचित होतो. ज्वालामुखीशींहि भूकंपाचा संबंध आहे. पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यांवर, विशेषतः जपानी बेटांवर फार भूकंप होतात. अझोर्स, आल्प्स्, भूमध्यसमुद्र, कॉकेशस आणि हिमालय पर्वत या प्रदेशांतहि वारंवार भूकंप होतात. जगांतील अत्यंत मोठे भूकंप पुढील ठिकाणीं झाले : लिमा (१७४६); लिस्बन (१७५५-या वेळीं अर्धा लाख लोक दगावले); कॅलाब्रिआ (१८५१); इक्वेडोर आणि पेरू (१८६८); चार्लसटन (१८८६); इटली (१८८७); जपान; (१८९१, १९१४,१९२३). १९२३ सालीं जपानांत जो भूकंप झाला त्यामुळें एक लाख लोक मेले व कित्येक जखमी झाले.

१९३५ त क्वेटा येथेंहि मोठा भूकंप झाला. भूकंपानें नवीन प्रदेश व बेटें वर येतात तर कांहीं गडप होतात. भूकंपयंत्राच्या शोधामुळें भूकंपाची आगाऊ सूचना मिळते.

**भूकंपलेखक**—(सीस्मोग्राफ). भूकंपाची किंवा भूपृष्ठभागाचीं आंदोलनें नोंदण्याचें हें यंत्र आहे. एका वाटोळ्या फिरणाऱ्या पंचपात्राच्या पृष्ठभागावर लेखण्यांनीं आडव्या उभ्या नागमोडीसारख्या रेघा उठतात. या लेखण्यांना वजनें टांगलेलीं असतात. कांहीं यंत्रांतून आडव्या गतींच्या पूर्व आणि पश्चिम किंवा उत्तर आणि दक्षिण अशा दिशाहि दाखविल्या जातात.

या यंत्रांत भूकम्पांची नोंद आपोआप स्वावलंबी पद्धतीनें होते. अशीं दोन तऱ्हेचीं यंत्रें आहेत:

(१) स्थिरबिंदु यंत्रांत एक वजनदार पदार्थ एका गतिशील दांड्यावर बसविलेला असतो. ह्या पदार्थाच्या जडत्वामुळें दांड्याचें खुलें टोंक ज्या दिशेनें पृथ्वी हालते व लहरीयंत्रांतील बिजागिरी फिरविते त्याच्या उलट दिशेनें निदर्शन करतें.

(२) पतनमापक (गोनिओमीटर) यंत्रांत एक अक्ष असतो. तो चळतो व त्यावर असलेल्या काठी(घूम)ला झोका देतो. प्रत्येक वेळीं (फोटो) रसायनानें माखलेल्या कागदावर ही गति नोंदली जाते. पृथ्वीच्या कंपाच्या निरनिराळ्या अवस्थांमधील काल कंपाच्या मूळच्या यंत्राच्या स्थानापासूनचें अंतर दर्शविते.

**भूगोलशास्त्र**—भूपृष्ठाचा माणसें आणि इतर प्राणी व वनस्पती यांच्या संबंधात जो विचार केलेला असतो तो सर्व भूगोलशास्त्रांत येतो. या दृष्टीनें या शास्त्राचे प्राकृतिक किंवा प्रादेशिक, व्यापारविषयक, ऐतिहासिक, राजकीय, इ. भाग पाडलेले असतात. त्याकारणानें याचा इतर अनेक शास्त्रांशीं संबंध येतो. उदा., ज्योतिष, वनस्पतिशास्त्र, भूशास्त्र, प्राणिशास्त्र, मानववंशशास्त्र, इ.. नकाशांचा आणि आकृतींचा भूगोलाच्या अभ्यासांत फार मोठा उपयोग आहे. या शास्त्रांचा खोल अभ्यास व्हावा म्हणून लंडनमध्यें दि रॉयल जिऑग्रॅफिकल सोसायटी नांवाची मोठी संस्था आहे. अमेरिकेंत नॅशनल जिऑग्रॅफिक मॅगझिन नांवाचें जें मासिक निघतें तें चांगलें वाचनीय असतें. या शास्त्रांतील पोटविषय या कोशांत त्या त्या नांवाखालीं विवेचिले आहेत ते पाहावेत.

भूगोलाच्या शास्त्रशुद्ध अभ्यासाच्या स्वरूपाचा विचार करताना आपणांस असें दिसून येईल कीं, वर उल्लेखिलेलीं शास्त्रें आणि प्रत्यक्ष पाहून जमा केलेली व सुसंगत मांडलेली माहिती असें या अभ्यासाचें स्वरूप आहे.

भूगोलशास्त्राच्या निश्चित कल्पना प्रथम ग्रीकांनीं मांडण्यास सुरुवात केली. त्यांच्यापुढें असलेला पहिला व त्यांना पडलेला त्या काळांतील महत्त्वाचा प्रश्न म्हणजे पृथ्वीचा आकार कोणता

[ चित्राची डावी बाजू— अत्युच्च पर्वत-शिखर आणि महासागराची आत्यंतिक खोली यांमधील अंतर साडेअकरा मैल आहे. ]

[ उजवी बाजू-१. वरचा अर्ध— ॲटलांटिकचें पाणी आटलें तर. २. खालचा अर्ध— पॅसिफिकचें पाणी आटलें तर, असें दृश्य दिसेल. ]

आहे हा होय. ख्रि. पू. ९०० वर्षेपर्यंत म्हणजे होमरच्या काळापर्यंत पृथ्वी सपाट असून ती समुद्रांनीं वेढली आहे अशी समजूत होती. परंतु थेलीसनें या पृथ्वीच्या सपाट आकाराच्या कल्पनेला प्रथमतः धक्का मारला आणि पृथ्वी वाटोळी आहे ही कल्पना पुढें मांडली. परंतु त्याचा शिष्य अनाक्सिमांडर यानें पृथ्वी हा एक घनाकृति गोल असून तो आकाशाच्या अंतराळांत लोंबत आहे असें सांगितलें. नंतर पायथागोरस या तत्त्वज्ञान्यानें व त्याच्या शिष्यांनीं याच कल्पनेचा जोरानें पुरस्कार केला. आणि पारमेनिडीझनें ख्रिस्ती शकापूर्वी साडेपांचशें वर्षे पृथ्वीवरील निरनिराळ्या हवामानाचे कटिबंध जाहीर केले. हिकॅटीअस (ख्रिस्ती शकापूर्वी ५०० वर्षे) हा भूगोलशास्त्राचा जनक होय. त्यानें समुद्रांनीं वेष्टित असलेला भूप्रदेश उत्तरेकडे युरोप, दक्षिणेकडे आशिया आणि मध्यभागीं भूमध्यसमुद्र अशी— मानवी प्राणी त्या काळांत राहत असलेल्या भूविभागाची—विभागणी केली. हिरोडोटसनें वाटोळ्या पृथ्वीची कल्पना देतांना

या भूविभागाचें वर्णन असें केलें आहे कीं, दक्षिण-उत्तर लांबीपेक्षां पूर्व-पश्चिम लांबी जास्त आहे. (यावरून आधुनिक अक्षांश आणि रेखांश यांचा उगम झाला.) आणि त्यानें भूविभाग युरोप, आशिया व आफ्रिका या तीन खंडांत पाडले. यावरून पाहतां पूर्ण शास्त्र बनण्याच्या मार्गांतील हे सर्व टप्पे दिसतात. हे सर्व टप्पे घेत घेत भूगोलशास्त्राची गति सुरू झाली आणि आरिस्टॉटलनें या शास्त्राला पूर्ण स्वरूप दिलें. पारमेनिडीझनें आपल्या नकाशांत उष्ण कटिबंध, शीत कटिबंध आणि समशीतोष्ण कटिबंध दाखविले होते, परंतु आरिस्टॉटलनें समशीतोष्ण कटिबंधाची निश्चित मर्यादा सांगितली.

आरिस्टॉटलपूर्वी 'जिऑग्रफी' हा शब्द प्रचारांतसुद्धां नव्हता. परंतु एराटास्थिनीझनें तो प्रथमतः प्रचारांत आणला. आरिस्टॉटलला नद्यांच्या मुखाजवळील गाळाचा त्रिभुज प्रदेश (डेल्टा) कसा बनतो, समुद्रकिनारा कसा धुपला जातो, आणि वनस्पती व प्राणी हीं तेथील हवामानावर कशा तऱ्हेनें जगतात, यांचें निश्चित स्वरूपाचें ज्ञान होतें. तसेंच त्यानें हवामान, ऋतु, आणि रेखावृत्तें यांचा संबंध लावला होता. आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे भूगोलावरील मानवाचें नैसर्गिक जीवन ठिकठिकाणच्या भौगोलिक परिस्थितीप्रमाणें बदलत जातें याची पूर्ण कल्पना त्यानेंच जगाला दिली. ॲंटीपोडीझ, पायथागोरस आणि हिरोडोटस या सर्वांनीं पृथ्वीची लांबी, रुंदी, समुद्र व महासागराचें पाणी यांबद्दलच्या कांहीं कल्पना निश्चित केलेल्या आढळतात.

ख्रिस्ती शकापूर्वी ५० वर्षें ते इ. स. २४ पर्यंतच्या काळांत स्ट्रेबोनें भूमध्यसमुद्राकांठचा प्रवास करून राजकीय भूगोल प्रथमतः निर्माण केला. इ. स. १५० मध्यें क्लॉडीअस टॉलमी यानें ग्रीकांनीं जमवलेल्या माहितीवरून भूगोल तयार केला. पुढें तो अरब लोकांच्या हातांत पडल्यानंतर भूगोलास आधुनिक शास्त्रीय स्वरूप मिळालें. हें स्वरूप ध्यानांत घेऊन टॉलेमी यानें जगाच्या-त्या काळांत ज्ञात असलेल्या जगाच्या-रेखावृत्तांच्या मदतीनें एक नकाशा प्रथम तयार केला.

इ. स. ८१५ मध्यें खलिफ अल् मामून (हरुन अल् रशीदचा मुलगा) यानें टॉलेमीच्या लिखाणाचें आणि विशेषतः ज्योतिषशास्त्र विषयाचें भाषांतर अरबी भाषेंत केलें. आणि तें 'अलमाजेस्ट' या नांवानें ज्ञात आहे. अरबी ज्योतिषशास्त्रज्ञांनीं मेसापोटेमियामधील सपाट मैदानावर पृथ्वीचा अंश पूर्णपणें मोजला आणि त्यावरून पृथ्वीच्या आकारमानाचें निश्चित स्वरूप ज्योतिष व गणित या शास्त्रांच्या साहाय्यानें मांडलें. इ. स. ३२० पासून ४१० पर्यंतचा काळ अंधारांतच होता, तरीसुद्धां मार्को पोलो यानें केलेला प्रवास, अरब लोकांची व्यापारानिमित्त हिंदी महासागरांतून जात असलेलीं जहाजें या सर्वांनीं टॉलेमीच्याच कल्पनेचा आश्रय घेतला होता.

परंतु हें अंधारी युग टॉसरकानेली आणि कोलंबस यांनीं संपविलें. आरिस्टॉटल आणि टॉलेमी यांनीं तयार केलेले नकाशे पाहून कोलंबस आपल्या कल्पनेप्रमाणें पश्चिमेकडे हिंदुस्थानास निघाला. आणि अटलांटिक महासागर ओलांडून त्यानें या शास्त्राला नवी चालना दिली आणि त्याची परिणति मॅगेलनच्या प्रवासानें झाल्यानंतर युरोप खंडांतल्या बुरसटलेल्या सनातन कल्पना कोसळून पडल्या आणि शास्त्रशुद्ध स्वरूपावर भूगोलशास्त्र उभें राहिलें.

सतराव्या शतकांत पर्वत, नद्या, वगैरे भूविभाग, जलविभाग, यांसारख्या गोष्टी व्यवस्थित नकाशांत दाखविण्याचें कार्य मर्केटरनें केलें. फिलिप क्लुवरनें भूगोलाची व्याख्या स्पष्ट शब्दांत अशी दिलेली आहे कीं, "भूगोल म्हणजे आम्हांला ठाऊक असलेल्या पृथ्वीचें संपूर्ण वर्णन." त्याच्या सात पुस्तकांतून त्यानें हल्लींच्या भूगोललेखनांतील माहिती मांडली. पहिल्या पुस्तकांत लहान लहान चौदा छोटीं प्रकरणें असून त्यांमध्यें भूगोलविषयींचे आकार, गणित, वगैरे सामान्य स्वरूप दिलेलें आहे. आणि पुढील सहा पुस्तकांतून युरोप आणि इतर खंडें यांची पूर्ण माहिती, तसेंच देशांचें सूक्ष्म वर्णन दिलेलें आहे. प्रत्येक देशाचें वर्णन करतांना उंचसखल भूविभाग आणि त्या देशांत राहणारे लोक यांची सांगड घालण्याचा प्रयत्न केलेला आहे.

इ. स. १६६५ मध्यें नाथाने कार्पेंटर यानें शास्त्रशुद्ध भूगोल कसा असावा याची पहिली नमुनेदार कल्पना टॉलेमीचे नकाशे, प्रवाशांनीं प्रवास करून आणलेल्या माहितीवरून बनविलेलीं चित्रें, वगैरे गोष्टी देऊन तयार केला.

यानंतर लेडन येथील औषधोपचार करणारा आणि ज्याचें शिक्षण संपूर्ण वैद्यकीचें झालेलें होतें अशा व्हॅरेनिअस या जर्मन शास्त्रज्ञानें आपल्या वयाच्या अवघ्या अठ्ठावीस वर्षांच्या कारकीर्दींत या प्रश्नाला सशास्त्र स्वरूप दिलें. आणि तें इतकें परिपूर्ण दिलें कीं, सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ ऑयझॅक न्यूटन यानें त्याचें लॅटिनमध्यें भाषांतर केलें, आणि डगडेलनें त्यावरून इंग्रजींत भाषांतर केलें. वैद्यकशास्त्रांतला मनुष्य बुद्धिमत्ता आणि शास्त्र यांचा संयोग करून कोणत्याहि विषयांत काय करूं शकतो याचें प्रत्यंतर म्हणजे वैद्यकशास्त्रज्ञ व्हॅरेनिअस याचें पुस्तक होय. त्यानें भूगोलाची पद्धति खालीलप्रमाणें स्वीकारली:—

१ एकाच प्रकारच्या भूविभागांचा देशांकडे विशेष लक्ष न देतां बनत असलेल्या कटिबंधाचा अभ्यास करणें. व २ प्रत्येक खंडांतील देशांच्या भूरचनेच्या दृष्टीनें आणि विशिष्ट तऱ्हेनें त्या

त्या देशांतील वैशिष्ट्य दाखविणारीं लक्षणें यांवर दुसऱ्या भागाची उभारणी करणें.

पहिल्या भागांत पृथ्वीचा आकार, लांबी-रुंदी, स्थान व रचना, जमीन व पाणी यांची विभागणी, पर्वत, जंगलें व वाळवंटें, जलविभाग (पृथ्वीवरील पाण्याचीं सर्व प्रकारचीं रूपें) आणि हवामान यांचा विचार केला. तसेंच अक्षवृत्तें, रेखावृत्तें, कटिबंध, हवामान यांचाहि विचार केला. आणि अभ्यासाची तुलनात्मक पद्धति उपयोगांत आणली; तसेंच रेखावृत्तें, लांबलांबचीं ठिकाणें वसलेल्या जागा आणि नौकानयनशास्त्र यांचें विवेचन केलें. विशिष्ट पद्धतीचा देशाच्या माहितीचा भूगोल न देतां त्यानें या विभागाचे तीन प्रकार सूचित केले आहेत. भूगोलशास्त्राची ही जी शास्त्रशुद्ध मांडणी त्यानें केली तींत बदल करण्याचें सामर्थ्य शंभर-दीडशें वर्षांत कोणालाहि नव्हतें.

यानंतर अठराव्या शतकांत स्वीडनमधील रसायनांचा व्यापार करणारा टॉरबरमन यानें पृथ्वीच्या गोलार्धाचें वर्णन सुसंगत रीतीनें प्रथमतः केलें. आणि भूगोलांतील निरनिराळया विषयांची संगति लावली. तसेंच फ्रेंच नकाशाकार द आनव्हील यानें जुन्या पद्धतीवर जोरदार हल्ला चढवून स्वतः प्रवास करून त्या अनुभवानें शास्त्रशुद्ध अभ्यास करण्याच्या कल्पनेचा जोरानें प्रसार केला. कांट या तत्त्वज्ञान्यानें भूगोलशास्त्र गणितापासून धर्मापर्यंत सर्व विषयांना लावलें. आणि सर्वसामान्य भूगर्भाचें त्यानें दोन विभागांत पृथक्करण केलें: पहिल्या विभागांत जमीन, हवा, आणि पाणी; आणि दुसऱ्या विभागांत पृथ्वीवर उत्पन्न होणारे पदार्थ, खनिज संपत्ति, वनस्पतिजीवन, प्राणी आणि मानवी जीवन यांचें संगतवार स्पष्टीकरण केलें. एकोणिसाव्या शतकांत भूगोलाची आधुनिक कल्पना अलेक्झांडर फॉन हंबोल्ट या भूगोलशास्त्रज्ञानें सत्यसृष्टींत आणली. आणि त्याच्या कल्पनेचें मूल सूत्र 'निसर्गांतील एकसूत्रीपणा' हें होय. त्यानें असा सिद्धांत मांडला कीं, हवामान, वनस्पती, प्राणी आणि मानव यांचें जीवन हे भूविभागाच्या निरनिराळया प्रकारांवर अवलंबून आहे. त्याचाच समकालीन असलेला कार्ल रीटर यानें निरनिराळे कटिबंध घेऊन तेथील जीवन एकसारखें कसें आहे हें तुलनात्मक पद्धतीनें दाखवून दिलें. त्याच्या प्रचंड पुस्तकांत पृथ्वीचा पृष्ठभाग, आशिया आणि आफ्रिकेचा थोडा भाग यांचें वर्णन असून तो एकवीस खंडांत लिहिला आहे. यावरून त्याच्या मूळ कल्पनेचा अंदाज येईल. हें पुस्तक २१ खंड झाल्यानंतर अर्थात् अपूर्णच राहिलें आहे. आणि विसावें शतक उजाडलें, परंतु तत्पूर्वी डार्विननें उत्क्रांति-विकास कसा होतो याची कल्पना मांडून ठेवली होती. लाखों वर्षांच्या काळांत पृथ्वीचा पृष्ठभाग थंड होत गेला. आणि त्यावर विकासतत्त्वाप्रमाणें मानव कसा निर्माण झाला; तसेंच हवा, पाणी, जमीन, भूपृष्ठरचना, उष्णतामान, सागरांतले प्रवाह या सर्वांचा मानवी राहणीवर कसकसा फरक होत गेला; आणि मानवाचें जीवन संपूर्णपणें भूगोलाच्या नैसर्गिक परिस्थितीवर कसें अवलंबून आहे, याची भूगोलशास्त्रानें पूर्णपणें छाननी केली. संशोधन आणि नवीं नवीं सांपडलेलीं साधनें यांवर विसाव्या शतकांतील भूगोल उभा राहिला आहे. अठराव्या शतकापर्यंत केवळ धडधाकट शरीर आणि धाडसी वृत्ति या दोनच गुणांवर त्या काळांत प्रवासी प्रवास करीत. परंतु विसाव्या शतकांत ही परिस्थिति बदलली आणि भूगोलशास्त्रज्ञ म्हणजे अचाट प्रवास व अफाट अभ्यास करून संशोधन करणारा गृहस्थ ठरला.

भूगोल विषयाचें शिक्षण म्हणजे शाळांतून जुन्या काळांत नद्या, पर्वत, समुद्र, शहरें यांच्या याद्या पाठ करणें आणि महत्त्वाच्या गोष्टींबद्दल कांहीं तरी अर्धसत्य कल्पना सांगणें अशा प्रकारचें होतें. परंतु आतां त्याला पूर्ण शास्त्रीय स्वरूप आलेलें असून जगांतील बहुतेक प्रमुख राष्ट्रांच्या विश्वविद्यालयांत त्याचें पूर्ण शिक्षण देण्याची व्यवस्था अभ्यासक्रमांत समाविष्ट करून, पदवी परीक्षेपर्यंत हा विषय पोहोंचविला आहे. म्हणजे आधुनिक जगांतील विश्वविद्यालयांना त्याची पूर्ण कल्पना आलेली आहे व महत्त्व पटलें आहे, असें म्हणावें लागतें. पृथ्वी पाहा.

भूगोलावरील एकेका गोष्टींत सर्वांत अधिक कोण याची यादी केल्यास अशी होईल:—

सर्वांत उंच पर्वतराजि—हिमालय.
सर्वांत लांब पर्वतराजि—ॲन्डीज (द. अमेरिका.)
अत्युच्च पठार—तिबेट.
सर्वांत लांब नदी—मिसिसिप्पी-मिसौरी (४,५०२ मैल).
सर्वांत मोठें गोड्या पाण्याचें सरोवर—सुपीरियर (उ. अमेरिका).
सर्वांत मोठा द्वीपसमूह—मलाया.
सर्वांत खोल महासागर—पॅसिफिक.
सर्वांत मोठें बेट—ग्रीनलंड.
अत्युष्ण प्रदेश—वायव्य सहारा, अबिसिनिआ व थर वाळवंट.
अतिथंड प्रदेश—आग्नेय सायबेरियांतील व्हेर्कोयान्स्क. (येथें शून्याखालीं ९०° उष्णतामान असतें.)
सर्वांत मोठें खंड—आशिया.
सर्वांत मोठें द्वीपकल्प—हिंदुस्थान.
सर्वांत मोठा महासागर—पॅसिफिक.
सर्वांत मोठें वालुकारण्य—सहारा.
सर्वांत मोठें पर्वतशिखर—एव्हरेस्ट
सर्वांत मोठें शहर—लंडन (८२ लाख वस्ती).

देहद्रव्य लपेटून घेऊन मृत माणूस दृश्य स्वरूप धारण करतो, असें थिऑसफीचें याबाबत म्हणणें आहे.

खुनासारखीं दुष्ट कृत्यें झालेल्या जागीं भुतें असतात, स्मशानांत तर त्यांचा सुळसुळाट असतो, कांहीं घराण्यांतून पूर्वजांचीं भुतें ठराविक वेळांत दिसतात, वगैरे गोष्टी नेहमीं ऐकण्यांत आहेत. भुतांना अमानुष शक्ती आहेत व तीं वाटेल तें करूं शकतात; रोगराई भुताखेतांच्या पछाडण्यामुळें होते, असे समज फार जुने आहेत. पाश्चात्य लोकांतदेखील हीं भुतेंखेतें काढण्याचे धार्मिक विधी आहेत. भुतें काढणारे मांत्रिक मंत्र-तंत्रांनीं भुतें काढतात. पेशवाईत, अमक्यांनीं माझ्यावर भुतें घातलीं तीं काढून घेण्यास लावावें, अशाबद्दलच्या सरकारकडे तक्रारी येत व सरकार त्यांची दाद घेई! खेड्यापाड्यांतून कांहीं देवळांतून भुतें काढण्याचे प्रकार नेहमीं चालतात.

ब्रह्मांडपुराणांत भुतांची एक वेगळी जात मानली आहे. तीस पुलहप्रजा म्हटलें आहे. हिमालयाच्या आसपास ही आहे असे उल्लेख येतात. यावरून भूतान राज्यांतील लोकांशीं यांचा संबंध दिसतो. रुद्र हा भूतगणांचा नायक आहे. या भूतांचा देवांनीं पराजय करून त्यांना खालीं दक्षिणेकडे लोटलें, अशासारख्या पुराणांत कथा आहेत.

**भूतकोलीत**—( इग्निस फॅटुअस ). रात्रीच्या वेळीं दलदलीच्या जागीं कांहीं जाळासारखें दृश्य दिसतें. कधीं स्मशानांतूनहि असें पेटलेलें कोलीत नाचतांना दिसल्यासारखें वाटतें. पाण्यामध्यें सेंद्रिय वस्तूंचें विघटन होऊन जो वायु तयार होतो तो जळत असावा असें शास्त्रज्ञ म्हणतात. पण नक्की उपपत्ति लागलेली नाहीं. इंग्रजींत याला 'विल-ओ-विस्प' व 'जॅक-ए-लॅन्टर्न' अशींहि नावें आहेत.

**भूतविद्या**—माणसांना उपद्रव देणाऱ्या प्राण्यांचा बंदोबस्त करण्यास शिकविणारें हें शास्त्र म्हणावें लागेल. छांदोग्यांत या शास्त्राचा उल्लेख आहे. शंकराचार्यांनीं याला 'भूततंत्रम्' असें नांव दिलें आहे; म्हणजे याचा अर्थ जीवनशास्त्र होईल. रंगरामानुजाच्या मताप्रमाणें ही वशीकरणविद्या होय.

**भूताकदिसी**—भुतुकसा, भूतकशी. हीं झाडें मोठालीं असून कोंकणांत व देशावरहि होतात. याचीं पानें हिरड्यासारखीं असतात. लांकूड इमारतीसाठीं वापरतात. डोके चढलें असल्यास याचा पाला चुरगळून हुंगतात.

**भूतान**—हें एक स्वतंत्र संस्थान हिमालयाच्या पूर्व भागांत आहे. हा मुलूख म्हणजे पर्वतांच्या रांगा, त्यांचे फांटे व त्यांमधील दऱ्या मिळून झालेला आहे. या भागावरील पर्वतांवर बर्फ फार असल्यामुळें नद्यांत नेहमीं पाणी असतें. या सर्व नद्या ब्रह्मपुत्रा नदीस मिळतात. मुख्य नद्या डिच्चू, अमोचू अथवा तोसा, चिंचू, माचू, माटिचू, डागेमेचू, या आहेत. या अरण्यांत भूर्ज, व ८०० फुटांवर ओक, देवदार व फर हीं झाडें आढळतात. हत्ती, चित्ते, कस्तुरीमृग, अस्वल, गेंडा, वगैरे प्राणी आढळतात. येथील मुलूख डोंगराळ असल्यानें शेती थोड्या ठिकाणीं होते. येथें तांदूळ, मका, गहूं हीं पिकें होतात.

घाटरस्त्यासाठीं ब्रिटिश सरकार भूतानला दरसाल दोन लाख रुपये खंडणी देत असे. भूतानचें क्षे. फ. २० हजार चौ. मैल असून लो. सं. ३,००,००० आहे. पुनक ही हिंवाळ्यांतील राजधानी मुंगी नदीच्या कांठीं आहे. उन्हाळ्यांतील राजधानी 'ट्राशीशोदझोंग' ही आहे. पारो, वांगद्व, पोटरेंग, व टोंगसा हीं गांवें आसामांतून ल्हासाकडे जाणाऱ्या रस्त्यावर आहेत. यांखेरीज वांदीपूर, थासा व मुरीखोम हीं मोठीं गांवें आहेत.

भूतान हा शब्द 'भोतान' म्हणजे भोताचा—तिबेटाचा शेवट या संस्कृतोद्भव शब्दापासून बनला आहे. हा मुलूख पूर्वीं भोतिया तेफू नांवाच्या लोकांच्या ताब्यांत होता. सुमारें २०० वर्षांपूर्वीं तिबेटी लोकांनीं या लोकांना जिंकून ते त्यांच्यांत मिळून मिसळून राहिले. भूतानी लोकांचे मुख्य वर्ग तीन आहेतः—(१) पुरोहित वर्ग, (२) अधिकारी वर्ग, व (३) शेतकरी वर्ग. भोतिया हे काळसर वर्णाचे, मजबूत बांध्याचे, काटक व जोमदार लोक आहेत. ते शूर, रागीट व आळशी आहेत. ते बकरा, याक, डुक्कर, वगैरे प्राण्यांचें मांस खातात. बहुपतित्वाची चाल, विशेषतः उत्तरेकडील भागांत, दृष्टीस पडते. वडील भावाची बायको ती इतर सर्व भावांचीहि बायको समजण्यांत येते. या चालीला मुख्य कारण दारिद्र्य असें सांगतात. भोतिया पुरुष आळशी व व्यसनासक्त असल्यामुळें बायकांना सर्व कारभार पाहावा लागतो. हे बौद्धधर्माचे अनुयायी आहेत. तरी हे भुताखेतांची पूजा करतात व पशूंचे बळी देतात. तशीचोझोंग हा भूतानमध्यें अतिशय प्रसिद्ध मठ आहे. त्यांत ३०० उपाध्याय राहतात. राजाची निवड करण्यांत येते. आजचे राजे महाराजा जिग-मे वंगचुक हे आहेत.

येथील सर्व सत्ता दोघांच्या म्हणजे (१) धर्मगुरु अथवा धर्मराजा, व (२) देवराजा अथवा भौतिक व ऐहिक सत्ताधिपति यांच्या हातीं असते. धर्मगुरु अथवा धर्मराजा हा बुद्धाचा अवतार आहे अशी लोकांत समजूत असे. संस्थानांत ९५०० लढवय्ये लोक आहेत.

**भूधरगड**—कोल्हापूरच्या दक्षिणेस ३६ मैलांवर एका खडकाळ डोंगरावर हा किल्ला आहे. उंची २६०० फूट व पूर्व-पश्चिम रुंदी २१०० फूट. किल्ल्यांत वस्ती आहे. केदारलिंग व भैरवनाथ अशीं दोन देवालयें आहेत. १६६७ त शिवाजीनें याची दुरुस्ती व बंदोबस्त केला. पुढें तो मोंगलांनीं घेतला, पण

परत मराठयांनीं ५ वर्षांनीं तो जिंकून घेतला. त्या वेळचीं जिंकलेलीं निशाणें भैरवनाथाच्या देवळांत आहेत. परशुराम-भाऊनें हा किल्ला घेतला होता, पण कोल्हापूरकरांनीं तो परत घेतला. १८४४ च्या गडकऱ्यांच्या बंडांत हा त्यांच्याकडे गेला होता, पण तो डि लामोटी यानें घेतला व पाडून टाकला. किल्ल्यांत एक राजवाडा व कांहीं इमारती आहेत. माघांत यात्रा भरते.

**भूपदार्थविज्ञान**—(टेरेस्ट्रिअल फिझिक्स). हा विषय भूस्तरशास्त्राशीं संबद्ध असून त्यामध्यें भूविज्ञान, भौमिक गुरुत्वाकर्षण, हवामानशास्त्र, सामुद्रशास्त्र, भौमिक चुंबकशास्त्र आणि भूकंपशास्त्र, इत्यादि विषयांचा संबंध येतो. भूमीच्या पोटांत काय आहे यासंबंधीं आतांपर्यंत अनेक तर्क करण्यांत आले आहेत. पृथ्वीचा अंतर्भाग एका कालीं द्रवरूप व भयंकर उष्ण होता व हल्लीं तो बराच थंड झाला असून अधिकाधिक थंड होत आहे, ही गोष्ट सामान्यतः मान्य करण्यांत आली आहे. यावरून भूमीचा जन्म केव्हां झाला अथवा भूमीवरील कवच केव्हां निर्माण झालें हा प्रश्न उत्पन्न होतो. सामान्यतः पृथ्वीच्या पोटांत असलेली उष्णता व उष्णतावाहक धर्म यांवरून लॉर्ड केल्व्हिन यानें २ ते ३ कोटी वर्षांपूर्वीं पृथ्वी उत्पन्न झाली असावी असें अनुमान केलें होतें. परंतु अलीकडे किरणोत्सर्जनाच्या धर्माचें नवीन ज्ञान उपलब्ध झाल्यामुळें पदार्थविज्ञानशास्त्री, विशेषतः लॉर्ड रॅले, यांनीं हा काल कांहीं शें कोटी सामान्यतः $४ \times १०^{९}$ इतकीं वर्षें अनुमानिला आहे. पृथ्वीच्या पोटांत काय आहे याचा विचार करतां पृथ्वीच्या पृष्ठभागावर एक पातळ कवच असून आंत उष्ण द्रवपदार्थ आहे, ही गोष्ट सहजच अनुमानितां येते. आपणांस ज्वालामुखींतून लाव्हा रस बाहेर पडतांना दिसतो. परंतु हा द्रवपदार्थ सिद्धांत भूशास्त्री व पदार्थ-विज्ञानशास्त्री यांनीं अमान्य केला आहे. जमिनीच्या अंतर्भागावर वरील कवचाचा मोठ्या प्रमाणांत दाब पडतो व भूकंप होतो. त्या मानानें ज्वालामुखींतून फारसा रस बाहेर येत नाहीं. हा भार असह्य होऊन फारच क्वचित् भूकंप झालेले आपल्या प्रत्ययास येतात. समस्तर सिद्धांताप्रमाणें पृथ्वीच्या पाठीवरील कठिण थराच्या आंत एक नरम व स्थिति-स्थापक थर असावा, आणि त्यामुळें पृथ्वीवरील कठिण कवच जसजसें वाढत जाईल तसतसा त्यास अवसर मिळत असावा.

**भूपाली**—हा कल्याण थाटांतील जन्य रागांपैकीं एक आहे. या रागांत मध्यम व निषाद हे स्वर वर्ज्य आहेत, म्हणून याची जाति औडुव–औडुव आहे. वादी स्वर गांधार व संवादी धैवत आहे. गानसमय रात्रीचा पहिला प्रहर आहे. हा राग पूर्वांगवादी असल्यानें देसकार रागापासून सहज निराळा राहूं शकतो.

**भूप्रकृतिवर्णन**—(फिजिऑग्राफी). प्राकृतिक भूगोल. पृथ्वीवरील नैसर्गिक विषयांचें व त्यांत प्रत्यहीं घडणाऱ्या घडामोडींचें वर्णन या शास्त्रांत असतें. जमीन आणि पाणी यांची (पर्वत, दऱ्या, नद्या, समुद्र इ. मध्यें) विभागणी; पर्वत आणि दऱ्याखोरीं यांचा विस्तार, निवास, इ.; किनाऱ्यांची आखणी व त्यांचे विशेष; समुद्रप्रवाह, समुद्राची खोली, खारीं–गोडीं सरोवरें; वारे, वादळें, पाऊस व हवामान; पृथ्वीवरील प्राणी, वनस्पती आणि माणसें यांचीं स्थानें, दळणवळण व संवर्धन यांचीं साधनें, इ. गोष्टींचा विचार या भूगोलांत केला जातो. यांत राजकीय विभागणीची माहिती येत नाहीं, किंवा प्राणिशास्त्र आणि वनस्पतिशास्त्र यांच्या दृष्टीनें प्राणि-वनस्पतींची माहिती नसते. तथापि सृष्टिशास्त्राच्या सर्व शाखांशीं याचा संबंध येतो. हवा, उष्णता आणि पाणी हीं पृथ्वीच्या पृष्ठभागावर बदल घडवून आणतात. तेव्हां त्यांचा वृत्तांत या शास्त्राला द्यावा लागतो.

**भूमापनशास्त्र**—(जिओडेसी). या शास्त्रामध्यें पृथ्वीचा आकार, तिचें परिमाण, तिचें विशिष्टगुरुत्व, व तिचें गुरुत्वाकर्षण या गोष्टींचा विचार करण्यांत येतो. हें शास्त्र पृथ्वीचें निरीक्षण व गणित यांच्यावर आधारलेलें आहे. पृथ्वीचा आकार वाटोळा आहे, ही गोष्ट ईजिप्त व ग्रीस या देशांमध्यें निदान खि. पू. ३०० च्या सुमारास ज्ञात होती. तथापि पृथ्वीचें आकारमान काय आहे याचें मोजमाप सतराव्या शतकापर्यंत निश्चितपणें करण्यांत आलें नव्हतें. विलेब्रॉर्ड स्नेल यानें सन १६१७ मध्यें पृथ्वीच्या पृष्ठभागाची त्रिकोणांत विभागणी करून क्षेत्रमापन करण्याची पद्धति स्वीकारली त्या वेळींच खरोखर या बाबतींत पद्धतशीर प्रगति झाली. पृथ्वीचा आकार गोल, वाटोळा असें गृहीत धरलें तर तिच्या पृष्ठभागाचें माप आपणांस निरनिराळ्या पद्धतींनीं काढतां येईल. परंतु पृथ्वीच्या क्षेत्रफळाचें मापन करण्याची व तिचा आकार वाटोळा आहे हें ठरविण्याची (वास्तविक तो पूर्ण वाटोळा नाहीं) एक निश्चित पद्धति आहे. ती अशी कीं, पृथ्वीच्या विशिष्ट भागांचें (विशेषतः एखाद्या रेखांशाच्या किंवा रेखावृत्ताच्या आधारानें) प्रत्यक्ष मापन करावयाचें आणि ज्योतिषशास्त्रीय निरीक्षणानें या रेखांशावरील क्षेत्राच्या दोन्ही टोंकांचे अक्षांश काढावयाचे. याप्रमाणें हा रेखांशाचा कंस मोजण्याचे प्रयत्न फ्रान्समध्यें अठराव्या शतकात करण्यांत आले होते. त्या शतकाच्या अखेरीच्या सुमारास या पद्धतीनें कांहीं भूखंडाचें त्रिकोणात्मक मापन करण्यांत आलें होतें. आज युरोप, आशिया, उत्तर अमेरिका, आफ्रिका, वगैरे भूखंडांतील त्रिकोणात्मक पद्धतीच्या मोजणीमुळें एकंदर भूक्षेत्राचें नक्की आकारमान सांगण्याइतकी सामुग्री जमा झाली आहे. आज अशा रीतीनें भूमापन करण्याकरितां जे त्रिकोण कल्पितात व

काढण्यांत येतात त्यांच्या तीन कोनांची बेरीज अगदीं अधिकांत अधिक एक अंशाच्या फरकानें बरोबर दोन काटकोन भरते.

पृथ्वी जर स्थिर व एकस्वरूपी व पूर्ण गोलाकार असती तर तिच्या गुरुत्वाकर्षणाची शक्ति सर्व पृष्ठभागावर सर्वत्र सारखी असती; परंतु पृथ्वी स्वतःभोंवतीं फिरत असल्यामुळें व तिचा आकार थोडा चपटा असल्यामुळें तिच्या गुरुत्वाकर्षणशक्तींत फरक पडत असतो. हा फरक विशिष्ट स्थळाचे अक्षांश व समुद्र-सपाटीपासून उंची यांवर अवलंबून असतो. हा फरक त्या ठिकाणच्या घड्याळाच्या लंबकाच्या आंदोलनावरून काढतां येतो. याप्रमाणें लंबकावरून आपणांस पृथ्वीचा आकार कशा प्रकारचा आहे हें निश्चित करण्याचें साधन मिळतें.

**भूमिगत द्रव्य**—जमिनींत पुरलेला किंवा गुप्त जागीं ठेवलेला नाणीं, सोनें, चांदी, इ. मौल्यवान् पण बेवारसी माल. यावर सरकारची मालकी असते. पण ज्याला तो सांपडला असेल त्याला सरकार त्यांतील कांहीं देतें.

**भूमिज**—हें एका रानटी जातीचें नांव आहे. हे लोक छोटा नागपूरच्या भागांत राहतात. मुंडामध्यें व या लोकांमध्यें बरेंच साम्य आहे. यांची लो. सं. सुमारें एक लाख आहे. यांतील ⅘ मानभूम येथें राहतात. बाकीचे ओरिसांत आहेत. हे स्वतःला हिंदू म्हणवितात. हे लोक मुंडारी व बंगाली भाषा बोलतात. हे पूर्वी दरवडेखोरी करीत. १८३२ सालीं या लोकांनीं मोठा दंगा-धोपा केला. आसाममध्येंहि सुमारें चाळीस हजार भूमिज आहेत.

**भूमिति**—अवकाश(स्पेस)च्या गुणधर्मांचा विचार करणारें हें शास्त्र आहे. समपृष्ठ (प्लेन)–भूमिति समपृष्ठावर काढलेल्या आकृतींचा विचार करते. लांबी, रुंदी व उंची यांच्या अवकाशांत काढलेल्या आकृतींचा विचार घन–भूमिति करते. गोलावरील आकृतींचा विचार गोलीय (स्फेरिकल) भूमितीमध्यें येतो. शुद्ध (प्युअर)–भूमिति अनुमान पद्धतीनें आकृति दृष्टी-आड न करतां सिद्धांत सिद्ध करते; पृथक्करण–भूमितींत भुज-युग्म (कोऑर्डिनेट) संख्यांचा उपयोग होतो. तिला आकृतीचा आधार आवश्यक नसतो. ही भूमिति जवळजवळ बीजगणिताचा भाग म्हणतां येईल. लांबी, क्षेत्रफळ, कोन, इत्यादींच्या मापनांचा विचार मापन (मेट्रिकल)–भूमितींत येतो.

प्रलंबीय (प्रोजेक्टिव्ह)-भूमितींत मोजमापांचा विचार बाजूला सारून केवळ वस्तूंच्या दृश्य आलेखनीय गुणधर्मांचा विचार करण्यांत येतो; जसें, एकमेकांस छेदणाऱ्या रेषा, एका रेषेंत येणारें बिंदू. वर्णनात्मक भूमितींत घन पदार्थांचा समपृष्ठावर आकृति काढण्याचा विचार होतो.

भूमितीच्या इतिहासाचा आरंभ ग्रीसपासून सुरू होतो. पायथागोरस, प्लेटो, युक्लिड, आर्किमिडीज, अपोलोनिअस, वगैरे ग्रीसचे प्रख्यात भूमितिकार आहेत. डेकार्टनें भुजयुग्मांचा उपयोग सुरू केला. मॉंजनें वर्णनात्मक भूमितीचा आरंभ केला. जर्मनींतील स्टीनर व फ्रान्समधील शास्ले शुद्धभूमितिकार आहेत. फॉन स्टॉडनें प्रलंबीय भूमिति मोजमापापासून अलग अशा पायावर आणिली. सध्यांच्या काळांत पृथक्करण पद्धतीनें पूर्वीच्या संयोगात्मक (सिन्थेटिक) पद्धतीपेक्षां फारच विशाल क्षेत्र व शक्ति निर्माण केली आहे. प्लकर, केले, सिल्हेस्टर, सालमन, हेस व क्लेब्श हे ह्या पद्धतीचे पुरस्कार करणारे भूमितिकार आहेत.

युक्लिडचें समांतर रेषांसंबंधीं स्वतःसिद्धतत्त्व (ॲक्सिअम) आवश्यक न मानून रचलेली 'अयुक्लिड' भूमिति बोल्यइ, लोबाटचेवस्की, वगैरेंनीं तयार केली. भूमितीचीं मूलतत्त्वें हेल्महोल्टझ, लाय, पीनो, हिल्बर्ट, वगैरेंनीं विवादिलीं.

आजचा सापेक्ष सिद्धांत दिक्–काल (स्पेस-टाइम) भूमितीचें एक अंग आहे.

हिंदुस्थानांत भूमितीचा उगम यज्ञसंस्थेपासून नक्की धरतां येतो. म्हणजे तो वेदकालांतील आहे. शुल्बसूत्रांमध्यें चौरस व त्याच्या लागेल तितक्या पटी करणें यासंबंधीं नियम आहेत. यानंतर भरतखंडांत आर्यभट्ट, ब्रह्मगुप्त व भास्कराचार्य हे तीन प्रमुख गणितज्ञ होऊन गेले. त्यांनीं पांचव्या शतकापासून भूमितीचा इतर गणितविषयांबरोबर चांगला ऊहापोह केला आहे. आर्यभट्टानें क्षेत्रफळें आणि घनफळें कशीं काढावींत यांचीं सूत्रें 'गणितपादां'त दिलीं आहेत. भास्कराचार्यांच्या लीलावतींत क्षेत्रव्यवहार, खातव्यवहार, राशिव्यवहार, चितिव्यवहार, इत्यादि भूमितिविषयक प्रकरणें दिलीं आहेत. क्षेत्रव्यवहाराची सविस्तर माहिती त्यानें जी दिली आहे तीवरून त्याची स्वतंत्र बुद्धि दिसून येते. भारतीय गणितज्ञान पाश्चात्यांपासून घेतलेलें नाहीं, हें प्रत्ययास येतें. भारतीय आणि पाश्चात्य यांमधील दृष्टिकोनच भिन्न आहेत. आपलें प्राचीन गणित यज्ञांगप्रधान आहे व पुढें व्यवहारासाठीं त्याची फारशी वाढ झाली नाहीं.

**भूम्यैक सत्तापद्धति**—(फिजिओक्रॅटिक सिस्टिम). राजनीतिशास्त्रांतील एक समाजनियमनपद्धति. याचा संस्थापक फ्रॅन्सिस केस्ने (१६९४–१७७४) नांवाचा एक फ्रेंच डॉक्टर होता. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धांत हा वाद फ्रान्समध्यें प्रचलित असून औद्योगिक स्वातंत्र्य, नैसर्गिक अनिर्बंधन आणि कृषि-संवर्धन या गोष्टींवर याच्या पुरस्कर्त्यांचा भर असे. जमीन ही एकच राष्ट्राच्या संपत्तीचें साधन असल्यानें शेतकरी, कोळी, खाणीवाले, इ. लोकच फक्त या संपत्तींत भर घालतात. पंडित, कलावंत, व्यापारी, यांत्रिक, कारागीर, इ. लोक अनुत्पादक वर्गांतील आहेत खरे; पण ते शेतकऱ्यांना लागत असल्यानें त्यांचाहि उपयोग आहे. जमिनीपासूनच सर्व संपत्ति येत

असल्यानें जमिनीच्या उत्पादनावरच फक्त कर बसवावा. या प्रकारचे सिद्धान्त या पद्धतींत आढळतात.

**भूर्ज**—[ वर्ग–बेतुलासी. इं. बर्च ]. या वर्गामध्यें भूर्ज व आल्डर हीं दोनच झाडें येतात. हीं झाडें युरोप, उत्तर आशिया व उत्तर अमेरिका या खंडांत आढळतात. उत्तरेकडील प्रदेशात सर्वत्र व दक्षिणेकडील प्रदेशांत उंच पर्वतावर हीं झाडें होतात. हें झाड फार कठिण आहे. याचें लांकूड रंगानें फिकें व रचनेमध्यें कठिण व चिवट असून बहुतेक घरगुती सामान करण्याकडे याचा उपयोग करण्यांत येतो. याचीं पिंपें वगैरेहि करतात. फ्रान्समध्यें याच्या पादुका करतात. या झाडाची साल पांढरट असून गुळगुळीत व तकतकीत असतें. हिचे पातळ पापुदरे निघतात. या सालीच्या टोप्या, जोडे व पेट्या तयार करतात. हिंदुस्थानांत भूर्जपत्र ग्रंथ लिहिण्याच्या कामीं वापरण्यांत येत असे. प्राचीन काळचे असे हस्तलिखित ग्रंथ काश्मीर वगैरे प्रांतांत अद्यापिहि आढळतात. भूर्जपत्रावर लिहिलेलें उपलब्ध असणारें पुस्तक म्हणजे दुसऱ्या शतकांतला खरोष्ठींत लिहिलेला 'धम्मपद' होय. चौथ्या शतकांतील 'संयुक्तागम' हा संस्कृत ग्रंथ भूर्जपत्रावरचा आहे.

हीं झाडें हिमालयावरहि सांपडतात. याची साल कागदापेक्षांहि अधिक टिकाऊ आहे असा कांहींचा समज आहे. हिंदुस्थानांतील बरेच प्राचीन हस्तलिखित ग्रंथ याच भूर्जपत्रांवर लिहिलेले होते. औषधी मंत्र (विंचू, सर्प यांच्या दंशावरील मंत्र) लिहिण्याच्या कामीं याचा फारच उपयोग करण्यांत येतो. याचे उपयोग अनेक आहेत. टपालानें पाठविण्याच्या जिनसाला वेष्टण, हुक्याच्या नळीचें वेष्टण, छत्रीचा अभ्रा, इत्यादि जिन्नस याचे तयार करतात. सौगंधिक व जंतुनाशक गुणहि याच्या अंगीं आहेत. याचें लांकूड किडत नसल्यामुळें त्याचा इमारतीच्या कामीं चांगला उपयोग होतो. याच्या रसाची चांगली दारू होते.

या झाडाची एक खुजी जात आहे. झाड दोनतीन फुटांच्यावर बहुधा वाढत नाहीं. हें उत्तरेकडील प्रदेशांत आढळतें.

अमेरिकेमध्यें एक भूर्ज वृक्षाची जात आहे. तिच्या सालीचे इतके पातळ पापुदरे निघतात कीं, ते कागद म्हणून सहज वापरतां येतात. यास कागदी भूर्ज (पेपर बर्च) असेंच म्हणतात. तेथील रेड इंडियन लोक या सालीच्या होड्या करतात.

**भूषण कवि**—हा शिवाजीच्या पदरचा एक भाट असून जातीचा कनोजा ब्राह्मण होता. बापाचें नांव रत्नाकर. यमुनाकांठच्या त्रिविक्रमपूरचा हा रहिवासी होता; हें गांव हल्लीं कानपूर जिल्ह्यांतील टिकमपूर होय. भूषणाला चिंतामणि, मतिराम व जटाशंकर ऊर्फ नीळकंठ हे तीन भाऊ होते; यांचें आडनांव त्रिपाठी. चिंतामणि हा नागपूरकर मकरंदशहा या गोंडराजाच्या पदरीं होता. शहाजहाननें त्याला देणगी दिली होती. भूषण कवि प्रथम छत्रसाल राजाच्या पदरीं होता. तेथून सन १६६४ त तो शिवाजीपाशीं येऊन राहिला. यवनाची नोकरी करण्याचा त्यास मोठा तिटकारा वाटत असे. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या राज्यांतील स्थिति व व्यवस्था भूषण कवीकडून शिवाजीला कळे. हा १०२ वर्षांचा होऊन वारला असें म्हणतात. 'शिवराज-भूषण-काव्य' या ग्रंथांत शिवाजीच्या प्रतापाचें सुरस वर्णन यानें केलें आहे. हें काव्य राज्याभिषेकाच्या आदल्या वर्षीं पुरें झालें. शिवाजीनें भूषण कवीस पुष्कळ द्रव्य दिलें. 'भूषण हजारा,' 'भूषण उल्लास' व 'दूषण उल्लास' असे याचे आणखी ग्रंथ आहेत. याच्या हिंदीमध्यें सवाया आहेत. याचा धाकटा भाऊ मतिराम हा संभाजीच्या पदरीं होता. कांहीं इतिहाससंशोधक हा शिवाजीच्या वेळीं नसून शाहूच्या काळांत होवा असें समजतात.

**भूषणगड**—मुंबई, सातारा जिल्हा. खटाव तालुक्यात वडूयच्या नैर्ऋत्येस ११ मैलांवर आहे. पायथ्यापासून उंची ६००° फूट आहे. हा शिवाजीनें १६७६ त बांधला. १८०५ मध्यें फत्तेसिंग भाने यानें हा घेतला. १८४८ त साताऱ्याचें राज्य खालसा झाल्यावर इंग्रजांकडे आला.

**भूस्तरशास्त्र**—(जीऑलॉजी). पृथ्वीची रचना, तिचा पूर्वेतिहास आणि तिची सध्यांची भूपृष्ठरचना कोणत्या तऱ्हेनें व कोणत्या कारणामुळें झाली आहे, याचें विवेचन या शास्त्रांत केलेलें असतें. खिस्ती शकापूर्वी ६ व्या शतकामध्यें झेनोफोनीज या तत्त्ववेत्त्यानें वर्तमानकालीं ज्या ठिकाणीं समुद्राचें अस्तित्व आहे त्या ठिकाणापासून फार दूरवर असलेल्या प्रदेशामध्यें शिंपले वगैरे समुद्रामध्यें आढळणाऱ्या वस्तूंचे थर असलेले पाहून त्यावरून असें प्रतिपादन केलें कीं, ही गोष्ट एका कालीं समुद्राचा पृष्ठभाग आजच्यापेक्षां पुष्कळ उंचीवर असल्यामुळेंच घडून आलेली असावी. समुद्र आणि जमिनीचा पृष्ठभाग यांचें स्थानांतर झाल्याबद्दलचीं विधानें अनेक ग्रीक व रोमन सृष्टिशास्त्रज्ञांनीं केलेलीं आहेत. विद्यापुनरुज्जीवनाच्या कालामध्यें जी विचारास चालना मिळाली तीमुळें पृथ्वीवरील खडकांचें निरीक्षण करण्याकडे १६ व्या शतकांतील कांहीं शास्त्रज्ञांचें लक्ष गेलें. तथापि यानंतर तीन शतकेंपर्यंत पृथ्वीचा पृष्ठभाग

आणि प्राणी यांच्या संबंधामध्यें जे बदल घडून आलेले आहे ते कोणत्या तरी उत्पातामुळें किंवा आकस्मिक धक्क्यामुळें घडून आलेले आहेत असेंच वर्नेटप्रमाणें अनेक शास्त्रज्ञांचें मत असून आरिस्टॉटलप्रमाणें या गोष्टी मनुष्याच्या जीवितांच्या मानानें फार दीर्घकालीन उलाढालीमुळें घडून आलेल्या असाव्यात, असें फारसें कोणीं प्रतिपादन केल्याचें आढळत नाहीं.

जेम्स हटन या नांवाच्या स्कॉट तत्त्वज्ञानें १७८५ मध्यें 'पृथ्वीची उत्पत्ति' या नांवाचा एक ग्रंथ लिहिला त्यांत त्यानें पृथ्वीच्या पृष्ठभागामध्यें जे फरक होतात ते ज्या अर्थी सापेक्षत्वानें फार अल्प अशा शक्तींकडून घडून आलेले दिसतात त्या अर्थी ते घडून येण्यास अत्यंत दीर्घकाल लागत असला पाहिजे या गोष्टीचें फार महत्त्व आहे, असें प्रतिपादन केलें. सध्यां निरनिराळ्या क्रियांच्या द्वारां जमिनीची उंची हळूहळू कमी होत जाऊन तिची सपाटी समुद्रसपाटीबरोबर येईल अशा रीतीनें चालू आहे. परंतु एकीकडे समुद्राच्या पात्रामध्यें केरकचरा वगैरे वाहून येऊन कुजून त्याच्यापासून नवीन नवीन भूखंड तयार होण्याचीहि क्रिया आढळून येते. हटन यानें असें दाखविलें कीं, ही क्रिया आणि प्रतिक्रिया यांची मालिका पृथ्वीच्या इतिहासामध्यें सतत चालू असलेली दृष्टीस पडते. हटननें प्रतिपादन केलेल्या तत्त्वांचें जॉन प्लेफेअर यानें अधिक विषदीकरण केलें. आणि त्यानंतर चार्लस लियाल यानें त्यांचें अधिक स्पष्टीकरण करून आपला 'भूस्तरशास्त्राचीं तत्त्वें' हा ग्रंथ लिहिला. याच वेळीं विल्यम स्मिथ यानें एक 'प्रस्तरावशेषावरून भूस्तरांचें ज्ञान' या नांवाचा प्रबंध लिहून (१८१६) एका नवीनच दिशेनें या शास्त्राची प्रगति केली. खडकामध्यें आढळणारे निरनिराळे प्राण्यांचे अवशेष हे एका विशिष्ट क्रमानें जमिनीच्या थरांमध्यें आढळतात, ही गोष्ट दिसून आल्यामुळें मनुष्याच्या विकासाचा क्रम कांहीं तत्त्वावर बसविणें सोपें झालें.

स्तरात्मक भूस्तरशास्त्र—प्राचीन प्राण्यवशेषांच्या अभ्यासकांनीं असें दृष्टोत्पत्तीस आणलें कीं, जुन्या काळच्या प्राण्यांपासून अर्वाचीन प्राण्यांची जी उत्पत्ति होत गेली आहे तिला लागणारा काल आपण सामान्यतः जितका मानीत होतों त्यापेक्षां अधिक असावा. जरी कांहीं कांहीं ठिकाणीं एकदम मोठाले फरक घडून आलेले दृष्टीस पडतात तथापि सामान्यतः ही क्रिया फार सावकाश होत आली असावी. जेव्हां कांहीं आकस्मिक फरक होतात तेव्हां जुने थर वर उचलले जाऊन ते दुमडले जातात आणि त्यांच्यावर नवीन थर येऊन बसतात. अशा तऱ्हेच्या विपरित स्तररचनेस विकृत स्तररचना म्हणतात, व अशा तऱ्हेच्या दोन थरांमधील काल पुष्कळ मोठा असण्याचा संभव असतो. चार्लस डार्विन यानें 'जातींची उत्पत्ति' हा ग्रंथ सन १८५९ मध्यें लिहून प्राचीन प्राण्यवशेषशास्त्रास सगदीं नवीन दिशा लावली. आणि नवीन नवीन तऱ्हेचे प्राणी आणि वनस्पती यांचा शोध लावून या शास्त्रांतील अपूर्णता भरून काढण्यास लोकांस उत्तेजित केलें. जॉर्जेस क्यूव्हीए यानें पॅरिस जवळील नदीच्या खोऱ्यांतील नष्ट सस्तन प्राण्यांचे अवशेष शोधून काढून त्यांचे सांगाडे जुळवून दाखविले. तसेंच एल्. जे. आर्. अॅगॅसिझ यानें माशांचा फार पद्धतशीर अभ्यास केला, आणि एल्. फॉं बुश यानें शीर्षपाद कवचधर प्राण्यांचा असाच सूक्ष्म रीतीनें अभ्यास केला. तसेंच मिल्ने-एडवर्ड्स आणि हेम यांनीं अनेक तऱ्हेचे प्रवाळ कीटक लोकांच्या नजरेस आणले. या सर्व गोष्टींमुळें अनेक तऱ्हेचे प्राणी मिळून एक तऱ्हेची सांखळी तयार होते, ही गोष्ट लोकांस पटूं लागली.

प्राणी अथवा वनस्पती यांचे प्रास्तर अवशेष शिल्लक राहणें ही गोष्ट त्यांच्या शरीरामध्यें जे भाग खनिजमय बनून नाश पावत नाहींत त्यांच्या प्रमाणावर अवलंबून असते. जे प्राणी मृदुकाय अथवा मऊ शरीराचे असून त्यांच्या शरीरावर संरक्षक कवच नसतें असे प्राणी अनंतकालापासून पृथ्वीच्या इतिहासामध्यें अस्तित्वांत असले पाहिजेत.

विल्यम स्मिथ यानें घालून दिलेल्या तत्त्वाप्रमाणें प्राण्यवशेषयुक्त प्रस्तरांचे किंवा खडकांचे पुढें दिल्याप्रमाणें वर्ग पाडलेले आहेत : हे वर्ग निरनिराळ्या कालास अनुसरून पाडलेले असून त्यांस त्या कालाचेंच नांव देण्यांत येतें. या कालास पांच मोठालीं युगें असें त्यांमध्यें आढळणाऱ्या अवशेषांवरून म्हणण्यांत येतें: आर्ष (आर्किअन) युग—हा सर्वांत प्राचीन काल असून हें नांव अनेक ठिकाणीं वापरण्यांत येतें. कॅंब्रियनपूर्व स्तरास पूर्वप्राचीन (प्रोटेरोझोइक) युगीन असें नांव देणें अधिक योग्य होईल. यानंतर प्राचीन युगीन (पॅलिओझोइक) अथवा जुन्या प्राण्यांचा वर्ग येतो. त्यानंतर मध्ययुगीन अथवा मध्यकालिक (मेसोझोइक) प्राणी येतात. त्यानंतर अर्वाचीन (केनोझोइक) अथवा अलीकडचे प्राणी आढळतात. कांहीं ग्रंथकार एक चतुर्थयुग (क्वॉर्टर्नरी) नांवाचा एक पांचवा काल मानतात व या कालांत मनुष्यप्राणी पृथ्वीवर अवतीर्ण झाला असें समजतात. या युगाचे नंतर श्रेणी (सीरीज) आणि काल (एपॉक) असे पोटविभाग पाडण्यांत येतात आणि त्यानंतर यांचे पुनः टप्पे (स्टेजेस्) आणि विभाग (एजेस्) असें वर्गीकरण करण्यांत येतें.

अश्मशास्त्र (पेट्रॉलॉजी)— खडकामध्यें जे निरनिराळ्या प्रकारचे खनिज घटक आढळून येतात त्यांवरून निरनिराळ्या खडकांचें शास्त्रोक्त पद्धतीनें वर्णन करणें व अभ्यास करणें आवश्यक वाटूं लागलें. खनिज शास्त्रज्ञांनीं जी ग्रंथरचना केली—

विशेषतः आर्. जे. ह्याउई (१८०१ व १८२२) आणि अलेक्झांडर ब्रॉगनियार्ट (१८१३ व १८२७), ए. जी. वर्नर (१७७५,१८१७) यांनीं जे ग्रंथ लिहिले—त्यामुळें खनिजांचा अभ्यास विशेष रीतीनें होऊं लागला; परंतु त्यांनीं सध्यां अग्निजन्य खडक म्हणून माहीत असलेल्या खडकासंबंधीं जें मत प्रदर्शित केलें त्यामुळें भूस्तरशास्त्राच्या अभ्यासास उलट अडथळाच उत्पन्न झाला. जेम्स हटन यानें १७८५ मध्यें ग्लेन टिल्ट या ठिकाणीं वज्रतुंड (ग्रानाइट) दगड हा आगंतुकपणें आढळून येतो, असें दाखवून दिल्यामुळें ज्या ठिकाणीं स्फटिकमय सिकतित खडक असतात त्या ठिकाणीं ते इतर सर्व खडकांपेक्षां जुने असतात, ही समजूत निराधार ठरली.

खडकांचें सामान्यतः पुढें दिल्याप्रमाणें वर्गीकरण करण्यांत येतें: १. अग्निजन्य अथवा रसापासून उत्पन्न झालेले (इग्नियस). २. संचयनरूप अथवा पुरामुळें व खडक झिजल्यामुळें वाहून आलेला गाळ सांचून चनलेले गाळाचे खडक (सेडिमेंटरी). यांचा एक पोटविभाग जलमग्न म्हणजे पाण्याखालीं असलेले (ॲक्वियस) असा मानण्यांत येतो. ३. रूपांतरित अथवा ज्यांच्या रचनेमध्यें आणि ज्यांच्या खनिज स्वरूपामध्यें पृथ्वीच्या दाबामुळें आणि पृथ्वींतील उष्णतेमुळें अनेक फरक घडून आलेले आहेत असे (मेट्यामॉरफिक). पृथ्वी जर एका कालीं वितळलेल्या रसाच्या स्वरूपांत असेल तर अग्निजन्य खडक हे सर्वांत प्राचीन व प्राथमिक स्वरूपाचे खडक असले पाहिजेत, व त्यांच्यापासून इतर सर्व खडक घनले असले पाहिजेत. अग्निजन्य खडक पृथ्वीच्या बऱ्याच वरच्या पृष्ठभागाच्या थरांत आढळून येतात याचें कारण ते पृथ्वीच्या कवचास घड्या पडल्यामुळें किंवा पीळ पडल्यामुळें मधील फटींमधून वर आले असावे हें होय. अग्निजन्य खडकातील जो खडक सर्वांत अखेरीस घनस्वरूप पावला असेल त्याचा काल हा सर्व खडकाचा काल मानण्यांत येतो. त्याचा कांहीं भाग जर दुसऱ्या प्रकारच्या खडकामध्यें घुसला असेल तर तो ज्यामध्यें घुसला असेल त्या खडकापेक्षां अर्वाचीन असला पाहिजे व त्याच्या फटींत तो भिंतीसारखा बसलेला असावा. परंतु या जातीच्या खडकांचे कांहीं गोटे मागाहून त्यावर बसणाऱ्या थरावरहि आढळून येणें साहजिक आहे. यावरून त्या खडकांचा सर्वांत प्राचीन व सर्वांत अर्वाचीन काल ठरवितां येतो. रूपांतरित खडकांचा विचार करतांना त्याची अनेक प्रकारचीं रूपें आढळतात व त्यामुळें अनेक निरनिराळे प्रश्न उत्पन्न होतात. यांपैकीं कांहीं खडकांची रचना पत्राकार असून ते बहुधा गाळाचे बनले असावेत, व त्यांमध्यें कांहीं खनिज द्रव्यें उष्ण वाफेच्या योगानें तयार झालेलीं असावींत. या खडकास संपुट (शिस्ट) शिला असें म्हणतात. जंघूर (नीस) नांवाचे जे दगड असतात ते कांहींसे वज्रतुंड दगडांचें चूर्ण झाल्यामुळें प्रथम वाहून येऊन नंतर घनरूपांत रूपांतर पावले असावेत. पूर्णाकार जंघूरी दगडास प्राथमिक स्वरूपाचे खडक मानण्यांत येत असे, परंतु ते अग्निजन्य खडकापेक्षां प्राचीन कालच्या खडकामध्यें अग्निजन्य खडक घुसल्यामुळें बनले असावे असें दिसतें. पृथ्वीच्या कवचावरील सामान्यतः अगदीं वरचे थर हे बहुतेक गाळाच्या खडकाचे बनलेले असून पुरामुळें उत्पन्न झाले असावे. ज्या पद्धतीनें प्राचीन काळीं खडक बनत असत ती क्रिया अद्यापहि चालू असलेली आपणांस आढळून येते.

रचनात्मक भूस्तरशास्त्र— एखादी खाण खोदीत असतांना आपणांस कांहीं थर मध्येंच वांकलेले (ॲन्टीक्लाइन्स) आढळून येतात तर कांहीं थर खालीं जाऊन जमिनींत परतल्यासारखे (सिंक्लाइन्स) आढळण्यांत येतात. पहिल्या प्रतीचे थर हे लांबट घुमटाच्या आकाराचे असतात व दुसऱ्या प्रकारचे थर चमच्याच्या आकाराचे व खोलगट असतात. अशा तऱ्हेनें वांकलेला थर क्षितिजाशीं अमुक कोनांत नमला आहे (डिप) असें मानतात; व समांतर रेषेमध्यें पसरलेल्या थरांच्या दिशेस त्याची धांव (स्ट्राइक) असें म्हणतात. अशा तऱ्हेनें पसरणारे थर एका बाजूला ढकलले जाऊन त्यांची घडी पडल्यासारखे होऊन त्यास समपातळींतील थरांचें स्वरूप येतें व अशा वेळीं या वळलेल्या थरामध्यें खालील थरांची रचना वरील थरांपेक्षां उलट प्रकारची असल्याचें दृष्टीस पडतें. अशा वळकटीचा वरील भाग थोड्या नमत्या कोनानें एका बाजूला पसरत जाऊन मूळ स्थानापासून १० ते २० मैल अंतरावर सुद्धां जाऊन पोहोंचतो.

प्राचीनप्राण्यवशेषशास्त्र— अत्यंत प्राचीन काळच्या प्राण्यांचें ज्ञान आपणांस त्यांचे जे प्रास्तर अवशेष आढळून येतात त्यांवरून होतें. आपण कॅम्ब्रियन काळांतील खडकाचा अभ्यास केला तर आपणांस त्या कालांत कवचधर प्राणी अनेक जातींचे पण प्राथमिक स्वरूपांतील आढळून येतात. या कालांत प्रवाल कीटक ऱ्हस्वपाद प्राणी आणि कांहीं विशिष्ट आकाराचीं कालवें अथवा मृदुकाय प्राणी समुद्रामध्यें राहत असल्याचें दिसून येतें. परंतु त्या कालांत मुख्यतः आढळून येणारे प्राणी म्हणजे कोमल अंकुरावर उपजीविका करणारे प्राणी म्हणजे त्रिपालिका जातीचे (ट्रीलोबाइट) होते. गॉटलँडियन (सिल्युरियन) कालामध्यें यांच्याऐवजीं तंतुजालयुक्त प्राणी (ॲरॅक्नीड), तसेंच वल्ह्यासारखे अवयव असणारे प्राणी (युरिप्टेरिडा) व विंचवाच्या जातीचे समुद्रांत आढळणारे प्राणी हे मुख्यतःच जलचर प्राणी असून जमिनीवर विंचू आणि शेणकिड्यांसारखे प्राणी उत्पन्न झालेले आढळतात. याच कालांत मत्स्य हा पहिला सपृष्ठवंश प्राणी दृष्टीस पडतो. डेव्होनियन

कालांतील माशांच्या अंगावर एक खवल्यांचें बनलेलें अस्थिमय कवच असल्यासारखे तर कांहीं मासे तीस फूटपर्यंत लांबीचे व बरेच घळकट आणि धीट झालेले दृष्टीस पडतात. कर्बयुक्त कालामध्यें (कॉर्बोनिफेरस) सपृष्ठवंश प्राण्यांमध्यें भूजलचर प्राणी विशेष प्रगति पावलेले आढळून येतात. याच वेळीं रशिया, दक्षिण आफ्रिका व टेक्सस प्रांतामध्यें परमियन काळांत सरपटणारे प्राणी अनेक तऱ्हेचे आढळून येतात. याच वेळीं ट्रायसमध्यें प्रचंड स्वरूपाचे सक्षुर प्राणी (डिनोसोर्स) आणि त्याचबरोबर कांहीं सस्तन प्राणी व पोटाशीं पिशवी असलेले प्राणी (मार्सुपियल) उत्पन्न झाल्याचें दृष्टीस पडतें. त्याचप्रमाणें समुद्रामध्यें ५० फूट लांबीचे अजस्र सरपटणारे प्राणी तयार झाल्याचें दृष्टीस पडतें. यांस पंख असून त्यांच्या हातास असलेल्या बोटांच्या साहाय्यानें ते हवेंत उड्या मारीत असावेत असें वाटतें. हे प्राणी कधीं कधीं जमिनीवरहि फिरत असून याची लांबी १०० फुटांपर्यंतहि असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. लहान लहान प्राणी सुरक्षिततेकरितां झाडावर राहूं लागले असावे असें वाटतें, व या प्राण्यांपासूनच अपर जुरासिक कालामध्यें पक्ष्यांची उत्पत्ति झाली असावी. कवचधर प्राण्यांच्या कालामध्यें (क्रेटेशियस) ज्यांस पोहतां येई असे पक्षी अस्तित्वांत होते. परंतु हवेमध्यें उडणारे सर्व अथवा सरपटणारे प्राणी (प्टेरोसॉरस) हेच विशेष असावे व वरील अजस्र सक्षुर प्राणी हे जमिनीवर वास्तव्य करीत असावे. या कालाच्या मध्याच्या सुमारास सपुष्प वनस्पतींच्या व वृक्षांच्या जाती निर्माण झाल्या असाव्यात. यानंतर कोणत्या तरी एखाद्या भयंकर सूक्ष्म जंतुजन्य रोगाची सांथ येऊन सर्व सरपटणाऱ्या प्राण्यांचा नाश झाला असावा, व यानंतर जे सस्तन प्राणी आतांपर्यंत दुर्बलच राहिले होते त्यांचा प्रसार जमीन व पाणी यांच्यावर सर्वत्र होऊन वटवाघळासारखे प्राणीहि हवेमध्यें निर्माण झाले असावे. एओसिन काळांतील फेनॅकोडस या प्राण्यापासून टेपर, गेंडा आणि अश्व हे उत्पन्न झाले असावे. एओसिन काळांत व्हेल मासे दृष्टीस पडतात आणि लेमूर हा मर्कटाचा पूर्वजहि आढळतो. यानंतर प्राथमिक मनुष्यस्वरूपाचे प्राणी हळूहळू दिसूं लागून सर्व पूर्वप्राचीन युगात त्यांची हळूहळू वाढ होत गेल्याच्या खुणा दृष्टीस पडतात. (विश्वकोश, विभाग १ ला, प्रस्तावना पाहा.)

कै. कृ. वि. वझे, इंजिनियर, यांनीं आपल्या पुराणांचा व आधुनिक शास्त्रांचा तौलनिक अभ्यास करून भरतखंड कसें बनलें याचा भूस्तरशास्त्रविषयक संशोधनपर इतिहास दिला आहे (महाराष्ट्र साहित्य-पत्रिका) तो थोडक्यांत पुढें देत आहों.

भारतीय भूघटना—या भारतवर्षाला पूर्वी जंबुद्वीप—पेरूच्या आकाराचें बेट असें म्हणत असत. या पेरूचा देठ हिमालयाकडे असून त्याचा शेंडा रामेश्वराकडे आहे.

एकंदर काळाचे शास्त्रकारांनीं चार प्रकार केले आहेत: (१) कलि म्हणजे ज्यांत फारशा घडामोडी होत नाहींत तो झोंपेचा काळ; (२) ज्या काळांत पुष्कळ गाळ टाकण्यांत येतो तो काळ म्हणजे द्वापर; (३) ज्या काळीं पुष्कळ ज्वालामुखी सारखे स्फोट होतात तो काळ म्हणजे त्रेता; व (४) ज्यांत सारख्या उलथापालथी होत असतात तो काळ म्हणजे कृत. या काळांना युग अशी पारिभाषिक संज्ञा आहे. पृथ्वीवरील घडामोडींचा इतिहास या चार काळांत विभागून सांगतात.

हिमालयापासून विंध्य पर्वतापर्यंतचा भाग द्वापर युगांत झाला असून त्याला सात्त्विक, नागर किंवा सौम्य अशीं नांवें आहेत. विंध्य पर्वतापासून कृष्णा किंवा तुंगभद्रापर्यंतचा प्रदेश त्रेता युगांत झाला असून याला द्राविड किंवा राजस असें नांव आहे. यालाच आग्नेय असेंहि म्हणतात. कृष्णा किंवा तुंगभद्रा यांच्या दक्षिणेचा रामेश्वरापर्यंतचा प्रदेश कृतयुगांत झाला असून त्याला तामस किंवा वेसर असें म्हणतात. या एक एक युगांत तीन तीन चक्रें व एक एक चक्रांत तीन तीन वर्णे किंवा गुण आहेत. याप्रमाणें भरतवर्षाचे सत्तावीस भाग होतात. त्यांपैकीं सोळा भाग स्पष्ट व प्रमुख आहेत.

हे जे निरनिराळे प्रकार पडले आहेत असे प्रदेश सर्वत्र असतात. एका प्रांतांत निरनिराळे जिल्हे व एका जिल्ह्यांत निरनिराळे तालुके व गांव या गुणांनीं युक्त सांपडतील. परंतु सगळे सोळा अठरा प्रकार एका ठिकाणीं असे पृथ्वीवर भरतवर्षाशिवाय इतरत्र नाहींत. उदाहरणार्थ, ईजिप्त 'नदीमातृक' आहे. स्वित्झर्लंड 'सुरक्ष' आहे; वगैरे. या भरतखंडाचा हाच विशेष आहे कीं, सगळ्या पृथ्वीवरील स्थिति येथें आहे, परंतु येथील सर्वसंग्रह इतरत्र नाहीं.

पृथ्वी घट्ट झाल्यावर पहिल्यानें तयार झालेला भाग विषुववृत्तावर होता व ध्रुवाकडे तेव्हां पृथ्वी पातळ होती. पृथ्वी स्वतःच्या आंसाभोंवतीं गरगर फिरत असल्यामुळें ती पातळ होती तेव्हां विषुववृत्ताकडे तो पातळ भाग जास्त येऊन गोळे होऊन उडून जात असे व त्यामुळें तेथील भाग पहिल्यानें घट्ट झाला. हे गोळे कणीदार व खाळ असतात. यांत रत्नें सांपडतात. वनस्पती अगर प्राणी सांपडत नाहींत. या भागांत वरचेवर फार उलथापालथी झाल्यामुळें हे गोळ्यांचे बनलेले दगड वांकडेतिकडे झाले आहेत व म्हणून यांना वेसर (मेटॅमॉर्फिक) दगड म्हणतात. कृतयुग म्हणजे पहिलें युग म्हणून या दगडांना (प्रायमरी) असेंहि म्हणतात. यांत तत्त्वांचे अवशेष सांपडत नाहींत म्हणून यांना (आर्कीअन), किंवा (अझोइक)

असेंहि म्हणतात. मद्रास, नीलगिरि, बेझवाडा, ओरिसा व बुंदेलखंड या भागांत असले दगड आहेत. त्यांपैकीं मद्रास, बेझवाडा व ओरिसा हा भाग आजतागायत समुद्राखालीं गेलेला दिसत नाहीं.

या कृतयुगांत तीन चक्रें झालीं. तीं रत्नचक्र, हेमचक्र व अश्मचक्र या नांवांनीं प्रसिद्ध आहेत. पहिले जे दगड तयार झाले ते रत्नचक्रांकित होत. यांत गोवळकोंडा वगैरे भाग अगदीं पहिले होत. रावणाची लंका असल्याच प्रदेशांत होती म्हणून तेथें सोनें व रत्नें विपुल होतीं. यानंतर हेमचक्र आलें. वरच्या कवचाला चिरा पडून त्यांत सुवर्ण, रजत या धातूंचा रस त्यांत येऊन बसला व त्यांचा जो थर बनला त्याला धारवाड थर म्हणतात. धारवाड, कोलार हा प्रदेश या प्रकारचा आहे. सोन्याला अग्नीचें रेत किंवा वीर्य म्हणण्याचें कारण तें अग्नींतून पातळ होऊन बाहेर आलेलें दिसतें.

कृतयुगांतील दगडांचे दोन प्रकार आहेत : एक ओरिसा प्रांतांत सांपडतो. यांतील शिरगोळा (फेल्स्पार) हा पापड-(सोडा)खाराचा बनलेला आहे. दुसरा बुंदेलखंडांत सांपडतो; यांतील शिरगोळा पोटॅशचा बनलेला आहे. या काळचे घट्ट दगड उरले व मऊ भाग वाहून गेला; त्यामुळें नीलगिरि, पारसनाथ, अबू हे डोंगर उरले आहेत. मऊ भागाचे बुंदेलखंड वगैरे पठार बनलें असून शिरांच्या नद्या (कावेरी, चंबळा) झाल्या आहेत. बुंदेलखंडाप्रमाणेंच बालाघाट, होसूर हे भाग ओरिसाचे व बेलारी, कडाप्पा हे नीलगिरीचे आहेत. यापलीकडचा खोलगट भाग म्हणजे बुंदेलखंडाचा गंगा व यमुना यांमधील भाग, ओरिसाचा बंगाल व नीलगिरीचे कर्नाटक, सेलिम हे भाग होत.

धारवाड व अरवली हे भाग सारखे आहेत. अरवलीच्या डोंगरांत झिंद संस्थानांत लवचिक दगड ज्यांना संस्कृतांत 'जलचामर' व इंग्रजींत 'ॲस्बेस्टॉस' म्हणतात ते सांपडतात. हे दगड नीलगिरींत पण सांपडतात. गोट्यांचा प्रदेश म्हणजे गदग होय. येथील गोटे वर्षांच्या जोरानें वाहून आले असावे. नाहीं तर इतका जाड म्हणजे चार हजार फूट खोलीचा थर बसण्यास फार वेळ लागेल. हजारीबाग, एरिणपुरा, वेलोर इकडे अभ्रक फार सांपडतो. असले थर कोईमतुर, विजगापट्टण व कृष्णगड यांकडे आहेत. हा अभ्रक कारखान्यास उपयोगी पडेल असा व इतका आहे.

धारवाड हे थर गोदावरी, विजगापट्टण, हैदराबाद, व गोदावरी आणि महानदी यांच्या दरम्यान नाहींत. हे फक्त धारवाड, बल्लारी, म्हैसूर, नेलोर, बालाघाट, नागपूर, जबलपूर, बिहार, ओरिसा, हजारीबाग, रेवा, अरवली व शिलांग या भागांत आहेत. हिमालय व मध्यदेश यांच्या दोन्ही बाजूंस हे थर 'वैकृत' आहेत. त्यांत उत्तरेकडचे फार बिघडले असून दक्षिणेकडे सिमला, जौनपूर, दार्जिलिंग, सयाम या बाजूचे कमी बिघडलेले आहेत. यांत सोनें, चांदी, लोखंड व तांबें या धातू सांपडतात.

सोनें ज्या गारगोटीच्या थरांत सांपडतें तिचे दोन प्रकार आहेत : (१) पांढरी, व (२) निळी. यांपैकीं निळी जुनी असून पांढरी नवी आहे. कारण पांढरी गार निळ्या गारींत दाबलेली सांपडते. यावरून निळ्या गारेंतील सोनें जुनें व पांढऱ्या गारेंतील नवें असें ठरतें.

धारवाड हा भाग सुरकुत्यांनीं झालेला असून कडाप्पा वगैरे भाग उचलून वर आलेले आहेत. विंध्यसुद्धां असाच वर उचलून येत येत फार उंच वाढला होता. विंध्य मोठा होता तेव्हां हिमालय नव्हता व विंध्याच्या पायथ्याशीं खोल समुद्र होता. हा समुद्र गाळानें भरून जाऊन व हिमालय वर येऊन विंध्य हल्लीं ठेंगणा झाला आहे. कडाप्पाचे डोंगर जोरानें वर उचलले असून विंध्याचे डोंगर हळूच वर उचलले आहेत. ही उचलण्याची क्रिया वेळोवेळीं झाली असून त्यामुळें थर वांकडेतिकडे फार झाले आहेत. कडाप्पाचे थर हिमालयांत नाहींत. विंध्याचे थर मात्र हिमालयांत सर्व लांबीवर तळाशीं आहेत व त्यांवर हिमालयाचा गाळ बसलेला आहे. यावरून विंध्य पर्वत जुना असून त्याच्या पायथ्याच्या समुद्रांत हिमालय जन्मत होता असें दिसतें. विंध्य व सह्याद्रि हे पर्वत समकालीन असून यांच्या दगडांचे थर नर्मदा व तापी यांच्या तळांच्या व कोळशाच्या थरांच्या वर चढलेले आहेत. यावरून या कोळसे वगैरेंच्या थरांनंतर हे ज्वालामुखींचे स्फोट होऊन हे डोंगर उत्पन्न झाले हें उघड आहे. विंध्य पर्वत झाला तेव्हां पापघ्नी, शोण व नर्मदा; व सह्य झाला तेव्हां गोदा व कृष्णा या नद्या बनल्या. बेळगांव-कलादगीकडचे तांबडे दगड व माती हीं ज्वालामुखीच्या आगीनें भाजून गेलेलीं आहेत. तामस खडकावर पाऊस पडून त्याचा मऊ भाग नद्यांच्या पाण्याबरोबर वाहून गेला व त्यांतील कठिण टोले उरले; हे पुढें या खडकांना सुरकुत्या पडतांना खोलगट भागांत जाऊन बसले. या काळाला 'अश्मचक्र' म्हणतात. असा प्रदेश बल्लारी, कडाप्पा, रायचूर हा भाग आहे. या गोळ्यांवरून या काळाला अश्मचक्र असें नांव पडलें आहे. कोणी याला 'ग्रावचक्र' असेंहि म्हणतात. या खडकांना राजस (धुळीचे) खडक म्हणतात.

कृतयुगांतील खडकाची जाडी सुमारें २६ हजार फूट असावी असा अंदाज आहे. यानंतर पृथ्वी बरीच निवली व तिजवर नद्या म्हणण्यालायक असे पाण्याचे ओघ निर्माण झाले. भारत-

वर्षातील असे पहिले ओघ म्हणजे कावेरी व तापी होत. यासाठींच यांना पुराणांत 'सूर्यकन्या' असें नांव आहे. कृतयुगाचा भाग नकाशांत तुटक्या आडव्या रेघांनीं दाखविला आहे.

दुसरें युग म्हणजे त्रेतायुग होय. या युगांत शंखचक्र, मत्स्यचक्र व वृक्षचक्र अशीं तीन चक्रें झालीं. भारतवर्षांत या चक्रांत मोठमोठे ज्वालामुखी पर्वत झाले. सह्य व विंध्य हे असले पर्वत होत व म्हणून या पर्वतांना 'आग्नेय' पर्वत म्हणतात. ज्वालामुखी पर्वतांतून जो दगडाचा रस बाहेर पडला व त्याचे जे खडक बनले त्या खडकांना 'द्राविड' रसाचे झालेले खडक म्हणतात. त्रेतायुगाच्या प्रारंभीं ओरिसापासून रत्नाकरा-अरबी समुद्रा-पर्यंत तापी नदी वाहत असून सभोंवार मोठें जंगल होतें. या जंगलाच्या खालीं तामस खडक होते. ज्या ठिकाणीं पाणी होतें तेथें या काळीं शंख असून त्यांचे खडूचे खडक बनविण्याचे काम चालू होतें. तसेंच यानंतर या पाण्यांत हळूहळू मासेहि निर्माण झाले. खडू ज्या काळीं झाला त्या काळाला शंखचक्र व मासे झाले त्या काळाला मत्स्यचक्र म्हणतात. भारतवर्षांत या काळीं विंध्याद्रीच्या उत्तरभागीं समुद्र होता व त्यांत हे थर पाहण्यास मिळतात. नंतर वृक्षचक्र झालें व या काळांत गोंडवनापासून अरबस्तानापर्यंत तापी जात होती व तेथें दंडकारण्य नांवाचें मोठें जंगल होतें. वऱ्हाड वगैरे भागांत सांपडणारा दगडी कोळसा हा याच जंगलाचा झाला आहे. भुसावळखालीं अठराशें फुटांवर व नाशकाखालीं तीन हजार फुटांवर हा कोळसा आहे. या कोळशावर ज्वालामुखीच्या 'लाव्हा' नांवाच्या दगडी रसाचे तीन हजार फूट उंचीचे थर बसले आहेत.

त्रेता युगांतील खडकाचे थर सुमारें ३९,००० फूट जाड आहेत. जेव्हां ज्वालामुखीच्या स्फोटांनीं सह्य पर्वत बनला तेव्हां पृथ्वीला सुरकुती पडून रत्नाकर ऊर्फ अरबी समुद्र खड्डा झाला व तापी त्याला मिळूं लागली. सह्य पर्वत उंच झाल्यावर गोदावरी व कृष्णा या दोन नद्या व विंध्य पर्वत उंच झाल्यावर नर्मदा नदी निर्माण झाली. या नद्या पुराणांतरीं चंद्रापासून म्हणजे सूर्यापासून उत्पन्न झालेल्या नद्यांनंतर झाल्याचें वर्णन आहे. तसेंच दंडकारण्याला आग लागून तें जळल्याचें व त्या ठिकाणीं नवी जमीन वगैरे झाल्याचेंहि वर्णन पुराणकारांनीं लिहून ठेवलें आहे. या त्रेता युगांतील खडकांत कोळसा, लोखंड, नीललोह (मँगानीज), तांबें, कथील या जिनसा सांपडतात. धारवाड, जबलपूर, मिदनापूर ते जयपूर, रामगड ते बालाघाट, या प्रदेशांत या काळचे खडक भरतवर्षांत आहेत. द्राविड प्रदेश कोणी कृष्णेपर्यंत व कोणी तुंगभद्रेपर्यंत असा जो भेद दाखवितात याचें कारण धारवाड भाग द्राविड नसून परंतु राजस असून या काळचा आहे हें होय. यांना इंग्रजींत 'सेकेंडरी' असें म्हणतात.

यानंतर द्वापरयुग लागलें. या द्वापरयुगाच्या आरंभीं हिमालय समुद्रांतून वर येऊं लागला. व पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पृथ्वीला मोठी सुरकुती पडली. ही सुरकुती म्हणजे शांघायपासून स्पेनच्या टोंकापर्यंत असलेली डोंगराची मोठी ओळ होय. या द्वापरयुगाचे सर्पचक्र, शृंगचक्र, व दंतचक्र असे तीन मुख्य भाग आहेत. नर्मदेपासून यमुनेपर्यंत जे थर पसरलेले आहेत त्यांजकडे नजर फेंकली म्हणजे द्वापरयुगांत शांतपणें समुद्राच्या तळांत हे दगड बनत असल्याचें दिसतें. यांत वांकडेतिकडे किंवा उलथेपालथे थर नाहींत. हीच स्थिति टेहरी, हुशंगाबाद, ग्वाल्हेर, आग्रा येथें आहे. बिजावर थराचे दगड वाहून येऊन त्यांचे पन्ना व गोवळकोंडा, दक्षिणेंत कर्नूल, भीमा व गोदावरी, आणि हिमालयांत चक्रत, सिमला, हैमंत, अटक व पंजल हे थर बनलेले सांपडतात. उत्तम चुन्याचे व रेतीचे दगड ग्वाल्हेर, दिल्ली, आग्रा इकडे मिळतात. यांच्यावर एका टोंकास मिठाचे (शिवालकचे) डोंगर व दुसऱ्या टोंकांस कोळशाचे थर आहेत.

हिमालयांत तीन ते चार हजार फूट कडाप्पाचे थर व त्यावर विंध्याचे एक हजार फूट थर आहेत. त्यांवर मिठाचा थर चिखलांत रुतलेला आहे. यावरून मीठ होत होतें व गाळ बसत होता अशी दुहेरी क्रिया एकदम चालू होती असें दिसतें. हिमालयाच्या पूर्वेस व पश्चिमेस आराकान, योमा व बलुचिस्तान यांत कोळशाच्या खालचे थर मुळींच नाहींत. तिबेटांत प्रवालमय (खडूचे) थर पंधराशें फूट, त्यावर पंधराशें फूट गार व त्यावर सहाशें फूट चुनखडी आहे. काश्मीरची पंचल टेंकडी, स्वात, चित्रळ, उत्तरशान येथेंहि हीच स्थिति आहे. यांच्यापलीकडे चीन, हजारा इकडे ज्वालामुखीचे स्फोट झाले आहेत. हा भाग मध्यंतरीं समुद्राच्यावर येऊन ज्वालामुखीचे स्फोट झाल्यावर फिरून बुडाला असावा. याच वेळीं दक्षिणेंत सह्य वगैरे पर्वत बनले व हिमालयवर आल्यावर सिंधु, ब्रह्मपुत्रा, वगैरे नद्या निर्माण झाल्या व त्या कराची व कलकत्त्याकडे समुद्राला मिळूं लागल्या. याप्रमाणें विंध्य व हिमालय यांमधील सर्व भाग या द्वापर युगांत झाला.

द्वापरयुगांतील विंध्य व हिमालय यामधील गाळाचे थर सुमारें सत्तावीस हजार फूट आहेत. हे पाण्यांत निर्माण झाले म्हणून यांना जलज किंवा सौम्य म[illegible]
सपाट आहे म्हणून हिला नागर (न[illegible]
म्हणतात. ही सुपीक असल्यानुळें [illegible]
म्हणजे गुड (गुळ) उत्पन्न [illegible]

जमीन होय. या थरांत प्राण्यांचे अवशेप सांपडतात म्हणून यांना 'सात्त्विक' असें म्हणतात.

द्वापरयुगांत सर्पचक्र आलें. या वेळीं हिमालय समुद्रांत होता. सरेड, पाकोळया, वगैरे प्राणी या थरांत सांपडतात. यापुढें शृंगचक्र आलें. यांत हरणें, बकऱ्या, वगैरे जनावरें सांपडतात. यानंतर दंतयुग आलें. यांत गेंडा, हत्ती, जिराफ, उंट, घोडा, हीं जनावरें सांपडतात. या भागांत शिवथेरिअम नांवाचा प्राणी सांपडतो. याला चार शिंगें व सोंड आहे. हा सशृंग व अशृंग प्राण्यांच्यामध्यें आहे. या भागांतील जमीन सपाट आहे. यानंतर हिमालय व विंध्य यांमधील मुलूख वर आल्यावर हिमालयांत भोंक पाडून भगीरथानें गंगा नदी दक्षिणेस आणली व तिच्या कांठीं नाना शहरें वसलीं. पुढें राजपुतान्यांतील समुद्र आटला व कच्छचें रण व राजपुताना हा रेताळ मुलूख निर्माण झाला. हा प्रदेश आहे.

येथून कलियुग सुरू झालें. यांत पन्नास फूट खोलीवर हत्ती, घोडा, बैल, माणूस यांचीं हाडें सांपडतात. ह्या काळीं आर्यावर्त झालेला होता व गुजराथ व काठेवाड झाला. गुजराथ म्हणजे साबरमती, मही, नर्मदा व तापी यांचा गाळ. आधुनिक काळांत मुंबईजवळ महालक्ष्मीपाशीं, सिंधूच्या मुखाजवळ, गंगेच्या मुखाजवळील सुंदरबन, कृष्णा व गोदावरीचीं मुखें, येथें नवी जमीन तयार होण्याचें काम आज चालू आहे. यांत अर्वाचीन झाडें, प्राणी, माणसें, वगैरे पांच-पन्नास फुटांच्या आंत सांपडतात. या युगांत इतकाच गाळ बसलेला आहे असें दिसतें.

[ म. सा. पत्रिका, वर्ष १ लें ]

आतां डॉ. द. ल. सहस्रबुद्धे यांनीं पाश्चात्य भूस्तरशास्त्राला धरून भारतीय भूस्तरासंबंधीं जो तक्ता केला आहे तो पुढील पानावर पाहावा.

**भृगु**—एक वैदिक ऋषि. ऋग्वेदांत हा शब्द अनेकवचनी येतो. ऋग्वेदांत अग्निसूक्तामध्यें भृगूंचा वारंवार उल्लेख येतो. पृथ्वीवर अग्नि आणण्याचें काम भृगूंनीं केलें असें या सूक्तांत म्हटलेलें आहे. सातव्या मंडलांत भृगूंना सुदास राजाचे मांडलिक असेंहि म्हटलेलें आढळतें. अथर्ववेदांत भृगूंचा चारदां उल्लेख आला आहे. भृगूंच्या वंशाला भार्गव हें नांव असून त्यांमध्यें जमदग्नि, परशुराम अशा प्रकारचे तेजस्वी ब्राह्मण उत्पन्न झाले. मनुस्मृतींत मनूनें भृगूला पुत्र मानलें असून त्याच्या हवालीं आपला स्मृतिग्रंथ केला असें वर्णन आहे. भृगु हा शब्द भृज्जति = भाजणें या धातूपासून निघाला असें यास्कानें म्हटलें आहे. भृगूसंबंधीं पुराणांतून अनेक कथा आहेत. भृगूची लाथ विष्णूनें श्रीवत्सचिन्ह म्हणून धारण केली (भागवत १०.८९). याला संजीवनी विद्या अवगत होती, ती वापरून त्यानें जमदग्नीला जिवंत केलें (ब्रह्मांड १.३०). हा गोत्रकार आहे. याच्या नांवावर भृगुस्मृति, भृगुगीता, भृगुसंहिता, भृगुसिद्धांत व भृगुसूत्र हे ग्रंथ आहेत.

**भेग**—(क्लीव्हेज). एखाद्या पदार्थामध्यें ज्या दिशेनें किंवा ज्या पद्धतीनें अथवा मार्गानें फट पडते त्यास दोरा, चीर, भेग, इत्यादि म्हणतात. स्फटिकमय पदार्थांस ज्या मार्गानें फट पडते त्यास त्याचें पृष्ठ किंवा पातळी अथवा चीर म्हणतात. पदार्थाला कोणत्या दिशेनें किंवा मार्गानें फट पडेल तें त्या पदार्थाच्या स्वाभाविक स्फटिकमय आकारावर अवलंबून असतें. तसेंच एकाच खनिज पदार्थाचे जर निरनिराळया आकारांचे स्फटिकमय पदार्थ असतील तर ते सर्व एकाच मार्गानें भेगतील किंवा त्यांस चिरा पडतील. आणि अशा रीतीनें नियमितपणें भेगा पडणारे पदार्थ खनिज द्रव्यांमध्यें त्यांच्या जाती ओळखण्याच्या कामीं फार उपयुक्त असतात. खडकांमध्यें फटी पडणें हें दुसऱ्याहि अनेक कारणांवर अवलंबून असतें. व त्यांतील कणांवर दाब पडल्यामुळें त्यांच्या घसरण्याच्या क्रियेवर अवलंबून असतें.

**भेंड**—(पिथ्). झाडांच्या खोडांच्या मध्यभागीं एक प्रकारचा वाटोळा किंवा निमुळता असा नरम भाग असतो त्याला भेंड (पिथ् किंवा मेडयुला) म्हणतात. हा भेंडाचा भाग प्रथम ओला असतांना हिरवट असून गरदार असतो. परंतु पुढें तो शुष्क होतो. हा भाग म्हणजे त्या वनस्पतीचें अन्नाचें कोठार होय. ज्वारी वगैरेच्या दांड्यांत पुष्कळ भेंड असतें. टोप्या वगैरे तयार करण्याच्या कामीं भेंडाचा उपयोग करतात.

हीं रानझाडें कोंकणांत फार दिसतात. यांना पिवळीं, तांबूस फुलें येतात व फळें मोठ्या पोफळाएवढीं असतात. याचें लांकूड हलकें पण फार चिवट असतें. म्हणून त्याचे रथ, गाड्या, वगैरे करतात.

**भेडसा**—मुंबई, पुणें जिल्हा. खडकाळें (कामशेत) याच्या नैर्ऋत्येस ५ मैलांवर हें गांव असून येथें बौद्ध लेणीं आहेत. दोन मुख्य लेण्यांत चैत्य आहेत. प्रवेशद्वाराजवळ अष्टकोनी स्तंभ आहेत. दरवाजावर शिलालेख आहे. विहिरीजवळच्या एका डेऱ्यावरहि लेख आहे. हीं लेणीं इ. स. पहिल्या शतकातलीं असावींत.

**भेडाघाट**—मध्यप्रांत, जबलपूर जिल्हा, एक गांव. या गांवीं नर्मदा नदी संगमरवरी पहाड फोडून बाहेर निघाली आहे. या फोडलेल्या पहाडांची उंची १२० फूट आहे. चंद्रप्रकाशांत हा देखावा पाहिला तर तो फारच मनोरम दिसतो. ह्या घाटाजवळ पुष्कळ निमुळत्या टेंकड्या आहेत. ह्यांपैकीं एका टेंकडीवर एक अगदीं वेगळ्या प्रकारचें देवालय आहे. ओबडधोबड गुहाहि

वर्षातील असे पहिले ओघ म्हणजे कावेरी व तापी होत. यासाठींच यांना पुराणांत 'सूर्यकन्या' असें नांव आहे. कृतयुगाचा भाग नकाशांत तुटक्या आडव्या रेघांनीं दाखविला आहे.

दुसरें युग म्हणजे त्रेतायुग होय. या युगांत शंखचक्र, मत्स्यचक्र व वृक्षचक्र अशीं तीन चक्रें झालीं. भारतवर्षांत या चक्रांत मोठमोठे ज्वालामुखी पर्वत झाले. सह्य व विंध्य हे असले पर्वत होत व म्हणून या पर्वतांना 'आग्नेय' पर्वत म्हणतात. ज्वालामुखी पर्वतांतून जो दगडाचा रस बाहेर पडला व त्याचे जे खडक बनले त्या खडकांना 'द्राविड' रसाचे झालेले खडक म्हणतात. त्रेतायुगाच्या प्रारंभीं ओरिसापासून रत्नाकरा–अरबी समुद्रा–पर्यंत तापी नदी वाहत असून सभोंवार मोठें जंगल होतें. या जंगलाच्या खालीं तामस खडक होते. ज्या ठिकाणीं पाणी होतें तेथें या काळीं शंख असून त्यांचे खडूचे खडक बनविण्याचे काम चालू होतें. तसेंच यानंतर या पाण्यांत हळूहळू मासेहि निर्माण झाले. खडू ज्या काळीं झाला त्या काळाला शंखचक्र व मासे झाले त्या काळाला मत्स्यचक्र म्हणतात. भारतवर्षांत या काळीं विंध्याद्रीच्या उत्तरभागीं समुद्र होता व त्यांत हे थर पाहण्यास मिळतात. नंतर वृक्षचक्र झालें व या काळांत गोंडवनापासून अरबस्तानापर्यंत तापी जात होती व तेथें दंडकारण्य नांवाचें मोठें जंगल होतें. वऱ्हाड वगैरे भागांत सांपडणारा दगडी कोळसा हा याच जंगलाचा झाला आहे. भुसावळखालीं अठराशें फुटांवर व नाशकाखालीं तीन हजार फुटांवर हा कोळसा आहे. या कोळशावर ज्वालामुखीच्या 'लाव्हा' नांवाच्या दगडी रसाचे तीन हजार फूट उंचीचे थर बसले आहेत.

त्रेता युगांतील खडकाचे थर सुमारें ३९,००० [illegible] आहेत. जेव्हां ज्वालामुखीच्या स्फोटांनीं सह्य पर्व[illegible] पृथ्वीला सुरकुती पडून रत्नाकर ऊर्फ अरबी [illegible] व तापी त्याला मिळूं लागली. सह्य पर्व[illegible] वरी व कृष्णा या दोन नद्या व विंध्य [illegible] नर्मदा नदी निर्माण झाली. या नद्या पुराणांत [illegible] म्हणजे सूर्यापासून उत्पन्न झालेल्या नद्यांनंतर झाल्या [illegible] आहे. तसेंच दंडकारण्याला आग लागून तें जळल्याचें व [illegible] ठिकाणीं नवी जमीन वगैरे झाल्याचेंहि वर्णन पुराणकारांनीं लिहून ठेवलें आहे. या त्रेता युगांतील खडकांत कोळसा, लोखंड, नीललोह (मँगानीज), तांबें, कथील या जिनसा सांपडतात. धारवाड, जबलपूर, मिदनापूर ते जयपूर, रामगड ते बालाघाट, या प्रदेशांत या काळचे खडक भरतवर्षांत आहेत. द्राविड प्रदेश कोणी कृष्णेपर्यंत व कोणी तुंगभद्रेपर्यंत असा जो भेद दाखवितात याचें कारण धारवाड भाग द्राविड नसून परंतु राजस असून या काळचा आहे हें होय. यांना इंग्रजींत 'सेकेंडरी' असें म्हणतात.

यानंतर द्वापरयुग लागलें. या द्वापरयुगाच्या आरंभीं हिमालय समुद्रांतून वर येऊं लागला. व पूर्व समुद्रापासून पश्चिम समुद्रापर्यंत पृथ्वीला मोठी सुरकुती पडली. ही सुरकुती म्हणजे शांघायपासून स्पेनच्या टोंकापर्यंत असलेली डोंगराची मोठी ओळ होय. या द्वापरयुगाचे सर्पचक्र, शृंगचक्र, व दंतचक्र असे तीन मुख्य भाग आहेत. नर्मदेपासून यमुनेपर्यंत जे थर पसरलेले आहेत त्यांजकडे नजर फेंकली म्हणजे द्वापरयुगांत शांतपणें समुद्राच्या तळांत हे दगड बनत असल्याचें दिसतें. यांत वांकडेतिकडे कि[illegible] उलथेपालथे थर नाहींत. हीच स्थिति टेहरी, दुर्गाबाद, [illegible] आग्रा येथें आहे. विजावर थराचे दगड वाहून [illegible] पन्ना व गोवळकोंडा, दक्षिणेंत कर्नूल, भीमा व [illegible] हिमालयांत चक्रत, सिमला, हैमंत, अटक [illegible] लेले सांपडतात. उत्तम चुन्याचे व [illegible] आग्रा इकडे मिळतात. यांच[illegible] (शिवालकचे) डोंगर व [illegible]

हिमालयांत तीन [illegible] वर विंध्याचे [illegible] चिखलांत [illegible] बसत [illegible] [illegible]

द्वा[illegible] सुमारें सत्ता[illegible] म्हणून यांना [illegible] सपाट आहे म्हणून [illegible] म्हणतात. ही सुपीक असल्या[illegible] म्हणजे गुड (गुळ) उत्पन्न क[illegible]

जमीन होय. या थरांत प्राण्यांचे अवशेप सांपडतात म्हणून यांना 'सात्विक' असें म्हणतात.

द्वापरयुगांत सर्पचक्र आलें. या वेळीं हिमालय समुद्रांत होता. सरडे, पाकोळ्या, वगैरे प्राणी या थरांत सांपडतात. यापुढें शृंगचक्र आलें. यांत हरणें, बकऱ्या, वगैरे जनावरें सांपडतात. यानंतर दंतयुग आलें. यांत गेंडा, हत्ती, जिराफ, उंट, घोडा, हीं जनावरें सांपडतात. या भागांत शिवथेरिअम नांवाचा प्राणी सांपडतो. याला चार शिंगें व सोंड आहे. हा सशृंग व अशृंग प्राण्यांच्यामध्यें आहे. या भागांतील जमीन सपाट आहे. यानंतर हिमालय व विंध्य यांमधील मुलूख वर आल्यावर हिमालयांत भोंक पाडून भगीरथानें गंगा नदी दक्षिणेस आणली व तिच्या कांठीं नाना शहरें वसलीं. पुढें राजपुतान्यांतील समुद्र आटला व कच्छचें रण व राजपुताना हा रेताळ मुलूख निर्माण झाला. हा प्रदेश आहे.

येथून कलियुग सुरू झालें. यांत पन्नास फूट खोलीवर हत्ती, घोडा, बैल, माणूस यांचीं हाडें सांपडतात. ह्या काळीं आर्यावर्त झालेला होता व गुजराथ व काठेवाड झाला. गुजराथ म्हणजे साबरमती, मही, नर्मदा व तापी यांचा गाळ. आधुनिक काळांत मुंबईजवळ महालक्ष्मीपाशीं, सिंधूच्या मुखाजवळ, गंगेच्या मुखाजवळील सुंदरबन, कृष्णा व गोदावरीचीं मुखें, येथें नवी जमीन तयार होण्याचें काम आज चालू आहे. यांत अर्वाचीन झाडें, प्राणी, माणसें, वगैरे पांच-पन्नास फुटांच्या आंत सांपडतात. या युगांत इतकाच गाळ बसलेला आहे असें दिसतें.

[ म. सा. पत्रिका, वर्ष १ लें ]

आतां डॉ. द. ल. सहस्त्रबुद्धे यांनीं पाश्चात्य भूस्तरशास्त्राला धरून भारतीय भूस्तरासंबंधीं जो तक्ता केला आहे तो पुढील पानावर पाहावा.

**भृगु**—एक वैदिक ऋषि. ऋग्वेदांत हा शब्द अनेकवचनी येतो. ऋग्वेदांत अग्निसूक्तामध्यें भृगूंचा वारंवार उल्लेख येतो. पृथ्वीवर अग्नि आणण्याचें काम भृगूंनीं केलें असें या सूक्तांत म्हटलेलें आहे. सातव्या मंडलांत भृगूंना सुदास राजाचे मांडलिक असेंहि म्हटलेलें आढळतें. अथर्ववेदांत भृगूंचा चारदां उल्लेख आला आहे. भृगूंच्या वंशाला भार्गव हें नांव असून त्यांमध्यें जमदग्नि, परशुराम अशा प्रकारचे तेजस्वी ब्राह्मण उत्पन्न झाले. मनुस्मृतींत मनूनें भृगूला पुत्र मानलें असून त्याच्या हवालीं आपला स्मृतिग्रंथ केला असें वर्णन आहे. भृगु हा शब्द भृज्जति = भाजणें या धातूपासून निघाला असें यास्कानें म्हटलें आहे. भृगूसंबंधीं पुराणांतून अनेक कथा आहेत. भृगूची लाथ विष्णूनें श्रीवत्सचिन्ह म्हणून धारण केली ( भागवत १०.८९ ). याला संजीवनी विद्या अवगत होती, ती वापरून त्यानें जमदग्नीला जिवंत केलें ( ब्रह्मांड १.३० ). हा गोत्रकार आहे. याच्या नांवावर भृगुस्मृति, भृगुगीता, भृगुसंहिता, भृगुसिद्धांत व भृगुसूत्र हे ग्रंथ आहेत.

**भेग**—( क्लीव्हेज ). एखाद्या पदार्थामध्यें ज्या दिशेनें किंवा ज्या पद्धतीनें अथवा मार्गानें फट पडते त्यास दोरा, चीर, भेग, इत्यादि म्हणतात. स्फटिकमय पदार्थास ज्या मार्गानें फट पडते त्यास त्याचें पृष्ठ किंवा पातळी अथवा चीर म्हणतात. पदार्थाला कोणत्या दिशेनें किंवा मार्गानें फट पडेल तें त्या पदार्थाच्या स्वाभाविक स्फटिकमय आकारावर अवलंबून असतें. तसेंच एकाच खनिज पदार्थाचे जर निरनिराळ्या आकारांचे स्फटिकमय पदार्थ असतील तर ते सर्व एकाच मार्गानें भेगतील किंवा त्यांस चिरा पडतील. आणि अशा रीतीनें नियमितपणें भेगा पडणारे पदार्थ खनिज द्रव्यांमध्यें त्यांच्या जाती ओळखण्याच्या कामीं फार उपयुक्त असतात. खडकांमध्यें फटी पडणें हें दुसऱ्याहि अनेक कारणांवर अवलंबून असतें. व त्यांतील कणांवर दाब पडल्यामुळें त्यांच्या घसरण्याच्या क्रियेवर अवलंबून असतें.

**भेंड**—( पिथ् ). झाडांच्या खोडांच्या मध्यभागीं एक प्रकारचा वाटोळा किंवा निमुळता असा नरम भाग असतो त्याला भेंड ( पिथ् किंवा मेड्युला ) म्हणतात. हा भेंडाचा भाग प्रथम ओला असतांना हिरवट असून गरदार असतो. परंतु पुढें तो शुष्क होतो. हा भाग म्हणजे त्या वनस्पतीचें अन्नाचें कोठार होय. ज्वारी वगैरेच्या दांड्यांत पुष्कळ भेंड असतें. टोप्या वगैरे तयार करण्याच्या कामीं भेंडाचा उपयोग करतात.

हीं रानझाडें कोंकणांत फार दिसतात. यांना पिवळीं, तांबूस फुलें येतात व फळें मोठ्या पोफळाएवढीं असतात. याचें लांकूड हलकें पण फार चिवट असतें. म्हणून त्याचे रथ, गाड्या, वगैरे करतात.

**भेडसा**—मुंबई, पुणें जिल्हा. खडकाळें ( कामशेत ) याच्या नैर्ऋत्येस ५ मैलांवर हें गांव असून येथें बौद्ध लेणीं आहेत. दोन मुख्य लेण्यांत चैत्य आहेत. प्रवेशद्वाराजवळ अष्टकोनी स्तंभ आहेत. दरवाजावर शिलालेख आहे. विहिरीजवळच्या एका डेऱ्यावरहि लेख आहे. हीं लेणीं इ. स. पहिल्या शतकातलीं असावींत.

**भेडाघाट**—मध्यप्रांत, जबलपूर जिल्हा, एक गांव. या गांवीं नर्मदा नदी संगमरवरी पहाड फोडून बाहेर निघाली आहे. या फोडलेल्या पहाडांची उंची १२० फूट आहे. चंद्रप्रकाशांत हा देखावा पाहिला तर तो फारच मनोरम दिसतो. ह्या घाटाजवळ पुष्कळ निमुळत्या टेंकड्या आहेत. ह्यांपैकीं एका टेंकडीवर एक अगदीं वेगळ्या प्रकारचें देवालय आहे. ओबडधोबड गुहादि

| | | समुद्रजन्य प्रस्तर | शुद्धजलजन्य प्रस्तर | युरोप व अमेरिकेंतील तत्सम युगें | |
|---|---|---|---|---|---|
| प्रस्तरावशेषयुक्त | आर्य | वर आलेले समुद्रकांठ, पोंवळयाचे खडक ... ... | अर्वाचीन मळी जमीन;पोरबंदरी दगड;ओसाड प्रदेशांतील वाळू | अलीकडील } तृतीयावस्थोत्तर | निर्मानुष (सिनोझोइक) |
| | | कडलोर वाळूचे खडक ... ... ... ... ... | नर्मदा व गोदावरी यांच्या कांठच्या जुन्या मळी जमिनी. | प्लीस्टोसीन } तृतीयावस्थोत्तर | |
| | | मकराण श्रेणी ... ... ... ... ... ... | वरच्या शिवालिक व इरावती श्रेणी. | नूतन (प्लीओसीन) } तृतीयावस्थाक | |
| | | गाज, येनगयौंग आणि प्रोम श्रेणी ... ... ... ... | खालचा मंछर. | नवपूर्व (मिओसीन) } तृतीयावस्थाक | |
| | | नारी ... ... ... ... ... ... ... ... | कसौली. | नवपूर्वतर (ऑलीगोसीन) } तृतीयावस्थाक | |
| | | कीरथर, राणीकोट, सबाथू, ... ... ... ... ... | | नवप्रभात (एओसीन) } तृतीयावस्थाक | |
| | | कार्डिटा ब्युमांटी थर ... ... ... ... ... | दक्षिण हिंदुस्थानांतील काळवथरी दगड (ट्रॅप). } | | |
| | | सिक्किम श्रेणी; बाघ थर; अरियलूर, त्रिचनापल्ली व उततूर थर. | लामेटा श्रेणी } | सितोपल (क्रेटेसियस) | मध्ययुग (मेसोझोइक) |
| | | स्पिटीशेल (स्लेटीसारखा खडक), बलुचिस्तानांतील मोठाले चुनखडीचे खडक; उमिआ. | } जबलपूर श्रेणी. } राजमहाल व महादेव श्रेणी (गोंडवनी रचना) | ज्यूरीन (ज्युरासिक) | |
| | | कच्छोल, चारी कच्छांतील पटचम श्रेणी. सीपै श्रेणी | | | |
| | | मध्य हिमालयांतील 'ट्रायस'; क्षारपर्वतांतील सोराइट प्रस्तर. | पांचेट श्रेणी (गोंडवनी रचना) | त्रिस्तर (ट्रिआसिक) | |
| | | प्रॉडक्ट्स स्लेटी दगड; व चुनखडी, मध्य हिमालय आणि क्षारपर्वतप्रदेश. | दामुड श्रेणी (गोंडवनी रचना) | | |
| | | क्षारपर्वतांतील गोट्यांचे खडक (बोल्डरबेड) | तालचेर गोट्यांचे खडक. (गोंडवनी रचना) | पर्मियन | पुराणयुग (पॅलिओझोइक) |
| | द्राविडी | अपर पॅलिओझोईक भिन्न प्रस्तर | | कर्बजनक (कार्बोनिफेरस) | |
| | | मध्य हिमालयांतील फेनेस्टेला शेल: काश्मीरांतील झोवान थर, ब्रह्मदेशांतील चुनखडी, वगैरे. | | डेव्होनिअन | |
| | | चित्रळ चुनखडी, मयम्यो चुनखडी. | विंध्योत्तर व अधोगोंडवन अज्ञात शुद्धजलजन्य प्रस्तर | गॉथलंडिअन (सिलुरियन) | |
| | | मध्य हिमालय व वरचा ब्रह्मदेश यांतील सेल्युरियन | | ऑर्डोव्हिशियन | |
| | | मध्य हिमालयाच्या भागांतील हैमंत | | | |
| | | क्षारपर्वतांतील निओबोलस व तत्संबद्ध कॅंब्रियन थर. | | } कॅंब्रियन | |
| | | अधोकॅंब्रियन प्रस्तर अथवा ओलेनेल्लस प्रदेश | | | |
| प्रस्तरावशेषविहीन | पुराण | विंध्य, कर्नूल, वरचा कडाप्पा, कलादगी, पखल, भीमा, | | केविनधन | अल्गाँकियन |
| | | खालचा कडाप्पा, ग्वालेर, बिजावर व पेनगंगा श्रेणी. | | ऑनिमिकी | |
| | प्राकानिक | महान् एपार्कियन आंतरकाल | | | प्राकानिक |
| | | धारवाडी. | | हुरोनियन | |
| | | स्फोटक जंबूरी व ग्रानाइट खडक, द. हिंदुस्थानांतील चार्नोकाइट व नोराइट खडक, बंगालमधील अनोर्थोसाइट खडक. | | लॉरेन्शियन | |
| | | जंबूरी खडक. | | कीवतिन | |
| | | प्राचीनतम जंबूरी खडक. | | कौटचिचिंग | |

[ पान १८३७ वरून चालू ]
या ठिकाणीं बऱ्याच आहेत. दुग्धधारा नांवाचा एक धबधबा आहे. भेडाघाट गांव जबलपूर शहरापासून रस्त्यानें १३ मैल, व जी. आय्. पी. रेल्वेवरील मीरगंज स्टेशनापासून ३ मैलांवर आहे. भेडाघाट स्टेशनापासून संगमरवरी पहाड ७ मैल लांब आहेत. कार्तिकी पौर्णिमेला येथें यात्रा भरते.

**भेंडी**—[ वर्ग माल्व्हासी. इं. हिबिस्कस ]. उष्ण कटिबंधांत एक फार विस्तृत प्रमाणावर आढळणारी वनस्पतींची जात. हीं बहुधा झुडपें असतात व त्यांस फार शोभिवंत फुलें येतात. यांतील कांहीं झुडपें झाडासारखीं मोठीं होतात. याच्या सालीच्या दोरांचा व्यापार चालतो.

भेंडी हळवी व गरवी असते. कोरडवाहू शेतांत, कोंकणांत आणि मावळांत भातशेतीच्या बांधावर व परसांत जी भेंडी लावितात ती गरवी असते. हिचीं झाडें ५।६ फूट उंच वाढतात. गरव्या जातीच्या भेंड्या पांचधारी व सातधारीहि असतात. त्यांस बहुधा कांटे असतात. त्यांचा रंग तांबूस असतो. भेंड्या ६ ते ९ इंच लांब व १ ते ११ इंच जाड असतात. हळव्या पिकामध्यें जे किडे होतात तेच भेंडीसहि होतात. म्हणून कापसावरील किडे भेंडीवर जाऊन कापूस वांचावा म्हणून कापसाच्या शेतांत भेंडी लावावी असें म्हणतात. मळेजमिनींत भेंडी करण्याकरितां बीं मुंबईकडील वापरतात. साष्टी बेटांत पुष्कळ बागांमध्यें हळवी भेंडी करतात. तिकडे तिला फारच लवकर भेंड्या धरावयास लागतात. ती भेंडी सुमारें कंबरेइतकी उंच वाढेपर्यंत चांगलीं फळें देते. पुढें फळें लहान यावयास लागतात. फळें सुमारें वीत सव्वा वीत लांब व एक इंच जाड होतात. सहाधारी व अष्टपैलू अशाहि दोन जाती भेंडींत आढळतात. भेंड्या फार पौष्टिक आहेत. यांतील चीक ( भेंडा ) रंगांत घालतात. आमवातावर भेंडीचें मूळ खडीसाखरेशीं देतात.

**भेलसा**—मध्यहिंदुस्थान, ग्वाल्हेर संस्थानांतील हा एक जिल्हा आहे. क्षे. फ. १६२५ चौ. मैल. या जिल्ह्यांत भेलसा, ग्यारसपूर, उदयपूर, उदयगिरि व बारो येथें पुरातनकाळच्या वस्तू सांपडतात. लो. सं. सुमारें १। लाख. भेलसा गांव जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून लो. सं. सुमारें ८००० आहे. येथील इमारती मुसलमानी धर्तीच्या आहेत. याच्या आसपास बरेच बौद्ध स्तूप आहेत. सांचीचा स्तूप तर अतिशय प्रसिद्ध आहे. भेलसाच्या वायव्येस बेटवा व बिआस नद्यांमध्यें प्राचीन बेसनगरचें स्थान आहे. हें अशोकाच्या वेळचें असावें असें वाटतें. येथें जुन्या काळचीं नाणीं सांपडतात. येथें भैलेशा-( सूर्या )चें देऊळ आहे. त्यावरून या गांवास भेलसा हें नांव पडलें असावें. पुराणांत या गांवाचा भद्रावती म्हणून उल्लेख केलेला सापडतो. जैन लोक या गांवास भद्दलपूर असें म्हणतात. अशोकाच्या वेळीं भेलसा अगर प्राचीन बेसनगर हें मोठें गांव होतें.

**भेषजविज्ञान**—( फार्माकोलॉजी ). निरनिराळ्या औषधांचा मनुष्याच्या शरीरांतील पेशींवर कोणता व कसा परिणाम होतो हें ज्ञान करून घेणाऱ्या शास्त्रास भेषजविज्ञान किंवा औषधिविज्ञान असें म्हणतात. या शास्त्राचा उगम प्रथम प्राचीन हिंदु लोकांत झाला. त्यांची अशी समजूत असे कीं, निरनिराळ्या वनस्पती ह्या मनुष्यप्राण्यास निरनिराळ्या प्राण्यांपासून आपलें संरक्षण करण्याच्या कामीं साहाय्य करतात. निरनिराळ्या फळांच्या आकारांवरून त्या फळांचा उपयोग कोणत्या कामाकरितां करावयाचा अशी त्यांची समजूत असे; उदा., लिंबाचा आकार कांहींसा हृदयासारखा असल्यामुळें हृद्रोगावर त्याचा उपयोग होतो अशी त्यांची समजूत असे. अशा तऱ्हेची समजूत मनुष्यामध्यें दीर्घकालपर्यंत टिकून राहिलेली आढळते.

तर्कशुद्ध अशा औषधिविज्ञानाचा पाया प्रथम हीपोक्रेटीस ( जन्म खि. पू. ४६० ) या विद्वान् गृहस्थानें घातला. यानें स्वतःच बरींच औषधें तयार केलीं. त्यांमध्यें गळूं वगैरे पिकविण्याचीं औषधें ( पोटिसासारखीं ), गुळण्या करण्याचीं औषधें, गोळ्या व मलमें, इत्यादि असत. औषधांचा शास्त्रोक्त उपयोग करणारा पहिला वैद्य गालेन हा होय. हा खिस्ती शकाच्या दुसऱ्या शतकांत होऊन गेला. याच्या वैद्यकाचा प्रभाव १५ व्या शतकापर्यंत चालू होता. त्यानंतर विरुद्धचिकित्सा किंवा विषमचिकित्सा ( ॲलोपथी ) व समचिकित्सा ( होमिओपथी ) या पद्धती प्रचारांत आल्या. सध्यांचें औषधिशास्त्र हें निगमन पद्धतीचें ( इंडक्टिव्ह ) शास्त्र आहे. औषधिशास्त्रांतला पहिला प्रयोग रॉबर्ट बॉइल यानें केला. त्यास असें दिसून आलें कीं, कोणत्याहि औषधाचा परिणाम आपण तें रक्त प्रवाहांत मिसळलें असतां दिसून येतो. अर्वाचीन काळांत औषधिशास्त्रांतील प्रयोगांचा अवलंब मॅगेन्डाय यानें कुचला या औषधाच्या बाबतींत व लॉर्ड बर्नार्ड यानें क्यूरेर या औषधाच्या बाबतींत केला. विशिष्ट औषधाचा विशिष्ट रोगावर जो परिणाम होतो तो विविध प्रकारांनीं होत असतो. त्यामुळें तो निश्चितपणें कोणत्या पद्धतीनें झाला हें सांगतां येणें कठिण असतें. त्यांतील मूळ भाग कोणता हेंहि निश्चित करणें कठिण असतें. कांहीं औषधांचा परिणाम, उदाहरणार्थ, क्षाररेचक औषधांचा परिणाम, पेशींतील पाणी आंतड्यांत ओढून आणण्याच्या कामीं होतो तर खावयाच्या सोड्याचा परिणाम पोटांतील अम्लांश रासायनिक रीतीनें नाहींसा करण्याच्या कामीं होतो. अद्यापि कांहीं औषधांचा परिणाम निश्चितपणें कसा होतो हें पक्कें ठाऊक झालें नाहीं, व

त्या औषधांचा भौतिक अगर रासायनिक कोणता परिणाम उपयुक्त आहे, हेंहि निश्चितपणें सांगतां येत नाहीं. औषधक्रिया, औषधी ग्रंथ पाहा.

**भेसळ**—खाण्याच्या जिनसांत किंवा व्यापारी मालांत जी लबाडीनें भेसळ करतात त्याला हें नांव आहे. कांहीं भेसळ मुद्दाम वस्तु टिकावी किंवा पाहिजे त्या प्रकारची व्हावी म्हणून केली जाते. मलई टिकण्यासाठीं थोडें बोरीक ॲसिड तींत घालतात, किंवा बीयरमध्यें सॅलिसिलिक अम्ल यासाठींच घालतात. तसेंच तंबाखू नीट पेटावी म्हणून तींत सोरा (साल्टपीटर) मिसळतात. पण अन्नपदार्थांत हलका पदार्थ मिसळून तो मूळ भावानें जो विकतात तो गुन्हा आहे. उदा., लोण्यांत चरबी, गव्हाच्या पिठांत मक्याचें किंवा इतर पीठ, दुधांत पाणी, इ.. ही भेसळ थांबविण्यासाठीं सरकारी कायदे असतात व तपासनीस नेमलेलेहि असतात.

**भैरव**—हा भैरव थाटाचा आश्रय राग आहे. याचा आरोहावरोह सातहि स्वरांचा आहे, म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी ऋषभ आहे. गानसमय प्रातःकाळ सर्वसंमत आहे. याच्या अवरोहांत कोमल निषादाचा प्रयोग विवादी या नात्यानें केव्हां केव्हां केलेला आढळतो. ऋषभ व धैवत हे स्वर या रागांत आंदोलित असतात. याची प्रकृति गंभीर आहे.

**भैरवी**—हा भैरवी थाटाचा आश्रय राग आहे. याच्या आरोहावरोहास सातहि स्वर लागतात. म्हणून याची जाति संपूर्ण–संपूर्ण आहे. वादी स्वर धैवत व संवादी गांधार आहे. गानसमय दिवसाचा दुसरा प्रहर मानितात. हा सार्वकालिकहि समजला जातो. याच्या आरोहांत अनेक वेळां तीव्र ऋषभाचा प्रयोग विवादी स्वर म्हणून केलेला दृष्टीस पडतो. हा राग अति लोकप्रिय व मधुर आहे.

**भोई**—हिंदुस्थानांत एकंदर भोई लोक सुमारें तीन लाख आहेत. पैकीं हैद्राबाद संस्थानांतच पावणेदोन लाख आहेत. भोई म्हणजे कोळी, व पालखी–डोली वाहणारे लोक होत. यांचा धंदा कोळ्यांप्रमाणेंच असल्यामुळें त्यांना कोळी असेंहि म्हणतात. भोई हें नांव धंद्यावरून पडलेलें असून, डोली वाहणारे महार लोक देखील आपणांस भोईच म्हणवितात. यांचे रीतीरिवाजहि कुणब्यांसारखेच असून हे त्यांच्याशीं बेटीव्यवहार करतात.

मराठे भोई—हे लोक मासे पकडून आपली उपजीविका करतात. कांहीं लोक वाणी व व्यापारीहि आहेत व कांहींना इनाम जमिनी मिळाल्या आहेत. यांच्यांत खास, वऱ्हाडी, काड, माळे, खारे, गोडे, वगैरे पोटभेद आहेत. त्यांत परस्पर लग्न-व्यवहार होत नाहींत. रत्नागिरि जिल्ह्यांतील भोयाना राजभोई असें म्हणतात.

खानदेशी भोई—मासे धरणें व डोली वाहणें, यांखेरीज हे लोक नदीच्या वाळवंटावर कलिंगडें व काकड्या लावून विकतात व गाढवांच्या पाठीवर दाणा लादून विकण्यास नेतात. ढीमर ही यांच्यांतीलच पोटजात आहे.

कर्नाटकी भोई—या लोकांत कर्नाटकांतील व इतर प्रांतांतील मासे धरणाऱ्या लोकांचें मिश्रण आहे. पालख्या वाहणें व मासे धरणें; यांशिवाय लग्नकार्याच्या वेळीं मशाली व छत्र्या धरणें हाहि त्यांचा धंदा आहे. कित्येक जमीनमहसुलाच्या कचेरींतहि काम करतात.

गुजराथी भोई—हे आपणास रजपूत म्हणवितात. शिंगाडे पिकविण्याचा धंदा करतात. यांच्यांत ९ पोटभेद आहेत.

**भोंक पाडणें**—(बोअरिंग). लांकूड, लोखंड, खडक किंवा इतर पदार्थ यांमध्यें योग्य हत्यारानें छेद पाडणें या क्रियेस म्हणतात. धातूला छिद्र पाडावयाचें असल्यास सामत्यानें पाडण्यांत येतें. किंवा यंत्राच्या साहाय्यानें मोठ्या पहारींनींहि धातूस छिद्र पाडण्यांत येतें. जमिनीमध्यें किंवा खडकामध्यें खाणीच्या कामाकरितां किंवा भूस्तरशास्त्रीय अथवा शिल्पशास्त्रीय कामाकरितां मोठमोठ्या पहारींनीं मोठमोठीं छिद्रें पाडण्यांत येतात. या पहारी केव्हां केव्हां हातानें पण बहुधा दाबलेल्या हवेच्या साहाय्यानें चालविण्यांत येतात. खाणीच्या कामांत बहुधा प्रथम एक लहानसा खड्डा सहा फूट खोल खणण्यांत येतो. त्यावर एक तिपाई घडवंची व कप्प्या उभ्या करण्यांत येतात. छिद्रें पाडणाऱ्या पहारी १० पासून २० फुटांपर्यंत लांब असतात व त्या एकमेकांस जोडण्याची व्यवस्था केलेली असते. व त्यांच्या खालच्या बाजूस एक छिनी बसविलेली जाते. एका उचालक दांड्यानें ही पहार वर उचलली जाते, आणि तिला थोडी वक्रगति देऊन खालीं पाडण्यांत येते, व याप्रमाणें दर ठोक्यास थोडें थोडें छिद्र पडत जातें. एका पंपाच्या साहाय्यानें आंतील दगडाचा चुरा व गाळ वर काढण्यांत येतो.

**भोंकर**—[बोराजिनासी]. या वर्गांतील वनस्पतींचें बीं द्विगर्भपर्ण असून पुष्प संयुक्त एक पाकळीचें असतें. या वर्गांत बोरजे, अलकनेट, वगैरे अनेक वनस्पती व झुडपें मोडतात. प्रसिद्ध 'फर्गेट मी नॉट' (मला विसरूं नको) हें झुडूप याच वर्गांत मोडतें. हीं उत्तरेकडील समशीतोष्ण प्रदेशांत आढळतात.

आपल्याकडे भोंकरीला शेलवट असेंहि म्हणतात. यांत दोन-तीन प्रकार आहेत. भोंकरीचीं फळें पिकलीं म्हणजे तांबडीं होतात. फळाच्या आंत चीक असतो. फळांची भाजी होते व लोणचेंहि घालतात. अतिसारावर साल पाण्यांत उगाळून देतात.

**भोंगा**—(सायरेन). हें एक एकाच सुरांत शिटी वाजवणारें यंत्र असतें. यामध्यें एका वाटोळया तबकडीला तिच्या कांठापासून सारख्या अंतरावर भोकें पाडलेलीं असतात. या छिद्रावर जोरानें हवेचा प्रवाह एका भात्यांतून सोडला जातो, आणि ही तबकडी एकसारखी शीघ्र गतीनें फिरविण्यांत येते. म्हणजे एकसारखा स्वर निघूं लागतो. या स्वराची तीव्रता त्या तबकडींतून दर सेकंदास जितक्या वेळां हवेचा फवारा बाहेर येईल त्या मानानें असते. या यंत्राचा एखाद्या वाद्याची कंपनसंख्या मोजण्याकरितां उपयोग करण्यांत येतो. लढाईच्या काळांत हल्ल्याची किंवा इतर कांहीं सूचना गांवाला देण्यासाठीं असे भोंगे वाजवितात. गिरण्यांचे भोंगे परिचित आहेत.

**भोज**—या नांवाचें एक राष्ट्र व जाति प्राचीन काळीं होती. यादवांपैकींच हे भोज होते. त्यांचें राज्य वऱ्हाडांत एलिचपूरच्या बाजूस होतें; सांप्रत तेथें भोजकट नांवाचें एक गांव असून तें रुक्मिणीच्या रुक्मी नांवाच्या भावानें वसविलें असें सांगतात. वऱ्हाडासच त्या काळीं भोज हें नांव होतें. महाभोज, कुंतिभोज हीं घराणीं महाभारतकाळीं होतीं. तीं अवन्ती व मध्यदेशांत राहत असत. यांनींच श्रीकृष्णाच्या वृष्णिकुळास द्वारकेपर्यंत मार्गे हटविलें. चंपूरामायणाचा कर्ता विद्वान् भोजराजा हा या रुक्मी भोजाचा वंशज होता. श्रीरामाचा आजा जो अज त्याची बायको इंदुमती ही भोज कुलांतील होती. अशोकाच्या लेखांत पैटानिक, पुलिंद, वगैरे असंस्कृत लोकांबरोबरच भोजांचाहि उल्लेख आलेला आहे. नाशिक जिल्ह्यांतील भोजपूर गांवीं एक लेणें असून तेथें कांचेचा कारखानाहि होता. बेळगांव जिल्ह्यांतील भोजपूर गावीं एक रट्टाचा ताम्रपट सांपडला होता. माळव्याचा भोजराजा प्रख्यात आहे.

**भोज परमार** (१०१०-१०५३)—माळव्याचा एक विद्वान् व शूर राजा. याचा चुलता मुंज याचा चालुक्य राजानें खून केल्यानंतर त्याचा सूड भोजानें घेतला. गुजराथ आणि चेदी यांच्याशींहि भोजानें लढाया दिल्या. हा राजा फार विद्वान् व विद्वानांचा आश्रयदाता होता. 'सरस्वतीकंठाभरण' हा साहित्यशास्त्रावर, 'राजमार्तंड' हा योगशास्त्रावर, 'राजमृगांक' हा ज्योतिषावर, 'समरांगण' हा शिल्पावर, वगैरे त्याचे विविध शास्त्रांवर ग्रंथ आहेत. 'कूर्मशतक' नांवाचे दोन प्राकृतांत केलेले काव्यग्रंथ होते. धारला यानें एक मोठी पाठशाळा बांधिली होती. ती अद्यापि भग्न स्थितींत पाहावयास मिळते. यांत कांहीं ग्रंथ खोदून ठेवलेले होते. राजतरंगिणीमध्यें याचें वैभव वर्णिलें आहे. याचीं कांहीं दानपत्रें उपलब्ध आहेत. मुंज आणि भोज यांच्या बऱ्याच कथा ऐकिवांत व लिहिलेल्या आहेत. गुजराथचा भीमदेव व चेदीचा राजा कर्ण यांनीं धारानगरीवर स्वारी करून भोजाला मारलें. धारानगरीचा भोज व उज्जयिनीचा विक्रम यांच्यांत साम्य असल्यामुळें यांच्याबद्दलच्या माहितींत घोंटाळा होत असतो.

**भोज प्रतिहार** (८४४-८८२)—कनोजचा एक राजा. हा रामभद्राचा पुत्र. याला मिहिर किंवा आदिवराह म्हणत. यानें 'आदिवराह' शिक्क्याचीं बरींच नाणीं पाडलीं. तीं पुढें शंभर वर्षें प्रचारांत होतीं. याचे शिलालेख व दानपत्रें सांपडलीं आहेत. हा भगवतीदेवीचा भक्त असे. याची राणी चंद्रभट्टारिका हिच्यापासून याला महेंद्रपाल झाला.

**भोजराज मिनेगार**—पेशवाईंतील मिन्याचें काम करणारा एक कारागीर. हा कांहीं काळ शिंद्यांकडे होता व तेथून जयपुरास गेला. पण तेथें याच्यावर कांहीं तोहमत येऊन याला पुण्यास जाण्याची बंदी झाली. तेव्हां याच्याकडून महाराष्ट्रांतील कारागिरांना मिन्याचें शिक्षण देण्याचा नाना फडणिसाचा हेतु साध्य झाला नाहीं.

**भोपटकर, लक्ष्मण बळवंत** (१८८०- )—हिंदुमहासभेचे एक प्रमुख व महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्यकर्ते. हे चांगले राजकारणी व समाजसुधारणावादी आहेत. हे कांहीं दिवस 'भाला' व नंतर 'लोकसंग्रह' या पत्रांचे संपादक होते. लो. टिळक यांच्याबरोबर हे राष्ट्रीय पक्षाच्या राजकारणांत भाग घेत असत. हे होमरूल लीगच्या चळवळींतील पहिल्या कार्यकर्त्यांपैकीं एक होते. म. गांधींच्या असहकारितेच्या चळवळींतहि यांनीं प्रथम भाग घेतला होता. यांस सत्याग्रहाच्या चळवळींत दोन वेळां तुरुंगवासाची शिक्षाहि झाली होती. पुणें म्युनिसिपालिटीचे हे अनेक वर्षें सभासद होते. तसेंच मुंबई कायदे मंडळाचेहि हे सभासद होते (१९२४-२७); त्या वेळीं हे महाराष्ट्रांतील स्वराज्य पक्षाचे पुढारी म्हणून होते. पुढें हे प्रतिसहकारवादी व नंतर लोकशाही (डेमोक्रॅटिक) स्वराज्य पक्षाचे पुरस्कर्ते बनले. हे एक जोरदार मराठी लेखक व वक्ते आहेत. महाराष्ट्रीय मंडळ (पुणें) या व्यायामसंस्थेचे हे अध्यक्ष आहेत. पुणें लॉ कॉलेजचे व्हाइस प्रिन्सिपल आहेत. बॅरिस्टर सावरकर सुटून आल्यानंतर हे हिंदुमहासभेकडे अधिक लक्ष देऊं लागले व एकदा हिंदुसभेचे अध्यक्ष होते. ते केसरी-मराठा संस्थेचे एक विश्वस्त आहेत. यांनीं व्यायाम विषयावर कांहीं ग्रंथ लिहिले आहेत व विद्यार्थ्यांसाठीं उपयुक्त असे कायद्यावरील ग्रंथ लिहिले आहेत.

**भोपटगड**—(भूपतगड). शहापूर तालुक्यांत माहुलीच्या उत्तरेस पंचवीस-तीस मैलांवर व मोखाड्याच्या नैर्ऋत्येस सुमारें ८ मैलांवर एका सातशें फूट उंचीच्या टेंकडीवर हा बांधलेला आहे. हा कुरलोट खेड्यांत मोडतो. लांबी १५०० फूट व रुंदी ३०० फूट. हल्लीं हा मोडकळीस आलेला आहे.

त्या औषधांचा मॉविग-कुकुर्विटासी]. भोपळयाचे (१) काळा उपयुक्त आहे २) तांबडा भोपळा, (३) दुध्या भोपळा, आणि औषधी ग्रंथ.शीफळ, असे चार प्रकार आहेत. काळा व तांबडा भोपळा यांसच बहुधा 'भोपळा' म्हणतात. याच्या फुलांत नर व मादी असे दोन प्रकार असतात. नर फुलास 'वांझ' म्हणतात. मादी फुलांसच फळ धरतें. दर वेलास ५ ते २५ फळें येतात. फळ पूर्ण पक्व होण्यास ३-४ महिने लागतात. चांगलें पक्व फळ बारा महिनेपर्यंत न सडतां टिकतें. विलायती भोपळे आपल्याकडील भोपळ्यांपेक्षां पुष्कळ जातींचे आहेत. पंपकिन जातीचीं फळें सव्वा मणापेक्षांहि जास्ती वजनाचीं होतात, म्हणून त्यास 'हंड्रेडवेट' असें विशेषण देतात. भोपळा पौष्टिक आहे. भाजी चांगली होते. भोपळ्याच्या बियांचे लाडू करतात. हा औषधीहि आहे. उंदराच्या, विंचवाच्या विषावर देंठ उगाळून लावतात.

दुध्या भोपळा—ह्या वेलीस पांढरीं फुलें येतात. याला फळें पांढऱ्या रंगाचीं येतात. (१) लांब दुध्या, व (२) तुंबी दुध्या अशा दोन जाती आहेत. पहिल्या जातीचीं फळें एका हातापासून तीन हातांपर्यंत लांब व ४ ते ९ इंच जाड होतात व दुसऱ्या जातीचीं फळें तुंब्याच्या आकाराचीं असतात. दुध्याची कोरडी अगर पावळ भाजी करतात. साखरेच्या पक्क्या पाकांत याच्या सुक्या वड्या करतात. दुध्याच्या बिया विस्तवावर भाजून खाण्यास गोड लागतात. वाळलेल्या भोपळ्याचे तंबुरे करतात. नवीन पोहण्यास शिकण्यासाठीं हे कंचरेस बांधतात. मूळव्याधीवर पाल्याचा रस काढून लेप देतात.

**भोपाळगड**—मुंबई, बेळगांव जिल्हा, खानापूर तालुक्याच्या नैर्ऋत्य कोंपऱ्यास वाणूर नांवाच्या खेड्याजवळ आहे. तट अवश्य त्या ठिकाणीं बांधलेला आहे. क्षेत्रफळ ३०० एकर आहे. एक पाण्यानें भरलेलें तळें आहे. हा भोपाळ नांवाच्या राजानें बांधला असें सांगतात. १६७९ त हा संभाजीनें घेतला होता.

**भोपाळ संस्थान**—मध्य हिंदुस्थानांतील एक मोठें संस्थान. क्षे. फ. ६९०२ चौ. मैल व लो. सं. सुमारें आठ लाख (पैकीं शें. ७३ हिंदू). वार्षिक उत्पन्न ५८ लक्ष रुपये आहे. भोपाळ हें नांव भोजपाल यावरुन पडलें असावें. या संस्थानचा बहुतेक भाग विंध्य पर्वताच्या पठारांत आहे. बेटवा, पार्वती, कालिया, सोट, अजनर, वगैरे नद्या आहेत. पाऊस सरासरी ४२ इंच पडतो. येथील संस्थानिकांचा मूळपुरुष दोस्त महंमदखान नांवाचा तिऱ्हा अफगाण औरंगजेबाच्या लष्करी नोकरींत वाढत वाढत माळव्याचा सुभेदार झाला, व औरंगजेबाच्या मृत्यूनंतर त्यानें स्वतंत्र राज्य स्थापलें. त्याचा एक वंशज नजरखान १८२० सालीं मरण पावल्यावर त्याची मुलगी शिकंदर बेगम (१८४४-१८६८), तिची मुलगी शहाजहान बेगम (१८६८-१९०१), नंतर तिची मुलगी सुलतानजहान बेगम (१९०१-१९२६) याप्रमाणें तीन स्त्रीवारसांनीं राज्य केलें. हैद्राबादच्या निजामांप्रमाणेंच भोपाळचे नबाब किंवा बेगमा या इंग्रजांना अनुकूल असत. म्हणून त्यांना बरेच फायदे मिळाले. जहान बेगमनें राज्यांत पुष्कळ सुधारणा केल्या व १९२६ सालीं आपल्या मुलासाठीं गादी सोडली.

या संस्थानांत रायसेन, गिनुरगड, सिवान, चौकीगड, वगैरे किल्ले; सांची येथील स्तूप; जामगडचें प्राचीन देऊळ; महीलपूर व समसगडी येथील प्रचंड मूर्ती, हीं प्रेक्षणीय आहेत. भोपाळ, अष्टा, तिहोरी, इच्छावार व बेरेसिया हीं मुख्य शहरें आहेत. भोपाळ ही राजधानी टेंकडीवर वसलेली असून नजीक दोन तलाव २½ मैल व पाव मैल विस्तार असलेले आहेत. शहराची लो. सं. सुमारें पाऊण लाख आहे. शहराभोंवतीं दोन तट असून त्यांत भोज राजानें बांधलेला किल्ला, आणि भोजराजाच्या नातीनें (११८४) जें सभामंडळ नांवाचें देऊळ बांधलें होतें त्याच्या जागेवर केलेली खुदिशिया बेगमची जुम्मा मशीद आहे. दुसरा किल्ला फत्तेगड दोस्त महंमदानें बांधला. शहाजहान बेगमनें ताजमहाल, बारामहाल, वगैरे इमारती बांधल्या.

संस्थानांतील जमीन बहुतेक सुपीक आहे. गहूं, डाळी, तंबाखू व ऊंस हीं मुख्य पिकें होत. जंगल मोठें व उत्पन्न देणारें आहे. रयतवारी पद्धत अमलांत आहे. शेतीच्या वाढीला संस्थान मदत करतें. कापडाच्या गिरण्या, साखरेची गिरणी, आगकाड्यांचा कारखाना, रासायनिक पदार्थांचा कारखाना, इ. अनेक मोठे उद्योगधंदे चालतात. शिक्षणाच्या चांगल्या सोयी असून संस्थानांत फिरते दवाखाने ठेविले आहेत. १९४८ च्या एप्रिल महिन्यांत नबाबांनीं जबाबदारीच्या राज्यकारभाराचे प्रजेला हक्क दिले व आठ लोकप्रतिनिधींचें एक मंत्रिमंडळ नेमलें; त्यांतील एकच मंत्री सरकारी नोकर आहे. संरक्षण, वाहतूक व बाह्य कारभार या बाबी मध्यवर्ती सरकारकडे सोंपवून या संस्थानानें अंतर्गत स्वातंत्र्य राखलें आहे. सध्यांचे नबाब महंमद हमिदुल्लाखान हे चांगले सुशिक्षित व राजकारणपटु आहेत. १९२६ सालीं यांच्यासाठीं यांच्या आईनें गादी खाली केली. हे बरींच वर्षें नरेंद्रमंडळाचे प्रमुख होते. हे चांगले क्रीडापटु असून पोलोच्या खेळांत फार कुशल आहेत.

**भोर संस्थान**—मुंबई, पुणें जिल्हा. या संस्थानचा प्रदेश (चार तालुके-विचित्रगड, राजगड, प्रचंडगड व पौनमाळ) पुणें, सातारा आणि कुलाबा (सुधागड, तालुका) या मुंबई प्रांताच्या तीन जिल्ह्यांत विभागलेला आहे. क्षे. फ. ९१० चौ.

मैल व लो. सं. ( १९४१ ) १,६५,९६१. संस्थानांत ५०२ गांवें आहेत. संस्थानचें उत्पन्न सु. नऊ लाख रु. आहे. संस्थानचा ३/४ भाग डोंगराळ असून सह्याद्रीच्या घाटमाथ्यावर आहे व तेथून नीरा, मुळा, मुठा, वेळवंडी व गुंजवणी या नद्या वाहतात. भोर राजधानीपासून सुमारें २ मैलांवर वेळवंडी नदीला भाटघर येथें १५० फूट उंचीचें मोठें धरण बांधलें असून त्याचें पाणी उत्तर नीरा व दक्षिण नीरा या नांवाच्या दोन मोठाल्या कालव्यांतून दूरवर दुष्काळी खालसा प्रदेशांत नेलें आहे. पाऊस सरासरी घाटमाथ्यावर १०० इंच व सुधागडांत १५० इंच पडतो. घाटावर भात, नाचणी, वरी, बाजरी, जोंधळा, वगैरे पिकें, आणि सुधागडांत भात, वरी, नाचणी, वाल, मूग, वगैरे पिकें होतात. जंगलांत साग, हिरडा, जांभूळ, आंबा व फणस हीं मुख्य झाडें होतात. रोहिडा, राजगड, तोरणा, तुंग व तिकोना हे किल्ले घाटावर व सुधागडांत भोरप व सरसगड हे इतिहासप्रसिद्ध किल्ले आहेत. भोर शहरापासून ८ मैलांवर भोर-वाई मार्गावर आंबाडखिंड ऊर्फ विश्रामघाट येथें संस्थानची धर्मशाळा, सरकारी वाडा व अन्नछत्र आहे. भोरच्या आग्नेयीस आंबवडें येथें शंकराजी नारायण ( पंतसचिव घराण्याचा मूळपुरुष ) यांची समाधि आहे. शिवाय बनेश्वर ( राजगड तालुका ), रायरेश्वर ( विचित्रगड तालुका ) व उन्हेरें ( सुधागड तालुका ) हीं स्थळें पाहण्यासारखीं आहेत.

या संस्थानचे मूळ संस्थापक शंकराजी नारायण गांडेकर हे देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण गांडापूर ( निजाम इलाखा ) येथील मूळचे रहिवासी. शंकराजीचे वडील नारोपंत हे शिवाजीच्या सैन्यांत कारकून होते. शंकराजी प्रथम कारकुनी करून १६८६ सालीं फौजेंत शिरले, व राजाराममहाराज जिंजीस असतां महाराष्ट्रांत शंकराजी नारायण व परशुराम त्रिंबक यांनीं स्वराज्यरक्षणाची कामगिरी उत्तम बजाविली. राजगड किल्ला मोंगलापासून सोडविला. या कामगिरीबद्दल शंकराजीस राजाराममहाराजांनीं विश्वासनिधि-कारभारी हा किताब व सचिवपद दिलें ( १६९८ ). ताराबाईच्या कारकीर्दींतहि शंकराजीनें मोंगली फौजेविरुद्ध पुष्कळ शौर्याचीं कामें केलीं. पुढें शाहू दक्षिणेंत आल्यावर त्यानें सर्व सरदारांना बोलाविलें; त्या वेळीं ताराबाई व शाहू यांपैकीं कोणत्या पक्षास मिळावें, ही अडचण आल्यामुळें शंकराजी भोरनजीक आंबवडें येथें चतुर्थाश्रम घेऊन व लवकरच विष खाऊन मयत झाला ( १७०७ ). यानंतर नारो शंकर ( १७०७-१७३७ ) यांस शाहूनें सचिवपद दिलें तें वंशपरंपरा या घराण्याकडे राहिलें; त्याचे वारस चिमणाजी नारायण ( १७३७-१७५७ ), सदाशिव चिमणाजी ( १७५८-१७८७ ), रघुनाथ चिमणाजी ( १७८७-१७९१ ), शंकरराव रघुनाथ ( १७९१-१७९८ ), चिमणाजी शंकर ( १७९८-१८२... या तऱ्हेची अडचण या ( १८२८-१८३६ ), चिमणाजी रघुनाथ ... नें एकाच सम- शंकरराव चिमणाजी ऊर्फ रावसाहेब ( १८७१-... चें शोधून अनुक्रमें भोरचे अधिपति झाले, व सांप्रत रघुनाथराव ऊर्फ ... या साहेब हे पंतसचिव आहेत.

नारो शंकर सचिव ( १७०७-१७३७ ) याला पुरंदर किल्ल्यानजीक बेलसर गांवच्या एका रामोपासक कुलकर्ण्यानें श्रीरामाच्या मूर्ती दिल्या, तेव्हांपासून भोरास रामनवमीचा उत्सव चालू आहे. चिमणाजी रघुनाथ यानें सन १८६३ मध्यें रामबागच्या ओढ्यास धरण बांधून त्याचें पाणी नळानें भोरांत आणलें, नीरा नदीचा घाट बांधला, व संस्थानांत जागजागीं इमारती बांधल्या. मागचे अधिपति रावसाहेब ( १८७१-१९२२ ) यांनीं सडका, चावड्या, धर्मशाळा व विहिरी अनेक बांधल्या; भोरास हायस्कूल व संस्थानांत सुमारें ६० प्राथमिक शाळा, भोरास एक मोफत दवाखाना, वगैरे सुधारणा केल्या. त्यांना ११ तोफांच्या सलामीचा मान व हिज हायनेस पदवी मिळाली होती. त्यांनीं बहुतेक तीर्थयात्रा केल्या. काटकसरीनें राज्यकारभार करून संस्थानची शिल्लक मरणसमयीं बरीच ठेवली.

हल्लींचे सचिव श्रीमंत बाबासाहेब यांचें शिक्षण पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत झाल्यावर वडिलांच्या देखरेखीखालीं यांना राज्यकारभाराचें शिक्षण मिळालें. १९२२ सालीं राज्यारोहणप्रसंगीं त्यांनीं घरपट्टी, म्हैसपट्टी, लग्नटका व पाटदाम हे कर व शेंदूर, तपकीर, वगैरे जिनसांवरील लायसेन्स फी माफ केली. प्राथमिक शिक्षण चौथी यत्तेपर्यंत मोफत केलें. पालीस मोफत दवाखाना, व भोरास वेधशाळा आणि कै. श्री. सौ. गंगूताई पंतसचिव वाचनालय स्थापन केलें. १९२१ पासून सुधागड तालुका सभा व भोर प्रजासभा यांनीं प्रजेला राजकीय हक्क मिळण्याची व मालकी जंगलावरील मालकी हक्क सर्व्हे सेटलमेंटच्या वेळीं नष्ट झालेले पुन्हां रयतेला मिळण्याची चळवळ सुरू केली. या रयतेच्या मागणीप्रमाणें जंगल चौकशी समिति व हिरडा चौकशी समिति नेमून रयतेस जंगलचे हक्क व हिरड्याचे हक्क दिले. १९२७ सालीं पाली सॅनिटरी बोर्ड व नंतर नोटिफाइड एरिया कमिटी, १९३२ सालीं तालुका लोकलबोर्ड, १९३१ सालीं भोर कायदे मंडळ स्थापन करून १९४२ सालीं कायदे मंडळाला बहुसंख्य लोकनियुक्त सभासद निवडण्याचा हक्क व लोकनियुक्त सभासदांपैकीं मंत्री नेमण्याचा हक्क देऊन ता. १८ ऑगस्ट १९४७ रोजीं संपूर्ण जबाबदार पद्धतीचें मंत्रिमंडळ स्थापलें व संरक्षण, परराष्ट्रसंबंध, इनाम, तैनात, सरंजाम व खासगी हीं खातीं वगळून सर्व खातीं चार लोकनियुक्त मंत्र्यांच्या मंत्रिमंडळाच्या

त्या औषधांचा मोंविग-कुरूधराज्यांत भोर संस्थान सामील झालें. उपयुक्त आहे २) तं्८ साली सर्व दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानें औषधी ग्रंथ.शील विलीन, झाली त्यांबरोबर हेंहि झालें. याप्रमाणें ~~~ताहेबांच्या कारकीर्दीत प्रजेला पायरीपायरीनें पूर्ण स्वातंत्र्य मिळालें. श्रीमंत चागले विद्याव्यासंगी, मनमिळाऊ व सुशील आहेत. त्यांनीं हिंदुस्थानांत व परदेशांत पुष्कळ प्रवास केला आहे.

गांव—हें राजधानीचें गांव टुमदार आहे. गांवांत एक मोठें हायस्कूल, वाचनालय, दवाखाना, वेधशाळा, वगैरे सोयी आहेत. संस्थानी मुख्य कचेऱ्या आहेत. लो. सं. सु. ५०००. शहराजवळ २ मैलांवर भाटघर धरण आहे तें पाहण्यासारखें आहे. त्याच्या आसपास कांहीं सुताच्या व कापडाच्या गिरण्या आहेत. हें शहर १७४० सालीं तिसरे सचिव चिमणाजी नारायण यांनीं वसविलें.

**भोरकर, डॉ. धों. म.** (१८५१–१९१०)— एक होमिओपाथी वैद्यकीचे पुरस्कर्ते. यांचा जन्म भोर संस्थानांत झाला. ह्यांचें वैद्यकीय शिक्षण पुण्याच्या मेडिकल हायस्कूलमध्यें झालें. कोल्हापूरच्या राजघराण्यांत खाजगी डॉक्टर म्हणून ह्यांना नोकरी मिळाली. त्या वेळच्या महाराजांबरोबर हे विलायतेस जाऊन आले होते. नोकरी करतां करतां होमिओपाथीचा खाजगी व्यवसाय ते करीत असत. ह्या व्यवसायांत त्यांना सुप्रसिद्ध डॉ. गो. कृ. गुणे यांचें सहकार्य लाभलें. कोल्हापूर संस्थानांत समचिकित्सा पद्धतीचा प्रसार होण्यास हे दोघे कारणीभूत झाले होते.

**भोसरी**—(भावसरी). मुंबई, पुणें जिल्हा. पुण्याच्या उत्तरेस ८ मैलांवर नाशिक रस्त्यावर हें गांव आहे. गांवाला पूर्वी वेस असावी. आंत पडके वाडे दिसतात. काळकाईचें व कान्होबाचें देऊळ गांवांत आहे. श्रावण वद्य ८ स कान्होबाची जत्रा भरते. कान्होबाचे पुजारी अस्पृश्य वर्गांतील असत.

**भौतिक परिमाण**—(फिजिकल डायमेन्शन्स). पदार्थविज्ञानशास्त्राचें एक धोरण असें आहे कीं, त्यामध्यें असलेलीं सर्व मापें अथवा परिमाणें तीन मूळ मापनांमध्यें म्हणजे लांबी, द्रव्यपरिमाण व काल यांमध्यें मोजावयाचीं. उदाहरणार्थ, गतीचें परिमाण सांगावयाचें असल्यास विशिष्ट कालामध्यें इतकी लांबी असें सांगण्यांत येतें. यावरून आपणांस गति = लांबी ÷ काल, किंवा गति = लांबी × काल$^{-1}$ असें समीकरण मांडतां येईल. यावरून गतीचें परिमाण लांबी × काल$^{-1}$ असें सांगण्यांत येतें. याप्रमाणेंच गतिवृद्धि म्हणजे विशिष्ट कालाच्या मूलमानामध्यें झालेली गतीची वाढ असल्यानें तिचें परिमाण गति ÷ काल किंवा गति = लांबी × काल$^{-2}$ असें म्हणतां येईल. याप्रमाणेंच शक्तीचें परिमाण द्रव्य व गतिवृद्धि यांच्या प्रमाणांत असल्यामुळें तें द्रव्य × लांबी × काल$^{-2}$ असें दाखवितां येईल.

**भौम द्रव्य**—(टेल्युरिअम). थल. एक रासायनिक मूलद्रव्य. अणुभारांक १२७.५. हें दुर्मिळ मूलद्रव्यांपैकीं असून १७९८ सालीं क्लापरॉथ ह्यानें त्याचा शोध लावला. गंधकाच्या वर्गांत हें असून त्याचे गुणधर्म त्याच्यासारखे आहेत. ४५०° शत. ला हें वितळतें, हवेंत जळतें, व भौमद्विप्राणिद (टेलुरिअम डायऑक्साइड) तयार होतें. उज्ज (हायड्रोजन) बरोबर ह्याचा संयोग होऊन भौमित उज्ज (टेल्युरेटेड हायड्रोजन) तयार होतो. ह्याला अतिशय घाण येते. धातूंबरोबर ह्याचा संयोग होऊन गंधकिदा (सल्फाइड्स) सारखीं भौमिदें (टेल्युराइड्स) तयार होतात.

**भ्रम**—१. (हॅल्युसिनेशन्स). ही एक मानसिक अवस्था आहे. या अवस्थेमध्यें रोग्यास कांहीं संवेदनांची जाणीव होते. परंतु त्या संवेदना त्याच्या प्रत्यक्ष इंद्रियांस होत नाहींत. भ्रम आणि गैरसमज या दोन गोष्टींत भेद आहे. कारण गैरसमजामध्यें प्रत्यक्ष इंद्रियांस संवेदना होत असते, परंतु त्याचा अर्थ मात्र भलताच करण्यांत येत असतो. फिनेल या पंडिता प्रथम भ्रमाचा संवेदनांशीं संबंध जोडला. मनुष्याच्या सर्व इंद्रियांस भ्रम एकसारखाच होत नाहीं. श्रवणेंद्रियास भ्रम होण्याचा संभव अधिक असतो. अशा श्रवणभ्रमामधील कानांत मणमणणें हा एक साधा प्रकार आहे. परंतु कांहीं वेळां घड्याळाचे ठोके ऐकूं येणें, वाद्यांचे नाद ऐकूं येणें, किंवा एखाद्या मनुष्याचे शब्द ऐकूं येणें, वगैरे प्रकारचे भ्रम होतात. अशा बाबतींमध्यें प्रत्यक्ष मज्जातंतूस जरी कांहीं विकार झाला नसला तरी संवेदनास्थान अथवा ज्ञानतंतुपीठ यांमध्यें कांहीं तरी बिघाड झाला असणें संभवनीय असतें. एखाद्या विशिष्ट अनुभवामुळें मनुष्याच्या भावना इतक्या उद्दीपित होतात कीं, त्या गोष्टीची आठवण मनुष्य शक्य तों दाबून टाकूं पाहतो व जेव्हां दाबण्याची क्रिया झोंपेमध्यें किंवा इतर वेळीं शिथिल होते तेव्हां त्या अनुभवांची स्मृति उचल करते, आणि त्यामुळें पुन्हां त्या अनुभवाची जाणीव होऊन मनुष्यास एखादा देखावा दिसूं लागल्याचा किंवा कांहीं शब्द ऐकूं आल्याचा भ्रम होऊं लागतो.

२. (डेलिरिअम). उन्माद पाहा. मनाची तात्पुरती विकृति होऊन मनुष्य कांहीं तरी असंबद्ध व असमंजसपणाचें बोलूं लागला असतां त्यास भ्रम झाला असें म्हणतात. हा विकार मेंदूस प्रत्यक्ष इजा झाल्यामुळें किंवा त्याचा दाह झाल्यामुळें उत्पन्न होतो. किंवा ताप वगैरेमध्यें उष्णमान अतिशय वाढल्यामुळें उत्पन्न होतो. कधीं कधीं फार दीर्घकाल एखादें दुखणें किंवा इजा झाल्यानें किंवा ग्लानि आल्यानेंहि होतो.

**भ्रमणप्रेरणा**—( मोमेंट ऑफ इनर्शिआ ). पदार्थामधील द्रव्य, भ्रमणसापेक्ष पदार्थाची स्थिति व भ्रमणवेग ह्यांवरून गणित करून काढलेली ही संख्या आहे. स्थलांतरगति असतांना जडत्व किंवा द्रव्य ( इ. मास ) ह्याला जसें महत्त्व आहे तसेंच भ्रमणगति असतांना भ्रमणप्रेरणेला आहे.

गतिमान पदार्थाला गतीच्या योगानें गतिसामर्थ्य ( कायनेटिक एनर्जी ) प्राप्त होतें. अक्षाभोंवतीं फिरत असलेल्या चक्रासारख्या पदार्थाचें गतिसामर्थ्य भ्रमणप्रेरणा या संख्येएवढें असतें.

**भ्रमिष्टपणा**—( क्रेटिनिझम ). लहान मुलांच्या कंठग्रंथींची क्रिया योग्य प्रमाणांत न झाल्यास त्यांस एक प्रकारचें जें वेड लागतें, त्यास भ्रमिष्टपणा म्हणतात. या रोगाचीं लक्षणें म्हणजे खुजेपणा, डोकें व पोट मोठें, हीं असतात. जर मोठ्या मनुष्याच्या कंठग्रंथी एखाद्या रोगामुळें अथवा इजा होऊन नष्ट झाल्या तर त्यांस यासारखा रोग होतो. हा रोग प्रादेशिक असून डोंगराळ प्रदेशांतील दऱ्यांतून बराच आढळतो. हा रोग झालेल्यास कंठग्रंथिवृद्धीचा रोग होतो. या रोगामध्यें बरीच शारीरिक व्यंगें उत्पन्न होण्याचा व विशेषतः बुद्धिमांद्य येण्याचा संभव असतो. यावर उपचार केले असतां कांहीं उपयोग होण्याचा संभव असतो. परंतु यावर खरा उपचार म्हणजे रोग्यास मेंढीच्या किंवा इतर प्राण्याच्या कंठग्रंथींचा रस किंवा अर्क देणें हा होय. तथापि मेंदूची विकृति पूर्णपणें नाहींशी होत नाहीं.

**भ्रामक**—( जीरोस्कोप ). या यंत्रामध्यें मुख्यतः एक जलद फिरणारें चाक असतें व त्याचा आंस अशा रीतीनें बसविला असतो कीं, तो वाटेल त्या दिशेनें फिरवितां येतो. या यंत्राचा विशेष हा आहे कीं, गुरुत्वाकर्षणाचे नियम लागू असूनहि या यंत्राच्या समतोल स्थितीमध्यें कधींहि बिघाड होत नाहीं. याचें कारण असें कीं, यांतील चाकाची भ्रमण करण्याची प्रवृत्तिच अशी असते कीं, तें नेहमींच एका समपातळींत भ्रमण करीत राहतें; व दुसरी कोणतीहि विरुद्ध प्रेरणा आड आल्यास तिला प्रतिबंध करतें. साधा भोंवरा याच तत्त्वावर फिरत असतो. या भ्रामकाचा उपयोग प्रथम १७७४ मध्यें खलाशी लोकांकरितां एक कृत्रिम क्षितिज उत्पन्न करण्याकरितां करण्यांत येऊं लागला. १८९६ मध्यें ओब्री यानें याचा उपयोग स्वयंप्रेरित पाणतीर अथवा टॉर्पेडो चालविण्याच्या कामीं केला. याच तत्त्वावर एल्मर ए पेरी या अमेरिकन इंजिनियरानें एक होकायंत्र अथवा दिग्दर्शक ( भोंवरा पाहा ) भ्रामक यंत्र तयार केलें. याचा नाविकास फार उपयोग होतो. या होकायंत्रास पृथ्वीच्या भ्रमणगतीपासून प्रेरणा मिळते, व हें होकायंत्र नेहमीं पृथ्वीची अचूक उत्तर दिशा दाखविते. पोलाद व लोखंड यांनीं बांधलेल्या गलबतामध्यें लोहचुंबकाच्या सुईच्या होकायंत्रामध्यें अनेकदां मोठमोठे हेलकावे बसून बरीच अडचण होत असे. तशा तऱ्हेची अडचण या होकायंत्रांत येत नाहीं. स्पेरीनें गलबतें व विमानें एकाच समतोल पातळींत राहण्याकरितां अनेक स्वयंप्रेरित साधनें शोधून काढलीं. गलबत जेव्हां हालूं लागतें तेव्हां त्या हेलकाव्यामुळें या भ्रामकास विरुद्ध गति मिळते व त्यामुळें गलबताच्या हेलकाव्यास प्रतिबंध उत्पन्न होऊन गलबताचा तळ समपातळींत राहण्यास मदत होते. विमानामध्यें स्पेरीनें बसविलेल्या भ्रामकांतील चक्रास विमानाच्या इंजिनाच्या धुरेमध्यें बसविलेल्या विद्युदुत्पादकापासून गति मिळते व त्यामुळें एका गतियंत्रक पड्यावर क्रिया होऊन त्याच्या योगानें सुकाणूवर क्रिया घडून किंवा परिणाम होऊन विमान समपातळींत राहण्यास मदत होते. स्पेरीनें शोधून काढलेला भ्रामक-मार्गदर्शक ( जीरो पायलट ) फक्त ऐशीं पौंड वजनाचा असून विमानास योग्य दिशेनें मार्गक्रमण करण्यास त्याचा फार उपयोग होतो.

**भ्रामकगतियंत्र**—( स्टीम टर्बाइन ). खेळांतील भिरभिरें किंवा वाऱ्यानें फिरणारी पवनचक्की सर्वांच्या अवलोकनांत येतेच. याच तत्त्वावर भ्रामकगतियंत्र बनविलेलें असतें. एखाद्या बंद वाटोळ्या जागेंत आंत फिरणारा जो पंखा बसविलेला असतो, त्या पंख्याचीं जीं पातीं असतात त्यांवर वाफेचा अगर पाण्याचा जोर पडून तो पंखा फिरतो. या यंत्राचा विशेष फायदा हा आहे कीं, त्याची गति एकदम वर्तुळाकार होते. मध्यें कांहीं घालावें लागत नाहीं. यामुळें तें करणेंहि सोपें जातें व त्यास जागाहि कमी लागते ( जलभ्रामक पाहा ). जरी पाण्यांत व वाफेनें चालणाऱ्या भ्रामकगतियंत्रामधलि तत्त्व एकच आहे तरी त्यांच्या आंतील योजनेमध्यें बराच फरक असतो. सारख्याच वजनाच्या वाफेच्या व पाण्याच्या आकारामध्यें फार फरक असतो. वाफेच्या कमीअधिक उष्णतामानाप्रमाणें तिच्या दाबांत व आकारामध्यें फरक होत असतो. यासाठीं वाफेनें चालणाऱ्या यंत्राचे पंखे पाण्याच्या टर्बाइनपेक्षां अगदीं निराळे असतात. वाफेच्या यंत्राचे तीन प्रकार : ( १ ) गतीनें चालणारे, ( २ ) दाबानें चालणारे, व ( ३ ) या दोहोंनीं मिळून चालणारे. वाफेवरील दाब एकदम काढून घेतल्यास अगर कमी केल्यास वाफेचा आकार वाढतो व त्याचबरोबर तेथें अतिशय गतिहि उत्पन्न होते. गतीनें चालणाऱ्या भ्रामकगतियंत्रामध्यें बहुधा एकच पंखा असतो, क्वचित् दोन असतात. याची गति बरीच असते; म्हणजे दर मिनिटास १५,००० फेरे असतात. 'डिलाव्हल' हें भ्रामकगतियंत्र याच जातीचें असतें. दाबानें चालणाऱ्या यंत्रामध्येंहि वाफ पसरत असतेच, पण ती क्रिया हळूहळू होत असते. त्यासाठीं त्या भ्रामकगतियंत्रामध्यें लहानमोठे असे अनेक पंखे असावे लागतात. लहान पंख्याच्या बाजूनें वाफ यंत्रामध्यें

फिरत जाते व प्रत्येक पंखयावर काम करीत करीत ती सर्वात मोठ्या पंखयावर जाते; तोंपर्यंत तिचें प्रसरण पूर्ण होतें. 'पार्सन' भ्रामकगतियंत्र अशा प्रकारचें असतें. याचे फेरे दर मिनिटास ३ पासून ५,००० पर्यंत असतात. कांहीं यंत्रामध्यें या दोन्ही गुणांचा उपयोग करून तीं बनविलेलीं असतात. यांमध्यें पंखे थोडे व ते एकाच आकाराचे असतात. 'कर्टिस', 'रेटो', वगैरे भ्रामकगतियंत्रें या पद्धतीचीं असतात. 'डिलाव्हल' जातीचीं भ्रामकगतियंत्रें अश्वशक्तीपासून ५०,००० अश्वशक्ती-इतकीं लहानमोठीं असूं शकतात. साधारणतः २०० अश्वशक्तीचीं असतात. 'कर्टिस' प्रकारचीं २०० ते ५०० अगर १०,००० अश्वशक्तीचीं असतात. व 'पार्सन' जातीचीं ५०० पासून लागेल तेवढ्या मोठ्या अश्वशक्तीचीं असतात.